# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

९९८

( शरीरखंड. )

हा ग्रंथ

श्रीधर व्यंकटेश केतकर; एम्. ए. पीएच्. डी.

यांनीं

मंडळांतील अनेक साहाय्यकांच्या मदतीनें तयार केला.

## विभाग पंधरावा

---

## तपून—धमन्या

---

ज्ञानं राष्ट्रधनं महत्तममिदं ब्राह्मण्यसंरक्षकम् ।
लोके क्षत्रियवैश्यकार्यघटनासौकर्यसंस्थापकम् ॥
कर्तृत्वागमबोधको ननु भवेज्ज्ञानार्थयत्नोऽधुना ।
ज्ञात्वा नागपुरे सुपण्डितजनैः संघः शुभो निर्मितः ॥

---

१९२५

मुद्रक—डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांनीं ज्ञानकोश छापखाना ८४१ सदाशिव पेठ पुणें येथें छापला.

प्रकाशकः—महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळ लिमिटेड नागपूर, तर्फे श्रीधर व्यंकटेश केतकर,
८४१ सदाशिव पेठ, पुणें.






या विभागांतील विशिष्ट लेख व लेखकः—तेल, दारू, डॉ. वामन द्वारकानाथ कोर्डे. तैलयंत्र, दोर, धक्का, रा. वा. इ. मनोहर. त्रिकोणमिति, प्रो. एस्. बी. वोंडाळे. थिआसफी, रा. रा. स. भागवत. दुधदुभतें, रा. भा. का. घारे.

ज्या विषयावर शाखासंपादक नाहींत त्या विषयाची जबाबदारी संपादकमंडळावर आहे असें समजावें.

——:*S*:——

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश

## अंतरंग परिचय.

प्रस्तुत विभागांत त, थ, द, हीं अक्षरें पुरीं झाली असून थ चीं १२ पृष्ठें झाली आहेत. त्यांचें वर्गीकरणः—

### तपून-स्वष्टा.

**हिंदुस्थान, इतिहास,** वैदिक.—तैत्तिरीय शाखा. पौराणिक.—तक्षक, ताम्रलिप्ति, तारकासुर, तारा, तुंबरु, त्रिपुर, त्रिशंकु, त्वष्टा. प्राचीन हिंदुस्थान.—तक्षशिला, तुंग, तोमर. मुसुलमानी.—तानसेन, तुघ्लक घराणें, तुरुष्क, तैमूर, तोडरमल. मराठे.—ताई तेलीण, तांदुळजाची उर्फ राक्षसभुवनची लढाई, तानाजी मालुसरे, ताराबाई, तुकोजी होळकर, तुळसीबाई, तुळाजी आंग्रे, तोतया भाऊसाहेब, त्रिंबकजी डेंगळे. इंग्रजी अमदानी.– तात्या टोपी. जाती.—तरखन, तलैंग, तवेफ. तागा, तातवा उर्फ तंती, तान्तन, तांबट, तामिळ, तिगळ, तिरगुळ, तुद, तेलगू, तेली.

**वाङ्मय,** जैन.—त्रिषष्टिशलाकापुरुषचरित्र. चरित्रें.—ताताचार्य. मराठी, चरित्रेंः—तर्खडकर दा. पां., तर्खडकर द्दा. रा., तळेकर श्रीकृष्णशास्त्री, तुकाराम, तेलंग. द्राविडी.—तामिळ वाङ्मय, तूलू, तेलगू वाङ्मय. चरित्रेंः-तिक्कन, तिमप्पासाती, तिरुज्ञानसंबंदर, तेनालरामलिंग. बंगाली, चरित्रेंः-तोरुदत्त हिंदी, चरित्रेंः-तुळशीदास, तौसनी. पाली.-तिपिटक.

**प्रादेशिक इतिहास व भूगोल.**—मुंबई इलाखा, महाराष्ट्रः—तळेगांव ढमढेरे, तळेगांव दाभाडे, तळोदें, तान्सा सरोवर, तारापूर, तासगांव, तुरंबे, तुळापूर, तेरदाळ, तोरगुळ, तोरणमाळ, तोरणा, तोरवी, त्र्यंबकेश्वर. कर्नाटक.–तालीकोट. गुजराथ.-ताहेल उर्फ तेम, तापीनदी. इंदूर.–तराणा. बडोदें-तिलकवाडा. ग्वाल्हेर.–तोंवरघर. म्हैसूर.–तरीकेर, तलकाड, तालगुंड, तिपतूर, तिरुमकूडल, तुमकूर, तुरुवकूर, तेरकनांबी, त्याम गोंदल. हैद्राबाद.-तांडूर, तुळजापूर. वऱ्हाड.–तळेगांव दशासर, तेल्हारा. मध्य प्रांत.—तर्मपुरी जमिनदारी, तारापूर, तिरखेड, तिरोडा, तिरथगड, तुमसर. मध्य हिंदुस्थान.–तरोओन, तालबेहट, तिजार, तेओंथर. रजपुताना.–तोडभीम. संयुक्त प्रांत.—तमकुही, तराई, तांडा, तालबहूत, तिरवा, तिल्हर, तेहरी. पंजाब.—तरणतारण, तलगंग, तिरावरी, तोबटेकसिंग, तोहाना. वायव्य सरहद्द प्रांत.–तिराह, तेरी. बंगाल.–तमलुक, तारकेश्वर, तालचेर, तिरहुत, तेकरीराज, तोल्लीगंज, त्रिवेणी. ओरिसा.–तिगिरिया. आसाम.–तुकेश्वरी, तुरा, तेझपूर. ब्रह्मदेश.—तयथिन, तवॉय तिश्यैंग, तिहिम, तिलिन, तेनासरीम, तैकल, तैक्चि, त्सते. मद्रास.—ताडपत्री, ताम्रपर्णी, तिकुली, तिंडिवनम्, तिनालि, तिनेवेल्ली, तिरुक्कलीक्कुनरम्, तिरुकोयिलूर, तिरुचुली, तिरुचेंगोडु, तिरुचेंदूर, तिरुत्तनी, तिरुत्तरैप्पुंडी, तिरुपती, तिरुप्पत्तुर, तिरुप्पुवनम्, तिरुमंगलम्, तिरुमल, तिरुरंगडी, तिरुवन्नमलै, तिरुवल्लम, तिरुवल्लूर, तिरुवादी, तिरुव्वड मरुदूर, तिरुव्वलूर, तिरुव्वादानै, तिरुव्वुर, तिल्लिवेरी, तुंगभद्रा, तुतिकोरिन, तुनी, तुरय्यूर, तेनकासी, त्रांक्विबार, त्रावणकोर, त्रिचनापल्ली, त्रिचूर, त्रिपपूर, त्रिपुनितुर त्रिवेंद्रम्.

**आशिया, हिंदुस्थानेतर,** ऐतिहासिक.—ताहीर, तुघ्रलबेग, तैमूर. प्रादेशिक.—तशकुर्घान (पूर्वतुर्कस्तान), ताशकंद, ताशखुरघन, तिबेट, तिमोर (मलाया), तिमोर लॉट (मलाया), तिस्ता नदी (तिबेट), तुर्कस्तान, तेहरान (इराण), तोबालस्क (रशिया), त्रिकोमाली. जाती.—ताजिक, तातार, तुंगुसे, तुर्क लोक.

**शास्त्रें**—इतिहास साहित्य.-[illegible]. युद्धशास्त्र.—तरवार, तोफखाना. वैद्यक.—[illegible], तुकल्मा लावणें, तोतरें बोलणें, त्रिदोष, त्वक्स्फोट, [illegible] (फोड), त्वगुरुक्षतारोग, त्वग्रोग. वनस्पतिशास्त्र.—तंबाखू, तमाल, तरवड, तरोटा, ताग, ताड, तांदुळजा, ताळ, तुतीचें झाड, तुळस, तूर, तोंडली. ज्योतिषशास्त्र.—तिथी, त्रेतायुग. वास्तुशिल्प.–ताजमहाल. गणित.–त्रिकोणमिति. प्राणिशास्त्र.–तरस. यंत्रशास्त्र.–तारायंत्र, तुंगतामापक यंत्र, तैलयंत्र. रसायन.—तुरटी. खनिज.—तांबें, तेल. तर्कशास्त्र.—तर्कशास्त्र. धार्मिक व सांप्रदायिक.–तिपिटक, त्रिमूर्तितत्त्व, चरित्रें—तिरुमंगई आळवार, तीर्थंकर, तुकाराम.

### थ-थ्रेस.

**हिंदुस्थान, इतिहास,** मराठे.—थोरात. ब्रिटिश.–थिबाराजा. जाती—थोरी.

**प्रादेशिक इतिहास व भूगोल**—मुंबई.–सिंध, थरव पारकर, थान, थाळनेर, थासा, थुल. महाराष्ट्रः–थेऊर. हैद्राबाद संस्थान.—थेर. मध्य हिंदुस्थान.–पालनपूर. पंजाब.—थरोन, थानेसर, थेओग. वायव्य सरहद्द प्रांत.—थल. ब्रह्मदेश.—थत्ती, थटोन, थबीक्यीन,

थवीगन, थवींग, थयेरचळंग, थयेतम्यो, थरवडी, थिबा, थिगोन, थोंख, थोंक्ष.

**यूरोप**—ऐतिहासिक.-थिओडोरा, थिअर्स, थेरॉइने. प्रादेशिक.—थर्मोपिली, थिबिस, थेस्पी, थ्रेस.

**वाङ्मय**, ग्रीक, चरित्रेः—थिओक्रीटस, इंग्रजी.-चरित्रें—थॅकरे. अमेरिकन, चरित्रेः—थोरो. प्राचीन-भाषा.—थई भाषा.

**शास्त्रें**—इतिहासशास्त्र, चरित्रेः—थुसिडाइडिझ. धार्मिक व सांप्रदायिक.—थिऑसफी. तत्त्वज्ञान.-चरित्रेः—थेल्स. वैद्यक.—थॉयरॉइड पिंडवृद्धिरोग, थॉयराइड संकोचनरोग. वनस्पतिशास्त्र.—थिओफ्रेस्टस, थूरेट. यंत्रशास्त्र—थिओडोलाइट. चरित्रेः-थॉमसन जेम्स. भूमिज्ञान, चरित्रें—थॉमसन जोसेफ. उद्योग व कला.-चरित्रें—थॉर्नहिल. अक्षरविकास—थ.

द—द्व्याश्रयकाव्य.

**हिंदुस्थान, इतिहास.** वैदिक.—दधीच, दानव, दास, दिति, दिवोदास, देव, देवयान. पौराणिक.—दंडक, दनु, दमयंती, दर्शक, दशपुर, दशरथ, दशार्ण, दशावतार, दिलीप, दुर्योधन, दुर्वास, दुष्यंत, देवकी, देवयानी, देवलस्मृति, द्रुपद, द्रोण, द्रौपदी, द्वैतवन. प्राचीन हिंदुस्थान.—दळवणपूरचे गंगराजे, दाहीर, दिल्लीचीं हिंदु राजघराणीं, देवगुप्त देवदत्त, देश. रजपूत.—दुर्गादास, दुर्गावती, दुर्लभराज, देवलदेवी. मुसुलमानी.—दाऊदखानपन्नी, दानियल मिर्झा, दानिष्मदखान, दारा, दिलावरखान, दिलेरखान, दुंदेखान, दोस्तअल्ली. मराठे.—दत्ताजी त्रिमल, दत्ताजी शिंदे, दयाबहादुर, दयाराम, दरक-दरकदार, दर्याबाई, दर्यासारंग, दळवाई, दादाजी लोहकरे, दादोजी कोंडदेव, दाभाडे, दिवाकर चोरघोडे, दीपाबाई, दुमाला, दुर्गादेवी, दुर्गाबाई, देवगिरीकर यादव, देवघर (ढमढेरे), देशपांडे-देशमुख-देसाई, देशाधिकारी, दौलतराव शिंदे. इंग्रजी.—दादाभाई नवरोजी, दारू, दिलिपसिंग. जाती.—दनु, दरद, दरवेशी, दर्जी, दसनामी, दहाइत, दांगट, दास, दुबळे, देवरुखे, देवांग, देवार, देवळ.

**प्रादेशिक इतिहास व भूगोल**, महाराष्ट्र.—दण्डक, दक्षिण, दापोली, दाभोळ, दिंडोरी, देवगड, देवराष्ट्र, देवरुख, देहू, दौंड. गुजराथ, काठेवाड.—दमण, दर्दीजानबाई, दसक्रोई, दसार, दांता, दाथा, दाभ, दारोड दाहिदा, दीव, दुधपूर, दुभ्रेज, देदर्द, देदान, देओट, देरडीजानबाईनि, देवलिया, दोहद, द्वारका. कर्नाटक.—देगांवे, देवगिरी, देवीहोसूर, द्वारसमुद्र. सिंध.—दादू, दिपलो, देवल, देरोमोहबत. नेपाळ.—देवपाटण. हैद्राबाद.—देवदुर्ग, देवरकोंडा, दौलताबाद. म्हैसूर.—देवनहळ्ळी, दोडबळ्ळापूर. वऱ्हाड-मध्यप्रांत.—दत्तापूर धामणगांव, दमो, दरेकसा, दर्यापूर, दल्ली, दवा, दहीहंडा, दारव्हा, दिवाणाची इस्टेट, दुधमळा, देऊळगांव, देऊळघाट, देवगांव, देवटेक, देवरी, देवळी, द्रुग. मध्यहिंदुस्थान.—देवास. राजपुताना.—दओस, दिदवाण, देलवाड, देवळिया. पंजाब.—दनखर, दरकोटी, दलहौसी, दसूय, दस्क[illegible] दामी-नानगर, दिपालपूर, देपाळपूर, देलथ[illegible] प्रांत—दीर, दौर. संयुक्तप्रांत.—दनकौर, दर्याबाद, दलमऊ, दातागंज, दिबई, दिल्ली, देवगडकिल्ला, देवप्रयाग, देवबंद, देवरिया, देवल, दोमरियागंज, द्वाराहाट. बंगाल.—दखिनशहाबाजपूर, दत्राजपूर, दमखन, दमरायनराज, दामोदरनदी, दार्जिलिंग, दिनाजपूर, देवीकोट, दैनहाट. बिहार-ओरिसा.—दर्भंगा, दर्भंगाराज, दलमी, दसपल्ला, दाऊदनगर, दिनापूर, देव. आसाम.—दखिनपाट, दफ्ला, दरंग, दिब्रूगढ, दिमापूर, द्वार, द्वारनान्यतिरमेन. ब्रह्मदेश.—दनुबियु, देरधी. मद्रास.—दर्सि, दिंदिगल, दिल्लीमोंट, देवीकोट्टई, दौलेश्वरम्. काश्मीर.—दालतलाव.

**आशिया, हिंदुस्थानेतर**, ऐतिहासिक.—दरायस, दोस्तमुहम्मदखान. प्रादेशिक.—दमास्कस (सीरिया).

**आफ्रिका**, प्रादेशिक-दरवान दक्षिण आफ्रिका, दारेसलाम

**अमेरिका**, दक्षिण अमेरिका.

**ध्रुवप्रदेश**-दक्षिणध्रुवप्रदेश.

**वाङ्मय**, संस्कृत.—दर्शनें, देवीभागवत, द्याश्रयकाव्य. चरित्रें—दण्डी. मराठी.—चरित्रें.—दयाळनाथ, दाढी, दासोपंत, देवनाथ, देवीदास, देशपांडे रा. भो., देशमुख गो. ह. द्राविडी.—द्राविडवेद. पाली.—दीपवंश.

**शास्त्रें**, नाटय, चरित्रें.-देवल गो.ब. व्युत्पत्ति.-देवानंपिय. समाज.-द्राविड संस्कृति. प्राणिशास्त्र.-देवमासा. युद्धशास्त्र.-दारू, दारूगोळा, द्वंद्वयुद्ध. वैद्यक.-दंतवैद्यक, दमा, दूषितरक्तावस्था, दृष्टि, देवी. वनस्पति.-दवणा, दारुहळद, दालचिनी, दिलपसंत, दिविदिवि, दूर्वा, देवदार, देवभात, दोडका, द्राक्षें. पदार्थविज्ञान-दव, दुर्बिण, द्रवगुरुत्वमापक, द्रवीभवन, द्रव्य, भूशास्त्र.-दोआब, द्वीपें. तत्त्वज्ञान-दैववाद, द्वैत उर्फ द्वितत्त्ववाद, कायदेशास्त्र.—दत्तक, दरवडा, दलाल, दिव्य, देहांतशासन. ज्योतिष.—दक्षिणायन, देवयान, चरित्रेंः—दादाभट, दामोदर, दिवाकर, दीक्षित चिंतामणि, दीक्षित शं. बा. अर्थशास्त्र.-दाटी, दाम, दुष्काळ. धार्मिक व सांप्रदायिक.—दत्तात्रय, दयानंद सरस्वती, दर्श, दर्शपूर्णमास, दशावतार, दशाहार, दसरा, दहीकाला, दक्षिणा, दाऊलमलक, दादू, दान, दामाजीपंत, दिगंबरजैन, दिवाळी, दुल्हादेव, दृष्ट, देव, देवक, देव-दासी, देवदूत, देवयान, देवळें, देवी, उद्योग व कला.—दंतमंजन, दुधदुभतें, दोर व दोरखंडें. अर्थनिश्चय.—दश. अक्षरविकास.-द.

ध-धमन्या.

**हिंदुस्थान, इतिहास**, मराठे.—धडफळे, धनाजी जाधव व त्याचा वंश. जाती.—धनगर, धनवार.

**प्रादेशिक**, मुंबई.-धकचा किल्ला, धडगांव किल्ला, धंधुका. मद्रास.—धनकक्ट, आसाम.—धनसिसिरी नदी. वऱ्हाड-मध्य प्रांत.—धनोरा, धमतरी. इंदूर.—धमणार.

**वाङ्मय**, जैन.—धनपाल. संस्कृत-धनुर्वेद, धन्वंतरि.

**शास्त्रें**—ज्योतिष.—धनुर्मास. युद्धशास्त्र.—धनुर्वेद. वैद्यक.—धनुर्वात. धमन्या, चरित्रें.—धन्वंतरी. [illegible]स्पति.—धने. नौकानयन.—धक्का, अक्षर-

आहे. १९०३-०४ साली लागवडीखाली जमीन ९७ चौरस मैल होती. उत्पन्न १,२०,००० रुपये होतें.

**तवयिन**—अपर ब्रह्मदेशांतील श्वेबो जिल्ह्याची एक नैर्ऋत्येकडील तहशील (टाऊनशिप). क्षेत्रफळ ६१५ चौ. मै. पूर्वभाग सपाटीचा असून पश्चिम भागांत टेंकड्या आहेत. लोकसंख्या ( १९११ ) ४५८५९. खेडीं २२१ आहेत.

**तंबाखू**—यास लॅटिन नांव निकोटिआना टबाकम, मराठी तंबाखू, गुजराथी तमाखू, कानडी होगेसोप्पू हीं नांवें आहेत. याच्या सुमारें ४१ जाती आहेत त्यांपैकीं नि. टबाकम, नि. रस्टिका, नि. अलाटा व नि. प्लंवा गिनिफोलिआ या महत्त्वाच्या असून पहिल्या जातीच्या दोन तीन पोटजाती हिंदुस्थानांत होतात. तंवाखूचें रोप सुमारें तीन फूट उंच वाढतें. वरचा शेंडा न खुडल्यास तें पांच फूट सुद्धा उंच होतें. याचीं पानें कुडयाच्या पानासारखीं म्हणजे रुंद व दोन्ही बाजूला निमुळतीं असतात. याचें बीं बोंडांत येतें, तें तुळशीच्या बियाप्रमाणें बारीक असतें. सर्व जगांत युनायटेडस्टेट्स्, हिंदुस्थान, क्यूबा, रशिया व पूर्वेकडील डच लोकांच्या वसाहती—मुख्यत्वेंकरून सुमात्रा—या पांच देशांत तंवाखूची लागवड जास्त प्रमाणांत होते. जगांतील सुमारें ⅔ तंबाखू या पांच देशांत होते. शिवाय हॉलंड, जर्मनी व फ्रान्स देशांतहि याची वरीच लागवड आहे. मात्र तंबाखूचें मूलस्थान दक्षिणअमेरिका आहे. तेथून पोर्तुगीज लोकांनीं १७ व्या शतकाच्या आरंभीं ती हिंदुस्थानांत आणिली. बाबरच्या कारकीर्दीत तंबाखूचा उल्लेख नाहीं. दाराशिकोहिमध्यें स. १५०८ मध्यें दक्षिणेंत प्रथम तंबाखू आली असें म्हटलें आहे. स. १६०५ मध्यें आसदबेगनें विजापूरहून अकबरास तंबाखू पाठविली; जहांगीरनें तंबाखू ओढण्याची मनाई केली होती. १८२९ सालीं ईस्ट इंडिया कंपनीनें मेरीलँड व व्हर्जिनिया या जातीची तंबाखू हिंदुस्थानांत पाठविली. १८७६ सालीं गंगेच्या कांठीं गाझीपूर येथें ८०० एकर क्षेत्राचें एक प्रयोगक्षेत्र स्थापन झालें. तेथें तंबाखू तयार करण्यासाठीं व्हर्जिनियांतून एक प्लँटर आणिला होता. सर्व हिंदुस्थानांत गाझीपुरी तंबाखू चांगली समजली जाते. हल्लीं जास्त प्रमाणांत मद्रास इलाख्यांत गोदावरी व कृष्णा या दोन नद्यांच्या बेचक्यांत लंका नांवाची प्रसिद्ध तंबाखू होते. पंजाबांत व मुंबई इलाख्यांत तंबाखूची वरचि लागवड आहे. त्रिचनापल्ली येथील चिरूटांची सर्व हिंदुस्थानांत प्रसिद्धि आहे.

मुंबई इलाख्यांत १८७२ सालीं हवाना व शिराज ( पर्शियन ) जातीच्या तंबाखूचें बीं आणून त्याची लागवड धारवाड जिल्ह्यांत केली. तथापि तंबाखूची लागवड व नंतर तंबाखू तयार करण्यासंबंधीं प्रयत्न मोठ्या प्रमाणांत खेड जिल्ह्यांतील नडियाद तालुक्यांत १८६५ सालीं सुरू केले. या पिकासंबंधीं आणखी प्रयोग भडगांव ( खानदेश ) येथेंहि करण्यांत आले होते. हल्लीं नडियाद येथें सरकारी शेत असून तेथें तंबाखू तयार करण्या( सुकविणें )संबंधीं हरप्रयत्न करण्यांत आले, तथापि ते सर्व प्रयत्न निष्फळ ठरले. १९१५-१६ सालीं मुंबई इलाख्यांत ८८९३७ एकर क्षेत्र तंबाखूकडे होतें.

हिंदुस्थानांत वेळोवेळीं तंबाखूच्या अनेक जाती आल्या. त्यांपैकीं पूर्वी आलेल्या अमेरिकन जातींना येथें देशी असें म्हणतात. त्या बहुतकरून महाराष्ट्रांत पिकतात. दुसरी जात तुर्कस्तानांतून आली. तिला विलायती असें नांव पडलें आहे. ही उत्तर हिंदुस्थानांत बरीच पिकते. उत्तर गुजराथेंत मुख्य दोन जातींची तंबाखू आढळते. एक आंखूड, वाटोळें पान असलेली तिला शामर किंवा शामरू म्हणतात. दुसरी लांबट, अरुंद पान असलेली; तिला पिलियु म्हणतात. कर्नाटकांतील तंबाखूचें पान अरुंद लांबट, असतें तिला घांटी तंबाखू म्हणतात.

हल्लीं पुसा येथें सिगारेट करण्यास योग्य अशी ' टाईप २८ नांवाची' जात ठरविण्यांत आली आहे. बंगाल्यांत सुमात्रा नांवाच्या जातीचीं पानें चिरूटाला बाहेरून वेष्टण करण्याजोगीं योग्य होतात असें अनुभवास आलें आहे. हिंदुस्थानांतून तंबाखूची निर्गत होते व आयातहि बरीच होते. आयात सिगारेटची किंवा सिगारेट करण्यास लागणाऱ्या तंबाखूची असते व निर्गत बहुतकरून चिरूटाची असते.

गुजराथेंत गोराडू, बेसर व नदीकांठच्या भात जमिनींत, देशावर गांवकुसाच्या पांढऱ्या जमिनींत, नदीच्या मळईंत, खानदेशांत काळ्या जमिनींत व कर्नाटकांत मध्यम काळ्या जमिनींत, सातारा जिल्ह्यांत रेताडलापण व लापण जमिनींत तंबाखू चांगली होते.

उष्ण व दमट हवेंत तंबाखू चांगली पिकते पण ती ओढण्यास नरम असते. तंबाखूचीं पानें नरम करण्यासाठीं ओलसर हवेची जरूर असते. रुक्ष हवेंत पिकणारी तंबाखू फार कडक असते. गुजराथेंत दरसाल त्याच त्या जमिनींत तंबाखू करण्याची विशेष चाल आहे. कर्नाटकांत दोन तीन वर्षांनीं त्याच त्या जागीं तंबाखू फार चांगली येते. गुजराथेंत खेडा जिल्ह्यांत जमीन दोन तीन वेळ नांगरतात, समार नांवाची फळी फिरवून ढेकळें फोडितात व जमीन सपाट करतात. तेथें कित्येक शेतकरी एकरीं ५० गाड्यांपर्यंत शेणखत देतात, पण सर्वसाधारणपणें २० गाड्या देण्याची चाल आहे. ज्या ठिकाणीं सोय असेल अशा ठिकाणीं सोरा असलेलें विहिरीचें पाणी देतात. नडियाद तालुक्यांत पाण्यांत सोऱ्याचा अंश असलेल्या बऱ्याच विहिरी आहेत. तंबाखूचें रोप मिरच्यांप्रमाणेंच तयार करितात. खेडा जिल्ह्यांत पुष्कळ ठिकाणीं तरव्याकरितां राब भाजतात व कांहीं ठिकाणीं मेंढ्यांच्या लेंड्या, शेणखत, तळ्यांतील गाळ वगैरेखेर रोप करतात. तरव्यांत पहिल्या पावसाळ्याबरोबर बीं टाकतात. बीं फार बारीक असल्यामुळें तें वाळूंत अथवा मातींत मिसळून पेरतात म्हणजे सारखें पेरलें जातें. सुमारें २००

फुटांच्या वाफ्यांत चार औंस बीं टाकलें म्हणजे एका एकराला रोप पुरतें. लागण करण्याची वेळ १५ ऑगस्टपासून १५ सप्टेंबरपर्यंत असते. लागण संध्याकाळीं अगर ढगांची छाया असेल त्यावेळीं करावी म्हणजे रोपें कोमेजत नाहींत. रोप लावल्याबरोबर पाण्याचा 'चुळा' द्यावा. कित्येक प्रसंगीं, जेथें पाणभरतें पीक करावयाचें असतें तेथें लागण १५ ऑक्टोबरपर्यंतहि करतात.

खेडा जिल्ह्यांत लागणीसाठीं जिसाळीनें चौक पाडतात व दोन हमचौरस लागण करतात. देशावर येडताक नांवाच्या हत्यारानें किंवा दोरीला चिंध्या बांधून जमिनीवर लागणीसाठीं खुणा करतात व तीन फूट अंतरानें लागण करतात. साधारणपणें ४–५ कोळपण्या व दोन तीन खुरपण्या देतात. कर्नाटकांत कोरडवाहू पिकाला दर दहा दिवसांनीं कोळपणी देतात. खुरपणीच्या वेळा बुडख्याजवळील पिकलेलीं पानें काढून टाकतात. पाण्यानें तंबाखूचें उत्पन्न वाढतें म्हणून ज्या ठिकाणीं पाण्याची सोय असेल तेथें पाणी देतात. गुजराथेंत ३–४ वेळ पाणी देतात. कर्नाटकांतलि पीक बहुतेक कोरडवाहू असतें. रोपें लाविल्यापासून साडेचार पांच महिन्यांत म्हणजे मार्गशीर्ष–पौषांत तंबाखू तयार होते. पानांवर पिंगट रंगाचे फोड दिसूं लागले म्हणजे तीं कापण्यास तयार झालीं म्हणून समजावें.

कोळपणी, खुरपणी, पाणी देणें यांशिवाय पीक तयार होईपर्यंत खुडण्याचें काम फार महत्त्वाचें आहे. झाडांवर फुलांचा गोंडा आला म्हणजे त्याबरोबरच वरील पानांसहित तो खुडतात. जमिनीच्या मगदुराप्रमाणें झाडावर दहा बारा पानें राहूं देतात, बाकी काढून टाकतात. गोंडा खुडल्यावर राहिलेलीं पानें जोमानें वाढून तीं दळस होतात. शेंडा खुडल्यानंतर कांहीं दिवसांनीं झाडाच्या बगलेंत फूट होऊं लागते. ती जसजशी होईल तसतशी खुडून टाकतात. ती दर आठ वड्यास काढावी लागते. ही फूट राहूं दिल्यास इतर पानें अगदीं पातळ व रोगट दिसूं लागतात. सर्व पिकांपैकीं कांहीं झाडें न खुडतां बियांकरितां राखतात. कोरडवाहू पीक पाणभरतीपेक्षां लवकर तयार होतें. बांधणीचें काम स्थानिक प्रघातावर व बाजारांतील मागणीवर अवलंबून असतें. देशावर व कर्नाटकांत पेंड्या बांधतात. गुजराथेंत लहान लहान जुड्या बांधतात. तंबाखू तयार करण्याच्या दोन पद्धती आहेत. एक पेंड्या बांधण्यापूर्वीची व दुसरी बांधल्यानंतरची. पिकाची कापणी दोन तऱ्हेनें करतात. पहिली तऱ्हा सबंध झाड कापणें व दुसरी नुसतीं पानें काढणें. पहिली पद्धत देशावर प्रचलित आहे; ती येणेंप्रमाणेः— झाडें कापून झालीं म्हणजे तीं नऊ ते अठरा दिवसपर्यंत वाळवितात. तीं वाळत घालतांना एकाशीं एक झाड ठेवून लांबच्यालांब ओळी पसरतात. मध्यंतरीं यास दोन तीन चाळवण्या द्याव्या लागतात. ह्या ओळींची लांबी सुमारें १०० फूट व रुंदी १६ फुटांपर्यंत असते. हीं तंबाखूचीं झाडें पानाची मधली शीर वाळेपर्यंत उन्हांत ठेवतात. झाडें वाळल्यावर खड्ड्यांत पुरतात. खड्ड्याची लांबी–रुंदी तंबाखूच्या क्षेत्रावर अवलंबून असते. पण सर्वसाधारण खड्डा १४ फूट लांब, ७ फूट रुंद व ३ फूट खोल असतो. खड्ड्यांत झाडें भरण्याच्या पूर्वी त्याच्या चारी बाजूला व तळाला बाजरीचें सरमड पसरतात. नंतर पहांटे पांच वाजतां ज्यावेळीं झाडें दहिंवरानें नरम झालेलीं असतात त्यावेळीं तीं वाहून आणून सरमडावर खड्डा भरेपर्यंत झाडावर झाड रचतात. भरतांना सर्व बुडखे बाहेरील बाजूस रहातील अशी तजवीज करतात. मग त्यावर एक कामळें (घोंगडी) हांतरून वर पुन्हां सरमडाच्या पेंढ्या घालतात व त्यावर सुमारें चार अंगुळें जाडीचा मातीचा थर देतात. हीं खड्ड्यांतील तंबाखूचीं झाडें दोन रात्री ठेवून तिसऱ्या दिवशीं सकाळीं तीं खड्ड्यांतून बाहेर काढून लगेच घरीं नेतात व एका कोंपऱ्यांत रचून झांकून ठेवतात. पुढें पानें काढणें व जुडया बांधणें हें काम दोन तीन दिवसांत करावें लागतें. पानें नरम असतात तेव्हां तें सोपें जातें. नाहीं पेक्षां पानांवर थोडें पाणी शिंपावें लागतें. जुडया बांधतांना बाहेरील बाजूला चांगलीं पानें व आंतील बाजूस चुरमुडलेलीं, चाराचुरा वगैरे घालून जुडया (पेंडया) बांधितात. प्रत्येक पेंढी सुमारें तीन फूट लांब व दीड फूट रुंद असते. पेंडया तयार झाल्या म्हणजे त्या उघडया हवेंत वाळवितात. पहिल्यानें जमिनीवर एक कडबीचा थर देऊन त्यावर पेंढी व पुन्हां कडबा असा थराआड थर देत देत त्या पेंडयांची उंची सुमारें तीन ते चार फूट होईपर्यंत ढीग करतात. असे अनेक ढीग करतात. हे ढीग दर तीन दिवसांनीं चाळावे लागतात व अशा चाळवण्या पांच सहा द्याव्या लागतात. तंबाखूला चांगला रंग चढावा म्हणून कित्येक शेतकरी रोशा गवतानें पाणी तयार करून तें तीं खड्ड्यांत घालतांना त्याच्या वर शिंपडतात.

दुसरी पद्धत गुजराथेंत आढळते. तींत पुन्हां खाण्याची व ओढण्याची तंबाखू निरनिराळ्या रीतीनें तयार करतात. खाण्याकरितां झाडांचीं पानें कापून तीं शेतांत आठ दिवसपर्यंत वाफ्यांत ठेवून वाळवितात. नंतर सकाळच्या प्रहरीं पानें दंवानें भिजलीं असल्यास तशीं व भिजलीं नसल्यास पाण्याचा हपका मारून नरम करून नंतर गोळा करून चादरींत बांधून घरीं आणतात. त्यानंतर ५० ते ७० पानें एकावर एक ठेवून त्याच्या जुडया बांधितात. त्या एकावर एक ठेवून वर चादर घालून वर दडपण ठेवितात. पुन्हां दोन तीन दिवसांनीं त्या चाळतात. अशा चार पांच चाळवण्या झाल्या म्हणजे तंबाखू विकण्यास तयार होते. उत्तरगुजराथेंत 'लिलावा' म्हणून एक प्रकारची तंबाखू तयार करतात. या पद्धतींत पानें तयार झाल्यावर तीं कापून पांच पांच पानें एके ठिकाणीं बांधतात व या जुडया सावलींत दोरी बांधून तिला अडकवितात. हीं पानें रंगांत फरक न होतां वाळतात. तीं वाळलीं म्हणजे शिरा काढून घेऊन

तंबाखूचा हातानें चुरा करतात. ही जी हिरवी पूड तयार होते तिला ' लिलावा ' म्हणतात. या पुडीच्या विड्या करतात. खेडा जिल्ह्यांत तंबाखू तयार करण्याच्या तीन तऱ्हा आहेत.

(१) कालियुं:—ही ओढण्याकरितां उपयोगांत आणतात. या पद्धतींत तीन तीन पानें एकावर एक ठेवून तीं चार दिवस वाळवितात. नंतर घरांत आणून तीं एक दोन दिवस दडपून ठेवितात. नंतर पानाच्या जुड्या बांधून ढीग करतात व ते ढीग दर दोन दिवसांनीं परततात.ही क्रिया साधारणपणें १५ दिवस चालते. तयार झालेल्या तंबाखूचा रंग काळापिंगट असतो. दर एकरीं उत्पन्न सरासरी १००० ते १४०० पौंड पानें येतें.

(२) जरदो( पिंवळ्या रंगाचा ):—यांत दोन प्रकार असतात: (अ) ओढण्यासाठीं-याच्या पिकाला गोडें पाणी देतात. ( आ ) तपकिरीसाठीं व खाण्यासाठीं जें पीक करितात त्याला खारें पाणी देतात. पानें तोडण्याच्या अगोदर पिकाला खूप पाणी देतात, नंतर पानें काढून तीं ओल्या वाफ्यांत ८ दिवस वाळवितात. ओलाव्यामुळें पानें सावकाश वाळून पानांचा रंग पिंवळा धमक उठतो. व तीं गोळा करून आणून वर वर्णन केल्याप्रमाणें जुड्या बांधतात. सरासरी दर एकरीं उत्पन्न खाऱ्या पाण्याचें २५००-३००० पौंड व गोड्या पाण्याचें १०००-१४०० पौंड होतें.

(३) चोपडी( वुकाप्रमाणें )—या पद्धतींत तंबाखू तयार करण्याची पद्धत मरद्याप्रमाणेंच असून पानें दहा बारा दिवस वाळवितात. दर एकरीं सरासरी उत्पन्न १००० ते १५०० पौंड असते.

**तबारी** (८३८-९२३ ).—हा अरबी इतिहासकार व धर्मशास्त्रज्ञ अमोल येथें जन्मला. राइ बगदाद, सिरिया व ईजिप्त येथें त्याचें शिक्षण झालें. बापाच्या मृत्यूनंतर स्वतःच्या पायावरच याला उभे रहावयाचें असल्यामुळें त्याला अत्यन्त दरिद्रावस्था आली. लवकरच तो वजिराच्या मुलाचा शिक्षक झाला. तो ईजिप्तमध्यें गेला पण लवकरच त्याला बगदाद् येथें परत यावें लागलें. तेथें तो मरेपर्यंत परंपरागत धर्माचा व कायद्याचा शिक्षक होता. त्याचा जीवनक्रम साधा पण उदात्त असून तो अत्यन्त उद्योगी होता.त्यानें सर्व मतांवर टीका करून आपला नवीनच संप्रदाय काढला; यामुळें त्याजवर हनबाली पंथाच्या लोकांचा रोष झाला होता. पैगंबरांचा व राजांचा इतिहास व कुराणावर टीका असे त्याचे दोन मुख्य ग्रंथ आहेत.

**तमकुही**—संयुक्त प्रांताच्या गोरखपूर व बस्ती जिल्ह्यांत आणि बंगालच्या मुजफरपूर ,दरभंगा, सारन आणि गया या जिल्ह्यांत ही एक इस्टेट आहे. या इस्टेटींत २५३ खेडीं आहेत. उत्पन्न २.८ लक्ष रुपये आहे. भुइनहार ( भूमिहार ) हे या इस्टेटीचे मालक असून ते रजपुतांचे वंशज आहेत. यांचा मूळपुरुष सारन जिल्ह्यांतील हास्वा येथील राजा फत्तेसाही हा होय. याच्या मुलांनीं इस्टेटीची धुळधाण उडवून दिली, परंतु पुढें सुमारें १८३०-४० च्या दरम्यान याच्या नातवानें पुन्हां तमकुहीची इस्टेट परत मिळविली. याला राजा ही पदवी होती. या ठिकाणीं हल्लीं ईश्वजित प्रताप बहादूरसाही नांवाचा राजा आहे.

**तमलुक**,पो ट वि भा ग.—बंगाल इलाख्यांतील मिदनापूर जिल्ह्याचा एक पूर्वेकडील पोटविभाग. क्षेत्रफळ ६५३ चौरस मैल आहे. ह्या पोटविभागाची जमीन सुपीक आहे, व येथें तांदुळाचें पीक चांगलें होतें. लोकसंख्या ( १९११ ) ६०१५०२. मोठें गांव तमलुक असून खेडीं १५७८ आहेत. गिओनखाला हें व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे.

गां व.—हें जुनें ताम्रलिप्ति नगर होय. सध्याचे राजे हंस घराण्यांतील असून जातीनें रजपूत आहेत. हें गांव पूर्वी बंदर असून याच ठिकाणीं चिनी यात्रेकरू 'फाहिआन' हा जहाजांत बसून सिलोनाला गेला. ह्युएनत्संग म्हणतो कीं, या ठिकाणीं १० बौद्ध मठ व १००० बौद्ध भिक्षू होते. याशिवाय २०० फूट उंचीचा अशोकानें बांधलेला स्तंभहि येथें होता. येथें रूपनारायण नदीवर काली देवीचें देवालय आहे. देवालयाच्या सभोंवतीं ६० फूट उंचीची विचित्र तऱ्हेची भिंत आहे देवीची मूर्ति एकाच दगडाची केलेली असून ती शंकराच्या मांडीवर बसविली आहे. देवालयाच्या आवारांत केळी कदंब नांवाचें झाड असून त्याच्या दर्शनानें, ज्या बायकांना मुलें होत नाहींत, त्यांना पुत्रप्राप्ति होते असें म्हणतात.

**तमाल**—या झाडास लॅटिनमध्यें सिनॅमोमम् तमाल, कासिया लिग्निया, कासिया सिन्यामन् व इतर भाषांत ताज, किका, किरकीरिया, सिंकामी, छोटा सिंकोली, तुपसोर, दोपत्ती, तमाल इत्यादि नांवें आहेत. समुद्रसपाटीपासून सुमारें ३००० ते ७००० फूट उंचीपर्यंतच्या प्रदेशांत हीं झाडें वाढतात. हीं झाडें मध्यम आकाराचीं असून सिंधु व सतलज ह्या दोन नद्यांमधील प्रदेशांत तुरळक आढळतात. परंतु पूर्वबंगाल, खासिया टेंकड्या व ब्रह्मदेश यांमधून तीं पुष्कळ होतात. या झाडाच्या सालींपेक्षां पानांचें जास्त महत्त्व आहे व या पानांचा व्यापार बऱ्याच प्राचीन काळापासून सुरू होता असा अंदाज आहे.

ला ग व ड.—खासिया व जैंटिया टेंकड्यांतून ६ चौरस मैल जमिनीवर या झाडांची लागवड केलेली होती. ही लागवड बहुधां बागांतून फणस व सुपारीचीं झाडें यांबरोबर करतात. खूप पाऊस व कडक ऊन जेथें आळीपाळीनें पडतें तेथें या झाडांची वाढ सपाट्यानें होते. परंतु झाडाच्या बुडाशीं एकसारखा बराच ओलावा असल्यास पानांचा वास कमी होतो. खासिया व जैंटिया टेंकड्यांतून यांची लागवड करातांना झाडें ७फूट अंतरावर लावतात बिया वाफ्यांतून पेरतात. व पांच वर्षांचे रोपे झाल्यावर ते कायमच्या जागीं लावतात. सुमारें दहा वर्षांचें झाड झाल्यावर त्यापासून

उत्पन्न होऊं लागतें व पुढें जवळ जवळ शंभर वर्षे या झाडापासून उत्पन्न घेतां येतें. ही लागवड टेंकड्यांवरील लोकच करतात. सिलहट्टमध्यें पिकलेल्या बिया खाली पडून आपोआप रोपें उगवतात. रोप सुमारें एक फूट उंच झाल्यावर दुसरीकडे काढून लावितात. यांची लहानपणी फार काळजी घ्यावी लागते व कडक उन्हापासून त्यांना इजा होऊं नये म्हणून आजूबाजूस झाडेंझुडपें लावून यांचें संरक्षण होईल अशा तऱ्हेनें त्यांची लागवड करतात. कांहीं मळ्यांतून जमिनीची मशागत करतात परंतु कांहीं ठिकाणीं तसें करण्याची जरूर नसते.

पानें जमा करणें.—तमालाच्या पानांची तोड करितात. आक्टोबरपासून डिसेंबरपर्यंत व कांहीं ठिकाणीं हें काम मार्च पर्यंतहि चालतें. कोंवळया झाडांचीं पानें वर्षांतून एकदां व जुन्या व रोगट झाडांचीं पानें एक वर्षाआड खुडतात. एका झाडापासून सरासरी १५ शेर पानें निघतात. परंतु अनुकूल स्थितींत त्यांचें उत्पन्न २५ शेरसुद्धां होतें. जैंटिया परगण्यांतील ४०० एकरावरील पिकाचें उत्पन्न १९०४-०५ सालीं ११०० रु. झालें. पानें खुडण्याच्या वेळीं लहान लहान फांद्या पानांसुद्धा तोडतात व नंतर त्या दोन तीन दिवस उन्हांत वाळवितात. कधीं कधीं फांद्या व पानें एकत्र व कधीं कधीं तीं निराळीं करून त्यांचे गठ्ठे बांधितात. हे गठ्ठे मजूर लोक घाटांतील रस्त्यांतून सिलहट्टमध्यें आणितात. रोपें करण्याकरितां सिलहट येथील बिया चांगल्या असतात.

उपयोग.—पानांपासून रंग व सिरका तयार होऊन त्याचा भाजीच्या मसाल्यांतहि उपयोग करतात. तमालपत्र एक तसूभर रुंद असून सुमारें चार पांच अंगुलें लांब असतें. तमालपत्र मधुर, बलकर व शीत असून श्रम, दाह, कफ, शैत्य, विस्फोट व पित्त यांचा नाश करतें. संस्कृत ग्रंथांत याचा उल्लेख पुष्कळ आहे.

**तरखन**—पंजाबांतील एक जात. लो. सं. ६४६३३०. हे हिंदु, शीख व मुसुलमानहि आहेत. भागलपूर संस्थान खेरीज सर्व प्रांतांत हे आढळून येतात. आसामांतहि यांची वस्ती २०८७१ आहे. ते सुतार असून कधीं कधीं ते व लोहार यांच्यामध्यें मुळींच भेद दिसत नाहीं. त्यांना बढाई, धाधी व खाती असेंहि म्हणतात. लोहाराप्रमाणें तरखन हा खेड्यांतील एक महत्त्वाचा कारागीर आहे.

**तरणतारण**, *तहशील.—पंजाब. अमृतसर जिल्ह्यांत* ही एक तहशील आहे. या तहशिलींत तरणतारण व वैरावल हीं दोन मोठीं गांवें असून तरणतारण हें तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. या तहशिलींतील जमीनीला बारीदुआब कालव्याचें पाणी पुरविलें जातें.

गांव.—पंजाब. अमृतसर जिल्ह्यांत त्याच नांवाच्या तहशिलीचें हें गांव मुख्य ठिकाण आहे. हें गांव येथें असलेल्या पवित्र तलावामुळें प्रसिद्ध आहे. हा तलाव शीख लोकांचा पांचवा गुरु अर्जुन यानें बांधला असें म्हणतात. तलावाच्या उत्तरेकडील बाजूवर राजकुमार नवनिहालसिंग यानें उंच खांब उभारला आहे. या तलावांतील पाण्यानें कोड नाहींसें होतें असें म्हणतात. लोखंडाचीं भांडीं वगैरे सामान येथें तयार होतें.

**तरवड**—यास लॅटिनमध्यें कासिया ऑरिक्युलाटा, मराठींत तरवड, संस्कृतमध्यें शरपुष्प, अवुर व देशी भाषेंत चांभारआवळी अशीं नांवें आहेत. तरवडाच्या जातींत बऱ्याच वनस्पती, झुडुपें झाडें यांचा समावेश होतो. त्याच्या सुमारें ३८० उपजाती आहेत, व त्यांची वाढ उष्ण प्रदेशांतून होते. हिंदुस्थानांत १८ उपजाती आढळतात. त्यांचीं फुलें सुंदर असतात व त्यांचा उपयोग औषधी कामाकरितां व कातडीं रंगविण्याकडे केला जातो.

वस्तुक्षेत्र.—तरवडाचें झुडुप उंच असून राजपुतान्याच्या दक्षिणेकडील मध्यहिंदुस्थान, दक्षिणहिंदुस्थान व ब्रह्मदेशाच्या कांहीं भागांतून पुष्कळ उगवतें. खडकाळ टेंकड्यांवरून व काळ्या जमिनींतहि त्यांची वाढ होते.

उपयोग—कातडी कमाविण्यास याच्या सालीचा उपयोग करितात. सालींतील कातडीं कमाविण्याचें द्रव्य फार कमी दर्जाचें आहे असें प्रोफेसर ह्यूमेल व प्रॉक्टर यांच्या शोधांवरून सिद्ध झालें आहे. मद्रासच्या उत्तरेकडील भागांतून तिळाचें तेल काढतांना तरवडाची साल किंवा थोडा हिंक त्यांत मिसळतात. डोळे येऊन पू फार येऊं लागला म्हणजे तरवडाच्या बियांचा औषधासारखा उपयोग करितात तरवडाचीं पानें थंड पाण्यांत कांहीं तास भिजत घालून जो कषाय होतो तो दाहनाशक आहे. लहान लहान फांद्यांचा दांत स्वच्छ करण्यासाठीं कुचल्यासारखा लोक उपयोग करितात व लोखंडाला पाणी चढविण्यास मुळ्यांचा चांगला उपयोग होतो असें म्हणतात. चहाच्या ऐवजीं याच्या पानांचा काढा पितात व दुष्काळांत लोक भाजीपाल्याप्रमाणें पानांचा उपयोग करितात. तरवडाचें झाड साधारण तीन चार हात उंच वाढतें. याचीं पानें टाकळ्याच्या पानासारखीं असतात. यास पिंवळ्या रंगाचे फुलांचे घोस येतात. याच्या शेंगा चापट असून टीचभर लांब असतात. साल काढल्यानंतर राहिलेलीं लांकडें सर्पणास उपयोगीं पडतात.

उपजाती.(१) कासिया ॲबसस्:—चकसु, चिमर अथवा चितोल आणि बानार हीं याला इतर नांवें आहेत. ही वनस्पति सर्व हिंदुस्थानभर विपुल आढळते. जुलाबाकरितां व डोळे आल्यावर याच्या बियांचा औषधासारखा उपयोग करितात.

( २ ) विलायती आगटी.—यालाच कांहीं लोक दद्मर्दन असें म्हणतात हीं झुडपें हिंदुस्थानांतील बगीच्यांतून आढळतात. वेस्टइंडीज बेटांतून हीं झुडपें पहिल्यानें इकडे आलीं. गजकर्ण व नायटे यांवर याचीं पानें व्हॅसलीनमध्यें खलून लावितात.

(३) भुईतरवडः—याला कधीं कधीं देशी सेन्ना, जमेका सेन्ना व इटालिअन सेन्ना असें म्हणतात. हिंदुस्थानाच्या बहुतेक सर्व भागांतून यांचीं रोपें आढळतात. बाजारांत हलक्या प्रतीचा सेन्ना म्हणून भुईतरवडच विकतात.

(४) कासिया ऑक्सीडेंटॅलिस--यालाच निग्रो कॉफी, कसौंडी, कसुंदा, हिकल, कलका, सुंद असें म्हणतात. हें एक लहान झुडुप असून सर्व हिंदुस्थानभर ओसाड जागेंत व रस्त्याच्या बाजूला हें पुष्कळ जागीं आढळतें. हें आरंभीं अमेरिकेंतून इकडे आलें असावें. या झुडपाचीं पानें, मुळ्या व बिया औषधी आहेत. बियांची पूड करून कॉफीच्या ऐवजीं वापरतात. त्या पित्तहारक आहेत.

(५) जंगली टाकळा:—कासिया सोफेरा, काळी कसौंदा, काळकसौंदा, बनर हीं त्याचीं इतर नांवें आहेत. उष्ण कटिबंधांतून व सर्व हिंदुस्थानभर टाकळा आढळतो. टाकळ्याच्या बिया, साली व पानें रेचक असून गजकर्णाला पानांचा रस काढून लावितात. या खेरीज तरोटा, वाहवा व सोनामुखी हीं याच जातींत मोडतात.

**तरवार** ( तलवार )—'तरवारि' असा शब्द संस्कृत शब्दकोशांत सांपडतो व त्याचा उपयोग 'मालतीमाधव' या संस्कृत नाटकांत केलेला आहे. तथापि हा प्राचीन वैदिक शब्द नसून तरवारवाचक ' असि ' हा शब्द वेदवाङ्मयांत आहे. इंग्रजी शब्द 'सोवर्ड ' हा ' स्वृ ' = प्रहार करणें ह्या संस्कृत धातूपासून झाला असावा असें भाषाशास्त्रज्ञांचें म्हणणें आहे.

फेंकून मारण्याचीं धनुष्यबाणादि हत्यारें आणि लांब लांकडी दांड्याला धातूचें पातें बसवून केलेलीं हत्यारें या दोहोंहून तरवार हें हत्यार अगदीं निराळ्या प्रकारचें आहे. तरवारीचे दोन भाग असतात. एक भाग हातांत धरण्याची मूठ व दुसरा भाग लांब पातें. खरी उत्तम तरवार धातू-खेरीज इतर कशाचीहि करतां येणार नाहीं. हिंदुस्थान व इराण या देशांची तरवारीबद्दल-विशेषतः तरवार व इतर हत्यारांनां पाणी उत्कृष्ट प्रकारें देण्याबद्दल-प्रसिद्धि आहे. यूरोपांतहि अनेक देशांत तरवारी तयार करतात पण त्यांत इंग्लंडचीच विशेष प्रसिद्धि असून तेथें ज्यांत अनेक पिढ्या हा धंदा चालत आलेला आहे अशीं अनेक घराणीं अद्याप आहेत. आधुनिक यांत्रिक शोधांचा उपयोग तरवारी करण्यांत फारसा होत नाहीं. उत्तम तरवारी हातानेंच तयार कराव्या लागतात व त्याला फार उच्च प्रकारचें हस्तकौशल्य लागतें. अनेक प्रकारच्या व कमजास्ती लांबीरुंदीच्या तरवारी उपलब्ध असून त्यांत सरळ व वांकदार असे आकारासंबंधाचे दोन मुख्य भेद आहेत, आणि त्यांपैकीं सर्व दृष्टींनीं अधिक योग्य आकार कोणता, हें प्रत्यक्ष अनुभवानंतरहि ठरविणें कठिण आहे. फ्रेंचांनीं स. १८२२ पासून दोनचारदां सरळ व वांकदार आकारांत आलटापालट करून पाहिलें. तरवारीचा उपयोग कापणें व खुपसणें अशा दोन कामांकरितां करतात; आणि कापण्याला वांकदार तर खुपसण्याला सरळ आकार उपयोगी पडतो; परंतु हातघाईच्या लढाईंत तरवारींचा उपयोग खुपसण्याकडे करावा कीं वरून घाव मारण्याकडे करावा हा प्रश्न सोडवणें मोठें कठिण आहे. १८ व्या शतकांत आतांपर्यंत तुर्की घोडेस्वारांच्या तरवारीहल्ल्याची यूरोपीय सैन्यांना मोठी भीति वाटत असे, व त्याचें कारण तुर्कांच्या मोठ्या वांकदार तरवारी होय, अशी समजूत असल्यामुळें यूरोपांतहि अनेक शतकें वांकदार तरवारी करण्याची रूढि होती. ग्रेटब्रिटननें १९०८ सालीं तरवारींनां खुपसण्याच्या कामाच्या दृष्टीनेंच सरळ आकार देण्याचें ठरविलें.

इ ति हा स.—रानटी लोकांच्या हत्यारांत लांकडाच्या व दगडाच्या तरवारी सांपडतात. आफ्रिदी व अफगाण लोकांत मोठाले सुरे असतात त्या आंखुड तरवारीच होत. वस्तुतः तरवार व खंजीर यांचा आकार सारखाच असून लांबींत फरक असतो आणि ऐतिहासिक दृष्ट्या खंजीर हेंच तरवारीचें आद्यस्वरूप असावें. प्रथम तांब्याच्या व नंतर ख्रि. पू. २००० च्या सुमारास ब्रॉंझ धातूच्या तरवारी करीत असत; आणि ख्रि. पू. १००० ते ७०० च्या दरम्यान लोखंडाच्या तरवारी होऊं लागल्या, असें प्राचीन यूरोपीय संशोधनावरून ठरलें आहे. पौरस्त्य देशांत वैदिक काळापर्यंत तरवारीचा पत्ता लागतो पण त्यापूर्वीच्या काळाबद्दलचें संशोधन झालेलें नाहीं. रजपूत, मुसुलमान, शीख, मराठे वगैरे सर्व लोकांत तरवारीचें प्रामुख्य दिसून येतें. जपानांत दोन्ही हातांनीं धरून तरवार वापरण्याची पद्धत आहे.

भ वा नी त र वा र.—शिवाजीजवळ तुळजा व भवानी या नांवाच्या दोन प्रख्यात तरवारी होत्या; पैकीं विशेष ख्याति भवानीची आहे. ही गोवळकर सावंतावर स्वारी केली असतां मिळाली. सावंताला तीनशें होन देऊन व पोषाक वगैरे देऊन ही विकत घेतली. पुढें तिला भवानी हें नांव शिवाजीनें देऊन व ती 'प्राप्त जालियावरी बहुत यशस्वी जाली (म्हणून) तिची पूजा नित्यनेमें आदरेंकरून करिते झाले '. ही वंशपरंपरेनें सातारकर छत्रपतींच्या जवळ होती. ती लंडन येथें ब्रिटिश म्यूझियममध्यें आहे अशी गोष्ट कांहीं सांगतात; परंतु ती खोटी आहे. कारण ब्रि. म्यू. च्या अधिकाऱ्यास विचारण्यांत आलें असतां त्यानें भवानी तेथें नसल्याचें प्रसिद्ध केलें आहे. सांप्रत ती सातारा येथील महाराजांच्या जलमंदिरांतील देवघरांत पूजेंत ठेविलेली आहे. तिचें मेण रत्नजडित असून त्यांत ११७ माणकें, १२ हिरे व २ पाच आहेत. तरवारीची लांबी ३॥ हात असून, मुठीपासून १॥। हातपर्यंत हिची धार एकेरी आहे आणि त्यापुढें शेवटपर्यंत दुहेरी आहे. तिच्या पात्यावर राजछत्राची(छत्रपतींच्या )एक टिंबाटिंबाची आकृति व "सरकार राजा शाहुछत्रपति काद +++ CACA" असा लेख आहे. शाहूनें कदाचित् हा कोरविला असावा. अद्यापि वाळंतीण अडल्यास हिचें तीर्थ दिल्यानें तिची सुटका होते अशी साताऱ्यास लोकसमजूत आहे. [ भा इ. सं. षष्ठसंमेलनवृत्त. पृ. १८४. ]

**तरस**—हा एक मांसाहारी पशुवर्गांतील प्राणी आहे. याचे पंजे जाड, आंखूड आणि अतिशय बळकट असतात. याचा जबडा अतिशय बळकट असून त्यांत ३४ दांत असतात; त्यानें तो अति कठिण हाडें सहज फोडूं शकतो. त्याचे मागचे पाय आंखूड असून मानेपासून शेंपटीपर्यंच्या कण्यावर लांबट आणि राठ केस असतात. याचा आकार कांहींसा कोल्ह्यासारखा असून रंग करडा असतो. हा विशेषतः हिंदुस्थान, इराण आशियामायनर, उत्तर आणि पूर्व आफ्रिका या देशांत आढळतो. हा पुरलेलीं प्रेतें शोधून उकरून खाण्यांत मोठा पटाईत आहे हा सर्व दिवसभर गुहेंत पडून राहून सूर्यास्तावरोवर भयंकर आरोळ्या ठोकीत भक्ष्याच्या शोधार्थ बाहेर पडतो. याचें भक्ष्य प्रायः वहीरी ससाणा, मेंढया आणि कुत्रे हें होय. हा स्वभावानें भित्रा पण कावेबाज प्राणी आहे.

याची दुसरी एक जात दक्षिण आफ्रिकेंत आढळते. त्या जातींतील प्राण्यांच्या अंगावर ठिपके असतात, रंग पिंगट असतो व गळ्याभोंवती लहानशी आयाळ असते. हाहि दिवसभर गुहेंत पडून असतो. याचें मुख्य खाद्य समुद्रांतील मासे, खेंकडे, इतर जनावरें आणि क्वचितप्रसंगीं व्हेल मासा हें असतें.

**तराई**—संयुक्तप्रांत. नैनिताल जिल्ह्याचा हा एक दक्षिणेकडील भाग आहे. यांत वाजपूर, गदरपूर, किछा, किलपुरी, नानकमता आणि बिल्हेरी हे परगणे आहेत. या भागांत ४०४ खेडीं आहेत पण एकहि मोठें गांव आढळत नाहीं. या भागाची बहुतेक सर्व व्यवस्था सरकारतर्फेंच होते.

**तराणा**--मध्यहिंदुस्थान, संस्थान इंदूर महिदपूर जिल्ह्यांतील एका परगण्याचें हें गांव मुख्य ठिकाण आहे. येथें आढळणाऱ्या अवशेषांवरून हें गांव एका काळीं फार मोठें असावेंसे वाटतें. १८०० सालीं हें गांव होळकराच्या खास जहागिरींतलें होतें. होळकर घराण्यांतील सुप्रसिद्ध अहल्याबाईनें या ठिकाणीं 'तिळभांडेश्वरा' चें देवालय बांधलें व पुष्करणी झाडें लाविलीं. पुढें अहल्याबाईच्या मुलीचें लग्न यशवंतराव फणसे याच्यावरोवर झालें व त्यावेळेस हें गांव त्याला मिळालें. सन १८४९ पर्यंत फणसे घराण्यांतच हें गांव होतें. परंतु राजाभाऊ फणसे याच्या वाईट वर्तनावरून हें गांव त्याच्या ताब्यांतून गेलें.

**तरीकेर, तालुका**.—संस्थान म्हैसूर, कडूर जिल्ह्यामध्यें हा एक उत्तरेकडील तालुका आहे. यांत तरीकेर व अज्जमपूर हीं दोन मोठीं गांवें असून, तरीकेर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. यांत पूर्वेकडील जमीन काळी असून तींत गहूं, कापूस, बंगाली चणे, आणि जोंधळा इत्यादि धान्यें चांगलीं पिकतात. या तालुक्यांत अज्जमपूरजवळ सोन्याची खाण आहे.

गांव.—म्हैसूर, जिल्हा कडूर. तरीकेर तालुक्याचें हें गांव मुख्य ठिकाण आहे. सन १४०० मध्यें विजयानगरच्या राजानें हें गांव जाहीज करून आपल्या सेनापतीला दिलें. सेनापतीच्या घराण्यापासून हें गांव विजापूरच्या सुलतानानें घेतलें. पुढें १७६१ सालीं हें गांव हैदरअल्लीनें घेतलें. येथें १८९९ सालीं रेल्वे सुरू झाली व तेव्हांपासून हें गांव वरेंच वाढलें.

**तरोंअन**--मध्यहिंदुस्थानांतील चौवे जहागिरींपैकीं ही एक जहागीर आहे. ही जहागीर बाघेलखंडच्या पोलिटिकल एजंटच्या देखरेखीखालीं आहे. जहागिरींत फक्त १३ खेडीं असून उत्पन्न १०,००० रुपये आहे. चौवे ब्रिजगोपाल हा हल्लीं जहागिरीचा मालक आहे.

**तरोटा**.--या वनस्पतीस कासियाटोरा, फोटिडकासिया, चकुंदा, पानेव्हर, पानवर, कोव्हरिया, कोवरिया, इत्यादि इतर नांवें आहेत. बंगाल व हिंदुस्थानच्या उष्ण भागांतून दर वर्षी उगवणारी ही वनस्पति आहे. गजकर्ण व नायटे यांवर तरोटा लावितात म्हणून त्याला संस्कृत भाषेंत चक्रमर्द असें म्हणतात. निळीवरोवर तरोट्याच्या बियांचा उपयोग करतात व यामुळें रंगारी नेहमीं त्या विकत घेतात. या बिया भाजून त्यांच्या पुडींचा उपयोग कॉफीच्या ऐवजीं करतात.

**तर्कशास्त्र**—प्राचीन तर्कशास्त्रास 'न्याय' म्हणत असत आणि त्याच्या दोन पद्धती प्रचलित होत्या. एक न्याय [ पहा ] व दुसरी वैशेषिक [ पहा ]. या दोहोंचें विवेचन अन्यत्र केलेंच आहे. केवळ प्रमाण म्हणून गृहीत धरलेल्या विधानांवरून अनुमानपरंपरा कशी काय काढावी हाहि तर्कशास्त्राचा भाग धरल्यास तोहि प्राचीनांनीं वाढविला होता असें दिसून येईल या ज्ञानांगाचें विवेचन प्राचीनांनीं "मीमांसा" या दर्शनांत घातलें आहे ( विज्ञानेतिहास पृ. २१६-२६ 'मीमांसा' लेख पहा ). म्हणजे प्राचीन भारतीय तर्कशास्त्र जाणावयाचें असल्यास दोन न्याय व मीमांसा या तिहींचा साकल्यानें अभ्यास केला पाहिजे.

अर्वाचीन तर्कशास्त्र म्हणजे शास्त्रीय ज्ञानाचें तर्कशास्त्र होय. हें अजून बाल्यावस्थेंतच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं अनेक शास्त्रांत संशोधनासाठीं कोणत्या रीती वापरल्या जातात त्यांचें पद्धतशीर विवेचन व तदंतर्गत अनुमानपद्धतींचें व्यवस्थीकरण होईल तेव्हां हें तर्कशास्त्र भक्कम पायावर उभारलें गेलें असें होईल. विज्ञानेतिहास (पृ.३-१४) यांत शास्त्ररचनेचें-तर्कशास्त्र आणि शास्त्रेतिहास हीं कशीं तयार केलीं गेलीं पाहिजेत या संबंधानें-स्थूल विवेचन केलेंच आहे.

**अर्वाचीन तर्कशास्त्र**.—या लेखांत या विषयाचे दोन विभाग केले आहेत ते ( १ ) तर्कशास्त्राचे प्रश्न, व ( २ ) यूरोपांतील सातत्य हे होत.

(१) प्रश्नविवेचन:—तर्कशास्त्र म्हणजे अनुमान कसें काढावें या प्रक्रियेसंबंधाचें शास्त्र. अनुमान म्हणजे काय ? हा यांत महत्वाचा विषय होतो. अनुमान म्हणजे अनेक पूर्वविधानें

एकत्र करून त्यांच्या पासून जो निर्णय काढावयाचा त्यास हें नांव आहे. एका पूर्वविधानापासूनहि अनुमान काढतां येतें असें एक मत आहे, पण सूक्ष्मपणें पाहिल्यास तसल्या एका विधानामध्येंच अनेक विधानें अंतर्भूत झालेलीं दिसतात. उदा. सर्व मनुष्यें कांहीं प्राणी असतात; म्हणून कांहीं प्राणी मनुष्य असतात. यावरून हें दिसून येईल कीं, अनुमान निवण्याकरितां निदान दोन विधानें असलींच पाहिजेत. अशीं दोन विधानें एकत्र करण्याचे तीन मुख्य प्रकार आहेत ते:—

( अ ) उपमानमूलक ( अनॉलॉजिकल ) अनुमान, विशेषापासून विशेष ( पर्टिक्युलर ). उदा. इंग्रज व अफगाण यांचें सरहद्दीवरील युद्ध अनर्थावह आहे; इंग्रज व तिबेटी लोक यांच्या सरहद्दीवरील युद्ध इंग्रज--अफगाण युद्धासारखें आहे; म्हणून, इंग्रज--तिबेटियन युद्ध अनर्थावह आहे.

( आ ) प्रत्यक्षसंकलनमूलक ( इंडक्टिव्ह ) अनुमान, विशेषापासून सामान्य ( फ्रॉम पार्टिक्युलर टू युनिव्हर्सल ); उदा. इंग्रज--अफगाणमधील सरहद्दीवरील युद्ध अनर्थावह आहे; सर्व सरहद्दीवरील युद्धें इंग्रज--अफगाण युद्धासारखीं असतात; म्हणून सर्व सरहद्दीवरील युद्धें अनर्थावह असतात.

( इ ) आप्तवाक्यमूलक ( डिडक्टिव्ह उर्फ सीलॉजिस्टिक ) अनुमान, सामान्यापासून विशेष ( फ्रॉम युनिव्हर्सल टु पर्टिक्युलर ). उदा. सर्व सरहद्दीवरील युद्धें अनर्थावह असतात; इंग्रज--अफगाणांचें हें सरहद्दीवरील युद्ध आहे; म्हणून इंग्रज--अफगाण युद्ध अनर्थावह आहे.

या वरील एकंदर वाक्यांमध्यें तीन मानसिक निर्णय ( जजमेंट ) असून ते तीन पृथक् वाक्यांत सांगितले आहेत; आणि त्यांपैकीं दोन एकत्र करून त्यांच्यापासून तिसरें अनुमान काढलें आहे. वरील वाक्यांमध्यें एक 'सामान्यशब्द' ( मेजर टर्म ), एक 'विशेषशब्द' ( मायनर टर्म ), आणि एक 'संयोगीशब्द' ( मिडल टर्म ) असून, ज्या वाक्यामध्यें संयोगी व सामान्यशब्द आलेले आहेत त्याला 'सामान्यविधान' ( मेजर प्रेमिस ) व ज्या वाक्यामध्यें संयोगी व विशेष शब्द आलेले आहेत त्याला 'विशेषविधान' ( मायनर प्रेमिस ) म्हणतात. वरील उदाहरणांत 'इंग्रज—अफगाण युद्ध' हा विशेष शब्द आहे; 'अनर्थावह' हा सामान्यशब्द आहे; आणि 'सरहद्दीवरील युद्ध' संयोगी शब्द आहे. 'सामान्यशब्द' = स, विशेषशब्द = प, आणि संयोगीशब्द = म अशा संज्ञा योजून वरील तिन्ही अनुमानें पुढीलप्रमाणें मांडतां येतील.

| उपमानमूलक | इंडक्टिव्ह | डिडक्टिव्ह |
|---|---|---|
| $प^{1}$ स आहे. | प, स आहे. | प्रत्येक म स आहे. |
| $प^{2}$ $प^{1}$ सारखा आहे. | प्रत्येक म, स सारखा आहे. | प म आहे. |
| ∴ $प^{1}$ स आहे. | ∴ प्रत्येक म, प आहे. | ∴ प स आहे. |

इंडक्टिव्ह ज्ञान व अनुमान या दोहोंत फरक आहे इतकेंच नव्हे तर त्या पद्धती परस्परविरुद्ध आहेत. इंडक्टिव्ह पद्धतींत विशेष विधान सामान्य विधानाला किंवा सिद्धांताला पुरावा म्हणून देण्यांत येतें तर उलटपक्षीं "डिडक्टिव्ह" पद्धतींत सामान्य विधान हें विशेष विधानाला पुरावा म्हणून देण्यांत येतें. अशा तऱ्हेचें भाष्य इंग्रज ग्रंथकारांनीं केलेलें आढळतें. पण त्यांत फारसें महत्त्व नाहीं. डिडक्टिव्ह आणि इंडक्टिव्ह या दोन्हीं स्वतंत्र पद्धती मानण्याचें कारण नाहीं. कांकीं प्रत्यक्ष आणि अनुमान यांचा अनेकदां उपयोग जींत होतो तिलाच पद्धति म्हणतां येईल.

अनुमान व उपमान यांमध्येंहि मोठा फरक आहे, कारण विशेष विधानावरूनच विशेषविधान केलेलें असतें, आणि साधारण सादृश्यावरून निर्णय दिलेला असतो. उपमानामध्यें अनुमानाइतका प्रत्यक्ष पुरावा नसतो. उदा० पृथ्वी व मंगळ या दोन ग्रहांचें कांहीं बाबतींत सादृश्य पाहून हे दोन्ही ग्रह सर्वच बाबतींत सारखे आहेत असा निर्णय देतात आणि पृथ्वीप्रमाणें मंगळावरहि मनुष्यवस्ती असली पाहिजे असें ठरवतात. अर्थात या निर्णयाला प्रत्यक्ष पुरावा नसल्यामुळें हा निर्णय विश्वसनीय नाहीं. इंडक्टिव्ह अनुमानहि नेहमीं विश्वसनीय नसतें, कारण त्यांत एक किंवा अनेक विवक्षित उदाहरणांवरून सर्वसामान्य सिद्धांत ठरवण्याचा प्रयत्न केलेला असतो. तथापि या तिन्ही तर्कपद्धतींत साम्य असून तिहींचा 'तर्कशास्त्र' या विषयांत अन्तर्भाव होतो.

बिनचुक अनुमानें कशीं काढावीं हा तर्कशास्त्राचा विषय असल्यामुळें त्याची इतर सर्व ज्ञानविषयांनां मदत होते. तथापि तर्कशास्त्राचा निकट संबंध अतींद्रियविज्ञान (मेटॅफिजिक्स) व मानसशास्त्र (सायकॉलजी) या दोन विषयांशीं येतो; कारण हे तिन्ही विषय म्हणजे मनाच्या व्यापारांचे निरनिराळे प्रकार आहेत. 'अतिंद्रिय विज्ञान' इंद्रियांनां अगोचर पण मनाला आकलन होणाऱ्या अशा गोष्टींचा उहापोह करतें; आणि तर्कशास्त्र अनुमानें काढतांना जी मानसिक क्रिया होते तिचा विचार करतें. बिनचुक अनुमानाप्रमाणें चुकीचीं अनुमानें कोणतीं, याचाहि विचार तर्कशास्त्रांत केलेला असतो, त्या भागाला 'हेत्वाभास' (फॅलसीज) म्हणतात.

तर्कशास्त्रापैकीं प्रत्यक्ष संकलनमूलक ( इंडक्टिव्ह ) अनुमानपद्धतीला अलीकडील शास्त्रीय संशोधनामुळें विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे, कारण सर्व प्रकारच्या शास्त्रीय संशोधनांत कांहीं थोडक्या प्रत्यक्ष प्रयोगांवरून ( उदाहरणांवरून ) सर्वसामान्य अनुमान किंवा नियम ठरवावयाचा प्रयत्न असतो; अशा प्रयत्नांत चुका होऊं नयेत म्हणून अनुमानें काढतांनां कोणत्या गोष्टी विशेष लक्षांत ठेवावयास पाहिजेत याबद्दल विस्तृत उहापोह करण्याची पद्धति अलीकडील तर्कशास्त्रज्ञांनीं पाडली आहे. शास्त्रीय संशोधनां...

नुकतांच प्रवेश करूं पाहणाऱ्या महाराष्ट्रीय वाचकांना याची माहिती व महत्त्व विशेष लक्षांत घेणें जरूर असल्यामुळें त्या बद्दल सविस्तर विवेचन "शास्त्रीकरण", "विज्ञानशास्त्र" या स्वतंत्र लेखांत देत आहों.

भौतिक शास्त्रांप्रमाणें नीतिशास्त्र, राजनीतिशास्त्र, समाज शास्त्र, तत्त्वज्ञान, यांची प्रगतीहि अलीकडेच होत आहे. हीं शास्त्रें मागसण्याचें कारणहि, तर्कशास्त्राच्या 'इंडक्टिव्ह अनुमान पद्धति' या अंगाची वाढ १७ व्या शतकापूर्वी झाली नव्हती हें होय.

(२)यू रो पां ती ल सा त त्य.- हें आपणांस वरेंच चित्त-वेधक दिसतें. तात्त्विक अनुमानपद्धतीचा विकास आपल्या-पेक्षां यूरोपांत अधिक झाला असें म्हणतां येणार नाहीं, आणि हेत्वाभासांचें ज्ञानहि यूरोपांत आपल्यासारखेंच वाढलें. किंबहुना असेंहि म्हणतां येईल की, तर्कशास्त्राच्या तात्त्विक बाबतींत आजची प्रगति प्राचीन यूरोपांत किंवा हिंदुस्थानांत झालेल्या प्रगतीच्या पेक्षां जास्त झाली नाहीं.

पाश्चात्त्य देशांत तर्कशास्त्राचा उदय प्रथम प्राचीन ग्रीक लोकांमध्यें झाला. व्यवस्थित वादविवाद करण्यासंबंधानें झेनोची प्रसिद्धि झाली. तथापि तर्कशास्त्राच्या वाढीला सोफिस्ट पंथी ग्रीक विद्वानांची मोठी मदत झाली; त्यांपैकी साक्रे-टीस हा प्रमुख होय. त्यानें इंडक्टिव्ह तर्कपद्धति या शाखेची विशेष वाढ केली. यानंतर प्लेटोनें नवें डायलेक्टिक् किंवा लॉजिक हा विषय विशिष्ट स्वरूपांत मांडला. डायले-क्टिक हें ज्ञानशोधनाचें शास्त्र न म्हणतां बौद्धिक कुस्तीचें शास्त्र म्हणतां येईल.

आरिस्टाटलनें सोफिस्ट व प्लेटो यांच्या परिश्रमाच्या पाया-वर अनुमानशास्त्राची पद्धत तयार केली, पण तिचा जो उत्तर कालीन विकास स्कूलमेन वगैरेंच्या तावडींत झाला. त्यांत तर्कशास्त्रांत केवळ वादविवादांत हल्ला व प्रतिकार करण्याची कला यांचेंच स्वरूप मिळालें. आपल्याकडेहि तो प्रकार झाल्याशिवाय राहिला नाहीं. "छल" "वितंडा" असल्या प्रकाराच्या आभासात्मक वादविवादाचे प्रकार तशाच काल-मीत निघाले. आघातप्रत्याघाताच्या कार्यासच जेव्हां ही पद्धति उपयोगांत येऊं लागली तेव्हां लॉजिक हें ज्ञानसाधन नसून ती केवळ एक वाद जिंकण्याची कला आहे असें यूरो-पांत मानूं लागले. ग्रीकांच्या अलंकारशास्त्राचीहि गोष्ट तशीच आहे. "न्हेटोरिक्स" या शास्त्राचा जन्महि यूरोपांत "केस" जिंकण्यासाठीं लागणारी विद्या या स्वरू-पांत झाला,तशीच प्रथम सोफिस्टांची व नंतर स्कूलमेनच्या तावडींत "लॉजिक" असतां त्याचीहि गोष्ट होती.

तथापि "शास्त्र" या नात्यानें त्या विद्येस स्वरूप, हिंदुस्थानांत तसेंच यूरोपांतहि प्राप्त झालें होतें. दोन्ही ठिकाणीं तर्कशास्त्राचें स्वरूप केवळ खटला जिंकण्याकरतां तयार केलेली विद्या असें शास्त्रीय ग्रंथकारांनीं मांडलें नसून जगद्विषयक सत्य जाणण्याचें शास्त्र या दृष्टीनेंच त्याचें विकसन मांडण्यांत आलें. आपल्या इकडच्या वैशेषिकांचें तर्कसंग्रहासारखें लहानसें पुस्तक पाहिलें तरी या गोष्टी आपणांस दृश्यमान होतील. जगांतील एकंदर वस्तू आणि कल्पनाविषय हीं एकत्र घेऊन त्यांचें वर्गीकरण करण्याचा प्रयत्न, द्रव्यगुणादि गोष्टींचें पृथक्करण, "लक्षणाची" बरोबर व्याख्या, व्याप्ति-अव्याप्तीची कल्पना, ज्ञानाचीं कारणें शोध-ण्याचा प्रयत्न, कारणांचें साधारण,असाधारण व निमित्त असें वर्गीकरण, संबंधाचें वर्गीकरण, या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या असतां आपल्याकडील तर्कशास्त्र म्हणजे केवळ वादविवादांत जय मिळविण्याची विद्या या दृष्टीनेंच अभ्यासिलें गेलें होतें असें म्हणतां येणार नाहीं. व आरिस्टाटलच्या ग्रंथाकडे पाहिलें म्हणजे तेंच कबूल करावें लागेल.

आरिस्टाटलच्या हातांत "लॉजिक" हें शास्त्र बनलें, व तें पुढें धार्मिक वादविवादाच्या कामीं लागून केवळ वादविवादाची कला बनलें, व सत्यशोधनाकडे याचा उपयोग यूरोपांतील मध्ययुगांत कधीं कमीं होऊं लागला. आपल्याकडेहि तशीच स्थिति झाली. धार्मिक मंडळीस ' घटपटादि खटपट " जुगुप्सात्मक वाटूं लागली आणि त्यापासून धार्मिक मनोवृत्ती सोडविल्या पाहिजेत असें वाटूं लागलें आणि शास्त्रीय अभ्या-साचा उदय होण्याची क्रिया झाली नाहीं पण ती यूरोपांत झाली. "लॉजिक" हें "सिद्ध करण्याची" कला नसावी पण "शोधण्याची कला" व्हावी म्हणून विचारी मंडळींत प्रयत्न झाला आणि त्या प्रयत्नाचें फल म्हटलें म्हणजे प्रत्येक शास्त्रांत शोध करण्याच्या पद्धती निर्माण करण्यांत आल्या. समोर आलेल्या पुराव्यांतील सत्य कसें काढावें याविषयींचे आलेले अनुभव एकत्रित करण्यांत येऊं लागले. आणि प्रत्येक शास्त्राबरोबर त्या शास्त्राची संशोधनपद्धति जुळविण्यांत येऊं लागली. कायशास्त्रामध्यें पुराव्याचा कायदा आहे तो अनुभवाचा समुच्चय आहे. इतिहाससंशोधनामध्यें सत्य शोधण्यासाठीं जे कठोर नियम आज वापरले जातात तेहि अनुभवाचे समुच्चय होत. प्रत्येक अभ्यासक्षेत्रांतील अभ्यास्य वस्तूंचें संकीर्णत्व जाणणें आणि संकीर्णत्वामुळें सत्य गूढ कसें होतें हें जाणणें आणि संकीर्णत्व पृथक्करण करून सोपें करणें, व उपलब्ध पुराव्यांतून नियमित सत्य काढणें या क्रिया करण्यासाठीं समाजशास्त्रकार व अर्थशास्त्रकार यांनींहि पद्धती तयार केल्या आहेत. त्या सर्व प्रत्यक्षसंकलन आणि अनुमानपरंपरा याहींकरून संयुक्त आहेत.

अनेक शास्त्रांचा अभ्यास आणि त्यांत संशोधन करण्याची इच्छा यांचा परिणाम याप्रमाणें तर्कशास्त्रावर होत गेला आणि त्या तऱ्हेची प्रवृत्ति उत्पन्न करण्याचें बरेंचसें श्रेय इंग्लंडमधील तत्ववेत्ता बेकन यास आहे. गणिताच्या विका-साचाहि परिणाम तर्कशास्त्रावर होऊं लागला. आणि संभ-वनीयतेची मोजदाद त्याबरोबर होऊं लागली आणि केवळ प्रत्यक्ष तर्क उर्फ एमपिरिक पद्धतीचा उदय झाल्यामुळें केवळ अनुमानपरंपरेनें जें निघेल तेंच सत्य या तऱ्हेच्या आग्रही

पद्धतीस घराच आला मसला. बेकनला त्याची परंपरा चालविणारे इंग्लंडांत जे अनुयायी भेटले ते व्हेवेल, व जान स्टुअर्ट मिल हे होत. त्यांची विचारपद्धति लॉकच्या "ज्ञान" विषयक विचारपद्धतीस जुळेल.ी होती आणि त्यामुळे इंग्लंडचें तर्कशास्त्र आणि इंग्लंडची ज्ञानमीमांसा एकमेकांस मिळती झाली. इंडक्टिव्ह आणि डिडक्टिव्ह अशी या पद्धतीची नांवें देण्यासंबंधाची मांडणीहि झाली पण त्यांत अर्थ नाहीं. प्रत्येक चांगल्या संशोधनांत प्रत्यक्षावलोकन, त्यावरून अनुमानें, पुन्हां अनुमानानें जें निघेल त्याची प्रत्यक्षानें तपासणी या सर्व क्रिया येतातच. आणि यामुळें या सर्व क्रियांस एक ग्रंथकार डिडक्टिव्ह म्हणतो व दुसरा इंडक्टिव्ह म्हणतो व दोघेहि उगाच भांडत असतात, असा घोटाळाहि फार झाला आहे. स्पेन्सरनें असें दाखविलें आहे कीं, शास्त्रीय ज्ञान म्हणजे सामान्य ज्ञानाचेंच अनुमानपरंपरेने वृद्धिंगत झालेलें स्वरूप होय.

"लाजिक" ची इंग्लंडमध्यें वाढ झाली ती केवळ शास्त्रीय ज्ञानाचें हत्यार या दृष्टीनें झाली. पण जर्मनीमध्यें जी वाढ झाली ती विज्ञानशास्त्राचा एक भाग या दृष्टीनें झाली. या पद्धतीचें जर्मन विस्तरण म्हटलें म्हणजे शास्त्रांचें पद्धतशीर वर्गीकरण करण्याचा प्रयत्न होय. यांत लाम्बनिच, वोल्फ, आणि लांबर्ट यांनीं भाग घेतला आणि सिगवार्ट यानें लाजिक हें पद्धतीचें शास्त्र म्हणून तयार केलें आणि ज्ञान कसें मिळतें, मनाचें स्वरूप काय, यांविषयीं जें खोल विचार करणें झालें त्याची पद्धति आणि "लाजिक" च्या पाठीमागें असलेलें "मानसशास्त्र" पहाण्याचे प्रयत्न होऊं लागले. या तऱ्हेनें प्रयत्न करण्यांत बेकन हा प्रमुख होता. यानें लाजिकमध्यें "तात्कालिक बोध सिद्धान्त", (थिअरी आफ अपरसेपशन्स) घालण्याचा प्रयत्न केला. मनांतल्या मनांत होणाऱ्या अनुमानपरंपरा व संस्कार हे सर्व "तात्कालिक बोधाचे अंश आहेत" अशी त्यानें मांडणी केली. पुढें कांटनें मेटाफिजिक्सचा म्हणजे अतिभौतिक विद्येचा आणि तर्कशास्त्राचा संबंध जोडण्याचा प्रयत्न केला. कांटचा प्रयत्न मुख्य असा कीं, ज्ञानाचें कारण केवळ बाह्य वस्तु नव्हे. "मनोघटनेचा" ज्ञानाशीं निकट संबंध आहे. ज्ञान हें बाह्य वस्तूचा केवळ परिणाम नसून आपल्या मनाच्या गूढ शक्तींचा परिणाम आहे इत्यादि. याप्रमाणें कांट हा ज्ञानाचीं मूलभूत कारणें पाहून तीं तर्कशास्त्रास जोडण्याची क्रिया करूं लागला. हेगेलनें ही क्रिया फारच जोरानें पुढें नेली आणि त्या क्रियेचें थोड्याबहुत फरकानें संवर्धन करणारे अभ्यासक म्हटले म्हणजे वेरडेर, रोझनक्रँटस, व कूनोफिशर हे होत. परंतु पुढें जर्मनींतच हो "लाजिक" ची अतिभौतिक उर्फ मेटयाफिजिकल मांडणी अप्रिय होऊं लागली आणि यांत प्रामुख्यानें कार्य करणारे ग्रंथकार म्हटले म्हणजे उवरव्हेक, ड्रोबिश, लोट्स, बूल, प्रसिद्ध तत्ववेत्ता वुंट आणि प्रंटल हे होत. बूलचें लॉजिकचें गणिती पद्धतीनें पृथक्करण करण्याचें कार्य पुष्कळ झालें आहे. कांट आणि हेगेल यांनीं तर्कशास्त्राचा आणि एकंदर जगाच्या वस्तुज्ञानाचा संबंध जोडण्याचा प्रयत्न केला तो भारतीयांस अपरिचित नाहीं. आपल्याकडे तर्कग्रंथांमध्यें अनुमानपद्धतीवर विवेचन जसें सांपडतें तसें मनावर व विश्वांतर्गत वस्तुमात्रावर व कल्पनाविषयावर विवेचन सांपडतें. आणि यामुळें प्राचीन संस्कृत ग्रंथकारांच्या मनोरचनेचें त्यांत थोडेंबहुत साम्य भासल्याशिवाय रहात नाहीं. *"न्याय", "मीमांसा", "विज्ञानशास्त्र", "शास्त्रीकरण", "क्लमेन", "हेगेल"* इत्यादि लेख पहा. [ संदर्भग्रंथः—ग्रंथकारांचीं व ग्रंथांचीं नांवें लेखांत आलींच आहेत ब्राकहाऊस, व ब्रिटानिका या दोन्ही ज्ञानकोशांतील भिन्न प्रकारचे लेख पाहून तुलना करण्याजोगे आहेत. ]



**तर्खडकर, दादोबा पांडुरंग** (१८१४–१८८२)—वैश्य; यांचा जन्म मुंबईत झाला. प्राथमिक शिक्षण मुंबईत एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटमध्यें झालें; विद्यार्थी असतांनाच यांनीं आपलें मोठें व्याकरण लिहून प्रसिद्ध केलें व मराठी नकाशे छापले. विद्यार्थ्यांस त्यांचा फार उपयोग झाला. १८६५ सालीं सरकारच्या आज्ञेवरून यांनीं लघुव्याकरण लिहिलें; हल्लीं त्याची २२ वी आवृत्ति प्रसिद्ध झाली आहे. 'दादोक्त' व्याकरणाच्या साहाय्यानें मराठी भाषेचें ज्ञान सर्व महाराष्ट्रीयांस झालें आहे व होत आहे. याशिवाय यांनीं पर्शियन व संस्कृत व्याकरणें लिहिलीं आहेत. यांनीं शाळाखात्यांत काम करून फार वाहवा मिळविली; १८५७ सालच्या शिपायांच्या बंडाच्या वेळीं अहमदनगरास भिल्लांनीं बंड केलें, त्यावेळीं हे नगरास डे. कलेक्टर होते; मोठ्या चातुर्यानें यांनीं भिल्लांचें बंड मोडलें; सरकारनें रावबहादूर ही पदवी देऊन यांचा गौरव केला. १८६२ सालीं यांनीं पेन्शन घेतलें. कांहीं दिवस बडोद्याच्या दिवाणाचे हे मदतनीस होते. हे चांगले लेखक होते. यांच्या 'लघु' आणि 'मोठ्या' व्याकरणग्रंथाशिवाय शिशुबोध, यशोदा पांडुरंगी, इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत. हे कविताहि करीत; प्रार्थनासमाज हें नांव पुढें ज्या सभेला मिळालें ती परमहंससभा यांनींच स्थापन केली. यांचा मृत्यु १७ आक्टोबर १८८२ रोजीं झाला.

**तर्खडकर, द्वारकानाथ राघोबा** (१८४६–१९०४)—वैश्य; जन्म मुंबईत व प्राथमिक शिक्षण पुण्यास झालें; कॉलेजशिक्षण पुरें झाल्यावर यांना सरकारनें लॅटिन टीचर नेमिलें. यांनीं पुष्कळ ठिकाणीं हेडमास्तरची नोकरी केली व १८९९ सालीं पेन्शन घेतलें. यांनीं लिहिलेल्या 'भाषांतर पाठमाला' सुप्रसिद्ध आहेत. यांचे अखेरचे दिवस ईश्वरभजनांत गेले. नाशिक येथें यांनीं गंगाबाईचें देवालय बांधलें आहे. यांचा स्वभाव प्रेमळ व परोपकारी होता. मृत्यु ता. ४ आक्टोबर १९०४ सालीं झाला.

**तर्मपुरी जमीनदारी**—जिल्हा भंडारा. साकोलीच्या उत्तरेस ५ मैलांवर ही जमीनदारी आहे. क्षेत्रफळ १४ चौरस

मैल; त्यापैकीं ¾ जंगल आहे. एकंदर खेडीं ७ आहेत. ही जमीनदारी ह्यांच्या घराण्याकडे १७३२ सालापासून असून ती प्रथम मांडलाच्या गोंड राजांनीं दिलेली आहे. हें घराणें मान जातीचें असून ह्यांची जमीनदारीण विधवा आहे. जमीनदारीला कर्ज असून तें हप्त्यांनीं फेडण्याची व्यवस्था झाली आहे. उत्पन्न १०५० रु. व टाकोळी ७५० रुपये.

**तलकाड**—जिल्हा म्हैसूर. तिरुमकूडल–नरसीपूर तालुक्यांत हें गांव कावेरी नदीच्या उत्तर तीरावर वसलें आहे. हें गांव इ. स ३०० पासून तों इ. स. ११०० पर्यंत गंग नांवाच्या राजांचें राजधानीचें शहर होतें. पुढें चोल राजांनीं गंगांचा पराभव करून हें गांव आपल्या ताब्यांत घेतलें. कांहीं दिवसांनीं हें गांव म्हैसूरच्या नाइकाच्या ताब्यांत होतें. म्हैसूरच्या राजानें नाइकाच्या बायकोजवळ असणाऱ्या हिऱ्याकरितां या गांवावर स्वारी करून तें घेतलें. परंतु राणीनें सर्व हिरेमाणीक नदींत फेंकून स्वतः नदींत उडी टाकली. मरतांना तिनें खालीलप्रमाणें शाप दिला असें सांगतात:—'तलकाड गांव वाळूचें मैदान होवो; मालिंगी पाण्यांत बुडून जावो; म्हैसूर राजघराण्याला वारस न राहो.' राणीच्या शापाप्रमाणें तलकाड हल्लीं वाळूच्या टेंकड्यांखालीं दबून गेलें आहे.

**तलगंग**, तहशील.—पंजाब इलाख्यांतील अटक जिल्ह्याची एक तहशील. क्षेत्रफळ १२०० चौ. मै. लो. सं. ( १९२१ ) १०८५०१. खेडीं ८७; पैकीं तलगंग हें मुख्य ठिकाण होय. सोहान नदी उत्तर सरहद्दीवरून वहाते. हिच्या प्रदेशांतील जमीन फार सुपीक आहे. दक्षिण भाग डोंगराळ आहे. त्याचें सकेशर शिखर ५०१० फूट उंच आहे

गांव.—पंजाब, जिल्हा अटक. हें गांव त्याच नांवाच्या तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. या गांवांत बायकांकरितां जोडे तयार करतात व बाहेरगांवींहि येथील जोड्यांचा फार खप आहे. पूर्वी येथें लहानशी छावणी होती ती १८८२ त उठली.

**तलैंग**—ब्रह्मदेशांत वर्चस्वाकरितां ब्रह्मी लोकांशीं झगडणाऱ्या (पेगुअन) पेगू महावंशाच्या अवशिष्ट भागाला तलैंग असें म्हणतात. अठराव्या शतकाच्या मध्यंतरीं (पेगुअन) पेगू लोक मार्ताबानच्या आखातापासून मंडालेपर्यंतच्या मुलुखाचे मालक होते, हल्लीं तलैंग लोक खालच्या ब्रह्मदेशांत तेनासरीम व पेगु या भागांत रहातात. परंतु ही राष्ट्रजात नामशेष होण्याच्या पंथास लागली आहे. हे लोक आपल्याला मॉन म्हणवितात. ब्रह्मी लोकांपेक्षां तैलंग लोक सदृढ बांध्याचे असून त्यांचे चेहरे ( ब्रह्मी लोकांपेक्षां ) अधिक गोल आहेत. तलैंग भाषेसंबंधीं माहिती पहिल्या विभागांत दिली आहे ( पृ. १६० पहा ).

**तवॉय**, जिल्हा.—खालच्या ब्रह्मदेशांत, तेनासेरीम विभागांतील एक जिल्हा. क्षे. ५३०८ चौ. मै. मर्यादा: उत्तरेस अमहर्स्ट जिल्हा; दक्षिणेस मर्गुई; पूर्वेस सयामची सरहद्द आणि पश्चिमेस बंगालचा उपसागर. तवॉय नदीच्या कांठच्या लागवडीचा भाग व समुद्रकिनाऱ्याची अरुंद पट्टी सोडली असतां, हा सर्व जिल्हा खडकाळ व डोंगराळ आहे. डोंगराच्या रांगा सामान्यतः दक्षिणोत्तर जातात. मुर्गुई जिल्ह्याच्या सरहद्दीवर मैनमोलेतकत (६८०० फूट) हें जिल्ह्यांतील सर्वांत उंच शिखर असून नवलवो शिखर त्याच्या खालोखाल आहे. दक्षिणेकडे तेनासेरीम व उत्तरेकडे तवॉय ह्या मुख्य नद्या आहेत. पैकीं पहिली उन्हाळ्यांत नाव्य नसते; दुसरींतून तवॉय गांवापर्यंत लहान जहाजें व पुढें ४० मैलपर्यंत नावा चालू शकतात. ह्या जिल्ह्यांत औषधी वनस्पती पुष्कळ आहेत असें म्हणतात. लवंग, एरंडी, सार्सापरिला वगैरेंचीं झाडेंहि पुष्कळ आहेत. कित्येक वनस्पतींपासून रंग तयार करतां येतात. हत्ती, गेंडा, वाघ, चित्ता, रिसन, सांबर, मलायी अस्वल, डुकर व पांच सहा प्रकारचे हरीण वगैरे रानटी पशू येथें आढळतात. डोंगरांत ओरँग–ओटँगहि आहेत असें म्हणतात. नद्यांमध्यें सुसरी व समुद्रकिनाऱ्यावर कांसवें दिसतात. समुद्रावरील वाऱ्यांच्या योगानें उन्हाळ्यांतील उष्णता कमी होत असल्यामुळें जिल्ह्याची हवा एकंदरींत सुखावह आहे. समुद्रकिनाऱ्याच्या इतर भागांप्रमाणें या जिल्ह्यांतहि पाऊस पुष्कळ म्हणजे वार्षिक सरासरी २२८ इंचपर्यंत पडतो.

इतिहासः—हा जिल्हा निरनिराळ्या काळीं, सयाम, पेगु व आवा येथील राजांच्या मुलुखांत मोडत असे; परंतु त्याचा प्राचीन इतिहास चांगलासा उपलब्ध नाहीं. सयामी लोक हे येथील पहिले रहिवाशी असावेत; परंतु आराकानी लोकांची वसाहत फार प्राचीन काळापासून होती असें म्हणतात. ह्या देशासंबंधीच्या सर्वांत प्राचीन लेखांत असें म्हटलें आहे कीं, इ. स. १२०० त ब्रह्मी राजा नरपतिसिथु यानें मेता म्हणून न येतां धर्मगुरु या नात्यानें इकडे येऊन केदौंगच्या उपसागरांत क्येथलुट हें गांव वसविलें. त्याच राजानें तवॉय पॉइंटवर एक देऊळ बांधलें असें सांगतात. अगदीं अलीकडील काळापर्यंत या देशावर सयामी लोकांच्या स्वाऱ्या होत होत्या. १७५२ सालीं तवॉयचा राजा स्वतंत्र झाला; परंतु नंतर लवकरच (१७५७) तो पुन्हां सयामच्या हातीं गेला.

१७५९ सालीं ब्रह्मी राजा अलौंगपया यानें हा देश घेतला; परंतु तो राजा लवकरच मरण पावला. स. १८६० पासून यंदाबोचा तह ( १८२६ ) होईपर्यंत, अंतःकलह व सयामी लोकांच्या हल्लयामुळें जिल्ह्याचें अतिशय नुकसान झालें; अखेर पहिल्या ब्रह्मी युद्धांत 'सर आर्चिबोल्ड कँबेल याच्या हाताखालीं सैन्य पाठवून हा जिल्हा इंग्रजांनीं आपल्या ताब्यांत घेतला. १८२९ सालीं मौंगदा ( पूर्वीचा सुभेदार ) यानें बंड केलें होतें परंतु तें लवकरच मोडण्यांत आलें. तेव्हांपासून हा जिल्हा इंग्रजांकडेच असून त्यांत पूर्ण शांतता नांदत आहे.

प्राचीन अवशेषः—तवॉयच्या दक्षिणेस कांहीं मैलांवर शिन्मोफी नांवाचें प्रख्यात देवालय आहे. देवालयांतील

मूर्ति, तिच्या जवळ असलेला एक पाषाण व वडाचें झाड हीं सर्व हिंदुस्थानांतून समुद्रमार्गानें महात गेलीं असा लोकांचा समज आहे. तवॉय नदीच्या उभय्या तीराला, तवॉय पॉइंटवर शिनमौ नांवाच्या देवळांत बुद्धाचा दांत आहे असें म्हणतात याशिवाय या जिल्ह्यांत एकंदर २९ जुनी देवालयें आहेत जुन्या तवॉय किंवा म्योहौंग गांवाचे अवशेष हल्लींच्या गांवाच्या उत्तरेस कांहीं मैलांवर आहेत. लो. सं (१९२१) १५६७८६. मागील दशकांत वाढ शें. १५ ९. उत्तर आराकान, मर्गुई व सालवीन हे जिल्हे वगळले असतां, तवॉय जिल्ह्याइतकी विरळ वस्ती खालच्या ब्रह्मदेशांतील दुसऱ्या कोणत्याहि जिल्ह्यांत नाहीं. शें. ९६ लोक बौद्ध-धर्मी व शें. २ ख्रिस्ती असून बाकीचे वन्य हिंदू, मुसुलमान किंवा हिंदू आहेत. शें. ९५ लोक ब्रह्मी भाषा ( तवॉयी नांवाची पोटभाषा ) बोलतात; व डोंगराळ भागांत करेन भाषा वरीच चालते. शें. ५९ लोकांचा उदरनिर्वाह शेतीवर होतो.

शेतीः—तांदूळ हें या जिल्ह्यांतील मुख्य पीक होय. कापूस, सण (ताग), वेलदोडे, तंबाखू व कॉफी यांची लागवड फारच थोडी होते.

जंगलः—जंगलांत होणारीं महत्वाचीं झाडेः—पिंगन—यांची उंची २५० फुटांपर्यंत असून होड्या बांधण्यास त्याचा फार उपयोग करतात; पिंगडो, पदौक व कोक्को यांच्या लाकडाचा नक्षीकामाकरितां अमेरिका व इंग्लंड या देशांत फार खप होतो; आणि पिनम व अनम्, रेवंदसार, कापूर व काजू हीं झाडेंहि पुष्कळ आहेत याजिल्ह्यांत थोडेंबहुत कथील सांपडतें; व समुद्राच्या पाण्यापासून मीठ तयार केलें जातें.

व्यापार व दळणवळणः—तवॉय शहरचें रेशमी कापड व लुंगी हीं सर्व ब्रह्मदेशभर प्रसिद्ध आहेत. शहरांत तांदुळाच्या व इमारती लाकडाच्या पांच गिरण्या आहेत; व त्या गांवांत मातीचीं भांडीं आणि धातुकामहि होतें. जिल्ह्याचा बहुतेक व्यापार तवॉय शहर व सिनब्यूबिनमधून होतो. तांदूळ, मीठ, व इमारती लांकूड हे निर्गत जिन्नस आहेत. तवॉय शहरापासून म्यित्त गांवावरून सयामी सरहद्दीपर्यंत जाणारा रस्ता हा जिल्ह्यांतील मुख्य रस्ता होय याशिवाय तवॉयपासून सिनब्यूबिन आणि येब्यूपर्यंत, व युन्ग्वाकिनपासून मौंग-मगनपर्यंत रस्ते आहेत. पक्क्या रस्त्याची एकंदर लांबी १५५ मैल आहे. तवॉय नदींतून नावा चालतात रंगून व मर्गुई यांच्या दरम्यान जाणारी बोट सिनब्यूबिन येथें नदीच्या मुखाजवळ लागते व तेथून तवॉय शहरापर्यंत पडावामधून उतारू व माल हीं नेलीं जातात.

तवॉय शहर हीं एकच म्युनिसिपालिटी आहे. एकंदर ब्रह्मदेशाच्या मानानें या जिल्ह्यांत शिक्षणाचा प्रसार कमी आहे. १९०१ सालीं शें. ३१.२ पुरुषांना व शें. ४.४ स्त्रियांना लिहितां वाचतां येत होतें. १९०३-०४ सालीं जिल्ह्यांत ६ दुय्यम, ६३ प्राथमिक व १६९ बालशिक्षणाच्या शाळा होत्या. तवॉय शहरांत एक रुग्णालय आहे; व तवॉयनदीच्या मुखाजवळ, रीफ बेटावर २५ फूट उंचीचें दीपगृह असून आकाश स्वच्छ असतां तें १२ मैलांवरून दृग्गोचर होतें.

तालुका.—खालच्या ब्रह्मदेशांत तवॉय जिल्ह्यामधील एक तालुका. क्षे. फ. २३४० चौ. मै. लो. सं. ( १९०१ ) ३३८१८. यांत तवॉय हें जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण आणि ६४ खेडीं आहेत तवॉय खेरीज दुसरें महत्वाचें गांव ईशान्येस सयामच्या सरहद्दीवरील म्यित्त हें होय. ब्रह्मदेश व सयाम यांच्या दरम्यान होणाऱ्या व्यापाराची नोंद तेथें केली जाते.

शहर.—खालच्या ब्रह्मदेशांत याच नांवाच्या जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें तवॉय नदीच्या डाव्या तीराला, तिच्या मुखापासून ३० मैलांवर व समुद्र किनाऱ्यापासून ७ मैलांवर आहे. हल्लींचें तवॉय शहर १७५१ सालीं स्थापन झालें. १८२४ सालीं इंग्रजांनीं या शहरावर सैन्य पाठवून तें आपल्या ताब्यांत घेतलें. लो. सं. ( १९०१ ): २२०७४.

या शहराचा व्यापार रंगून, मुर्गुई आणि कलकत्ता व स्ट्रेट्स सेटलमेंट यांशीं चालतो. परंतु तो फारसा मोठा नाहीं. तांदूळ, रेशमी कापड, मीठ, इमारती लांकूड, व ( घरें शाकारण्याकरितां उपयोगांत येणारीं ) दणीचीं पानें हा माल बाहेर जातो आणि तंबाखू, कापड, साखर, राकेल, सूत वगैरे जिन्नस येथें बाहेरून येतात.

रेशमी कापड विणणें हा शहरांतील मुख्य धंदा असून मातीचीं भांडीं, सुती कापड, व सोन्याचांदीचें काम थोडेंबहुत होतें. येथील म्युनिसिपालिटी १८८७ सालीं स्थापन झाली. तिचें १९०३–०४ सालचें उत्पन्न ३९००० रु. होतें.

तवेफ—संयुक्त प्रांतांत ही एक जात आहे. या जातींत बायकांचीहि पंचायत असते. या पंचायतींत एक चौधरीण नेमली जाते व इतर सभासद प्रसंगानुसार निवडले जातात. चौधरणीची जन्मभूमि त्याच गांवांत असावी लागते. प्रत्येक शहरांत चौधरीण नेमलेली असते व हलक्या जातीच्या मनुष्याच्या घरीं नाच करणें व वेश्येनें दिलेल्या मेजवानीच्या प्रसंगीं न जाणें वगैरे गुन्ह्यांची ती चौकशी करते.

तशकुरघान—अफगाण; तुर्कस्तान. तशकुरघान जिल्ह्याचें हें गांव मुख्य ठिकाण आहे. हें गांव प्रांतांत सर्वांत मोठें व श्रीमंत असून मध्य आशिया व काबूल यांच्यातील व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. यांत उझबेग व ताजिक असा दोन प्रकारचे लोक राहतात. गांवांत दुकानें जवळ जवळ ५०० आहेत.

तळेकर, श्रीकृष्णशास्त्री—श्रीकृष्णशास्त्री हे रघुनाथशास्त्रीबोवांचे चिरंजीव होत. रघुनाथशास्त्री हे ऋग्वेदी ब्राह्मण असून शास्त्रांतहि प्रवीण होते. त्यांस विद्येची अभिरुचि फार होती. त्यांस जशी शिकण्याची हौस होती तशी

शिकविण्याची हौस पुष्कळ होती. त्यामुळें कृष्णशास्त्री ह्यांच्या घरीं पढावयास पुष्कळ विद्यार्थी येत असत. श्रीकृष्णशास्त्री ह्यांनीं पुण्याच्या संस्कृत पाठशाळेंत अलंकारशास्त्राचा चांगला अभ्यास केला आणि त्या काळच्या चालीप्रमाणें दक्षिणा मिळविली. पुढें दिवसानुदिवस इंग्रेजीचें महात्म्य वाढूं लागलें. कैलासवासी महादेवशास्त्री कोल्हटकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर, विष्णुशास्त्री पंडित इत्यादि मंडळी क्यांडी साहेबांच्या वर्गांत इंग्रेजी शिकूं लागली. तेव्हां श्रीकृष्णशास्त्री हेहि इंग्रेजीचा अभ्यास करूं लागले. त्यांत त्यांची फार चांगली प्रगति झाली. असा विद्याभ्यासाचा क्रम चालला असतां रघुनाथशास्त्री ह्यांस देवाज्ञा झाली. तेव्हां श्रीकृष्णशास्त्री ह्यांस कोणाचा आधार नाहींसा झाला, व संसार त्यांच्या गळ्यांत पडला. त्यांजवर लहानपणापासून क्यांडी साहेबांचा फार लोभ होता, आणि रघुनाथशास्त्र्यांवरहि त्यांची फार कृपा होती; त्यामुळें साहेबांस त्या अनाथ झालेल्या कुटुंबाची दया येऊन त्यांनीं श्रीकृष्णशास्त्र्यांस एक लहानशी इंग्रजी कारकुनाची जागा दिली. त्या जागेवर असतां मोल्सवर्थ साहेबास मराठी इंग्रजी-कोश-तयार करण्याच्या कामीं त्यांनीं चांगलें साहाय्य केलें. त्यावरून त्यांस फार संतोष झाला. पुढें कित्तीएक वर्षेंपर्यंत श्रीकृष्णशास्त्री पंडितपणाचें म्हणजे साहेब लोकांस मराठी भाषा शिकविण्याचें काम करीत होते. त्यांतहि त्यांची मोठी आख्या झाली. पुढें बेळगांव हायस्कुलांत ह्यांस संस्कृताचे गुरू नेमिले. तेथेंहि त्यांनीं चांगला लौकिक संपादिला. संस्कृत भाषेचें व्याकरण मराठींत श्रीकृष्णशास्त्र्यांनीं ह्याच स्कुलांत असतां लिहिलें. तें सरकारास पसंत वाटून त्यांनीं त्यांस त्याबद्दल पांचशें रुपये बक्षीस दिले.

बेळगांवाहून श्रीकृष्णशास्त्र्यांची बदली क्यांडी साहेबांच्या हाताखालीं ट्रान्सलेशन एक्झिबिशनरच्या जागीं झाली. त्या जागेवर ते असतां मराठी क्रमिक पुस्तकें तयार करण्याचें काम क्यांडी साहेबांनीं केलें त्यांत श्रीकृष्णशास्त्र्यांचा फार उपयोग झाला. त्या पुस्तकांतले कित्तीएक धडे शास्त्रीबोवांच्या हातचे आहेत. त्या कामावरून त्यांस रत्नागिरीच्या इंग्लिशस्कुलावर हेडमास्तर नेमिलें. तिकडे ते गेले होते; परंतु त्यांच्या प्रकृतीस तिकडची हवा मानवेना, म्हणून ते पुन्हां बदली करून घेऊन पुण्यास आले. या सुमारास सर रिचर्ड टेंपल हे नागपुर प्रांताचे चीफ कमिशनर होते, त्यांनीं तिकडे शाळाखात्याची नवी व्यवस्था स्थापण्याचा विचार मांडिला. तेव्हां इकडचे कांहीं माहीतगार लोक तिकडे नेले. त्यांत श्रीकृष्णशास्त्री तळेकर हे होते. त्यांस डेपुटी एज्युकेशनल इन्स्पेक्टरची जागा मिळाली. तेथून पुन्हां ते खानदेशांत बदलून आले.

पुढें १८७२ सालीं त्यांची नेमणूक अहमदनगरच्या डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टराच्या जागेवर झाली. त्या ठिकाणीं त्यांनीं सुमारें पावणेपांच वर्षें काम केलें. १८७७ सालीं ते क्यांडी साहेबाच्या मागें मराठी ट्रान्सलेटर झाले. ह्या कामावर असतांनाच पुणें येथें त्यांस देवाज्ञा झाली. तेव्हां त्यांचें वय सुमारें ५३-५४ वर्षांचें होतें.

**तळेगांव ढमढेरे**—जिल्हा पुणें. शिरूरच्या नैर्ऋत्येस २० मैलांवर वेलनदीवर हा गांव आहे. लोकसंख्या चार हजार. येथें १८५५ सालीं म्युनिसिपालटी स्थापन झाली आहे. गणपती, नाथ, सिद्धेश्वर, टकलेश्वर व उत्तरेश्वर अशीं येथें पांच देवालयें आहेत. पैकीं गणपतीचें देवालय ढमढेरे वंशांतील एका मनुष्यानें बांधिलें देवालयावरील नक्षीकाम फारच उत्तम आहे. नाथाचें मंदीर शिवाजीच्या वेळचें बांधलेलें आहे. येथें महाशिवरात्रीस जत्रा भरते. उत्तरेश्वर कोणी महाजनानें बांधलें. वायव्येस भैरवाचें देऊळ आहे. १७५१ सालीं मोंगलांनीं ह्या गांवाची अगदीं नासधूस करून टाकली होती.

**तळेगांव दशासर** ( दशसहस्र )—तालुका चांदूर, जिल्हा उमरावती. येथील लोकसंख्या ६२२०. एके काळीं हें चांदूर तालुक्यांतील सर्वांत मोठें गांव होतें. परंतु चांदूर रेल्वे स्टेशन झाल्यामुळें येथून तहशिलीचें ठिकाण तिकडे ( चांदूरास ) गेलें. तळेगांव दशासर हा तळेगांव दशसहस्र या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश आहे. हल्लीं हा गांव मोडकळीस आला आहे- तरी पूर्वींच्या इमारती व देवळें पाहिलीं असतां पूर्वींचें वैभव ध्यानांत येतें. कदाचित गांवाची लोकसंख्या पूर्वी दहा हजार असेल व त्यावरून हें नांव पडलें असेल. येथें एक सरकी काढण्याचा कारखाना असून सूत व कापड विणण्याचे हातमाग आहेत. त्यांतून गरीब लोकांच्या उपयोगाचें कापड निघतें. पोलिस ठाणें, टपालघर, दवाखाना आणि सरकारी इंग्रजी मराठी शाळा आणि हिंदुस्थानी शाळा येथें आहेत.

येथें केशवराज उर्फ श्रीकृष्ण यांची काळ्या दगडाची मूर्ति असून ती तेथील देशपांडे यांच्या पूर्वजांनीं सरासरी ७५-१०० वर्षांपूर्वी प्रस्थापित केलेली आहे. मूर्तीस इनाम असून तेथील व्यवस्था देशपांड्यांमार्फत होत असते. कृष्णजयंतीचा उत्सव श्रावण वद्य ८ पासून पौर्णिमेपर्यंत चालतो. तसेंच एक विठ्ठलरुखमाईचें नवीन देऊळ आहे व साधुश्रेष्ठ गोपाळबुवा उर्फ श्रीकृष्ण महाराज ह्या नांवानें प्रसिद्ध असलेल्या सत्पुरुषाची समाधी गांवाबाहेर मराठी शाळेच्या जवळच नदीतीरीं आहे. येथें (समाधीजवळ) सायंकाळीं बसल्यास आसपासचा देखावा फार प्रेक्षणीय दिसतो. समाधीचें व्यवस्थाकाम तेथील पाटील सदाशिवराव ह्यांच्या मार्फत होतें. त्याजवळच एक महादेवाचें देऊळ आहे. येथें ब्राह्मणवस्तीहि फार आहे.

**तळेगांव दाभाडे**—मुंबई इलाखा. पुणें जिल्ह्यांत मावळ तालुक्यांत पुण्याच्या वायव्येस १७ मैलांवर आहे. लोकसंख्या सुमारें ५,०००. गांवाच्या दक्षिणेस पाण्याचा मोठा तलाव असून कांहीं महादेवाचीं देवालयें आहेत.

बाळाजी विश्वनाथ पेशवे यांच्या कारकीर्दीत दामाडे वंश नांवारूपास आला. खंडेराव दाभाडे हा या गांवाचा संस्थापक होय. त्यास स. १७१६ मध्यें सेनापती नेमिलें. स. १७२१ त खंडेराव मरण पावल्यानंतर त्याचा मुलगा त्रिंबकराव दामाडे हा सेनापती झाला. यांचें व बाजीरावाचें युद्ध होऊन हा त्यांत मारला गेला. दाभाडे हे श्रावणमासांत तळेगांवास ब्राह्मणभोजन घालून दक्षिणा देत असत; ती पुढें पेशवे देऊं लागले व हल्लीं इंग्रज सरकार त्यांतून फेलोशिप व ग्रँट देतें. येथें म्युनिसिपालिटी आहे. येथें पैसा फंडानें चाललेली कांचशाळा व राष्ट्रीय शिक्षण देणारें नूतन समर्थविद्यालय या प्रसिद्ध संस्था आहेत.

**तळोदें**, ता लु का.—मुंबई. पश्चिम खानदेश जिल्ह्यांत हा एक तालुका आहे. या तालुक्यांत मेवा नांवाच्या ६ इस्टेटी आहेत. येथील जमीन उत्तम प्रकारची आहे. या तालुक्यांत पूर्व व पश्चिमेकडील बाजूंवर सातपुडा डोंगर आहे. कांहीं ठिकाणीं हवा बरी आहे, परंतु सातपुडा डोंगराशेजारीं हवा अतिशय वाईट आहे. पाऊस दर वर्षी सरासरी ३० इंच पडतो.

गां व.—मुंबई. पश्चिम खानदेश. धुळ्याच्या वायव्येस ६२ मैलांवर सुमारें ६ हजार लोकवस्तीचें हें गांव असून तळोदें तालुक्याचें ठाणें आहे. येथें लांकडाचा मोठा व्यापार असून रोशेल तेल व धान्य यांचाहि कांहींसा व्यापार आहे. येथें म्युनिसिपालिटी आहे. येथें मामलेदार कचेरी, सरकारी शाळा व पोष्ट ऑफिस आहे. येथें एक किल्ला असून तो मन्या स्थितींत आहे.

**तक्षक**—कद्रुपुत्र, एक नाग. हा सव्वीस नागकुलांतील एका कुलाचा आधिपति असून, याच्या कुलांत जीं कुळें होतीं त्यांतून अठरा कुळें जनमेजयकृत सर्पसत्रांत दग्ध झालीं; त्यांचीं नांवें अशीं:--पिच्छांडक, मंडलक, पिंडसेक्ता, भेणक, उच्छिक, शरभ, भंग, बिल्वतेजा, विरोहण, शिली, शलकर, मूक, सुकुमार, प्रवेपन, मुद्गर, शिशुरोमा, सुरोमा आणि महाहनु. सर्पसत्रांत तक्षकावरच स्वतः प्रसंग आला असतां यास आस्तिक ऋषीनें वांचविलें.

**तक्षशिला**--या प्रसिद्ध शहराचें स्थान बरेच दिवस नक्की माहीत नव्हतें. प्लिनीच्या ग्रंथांत पुष्कलावतीपासून तक्षशिलेचें अंतर रोमन ६० ( इंग्लिश ५५ ) मैल लिहिलें आहे. त्यावरून सिंधूच्या पूर्वेस दोन दिवसांच्या वाटेवर हुसन अबदलाच्या पश्चिमेस हारो नदीवर तें असावें असें दिसतें. परंतु चिनी प्रवाशांनीं तें सिंधूपासून पूर्वेस ३ दिवसांच्या वाटेवर असल्याचें लिहिलें आहे. सिंधूपासून तिसरा मुक्काम कालकसराई येथें येतो. यावरून कालकसराईजवळ कोठें तरी तक्षशिला असावें. कालकसराईच्या ईशान्येस १ मैलावर शहाधेरी म्हणून गांव आहे. तेथें ५५ हून जास्त स्तूप, २८ विहार व ९ देवळें, इतक्यांच्या खुणा मला आढळल्या असें कनिंगहॅम लिहितो. त्या स्तूपांपैकीं २ स्तूप माणिक्यालच्या प्रसिद्ध स्तूपाएवढे होते. यावरून तक्षशिला येथेंच असावें.

या शहराचें वैभव आणि विस्तार यांविषयीं सर्व ग्रीक ग्रंथकारांनीं पुष्कळ वर्णन केलें आहे. एरियन लिहितो कीं, तें सिंधु व बेहात यांच्यामध्यें सर्वांहून मोठें, जास्त वस्तीचें आणि संपत्तिमान असें होतें. स्ट्रेबो म्हणतो कीं, याच्या आसपासचा प्रदेश दाट वस्तीचा व सुपीक होता. प्लिनीचें म्हणणें कीं तें सपाट मैदानांत वसलें होतें. ह्या सर्व गोष्टी शहाधेरीजवळच्या अवशेषांशीं जमतात.

अलेक्झांडरच्या नंतर ५० वर्षांनीं तक्षशिला येथील लोकांनीं मगधराजा बिंदुसागर याच्या विरुद्ध बंड केलें. तेव्हां त्यानें आपला मोठा मुलगा बंदोबस्तास पाठविला परंतु बंदोबस्त झाला नाहीं. म्हणून दुसरा मुलगा अशोक यास पाठविलें. त्यास लोक शरण आले. अशोक प्रतिनिधि म्हणून असतां तक्षशिला येथें अफाट संपत्ति होती. पुढें अशोकाचा मुलगाहि येथें प्रतिनिधि होता.

ख्रि. पू. २००च्या सुमारास मौर्य राजांच्या वंशजांचा बॅक्ट्रियांतील ग्रीकांशीं कलह होऊन तक्षशिला हा त्यांच्या हिंदुस्थानांतील राज्याचा एक भाग झाला. ख्रि. पू० १२६ मध्यें तें ग्रीकांपासून इंडोसिथियन राजांकडे गेलें. कनिष्काच्या वेळीं तक्षशिला येथें त्याचा छत्रप असावा. या छत्रपांचीं पुष्कळ नाणीं सांपडलीं आहेत. तक्षशिला हें नांव ज्यांत आहे असा एक ताम्रपट सांपडला आहे. तक्षशिला याचें पाली रूप तक्कसिला व त्याचें ग्रीक रूप ताक्सिला झालें आहे.

फाहिआन येथें आला होता ( ४०० ). तो म्हणतो कीं, येथें बुद्धानें आपलें मस्तक भिक्षेंत दिलें, यावरून यास हें नांव पडलें. संगयूनहि ( ५०२ ) तीच दंतकथा लिहितो. ह्युएनत्संग हा दोनदां ( ६३०, व ६४३ ) येथें आला होता. तो लिहितो कीं शहराचा घेर १० ली होता, तेथें राजा नव्हता. तें काश्मीरच्या ताब्यांत होतें. येथील जमीन सुपीक होती, विहार पुष्कळ परंतु बहुतेक मोडलेले होते. शहरापासून ३ मैलांवर अशोकाचा स्तूप होता तेथेंच बुद्धानें आपलें मस्तक दिलें होतें. वायव्यहिंदुस्थानांत जे ४ स्तूप प्रख्यात होते, त्यांतलाच हा एक आहे. तक्षशिला हें बुद्धधर्मी लोकांत फार महत्त्वाचें होतें. याच्या नांवावरून मस्तकाची दंतकथा उत्पन्न झाली असावी कारण बुद्धधर्माच्या पूर्वीचें हें नांव आहे. हें नगर अयोध्येच्या भरताचा पुत्र तक्ष यानें वसविलें.

शहाधेरी येथें अवशेष उत्तर-दक्षिण ३ मैल व पूर्व-पश्चिम २ मैल पसरले आहेत. यांचे निरनिराळे भाग असून त्यांस निरनिराळीं नांवें आहेत. तीं:—बीर अथवा भीर, हतीयाल, सिरकापका कोट, कच्चा कोट, बाबरखाना व शिरसक्का कोट. बीर उंचवटा दक्षिणोत्तर ४ हजार फूट व पूर्वपश्चिम २६०० फूट आहे. तो सर्वांत जुना असून त्यांत जुनीं नाणीं जास्त सांपडतात. बीरच्या ईशान्येस हतीयाल ही एक किल्ल्यासारखी जागा आहे. तींत ११ फूट जाडीच्या

शिकविण्याची हौस पुष्कळ होती. त्यामुळें कृष्णशास्त्री ह्यांच्या घरीं पढावयास पुष्कळ विद्यार्थी येत असत. श्रीकृष्णशास्त्री ह्यांनीं पुण्याच्या संस्कृत पाठशाळेंत अलंकारशास्त्राचा चांगला अभ्यास केला आणि त्या काळच्या चालीप्रमाणें दक्षिणा मिळविली. पुढें दिवसानुदिवस इंग्रेजीचें महात्म्य वाढूं लागलें. कैलासवासी महादेवशास्त्री कोल्हटकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर, विष्णुशास्त्री पंडित इत्यादि मंडळी क्यांडी साहेबांच्या वर्गांत इंग्रेजी शिकूं लागली. तेव्हां श्रीकृष्णशास्त्री हेहि इंग्रेजीचा अभ्यास करूं लागले. त्यांत त्यांची फार चांगली प्रगति झाली. असा विद्याभ्यासाचा क्रम चालला असतां रघुनाथशास्त्री ह्यांस देवाज्ञा झाली. तेव्हां श्रीकृष्णशास्त्री ह्यांस कोणाचा आधार नाहींसा झाला, व संसार त्यांच्या गळ्यांत पडला. त्यांजवर लहानपणापासून क्यांडी साहेबांचा फार लोभ होता, आणि रघुनाथशास्त्र्यांवरहि त्यांची फार कृपा होती; त्यामुळें साहेबांस त्या अनाथ झालेल्या कुटुंबाची दया येऊन त्यांनीं श्रीकृष्णशास्त्र्यांस एक लहानशी इंग्रजी कारकुनाची जागा दिली. त्या जागेवर असतां मोलस्वर्थ साहेबास मराठी इंग्रजी-कोश-तयार करण्याच्या कामीं त्यांनीं चांगलें साहाय्य केलें. त्यावरून त्यास फार संतोष झाला. पुढें कित्येक वर्षेंपर्यंत श्रीकृष्णशास्त्री पंडितपणाचें म्हणजे साहेब लोकांस मराठी भाषा शिकविण्याचें काम करीत होते. त्यांतहि त्यांची मोठी आख्या झाली. पुढें बेळगांव हायस्कुलांत ह्यांस संस्कृताचे गुरु नेमिले. तेथेंहि त्यांनीं चांगला लौकिक संपादिला. संस्कृत भाषेचें व्याकरण मराठींत श्रीकृष्णशास्त्र्यांनीं ह्याच स्कुलांत असतां लिहिलें. तें सरकारास पसंत वाटून त्यांनीं त्यांस त्याबद्दल पांचशे रुपये बक्षीस दिले.

बेळगांवाहून श्रीकृष्णशास्त्र्यांची बदली क्यांडी साहेबांच्या हाताखालीं ट्रान्सलेशन एक्झिबिशनरच्या जागीं झाली. त्या जागेवर ते असतां मराठी क्रमिक पुस्तकें तयार करण्याचें काम क्यांडी साहेबांनीं केलें त्यांत श्रीकृष्णशास्त्र्यांचा फार उपयोग झाला. त्या पुस्तकांतले कित्येक धडे शास्त्रीबोवांच्या हातचे आहेत. त्या कामावरून त्यांस रत्नागिरीच्या इंग्लिशस्कुलावर हेडमास्तर नेमिलें. तिकडे ते गेले होते; परंतु त्यांच्या प्रकृतीस तिकडची हवा मानवेना, म्हणून ते पुन्हां बदली करून घेऊन पुण्यास आले. या सुमारास सर रिचर्ड टेंपल हे नागपुर प्रांताचे चीफ कमिशनर होते, त्यांनीं तिकडे शाळाखात्याची नवी व्यवस्था स्थापण्याचा विचार मांडिला. तेव्हां इकडचे कांहीं माहीतगार लोक तिकडे नेले. त्यांत श्रीकृष्णशास्त्री तळेकर हे होते. त्यांस डेपुटी एज्युकेशनल इन्स्पेक्टरची जागा मिळाली. तेथून पुन्हां ते खानदेशांत बदलून आले.

पुढें १८७२ सालीं त्यांची नेमणूक अहमदनगरच्या डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टराच्या जागेवर झाली. त्या ठिकाणीं त्यांनीं सुमारें पावणेपांच वर्षें काम केलें. १८७७ सालीं ते क्यांडी साहेबाच्या मागें मराठी ट्रान्सलेटर झाले. ह्या कामावर असतांनाच पुणें येथें त्यांस देवाज्ञा झाली. तेव्हां त्यांचें वय सुमारें ५३–५४ वर्षांचें होतें.

**तळेगांव ढमढेरे**–जिल्हा पुणें. शिरूरच्या नैर्ऋत्येस२० मैलांवर वेलनदीवर हा गांव आहे. लोकसंख्या चार हजार. येथें १८५५ सालीं म्युनिसिपालटी स्थापन झाली आहे. गणपती, नाथ, सिद्धेश्वर, टकलेश्वर व उत्तरेश्वर अशीं येथें पांच देवालयें आहेत. पैकीं गणपतीचें देवालय ढमढेरे वंशांतील एका मनुष्यानें बांधिलें देवालयावरील नक्षीकाम फारच उत्तम आहे. नाथाचें मंदीर शिवाजीच्या वेळचें बांधलेलें आहे. येथें महाशिवरात्रीस जत्रा भरते. उत्तरेश्वर कोणी महाजनानें बांधलें. वायव्येस भैरवाचें देऊळ आहे. १७५१ सालीं मोंगलांनीं ह्या गांवाची अगदीं नासधूस करून टाकली होती.

**तळेगांव दशासर** ( दशसहस्र )—तालुका चांदुर, जिल्हा उमरावती. येथील लोकसंख्या ६२२०. एके काळीं हें चांदुर तालुक्यांतील सर्वांत मोठें गांव होतें. परंतु चांदुर रेल्वे स्टेशन झाल्यामुळें येथून तहशिलीचें ठिकाण तिकडे ( चांदुरास ) गेलें. तळेगांव दशासर हा तळेगांव दशसहस्र या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश आहे. हल्लीं हा गांव मोडकळीस आला आहे- तरी पूर्वीच्या इमारती व देवळें पाहिलीं असतां पूर्वीचें वैभव ध्यानांत येतें. कदाचित गांवाची लोकसंख्या पूर्वी दहा हजार असेल व त्यावरून हें नांव पडलें असेल. येथें एक सरकी काढण्याचा कारखाना असून सूत व कापड विणण्याचे हातमाग आहेत. त्यांतून गरीब लोकांच्या उपयोगाचें कापड निघतें. पोलिस ठाणें, टपालघर, दवाखाना आणि सरकारी इंग्रजी मराठी शाळा आणि हिंदुस्थानी शाळा येथें आहेत.

येथें केशवराज उर्फ श्रीकृष्ण यांची काळ्या दगडाची मूर्ति असून ती तेथील देशपांडे यांच्या पूर्वजांनीं सरासरी ७५–१०० वर्षांपूर्वी प्रस्थापित केलेली आहे. मूर्तीस इनाम असून तेथील व्यवस्था देशपांड्यांमार्फत होत असते. कृष्णजयंतीचा उत्सव श्रावण वद्य ८ पासून पौर्णिमेपर्यंत चालतो. तसेंच एक विठ्ठलरखमाईचें नवीन देऊळ आहे व साधुश्रेष्ठ गोपाळबुवा उर्फ श्रीकृष्ण महाराज ह्या नांवानें प्रसिद्ध असलेल्या सत्पुरुषाची समाधी गांवाबाहेर मराठी शाळेच्या जवळच नदीतीरीं आहे. येथें (समाधीजवळ) सायंकाळीं बसल्यास आसपासचा देखावा फार प्रेक्षणीय दिसतो. समाधीचें व्यवस्थाकाम तेथील पाटील सदाशिवराव ह्यांच्या मार्फत होतें. त्याजवळच एक महादेवाचें देऊळ आहे. येथें ब्राह्मणवस्तीहि फार आहे.

**तळेगांव दाभाडे**—मुंबई इलाखा. पुणें जिल्ह्यांत मावळ तालुक्यांत पुण्याच्या वायव्येस १७ मैलांवर आहे. लोकसंख्या सुमारें ५,०००. गांवाच्या दक्षिणेस पाण्याचा मोठा तलाव असून कांहीं महादेवाचीं देवालयें आहेत.

बाळाजी विश्वनाथ पेशवे यांच्या कारकीर्दीत दाभाडे वंश नांवारूपास आला. खंडेराव दाभाडे हा या गांवाचा संस्थापक होय. त्यास स. १७१६ मध्यें सेनापती नेमिलें. स. १७२१ त खंडेराव मरण पावल्यानंतर त्याचा मुलगा त्रिंबकराव दाभाडे हा सेनापती झाला. यांचें व बाजीरावाचें युद्ध होऊन हा त्यांत मारला गेला. दाभाडे हे श्रावणमासांत तळेगांवास ब्राह्मणभोजन घालून दक्षिणा देत असत; ती पुढें पेशवे देऊं लागले व हल्लीं इंग्रज सरकार त्यांतून फेलोशिप व ग्रँट देतें. येथें म्युनिसिपालिटी आहे. येथें पैसा फंडानें चाललेली कांचशाळा व राष्ट्रीय शिक्षण देणारें नूतन समर्थविद्यालय या प्रसिद्ध संस्था आहेत.

तळोदें, ता लु का.—मुंबई. पश्चिम खानदेश जिल्ह्यांत हा एक तालुका आहे. या तालुक्यांत मेवा नांवाच्या ६ इस्टेटी आहेत. येथील जमीन उत्तम प्रकारची आहे. या तालुक्यांत पूर्व व पश्चिमेकडील बाजूंवर सातपुडा डोंगर आहे. कांहीं ठिकाणीं हवा बरी आहे, परंतु सातपुडा डोंगराशेजारीं हवा अतिशय वाईट आहे. पाऊस दर वर्षी सरासरी ३० इंच पडतो.

गां व.—मुंबई. पश्चिम खानदेश. धुळ्याच्या वायव्येस ६२ मैलांवर सुमारें ६ हजार लोकवस्तीचें हें गांव असून तळोदे तालुक्याचें ठाणें आहे. येथें लांकडाचा मोठा व्यापार असून गोडेतेल व धान्य यांचाहि कांहींसा व्यापार आहे. येथें म्युनिसिपालिटी आहे. येथें मामलेदार कचेरी, सरकारी शाळा व पोष्ट ऑफिस आहे. येथें एक किल्ला असून तो भग्न स्थितींत आहे.

तक्षक—कद्रुपुत्र, एक नाग. हा सव्वीस नागकुलांतील एका कुलाचा अधिपति असून, याच्या कुलांत जीं कुळें होतीं त्यांतून अठरा कुळें जनमेजयकृत सर्पसत्रांत दग्ध झालीं; त्यांचीं नांवें अशीं:--पिच्छांडक, मंडलक, पिंडसेक्ता, भेणक, उच्छिख, शरभ, भंग, बिल्वतेजा, विरोहण, शिली, शलकर, मूक, सुकुमार, प्रवेपन, मुद्गर, शिशुरोमा, सुरोमा आणि महाहनु. सर्पसत्रांत तक्षकावरच स्वतः प्रसंग आला असतां यास आस्तिक ऋषीनें वांचविलें.

तक्षशिला--या प्रसिद्ध शहराचें स्थान बरेच दिवस नक्की माहीत नव्हतें. प्लिनीच्या ग्रंथांत पुष्कलावतीपासून तक्षशिलेचें अंतर रोमन ६० ( इंग्लिश ५५ ) मैल लिहिलें आहे. त्यावरून सिंधूच्या पूर्वेस दोन दिवसांच्या वाटेवर हसन अबदालाच्या पश्चिमेस हारो नदीवर तें असावें असें दिसतें. परंतु चिनी प्रवाशांनी तें सिंधूपासून पूर्वेस ३ दिवसांच्या वाटेवर असल्याचें लिहिलें आहे. सिंधूपासून तिसरा मुक्काम कालकसराई येथें येतो. यावरून कालकसराईजवळ कोठें तरी तक्षशिला असावें. कालकसराईच्या ईशान्येस १ मैलावर शहाधेरी म्हणून गांव आहे. तेथें ५५ हून जास्त स्तूप, २८ विहार व ९ देवळें, इतक्यांच्या खुणा मला आढळल्या असें कनिंगहॅम लिहितो. त्या स्तूपांपैकीं २ स्तूप माणिक्यालच्या प्रसिद्ध स्तूपाएवढे होते. त्यावरून तक्षशिला येथेंच असावें.

या शहराचें वैभव आणि विस्तार यांविषयीं सर्व ग्रीक ग्रंथकारांनीं पुष्कळ वर्णन केलें आहे. एरियन लिहितो कीं, तें सिंधु व बेहात यांच्यामध्यें सर्वांहून मोठें, जास्त वस्तीचें आणि संपत्तिमान असें होतें. स्ट्रेबो म्हणतो कीं, याच्या आसपासचा प्रदेश दाट वस्तीचा व सुपीक होता. प्लिनीचें म्हणणें कीं तें सपाट मैदानांत वसलें होतें. ह्या सर्व गोष्टी शहाधेरीजवळच्या अवशेषांशीं जमतात.

अलेक्झांडरच्या नंतर ५० वर्षांनीं तक्षशिला येथील लोकांनीं मगधराजा बिंदुसार याच्या विरुद्ध बंड केलें. तेव्हां त्यानें आपला मोठा मुलगा बंदोबस्तास पाठविला परंतु बंदोबस्त झाला नाहीं. म्हणून दुसरा मुलगा अशोक यास पाठविलें. त्यास लोक शरण आले. अशोक प्रतिनिधि म्हणून असतां तक्षशिला येथें अफाट संपत्ति होती. पुढें अशोकाचा मुलगाहि येथें प्रतिनिधि होता.

खि. पू. २००च्या सुमारास मौर्य राजांच्या वंशजांचा बॅक्ट्रियांतील ग्रीकांशीं कलह होऊन तक्षशिला हा त्यांच्या हिंदुस्थानांतील राज्याचा एक भाग झाला. खि. पू० १२६ मध्यें तें ग्रीकांपासून इंडोसिथियन राजांकडे गेलें. कनिष्काच्या वेळीं तक्षशिला येथें त्याचा क्षत्रप असावा. या क्षत्रपाचीं पुष्कळ नाणीं सांपडलीं आहेत. तक्षशिला हें नांव ज्यांत आहे असा एक ताम्रपट सांपडला आहे. तक्षशिला यांचें पाली रूप तक्कशिला व त्याचें ग्रीक रूप ताक्सिला झालें आहे.

फाहिआन येथें आला होता ( ४०० ). तो म्हणतो कीं, येथें बुद्धानें आपलें मस्तक भिक्षेत दिलें, यावरून यास हें नांव पडलें. संगयूनहि ( ५०२ ) तीच दंतकथा लिहितो. ह्युएनत्संग हा दोनदां ( ६३०, व ६४३ ) येथें आला होता. तो लिहितो कीं शहराचा घेर १० ली होता, तेथें राजा नव्हता. तें काश्मीरच्या ताब्यांत होतें. येथील जमीन सुपीक होती, विहार पुष्कळ परंतु बहुतेक मोडलेले होते. शहरापासून ३ मैलांवर अशोकाचा स्तूप होता तेथेंच बुद्धानें आपलें मस्तक दिलें होतें. वायव्यहिंदुस्थानांत जे ४ स्तूप प्रख्यात होते, त्यांतलाच हा एक आहे. तक्षशिला हें बुद्धधर्मी लोकांत फार महत्त्वाचें होतें. याच्या नांवावरून मस्तकाची दंतकथा उत्पन्न झाली असावी कारण बुद्धधर्माच्या पूर्वींचें हें नांव आहे. हें नगर अयोध्येच्या भरताचा पुत्र तक्ष यानें वसविलें.

शहाधेरी येथें अवशेष उत्तर-दक्षिण ३ मैल व पूर्व-पश्चिम २ मैल पसरले आहेत. यांचे निरनिराळे भाग असून त्यांस निरनिराळीं नांवें आहेत. तीं:–बीर अथवा फीर, हत्तीयाल, सिरकापका कोट, कच्चा कोट, बाबरखाना व शिरसुखका कोट. बीर टेंकाड दक्षिणोत्तर ४ हजार फूट व पूर्वपश्चिम २६०० फूट आहे. तो सर्वांत जुना असून त्यांत जुनीं नाणीं जास्त सांपडतात. बीरच्या ईशान्येस हत्तीयाल ही एक किल्ल्यासारखी जागा आहे. लांब ११ फूट कांठांच्या

भिंती व चौकोनी बुरुज आहेत. तृतीयाल याच्या उत्तरेस उंचवट्यावर सिरकापका कोट आहे. याच्या भिंती दगडाच्या असून १५ फूट जाड आहेत. एकंदर घेर २½ मैल आहे. सर्व भागांत ही जागा मजबूत व बंदोबस्ताची आहे. त्याच्या उत्तरेस कच्चा कोट आहे. हा मातीचा आहे. भिंती ३० पासून ५० फूट पर्यंत उंचीच्या आहेत. बावरखान ही जागा वरील जागेच्या पलीकडे आहे. उत्तरेस लुंडीनाला आहे. त्यांत पुष्कळ स्तूप पडलेले आढळतात. त्यांतच अशोकानें बांधलेला शिरोदानाचा स्तूप असावा. बावरखान्याच्या ईशान्येस सिरकुसचा कोट आहे. त्याच्या भिंती चौकोनी दगडांच्या १८ फूट उंचीच्या आहेत. आंत हल्लीं ३ खेडीं आहेत. याच्या पश्चिमेस अर्ध्या मैलावर दोन हजार फूट लांबीची मातीची भिंत आहे. शिरसुकचा घेर बाहेरच्या बांधीव कामासुद्धां ५ मैल आहे. याप्रमाणें सुमारें ६ चौरस मैल प्रदेशांत हे अवशेष आहेत. असे विस्तृत चांगल्या स्थितींत असलेले व महत्त्वाचे अवशेष पंजाबांत दुसरे कोठें नाहींत. एकंदरींत प्राचीन तक्षशिला शहर हेंच होय. येथील नाल्यांत नदीचे पुष्कळ पाट काढून आणलेले आहेत. तक्षशिला प्रांताचा घेर १३३मैल ह्युएनत्संगानें लिहिला आहे. पश्चिमेस सिंधु, उत्तरेस उरस प्रांत, पूर्वेस झेलम नदी आणि दक्षिणेस सिन्हापुर प्रांत, ह्या सीमा होत्या. [ कनिंगहॅम; प्राचीन भारतभूवर्णन; ह्युएनत्संग. ]

**ताई तेलीण**—ही एका तेल्याची बायको होती; पण ती प्रतिनिधि घराण्यांतील परशराम श्रीनिवास याजपाशीं राख म्हणून राहिली. त्याचा व हिचा संबंध सर्वश्रुत होता. याच प्रतिनिधीस थेटांपंत असें म्हणत. १८०६ सालीं प्रतिनिधीच्या आईनें तिचें व त्याचें जमेना म्हणून जेव्हां बापू गोखल्याच्या मदतीनें त्यास कैद करून मसूरच्या गढींत अटकेंत ठेविलें तेव्हां तेलणीनें अवघड असा वासोटा नांवाचा किल्ला आपल्या ताब्यांत घेतला व मग मसूरच्या गढीवर हल्ला चढवून प्रतिनिधीस बंधमुक्त करून आणलें (१८०७). बंधमुक्त झाल्यावर प्रतिनिधीनें पेशव्याविरुद्ध बंड केल्यामुळें बाजीरावानें बापू गोखल्यास पुन्हां त्याच्यावर पाठवून त्यास पुणें येथें कैद करून आणलें. तो कैदेंत पडल्यावर त्याचे बहुतेक किल्ले व मुलूख भराभर पेशव्यांच्या हातीं पडले, तथापि वासोटयाचा किल्ला ताई तेलिणीच्या हातीं असल्यामुळें तिनें तो आठ महिनेपर्यंत झुंजविला. शेवटीं तिच्या धान्याच्या कोठारास आग लागल्यामुळें ती शत्रूस शरण आली; मग तिला आणून पुण्यास ठेविलें. या वेळच्या प्रसंगास अनुलक्षून एक आर्या (श्रीमंत पंतप्रतिनिधि यांचा किल्ला......वासोटा) प्रसिद्ध आहे. ताई ही अखेरपर्यंत पंतांजवळच होती. हिचें खरें नांव रमा असें होतें पंत व्यसनी व दुर्वर्तनी निघाल्यानें त्याचें व आईचें पटत नसे; त्याच्या दोन बायकाहि त्याच्यापासून दूर रहात; मरेपर्यंत त्यांची व पंताची भेट झाली नाहीं [ डफ; अष्टप्रधानांचा इतिहास. ]

**ताग**—यास संस्कृतमध्यें शण, गुजराथींत शण; हिंदींत घोरू, कानडींत सणबू अशीं नांवें आहेत. तागाची लागवड हिंदुस्थानांत सर्व ठिकाणीं होते. हें पीक वाखासाठीं व हिरवाळ खतासाठीं करतात. गुजराथेंत गोराडू जमिनींत हें पीक फारच जोरानें वाढतें. हें पीक ठाणें जिल्ह्यांत वाखासाठीं भात कापल्यानंतर घेतात. रत्नागिरी जिल्ह्यांतील देवगड तालुक्यांत वरकस जमिनींत व खरीपांत नाचणी किंवा सांवा घेऊन मग सण घेतात. मळईच्या जमिनींत सण फारच होतो. खानदेशांत व पंचमहाल जिल्ह्यांत ह्या पिकाची लागवड वाखासाठीं बऱ्याच प्रमाणांत करतात. मध्यप्रांतांत याचा पेरा अकोट, इलिचपूर, मोरशी, छिंदवाडा, शिवणी वगैरे ठिकाणीं विशेष होतो. हिरवळ खताकरतां गुजराथेंत, नाशिक जिल्ह्यांत व उंसाच्या रानांत सण पुष्कळ पेरतात व पीक दोन अडीच महिन्यांचें झालें म्हणजे तें नांगरानें जमिनींत गाडून टाकतात. यानें जमिनीचा पोत सुधारतो; व पोषक द्रव्यांचा सांठाहि वाढतो. देवगड तालुक्यांत मे महिन्यांत जमीन राबवून साव्याचें पीक घेतात व मग सण पेरतात. जून जुलई महिन्यांत दर एकरीं साधारणपणें साठ सत्तर पौंड बीं पेरतात. परंतु देवगड तालुक्यांत ऑगस्ट महिन्यांत नव्वद ते शंभर पौंड बीं हातानें फेंकून पेरतात. हें पीक वाखाकरितां सप्टेंबर महिन्यांत काढतात. देवगड तालुक्यांत ताग नोव्हेंबर महिन्यांत उपटतात व चार दिवस उन्हांत वाळवतात. नंतर त्याच्या जुड्या बांधून त्या वाळण्यासाठीं सुमारें तीन आठवडे उभ्या करून ठेवतात. पुढें बीं काढून उन्हाळ्यांत मार्च एप्रिल महिन्यांत त्या पाण्यांत भिजत घालतात व त्यांजवर धोंड्यांचें दडपण घालून चेपून ठेवतात. देशावर ताग सुमारें पांच दिवस भिजूं घालतात परंतु देवगडाकडे त्याला सात दिवस लागतात. जुड्या बाहेर काढून त्याचा वाख काढतात. व नंतर तो धोंड्यावर काठीनें दोन मिनिटें ठोकतात. पुन्हां त्याची सर्व घाण निघेपर्यंत तो पाण्यांत बडवून बुडवून धुतात. नंतर वाखाच्या वेण्या वळून दोन तीन दिवस एकावर एक ठेवतात व पुढें त्या वेण्या सोडून दोरीवर चार दिवस वाळवतात. एक मनुष्य एक दिवसांत सरासरी पांच पौंड वाख काढूं शकतो. याच्या दर एकरीं उत्पन्नाचे आंकडे खालीं नमूद केल्याप्रमाणें देतातः—

वाळलेल्या काड्यांचें वजन ६२८० पौंड, वाखाचें वजन ५२० पौंड. व वाखाचें सणकाड्यांशीं शेकडा प्रमाण ८.२. किंमत दर–रुपयास आठ पौंडप्रमाणें.

सणाचा वाख अंबाडी व ज्यूटपेक्षां जास्त मजबूत असून टिकाऊ असतो. वाखासाठीं पीक साडेचार महिन्यांनीं कापतात. सन १९१६–१७ सालीं ३५०६० टन वाख परदेशीं

रवाना झाला. तागाच्या वाखाचें कापड, दोऱ्या, दोरखंडें, जाळी, सुतळी, गुपण्या पोतीं वगैरे करतात.

वाखाच्या पिकांत तागाला पहिलें स्थान मिळतें; कारण हें पीक करणें फायदेशीर असून याची मागणी व्यापारांत फार आहे. बंगाल्यांत कारखानदार व शेतकीखातें या दोघांचेहि या पिकाचें उत्पन्न वाढविण्यासाठीं प्रयत्न चालू आहेत. कारखानदारांनीं बीं तयार करण्यासाठीं आपल्या जमिनी शेतकीखात्याकडे दिल्या आहेत. मि. फिंलॉ, वाखाचे तज्ञ, यांनीं बियांची निवड करून व पिकांना एरंडी, सुपरफॉस्फेट, सलफेट ऑफ अमोनिया व नायट्रेट ऑफ सोडा हीं वरखतें देऊन तागाचें उत्पन्न वाढवितां येतें असें सिद्ध केलें आहे. शिवाय तागाच्या पिकाला पोटॅश खतापासून विशेष फायदा होत असून रायझोक्टोनिया रोगाला प्रतिबंधक असाहि त्याचा उपयोग होतो. या पिकाखालीं दर वर्षी सुमारें तीस लक्ष एकर जमीन असते व यापेक्षांहि जास्त क्षेत्र वाढण्याचा संभव आहे.

वाखापैकीं बहुतेक माल परदेशीं रवाना होतो बाकीचा राहिल्यापैकीं कांहीं पोतीं, कॅन्व्हस, सुतळी वगैरे रूपानें बाहेर जातो, व कांहीं हिंदुस्थानांत खपतो. माहे मार्च सन १९१४ अखेर पांच वर्षांची सरासरी पहातां दर वर्षी सुमारें ७२०००० टन ( ४० लक्ष गढ्ढे ) वाख सुमारें एकतीस कोटी, व तयार झालेला माल बावीस कोटी रुपये किंमतीचा म्हणजे साधारणपणें ४३ कोटींचा माल परदेशीं रवाना होतो.

जूटताग हें पीक मुख्यत्वें पूर्वबंगाल, आसाम व बहार या प्रांतांत फार महत्त्वाचें आहे. याशिवाय कुचबिहार, वहार व ओरिसा प्रांतांत याची लागवड होत असून नेपाळांतहि याचा थोडाबहुत पेरा होतो. याचा पेरा जमिनीच्या योग्यतेप्रमाणें व पावसाच्या अनुरोधानें फेब्रुवारीपासून जूनपर्यंत करतात. बीं दर एकरीं सुमारें नऊ पौंड पेरितात. कापणीचा हंगाम ऑगस्ट ते नोव्हेंबरपावेतो असतो. कापणीस उत्तम वेळ म्हटली म्हणजे फळ धरूं लागलें की कापणी करावी. याचा वाख पाण्यांत भिजत घालून काढितात. तागाचा वाख इतर वाखापेक्षां कमजोर असूनहि त्याचें विशेष महत्त्व, नरमपणा, रेशमाप्रमाणें चकाकी व दोरा वळून कपडा विणतां येतो म्हणून आहे. तागाचा कपडा टिकाऊपणांत कमी असतो. बंगाल्यांत दर एकरीं खर्च सुमारें तीस रुपये येतो व उत्पन्न पंधरा मण ( एकमण = ८० पौंड ) येतें वाखाला दर मणीं सरासरी आठ नऊ रुपये किंमत पडते.

तागाची विक्री बंगालामध्यें आपल्याकडील कापसाप्रमाणेंच मारवाडी दलालांमार्फत होते. मारवाडी दलाल खरेदीदाराजवळ व्यवहार करतात व मालकाला त्यापेक्षां कमी किंमत देतात व मधील फरक व दलाली आपण घेतात. तागाचें वजन वाढावें म्हणून त्यावर पाणी व वाळूहि टाकतात. अलीकडे ताग पहिल्याइतका उत्तम निघत नसून कनिष्ठ दर्जाचा माल बाजारांत जास्त येतो. याबद्दल संशोधन केलें असतां जमीनीची निःसत्त्वता व हलका, पण पुष्कळ माल काढण्याची प्रवृत्ति हीं दोन कारणें या बाबतींत आढळून आलीं व निवडक बीं वापरणें वगैरे उपाय सुचविण्यांत आले आहेत उत्तम तागाचें तलम कापड व सामान्य तागाचे पडदे, सतरंज्या, गोणपाटें वगैरे जिन्नस होतात. हलक्या व निरुपयोगी तागाचा कागद करतात व खरखरीत वल्कट तागाचीं दोरखंडें करतात. हिंदुस्थानांतील गिरण्यांत जाडाभरडा माल निघतो व यूरोपांत व अमेरिकेंत सफाईदार व उंची माल काढतात.

वर दिलेल्या दोन जातींखेरीज मॅनिला ताग म्हणून एक तागाची जात आहे. ज्या जमीनींत झाडपाला कुजला असेल अशा जमीनींत हा ताग होतो. हा मूळ फिलिपाइन बेटांतील असून अलीकडे हिंदुस्थान, अंदमान, आराकान पर्वत यांमध्यें याची लागवड होते. याचे तंतू मजबूत असून वजनांत हलके असतात. याचे दोर व कागद करतात. याखेरीज राजमहालताग नांवाचा एक ताग प्रसिद्ध आहे. हा एका वेलीं( मार्सडेनिया )पासून काढतात. या वेलींच्याहि दोन तीन जाती आहेत. याच्या तंतूंचीं जाळीं, सुतळी, दोर वगैरे करतात. हा सिक्किमपासून पश्चिमेकडील हिमालयाच्या भागांत आहे.

**तागा**--पंजाबांतील एक जात. लो. सं. १३२२३. हे हिंदु व मुसुलमान असून मुख्यतः गुरगांव, दिल्ली, कर्नाळ व अंबाला जिल्ह्यांत आढळतात. यांची उत्पत्ति ब्राम्हणांपासून आहे. हे शेतकी करतात.

**ताजमहाल**—ताजमहालची इमारत आपल्या अप्रतिम सौंदर्यानें जगांतील सर्व इमारतींत प्रथमपद पावली आहे. ही इमारत आग्र्यापासून दीड कोसावर यमुनानदीच्या पश्चिमतीरावर आहे. ती बांधण्याच्या कामीं वीसहजार मनुष्यें खपत होतीं. हिंदुस्थानांत शिल्पशास्त्र त्या वेळेस किती उत्कृष्ट स्थितींत होतें, याची उत्तम साक्ष ही इमारत देते. तिच्या एकंदर स्वरूपावर जनानी झांक मारते असें मार्मिक शिल्पज्ञ म्हणतात.

इसवी सन १६०७ मध्यें शहाजहान पंधरा वर्षांचा असतां जहांगिरनें त्याचा निका अर्जुमंदबानू उर्फ मुम्ताजमहाल हिच्याशीं ठरविला. नंतर पुढें पांच वर्षांनीं हें लग्न झालें. ही बऱ्हाणपूर येथें १६३१ सालीं मृत्यु पावली. तिच्या मृत्यूनें शहाजहान इतका शोकग्रस्त झाला कीं आठ दिवसांत तो दरबारास आला नाहीं. बायकोच्या कबरेजवळ जाऊन तो ढळढळा रडे. प्रथम तिचें दफन बऱ्हाणपुरास केलें व नंतर तिचें प्रेत आग्र्यास आणलें. आग्र्याच्या दक्षिणेस राजा जयसिंग याच्या मालकीची एक जागा होती, ती त्याजकडून बादशहानें खरेदी केली; आणि तज्ञ कारागिरांकडून इमारतीचे नकाशे मागविले. त्यांपैकीं एक पसंत

करून प्रथम त्याचा लांकडी नमुना तयार करविला. नमुन्याप्रमाणें स. १६३१ च्या आरंभीं इमारतीस सुरुवात झाली, ती स. १६४३ च्या जानेवारींत पुरी झाली. मकामतखान व अब्दुलकरीम हे दोघे त्या कामावर मुख्य देखरेख करीत होते. त्या इमारतीस पन्नास लाख रुपये खर्च झाला. आर्फिदी म्हणतो, इमारतीचा खर्च ९ कोटी १७ लाख झाला आणि खालील गृहस्थ निरनिराळीं कामें पाहत होतेः– अमानतखान शिराजी, इसा गवंडी, पिरा सुतार, बन्नुहार, झातमल्ल, व जोरावर, इस्मईलखान रूमी ( वरील घुमट व त्याची परांची वनविणार), रामलाल काश्मिरी बागवान वगैरे. वीस उत्तमोत्तम जातींच्या दगडांचा उपयोग या इमारतीस केला आहे. स. १६४३ त बादशहा ताजमहालांत गेला; आणि एक लाख रुपयांच्या उत्पन्नाचीं तीस गांवें ताजमहालाच्या खर्चाकडे व सभोंवारच्या सराया, दुकानें, बाग यांच्या खर्चासाठीं, लावून दिलीं.

इमारती जवळ बाग आहे तींत जाण्यास विचित्र नक्षीचा दरवाजा लागतो. बागेच्या कडेस ताजमहाल आहे. दरवाजापासून महालापर्यंत सुरूचीं झाडें आहेत; त्यांतून रस्ता जातो त्यांत कारंजीं, पाण्याचे लांबट हौद आहेत. यांत निरनिराळ्या रंगाचे दरवाज्याच्या आंत मह्रिपदार कमानीचे दुजोडी सोपे आहेत. मुख्य महाल, मनोरे व आसपासच्या लहान इमारती यांना संगमरवरी दगड वापरलेला आहे. तो शुभ्र असून त्यांत थोडीशी काळ्या रंगाची झांक मारते. प्रथम मुख्य इमारतीचा चौथरा ( जोतें ), नंतर पटांगण व पुढें मुख्य वेस लागते. तिच्यावर संगमरवरांत कोरून स्लेटीच्या दगडासारखे काळे दगड बसवून कुराणांतील वाक्यें तयार केलीं आहेत. कमानीच्या पुढच्या कडेला संगमरवरी तोडा घातलेला आहे व भिंतीवर चित्रविचित्र नकस काम आहे.

हिच्यांतून आंत गेल्यावर खालीं खऱ्या थडग्याकडे जाण्याचा प्रशस्त संगमरवरी जिना लागतो व डावीउजवीकडे इतर दालनांत जाण्याचे मार्ग आहेत. या दालनाच्या आंत गेल्यावर आपल्या उंचीनें मनास थक्क करून सोडणारी आंतील जमीन आणि भिंतीवरील नक्षीनें डोळ्याचें सार्थक करून टाकणारी दिव्य सृष्टि नजरेस पडते. येथें प्रकाश अंधुक आहे. जमीनीच्या मध्यभागीं अर्जुमंदबानूचें व त्याच्या उजव्या बाजूस शहाजहानाचें कृत्रिम थडगें आहे. वर जीं थडगीं आहेत तीं कृत्रिम म्हणजे दर्शनीय थडगीं आहेत. त्यांमध्यें प्रेतें नाहींत. खरीं थडगीं खालच्या मजल्यांत आहेत वरील थडग्यांभोंवतीं अप्रतिम कौशल्याचें नक्षीदार सोनेरी मखर होतें व त्यांत रत्नजडित फुलें व फुलांचे गुच्छ होते. परंतु असें सांगतात कीं, हें मखर औरंगझेबानें मोडून टाकलें. आतांचें साधें संगमरवरी मखरहि फार पाहण्यालायक आहे. जमीनीवर व भिंतीवर फारच सुरेख नक्षीकाम आहे. पांढऱ्या दगडांत नमुना कोरून आंत रंगीबेरंगी खडे बसवून नक्षीचा प्रकार दाखविला आहे. झाडाचें पान मुरडलें तर आंतील बाहेरील रंग भिन्न दिसतो तो प्रकार देखील त्या त्या रंगाचे खडे बसवून दाखविला आहे. फुलें, पाकळ्या, यांचें निरनिराळ्या अवस्थेमधील निरनिराळे रंग त्या त्या रंगाच्या खड्यांनीं साधले आहेत. कांहीं ठिकाणीं अजूनहि खरे खडे दृष्टीस पडतात.

या इमारतींत आवाजाचा गंभीर प्रतिध्वनि होतो. इमारतीभोंवतीं दालनें असल्यामुळें व त्यांना खिडक्यादि तशा बेतानेंच ठेविल्यामुळें आंत फारसा उजेड पडत नाहीं. यामुळें आंतील गाभारा ओस न दिसतां गुप्त माणसांनीं गजबजल्यासारखा वाटतो.

खालच्या मजल्यांत खरीं थडगीं आहेत. खालीं व वर दोन ठिकाणीं थडगीं बांधण्याची चाल इजिप्शिअन लोकांपासून आलेली आहे या थडग्याचें काम वरच्या थडग्यांइतकें कौशल्यानें व कुसरीनें गच्च भरलेलें नाहीं; त्यांत साधेपणा जास्त राखिला आहे.

येथून वर चढून पुन्हां पुढच्या दालनांतून माडीवर गेलें असतां दर्शनी थडग्यांचा देखावा दृष्टीस पडतो. मध्यें कृत्रिम थडगीं, सभोंवतीं प्रशस्त दालनें, व त्यांच्या बाहेर भव्य कमानी अशी बांधणी आहे. शिखरांत जो वाटोळा घुमट दिसतो तो वास्तविक अंडाकृति आहे. हा आकार शिल्पशास्त्रज्ञ फारच पसंत करतात.

मुख्य इमारतीच्या सभोंवतीं चार मनोरे आहेत. प्रत्येकाचा घेर साठ पांसष्ट फूट असावा. बैठकी अष्टपैलू व मनोरे वाटोळे आहेत. ते पांच मजली असून त्यांची उंची निदान दोंडशें फूट असावी. मुख्य इमारतीच्या दोन्ही बाजूंना लहान लहान दोन इमारती असून त्यावरहि घुमट आहे. सर्व भिंतींचे कोंपरे छाटून सुंदर नक्षीदार मह्रिपा तयार करून खिडक्या केल्या आहेत. या इमारतीची यथार्थ कल्पना, प्रत्यक्ष इमारत पाहिल्याशिवाय येणें अशक्य आहे. नुसत्या फोटोनें अगर चित्रानें या लोकोत्तर सुंदर इमारतीची कल्पना आणून देऊं पाहणें शक्य नाहीं. ताजमहालासारखी सर्वांगसुंदर इमारत फारच क्वचित् पाहण्यांत येते, ही इमारत फारच प्रमाणशुद्ध कलाकुसरीच्या कामानें भरलेली आहे. बांधतांना शहाजहान बादशहानें पाण्यासारखा पैसा खर्च करून ठिकठिकाणीं मनास थक्क करून सोडणारें नक्षीकाम करविलें आहे. ही भव्य, रम्य, प्रमाणशुद्ध व चित्ताकर्षक असून जणूकाय कालच बांधली आहे इतकी ती नवी दिसते.

ताजमहालच्या एका अंगास निमाज पढण्याकरितां एक सोपा आहे. त्यांत ६ हात रुंद अशीं संगमरवरी पांढऱ्या व तांबड्या दगडाचीं आसनें केलेलीं असून, आसनांची संख्या एक हजार आहे. यमुनेचा पाट आणून तो एका चार मजली व उत्तम बांधलेल्या विहिरींत जलक्रीडेसाठीं सोडलेला आहे.

**ताजिक**—ताजिक लोक अफगाणिस्तानच्या दास्यत्वाखालीं असून जे इराणी लोक अफगाणिस्तानचे मूळ

मालक होते त्यांचे वंशज आहेत. ते आपल्याला पर्शियन म्हणवितात. ते अरब व इराणी जातीपासून झालेले असून त्यांचा धंदा हलकी कामें करण्याचा आहे. काबूलच्या उत्तरेकडील जिल्ह्यांतील ताजिक लोक चांगले लढवय्ये आहेत. अफगाणिस्तानांतील ताजिक लोकांची संख्या सुमारें ८० हजार आहे. ताजिक लोक तुर्कस्तान, अफगाणिस्तान, बुखारा, खिवा व काशगर या ठिकाणीं दास्यत्वांत असून बदकशान, वाखन, दार्वेज, कोस्त या ठिकाणीं त्यांच्या हातीं राज्यसूत्रें आहेत. कास्पिअन समुद्राच्या पश्चिमेस त्यांना तात म्हणतात.

ताड—यास लॅटिनमध्यें बोरासस फ्लॅबेलिफेर, इंग्रजींत पाल्मीरा, संस्कृतमध्यें ताल, मराठींत ताड इत्यादि नांवें आहेत.

इतिहास.—ताडास पंख्याच्या आकाराचीं पानें असतात. हें झाड मूळचें हिंदुस्थानांतील नाहीं. परंतु अलीकडे याचा प्रसार फार झाला आहे. ताडाचा वृक्ष आफ्रिकेंतून इकडे आला असला पाहिजे असा पुष्कळ लोकांचा समज आहे. या झाडापासून पांच तऱ्हेचे तंतू निघतात, (१) पानाच्या देंठाभोंवतीं असलेला विरल तंतु, (२) देंठापासून काढलेला, (३) बुंध्याच्या आंतील गाभ्यापासून तयार केलेला, (४) फलवेष्टनापासून काथ्या, व (५) पानापासून निघालेला. पैकीं पानापासून तयार केलेल्या वाकाचा अथवा तंतूचा उपयोग टोपल्या, परड्या, पेटारे इ. वस्तू करण्याकडे करतात. काथ्याचा निर्गत व्यापार मुख्यत्वेंकरून तिनवेल्ली जिल्ह्यांतील तुतिकोरीन येथेंच होतो. ताडाच्या पानांवर अक्षरें कोरून ग्रंथ लिहिण्याचा पूर्वी प्रघात असे. असे ग्रंथ अद्यापिहि बरेच पहावयास सांपडतात. ह्या झाडाचा रस उत्साहवर्धक व कफनाशक आहे. कच्च्या फळांतील गीर व मुळें यांच्या अंगीं दाहशामक व पौष्टिक गुण आहेत. पानथरी विशेष वाढली असतां ताडाची पोय जाळून ती राख औषध म्हणून देतात. देंठांत असलेला मऊ पदार्थ रक्तस्तंभक असतो. लांकूड लवकर फुटतें परंतु आडवें ठेविलें असतां तें मोठेंहि वजन सहन करतें. नळ व नाल्याकरितांहि त्याचा उपयोग करतात. हातांत धरावयाच्या काठ्या, मोरखण्या, छत्र्यांचे दांडे इ. जिनसा याच्याच तयार करतात. सिमेंट तयार करतांना या झाडाच्या रसाचा उपयोग करतात.

खाण्याच्या कामीं याचा नाना तऱ्हेचा उपयोग होतो. टिचकी मारल्याबरोबर फुलांच्या देंठांतून रस खालीं गळतो; तो आंबला म्हणजे त्यास ताडी असें म्हणतात. ताडीचें ऊर्ध्वपातन केल्यास त्या रसाची दारू बनते. रस शिजवून त्याचा उत्तम प्रकारचा शिरका तयार होतो. ताडाच्या रसापासून गूळहि तयार करतात. ताडाच्या ताज्या रसाचें सेवन करणें असेल तर तो आंबू नये म्हणून रस धरावयाच्या मडक्यास आंतून चुना लावतात. ४–५ महिने दररोज ३।८ क्वार्ट या प्रमाणांत या झाडापासून रस निघतो. या झाडास १५पासून २० वर्षे झाल्यानंतर तें ५०वर्षेंपर्यंत रस देऊं लागतें व ३ वर्षांतून एकदां तरी त्यास विसावा न दिल्यास हें झाड मरून जातें. स्त्रीवृक्षाला पुंवृक्षाच्या दीडपट रस असतो; व त्यांत साखरेचें प्रमाणहि इतर पुष्कळ प्रकारच्या ताडांच्या रसापेक्षां जास्त असतें. मार्च महिन्यांत हें झाड फुलून एप्रिल–मेमध्यें फळें येतात व जुलई व ऑगस्टमध्यें तीं परिपक्व होतात. या फळाच्या कवचीच्या आंतील भागांत एक प्रकारचा रस असतो तोच पुढें घट्ट होऊन त्याचा गर तयार होतो. या गरांत एकतऱ्हेचें वी असतें. तें बंगाल्यांत तालसान या नांवानें विकलें जातें. जुलई किंवा आगस्टमध्यें हीं फळें पक्व झालीं म्हणजे त्यांतील रसाळ मध्यवेष्टनाच्या वड्या करतात त्यास पतली असें म्हणतात. आंतील कवचीचें फळ अत्यंत कणखर असतें. जमिनींत लावल्यानंतर २।३ महिन्यांत त्यास मोड येतात; हे अंकुर तसेच खातात किंवा यांचें लोणचें घालतात. हें पुष्कळ ठिकाणीं पीक म्हणून काढलेलें आढळतें. ४।५ महिन्यांत हें काढण्यास योग्य होतें. प्रत्येक एकरीं १८०० पासून ३००० पर्यंत उत्पन्न होतें. कोळी व हलक्या जातीचे लोक हे कच्चे असतांनाच खातात. या फळावरील कवची फोडून आंतील गर शिजवून किंवा तसाच खावयाचा देखील प्रघात आहे.

ताडाचा गूळ.—मद्रास इलाख्यांत तिकडील लोक ताडाच्या रसापासून गूळ करतात. त्या गुळाचा रोजच्या खाण्याकडे खप होतो आणि कांहीं गूळ साखर करण्याच्या कारखान्याकडेहि जातो. श्रीमंत गायकवाड सरकारच्या गणदेवी परगण्यांतील साखरेच्या कारखान्यांत मद्रास इलाख्यांतून लाखो मण गूळ येऊन त्यांची साखर बनत होती हा गूळ फारच लांबून आणावा लागल्यानें त्यापासून एक वर्षी नुकसान झालें यामुळें तो कारखाना बंद पडला. मद्रास इलाख्यांत जसा ताडाचा गूळ होतो तसा मुंबई इलाख्यांत व्हावा यासंबंधीं पुष्कळ प्रयत्न चालले आहेत. ताड, खजूरी, शिंदी, सुरमाड, माड, या सर्व झाडांपासून रस घेऊन त्याचा गूळ करतां येईल.

ताडपत्री, तालुका.—मद्रास इलाख्यांतील अनंतपूर जिल्ह्याचा ईशान्येकडील एक तालुका. क्षेत्रफळ ६४१ चौरस मैल. लोकसंख्या ( १९२१ ) १११५५०. या तालुक्यांत खेडीं ९३ असून ताडपत्री व यादिकी हीं मोठीं गांवें आहेत. पूर्वसरहद्दीवर इराकोंडा टेंकड्या आहेत. या तालुक्यांतून पेन्नार ही नदी वाहते. नदीच्या दुथडीवर काळी, कापसाची अत्यंत सुपीक अशी जमीन आहे. मुख्य पीक कापूस आहे.

गांव.—मद्रास. जिल्हा अनंतपूर. ताडपत्री तालुक्याचें हें मुख्य ठिकाण आहे. लोकसंख्या (१९२१)११२९२ आहे. रामलिंग नांवाच्या राजानें स. १६०० मध्यें हें गांव वसविलें. येथील व्यापार बराच मोठा असून क्षेत्र म्हणूनहि या गांवची ख्याति आहे. याच राजानें नदीकिनाऱ्यावर श्रीरामेश्वराचें एक सुंदर देवालय बांधलें व याचा मुलगा तिम्मानायडू

यानें चितलरयास्वामींचें एक देवालय बांधलें. गांवाच्या मध्यमार्गी नुकतेंच एक देवालय बांधलें आहे.

**तांडा**, त ह शी ल.—संयुक्तप्रांत. फैजाबाद जिल्ह्यांतील ईशान्येकडील ही तहशील आहे. तांडा व बिहार हे दोन परगणे मिळून ही तहशील झाली आहे. या तहशिलींत ७३५ खेडीं आहेत. येथील गोग्रा नदीच्या वरचा भाग सुपीक असून इतर भाग अगदींच खराब आहे.

गां व.—संयुक्तप्रांत. फैजाबाद जिल्हा. तांडा तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें गांव फरुकशिअरनें महमद हयात याला दिलें होतें. येथील मलमल ढाका मलमलीपेक्षांहि सुरेख असते. यूरोपियन व्यापाऱ्यांनीं येथें येऊन विणकामांत पुष्कळ सुधारणा केली. शिवाय येथें निरनिराळ्या प्रकारच्या कापसाचें कापडहि तयार होतें. या गांवांत मामुली कचेऱ्या असून ३ शाळा आहेत.

**तांडुर**—संस्थान हैद्राबाद. जिल्हा कुलबुर्गा, कोडांगल तालुक्यांतील तांडुर जहागिरीचें हें गांव मुख्य ठिकाण आहे. १९०१ सालीं लोकसंख्या ५,९३०. हें फरशीकरितां प्रसिद्ध आहे.

**तातवा अथवा तंति**—बंगाल, बहार व आसाम प्रांतांतील विणकरी लोकांची जात. यांचा पूर्वज विश्वकर्म्यापासून शूद्र स्त्रियेच्या पोटीं जन्मला असें हे लोक समजतात. विश्वकर्मा हा यांचा देव आहे. अलीवर्दीखानानें एका तंतीला गवतावर वाळत असलेलें वस्त्र गाईनें खाल्लें म्हणून शिक्षा दिली होती. ८८ गज लांब दोऱ्याचें फक्त एक रति वजन भरेइतकें बारीक सूत कातण्याबद्दल यांची प्रसिद्धी होती. प्रसिद्ध ढाकाची मलमल हेच लोक विणीत असत. (ढाका पहा). बंगाल्यांत यांच्या हातचें पाणी ब्राह्मण लोक पितात.

**ताताचार्य**—ह्या कवीचा जन्म कांचीं येथें झाला होता. हा द्वैतमती माध्व होता. याचा उदय शालिवाहनाच्या १५ व्या शतकांत झाला. हा मोठा परोपकारी असे. सात्विक ब्रह्मविद्याविलास नांवाचा द्वैत वेदांतपरग्रंथ यानें केलेला आहे. चंद्रगिरी येथील राजा व्यंकटपति रायलू याचा हा कुलगुरु होता. याचा व अप्पया दीक्षिताचा वाद होऊन हा जिंकला गेला व यानें अप्पया दीक्षितावर मारेकरी घातले अशी आख्यायिका आहे. याची स्त्री पतिव्रता असून याच्या मरणाच्या खोट्या वार्तेनें ती मृत्यु पावली व तें पाहून हाहि मृत्यु पावला असें सांगतात.(कविचरित्र) हा अप्पया दीक्षिताचा चुलत भाऊ होता असें ऑफ्रेक्ट नमूद करतो.

**तातारखान**—हा तुघलख शहाचा दत्तकपुत्र असून सुलतान महंमुद शाह तघलख याचा हा मुख्य प्रधान होता. 'तफ्सीर तातार खानी' नामक कुराणावरील टीकेचा हा कर्ता असून, 'फतावी तातर खानी' नांवाचाहि महंमदी कायदा विषयक एक ग्रंथ यानें रचिला आहे. सुलतान फिरोजशाह बार्बेक याच्या कारकीर्दींत हा मरण पावला [ बील. ]

**तातार लोक**—रशियाच्या साम्राज्यांतील मुसुलमान व तुर्क उत्पत्तीच्या रहिवाशांनां तातार म्हणतात. ( सामान्य प्रचारांतील तार्तर हें नांव बरोबर नाहीं ) यूरोपांतील रशियांतील बहुतेक तातार लोक, तेराव्या शतकांतील मंगोल स्वारींतील अवशिष्ट लोकांचे वंशज आहेत, व सैबेरियांतील तातार लोक तुर्क लोकांचे वंशज असून त्यांच्यांत फिन व सामोयिडी रक्ताचेंहि थोडेंबहुत मिश्रण आहे. रशियनसाम्राज्यांत राहणाऱ्या तातार लोकांच्या तीन मुख्य शाखा आहेत. (१) यूरोपांतील रशिया व पोलंड येथील तातार, ( २ ) काकेशसमधील तातार व ( ३ ) सैबेरियांतील तातार. यांचे एकंदर ११ पोटविभाग आहेत. ते:— ( १ ) खानन तातार, ( २ ) आस्ट्राखान तातार, ( ३ ) क्रिमियन तातार, ( ४ ) नोगेस, हे कुमा नदीच्या कांठीं रहातात. ( ५ ) करचेस, हे एलबुर्झच्या आसपास रहातात. (६) पर्वतावर रहाणारे तातार, ( ७ ) बारब तातार, ( ८ ) चुलिअम, ( ९ ) अबाकान, ( १० ) अल्ताई पर्वताच्या उत्तरेकडील उतरणीवर राहणारे तातार व ( ११ ) अल्ताई तातार.

सहा शतकांपूर्वी ज्या मंगोल व तुर्क रक्ताच्या लोकांनीं यूरोपवर स्वारी केली त्यांना प्रथमतः तातार म्हणत. हल्लीं तातार हें नांव स्थूलमानानें उरल्अल्ताईक राष्ट्रजातींनां व वस्तुतः रशियांतील तुर्कभाषा बोलणाऱ्या मुसुलमानांनां लावतात. हे कधींहि आटोमन अथवा सेल्जुक साम्राज्यांत नव्हते. त्यांनीं लहान लहान वसाहती केल्या होत्या व इतर मुसुलमानांपासून ते अलिप्त होते.

**तात्या टोपी**—१८५७ सालच्या बंडांत प्रसिद्धीस आलेला पुढारी. १८५९ सालीं एप्रिल महिन्याच्या ७ व्या तारखेस तो पकडला जाऊन १८ व्या तारखेस त्यास फांशीं दिलें.तो कऱ्हाडा ब्राह्मण असून,जवळ येथील (जि. नगर रहिवाशी होता तो पुण्यास पेशव्यांच्या तोफखान्यांत नोकर होता. पुणें सोडून तीस वर्षे मध्यहिंदुस्थानांत शिंदे व निरनिराळ्या संस्थानिकांच्या पदरीं त्यानें तोफखान्यावर नोकरी पत्करिली होती. तोफखान्यावरील अधिकारी म्हणून त्याचें तोफखाने हें आडनांव पडलें. पुढें त्यास नानासाहेब पेशव्यानें आपल्या पदरीं ठेविलें. बंडाच्या सुरवातीच्या वेळीं तो नानासाहेबाच्याच पदरीं ब्रह्मावर्त येथें काम करीत होता. १८५७ च्या आक्टोबरच्या १० व्या तारखेस, आग्रा शहरीं कर्नल ग्रेथडच्या फौजेवर ज्या आठ हजार बंडवाल्यांनीं हल्ला चढविला त्यांचा तात्या हाच सेनापति होता. त्याचप्रमाणें झांशी येथें राणी लक्ष्मीबाई हिलाहि तात्या मदत करण्याकरितां आला होता, परंतु जनरल रोझनें त्याचा पराभव केल्यामुळें त्यास पळून जावें लागलें. पुढें तात्या, राणी लक्ष्मीबाई, बांद्याचा नबाव, रावसाहेब पेशवे वगैरे पुढारी ग्वाल्हेरवर चाल करून गेले व जयाजीराव शिंद्याचा पराभव करून त्यांनीं तें शहर आपल्या ताब्यांत घेतलें. पण पुढें ग्वाल्हेर इंग्रजांनीं घेतलें. बेटवाच्या लढाईच्या वेळीं तात्याच्या हाताखालीं २२,०००

बंडवाल्यांची फौज होती. इतकी मोठी फौज इतरत्र कोणत्याहि वेळीं त्याच्या हुकुमाखालीं नव्हती. बंडाच्या प्रारंभींच तात्यानें इंदुरास सैन्य फितविण्याचा प्रयत्न केला होता. तेथून त्यानें सागरच्या किल्ल्यावर हल्ला करून तो बळकट किल्ला काबीज केला व सात महिने ताब्यांत ठेविला होता. (१८५८ फेब्रुवारी).

तात्या जर दक्षिणेंत जाता व आपल्या चातुर्यानें त्यानें इंग्रजांविरुद्ध दक्षिण उठविली असती तर आमची सत्ता कायमची नाहींशी झाली असती असें एका इंग्रजानेंच म्हटलें आहे. तात्या फार पाताळयंत्री, धूर्त, शूर व धाडशी होता. मात्र त्याच्या हाताखालील फौज बिन कवायतीची व पोटभरू असल्यानें त्याचा पराभव होई. तरी पण त्यानें इंग्रजी सेनापतीचा एकदोनदां पराभव केला होता व सर रोज सारख्या सेनापतीसहि आपल्या चलाखीनें चकित करून सोडलें होतें. बंडाचा बीमोड झाल्यानंतर जवळच्या दोनतीनशें लोकांनिशीं त्यानें मोठमोठ्या मी मी म्हणविणाऱ्या सेनापतींना दोन वर्षे आपल्या मागें रखडवीत लावून खडे चारले. शेवटीं नर्मदाकांठच्या एका जंगलांत पदरच्या लोकांपैकीं एकानें विश्वासघात करून त्याला पकडून दिलें. [ बील; म्यालेसन; माझा प्रवास. ]

तात्यास सुभेरी येथें पकडलें असतां त्यानें आपली स्वतःची सर्व हकीकत इंग्रज अधिकारी मीड याच्या पुढें सांगितली. ती मॅलेसनच्या 'हिस्टरी ऑफ दि इंडियन म्युटिनि, भा. ३' (परिशिष्ट १ लें) मध्यें छापलेली आहे. तिचा त्रोटक सारांश पुढीलप्रमाणें:--

"माझें नांव तात्या व वडिलांचें नांव पांडुरंग. नगर जिल्ह्यांतील पातोडे महालांतील जवळें हें माझें मूळचें गांव. त्यानंतर फिरत फिरत मी ब्रह्मावर्तास नानासाहेब पेशव्याजवळ नोकरीस राहिलों. १८५७ च्या मे महिन्याच्या प्रारंभीं कानपूरच्या कलेक्टरानें मला आणि नानासाहेबांना भेटीला बोलावून स्वतःचें रक्षण बंडवाल्यांपासून करण्याबद्दल विनविलें, व नानासाहेबांनीं तें कबूल केलें परंतु दोनच दिवसांनीं बंडवाल्यांनीं आह्मांस कैद केलें व नानासाहेबांचा कानपूर येथील वाडा लुटला. पुढें बंडवाले आह्मां दोघांना घेऊन दिल्लीकडे निघून गेले. त्यांनीं आह्मांला बंडाचा पुढाकार घेण्याबद्दल आग्रह केला परंतु प्रथम आम्ही तें नाकारलें. नानासाहेबानें जनरल व्हिलर यास अलाहाबाद येथें पोहोंचविण्याबद्दल खटपट केली. पुढें चाळीस नावा तयार करून कानपूरच्या सर्व यूरोपियन लोकांस सुखरूपपणें गंगापार करीत असतां बंडवाल्यांनीं आमचें न ऐकतां नावांवर हल्ला करून त्यांतील यूरोपियनांची कत्तल केली. या कृत्यास आमची दोघांची संमति नव्हती. त्यानंतर चार दिवसांनीं नानासाहेब आपल्या आईचें श्राद्ध करण्याकरतां ब्रह्मावर्तास गेले तेव्हांहि ते बंडवाल्यांच्या कैदेंतच होते. बंडवाल्यांनीं फत्तेपुरावर हल्ला केला तोहि नानासाहेबांच्या संमतीशिवायच केला. कानपूर येथें बंडवाल्यांचा पराभव झाल्यावर आम्ही ब्रह्मावर्तास गेलों आणि आमच्या मागें बंडवाले आले. तेथून नानासाहेब, बाळासाहेब, रावसाहेब, मी आणि आमचीं बायकामाणसें असे सर्वजण फत्तेपुरास गेलों. तेव्हां बंडवाल्यांनीं ब्रह्मावर्त येथील नानासाहेबांचा वाडा लुटला. त्यानंतर शिवराजपुर येथें ४२ व्या तुकडीनें नानासाहेबाची मदत मागितली, तेव्हां मला त्यांनीं पाठविलें. आम्ही ब्रह्मावर्तास गेलों परंतु तेथें आमचा पराभव झाला. नंतर श्रीमंतांच्या आज्ञेनें मी मोरार येथें जाऊन तेथल्या पलटणींनां घेऊन काल्पीस आलों. या सैन्याचे अधिपती बाळासाहेब झाले. नंतर मी कानपुरास गेलों. तेथील लढाई ११ दिवस चालली होती. तेथें आमचा पराभव झाल्यावर आम्ही शिवराजपुरास लढाई दिली पण तेथेंहि आह्मांस हार खावी लागली. तेथून गंगापार होऊन आम्ही खेरा येथें राहिलों. नंतर रावसाहेब यांच्या हुकुमावरून मी काल्पीला गेल्यावर नानासाहेबानें मला चरखारीस पाठविलें.

अकरा दिवस लढाई करून मी चरखारी तेथील राजापासून काबिज केलें व तिकडे रावसाहेब काल्पीला गेले. त्यावेळीं बाणपूर, शहागड व आणखी तीन ठिकाणचे राजे मला येऊन मिळाले. इतक्यांत झांशीच्या राणीचें, मदत करण्याबद्दल मला पत्र आलें व रावसाहेबाची संमति घेऊन मी झांशीस गेलों. दुसऱ्या दिवशीं लढाईस तोंड लागलें परंतु तींत आमचा पराभव झाला व आम्ही काल्पीस गेलों. आमच्या मागून त्याच रात्रीं लक्ष्मीबाई आल्या व रावसाहेबाजवळ झांशी लढविण्यासाठीं फौज मागूं लागल्या. त्याप्रमाणें मला रावसाहेबांनीं राणीबरोबर पाठविलें. वाटेंत आह्मीं कुंच येथें लढाई दिली. परंतु तींत आमचा पराभव झाला. तेव्हां मी चिरखी येथें माझ्या मातापितरांस भेटण्याकरितां गेलों व राणी लक्ष्मीबाई काल्पीस गेली. काल्पी येथें रावसाहेबांनीं इंग्रजांस तोंड दिलें परंतु तेथेंहि त्यांना पराभव झाला. म्हणून ग्वाल्हेरास जाण्यासाठीं सर्व मंडळी गोपाळपूर येथें जमली. तेथेंच मीहि त्यांना येऊन मिळालों. ग्वाल्हेरीस आल्यावर जयाजीराव शिंदे यांनीं अडथळा केल्यामुळें त्याचा पराभव करून आह्मीं ग्वाल्हेरीचा किल्ला घेतला. नंतर काल्पी आणि शिरपूर येथील इंग्रज पलटणी आमच्यावर चाल करून आल्या व चार पांच दिवस युद्ध होऊन आमचा पराजय झाला. या लढाईंत लक्ष्मीबाई गोळी लागून पडल्या. आह्मीं रात्रीं जावरा-अलिपूर येथें मुक्काम केला. तेथें थोडीशी चकमक उडून चंबळा उतरून आह्मीं टोंक येथें गेलों. तेथील नवाबाचा पराभव करून नंतर भिलवाडा येथें गेलों व तेथून कोटयावरून पाटणास गेलों. यावेळीं बांदेवाला व फुर्मानवाला नवाब हे दोघेहि आमच्या बरोबर होते. पाटणाच्या राजाचा पराभव करून आह्मीं त्याच्यापासून खंडणी वसूल केली. आणि दर एक स्वाराला दरमहा ३० रु. आणि दर एक पायिकाला दरमहा १२ रु. याप्रमाणें तीन महिन्यांचा पगार

वाटला. तेथून आम्ही राजगड मार्गानें सिरोंज येथें गेलों. सिरोंजहून इसागडावर हल्ला करून आम्हीं तें घेतलें. रावसाहेबांच्या हुकुमावरून मी चंदेरीस गेलों. चंदेरीहून मनगौळी जकळेमवरून सुलतानपूर येथें मी आलों. वाटेंत इंग्रज पलटणीच्या व आमच्या चकमकी होतच होत्या. सुलतानपुरास रावसाहेब मला येऊन मिळाले. तेथून ललितपूर, कजुरिया, तालभाट, राजगड इत्यादि गांवांवरून नर्मदा उतरून कौगांव वस्ती येथें आलों. मध्यंतरी कंदुळ येथील इंग्रज सरकारच्या कचेऱ्या आमच्या सैन्यानें रावसाहेबांच्या आज्ञेविरुद्ध जाळून टाकल्या. कौगांव येथील होळकराच्या एका रिसाल्याला सामील करून घेऊन आम्ही गुजराथकडे वळलों व वाटेंत तारायंत्राच्या तारा तोडून टाकिल्या, परंतु इंग्रजांची एक तुकडी आमच्यावर रवाना झाली आहे असें कळल्यामुळें आम्हीं पुन्हां नर्मदेकडे वळलों. चिखलीस नर्मदा उतरून राजपुराच्या राजाचा पराभव करून आम्ही छोटा उदेपूरास गेलों व तेथें इंग्रजांच्या सैन्याचा पराभव केला. तेथून देवगड बारीवरून बासवाडा टाकून आम्ही सालमीर येथें गेलों व तेथें एक दिवस मुक्काम करून उदेपुरास जाण्यास निघालों असतां मध्येंच इंग्रज भेटल्यामुळें पुन्हां भिलवाड्याकडे परतलों. तेथून प्रतापगडास जाऊन व इंग्रजांनां तोंड देऊन, मंदसोरवरून झिटापूर, छप्राबारोद,व नहरगड येथें गेलों. तेथील राजा मानसिंग आम्हांस मिळला. परंतु तेथून देवासकडे जात असतांना तो आम्हांस सोडून गेला. मध्यंतरी इंग्रजांचा पराभव करून आम्ही मारवाडकडे चाललों. वाटेंत देवगड बारीपासून माझी व रावसाहेबांची बोलाचाली होऊन मी यापुढें तुमच्याबरोबर पळत फिरणार नाहीं व वेळ आल्यास निघूनहि जाईन असें स्पष्ट बजाविलें. पुढें परोन येथें मी त्यांनां सोडलें. त्यावेळीं रावसाहेबांच्या बरोबर ६००० सैन्य होतें. आणि माझ्याबरोबर १ स्वयंपाकी ( रामराव ), १ शागीर्द, ( नारायण ) आणि १ मोतद्दार ( गोविंद ) येवढाच काय तो परिवार होता. पुढें दोन मजला झाल्यावर गोविंद मला सोडून गेला. परोनच्या जंगलांत मला राजा मानसिंग भेटला. त्यानें मला रावसाहेबांना सोडल्याबद्दल दोष दिला. परंतु त्यांच्याबरोबर पळत फिरण्याचा मला कंटाळा आला असें मीं त्यास सांगितलें. यावेळीं रावसाहेब पाटणावरून सिरोंजास गेला असें मला समजलें. मी बातमी काढली असतां रावसाहेब तेथें नसून इमामअली, वर्दी मेजर, फिरोजशाहा, अंबापाणीवाला नबाब आणि अदील महंमद हे आठ नऊ हजार सैन्यासह तेथें असल्याचें समजलें. त्यांनीं मला मदतीस बोलाविलें. यावेळीं राजा मानसिंग हा आपल्या गांवीं जातो असें मला सांगून महुदीया येथें मेजर मीड याला शरण गेला होता व त्यानें त्याला माफी केली होती. मानसिंगास मी वरील इमामअलीनें मदतीस बोलाविलें आहे असा निरोप कळवून मी पुढें काय करावें असा त्यास सल्ला विचारला. तेव्हां तिसऱ्या दिवशीं रात्रीं तो स्वतःच माझ्याकडे आला व माझ्याशीं इतर गोष्टी बोलूं लागला. तेव्हां मी त्याला पुन्हां सल्ला विचारला असतां, सकाळीं काय तें नक्की सांगतों असें त्यानें उत्तर दिलें. त्यानंतर मी निजण्याकरतां गेलों व मला झोंप लागली असतां मानसिंगानें विश्वासघात करून मला पकडलें व त्यानें मला इंग्रजांच्या (मेजर मीड ) हवालीं केलें" याप्रमाणें तात्याटोपीनें आपली हकीकत ता. १०एप्रिल १८५९ रोजीं मुवेरी गांवीं इंग्रज अधिकारी मेजर मीड यास सांगितली.

तात्याला पकडून देण्याबद्दल मानसिंगास वार्षिक १ हजाराचें वर्षासन इंग्रजांनीं करून दिलें तें अद्याप चालत आहे ( टाईम्स १७-३-१८९९ ).

तात्यांचा मुलगा पांडुरंगराव हा नानासाहेब पेशव्याबरोबर नेपाळांत गेला होता. त्याचे चारीहि मुलगे ( वडील बळवंतराव ) पुढें नानासाहेबांच्या बायकामंडळींबरोबर राणीगंज येथें रहात असत. त्यांनीं पेशव्यांच्या या मंडळींनां मातृवत मानून यावज्जन्म त्यांच्या सेवेंत आपलें जन्म खर्चिलें.

तात्याची जबानी इंग्रज लष्करी अधिकाऱ्यांनीं त्यांनां पकडून कैदेंत टाकल्यावर घेतली असल्यामुळें, ती सक्तीच्या खुषीनें घेतली असण्याचा बराचसा संभव आहे. अर्थात् तींतील मजकुराची ग्राह्याग्राह्यता इतर पुराव्यावरून ठरवावी लागेल.

**तांदुळजा**—या वनस्पतीस पाश्चात्य वनस्पतिशास्त्रज्ञ अमरंथ या वर्गांत घालतात. या वर्गांतील इतर वनस्पती कमी प्रसिद्ध आहेत. एकंदर वर्गाची माहिती येणेंप्रमाणें. अमरंथ या ( इंग्रजी ) नांवानें दर्शविल्या जाणाऱ्या वनस्पतीच्या तीन जाती आहेत.—( १ ) पहिली मुख्यतः भाजीपाल्याकरितां बागेंत तयार करतात; (२) दुसरी रानटी असून तिचा भाजीपाल्याकरितां किंवा औषधांकरितां उपयोग करतात व (३) तिसरी धान्याकरितां शेतांत लावतात; हीच जात सर्वांत महत्त्वाची आहे.

व र्ग १ ला, भा जी पा ला.—या वर्गांत लालसाग, चौलेसाग, चेलू,नतिया, कांटेमाठ, तंदुलिया, चौळाइ वगैरे पोट जाती आहेत.

व र्ग २ रा, धा न्य.—यास केदारी चुवा, रमदन वगैरे नांवें आहेत. हें हिंदुस्थानच्या सर्व सपाट प्रदेशांत, बागांतून शोभेकरितां अथवा भाजीपाल्याकरितां लावलें जातें. परंतु डोंगरी लोक धान्याकरितां याची शेतांत लागवड करतात. पेरणी मे व जूनमध्यें होऊन आक्टोबरांत पिकाची कापणी होते. ज्याला प्राचीन लेखक अनर्दन असें म्हणत तें याच जातीचें असावें असें वाटतें. परंतु हल्लीं, चुवा ( आ ), चुको, गणहर, वगैरे नांवानीं तें परिचित आहे.

व र्ग ३ रा, धा न्य.—काश्मीरपासून सिकीमपर्यंत हिमालयावर ३००० तें १०००० फूट उंचीच्या भागांत; मध्य व दक्षिण हिंदुस्थानांत आणि

ब्रह्मदेशांत; व उत्तर पश्चिम आणि मध्य हिंदुस्थानच्या सपाट प्रदेशांत, हें हिंवाळी पीक काढतात. याची झाडें फार शोभिवंत असून ज्या डोंगरांच्या उतरणीवर त्याचें पीक असतें ते डोंगर सोन्यासारखे दिसतात. याची पेरणी मे व जूनमध्यें होऊन कापणी आक्टोबर—नंवबरमध्यें होते. हें धान्य इतर धान्यांपेक्षां पौष्टिक गुणांत फारसें कमी नसतें.

**तांदुळजाची लढाई**—पानिपत झाल्यानंतर व थोरले माधवराव गादीवर आल्यानंतर पेशव्यांच्या घरांत भांडणें लागलेली पाहून व राघोबादादाच्या घालमेलीनीं अनेक मराठे सरदार असंतुष्ट झाले आहेत असें पाहून मराठ्यांची रग जिरविण्यास ही संधि उत्तम आहे असें निजामअल्लीचा दिवाण विठ्ठलसुंदर यानें त्याच्या मनांत भरविलें. तेव्हां निजाम अल्लीनें पेडगांवच्या तहाप्रमाणें पेशव्यांनां जो प्रांत द्यावयाचा तो न देतां उलट आपणच तो तह मोडून पेशव्यांशीं युद्ध सुरू केलें ( १७६३ ). गोपाळराव पटवर्धन, मोरोबा फडणीस, सदाशिव रामचंद्र व भवानराव प्रतिनिधि या असंतुष्ट मराठे सरदारांशीं बोलणें लावून विठ्ठल सुंदरानें त्यांनां आपल्या पक्षास वळवून घेतलें, व पेशव्यांची सत्ता नष्ट करून सातारच्या गादीवरील नामधारी राजांची सर्व राज्यसूत्रें जानोजी भोंसल्याच्या हातीं देण्याचें आमीष त्यास दाखविल्यावरून त्यालाहि आपल्याकडे ओढलें. राघोबादादाची या युद्धाकरितां मुळींच तयारी नव्हती, तथापि माधवराव पेशव्यांनीं या प्रसंगीं आपल्या चुलत्यास शक्य तेवढें पाठबळ दिलें. मल्हारराव होळकर व दमाजी गायकवाडहि सैन्यांत येऊन दाखल झाले निजामाच्या संयुक्त सैन्याशीं लढण्यास पुरेशी फौज पेशव्यांजवळ नव्हती. मराठ्यांची फौज शत्रूशीं लढण्याचा आव घालून प्रथम त्याच्या रोखानें चालून गेली; परंतु पुढें शत्रूशीं लढाई न देतां ती झपाट्यानें औरंगाबादेवर चढाई करून गेली. इतक्यांत निजामहि पाठोपाठ त्यांच्या मागें आला. तेव्हां ते वऱ्हाडांत शिरले व मलकापुरापासून ६०,००० रुपये खंडणी घेऊन भोंसल्याच्या मुलुखांत लुटालूट करूं लागले. परंतु निजाम पाठीमागें आला असें पाहून ते मुंगीपैठणास आले, व तेथून आग्नेय दिशेनें जाऊन मोंगलांचा मुलुख उध्वस्त करूं लागले. आतां कोठें निजामच्या ध्यानांत आलें कीं, मराठ्यांचा पाठलाग करणें म्हणजे केवळ वाऱ्याला धरूं पाहणें आहे. म्हणून त्यानें पुणें शहर लुटून फस्त करण्याचा संकल्प करून सरळ पुण्याच्या रोखें कूच केलें; हें पाहतांच राघोबाहि त्याचा बचाव काढण्याकरितां हैद्राबादवर चालून गेला.

शत्रूच्या आगमनाचें वर्तमान समजतांच पुण्यांतील लोक आपआपली मालमत्ता घेऊन पुणें सोडून शेजारच्या किल्ल्यांत किंवा कोंकणांत निघून गेले. इतक्यांत जानोजीचा सरदार बापू करांडे मोठमोठ्या मजला करीत पुढें आला, व त्यानें या लोकांनां अडविलें. यानंतर पेशव्यांच्या कुटुंबांतील मंडळी व सरकारी दरबार सिंहगडाकडे गेला होता तिकडे तो गेला. तेथें त्यानें सिंहगडाच्या पायथ्याच्या गांवास आग लावली. मागून निजामहि येऊन दाखल झाला. त्यानें पुण्यापासून कांहीं अंतरावर आपली छावणी देऊन आपल्या सैन्यास तें शहर लुटण्याची परवानगी दिली. ज्यांनीं पैसे देऊन आपला बचाव करून घेतला त्यांच्याशिवाय बाकीच्यांनां लुटून त्यांचीं घरें जाळून टाकण्यांत आलीं. पुढें निजाम पुरंदराकडे गेला व तेथून पूर्वेस भीमानदीपर्यंत त्यानें मराठ्यांचा सर्व मुलूख उध्वस्त करून औरंगाबादेकडे जावयास निघाला.

इकडे राघोबादादा हैद्राबादेकडे गेला होता; परंतु निजामानें पुणें जाळल्याचें ऐकिलें तेव्हां आसपासच्या खेड्यांतूनच २,८०,००० रु. खंडणी उकळून तो निजामच्या पाठीवर आला; व निजामास पूर्वी देऊं केलेल्या मुलखापैकीं ३२ लक्षांचा मुलूख जानोजी भोंसल्यास देण्याचें कबूल करून त्यानें त्यास शत्रूपासून फोडलें.

निजाम औरंगाबादकडे जात असतां राघोबाची फौज त्याच्या पाठोपाठच होती. निजामाचें सैन्य गोदेतीरीं आलें तेव्हां कांहीं सैन्य नदी ओलांडून पैलतीरीं गेलें. बाकीचें सैन्य नदीपार होईपर्यंत विठ्ठलसुंदर यानें गोदेच्या दक्षिण तीरावरच राक्षसभुवन येथें रहावें असें ठरलें. निजामास सोडून जाण्यास ही संधि चांगली आहे असें पाहून, आपल्या फौजेस पगार द्यावयास पैसे न मिळाल्याचा बहाणा करून जानोजी भोंसले त्याच्या सैन्यापासून कांहीं अंतरावर छावणी देऊन राहिला. संकेताप्रमाणें जानोजी वेगळा होतांच मराठ्यांनीं निजामावर हल्ला केला. तेव्हां घनचक्कर लढाई होऊन अखेर मराठ्यांनीं शत्रुसैन्याची दाणादाण केली. ही लढाई जवळ जवळ दोन दिवसपर्यंत एकसारखी चालली असून, तींत मोंगल निकरानें लढले. राघोबादादा प्रत्येक प्रसंगीं स्वतः पुढाकार घेऊन शत्रूवर हल्ला चढवी.

दादा हत्तीवर बसून तिरंदाजी करीत होता. हत्तीस दारू पाजून पायांत साखळदंड घालून त्याला ठासून उभें केलें होतें. तिकडे विठ्ठलसुंदरहि लढाईस उभा राहिला. एकाएकीं निजामाचे सर्व पठाण दादावर चालून आले व विठ्ठलपंतानें दादांचा हत्ती वळविला. तेव्हां मराठे पळूं लागले. माधवराव हे सैन्याच्या मागें दोन कोसांवर नर्मदेत होते. त्यांनीं आयत्या वेळीं येऊन शत्रूवर हल्ला केला तेव्हां निजामाचा पराभव होऊन तो शरण आला.

दादानां सोडविण्यांत जी लढाई झाली तींत विठ्ठलपंतावर रावसाहेबानीं हल्ला केला होता. त्यांत विठ्ठलपंत ठार झाला. या लढाईंत दोन्ही पक्षांचा बराच नाश झाला. निजामाचे दहा हजार लोक पडले. इकडे निजाम पळून औरंगाबादेस गेला तेव्हां मराठे त्याच्या मागें लागले. शेवटीं शरण येऊन त्यानें दादांजवळ रदबदली केली व दोपाचें खापर विठ्ठलपंतावर फोडलें. तेव्हां निजामअल्लीस पूर्ण क्षमा करूनच दादासाहेब थांबला नाहीं, तर त्यानें त्याला पूर्वी देऊं केलेल्या ५१

लक्षांच्या मुलुखापैकीं आतां जानोजी भोंसल्यास यावयाचा ३२ लक्षांचा मुलुख वगळून बाकीचा १९ लक्षांचा त्यास देण्याचें आश्वासन दिलें. परंतु राघोबाच्या कारभारी मंडळींनीं त्याचें मन वळवून शेवटीं फक्त ९ लक्षांचाच मुलूख निजामाच्या स्वाधीन केला; नंतर मराठे परत पुण्यास आले व दादानें आपण होऊन माधवरावाकडे कारभार सोंपविला. पुष्कळ मराठी बखरींतून व कागदपत्रांतून हिला राक्षसभुवनची लढाई म्हणतात ग्रांट डफ व कांहीं बखरी हिला तांदुळजाची लढाई म्हणतात. [ पेशव्यांची बखर, डफ; ऐ. ले. सं. ]

**तानसेन गंधर्व**—हा जातीचा गौडब्राह्मण होता. यास गंधर्वापासून गायनकला प्राप्त झाली अशी आख्यायिका सांगतात. गायनकलेंत अत्यंत निपुण असल्यामुळे अकबराची त्याच्यावर फार मर्जी असे. प्रथम तानसेन हा रामचंद्र नामक एका हिंदु राजाच्या पदरीं होता; परंतु अकबराच्या विनवणीवरून रामचंद्रानें त्यास अकबराच्या दरबारास पाठविलें. तानसेनाचा गुरु हरिदासस्वामी याचें गायन ऐकण्याकरितां अकबर वाद्यवाहकाच्या वेषानें गेल्याबद्दल दंतकथा व एक चित्र उपलब्ध आहे ( ज्ञानकोश विभाग ५ पृ. १८४ पहा ). इ. स. १५८८ सालीं म्हणजे अकबर बादशहाच्या राज्यारोहणानंतर चौतीस वर्षांनीं तानसेन मृत्यु पावला. हल्लीं गवय्या लोकांत याची इतकी मान्यता आहे कीं ते याचें नांव निघतांच कान पिरगाळून घेऊन यास नमन करीत असतात. याची कबर ग्वाल्हेर येथें आहे. याचे ग्रंथ—पदें. [ अ. कोश; सं. का. सूचि ].

**तानाजी मालुसरे**—हा मराठा जातीचा असून शिवाजीचा परम विश्वासु असा बालमित्र होता. प्रतापगडाखालीं मावळी खोऱ्यांतील उमराठें हें याचें राहाण्याचें गांव. लहानपणापासून हा शिवाजीबरोबर अनेक संकटांच्या प्रसंगांत होता. त्याला किल्ले घेण्यांतहि हा पुष्कळ उपयोगी पडला. अफजलच्या प्रसंगांत हा शिवाजीबरोबर भेटीच्या मंडपांत गेला होता व पुढें यानेंच अफजलच्या सय्यद बंडा नांवाच्या अंगरक्षकास छाटून टाकिलें ( १६५९ ). पुढें शाहिस्तेखानाच्या छाप्यांत जे १०।१२ माणसें शिवाजीबरोबर खानाच्या तंबूंत धाडसानें घुसलीं, तींत हा एक होता ( १६६३ ). आग्र्यास शिवाजी गेला, त्यावेळीं याला बरोबर नेलें होतें ( १६६६ ). तेथून स्वदेशीं परत आल्यावर लगेच शिवाजीनें आपले मोंगलास दिलेले किल्ले परत घेण्याची मोहीम आरंभिली. तींत कोंढाणा घेण्याची कामगिरी याच्याकडे आली. यावेळीं तानाजी हा बारा हजार हशमा ( पायदळा ) चा सुभेदार होता. त्याला पालखीचा व पांच कर्ण्यांचा मान होता. राजमाता जिजाबाईच्या मनांत कोंढाणा किल्ला घेण्याचा विचार आला; कारण तो किल्ला पुण्याच्या तोंडाला व जेजुरीच्या बारीला असल्यानें तेवढया प्रांतावर देखरेख राही. जिजाबाईनें शिवाजीला सांगून गड लवकर घेण्याची व्यवस्था केली. गड घेण्यास तानाजीशिवाय दुसरा सरदार योग्य दिसेना कारण, गडावर या सुमारास उदेभान नांवाचा शूर किल्लेदार औरंगझेबाकडील होता. हा मूळचा राठोड रजपूत असून पुढें बाटून मुसुलमान झाला होता. त्याच्या हाताखालीं रजपूत सैन्य बरेंच होतें.

तानाजी या वेळीं आपल्या गांवीं होता. त्याच्या रायबा नांवाच्या मुलाचें लग्न माघ वद्य पंचमीस ठरलें होतें व लग्नाच्या हळदीचा समारंभ चालू होता. इतक्यांत राजदूत येऊन त्यानें शिवाजीचा निरोप कळविला. त्यावरोबर सरकार कामगिरीमुळें तानाजीनें लग्न पुढें ढकललें. आपला भाऊ सूर्याजी, मामा शेलार, मकाजी दादाजी, रुपाजी काटकर वगैरे शूर सरदार व गांवांत जमली तेवढी फौज घेऊन तानाजी तावडतोब राजगडास येऊन राजास भेटला. शेलार मामानें सांगितलें कीं, आधीं लग्न उरकून मग कामगिरीवर जाऊ;तेव्हां तानाजी म्हणाला आधीं लगीन सिंहगडचें करूं मग रायबाचें. तसेंच उदेभानाच्या पराक्रमाबद्दल कोणी सांगितलें असतां त्यानें उत्तर केलें ' आम्ही शूर मर्द क्षत्री ( य ) नाहीं भिणार मरणाला. '

शिवाजीनंतर तानाजी जिजाबाईला भेटला; तिनें त्याला म्हटलें माझा शिवाजी थोरला व तानाजी धाकटा मुलगा आहे; मला कोंढाणा घेऊन दे. त्यानें कबूल करून रायबाला शिवाजीच्या स्वाधीन केलें व म्हटलें कीं, जर कोंढाण्याहून परत आलों तर मी त्याचें लग्न करीन,जर गेलों व तिकडे मेलों तर तुम्ही त्याचें लग्न करा. अशी निरवानिरव करून तानाजीसुभेदार बरोबर एक हजार पायदळ घेऊन निघाला. आनंदबारीला येऊन तेथें सैन्य ठेवून रात्रीं सुभेदार आपण स्वतः कोंढाण्याचा भेद काढण्यासाठीं पाटलाचा वेष घेऊन गडाच्या पश्चिमेकडील कोळयांच्या चौकीवर गेला. तेथें त्यानें आपण साखरखेड्याचे पाटील असून पुण्यास सरकारी वसूल भरण्यास गेलो होतों, तिकडून आतां परत जात असतां वाघानें अडविल्यामुळें येथें आलों असें सांगून पहारेकरी कोळ्याजवळ पानसुपारी मागितली. पुढें आपल्यापासले अफूचे व माजुमाचे विडे हळूच त्यांनां दिले त्यामुळें ते झिंगले. नंतर त्यांचा नाईक खंडोजी याला कंठी कडीतोडे देऊन सुभेदारानें फितूर करून खरी हकीकत सांगितली. तेव्हां त्यानें गडावरील माहिती दिली.उदेभानाजवळ १८०० पठाण व रजपूत असून तो स्वतः फार बळकट व शूर असल्याचें सांगितलें. चांदवडी रुपाया दोन बोटांनीं दाबून चपटा करणें व पहार वळविणें हे त्याचें सहजकृत्य आहे असें समजलें. तसेंच गडाचा सरनोबत सिद्दी हिलाल हा व उदेभानाचे १२ पुत्र हेहि शूर असल्याचें कळलें. तरीपण पूर्वेच्या ( नैर्ऋत्य ? ) बाजूस डोणागिरी नांवाचा एक अगदीं उभा कडा तुटलेला आहे तिकडून सोल ( सांखळी, दोराची शिडी ) लावून तटावर चढतां येईल. याप्रमाणें माहिती

मिळवून तानाजी फौजेंत परत आला. येतांना किल्ला घेतल्यावर कोळ्यांनां बक्षिसें व खंडोजीला सरदारी देण्याबद्दल हातचा लेख त्यानें लिहून दिला होता. एक हजार फौजेसह सुभेदार किल्ल्याच्या कल्याण दरवाजाखालीं आला. ती रात्र माघ वद्य नवमीची असल्यानें अंधार फार होता व गडाच्या आसपास झाडीहि दाट होती. सुभेदारानें आपली यशवंती घोरपड घेऊन तिच्या कमरेस सांखळी बांधून तिला त्यानें ठरविलेल्या कड्याच्या वर चढविलें; परंतु ती परत आली. या अपशकुनाकडे दुर्लक्ष्य करून त्यानें पुन्हां तिला वर चढविलें. इतक्यांत शत्रूची घस्त त्या बाजूस आली. तिला खालीं गलबल ऐकूं आल्यावरून शोध करितां खंडोजी कोळ्यानें सांगितलें कीं वाघानें गाय पकडल्यानें लोक गडबड करीत आहेत. तें ऐकून घस्त परतली.

नंतर प्रथम सुभेदार तोंडांत पट्टा धरून अंबाबाई व शिवाजी यांनां नमस्कार करून सांखळदंड धरून वर चढला. त्याच्या मागून शेलारमामादि पन्नास मावळे वर चढले. त्यांच्या नंतर आणीक लोक चढूं लागले, इतक्यांत सांखळदंड तुटला; तेव्हां शेलारमामा घाबरला. परंतु सुभेदारानें त्याला धीर दिला. पुढें दरवाजावर आपले लोक ठेवण्यासाठीं सुभेदारानें पुणें बाजूकडील पहिल्या दरवाजावर जाऊन तेथील पहारेकऱ्यांवर एकाएकीं हल्ला करून त्यांनां तोडून काढलें व दरवाजा ताब्यांत घेऊन दुसऱ्या व तिसऱ्या दरवाजांवर जाऊन तेथील पाहरेकरी कापून तेहि काबीज केले. यामुळें गडबड झाली तेव्हां किल्ल्यावरील फौज जागी झाली. पण अंधाऱ्या रात्रीमुळें तिला कोठें काय चाललें आहे हें समजेना व इतक्या बंदोबस्ताच्या आगीं शत्रू आले असतील ही कल्पनाहि करवेना. उदेभानास हकीकत समजल्यावर त्यानें चंद्रावळ नांवाचा लढाऊ हत्ती मावळ्यांवर सोडला; त्याचे गंडस्थळांत पांच पट्टे होते. सुभेदार थोडासा थकला होता. इतक्यांत हत्तीनें त्याच्यावर मोहरा केला. दोघांची झटापट चालली; सुभेदारानें प्रथम महाताला गारद केलें व मग हत्तीची सोंड पट्ट्यानें उतरविली तेव्हां हत्ती पळून गेला. नंतर गडाचा सरनोबत सिद्दी हिलाल यानें जमविलें तितकें सैन्य घेऊन सुभेदारावर हल्ला केला. या वेळीं सुभेदार कल्याणदरवाज्याकडे जात होता; कारण सांखळी तुटल्यावर सूर्याजीनें खालीं असलेल्या सर्व सैन्यासह त्या दरवाज्याजवळ जमावें व आपण तो आंतून उघडतो असें सुभेदारानें सांगितलें होतें. सिद्दीचें व सुभेदाराचें द्वंद्वयुद्ध होऊन त्यांत सुभेदारानें त्याला कत्तल केलें.

तेव्हां उदेभानाचे प्रमुख सरदार व १२ पुत्र सुभेदारावर चढाई करून आले. परंतु सुभेदार व त्याचे लोक यांनीं त्यांचीहि खांडोळी केली. अखेर उदेभान सुभेदाराच्या अंगावर आला. त्यानें प्रथम तानाजीस नोवाजून त्याला औरंगजेबाची चाकरी करण्यास बोलाविलें तें त्यानें नाकारलें. या वेळीं तानाजी हा लढून लढून दमला होता; उदेभान तवाना होता. दोघांची लढाई जुंपल्यावर सुभेदार जास्त थकत चालला. उदेभान शूर होता व दारू, अफू वगैरेंच्या अंमलानें बेहोप झाला होता. त्यामुळें सुभेदाराचा हात लटका पडून त्याला जखमा होऊं लागल्या व डाव्या हातची ढालीहि तुटली. तेव्हां शेल्यानें हात बांधून त्याच्यावरहि त्यानें वार घेतले; पुढें तोहि हात तुटला; तरीपण तो लढत होता. अखेर उदेभानाच्या एका वारानें तानाजी मरणोन्मुख होऊन पडला; पण त्यानेंहि शेवटयांत उदेभानला ठार केलें. याप्रमाणें दोघांच्या हातानें एकमेक पडले. तेव्हां ८० वर्षांच्या शेलारमामानें अंगावर आलेल्या शत्रूशीं लढत लढत कल्याणदरवाजा जवळ केला व तेथील पहारा कापून दरवाजा उघडून सूर्याजीस सैन्यासह आंत घेतलें;

सूर्याजीचा व सैन्याचा धीर खचूं नये म्हणून सुभेदार पडल्याचें शेलारमामानें गुप्त ठेविलें. नंतर सूर्याजीनें किल्यावरील मोंगलसैन्याचा पुरा फडशा पाडून किल्ला काबीज केला (४ फेब्रु. १६७०) व त्याबद्दलची खूण म्हणून गवताच्या गंजीस आग लावून पांच तोफा केल्या; त्या राजगडीं शिवाजीनें ऐकल्या. पुढें मामानें सूर्याजीला सुभेदाराची सरी हकीकत सांगितली. नंतर सकाळीं सुभेदाराच्या प्रेतास अग्निसंस्कार केला. शिवाजीस व जिजाबाईस सारी हकीकत ऐकून फार दुःख झालें. राजानें दहा दिवस डोईस मंदील काढून पांढरा पटका बांधला व 'गड आला पण सिंह गेला' असे उद्गार काढून कोंढाण्याचें नांव सिंहगड ठेविलें; रायबाचें लग्न स्वतः लाविलें. तानाजीचा सेनापतीचा अधिकार सूर्याजीस दिला व सरंजाम रायबाला दिला व डोणजें गांव इनाम दिलें. तानाजीची ही कामगिरी शिवाजीच्या इतिहासांत अवर्णनीय होऊन गेली. या वीररसप्रधान प्रसंगावर त्यावेळींच पोवाडे रचले गेले व अद्यापीहि हा प्रसंग महाराष्ट्रांतलि कवींनां वर्ण्यविषय होऊन बसला आहे. तानाजीची समाधि, उदेभानाचें थडगें, तानाजीचा हात तुटलेली जागा, डोणगिरीचा कडा वगैरे ठिकाणें सिंहगडावर पाहण्यासारखीं आहेत. [ तुळशीदासाचा पोवाडा; सप्तप्रकरणात्मक चरित्र; शिवदिग्विजय ]

**तान्तन** (वस्ती ११६४१)—त्रावणकोरमध्यें चिरायिंकिल, किरन्, करुणगपल्ली, कार्तिकपल्ली आणि मवेलिकार या तालुक्यांत हे लोक आढळतात. वरकलीच्या दक्षिणेस उरली व कोत्तरकारच्या पूर्वेस कित्येक ठिकाणीं मूतलपट्टकार, अशीं यांचीं नांवें आहेत. मुप्पात्ति, व मुप्पत्त हे अनुक्रमें स्त्रीजातिवाचक व पुरुषजातीवाचक शब्द आहेत. या जातीच्या चार पोटजाती आहेत ते (१) इलंगि,(२) पूवर, (३) इरुनेल्ली व (४) पिलकुटी. यांच्यांमध्यें गोंदण्याची चाल बरीच आहे. यांचें खाणें पिणें इरव्हावांप्रमाणें असतें. यांच्या उपाध्यायास तान्त कुरुप्पु असें म्हणतात व यांच्याबद्दल तोच चौलविधि करितो. यौवनप्रारंभानंतर संबंधविधीप्रमाणें किंवा मत्स्या...

तऱ्हेचें लग्न हे लोक लावितात. मुलांची शेंडी राखण्याच्या वेळीं चौलविधीला प्रारंभ पित्याला करावा लागतो. कुटुंबांतील मोठ्या माणसाच्या प्रेताचा दहनविधि असतो व इतरांस पुरण्यांत येतें. सुतकाचा काल १० दिवस असतो.

**तान्सासरोवर**—मुंबई, ठाणा जिल्ह्यांत, हें एक कृत्रिम सरोवर आहे. तान्सा नदींत बंधारा (डॅम) बांधून हें सरोवर केलें आहे. बांधाची उंची ११८ फूट असून लांबी १ $\frac{1}{2}$ मैल आहे. या बांधाला जवळ जवळ, १॥कोटी रुपये खर्च आला.

**तापीनदी**—पश्चिम हिंदुस्थानांतील मोठ्या नद्यांपैकीं एक नदी. सूर्यानें, स्वतःच्या उष्णतेपासून बचाव करण्यासाठीं ही नदी उत्पन्न केली, अशी समजूत आहे. मुलताईच्या पवित्र तलावांतून हिचा उगम आहे. खानदेशांत शिरल्यावर हिला वऱ्हाडमधून पूर्णानदी मिळते. हिच्याकांठीं पुष्कळ तीर्थें आहेत. पुर्णा व तापी यांच्या संगमावर चांगदेव नांवाचें प्रसिद्ध पवित्र ठिकाण आहे. आणि सुरतच्या वरच्या बाजूला बोधान या नांवाच्या तीर्थाचें ठिकाण आहे. सुरत शहर व थालनेरचा किल्ला हीं या नदीच्या कांठचीं इतिहासप्रसिद्ध ठिकाणें आहेत.

**तांबट**—कांसार पहा.

**तांबें**—फार प्राचीन काळापासून उपयोगांत असलेली एक धात. तांबें व कथील यांच्या मिश्रणानें झालेली ब्रांझ धातु हा मनुष्य जातीनें वापरलेल्या धातूचा पहिला संयुक्त पदार्थ होय; व त्यावरून ऐतिहासिक कालापूर्वीच्या युगाला ब्रांझ युग ही संज्ञा मिळालेली आहे.

तांबें ही विशिष्ट प्रकारच्या तांबड्या रंगाची व चकचकीत धातू आहे. शुद्ध तांब्याच्या नुकत्याच घासलेल्या भागावर गुलाबी किंवा पिंवळट छटा असते; परंतु तांब्यांत ताम्रस प्राणिद असेल तर तीं जांभुळसर असतें. त्याचें विशिष्ट गुरुत्व ८.९१ ते ८.९५ पर्यंत असतें. बाजारी तांबें थोडेसें सछिद्र असल्याकारणानें त्याचें विशिष्टगुरुत्व ८.२ ते ८.५ पर्यंत असतें. तांबें वितळण्याचें उष्णमान निरनिराळ्या शास्त्रज्ञांच्या मतें १०००° ते १२००° सें. पर्यंत आहे. वितळलेल्या धातूचा रंग समुद्राच्या पाण्याप्रमाणें असतो; व उष्णमान वाढविल्यास ( विद्युत्स्फुलिंगामध्यें ) त्याची वाफ होऊन जळूं लागते. त्या ज्वालेचा रंग हिरवा असतो. वितळलेल्या तांब्यांत कर्बैकप्राणिद, उज्ज, गंधकद्विप्राणिद वगैरे वायू शोषिले जातात, परंतु तांबें थंड होत जाईल त्याप्रमाणें ते पुन्हां मोकळे होतात. यामुळें विशेष काळजी न घेतल्यास, ओतीव पदार्थ सछिद्र बनतात. ( उष्णतेचें मान०° इतकें असतां त्याची विशिष्ट उष्णता ०.०८९, व १००° असतां ०.९४२ असते ). विद्युद्वाहकांत याचा नंबर दुसरा लागतो. रुप्याची वाहकशक्ति १०० आहे असें मानिल्यास शुद्ध तांब्याची वाहकशक्ति ( उ. मा. १२° सें. ) ९६.४आहे असें माथिएसेन यानें ठरविलें आहे.

कोरड्या हवेचा तांब्यावर परिणाम होत नाहीं, परंतु कर्बाम्लमिश्रित ओलसर हवेंत त्यावर कार्बिताचा हिरवा थर बसतो. उष्णमान नेहमीचें असल्यास त्यावर गंधकाम्ल किंवा उज्जहराम्ल यांचा बहुतेक मुळींच परिणाम होत नाहीं, परंतु तापविल्यानंतर पहिल्या अम्लाच्या योगानें ताम्रगंधकित ( मोरचूद ) व गंधकद्विप्राणिद आणि दुसऱ्याच्या योगानें ताम्रसहरिद व उज्ज हीं द्रव्यें मिळतात. तीव्र नत्रिकाम्लाचाहि त्यावर परिणाम होत नाहीं; परंतु पातळ अम्ल वापरलें असतां जोरदार प्रतिक्रिया सुरू होते. व तीपासून प्रथम ताम्रनत्रित व नत्रप्राणिद, आणि ताम्रनत्रिताचें निर्वेशन वाढेल तसतसें नत्रसप्राणिद व अखेर केवळ नत्र हीं तयार होतात.

**तांबें सांपडण्याचें ठिकाण**.—निसर्गांत तांबें पुष्कळ विखुरलेलें असून, तें बहुतेक जमीनींत, लोहांश असलेल्या खनिज पाण्यांत आणि अशोधित धातूंत सांपडतें. तें समुद्रांतील गवत व जमीनीवरील गवत तसेंच अंडीं, मांस, यकृत व मूत्रपिंड, मनुष्याचें व इतर प्राण्यांचें रक्त व ट्यूरेको नांवाच्या पक्ष्याच्या पंखांतील रंगित द्रव्य यांत आढळून आलेलें आहे. आर्य वैद्यकांत मोराच्या पिसांच्या राखेपासून तांबें काढीत.

वितळून तयार केलेल्या धातूचे सर्व गुणधर्म अंगीं असलेलें *नैसर्गिक तांबें खनिज रूपानें आढळतें. त्याचे स्फटिक घना*कृति असतात. तांब्याच्या खाणींत नैसर्गिक तांबें बहुधां वरच्या भागांत, म्हणजे ज्या ठिकाणच्या द्रव्यावर वातावरणाचा परिणाम होत असतो तेथें सांपडतें. त्या धातूच्या क्षाराच्या द्रव्यावर कार्य ( रिडक्शन ) होऊन, खाणींतील लांकडावर किंवा लोखंडी वस्तूवर धातूचे थर बसतात. कधीं कधीं तें खडकांतील भेगांतून बसतें. तांब्याची सर्वांत मोठी खाण मिचिगानमध्यें,केवीना पॉइंटजवळ,सुपीरियर सरोवराच्या प्रदेशांत असून तेथें ४०० टनांपेक्षां जास्त माल सांपडलेला आहे. कांहीं ठिकाणीं तांब्याबरोबर नैसर्गिक रुपेंहि सांपडतें.

**अशोधित धातु**.—तांब्याचे मुख्य अशोधित धातु म्हटले म्हणजे क्युप्राइट व माल्कोनाइट हीं प्राणिदें, मालकाइट व चेसिलाइट हीं कार्बितें, ॲटॅकॅमाइट हें हरिद, कायसोकोल हा सिलिकेट, व चाल्कोसाइट, चाल्कोपायराइट, एरुबेसाइट व टेट्राहेड्राइट हें गंधकिद हे होत. क्युप्राइट हें फार प्रमाणांत आढळत नाहीं. तेनसी व मिसीसिपीच्या खोऱ्यांतील खाणींमध्यें माल्कोनाइट पुष्कळ सांपडतें. मालकाइटमध्यें धातूचें प्रमाण शेंकडा ५६ असतें. तें दक्षिण आफ्रिका, सैबिरिया वगैरे ठिकाणीं पुष्कळ मिळतें. ॲटॅकॅमाइट मुख्यत्त्वेंकरून चिली व पेरू या देशांत आढळतें. शुद्ध कायसोकोलमध्यें धातूचें प्रमाण शें. ३० असतें. ही धातु चिली, विस्कोनसिन व मिसोरी यांत पुष्कळ सांपडते. परंतु तांब्याचे गंधकाबरोबर होणारे संयुक्त पदार्थ हे आर्थिक

दृष्टया सर्वांत महत्त्वाचे होत. चाल्कोसाइटमध्यें तांब्याचें प्रमाण शें. ८० व चाल्कोपायराइटमध्यें शेकडा ३४.६असतें.

धा तु वि द्या.—अशोधित धातूपासून तांबें मिळवि-ण्याच्या तीन रीती आहेत. (१) कोरडी किंवा सुकी किंवा अनार्द्र; (२) ओली किंवा आर्द्र व (३) वैद्युतिक.

अशोधित धातु घेतली असेल त्याप्रमाणें व स्थानिक परि-स्थितीप्रमाणें कामाच्या रीती भिन्न असतात. ज्या अशोधित धातूंत तांब्याचें प्रमाण शें. ४ पेक्षां कमी असतें तींतून तांबें काढण्याकरितां अनार्द्र रीत फायदेशीर पडत नाहीं. यासाठीं अशा धातूकरितां आर्द्रपद्धतीचा उपयोग केला जातो.

तां बें गा ळ णें —प्रथम, अनार्द्र रीतीनें तांबें गाळण्याच्या पद्धतीचीं सामान्य तत्त्वें सांगून, मग उपयोगांत आणल्या-जाणाऱ्या यंत्रसामुग्रीचें वर्णन देऊं. तांब्याच्या गंधकीकृत अशुद्ध धातूंत (आर्थिक दृष्टीनें ह्याच अत्यंत महत्त्वाच्या आहेत) बहुधां अर्सेनिक व अँटिमनी यांचें मिश्रण असल्यामुळें, शक्यतर हीं परकी द्रव्यें प्रथम काढून टाकणें जरूर असतें. याकरितां भाजून भस्मीकरण केल्यानंतर त्यांचा रस करतात. याला मॅट असें म्हणतात. या रसांत तांबें व लोह यांच्या गंधकिदांचें मिश्रण असतें, परंतु अर्सेनिक, अँटिमनी किंवा सिलिका हीं द्रव्यें बहुतकरून मुळींच नसतात. आतां त्या मिश्रणांतील लोखंड काढून टाकण्याकरतां, त्यांत कोक व द्रवकारक सिलिकायुक्त द्रव्यें मिसळतात. तयार झालेल्या धातूंत तींत अद्यापहि लोखंड राहिलेलें असल्यास "निळी धातु", निराळें तांबें व तांब्यांचें प्राणिद असल्यास "पिंपल धातु", व तांब्याचें शुद्ध गंधकिद राहिलेलें अस-ल्यास "पांढरी धातु" अशीं नांवें दिलीं जातात. ह्या धातूचा पुन्हां रस करून मग ती शुद्ध केली जाते.

इंग्लिश पद्धतींत पुढील क्रिया करतात. (१) अनाम्ली-करण, (२) भट्टींत (परावर्तक भट्टी) घालून रस करून मॅट बनविणें; (३) मॅट भाजणें; (४) पांढरी धातु करण्या-करितां, पुन्हां भट्टींत टाकून वितळविणें; (५) पांढऱ्या धातूची पुन्हां मॅट अथवा अशुद्ध धातु करणें; (६) अशुद्ध धातूचें शुद्धीकरण, इत्यादि.

जर्मन किंवा स्विडिश पद्धतः—ह्या पद्धतींत प्रतिध्वनिक किंवा परावर्तक भट्टीच्या ऐवजीं झोताच्या भट्टीचा उपयोग केला जातो; हा तिचा विशेष आहे. तींत पुढील क्रिया कर-तातः (१) भस्मीकरण; (२) मॅट तयार करण्याकरतां झोताच्या भट्टीमध्यें रस करणें; (३) मॅट भाजणें; (४) कोक व द्रवकारक पदार्थांबरोबर झोताच्या भट्टीमध्यें रस करून काळी किंवा अशुद्ध धातु तयार करणें; व (५) अशुद्ध धातूचें शुद्धीकरण.

अशुद्ध धातूंत मुख्यतः लोह, शिसें, जस्त, कोबल्ट, निकेल बिस्मथ, अर्सेनिक, अँटिमनी, गंधक, सेलेनियम व टेल्यूरियम ह्या परक्या धातू असतात. त्या काढून टाकण्याकरतां प्राणिदी-करण करणाऱ्या पदार्थांच्या योगानें तिचा रस करून, वरील मळी काढून घ्यावी अगर, वरील कृतीनें तयार झालेला पदार्थ उडून जाऊं द्यावा; किंवा वैद्युतिक रीतीनें तांबें निराळें करावें. प्राणिदीकरण करतांना नेहमीं थोडेंबहुत ताम्रसप्राणिद बनतें; व तांब्याबरोबर वितळून त्याचा मऊपणा व चिवटपणा कमी करितें. यास्तव प्राणिदाची पुन्हां धातु करणें जरूर असतें; हें करण्याकरतां धातूचा रस ओल्या लांकडाच्या दांड्यानें ढवळावा म्हणजे लांकडांचें ज्वलन, अभिषव यांच्या-पासून तयार होणाऱ्या पदार्थांच्या योगानें प्राणिदाचें संस्क-रण होऊन, सर्व क्रिया चांगल्या तऱ्हेनें झाली असल्यास, मऊ, घनवर्धनीय व चकचकीत तांबें मिळतें.

आर्द्रपद्धतिः—आर्द्रपद्धतीचा उपयोग फक्त कमी प्रतीच्या अशोधित धातूंतून, व ज्यांच्याबरोबर सोनें किंवा रुपें असतें अशा धातूंतून तांबें काढण्याकरतां केला जातो. या पद्धतींतील मुख्य तत्त्व म्हणजे अशोधित धातूचें द्रावण करून तींतून, सांक्याच्या रूपानें तांबें निराळें करणें, हें होय. आर्थिक दृष्टया महत्त्वाच्या अशोधित धातूंत प्राणिद, कर्बित, गंधकित किंवा गंधकिदाच्या रूपानें तांबें असतें. पैकीं प्राणिद व कर्बित हे गंधकिक किंवा उज्जहरिक अम्ल, लोहस हरिद, लोहिक गंधकित, अमोनियायुक्त संयुक्त पदार्थ व सोडियम् थायोसल्फेट यांमध्यें द्रवतात. परंतु आर्थिक दृष्टीनें गंधकिक किंवा उज्जहराम्ल उपयोगांत आणणें फायद्याचें असतें.

अशोधित धातु, शिसें, विटा किंवा दगड यांच्या खोज्यांत ठेवून त्यावर गंधकाम्ल टाकावें; किंवा गंधकद्वि-प्राणिद, नत्रस धूर (सोरा व गंधकाम्लापासून तयार केलेला) व वाफ यांचें मिश्रण सोडावें. बहुतेक तांब्याचा मोरचूद झाल्यावर, अशोधित धातूंतील क्षार काढून टाकण्याकरतां ती धुतात. उज्जहराम्ल वापरलें असता अनाम्लक्षार बनत नाहींत, परंतु त्यांत लोहसप्राणिदें द्रवतात ही गोष्ट अनिष्ट आहे.

अ ना म्ली क र ण.—अनाम्लीकरणाची (भाजण्याची) क्रिया अशा रीतीनें चालविली पाहिजे कीं, त्यामुळें शक्य तेवढें अर्सेनिक व अँटिमनी निघून जाऊन, अनाम्लीभूत धातु वितळवितांना तांब्याशीं संयोग पावण्याला जरूर तेव-ढाच गंधक शिल्लक रहावा.

ताम्रगंधकित किंवा ताम्रस व ताम्रिक हरिदाच्या द्राव-णांतून सांक्याच्या रूपानें तांबें निराळें करण्याकरितां लोखं-डाचा उपयोग करितात. तांब्याच्या सांक्याचा आकार व सांका निराळा होण्याला लागणारा वेळ, लोखंड, शुद्ध-अशुद्ध लोखंडाचा कीस किंवा कांड्या यांपैकीं ज्या स्थितीं-तील घेतलें असेल त्यावर अवलंबून असतो. लोखंडाची पूड घेतली असतां क्रिया सर्वांत जलद होते. लोखंडाचा उपयोग करितांना द्रावण अगदीं शिथिल असावें; व त्यांत लोहिक क्षाराचें प्रमाण शक्य तेवढें कमी असावें, नाहीं तर स्वतंत्र अम्लाचा लोखंडावर परिणाम होऊन लोहिक क्षारांचें संस्करण होईल.

गंधकिदाच्या स्वरूपांतील अशुद्ध तांब्यापासून, आर्द्र पद्धतीनें धातुरूप तांबें काढतांना पुढील क्रिया कराव्या लागतातः (१) तांब्याचें द्रवणीय स्वरूपांत रूपांतर करणें, (२) तांब्याचे क्षार द्रवविणें व (३) सांक्याच्या रूपानें तांबें निराळें करणें. ताम्रगंधकिदाचें गंधकित केल्यास तें पाण्यांत द्रवतें; अम्लप्राणिद केल्यास गंधक किंवा उज्जहराम्लांत द्रवतें; ताम्रिक हरिद पाण्यांत द्रवणीय आहे, व ताम्रस हरिद धातूंच्या हरिदांच्या द्रवणांत विरतें.

उघड्या हवेंत ठेवणें, भाजून अनाम्ल करणें, व लोखंडाचें नत्रित अगर लोहिक गंधकित यांबरोबर तापविणें, यांपैकीं एखादी क्रिया करून गंधकिदाचें गंधकितांत रूपांतर केलें जातें. पहिल्या रीतींत वेळ फार लागतो. अशुद्ध धातूंत लोहाचें प्रमाण जास्त असल्यास मात्र दुसऱ्या रीतीचा उपयोग करण्यास हरकत नाहीं. तरी ह्या रीतीनें थोडें बहुत गंधकिद तसेंच कायम रहातें. लोहस गंधकिताबरोबर भाजून भस्म केल्यास सर्व गंधकिताचें प्राणिद तयार होतें. लोहिक गंधकिताचा उपयोग, उघड्या हवेंत ठेवण्याच्या कृतींत जोड किंवा पुरवणी म्हणून करितात.

उज्जहर किंवा गंधकाम्ल स्वस्त असेल तर गंधकिदाचें प्राणिद तयार करण्यांत येतें. त्यावेळीं अनाम्लीकरणाची क्रिया परावर्तक किंवा धातूवर ज्वाला परत फिरविणाऱ्या भट्टींत करितात. किंवा गंधक परत पाहिजे असल्यास बंद तोंडाच्या भट्टी (मफल फरनेस) मध्यें करितात.

ताम्र गंधकिदाचें हरिद करावयाचें असल्यास, अशोधित धातू मिठाबरोबर भाजतात; परंतु सर्पण महाग असेल तर किंवा कोणत्याहि प्रकारचे अपायकारक असून धूर हवेंत मुळींच जाऊं द्यावयाचे नसतील तर, अशुद्ध धातूवर लोहस-हरिद आणि उज्जहराम्ल, किंवा लोहिकहरिद घालतात. दोन्ही रीतींनीं ताम्रिकहरिद तयार होतें व नंतर त्याच्या द्रावणांतून वर दिल्याप्रमाणें लोहाच्या योगानें तांबें निराळें काढितात.

याप्रमाणें मिळालेल्या धातूंत शें. ५५ पेक्षां जास्त तांबें असेल तर तिचें एकदम शुद्धीकरण करितात; पण हें प्रमाण कमी असेल तर मॅटबरोबर ते पुन्हां वितळविलें जातें. इतर पदार्थांत मुख्यतः लोहाचें अनाम्ल क्षार, लोह, ग्राफाइट, व कधीं कधीं सिलिका, अँटिमनी आणि लोहाचे आर्सेनेटस असतात. धुण्यानें हे पदार्थ निघून जातात. तांब्यांत कर्बयुक्त द्रव्यें जास्त असल्यास (सांका पाडण्याकरितां लोखंडाची पूड वापरली असतां तांब्यांत कर्बयुक्त द्रव्यें बहुत-करून रहातात.) तांबें हवेंत तापवितात; त्यामुळें कर्ब जळून जातो. त्याबरोबरच थोडयाशा तांब्याचें प्राणिदीकरण होतें; याकरितां त्याचें पुन्हां संस्करण करावें लागतें.

वैद्युतिक शुद्धीकरण.— तांब्याबरोबर असलेल्या इतर धातूंपासून मग त्या सोनें किंवा चांदी याप्रमाणें मौल्यवान असोत किंवा अर्सेनिक, अँटिमनी, सेलेनियम व टेल्युरिम-प्रमाणें हीण धातू असोत, वैद्युतिक रीतीनें तांबें निराळें करण्याचीं तत्त्वें पुष्कळ दिवसांपूर्वी माहित झालेलीं होतीं परंतु डायनॅमोंत सुधारणा होऊन विशुद्धाकरितां कमी खर्चात मिळूं लागेपर्यंत तांब्याचें विशुद्धिघटन मोठया प्रमाणावर करणें (व्यापारी दृष्टीनें) शक्य नव्हतें. हल्लीं विजेचे उपयोग वाढल्यामुळें, विद्युद्विघटनानें तयार केलेल्या व उत्तम प्रकारची विद्युद्वाहक शक्ति असलेल्या तांब्याची मागणी वाढत चालल्यामुळें त्या तांब्याला वितळवून शुद्ध केलेल्या तांब्यापेक्षां किंमतहि चांगली येते. तांब्याची किंमत वाढल्यामुळें त्याबरोबर असणारी मौल्यवान धातु (सोनें किंवा रुपें) २५ किंवा ३० रुपयांपेक्षां जास्त किंमतीची नसली तरी वैद्युद्विघटनानें तांबें तयार करणें फायद्याचें पडतें.

मोठया प्रमाणावर तांबें शुद्ध करण्याचा प्रयत्न जी. आर. एलकिंगटन यानें करून, पहिलें पेटंट १८६५ सालीं घेतलें. त्यानें अशुद्ध तांब्याच्या जाड पत्र्याच्या धनध्रुवाकरितां व वैद्युतिक रीतीनें तयार झालेल्या तांब्याचा थर ज्यावर बसला आहे अशा पत्र्यांचा ऋणध्रुवाकरितां उपयोग केला. पंचपात्रीसारख्या आकाराच्या अग्निमृत्तिकेच्या मोठया भांड्यांत ताम्रगंधकिताचें संपृक्त द्रावण घालून, त्यांत सहा धनध्रुवांच्यामध्यें चार ऋणध्रुव (दोन धन-ध्रुवांच्यामध्यें १ ऋणध्रुव याप्रमाणें) ठेवण्यांत येऊन सर्व धनध्रुव एकमेकांशीं व त्याचप्रमाणें सर्व ऋणध्रुव एक-मेकांशीं जोडलेले होते. याप्रमाणें १०० किंवा अधिक वरण्यांची मालिका तयार केली होती (म्हणजे एका वर-णीच्या धनध्रुवाचीं टोकें दुसऱ्या वरणीच्या ऋणध्रुवाशीं जोडलेलीं होतीं). प्रवाहाची घनता दर चौ. फुटास ५ किंवा ६ अँपिअर असे. याप्रमाणें प्रवाह चालू झाल्यानंतर धन-ध्रुवावरील तांबें ऋणध्रुवावर जाऊन बसल्यामुळें तें वाढत जातें, व धनध्रुव कमी होत. ऋणध्रुवांची जाडी बरीच झाल्यानंतर त्याचे पत्रे करीत किंवा तसेंच बाजारांत पाठ-वून देत. चांदी व इतर अद्राव्य पदार्थ वरणीच्या तळाशीं बसत. विद्युद्विघटनार्थ घेतलेल्या द्रावणांत लोहाचें प्रमाण फार होईपर्यंत त्याचा उपयोग केला जात असे; परंतु त्यांत वरचेवर गंधकाम्लाचें अगदीं पातळ मिश्रण घालीत असत. ही पद्धत ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाची आहे; व अद्यापहि खर्च आणि त्रास कमी करून, धातु जास्त शुद्ध करण्या-करितां व ती लवकर मिळण्याकरितां थोडे बहुत फेरफार करून हीच पद्धति प्रचारांत आणली जाते.

प्रवाहाच्या घनतेवर तांब्याचे स्वरूपगुण अवलंबून असतात. म्हणजे प्रवाह अगदीं दुर्बल असतां तांबें फिकट रंगाचें व ठिसूळ असतें. जसजसा प्रवाह जोरदार होत जाईल तसतसे कांहीं एका मर्यादेपर्यंत तांब्याचे गुणधर्म चांगले होत जातात. पण पुढें त्याचा रंग काळसर होत जातो. व त्याच्या परमाणूंतील आकर्षकशक्ति कमी कमी

होत गेलेली आढळून येते. तांबें शुद्ध करितांना सामान्य-पणें, प्रवाहवनता ७.५ ते १२ किंवा १५ अँपियरपर्यंत असते व द्रावणांत, १ ग्यालन पाण्यामध्यें १½ ते २ पौंड ताम्रगंधकित व ५ ते १० औंस गंधकाम्ल असतें.

तांबें गाळून शुद्ध करण्याच्या अर्वाचीन पद्धतींनें पुष्कळ वेळ व श्रम हीं वांचतात; त्यामुळें जगांतील तांब्याचें उत्पन्नहि पुष्कळ वाढलें आहे. गंधकीकृत तांब्याची अशुद्ध धातूची सकाळीं भट्टी लाविल्यास संध्याकाळपर्यंत, तांब्याचें प्रमाण शें. ९९ असलेल्या पट्या बाहेर पाठविण्याकरितां तयार होतात. ह्याच कामाला पूर्वी चार महिनेंहि पुरत नसत. जगांत तयार होणाऱ्या तांब्यापैकीं, शें. ७० चें वैद्युतिक रीतीनें शुद्धीकरण केलें जातें. १९०७ सालीं अमेरिकेंत ४६१५८३ टन तांबें शुद्ध करण्यांत आलें; त्याबरोबर १३९९५४३६ औंस चांदी व २७२१५० औंस सोनें मिळालें. अलीकडे अमेरिकेमध्यें तांब्याची पैदास वाढत असून इतर देशांत कमी होत आहे.

*तयार झालेल्या सर्व मालाला तीन महिन्याच्या आंत* मागणी येते व ती बहुधां एक महिन्यापेक्षां जास्त पुरतहि नाहीं, यावरून पैदाशीबरोबर त्याचा खपहि वाढला आहे हें उघड आहे. हल्लीं जहाजांना बाहेरून लावण्याकरितां तांब्याच्या पत्र्यांचा उपयोग करित नाहींत तरी वैद्युतिक उपकरणें आणि विद्युद्वाहक करण्याकडे तांब्याचा उपयोग होऊं लागल्यामुळें तांब्याचा एकंदर खप कमी झालेला नाहीं.

तांब्याच्या मिश्रधातूः—बहुतेक दुसऱ्या सर्व धातूंबरोबर तांब्याचें मिश्रण होऊन महत्त्वाच्या मिश्रधातू बनतात. त्यांपैकीं ज्यांत तांब्याचें प्रमाण बरेंच आहे अशा मुख्य मिश्रधातू म्हटल्या म्हणजे पितळ, ब्रांझ व जर्मनसिल्व्हर या होत. *त्यांचे गुणधर्म व उपयोग त्या त्या धातूंच्या* वर्णनांत दिले आहेत.

तांब्याचें अस्तित्व शोधून काढण्याच्या रीतीः—तांब्याच्या संयुक्त पदार्थांच्या योगानें बुनसेन बर्नरच्या ज्वाळेला हिरवा रंग येतो. तांब्याच्या क्षाराच्या द्रावणांत अमोनिया मिळविला असतां त्याला एक प्रकारचा निळा रंग येतो. पोटॅशिअम फेरो सायनाइडच्या योगानें तपकिरी रंगाचा सांका मिळतो, व द्रावण फार पातळ असेल तर नुसता तपकिरी रंग होतो. या प्रतिक्रियेनें ५००००० पट पाण्यांतील १ भाग तांब्यानेंहि अस्तित्व शोधून काढितां येतें.

औषधाकरितां उपयोगः—ताम्रगंधकिताचा (मोरचुदाचा) *वांतिकारक म्हणून उपयोग केला जात असे. परंतु त्यामुळें मागून ग्लानि येते व त्यापासून अपेक्षित क्रिया न झाल्यास* पोटांतील श्लेष्मल त्वचेवर त्याचे फार हानिकारक परिणाम होतात, *या कारणास्तव हल्लीं त्याचा उपयोग या कामाकरितां* क्वचित् केला जातो. तथापि बाह्यतः, दाहक व कोथघ्न म्हणून तें उपयोगी आहे. तांब्याचे संयुक्त पदार्थ विषारी असतात.

चिटें छापण्याच्याकामीं व हिरवे रंग करण्याकरितां मोरचुदाचा फार उपयोग करतात. पेरणीच्या बियाला कीड लागू *नये म्हणून तें मोरचुदाच्या पाण्यांत भिजवितात.*

तांबें गाळण्याचे कारखाने हिंदुस्थानांत बरेच जुने असावे. हल्लीं बंगाल प्रांतांत सिंघभूम व दारभूम येथें हे कारखाने सुरू झाले आहेत. दार्जिलिंग चांदा, गढवाल, आसाम व बलुचिस्तान इत्यादि ठिकाणीं तांब्यासंबंधीं महत्त्वाचे शोध लागले आहेत. दक्षिण हिंदुस्थान, राजपुताना व हिमालयाच्या बाह्य प्रदेशांतील पुष्कळसे भाग यांमध्यें पूर्वी तांबें गाळीत असत. पुष्कळ यूरोपियन कंपन्यांनीं तांबें खणून तें गाळण्याचे प्रयत्न या प्रांतांत केले परंतु ते निष्फळ ठरले.

तरी कच्चें तांबें खाणींतून काढून शुद्ध करण्याचे कारखाने काढण्यास कौलनामे व परवाने दिले जातात. हल्लीं हिंदुस्थानांत परदेशांतून तांबें फार येतें. परंतु हिंदुस्थानांतील चांगल्या खाणींचें तांबें शुद्ध केलें तर बरीच अडचण दूर होईल. पूर्वी तांबें शुद्ध करण्याचीं साधनें सुधारलेलीं नसल्या कारणानें खाणी खणणारे लोक पायराटीसपर्यंत पोंचतच नसत. कारण मध्येंच पाणी लागत असे; यामुळें वरच सांपडणारीं तांब्याचीं प्राणिदें व कार्बितें यांपासूनच ते लोक तांबें काढीत असत.

तांबें व पितळ यांचे कारागीर.—हे कारागीर तीन प्रकारचे आहेत (१) गाळणारे, (२) ओतणारे व (३) ठांबट. लोखंड व तांबें यांच्या कारखान्यांची संख्या एकत्र दिलेली असते. १९०५ त हिंदुस्थानांत असे २४३०० कारखाने होते. अलीकडे तांबें पितळ यांचे कारखाने शहरांत जास्त प्रमाणावर निघू लागले आहेत. इतर *उद्योगधंद्यांशीं सरकारी रिपोर्टांत* तुलना करून पहातां हा धंदा चांगल्या स्थितींत आहे. कारण या कारखान्यांतील बहुतेक काम हलकें असतें.

तांबें व पितळ यांचीं भांडीं—प्रत्येक प्रांतांत दोन किंवा त्याहून जास्त कारखाने आहेत त्यामुळें प्रत्येक प्रांतांतील भांड्यांचे आकार, घडण व डौल हीं वेगळालीं असतात. पितळ हें तांबें व जस्त यांचें २:१ किंवा ४:३ *याप्रमाणें मिश्रण करून तयार होतें हें हिंदुस्थानांत* बहुधां करीत नाहींत. परदेशांतून याचे पत्रे येतात. कांसें हें, तांबें *व जस्त यांचें ७:२ या प्रमाणांत मिश्रण करून करतात.* हें हिंदुस्थानांत तयार होतें. धालिया किंवा भारिया हे लोक कांसें तयार करतात व कांसार हें कांसें विकतात.

हिंदू लोक सोन्याच्या खालोखाल तांबें व रुपें या धातूंना शुद्ध समजतात. *पितळ हें त्याहूनहि खालच्या दर्जानें मानिलें* जातें. मुसुलमान लोक पितळेला हलकी मानतात; परंतु कल्हई केलेलीं तांब्याचीं भांडीं हे वापरतात; कांशाच्या भांड्यांत अंबट पदार्थ कळकत नाहींत.

हिंदी कारागिरांनीं पूर्वी तांबें व पितळ व त्यांच्या मिश्रणानें झालेल्या धातूंचें कुशल काम व उपयोग यांचें चांगलें

ज्ञान असावें असें त्यांच्या भांड्यांवरून व इतर जिनसां-वरून दिसतें. ब्रह्मदेशांतील पितळेच्या मूर्ती इतक्या कमी श्रमानें व साहित्यानें केलेल्या आहेत कीं आंग्ल कारागिरांनां त्या तितक्या कमी श्रमानें व साहित्यानें करतां येणार नाहींत. राजपुताना व इतर ठिकाणीं तांब्याच्या बांगड्या फार स्वस्त मिळतात.

या धातूंची घरगुती भांडीं अगदीं साधीं असून त्यावर नक्षीदार काम नसतें. हिंदू लोकांमध्यें या धातूचे लोटे व मुसुलमान लोकांत झाऱ्या वापरतात.

या धातूंच्या पंचपात्रीं, आचमनी ( संध्येची पळी ), धूप-दाणी, सिंहासन, आर्ती, घंटा इत्यादि पूजेची भांडीं व उपकरणीं व कृष्ण, विष्णु इत्यादिकांच्या मूर्ती या जिनसा तयार करतात.

**तांबोळी**—हा धंदेवाचक शब्द असून त्याचा अर्थ विड्यांचीं पानें विकणारा असा होतो. ही मुख्यतः पंजाबां-तील जात आहे. तेथें हे हिंदु व मुसुलमान असून, दिल्ली, कर्नाळ, अंबाला, सिमला, कांगा, लुधियाना, फिरोजपूर, लाहोर, रावळपिंडी, मुलतान हे जिल्हे आणि नह्न व पति-याळा संस्थानें यांत आढळतात. हे मुख्यतः संयुक्त प्रांतांतून आलेले आहेत.

तनावली तांबोळी या नांवाची यांची एक पोट जात अटक व लाहोर यांत आढळते. ही एक मेहनती व शांतता-प्रिय अशी शेतकरी जात असून आपणांस अमीरखान म्हणून एका धारल (शहराचें नांव)येथील मोंगलांचे वंशज म्हणवितात. ४ शतकांपूर्वी अमीरखानाच्या मुलांनीं सिंधुनद ओलांडून हजाऱ्याच्या तनवाल नांवाच्या मैदानांत वसाहत केली असें म्हणतात.

म हा रा ष्ट्री य.—ही जात मूळ महाराष्ट्रीय नसून गुजराथ व पंजाबमधून इकडे १०० । १२५ या वर्षांपूर्वी आली असें म्हणतात. यांची वस्ती बहुतेक जिल्ह्यांत आढळते. या जातींपैकीं कांहीं अद्याप गुजराथी भाषा बोलतात व गुजराथी पेहराव करतात. पण बहुतेकांनीं मराठी भाषा व चालीरीती उचलल्या आहेत. त्यांचा मुख्य धंदा खाण्याचीं पानें, आपटा वगैरे पानें विकणें हा होय. सातारा जिल्ह्यांत या जातीची वस्ती वरीच म्हणजे अदीच तीन हजारपर्यंत आहे.

दहावारा पिढ्यापूर्वी ही जात कर्नाटकांतून येथें आली असें म्हणतात. लिंगायत, मराठा व मुसुलमान असे या जातीचे विभाग असून खालील माहिती विशेषतः लिंगायत तांबोळ्यांनांच अनुलक्षून आहे. हे लोक मराठी भाषा बोल-तात. मराठा शेतकऱ्यांप्रमाणें दिसतात. बहुतेक तांबोळी गाई म्हशी पाळतात व खेड्यांत पानांचे गड्डे आणण्याकरितां तट्टेंहि बाळगतात. ते मद्यमांसाशन करीत नाहींत असें म्हण-तात. विड्याचीं पानें, सुपाऱ्या, तंबाखू वगैरे सामान विकतात. तांबोळ्यांच्या स्त्रिया हा धंदा सारखा करीत नाहींत. कित्येक तांबोळी शेतीहि करितात व कित्येक मजुराचा धंदा करि-तात.कांहीं लोक दुसऱ्याच्या घरीं नोकर म्हणूनहि राहतात.ते हिंदू देवतांची पूजा करितात व सर्व हिंदू सण व उपास पाळतात. त्यांचे जन्माचे, लग्नाचे व अंत्य संस्कार साधारणतः हिंदू प्रमाणेंच असतात. जंगम किंवा ब्राह्मण हे त्यांच्या धर्म-कृत्यांस जरूर लागतात. मुसुलमान व मराठा तांबोळी अली-कडे पानें विकण्यांच्या धंद्यांत सरसावल्यामुळें लिंगायत तांबोळी मागे पडले आहेत. [ इंडियन गॅझेटियर; मुंबई गॅझेटियर; सेन्सस रिपोर्टे; रोजची ग्लासरी. ]

**ताब्रीझ**—इराणांतील अजरबैजान प्रांताची हें शहर राजधानी आहे. लोकसंख्या सुमारें २ लक्ष आहे. हरून-अल-राशिद याच्या बायकोनें ८९१ सालीं शहर वसविलें असें सांगतात पण त्यास पुरावा नसून त्याच्यापूर्वी कित्येक शतकें ताब्रीझ माहीत होतें. गरम खनिज पदार्थांच्या जवळच असणाऱ्या झऱ्यांवरून हें नांव पडलें आहे.

शहरांत प्रख्यात इमारती फार थोड्या आहेत. गझनखान ( १२९५-१३०४ ) व जहानशहा ( १४३७ ) यांनीं बांध-लेल्या मोठ्या इमारती पडलेल्या आहेत. इराणांत उत्तम हवेचीं जीं शहरें आहेत त्यांपैकीं हें एक आहे. या शहरांचें भूमिकंपानें पुष्कळ नुकसान झालें आहे. १८७८ पूर्वी येथें व्यापार चांगला चालत असे, पण काकेससमध्यें रेल्वेरस्ता झाल्यानें व इतर कांहीं कारणांनीं या शहराचें व्यापारी महत्त्व कमी झालें.

**तामनगड**.—राजगडसंस्थानांतील १८९ खेड्यांचा पर-गणा. हा मुलूख संस्थानच्या उत्तरेस असून बहुतेक डोंगराळ आहे. क्षेत्रफळ १०५,१३७ एकर व लोकसंख्या ४६,५६९. यांत चार प्राथमिक शाळा, एक पोलिसठाणें व २ चौक्या आहेत.

**तामिळ**, भा षा.—मॅक्समुल्लरनें जगांतील एकंदर भाषांचे सेमेटिक, आर्य व तुराणी असे तीन मुख्य वर्ग पाडले आहेत. तुराणी वर्गांतील भाषा ऑस्ट्रेलियापासून फिनलंड-पर्यंतच्या फार विस्तृत प्रदेशांत पसरल्या असून या वर्गां-तील सर्व भाषांमध्यें तामिळ हीच भाषा सर्वांत अधिक प्रगत असून तिच्यांत शुद्ध देश्य असें वाङ्मयहि पुष्कळ व उच्च प्रतीचें आहे. तामिळ या शब्दाचा अर्थ 'गोड' असा आहे, आणि तेलगू भाषेइतकी मधुरता तामिळ भाषेंत नसली तरी तिला 'पूर्वेकडील इटालियन भाषा' म्हणतां येईल. "थोडक्या शब्दांत जोरदार अर्थ आणण्याच्या बाब-तींत तामिळच्या वरचढ अशी जगांत दुसरी कोणतीहि भाषा बहुधां नसेल" असें रेव्हरंड. पी. पर्सीव्हल म्हणतो. तामिळ भाषा बोलणारे लोक पुलिकतपासून त्रिवेंद्रमपर्यंतच्या व समुद्र-किनाऱ्यापासून पूर्वघाटापर्यंतच्या प्रदेशांत आहेत. शिवाय सिलोनमधील सुमारें निम्मे लोक तामिळ असून ब्रिटिश ब्रह्मदेश, मॉरिशस बेट, नाताळ व वेस्टइंडिया बेटें वगैरे मुलु-खांत तामिळ लोकांची वस्ती आहे. उत्तर सिलोनसह

हिंदुस्थानांतील ५८ हजार चौरस मैल प्रदेश तामिळ भाषा बोलणाऱ्या लोकांनीं व्यापला आहे, आणि तामिळ ही १ कोटी २० लक्ष लोकांची मातृभाषा आहे.

संस्कृत पंडितांनीं सामान्यतः हिंदुस्थानांतील एकंदर भाषांचा पांच गौड भाषा व पांच द्राविडी भाषा असा हिशेब केला असून पांच द्राविडी भाषांत तेलगू, कानडी, मराठी, गुजराथी व तामिळ यांचा समावेश केला आहे. वास्तविक मराठी व गुजराथी या दोन भाषांचें उत्तरेकडील भाषांशी साम्य असून त्यांची आद्यजननी संस्कृत भाषा आहे. द्राविडी भाषावर्गांत तामिळ, तेलगू, कानडी, मल्याळम्, तुळु, गोंड' व कु या भाषांचा समावेश होतो. द्राविडी भाषा मूळ एका निराळ्याच भाषेपासून झाल्या असल्या तरी संस्कृत शब्दांचें

## भाषांचें तुलनात्मक कोष्टक.

| मराठी | संस्कृत | तामीळ | तेलगु | कानडी | मल्याळम् |
|---|---|---|---|---|---|
| मी | अहम् | नान् | नेनु | नानु | नान् |
| मला | माम् | एमइ | नन्नु | नान्नान्नु | एन्ने |
| आम्ही | वयम् | नाम् | मेमु | नावु | नांगल |
| तूं | त्वम् | नि, नीन् | निवु | नितु | नि, निन् |
| तुम्ही | यूयम् | निंधल | मिरु | निवु | निंगल |
| तुम्हास | युष्मत् | अङ्कलइ | मिम्मुनु | निम्मन्नु | निंगले |
| तो | सः | अवान | वडु | अवनु | अवेन् |
| ते | ते | अवारकल | वरु | अवरु | अवार |
| एक | एक | ओन्रु | ओकति | ओन्दु | ओन्न |
| दोन | द्वि | इरन्डु | रेन्डु | एरडु | रेन्ड |
| तीन | त्रि | मुन्रु | मुडु | मुरु | मुन्न |
| चार | चतुर् | नन्गु | नलुगु | नाल्कु | नल |
| पांच | पंचन् | ऐन्डु | ऐदु | ऐदु | अंजह |
| सहा | षट् | आरु | आरु | आरु | आर |
| सात | सप्त | एरु | एडु | एलु | ऐरा |
| आठ | अष्ट | एट्टु | एनिमिदि | एन्टु | एट्ट |
| नऊ | नव | ओंवदु | तोम्मिदी | ओंवत्तु | ओइम्बथा |
| दहा | दश | पत्तु | पादि | हत्तु | पठ |
| बाप | पिता | अप्पान् | तन्दि | तंदे | अप्पेन |
| बाप | पितर् | अप्पानमार | तन्दुलु | तंदेगलु | अप्पेनमार |
| आई | मातर्,माता | ताय् ,अम्मा | तल्ली | ताइ | अम्मा |
| मुलगा | पुत्र | मकन् | कोडुकु | मगनु | मकेन |
| मुलगी | दुहिता,पुत्री | मकळ | कूतुरु | मगलु | मकळ |
| डोकें | शिरस् | तलाइ | तला | तले | थाल |
| डोळा | अक्षि | कान् | कण्णु | कण्णु | कण्ण |
| तोंड | मुखम् | वइ | नोरु | बाइ | वाय |
| हात | कराः | केइ | चेयी | कइ | केइ |
| पाय | पाद | काल् | कालु | कालु | काल |
| झाड | वृक्ष | मारम् | चेट्टु | मर | मारम् |
| झाडें | वृक्षाः | मारंगकाल् | चेट्टल | मरगळ | मारंगळ |
| सूर्य | सूर्यः | प्रयिरु | पोद्दु | सूर्य | थाल |
| चंद्र | चन्द्रमस् | तिंगल | नेला | चंद्र | नालाव |
| दिवस | दिवस | नाल | पगालु | हगलु | वकल |
| रात्र | रात्रिः | इरावु | रे | इरलु | रात्रि |
| आग | अग्नि | नेरुप्पु | निप्पु | बेंकि | ये |
| पाणी | अप्,नीर | नीर | नीरु | नीरु | वेल्लम् |

ज्ञान असावें असें त्यांच्या भांड्यांवरून व इतर जिनसां-वरून दिसतें. ब्रह्मदेशांतील पितळेच्या मूर्ती इतक्या कमी श्रमानें व साहित्यानें केलेल्या आहेत कीं आंग्ल कारागिरांनां त्या तितक्या कमी श्रमानें व साहित्यानें करतां येणार नाहींत. रामपुताना व इतर ठिकाणीं तांब्याच्या बांगड्या फार स्वस्त मिळतात.

या धातूंची घरगुतीं भांडीं अगदीं साधीं असून त्यावर नक्षीदार काम नसतें. हिंदू लोकांमध्यें या धातूचे लोटे व मुसुलमान लोकांत झाऱ्या वापरतात.

या धातूंच्या पंचपात्रीं, आचमनी ( संध्येची पळी ), धूप-दाणी, सिंहासन, आर्ती, घंटा इत्यादि पूजेचीं भांडीं व उपकरणीं व कृष्ण, विष्णु इत्यादिकांच्या मूर्ती या जिनसा तयार करतात.

**तांबोळी**—हा धंदेवाचक शब्द असून त्याचा अर्थ विड्यांचीं पानें विकणारा असा होतो. ही मुख्यतः पंजाबां-तील जात आहे. तेथें हे हिंदु व मुसुलमान असून, दिल्ली, कर्नाळ, अंबाला, सिमला, कांगा, लुधियाना, फिरोजपूर, लाहोर, रावळपिंडी, मुलतान हे जिल्हे आणि नहन व पति-याळा संस्थानें यांत आढळतात. हे मुख्यतः संयुक्त प्रांतांतून आलेले आहेत.

तनावली तांबोळी या नांवाची यांची एक पोट जात अटक व लाहोर यांत आढळते. ही एक मेहनती व शांतता-प्रिय अशी शेतकरी जात असून आपणांस अमीरखान म्हणून एका बारल (शहराचें नांव)येथील मोंगलांचे वंशज म्हणवितात. ४ शतकांपूर्वी अमीरखानाच्या मुलांनीं सिंधुनद ओलांडून हजाऱ्याच्या तनवाल नांवाच्या मैदानांत वसाहत केली असें म्हणतात.

म हा रा ष्ट्री य.—ही जात मूळ महाराष्ट्रीय नसून गुजराथ व पंजाबमधून इकडे १००।१२५ या वर्षांपूर्वी आली असें म्हणतात. यांची वस्ती बहुतेक जिल्ह्यांत आढळते. या जातींपैकीं कांहीं अद्याप गुजराथी भाषा बोलतात व गुजराथी पेहराव करतात. पण बहुतेकांनीं मराठी भाषा व चालीरीती उचलल्या आहेत. त्यांचा मुख्य धंदा खाण्याचीं पानें, आपटा वगैरे पानें विकणें हा होय. सातारा जिल्ह्यांत या जातीची वस्ती बरीच म्हणजे अदीच तीन हजारपर्यंत आहे.

दहावारा पिढ्यांपूर्वी ही जात कर्नाटकांतून येथें आली असें म्हणतात. लिंगायत, मराठा व मुसुलमान असे या जातीचे विभाग असून खालील माहिती विशेषतः लिंगायत तांबोळ्यांनाच अनुलक्षून आहे. हे लोक मराठी भाषा बोल-तात. मराठा शेतकऱ्यांप्रमाणें दिसतात. बहुतेक तांबोळी गाई म्हशी पाळतात व खेड्यांत पानांचे गठे आणण्याकरितां तट्टेंहि बाळगतात. ते मद्यमांसाशन करीत नाहींत असें म्हण-तात. विड्याचीं पानें, सुपाऱ्या, तंबाखू वगैरे सामान विकतात. तांबोळ्यांच्या स्त्रिया हा धंदा सारखा करीत नाहींत. कित्येक तांबोळी शेतीहि करितात व कित्येक मजुराचा धंदा करि-तात.कांहीं लोक दुसऱ्याच्या घरीं नोकर म्हणूनहि राहतात.ते हिंदू देवतांची पूजा करितात व सर्व हिंदू सण व उपास पाळतात. त्यांचे जन्माचे, लग्नाचे व अंत्य संस्कार साधारणतः हिंदू प्रमाणेंच असतात. जंगम किंवा ब्राह्मण हे त्यांच्या धर्म-कृत्यांस जरूर लागतात. मुसुलमान व मराठा तांबोळी अली-कडे पानें विकण्यांच्या धंद्यांत सरसावल्यामुळें लिंगायत तांबोळी मागे पडले आहेत. [ इंडियन गॅझेटियर; मुंबई गॅझेटियर; सेन्सस रिपोर्ट; रोजची ग्लासरी. ]

**ताब्रीझ**—इराणांतील अजरबैजान प्रांताची हें शहर राजधानी आहे. लोकसंख्या सुमारें २ लक्ष आहे. हरून-अल-राशिद याच्या बायकोनें ८९१ साली शहर वसविलें असें सांगतात पण त्यास पुरावा नसून त्याच्यापूर्वी कित्येक शतकें ताब्रीझ माहीत होतें. गरम खनिज पदार्थांच्या जवळच असणाऱ्या झऱ्यांवरून हें नांव पडलें आहे.

शहरांत प्रख्यात इमारती फार थोड्या आहेत. गझनखान ( १२९५-१३०४ ) व जहानशहा ( १४३७ ) यांनीं बांध-लेल्या मोठ्या इमारती पडलेल्या आहेत. इराणांत उत्तम हवेचीं जीं शहरें आहेत त्यांपैकीं हें एक आहे. या शहराचें भूमिकंपानें पुष्कळ नुकसान झालें आहे. १८७८ पूर्वी येथें व्यापार चांगला चालत असे, पण काकेससमध्यें रेल्वेरस्ता झाल्यानें व इतर कांहीं कारणांनीं या शहराचें व्यापारी महत्त्व कमी झालें.

**तामनगड**.—रायगडसंस्थानांतील १८९ खेड्यांचा पर-गणा. हा मुलूख संस्थानच्या उत्तरेस असून बहुतेक डोंगराळ आहे. क्षेत्रफळ १०५,१३७ एकर व लोकसंख्या ४६,५६९. यांत चार प्राथमिक शाळा, एक पोलिसठाणें व २ चौक्या आहेत.

**तामिळ**, भा षा.—मॅक्समुल्लरनें जगांतील एकंदर भाषांचे सेमेटिक, आर्य व तुराणी असे तीन मुख्य वर्ग पाडले आहेत. तुराणी वर्गांतील भाषा ऑस्ट्रेलियापासून फिनलंड-पर्यंतच्या फार विस्तृत प्रदेशांत पसरल्या असून या वर्गां-तील सर्व भाषांमध्यें तामिळ हीच भाषा सर्वांत अधिक प्रगत असून तिच्यांत शुद्ध देश्य असें वाङ्मयहि पुष्कळ व उच्च प्रतीचें आहे. तामिळ या शब्दाचा अर्थ 'गोड' असा आहे, आणि तेलगू भाषेइतकी मधुरता तामिळ भाषेंत नसली तरी तिला 'पूर्वेकडील इटालियन भाषा' म्हणतां येईल. "थोडक्या शब्दांत जोरदार अर्थ आणण्याच्या बाब-तींत तामिळच्या वरचढ अशी जगांत दुसरी कोणतीहि भाषा बहुधा नसेल" असें रेव्हरंड. पी. पर्सीव्हल म्हणतो. तामिळ भाषा बोलणारे लोक पुलिकतपासून त्रिवेंद्रमपर्यंतच्या व समुद्र-किनाऱ्यापासून पूर्वघाटापर्यंतच्या प्रदेशांत आहेत. शिवाय सिलोनमधील सुमारें निम्मे लोक तामिळ असून ब्रिटिश ब्रह्मदेश, मॉरिशस बेट, नाताळ व वेस्टइंडिया बेटें वगैरे मुलु-खांत तामिळ लोकांची वस्ती आहे. उत्तर सिलोनसह

हिंदुस्थानांतील ५८ हजार चौरस मैल प्रदेश तामिळ भाषा बोलणाऱ्या लोकांनीं व्यापला आहे, आणि तामिळ ही १ कोटी २० लक्ष लोकांची मातृभाषा आहे.

संस्कृत पंडितांनीं सामान्यतः हिंदुस्थानांतील एकंदर भाषांचा पांच गौड भाषा व पांच द्राविडी भाषा असा हिशेब केला असून पांच द्राविडी भाषांत तेलगू, कानडी, मराठी,

## भाषांचें तुलनात्मक कोष्टक.

| मराठी | संस्कृत | तामीळ | तेलगु | कानडी | मल्याळम |
|---|---|---|---|---|---|
| मी | अहम् | नान् | नेनु | नानु | नान् |
| मला | माम् | एन्नइ | नन्नु | नान्नु | एन्ने |
| आम्ही | वयम् | नाम् | मेमु | नावु | नांगळ |
| तूं | त्वम् | नि, नीन् | निवु | निनु | नि, निन् |
| तुम्ही | यूयम् | निंधल | मिरु | निवु | निंगल |
| तुम्हास | युष्मत् | अङ्कलइ | मिम्मुनु | निम्मन्नु | निंगले |
| तो | सः | अवान | वडु | अवनु | अवेन् |
| ते | ते | अवारकल | वरु | अवरु | अवार |
| एक | एक | ओन्रु | ओकति | ओन्दु | ओन्नि |
| दोन | द्वि | इरन्दु | रेन्डु | एरडु | रेन्ड |
| तीन | त्रि | मुन्रु | मुडु | मूरु | मुन्न |
| चार | चतुर् | नन्गु | नलुगु | नाल्कु | नल |
| पांच | पंचन् | ऐन्दु | ऐदु | ऐदु | अंजह |
| सहा | षट् | आरु | आरु | आरु | आर |
| सात | सप्त | एरु | एदु | एलु | ऐरा |
| आठ | अष्ट | एट्टु | एनिमिढि | एन्टु | एट्ट |
| नऊ | नव | ओंबटु | तोम्मिर्दी | ओंबत्तु | ओइम्बथा |
| दहा | दश | पत्तु | पादि | हत्तु | पठ |
| बाप | पिता | अप्पान् | तन्ड्रि | तंदे | अप्पेन |
| बाप | पितर् | अप्पानमार | तन्डुलु | तंदेगळु | अप्पेनमार |
| आई | मातर्,माता | ताय् ,अम्मा | तल्ली | ताइ | अम्मा |
| मुलगा | पुत्र | मकन् | कोडुकु | मगनु | मकेन |
| मुलगी | दुहिता,पुत्री | मकळ | कूतुरु | मगळु | मकळ |
| डोकें | शिरस् | तलाइ | तला | तले | थाल |
| डोळा | अक्षि | कान् | कण्णु | कण्णु | कण्ण |
| तोंड | मुखम् | वइ | नोरु | बाइ | वाय |
| हात | कराः | केइ | चेयी | कइ | केइ |
| पाय | पाद | काल् | कालु | कालु | काल |
| झाड | वृक्ष | मारम् | चेट्टु | मर | मारम् |
| झाडें | वृक्षाः | मारंगकाल् | चेट्टल | मरगळ | मारंगळ |
| सूर्य | सूर्यः | ञयिरु | पोद्दु | सूर्य | घाल |
| चंद्र | चन्द्रमस् | तिंगल | नेला | चंद्र | नालाव |
| दिवस | दिवस | नाल | पगाल्लु | हगलु | वकल |
| रात्र | रात्रिः | इरावु | रे | इरलु | रात्रि |
| आग | अग्नि | नेरुप्पु | निप्पु | बेंकि | ये |
| पाणी | अप्,नीर | नीर | नीरु | नीरु | वेल्लुम् |

गुजराथी व तामिळ यांचा समावेश केला आहे. वास्तविक मराठी व गुजराथी या दोन भाषांचें उत्तरेकडील भाषांशीं साम्य असून त्यांची आद्यजननी संस्कृत भाषा आहे. द्राविडी भाषावर्गांत तामिळ, तेलगू, कानडी, मल्याळम, तुळु, गोंड' व कु या भाषांचा समावेश होतो. द्राविडी भाषा मूळ एका निराळ्याच भाषेपासून झाल्या असल्या तरी संस्कृत २०५

मिश्रण तामिळमध्यें शें. ४० तेलगूमध्यें शें. ५० व मल्याळम् भाषेत याहूनहि अधिक प्रमाणांत आहे, व तत्त्वज्ञान, शास्त्र, धर्म व कलाविषयक पारिभाषिक शब्द संस्कृतमधील आहेत. भाषांतील शब्दांच्या तुलनेकरितां मागील पृष्ठावरील कोष्टक पहा.

इरुल, कुरुव आणि येरुकल अशा तामिळच्या तीन पोटभाषा आहेत, पैकीं पहिल्या दोन निलगिरी पर्वतांतील जंगली लोक बोलतात, व शेवटची--जिला कोर्चा किंवा कोरव असेंहि म्हणतात ती--जिप्सी लोकांसारख्या भटक्या जाती बोलतात. मालसर हा तामिळचाच एक अपभ्रष्ट प्रकार असून ही भाषा अनमलइ पर्वतांतील उत्तरेकडील जंगली लोक बोलतात. मुख्य तामिळ भाषेंत शेन ( उच्च ) व कोडूम ( खेडवळ ) असे दोन प्रकार असून पहिली काव्यवाङ्मयांत व दुसरी सामान्य लोकांच्या बोलण्यांत रूढ आहे.

लि पि.—तामिळ, तेलगु, कानडी व मल्याळम् अशा तीन द्राविडी लिपी आज प्रचारांत आहेत. त्या तिन्ही मूळ देवनागरी लिपीपासून निघाल्या आहेत असें मानतात. तेलगुकानडी व तामिळ या दोन लिपींत बरेंच अंतर आहे, व या दोन्ही लिपी देवनागरीहून फार भिन्न आहेत. प्राचीन तामिळभाषेची वेत्तलुत्तु (म्ह. वाटोळीं अक्षरें) ही फार जुनी लिपि असून आधुनिक तामिळ लिपि, ग्रंथ लिपा व तिच्या पूर्वीच्या अशोककालीन जुन्या ब्राह्मी लिपीपासून तयार झालेली आहे, व कांहीं वर्ण जुन्या वत्तेलुत्तु लिपींतून घेतलेले आहेत. तथापि ही लिपि फार अपुरी आहे. तामिळ लिपींत बारा स्वर व अठरा व्यंजनें मिळून तीस वर्ण आहेत. स्वर भरपूर आहेत पण व्यंजनें फारच कमी आहेत. पांच पांच वर्णांचे पुरे पांच वर्ग नाहींत; तर क वर्गांतील ख, ग, घ या तीन वर्णांचें काम एकट्या 'क'ला भागवावें लागतें व अशीच चवर्ग, टवर्ग, तवर्ग व पवर्गाबद्दल स्थिति आहे. क, च, ट, त, प या पांच वर्गांतील अनुनासिकें मात्र आहेत. पुढें य, र, ल, व, हे चार वर्ण आहेत आणि श, ष, स, ह हे वर्ण नाहींत. 'ह' चें काम 'क'ला व 'स'चें 'च'ला करावें लागतें. याशिवाय न, र, ल, ळ, अशासारख्या उच्चाराचे चार वर्ण आहेत. तामिळ व्याकरणकार व्यंजनांचे कठोर, मृदु व मध्यम असे तीन वर्ग पाडतात. कठोर व्यंजनांपैकीं कोणतेंहि शब्दाच्या शेवटीं येत नाहीं. मृदुपैकीं एकखेरीज कोणतेंहि आणि मध्यमपैकीं कोणतेंहि शब्दाच्या शेवटीं येऊं शकतें.

तामिळ भाषेंत निरनिराळ्या काळीं जे संस्कृत शब्द शिरले ते सध्यां अति विकृत स्वरूपांत आहेत. याचें कारण या दोन भाषांतील उच्चारसंप्रदायाची भिन्नता होय. उदा. उलगु (संस्कृत=लोक), उरुवम् (रूप), अरुक्केन (अर्क), अर्पुतम् (अभ्दुतम्), नट्चत्तिरम् (नक्षत्रम्), इरुडि (ऋषि), तीर्कम् (दीर्घम्), अरसेन (राजन्). संस्कृतखेरीज हिंदुस्थानी, अरबी, आणि फारशी शब्द तामिळनें उचलिले आहेत; ते बहुतेक महसूल, राजकीय व न्यायखात्यांतील संज्ञा आहेत. अलीकडे इंग्रजी शब्दहि शिरलेले दिसतात; उदा. तिरटि (ट्रिटी), पट्लर (बटलर), आक्ट (अॅक्ट), कुलोब (क्लब ), कवर्नर (गव्हर्नर), पिन्नलकोडु (पिनलकोड), सिक्कु (सिल्क) मेजास्तिरट्टु (मॅजिस्ट्रेट). तथापि इतर द्राविडी वाङ्मयीन भाषांशीं तुलना करतां, तामिळनें परकी वर्चस्वाला न जुमानतां आपलें वैशिष्ट्य राखिलें आहे असें निःसंशय म्हणावें लागेल. कांहीं तामिळी शब्दहि इंग्रजी भाषेंत रूढ झाले आहेत; उदा. करी (तामि. करी.), मुलिगटानी (मिलगु = मिरी व तण्णीर = थंड पाणी ), चेरूट (सुरुत्तु), परिया (परेइयन).

संस्कृतांतल्यापेक्षां तामिळमध्येंच संधिनियम फार गुंतागुंतीचे आहेत. जुन्या काव्यभाषेंत (शेन- तामिळींत) हे तंतोतंत पाळीत असले तरी आजच्या भाषेंत (कोडूम--तामिळींत ) त्यांकडे दुर्लक्ष करण्याची प्रवृत्ति वाढत चालली आहे. हे संधिनियम संस्कृत नियमांसारखे वाटतात तरी त्यांमध्यें अतिशय फरक आहे. उदा. इरुळ नीक्किनान यांचा संधि इरुणीक्किनान; पोन पात्तिरम = पोरपात्तिरम्; पलन तन्दान = पलनरान्दन. नामें दोन प्रकारचीं--उच्च वर्णीय व नीचवर्णीय, किंवा पुरुषवाचक व अपुरुषवाचक. पहिल्यांत सबुद्ध प्राणी व दुसऱ्यांत इतर सर्व नांवें येतात. फक्त उच्चवर्णीय नामांत एकवचनांत स्त्रीलिंग व पुल्लिंग हा भेद पाळतात; बहुवचन दोघांचें एकच होतें (पुल्लिंगांत अंत्य न् चा व स्त्रीलिंगांत ळ्चा र होतो.) कळ् (गळ्) हा नपुंसकलिंगी प्रत्ययहि यापुढें वाटल्यास लावावा. विभक्तिप्रत्यय लागण्यापूर्वी कांहीं नामांचें सामान्यरूप होतें. एकवचनी व अनेकवचनी विभक्तिप्रत्यय सारखेच असतात. द्वितीयेचा एइ, तृती. आल्, चतु. कु, पंच. इलिरुंदु ( इनिन्रु ), षष्ठी उडेइय ( अदु ), व सप्तमीचा इल् ( इडत्तिल, इन् ) असा आहे. जुन्या कवितांतून या प्रत्ययांचीं विविध रूपें आढळतात तर पुष्कळ वेळां प्रत्यय गाळतातहि. विशेषणें जेव्हां गुणदर्शक असतात तेव्हां तीं नामांपूर्वी येऊन जशींच्या तशींच राहतात. तीं क्रियावाचक असतांना नामांनंतर येऊन त्यांना क्रियापदाचे प्रत्यय लागतात. एकवचनी व अनेकवचनी सर्वनामें पुढीलप्रमाणें असतातः—

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम पुरु. | नान् ( यान् ) | नाम् ( याम् ), नानगळ. |
| द्वितीय पुरु. | नी | नीर (नीविर, नीविर) नीनगळ |

क्रियापदांत धातु, काळ व पुरुषवाचक प्रत्यय हीं मुख्यतः पहावयाचीं असतात. अनियमितार्थ, आज्ञार्थ व संकेतार्थ असे तीन मूळ अर्थ व तसेच तीन काळ ( वर्तमान, भूत व भविष्य ) आहेत. पुरुषवाचक प्रत्यय एकवचनीः—(१) एन; ( २ आय, सन्मानार्थी-ईर, ( ३ ) पुल्लिं. —आन् स्त्रीलिं.—आळ्, सन्मानार्थी—आर, नपुंस.—अदु. अनेकवचनी—( १ )-ऑम् ( आम्, एम् ); ( २ )-ईकळ; ( ३ ) पुल्लिं. व

बोलि.—आरवळ्, नपुंस.-अन. हे प्रत्यय सर्व क्रियापदांनां सर्वकाळीं लागतात; फक्त भविष्यकाळीं—अदु आणि—अन यांच्या बद्दल—उम् (कुम्) येतो. अकर्मक क्रियापदांनां वर्तमानकाळीं—किर (किनर), भूतकाळीं—द, न्द, किंवा इन् आणि भविष्यकाळीं व् (व्) लागतो तर सकर्मक क्रियापदांनां या काळांत अनुक्रमें किर (क्किर्), त्त् (न्द्) व प्प् हे प्रत्यय लागतात. पण यांत सुद्धां अनेक अपवाद आहेत. इतर काळ व अर्थ यांचा बोध कांहीं सहाय्यक धातू किंवा विशिष्ट प्रत्यय लागून होतो. निरनिराळे प्रत्यय लागून (उदा.–प्पि, –वि,–त्तु) प्रयोजक धातू बनतात, व नामाला पडु (पडणें) किंवा उण् (खाणें) हे साहाय्यक लागून कर्मणिप्रयोग होतो. तामिळ भाषेंत पुढील चार विशेष लक्षांत ठेवण्यासारखे आहेतः—(१) क्रियापदाचें काळ नसलेलें नकाररूप (हें अ लागून होतें); (२) इल्ले व अल्ल या दोन नकारार्थी अव्ययांची क्रियापदासारखी योजना, पाहिलें अव्यय अस्तित्व नाकबूल करतें तर दुसरें गुण किंवा सत्त्व नाकबूल करतें; (३) दोन कृदंतसंधांचा उपयोग, एक विशेषणार्थी किंवा संबंधी कृदंत व दुसरें सामान्य क्रियाविशेषणार्थी किंवा धातुसाधित कृदंत; व (४) पुरुषवाचक प्रत्यय लावून विशेषणांनां क्रियापदाचें रूप देणें, हें रूप नामाप्रमाणें चालवितां येतें. उदा. पेरिय म्हणजे मोठा; पेरियोम म्हणजे आम्हीं मोठे आहों; पेरियोमुक्कु = मोठे असणाऱ्या आम्हाला. जुन्या काव्यांतून जीं क्रियापदाचीं रूपें सांपडतात तीं ह्यातां उपयोगांतून गेलेलीं आहेत. क्रियापदांनां कांहीं विशिष्ट प्रत्यय लावून विशेषणें, क्रियाविशेषणें व भाववाचक नामें तयार करितात. परोक्ष बोलण्याची तऱ्हा (इनडायरेक्ट स्पीच) इतर भारतीय भाषाप्रमाणें याहि भाषेंत नाहीं. अवतरणें दाखविण्यासाठीं संस्कृत 'इति' प्रमाणें एन्रु योजितात. वाक्यरचना मराठीप्रमाणेंच आहे उदा. कुल्लेदेइयेइ कोन्रुपोत्तवलेइ अळेहवित्तु नी न् इप्पडि प्पट्ट शिशु-व-अत्ति शेय्दाय् एन्रु केत्तान (मूल जिनें मारिलें तिला बोलावून तूं शिशुहत्त्या कां केलीस असें त्यानें विचारलें).

लोक.—दक्षिण हिंदुस्थानांतील लोक व त्यांच्या भाषा यांनां जें 'द्रविड' असें नांव आहे त्यापासून तामिळ हा शब्द निघाला व त्याची व्युत्पत्ति द्रविड–द्रमिड–द्रमिल–दमिल-तामिळ अशा प्रकारें आहे असें बिशप काल्डवेल, डॉ. ग्रील, डॉ. गुंडर्ट वगैरे विद्वानांचें म्हणणें आहे. तामिळ लोक यूरोपीयाइतके शरीरानें मजबूत नाहींत. तथापि देखणे असतात. त्यांचें नाक शेंडेदार व वर मनोऱ्याप्रमाणें निमुळतें होत गेलेलें असतें; केंस काळे व डोळे बारीक किंवा मध्यम आकाराचे असतात; तोंड मोठें; ओंठ जाड; कपाळ क्वचित् उंच; दाढी विपुल व वर्ण काळाकुट्ट असतो. तामिळ लोकांत पुष्कळ चांगले गुण असतात, उदा. काटकसरीपणा, धिमेपणा, सोशिकपणा, सभ्यपणा वगैरे. त्यांची स्मरणशक्ति फार दांडगी असते. त्यांचे दुर्गुण म्हटले म्हणजे खोटेपणा व कामासक्तता. वेठ्या कामाची सर्वांत कमी व धाडसी कामाची सर्वांत अधिक आवड त्यांच्यामध्यें असते. जेथें कोठें पैसा मिळण्यासारखा असेल तेथें व्यापारी म्हणून किंवा मजूर किंवा घरकामे म्हणून तामिळ लोक राहिलेले आढळतात. सिलोनमधील चहा व कॉफीच्या मळ्यांत सुमारें १,५०,००० तामिळ असून, मॉरिशस बेट, वेस्ट इंडीज बेटें, ब्रह्मदेश, सयाम वगैरे देशांतहि तामिळ लोक मजूर म्हणून राहिलेले आहेत.

तामिळांमध्यें सुद्धां ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चारी वर्ण आहेतव. ब्राह्मणांत तीन वर्ग आहेत तेः—(१) अग्निदैवत, (२) काशिवारवंश (काशिवार नांवाच्या भविष्यवाद्याचा वंश; हा शिवभक्त होता). (३) परतोवासरवंश (हाहि भविष्यवादीच होता.); हे सर्व वैष्णव होते.

क्षत्रिय हे पूर्वी राज्य करीत होते. त्यांचेहि तीन वर्ग आहेत. (१) अग्निवंश, यांना सेरन म्हणत होते. हे मलेयवरचें राज्य करीत होते. पोर्तुगीज लोक त्यांस मलवार म्हणत व त्यांच्या भाषेस मलय भाषा म्हणत. (२) सूर्यवंश, यांनां चोलन म्हणत. त्यांच्या राज्यास चोलमंडल म्हणत. (पोर्तुगीज-कॉरोमांडल) यास चोलचें राज्य आणि त्यांच्या भाषेस तेलगु किंवा वडगु (उत्तरीयहि) म्हणतात. (३) चंद्रवंश; यांतील राजांनां पांड्य म्हणत. त्यांनीं मदुरेवर राज्य केलें. त्यांची भाषा हीच खरी शुद्ध आणि सुंदर तामिळ भाषा होय. तिला मलवार असेंहि नांव आहे परंतु तें योग्य नाहीं.

वैश्य श्रीमंत असून त्यांचे वर्ग तीनः—(१) कोवैश्य अथवा इडैयार, हे गुरें पाळून उपजीविका करितात. (२) तान वैश्य अथवा चेट्टी किंवा व्यापारी, हे व्यापारावर उपजीविका करितात. (३) पूवैश्य किंवा वेल्लाळर, हे शेती करतात.

वैश्यांचे जे वर तीन वर्ग सांगितले त्यांचे नोकर ते शूद्र होत. त्यांचे दोन वर्ग आहेतः-(१) घरगुती आणि (२) बाहेरील कामाकरितां. घरगुती १८ तऱ्हेचे आहेत. यांत न्हावी, धोबी, सुतार वगैरे येतात. बाहेरील कामकऱ्यांचे वर्ग २८ वर आहेत. वरील प्रत्येक जातीचें एक ठराविक बिरुद (निशाण) ठरलें आहे. म्हणजे त्यांचे हक्क आणि हत्यारें निरनिराळीं आहेत.

घरचाकरी करणाऱ्यांच्या १८ जातीः—

१ नविदर (नावियर)=न्हावी.

२ ओवेर (वान्देर), यांचें काम वैश्य लोकांचीं लग्नें व मृत्यु प्रसिद्ध करण्याचें आहे.

३ तट्टार = सोनार
४ कोल्लर = लोहार
५ तच्चर = सुतार
६ कन्नार = पितळकाम करणारा
७ कासिप्पेर = गवंडी

(३ ते ७ :) या सर्वांनां कम्माळर ही सामान्य संज्ञा आहे.

८ वलैयर = पारधी
९ पन्नर = शिंपी
१० एण्णइ वाणियर = तेली
११ शुण्णबु वाणियर ( कुण्णबु कारर ) = चुना भाजणारा
१२ उप्पु वाणियर ( उप्पु कारर ) = मीठ करणारा
१३ पूमाले कारर = फुलमाळी
१४ इल्ले वलेयर–दुर्गरक्षक
१५ वेट्टियर ( परैयर ) = ताशावाले; हे विणकामहि करतात.
१६ कोस्सेवर (कुशवर) = कुंभार; हे प्रेतासाठीं खड्डे उकरतात व प्रेतें वाहून नेतात.
१७ वीरकदियार = शंख वाजविणारे
१८ वण्णार = धोबी

बाहेरचें काम करणाऱ्यांपैकीं कांहीं जाती पुढें दिल्या आहेतः—

१ कोमट्टियर = कोमटी
२ सलपर = किरकोळ विक्री करणारे
३ आगंबादियर = हलक्या जातीचे शेतकरी
४ परवर, ५ करैयार, ६ तामिळर, ७ मुक्कुवर, ८ पत्तेनवर, ९ संपदवर, १० पळ्ळवळर } निरनिराळ्या जातींचे कोळी व मच्छिमार.
११ संदर ( शाणार ), १२ पळ्ळर, १३ नळ्ळवर } ताडी काढणारे
१४ तन्नेकन्नर, १५ मावुत्तर = महात, १६ परंवर } हस्तिरक्षक.
१७ कयकुलर, १८ शेणियर, १९ चाल्लियर( शालियर ) } कोष्टी
२० एळुत्त कारर = नितारी
२१ सयेकारर = रंगारी
२२ एलेय वाणियर = तांबोळी
२३ मरवर, २४ कुरवर, २५ वेडर } जंगली जाती
२६ शेम्मार, २७ शक्किलियर } चांभार
२८ तुरुंबर = हलक्या जातीचे धोबं

शूद्रांपैकीं ... त्यांच्या विशेष गु... पासून ... त्यांस मिळाल... यर ( ... म्हणतात. ... इदन्येय ... ) म्हणता...

जफनापत्तम् प्रान्तामध्यें तीन जाती आहेतः—(१) मदपल्ले–तेथील राजांच्या रखेलींचे वंशज; यांनां मदपल्ली ( स्वयंपाकघर ) म्हणत. कारण रखेल्यांचें काम थाढणें वगैरेंचें असे. ( २ ) मलवालर-हे एक वेल्लाळरच, पण मलवारच्या राज्यांतून आलेले होत. ( ३ ) परेदेसर--यांपैकीं कांहीं परदेशचे व कांहीं गुलामगिरींतून मुक्त झालेले होत. यांच्याबद्दल खात्रीनें कांहीं सांगता येत नाहीं.

पूर्वी जेव्हां सीलोन बेट ओसाड होतें त्यावेळेस चोलमहल ( कारोमंडल ) च्या राजाचा पुत्र सिंहकुमार आपले अम्मलदार व कांहीं दुसरे राजपुत्र यांसह नहाजांतून आला आणि तेथील हवेनें व सुपीकतेनें खुष होऊन त्यानें तेथेंच आपलें राज्य स्थापण्याचें ठरविलें. नंतर पत्रानें, पांड्यमंडलम् ( मदुरा ) च्या चंद्रवंशीय राजास निरनिराळीं कुटुंबें तेथें वस्तीकरितां पाठविण्याची त्यानें विनंति केली आणि त्याच्या मुलीसहि मागणी घातली, ती राजानें तावडतोब कबूल केली, आणि मुलीबरोबर बराच लवाजमा त्यानें पाठविला. नंतर त्यांचें थाटानें लग्न झालें आणि त्यांनां तेथें राज्याभिषेक झाला. तेव्हांपासून तेथील राजे मदुरेच्या चंद्रवंशीय राजांच्याच मुली करतात. राजाची भाषा तेलुंग (किंवा तेलिंग) आणि राणीची तामिळ असल्यामुळें दोन्हींची मिसळ होऊन तिसरीच एक भाषा तयार झाली आणि लग्नामुळें दोन लोकांचें मिश्रण होऊन तिसरे लोक झाले त्यांस सिंगकुमारम् किंवा सिंगली म्हणतात. तसेंच मदुरेच्या राजकन्येनें आणि तिच्या बरोबरच्या लोकांनीं बुद्धाची पूजा इकडेहि चालू केली. ही सर्व, राजपुत्र व त्याच्या लग्नाची हकीकत राजरत्नकरी राजनीति, राजवली वगैरे सिंगली ग्रंथांमध्यें आहे; तशाच कांहीं निरनिराळ्या गोष्टी प्रचलित आहेत त्यांत ही गोष्ट आहे.

ता मि ळ व आ र्य न सं स्कृ ति.—तामिळ देशाचा प्राचीन इतिहास अद्याप उपलब्ध झालेला नाहीं. या देशांत राहणारे अत्यंत प्राचीन रहिवाशी ओशियानियांतील रहाणाऱ्या निग्रो जातीपैकीं होते, असें कांहींजण मानतात. तथापि हें अद्याप सिद्ध झालेलें नाहीं. तामिळ लोकांपूर्वी त्यांच्या देशांत रहात असलेल्या लोकांसंबंधींच्या कोणत्याहि प्रकारच्या दंतकथा तामिळ लोकांत प्रचलित नाहींत. डॉ. कॉल्डवेल यांचें मत असें आहे कीं, तामिळ वाङ्मयांतील सर्वांत जुने लेख ख्रिस्ती शकाच्या ८ व्या शतकाच्या पूर्वीचे नाहींत. त्या देशांत पुराणें म्हणून जे ग्रंथ आहेत त्यांत हीं प्राचीन काळापासूनचा इतिहास सांगण्याचा प्रयत्न आहे. पण वास्तविक त्यांत बालिश दंतकथांखेरीज महत्त्वाची माहिती नाहीं. रामायण आणि मनु... या ग्रंथांत असा उल्लेख आहे कीं, कारोमांडल ... " म्लेच्छ " लोक रहातात व ते ... व्यत्यय करतात. तामिळ भाषेचें ... लीन द्राविड लोकांच्या संस्कृती... ल अनुमानें काढलीं आहेतः—

"या लोकांवर राज्य करणारे राजे असत ते तटबंदी केलेल्या वाड्यांत रहात; प्रत्येक राजाचें राज्य लहानशा प्रदेशावरच असे; त्या लोकांनां ग्रंथ माहीत नव्हते; इतकेंच नव्हे तर लिहिण्याची कोणती लिपीहि त्यांनां माहीत नसावी. पण त्यांच्यामध्यें भाट लोक असत व ते मोठया उत्सवाच्या प्रसंगीं कवनें म्हणून दाखवीत; त्यांनां जस्त व कथील यांखेरीज नेहमींच्या उपयोगांतल्या सर्व धातू माहीत होत्या; तसेंच त्यांनां प्राचीन लोकांनां माहीत असलेले आकाशांतील ग्रह, बुध व शनि खेरीजकरून माहीत होते; त्यांनां संख्या १०० पर्यंत व त्यांच्यापैकीं कित्येकांनां हजारापर्यंत माहीत होती, पण त्याच्यापुढें लक्ष व कोटी या संख्यांबद्दल त्यांनां ज्ञान नव्हतें. रोगांवरील औषधेंहि त्यांनां माहीत होतीं पण वैद्यकशास्त्र किंवा धंदेवाले वैद्य यांच्यामध्यें नव्हते. ते लोक लहानसहान गांवांतून रहात असत, व लहानसहान होड्या तयार करीत असत. त्यावेळीं मोठालीं शहरें नव्हतीं, मोठालीं जहाजें दांधून समुद्रावर दूरच्या देशाशीं व्यापार करण्याइतकी प्रगति त्यांच्यांमध्यें झाली नव्हती. सिलोनशीं मात्र त्यांचें दळणवळण असे. कारण त्यावेळीं तेथें खोल समुद्र नसून पायीं जातां येण्यासारखें उथळ पाणी असावें असें वाटतें. बेट किंवा खंड हे भौगोलिक संज्ञादर्शक शब्द त्यांनां माहीत नव्हते. शेतकीचें ज्ञान त्यांनां होतें; युद्धानेंहि ते शोकी असत; कापड विणणें, त्याला रंग देणें, या व जीविताला अवश्य असणाऱ्या इतर सामान्य कला त्यांनां माहीत होत्या. पण चित्रकला, शिल्पकला किंवा खोदकाम तसेंच ज्योतिषशास्त्र, फलज्योतिष, तत्वज्ञान, व्याकरण वगैरे कोणत्याहि प्रकारची विद्या त्यांच्या मध्यें नव्हती. त्यांची बौद्धिक प्रगति किती झाली होती हें बौद्धिक व्यापारासंबंधानें त्यांच्या भाषेतील शब्दांवरून स्पष्ट होतें. 'विचार' याला शब्द त्यांच्यामध्यें होता, परंतु स्मरणशक्ति, सदसद्विवेकबुद्धि, इच्छा वगैरे बौद्धिक किंवा मानसिक व्यापार दर्शविणारे शब्द त्यांच्या भाषेत नव्हते."

बायबलाच्या पूर्वार्धात (ओल्ड टेस्टॅमेंट) आणि ग्रीक व रोमन लेखकांच्या ग्रंथांत द्राविडीभाषेंतील लोक, त्यांचीं रहाण्याचीं ठिकाणें, प्राणी व पदार्थवाचक शब्दांसारखे शब्द सांपडतात. यांवरून कांहीं द्राविडी भाषा फार जुनी असली पाहिजे हें निःसंशय सिद्ध होतें. तसेंच कांहीं द्राविडी शब्द रामायण व महाभारत या ग्रंथांत सांपडतात. वैदिक वाङ्मयांत मात्र द्राविडी शब्द मुळींच आढळत नाहींत असें मॅक्समुल्लर म्हणतो. आर्य लोक हिंदुस्थानांत आले तेव्हां उत्तरहिंदुस्थानांतलि मूळच्या लोकांबरोबर त्यांचीं घनघोर युद्धें झालीं. पण दक्षिण हिंदुस्थानांतलि लोकांबरोबर आर्य लोकांनां युद्धें करावीं लागलीं असाबद्दलचा पुरावा नाहीं. द्राविडी व आर्य या दोन समाजांच्या मिश्रणासंबंधानें डॉ. कॉल्डवेल म्हणतोः—

"हिंदूंच्या चातुर्वर्ण्ययुक्त समाजांत द्राविडी लोकांचा जो समावेश झाला व त्यांनां म्लेंछ याच्याऐवजीं शूद्र हें जें नामाभिदान प्राप्त झालें ती गोष्ट घडून येण्याला आर्य लोकांनां युद्ध करावें लागलें नाहीं, तर ती आर्य लोकांनीं स्वतःच्या संस्कृतीचा आणि वसाहतींचा अधिकाधिक फैलाव दक्षिण हिंदुस्थानांत केल्यामुळें हळू हळू पूर्ण शांततेच्या मार्गानेंच घडून आली. आज तामिळ लोकांमध्यें ब्राह्मणवर्गाला जो मान आहे आणि पूर्वपरंपरेच्या निदर्शक अशा ज्या गोष्टी हल्लीं अस्तित्वांत आहेत त्यांवरून असें स्पष्ट दिसतें कीं, आर्य लोकांनीं द्राविडी लोकांवर आपलें जें वर्चस्व स्थापिलें तें केवळ आपल्या बुद्धिप्रभावानें आणि राज्यकारभारविषयक कौशल्यानेंच होय, युद्धमार्गानें नव्हे."

उत्तरेकडील प्राचीन संस्कृत वाङ्मयामध्यें व्यास या ग्रंथकाराचा मोठा दर्जा आहे. पण दक्षिण हिंदुस्थानांत व्यासाइतकीच मोठी योग्यता अगस्ति ऋषीला मिळालेली आहे. ऋग्वेद ग्रंथांत अगस्ति ऋषीचें नांव आहे पण त्याच्या संबंधीच्या तामिळ वाङ्मयांतील सर्व कथा रामायण व महाभारतामधून घेतलेल्या आहेत. अगस्ति ऋषीसंबंधानें डॉ. कॉल्डवेलचें म्हणणें पुढीलप्रमाणें आहेः—

"उत्तर हिंदुस्थानांतून आर्य लोकांची जी मोठी टोळी दक्षिणेकडे वसाहत करण्याकरितां गेली तिचा पुढारी अगस्ति ऋषि होता. उत्तर हिंदुस्थानांत अगस्ति हा एक ऋषींमधील नांवाजलेला ऋषि होता. पण दक्षिणहिंदुस्थानांत द्राविडी लोकांमध्यें शास्त्रें व वाङ्मय यांचा अगदीं आद्य गुरु म्हणून त्याला फारच पूज्य मानतात. त्यानें वाटेंतील विंध्य वगैरे विकट पर्वतांतूनहि वाट काढून थेट केपकामोरीनपर्यंत प्रवास केला. 'तामीरमुनि' असें अत्यंत उच्चतादर्शक नांव त्याला दिलेलें आढळतें. पहिला पांड्य राजा कुलशेखर याच्या दरबारीं त्याचें मोठें वजन होतें आणि अगस्तीनें आपल्या या शिष्याला ज्ञानप्राप्ति करून देण्याकरितां प्राथमिक स्वरूपाचे विविध विषयांवर अनेक ग्रंथ लिहिले. त्या ग्रंथांमध्यें अर्थातच त्याचा व्याकरणविषयक ग्रंथ फार प्रसिद्धि पावला. अगस्ति ऋषीबद्दल द्राविडी लोकांचा पूज्य भाव इतका वाढला कीं, आकाशामधील एका ठळक ताऱ्याची (कॅनोपस) अगस्ति ऋषीचा तारा उर्फ अगस्तीश्वर म्हणून केपकामोरीननजीकचे लोक पूजा करू लागले. जुन्या मताचे बरेचसे हिंदू लोक अगस्ति ऋषी अद्याप जिवंत आहे पण तो अदृश्य स्वरूपांत वास करतो, व त्याचें रहाण्याचें ठिकाण अगस्त्याची टेंकडी—('अगस्त्यमलै' पहा) ज्या ठिकाणाहून ताम्रपर्णी नांवाची तिनेवेल्लीकडील पवित्र नदी उगम पावते ती टेंकडी–आहे असें मानतात."

वास्तविक पाहतां अगस्तिऋषीच्या नांवावर जे अनेक ग्रंथ मोडतात त्यांपैकीं एकहि खुद्द त्यानें लिहिलेला नाहीं. त्यांपैकीं एकतर इतका अलीकडला आहे कीं, त्यामध्यें एका रोगाचें नांव दिलें आहे तें यूरोपियन भाषेंतील नांवावरून बनलेलें

८ वल्लैयर = पारधी
९ पन्नर = शिंपी
१० एण्णइ वाणियर = तेली
११ शुण्णवु वाणियर ( कुण्णवु कारर ) = चुना भाजणारा
१२ उप्पु वाणियर ( उप्पु कारर ) = मीठ करणारा
१३ पूमालै कारर = फुलमाळी
१४ इल्ले वलेयर–दुर्गरक्षक
१५ वेट्टियर ( परैयर ) = ताशावाले; हे विणकामहि करतात.
१६ कोस्सेवर (कुशवर) = कुंभार; हे प्रेतासाठीं खड्डे उकरतात व प्रेतें वाहून नेतात.
१७ वीरकादियार = शंख वाजविणारे
१८ वण्णार = धोबी

बाहेरचें काम करणाऱ्यांपैकीं कांहीं जाती पुढें दिल्या आहेतः—

१ कोमट्टियर = कोमटी
२ सलपर = किरकोळ विक्री करणारे
३ आगंबादियर = हलक्या जातीचे शेतकरी
४ परवर
५ करैयार
६ तामिळर
७ मुकुवर
८ पत्तेनेवर
९ संपदेवर
१० पलेवल्लर
[४–१० : निरनिराळ्या जातींचे कोळी व मच्छिमार.]
११ संदर ( शाणार )
१२ पळ्ळर
१३ नळवर
[११–१३ : ताडी काढणारे]
१४ तन्नेकन्नर
१५ मावुत्तर = महात
१६ परंवर
[१४–१६ : हस्तिरक्षक.]
१७ कयकुलर
१८ शेणियर
१९ चाल्लियर( शालियर )
[१७–१९ : कोष्टी]
२० एलुत्त कारर = चितारी
२१ सयेकारर = रंगारी
२२ एलेय वाणियर = तांबोळी
२३ मरवर
२४ कुरवर
२५ वेडर
[२३–२५ : जंगली जाती]
२६ शेम्मार
२७ शक्किलियर
[२६–२७ : चांभार]
२८ तुरुंबर = हलक्या जातीचे धोबी

शूद्रांपैकीं ज्यांना त्यांच्या विशेष गुणामुळें पूर्वीच्या क्षत्रियांपासून उच्च दर्जा व हत्यारें मिळालीं होतीं त्यांना वलंकैयर ( उजव्या हाताचे ) म्हणतात. परंतु बाकी सर्व शूद्रांना इदन्कैयर ( डाव्या हाताचे ) म्हणतात. वरील जातीशिवाय जफनापत्तम् प्रान्तामध्यें तीन जाती आहेतः—(१) मदपल्ले–तेथील राजांच्या रखेलींचे वंशज; यांना मदपल्ली ( स्वयंपाकघर ) म्हणत. कारण रखेल्यांचें काम वाढणें वगैरेचें असे. ( २ ) मलवाल्लर-हे एक वेल्लाळरच, पण मलवारच्या राज्यांतून आलेले होत. ( ३ ) परदेसर--यांपैकीं कांहीं परदेशचे व कांहीं गुलामगिरींतून मुक्त झालेले होत. यांच्याबद्दल खात्रीनें कांहीं सांगता येत नाहीं.

पूर्वी जेव्हां सीलोन बेट ओसाड होतें त्यावेळेस चोलमंडल ( कारोमंडल ) च्या राजाचा पुत्र सिंहकुमार आपले अम्मलदार व कांहीं दुसरे राजपुत्र यांसह महाजांतून आला आणि तेथील हवेनें व सुपीकतेनें खुष होऊन त्यानें तेथेंच आपलें राज्य स्थापण्याचें ठरविलें. नंतर पत्रानें, पांड्यमंडलम् ( मदुरा ) च्या चंद्रवंशीय राजास निरनिराळीं कुटुंबें तेथें वस्तीकरितां पाठविण्याची त्यानें विनंति केली आणि त्याच्या मुलीसहि मागणी घातली, ती राजानें तावडतोब कबूल केली, आणि मुलीबरोबर बराच लवाजमा त्यानें पाठविला. नंतर त्यांचें थाटानें लग्न झालें आणि त्यांना तेथें राज्याभिषेक झाला. तेव्हांपासून तेथील राजे मदुरेच्या चंद्रवंशीय राजांच्याच मुली करतात. राजाची भाषा तेलुंग (किंवा तेलिंग) आणि राणीची तामिळ असल्यामुळें दोन्हींची मिसळ होऊन तिसरीच एक भाषा तयार झाली आणि लग्नामुळें दोन लोकांचें मिश्रण होऊन तिसरे लोक झाले त्यांस सिंगकुमारम् किंवा सिंगली म्हणतात. तसेंच मदुरेच्या राजकन्येनें आणि तिच्या बरोबरच्या लोकांनीं बुद्धाची पूजा इकडेहि चालू केली. ही सर्व, राजपुत्र व त्याच्या लग्नाची हकीकत राजरत्नकरी राजनीति, राजवली वगैरे सिंगली ग्रंथांमध्यें आहे; तशाच कांहीं निरनिराळ्या गोष्टी प्रचलित आहेत त्यांत ही गोष्ट आहे.

ता मि ळ व आ र्य न सं स्कृ ति.—तामिळ देशाचा प्राचीन इतिहास अद्याप उपलब्ध झालेला नाहीं. या देशांत राहणारे अत्यंत प्राचीन रहिवाशी ओशियानियांतील रहाणाऱ्या निग्रो जातीपैकीं होते, असें कांहींजण मानतात. तथापि हें अद्याप सिद्ध झालेलें नाहीं. तामिळ लोकांपूर्वी त्यांच्या देशांत रहात असलेल्या लोकांसंबंधीच्या कोणत्याहि प्रकारच्या दंतकथा तामिळ लोकांत प्रचलित नाहींत. डॉ. कॉल्डवेल यांचें मत असें आहे कीं, तामिळ वाङ्मयांतील सर्वांत जुने लेख खिस्ती शकाच्या ८ व्या शतकाच्या पूर्वींचे नाहींत. त्या देशांत पुराणें म्हणून जे ग्रंथ आहेत त्यांत अगदीं प्राचीन काळापासूनचा इतिहास सांगण्याचा प्रयत्न केला आहे. पण वास्तविक त्यांत बालिश दंतकथांखेरीज अधिक महत्त्वाची माहिती नाहीं. रामायण आणि मनुस्मृति या ग्रंथांत असा उल्लेख आहे कीं, कारोमांडल किनाऱ्यावर नरभक्षक “ म्लेंच्छ ” लोक रहातात व ते ऋषींच्या तपाचरणाला व्यत्यय करतात. तामिळ भाषेचें परीक्षण करून आर्यपूर्वकालीन द्राविड लोकांच्या संस्कृतीबद्दल डॉ. कॉल्डवेलनें पुढील अनुमानें काढलीं आहेतः—

" या लोकांवर राज्य करणारे राजे असत ते तटबंदी केलेल्या वाड्यांत रहात; प्रत्येक राजाचें राज्य लहानशा प्रदेशावरच असे; त्या लोकांनां ग्रंथ माहीत नव्हते; इतकेंच नव्हे तर लिहिण्याची कोणती लिपीहि त्यांनां माहीत नसावी. पण त्यांच्यामध्यें भाट लोक असत व ते मोठया उत्सवाच्या प्रसंगीं कवनें म्हणून दाखवीत; त्यांनां जस्त व कथील यांखेरीज नेहमींच्या उपयोगांतल्या सर्व धातू माहीत होत्या; तसेंच त्यांनां प्राचीन लोकांनां माहीत असलेले आकाशांतील ग्रह, बुध व शनि खेरीजकरून माहीत होते; त्यांनां संख्या १०० पर्यंत व त्यांच्यापैकीं कित्येकांनां हजारापर्यंत माहीत होती, पण त्याच्यापुढें लक्ष व कोटी या संख्यांबद्दल त्यांनां ज्ञान नव्हतें. रोगांवरील औषधेंहि त्यांनां माहीत होतीं पण वैद्यकशास्त्र किंवा धंदेवाले वैद्य यांच्यामध्यें नव्हते. ते लोक लहानसहान गांवांतून रहात असत, व लहानसहान होड्या तयार करीत असत. त्यावेळीं मोठालीं शहरें नव्हतीं, मोठालीं जहाजें बांधून समुद्रावर दूरच्या देशाशीं व्यापार करण्याइतकी प्रगति त्यांच्यामध्यें झाली नव्हती. सिलोनशीं मात्र त्यांचें दळणवळण असे. कारण त्यावेळीं तेथें खोल समुद्र नसून पायीं जातां येण्यासारखें उथळ पाणी असावें असें वाटतें. बेट किंवा खंड हे भौगोलिक संज्ञादर्शक शब्द त्यांनां माहीत नव्हते. शेतकीचें ज्ञान त्यांनां होतें; युद्धाचेहि ते शोकी असत; कापड विणणें, त्याला रंग देणें, या व जीविताला अवश्य असणाऱ्या इतर सामान्य कला त्यांनां माहीत होत्या. पण चित्रकला, शिल्पकला किंवा खोदकाम तसेंच ज्योतिषशास्त्र, फलज्योतिष, तत्त्वज्ञान, व्याकरण वगैरे कोणत्याहि प्रकारची विद्या त्यांच्यामध्यें नव्हती. त्यांची बौद्धिक प्रगति किती झाली होती हें बौद्धिक व्यापारासंबंधानें त्यांच्या भाषेतील शब्दांवरून स्पष्ट होतें. ' विचार ' याला शब्द त्यांच्यामध्यें होता, परंतु स्मरणशक्ति, सदसद्विवेकबुद्धि, इच्छा वगैरे बौद्धिक किंवा मानसिक व्यापार दर्शविणारे शब्द त्यांच्या भाषेत नव्हते."

बायबलाच्या पूर्वार्धांत (ओल्ड टेस्टॅमेंट) आणि ग्रीक व रोमन लेखकांच्या ग्रंथांत द्राविडीभाषेंतील लोक, त्यांचीं रहाण्याचीं ठिकाणें, प्राणी व पदार्थवाचक शब्दांसारखे शब्द सांपडतात. यांवरून कांहीं द्राविडी भाषा फार जुनी असली पाहिजे हें निःसंशय सिद्ध होतें. तसेंच कांहीं द्राविडी शब्द रामायण व महाभारत या ग्रंथांत सांपडतात. वैदिक वाङ्मयांत मात्र द्राविडी शब्द मुळींच आढळत नाहींत असें मॅक्समुल्लर म्हणतो. आर्य लोक हिंदुस्थानांत आले तेव्हां उत्तरहिंदुस्थानांतील मूळच्या लोकांबरोबर त्यांचीं घनघोर युद्धें झालीं. पण दक्षिण हिंदुस्थानांतील लोकांबरोबर आर्य लोकांनां युद्धें करावीं लागलीं अशाबद्दलचा पुरावा नाहीं. द्राविडी व आर्य या दोन समाजांच्या मिश्रणासंबंधानें डॉ. कॉल्डवेल म्हणतोः—

" हिंदूंच्या चातुर्वर्ण्ययुक्त समाजांत द्राविडी लोकांचा जो समावेश झाला व त्यांनां म्लेंछ याच्याऐवजीं शूद्र हें जें नामाभिधान प्राप्त झालें ती गोष्ट घडून येण्याला आर्य लोकांनां युद्ध करावें लागलें नाहीं, तर ती आर्य लोकांनीं स्वतःच्या संस्कृतीचा आणि वसाहतींचा अधिकाधिक फैलाव दक्षिण हिंदुस्थानांत केल्यामुळें हळू हळू पूर्ण शांततेच्या मार्गानेंच घडून आली. आज तामिळ लोकांमध्यें ब्राह्मणवर्गाला जो मान आहे आणि पूर्वपरंपरेच्या निदर्शक अशा ज्या गोष्टी हल्लीं अस्तित्वांत आहेत त्यांवरून असें स्पष्ट दिसतें कीं, आर्य लोकांनीं द्राविडी लोकांवर आपलें जें वर्चस्व स्थापिलें तें केवळ आपल्या बुद्धिप्रभावानें आणि राज्यकारभारविषयक कौशल्यानेंच होय, युद्धमार्गानें नव्हे."

उत्तरेकडील प्राचीन संस्कृत वाङ्मयामध्यें व्यास या ग्रंथकाराचा मोठा दर्जा आहे. पण दक्षिण हिंदुस्थानांत व्यासाइतकीच मोठी योग्यता अगस्ति ऋषीला मिळालेली आहे. ऋग्वेद ग्रंथांत अगस्ति ऋषींचें नांव आहे पण त्याच्या संबंधीच्या तामिळ वाङ्मयांतील सर्व कथा रामायण व महाभारतामधून घेतलेल्या आहेत. अगस्ति ऋषीसंबंधानें डॉ. कॉल्डवेलचें म्हणणें पुढीलप्रमाणें आहेः—

" उत्तर हिंदुस्थानांतून आर्य लोकांची जी मोठी टोळी दक्षिणेकडे वसाहत करण्याकरितां गेली तिचा पुढारी अगस्ति ऋषि होता. उत्तर हिंदुस्थानांत अगस्ति हा एक ऋषींमधील नांवाजलेला ऋषि होता. पण दक्षिणहिंदुस्थानांत द्राविडी लोकांमध्यें शास्त्रें व वाङ्मय यांचा अगदीं आद्य गुरु म्हणून त्याला फारच पूज्य मानतात. त्यानें वाटेंतील विंध्य वगैरे विकट पर्वतांतूनहि वाट काढून थेट केपकामोरीनपर्यंत प्रवास केला. ' तामीरमुनि ' असें अत्यंत उच्चतादर्शक नांव त्याला दिलेलें आढळतें. पहिला पांड्य राजा कुलशेखर याच्या दरबारीं त्याचें मोठें वजन होतें आणि अगस्तीनें आपल्या या शिष्याला ज्ञानप्राप्ति करून देण्याकरितां प्राथमिक स्वरूपाचे विविध विषयांवर अनेक ग्रंथ लिहिले. त्या ग्रंथांमध्यें अर्थातच त्याचा व्याकरणविषयक ग्रंथ फार प्रसिद्धि पावला. अगस्ति ऋषीबद्दल द्राविडी लोकांचा पूज्य भाव इतका वाढला कीं, आकाशामधील एका ठळक ताऱ्याचीं ( कॅनोपस ) अगस्ति ऋषीचा तारा उर्फ अगस्तीश्वर म्हणून केपकामोरीनजवळचे लोक पूजा करू लागले. जुन्या मताचे बरेचसे हिंदू लोक अगस्ति ऋषी अद्याप जिवंत आहे पण तो अदृश्य स्वरूपांत वास करतो, व त्याचें रहाण्याचें ठिकाण अगस्त्याची टेंकडी—( ' अगस्त्यमले' पहा ) ज्या ठिकाणाहून ताम्रपर्णी नांवाची तिनेवेल्लीकडील पवित्र नदी उगम पावते ती टेंकडी—आहे असें मानतात."

वास्तविक पाहतां अगस्तिऋषीच्या नांवावर जे अनेक ग्रंथ मोडतात त्यांपैकीं एकहि खुद्द त्यानें लिहिलेला नाहीं. त्यांपैकीं एकतर इतका अलीकडला आहे कीं, त्यामध्यें एका रोगानें नांव दिलें आहे तें यूरोपियन भाषेतील नांवावरून घ...

आहे. या ग्रंथांचें कर्तृत्व अगस्ति ऋषीकडे देण्याचें कारण हें कीं त्या ग्रंथांना महत्त्व प्राप्त व्हावें. द्राविड देशांतील स्थानिक पुराणांत मदुरा येथील राजांच्या नांवांच्या ज्या लांबलांब याद्या दिलेल्या आहेत त्या सर्व काल्पनिक आहेत असें डॉ. कॉल्डवेल उपलब्ध असलेल्या खोदलेखांच्या पुराव्यावरून म्हणतो.

मदुरा विद्यापीठ.—पांड्य घराण्यांतले बरेचसे राजे विद्येचे आश्रयदाते होते. तत्कालीन कवी या राजांच्या दरबारांत कविता म्हणून दाखवीत व मोठमोठीं बक्षिसें मिळवीत. वंशशेखरानें तामिळ भाषेच्या व वाङ्मयाच्या वृद्धीकरितां मदुरा विद्यापीठ स्थापिलें असें म्हणतात, व त्याचा मुलगा वंशचुरमणी यानें त्या पीठाला चांगली मदत केली. मदुरा येथील विद्यापीठ त्या काळीं हिंदुस्थानांत फार प्रसिद्ध होतें. विक्रमादित्याच्या दरबारांत ९ विद्वद्रत्नें होतीं असें म्हणतात. पण मदुरा पीठामध्यें विद्वानांची संख्या त्याच्या पांचपट होती. मदुरा विद्यापीठानें तामिळ वाङ्मयाची फार वाढ केली. पण या विद्यापीठांत पुढें तेथील अध्यापक व वैष्णव पंथी उपदेशक यांच्यांमध्यें भांडण सुरू झालें व तें संस्कृत व तामिळ या दोन भाषांच्या आपसांतील वर्चस्वाबद्दल होतें आणि अखेर या भांडणामुळेंच मदुरा येथील विद्यापीठ बंद पडलें.

जैन विद्वानांची कामगिरी.—पांड्य राजांच्या वेळीं जैन लोकांचें प्राबल्य तामिळ देशांत बरेंच होतें. हे लोक ब्राह्मणद्वेष्टे असत. यांनींच तामिळ भाषा संस्कृतपासून शक्य तितकी अलिप्त राखून तामिळ ग्रंथांची वृद्धि करण्याचें श्रेय आहे. जैन विद्वानांनीं लिहिलेले पुढील १८ ग्रंथ मदुराविद्यापीठानें मान्य केले होते.(१) नलदीयर, (२)नन्मणीकदीकयी, (३)इनियवईनर्पतु,(४)इन्ननर्पतु,(५)करनर्पतु,(६)कल्लवलीनर्पतु, (७–११) तोकई,(१२)कूरल,(१३) तिरिकदुकम, (१४)असरकोवई,(१५)पलमोली,(१६)सिरूपंसमूलं,(१७) मुतुमोलीकंजी, व (१८) एलती. जैन ग्रंथकारांचें वर्चस्व खिस्तोत्तर ८ किंवा ९ ते १२ किंवा १३व्या शतकापर्यंत होतें. मार्कोपोलोनें हिंदुस्थानला भेट दिली त्या सुमारास राज्य करीत असलेल्या सुंदरपांडिय नांवाच्या राजाच्या कारकीर्दीत जैन विद्वानांना पांड्य राजांच्या देशांतून हद्दपार करण्यांत आलें. यावरून जैन पंथाचा पुरस्कार करणारे तामिळ भाषेंतील ग्रंथ १३ व्या शतकापूर्वी लिहिले गेले असले पाहिजेत. तोलकप्पयम् या नांवाचा व्याकरणग्रंथ उपलब्ध असलेल्या सर्व तामिळ ग्रंथांत सर्वांहून जुना आहे. तो ८ व्या शतकांत लिहिलेला असावा. त्या ग्रंथांत जे उतारे दिलेले आहेत ते अर्थात् त्याहूनहि जुन्या ग्रंथांतले असले पाहिजेत. जैन लोकांनीं लिहिलेल्या ग्रंथांपैकीं चिंतामणि ( १५००० ओळींचा ) हा अत्यंत प्रसिद्ध ग्रंथ आहे( 'जीवकचिंतामणि' पहा ). हा ९ व्या शतकांतील असावा. नन–नुल हा व्याकरणग्रंथ चांगला असून तो चिंतामणीनंतरचा आहे. रामायणाचें तामिळमध्यें जें भाषांतर झालेलें आहे तें ११ व्या शतकांतलें असावें असें डॉ. कॉल्डवेलचें मत आहे.

**तामिळ वाङ्मय**, प्राचीन.—पाश्चात्य पंडितांच्या मतें इ. सनाच्या नवव्या शतकापूर्वी तामिळ वाङ्मय मुळींच अस्तित्वांत नव्हतें. पण श्री. कनकसभेच्या मताप्रमाणें वस्तुस्थिति अशी दिसते कीं, तामिळांचें स्वतंत्र व उत्कृष्ट असें वाङ्मय नवव्या शतकापूर्वीच लिहिलें गेलें होतें, व त्यानंतरचें वाङ्मय म्हणजे बव्हंशीं संस्कृत ग्रंथांचें रूपांतर व अंधानुकरण आहे असें म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. याचा अर्थ कनकसभेस कांहीं अगदीं निराळे ग्रंथ सांपडले असा नाहीं तर कांहीं ग्रंथकारांस तो खिस्तपूर्व काळापासून नवव्या शतकापर्यंत घालतो व इतर अभ्यासक या कवींस बरेच अर्वाचीन समजतात. प्राचीन तामिळ काव्यांचा मननपूर्वक अभ्यास करितां असें दिसून येणार आहे कीं, कांहीं जुनाट ग्रंथ दोन हजार वर्षांपेक्षांहि जास्त पाठीमागचे असून त्या प्राचीन काळीं तामिळांचें अरब, ग्रीक, रोमन आणि जाव्हानी यांसारख्या राष्ट्रांशीं व्यापारी दळणवळण असल्याकारणानें तामिळ लोक संपत्तिमान व सुसंस्कृत होते. भौतिक उत्कर्षाच्या विकासाबरोबर वाङ्मयीन चळवळीलाहि एकदम उत्तेजन मिळालें. तामिळी वाङ्मयाचा अत्युत्कृष्ट काळ खिस्तशकाच्या पहिल्या शतकांतला होय; आणि उग्रपाण्डय या तामिळ राजाच्या दरबारीं मदुरेस भरलेलें कविसंम्मेलन शेवटचें होय. या काळांतील पन्नासाहून ज्यास्त कवींच्या कृती आज आपल्यापर्यंत आल्या आहेत हे कवी अनेक भिन्न भिन्न जातींचे, धर्मांचे व तामिळ देशांतील निरनिराळ्या भागांतील आहेत. यांत कांहीं निर्ग्रंथ आहेत, कांहीं बौद्ध आहेत, तर कांहीं ब्राह्मणी धर्माचे आहेत. त्यांच्यांत राजे, आचार्य, व्यापारी, वैद्य, शेतकरी आणि कारागीर असे अनेक पेशाचे लोक आहेत. या देशाचा प्राचीन इतिहास अंधकार व अनिश्चितता यांनीं बराच आवृत आहे तरी एकाच काळांतील इतक्या अनेक कवींचे ग्रंथ, त्यांवर इष्टप्रकाशाचा मोठा झोत पाडतात यांत संशय नाहीं.

प्राचीन काव्यग्रंथ ( स. ५०—१५० पर्यंतच्या काळांतील ):—मुप्पाल किंवा कुरल, मणि–मेखलाइ, व शिल्प-अधिकारम् या काव्यग्रंथांशिवाय या काळांतील दुसरा एक विशेष नामनिर्देश करण्याजोगा ग्रंथ म्हणजे "कलिय–थोकई" होय. यांत कलि छंदांतलीं १५० प्रेमगीतें मदुरेंतील नल्लन्धुवनर नांवाच्या एका तामिळी पंडितानें संकलित केलेलीं आहेत. या गीतांचे निर्माते दिले नाहींत, तथापि यांतील विविध पद्यरचना व विषय पाहिले असतां हीं सर्व गीतें एका माणसाचीं नाहींत असें लागलीच दिसून येतें. गीतें बव्हंशीं संवादात्मक असून, वक्ते बहुधा एक युवती, तिची दासी आणि तिचा प्रियकर दिसतात. या गीतांतून शुद्ध व पवित्र प्रेम उत्तम तऱ्हेनें दिग्दर्शित केलें असून, पुढील काळांतील तामिळ शृंगारिक

पद्यांत दिसून येणारा अश्लीलपणा व ग्राम्य शृंगार यांत कोठें सांपडत नाहीं. यांतील प्रेम-दृश्यें तामिळांतील स्त्रीपुरुषसंबंध, आणि अनुनय व विवाह यांसंबंधींची त्यांची विशिष्ट तऱ्हा अगदीं हुबेहूब आपणांसमोर ठेवितात. यांपैकीं कांहीं दृश्यें पुढें मांडिलीं आहेतः—शिकारीला जात असलेल्या एका युवकाला राईंत झोल्यावर झोके घेत बसलेली, किंवा ओढ्यावर अंग धूत असलेली अथवा शेतांत माळ्यावर बसून पाखरें हांकीत असलेली एक कुमारिका आढळून येते व तिच्या सौंदर्याला मोहित होऊन शिकारीचा पाठलाग करण्याच्या निमित्तानें तो वारंवार त्या ठिकाणीं येतो. जर तिच्या डोळ्यांत तो भरला तर ती त्याला आपल्या घरीं भेटूं देते, आपल्याबरोबर लाय फिरावयास येऊं देते, नदीत जाण्यास त्याची सोबत घेते, इतकेंच काय पण आपल्या मंडन (वेणी-फणी वगैरे) कार्यांत त्याची मदत स्वीकारते व शेवटीं तो तिच्याशीं लग्न लावितो. पण जेव्हां ती युवती फार भिडस्त असल्याकारणानें आपल्या अनुनयाला थारा देत नाहीं तेव्हां तो तिच्या दासीशीं बोलणें लावितो, तिच्या (दासीच्या) मालकिणीच्या अतुल सौंदर्याची तारीफ करतो, आणि एकदां तिची गांठ घालून देण्याबद्दल त्या दासीच्या हातापायां पडतो. नंतर ती दासी यजमानिणीजवळ हळूच बोलणें काढून, मोठ्या अभिमानानें तिच्यावर मोहित झालेल्या त्या तरुण व सुंदर तिऱ्हाइताच्या उदात्त चेहऱ्याचें वर्णन करते. तेव्हां हें प्रणयी जोडपें गांवाबाहेरच्या राईंत संमीलित होतें; प्रथम दिवसा गांठी पडतात, पण पुढें पुढें तीं दोघें रात्रींहि चोरून गांठी घेतात. मग प्रियकर तिच्या बापाकडे मागणी घालून त्याची संमति मिळवितो; किंवा आपल्या प्रियकरिणीला असें सांगतो कीं मला दूर प्रवासाला जावयाचें असल्यानें थोडे दिवस तरी आपला वियोग होणार. युवतीची दासी त्याला रहाण्याविषयीं गळ घालते, वाटेंत हिंस्र पशू व पाशवी मनोवृत्तीचे चोर आहेत, तेव्हां तुमच्यावर अनेक संकटें ओढवतील अशा प्रकारची त्याला भीति घालते; व तारुण्य भराभर जात आहे, तें पुन्हां कोणालाहि प्राप्त होत नाहीं. शिवाय आयुष्यांतील सुखें अनुभवण्याचा हा काल आहे, वगैरेंची त्याला आठवण देते. एक दिवस जर तुम्हीं संकेतस्थानीं आला नाहीं तर बाईसाहेब किती दुःखी होतात, तेव्हां आपण जर त्यांनां सोडून गेलात तर वियोगदुःखामुळें त्यांचा अंत होणार आहे अशी स्वतःला भीति वाटत असल्याचें ती दासी त्याला सांगते. याउप्परहि जेव्हां तो प्रियकर आपला हेका सोडीत नाहीं तेव्हां ती तरुणी आपल्याला बरोबर नेण्याविषयीं प्रियकराची विनवणी करिते; पण तो तिला असें समजावतो कीं तूं नाजूक व भित्री असल्यानें तुला इतका लांबचा व कठिण प्रवास होणार नाहीं. यावर ती उत्तर देते कीं, अरण्यांत देखील हरणाच्यामागून हरिणी जाते. आपण मला सोडून गेलात तर मी खाणें पिणें वर्ज करीन व आपला निजध्यास घेऊन मरेन. आता माझें हृदय आपल्या हृदयाशीं बद्ध झालें आहे, तें तेथें तसेंच असूं द्या; त्याला माझ्याकडे परत पाठवूं नका. कारण तें मला दुःखदायक होईल या उत्तरानें ती प्रियकराला निरुत्तर करते, व त्याच्याबरोबर पळून जाते. या तरुणीची आई तिला शोधीत फिरते व जो प्रवासी भेटेल त्याला, एक मुलगी एका तरुण मनुष्याबरोबर जातांना रस्त्यांत तुम्हीं पाहिली कां? असें विचारीत सुटते. वाटसरू तिचें समाधान करून सांगतात कीं, "आपल्यावर प्रेम करणाऱ्या युवकाबरोबर जाण्यांत तुमच्या मुलीनें गैर तें काय केलें? मोत्याला जन्म देणाऱ्या सागराला त्याचा उपयोग काय? ज्या गिरीवर चंदन उगवतो त्याला त्यापासून काय फायदा? पोवळीं ज्या खडकावर बनतात त्याला त्यांचा काय उपयोग होतो? जो त्यांनां धारण करील त्यालाच त्यांचा उपयोग. याचप्रमाणें आपल्या आवडीच्या मनुष्याबरोबर तुमची मुलगी गेली आहे." कांहीं दिवसांनीं मुलगी आपल्या प्रियकरासह आईकडे परत येते व या तरुण जोडप्याचें नेहेमीच्या रिवाजाप्रमाणें लग्न लागतें. जर राजाच्या नोकरीनिमित्त तो प्रियकर दूर देशीं गेला तर ती युवती खिन्न होते, आपल्या मैत्रिणींची संगत टाळिते, एकदां रडते, एकदां हंसते. आपल्या भोंवतालच्या निर्जीव वस्तू देखील आपल्या शोकांत भाग घेतात अशी ती कल्पना करते; उदाहरणार्थ, सागर रडतो, वाळूचे डोंगर कंप पावतात, झाडांचीं पानें खालीं माना घालितात. ज्याची नौका समुद्रांत फुटली आहे अशा अगतिक नाविकाप्रमाणें आपली स्थिति आहे असें तिला वाटतें. इलुपू वृक्षावर किरमिजी फुलें व कोंगूवर सोन्याचीं फुलें बहरलीं आहेत व नदीतीरावरील सर्व झाडें फुललीं आहेत; मधुकर गुंजारव करीत एका फुलावरून दुसऱ्यावर उडत आहेत; कोकिळ शब्द करीत आहेत आणि सर्व सृष्टि मजेंत आहे पण प्रियकराच्या वियोगामुळें आपलें हृदय मात्र शोकपूर्ण आहे असें ती पाहते. तिला असें स्वप्न पडतें कीं, आपला प्रियकर परत आला आहे व आपलें म्लान वदन पाहून त्याला गहिंवर येतो व तो आपले पाय धरून क्षमायाचना करीत आहे मग आपण विनोदानें पुष्पमालांनीं त्याला प्रहार करीत आहों. तेव्हां तो आपला अपराध समजावून देण्याविषयीं कांपऱ्या आवाजांत आपणाला विनंति करतो. अशा तऱ्हेचें स्वप्न पडल्यामुळें आपल्या प्रियकराची लवकरच भेट होईल या आशेनें दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती प्रफुल्लित असते. तिची दासी तिच्या प्रियकराच्या श्रेष्ठ गुणांची तिला आठवण करून देते व तो तुला टाकणार नाहीं असें आश्वासन देते. याप्रमाणें कलित्-थोकईचा थोडक्यांत गोषवारा वर दिला आहे. मुप्पल, शिलप्प-अधिकरम्, मणिमेकलाई या काव्यांचीं कथानकें कनकसभेनें ('दि तामिळ्स १८००, इयर्स अॅगो') या ग्रंथांत दिलीं आहेत.

आतां यापुढील लहान काव्यें कर्वीच्या नांवाखालीं क्रमवार दिलीं आहेत.

कलथ-थलई (इ. स. ३०-६०):—या कवीबद्दल स्वतंत्र लेख १० व्या विभागांत आला आहे.

उरेय्यिरंक-कण्णनर ( इ. स. ४०—७० ):—यानें दोन काव्यें लिहिलीं; एकपेरुंपनरुप-पदइ आणि दुसरें पदिनप्पलइ. पहिलें सुमारें इ. स. ५० त लिहिलें. त्यावेळीं कांचीचा राजा जो थिरयन याच्या ताब्यांत चोलप्रदेश होता. जरी थिरयन हें काव्य राजप्रशंसापर असलें तरी गोपगीताच्या धर्तीवर हें बनलें आहे. या राजाच्या मुलुखांतील निरनिराळे देखावे यांत प्रतिबिंबित केले आहेत; उदाहरणार्थ, मिठाचे व्यापारी सहकुटुंब ज्यांतून प्रवास करतात त्या बैलगाड्यांच्या लांबलचक मालिका; मिऱ्यांचीं पोतीं वाहून नेणाऱ्या गाढवांचे तांडे; ज्यावर शिपाई राखण आहेत अशीं जकात-नाकीं; शिकारी, धनगर व शेतकरी यांची वस्ती असलेलीं गांवें; जहाजांनीं भरलेलीं बंदरें आणि कांची हें राजधानीचें शहर इत्यादि. दुसरें काव्य इ. स. ७० च्या सुमारास कारिकल चोलाच्या कारकीर्दींत रचलें गेलें असावें. कारिकल चोलाच्या कविरिप्पट्टिनम् नांवाच्या राजधानीचें यांत वर्णन आहे.

मुदथ-थामक-कण्णियर ( इ. स. ६०—९० ):—यानें कारिकल चोलाच्या स्तुतिपर पोरुनर-आरप-पदइ हें काव्य रचिलें. त्यांत, कारिकलचें लहानपणींच तुरुंगांतून पलायन; वेन्निलच्या संग्रामांत त्याला लाभलेला जय; राजा व योद्धा या दृष्टीनें त्याची पुढील कारकीर्द; त्याच्या दरबारीं येणाऱ्या भाटांशीं व कवींशीं त्याची असलेली सभ्य व उदार वागणूक वगैरे विषय येतात.

कपिलर ( ९०-१३० ):—ज्ञानकोश, विभाग १० पहा.

नक्कीरर ( इ. स. १००-१३० ):—हा मदुरेंतलि एका शिक्षकाचा मुलगा होता. आपल्या कवितांतून त्यानें कारिकल व किल्ली-वलवन हे चोल राजे, पांड्य राजा नेडुन-चेलियन आणि चेर राजा वान-वर्मन् उर्फ अथन यांचा उल्लेख केला आहे. तिरु-मुरुग रुप्पडइ व नेडु-नल-वडइ हीं त्यांचीं दोन काव्यें कायतीं सध्यां उपलब्ध आहेत. पहिल्यांत सहा तोंडें, बारा हात असलेली युद्धदेवता मुरुग ( कार्तिकस्वामी ) याची स्तुति आहे, व दुसऱ्यांत मदुरेंतील मोठी हिमराज वर्णिलेली आहे. थंडगार उत्तरवायु ताडाच्या झाडांमधून येऊन मदुरेंतील रुंद रस्त्यांवरून वहात आहे; गार वारा आंत येऊं नये म्हणून दारें व खिडक्या गच्च लावून घेऊन शय्यागारांत अग्नि प्रदीप्त केले आहेत; पांड्य प्रासादांत, शेजारच्या राजांशीं लढण्याकरितां ससैन्य गेलेल्या आपल्या पतीविषयीं विचार करीत राणी मंचकावर पडली आहे व तिचे नेत्र अश्रूंनीं भरले असून गालांवर त्यांचे ओघळ वहात आहेत, इकडे पांड्य राजा शत्रूच्या हद्दींतल्या आपल्या गोटांत जागाच आहे, पण तो राणीविषयीं विचार करीत नसून जखमी झालेल्यांना भेटण्यांत व त्यांच्या शुश्रूषेसंबंधीं आणि गोटाच्या संरक्षणासंबंधीं हुकूम सोडण्यांत गुंतलेला आहे वगैरे. हीं दोन्हीं काव्यें उत्तम वठलीं असून त्यांचा विषयहि हृदयंगम आहे. या कवीचीं किरकोळ पद्यें पुरननुरु, अकननुरु, कुरुंथोकइ आणि नर्‌रिइन या काव्यसंग्रहांतून सांपडतात.

नक्कीरर याच्या काव्यांत त्याच्या समकालीन गोष्टींबद्दल उल्लेख आढळतात. कारिकल चोलानें कुरुंब नांवाच्या भटक्या जातींना स्थिर केलें; पांड्य राजानें चेरदेशावर हल्ला करून पश्चिम किनाऱ्यावरील मुचिरीपर्यंत तो गेला; किल्लीवलवननें जेव्हां पांड्य राजावर चाल केली तेव्हां पलयन मारननें त्याचा मदुरेच्या तटाखालीं पराभव केला, इत्यादि निक्किररच्या काव्यांतून इतिहास आढळतो. याची शब्दयोजना व कल्पनाचित्र अति मार्मिक असून धाटणी प्रौढ व मनोरम असते; पण आपली विद्वत्ता प्रदर्शित करण्याचा प्रयत्न केल्यामुळें कधीं कधीं पांडित्य फाजील झालेलें दिसतें. वर उल्लेखिलेल्या दोन काव्यांखेरीज लहान लहान नऊ पद्यें त्याच्या नांवावर चालतात; पण या पद्यांची भाषा इतकी अर्वाचीन दिसते कीं कोणीहि त्यांना बनावट म्हणण्यास कचरणार नाहीं. ११ व्या शतकांतील "हालस्य महात्म्य" नांवाच्या मदुरेच्या शिवमंदिराच्या बखरींत या पद्यांची उगमकथा आलेली आहे. ही बखर संस्कृतांत आहे व तीवरून कवीला प्राचीन तामिळी वाङ्मयाचें मुळींच ज्ञान नव्हतें असें दिसतें.

मामूलनार ( इ. स. १००-१३० ):—याच्या पुष्कळशा कविता अकननुरुमध्यें व कांहीं थोड्या कुरुंथोकइ व नर्‌रिनइमध्यें आढळतात. या कवितांवरून असें दिसतें कीं तो मोठा प्रवासी असून, चेर, चोल आणि पांड्य राष्ट्रें, पनननडु, तुळु-नाड ( दक्षिण कानडा ) आणि एरुमइ-नडु (म्हैसूर प्रांत) या भागांतून तो फिरला; तो नेहमीं वेंकटम् ( अर्वाचीन तिरुपति ) या संपत्तिमान व सुशोभित शहराचा उल्लेख करतो. पेरुंज- चोरु-उटियन-चेरल, चेरल-अथन, पोथिय डोंगरावर सैन्य घेऊन येणारे अनौरस मौर्य राजे, इत्यादि प्राचीन राजांचा त्यानें उल्लेख केलेला आहे.

कल्लादनार ( स. १००-१३० ):—ज्ञानकोश विभाग १० मध्यें या कवीसंबंधीं स्वतंत्र लेख आहे.

मानकुडि-मरुथनार ( इ. स. ९०-१३० ):—अथवा मानकुडीचा मरुथनार. हा तामिळ वाङ्मयांत उल्लेखिलेला पहिला कविचूडामणि होय. नेडुंज-चेलियन हा पांड्य राजा आपल्या दरबारांतील सर्वश्रेष्ठ कवि म्हणून याचा उल्लेख करतो. याचीं कांहीं पद्यें पुरनानुरुमध्यें आढळतात; पण याची ज्याविषयीं ख्याति आहे तें काव्य म्हणजे मदुरैक-कांची होय; हें नडुंज-चेळियन राजाला उद्देशून लिहिलें आहे. हें नीतिपर असूनहि ज्याकरितां लिहिलें आहे त्या विजयोत्फुल्ल, महत्त्वाकांक्षी व स्वतः कवीचा यजमान आणि राजा याला रुचण्यासारखी त्याची धाटणी आहे. काव्याचा आरंभ प्राचीन पांड्यवंशाची संग्रामकीर्ति, न्याय व बुद्धिमत्ता यांच्या उठावदार वर्णनांत करून, नंतर नडुंज-चेलियनचे

विविध पराक्रम ओजस्वी शब्दांनीं सांगितले आहेत. राजाच्या अंगचे गुण, सत्य व न्याय यांविषयीं त्याची प्रीति, विश्वास्, मैत्री आणि निर्भय शौर्य, मानासंबंधींची त्याची उच्च कल्पना आणि अमर्याद दानशीलता याबद्दल कवीनें पुष्कळ प्रशंसा करून राजाला अशी आठवण दिली आहे कीं, पांड्यांच्या सिंहासनावर तुझ्यापूर्वी अधिष्ठित झालेल्या अनेक महान् व श्रेष्ठ राजांपैकीं आतां कोणीहि उरला नाहीं ! यापुढें, पांड्य-साम्राज्याखालीं असणाऱ्या सुपीक जमीनी, कुरणें, अरण्यें, डोंगराळ मुलूख, समुद्रकिनारा आणि त्यावरील ज्यांत लाखों मिठागरें व केळीं आहेत, मोती काढणारे वगैरे लोक व्यापार करीत आहेत अशीं बंदरें यांचें सविस्तर वर्णन दिलें आहे.नंतर मदुरा शहरांतील दृश्यें रेखाटून शेवटीं राजाला पूर्वजांचा नांवलौकिक संभाळून, धर्माच्या ठिकाणीं निष्ठा ठेवून, प्रजेचें अक्षय हित पाहण्याचा उपदेश केला आहे. या काव्यावरून असें दिसतें कीं कवि मोठा निसर्गप्रेमी, व लोक आणि लोक-रीती यांचें नीट निरीक्षण करणारा होता. यानें केलेलीं वर्णनें वस्तुस्थितिदर्शक आहेत; पण त्याची भाषासरणी नक्किरा-सारखी प्रगल्भ व श्रेष्ठ नाहीं.

तिरु-वल्लु-वर ( इ.स. १००-१३० ):—तामिळ भाषा जोंपर्यंत अस्तित्वांत आहे तोंपर्यंत कुरल किंवा मुप्पल याचा कर्ता म्हणून याची कीर्ति अखंड राहील. याच्या समकालीन ग्रंथकारांनीं—उदाहरणार्थ चीथलई-चट्टनार आणि इलंको-आडिकल यांनीं—कुरलमधील उतारे उद्धृत केले आहेत. १८०० वर्षे झालीं तरी तामिळी लोकांवरील कुरल काव्याचा पगडा कमी झालेला नाहीं व भाषा किंवा विचार यांच्या दृष्टी-नेंहि कोणी संशय व्यक्त करण्यास धजावत नाहीं. दहा-पेक्षां जास्त टीका याच्यावर लिहिल्या गेल्या आहेत, पण हल्लीं जास्त अभ्यासली जाणारी टीका म्हणजे परिमेल-अल-कर यानें लिहिलेली होय.

कोवुर-किलर ( इ. स. १००-१३० ):—हा संग्रामकवि चोल राजांच्या दरबारीं प्रख्यात होता. पुरनन्नुरूमध्यें चेट-चेन्नी-नलंक-किल्ली-चलवन यांच्या प्रशंसापर केलेलीं अनेक पद्यखंडें आढळतात. नलंक-किल्लीच्या कारकीर्दींत तो व त्याचे धाकटे भाऊ यांच्यामध्यें जेव्हां लढाया चालल्या होत्या त्यावेळीं कोवुर-किलर,नेडुंक-किल्लीच्या गोटांत होता. तेव्हां नलंककिल्लीनें प्रथम उरैय्यूर व मागाहून अवूर यांना वेढा घातला, त्यावेळीं कोवूरनें भावांभावांत सख्य घडवून आणण्याचा प्रयत्न केला. एकदां नेडुंक-किल्ली हा एका गरीब कवीला हेर समजून ठार मारीत असतां कोवूरनें त्याला जीवदान देवविलें. किल्ली-नलवनाच्या कारकीर्दींत जेव्हां राजानें मलयमनाचे दोन पुत्र पकडून हत्तीच्या पायां-खालीं त्यांना तुडविण्याचा हुकूम सोडला, तेव्हां यानेंच त्याच्या पूर्वजांच्या प्रख्यात दयाशील कृत्यांची त्याला आठ-वण देऊन तो हुकूम रद्द करविला. जेव्हां या राजानें चेर राष्ट्रावर स्वारी करून करूर या राजधानीला वेढा घातला तेव्हां कोवुर-किलर आणि दुसरे दोन कवी चोल छावणींत होते.

इरैय्यनार ( इ. स. १००-१३० ):—इरैय्यनार-अहप्पो-रुल नांवाच्या शृंगारकाव्यावरील एका व्याकरणाचा हा कर्ता होता.पुढील काळांत या ग्रंथकर्त्यांचें नांव व शिवाचें नांव एक करून याची साठ सूत्रांची एक लहान पोथी प्रत्यक्ष शिवानें लिहिलेली आहे असें मानण्यांत आलें.

परनर ( इ. स. १००-१३० ):—या काळांतील बहुतेक भाटांप्रमाणें यानेंहि चेर, चोळ आणि पाण्डय राष्ट्रांतून हिंडून मोठमोठ्या राजांच्या दरबारांना व लहान लहान संस्थानि-कांच्या वाड्यांना भेटी दिल्याचें दिसतें. नऊ राजांच्या जुटीचा उल्लेख हा करतो. हे राजे बहुधा कुरुंब असावेत व त्यांचा पराभव कारिकल चोलानें केल्याविषयीं इतिहास आहे. कारिकल चोलाचा नातू चेन कुट्टुव चेर यानें आर्य राजांचा पराभव केल्याचेंहि हा लिहितो. उरैयुरचा राजा चित्तन, सोन्याच्या खाणी जेथें चालू होत्या त्या पली देशचा राजा उल्लियन आणि पोथ्य डोंगरांतील संस्थानिक थिथियन यांचें शौर्य व दातृत्व यांविषयीं परनरनें त्यांची स्तुति केली आहे. पथिरु पट्टुमध्यें चेनकुट्टव या चेन राजाच्या स्तुतिपर यानें रचलेलीं दहा पद्यखंडें आढळतात. अव्वैयर ही कवयित्री असें लिहिते कीं, जेव्हां अथियरचा राजा नेडुमन अंचि यानें करीची राजधानी कोवलुर उध्वस्त केली त्यावेळीं हा तेथें हजर असून त्यानें विजयी वीराची स्तुति गाइली. पण तीं स्तुतिपर पद्यें आज उपलब्ध नाहींत. ज्या रणभूमीवर नेडु-मन अंचीचे दोघे राजशत्रू नेडुंज चेरल अथन आणि पेरु विरल किल्ली हे भयंकर रणसंग्राम करून पतन पावले त्या रणभूमीवर उभा राहून गाइलेल्या पद्यांपैकीं एकाचें भाषांतर खालीं देत आहों:—

" बाणांनीं विद्ध झालेले सर्व हत्ती कायमचे गायबंदी झाले आहेत. सर्व उमदे घोडे आपल्या स्वारांसह मारले गेले. रथांतून आणारे सेनापती आपलीं तोंडें ढालांनीं झांकून सर्व मृत्युमुखीं पडले, मोठी मेघगर्जना करणारे नगारे जमी-नीवर लोळत पडले आहेत; कारण ते वाजविणारा कोणीहि हयात नाहीं. शत्रुपक्षाकडील दोन्ही राजे, लांब भाल्यांनीं त्यांचीं सुगंधित अशीं वक्षस्थलें विद्ध झाल्याकारणानें धारा-तीर्थीं पतन पावले आहेत. अरेरे ! ज्यांतील शीतल नद्यांतून कमलांच्या देठांचीं कंकणें हातांत घालून कृषिवलांच्या मुली नाचतात व बागडतात त्यांच्या सुपीक प्रदेशांची काय वाट होईल बरें ?"

पेरुंक कौशिकनार ( इ. स. १०० ते १३० ):-हा पेरुंकुन्-रुरचा रहिवासी होता. यानें चेनकन्माचा राजा नन्नन याचा पुत्र नन्नन याची प्रशंसा मलैपडुकदाम काव्यांत केली आहे. याच्या काव्यांत नाविराम पर्वतावरील उत्कृष्ट देखावा मोठ्या सुंदर रीतीनें वर्णिला आहे. खडकावर आदळणाऱ्या धब-धब्यांच्या गर्जनेंत डोंगराच्या बाजूवर होणारा दणदणाट

( ३ ) तुला जितकी मदत करतां येणें शक्य असेल तेवढी करण्यास चुकूं नकोस.

( ४ ) भिक्षा देत असतांना आड येऊं नकोस.

( ५ ) दुसऱ्याजवळ जें असेल तें फोडूं नकोस.

( ६ ) श्रमांत कसूर करूं नकोस.

( ७ ) संख्या आणि अक्षरें यांच्याकडे दुर्लक्ष करूं नकोस.

( ८ ) भिक्षा मागणें लाजिरवाणी गोष्ट आहे. इत्यादि.

इडैय काडनार (इ.स.१०० ते १३०):-ऊसीमूरी काव्याचा हा कर्ता. हें काव्य सध्यां उपलब्ध नसलें तरी पप्पअहंकफलय यावरील गुणसागराच्या भाष्यांत याचा उल्लेख आढळतो. चोल राजा किल्ली-वल-वन यानें चेर राजधानी करूर हिला वेढा दिला त्यावेळीं यानें तेथें जाऊन राजाची भेट घेतली होती.

चीट्ट-लैच चाटनर ( इ. स. ११० ते १४० ):—हा मदुरेंतील भुसाऱ्याचा मुलगा होता. हा बौद्धधर्मी असून कवि, तत्त्वज्ञानी आणि परमार्थज्ञानी म्हणून प्रख्यात होता.त्याची कीर्ति तामिळी पांच आदिमहाकाव्यांपैकीं मणिमेकलै या काव्याचा कर्ता म्हणून आहे.हा लेखनाचा उत्कृष्ट नमुना असून यांत अतिसुंदर असे अनेक उतारे आहेत.धाटणी साधी व डौलाची आहे आणि योजिलेली वाक्यें चांगलीं घटीव व अर्थपूर्ण आहेत. सृष्टिवर्णनांत तर याचा हातखंडा आहे. मणिमेकलै नायिकेचें स्वभावचित्र यानें फारच उत्तम रेखाटलें आहे.सुंदर, तरुण व एका नर्तिकी मुलगी असूनहि ती आपणाला धर्मकृत्याला वाहून घेते व एक बौद्ध भिक्षुणी बनते. प्रत्यक्ष सुंदर युवराज तिच्यावर प्रेम करीत असतांना ती आपलें व्रत सोडीत नाहीं, आणि खोटा लज्जाविर्भाव दाखविणाऱ्या सोंगाड्यांप्रमाणें न वागतां आपल्या प्रियकराविषयीं तिला सतीप्रमाणें प्रेम वाटतें, आणि त्याला कामुकतेपासून परावृत्त करण्याचा आणि त्याचें जीवित पवित्र व आध्यात्मिक करण्याचा ती प्रयत्न करते. या महाकाव्याच्या शेवटच्या चार प्रकरणांत वेदांताच्या सहा शास्त्रांविषयीं विवेचन असून त्या ठिकाणीं कवि तात्त्विक सूक्ष्मतेंत आणि अध्यात्माच्या चक्रव्यूहांत आपली पारंगतता दर्शवितो. मणिमेकलै संपल्यानंतर तो करूर येथें गेला, आणि पुष्कळ दिवस राजाचा पाहुणा म्हणून राहिला.

इलंको अडिकल (इ. स. ११० ते १४०):—हा चेर राजा अथन याचा पुत्र आणि चोल राजा कारिकल याचा पौत्र होता. लहानपणींच खालील गोष्टीमुळें संन्यास घेऊन निग्रंथ पंथाचा हा एक साधु बनला. एके दिवशीं तो आणि त्याचा वडील भाऊ चेंक-कुटुनन करूर येथें दरबारच्या दिवाणखान्यांत सिंहासनाच्या पायरीशीं बसले असतां एक साधु चेरल अथन राजापुढें आला, आणि कांहीं वेळ राजा व त्याचे दोन पुत्र यांच्याकडे पाहून त्यानें असें स्पष्ट सांगितलें कीं, धाकट्या राजपुत्राच्या अंगावर मोठा सम्राट होण्याचीं सर्व चिन्हें दिसतात .हें भविष्य ऐकून चेंक-कुटुनन रागावला असें जेव्हां धाकट्या भावानें पाहिलें तेव्हां आपलीं राजवस्त्रें व अलंकार काढून सिंहासनाधिष्ठित होणें अगदीं अशक्य व्हावें म्हणून त्यानें निग्रंथ संप्रदायाची दीक्षा घेतली तेव्हांपासून शहराच्या पूर्वदरवाजाबाहेरील एका मंदिरांत तो राहिला. सर्व राज्यचिंता दूर झाल्याकारणानें त्यानें आपला फावला वेळ संगीत व वाङ्मय यांकडे लावला. पुटें पुष्कळ वर्षांनीं जेव्हां कविचीट्टलैच्च चाट्नार चेर दरबारीं आला आणि राजापुढें आपण रचलेलें मणिमेकलै काव्य त्यानें म्हटलें तेव्हां या राजर्षीच्या मनांत मणिमेकलैच्या मातापितरांचें, कोविलन आणि कण्णकि यांचें चरित्र स्मरणार्थ पुढें मांडावें म्हणून दुसरें एक महाकाव्य रचण्याची कल्पना उद्भवली. तदनुसार चीट्टलैच चट्नार याच्या देखत त्यानें चिळप्प अधिकरम् ( शिल्प अधिकरम् ! ) रचिलें. काव्यसरणीच्या सौंदर्यांत हें मणिमेकलैच्या तोडीचें आहे,पण याच्यांत वर्णिलेले विविध देखावे व समाजांतील निरनिराळ्या वर्गाविषयीं भरपूर माहिती लक्षांत घेतां, विद्यार्थ्यांना आणि सामान्य वाचकांना हें जास्त आवडणारें आहे यांत शंका नाहीं. गायन व नृत्यकला यांचें आपणाला असलेलें सर्व ज्ञान कवीनें पुढें मांडलें आहे. निरनिराळ्या छंदांत प्रेम व लीला यांवर गाणीं आणि स्तोत्रें या ग्रंथांत घालून त्याला अत्यंत शोभा आणिली आहे;यांत नायक आणि नायिकेचा स्वभाव फार चांगला रंगविला आहे. कोविलन नांवाच्या एका धनाढ्य व्यापाऱ्याचा मुलगा आनंदी पण मूर्ख असे. फार लहानपणींच त्याचें एका सद्गुणी व सुस्वभावी मुलीशीं लग्न झालें, पण संगीत व नृत्य यांचा फार शोकी असल्यानें तो वारंवार नाटकांना वगैरे जाऊं लागला व साहजिकच त्यावेळच्या एका अतिशय सुंदर नटीच्या प्रेमपाशांत सांपडला. आपली सर्व संपत्ति यानें तिच्या पायीं ओतली, शेवटीं आपल्या कर्माची लाज वाटून आपल्या तरुण पत्नीसह गांव सोडून तो मदुरेला पळाला.त्या ठिकाणीं आपल्या बापाच्या ओळखीच्या व्यापाऱ्याजवळ मदत न मागतां एका धनगरणीच्या घरीं तो उतरला, व आपल्या बायकोचा एक दागिना विकण्याकरितां एकटाच बाहेर पडला असतां राजवाड्यांतील अलंकार चोरल्याचा त्याजवर आरोप ठेवण्यांत येऊन एका राजरक्षकाकडून त्याला ठार मारण्यांत आलें. कण्णकी पतिव्रता असून आपल्याला न मानणाऱ्या पतीवरहि तिचें अलोट प्रेम होतें. तिचा स्वभाव इतका गोड होता कीं, त्याला रागें भरण्याचें तर राहोच, पण त्याची वारिकसारिक इच्छा सुद्धां ती लक्षपूर्वक पाहून सर्वस्वीं त्याच्या सेवेला ती आपणाला वाहून घेत असे. नवऱ्यानें आपली सर्व संपत्ति उधळल्यावर त्याच्या मागोमाग तीहि परक्या देशांत गेली. चोरीचा आरोप ठेवून आपल्या पतीला मारण्यांत आलें, असें जेव्हां तिनें ऐकिलें, तेव्हां तिनें मोठ्या धिटाईनें त्या शहरच्या राजाकडे जाऊन आपल्या पतीचा निरपराधीपणा सिद्ध केला. पण अत्यंत शोकाकुल होऊन चेर

हस्तिपांचें ओरडणें, सांवे कांडीत असतांना मायका म्हणत असलेलें गाणें, गुन्हाळाची करकर आणि वायकांसह आनंदानें नाचणाऱ्या दारुड्या डोंगरी लोकांनीं वहवलेल्या नगाऱ्यांचे आवाज; परलोकवासी योद्ध्यांच्या स्मरणार्थ उभारलेले लेखांकित दगड; रस्त्यांच्या चौकांत अमुक रस्ता कोठें जातो हे दाखविण्यांकरितां उभारलेले खुणेचे खांब; डोंगरी जातींचें आदरातिथ्य; डोंगरावरून खालीं वळत वळत वाहणाऱ्या चेयर नदीचा जोराचा ओघ; तरवारी व भाले घेऊन सज्ज असलेल्या पहारेकऱ्यांकडून संरक्षिले जाणारे किल्ल्याचे दरवाजे; नन्नन राजाकडून भाटांचें होणारें सुस्वागत, डोंगराच्या त्रासदायक चढणीमुळें त्यांनां झालेल्या श्रमावद्दल राजाचें दुःखप्रदर्शन, त्याचें गाणें संपेतोंपर्यंत राजाचें त्याठिकाणीं थांवणें व शेवटीं त्यांनां उत्तम जेवण देऊन पुष्कळ नजराण्यासह राजानें त्यांची केलेली बोळवण हा काव्यविषय आहे.

अवैय्यर (इ. स. १०० ते १३०):—ही अति विख्यात तामिळ कवयित्री तेरुवल्लुवरपेक्षांहि भारत लोकमान्य आहे. कारण तेरूवल्लुवरच्या काव्याचा अभ्यास जास्त शिकलेले पंडितच फक्त करितात. पण अवैय्यरचें काव्य वर्णमाला शिकल्यानंतर लगेच प्रत्येक तामिळ विद्यार्थी हातीं घेतो. अट्टिचूडि आणि कोनरैवेंथन हे तिचे दोन सूत्रग्रंथ तामिळ अकारविल्यानें लिहिले असून त्यांनां तामिळी सुवर्ण वर्णमाला या अन्वर्थक नांवानें संबोधिलें आहे. भाटाचा धंदा असल्यानें लहानपणींच काव्यांत आपले विचार मांडण्याची उत्तम कला तिनें पैदा केली; आणि काव्यकल्पना आणि वाङ्मय यांकडे तिचा स्वाभाविक कल असल्यानें, बराच अभ्यास करून आपल्या गुणांचा तिनें इतका विकास केला कीं, तिचे समकालीन कवी तिला विदुषी, कवियत्री असें मानूं लागले. दैदीप्यमान कपाळ, कज्जलरंजित पापण्या, आणि कमरेला रत्नजडित कमरपट्टा असें तिनें स्वतःचें वर्णन केलें आहे. थक्कडूरचा राजा अथियमन अंची याच्या दरबारीं तिच्या आयुष्यांतील तारुण्याचा काळ गेला; व राजाकडूनहि तिची वहावा होत गेली. ती असें सांगते कीं, अथियमनच्या राजवाड्यांतील दिवाणखाने आणि सौधप्रांत हे डमरूवर आपण गाइलेल्या चिजांनीं दुमदुमून जात असत. अथियमनशीं तिची सलगी तिनें स्वतःच खालीलप्रमाणें प्रगट केली आहे:—"ज्याप्रमाणें अवाढव्य हत्ती पाण्यांत बसून जेव्हां गांवांतील तरुणांनां आपले पांढरे सुळे धुवूं देतो. तेव्हां तो त्यांनां जितका सुखकर असतो, तितकाच हे राजा, तूं आम्हांला सुखकर आहेस. पण तोच हत्ती मदोन्मत्त झाला असतां जितका क्रूर असतो, तितकाच तूं आपल्या शत्रूंनां आहेस." जेव्हां एकदां आयुर्वर्धक गुण असणारें नेल्लि नांवाच्या झाडाचें फळ कोणीं एकानें राजाला अर्पण केलें तेव्हां त्यानें तें स्वतः न खातां अवैय्यरला दिलें तेव्हां ही कृतज्ञ कवयित्री पुढील शब्दांत राजाचें आभार मानिती झाली:-

"हे अंचि! अथियरपते! संग्रामदुर्धरा! ज्याच्या गळ्यांत सुवर्णमाला आहेत, व ज्याच्या कंकणविभूषित बलवान हातांमध्यें विजयी तरवार परजलेली आहे, असा तूं प्रत्येक रणांगणावर शत्रूंचा धुव्वा उडवितोस. ज्याचा कंठ निळा आहे, आणि ज्याच्या डोक्यावर चंद्रकोर आहे, त्या अतुल्य शिवाप्रमाणें तूं अक्षय श्रेष्ठ रहा. कारण उंच पर्वतावर उगवणाऱ्या नेल्लीवृक्षाचें मधुर फळ मृत्यूपासून माझें रक्षण व्हावें म्हणून तूं मला अर्पण केलें आहेस." एकदां अथियमनानें कांचीच्या थोंडेमन राजाकडे तिला वकील म्हणून पाठविलें होतें. कदाचित् आपल्या शत्रूविरुद्ध त्या राजाची मदत मागण्याकरितां ही वकिलात असावी. हिचा शेवट काय झाला हें जरी माहीत नाहीं तरी थोड्याच दिवसांनीं अथियमन लढाईत मारला गेला, हें खरें. या प्रसंगीं अवैय्यरनें जीं पद्यें गाइलीं तीं अतिशय हृदयस्पर्शी अशीं आहेत. "थोडें जरी मद्य असलें तरी तो आम्हाला पिवूं देई. पुष्कळ असलें तर आम्ही त्याप्रित्यर्थ गात असतांना तो आनंदानें आमच्याबरोबर तें घेई. जेवण साधें असो किंवा मोठया मेजवानीचें असो, तो पुष्कळ अतिथींसमवेत भोजनास बसे. जेथें म्हणून हाडांमांसाची समृद्धि असे, तेथें तो आम्हांला ठेवी, व जेथें बाण व भाले रोखले जात असत तेथें आपण स्वतः उभा राही. आपल्या सुगंधित हस्तांनीं तो माझ्या डोक्यावर थापटया मारी. हाय! हाय! ज्या वेळीं भाल्यानें त्याचें अति प्रिय वक्षस्थल विदारण केलें, त्याचवेळीं त्यानें भिक्षापात्र, राजाचे आश्रित अशा गरीब लोकांचे हात आणि त्याच्या दरबारांतील विद्वान कवींच्या जिव्हा छेदून टाकल्या! रडून रडून त्याच्या आश्रितांचे डोळे अंध झाले! अहो, तो आमचा प्रियकर राजा कोठें गेला? आतां गाणारे भाट किंवा त्यांनां बक्षीस देणारे यजमान लयाला गेले! पण जगाला निरुपयोगी अशा नद्यांच्या शीतल तीरावर उगवणाऱ्या पण अनुपभोज्य अशा पद्मनरई फुलांसारखे अनेक लोक हयात आहेत!" अथियमन अंचि याच्या मृत्यूनंतर तिनें तोंडिनाडांत प्रवास केला. आणि कांहीं वर्षांनीं थकडूर येथें ती परत आली. त्याठिकाणीं नेडूमन अंचीच्या एलिनी नांवाच्या मुलानें तिचा चांगला सत्कार केला. तेथील सत्काराविषयीं तिच्या काव्यांत वर्णन आहे.

चोल राजा पेरुनर किल्ली यानें जेव्हां मोठा यज्ञ केला, त्यावेळीं ही आली होती, आणि हिनें त्या प्रसंगीं एकत्र असलेल्या उग्र-पेरु-वलुथी, पेरु--नर--किल्ली आणि चेर--मनिको या तिघां तामिळ राजांनां उद्देशून भाषण केलें. 'आपल्या सर्व आयुष्यांत चांगलीं कृत्यें करा. तींच पुढें तुम्हांला उपयोगी पडतील.' तिनें उपदेशिलेलीं शुद्ध तत्त्वें आणि व्यावहारिक वेदांत यांचा एक नमुना म्हणून अट्टिचोडींतील आठ ओळींचें भाषांतर पुढें दिलें आहे:—

(१) दान करण्याची इच्छा धर.

(२) क्रोध आवरला पाहिजे.

( ३ ) तुला जितकी मदत करतां येणें शक्य असेल तेवढी करण्यास चुकूं नकोस.

( ४ ) भिक्षा देत असतांना आड येऊं नकोस.

( ५ ) तुझ्याजवळ जें असेल तें फोडूं नकोस.

( ६ ) श्रमांत कसूर करूं नकोस.

( ७ ) संख्या आणि अक्षरें यांच्याकडे दुर्लक्ष करूं नकोस.

( ८ ) भिक्षा मागणें लाजिरवाणी गोष्ट आहे. इत्यादि.

**इडैय काडनार** (इ.स.१०० ते १३०):–ऊसीमूरी काव्याचा हा कर्ता. हें काव्य सध्यां उपलब्ध नसलें तरी यप्पअरुंककलय यावरील गुणसागराच्या भाष्यांत याचा उल्लेख आढळतो. चोल राजा किल्ली-वल-वन यानें चेर राजधानी करूर हिला वेढा दिला त्यावेळीं यानें तेथें जाऊन राजाची भेट घेतली होती.

**चीट्ट-लैच चाट्टनर** ( इ. स. ११० ते १४० ):—हा मदुरेंतील मुसाऱ्याचा मुलगा होता. हा बौद्धधर्मी असून कवि, तत्त्वज्ञानी आणि परमार्थज्ञानी म्हणून प्रख्यात होता.त्याची कीर्ति तामिळी पांच आदिमहाकाव्यांपैकीं मणिमेकलै या काव्याचा कर्ता म्हणून आहे.हा लेखनाचा उत्कृष्ट नमुना असून यांत *अतिसुंदर असे अनेक उतारे आहेत.धाटणी साधी व* शैलीची आहे आणि योजिलेलीं वाक्यें चांगलीं घटीव व अर्थपूर्ण आहेत. सृष्टिवर्णनांत तर याचा हातखंडा आहे. मणिमेकलै नायिकेचें स्वभावचित्र यानें फारच उत्तम रेखाटलें आहे.सुंदर, तरुण व एका नटीची मुलगी असूनहि ती आपणाला धर्मकृत्याला वाहून घेते व एक बौद्ध भिक्षुणी बनते. प्रत्यक्ष सुंदर युवराज तिच्यावर प्रेम करीत असतांना ती आपलें मत सोडीत नाहीं, आणि खोटा लज्जाविर्भाव दाखविणाऱ्या सोंगाड्यणीप्रमाणें न वागतां आपल्या प्रियकराविषयीं तिला सतीप्रमाणें प्रेम वाटतें, आणि त्याला कामुकतेपासून परावृत्त करण्याचा आणि त्याचें जीवित पवित्र व आध्यात्मिक करण्याचा ती प्रयत्न करते. *या महाकाव्याच्या* शेवटच्या चार प्रकरणांत वेदांताच्या सहा शास्त्रांविषयीं विवेचन असून त्या ठिकाणीं कवि तात्त्विक सूक्ष्मतेंत आणि अध्यात्माच्या चक्रव्यूहांत आपली पारंगतता दर्शवितो. मणिमेकलै संपल्यानंतर तो करूर येथें गेला, आणि पुष्कळ दिवस राजाचा पाहुणा म्हणून राहिला.

**इलंको अडिकल** (इ. स. ११० ते १४०):—हा चेर राजा अथन याचा पुत्र आणि चोल राजा कारिकल याचा पौत्र होता. लहानपणींच खालील गोष्टीमुळें संन्यास घेऊन निग्रंथ पंथाचा हा एक साधु बनला. एके दिवशीं तो आणि त्याचा वडील भाऊ चेंक-कुट्टुवन करूर येथें दरबारच्या दिवाणखान्यांत सिंहासनाच्या पायरीशीं बसले असतां एक साधु चेरल अथन राजापुढें आला, आणि कांहीं वेळ राजा व त्याचे दोन पुत्र यांच्याकडे पाहून त्यानें असें स्पष्ट सांगितलें कीं, धाकट्या राजपुत्राच्या अंगावर मोठा सम्राट होण्याचीं सर्व चिन्हें दिसतात .हें भविष्य ऐकून चेंक-कुट्टुवन रागावला असें जेव्हां धाकट्या भावानें पाहिलें तेव्हां आपलीं राजवस्त्रें व अलंकार काढून सिंहासनाधिष्ठित होणें अगदीं अशक्य व्हावें म्हणून त्यानें निग्रंथ संप्रदायाची दीक्षा घेतली तेव्हांपासून शहराच्या पूर्वेदरवाजाबाहेरील एका मंदिरांत तो राहिला. सर्व राज्यचिंता दूर झाल्याकारणनें त्यानें आपला फावला वेळ संगीत व वाङ्मय यांकडे लावला. पुढें पुष्कळ वर्षांनीं जेव्हां कविचीट्टलैच्च चाट्टनार चेर दरबारीं आला आणि राजापुढें आपण रचलेलें मणिमेकलै काव्य त्यानें म्हटलें तेव्हां *या राजर्षीच्या मनांत मणिमेकलैच्या मातापितरांचें, कोविलन आणि कन्नकि* यांचें चरित्र स्मरणार्थ पुढें मांडावें म्हणून दुसरें एक महाकाव्य रचण्याची कल्पना उद्भवली. तदनुसार चीट्टलैच चट्टनार याच्या देखत त्यानें चिळप्प अधिकरम् ( शिल्प अधिकरम् ? ) रचिलें. काव्यसरणीच्या सौंदर्यांत हें मणिमे*कलैच्या तोडीचें आहे,*पण *याच्यांत वर्णिलेले विविध* देखावे व समाजांतील निरनिराळ्या वर्गांविषयीं भरपूर माहिती लक्षांत घेतां, विद्यार्थ्यांना आणि सामान्य वाचकांना हें जास्त आवडणारें आहे यांत शंका नाहीं. गायन व नृत्यकला यांचें आपणाला असलेलें सर्व ज्ञान कवीनें पुढें मांडलें आहे. निर*निराळ्या छंदांत प्रेम व लीला यांवर गाणीं आणि स्तोत्रें या* ग्रंथांत घालून त्याला अत्यंत शोभा आणिली आहे;यांत नायक आणि नायिकेचा स्वभाव फार चांगला रंगविला आहे. कोविलन नांवाच्या एका धनाढ्य व्यापाऱ्याचा मुलगा आनंदी पण मूर्ख असे. फार लहानपणींच त्याचें एका सद्गुणी व सुस्वभावी मुलीशीं लग्न झालें, पण संगीत व नृत्य यांचा फार शोकी असल्यानें तो वारंवार नाटकांनां वगैरे जाऊं लागला व साहजिकच त्यावेळच्या एका अतिशय सुंदर नटीच्या प्रेमपाशांत सांपडला. आपली सर्व संपत्ति यानें तिच्या पायीं ओतली, शेवटीं आपल्या कर्मांची लाज वाटून आपल्या तरुण पत्नीसह गांव सोडून तो मदुरेला पळाला.त्या ठिकाणीं आपल्या बापाच्या ओळखीच्या व्यापाऱ्याजवळ मदत न मागतां एका धनगरणीच्या घरीं तो उतरला, व आपल्या बायकोचा एक दागिना विकण्याकरितां एकटाच बाहेर पडला असतां राजवाड्यांतील अलंकार चोरल्याचा त्याजवर आरोप ठेवण्यांत येऊन एका राजरक्षकाकडून त्याला ठार मारण्यांत आलें. कन्नकी पतिव्रता असून आपल्याला न मानणाऱ्या पतीवरहि तिचें अलोट प्रेम होतें. तिचा स्वभाव इतका गोड होता कीं, त्याला रागें भरण्याचें तर राहोच, पण त्याची बारिकसारिक इच्छा सुद्धां ती लक्षपूर्वक पाहून सर्वस्वी त्याच्या सेवेला ती आपणाला वाहून घेत असे. नवऱ्यानें आपली सर्व संपत्ति उधळल्यावर त्याच्या मागोमाग तीहि परक्या देशांत गेली. चोरीचा आरोप ठेवून आपल्या पतीला मारण्यांत आलें, असें जेव्हां तिनें ऐकिलें, तेव्हां तिनें मोठ्या धिटाईनें त्या शहरच्या राजाकडे जाऊन आपल्या पतीचा निरपराधीपणा सिद्ध केला. पण अत्यंत शोकाकुल होऊन तेः

देशाकडे जाणाऱ्या रस्त्यानें ती भटकूं लागली, आणि पतिनिधनानंतर चौदाव्या दिवशींच मृत्यु पावली.

आरिसिल–किला ( इ. स. ११० ते १४० ):–अदीयमान एलिनीची राजधानी थकडूर हस्तगत करणारा जो चेर राजा पेरून चेरल तिरुम पोरइ याच्या प्रशस्तीपर आरिसिल् किलारनें दहा पद्यें रचिलीं आहेत. थकडूर याथीरईमध्येंहि याचीं अनेक पद्यें आलेलीं आहेत.

पोन्मुडियार ( इ.स. ११० ते १४० ):—हा संग्रामकवि चेर राजा, पेरूनचेरल तिरुमपोरुम् यांचें सैन्य थकडूरवर जेव्हां चालून गेलें, त्यावेळीं त्याच्यासमवेत होता. याचीं पद्यें वीररसात्मक असून रणांगणावरील थरारून सोडणारे देखावे हुबेहूब दृष्टीपुढें उभे करतात.

पेरुंक कुनरुल किलर ( इ. स. १२० ते १५० ):–पेरन चेरल तिरुम पोरइ याचें वर्णन ज्या याच्या दहा पद्यांत आलें आहे तीं पट्टिरु–पट्टूमध्यें जतन करून ठेविलीं आहेत.

खालील यादींत इ. स. ५० ते १५० यांच्या दरम्यान रचलेल्या तामिळ काव्यांचीं नांवें आणि त्यांतील ओळींची संख्या दिली आहे.

| काव्याचें नांव | | काव्याच्या ओळी |
|---|---|---|
| मुप्पाल किंवा कुरल | | २६६० |
| मणिमेकलै | | ४८५७ |
| चिलप अणिकरन् | | ४९५७ |
| कलिथ थोंकइ | | ४३०४ |
| इन्ना नारपट्ट | | १६० |
| पेरुंक कुरिंची | | २६१ |
| कुरिंची ( ऐंकरु मिरूमध्यें कपिलरनें रचलेलें ) | अदमासें | ४०० |
| तिरू पुरुकारुप्पडई | | ३१७ |
| नेडुनल वडई | | १८८ |
| पोरु नर अरूप पडइ | | २४८ |
| पेरूपपान आरूप पडई | | ५०० |
| पाडिनप पालै | | ३०१ |
| मदुरैक कांची | | ७८२ |
| मलै पडु कडम् | | ५८३ |
| पट्टिरु पट्टू ( ४१–५० ) | अदमासें | १५० |
| ” ” ( ६१–७० ) | ” | १५० |
| ” ” ( ७१–८० ) | ” | १५० |
| ” ” ( ८१–९० ) | ” | १५० |
| पुरनानुरू, आकनानुरू, करुन् टोकै आणि नरिनैमध्यें आढळणाऱ्या या काळांतील कवींचीं अदमासें ३०० पद्यें | | अदमासें ४००० |
| एकूण | | २५११८ |

वरील यादीवरून असें दिसून येईल कीं, इ. स. ५० ते १५० मध्यें होऊन गेलेल्या कवींच्या काव्यांतील २५००० पेक्षां ज्यास्त ओळी आज उपलब्ध असून, प्राचीन तामिळांचें वाङ्मय व इतिहास अभ्यासिण्याला त्या पुष्कळ साधनें पुरवितात. दगडावर किंवा धातूवर कोरून ठेविल्यापेक्षां जास्त टिकाऊ असें त्यांच्या सामाजिक आणि राजकीय स्थितीचें तसेंच त्यांच्या चालीरीतींचें अगदीं हुबेहुब चित्र आपणाला या पद्यवाङ्मयांत आढळेल. उत्तर हिंदुस्थानांत राहणाऱ्या आर्य जातीच्या धर्मेतिहासावर प्रकाश पाडणारे असे प्राचीन आर्यग्रंथावद्दलचे उल्लेख या वाङ्मयांत अनेक आढळतात. चार वेद हे बहुधां, नानमर ( चार गुप्त ग्रंथ ) या नांवानें ओळखले जात, व त्यावरून असें स्पष्ट दिसून येते कीं, ब्राह्मणांनीं तामिळांपासून वेदज्ञान चोरून ठेविलें होतें. "चार गुप्त ग्रंथांचे मालक", " सहा शास्त्रांमध्यें पंडित" अशा तऱ्हेचें ब्राह्मणांचें वर्णन केलें आहे. हल्लीं उपलब्ध नसलेलें इंद्रव्याकरण नामक प्राचीन व्याकरण त्यावेळीं सर्व ब्राह्मण अभ्यासीत व इंद्रव्याकरणांत पाण्डित्य श्रेष्ठ पण्डितांचें लक्षण समजलें जाई. रामायण–महाभारतांतील कथांशीं तामिळांचा परिचय होता. त्यांनां बौद्धांचे पिटक ग्रंथ, निगम आगम आणि आजीवक पंथाचा संस्थापक मरकलै याचे पवित्र ग्रंथ त्यांनां अवगत होते. वेदांताच्या सहा शाखा त्यांनीं माहीत होत्या. लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे पाणिनीच्या व्याकरणाचा किंवा पतंजलीच्या योगाचा कोठेंही उल्लेख नाहीं.

हिंदु धर्मग्रंथांचा तामिळ वाङ्मयावर परिणामः—तामिळ लोक " तुराणी " वंशांतले असून ते आर्य लोकांपूर्वीच हिंदुस्थानांत रहात होते; त्यांचा देश हिंदुस्थानच्या अगदीं दक्षिण टोंकाला आहे व यामुळें या भागांत ब्राह्मणवर्गाचें पूर्ण वर्चस्व कधींहि नव्हतें असें डॉ. काल्डवेल म्हणतो. ज्या द्राविडी लोकांवर आर्य संस्कृतीचा परिणाम झाला नाहीं त्यांच्यामध्यें भिक्षुकवर्ग, मूर्तिपूजा, स्वर्गनरककल्पना, आत्मा, पापपुण्य वगैरे संबंधीच्या कल्पना आढळत नाहींत. देवाचें अस्तित्व ते मानतात, व त्याला से को म्हणजे राजा असें नांव देतात. या देवाचीं देवालयें ते बांधीत पण त्याची पूजाअर्चा ते करीत नसत. ते भुताखेतांची ( डेव्हिल ) पूजा करीत व त्यांनां प्राण्यांचे बळी देत. भुताखेतांची पूजा करण्याची पद्धत शानर सारख्या जातींमध्यें अद्यापहि आहे. हल्लीं ते ज्या दैवताला फार भितात त्याचें नांव पालेवेशम् असें असून तो मुसुलमानांच्या अमदानींत एक मोठा प्रसिद्ध दरोडेखोर होता. कॅप्टन पोल हा इंग्रज ऑफिसर त्रावणकोर काबीज करतांना १८०९ सालीं मारला गेला. त्याची पूजा शानर लोक करूं लागले आणि त्याला दारू व विरूट नैवेद्य म्हणून अर्पण करीत असत. वेदग्रंथांत ज्या देवतांनां पूज्य मानिलें आहे त्या अग्नि, सूर्य, इंद्र वगैरे देवतांची पूजा तामिळ लोकांत नाहीं असें डॉ. कॉल्डवेल म्हणतो. परंतु हिंवाळ्याच्या दिवसांत जो एक मोठा उत्सव तामिळ लोक

करतात. त्या पोंगल नामक उत्सवांत पहिल्या दिवशीं इंद्राची आणि दुसऱ्या दिवशीं सूर्याची पूजा करतात.

बौद्ध व जैन धर्मांचे अनुयायी तामिळ लोकांत अनेक होते आणि जैनांनीं लिहिलेले बरेच ग्रंथ उपलब्ध आहेत. बौद्ध धर्माच्या प्रसाराकरितां अशोक सम्राटानें या देशांत धर्मप्रचारक पाठविले होते. इ. स. ८०० च्या सुमारास कांजीवरम् येथील बौद्धधर्मी राजा हीमशितल याच्या दरबारीं बौद्ध व जैन पंडितांमध्यें मोठा वाद होऊन बौद्ध पंडितांचा पराभव झाला; तेव्हां कांहीं बौद्ध पंडितांना ठार मारलें व कांहीं सिलोनांत पळून गेले.याप्रमाणें जैनांचें जें वर्चस्व झालें होतें तें १० व्या शतकांत शैवपंथी लोकांनीं नष्ट केलें. त्रिरुवीलिअदलपुराणम् यामध्यें असें सांगितलें आहे कीं, ८००० जैन पंडितांनीं स्वधर्मत्याग करण्याऐवजीं मरण पत्करलें. आद्यशंकराचार्यांनीं हिंदुधर्माचें वर्चस्व तामिळ देशांत स्थापण्याचें काम बरेंच केलें. शिव पंथाचा प्रसार सुंदरर व अप्पर व त्यांचा गुरु संबंदर या तिघांनीं केला. पुढें १२ व्या शतकांत वैष्णव पंथाचा प्रसार रामानुजांनीं केला आणि १३ व्या शतकांत मध्वाचार्य उर्फ आनंदतीर्थ यांनीं वैष्णवांचाच एक पोटपंथ तामिळ देशांत स्थापिला.

ब्राह्मणी धर्मांतील शिव ही तामिळ देशांत प्रस्थापित झालेली पहिली देवता होय. या पंथाचें लिंगपूजा हें एक प्रमुख चिन्ह आहे. कपाळावर तीन काळ्या रेघा आणि अंगाला भस्म हें शैवपंथी लोक ओळखण्याचें मुख्य साधन आहे. शैवपंथामध्येंच वीरशैव नांवाचा एक पोटभेद आहे, त्याची स्थापना बसव यानें केली. वीरशैवपंथी लोक अंगावर एक धातूच्या डबींत ठेवलेलें लहानसें लिंग बाळगतात, म्हणून त्यांनां लिंगायत असेंहि म्हणतात. वीरशैवपंथाचे तामिळ भाषेंत पांच मुख्य ग्रंथ आहेत. ( १ ) अपिशेकमलई, ( २ ) नेदुंगकलिनेदिल, ( ३ ) कुरुंगकलिनेदिल, ( ४ ) निरंगण मलई, व ( ५ ) कैंदलमलई. हे ग्रंथ १७ व्या शतकांतील शिव पिरकस तेशीकर यानें लिहिलेले आहेत.

शैवपंथांतील दुसरा जो पोटभेद त्याला शाक्तपंथ म्हणतात. याचा प्रसार बंगाल्यांत फार आहे. दुर्गापूजा हा शाक्त पंथाचा मुख्य उत्सव होय. तामिळांतहि शाक्तपंथी लोक आहेत. वासनात्याग हें जें हिंदुधर्मी माणसांचें ध्येय असतें तें इतर हिंदु धर्मपंथांतले लोक इंद्रियदमन करून साध्य करण्याचा प्रयत्न करतात तर, उलट शाक्तपंथी लोक इंद्रियभोग भोगून तेंच ध्येय गांठण्याचें तत्त्व प्रतिपादितात.

धा र्मि क ग्रं थ.—हिंदु धर्मासंबंधींची सामान्य माहिती देणारा ग्रंथ विवेकचिंतामणी हा आहे. तो मूळ कानडी भाषेंत होता. तो तामिळमध्यें निसक्कनयोकी यानें लिहिला. त्याच्यामध्यें हिंदुधर्मांतील निरनिराळ्या पंथांसंबंधानें माहिती दिली आहे. पेरियातिरुमोली नांवाच्या ग्रंथांत वेदग्रंथांचें सर्व सार आहे असें वैष्णव म्हणतात, पण तें चूक आहे. वेदांसंबंधींची माहिती देणारा तामिळ भाषेंतील ग्रंथ वेतपोळ विळक्कम हा होय. हा काशीविश्वनाथ मुदलीयर यानें लिहिला.या ग्रंथाचाच एक भाग ' पिरयाश्चित्त निरनय सत्तिर संगकिरकम् ' या नांवाचा आहे, त्याच्यामध्यें निरनिराळ्या प्रकारचीं पापें व त्यांचीं प्रायश्चित्तें दिलीं आहेत. ब्राह्मणानें कांदा खाणें या पापाबद्दलचें प्रायश्चित्तहि त्यांत सांगितलें आहे.



शैवपंथी लोकांची मुख्य देवता शिव, हिच्याबद्दलचे पुष्कळ ग्रंथ तामिळ भाषेंत आहेत. शिव हें नांव वेदग्रंथांत नाहीं, रामायण व महाभारत यांत शिव याचा महादेव ( मुख्य देव ) म्हणून उल्लेख आहे. १८ पुराणांपैकीं १० पुराणांवर शैव लोक हक्क सांगतात पण स्कंदपुराणासंबंधींचा एक संक्षिप्त ग्रंथ मात्र तामिळ भाषेंत छापला आहे. अरुणाचलपुराणम् या नांवाचा १७ व्या शतकांतला एल्लप्पा नवलर यानें केलेला ग्रंथ आहे. अरुणाचल किंवा अरुणगिरि ही टेंकडी मद्रासच्या नैर्ऋत्येस सुमारें १०० मैलांवर आहे. या टेंकडीवर एक शिवलिंगाचें देवालय आहे व तेथें पूजा केल्यानें काय फळ मिळतें तें या ग्रंथांत सांगितलें आहे. ' अत्तिसुदिपुराणम् ' हा गद्यग्रंथ असून त्यामध्यें शिवाच्या ६३ भक्तांच्या कथा दिल्या आहेत. अत्ती नांवाच्या झाडाच्या पानांच्या माळा हे शिवाचे भक्त घालतात.यावरून त्यांना अत्तिसुदी हें नांव पडलें आहे. काशीखंडम् हा स्कंदपुराणाचाच एक भाग आहे व त्यांत काशी ( बनारस ) संबंधींची स्तुति व तेथील भक्तांच्या कथा आहेत. पेरियपुराणम् उर्फ तिरुत्तोंदरपुराणम् हा १४ व्या शतकांतला ग्रंथ आहे. यामध्यें शिवाच्या ६३ भक्तोंचीं चरित्रें दिलीं आहेत. पेरियपुराणसारम् हा १५ व्या शतकांतील ग्रंथ असून तो वरील पुराणाचें सार आहे. पेरियपुराणवसनम् हा अरुमुकनवलर यानें १९ व्या शतकांत लिहिलेला गद्यग्रंथ आहे. पिरमोत्तिरखंडम् हा ग्रंथ १२ व्या शतकाच्या सुमारास एका पांड्य राजाचा भाऊ वरतुंगक रामपोड्य यानें लिहिला. स्कंदपुराणांतील एका भागाचें अनुकरण करून हा लिहिला आहे. संपंतसुवमीतेवरम् हा १० व्या शतकाच्या सुमाराचा ग्रंथ असून त्याच्यामध्यें शिवाविषयींचीं ३८४ स्तोत्रें आहेत. शैवसमयविलक्क विन–वियाई हा १९ व्या शतकांतला ग्रंथ असून त्यांत शैव पंथासंबंधानें पश्नोत्तर रूपानें माहिती दिली आहे. सेक्किलरपुराणम् हा १७ व्या शतकांतला उमापतिशिव चरियर यानें लिहिलेला ग्रंथ आहे. यांत पेरियपुराणम् नामक ग्रंथाच्या कर्त्या–संबंधानें १०० कविता आहेत. सेत्तिरकोवई या ग्रंथांत शैव लोकांच्या १०८ पवित्र स्थानांसंबंधींची माहिती आहे. सुतसंगकितर्थपुराणम्, तिरुक्कलुकुनपुराणम्, तिरुस्सितंमपरपुराणम् उर्फ कोइलपुराणम्, तिरुवतउहुरपुराणम्, तिरुवेंकर पुराणम्, तिरुविलैयदलपुराणम्, विरुत्तावलपुराणम्, विरिंचपुराणम् वगैरे शैवपंथाचे ग्रंथ आहेत.

पार्वती ही शिवाची बायको दुसऱ्या अनेक नांवानें देवता म्हणून पूजिली जाते. अंबिका, उमा, काली, दुर्गा, भवानी

हीं तिची नांवें प्रसिद्ध आहेत. मदुरा येथें ही देवता मीनाक्षी या नांवानें पूजिली जाते. या देवतेच्या स्तुतिपर कांहीं लहान लहान काव्यें तामिळ भाषेंत आहेत. त्यांपैकीं सौंतरीय लकरी हें १०४ कवितांचें काव्य विशेष प्रसिद्ध आहे. या काव्याचे दोन भाग असून पहिल्या भागांत पार्वतीची कथा सांगितली आहे व दुसऱ्या भागांत तिच्या शरीराच्या प्रत्येक अवयवाचें बारकाईनें वर्णन केलेलें आहे.

स्कंद किंवा कार्तिकेय हा शिवाचा दुसरा मुलगा असून त्याला तामिळ देशांतील शैव लोक देवतांमध्यें बरेंच उच्च स्थान देतात. त्याला सुब्रह्मण्यम् मुरुगण व आरुमुगण अशींहि नांवें आहेत. त्याला इंद्राची मुलगी देवयानी ही एक बायको व दुसरी वल्लीनची ही बायको आहे असें म्हणतात. कांतपुराण-सुरुक्कम्, कातिरकममलयी, कुमारतलट्ट, मुरूकनअनुफाति, मुरुकरअंतति वगैरे ग्रंथ या देवतेसंबंधानें आहेत व वल्लि-यम्मई वेंप हा स्कंदाच्या दुसऱ्या बायकोच्या स्तुतिपर ग्रंथ आहे. गणेश हा शिव व पार्वती यांचा थोरला मुलगा होय. त्याचीं गणपति, पल्लयर, विनायकर, इत्यादि दुसरीं नांवें आहेत. गणपती अकवल, गणपति अंतता, गणपति कंदम, गणपति विरुत्तम्, विनायक अकवल, विनायकर कवचम् वगैरे स्तुतिपर ग्रंथ आहेत.

विष्णु ही एक महत्त्वाची देवता तामिळ देशांत आहे. विष्णूची बायको लक्ष्मी, वाहन गरुड आणि तुळशीवृक्ष यांनाहि तामिळ लोक पूज्य मानतात. पेरूमल हें विष्णूचें नांव दक्षिण हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहे. विष्णूच्या दहा अव-तारांसंबंधींच्या कथाहि सर्वश्रुत आहेत. कुरुपरंपरा पिरापवम् या गद्यग्रंथांत विष्णूचे बारा अलवार व इतर भक्तांची माहिती आहे. सुमुद्स्-प्पदि हा १५ व्या शतकांतील संस्कृत व तामिळ भाषेंतला ग्रंथ आहे; यामध्यें वैष्णव लोकांनीं कशा प्रकारें आचरण करावें व कोणत्या मार्गानें स्वर्ग मिळवावा तें सांगितलें आहे. नलइर पिरपंतम् हा ग्रंथ फार जुना आहे. त्याचा शेवटला भाग इयरप हा कलियुग लागण्यापूर्वी लिहिला आहे असें मानतात. कधीं कधीं याला तामिळ वेद असेंहि म्हणतात. याच्यांत एकंदर चार हजार कविता आहेत व त्याचे चार भाग आहेत. यांपैकीं पहिल्या भागांत कृष्णाच्या बाळपणच्या गोष्टी, दुसऱ्या भागांत वैष्णव देवालयासंबंधाची माहिती, तिसऱ्या भागांत विष्णु या देवतेसंबंधींची माहिती आणि चौथ्या भागांत विष्णूच्या प्रार्थनापर पद्यें आहेत. भागवतपुराणवचनम् हा १८ व्या शतकांतला गद्यग्रंथ असून त्यांत भागवत पुराणाचें सार गद्यामध्यें दिलेलें आहे. यांतील मुख्य भाग कृष्णकथेसंबंधीं असल्यामुळें हा ग्रंथ फार लोकप्रिय आहे. विष्णुपुराणवचनम् हें विष्णुपुराणाचें गद्यामध्यें सार आहे.

हनुमान हा वानरांचा राजा शिवाचा पुत्र आहे असें मानतात. हनुमारशतकम्, हनुमारअनुपति हे हनुमान देवतेच्या स्तुतिपर ग्रंथ आहेत. याशिवाय सरस्वती व इतर स्थानिक दैवतें यांच्या स्तुतिपर काव्यें आहेत. तामिळ मुलुखांत वैष्णव ग्रंथकार आणि कवी यांची एकत्वानें माहिती दिली पाहिजे. महाराष्ट्रांतील संतकवींप्रमाणेंच त्यांच्याकडे स्थिति आहे. तथापि आपल्या वैष्णव वीरांपेक्षां त्यांच्याकडे वैष्णव साधूंचा काल अगोदरचा आहे. तर त्यांपैकीं कांहींचा वृत्तांत येथेंच देतों.

ता मि ळ वै ष्ण व सा धूं च्या क था.—हे वैष्णव साधू आळवार या नांवानें प्रसिद्ध आहेत. या आळवारांचे काला-नुक्रमें तीन गट पडतात ( 'आळवार' पहा ). यांच्यासंबंधीं अनेक दंतकथा भाविक लोक सांगतात व ग्रंथांतूनहि सांपडतात. त्यांपैकीं कांहीं आळवारांच्या कथा पुढें दिल्या आहेत.

( १ ) यगयी आळवारः—याला शंख अवतार मानि-तात. कांजीवरम्जवळील एका विहिरींतलि कमळांत तो दृश्य झाला. त्या मानवी देहांत त्याचा आत्मा मूर्तिमंत होता. विष्णूचा शंख ज्या मानससृष्टींतून उत्पन्न झाला तीमध्येंच याचा जन्म दैवी रीतीनें झाला.

( २ ) भूतत्तार आळवारः—विष्णूची गदा ज्या मानस-सृष्टींतून उत्पन्न झाली तीमध्येंच दैवी रीतीनें याचा जन्म झाला. तिरुकदल्मल्लि येथील कुरुकत्ति नांवाच्या फुलांत तो सांपडला.

( ३ ) पेय आळवारः—विष्णूचें खड्ग ज्या मानससृष्टींत निर्माण झालें त्याच सृष्टींत दैवी रीतीनें याचा जन्म झाला, व मैलापुर ( मद्रास ) येथील एका विहिरींतील एका कम-ळांत हा सांपडला.

ईश्वराच्या कृपेमुळें हे तिघेजण आळवार रजोगुण व तमोगुण यांतून मुक्त होऊन फक्त शुद्ध सत्त्वमय बनले व केवळ ईश्वरसेवेकरितां राहिले. त्यांच्यामध्यें ज्ञानभक्ति व ऐहिक वस्तूंविषयीं वैराग्य वाढलें. त्यांनीं खाणेंपिणें वर्ज्य केलें व ईश्वरप्रीति हीच त्यांचा आधार बनली. संसारी मनु-ष्यांचा सहवास ते टाळीत असत व कोठेंहि दोन दिवसांहून जास्त वेळ न राहतां जातांना गांवोगांव लोकांना उपदेश करीत ते देशपर्यटन करीत. परंतु हा वेळपर्यंत त्यांची एक-मेकांशीं गांठ पडली नव्हती. पुढें ईश्वराची इच्छा, त्यांचा खरा स्वभाव लोकांच्या नजरेस आणून त्यांच्या शिक्षणाचा लोकांस जास्त फायदा देण्याची झाली. म्हणून त्यानें एका मोठ्या वादळांत दक्षिण अर्काट जिल्ह्यांतील तिरुकोवलूर येथें त्या तिघा आळवारांची गांठ घातली. त्यांच्यापैकीं एकजण वादळांत एकटा सांपडल्यामुळें एका ब्राह्मणाच्या घराच्या बाहेरच्या खोलींत गेला व दार बंद करून जमिनीवर पडून राहिला. नंतर दुसरा देखील वादळांत सांपडल्यामुळें त्याच खोलीजवळ येऊन त्यानें दार ठोठावलें. तेव्हां आंतल्या गृह-स्थानें येथें एका माणसास फक्त निजण्यापुरती जागा आहे

असें ओरडून सांगितलें, तेव्हां दुसरा म्हणाला, जर एकजण निजूं शकतो तर दोघे बसूं शकतील. तेव्हां हा ज्ञानी पुरुष आहे असें जाणून पहिल्यानें त्याला आंत घेतलें. नंतर कांहीं वेळानें तिसरा तेथें आला व त्यानें दार ठोठावलें. तेव्हां दोघांनीं ओरडून सांगितलें कीं येथें फक्त दोघांनां बसण्यापुरती जागा आहे. तेव्हां तिसरा म्हणाला जर दोघे बसूं शकतात तर तिघे उभे राहूं शकतील. हें ऐकून हा ज्ञानी पुरुष आहे अशी त्यांची खात्री होऊन त्यांनीं त्याला आंत घेतलें. यथोचित नमस्कार झाल्यावर त्यांनीं एकमेकांस प्रश्न विचारले; पहिला म्हणाला, " मी ईश्वराचा निरंतरसहवर्ती सेवक आहे. " दुसरा म्हणाला, "मी वासुदेवाचा सेवक आहे," व तिसरा म्हणाला, "ज्ञान व आनंद असा जो परमात्मा त्याशीं मी युक्त आहे. "

हे तिघे एकत्र झाल्यावर विष्णूला त्यांच्याजवळ जाण्याची इच्छा होऊन तो तेथें गेला. काळोख असल्यामुळें तेथें चौथा इसम असल्याचा त्यांनां भास झाला. ते योगी असल्यामुळें परमेश्वर येथें आल्याचें त्यांनां अंतर्दृष्टीनें समजलें. नंतर तेथें एकाएकीं मोठा उजेड पडून त्यांनां विष्णु व लक्ष्मी यांचें दर्शन झालें व हर्षोत्फुल्ल होऊन त्यांनीं प्रत्येकीं ईशस्तवनाचे १०० श्लोक, त्याच ठिकाणीं बनविले. एकाच्या श्लोकाचा शेवट दुसऱ्याच्या श्लोकाचा आरंभ होत असे.

(४) तिरुमळिशायी आळवारः—हा साधु दैविक-रीतीनें जन्मला. हा एका वेळूच्या झुडपांत तिरुवलन नांवाच्या इसमास सांपडला. त्यानें त्याला घरीं नेऊन वाढविलें. तो सात वर्षांचा असतांनां त्याला योगसाधनाची इच्छा झाली. योगाभ्यासांत ध्यान करण्याकरितां कांहीं साधन पाहिजे म्हणून त्यानें त्या काळच्या निरनिराळ्या भाषांतील तत्त्वज्ञानाच्या ग्रंथांचें अध्ययन ४०० वर्षेपर्यंत केलें. नंतर तो वैष्णव बनला. नंतर परमेश्वरानें त्याला क्षणभंगुर व अविनाशी असे दोन्ही लोक दाखविले व सृष्टीची रचना देखील दाखविली. त्यानें नंतर गजेंद्र सरो-वराजवळ ७८० वर्षेपर्यंत योगाचरण केलें.

शिवपार्वती व सिद्धपुरुष, किमया जाणणार, हे लोक त्याच्या जवळ आले व आश्चर्यचकित होऊन निघून गेले. नंतर तो एका गुहेंत योगांत निमग्न झाला. तेथें त्याची व तिरुकोरलूरच्या तिघां आळवारांची भेट झाली व ते चौघेजण मैलापुराला गेले. येथें तिरुमळीला सोडून पहिले तिघे आळ-वार यात्रेकरितां निघून गेले.

कांचीवरम् येथें पोयगयीच्या जन्माच्या वेळीं आऊन तिरु-मळिशायी ७०० वर्षे राहिला. राजा कनिकननला त्यानें चमत्कार दाखविला. नंतर तो कुंभकोणमला जाण्यास निघाला. वाटेंत पेरम्बुलियूर खेड्यांत वेदपठण करणाऱ्या ब्राह्मणांनां त्यानें थक्क करून सोडलें.

नंतर कुंभकोणमला आऊन त्यानें नम्माळवार याचा तिरु-वोरमोलि ग्रंथ पाहिला व आपले ग्रंथ कुचकामाचे समजून त्यानें कावेरीमध्यें फेंकून दिले. परंतु त्यांतील दोन ग्रंथ ओघा-वरोवर वाहूं लागले. तेव्हां ते उपयोगी आहेत असें समजून त्यानें पाण्यांतून ते काढून घेतले व तदनुरूप लोकांनां उपदेश करूं लागला. तो ४७०० वर्षांचा होऊन स्वर्गाला गेला.

नम्माळवार, कुलशेखर, अंदाळ या दुसऱ्या गटांतील आळवारांची माहिती स्वतंत्र त्या त्या नांवाखालीं दिलेली आहे.

(१) तोंडरडिपोडी आळवारः—श्रीरंगमजवळील मंदन्गुडि खेड्यांत विष्णूच्या वनमाला नांवाच्या पुष्पमालासृष्टींत हा जन्मला. याला प्रथम विप्रनारायण म्हणत असत. त्याच्या बापानें त्याला उत्तम शिक्षण दिलें होतें, व तो श्रीरंगमला नित्य जात असल्यामुळें तेथील देवाचा भक्त बनला. विष्णु-चित्ताप्रमाणें हा देखील फुलें मिळवून देवाकरितां त्यांचे हार बनवीत असे.

एके दिवशीं बागेंत काम करीत असतांनां एक देवदासी वेश्या व तिची बहीण, उरय्यूर राजाच्या लवाजम्यांत परत येत होती. ती फार थकल्यामुळें बागेंत थोडीशी विश्रांति घेत बसली. इतक्यांत तिला विप्रनारायण दिसला. परंतु त्याच्या मनावर या वेश्येला पाहून कांहींच परिणाम झाला नाहीं. तेव्हां ती म्हणाली कीं, हा अभागळ असावा. त्यावर तिची बहीण म्हणाली कीं तो असामान्य पुरुष आहे; तूं जर त्याला वश करशील तर मी तुझी सहा महिने दासी होईन. यावर देवदासी म्हणाली न जिंकल्यास मी तुझी सहा महिने दासी होईन. लागलीच ती स्त्री भक्तवेषानें विप्रनारायणाजवळ जाऊन नमस्कार करून म्हणाली मी वेश्या आहे व पापाचरणामुळें नरकांत जाण्याची मला फार भीति वाटते, तर आपल्याजवळ आश्रय देऊन माझा आपण उद्धार करावा. विप्रनारायणानें तें कबूल केलें हळू हळू देवदासीनें त्याला मोहित करून देव-ळांतून आपल्या घरीं नेलें व त्याचें द्रव्य हरण करून त्याला हांकून दिलें. नंतर तो तिच्या घराभोंवतीं फिरत्या घालीत असे. एके दिवशीं लक्ष्मी व विष्णु रस्त्यानें जात असतां विप्र-नारायणाची कष्टावस्था पाहून लक्ष्मीला कींव आली व तिनें विष्णूला विनविलें व त्याच्या कृपेमुळें विप्रनारायणाचा मोह निघून गेला. तो पूर्वीपेक्षां जास्त भक्त झाला व त्यानें आपलें नांव बदलून तोंडरडिपोडी म्हणजे देवाच्या सेवकाच्या चरणाची धूलि असें ठेविलें.

(२) तिरुप्पाण आळवारः—हा विष्णूच्या वक्षस्थलावरील श्रीवत्स चिन्हाच्या सृष्टींत दैविक रीतीनें जन्मला व उरय्यूर मधील एका शेतांत पंचम जातीच्या इसमास सांपडला. या वेळेस चोळराजा धर्मवर्मा हा राज्य करीत होता. तिरुप्पाणाला चांगलें धार्मिक शिक्षण मिळालें व तो फार चांगला गवयी बनला. हा नेहमीं वीणा जवळ बाळगीत असे. नित्य

सूर्योदयापूर्वी कावेरींत स्नान करून वाळूची देवतामूर्ति करून तीपुढें तो गात असे व ब्राह्मण लोक येण्यापूर्वी ती मोडून घरीं जात असे.

एके दिवशीं तिरुप्पाण पूजेंत इतका गढून गेला कीं त्याला वेळेचें मुळींच भान राहिलें नाहीं. ब्राह्मण या पंचमाला पाहून फार रागावले व मुख्य उपासक श्रीलोकसरंगमहामुनिंद्र यानें त्याला गोटा मारला. तेव्हां तो जखमी होऊन पळून गेला. हा लोकसरंग नंतर देवळांत गेला तेव्हां त्याला देवळाचा दरवाजा उघडतां येईना. त्यानें देवाची क्षमा मागितली तेव्हां आंतून ध्वनि निघाला कीं तिरुप्पाणला खांद्यावर घेऊन ये. नंतर लोकसरंगनें दुसऱ्या दिवशीं प्रातर्विधि आटोपून तिरुप्पाणाला आपल्या खांद्यावर घेऊन देवाच्या मूर्तीजवळ आणलें. तेव्हा देवानें प्रगट होऊन त्यास दर्शन दिलें. आनंदभरित होऊन तिरुप्पाणानें देवाच्या नखाशिखांत वर्णनात्मक दहा श्लोक केले व वीणेवर गायन केलें. हें झाल्यावर कोणतीहि वस्तु डोळे उघडून पाहण्याचें त्यानें नाकारलें तेव्हां सर्वांसमक्ष तो देवाच्या मूर्तीत अदृश्य झाला.

( ३ ) तिरुमंगयी आळवार:—चोल देशांतील तिरुवलि तिरुननगिरीजवळ कुरयलूर नांवाच्या ठिकाणीं म्लेच्छ मातापितरांपासून विष्णूच्या धनुष्यसृष्टींत हा निर्माण झाला. याच्या पित्याचें नांव नील होतें व याला प्रथम नीलानिरत्तन म्हणत असत. हा चोलराजाचा सैनिक होता. येथें यानें इतकें शौर्य दाखविलें कीं अखेरीस राजानें याला मुख्य सेनापति करून राज्याच्या कांहीं भागाचा अधिकार यांजकडे सोंपविला.

तेथें दक्षतेनें राज्य करीत असतां त्याच्या राजधानीच्या शहराजवळील एका तळ्यांत कांहीं अप्सरा स्नानाकरितां आल्या. पैकीं एक दुसऱ्या तळ्याकडे निळीं कमळें तोडण्याकरितां गेली असतां बाकीच्या अप्सरा निघून गेल्या व ती अप्सरा मात्र तेथें मानववेषानें राहिली. एके दिवशीं एक वैष्णवभक्त तेथें स्नानास गेला असतां त्याला ती सांपडली. कपीलाचार्याच्या शापामुळें आपण येथें आहों असें तिनें त्याला सांगितलें व नीलानिरत्तनला वैष्णव करून त्याशीं लग्न केल्यास तिचा उद्धार होईल असा तिला शाप होता. तेव्हां त्या वैष्णवानें तिला घरीं नेऊन मुलीप्रमाणें पाळलें व तिचें नांव कामलवल्ली ( निळें कमळ ) असें ठेविलें.

तिचें सौंदर्य पाहून नीलानिरत्तन मोहित झाला व तिच्या सांगण्यावरून वैष्णव होऊन तिच्याशीं त्यानें विवाह केला व आपलें नांव तिरुमंगया असें बदलून रोज हजार वैष्णवांनां अन्नदान करूं लागला. परंतु या खर्चामुळें त्याला राजाची खंडणी देतां येईना तेव्हां राजानें त्याच्यावर स्वारी केली, परंतु तिरुमंगयीनें त्याचा पराभव करून त्याचें राज्य घेतलें. पुढें राजानें ब्राह्मणाचा कपटवेष धारण करून तिरुमंगयीपासून सर्व राज्य परत मिळविलें व नंतर त्याला कैद करून तिरुनरयूर देवळांत पाठविलें. तेथून त्याला कंडी येथें पाठविलें व तेथें वेगवती नदीच्या कांठीं देवाच्या सांगण्यावरून त्याला द्रव्य मिळालें व तें राजाला देऊन त्यानें आपली सुटका करून घेतली.

पुढें तो व त्याचे अनुयायी वैष्णव लोकांनां अन्नदान करण्याकरितां दरोडे घालून द्रव्य मिळवूं लागले. त्यांनीं एक बुद्ध देवळांतील सुवर्णमूर्ति नेली व साक्षात लक्ष्मी व विष्णु यांनीं नवरदेवनवरीचें रूप धारण केलें होतें,: त्यांच्या अंगावरील दागिने नेले परंतु हें द्रव्य पुरलें नाहीं. तेव्हां तिरुमंगयीनें श्रीरंगम् येथील देवळाचें काम करणाऱ्या लोकांनां एका जहाजांत घालून खोल समुद्रांत नेलें व त्यांनां विचारलें द्रव्य पाहिजे कीं स्वर्ग पाहिजे. तेव्हां त्यांनीं स्वर्ग पाहिजे म्हणून उत्तर दिलें. तिरुमंगयीनें हें ऐकून तें जहाज बुडविलें व आपण एकटाच परत आला. बुडालेल्या लोकांच्या नातलगांनीं त्यांच्याबद्दल तिरुमंगयीजवळ मागणी केली त्यावेळीं देवाच्या सांगण्यावरून त्यानें त्या लोकांनां हांक मारावयास त्यांच्या नातलगांस सांगितलें. तेव्हां त्या बुडालेल्या लोकांनीं आपण स्वर्गसुखांत आनंद करीत असल्याचें सांगितलें. यानंतर तिरुमंगयीनें कन्याकुमारीपासून हिमालयापर्यंत सर्व तीर्थें पाहिलीं व वाटेनें वैष्णव धर्माचा प्रसार केला. परत आल्यावर श्रीरंगम्च्या देवळांत गेला तेव्हां देवानें त्याला स्वतः मूर्ति होऊन देवाचे पराक्रम अनुभवण्यास सांगितलें व तिरुमंगयीची मूर्ती त्याच्या जन्मठिकाणीं स्थापली गेली. या मुर्तीची पूजा लोक अद्याप करतात. [ इं. अँ. पु. ३४, पृ. २७३–२८६. ]

ज्योतिषशास्त्र, शकुन व जादूमंत्र.—तामिललोकांचा ज्योतिष, शकुन, जादूटोणा, वगैरेंवर फार भरंवसा आहे. प्रत्येक इसमाची जन्मपत्रिका बहुतकरून तयार केलेली असते व प्रत्येक महत्त्वाच्या प्रसंगीं ज्योतिषाचा सल्ला घेण्यांत येतो. सुदमनी उलमुदेय्यन हा १७ व्या शतकाच्या सुमाराचा ज्योतिषशास्त्रावरील ग्रंथ सर्वमान्य समजला जातो. पोरुत्तनुल या ग्रंथांत विवाहसंबंधीं, ऋतुनुल या पुस्तकांत स्त्रियांच्या ऋतुप्राप्तीसंबंधीं ज्योतिषशास्त्रीय विचार दिलेले आहेत. शुभाशुभ शकुन पाहण्यासंबंधानें बरींच पुस्तकें आहेत. कनविन नुल या पुस्तकांत स्वप्नावरून शुभाशुभ पाहण्याची माहिती दिली आहे. शास्तिरभ या पुस्तकांत सामुद्रिकाविषयीं माहिती आहे. पंचपरिस शास्तिरम् या ग्रंथामध्यें गिधाड, घुबड, कावळा, कोंबडा व मोर या पांच पक्ष्यांवरून शुभाशुभ ठरविण्याचे नियम सांगितले आहेत. सरनुल शास्तिरम् यामध्यें श्वासोच्छ्वासावरून ( डाव्या उजव्या नाकपुडींतील सुरावरून ) शकुन पाहण्याची रीत सांगितली आहे. तुदिनुल यामध्यें शरीरावयवांच्या स्फुरणावरून ( डोळ्यांच्या पापण्या लवणें वगैरे ) शुभाशुभ पाहण्याचे नियम दिले आहेत. तामिळ लोकांचा जादूटोण्यावरहि फार विश्वास आहे ही गोष्ट, त्यांच्यामध्यें जीं एकंदर ६४ शास्त्रें व कला आहेत त्यांपैकीं २० जादूगिरीबद्दल आहेत यावरून

दिसून येते. जादूमंत्रांच्या साहाय्यानें माणसामाणसांमध्यें शत्रुत्व उत्पन्न करणें, माणसाचें मन वळविणें, विषाची बाधा नाहींशी करणें, मनुष्यानें हवेमध्यें मिसळून अदृश्य होणें, हवेमध्यें निराधार चालणें, स्वतःचा जीव स्वतःच्या शरीरांतून काढून दुसऱ्याच्या मृतशरीरांत प्रविष्ट करणें, तरवार किंवा इतर हत्यार शक्तिहीन करणें, वगैरे गोष्टी करतां येतात व या सर्वांबद्दलची माहिती देणारीं पुस्तकें आहेत. कोंगकनर कदर्कंदम या पुस्तकांत जादूचीं वर्तुळें कशीं काढावीं, बळी कोणते द्यावे वगैरे गोष्टी सांगितल्या आहेत. 'पुलिपनी मुनिवर पलतिरट्टुजल सितंपरम्' या पुस्तकांत जादू व नजरबंदी वगैरे संबंधींची माहिती आहे. 'सुंतर नंतर केसरी' या पुस्तकांत दीर्घायुष्य प्राप्त होण्याचें औषध करण्याची कृति सांगितली आहे. हें औषध ४० दिवस घेतल्यास मनुष्य १०० वर्षे जगतो, ८० दिवस घेतल्यात ४०० वर्षे जगतो वगैरे या पुस्तकांत सांगितलें आहे.

ऐतिहासिक वाङ्मय.—तामिळ भाषेंत ऐतिहासिक ग्रंथ नाहींत. तथापि चरित्रकाव्यग्रंथांमुळें प्राचीन काळाची माहिती देणारे ग्रंथ नाहींत असें नाहीं. प्राचीन काळा पासून तामिळ लोकांचा आयुष्यक्रम चित्रित करणारे उल्लेख काव्यग्रंथांत प्राचुर्यानें आहेत. तसेंच समकालीन राजाच्या उल्लेखामुळें तामिळ ग्रंथकारांचा काळ अधिक निश्चितपणें काढतां येतो व राजेलोकांची कुलपरंपरा निश्चित करतां येतें तथापि प्राधान्यानें ऐतिहासिकता ज्यांत आहे असे ग्रंथ उपलब्ध नाहींत. काव्यग्रंथांचें स्वरूप असलेले ग्रंथ ऐतिहासिक उपयोगाचे कसे होतात हें दाखविण्यासाठीं कांहीं उदाहरणें देतोंः—

तंजावर येथील सरस्वतीमहालमध्यें (पुस्तकालय) 'विक्रम चोलन युला' हा तामिळ भाषेंतील ग्रंथ आहे. तामिळ भाषेमध्यें ज्याला युला म्हणतात त्या छंदामध्यें लिहिलेली ही एक कविता आहे. या कवितेंत नायकाच्या पूर्वजांचें वर्णन देऊन नंतर नायक, आपले सरदार व परिवार यांसह जेव्हां बाहेर निघतो त्यावेळच्या त्याच्या स्वारीचें वर्णन दिलेलें आहे. या कवितेंत चोल राजांची वंशावळी आहे, (१) शेंगत–चोल यानें चेर राजास पोयागी कवीची कलवली कविता ऐकून बंधमुक्त केलें. (२) विक्रमचोल या कवितेचा नायक शेंगतचोल याचा मुलगा होता. या राजाच्या स्वारींत त्याच्या भोंवतीं असलेले मांडलिक राजे पुढें दिले आहेतः-(१) तोंडिमान पल्लव राजा, (२) मुनैयर–कोन अथवा मुनैचा राजा, (३) चोल कोन अथवा चोल राज्याचा राजप्रतिनिधि, (४) दमन ब्राह्मण, (५) वानन अथवा बान राजा, (६) कालिंगर कोन अथवा कलिंगचा राजा, (७) कादवन शेजी डोंगरी किल्ल्याचा राजा, (८) वेनाडुचा राजा, (९) अनंतपालन, (१०) वसवन, (११) चेदिनाडुचा राजा, (१२) अग्निकाव्हळचा राजा, (१३) अदिगन, (१४) वळमन व (१५) तिरिगत्तन. या राजाचे पूर्वज ब्रम्हा, सूर्य इत्यादि देवतांपासून उत्पन्न झाले असें या कवितेंत वर्णिलें आहे. ही कविता कोणीं व केव्हां केली ही माहिती उपलब्ध नाहीं.

कलंबगः—हा तामिळ वाङ्मयांतील पद्याचा एक प्रकार आहे. यांत निरनिराळ्या वृत्तांत व निरनिराळ्या तऱ्हेनें नायकाची स्तुति केलेली असते. हें स्तवन जर ईशस्तवन असलें तर १०० कवितांत असले पाहिजे आणि साधूचें ९५ कवितेंत, राजाचें ९० कवितेंत, प्रधानाचें ७० कवितेंत, वैश्याचें ५० किंवा ३० श्लोकांत असलें पाहिजे. यांतील मागील श्लोकाचें अंत्याक्षर व पुढील श्लोकाचें आद्याक्षर एकच असावें लागतें.

नंदि–कलंबगः—हें काव्य नंदि नांवाच्या राजाच्या स्तुतिपर असून त्यांत ११० कविता आहेत. ही गोष्ट अनियमित अतएव जरा चमत्कारिक आहे. हें काव्य नायकाच्या धाकट्या भावानें लिहिलेलें असावें. या काव्यांत या राजाला पल्लव राजा म्हटलें आहे व हा सोमवंशीय होता असाहि यांत उल्लेख आहे. याच्या राजधानीसंबंधीं निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळे उल्लेख आहेत. कोठें याची राजधानी कांची म्हणजे कांजीवरम्, कोठें मल्ले म्हणजे अर्वाचीन महाबलपुर, व कोठें मयिले अथवा मैलापुर म्हणजे अर्वाचीन मैलापुर आहे असा उल्लेख आहे. नंदि राजाच्या राज्याचा विस्तार (१) तोंडे नाडु, (२) कावेरी नदीच्या कांठचा प्रदेश, (३) चेरा प्रदेश, (४) कोंगु प्रदेश (५) अळैं नाडु व (६) पश्चिम प्रदेश या भागांवर झालेला होता. बाण राजे व उत्तरवेंकटाचे राजे हे त्याचे मांडलिक होते. नंदि राजानें तेळ्ळारु, कुरुकोडु, पळैयारु, वेळ्ळारु व नळ्ळारु येथें लढाया जिंकल्या; या राजाला चेर, चोल व पांड्य हे राजे खंडणी देत होते. हा राजा तामिळ वाङ्मयाचा भोक्ता होता. या काव्यांत नंदि राजाला निरनिराळीं आडनांवें दिलीं आहेत. शिलालेखांतील माहितीवरून असें दिसतें कीं बाहूर लेखांत उल्लेख असलेला दंतिवर्म्याचा पुत्र नंदि हाच या काव्यांतील नायक असावा. दंतिवर्मा हा राष्ट्रकूटच्या गोविंद राजाचा (इ. स. ७८२–८१४) समकालीन होता. म्हणजे नंदि राजा हा नवव्या शतकाच्या मध्यभागांत झाला असावा.

नंदिराजाचे शिलालेख चोल व तोंडिनाडु येथें सांपडतात. या राजाच्या शिलालेखांवरून बाण राजांचा हा सार्वभौम असावा असें उघड उघड दिसतें व याचा बाप बाण राजांचा सार्वभौम होता असाहि पुरावा सांपडतो. नंदीच्या ज्या आडनांवांचा उल्लेख काव्यांत आहे त्यांपैकीं कांहीं त्याच्या शिलालेखांत व त्याच्या बापाच्या शिलालेखांत सांपडतात. बाहूर येथील शिलालेखांत दंतिवर्मा व नंदीचा मुलगा नृपतुंगवर्मा हे दोघे कट्टे विष्णुभक्त होते असा उल्लेख आहे. परंतु नंदि–कलंबगं काव्यांत नंदि हा कट्टा शिवभक्त होता असें म्हटलें आहे.

इरैयण्णार—अगप्पोरुळः—हें काव्य म्हटलें म्हणजे प्रणय विषयावरील एकच प्रबंध होय. प्रणयाबरोबरच या काव्यांत

विवाह, सबलभपलायन वगैरे विषयांची चर्चा केली आहे. या काव्यांत ६० सूत्रें असून त्याला सुंदर तामिळ भाषेत लिहिलेली उत्कृष्ट टीका जोडलेली आहे. टीकेच्या "पायिरम्" भागांत हें काव्य मदुरेच्या शिवानें लिहिलेलें आहे, असा उल्लेख आहे.

तामिळ भाषेच्या तिसऱ्या संघाला आश्रय देणाऱ्या ४९ राजांपैकीं शेवटचा राजा उग्रप्पेरुवाळुदि याच्या कारकीर्दीत मथर दुष्काळ पडल्यामुळें त्यानें आपल्या पदरच्या विद्वानांनां रजा दिली. पुढें १२ वर्षांनंतर त्यानें पुन्हां या लोकांनां बोलाविलें. परंतु आलेल्या लोकांत "पोरुळडिंगारमा" मध्यें (प्रणयामध्यें ?) कोणीहि तरबेज नव्हता. यामुळें राजाला वाईट वाटलें, तेव्हां सोमसुंदरदेवानें ताम्रपटांवर हीं ६० सूत्रें लिहिलीं व देवळांत ते ताम्रपट ठेविले. राजाकडे हे ताम्रपट आणल्यावर त्यानें विद्वान लोकांनां त्यांचा अर्थ सांगण्यास सांगितलें. परंतु ते परस्परविरोधी अर्थ सांगावयास लागले. तेव्हां याचा निकाल कसा लावावा याचा राजाला विचार पडला असतां आकाशवाणी झाली कीं, रुद्रशर्मा नांवाच्या आंधळ्या मुलाला व्यासपीठावर बसवून त्याजपुढें निरनिराळ्या पंडितांनीं आपापले अर्थ सांगावे म्हणजे जो अर्थ सांगत असतां या आंधळ्या मुलाच्या डोळ्यांतून अश्रू येतील त्याचा अर्थ खरा असें समजावें. त्याप्रमाणें केलें असतां नक्कीवरची टीका सुरू झाली असतां प्रत्येक शब्दावरोवर त्या आंधळ्या मुलाच्या डोळ्यांतून अश्रु येऊं लागले. यावरून त्याचीच टीका खरी असें सिद्ध झालें. ही टीका पुढें मुशिरिय-अशिरियन नीलकंठण्णार यांनें लिहून काढली.

इरैयण्णारांत ४०० पेक्षां जास्त स्पष्टीकरणात्मक कविता आहेत. त्यांपैकीं ३१५ कविता नेडुमारण राजाच्या स्तुतिपर आहेत. यांत हा राजा पांड्य वंशांतील आहे असें म्हटलें असून त्याचीं १३ उपपदें दिलेलीं आहेत. हा राजा काळ्या वर्णाचा होता व हा तामिळ भाषेचा फार चहाता होता. यानें समुद्रमंथन करून देवांनां अमृत दिलें असें या काव्यांत आहे. यावरून कवि राजाला विष्णूचा अवतार समजत असावा असें वाटतें. त्यानें २० लढाया मारल्या त्यांपैकीं बऱ्याच चेर राजांशीं झाल्या. त्यानें एक जलयुद्धहि केलें होतें. नेडुमारण यास वाणवण, शैंबियाण, सोलण व तेण्णावाण अशीं नांवें आहेत. नेडुमारणानें शंगमंग व नेलवेलि येथें एका शत्रूशीं लढाई केली असें या काव्यांत आहे, शंगमंग हें पल्लव राजाची राजधानी कांजीवरम् याच्याजवळ आहे. यावरून ही लढाई पल्लव राजाशीं झाली असावी. कांहीं उपलब्ध शिलालेखांवरून ही लढाई नंदिवर्मन पल्लवमल्लाशीं झाली असावी असें दिसतें, व नंदिवर्मन् पल्लव राजा ७६० सालीं वारला. यावरून नेडुमारण हा इसवी सनाच्या ८ व्या शतकाच्या मध्यांत झाला असावा.

इरैयण्णार—अगप्पोरुळमधील सूत्राच्या लेखनाचा काल इ. स. ५०० पासून ७०० यांच्या दरम्यान असावा. त्या काव्यांत उल्लेखिलेलीं स्थळें हल्लींहि सांपडूं शकतात.

दंतकथेवरून मदुरा येथें व मदुरेच्या आसपास तीन तामिळ संघ झाले असें दिसतें. पैकीं तिसऱ्यासंबंधींचीच माहिती उपलब्ध आहे. या संघांतील सभासदांमध्यें ४९ कवी व टीकाकार होते. पांड्य राजांपैकीं मुडतिरुमारन व उग्रपेरुवलुधि यांनीं या संघाला आश्रय दिला. यांपैकीं दुसऱ्याच्या कारकीर्दीतच तिरुवल्लुवर याच्या कुरळ या काव्याच्या प्रसिद्धीस अनुज्ञा मिळाली. तिरुवल्लुवर याची बहीण अव्वैयार हिच्या काव्यांत उग्रपांड्यन् राजाचें वर्णन आहे; यावरून तिरुवल्लुवर हा उग्रपांड्यन् याचा समकालीन असावा.

परनर याच्या काव्यावरून सेंगुट्टन सेर, अदियमान अंजि, अव्वैय्यार व स्वतः कवि हे एकाच वेळीं किंवा निदान एकाच पिढींत होऊन गेले असावे असें दिसतें. सेंगुट्टनसेर हा राजा फार मोठा असून त्याच्या दरबारीं शिल्पाधिकारम् व मणिमेखलै हे ग्रंथ तयार झाले.

संघांतील दुसरा प्रख्यात कवि कपिलर हा होय. हा वेळपारि राजाच्या आश्रयाखालीं होता. यानें ऐंगुरुनुरु काव्याचा कुरुंजि हा भाग, दशदशकाचा (टेन टेन्स) सातवा भाग, कुरुंजिपाट्टु व इन्न हे ग्रंथ लिहिले.

सेंगुट्टन याच्या काळांत दोन महाकाव्यें झालीं. पैकीं एक पैंजणकाव्य हें शिलप्पधिकारम् या नांवानें प्रसिद्ध आहे. त्याचा सारांशः—पूहार येथील कोवलन नांवाच्या वैश्य पुत्राचें लग्न तेथील कण्णहि नांवाच्या वैश्य कन्येशीं झालें. हें जोडपें आईबापांपासून दूर रहात असतां कोवलन याची प्रीति एका नर्तकीवर जडली व तो बहुतेक वेळ तिच्यात्र सहवासांत घालवी. तरीहि त्याच्या स्त्रीचें त्याच्यावर असलेलें प्रेम यामुळें कमी झालें नाहीं. कोवलनपासून नर्तकीला एक मुलगी झाली. पुढें नर्तकी व कोवलन यांनां परस्परांच्या प्रेमाबद्दल संशय आला. कोवलन हा पुन्हां आपल्या पत्नीच्या सहवासांत दिवस घालवूं लागला व व्यापाराच्या उद्देशानें तो श्रीरंगम्‌कडे जाण्यास निघाला. त्याच्या पत्नीनें त्याला व्यापाराकरितां आपल्या पैंजणाची जोडी दिली. पैकीं एक पैंजण घेऊन तो विकावयास गेला असतां एका सोनारानें तो आपण विकत घेतों असें सांगून त्याला बसवून ठेविलें व स्वतः जाऊन राजाला सांगितलें कीं राणीचें पैंजण चोरणाराला मी पकडलें आहे. राजानें त्याला मारण्याचा हुकूम दिला, तेव्हां कोवलन मारला गेला. पुढें त्याच्या पत्नीनें राजाची कोवलनच्या शुद्धतेबद्दल खात्री करून मदुरा शहर जळेल असा शाप दिला व एका देवतेच्या प्रसादानें तिला तिचा पति पुन्हां मिळाला.

दुसऱ्या काव्यांत वरील काव्याचा पुढला भाग आहे तो असाः—कोवलनाचें जिच्यावर प्रेम होतें ती माधवी नांवाची

नर्तकी कोवलनच्या निधनाची वार्ता ऐकून बौद्ध धर्माची दीक्षा घेऊन ऐहिक सुखाचा त्याग करून कालक्रमणा करूं लागली. तिची कन्या मणिमेखला हिचें नांव या काव्याला दिलेलें आहे व त्यांत तिचा ऐहिकसुखत्याग व बौद्ध धर्म स्वीकारण्याकरितां तिनें केलेले प्रयत्न व पूहारच्या राजपुत्राच्या प्रेमयाचनेचा तिनें कसा अव्हेर केला वगैरे गोष्टींचें वर्णन आलेलें आहे.

या कथानकाच्या वेळीं पूहार येथें कारिकल नांवाचा राजा राज्य करीत होता असें त्यांतील वर्णनावरून दिसतें. तसेंच मणिमेखलै या काव्यावरून कारिकालनंतर किल्ली नांवाचा राजा पूहार येथें राज्य करीत होता असें दिसतें.

पैंजण काव्यांत नेडुम चेलियन नांवाच्या पांड्य राजाचा उल्लेख असून त्याचा कोर्कै येथील प्रतिनिधि इळंचेलियन याचाहि उल्लेख आहे. या पांड्य राजाच्या कारकीर्दीत संघांतील पुष्कळ प्रख्यात कवी उदयास आले व तो स्वतःहि तामिळ वाङ्मयांत बराच प्रख्यात आहे. या दोन काव्यांवरून असें दिसतें कीं त्यांत वर्णिलेल्या कथानकाच्यावेळीं पूहार येथें कारिकल व त्याचा नातू कोक्किळ्ळी हे राज्य करीत होते. कारूर येथील चेर राजा सेंगहुव चेर हा होता व हाच पैंजण काव्याच्या लेखकाचा भाऊ व मणिमेखलै काव्यकर्त्याचा आश्रयदाता होय. त्याचा पिता व चुलता हे अनुक्रमें दशदशकाच्या २ ऱ्या व ३ ऱ्या भागांतील नायक होत.

वर दिलेल्या कवींशिवाय या कालांत दुसरेहि प्रख्यात कवी झाले, त्यांत तिरुवल्लुर, इळंगोवडिगाल, शिष्पले, शट्टनार, रुद्रिरांगण्णनार, मुडथामक्काणियार, मांगुडि मरुडनार, नक्कीरर वगैरे मुख्य होत व यांचे ग्रंथ आजतागायत तामिळ वाङ्मयांत सर्वोत्तम मानले जातात.

यांपैकीं पैंजण व मणिमेखलै काव्यांवर बौद्ध धर्माचा बराच परिणाम झालेला दिसतो व त्यावरून या काव्यांचा काळ बौद्ध काल होता असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं व बौद्ध धर्माचा ऱ्हास इ. स. च्या ७ व्या शतकाच्या सुमारास झाला. हीं काव्यें ज्याच्या दरबारीं झालीं तो सेंगट्टुव राजा सिलोनच्या गजबाहूचा समकालीन होता असें दिसतें. कारण पत्तिनी देवीच्या देवळाच्या शुद्धीच्या वेळच्या यज्ञाला सिलोनचा गजबाहू राजा आला होता. सिलोनमध्यें दोन गजबाहू झाले. पहिला गजबाहू इसवी सन ११३–१२५ पर्यंत होता आणि दुसरा इ. स. ११४२–११६४ पर्यंत होता. यावरून वरील गजबाहू पहिलाच असला पाहिजे असें दिसतें. या पुराव्यावरून असें दिसतें कीं तामिळ वाङ्मयाचा विशेष भरभराटीचा काल अगदीं अलीकडे म्हटला तरी निदान इ. स. चें २ रें अथवा ३ रें शतक असला पाहिजे. गजबाहूशिवाय पैंजण काव्यांत दुसऱ्या कांहीं राजांचा उल्लेख आहे व त्यांच्या कालनिर्णयावरूनहि असें दिसतें कीं तामिळ वाङ्मयाचा भरभराटीचा काल इ. स. २ रें व ३ रें शतक असला पाहिजे.

मदुरैकांची हें पत्तुपाट्टु नांवाच्या दहा काव्यांच्या समुच्चयांतील एक आहे. हें काव्य तामिळ भाषेंत आहे व मांगुडि मरुडणार हा त्याचा कर्ता आहे. हें काव्य त्या वेळच्या देशाची समाजाची, लोकांची व तसेंच राजांची ऐतिहासिक माहिती मिळविण्याच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें आहे. नच्चिणार्क्किनियार नांवाच्या तामिळ विद्वानानें त्या काव्यावर टीका केली आहे. पांड्य राजा नेडुञ्जेळियन याचें व त्यानें युद्धांत दाखविलेल्या पराक्रमाचें वर्णन या काव्यांत आहे. तलैयालंगाणम् येथें नेडुञ्जेळियन यानें दोन पराक्रमी राजांना व व पांच संस्थानिकोंना लढाईत जिंकलें व यानें नेल्लूरहि घेतलें असें म्हणतात. वडिम्बलंबनिन्न पाण्डियन आणि पल्यागशालैमुडुकुमि पेरुव्हळुडि हे त्याच्या पूर्वजांपैकीं दोघे आहेत.

मदुरैकांची आणि त्यांतील नायक यांचा कालनिर्णय करण्याकरितां लागणारी माहिती शिन्नमनूर ताम्रपटांत आणि वेळविकुडि शासनपत्रांत सांपडते. वेळविकुडी शासनपत्रांत कडुङ्गोन नांवाच्या पहिल्या पांड्य राजापासून त्याच घराण्यांतील शेवटल्या जटिलवर्मन्पर्यंत सर्वांचीं नांवें दिलीं आहेत. जटिलवर्मन् आणि परांतक शडैयन हे दोघेहि एकच होते, कारण या दोघांचाहि मधुरकवि हा प्रधान होता असें ताम्रपटांत आणि शासनपत्रांत दिलें आहे. परांतक शडैयन याच्या कारकीर्दीत अनैमलै डोंगरावरील नरसिंह पेरुमाळ नांवाचें मंदिर बांधलें. म्हणून परांतक शडैयन किंवा जटिलवर्मन् याचा इ. स. ७६९–७० हा काल ठरतो. वेळविकुडि शासनपत्रांत दिलेल्या पांड्य राजांच्या वंशावळीप्रमाणें शेळियन हा कडुङ्गोन याचा नातू आहे. शेळियन आणि तलैयालंगाणम् येथें विजयी झालेला पांड्य राजा (नेडुञ्जेळियन) हे दोघेहि एकच असावेत असें दिसतें. कारण पांड्य राजांच्या वंशावळींतील दुसऱ्या कोणत्याहि राजाचें नांव शेळियन नाहीं आणि सिन्नमनूर ताम्रपटांत शेळियनच्या नंतरच्या राजापासून पांड्य वंशांतील राजांची वंशावळ दिलेली आहे व त्यांत तलैयालंगाणम् येथें झालेल्या लढाईचाहि उल्लेख केला आहे. या कारणांवरून असें वाटतें कीं नेडुञ्जेळियन आणि कडुङ्गोन हे दोघेहि एकच होते असें मानण्यास थोडाबहुत आधार आहे. वर दिलेंच आहे कीं पांड्य घराण्यांतील शेवटचा राजा जटिलवर्मन् हा इ. स. ७६९–७७० मध्यें होता. जटिलवर्मन्चा प्रधान मधुरकवि त्याच्या कारकीर्दीच्या तिसऱ्या वर्षी जिवंत होता. पण अनैमलै मंदिराची स्थापना झाली त्यावेळीं नव्हता. म्हणून इ. स. ७६९–७७० हीं जटिलवर्मन्च्या कारकीर्दीचीं शेवटलीं वर्षे असावीं असें धरून चालण्यास हरकत नाहीं. वेळविकुडि शासनपत्रांत दिल्याप्रमाणें नेडुञ्जेळियन हा पांड्य घराण्यांतील तिसरा व जटिलवर्मन् (इ. स. ७७०) हा शेवटचा म्हणजे सातवा राजा होता. प्रत्येक राजाची कारकीर्द जरी तीस वर्षांची

धरली तरी नेडुञ्जेलियनच्या कारकीर्दीच्या सुरवातीपासून जटिलवर्मनूच्या कारकीर्दीपर्यंत १५० वर्षें होतात. म्हणून नेडुञ्जेलियन याच्या कारकीर्दीस इ. स. ६२० ( ७७०–१५० ) पासून सुरवात झाली. इतर सबळ पुरावा मिळेपर्यंत मदुरैकांची हें काव्य आणि नेडुञ्जेलियन हे सातव्या शतकाच्या आरंभीं झालें असें मानण्यास हरकत नाहीं.

वर काढलेला नेडुञ्जेलियन याचा काल व (तो आणि सेलियन हे दोघेहि एकच होते) ह्या दोन्ही गोष्टी खऱ्या आहेत असें मानण्यास आणखी एक आधार आहे. वेळविकुडि शासनपत्रांत नेडुञ्जेलियन राजाचा मुलगा अरिकेसरी मारवर्मन् यानें नवेली येथील लढाई जिंकली असें म्हटलें आहे ( इ. स. ६५०–६८० ). शैवमहात्मा ज्ञानसंबंदर याचा नेडुमारन नांवाचा पांड्य राजा समकालीन होता. ह्या राजानेंहि नवेलि येथें जय मिळविला अशी आख्यायिका आहे. ज्ञानसंबंदर इ. स. सातव्या शतकाच्या मध्यकाळांत होता, म्हणून नवेली येथील लढाई देखील त्याच सुमारास म्हणजे इ. स. ६५०-६८० च्या दरम्यान झाली असली पाहिजे. नेडुञ्जेलियन याच्या मुलाचेंहि नांव नेडुमारन असें होतें. या गोष्टीनेंहि नेडुञ्जेलियन हा इ. स. ६२०–६५० मध्यें होता हें जें वर म्हटलें आहे त्याला पुष्टि मिळते.

कोयिलोलुगुः—या ग्रंथांत श्रीरंग बेटांतील श्रीरंगनाथाच्या देवळाला दिलेल्या देणग्या व त्या देवळाची केलेली दुरुस्ति व सुधारणा यांची हकीकत पुरातन काळापासून दिलेली आहे व हें काव्य तामिळ गद्यांत लिहिलें आहे. यांत इ. स. १३ ते १६ व्या शतकांतील दक्षिण हिंदुस्थानांतील राजांचा इतिहास दिला आहे. पुरातन काळच्या महत्त्वाच्या गोष्टींचा यांत उल्लेख केलेला आहे. दक्षिणेच्या इतिहासाचा शोध लावणाऱ्या पंडितांस याची माहिती होती. या ग्रंथाची पूर्ण तपासणी झाली नाहीं. शिलालेख व ताम्रपट यांवरून हा ग्रंथ बनविला आहे. यामुळें त्यांतील माहिती ऐतिहासिकदृष्ट्या कुचकामाची नाहीं. वरील देवालयांतील मूर्तीचा पूर्वेतिहास असाः —

रंगनाथदेवाची पूजा कांहीं काळपर्यंत ब्रह्मा करीत होता, त्याजपासून इक्ष्वाकूनें अयोध्येला मूर्ति नेली. नंतर रामानें कृपाळू होऊन ती मूर्ति बिभीषणाला दिली; त्यानें कावेरीच्या दोन फांटयांमधील श्रीरंगम् बेटांत ही मूर्ति स्थापिली. येथें किल्ली चोळाचा पूर्वज धर्मवर्मा यानें मुख्य देऊळ ( तिरुवुण्णालिगै) व इतर जरूरीच्या इमारती बांधल्या. यानंतर बऱ्याच काळानें किल्ली चोल राजाच्या कारकीर्दींत हें देऊळ रेतीनें झांकून गेलें होतें व बेटावर जंगल वाढलें होतें. किल्लीनें हें देऊळ पूर्वीच्या स्थितींत आणलें. किल्लीनंतर राजमहेंद्रानें देवळाच्या आंतील भागास फरसबंदी केली व कित्येक इमारती व रस्ता बांधला. निचुलापुरी येथें राज्य करणाऱ्या नंद-चोल राजास एक कमलपत्रावर पहात आलेली मुलगी मिळाली. त्यानें या देवळाला मोठया देणग्या दिल्या.

एका चोल राजाच्या पापाचरणामुळें कांहीं वर्षांनंतर रेतीची भर पडली व या गोष्टीमुळें उरैयूरचा नाश झाला, व राजधानी गंगैकोंडमला नेली. कांहीं वर्षांनंतर चोलराजानें उरैयूर येथें एक लहानसें देऊळ बांधून त्यांत ( नाच्चियार ) देवाची मूर्ति स्थापन केली.

कलि, वर्ष ५० मध्यें कुलशेखर–पेरुमल चेर. चोल व पांड्य राज्यांचा नायक झाला. याची मुलगी शोलकुलवल्ली हिनें श्रीरंगमच्या देवळांत कांहीं सुधारणा केल्या. कलि, वर्ष ३६० मध्यें गौडदेशाच्या राजानें देवास विपुल संपत्ती नजर केली. कलि, वर्ष ४४५ मध्यें वैष्णवसाधु तिरुमंगयी–अळवार हा येथें रहात होता. यानें देवळाची दुरुस्ती केली.

**कोश ग्रंथ.**–यांकडे तामिळ पंडितांचें लक्ष अत्यंत प्राचीनकाळीं देखील लागलें होतेंसें दिसतें. शूळामणि निगण्डु हा तामिळ शब्दकोश गुणभद्र याचा शिष्य मण्डलपुरुष यानें लिहिला. यानें असा उल्लेख केला आहे कीं, किरुत्तिवराय ( कृष्णराय ) यानें त्यास पुष्कळ देणग्या दिल्या. आतां मण्डलपुरुष हा गुणभद्राचा शिष्य असल्यामुळें व गुणभद्र हा राष्ट्रकूट राजांच्या आश्रयास असल्यामुळें हा कृष्णराय विजयानगरचा राजा नव्हे हें सिद्ध होतें. तेव्हां हा उल्लेख अकालवर्ष राष्ट्रकूटराजा कृष्ण ( दुसरा ) याच्याबद्दल असावा. अकालवर्ष कृष्ण ( दुसरा ) याचा काल इसवी सन ८८८ ते ते ९११–१२ हा आहे व गुणभद्र आणि मण्डलपुरुष हे अकालवर्षाच्या आश्रयाखालीं होते. यावरून शूळामणि निगण्डु या शब्दकोशाचा काल इ. स. ८७५(सुमारें) हा येतो.

**कायदे ग्रंथ.**—या विषयासंबंधानें पुस्तकें थोडीं आहेत व त्यापैकीं बहुतेक अलीकडील आहेत. मनुनितिशास्तिरम् हें मनुस्मृतीचें सार आहे. तरुमनुल हें स्मृतिचंद्रिका या हिंदु कायदे पुस्तकाचें सार आहे. पिनलकोड, क्रिमिनलप्रोसिजर, दिवाणीकोर्टाचा कायदा, पुराव्याचा कायदा वगैरे अलीकडील कायद्यांचीं भाषांतरें तामिळ भाषेंत झालीं आहेत. तसेंच पोलीसॲक्ट, रेल्वेकंपनीचे नियम वगैरेसंबंधीं पुस्तकें तामिळ भाषेंत झालीं आहेत.

**तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ.**—या विषयांतहि संस्कृत तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांचा पूर्ण परिणाम तामिळ ग्रंथांवर दिसतो. तर्कशास्त्राबद्दल तीच स्थिति आहे. तामिळ भाषेंतील तत्त्वज्ञानविषयक ग्रंथाला बहुधा एक प्रस्तावना जोडलेली असते व तिच्यांत ग्रंथकार ज्या तर्कशास्त्रपद्धतीचा अवलंब करणार तिचा परिचय करून दिलेला असतो व त्यांत निरनिराळ्या प्रकारचीं प्रत्यक्ष, अनुमान, साक्षात्कार, अभाव वगैरे प्रमाणें, त्यांचे अर्थ व त्यांचे पोटभेद, हेत्वाभास व त्यांचे प्रकार इत्यादिकांचें स्पष्टीकरण असतें. तत्त्वज्ञानाच्या ग्रंथांत जग, ईश्वर, आत्मा, मन, ज्ञानेंद्रिय, जगाचें मिथ्यात्व वगैरे

अनेक प्रश्नांचें तामिळ ग्रंथांत केलेलें तात्त्विक विवेचन आर्यन् संस्कृतींतील मतांनीं धरून असतें, हें पुढील उदाहरणावरून दिसून येईल. उदरहू माहिती 'सिवज्ञानपोथम्' ह्या ग्रंथांतील आहे. हा ग्रंथ अत्यंत पवित्र व फक्त पंडितांनांच कळण्यासारखा आहे असें मानतात; कारण त्याची भाषा सोपी नाहीं व सर्व ग्रंथ वाग्विवादात्मक व अध्यात्मिक स्वरूपाचा आहे. त्यांत एकंदर बारा सूत्रें असून प्रत्येक सूत्राचा विषय एकेका स्वतंत्र प्रकरणांत विवेचिला आहे. बारा विषय आहेत ते (१) ईश्वराचें अस्तित्त्व; (२) जग व आत्मे यांशीं ईश्वराचा संबंध; (३) आत्म्याचें अस्तित्व; (४) अन्तःकरणाशीं आत्म्याचा संबंध; (५) पंचज्ञानेंद्रियें; (६) मिथ्याजग व सत्य परमेश्वर यांमधील भेद; (७) सिवनपुढें सर्व वस्तू मिथ्या होत; (८) आत्म्याच्या ज्ञानप्राप्तीची तऱ्हा; (९) कर्मफलापासून ज्ञानचक्षूंच्या द्वारें आत्म्याची मुक्ति; (१०) आणव कनमम् मायै या मलमूच्या नाशाच्या रीती; (११) ईश्वरपदीं लीन होणारा आत्मा व (१२) अचिंत्य, अवर्णनीय अशा सिवनचें मनन, दर्शन व पूजन. आतां या ग्रंथांतील तत्त्वज्ञानाचा कांहीं मासला येथें देतों.

देवांचें अस्तित्वः—ज्यांत तो, ती, तें असे तीन्ही लिंगी प्राणी असून ज्यावर उत्पत्ति, स्थिति व नाश ह्या तिहींचा व्यापार चालतो असें हें जग ज्याप्रमाणें उत्पन्न झालें त्या प्रमाणें विलयास जाईल व मूळापासून त्याची पुन्हां उत्पत्ति होईल. सर्व वस्तूंच्या शेवटीं ईश्वराचें अस्तित्व असतें असे ज्ञानी म्हणतात (म्हणजे जगदुत्पत्तीचें तो ईश्वर म्हणजे एक असें निमित्तकारण आहे).

जग व आत्मे यांशीं परमेश्वराचा संबंधः—वर सांगितलेलें जग म्हणजे देव असून ईश्वर अपेथम् म्हणजे त्या ईश्वरांत व जगांत भेद नाहीं. परंतु ज्या अर्थी जग असित्त (म्हणजे असत्) आहे व ईश्वर सूत्तीयम (सद्रूप) आहे त्याअर्थी ईश्वर भेदम् म्हणजे जगापेक्षां निराळा आहे. त्याप्रमाणें तो ईश्वर पेथम् व अपेथम् असा दोन्हीहि असल्यामुळें त्याला पेथापेथम् (भेदाभेदम्) ही संज्ञा प्राप्त झाली आहे. म्हणून जगाच्या दृष्टीनें ईश्वर अपेथम् पेथन् व पेथापेथन् असा असतो. ईश्वर सर्व विश्व व्यापून उरला आहे. त्याच्या आज्ञेप्रमाणें आत्म्यांना स्वकनमम (कर्मा) नुसार जननमरण प्राप्त होतें. वेदामध्यें सांगितलें आहे कीं, ईश्वर एक, अनंत, शुद्ध असा असून त्याच्या तोडीचा दुसरा कोणी नाहीं, व ईश्वर–आत्मा एक आहे असें म्हणणारा आत्मा आहे. आत्मा पाशयुक्त असल्यामुळें अपवादन्यायानें ईश्वर स्वतंत्र ठरतो. ज्याप्रमाणें अ या स्वराशिवाय नुसतीं अक्षरें निरुपयोगी झालीं असतीं त्याप्रमाणें ईश्वराशिवाय आत्मा व्यर्थ ठरला असता. परआत्मा व आत्मा यांचा निकट संबंध व ईश्वरावांचून असलेलें आत्म्याचें व्यर्थत्व स्वरावांचून होणाऱ्या अक्षरांच्या व्यर्थत्वावरून ठरविलेलें आहे. परमात्म्यावरोबर आत्म्याचा द्वैत नष्ट करणारा संयोग एका श्लोकांत वर्णिलेला आहे.

आवाज व आलाप यांचा जो संबंध तसाच ईश्वर व जग यांचा संबंध. आलापांतलि सर्व स्वरांत ज्याप्रमाणें आवाज भरलेला असतो त्याप्रमाणें ईश्वर विश्वाच्या सर्व दृश्यांत भरलेला असतो. संगीतशास्त्रज्ञाशिवाय आवाजाला व आलापाला अस्तित्व नसतें. त्याप्रमाणेंच तीन अनन्त अशीं द्रव्यें असावयास पाहिजेत. जसें फळ व त्याचा स्वाद, त्याचप्रमाणें जग व जगन्नियन्ता. जसे तीळ व तिळांचे तेल तसा ईश्वर व जग. तिळापासून जसें तेल भिन्न असतें तसें जग ईश्वरापासून भिन्न आहे. ईश्वराच्या सत्तेनें हें विश्व अशा तऱ्हेनें व्यापिलें आहे कीं, त्याच्यामधील अद्वैत नष्ट झालेलें आहे तरी सत्ता विश्वापासून भिन्न आहे. म्हणून वेदांत ते एक आहेत असें न वर्णितां त्यांच्यांत अत्तुवितम् (अद्वैत) आहे असें वर्णन केलें आहे. ईश्वर व आत्मा अगर विश्व यांच्यामधील संयोगाच्या बाबतींत अद्वैतम् या शब्दाचा अर्थ एकम् असा घ्यावयाचा नाहीं. कारण अद्वैत या शब्दाचा अर्थ एकसमता एकपणा असा नाहीं. ईश्वर व आत्मा यांचा संबंध इतका निकट असतो कीं, ते दोन दिसत नाहींत एवढाच अर्थ घ्यावयाचा.

जो मनुष्य त्या संबंधाबद्दल अद्वैत म्हणजे एकसमता असें म्हणतो त्याच्या अस्तित्वावरूनच ईश्वर व तो हे एक नाहींत हें सिद्ध होतें. ह्यावरून ते दोन आहेत असें सिद्ध न होतां व भिन्न न दिसतां त्यांचा निकट संबंध आहे असा अर्थ घ्यावयाचा.

आत्म्याचें अस्तित्वः-यंत्राप्रमाणें असणाऱ्या व मायेपासून निर्माण होऊन विकास पावणाऱ्या शरीरांत आत्मा असतो. अपवादन्यायानें आत्म्याचें अस्तित्व ठरतें. ज्याप्रमाणें एखादा माणूस ह्या वस्तू माझ्या आहेत असें म्हणून त्या वस्तूंपासून निराळा ठरतो त्याप्रमाणें आत्मा तो ज्या शरीरांत असेल त्या शरीराला आपलें म्हणून त्यापासून भिन्न ठरतो. पंचेंद्रियांपासून आत्म्याला ज्ञानलाभ होतो म्हणून पंचेंद्रियांपासून आत्मा भिन्न आहे. अवत्त (अवस्था) मुळें आत्म्याला प्रगतीचें ज्ञान होतें म्हणून अवत्तेहून आत्मा भिन्न आहे. ज्याअर्थी सुषुप्तावस्थेंत अन्नसेवन अगर चलनक्रिया नसतात त्याअर्थी शरीरापेक्षां निराळें असें आत्म्याचें अस्तित्व आहे. ज्याअर्थी आत्म्याला संवेदनांचें ज्ञान असतें त्याअर्थी त्याला निराळें अस्तित्व आहे असें ठरतें.

अन्तःकरणमूशीं आत्म्याचा संबंधः—ह्या अन्तकरणम् पैकीं आत्मा नसून त्या सर्वांशीं आत्म्याचा निकट संबंध आहे. ज्याप्रमाणें वर चढलेल्या गंजाच्या आंत तांब्याचें भांडें असतें त्याप्रमाणें आणव मळमच्या आंत आत्मा असतो. ह्यामुळें त्याला ऐहिक ज्ञान नसतें. विकास पावल्यानंतर आत्मा पांच अवत्तैमध्यें प्रविष्ट होतो. बाह्य तत्तुवम्बद्दल पूर्वी विवेचन

येऊन गेल्यामुळें सूत्रकार या ठिकाणीं तुरणम् अथवा आन्तर तत्तुवम् ( अन्तकरणम् ) बद्दल बोलतो. ज्याप्रमाणें एखादा राजा आपल्या प्रधानासमवेत दौऱ्यावरून आऊन येतो व प्रत्येक दरवाज्यावर द्वारपाळ नेमतो व नंतर अन्तर्महालांत जातो तसा आत्मा प्राणवायूला द्वारपाळ नेमून अवत्तैमध्ये जातो.

पंचज्ञानेंद्रियें:—वर सांगितल्याप्रमाणें पंचज्ञानेंद्रियें केवळ आत्म्याचीं निमित्तें म्हणून वस्तुज्ञान अनुभवितात, स्वतः त्यांनां त्यांच्या विषयांचें ज्ञान नसतें. त्याचप्रमाणें जो आत्मा त्यांनां त्या ज्ञानग्रहणासाठीं उद्युक्त करतो त्या आत्म्याचेंहि त्यांनां ज्ञान नसतें. अतएव जें जें म्हणून आत्म्यांनां सुबोध होतें तें तें अनुपमेय ईश्वराच्या अरुळ ( अरुळ सत्ती ).मुळें त्यांनां सुबोध होतें अशी जरी वस्तुस्थिति आहे तरी त्यांनां ईश्वराचें ज्ञान नसतें. ज्याप्रमाणें लोहचुंबकासन्मुख असलेल्या लोहाला आपणांवर कोणाची आकर्षक शक्ति चालली आहे हें कळत नाहीं त्याप्रमाणें आत्म्याची स्थिति असते. लोहाकर्षणापासून लोहचुंबकांत ज्याप्रमाणें बदल होत नाहीं, त्याप्रमाणें आत्म्याच्या आकर्षणापासून परमात्म्यांत फरक होत नाहीं.

पंचज्ञानेंद्रियें ज्याप्रमाणें विषयज्ञानाचीं निमित्तें होत व त्यांनां ज्याप्रमाणें आत्म्याचें-तोच त्यांनां व्यापृत करणारा असतो तरी-ज्ञान नसतें त्याप्रमाणें आत्म्याला ईश्वराचें ज्ञान नसतें. पंचेंद्रियें ज्याप्रमाणें जड असून आत्म्याशिवाय त्यांनां विषयज्ञान होणार नाहीं, त्याप्रमाणें आत्माहि या बाबतींत जडासारखा असून ईश्वरानें त्याला उद्युक्त केल्याशिवाय तो व्यापारवान् होणार नाहीं.

कर्मफलापासून ज्ञानचक्षूंच्या द्वारें आत्म्याची मुक्तिः— पासुग्नानम् ( म्ह. आत्म्याचें ऐहिक ज्ञान ) अथवा पासग्नानम् ( शरीराचें ऐहिक ज्ञान ) यांनीं समजत नाहीं अशा सिवनचें अरुळच्या मदतीनें दर्शन घेणें हें ईप्सित आहे.म्हणून अन्तर्यामी ईश्वर आहे तो ज्ञानचक्षूंच्या साहाय्यानें पहा. अशा रीतानें शोधणाऱ्याला पासम् मृगजलवत् भासून ईश्वर ( सिवन् ) रखरखीत प्रदेशांत हिंडणाऱ्याला ज्याप्रमाणें शीतल प्रदेश त्याप्रमाणें वाटेल. पंचाक्षराचा उच्चार केल्यावर हें घडून येईल.

आणव कनमम् मायै या मलम्च्या नाशाच्या रीतीः— स्वतःच आत्मा असल्याप्रमाणें सिवन् आत्म्यांत असतो; त्यावरून आत्मा सिवनबरोबर असेल. त्यावरून आत्म्याचीं अशीं जीं जीं कर्में म्हणतों तीं तीं सिवनचीं ठरवील. तसें ठरल्यावर आणव मलम् माया मलम् व अपरिहार्य कननम् नष्ट होतील म्हणजे आत्म्याला त्यांपासून उत्पन्न होणारीं फळें चाखावीं लागणार नाहींत. ज्यावेळीं आत्मा सिवनशीं एकरूप होईल त्यावेळीं मी अमुक केलें त्यानें तमुक केलें असें तो म्हणणार नाहीं व अरुळसत्ती त्याच्या मदतीस येईल.

ईश्वरपदीं लीन होणारा आत्माः—ज्याप्रमाणें आत्मा नेत्रांनां व्यापारवान् करतो त्याप्रमाणें ईश्वर मुक्तशरीर आत्म्याला पहातो व स्वतःचें त्याला दर्शन देतो. याप्रमाणें तो त्या आत्म्याला स्वपदाचा लाभ करून देतो व या प्रसादापासून आत्मा कधींहि परतत नाहीं.

"ज्याप्रमाणें मुक्त आत्मे अरुळच्या साहाय्यानें ईश्वराला पहातात त्याप्रमाणें शरीरांत कोंडलेले आत्मे इंद्रियांचा ताबा स्वतःवर न चालूं देतां अरुळच्या सहाय्यानें मुक्त होतात. तद्नंतर अनुभवानें त्यांनां सिवनचें ज्ञान होऊन ते सिवनचरणीं लीन होतील. कनमसमुळें जो कामें करतो त्याला ' हें मी केलें तें अमक्यानीं केलें ' असें वाटतें. म्हणून या कनममचा नाश झाल्याशिवाय ज्ञानाचा उदय होणार नाहीं. हें ज्ञान प्राप्त झाल्यावर कनमम्चा नाश करण्यासाठीं प्राणी ज्यावेळीं सिवन्ची भक्ति करूं लागतो त्यावेळीं सिवन त्याच्यावर अनुग्रह करतो. म्हणून शिवभक्त शिवलिंग् व सिवन हे सर्व एकच आहेत असें समजून ईप्सित मनांत धरून सिवनची पूजा करा.

सिवन् गुरु व शास्त्रें एकच समजून शिवाची पूजा करावी. सर्व आत्म्यांचा जीवनाधार जो सिवन् त्याच्याशीं विमाना कलर ( ज्यांच्यावर एक मलम्चाच ताबा चालतो असे आत्मे ) आत्मे तद्रूप झाल्यावर त्यांनां पुन्हां जन्म येत नाहीं. पिरळया कलर ( म्ह. ज्यांच्यावर दोन मलम्चा ताबा चालतो असे ) आत्मे शिवरूपी झाले व त्यांच्यावर शिवाचा अनुग्रह झाला तर तेहि जननमरणाच्या फेऱ्यांतून चुकतील. सकलर ( म्ह. ज्यांच्यावर तिन्हीहि मलम्चा ताबा चालतो असे ) आत्मे शिवस्वरूप गुरूपासून ज्ञान शिकल्यावर शिवाच्या कृपेनें व शास्त्रांच्या मदतीनें तेहि जननमरणाच्या फेऱ्यांतून मुक्त होतात. "

वरील माहितीवरून तामीळ ग्रंथांतील तत्त्वज्ञानाचें आर्यांच्या संस्कृत ग्रंथांतील तात्त्विक विचारांशीं किती साम्य आहे हें दिसून येईल. सिवग्नान पोथम् या ग्रंथाच्या उत्पत्तीबद्दल त्याच ग्रंथांत पुढीलप्रमाणें माहिती आहे. सिवननें आपला सेवक जो नन्ती ( न्दी ) त्याच्या करवीं आपला भक्त जो सनत्कुमारन् त्याला ग्नानुल ( पवित्र धर्मग्रंथ ) सांगितला. सनत्कुमाराच्या तिसऱ्या पिढींतला ज्याला संस्कृतमधील द्वादशसूत्रें अवगत झालीं होतीं, जो शिवभक्त होता, ज्यानें सत्तु व असत्तुमधील भेद कळून असत्चा त्याग केला होता अशा गुरुमेयकण्डाननें या ग्रंथाचें तामिळ भाषेंत भाषांतर केलें. त्याचें टीकेसह सर्व लोकांनां कळावें म्हणून पक्ष, हेतु व तिरुत्तान्तम ( दृष्टान्त ) चा नैयायिक पद्धतीनें निवारण केलें आहे.

तर्कशास्त्र, अतींद्रिय विज्ञान आणि नीतिशास्त्र या तिन्ही विषयांवर तामिळ भाषेंत ग्रंथ आहेत. तर्कसंगकिरकम्

संस्कृतवरून भाषांतर केलेलें तर्कशास्त्रासंबंधींचें पुस्तक आहे. निययइलक्कनम् या पुस्तकामध्यें ॲरिस्टॉटल व बेकन यांच्या तर्कशास्त्रासंबंधानें माहिती दिलेली आहे. अतींद्रियविज्ञान या विषयाचा हिंदु तत्त्वज्ञानासंबंधींच्या ग्रंथांत अंतर्भाव होतो. नीतिशास्त्रासंबंधाचे ग्रंथ पुष्कळ आहेत कुरल हा ग्रंथ फार लोकप्रिय असून त्याच्या पुष्कळ आवृत्त्या निघाल्या आहेत. या पुस्तकांत १३३ प्रकरणें आहेत, व त्यांचे तुल्य तीन भाग पाडले असून सद्गुण संपत्ति व सुख यांपैकीं प्रत्येकाला एकेक भाग दिला आहे. या पुस्तकाचें लॅटिन, जर्मन, इंग्लिश वगैरे भाषांत भाषांतरहि झालें आहे. नलदियर हा ग्रंथ कुरल ग्रंथाच्या खालोखाल महत्त्वाचा आहे. तो मदुरा विद्यापीठांतील विद्वानांनीं लिहिला असें म्हणतात. त्याच्या अनेक सटीक आवृत्त्या निघाल्या आहेत. ईरगेकेस वेंप उर्फ नीतिचुडामणी, कैलासनतरशतकम्, कोर्वितशतकम्, कुमारेशशतकम्, मनवळनारायणशतकम्, नीतिनेरिविलक्कम्, नीतिचरणम्, नीतिचिंतामणी; तिरिक्कदुकम्, तंडलय्यरशतकम्, उपदेससंगकिरकम्, उदरकुरवम्म्, वेरिवेकैं, विरिंगसेसर शतकम् वगैरे नीतिपर ग्रंथ आहेत.

वैद्यकशास्त्र.—तामीळ लोकांमध्यें हा विषय फार प्रिय आहे, त्यामुळें या विषयावरील ग्रंथांचा प्रचार फार आहे. आयुर्वेद हा वैद्यकविषयक ग्रंथ अथर्ववेदाचा एक भाग आहे असें मानतात. हा ग्रंथ हल्लीं संपूर्ण उपलब्ध नाहीं. चरक व सुश्रुत हे वैद्यकावरचे फार जुने ग्रंथ आहेत. वैद्यक, जादूचे मंत्र व किमया या तीन विषयांवर मिळून अगस्तिऋषींनें तामिळ भाषेमध्यें ५० हून अधिक ग्रंथ लिहिले आहेत असें मानतात. वास्तविक हे ग्रंथ निरनिराळ्या काळांत लिहिलेले असून त्यांपैकीं कित्येक यूरोपियन लोक हिंदुस्थानांत आल्यानंतर लिहिलेले आहेत. जाफना येथील डॉ. ग्रीन नांवाच्या एका मिशनरी डॉक्टरानें वैद्यकावरील ११७ तामिळ ग्रंथांची यादी केलेली आहे. मृतशरीरविच्छेदनाविरुद्ध लोकमत असल्यामुळें शारीरविज्ञानशास्त्रांत हिंदु वैद्यांची फारशी प्रगति झालेली नाहीं. उलटपक्षीं तामिळ भाषेंतले वैद्यक ग्रंथ बऱ्याच भ्रामक समजुतींनीं भरलेले आहेत. जादू–टोणा व मंत्रतंत्र या गोष्टीहि वैद्यकावरील ग्रंथांत असतात.

भौतिकशास्त्रें.—हिंदूंमध्यें शास्त्रें व कला मिळून ६४ आहेत. तथापि भौतिकशास्त्रांमध्यें यूरोपांतल्यासारखे शोध इकडे लागलेले नाहींत. भौतिकशास्त्रांपैकीं वैद्यक, रसायन व आणि पाहण्यापुरतें ज्योतिषशास्त्र एवढ्याच शाखा इकडे प्रगत झाल्या आहेत.

गणित.—ही शास्त्रशाखा तामिळ लोकांमध्यें फारच थोडी अभ्यासिली जात असे असें दिसतें. अंकगणित किती अप्रगत स्थितींत होतें हें तामिळ संख्यापद्धतींत शून्य नाहीं यावरून दिसून येईल. बीजगणित व भूमिति यांवर प्राचीन ग्रंथ मुळींच नाहींत. अलीकडे शाळेंत शिकविण्याकरितां कांहीं पुस्तकें तयार झालीं आहेत. कनक्कतिकरम् हें अंकगणितशास्त्र, भुवनदीप व इतर कांहीं संस्कृत ग्रंथ यांच्या साहाय्यानें रचलें आहे.

ललितकला.—हिंदूंमध्यें ज्या ६४ कला आहेत, त्यांच्यांपैकीं पांच संगीतविषयक आहेत. पण तामिळ भाषेमध्यें संगीतावर जुना असा एकहि ग्रंथ झालेला नाहीं. तसेंच चित्रकला, खोदकला आणि शिल्पकला यांवरहि तामिळ भाषेंत एकहि जुना ग्रंथ नाहीं. हिंदु देवतांचीं चित्रें व मूर्ती पुष्कळ आढळतात. लांकडांच्या व धातूंच्या मूर्ती करण्याची कला बरीच सुधारलेली आहे. ब्रिटिश अंमल सुरू झाल्यानंतर स्कूल ऑफ आर्ट्स ही संस्था मद्रास येथें स्थापन होऊन या कलांना आतां चांगलें उत्तेजन मिळालें आहे.

व्याकरण ग्रंथ.—व्याकरण हा विषय हिंदूंना आवडता आहे. तामिळ भाषेंतलें पहिलें व्याकरण अगस्ति ऋषीनें लिहिलें आहे. पण तें त्याचा शिष्य तोलक्कपियनर याच्या शापामुळें नष्ट झालें अशी दंतकथा आहे. या शिष्यानें लिहिलेला तोलक्कपियम् नांवाचा सर्वांत जुना व्याकरणग्रंथ हल्लीं उपलब्ध आहे. त्यामध्यें १२७६ सूत्रें उर्फ कवितावद्ध नियम आहेत. पवनंती यानें नंदुल नांवाचें तामिळ व्याकरण लिहिलें. त्यांत ४६२ सूत्रें असून तो ग्रंथ प्रमाण मानला जातो. या ग्रंथांतील सूत्रांत वाजवीपेक्षां अधिक असें एकहि अक्षर नाहीं. अशी प्रौढी तामिळ लोक सांगतात. तामिळ व्याकरणांत पांच प्रकरणें असतातः—(१) वर्णविचार, (२) शब्दविचार, (३) विषयरचना, (४) वृत्तें व (५) अलंकार. नंदुल ग्रंथ १० व्या शतकाच्या सुमारास लिहिलेला आहे. नेमिवतमूलम् हा १६ व्या शतकांतील ग्रंथ असून तो कुमविरपंडितर यानें लिहिलेला आहे.

उत्तरकालीन काव्यवाङ्मय.—बहुतेक तामिळवाङ्मयांतील गणितशास्त्र, वैद्यक, व्याकरण व शब्दकोश वगैरे विषयांचे ग्रंथसुद्धां कवितावद्ध आहेत. काव्यग्रंथावर भाष्यात्मक जे जुने ग्रंथ आहेत ते गद्यात्मक आहेत. ते खेरीजकरून गद्यलेखनाचा परिपाठ यूरोपीयांच्या परिचयानंतर सुरू झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. तामिळ काव्याविषयीं दोन तीन यूरोपीय विद्वानांनीं आपलें मत प्रदर्शित केलें आहे. रेव्हरंड एच्. बॉवर म्हणतो "बेसची यानें आपल्या तामिळ व्याकरण या ग्रंथाच्या परिशिष्टांत तामिळ काव्यकलेविषयीं स्वतःचे विचार दिले आहेत. तो म्हणतो तामिळ कवी काव्याला साजेल अशी चांगली भाषा वापरतात. कोणत्याहि वस्तूचा उल्लेख करतांना ते त्याला गौरवपर विशेषणें नेहमीं योजितात. वृक्षाचा उल्लेख करतांना हिरवा, फुलांनीं डवरलेला, शीतळ छाया देणारा भव्य, किंवा असलें एखादें सुंदर विशेषण अवश्य योजतात. पर्वताचा उल्लेख करतांनाहि तो दाट वृक्षांमधून वर आलेला, किंवा त्यावरून ओढे वहात

असलेला किंवा फुलांनीं सुशोभित केलेला वगैरे एखादें तरी विशेषण लावल्याशिवाय ते कधींहि रहात नाहींत. त्यांचें वर्णन नेहमीं रूपक, मालारूपक वगैरे अलंकारांनीं भरलेलें असतें. अतिशयोक्ति अलंकारहि पुष्कळ योजलेला आढळतो. नैषध नामक तामिळ काव्यांत दमयंतीचें वर्णन करतांना तिच्या सौंदर्याला एकच प्रतिस्पर्धी होता व तो चंद्र होय. हें पाहून ब्रह्मदेवानें दमयंतीला चंद्रापेक्षांहि अधिक सुंदर बनविण्याकरितां चंद्राच्या चेहऱ्यावरील मूठभर सौंदर्य घेऊन तें दमयंतीच्या चेहऱ्यावर अधिक घातलें आणि त्यामुळें चंद्र तसा कलंकयुक्त विद्रुप बनला अशा तऱ्हेचें वर्णन आहे. तामिळ कवींना उपमालंकार योजण्याची इतर हिंदु कवींप्रमाणेंच फार आवड आहे. या बाबतींत ते वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष करून कल्पनेच्या वाटेल तशा भराऱ्या मारीत सुटतात. गणपति व सरस्वती या विद्येच्या देवता ते मानतात व काव्य करतांना प्रथम त्यांच्या कृपेची याचना करतात. करुणरस आणि माधुर्य हे भारतीय काव्याचे मुख्य गुण आहेत. जोरदारपणा हा गुण कमी असतो.

डॉ. कॉल्डवेल म्हणतो "तेलगू व तामिळ काव्यामध्यें सौंदर्य व माधुर्य अप्रतिम असतें आणि विशेषतः अर्थमाधुर्यापेक्षां शब्दमाधुर्याकडे जास्त लक्ष असतें. कोणत्याहि काव्यांत विशेष हेतु व अंतःकरणांत खळबळ उडवून देणारे विचार आढळत नाहींत. त्यामुळें तामिळ काव्यांतील कांहीं निवडक भागांचें भाषांतर इंग्रज वाचकांना आवडतें परंतु कोणत्याहि काव्याचें अथपासून इतिपर्यंत सर्व भाषांतर केलेलें वाचणें अगदीं कंटाळवाणें वाटतें. हा त्यांत महत्त्वाचा दोष आहे व त्याच्या जोडीला काव्याविषयींची पूर्वपरंपरागत पद्धति व नियम केवळ गुलामाप्रमाणें पाळणें हाहि मोठा दोष तामिळ कवींत आढळतो. हे दोष ज्यामध्यें आहेत त्या वाङ्मयाचा अधिकाधिक उत्कर्ष होत जाणें अशक्य आहे."

तामिळ भाषेतलें चिंतामणि हें काव्य कंबनाच्या रामायणापेक्षांहि अधिक सरस आहे असें तज्ज्ञ परीक्षकांचें मत आहे. हें काव्य १० व्या शतकांत एका जैन कवीनें लिहिलें आहे. रेव्हरंड एच्. बॉवर म्हणतो हें नीत्युपदेशपर महाकाव्य सर्वांहून अधिक योग्यतेचें आहे. याच्या कर्त्याचें नांव जरी अज्ञात असलें तरी त्याला सर्व तामिळ कवींचा राजा असें म्हणण्यास हरकत नाहीं. चिंतामणि हें त्या काव्यांतल्या नायकाचें नांव आहे. तामिळ भाषेत लोकप्रिय झालेलीं लहान लहान पद्येंहि पुष्कळ आहेत. हीं पद्यें रामायणाच्या आधारें रचलेल्या नाटकांतून व दुसऱ्या कित्येक काव्यांतून निवडून घेतलेलीं आहेत. हिंदू देवतांच्या स्तुतिपर पद्येंहि पुष्कळ आहेत. अशा पद्यांचा दुसरा एक विशेष आढळणारा विषय म्हटला म्हणजे प्रेम हा होय. अशा प्रेमविषयक पद्यांत प्रथम गणपति व सरस्वती यांची स्तुति असते व विष्णू, शिव व पार्वती यांचीहि साहाय्य करण्याबद्दल प्रार्थना केलेली असते व नंतर पुढील प्रकारचें वर्णन आढळतें. एक तरुण स्त्री बाजारांत जात आहे, तिच्याबरोबर जाण्याची परवानगी एक तरुण मागतो पण ती नापसंति दर्शवितें व म्हणते, "माझ्या पाठीमागून तूं येणें चांगलें नाहीं. जर तूं येशील तर मी तुला शिव्या देईन. तूं माझ्या मागें कां येत आहेस ?" त्याला उत्तर "मी तुझ्या मागें येत आहे कारण माझी तुझ्यावर प्रीति जडली आहे." "माझ्यामागें येणें हा मोठा द्वाडपणा आहे. माझ्यामागें येण्यांत तुझी काय इच्छा आहे ती मला सांग." "सुंदर वेलबुट्टीचें वस्त्र परिधान केलेल्या हे सुंदरी, तूं माझ्याशीं एकहि दयेचा शब्द बोलत नाहींस कां?" "मला तुजबरोबर बोलण्यास वेळ नाहीं. तूं असा विनाकारण कां वडबड करतो आहेस ? असे खोडसाळपणाचे शब्द बोलूं नकोस. तूं येथून दुसरीकडे जावें हें अधिक बरें." "तुझ्यापासून दूर जावें असें माझ्या मनांत मुळींच येत नाहीं, तूं मयूरीसारखी आहेस मी तुझ्या पाठीमागून येणार व तुझ्याशीं बोलणार." "तुला मजबरोबर काय बोलावयाचें तें दूर दूर उभा राहून बोल, तुझें बोलणें ऐकण्याची मजवर जबरदस्ती करणें हें तुला योग्य आहे काय ?" "केवळ प्रेमामुळें मी तुझ्या पाठीमागून येत आहे; तर याप्रमाणें माझ्याशीं भांडणें हें तुला बरें दिसत आहे काय ?" इत्यादि.

दुसऱ्या एका पद्यामध्यें लेखक म्हणतो "हे स्त्रिये, तूं मला गरम गरम दुधासारखी आहेस आणि मी तुला साखरेसारखा आहे, तर मग दूध व साखर यांच्यामध्यें भांडण काय असणार? तूं मला चंदनाच्या विलेपासारखी आहेस व मी तुला कस्तुरीसारखा आहे, तर मग या दोघांमध्यें कांहीं विरोध आहे काय ?" इत्यादि

तथापि तामिळ लोकांचीं बरींचशीं गाणीं अनीतिप्रचुर असतात. तामिळ कवींपैकीं पुष्कळ कवींत हा दोष आढळतो मात्र जैनपंथी काव्यामध्यें हा दोष नसतो. रेव्हरंड पी. पर्सीव्हल या मद्रास येथील प्रेसिडेन्सी कॉलेजमधील देश्य भाषांच्या प्रोफेसरानें हिंदुस्थानांतील वाङ्मयासंबंधानें पुढील मत नमूद केलें आहे." अद्भुतरसात्मक (रोमँटिक) गोष्टी देशी भाषांतील वाङ्मयांत इतक्या सुरेख आहेत कीं, भाषाशैली व वर्णनशैलीबद्दल त्यांचें कौतुक करणें प्राप्त आहे. तथापि अशा गोष्टींमध्यें अगदीं स्पष्टपणें अनीतिकारक प्रवृत्तीला पोषक होणारा प्रकार पुष्कळ ठिकाणीं आढळून येतो. नल व दमयंती यांची सुंदर गोष्ट त्या जगद्विख्यात भारतीय कवीनें अगदीं अप्रतीम व अनुकरणीय रीतीनें लिहिलेली असून ती उपर्युक्त दोषांपासून अगदीं अलिप्त आहे. असें असतांहि त्या गोष्टीचें तामिळ भाषेतील रूपांतर तामिळ कवींच्या अश्लीलतादि दोषांनीं इतकें भरलेलें आहे कीं शाळेंतील विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां बराचसा भाग गाळून

तयार केलेल्या प्रतींतूनहि प्रत्यक्ष तें काव्य शिकवूं लागल्या-नंतर मला एकंदर ११०० कवितांपैकीं ५०० हून अधिक कविता वगळाव्या लागणें भाग पडलें. अश्लील वर्णनांची आवड केवळ हिंदू कवींतच आढळते असें नाहीं तर यूरोपांतील सर्व देशांतल्या व इंग्लंडांतल्या देखील कादंबरीकार आणि नाटककार यांच्या लेखनांत अश्लीलतेचा भाग आढळून येतो. पण सभ्यपणाच्या सर्व मर्यादांचें उल्लंघन करण्याच्या कामांत हिंदू कवी यूरोपीय कवींच्या फारच पुढें गेलेले आहेत. कित्येक हिंदू काव्यांत हे दोष किती जास्त प्रमाणांत आहेत हें नुसत्या कल्पनेनें समजण्यासारखें नाहीं." सदरहू आरोपाच्या समर्थनार्थ तामिळ काव्यांतून भरपूर उतारे देणें मुद्रणनियंत्रणाच्या कायद्याच्या आडकाठीमुळें शक्य नाहीं.

तान्ह्या मुलांकरितां स्त्रियांनीं म्हणावयाचीं गाणीं व लहान मुलांच्या खेळण्यांतलीं गाणींहि तामिळ भाषेंत आहेत. असलीं कांहीं गाणीं मद्रास लिटररी सोसायटीच्या जर्नलमध्यें प्रसिद्ध झालीं होतीं. रामायणासंबंधानें बालकांडम्, अयोद्धीयकांडम्, अरणीयकांडम्, किष्किंधाकांडम्, सुंदरकांडम्,युद्धकांडम्,वगैरे निरनिराळीं काव्यें आहेत. रामायणाचें तामिळ भाषेंत रूपांतर कंबन या कवीचें आहे. तो ११ व्या शतकांत होऊन गेला असें मानतात.यानें रामायणाचें बरोबर भाषांतर न करतां रामायणांतली गोष्ट स्वतंत्रपणें व मूळांत फारसा फरक न करतां सांगितली आहे. कंबन कवीच्या तामिळ रामायणाची इंग्रज कवि पोप याच्या भाषांतरित इलियडशीं तुलना करतां येईल. मूळ वाल्मिकीच्या रामायणांत २४००० कविता आहेत आणि कंबनाच्या काव्यांत चार चार ओळींच्या १२०१६ कविता आहेत. याशिवाय रामायणयेलपट्टू, रामायणकोमैपट्टू वगैरे रामायणासंबंधींचीं काव्यें आहेत.

नैदतम् हें काव्य १२ व्या शतकांतील अतिविरराम पंडियन यानें लिहिलें असें म्हणतात. यांत नलदमयंतीकाव्याचें अनुकरण केलें आहे. त्याचे २९ सर्ग असून एकंदर कविता ११७१ आहेत. या काव्याला तामिळ लोकांत फार मान देतात, पण नैतिकदृष्ट्या यांतील बराचसा भाग आक्षेपार्ह आहे. नस्सुपोयकै, परतकद्दियम्, पांडववनवासम्, पनलकोदिमलै, पुलंतिरणकलवूमलै, सुपत्तिरैमलै, वित्तुवनकुरम्, वगैरे काव्यें महाभारतांतील कथांस अनुसरून आहेत. पंचत्तंतिरकतैपदल यांत पंचतंत्रांतील गोष्टींवरून रचलेलें काव्य आहे. याशिवाय जिंजीचा राजा व त्याचा घोडा, शिवगिरीच्या राजाचा पराक्रम, कलिंग किंवा तेलगू देशावरील विजय वगैरे ऐतिहासिक विषयांवर व स्त्रिया. प्रेम, दारू वगैरे विषयांवर इतर लहान लहान काव्यें आहेत.

*ना ट्य वा ङ्म य*.—या शाखेच्या वाङ्मयाचा प्रसार फार आहे. वाङ्मयाच्या या शाखेसंबंधानें रेव्ह. डब्ल्यू. टेलरच्या कॅटलागाच्या प्रस्तावनेंत पुढीलप्रमाणें म्हटलें आहे "प्राचीन नाटकांपैकीं उत्तम नाटकांचें भाषांतर तामिळ व इतर भाषांत झालेलें आहे. अशा नाटकांतले कांहीं भाग लग्नसमारंभांच्या वेळीं नाट्यप्रयोगरूपानें नाचाबरोबर कधीं कधीं करून दाखविण्यांत येतात. तथापि सामान्यतः नाइकिणींचे नाच, गाणेंबजावणें यांच्या मानानें नाटकांबद्दलची आवड तामिळ लोकांत फार कमी आहे. याचें एक कारण असें दिसतें कीं, तामिळ लोकांत भपकेदार मिरवणुकी, रात्रीच्या वेळच्या देवलयांतील उत्सव वगैरे प्रकारांची आवड विशेष आहे. नाट्यप्रयोगापासून आनंद होण्याइतकी रसिकता अंगीं येण्याकरितां लागणारी बौद्धिक उन्नति अद्याप तामिळ लोकांची झाली नाहीं.

रामनाटकम् हें १८व्या शतकांत अरुणचल कवीरयर यानें रामायणांतील गोष्टींवरून लिहिलेलें नाटक आहे. शकुंतलैविलसम्, समुत्तिरविलसम्, महाभारतविलसम्, मन्मथविलसम्, मार्कंडविलसम्, पद्मासुरविलसम् वगैरे नाटकें संस्कृत पौराणिक कथांवर रचलेलीं आहेत. तासिलतर विलसम् या १९ व्या शतकांतील नाटकांत लोकांपासून पैसे उकळण्याच्या तहशिलदाराच्या युक्त्या, लांच खाण्याचे प्रकार वगैरे गोष्टी दाखविल्या आहेत. नोंदीनाटकम् हें एका दरोडेखोरासंबंधाचें नाटक असून त्यांत त्याचे हातपाय तोडले गेल्यानंतर त्यानें एका देवालयांत देवाची पूजा केल्यामुळें त्याचे हातपाय पुन्हां कसे प्राप्त झाले त्याचा देखावा आहे. अलीपादशहानाटकम् हें एका मुसुलमान राजाविषयींचें, व अलीयारसनीनाटकम् हें मदुरा येथील एका राणीविषयींचें नाटक आहे. हरिश्चंद्रविलसम्, हें हरिश्चंद्राच्या गोष्टीवर रचलेलें नाटक आहे. दंभचरियरविलसम् हें गर्विष्ठ लोकांच्या उपहासपर नाटक आहे.

*ग द्य का दं ब ऱ्या व क था*.—या शाखेचीं पुस्तकें पुष्कळ आहेत व त्यांचा प्रसारहि फार आहे. या वाङ्मयशाखेचें महत्त्व विल्सननें पुढीलप्रमाणें दाखविलें आहे:— "वाङ्मयाच्या या अंगाचें निरीक्षण केल्यानें हिंदु लोकांच्या जुन्या चालीरीती, त्यांच्यावर परकीय यूरोपीय लोकांच्या परिचयानें होणाऱ्या परिणामापूर्वी कशा प्रकारच्या होत्या हें समजून घेतां येतें, हा एक महत्त्वाचा फायदा आहे. या चालीरीतींसंबंधींची माहिती इतर सामान्य वर्णनापेक्षां तामिळ कादंबऱ्या व कथा यांवरून अधिक स्पष्ट व यथातथ्य मिळते. परकीय यूरोपिय लोकांनीं हिंदी देश्य लोकांचें केलेलें अवलोकन केवळ बाह्य व बरेंच अपूर्ण असतें, त्यामुळें तें खरें विश्वसनीय मानतां येत नाहीं. हिंदु चालीरितींची व विचारांची खरी माहिती होण्यास त्यांच्या कथा–कादंबऱ्या यापेक्षां अधिक योग्य असें दुसरें कोणतेंहि साधन नाहीं. या वाङ्मयशाखेच्या अध्ययनाचा आणखीहि एक फायदा आहे. यूरोपमधल्या चालीरीतींवर पौर्वात्य चालीरीतींचा काय काय परिणाम झालेला आहे हें समजून

येण्यास या कथा-कादंबऱ्या चांगल्या उपयोगी पडतात. पौर्वात्य देशांतील या कथांमुळेच यूरोपीय लोकांच्या पूर्वजांची वाङ्मयाच्या या शाखेमध्यें प्रवृत्ति प्रादुर्भूत होऊं लागली ही गोष्ट हल्लीं सर्वमान्य झालेली आहे.

हिंदुस्थानांतलि कल्पित कथा-ग्रंथांपैकीं पंचतंत्र हा सर्वांत जुना ग्रंथ होय. तो इ. सच्या ६ व्या शतकांत लिहिलेला असावा. दुसरा ग्रंथ हितोपदेश, हा त्यापेक्षांहि अधिक सरस आहे. अशा प्रकारच्या कथाग्रंथांमध्यें वेताळपंचविशी हें पुस्तकहि फार प्रख्यात आहे. सिंहासनबत्तिशी या नांवाचें विक्रमादित्याच्या सिंहासनाबद्दलच्या गोष्टींचें आणखी एक पुस्तक आहे. या प्रकारच्या गोष्टींमध्यें एक हा विशेष दिसून येतो कीं, हिंदुस्थानांतील स्त्रिया शिक्षणविहीन आणि अज्ञानी असतात आणि त्यांच्याबद्दल पुरुषवर्गाचा आदर फारच कमी असतो. हिंदु समाजामध्यें ही जी स्थिति दिसून येते ती कायम ठेवण्यास अशा कल्पित गोष्टींच्या पुस्तकांनीं आजवर मदत केलेली आहे. यासंबंधानें जॉन मुरडॉक म्हणतो (क्लासिफाइड कॅटलॉग ऑफ तामिळ प्रिंटेड बुक्स,मद्रास,१८९५)"अशा गोष्टींपैकीं बऱ्याचशा गोष्टी स्त्रियांचा दुष्ट स्वभाव,चैनीची आवड, अनीतीचें आचरण आणि ठकबाजी वगैरे स्त्रियांतील दुर्गुणांसंबंधानें असतात. या सर्व दुर्गुणांचा आरोप बहुधा बराचसा पुरुषवर्गाच्या तिरस्कारयुक्त बुद्धीमुळें उत्पन्न झालेला असतो. ही तिरस्कारबुद्धि व या प्रकारच्या कथा पौर्वात्य देशांतच आहेत असें नाहीं तर त्यांचें अनुकरण, दक्षिण यूरोपांतील देशांत ख्रिस्ती समाजामध्येंहि अधिक प्रमाणांत केलें गेलें आहे. यूरोपांतील मध्ययुगापूर्वीच्या म्हणजे ख्रिस्तोत्तर १० व्या शतकापूर्वीच्या काळांतील कल्पित कथा आणि मध्ययुगांतील स्त्रीदाक्षिण्याच्या काळांतील अद्भुतरसात्मक कथा यांमध्यें फार लक्षांत घेण्यासारखा फरक आहे. या मध्ययुगांतील कथांत स्त्रीवर्गाच्या सौंदर्याची आणि गुणांची जी स्तुति व तरफदारी केलेली दिसते ती उत्तर यूरोपांतील टयुटानिक लोकांच्या परंपरागत प्रवृत्तीनें दक्षिण यूरोपांतील लोकांत प्रेरित झालेली दिसते.

"हिंदुस्थानांतलि कल्पित कथांमध्यें दुसरा एक महत्त्वाचा दोष दिसून येतो तो हा कीं, त्यांत ठकबाजीनें प्रतिपक्षाचा पाडाव करण्याच्या रीतीला उघड उघड उत्तेजन दिलेलें असतें. हिंदूंचें अखिल राष्ट्रच कोल्ह्याप्रमाणें लुच्चेगिरीचें आचरण करण्यांत पौढी मिरवितें. लुच्चेगिरी, ठकबाजी करणें हें हलकेपणाचें निंद्य-कर्म आहे असें लोकांनां पटल्याशिवाय हिंदु राष्ट्राची सदसद्विवेकबुद्धि खरी सुधारली आहे असें म्हणतां येणार नाहीं. पंचतंत्रामध्यें वर सांगितलेल्या प्रकारच्या आक्षेपार्ह कथा पुष्कळ आहेत व त्या काढून टाकल्याशिवाय पंचतंत्र हें पुस्तक शाळेंत विद्यार्थ्यांनां शिकविणें योग्य होणार नाहीं."

कथाचिंतामणि हें कल्पित कथांचें पुस्तक फार लोकप्रिय आहे. नरसिंगरायर याचा सुप्रसिद्ध दिवाण अप्पाजी याच्या संबंधींच्या या कथा आहेत. महाभारतवाचनम् हें महाभारताचें तामिळ भाषेंत गद्यात्मक भाषांतर आहे. सबंध ग्रंथाची किंमत १५ रुपये असून त्याचे निरनिराळे भागहि विकत मिळतात. उदा.:—महाभारत, आदिपर्ववाचनम्, महाभारत-सभापर्ववाचनम्, महाभारत विराटपर्ववाचनम् वगैरे. नलचक्रवर्ती ( नलदमयंतीची कथा ), पुरूरवचक्रवर्तीकतै (पुरूरवा राजाची कथा ), रामायणवाचनम्, रामायणउत्तरकांडम्, अश्वमेधपर्वम् ( महाभारतांतील अश्वमेधासंबंधी कथा ), कमरजनकतै ( कामदेवासंबंधींची कथा ), वगैरे कथांचीं पुस्तकें संस्कृत पुराणांच्या आधारानें तयार केलेलीं आहेत. याशिवाय अरेबियन नाइट्स, हितोपदेश, पंचतंत्र, पर्शियन कथा वगैरे गोष्टींच्या पुस्तकांच्या आधारें तामिळ भाषेंत पुस्तकें झालीं आहेत.

मुसुलमानांनीं लिहिलेले तामिळ ग्रंथ.—तामिळ मुसुलमानांच्या संख्येच्या मानानें त्यांनीं लिहिलेले ग्रंथ बरेच आहेत. त्यांचे बरेचसे ग्रंथ धर्मविषयक आहेत. कुराणाचें मात्र तामिळ भाषेंत भाषांतर केलेलें नाहीं, कारण तसें करणें पाप आहे अशी त्यांची समजूत आहे. तामिळ मुसुलमानांनीं लिहिलेल्या ग्रंथांत हिंदुस्थानी शब्द बरेच असतात. आइर्मसल या ग्रंथांत जगाची उत्पत्ति स्वर्ग, नरक, सप्तलोक, जीझसचें आगमन, महंमद वगैरेसंबंधींची माहिती आहे. सिरकीर्तनम् या ग्रंथांत महंमद पैगंबराची हकीकत असून अनेक अद्भुत चमत्कारांच्या गोष्टी दिल्या आहेत. पेनपुत्तिमलई या पुस्तकांत स्त्रियांनां नित्युपदेश केलेला आहे. वैत्तियरातकम् यामध्यें वैद्यकासंबंधीं माहिती आहे, व ती आर्यवैद्यक पद्धतीप्रमाणें दिली आहे.

तामिल वाङ्मय व ब्रिटिश काल.—ब्रिटिश राज्य प्रथम तामिळ मुलखांत सुरू झालें. त्यामुळें तामिल वाङ्मयाच्या अर्वाचीन काळास जरा अगोदर सुरवात होणें स्वाभाविक आहे तथापि त्याचा परिणाम एवढाच झालेला दिसतो कीं तामिळमध्यें ख्रिस्ती वाङ्मय बरेंचसें झालेलें आहे. पण हें उत्तेजन सर्व तामिळ राष्ट्रावर परिणामकारी झालें नाहीं. खरी तामिळ वाङ्मयाच्या वाढीस सुरवात एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत झाली. इ. स. १८५३ सालापर्यंत मराठी भाषेचा पगडा तामिळ मुलखांत होता. तालुक्याच्या दप्तराची भाषा तामिळ व जिल्ह्याच्या दप्तराची भाषा मराठी व लिपी मोडी अशी स्थिति होती. यावेळेस माध्व मंडळी विशेषेंकरून मराठी शिकत. ते महाराष्ट्रीय ब्राह्मणांच्याकडे शागीर्दपणा करीत आणि त्यांच्या मार्फतच दसरीं प्रविष्ट होत. पूर्वी तामिळ ब्राह्मण सरकारी नोकरींत थोडेच होते. सरकारी कारकुनी खालच्या प्रतीची, ती मुदलियारांनीं करावी आणि वरच्या प्रकारची महाराष्ट्रीय ब्राह्मणांनीं करावी अशी त्यावेळीं स्थिति होती. १८५३ सालीं मराठी बंद होऊन जिल्ह्यांतून तामिळ सुरू भाषा झाली. तेव्हां तामिळ ब्राह्मणच पुढें अधिक सरसावले. मद्रास युनिव्हर्सिटी

१८५७ साली स्थापन झाली. तिच्या योगानें तामिळ ब्राह्मणांचाहि राजन्यवहारांत प्रवेश वाढत गेला. कुंभकोणम् येथें एक कॉलेज स्थापन झालें, तेथें अगोदर संस्कृत विद्या वास करीत होतीच, पण तेथें कॉलेज स्थापन झाल्यानंतर जो वर्ग केवळ संस्कृत विद्येकडे जावयाचा तो इंग्रजी विद्येकडे वळून त्याचाहि राजदरबारांत अधिकाधिक प्रवेश झाला. युनिव्हर्सिटीची तामिळ भाषेवर पुढील परिणामकारी गोष्ट म्हणजे तामिळ भाषेचा अभ्यास युनिव्हरसिटीनें ती दुय्यम भाषा म्हणून मान्य करून वाढविला ही होय.

तामिळ भाषेचें प्रथमतःअभ्यासग्रंथ म्हणून महत्त्व पावलेलें पुस्तक म्हटलें म्हणजे प्रताप मुदलियार याचें आत्मचरित्र होय. हें चरित्र फार साध्या भाषेंत लिहिलें गेलें असल्यामुळें बरेंचसें लोकप्रिय झालें होतें. हा प्रताप मुदलियार ईस्टइंडिया कंपनींत कारकून होता आणि यांत अव्वल इंग्रजीच्या व जुन्या हिंदु रहाणीच्या गोष्टी आल्यामुळें हें तामिळ भाषेच्या यूरोपीय अभ्यासकांसहि आकर्षक झालें आहे व मुलकी परीक्षांसाठीं अभ्यासपुस्तक म्हणून हेंच नेमलें जाई.

आजच्या तामिळ वाङ्मयाचें महत्त्व अखिल भारतीय महत्त्वाच्या दृष्टीनेंहि थोडेंच आहे. नाटकें, कादंबऱ्या, काव्यें, कमिक पुस्तकें, शालोपयोगी पुस्तकें, शास्त्रविषयक अत्यंत प्राथमिक स्वरूपाचीं पुस्तकें, ख्रिस्ती पुस्तकें, संस्कृत धार्मिक ग्रंथाचीं भाषांतरें, हीं सर्व तामिळमध्यें झालीं आहेत. तथापि यांमध्यें महत्त्वाचीं पुस्तकें नाहींत म्हटलें तरी चालेल. कादंबऱ्यांमध्यें रेनाल्डच्या कादंबऱ्यांचीं भाषांतरें तर सपाटून आहेत. ऐतिहासिक कादंबऱ्याहि कांहीं झाल्या आहेत. एक महाराणा प्रतापसिंहावर, एक पद्मिनीवर, व एक तशीच विजयनगरच्या विनाशावर कादंबरी आहे. पी. संबंधम् मुदलियार हायकोर्ट वकील हे कादंबरीकार म्हणून पुढें आलेले गृहस्थ आहेत. तसेंच डिटेक्टिव्ह कादंबऱ्यांचा सुळसुळाट पुष्कळच आहे. आजचें कादंबरीवाङ्मय मराठी कादंबरी-वाङ्मयापेक्षां कमी योग्यतेचें आहे असें तेथील महाराष्ट्र-भाषापरिचित लोकांचें मत आहे.

नाटकें तामिळमध्यें होत आहेत. तामिळ मंडळी आपल्या-इतकीच नाटकांची शोकी आहे. तेथें नाटककंपन्यांत स्त्रिया देखील फिरत आहेत. अर्थात् या सर्व देवदासी वर्गांतल्याच आहेत. तथापि देवदासी या वर्गास एक निराळा धंदा करावयास मिळाला म्हणून हीहि एक महत्त्वाची प्रगतीचीच गोष्ट म्हटली पाहिजे. नाटक कंपनीकडे महाराष्ट्रापेक्षां तामिळ नाडूंत अधिक भांडवल घातलें जातें. सध्यां तेथील प्रमुख नाटक कंपन्यांमध्यें "कन्नया"च्या नाटक मंडळीचें नांव देतां येईल. नाटकें संगीत आहेत तशीं गद्यहि आहेत. ऐतिहासिक संगीत नाटकांत व्ही. जी. सूर्यनारायणराव शास्त्री यांचे " मनविजयं " व बहादूर पी. सुंदर पिले यांचें " मनोन्मणीयं " यांना नांवें देतां येतील. मनोन्मणीयं याचें संविधानक बरेंचसें शाकुंतलाच्या धर्तीवर आहे.

अर्वाचीन तामिळ वाङ्मयावरून तामिळ जनतेचें बुद्धि-मर्यादेचें चित्र रंगवतां येणार नाहीं. कांकीं इतर भागांपेक्षां तामिळ नाडूमध्यें इंग्रजी भाषेचा प्रवेश अधिक झाला आहे व प्राथमिक शाळांतून देखील इंग्रजी भाषेचें शिक्षण देतात. मुंबई कलकत्त्यासारख्या शहरांत हिंदुस्थानीला जें प्रामुख्य येतें तें मद्रासला इंग्रजी भाषेला आहे. गाडीवाले, रिक्शावाले, बूट दुरुस्त करणारे, मोची, शिंपी या सर्वांमध्यें इंग्रजीचा प्रचार अधिक झाला आहे आणि सर्व हिंदुस्थानांत इंग्रजी पुस्तकांचें मद्रास हेंच मुख्य मुद्रणस्थान झालें आहे. यामुळें तामिळ भाषेंतील ग्रंथसंपत्तीकडे फारसें लक्ष गेलें नाहीं व तामिळ लोकांनीं लिहिलेल्या इंग्रजी पुस्तकलेखांहून तामिळ पुस्तक-लेखांची योग्यता कमी आहे. निरनिराळ्या हिंदुस्थानाच्या भागांतील इंग्रजी पत्रांसाठीं मद्रासहून लेखक आणले जातात. खुद्द मद्रासमध्यें देशी लोकांनीं चालविलेल्या इंग्रजी पत्रांचेंच महत्त्व अधिक आहे. तामिळ दैनिक स्वराज्य, स्वदेशमित्र वगैरे आहेतच. नॉनकोऑपरेशनवाल्यांचें मुख्य मुखपत्र म्हटलें म्हणजे देशभक्त होय. तामिळमध्यें चांगल्या मासिकांचेंहि दुर्भिक्ष्यच आहे. तामिळांचें एका काळीं अत्यंत प्रसिद्ध असलेलें पण सध्यां दिवंगत झालेलें मासिक म्हटलें म्हणजे "विवेकचिंतामणि" हें होय. सध्या थोडे पुढें आलेलें मासिक म्हटलें म्हणजे " विवेकबोधिनी " होय. याचें स्थूल-पणें स्वरूप मनोरंजनासारखें आहे. आतां मोठ्या काव्याचें उत्पादन जवळ जवळ नाहींसें होऊन तुटक स्फुट कविता बरीच वाढूं लागली आहे व ती मासिकांत बरीच दृष्टीस पडते. गणपतीच्या मेळ्यांत ज्याप्रमाणें जोरदार गाण्यांस अवकाश सांपडतो त्याप्रमाणें तेथेंहि अनेक उत्सवांत व मेळ्यांत सांपडतो. या प्रसंगीं जीं जोरदार "राष्ट्रीय" गाणीं म्हटलीं जातात त्यांत सुब्रह्मण्य भारती ब्यारिस्टर यांच्या गाण्यांचा उल्लेख केला पाहिजे. हा कवि विनायकराव सावरकरांच्या व चिदंबरम् पिल्लेच्या संगतींतला म्हणून प्रख्यात आहे. जुन्या कवींची म्हणजे भाटांची परंपरा अजून नष्ट झाली नाहीं. अनेक मोठ्या जमीनदारांस " पुलवर " नांवानें प्रसिद्ध असलेले गायक ठेवावे लागतात व त्यांच्या या हक्कास थोडीशी सरकारकडूनहि मान्यता मिळाली आहे.

**तामिळ भाषेंतील ख्रिस्ती धर्म-ग्रंथ.**—असले धर्मग्रंथ देश्य भाषांत तयार करण्याचें काम प्रॉटेस्टंट व रोमन कॅथॉलिक या दोन्ही ख्रिस्ती धर्मपंथांच्या लोकांनीं केलें आहे. त्यापैकीं प्रॉटेस्टंट लोकांच्या कामगिरीची हकीकत प्रथम दिली आहे. हिंदुस्थानांतील सर्व भाषांपैकीं प्रथमतः तामिळ भाषेंत बायबलचें भाषांतर झालें. स. १६८८मध्यें सिलोनमध्यें राहणाऱ्या डच लोकांनीं बायबलच्या उत्तरार्धाचें ( न्यू टेस्टॅमेंट )भाषांतर सुरू केलें आणि स. १६९४ मध्यें पूर्वार्धाचें ( ओल्ड टेस्टॅमेंटचें ) सुरू केलें. पहिले प्रॉटेस्टंटपंथी मिशनरी

१७०६ मध्यें हिंदुस्थानांतील ट्रंकीबार बंदरीं उतरले. त्यांच्यापैकीं झीगेनवल्ग यानें न्यू टेस्टॅमेंटचें भाषांतर तामिळमध्यें सुरू केलें. तें १७११ सालीं पुरें झालें. त्याच सालीं छापण्याचें यंत्र हिंदुस्थानांत येऊन १७१५ सालीं या भाषांतराची पहिली आवृत्ति प्रसिद्ध झाली. स. १७१३ मध्यें झीगेनवल्गनेंच ओल्ड टेस्टॅमेंटचें भाषांतर सुरु केलें व तें दोघातिघांच्या मदतीनें स. १७२८ मध्यें पुरें झालें. स. १७२४ मध्यें ख्रिस्ती सूर्क्ते ( साम्स )यांचें एक पुस्तक छापलें गेलें. यानंतर मद्रास ऑग्झिलिअरी-बायबल सोसायटी, जॅफना ऑग्झिलिअरी बायबल सोसायटी व दुसऱ्या कित्येक मिशनरी सोसायट्यांनीं बायबलच्या सुधारलेल्या आवृत्त्या छापून प्रसिद्ध केल्या. स. १८२९ मध्यें छापलेल्या तामिळ भाषेतील बायबलचे पांच मोठाले व्हॉल्यूम्स तयार झाले होते. स. १८३१ मध्यें लहान टाइप वापरून संपूर्ण न्यू टेस्टॅमेंट एका भागांत प्रसिद्ध करण्यांत आलें. स. १८४० मध्यें संपूर्ण बायबल एकाभागांत प्रसिद्ध करण्यांत आलें. स. १८५८ मध्यें अमेरिकन मिशन प्रेसनें अगदीं लहान टाइप वापरून संपूर्ण बायबलची अगदीं लहान आकाराची प्रत प्रसिद्ध केली. इंग्लिश बुक ऑफ कॉमन प्रेअर याचें डॉ. रॉट्लरनें भाषांतर स. १८१९ मध्यें, दी लेडीज तामिळ बुक याचें भाषांतर डॉ. ईमूलनें स. १८५९मध्यें, डच रिफॉर्म लिटर्जी याचें भाषांतर रेव्हरंड डॉ. एच्. एम. स्कूडरनें स. १८६२ मध्यें, प्रेअर्स फॉर फॅमीलीज याचें भाषांतर १८२८ सालीं प्रसिद्ध झालें. जर्मन भाषेंतील व इंग्लिश भाषेंतील ख्रिस्ती सामांचीं भाषांतरें बरींच प्रसिद्ध झालीं पण पाश्चात्य संगीत चालींचीं हीं भाषांतरें तामिळी लोकांनां पसंत पडलीं नाहींत. म्हणून तामिळी संगीत चालीवर ख्रिस्ती गाणीं तयार करण्यांत आलीं. पण असल्या गाण्यांचा सार्वजनिक प्रार्थनेमध्यें उपयोग करण्याला पुष्कळ मिशनऱ्यांनीं प्रथम विरोध केला. देश्य वृत्तांतील ख्रिस्ती गाणीं सुरू करण्याचा उपक्रम प्रथम अमेरिका-मदुरा मिशनच्या रेव्हरंड इ. वेबनें केला. तंजावर येथील वेथनयगशास्त्री या ख्रिस्ती झालेल्या कवीनें सार्वजनिक प्रार्थनेला योग्य अशीं बरींच ख्रिस्ती गाणीं तयार केलीं. हीं देश्य वृत्तांतलीं गाणीं पुस्तकरूपानें स. १८५३ मध्यें प्रसिद्ध झालीं. तीं इतकी लोकप्रिय झालीं कीं असल्या गाण्यांचा मोठा संग्रह प्रसिद्ध करण्याचें वेबनें ठरविलें; व असलीं गाणीं तयार करण्याला उत्तेजन म्हणून बक्षिसेंहि लाविलीं. असल्या २८१ गाण्यांचा ग्रंथ स. १८६०मध्यें 'ख्रिश्चन व्हर्न्याक्यूलर एज्युकेशन सोसायटी'नें प्रसिद्ध केला. त्याची १५०० प्रतींची पहिली आवृत्ति लवकरच खपल्यामुळें २००० प्रतींची दुसरी आवृत्ती १८६४ सालीं काढण्यांत आली.

'दि वे टु साल्वेशन ' याचें भाषांतर ट्रांक्विबार येथें १७४७ सालीं, आर्ट्स टू ख्रिश्चानिटी याचें भाषांतर १७५० सालीं, दि पिल्ग्रीम्स प्रोग्रेसचें भाषांतर १७९३ सालीं, बोगात्स्कीच्या गोल्डन ट्रेझरीचें भाषांतर १८०० सालीं प्रसिद्ध झालें. सन १८५० नंतर ख्रिस्ती धर्मासंबंधाच्या निरनिराळ्या विषयांवर पुष्कळ ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. धर्मप्रसाराचें काम सुलभ होण्याकरितां ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं धर्मविषयक लहान लहान पुस्तकें प्रसिद्ध करण्याचें काम सुरू केलें. अशा प्रकारच्या पुस्तकांतील मजकूर स्थानिक लोकांची मनोरचना लक्षांत घेऊन लिहिलेला असतो आणि आकार लहान व किंमत थोडी यामुळें असल्या पुस्तकांचा प्रसार थोड्या शिकलेल्या व गरीबगुरीब लोकांत फार होतो. ही गोष्ट लक्षांत घेऊन असलीं लघुधर्मपुस्तकें लिहिण्याचा उपक्रम झीगेनबल्गनें १७१३ सालीं केला. त्यानें आपलें पुस्तक तामिळ भाषेंत तामिळ लोकांनां उद्देशून लिहिलेल्या पत्राच्या स्वरूपांत तयार केलें होतें. अशा पुस्तकांच्या प्रसारासंबंधानें जॉफना येथील रेव्हरंड एल्. स्पॉल्डिंग म्हणतोः—" स. १८२० मधील अशा पुस्तकांच्या प्रसारासंबंधींच्या जॉफना येथील गोष्टी मला आठवतात. त्या काळांतील सर्व मिशनरी लोकांची अशी पद्धत असे कीं दररोज संध्याकाळीं ४ वाजल्यापासून सूर्यास्तापर्यंत खेडेगांवांतील लोकांच्या घरोघर जावयाचें व त्यांच्याशीं गप्पागोष्टी बोलत त्यांच्यामध्यें लघुधर्मपुस्तकांचा प्रसार करावयाचा. स्वतः मी असल्या तऱ्हेचीं शंभर पुस्तकें थोडक्याच दिवसांत खपविलीं. त्यावेळीं जाफना मिशनमध्यें अमेरिकेहून आलेल्या प्रिंटरला सिलोनच्या गव्हर्नरनें तें बेट सोडून जाण्याचा हुकूम केला. तेव्हां हस्तलिखित लघुधर्मपुस्तकें आम्हीं तयार करविलीं. त्या कामाकरितां चांगलें हस्ताक्षर असलेल्या शिक्षकांचा व विद्यार्थ्यांचा आम्ही उपयोग करीत होतों, व त्यांनां चार पानें लिहिण्याबद्दल एक पैसा मजुरी देत होतों. अशीं लघुधर्मपुस्तकें प्रसिद्ध करणाऱ्या मद्रास रिलिजस ट्रॅक्ट सोसायटी ( स्थापना १८१८ ), तिनेवेल्ली ट्रॅक्ट सोसायटी ( १८२२ ), साउथ त्रावणकोर ट्रॅक्ट सोसायटी ( १८५५ ), नेयूर ट्रॅक्ट सोसायटी, जॉफना ट्रॅक्ट सोसायटी ( १८२३ ), तंजावर ट्रॅक्ट सोसायटी वगैरे अनेक सोसायट्या स्थापन होऊन त्यांनीं ग्रंथप्रकाशनाचें काम पुष्कळ केलें आहे.

**रोमन कॅथॉलिक पंथाचे ग्रंथ.**—रोमन कॅथॉलिक मिशनरी, पोर्तुगीज भूसंशोधकांबरोबर प्रथम हिंदुस्थानांत आले व त्यांनीं धर्मप्रसाराच्या कामास जोरानें सुरवात केली. रोमन कॅथोलिक मिशनचा तामिळ देशांतील आद्य संस्थापक झेवियर हा होय. रॉबर्ट डी नोबिली नांवाचा मिशनरी मदुरा येथें स. १६०६ मध्यें आला. त्याला संस्कृत व तामिळ या दोन्ही भाषा येत होत्या; त्यानें पुष्कळ पुस्तकें तामिळ भाषेंत लिहिलीं. त्याचें तामिळ लोकांनीं तत्तुव पोदकर ( खरा शिक्षक ) असें नांव ठेविलें होतें. त्यानें निनोपतेस कंदम(आध्यात्मिक उपदेशाचें पुस्तक), मंत्तिर वियकेकियनम (प्रार्थनांचें स्पष्टीकरण), अत्तुम निरनयम ( आत्म्याच्या

अस्तित्वाची प्रमाणें ), सत्यवेतलसनम ( खऱ्या वेदाचें लक्षण ), सकुननिवरनम् ( शकुनांचें निवारण ), कदकुल निरूनयम् ( ईश्वराच्या अस्तित्वाची प्रमाणें ), पुनर्जन्म अस्लेपम् ( आत्म्याच्या पुनर्जन्मविषयक सिद्धान्तावर आक्षेप ), नितियसिवनसल्लपम् ( अमर्त्यत्वाबद्दल संभाषण ), सेसुनतर सारित्तिरम् ( जीजस क्राइस्टचा इतिहास ), ञॅनतिपिकेयी ( ज्ञानाचा दीप ), नीतिस्सोल ( म्हणी ), वगैरे पुस्तकें तामिळ भाषेंत लिहिलीं.

रेव्हरंड बीजवेसची हा जेसुट मिशनरी १७ व्या शतकाच्या आरंभीं हिंदुस्थानांत आला. त्यानें तामिळ भाषेचा व वाङ्मयाचा अभ्यास केला इतकेंच नव्हे तर खाणेपिणें पोषाक वगैरे बाबतींतहि त्यानें तामिळ लोकांची पद्धति उचलली आणि हिंदु लोकांच्या गुरुप्रमाणें मोठा भपकेदार देखावा केला. बोटांत आंगठ्या घालून तो पांढऱ्या घोड्यावर बसून किंवा पालखीमध्यें बसून प्रवास करीत असे. त्याच्या डोक्यावर रेशमी छत्री धरण्यास माणूस असे. तो वाघाच्या कातड्यावर बसत असे. इ. स. १७३६ मध्यें त्याला एका संस्थानांत दिवाणहि नेमण्यांत आलें होतें. मदुरा कॉलेजनें बेसचीला धारमामुनी अशी पदवी दिली होती. त्यानें तरुण तामिळी लोकांत शिक्षणाचा प्रसार पुष्कळ केला व गरीब विद्यार्थ्यांनां पुष्कळ मदत केली व शिकलेल्या इसमांनां त्यांच्या योग्यतेनुसार नोकऱ्या मिळवून दिल्या. बेसची हा खंदा लेखक होता. त्यानें एकंदर तेवीस ग्रंथ लिहिले असें म्हणतात. त्यांचीं नांवेंः—वेदांचें तेज, लूथर, न कोमेजणारी माला, मधुर माला वगैरे. पाँदेचरी येथें रोमन कॅथॉलिक प्रेसनें छापण्याचें काम १८४० सालीं सुरू करून पुष्कळ ग्रंथ प्रसिद्ध केले.

**शा ळां ती ल क्र मि क पु स्त कें.**—शाळांमध्यें लेखन व वाचन एकदम शिकविण्यांत येतें. चांगला दिवस पाहून मुलाला शाळेंत घालतात. त्याला प्रथम मूळाक्षरें शिकवितात. नंतर अत्तिसुदी शिकवितात. या पुस्तकांतील विषयाचा अर्थ मुलांनां मुळींच समजत नाहीं व बऱ्याचशा शिक्षकांनांहि समजत नाहीं. या पुस्तकांतील कोणत्याहि घड्याचा अर्थ समजावून सांगत नाहींत. मुलांनीं फक्त तें पुस्तक घोकून पाठ करावें अशी पद्धत आहे गणित हा विषय हिंदुस्थानांत सर्वत्र फार लोकप्रिय आहे. पण गणित शिकण्याचा मुख्य उद्देश बाजारांतल्या देवघेवींचे हिशेब मुलांनां नीट करतां यावेत हा असतो. त्यामुळें अंकगणितांतील ह्या विषयासंबंधाचीं प्रकरणेंच शिकवितात. अलीकडे यूरोपीय शिक्षणपद्धतीवर चाललेल्या शाळांमध्यें बीजगणित, भूमिति, त्रिकोणमिति वगैरे निरुपयोगी गणिताच्या शाखांकडे विशेष लक्ष देऊन रोजच्या व्यवहारांत विशेष उपयोगी पडणाऱ्या अंकगणिताकडे दुर्लक्ष केलें जातें अशी सामान्य लोकांची तक्रार आहे. प्राथमिक शाळांमध्यें उजळणी पाठ करून घेण्याकडे विशेष कटाक्ष असे. दररोज सकाळसंध्याकाळ मुलांनीं एका ओळींत उभे केल्यावर एक विद्यार्थी प्रथम उजळणी सांगतो व नंतर इतर मुलें अगदीं मोठ्या आवाजांत तो भाग ( पर्वचा ) म्हणतात.

प्रथम क्रमिक पुस्तकें त्रांकीबार व इतर ठिकाणच्या मिशनऱ्यांनीं स्वतःच्या शाळांतील शाळांकरितां तयार केलीं. १८१७ सालीं कलकत्ता स्कूलबुक्स सोसायटी स्थापन झाली व त्यानंतर लवकरच तसली एक सोसायटी मद्रास येथें स्थापन झाली. तथापि मद्रासची सोसायटी बरींच वर्षे केवळ नांवाला अस्तित्वांत होती. पुढें स. १८५० च्या सुमारास ही सोसायटी पुन्हां जोमानें कार्यप्रवृत्त होऊन तिनें ठरविलेल्या विषयांवर उत्तमोत्तम पुस्तकें लिहिणारांनां बक्षिसें देऊं केलीं. यामुळें अनेक विषयांवर चांगलीं क्रमिक पुस्तकें निर्माण झालीं त्यांपैकींच एच्. मॉरिसी याचें हिस्टरी ऑफ इंडिया हें पुस्तक होय. मिशनऱ्यांच्या शाळेंत शिकविण्याकरितां कांहीं ख्रिस्ती धर्मपर पुस्तकें मद्रास ट्रॅक्ट सोसायटीच्या कमिटीनें तयार केलीं. १७५४ सालीं साउथ इंडिया ख्रिश्चियन स्कूलबुक्स सोसायटी स्थापन झाली पण पुढें ती सोसायटी १८५९ सालीं स्थापन झालेल्या ख्रिश्चन व्हर्न्याक्युलर एज्युकेशन सोसायटीच्या मद्रास शाखेमध्यें समाविष्ट झाली. ब्रिटिश सरकारचें पब्लिक इन्स्ट्रक्शन डिपार्टमेंट स्थापन झाल्यावर सरकारी शाळांकरितां क्रमिक पुस्तकांचा पुरवठा करणारी दुसरी एक संस्था अस्तित्वांत आली. अशा रीतीनें तामिळ भाषा व व्याकरण, भूगोल, हिंदुस्थानचा व इंग्लंडचा इतिहास, अंकगणित, बीजगणित, भूमिती वगैरे विषयांवर तामिळ भाषेंत क्रमिक पुस्तकें तयार झालीं.

क्रमिक पुस्तकांपैकीं हिंदुस्थानचा इतिहास लिहितांना एक महत्त्वाची अडचण उत्पन्न होते. ती तामिळ किंवा द्राविडी लोकांच्या प्राचीन इतिहासलेखनासंबंधींची. यासंबंधीं कॉल्डवेल म्हणतो, "तामिळ किंवा द्राविडी लोक मूळ कोणत्या मानववंशांतले आहेत. यासंबंधानें हिंदु समाजांतहि कोणत्याहि वर्गाला कांहीं एक माहिती नाहीं, तसेंच संस्कृत वाङ्मय किंवा द्राविडी भाषांचें वाङ्मय यांमध्येंहि या विषयासंबंधानें कोणतीहि ऐतिहासिक माहिती किंवा नुसत्या दंतकथाहि दिलेल्या नाहींत; ही एक लक्षांत घेण्यासारखी गोष्ट आहे. तामिळ लोक दगडांच्या राशींनां ( या राशी थडग्यांच्या चिन्हदर्शक असतात ) पांडुकुरी असें म्हणतात. कुरी म्हणजे खड्डा आणि पांडु म्हणजे महाभारतांतील पांच पांडव. कोणतेंहि कृत्य पांडवांनीं केलेलें आहे असें म्हणणें म्हणजे त्यासंबंधानें कांहींच माहिती नाहीं असें म्हणण्यासारखें आहे. एखादी इमारत पांडवांनीं बांधलेली आहे याचा अर्थ एवढाच कीं ती फार प्राचीनकाळीं बांधलेली आहे आणि ती कोणत्या लोकांनीं बांधली तें माहीत नाहीं. 'पांडुकुरी' कुणी बांधल्या असा प्रश्न केल्यास त्या

येथें रहाणाऱ्या लोकांनीं बांधल्या असे तामिळ लोक सांगतात. पण हे प्राचीन लोक तामिळांचेच वंशज होते किंवा दुसऱ्या एखाद्या परकी वंशाचे लोक होते हें तामिळ लोकांनां सांगतां येत नाहीं. सदरहू प्रश्नास एखाद्या वेळीं असेंहि उत्तर देण्यांत येतें कीं, हीं थडगीं फार प्राचीनकाळीं रहाणाऱ्या एका ठेंगू ( ड्वार्फ ) जातीच्या लोकांनीं बांधलीं. हे लोक एक हातभर उंच असूनहि त्यांच्या अंगीं राक्षसासारखी शक्ति होती."

प्राचीन इतिहासासंबंधींच्या तामिळ लोकांच्या कल्पना रामायण व महाभारत या ग्रंथांवरूनच मुख्यतः बनल्या आहेत. कॉल्डवेल याला शिलालेखावरून जो पुरावा मिळालेला आहे त्यावरून तो म्हणतो कीं, मदुरा येथील राजांचीं कर्णमधुर अशीं जीं संस्कृत नांवें आढळतात तीं सर्व काल्पनिक असलीं पाहिजेत. तामिळ लोकांचा प्राचीन इतिहास समजण्याकरितां मद्रास इलाख्यांत सांपडणारे सर्व ठिकाणचे शिलालेख एकत्र करून त्यांचा ऐतिहासिक दृष्ट्या अभ्यास व्हावयास पाहिजे. शिलालेखांतील माहिती हाच प्राचीन इतिहासाची इमारत उभारण्यास खरा विश्वसनीय आधार होय.

मा सि कें.—स. १८६५ च्या सुमारास तामिळ भाषेमध्यें बारा मासिकें प्रसिद्ध होत होतीं.त्यांपैकीं दोन खेरीज बाकीचीं ख्रिस्ती लोकांनीं चालविलेलीं होतीं. हिंदुस्थानांत सुरू झालेलें अगदीं पहिलें मासिक "तामिळ मॅगेझीन" हें असावें असें वाटतें. तें स. १८३१ मध्यें मद्रास रिलिजस ट्रॅक्ट सोसायटीनें सुरू केलें. पण वरचेवर संपादक बदलल्यामुळें त्याला सुस्थिति प्राप्त झाली नाहीं. शिवाय ख्रिस्ती धर्मविषयक लांबलांब धर्मोपदेश ( सरमन्स ) त्या मासिकांत प्रसिद्ध होत असल्यामुळें त्याच्या खपावर बराच अनिष्ट परिणाम झाला. स. १८४६ मध्यें त्या मासिकाला पाक्षिक बनवून दि ट्रुथफुल मेसेंजर या नांवाचें मासिक सुरू करण्याचें ठरलें, पण तेंहि सहा महिन्यानंतर बंद पडलें. हल्लीं हयात असलेल्या तामिळ मासिकामध्यें मिशनरी ग्लीनर हें नागेर कॉईल येथें छापलें जाणारें आणि फ्रेंडली इन्स्ट्रक्टर हें पालंकोटा येथें निघणारें हीं दोन मासिकें सर्वांत जुनीं आहेत. मिशनरी ग्लीनर हें मासिक स. १८४० च्या सुमारास सुरू झालेलें असून मिशनरी कार्याचें वृत्त देणें हाच त्याचा मुख्य उद्देश आहे.स. १८५४ मध्यें दि तामिळ क्वार्टर्ली रिपॉझिटरी या नांवाचें मासिक अमेरिकन-मदुरा मिशननें रेव्हरंड. ई. वेब याच्या संपादकत्वाखालीं सुरू केलें. याचा उद्देश मिशनच्या एजंटांनां अभ्यासाकरितां लागणारीं पुस्तकें क्रमयाक्रमधानें प्रसिद्ध करणें हा होता. तदनुसार चर्चचा इतिहास, मौतिकतत्त्वज्ञान वगैरे विषयांवर लेख प्रसिद्ध झाले. पुढें ही योजना गैरसोईची वाटल्यावरून एकेक स्वतंत्र पुस्तकच प्रसिद्ध करण्याचें मिशननें ठरविलें. स. १८६१ मध्यें ख्रिश्चन व्हर्न्याक्युलर एज्युकेशन सोसायटीनें देशोपकारी या नांवाचें सचित्र मासिक सुरू केलें व तें हिंदू लोकांच्याहि वाचनांत येईल असें धोरण राखलें. त्याचा संपादक रेव्हरंड एफ्. वेलीस हा होता. याच्या या मासिकाच्या सुमारें एक हजार प्रती खपत असत. पण मुख्यतः त्याचा खप ख्रिस्ती लोकांतच होत असे. मद्रास येथील फ्री चर्च मिशनचा रेव्हरंड आर. एस्. बाबू यानें दी लँप ऑफ लाइट या नांवाचें मासिक बरींच वर्षे चालविलें. त्याचा मुख्य खप मद्रास शहारांतच असे. हिंदूमध्यें धार्मिक ज्ञानाचा प्रसार करणें हा त्याचा मुख्य उद्देश असे. स. १८६३ मध्यें दि साऊथ त्रावणकोर ख्रिश्चन मेसेंजर या नांवाचें पत्र नॅगेर कॉईल येथें सुरू झालें. त्यामध्यें लहान लहान पण खोचदार लेख असत. स. १८६३ मध्येंच ल्युथेरन मिशननें अरुणोदयम् नांवाचें मासिक सुरू केलें. मद्रास शहरांत स. १८६५ मध्यें अमिर्यवचनी नांवाचें सचित्र मासिक हिंदु स्त्रियांकरितां सुरू करण्यांत आलें. त्यांत लेख लिहिणाऱ्या मुख्यतः नेटिव्ह ख्रिस्ती स्त्रियाच असत.

वरील सर्व मासिकें मोठ्या माणसांकरितां आहेत पण केवळ लहान मुलांकरितां म्हणून स्वतंत्र मासिकें निघतात. बालदीपिकै नांवाचें त्रैमासिक स. १८४० मध्यें नॅगेर कॉईल येथें सुरू होऊन बरींच वर्षे चाललें. पण तें स. १८५२त बंद झालें. शिरुपीलैन नेसतोलन ( मुलांचा मित्र ) या नांवाचें दुसरें एक त्रैमासिक मुलांकरितां स. १८४९ मध्यें पालंकोटा येथें सुरू झालें व अनेक वर्षे चालू राहिलें. १८५८ सालीं साउथ इंडियन ख्रिश्चन स्कूलबुक्स सोसायटीचें मिशन स्कूल मॅगेझिन आणि त्याच्या पुढच्या वर्षी जाफना येथें पालियनेंसन नांवाचें मासिक सुरू झालें. स. १८६५ सुमारास फक्त दोन मासिकें हिंदू लोकांनीं चालविलीं होतीं त्यांपैकीं एक मद्रास वेद समजाचें वत्तुवबोधिनी हें एक होय. या मासिकांत धार्मिक प्रश्नांची चर्चा करतांना मतभेद इतके माजले कीं लवकरच तें मासिक विकावें लागलें. तेव्हां एका सभासदानें तें विकत घेऊन त्यांत फक्त सामाजिक सुधारणा व वाङ्मय या विषयांवरच लेख मुख्यतः देण्याचें ठरविलें. यामुळें १८६५ सालीं विवेक विलक्रम् या नांवाचें दुसरें मासिक निघून त्यांत धार्मिक विषयांचीहि चर्चा येऊं लागली.

वृत्त प त्रें.-आरंभीं सुमारें २५वर्षें वयाच्या तामिळ लोकांनीं कित्येक तामिळ वृत्तपत्रें एकामागून एक सुरू केलीं. पण तीं थोडथोडा काळ टिकून बंद पडत गेलीं. १८५५ सालीं रेव्हरंड पी. पर्सिव्हलनें तिनवर्तमणी नांवाचें तामिळ साप्ताहिक सुरू केलें. त्याची वार्षिक वर्गणी मद्रासमध्यें नेटिव्हांनां ३ रुपये, यूरोपियनांनां पांच रुपये आणि बाहेरगांवच्या लोकांनां पोस्टेजसह पांच रुपये असे. हें पत्र थोडक्या वर्गणींत फार चांगले लेख देऊं लागल्यामुळें इतर पत्रांनां त्याची स्पर्धा करणें अशक्य झालें. अगदीं सुरवातीपासूनच त्यानें पुष्कळ

ग्राहक मिळविले. त्यामध्यें वाङ्मय व शास्त्रें यांवर लेख असून शिवाय बातमीहि असे आणि मधून मधून उत्तम तामिळ लेखकांच्या लेखांचे इंग्रजी भाषांतरात्मक लेखहि प्रसिद्ध होत. शिवाय या पत्रांत देश्य लोकांतील बातमीदारांचीं पत्रेंहि विनहरकत प्रसिद्ध होत असत. एकंदरींत या पत्रानें चांगली कामगिरी बजाविली. मद्रास इलाख्यांत प्रत्येक कलेक्टर ऑफिसमार्फत डिस्ट्रिक्ट गॅझेट प्रसिद्ध होत असे. यामध्यें इंग्रजी व देशी दोन्हीं भाषेंतल्या त्या जिल्ह्यासंबंधीचे सरकारी हुकूम, हवामानासंबंधींची माहिती, बाजारभाव, आठवड्याचें कॅलेंडर व इतर बरीच उपयुक्त माहिती उपलब्ध होत असे. यांशिवाय या गॅझेटामध्यें ज्यांना संपादकीय लेख म्हणतां येईल असे त्या त्या जिल्ह्यासंबंधीं विषयावर लेख येत असत. याच गॅझेटला जोडून साप्ताहिक पोलिससर्क्युलरहि प्रसिद्ध होऊं लागलें. या गॅझेटाची मासिक वर्गणी तीन आणे व २५ रुपयांहून कमी पगाराच्या सरकारी नोकरांना २ आणे असे. किरकोळ प्रतीला एक आणा किंमत असे. खाजगी जाहिराती गॅझेटच्या धोरणाला अविरोधी अशा एका ओळीला अर्धा आणा या दरानें घेण्यांत येत असत. हीं गॅझेटें १८५६ सालीं सुरु झालीं. या जिल्हा गॅझेटांना पुढीलप्रमाणें वर्गणीदार मिळाले होते. बेल्लारी १२९५; मदुरा २१५; तिनेवेल्ली ६२; कोइमतूर ४१९; तंजावर २१३; विजगापट्टण ४७; दक्षिण अर्काट २२६; त्रिचनापल्ली १५७; मद्रास २४१; सालेम १६०.

अमेरिकन जाफना मिशनकडून पुष्कळ वर्षें दर महिन्यास दोनदां जाफना मॉर्निंग स्टार या नांवाचें वृत्तपत्र प्रसिद्ध होत असे. त्याचें धोरण ख्रिस्ती असे, तरी पत्र चांगलें चालविलें होतें. त्याची वर्गणी सुद्धां दीड रुपया होती.

अलीकडे तामिळ नाडूमध्यें शिक्षणविकास आणि मुद्रणविकास झाल्यामुळें लोकसंख्येच्या मानानें तामिळ पुस्तकांचा संग्रह गुजराथीखेरीज इतर भाषेंतल्यापेक्षां संख्येनें अधिक आहे. तथापि तामिळ वाङ्मय मराठीइतपतहि उच्च विचारांचें, किंवा लेखनकौशल्याचें किंवा पांडित्याचें आश्रयस्थान नाहीं.

ता मि ळ सु भा षि तें.—सुभाषितें हा एक वाङ्मयाचा प्रकार असून त्यावरून लोकांचे विचार व रहाणी चांगली कळून येते. उदा० आंग्लभाषेंतील बहुतेक म्हणी हवामान व ऋतू यांसंबंधीं आहेत; कारण हवामानांतील फरक हा तिकडे फरक असा वाटतो पण हिंदुस्थानांत तो परिपाठींतला असतो त्यामुळें इकडील फारच थोड्या म्हणी हवेसंबंधीं असतात. दुसरी गोष्ट म्हणजे इकडील स्त्रीदास्यत्वाची. या विषयावर तामिळींत बऱ्याच म्हणी आहेत, पण आंग्लस्त्रियांना बराच मान असल्यानें इंग्रजींत अशा म्हणी सांपडणार नाहींत. इंग्रजी म्हणींत स्त्रियांचा पोशाख आणि शिंपी, तर आपल्या म्हणींत स्त्रियांचे दागिने आणि सोनार यांचा परामर्ष घेतलेला दिसेल. गर्व व पोकळ डौल यासंबंधींच्या म्हणी तामिळींत फार आहेत. तामिळ—किंवा द्राविडी म्हणाना—म्हणींतील एक विशेष म्हणजे त्यांतील प्राणी निर्बुद्ध व मुके दिसतात. आर्यांनीं ज्याप्रमाणें ( उदा. पंचतंत्रांत ) प्राण्यांच्या ठिकाणीं बुद्धि, चैतन्य व कांहीं मानवी गुण कल्पिले तसे द्राविडांनीं केलेले दिसत नाहीं. भारतीय सुभाषितें, भारतीय वाङ्मयाप्रमाणेंच चैतन्योत्पादक व प्रवृत्तिमार्गी नाहींत; तीं आपणाला निराश करतात; तेव्हां तामिळी सुभाषितें याच प्रकारचीं असणार. तामिळ सुभाषितें संख्येनें फार मोठीं ( सारा आठ हजारांवर ) व अत्यंत सुंदर आणि हृदयंगम आहेत इतर कोणत्याहि भारतीय वाङ्मयांत इतका उत्कृष्ट सांठा सांपडणार नाहीं. त्यांची कल्पना येण्याकरितां कांहीं निवडक सुभाषितें पुढें दिलीं आहेत.

ईश्वरासंबंधीं:—( १ ) तिळांतल्या तेलाप्रमाणें ईश्वर सर्वव्यापी आहे. ( २ ) नरकाचीं द्वारें बंद करण्याचा जो अडसर तीच ईश्वरोपासना होय. ( ३ ) जर ईश्वर म्हणून कोणी नाहीं असें म्हणशील तर शेणाकडे पहा; औषध कसलेंहि नाहीं म्हणशील तर दारुकाम पहा; जर कोणतेंहि रेचक नाहीं म्हणशील तर जेपाळाचें बीं पहा. ( ४ ) ईश्वर आपल्याला एखादा मार्ग दाखवील, पण तो आपल्या तोंडांत अन्न आणून घालील कां?

भवितव्यता:—( १ ) ईश्वरलिखितांत एक अणूचाहि फरक होणार नाहीं. ( २ ) मळ झाडून टाकतां येईल पण जन्माबरोबर आलेलें कर्म नाहींसें होणार नाहीं. ( ३ ) जरी एखादी बाई किल्ल्यांत ( राजघराण्यांत ) जन्माला आली असली, तरी तिच्यामागें नशीब लागलेलेंच आहे. ( ४ ) नशीबाप्रमाणें तुम्हाला बायको व उपाध्याय मिळत असतो.

चांगलें नशीब:—(१) सौंदर्याच्या ठिकाणीं रड व नशीबाच्या ठिकाणीं खाद ठेविलेलें म्हणून समजावें.(२) तुम्हाला सौंदर्य खाऊं घालील कीं नशीब घालील?कमनशीब:—(१)दुर्दैवी माणसाला पुष्कळ दूध जरी मिळालें तरी तें मांजर पिऊन टाकील. ( २ ) जिच्यामागें शनि लागलेला आहे ती मोठ्या गर्दीच्या बाजारांत गेली तरी तिला नवरा मिळणार नाहीं. पाढऱ्यापायाची:—(१) तरुण व भाग्यवती मुलगी म्हणून मी तिला घरांत घेतांच माझ्या सोन्याचें गवत झालें असें बनलें! (१) सीतेच्या जन्मानें सिंहलद्वीप नाश पावलें ( सासू सुनेला उद्देशून म्हणते ).

दोष व दुर्गुण:—( १ ) निरसें दूधहि अशुद्धच व नवीन जन्मलेलें मूलहि अशुद्धच. ( २ ) घरोघरीं मातीच्याच चुली, सोन्याची चूल कोठेंहि नसते. दुसऱ्याला नांवें ठेवणें—(१) थोरल्या बहिणीला नांवें ठेवणारी आपण स्वतःच वेश्या बनते. ( २ ) एकडोळ्या चकण्याला हंसतो. बच्याचें तेल बांग्यावर:—

(१) मृत्यूची बातमी आणणाराला तुम्ही दोष द्यावा कां ? (२) को-गांवच्या बाईनें बदकर्म केलें म्हणून गुंटूरगांवच्या बाईला शिक्षा मिळाली. ( ३ ) तुमचा चेहराच जर कुरूप असेल तर आरसा काय करील ? ढोंगः—( १ ) शैव भिक्षूबरोबर तो शिवासंबंधीं बोलतो व वैष्णव भिक्षूबरोबर विष्णुसंबंधीं बोलतो.( २ ) मूर्ख स्त्रीच्या पापण्यांत अश्रू तयार असतात.

स्वार्थीपणाः-( १ ) वडील भावाला मुलगी झाली म्हणजे त्याला आपली बहीण परकी वाटूं लागते. ( २ ) तूप गांवाचें आहे पण माझी बायको वाढणारी आहेना.

कुटुंबासंबंधींः—( १ ) तुझा थोरला भाऊ तुझ्या स्वतःच्या आईच्या पोटीं आला म्हणून त्याची बायको आली कीं काय ? ( २ ) तुमच्या गांवचा जांवई व नांगरचा बैल एकाच किंमतीचे. ( ३ ) कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ. आईः—( १ )आईला जर तुम्ही तळ्यावर पाहिलें तर मुलाला घरीं पहाण्याचें कारण नाहीं. (२)त्याची आई त्याच्या पोटाकडे पाहील पण बायको पोतराकडे पाहील. मुलेंः—( १ )हत्तीला पकडून भांड्यांत कोंबणें ही मुलांची वेडी भाषा असते. (२ )लहान मूल जितका वेळ निजतें तो सर्व वेळ आईला फार उपयोगी पडतो. ( ३ )नेहमीं हातां-खांद्यावर असणारें मूल आणि मांडीवर घेऊन लावलेली पत्रा-वळ कधींहि चांगली होणें नाहीं (इंग्रजी—"मदर्स डार्लिग्स मेक बट् मिल्क-सॉप हीरोज" ).

बायकाः—( १ ) स्त्री तरुणपणीं आनंददायक असते पण म्हातारपणीं त्रासदायक वाटते. ( २ ) भर ज्वानींत असतांना एखादी चक्किली ( चांभार जातीची ) मुलगी व नाचणीचें कणीसहि सुंदर दिसतें ( संस्कृत—प्राप्तेतु षोडशे वर्षे गर्दभी अप्सरा भवेत् ). ( ३ ) जन्माला येणाऱ्या प्रत्येक मुलीचा नवरा अगोदरच जन्मलेला असतो ( इंग्रजी-मॅरेजेस आर मेड इन् हेवन ). ( ४ ) बायकांचें शहाणपण चुलीपुरतें. ( ५ ) सौंदर्य तिच्यांतून गळतें आहे; कुत्रें तें चाटींत आहे, तर एक फुटकें भांडें तें भरावयास आण ! ( एखाद्या सौंदर्याचा दिमाख दाखविणाऱ्या कुरूप स्त्रीसंबंधीं बोलतांना ). ( ६ ) एखादी रंभेसारखी वेश्याहि बायको करा, पण लिहितां येणारी मुलगी पत्करूं नका. (७) एखाद्या बाईच्या अंगावर दागिने घाला व तिच्याकडे बघा, आणि एखाद्या भिंतीला गिलावा करा व तिच्याकडे बघा. ( इंग्रजीः—नो वूमन ईज अग्ली व्हेन् शी ईज ड्रेस्ड ).( ८ ) राजे, बायका आणि लता जवळ असेल त्याला कवटाळतील. ( ९ )बायकांनां आपण धर्मादाय म्हणून अन्न घालीत नाहीं. ( १० ) गरीबाची बायको म्हणजे कोणाचेंहि प्रीतिपात्र म्हणावें.( ११ ) चोराची बायको नेहमीं विधवा असते.लग्नः—( १२ ) ज्या घरांत लग्न होईल त्यांत पुढें सहा महिने दुष्काळ पडेल. ( १३ ) माकडाप्रमाणें कुरूप असली तरी आपल्याच जातीची मुलगी करा. ( १४ ) मुलगी दहा वर्षे वयाच्यावर लग्नाशिवाय ठेवूं नये, मग ती एखाद्या परिया (अस्पृश्या)ला सुद्धां द्यावी ( इंग्रजी—हार्टस अँड हेड् फिशेस आर नो कीपिंग वेअर्स ).

नवराबायकोः—( १ ) लाकडे ! तूं स्वयंपाक करूं नकोस कीं फळीचें पीठ दळूंहि नकोस; माझ्या डोळ्याप्रमाणें प्रिय असलेली तूं माझ्याजवळ असलीस म्हणजे पुरे. ( २ ) लग्नानंतर साठ दिवस इच्छा राहील, तीस दिवस विषय राहील व नव्वद दिवस झाले कीं, ती केरसुणीसारखी होऊन बसेल ( इंग्रजी—व्हेन् ए कपल आर न्यूली मॅरिड, दि फर्स्ट मन्थ ईज हॉनिमून ऑर स्मिक्-स्मॅक्; दि सेकंड इज हीदर अँड दीदर; दि थर्ड ईज ट्विक्ट्वॅक्; दि फोर्थ—दि डेव्हिल टेक देम दॅट् मॅाट दी अँड मी टुगेदर ). ( ३ ) दोन बायकांच्या नवऱ्यानें लांब केंस कां ठेवावेत ? ( ४ ) नवऱ्याजवळ पैसा नसला म्हणजे प्रत्यक्ष त्याची बायकोहि त्याचा मान ठेवीत नाहीं. (इंग्रजीः—व्हेन पॉव्हर्टी कम्स इन् ॲट् दि डोअर, लव्ह् लीप्स आऊट दि विंडो ). ( ५ ) आपल्या बायकोला मारण्यास गांवच्या पाटलाची परवानगी पाहिजे कां काय ? ( ६ ) संशयी नवऱ्याच्या बायकोला चाळीस नवरे असतात. ( ७ ) घरांतली स्वतःची बायको मरगोसा ( कडू ) झाडा-प्रमाणें वाटते पण बाहेरची उंसाप्रमाणें वाटते.

स्त्रीदोषः—( १ )जी आपल्या बापाशीं कर्म करते तिला मोठा किंवा लहान भाऊ सारखाच ( इंग्रजी -शी ईज ॲज कॉमन ॲज ए बार्बर्स चेअर ). ( २ ) रडक्या माणसावर किंवा हंसणाऱ्या बाईवर विश्वास ठेवूं नका. ( ३ ) पातिव्रत्या-खेरीज सौंदर्य, सुवासरहित पुष्पाप्रमाणें आहे. ( ४ ) कुमा-रीला जाण्याची संधि मिळाली नाहीं म्हणून ती पतिव्रता आहे ( संस्कृत.—तुरगब्रह्मचर्य ). सासूः—( १ )माझ्या मुलीला मी आठवड्यांतून दोनदां न्हावूं घालीन पण सुनेला फक्त दिवाळींत. ( २ )फुटलेलें मडकें एकवेळ जडवितां येईल पण सासुसुनेचें कधीं एकत्र जमणार नाहीं. ( ३ )माझा मुलगा मेला तरी मरूंदे, पण त्याच्या मरण्यानें सुनेचा ताठा कमी झाल्याचें पाहून मला समाधान वाटेल. ( ४ )सासूच्या हातून भांडें फुटलें तर तें मातीचें होतें, पण सुनेच्या हातून फुटलें तर मात्र तें सोन्याचें होतें.

[ संदर्भग्रंथः—मुरडॉक—क्लासिफाईड कॅटलॉग ऑफ तामिळ प्रिंटेड बुक्स; गोव्हर—फोक-सॉंग्स ऑफ सदर्न इंडिया; काल्डवेल—कंपॅरिटिव्ह ग्रामर ऑफ दि द्रविडियन लँग्वेजेस; एस्. सी. चिट्टी—दि तामिळ प्लुटार्च; पोप—फर्स्ट लेसन्स इन् तामिळ; अर्नोल्ड—गॅलक्सी ऑफ तामिळ पोएट्स; क्वार्टर्ली लिस्ट ऑफ बुक्स इन् मद्रास प्रेसिडेन्सी. कनकसभे—तामिळ्स, १८०० ईयर्स ॲगो.; हर्मन जेनसेन—तामिळ प्राव्हर्ब्स; लाझारस—डिक्शनरी ऑफ तामिळ प्राव्हर्ब्स; सयनेसन—हँडबुक ऑफ तामिळ प्राव्हर्ब्स अँड फ्रेजेस. ]

**ताम्रपर्णी**—मद्रास. तिनेवेल्ली जिल्ह्यांत ही एक नदी आहे. हिचा बृहत्संहितेंत उल्लेख आहे. ही पश्चिमघाटांत आगस्त्यमलइ नांवाच्या शिखराजवळून निघाली आहे.' पुढें कांहीं अंतरावर पापनाशनम् नांवाचें तीर्थ असून वन-तीर्थाजवळ हिचा एक धबधबा आहे. ही मानारच्या आखातास मिळते. या नदीस बंधारे असून त्यांपैकीं मरुडूर नांवाच्या बंधाऱ्याच्या योगानें ३०००० एकर जमीनीला पाणी पुरविलें जातें बाकीच्या ६ बंधाऱ्यांच्या योगानें ७१००० एकर जमीनीस पाणी मिळतें. या नदीचें खोरें अत्यंत सुपीक आहे.

**ताम्रलिप्ति**—या शहराचा महाभारतांत भीमविजयांत, भीष्मपर्वांत आणि बृहत्संहितेंत उल्लेख आहे ( १०.१४ ). अशोकाच्या साम्राज्याची ताम्रलिप्ति ही पूर्वेकडील सीमा होय. हें ( तमलुक ) हल्लीं गंगेच्या मुखाजवळचें बंदर आहे. हल्लीं हें बंगाल इलाख्यांतील मिदनापूर जिल्ह्यांत समुद्रापासून ३० कोसांवर आहे. येथें चिनी प्रवाशी फाहिआन यानें दोन वर्षे राहून संस्कृतचा अभ्यास केला होता. ( तमलुक पहा ) [ स्मिथ अर्लि हिस्टरी ऑफ इंडिया ].

**तारक-तारकासुर** ( १ )—त्रिपुरांतील दैत्य ( त्रिपुर पहा. ). यास ताराक्ष अथवा तारकाक्ष, कमलाक्ष आणि विद्युन्माली असे तीन पुत्र होते. ( भार. कर्णपर्व अ ३३ ).

( २ ) दनुपुत्र दानवांतील एक.

( ३ ) वज्रांग दैत्यास वरांगीपासून झालेला पुत्र. याच्यापासून अतिशय उपद्रव झाला असतां कार्तिकेयाचा अवतार झाला, व त्यानें सातव्याच दिवशीं यास मारिलें ( मत्स्य-पुराण अ. १४७-१५९ )

**तारकेश्वर**—बंगाल इलाखा. हुगळी जिल्हा, श्रीरामपूर पोटविभागांत हें एक खेडें आहे. हें खेडें तेथें असलेल्या शिवाच्या देवालयामुळेंच फार प्रसिद्ध आहे. या देवालयाच्या नांवानें पुष्कळशी जमीन आहे. शिवरात्रीच्या दिवशीं येथें यात्रा भरते. यात्रेला २०००० लोक जमतात. दुसरी मोठी यात्रा चैत्र संक्रांतीदिवशीं भरते. या वेळेस यात्रेंत १५००० हजार लोक असतात. येथें नुकताच सत्याग्रह होऊन महंत व लोकांचे प्रतिनिधी यांमध्यें देवस्थानाच्या व्यवस्थेसंबंधीं करार झाला आहे.

**तारा**( १ )—बृहस्पतीच्या दोन स्त्रियांतील दुसरी. हिला चंद्रापासून बुध हा पुत्र झाला व त्यामुळें शापापासून चंद्रास क्षय लागला अशी पौराणिक कथा आहे.

( २ ) सुषेण वानराची कन्या व वालीची स्त्री. हिचा पुत्र अंगद.

( ३ ) सूर्यवंशीय हरिश्चंद्र राजाची स्त्री. हिला तारामती असेंहि नांव असून रोहिदास नामक पुत्र होता.

**तारापूर**—रायगड संस्थानांत ३७ गांवांची ही जमीनदारी आहे. क्षेत्रफळ ९६९४ एकर. लोकसंख्या ९४१८. टाकोळी १०० रु व सारा ६२४ रु. जमीनदार संस्थानिकाचा नातलग असून त्यास ठाकूर ही स्थानिक पदवी आहे.

**तारापूर चिंचणी**—मुंबई, जिल्हा ठाणें. माहीम व डाहाणु तालुक्यांत हीं दोन खेडीं आहेत. या दोन खेड्यांच्या मध्यें खाडी आहे. यांपैकीं तारापूर हें बंदर असून चिंचणी हें फार जुनें गांव आहे. यांत पारशी व वाणी सावकार फार आहेत. येथें पूर्वी फार मोठा व्यापार चालत असे.

तारापूरची स. १८८१ मध्यें एकंदर लोकसंख्या २५२९ होती. त्यांपैकीं २१२४ हिंदू, ३९७ मुसुलमान, ३६६ पार्शी व ५२ ख्रिस्ती असें वर्गीकरण होतें. एक सरकारी व एक पार्शांची शाळा येथें आहे. १८२० च्या सुमारास भिकाजी मेहेरजीनें बांधलेलें एक पारशांचें देऊळ व स्मशानभूमि आहे. इ. स. १२८० च्या सुमारास माहीमचा अधिकारी भीम यानें तारापूर जिंकलें. स. १५३३ त पोर्तुगीजांनीं हें गांव जाळून टाकलें. १७३९ सालीं चिमाजी आप्पानें तारापूरचा किल्ला सर केला व त्याची समुद्राकडील बाजू नीट राखून बंदोबस्त करण्यांत आला. १७७६ सालीं रघुनाथरावानें या किल्ल्याचा आश्रय घेतला होता. १८०३ सालीं तारापूरचा किल्ला इंग्रजांच्या हातीं गेला. हा किल्ला पेशव्यांनीं भिकाजी मेहेरजीस इनाम म्हणून दिला होता.

उत्तरेकडील बाजूस चिंचणी हा गांव असून तेथें अकालींचें ठिकाण व प्रवाश्याकरितां एक बंगला आहे. या बंगल्याचा हल्लीं शाळेकरितां उपयोग केला जातो. तारापूर व चिंचणी हीं दोन्हीं ठिकाणें लष्करीदृष्ट्या पूर्वी महत्त्वाचीं मानलीं जात असत हें ठिकाण कांचकाम व विशेषतः बांगड्यांकरितां फार प्रसिद्ध आहे. बांगड्यांचे कारखाने खासगी मालकीचे असलेलीं अशीं मुसुलमानांचीं दहा बारा घरें आहेत. येथील मुसुलमान व ख्रिस्ती लोकांचे रीतरिवाज बरेचसे हिंदूप्रमाणें आहेत. मुंबई इलाख्याच्या किनाऱ्यावरील अनेक गांवांप्रमाणें हेंहि ठिकाण शुद्धीकरणाच्या ( रीकॉन्व्हर्शन ) उद्योगाला फार सोयीचें आहे.

**ताराबाई**—थोरल्या शिवाजीचा धाकटा मुलगा राजाराम अटकेंत असतांना ( १६८०-१६८९ ) त्याची पहिली बायको वारल्यावर संभाजीनें त्याचें हंबीरराव मोहिते सेनापति यांच्या ताराबाई नांवाच्या मुलीशीं लग्न लावून दिलें. हिचें सासरचें नांव सीताबाई होतें, परंतु तें लोपून माहेरचेंच ताराबाई हें प्रख्यात झालें हिचा जन्म स. १६७५ त झाला. संभाजीचा वध झाल्यावर राजारामानें प्रथम विशाळगड व मग जिंजी येथें राज्यकारभाराचें मुख्य ठाणें केलें. तेथें ही व हिच्या सवती राजसबाई व अंबिकाबाई या राहत असत. हिला १६९१त शिवाजी नांवाचा पुत्र झाला. तें ऐकून येसूबाईनें ( औरंगजेबाच्या कैदेंतून ) राजारामास राज्यावर बसण्याबद्दल व मुलें माणसें जिंजीस, विशाळगडाहून नेण्याबद्दल निरोप पाठविला. त्याप्रमाणें राजारामानें त्यांना जलमार्गानें पाठविलें व मंडळी जिंजीस दाखल झाली. पुढें जिंजीहून राजाराम निघून

विशाळगडाकडे आल्यावर या बायका झुल्फिकरखानाच्या हातीं लागल्या होत्या, पण त्यानें त्यांनां कैद न करितां संभाजीचा मेव्हणा गणोजी शिर्के याच्या हवालीं केलें व त्यानें त्यांनां विशाळगडीं पोंहोंचविलें. राजाराम मरण पावला तेव्हां हिला शिवाजी नांवाचा एक दहा वर्षांचा मुलगा होता. त्याला रामचंद्रपंत अमात्य, शंकराजी नारायण व धनाजी जाधव सेनापति यांच्या मदतीनें गादीवर बसवून हिनें राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतलीं, व राजसबाईस तिच्या संभाजी नांवाच्या मुलासह कैदेंत ठेविलें. प्रथम रामचंद्रपंत या गोष्टीस राजी नव्हता. परंतु त्यामुळें गृहकलह वाढतो तें पाहून त्यानें संमति दिली. पण याचा परिणाम होऊन सरदारांत फाटाफूट झालीच.

ताराबाईनें परशराम त्रिंबकास प्रतिनिधि करून त्याच्याकडे सर्व किल्ल्यांच्या बंदोबस्ताचें काम सोंपविलें व स्वतः कोणत्याहि एका किल्ल्यांत न राहतां वेळ पडेल त्याप्रमाणें जागा बदलण्याचें ठरविलें; याच वेळीं धनाजी जाधव, निंबाळकर, भोंसले, दाभाडे, चव्हाण, वगैरे सरदारांनीं मोंगलांच्या मुलुखांत शिरून सर्व ठिकाणाहून चौथाई, सरदेशमुखी व घासदाणा या नांवाखालीं पैसा गोळा करण्याचा क्रम आरंभिला ( १७०० ).

अवरंगझेब मरण पावल्यावर अझीमशहा मोंगल सैन्यासह उत्तरेकडे रवाना होतांच धनाजीनें पुण्याच्या मोंगल फौजदाराचा पराभव केला, चाकण किल्ला सर केला व मागील युद्धांत मोंगलांनीं घेतलेला मुलूख आपल्या ताब्यांत परत घेण्यास झपाट्यानें सुरवात केली ( १७०७ ). तेव्हां झुल्फिकरखानाच्या सल्यानें अझीमशहानें शाहूची सुटका केली व तो दक्षिणेंत यावयास निघाला; तेव्हां परसोजी भोंसले, हैबतराव निंबाळकर व नेमाजी शिंदे शाहूस मिळाले. शाहूनें आपण परत आल्याचें वर्तमान ताराबाईस कळविलें. परंतु आपल्या हातची सत्ता सोडण्यास ताराबाई राजी नसल्यामुळें ती शाहू हा कोणी तरी तोतया आहे असें म्हणूं लागली. तिनें रामचंद्रपंत, निळोपंत, धनाजी जाधव, परशराम त्रिंबक शंकराजी नारायण, कान्होजी आंग्रे, व फोंडसावंत यांच्याजवळून स्वामिभक्तीची शपथ घेवबून शाहूला तोंड देण्याचें ठरविलें. धनाजी व परशराम त्रिंबक यांची शाहूवर रवानगी झाली. परंतु शाहूनें धनाजीस आपल्याकडे वळवून घेतलें व पुण्याच्या उत्तरेस बावीस मैलांवर खेड कडूस येथें दोन्ही पक्षांत झालेल्या चकमकींत पराभव पावून परशराम त्रिंबक साताऱ्यास निघून गेला ( १७०७ ). पुढें धनाजीच्या मदतीनें चंदन व वंदन व शेखमिऱ्याच्या मदतीनें सातारा हे किल्ले शाहूनें घेतले ( १७०७ ). सातारा हातीं आल्यावर शाहूनें आपल्या स्वतःस राज्याभिषेक करून घेतला ( १७०८ ); व ताराबाई साताऱ्याहून पन्हाळ्याकडे पळून गेली.

पुढें ( १७०८–०९ ) पन्हाळा व विशाळगड हे किल्लेहि शाहूच्या स्वाधीन झाले. यानंतर तो रांगण्यास आला तेव्हां ताराबाई तेथून मालवणास पळून गेली व रांगणा शाहूच्या हातीं पडला व कोल्हापूरहि त्यानें घेतलें. झुल्फिकरखानाचें व शाहूचें सख्य असल्यामुळें, व उत्तरेस जातांना त्यानें मागें दक्षिणच्या सुभेदारीवर ठेवलेल्या दाऊदखान पन्नी नांवाच्या सरदारानें मराठे सरदारांशीं तडजोड करून जे शाहूचें स्वामित्व कबूल करतील त्यांनाच फक्त दक्षिणच्या सुभ्यांच्या वसुलाचा चवथा हिस्सा कांहीं अटींवर देण्याचें कबूल केल्यामुळें ताराबाईचा पक्ष आतां निर्माल्यवत् झाला ( १७०९ ).

पुढें १७१० त पन्हाळ्याच्या किल्लेदारानें तो किल्ला ताराबाईच्या स्वाधीन केला. तिनें वाडकर सांवताच्या मदतीनें आणीक किल्ले घेतले. ताराबाईनें आतां पन्हाळा किल्ला व त्याच्या जवळचेंच कोल्हापूर शहर हीं आपल्या पक्षाचीं कायमचीं राहण्याचीं ठिकाणें केलीं. या वेळीं हिचा पक्ष फार प्रबळ झाला. कारण धनाजी जाधव मेल्यानें व थोरात, निंबाळकर, पांढरे, आंग्रे, खटावकर, चव्हाण, सावंत, पंतअमात्य व प्रतिनिधि ही मंडळी ताराबाईकडे होती. यांनीं निरनिराळे टापू व्यापून सातारा ते कोल्हापूर प्रांतांत धुमाकूळ घातला. सारांश १७०७-१० पर्यंत शाहूची सत्ता सातारा व त्याच्या आसपास ५।२५ मैल इतकीच होती. ही सर्व स्थिति बाळाजी विश्वनाथानें पालटविली. त्यानें सैन्य जमवून ताराबाईशीं तोंड दिलें, तसेंच परशुरामपंतास कैदेंतून काढून त्याला प्रतिनिधिपद दिलें; अनेक सरदार नवीन निर्माण केले. ताराबाईकडील कांहीं सरदार फितवले व शाहूचा पक्ष बळकट केला व शिवाजीस तर वेडा ठरविलें. इतक्यांत (१७१२ जानेवारी ) ताराबाईचा मुलगा शिवाजी देवीनें मरण पावला. त्याच्या मरणानें कोल्हापुरच्या राज्यकारभारांत बरीच क्रांति झाली. रामचंद्रपंतानें आतां राजसबाईचा मुलगा संभाजी यास गादीवर बसवून ताराबाई व तिची गरोदर असअसलेली सून भवानीबाई यांनां अटकेंत ठेविलें. या कामींहि बाळाजीपंताचा हात होता. त्यामुळें संभाजी हा पुढें शाहूचा मिंधा राहिला परंतु पुढें संभाजी हा शाहूशीं कुरापती काढून भांडूं लागला, त्याला निजामउलमुल्क, उदाजी चव्हाण वगैरे मंडळींनीं मदत केली. अशा एका लढाईंत वारणेतीरीं श्रीपतराव प्रतिनिधीनें संभाजीचा पराभव केला व त्याचा सारा जनानखाना कैद केला ( १७३० ). ताराबाई त्यांत होती; तिला परत पाठवितांना तिनें कोठेंहि (कोल्हापूर किंवा सातारा) कैदेंतच राहावयाचें तर तुम्हांजवळ राहते असें म्हटल्यावरून शाहूनें तिला साताऱ्याच्या किल्ल्यांत नजरकैदेंत ठेविलें. ती जर या वेळीं कोल्हापुरास जाती तर पुढें रामराजाची स्थापना साताऱ्यास होती ना; परंतु तेथें तिची सून जिजाबाई ( संभाजीची राणी ) ही तिची मात्रा चालू देत नसे.

पुढें आपल्यास संतति होत नाहीं असें पाहून शाहू एखादा मुलगा दत्तक घेणार आहे हें ताराबाईस समजलें, तेव्हां मी हें दत्तविधान होऊं देणार नाहीं असें ती म्हणूं लागली. आणि बारीक चौकशी केल्यावर आपला नातु, शिवाजीचा

मुलगा रामराजा हा अद्याप जिवंत आहे असें तिनें प्रगट केलें व त्याला दत्तक घेण्याबद्दल शाहूस आग्रह केला. तेव्हां तें त्यानें कबूल केलें व त्याप्रमाणें रामराजास गादीवर बसविण्यास सांगून शाहू वारला. या कामांत ताराबाई व तिची सून सकवारबाई यांचा तंटा लागला होता. परंतु पेशव्यानें युक्तीनें तें काम तडीस नेलें. सकवारबाई सती गेल्यानें या कार्यांत विघ्नहि राहिलें नाहीं. सकवारनें सती जाण्याबद्दल ताराबाईचाच विशेष आग्रह असावा. पुढें रामराजाला साताऱ्यास ( पानगांवाहून ) आणल्यानंतर रामराजा हा आपला नातु आहे अशी रघुजी भोंसल्याची व इतर मराठेमंडळाची खात्री करण्यासाठीं ताराबाई सर्वांसमक्ष रामराजाबरोबर एका ताटांत जेवावयास बसली ( १७५० ). रामराजाला लहानपणींच जिजाबाईच्या भीतीनें ताराबाईनें पळवून पानगांवीं नेलें होतें. या कामीं रामचंद्रपंत अमात्याची तिला मदत होती. या वेळीं तिचें वय ७० वर होतें. या प्रसंगीं मात्र ती पेशव्याशीं मोकळेपणानें वागली.

पण पुढें रामराजास गादीवर बसवून नानासाहेबानें सर्व सत्ता आक्रमिली हें तिला न खपून, ती आपल्या पतीच्या समाधीचें दर्शन घेण्याच्या मिषानें सिंहगडास आली, व रामराजा हा खोटा आहे असें म्हणून आपल्या हातीं अधिकार-सूत्रें घेण्याकरितां पंतसचिवाशीं कारस्थान करूं लागली. तेव्हां पेशव्यानें मोठ्या मुष्किलीनें तिचें मन वळवून तिला पुण्यास आणलें, व तिची खुशामत करून आपल्या सर्व योजनांत तिची व तिच्या मार्फत रामराजाची संमति मिळविली. यावेळीं दिल्लीस गाजीउद्दीन वगैरे दरबारी मंडळी मराठ्यांना अनुकूल होती व नानासाहेबांचा उद्देश मराठी साम्राज्याचा प्रसार दिल्लीकडे करण्याचा होता, परंतु ताराबाईनें घोळ घालून तो तडीस जाऊं दिला नाहीं.

निजामास मदत करण्याकरितां औरंगाबादेकडे जाण्यापूर्वी ताराबाईनें आपल्या पश्चात् कांहीं कारस्थानें करूं नये. म्हणून साताऱ्याच्या किल्ल्यांत तिचेच लोक ठेवून, व त्यांची सर्व व्यवस्था तिजकडे सोंपवून तिला खूष ठेवण्याचा पेशव्यांनीं प्रयत्न केला. अशा वेळीं एकदां ताराबाईनें खडा टाकून पेशव्याच्या दास्यत्वांतून मुक्तता करून घेऊन स्वतंत्र होण्याची रामराजाची कितपत इच्छा आहे हें पाहिलें. परंतु आपल्या कारस्थानांत भागीदार होण्यास तो लायक नाहीं, असें आढळून येतांच तिनें दमाजी गायकवाडास निरोप पाठविला कीं, सर्व देशांतील बहुतेक सैन्य तूर्त पेशव्याबरोबर गेलें आहे; तरी यावेळीं तुम्हीं येथें येऊन राजाला व सर्व मराठी साम्राज्यास ब्राह्मणांच्या जुलमांतून मुक्त करावें. दमाजी गायकवाड जवळ आल्याचें जेव्हां ताराबाईस समजलें तेव्हां तिनें राजास एकदां किल्ल्यावर येण्याकरितां निमंत्रण देऊन, तेथें तो आला असतां त्यास कैद करून भित्रेपणाबद्दल त्याची चांगली निर्भर्त्सना केली. नंतर तिनें गडाखालीं शहरांत पेशव्यांच्या पक्षाची जी मंडळी होती त्यांच्यावर तोफा डागण्याविषयीं हवालदारास हुकूम केला. नाना पुरंदरे, गोविंदराव चिटणीस वगैरे मंडळी आरळ्याकडे पळून गेली, व तेथें त्यांनीं सैन्य जमा केलें. प्रथमतः गायकवाडानें या मंडळीचा नींब येथें पराभव केला; परंतु नाना पुरंदऱ्यानें पुढें त्र्यंबकराव याचा पचपा काढून दमाजीस जोर खोऱ्याकडे मागें हटविलें. इतक्यांत नानासाहेब कर्नाटकांतून परत आला व त्यानें साताऱ्यास टाकोटाक येऊन वेण्याच्या माळावर गायकवाडाच्या गोटावर हल्ला करून तो लुटला, व दमाजीस कैद करून बंदोबस्तानें पुण्यास पाठविलें. राजा व किल्ला हीं दोन्हींहि आपल्या स्वाधीन करण्यारितां ताराबाईचें मन वळविण्याचा पेशव्यानें प्रयत्न केला. परंतु त्यांत यश येत नाहीं असें पाहून, तो ताराबाईच्या वाटेस न जातां परत औरंगाबादेकडे केला ( १७५१ ).

तो तिकडे गेल्यावर ताराबाईनें पांच सहा हजार मराठे व रामोशी चाकरीस ठेवून वांई व सातारा हे दोन्हींहि जिल्हे कबजांत घेतले. औरंगाबादेहून परत आल्यावरोबर पेशव्यानें साताऱ्यास वेढा देण्यासाठीं बरेंच मोठें सैन्य रवाना केलें (१७५३). पेशव्यांच्या सैन्यापुढें आपला टिकाव लागणार नाहीं, अशी साताऱ्चा हवालदार आनंदराव जाधव यास खात्री वाटत असल्यामुळें, त्यानें राजास ताराबाईच्या कबजांतून काढून नेण्याचें ठरविलें. ही गोष्ट ताराबाईस समजतांच तिनें आनंदरावाचा, व त्याच्या कटांत जे जे कोणी सामील होते त्या सर्वांचा शिरच्छेद करण्याचा हुकूम केला; व आनंदराव जाधवाच्या जागीं बाबूराव जाधव नांवाच्या दुसऱ्या एका माणसाची योजना केली. कर्नाटकांत जाण्यापूर्वी पेशव्यानें ताराबाईस सांगून पाठविलें कीं, तुम्हीं आतां माझ्या स्वाधीन झाला तर राजा व त्याचा सर्व इतमाम तुमच्या ताब्यांत देण्यांत येईल. परंतु ताराबाईनें पेशव्यास साफ सांगितलें कीं, तुम्हीं अतःपर माझी सत्ता मान्य करण्यास तयार आहां याविषयीं साताऱ्यास येऊन माझी खात्री पटवून दिल्याशिवाय मी तुमचें ऐकणार नाहीं.

पुढें ( १७५५ ) जानोजी भोंसले पुण्यास आला असतां त्यानें, मी पेशव्यांपासून तुम्हांस कांहीं अपाय होऊं देणार नाहीं असें ताराबाईस आश्वासन दिल्यावर ती पुण्यास आली. तेथें नानासाहेबानें तिचा चांगला आदरसत्कार करून तिची दिलसफाई करून घेतली. परंतु रामराजास बंधमुक्त करण्यास मात्र ती तयार झाली नाहीं.

शेवटीं १७६१च्या डिसेंबर महिन्यांत ताराबाई निवर्तली. मरणसमयीं तिचें वय ८६ वर्षांचें होतें. ती जिवंत होती तोंपर्यंत रामराजाचा बंदिवास तिळमात्रहि कमी झाला नाहीं. अगदीं अखेरपर्यंत तिच्या मनांत बाळाजी बाजीराव व सदाशिवरावभाऊ यांच्याविषयीं पूर्ण द्वेष वास करीत होता. पानिपतच्या युद्धाचा दुःखपर्यवसायी शेवट होऊन त्यांत भाऊची आहुती पडली, मागून नानासाहेब शोकानें मरण पावला, तेव्हां मात्र ताराबाईस फार समाधान वाटलें. व आतां मी

सुखानें मरेन असें ती म्हणाली [ पेशव्यांची बखर; शाहूमहाराजांची बखर; राजवाडे खंड ३, ६, ८ ].

ताराबाई ही फार महत्त्वाकांक्षी, दीर्घोद्योगी, रागीट, हट्टी व मत्सरी होती. रामचंद्रपंत वगैरे बऱ्याच जुन्या सरदारांच्या मनांत प्रथम शाहूस गादीवर बसवावयाचें होतें, परंतु हिला तें आवडलें नाहीं व आपल्या मुलास राजा करण्याचा हट्ट तिनें तडीस नेला. या कृत्यास प्रतिनिधि (परशुरामपंत ) व ( शंकराजी नारायण ) सचीव ह्यांची मदत तिनें घेतली. एव्हांपासूनच सरदारांत वैमनस्यें वाढलीं व त्याचा परिणाम मराठेशाहीवरील पुढच्या ६० वर्षांवर घडला. ताराबाईनेंच मराठी साम्राज्यांत दुहीचें बीज पेरलें. ती दीर्घसूत्री, आपल्या स्वार्थासाठीं वाटेल तें करणारी, करारी, फार संशयी व पेशव्यांचा द्वेष करणारी होती व या कामीं देवानें तिला आयुष्यहि फार दिलें. रामारामापुढें तिचें चाललें नाहीं. तो मेल्यावर व शत्रू दाराशीं बसला असतां, खऱ्या मुत्सद्दी रामचंद्रपंताचा सल्ला तिनें धुडकावला. एकदां तर संशयावरून तिनें त्याचा अपमान करून त्याच्या पायांत रुप्याची बेडी घातली होती. परंतु तो मात्र शेवटपर्यंत तिच्याशीं इमानानें वागला. हिच्या कारभारानें शिवाजीनें घालून दिलेल्या लष्करादि एकंदर राज्यव्यवस्थेंतील शिस्त नाहींशी होऊन, एकसूत्रीपणा गेला. येसूबाईसारखी ही निःस्वार्थी नसून स्वतः तर स्वार्थी होतीच, परंतु तिच्या उदाहरणानें त्यावेळीं सरदारांतहि स्वार्थ बोकाळला. परशुरामपंत हा रामचंद्रपंताचा मत्सर करूं लागला. त्याला प्रतिनिधिपदाची लालूच देऊन तिनें फितविलें ' शाहूस आणवून राज्यावर बसवावा ' असेंच मरेपर्यंत राजारामानें सांगितलें होतें,परंतु तें तिनें एकीकडे ठेविलें तिच्या अंगीं मुत्सद्दीपणा फारसा नव्हता, मराठी साम्राज्यांत तिनें ५०–६० वर्षे ढवळाढवळ करून कोणासहि स्वस्थता लाभूं दिली नाहीं. संशयी स्वभावानें तिनें आपल्या पक्षाच्या लोकांनाहि निर्धास्त काम करूं दिलें नाहीं. त्यामुळें जुने मुत्सद्दी निरुपयोगी झाले व नव्यांनां सढळ वाव मिळाला नाहीं. तिची एकंदर ४० वर्षे कैदेंत गेलीं. यावरून तिला अडकवून ठेवणेंच श्रेयस्कर असें राष्ट्रभक्तांस त्यावेळीं वाटत असावें असें दिसतें.

**तारायंत्र**—धातूच्या तारेंत विद्युत्प्रवाह सोडून त्याच्या साहाय्यानें पुष्कळ अंतरावर अतिशय वेगानें या यंत्रानें सांकेतिक खुणा पाठवितात. या खुणांचा संदेश पाठविण्याकडे उपयोग करितां येतो म्हणून त्यास तारायंत्र म्हणतात यास विद्युत्संदेशहारक यंत्र असाहि पारिभाषिक शब्द आहे. तांब्याची तार किंवा जस्ताची कल्हई केलेली लोखंडी तार पृथ्वीपासून चिनीच्या प्याल्यांच्या योगानें विद्युत्दृष्ट्या निरुद्ध असलेल्या खांबावरून नेऊन दोन स्थळांचा वैद्युतिक संबंध जोडतात. या तारेस विद्युन्मार्ग असें नांव दिलें आहे. बहुतेक ठिकाणीं वीज उत्पन्न करण्याकरितां तारायंत्रांत विद्युद्घटमोलचा उपयोग करितात. डानिअल्, बायक्रोमेट् किंवा लाकलांशे या नांवानें प्रसिद्ध असलेल्या तीन प्रकारचे विद्युद्घट बहुधा वापरतात. याशिवाय ज्यांत विद्युत्संचय करून घेतां येतो अशा प्रकारच्या 'ॲक्युम्युलेटर' नांवाच्या विद्युत्संचायक साधनांनाहि कित्येक स्थळीं उपयोग करण्याचा प्रघात आहे. बऱ्याच दूर अंतरावर असलेल्या दोन स्थळांचा संबंध घटमालेच्या योगें घडवून आणण्यापेक्षां संचायकाच्या योगानें घडवून आणण्यांत फायदा आहे. कारण त्या योगानें पैशाची बचत होऊन त्रास कमी पडतो. जमीनीवरून तारायंत्रासाठीं तार नेणें सोपें आहे; परंतु समुद्रांतून नेणें फारच कठिण आहे; व या कारणामुळें तारायंत्राचा शोध लागून कित्येक वर्षे लोटलीं तरी समुद्रांत तार घालण्याचें धाडस कित्येकांनीं केलें नाहीं. या कामांत प्रथमतः बहुतेकांस चांगलेंसें यश आलें नाहीं; परंतु १८५१ सालीं डोव्हरच्या सामुद्रधुनींत तार घालण्यांत आली. हीच समुद्रांतील पहिली तार होय. नंतर कांहीं वर्षांनीं इंग्लंड आणि अमेरिका हे दोन देश तारायंत्रांनीं निगडित करण्यांत आले.

स मु द्रां तील ता रे ची र च ना.–दोन स्थलांमध्यें शेंकडों किंवा हजारों मैल समुद्र असतो. म्हणून वादळ, लाटा, वारा किंवा समुद्रांतील प्राणी यांच्यापासून तारेस धक्का पोहचूं नये म्हणून विशिष्ट पद्धतीनें तार तयार केलेली असते. तांब्याच्या सात तारा एकत्र करून त्यांची एक दोरी केलेली असते. या दोरीसभोंवतीं गटापर्चा व डांबर यांचे चार पांच थर दिलेले असतात. व त्यास डांबरांत बुडविलेल्या वांकानें मढवून काढितात. व हे सर्व एकत्र रहावे म्हणून त्यावर डांबर आणि वांक यांनीं मढविलेली पोलादी तार गुंडाळतात या प्रकारें तयार झालेल्या तारेवर खारट पाणी आणि समुद्रांतील मोठाले प्राणी यांचें कांहीं चालत नाहीं.

मॉ र्स चे ता रा यं त्र.—धावडी लोखंडाच्या एकाद्या शलाकेसभोंवतीं रेशमानें गुंडाळलेल्या तारेचे मळसूत्राकार वेढे दिले आणि त्यांतून विद्युत्प्रवाह सोडला तर त्या लोखंडाच्या अंगची चुंबकशक्ति विलयास जाते. विजेच्या या गुणधर्माचा उपयोग करून मॉर्स यानें एक तारायंत्र तयार केलें. त्याची रचना संक्षेपतः पुढें दिल्याप्रमाणें आहेः—विद्युत्प्रवाह एका लोखंडी तुकड्यासभोंवार फिरवावा. ह्या लोखंडी तुकड्याशेजारीं एका स्प्रिंगला जोडलेली लहानशी लोखंडी पट्टी ठेवावी. या पट्टीचें एक टोंक सुटें असून त्याला सुईसारखें टोंक असतें. जेव्हां प्रवाह सुरू होतो तेव्हां ती पट्टी आकर्षिली जाऊन वेटोळ्यांत असलेल्या लोहाच्या तुकड्याला चिकटते प्रवाह चालू असतांना सुईच्या टोंकाजवळ एक कागदाची पट्टी सावकाश सरकत जाईल अशी. योजना केलेली असते. म्हणून क्षणिक प्रवाहानें कागदी पट्टीवर टिंब उठूं शकतें. जर प्रवाह तत्काळ बंद न करितां कांहीं काळ तसाच सुरू ठेविला तर त्याच्या योगानें रेघ उठते. अशा

रितीनें रेषा आणि टिंबें यांच्या सांकेतिक समुच्चयानें वर्णमाला बसवितां आली आहे.उ.· –म्हणजे अ,—···म्हणजे ब, —·—· म्हणजे क इ. इ. तारखात्यांतील कारकून इतके तरबेज असतात कीं, नुसत्या आवाजावरूनच त्यांनां तार वाचतां येते; तारेच्या कागदी पट्टीवरील रेषा आणि टिंबे यांकडे त्यांनां बिलकुल पहावें लागत नाहीं.

मॉर्सच्या यंत्रपद्धतीशिवाय दुसऱ्या अनेक तऱ्हा आहेत. त्यांपैकीं दोन पुढें दिल्या आहेत. फिरत्या लोहचुंबकाच्या सुईसभोंवार जर विद्युत्प्रवाह फिरविला तर सुई उजवीकडे अगर डावीकडे प्रवाहाच्या दिशेच्या उलट सुलट अनुक्रमानें फिरते. असल्या प्रकारच्या चलित सुईचा उपयोग करून एक तारायंत्र बसविलें आहे. या यंत्रांत घड्याळावर ज्या प्रमाणें रोमन आंकडे असतात त्याप्रमाणें चुंबक सुईच्या सभोंवार वर्णमाला बसविलेली असते व त्यायोगानें संदेश पाठवितां येतो. याच यंत्रांत जर डावीकडे सुई वळली तर टिंब आणि उजवीकडे सुई वळली तर रेषा असा संकेत करून संदेश पाठवितां येतो. अशा यंत्राच्या तबकडीवर वर्णमाला काढीत नाहींत.

वरील दोन प्रकारच्या यंत्रांपैकीं पहिल्या यंत्रावरून बातमी वाचणें जरी सुलभ आहे तरी तें यंत्र वापरणें त्रासदायक असून बातमी जलद रीतीनें पाठवितां येत नाहीं. म्हणून वरील यंत्राचा यूरोपांतील वडे लोक घरगुती कामाकडे क्वचित् क्वचित् उपयोग करितात. दुसऱ्या प्रकारचें यंत्र कित्येक ठिकाणीं प्रचारांत आहे. तारायंत्राचें काम सुव्यवस्थित चालण्याकरितां प्रवाह जात आहे किंवा नाहीं हें समजणें अत्यावश्यक आहे; व त्याकरितां गॅल्व्हानोमिटरचा म्हणजे चुंबकत्व असलेल्या सुईचा उपयोग करितात.

दु हे री ता रा यं त्र.–एकाच तारेच्या योगानें एकाच वेळीं बातमी पाठविणें आणि बातमी घेणें हें एकसमयावच्छेदेंकरून ज्या यांत्रिक रचनेमुळें करितां येईल अशी रीत प्रथमतः जी. डब्ल्यू गिंट्ल् यानें सन १८५३ सालीं शोधून काढली. त्यानंतर या पद्धतींत अनेक सुधारणा होऊन ' डिफरेन्शिअल ' पद्धति आणि ' ब्रिज ' पद्धति अशा दोन महत्त्वाच्या रीती व्यवहारांत चालू आहेत. या दोन रीतींपैकीं ' ब्रिज ' रीत जास्त उपयुक्त आहे म्हणून तिची माहीती पुढें दिली आहे. ( आकृति नं. १ पहा ).

ब ही ब्याटरी आहे व र हा रिओस्टॅट् आहे ( रिओस्टॅट् म्हणजे वीज जास्त कमी न जातां एका ठराविक प्रमाणांत जाऊं देण्याचें यंत्र ); क हें कन्डेन्सर आहे, म्हणजे विजेचा संचय करण्याचें यंत्र. पृथ्वी म्हणून खूण केलेली तार पृथ्वीस जोडली आहे आणि तार म्हणून निर्देश केलेली तार परस्थळीं पाठवून दिली आहे.

व ह्या ब्याटरींत उत्पन्न झालेली वीज किल्लीतून जाऊन ड या ठिकाणीं ड प आणि ड च या दोन मार्गांनीं विभागते. ड प आणि ड च या दोन ठिकाणीं विजेस सारखाच प्रतिरोध व्हावा म्हणून ज्या दोन तारांची विद्युत्प्रतिरोध-शक्ति सारखीच आहे, असल्या तारा बसवितात. ब्याटरीचें दुसरें ध्रुवटोक पृथ्वीस जोडून तें पुढें कन्डेन्सर आणि रिओस्टॅट यांस "समान्तर" जोडून 'च' या ठिकाणीं जोडलेलें असतें किल्लीच्या साहाय्यानें विजेचा संयोग अगर वियोग केला तरी प आणि च या ठिकाणीं विजेचा जोर सारखाच रहातो. त्यामुळें तार घेणाऱ्या यंत्रावर कांहींच परिणाम घडत नाहीं. परंतु जेव्हां तारेंतून दुसरीकडची बातमी स प या ठिकाणीं दोन मार्गानें विभागते व ड प या मार्गाचा विरोध प, च, पृथ्वी या मार्गापेक्षा भिन्न असल्याकारणानें येणाऱ्या विद्युत्प्रवाहाचा परिणाम तार घेणाऱ्या यंत्रावर घडतो. याप्रमाणें परस्थळीं जाणाऱ्या विद्युत्प्रवाहाचा परिणाम तार घेणाऱ्या यंत्रावर न घडतां परस्थलाहून येणाऱ्या विद्युत्प्रवाहाचा परिणाम घडतो व त्यामुळें एकाच तारेनें बातमी पाठविणें आणि घेणें या गोष्टी एकसमयावच्छेदेंकरून करितां येतात असें दिसून येईल.

च तुः सं दे शी ता रा यं त्र.—यानें एकाच तारेनें एकाच वेळीं दोन संदेश पाठविणें आणि दोन संदेश घेणें अशा चार क्रिया करितां येतात. असल्या प्रकारचें यंत्र तयार करण्याचें काम प्रथमतः डॉ. जे. बी. स्टार्क यानें हातीं घेतलें. परंतु एडिसन यालाच व्यापारी दृष्ट्या फायदेशीर पडेल असें यंत्र करण्याचें यश संपादितां आलें.आकृतींत दिलेलें यंत्र हें एडिसन याच्याच सुधारलेल्या पद्धतींपैकीं एक यंत्र आहे. या यंत्रामध्यें एकाच वेळीं एकाच दिशेनें दोन संदेश पाठवितां येणें एवढीच गोष्ट दुहेरीसंदेशयंत्रापेक्षां जास्त आहे व तेवढ्या पुरतेंच त्याचें पुढें वर्णन केलें आहे. बाकीचा भाग दुहेरीयंत्र पद्धतीप्रमाणें समजावा. ( आकृति नं २ पहा ).

आकृतींतील क आणि ग ह्या बातमी पाठविण्याच्या दोन किल्ल्या आहेत. यांच्यापैकीं क नें विद्युत्प्रवाहाची फक्त दिशा बदलतां येते आणि ग नें विद्युत्प्रवाहाचा फक्त जोर बदलता येतो. र आणि व हीं दोन बातम्या घेण्याचीं यंत्रें आहेत; यांपैकीं र हें ध्रुवात्मक पद्धतीचें आहे. याशिवाय दुहेरी संदेशपद्धतींत दाखविलेले भाग असतात ते भाग वरील आकृतींत दाखविले नाहींत. अनेक संदेशपद्धति म्हणून आणखी एक तऱ्हा आहे. या तऱ्हेनें एकाच तारेनें एकाच वेळीं अनेक संदेश पाठवितां आणि घेतां येतात. परंतु ही पद्धत फारशी व्यवहाराच्या उपयोगी नसल्याकारणानें विशेष उपयोगांत नाहीं; म्हणून तिचें वर्णन दिलें नाहीं.

स्व यं च लि त ता रा यं त्र.–मॉर्स याच्या पद्धतीनें टिंबें आणि रेषा फार दूरच्या स्थळीं शीघ्र गतीनें हातानें पाठविणें अशक्य आहे असें दिसून आल्या कारणानें वरील प्रकारचें यंत्र शोधून काढलें गेलें. १८४६ सालीं बेन यानें एक यंत्र तयार केलें; परंतु त्या वेळीं त्याचा कोणी उपयोग केला नाहीं. सध्या व्यवहारांत उपयोगीं असलेलीं यंत्रें याच यंत्राच्या सुधारलेल्या आवृत्त्या होत. या पद्धतींत कागदाच्या एका पट्टीवर

दोहों अंगास भोंक पडतात. डावीकडे किंवा उजवीकडे भोंक असल्यास टिंब किंवा रेषा समजण्याचा संकेत असतो. ही पट्टी यांत्रिक रुळावरून फिरते; व याप्रमाणें फिरत असतांना या छिद्रामुळें यांत्रिक दांडयांच्या योगानें टराविक वेळानें प्रवाह बंद होतो किंवा ठराविक वेळानें विरुद्ध दिशेनें सुरू होतो, यामुळें स्थितिविशिष्ट विद्युल्लतेच्या योगानें उत्पन्न होणारी वीज अत्यल्प प्रमाणांत उत्पन्न होते व तार पाठविण्याचें काम शीघ्रपणें करितां येतें.

हस्तलेखसंदेशवाहकयंत्र —या यंत्रानें दूरच्या प्रदेशीं एखाद्यानें येथें लिहिलेलें जसेंच्या तसें पाठवितां येतें. या यंत्रानें पाठविण्याच्या लेखणीच्या गतीचें ९०° अंश करणाऱ्या दोन सरळ रेषांच्या गतींत 'पृथक्करण' केलें जातें. या कामासाठीं तरफांच्या समुदायांचा उपयोग करितात. लेखणी तरफांस जोडलेली असते. उपरिनिर्दिष्ट तरफांच्या योगानें पृथक्करण होऊन उत्पन्न झालेल्या सरळ गतींच्या योगें गतीच्या लांबीच्या मानानें कमीजास्त प्रमाणांत दोन विद्युत्प्रवाह पाठवितात. बातमी घेण्याच्या ठिकाणीं ह्या कमी जास्त येणाऱ्या विद्युत्प्रवाहाच्या योगें कमीजास्त प्रमाणांत लोहचुंबकत्व उत्पन्न करून तरफांच्या समुदायास गति देतात. या तरफांच्या समुदायास लेखणी जोडलेली असते. संदेश पाठविण्याच्या ठिकाणच्या तरफांच्या समुदायाप्रमाणेंच संदेश घेणाऱ्या तरफांच्या हालचाली होतात. त्यामुळें दुसऱ्या ठिकाणीं जसेच्या तसे हस्तलेख उठूं शकतात.

विद्युत्तारायंत्रानें चित्रलेखन.—सेलेनियम् नांवाच्या पदार्थावर उजेड पडला असतां तो जास्त प्रमाणावर विद्युद्वहन करितो ह्या त्याच्या गुणधर्माचा फायदा घेऊन तारायंत्रानें चित्रलेखन करितां येतें. जें चित्र पाठवावयाचें असेल तें कांचेच्या एका नळीवर बसविलेलें असतें. या कामासाठीं फोटोग्राफीचें चित्र उत्तमप्रकारें उपयोगीं पडतें. विद्युद्दीपाचा प्रकाश बाह्यगोल लेन्सानें केंद्रीभूत करून त्या फोटोवर पाडतात. कांचेच्या नळीमध्यें बसविलेल्या त्रिकोणी छोलकाचा आरसा नळीमध्यें फोटोंतून शिरलेल्या किरणांस नळीबाहेर पाठवितो. हे किरण एका सेलेनियम्च्या ब्याटरीवर पडतात व त्यामुळें प्रकाशाच्या कमीजास्त तीव्रतेच्या प्रमाणांत विद्युत्प्रवाह कमीजास्त असा वाहूं लागतो. कांचेचें वरील नळकांडें एका मळसूत्राच्या योगानें शंक्वाकार फिरत असतें. चित्रयंत्रसंदेश घेण्याच्या ठिकाणीं असल्याच प्रकारचें दुसरें कांचेचें नळकांडें वरीलप्रमाणें फिरत असतें. या नळीवर फोटोग्राफीच्या कांचेवर असलेला प्रकाशग्राही रासायनिक थर बसविलेला असतो व त्याच्या समोर एक विद्युद्दीप असतो. त्या दीपाच्यापुढें भोंक पाडलेला असा एक लोखंडी पत्रा बसवितात आणि त्या दीपाच्या आणि पत्र्याच्या दरम्यान अल्युमिनमची झांकणी असते. या झांकणीच्या योगें त्या भोंकांतून जाणारा प्रकाश कमीजास्त होतो. ज्या ज्या प्रमाणांत विद्युत्प्रवाह येईल त्या त्या प्रमाणांत त्या भोंकांतून कमीजास्त प्रवाह जाऊन नळीवरील फ्रेटीवर मूळच्या चित्राचे भाग उठूं लागतात व थोडयाच वेळांत संपूर्ण चित्र उठतें.

पूर्वेतिहास— इ. स. १८३८ पूर्वी विद्युत्संदेश पाठविण्यास पूर्ण (दुहेरी) तारामंडळाची जरूर होती. पण त्यापूर्वी के. ए. स्टेनहील यानें या दुहेरी तारेच्या ऐवजी एकेरी तार वापरली असतां चालेल असें सिद्ध केलें. दुसऱ्या तारेच्या ऐवजीं त्यानें एकाच तारेचीं टोंकें पृथ्वीला जोडून विद्युन्मंडल पूर्ण केलें. अशा तऱ्हेनें दुहेरी तारेच्या ऐवजीं एकेरी तारेनें जर काम भागतें, व विजेचा परत मार्गहि पृथ्वीच्या जोडानें सुलभ होऊं शकतो, तर दोन्हीहि मार्गांचे काम पृथ्वीच्याच जोडानें कां होऊं नये व तारांची जरूर पूर्णपणें कां नाहींशी होऊं नये, हा त्याच्यापुढें प्रश्न आला व एकेवेळीं हेंहि घडून येईल असें त्यानें भाकीत केलें.

मोर्सः—यानंतर १८४२ सालीं त्याविषयीं मोर्सनें कांहीं प्रयोग केले. त्यानें एका कालव्याच्या दोन्ही बाजूस दोन दोन धातूचे पत्रे कांहीं अंतरावर पाण्यांत सोडले, त्यांपैकीं एका बाजूची जोडी त्यानें विद्युद्घटाला जोडली, व दुसऱ्या बाजूची जोडी तारायंत्राच्या ग्राहकाला जोडली. या व्यवस्थेनंतर पहिल्या पत्र्याच्या जोडींतून जसजसा प्रवाह सोडावा तसतशी खुणा दुसऱ्या पत्र्यास जोडलेल्या तारायंत्राच्या ग्राहकावर येऊं लागल्या. या दोन पत्र्यांमधील अंतर मात्र कालव्याच्या रुंदीच्या चौपट असावयास पाहिजे. या त्याच्या प्रयोगावरून व यापुढें विल्किन्स, व्हॉयटन वगैरेंच्या प्रयोगावरून बिनतारी तारायंत्राची शक्यता सिद्ध होऊं लागली.

ट्रोब्रिजः—सूक्ष्मध्वनिश्रावकाच्या शोधानें याचा प्रयोग बराच सुलभ झाला. गतिजन्यविद्युद्यंत्र (डायनॅमो), अन्योन्यगामी प्रवाह उत्पन्न करणारें यंत्र किंवा प्रवर्तक वेटोळें (इंडक्शन कॉईल)यांच्या तारांचीं टोंकें दोन ठिकाणीं जमीनींत पुरलीं व मध्येंच हें सूक्ष्मध्वनिश्रावक यंत्र ठेवलें, तर प्रवाहाची जसजशी घडीमोड करावी तसतसा ध्वनि त्या सूक्ष्मध्वनिश्रावकास ऐकूं येतो, हा पृथ्वीच्या अंगीं असलेल्या विद्युद्वाहकतेचा प्रयोग झाला. याशिवाय त्यानें पाण्याच्याहि अंगीं असाच विद्युद्वाहकतेचा गुण आहे हें सिद्ध केलें. एका जहाजावर विद्युदुत्पादक यंत्र ठेवून त्याचीं दोन टोंकें समुद्रांत सोडलीं व कांहीं तरी चिन्हें दर्शविण्याच्या हेतूनें प्रवाह कमी जास्त सोडूं लागलें, तर त्याच समुद्रांत असलेल्या दुसऱ्या एखाद्या जहाजावर अशा तऱ्हेचे समुद्रांत सोडलेले दोन पत्रे असतील व त्या पत्र्यांना जर शब्दवाहक यंत्र जोडलें तर समुद्रांतून जाणारा विद्युत्प्रवाह त्या पत्र्यांवर येऊन शब्दवाहक यंत्रांत नाद उत्पन्न होतो.

यानंतर कांहीं दिवसांनीं म्हणजे १८९१ सालीं दोन दूर अंतरावरच्या विद्युद्रोधित विद्युन्मंडलांत चुंबकीय प्रवर्तन

सुरू करून त्या दोन ठिकाणांत संदेशव्यवहार सुरू करतां येईल की नाहीं याविषयीं त्यानें प्रयोग केले. या प्रयोगांच्या सिद्धतेनंतर पृथ्वी व पाणी यांच्या विद्युद्वाहकतेशिवाय चुंबकीय प्रवर्तन हें बिनतारी तारायंत्राला तिसरेंच साधन सांपडलें.

प्रीस्टः—१८८५ मध्यें प्रीस्ट व हीन साइड या दोघांनीं विद्युद्वाहकता व चुंबकीयप्रवर्तन या दोहोंच्या साहाय्यानें एक यंत्र तयार केलें. या यंत्रानें प्रत्यक्ष शब्द पाव मैलपर्यंत ऐकूं जात होते व १००० यार्डपर्यंत खुणा केल्या जात असत. यानंतर वलरभी स्मिथ यानें बिनतारी विद्युत्घंटा शोधून काढली.

हर्ट्झ च्या लहरींचा शोध.—आतांपर्यंतच्या बिनतारी तारायंत्राच्या शोधांचा भर, जमीन किंवा पाणी यांची विद्युद्वाहकता, या दोहोंचें एकीकरण किंवा स्थिरविद्युत्प्रवर्तन यांवर होता. पण हीं सर्व साधनें विजेच्या ठिणगीच्या योगानें उत्पन्न होणाऱ्या विद्युल्लहरींच्या शोधानें मार्गे पडलीं. धातूच्या चुऱ्यानें भरलेल्या नळीला शब्दग्राहक यंत्र जोडलें व तिच्या जवळपास कोठें विद्युत्स्फुलिंग पडूं लागले, तर त्यांचा त्या नळीवर परिणाम दिसूं लागतो; जवळपासच नव्हे तर हा परिणाम पांचशें यार्डपर्यंत दिसतो. साधारणः प्रवर्तनाचाच हा परिणाम असावा असा त्यावेळीं समज होता पण या विद्युत्स्फुलिंगाच्या योगानें जवळपासच्या जागेंत विद्युल्लहरी उत्पन्न होतात हें १८८० सालीं हर्ट्झनें प्रयोग करून सिद्ध केलें.

मार्कोनीचें यंत्रः—मार्कोनीनें मुख्यत्वेंकरून या विद्युल्लहरींचाच बिनतारी यंत्राच्या शोधाकडे उपयोग करून घेतला, व त्याच्या करतां १८९४ तें १८९६ च्या दरम्यान विद्युल्लहरींचा शोध लावण्याचें यंत्र किती सुधारून उत्तम करतां येईल याकडेच त्यानें लक्ष दिलें. त्यानें स्वतः एक शोधक नळी तयार केली.

ष ष ही प्लॅटिनमची तार लावलेले प प हे चांदीचे दोन ठोकळे आहेत व या दोन ठोकळ्यांमध्यें शें. ९५ निकेल व शें. ५ चांदी या प्रमाणांत धातूंचा कीस ठेवला आहे व नंतर ही नळी निर्वात केली आहे. ही कांचेची असून हिला भरण्याला म ही मूठ केलेली आहे. पूर्वी तयार केलेल्या कोणत्याहि विद्युल्लहरीशोधकापेक्षां हा फार सूक्ष्म शोधक तयार झाला; पण मार्कोनीचा हेतु केवळ सूक्ष्म शोधक शोधून काढणें एवढाच नसून, त्याच्या योगानें विद्युल्लहरींचा बिनतारी तारायंत्रांत कसा उपयोग होईल हा होता. १८९२ सालीं सर विल्यम क्रूकनें या विद्युल्लहरींचा बिनतारी तारायंत्राकडे उपयोग करतां येईल असें सुचविलें होतें, पण त्या दिशेनें कोणीच प्रयत्न केले नाहींत. पुढें जी. मार्कोनी ( हा इटालियन शास्त्रज्ञ होय ) यानें या दिशेनें प्रयत्न केले. त्यानें दोन तऱ्हेचीं यंत्रें शोधून काढलीं:—( १ ) प्रेपक( संदेश पाठविणारें ) व ग्राहक ( संदेश घेणारें ).

(१)प्रेपकः—या यंत्रांत त्यानें विद्युत्प्रवर्तक किंवा विद्युत्स्फुलिंग घेटोळें ( म्हणजे ज्याच्या योगानें स्फुलिंग उत्पन्न होतील तें ) ठेविलें. त्या घेटोळ्याचा एक गोळा त्यानें जमीनीस जोडला व दुसरा अंतरिक्षस्थ तारेस जोडला. प्रवर्तक घेटोळ्याच्या आद्य घेटोळ्यांत त्यानें कमीजास्त प्रवाहाच्या योगें ( तुटक तुटक प्रवाह सोडून ) खुणा करण्याकरितां एक किल्ली ठेविली. ज्या तऱ्हेनें ही किल्ली दाबावी, त्या तऱ्हेनें ही अंतरिक्षस्थ तार विद्युद्भाररहित किंवा सहित व्हावी व त्यामुळें हवेंत विद्युदांदोलनें उत्पन्न व्हावीं,व या आंदोलनांच्या निरनिराळ्या प्रकारावर निरनिराळीं चिन्हें बसविलीं होतीं. ही प्रेपक यंत्राबद्दलची माहिती झाली.आतां ग्राहक यंत्राकडे वळूं

(२)ग्राहकः—या ग्राहक यंत्रांत ( आकृति नं. ४ पहा. ) त्यानें आपल्या विद्युल्लहरीशोधक नळीचा प्रयोग केला. या नळीचें एक टोंक त्यानें पृथ्वीला जोडलें व दुसरें अंतरिक्षस्थ तारेस जोडलें. या नळीच्या ओळींतच त्यानें एक व्होल्टाचा विद्युद्घट व सूक्ष्मभेद दाखविणारा रिले ( टप्पा ) ठेविला. स्थानिक विद्युद्घटाच्या मदतीनें हा रिले बातमी लिहिणाऱ्या यंत्राला गति देतो.

वरील यंत्राची क्रिया.—प्रेपक यंत्रांत असलेली किल्ली जशी दाबावी किंवा सोडावी त्याप्रमाणें अंतरिक्षस्थ पडदा विद्युद्भारसहित किंवा रहित होतो आणि त्यामुळें उच्च कंपनसंख्येची विद्युदांदोलनें उत्पन्न होतात. अंतरिक्षस्थ पडद्याला लावलेला विद्युत्स्फुलिंग गोळा व जमीनीशीं जोडलेला दुसरा विद्युत्स्फुलिंग गोळा हे मिळून विद्युत्संचायक ( कंडेन्सर ) बनतो. विद्युत्स्फुलिंग पडण्यापूर्वी स्थिरविद्युच्छक्तिरेषा एका गोळ्यापासून दुसऱ्या गोळ्यापर्यंत वक्र होतात व स्फुलिंग पडला म्हणजे त्या रेषा दूरदूर जाऊं लागतात, या वेळीं त्यांचीं टोकें पृथ्वीला लागलेलीं असतात. त्या रेषा अशा तऱ्हेनें जात असतांना त्यांच्या बरोबर चुंबकीय शक्तिरेषा उत्पन्न होऊन पाण्यांत लाट, धोंडा टाकलेल्या ठिकाणापासून दूर जात असतांना मोठीमोठी होत जाते तशा मोठ्या मोठ्या होत जातात. यालाच विद्युल्लहरी असें म्हणतात. ग्राहकयंत्रावर या चुंबकीय शक्ति उत्पन्न करितात. आणि त्याचा परिणाम विद्युत्शोधकनळीवर व तिला जोडलेल्या निरनिराळ्या सूक्ष्म-भेदपरिणामी यंत्रावर होतो.

वर वर्णन केलेलें यंत्र बसवून व त्यापासून विद्युल्लहरी उत्पन्न करून त्यांच्या साहाय्यानें चिन्हें पाठविणें हा या तारायंत्राचा मुख्य भाग होय. आद्य घेटोळ्यांतील किल्ली फार वेळ किंवा थोडा वेळ दाबून, मोठाली किंवा लहान लहान विद्युल्लहरींचीं आंदोलनें उत्पन्न करून त्यांवर मॉर्सच्या तारायंत्रांतील खुणाप्रमाणें रेषा किंवा टिंबयुक्त खुणा बसविण्याची योजना मार्कोनीनें केली होती. ग्राहक ठिकाणीं विद्युल्लहरीशोधक नळी प्रत्येक आघातानंतर हलवणें जरूर असल्यामुळें ती हलविण्यास संदेशलेखनयंत्राप्रमाणेंच रिलेच्या साहाय्यानें विद्युच्चुंबकीय व्यवस्था केली होती. अशा तऱ्हेनें १८९६ मध्यें पहिल्यानें काम करण्यास समर्थ असें यंत्र तयार केलें. त्या

यंत्राच्या साधेपणामुळें त्याचा प्रसार जहाजाच्या कामीं लवकर झाला. १८९९ च्या मार्चमध्यें इंग्लंड व फ्रान्स यांच्यांत सुमारें तीस मैल अंतरापर्यंत हें यंत्र मिनिटास १५ पासून २० शब्दांपर्यंत काम करूं लागलें. १९०१ च्या जानेवारींत हें अंतर २०० मैल पर्यंत वाढलें. याच वेळीं त्यानें ग्राहक यंत्रांतहि कांहीं सुधारणा केली. ग्राहक, अंतरिक्षस्थ तार व पृथ्वी यांमध्यें जी पूर्वी विद्युल्लहरीशोधक नळी घातली होती, ती काढून त्यानें त्या ठिकाणी एका विशिष्ट तऱ्हेनें आंदोलनाचें रूपांतर करणारें आद्य वेटोळें घातलें, व ही नळी त्याच्या गौण वेटोळ्याच्या टोंकास जोडली.

पुढील सुधारणा.—विद्युल्लहरीतारायंत्र मार्कोनीनें मूर्त स्वरूपांत आणल्यावर त्यावर पुष्कळ लोक काम करूं लागले. यंत्राचे मुख्य दोन भाग म्हणजे प्रेषक ( बातमी पाठविणारें ) व ग्राहक ( बातमी घेणारें ) असे असल्यामुळें ज्या काय सुधारणा होणार त्या यांच्यांतच होणार, तेव्हां प्रथम प्रेषकयंत्राबद्दल विचार करूं. प्रेषक यंत्रांतील मुख्य भाग म्हणजे अंतरिक्षस्थ तार होय. ही तार निरनिराळ्या आकाराची असूं शकते. ही कधीं एकटीच सरळ असते तर कधीं तिच्या शेवटीं एक पत्रा असतो, तर कधीं वाकवून तिचा कांहीं भाग पृथ्वीशीं समांतर केलेला असतो. कधीं कधीं छत्रीच्या आकारांत किंवा शंकूच्या आकारांत एकापेक्षां अधिक तारा असूं शकतात. ही तार किंवा तारा हा एक पडदा व पृथ्वी हा दुसरा पडदा. या दोन पडद्यांच्या योगानें विद्युत्संचायक तयार होतो. हा संचायक विद्युद्भारित करून एकाएकी विद्युद्भार रहित केला जातो व त्यामुळें जोरदार विद्युदांदोलनें सुरू होऊन ते अंतरिक्षस्थ तार व पृथ्वी यांत सारखे फिरत रहातात. अंतरिक्षस्थ तारेभोंवतीं असणाऱ्या विद्युत् व चुंबकीय शक्तींत यामुळें जोराचे फरक होऊं लागतात, व विद्युल्लहरी रूपांत त्यापासून शक्ति दूर दूर जाऊं लागते. एका घटकेत अंतरिक्षस्थ तारेवर स्थिरविद्युद्भार असून त्यापासून शक्तिरेषा पृथ्वीपर्यंत पसरतात. दुसऱ्या घटकेला त्यावर विद्युत्प्रवाह दिसूं लागून त्याभोंवती चुंबकीय शक्तिरेषा असते. हे चल आणि स्थिर परिणाम एकामागून एक त्यावर दिसून येतात. आणि याचा परिणाम असा होतो कीं, अंतरिक्षस्थ तारेपासून विद्युत्शक्तीच्या स्पर्शवक्ररेषा निघून चोहोंकडे बाहेर पसरतात व त्याबरोबरच चुंबकीय शक्तीच्या वर्तुलाकृती रेषा वृद्धिंगत होतात. या सर्व क्रियेची तुलना विण्याच्या तारेच्या क्रियेशीं करतां येईल. विण्याची तार एका बाजूस ओढली म्हणजे तिच्यावर जो तणाव पडतो तो तणाव म्हणजे अंतरिक्षस्थ तारेचा विद्युद्भार, तार सोडणें म्हणजे विद्युद्भाररहित करणें, व विण्याच्या तारेनें उत्पन्न केलेलीं आवाजाचीं आंदोलनें म्हणजेच बिनतारी तारायंत्रांतील अंतरिक्षस्थ तारेनें उत्पन्न केलेलीं विद्युदांदोलनें होत. अंतरिक्षस्थ तारेवर विद्युद्भार उत्पन्न करून त्याच्या साहाय्यानें विद्युल्लहरी उत्पन्न करणें हा मुख्य भाग झाला. आतां हा विद्युद्भार कसा उत्पन्न करतां येईल हें पाहूं. हा विद्युद्भार उत्पन्न करण्याच्या दोन तीन निरनिराळ्या रीती आहेत.

( १ ) मागील आकृतींत दाखविल्याप्रमाणें प्रवर्तक वेटोळ्याला जोडलेल्या दोन गोळ्यांवर विद्युत्संभाव्यशक्तींत फरक वाढूं लागला म्हणजे अंतरिक्षस्थ तारेवर [illegible] वाढूं लागतो व संभाव्यशक्तीचा फरक इतका होतो कीं त्या दोन गोळ्यांत विद्युत्स्फुल्लिंग पडतो. ही मार्कोनीची पद्धत होय.

(२) दुसऱ्या पद्धतींत अंतरिक्षस्थ तार पूर्णमंडलास प्रत्यक्ष जोडलेली असते. पूर्णमंडल हें लेडनघट, वेटोळें, आद्य वेटोळें व स्फुलिंगावकाश यांचें झालेलें [illegible] आद्य वेटोळ्याचें एक टोंक जमीनीला जोडून दुसऱ्या [illegible] अंतरिक्षस्थ तार उभी केलेली असते. पूर्णमंडलांत आंदोलनें सुरू करावीं त्यावेळीं तत्सदृश आंदोलनें अंतरिक्षस्थ तारेंतहि उत्पन्न होतात; व नंतर त्यापासून विद्यु[illegible] विसर्जन होऊं लागतें ( आकृति नं. ५ पहा. )

उपयोगांत असलेल्या बिनतारी तारायंत्रांत, अंत[illegible] तार नसून आकृति ६ मध्यें (पहा) दाखविल्याप्रमाणें [illegible] सारख्या तारा लावलेल्या असतात. या तारांचीं खालचीं [illegible] आंदोलनांत रूपांतर करणाऱ्या वेटोळ्याच्या गौण वेटो[illegible] पृथ्वीशीं जोडलेली असतात. प्रवर्तक वेटोळ्याच्या [illegible] वेटोळ्यांत एक किल्ली घालून, आंदोलनें कमीजास्त किंवा पूर्ण थांबविणें या गोष्टी, करतां येतात व [illegible] ताब्यांत ठेवतां आलीं म्हणजे नंतर अंतरिक्षस्थ [illegible] विसर्जन पावणाऱ्या विद्युल्लहरीहि आपल्या ताब्यांत येतात.

दूर दूर अंतरावर बिनतारी यंत्रानें संदेश [illegible] असेल तर विद्युल्लहरी जितक्या जोरदार असतील [illegible] चांगल्या. जोरदार विद्युल्लहरी उत्पन्न करण्याकरितां [illegible] रचना तयार करण्यांत आली आहे.

प्रेषकयंत्रांप्रमाणें ग्राहकयंत्रांतहि सुधारणा [illegible] लागल्या. मार्कोनीच्या ग्राहकयंत्राची रचना व क्रि[illegible] मागें वर्णन केलींच आहेत पण त्यांत एक न्यून [illegible] कीं विद्युल्लहरीशोधक नळी एका विद्युल्लहरीच्या [illegible] विद्युत्प्रवाही झाली म्हणजे मग ती प्रवाहीच रा[illegible] तिच्या योगानें विद्युल्लहरीचा शोध लागणें कठिण [illegible] पुन्हां ती पूर्व स्थितींत आणण्याकरतां तिला बारीक धक्के द्यावे लागतात. ग्राहकयंत्रांत हाच भाग मुख्य [illegible] असल्यामुळें व मार्कोनीच्या यंत्रांत वरील न्यून [illegible] या भागाची सुधारणा करण्याकडे पुष्कळ शास्त्र[illegible] वेधलें व पुष्कळ निरनिराळे विद्युल्लहरीशोधक तयार [illegible]

समकालिक विद्युत्तरंग तारायंत्र.—[illegible] केलेल्या अंतरिक्षस्थ तारेवर वातावरणांतून [illegible] त्याहि विद्युल्लहरी येऊन त्यांचा परिणाम [illegible] विद्युल्लहरीशोधकावर होईल. या यंत्रास समका[illegible]

# बिनतारीसंदेशवाहकयंत्र.


















यंत्राच्या साधेपणामुळें त्याचा प्रसार जहाजाच्या कामीं लवकर झाला. १८९९ च्या मार्चमध्यें इंग्लंड व फ्रान्स यांच्यांत सुमारें तीस मैल अंतरापर्यंत हें यंत्र मिनिटास १५ पासून २० शब्दांपर्यंत काम करूं लागलें. १९०१ च्या जानेवारींत हें अंतर २०० मैल पर्यंत वाढलें. याच वेळीं त्यानें ग्राहक यंत्रांतहि कांहीं सुधारणा केली. ग्राहक, अंतरिक्षस्थ तार व पृथ्वी यांमध्यें जी पूर्वी विद्युल्लहरीशोधक नळी घातली होती, ती काढून त्यानें त्या ठिकाणी एका विशिष्ट तऱ्हेनें आंदोलनाचें रूपांतर करणारें आद्य वेटोळें घातलें, व ही नळी त्याच्या गौण वेटोळ्याच्या टोंकास जोडली.

पु ढी ल सु धा र णा.—विद्युल्लहरीतारायंत्र मार्कोनीनें मूर्त स्वरूपांत आणल्यावर त्यावर पुष्कळ लोक काम करूं लागले. यंत्राचे मुख्य दोन भाग म्हणजे प्रेषक ( बातमी पाठविणारें ) व ग्राहक ( बातमी घेणारें ) असे असल्यामुळें ज्या काय सुधारणा होणार त्या यांच्यांतच होणार, तेव्हां प्रथम प्रेषकयंत्राबद्दल विचार करूं. प्रेषक यंत्रांतील मुख्य भाग म्हणजे अंतरिक्षस्थ तार होय. ही तार निरनिराळ्या आकाराची असूं शकते. ही कधीं एकटीच सरळ असते तर कधीं तिच्या शेवटीं एक पत्रा असतो, तर कधीं वाकवून तिचा कांहीं भाग पृथ्वीशीं समांतर केलेला असतो. कधीं कधीं छत्रीच्या आकारांत किंवा शंकूच्या आकारांत एकापेक्षां अधिक तारा असूं शकतात. ही तार किंवा तारा हा एक पडदा व पृथ्वी हा दुसरा पडदा. या दोन पडद्यांच्या योगानें विद्युत्संचायक तयार होतो. हा संचायक विद्युद्भारित करून एकाएकी विद्युद्भार रहित केला जातो व त्यामुळें जोरदार विद्युदांदोलनें सुरू होऊन ते अंतरिक्षस्थ तार व पृथ्वी यांत सारखे फिरत रहातात. अंतरिक्षस्थ तारेभोंवतीं असणाऱ्या विद्युत् व चुंबकीय शक्तींत यामुळें जोराचे फरक होऊं लागतात, व विद्युल्लहरी रूपांत त्यापासून शक्ति दूर दूर जाऊं लागते. एका घटकेंत अंतरिक्षस्थ तारेवर स्थिरविद्युद्भार असून त्यापासून शक्तिरेषा पृथ्वीपर्यंत पसरतात. दुसऱ्या घटकेला त्यावर विद्युत्प्रवाह दिसूं लागून त्याभोंवती चुंबकीय शक्तिरेषा असते. हे चल आणि स्थिर परिणाम एकामागून एक त्यावर दिसून येतात. आणि याचा परिणाम असा होतो कीं, अंतरिक्षस्थ तारेपासून विद्युत्शक्तीच्या अर्धवक्ररेषा निघून चोहोंकडे बाहेर पसरतात व त्याबरोबरच चुंबकीय शक्तीच्या वर्तुलाकृती रेषा वृद्धिंगत होतात. या सर्व क्रियेची तुलना विण्याच्या तारेच्या क्रियेशीं करतां येईल. विण्याची तार एका बाजूस ओढली म्हणजे तिच्यावर जो तणाव बसतो तो तणाव म्हणजे अंतरिक्षस्थ तारेचा विद्युद्भार, तार सोडणें म्हणजे विद्युद्भाररहित करणें, व विण्याच्या तारेनें उत्पन्न केलेली आवाजाचीं आंदोलनें म्हणजेच बिनतारी तारायंत्रांतील अंतरिक्षस्थ तारेनें उत्पन्न केलेलीं विद्युदांदोलनें होत. अंतरिक्षस्थ तारेवर विद्युद्भार उत्पन्न करून त्याच्या साहाय्यानें विद्युल्लहरी उत्पन्न करणें हा मुख्य भाग झाला. आतां हा विद्युद्भार कसा उत्पन्न करतां येईल हें पाहू. हा विद्युद्भार उत्पन्न करण्याच्या दोन तीन निरनिराळ्या रीती आहेत.

( १ ) मागील आकृतींत दाखविल्याप्रमाणें प्रवर्तन वेटोळ्याला जोडलेल्या दोन गोळ्यांवर विद्युत्संभाव्यशक्तीचा फरक वाढूं लागला म्हणजे अंतरिक्षस्थ तारेवर विद्युद्भार वाढूं लागतो व संभाव्यशक्तीचा फरक इतका होतो कीं त्या दोन गोळ्यांत विद्युत्स्फुल्लिंग पडतो. ही मार्कोनीची मूळ पद्धत होय.

(२) दुसऱ्या पद्धतींत अंतरिक्षस्थ तार पूर्णमंडलाला आळून प्रत्यक्ष जोडलेली असते. पूर्णमंडल हें लेडनघट, प्रवर्तक वेटोळें, आद्य वेटोळें व स्फुल्लिंगावकाश यांचें झालेलें असतें. आद्य वेटोळ्याचें एक टोंक जमीनीला जोडून दुसऱ्या टोंकावर अंतरिक्षस्थ तार उभी केलेली असते. पूर्णमंडलांत ज्यावेळीं आंदोलनें सुरू करावीं त्यावेळीं तत्सदृश आंदोलनें अंतरिक्षस्थ तारेंतहि उत्पन्न होतात; व नंतर त्यापासून विद्युल्लहरींचें विसर्जन होऊं लागतें( आकृति नं. ५ पहा. )

उपयोगांत असलेल्या बिनतारी तारायंत्रांत, अंतरिक्षस्थ तार नसून आकृति ६ मध्यें (पहा) दाखविल्याप्रमाणें चरख्यासारख्या तारा लावलेल्या असतात. या तारांचीं खालचीं टोंकें आंदोलनांत रूपांतर करणाऱ्या वेटोळ्याच्या गौण वेटोळ्यांतून पृथ्वीशीं जोडलेलीं असतात. प्रवर्तक वेटोळ्याच्या आद्य वेटोळ्यांत एक किल्ली घालून, आंदोलनें कमीजास्त करणें किंवा पूर्ण थांबविणें या गोष्टी, करतां येतात व आंदोलनें ताब्यांत ठेवतां आलीं म्हणजे नंतर अंतरिक्षस्थ तारेंतून विसर्जन पावणाऱ्या विद्युल्लहरीहि आपल्या ताब्यांत ठेवतां येतात.

दूर दूर अंतरावर बिनतारी यंत्रानें संदेश पोहोंचविणें असेल तर विद्युल्लहरी जितक्या जोरदार असतील तितक्या चांगल्या. जोरदार विद्युल्लहरी उत्पन्न करण्याकरतां एक यंत्ररचना तयार करण्यांत आली आहे.

प्रेक्षकयंत्रांप्रमाणें ग्राहकयंत्रातहि सुधारणा कराव्या लागल्या. मार्कोनीच्या ग्राहकयंत्राची रचना व क्रिया हीं मागें वर्णन केलींच आहेत पण त्यांत एक न्यून आहे तें हें कीं विद्युल्लहरीशोधक नळी एका विद्युल्लहरीच्या धक्क्यानें विद्युत्प्रवाही झाली म्हणजे मग ती प्रवाहीच राहून नंतर तिच्या योगानें विद्युल्लहरीचा शोध लागणें कठिण होतें व पुन्हां ती पूर्व स्थितींत आणण्याकरतां तिला बारीक बारीक धक्के द्यावे लागतात. ग्राहकयंत्रांत हाच भाग मुख्य महत्त्वाचा असल्यामुळें व मार्कोनीच्या यंत्रांत वरील न्यून असल्यामुळें या भागाची सुधारणा करण्याकडे पुष्कळ शास्त्रज्ञांचें लक्ष्य वेधलें व पुष्कळ निरनिराळे विद्युल्लहरीशोधक तयार झाले.

स म का लि क वि द्यु त्त रं ग ता रा यं त्र.—वर वर्णन केलेल्या अंतरिक्षस्थ तारेवर वातावरणांतून आलेल्या कोणत्याहि विद्युल्लहरी येऊन त्यांचा परिणाम खालीं असलेल्या विद्युल्लहरीशोधकावर होईल. या यंत्रास समकालिक विद्युत्तरंग

# बिनतारीसंदेशवाहकयंत्र.


















# विशिष्टप्राणी.



पट्ट्यांचा तरस



ठिपक्यांचा तरस.



तिबेटी लोकांचें ईश्वरप्रार्थनेचें हातचक्र



लांब केसांचा याक बैल.

यंत्र म्हणतां येणार नाहीं. पण शक्तिग्रहणयंत्र व प्रवर्तनयंत्र घालून एक पूर्ण मंडल तयार केलें तर लघुकालिक विद्युच्चालक शक्तीनें त्यांत विद्युत्तरंग उत्पन्न होतील, आतां फक्त एवढ्याच गोष्टीची जरूर आहे कीं याची पैरवी (कंपनसंख्या-दर सेकंदाला होणाऱ्या फेऱ्यांना दर फ्रीक्वन्सी) संचायक मंडलाच्या पैरवीशीं जमली पाहिजे. संचायक मंडलाला त्याची त्याजवरच अवलंबून असणारी स्वाभाविक पैरवी असते क ही संचायकाची ग्रहणशक्ति व ल ही प्रवर्तनशक्ति असेल तर त्याची पैरवी $\left\{ \frac{१}{२ \times \frac{२२}{७} \sqrt{कल}} \right\}$ या पदसंघातानें (फॉर्म्युला) काढतां येते.

विनतारी तारायंत्रांत प्रेपक व ग्राहक हे समाकालिक विद्युत्तरंगाचे असावेत. तसे नसतील तर संचायकांत फेरफार करून ते समकालिक विद्युत्तरंगाचे करून घेणें शक्य आहे हें वरील पदसंघातावरून दिसून येईल. ते जर समकालिक विद्युत्तरंगाचे नसतील तर वाटेल त्या विद्युल्लहरी ते ग्रहण करतील व स्पष्ट संदेशाऐवजीं निरनिराळ्या संदेशांचें मिश्रण किंवा कांहींच ऐकूं येणार नाहीं. त्याचप्रमाणें दोन समकालिक आंदोलन होणाऱ्या दोन स्वरशूलांपैकीं एकाचीं आंदोलनें होत असतां दुसरा जवळ धरला तर त्याच्यांतहि आंदोलनें सुरू होतात, पण तो जर का भिन्नकालिक आंदोलनांचा असेल तर त्याचीं आंदोलनें होत नाहींत, व त्याचा काल जर फारसा भिन्न नसेल तर त्यांत मोठ्या अडचणीनें आंदोलनें सुरू होतात. अशा तऱ्हेनें नियतकालिक आंदोलनाचें यंत्र असणें जास्त सोयीचें पडतें. व तो तरंगकाल बाकी यंत्रांनां माहीत असला म्हणजे त्यांनां आपलें यंत्र त्या नियमित तरंगकालाचें करून घेऊन नेमक्या त्याच यंत्राशीं बोलतां येईल; व हीं दोन यंत्रें एकमेकांशीं बोलत असतांनां बाकी यंत्रांनां त्रासहि होणार नाहीं व त्यांची बातमीहि मधल्यामध्यें त्यांनां घेतां येणार नाहीं.

त्याचप्रमाणें उभ्या अंतरिक्षस्थ तारेंतून निघणारे विद्युत्तरंग त्या तारेपासून वाटेल त्या दिशेकडे पसरतात, व त्या तारेला केंद्र धरलें तर त्याच्या परिघावर असणाऱ्या सर्व विद्युत्तरंगयंत्रांनां बातमी मिळूं शकते. हें टाळण्याकरतां अंतरिक्षस्थ तारेंतून विद्युत्तरंग विवक्षित एका दिशेनें पाठवितां येणें जास्त जरूर आहे. ते एका दिशेनें पाठवितां येण्याकरतां पहिल्यानें परवलीयदर्पणांचा उपयोग केला गेला. पण एक हजार फूट लांबी असलेल्या विद्युल्लहरींचें दर्पणाच्या साहाय्यानें परावर्तन करणें म्हणजे एक लक्षांश इंच व्यासाच्या भारशानें दृक्-प्रयोग करण्यासारखेंच होईल.

१९०६त मार्कोनीनें हा प्रश्न सोडविला, तो असा कीं प्रेपक यंत्राची अंतरिक्षस्थ तार निव्वळ उभी न करतां थोडीशी पृथ्वीशीं समांतर ठेवावी. अशा अंतरिक्षस्थ तारेंतून निघणारे विद्युत्तरंग तारेच्या टोकाच्या उलट दिशेला जातात.

अ ट लां टि क पा र वि न तां री ता रा यं त्र :—१९०१ च्या सुमारास विनतारी तारायंत्रानें सरासरी २०० मैलांच्या अंतरावर विनतारी तारायंत्रानें मार्कोनीनें संदेश पाठविला; व यानंतर अटलांटिकवर विजय मिळवावा अशी त्याला इच्छा झाली व त्याप्रमाणें त्यानें दक्षिण कार्नवालमध्यें 'पोलधू' ला एक स्टेशन तयार केलें. ता. १२ डिसेंबर १९०१ या दिवशीं ठराविक वेळीं या ठिकाणापासून पाठविलेली एस् या अक्षराचीं चिन्हें त्याला ऐकूं आलीं. १९०२ च्या फेब्रुवारींत 'फिलाडेल्फिया' नांवाच्या बोटींत असतांना मार्कोनीला पोलधू पासून १५५० मैलपर्यंत वाचण्याजोगे संदेश व सरासरी २००० मैलपर्यंत मॉर्सचीं चिन्हें घेतां आलीं. हें वर्ष संपण्याच्या आंतच अटलांटिक पार विनतारी तारायंत्रपद्धति शक्य आहे हें ठरलें. अटलांटिक पार विनतारी तारायंत्रपद्धति शक्य नसल्याच्या बऱ्याच कारणांपैकीं एक महत्त्वाचें कारण म्हणजे पृथ्वीच्या वर्तुलाकारामुळें अटलांटिकचीं उंची पोलधू व प्रेपकठिकाण ( इंग्लंडमधील ) यांच्या उंचीपेक्षां १२५ मैल जास्त आहे. आतां विद्युत्तरंग, तेजोतरंगाप्रमाणें सरळ रेषेंत वहातो व त्याप्रमाणेंच कधीं वक्र होत नाहीं, अशी कल्पना केली तर इंग्लंडमधील स्टेशनापासून निघालेले विद्युत्तरंग अटलांटिकच्या टेंकाडावरून सरळ जाऊन पोलधूवर जमीनीपासून १००० मैल उंचीवर जातील, व हे तरंग, नंतर कोणत्याच अंतरिक्षस्थ तारेनें काय, पण प्रत्यक्ष पतंगाची जरी योजना केली तरी पकडणें अशक्य होईल, अर्थात् विनतारी तारायंत्रें निरुपयोगी होतील. पण सुदैवानेंच म्हणा हे तरंग आपले आपणच इतक्या उंच न जातां जमीनीकडे धांव घेतात व म्हणून बऱ्याच उंचीच्या अंतरिक्षस्थ तारेची जरूर लागत नाहीं व अटलांटिक पार विनतारी तारायंत्रानें संदेश पाठविले जातात. तेजोतरंगांप्रमाणें विद्युत्तरंग सरळच जातात. असें नसून कधीं कधीं ते त्यांच्या सरळमार्गापासून जवळ जवळ १७° अंशांपर्यंत वळले आहेत हेंहि दिसून आलें आहे.

याप्रमाणें विनतारी तारायंत्र अथवा विद्युत्तरंगसंदेशवाहक यांच्या योगानें पृथ्वीच्या पाठीवर कोणत्याहि ठिकाणच्या संदेशवहनाच्या कामीं क्रांति घडवून आणली आहे. त्याच्या योगानें हजारों मैल दूर असलेल्या निरनिराळ्या ठिकाणीं तावडतोब बातमी पोंचवितां येते, त्याचप्रमाणें युद्धप्रसंगीं किंवा शांततेच्या वेळीं एका जहाजावरून दुसऱ्या जहाजावर किंवा किनाऱ्यापासून जहाजावर बातमी पोंहोंचविण्याचें हें एक महत्त्वाचें साधन होऊन बसलें आहे. विनतारी तारायंत्र जर यशस्वी झालें तर स-तार तारायंत्रें मागें पडतील या आरंभीच्या समजुतीला मात्र आधार न मिळून विनतारी तारायंत्राचें क्षेत्र व काम विशिष्ट आहे हें सिद्ध झालें आहे.

हिं दु स्था न.—हिंदुस्थानांतील मुलकी कारभाराच्या बाबींसंबंधीं, तारायंत्रखात्याची एक स्वतंत्र बिनतारी संदेशवाहक शाखा स्थापन करण्यांत यावी असें १९१९-२० सालीं ठरलें; आणि याचकरितां इंग्लंडाहून पांच तज्ज्ञ अधिकारी हिंदुस्थानांत आणण्यांत आले. हवामानांत मोठा फरक

होऊन त्यामुळें ज्या ज्या वेळीं अडथळे उत्पन्न झाले, असे सर्व प्रसंग खेरीजकरून विनतारीसंदेशगृहांचीं कामें उत्कृष्ट रीतीनें सर्व वर्षभर चाललेलीं होतीं. ज्या वेळीं खुष्कीनें संदेश वाहनाच्या कामीं अडथळा होई त्या वेळीं विनतारी संदेशवाहक यंत्राचा चांगलाच उपयोग होत असे. मुंबई ते एडन, मुंबई ते सीलोन, कराची ते इराणचें आखात यांमध्यें विनतारीसंदेशवाहनकार्य सुरू झालें. ब्रह्मदेश व मलाया द्वीपकल्प यांमध्यें दळणवळण सुरू करण्याची योजना झाली होती परंतु ती लांबणीवर टाकावी लागली; नवीन यंत्रसामुग्री आणण्यांत आली व त्यामुळें संदेशग्राहकगृहांत हवेतील फरकामुळें जी अडचण उत्पन्न होत होती ती दूर करण्याचे प्रयत्न करण्यांत आले. कराची येथें एक मुलकी व लष्करी शाळा स्थापण्यांत आली व त्यामुळें लष्करी व मुलकी गरजा भागविण्याचें एक साधन झालें.

सरकारी लष्करी अधिकाऱ्यांनीं विनतारी संदेशगृहांचा उपयोग कितपत करावा याबद्दल कांहीं नियम करण्यांत आले आहेत. एखादा ऑफिसर आपल्या अधिकाराच्या नात्यानें जेव्हां त्या यंत्राचा उपयोग करील तेव्हां त्यास परवाना घेण्याची जरूर नाहीं, मात्र त्यानें डायरेक्टर जनरल याची संमति घेतली पाहिजे. पण खासगी नात्यानें जेव्हां एखादा अधिकारी या यंत्राचा उपयोग करील तेव्हां त्यानें परवाना घेतला पाहिजे.

"साम्राज्य विनतारी मंडळ" स्थापन करण्यांत यावें म्हणून एंम्पायर प्रेस यूनिअननें इंग्लंडांत खटपट केली व याबद्दल वर्षभर चर्चा चालू होती. परंतु ब्रिटिश पोस्ट ऑफिसनें केलेल्या अडथळ्यामुळें या बाबतींत कांहींच होऊं शकले नाहीं. हिंदुस्थानसरकारची उपर्युक्त योजनेबद्दल पूर्ण सहानुभूति आहे. परंतु त्याच्या जवळ भांडवल व तज्ज्ञ नाहींत. हिंदुस्थानांत विनतारी संदेशवाहक यंत्रें उभारण्यांत यावीं म्हणून हिंदुस्थानसरकारनें मार्कोनी–कंपनीशीं करारहि केला आहे. परंतु ब्रिटिश पोस्ट ऑफीसचा दुराग्रह गेल्याखेरीज ही मागणी फलद्रुप होईलसें दिसत नाहीं.

विनतारी संदेशवाहक गृहें १९२३–२४ अखेर एकंदर पंचवीस होतीं. आलाहाबाद, मुंबई, कलकत्ता, दिल्ली, डायमंड आयलंड, जूटोघ, कराची, लाहोर, मद्रास (तीन स्टेशनें), मेमियो, मद्दू, नागपूर, पेशावर, पुणें, पोर्टब्लेअर, क्वेटा, रंगून ( तीन स्टेशनें ), सँडहेड्स, शिकंदराबाद व व्हिक्टोरिया पॉइंट, अशीं गृहें हिंदुस्थानांत व बाहेर आहेत. रंगून व मद्रास या ठिकाणीं नवीन गृहें बांधण्यांत आलीं व गतीचा वेग वाढावा म्हणूनहि योजना करण्यांत आली. १९२५ सालच्या सुरवातीस, समुद्रावरील जहाजाशीं व्यवहार ठेवणारीं सहा समुद्रकिनाऱ्यावरील विनतारी संदेशगृहें होतीं व आन्तर्देशीय बारा गृहें होतीं. पोष्ट व टेलिग्राफ खात्याचीहि तीन गृहें बंगालच्या उपसागरांत होतीं. १९२१–२२ सालीं, अन्तर्देशीय संदेशगृहांच्या बाबतींत आज तागाईतपणा आणण्याचा विचार करण्यांत आला. आधुनिक दृष्टया त्यांत सुधारणा करावी असें ठरलें. आन्तर्देशीय पद्धतीचीं लहान लहान गृहें जोडण्यांत यावींत व अशीं गृहें स्थापन करण्यास स्थानिक सरकारास मुभा असावी असें ठरलें. खासगी व्यक्तींनांहि धंद्याकरितां अशी गृहें परवाना घेऊन बांधण्यास मोकळीक असावी असें धोरण स्वीकारण्यांत आलें. १९२२ अखेर, अति खर्चामुळें आन्तर्देशीय योजना अमलांत आणण्याचें काम पुढें ढकलण्यांत आलें. पोष्ट व टेलिग्राफ खात्यानें सध्यां समुद्रकिनाऱ्यावरील स्टेशनेंच फक्त उपयोगार्थ मोकळीं ठेविलीं आहेत. आन्तर्देशीय स्टेशनांचा तूर्त उपयोग केला जात नाहीं. रंगून व मद्रासमधील विनतारी संदेशवाहकाची मात्र गतीच्या बाबतींत प्रगति झाली आहे. जगांतील इतर रेडिओ स्टेशनांशीं जर हिंदुस्थानास आपला संबंध जोडावयाचा तर येथें उत्कृष्ट प्रकारचें संदेशवाहक गृह निर्माण करण्यांत आलें पाहिजे. मोठ्या अंतराच्या बाबतींतहि प्रयोग सुरू आहेत.

**ताल संस्थान**--मध्यहिंदुस्थानांतील माळवा एजन्सीमधील एक ठाकुरात. सन १६०० मध्यें हें माळव्याच्या सुभेदाराकडे, १८१० सालीं होळकराकडे व मंदसोरच्या तहांत गफूरखानाकडे आलें. मुख्य गांव ताल अथवा तालमंडावल हा आहे.

**तालगुंड**—हें खेडें म्हैसूर, जिल्हा शिमोगा, तालुका शिकारपूरमध्यें आहे. येथें प्राचीन काळीं कदंब किंवा त्रिनेत्र नामक राजा होता. त्यानें अहिक्षेत्राहून प्रथम ब्राह्मण येथें आणले अशी दंतकथा आहे. येथें जुने लेख पुष्कळ आहेत. येथें एक पडकें देऊळ असून त्याच्या समोर असणाऱ्या खांबावर एक महत्त्वाचा लेख आहे.

**तालचेर**—बंगाल. ओरिसामधील लहान संस्थानांपैकीं हें एक संस्थान आहे. या संस्थानांत कोळशाची खाण आहे. परंतु कोळसा चांगला व पुष्कळसा निघण्याचा संभव नसल्यामुळें ती चालू केली नाहीं. याशिवाय ब्राह्मणी नदीच्या कांठीं लोखंड व चुना बराच सांपडतो. नदींत थोडें सोनेंहि सांपडतें. येथील राजा स्वतःला जयपूर येथील रजपूत राजाचा वंशज म्हणवितो. संस्थानचें उत्पन्न ६५००० रुपये आहे.

**तालबहत**—हें गांव संयुक्तप्रांत, जिल्हा झांशी, ललितपूर तहशिलींत आहे. इ. स. १६१८ मध्यें चंदेरीच्या भरत राजानें या ठिकाणीं किल्ला व राजवाडा बांधला. किल्ल्याच्या पूर्वेकडे ५२८ एकराचा एक सुंदर तलाव आहे.

**तालिकोट**—हा गांव मुंबई, विजापूर जिल्हा, मुद्देबिहाळ तालुक्यांत आहे. या गांवाजवळ असणाऱ्या रक्कसगी आणि तंगडगी या गांवीं विजयानगरचा रामराजा व दक्षिणेंतील विजापूर, बेदर व गोवळकोंडा येथील राजे यांमध्यें मोठी लढाई होऊन तींत विजयानगरच्या राजाचा पराभव झाला. तरी देखील महुरमानी राजांतहि परस्पर मत्सरामुळें

विजयानगरचें राज्य याच वेळीं समूळ नष्ट न होतां रामराजाच्या भावाकडे थोडेसें राज्य ठेवण्यांत आलें. मात्र हिंदूसाम्राज्यसत्ता नष्ट झाल्यानें त्यांतील देशमुख, जमीनदार, जहागीरदार वगैरे लोक स्वतंत्र पाळेगार बनले. या राज्याचा व अनागोंदी राज्याचा बराच संबंध येतो ( ज्ञानकोश भाग ६ आनागोंदी पहा). सन १७५० मध्यें बाळाजी बाजीरावानें हा गांव आनंदराव रास्ते यास सरंजामासाठीं दिला. पुढें हा गांव रास्त्यांकडेच राहिला. येथें सतरंज्या चांगल्या होतात.

**तालुरंध्ररोग**—बाच्या जवडपाच्या डाव्या व उजव्या बाजूच्या हाडाच्या आंतील म्हणजे मुखांतील बाजूस दोन्हीं बाजूकडून अस्थींचा पापुद्रा गर्भावस्थेंत वाढून मुखाच्या मधोमध मिळून येतो व मुखास कडीपाटाप्रमाणें " टाळू " नांवाची रचना मूल उपजतांच तयार होते. परंतु असें अस्थिमीलन मुखरंध्रापासून मागें पडजिभेच्या टापूपर्यंत पूर्णपणें अगर अंशतः न झाल्यामुळें लहान, मध्यम अगर मोठी फट टाळूमध्यें उपजतपणें एका अगर दोन्हीं बाजूस असलेली कांहीं रोग्यांची पहाण्यांत येते त्या रोगास हें नांव आहे. तुटका ओंठ, पाठीच्या कण्याशीं संबंध असलेलें आवाळू, स्थूलचरणरोग, हे व असले कांहीं उपजत व्यंगयुक्त रोग आहेत व त्यांपैकीं एखादुसरें व्यंग या तालुरंध्ररोग्यासहि असण्याचा संभव असतो. मोठी फट पडजिभेपासून दांतापर्यंत असते व लहान फट पडजीभ व तिच्या अलीकडील टाळूचा मृदुभाग यापुरतीच असते. या व्यंगामुळें शैशवावस्थेंत स्तनपान करतांना दूध ओढणें, दुग्धपान करणें या क्रिया बहुतेक अशक्य होतात. व यानंतर अर्भकाचें वय जसें वाढेल व फट लहान मोठी असेल त्यामानानें मुलाचा आवाज, भाषण, उच्चार, चव, घ्राणेंद्रियाची तीक्ष्णता व श्रवणशक्ति यांत व्यंग व कमतरता येऊन दूध नाकांतून परत येत असल्यामुळें मूल रोडावतें व म्हणून दूध पाजणें झाल्यास डोकें मागें वरचेवर वळवून मग दूध पाजलें तर तें पोटांत जातें. पवर्ग, टवर्ग, तवर्ग, ग वगैरे कवर्गांतील व्यंजनें अगर अक्षरें त्यास नीट उच्चारतां येत नाहींत. या फटीवाटे नाकांत वारें शिरण्याचें नवें द्वार झाल्यामुळें पडसें सर्दी होते व नाकांत खपल्या धरून त्या कुजल्यामुळें पिनसाप्रमाणें नाकास घाण येते. फट असल्यामुळें अन्नाचें चर्वण नीट होत नाहीं. यांतच तुटका ओंठ असें आणखी कांहीं व्यंग असल्यास या सर्व व्यंगयुक्त रोगांचा परिणाम मुलाच्या मनावरहि होऊन मूल लाजरें, भित्रें, घाबरट होऊन चारचौघांत उठण्याबसण्यास मागें घेतें. कारण त्यास असलेल्या अनेक व्यंगांची जाणीव त्यास असते. म्हणून हें व्यंग नाहींसें करण्यासाठीं शस्त्रक्रिया करणें हाच त्यांतल्या त्यांत श्रेयस्कर उपाय ठरला आहे. शस्त्रक्रिया करणें ती मूल अंगावर पीत आहे इतक्या कोंवळ्या वयांत करूं नये. कारण त्यांत रक्तस्राव होतो व तो सोसण्याची त्यास ताकद नसते व मूल स्तनपान करतांना अगर शिंका, खोकला यामुळें टांके तुटून जातात. तसेंच जवळ जवळ दोन वर्षेंपर्यंत पहिले दांत सर्व उगवतात व तीन वर्षेंपर्यंत फट आपोआप अंमळ कमी होते. मूल बोलूं लागण्याच्या सुमारास शस्त्रक्रिया करावी; त्याच्या अगोदर करूं नये. ती केल्यानंतर कदाचित् मुलाचें बोलणें व उच्चार सकृद्दर्शनीं आणखी बिघडला आहे असाहि भास होण्याचा संभव आहे. कारण उच्चाराचीं पूर्वीचीं साधनें नष्ट होऊन नव्या रचनेचा उपयोग करावयास शिकावयाचें असतें. यावेळीं उच्चार सुधारण्यासाठीं एखादा शिक्षक ठेवून उच्चार शुद्ध करण्याचा व्यायाम रोज करवीत जावा. म्हणजे उच्चार बहुधा नीटपणें साधतील; परंतु या कामांत एखादेवेळीं यश न येण्याचें कारण नवीन कृत्रिम टाळू उच्चार करतेवेळीं निरोगी टाळूप्रमाणें चलनशील नसल्यामुळें ती उचलली जाऊन बोलतांना नाकाच्या मागील द्वार जसें झांकलें जावें तितकें तें झांकलें जात नाहीं. उच्चार उत्तम न साधला तरी नेहमीं नाकांतून शेंबूड मुखांत गळून चव बिघडणें, पिनसासारखी घाण सुटणें या व असल्या आपत्तींपासून रोगी व आप्तेष्ट मुक्त होतात. हा कांहीं शस्त्रक्रियेपासून लहान फायदा नाहीं असें वाटतें व तसेंच रोग्याची लाजरी व भित्री मनःस्थिति पालटून त्याच्या सुखसमाधानांत मोठीच भर पडते.

**शस्त्रक्रिया.**—फट फार रुंद असल्यास शस्त्रक्रिया निरुपयोगी होते. गुंगी देऊन रोग्यास निजवावें. शस्त्रक्रिया भानगडीची आहे पण तिचीं मुख्य अंगें व उद्देश खालीलप्रमाणें:—

( १ ) टाळूची त्वचा हाडापर्यंत कापून काढणें ( मागील दांतांपासून पुढील दांतापर्यंत फटीची लांबी असेल त्या सुमारानें छेद करावा ). या वेळीं खूप रक्तस्राव होण्याचा संभव असतो. ( २ ) टाळूच्या मृदुभागांतील फटीपासून जेथपर्यंत पुढें फट असेल तेथपर्यंत तिच्या दोन्ही कडा तीक्ष्ण शस्त्रानें कापणें. ( ३ ) नंतर घोड्याच्या केसानें आणि चांदीच्या तारेनें नव दहा टांके घालून त्यांच्या गांठी मारणें. ( ४ ) याप्रमाणें नवीन टाळू बनविल्यावर भोंवतालच्या रचनेवर ओढ व ताण पडूं नये अशी तजवीज राखणें. टाळूस फिरंगोपदंश झुमा अगर अस्थिरोगामुळें भोंक पडलें तर त्यासाठीं कृत्रिम चकती अगर बोळा बसवितात. ही चकती व्हलकनाइट अगर सोन्याची असून ती न खुपणारी असावी. पण यापेक्षां शस्त्रक्रियेनें फायदा होऊन उच्चार अधिक चांगला होतो.

**ताशकंद**—रशियन तुर्कस्तानची राजधानी. शहराच्या जुन्या वस्तीची लोकसंख्या ( १८९७ ) १५६४१४ होती. यांत सार्ट, उझबेग, यहुदी, खिरघीझ व रशियन लोकें आहेत. रशियन उर्फ नवी वस्ती, रुंद रस्ते व बागा यांच्यामुळें सुंदर दिसते. रशियन वस्तीची लोकसंख्या सुमारें (१९००) २५०००आहे.

**ताश खुरघन** (उर्फ खुला)—अफगाणी तुर्कस्तानांतील एक संस्थान व शहर. खुला शहराचा मराठ्यांचा शत्रु अहमदशहा अबदाली यानें नाश करून ताश खुरघन हें शहर वसविलें. खुला आतां पडक्या इमारतींचेंच स्थान झालें आहे. हिंदुस्थान व बुखारा येथून एकमेकांकडे जाणाऱ्या व्यापाऱ्यांचे तांडे या शहरांत जमतात.

**तासगांव**, ता लु का.—मुंबई, सातारा जिल्ह्याचा हा एक तालुका आहे. यांत ४८ खेडीं आहेत. आणि उत्तर व पूर्वेकडील भाग खडकाळ व नापिक आहे. याचा पश्चिम व आग्नेयीकडील भाग सुपीक आहे. या भागांत बाभळीची व आंब्याचीं झाडें पुष्कळ आहेत. कृष्णा व येरळा ह्या दोन नद्या या तालुक्यांतून वाहतात. या नद्यांच्या जवळपासची जमीन सुपीक आहे. लोकसंख्या (१९११) ८१४०५.

गां व.—मुंबई, सातारा जिल्ह्यांत त्याच नांवाच्या तालुक्याचें हें गांव मुख्य ठिकाण आहे. पूर्वी गांवाभोंवताली भिंत असून ४ दरवाजे होते. गांवांत पटवर्धनांचा राजवाडा असून राजवाड्यासभोंवताली भिंत आहे व ४ मजबूत दरवाजे आहेत. राजवाड्यापासून थोड्या अंतरावर शंभर वर्षांचें जुनें गणपतीचें सुंदर देवालय आहे. या गांवांत सबॉर्डिनेट जज्जाचें कोर्ट, इंग्रजी शाळा व दवाखाना आहे. लोकसंख्या (१९११) ६८२५. हा गांव परशुरामभाऊकडे होता.

**ताहेज अथवा तेज**- अबुलफझलनें (१५८२) ही कच्छची (मुं. इ.) राजधानी असून तेथें जारा व कंथकोट हे दोन मजबूत किल्ले आहेत असें लिहिलें आहे. तेज हें एका काळीं सौराष्ट्र म्हणजे सिंधूनदापासून दमणपर्यंतच्या सर्व भागांत मुख्य शहर होतें असें म्हणतात.

**ताहीर पहिला**—ताहीर हा खलीफ मामुन याच्या प्रमुख मदतगारांपैकीं एक असून त्याच्या वेळच्या मोठमोठ्या सेनानायकांत याची गणना होत असे. इ. स. ८११ त अली ईसा याला ताहीरनें एका लढाईत ठार करून त्याचें शिर खलीफ मामुन याच्याकडे नजराणा म्हणून पाठविलें. या कृत्याबद्दल त्यास खलीफानें बक्षिस दिलें. पुढें आपला बंधु जो अमीन त्याच्या विरुद्ध मामूननें बंड केलें. हा अमीन बगदादचा खलीफ होता. मामूननें ताहीरच्या हाताखालीं फौज देऊन त्यास अमीनवर पाठविलें. ताहीरनें बगदाद शहर आपल्या ताब्यांत घेऊन, अमीन यास ठार मारिलें (इ. स. ८१३) व त्याचें शिर मामूनकडे पाठविलें. या जयाबद्दल मामून यानें ताहीरास खोरासान प्रांताची जहागीर दिली. ही जहागीर ताहीरच्या वंशाकडे कायम राहिली. ताहीर हा सन ८२२ त मर्व येथें मृत्यु पावला [ बील; ओरि. बॅयाग्राफिकल डिक्शनरी. ]

**तिकन सोमयाजी**—हा कवि व इतिहासवेत्ता जातीचा ब्राह्मण होता. नेलुर प्रांतांतील पोचरच गांवीं याचा जन्म झाला. याचा उदय शालिवाहनाच्या १२ व्या शतकांत झाला. यानें कविराट नामक ब्राह्मणाजवळ संस्कृत भाषेचें अध्ययन केलें. तेलगू भाषेंत तर हा चांगलाच प्रवीण होता. असें सांगतात कीं मानसिंग राजाच्या आज्ञेवरून भारताच्या अठराहि पर्वांचें भाषांतर यानें तेलगूंत इतकें जलद लिहिलें कीं राजानें प्रसन्न होऊन यास पुष्कळ जमीन इनाम दिली. त्या उत्पन्नावर यानें अनेक यज्ञ करून वरील नांव मिळविलें. [ कविचरित्र व अर्वाचीन कोश ]

**तिक्कली**, त ह शी ल.—मद्रास. गंजम जिल्ह्यांत आग्नेय दिशेकडील ही एक जमीनदारी तहशील आहे. हिच्यांत तरला जमीनदारी व कित्येक लहान जमीदारी आहेत. क्षेत्रफळ २७५ चौरस मैल. १९२१ सालीं लोकसंख्या १३७२६१ होती. या तहशिलींत ३५० खेडीं असून तिक्कली हें मुख्य ठिकाण आहे. १९०३—०४ सालीं उत्पन्न ५६५०० रुपये होतें.

गां व.—मद्रास. जिल्हा गंजम, हें गांव तिक्कली जमीनदारी तहशिलींत आहे. तिक्कली गांवचा जमीनदार रघुनाथदेव, याच्या नावावरून या गांवाला रघुनाथपूर असेंहि म्हणत. येथें डेप्युटी तहशिलदार व पाटतिक्कली आणि नंदीगम जमीदारीचे मालक असतात. लोकसंख्या (१९११) ७६६८ होती.

**तिगळ**—यांना तिलगर अथवा तिळवी असेंहि म्हणतात. यांची मुख्य वस्ती बेळगांव, धारवाड, विजापूर आणि कानडा हे जिल्हे, म्हैसूर व मद्रास यामध्यें आढळते. मुंबईच्या तिगळ लोकांनीं आपली एक स्वतंत्रच जात बनविली आहे; आणि तिगळ या दोनहि जाती, आपणांस मूळ क्षत्रिय समजतात. हे गळ्यांत जानवें घालतात. तथापि त्यांचा वंशपरंपरा धंदा शेतीचा आहे.

मुंबईत स्थायिक झालेले तिगळ लोक घरीं एक्वार नांवाची मोडकीतोडकी तामीळ भाषा बोलतात. हे सुद्धां गळ्यांत जानवें घालतात व मृतांस पुरतात. हेल किंवा जुने तिगळ यांजबरोबर हे तिगळ रोटी अगर बेटी व्यवहार करीत नाहींत. ऋतु प्राप्त झाल्यानंतरहि मुलींची लग्नें करतात एकाच वेळीं अनेक बायका करण्याची चाल तिगळ लोकांत आहे, परंतु बहुभर्तृत्वाच्या चालीचा यांच्यांत पूर्ण अभाव आहे.

वधूबद्दल तिच्या बापास, वराच्या बापानें हुंडा अगर 'तेर' देण्याचा प्रघात आहे. लग्नाचा मुहूर्त जोशी ब्राह्मण ठरवितो. विधवांनां पुनर्विवाह करण्याची मुभा आहे. मृत पतीच्या नातलगाशीं विधवेला लग्न करतां येत नाहीं. विधवेच्या पुनर्विवाहाचा समारंभ रात्रीं होतो. विधुरासच फक्त विधवेशीं लग्न लावतां येतें. बायकोच्या वाईट वर्तणुकीबद्दल नवरा तिला सोडचिठ्ठी देऊं शकतो. स्वजातीच्या किंवा उच्च जातीच्या मनुष्यांबरोबर स्त्रीनें व्यभिचार केल्यास तीचें लग्न विधवा-विवाहपद्धतीनें लागतें. हीन जातींतील मनुष्याशीं व्यभिचार केल्यास तीला जातिबहिष्कृत करतात. ही जात हिंदु वारसाचा कायदा पाळते.

तिगळ हे वैष्णव पंथाचे हिंदु आहेत. राम, हनुमान, रंगनाथ आणि भैरव या चार प्रमुख देवतांची हे उपासना करतात. गुरुनायम्मा नांवाची त्यांची कुलदेवता असून, म्हैसूर आणि कारकल ( दक्षिण कानडा ) शहरीं या देवतेचीं देवळें आहेत. आश्विनमध्यें तिरुपतीची आणि चैत्रामध्यें उडपीची यात्रा करण्याची चाल तिगळ लोकांत आहे. हिंदूंचे सर्व सण तिगळ लोक पाळतात अन्नेच्या वेळीं देवांना बकऱ्यांचे बळी देण्यांत येतात. मुसुलमान साधुसंतांनांहि तिगळ लोक मान देतात. अनेगुन्डीचा ब्राह्मण स्वामी हा तिगळांचा धर्मगुरु होय. विवाहविधीहि ब्राह्मणाकरवींच होतात.

शेती आणि बागाईत हे या जातीचे वंशपरंपरागत धंदे आहेत. रयतवारी पद्धतीची अनेकांची जमीन आहे. तिगळ लोक मांसाहारी आहेत. ते बकरीं, मेंढ्या, ससे, हरणें, वदकें इत्यादि प्राण्यांचें मांस खातात. हे यथेच्छ मदिरापान करतात (एथ्नॉग्राफिकल सर्व्हे ऑफ बॉम्बे. १९०७).

**तिगिरिआ संस्थान**—ओरिसामधील खंडणी देणाऱ्या संस्थानांपैकीं सर्वांत लहान संस्थान असें हें एक संस्थान आहे. क्षेत्रफळ ४६ चौरस मैल. हें संस्थान सुमारें ४०० वर्षांपूर्वी नित्यानंद तुंग नांवाच्या पुरुषानें स्थापिलें. १९०१ साली लोकसंख्या २२,६२२ होती. संस्थानांत १०२ खेडीं आहेत. यात जोंधळे, तांदूळ, खाण्याचें धान्य, गळिताचें धान्य, ऊंस, तंबाखू आणि कापूस पिकतो. यात उत्तम कापड तयार होतें व त्यापैकीं पुष्कळसें परगांवींहि जातें. संस्थानचें उत्पन्न १०,००० रुपये असून ८८२ रुपये खंडणी आहे.

**तिग्यैंग**—उत्तर ब्रह्मदेश. कठा जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ३५२ चौरस मैल. १९११ सालीं लोकसंख्या १७५८२ होती. यांत ११६ खेडीं असून तिग्यैंग हें मुख्य ठिकाण आहे. १९०३-०४ साली वहीत जमीन १६ चौरस मैल असून सारा व कर यांचें उत्पन्न ४५,८०० रुपये होतें.

**तिजार**, त ह शी ल.—ही तहशील अलवार संस्थानच्या ईशान्येकडे वसली असून हिच्यांत १८९ खेडीं असून तिजार हें मुख्य ठिकाण आहे. लोकसंख्या ६६८५६.

गां व.—हें गांव राजपुताना, अलवार संस्थानांतील तिजार तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. विणकाम व कागद तयार करणें हे येथील मुख्य धंदे होत. तेजपाल नांवाच्या जादोन ( यादव ) रजपुतानें हें गांव वसविलें. या गांवालाच पूर्वी त्रिगर्तग असें म्हणत असत.

**तिंडिवनम्**, ता लु का व गां व—मद्रास. दक्षिण अर्कोट जिल्ह्याचा हा ईशान्येकडील तालुका आहे. क्षेत्रफळ ८१६ चौरस मैल. यांत ४७३ खेडीं असून तिंडिवनम् हें मुख्य ठिकाण आहे. १९११ सालीं लोकसंख्या २१७३२९ होती. १९०३-०४ सालीं सारा व कर यांचें उत्पन्न ७,७८००० होतें. मुख्य गांव तिंडिवनम् लो. सं.( १९११ ). १२०८४.

**तिड्डिम**—ब्रह्मदेश, चिन टेकड्यांचा हा उत्तरेकडील पोटविभाग आहे. याच्या उत्तरेकडे मणिपूर संस्थान व दक्षिणेकडे फलम पोटविभाग आहे. १९११ सालीं लोकसंख्या ३१९१८ होती. यांत ७२ खेडीं असून तिड्डिम हें मुख्य ठिकाण आहे.

**तिथि**—पंचांग पहा.

**तिनाली**, ता लु का.—मद्रास. गुंटुर जिल्ह्यांमधील हा एक पोटविभाग व तालुका आहे.क्षेत्रफळ६६४३चौ.मै. असून १९२१ सालीं लोकसंख्या२२५३४८ होती. या तालुक्यांतील जवळ जवळ सर्व जमिनीला कृष्णानदीच्या कालव्याचें पाणी पुरविलें जातें. मद्रास इलाख्यांतील सर्व तालुक्यांत हा तालुका श्रीमंत आहे.

गां व.—तिनाली तालुक्याचें ठाणें १९२१ सालीं लोकसंख्या २३२३०. या गांवांत विजयानगरचा राजा कृष्णदेव याच्या सभेंतील आठ कवींत प्रसिद्ध असलेला, गरलपति रामलिंगम हा जन्मला.

**तिनेवेल्ली**, जि ल्हा—मद्रास इलाख्यांतील एक जिल्हा.उ.अ. ८९°ते९°४३' व पू.रे.७७°१२'ते७८°२३'. क्षेत्रफळ ५३८९ चौ. मै याच्या पश्चिमेस सह्याद्रि असून पूर्वेकडे व दक्षिणेकडे समुद्र आहे. उत्तरेस मदुरा जिल्हा. सह्याद्रि पर्वताच्या अगदीं दक्षिणेकडील रांगा ह्या जिल्ह्याच्या व त्रावणकोर संस्थानाच्यामध्यें आहे. पहाडांवर खूप दाट जंगल आहे. अगस्त्य मलई हें अत्युच्च शिखर असून त्याची उंची ६२०० फूट आहे. ताम्रपर्णी, चित्तार, वैप्पार या नद्या आहेत. जिल्ह्याच्या मध्यभागीं चुनखडी सांपडते. घाटांत जंगली जनावरें पुष्कळ आहेत. पहाडाच्या बाजूनें पाऊस चांगला पडतो. जेनकाशी व अम्बासमुद्र येथें ७० इंच व इतर ठिकाणीं ४० ते ५० इंच पाऊस पडतो.

इतिहास:—१८ व्या शतकापर्यंतचा मदुरा जिल्ह्याचा व तिनेवेल्ली जिल्ह्याचा इतिहास बहुतेक सारखाच आहे. ताम्रपर्णीच्या मुखानजीक असलेल्या कोलकई गांवीं पाण्ड्य राजांची पूर्वकालीं राजधानी होती. मदुऱ्याच्या नाईक वंशाचा प्रसिद्ध पुरुष तिमुरल नाईक ह्यानें ह्या जिल्ह्याच्या अगदीं वायव्य कोंपऱ्यांत असलेल्या श्रीविल्लीपुत्तुर गांवीं एक लहानसा राजवाडा बांधला होता.

सन १७४३ मध्यें तिनेवेल्ली हा जिल्हा अर्काटच्या नवाबाच्या ताब्यांत आला. पण हा ताबा नामधारीच होता. मुख्य सत्ता पाळेगारांच्या हातीं होती. ह्यांच्या ताब्यांत सर्व पहाडांतील किल्ले असून शिवाय जवळ ३०००० सैन्य जय्यत असे. पण ह्यांचा सर्व शक्ति आपसांत भांडणें करण्यांत खर्च झाली. या पाळेगारांनीं मधून मधून अनेक बंडें केलीं. अखेरीस १८०१ सालीं कंपनीनें ह्या जिल्ह्याचा सर्व कारभार आपणाकडे घेतला व तेथील नवाबास पेन्शन दिलें

प्राचीनकालीन द्राविड संस्कृतीचें हा जिल्हा म्हणजे माहेरघर होय. जिल्ह्याच्या बऱ्याच भागांत थडगीं दृष्टीस पडतात.

पैकीं आदिचनल्लूर येथील वरीच महत्त्वाचीं आहेत. कोलकई व कायल हीं पूर्वी राजधानीचीं शहरें होतीं. पण त्यांचें पूर्वकालीन वैभव दाखविणारें आतां कांहींच उरलें नाहीं. तिरुचेन्दूर, अलवार, तिरुननगरी, श्रीवैकुंठम, तिनेवेल्ली गांव, नानगुनेरी, श्रीविल्लीपुत्तुर, तेनकासी, पापनाशम, कलुगुमलई व कुत्तालम् येथील देवालयें प्रसिद्ध आहेत. जुनीं रोमन नाणीं व पांड्यांच्या वेळचीं नाणीं तिनेवेल्लींत अजूनपर्यंत आढळतात.

या जिल्ह्यांत गांवें २९, खेडीं १४८२ व तालुके ९आहेत. लो. सं. ( १९२१ ) १९०१३९६. ह्या जिल्ह्यांत मोठीं शहरें नाहींत. तिनेवेल्ली, पालमकोटा, तुतिकोरिन व श्रीविल्लीपुत्तुर ह्या चार ठिकाणीं म्युनिसिपालिट्या आहेत. राजपालेय येथें 'युनियन' आहे.

शेंकडा ८६ लोक तामिळ भाषा बोलतात व शेंकडा १३ लोक तेलगू भाषा बोलतात. मुसुलमान लब्बई लोक व्यापाराचा धंदा करतात. बहुतेक हिंदू तामिळ आहेत. शानान, पल्लन व मरवण असे तीन जातीचे लोक ह्या जिल्ह्यांत आहेत. मरवण चोऱ्या करण्यांत व दरवडे घालण्यांत पटाईत आहेत. सुमारें दोन तृतीयांश लोक शेतकीवर उपजीविका करतात. इतर लोक ताडी काढणें व विकणें, विणणें व सोनारकाम वगैरे इतर धंदे करतात.

उत्तरेस काळी कापसाची जमीन आहे. ताम्रपर्णी नदीकांठचा प्रदेश सुपीक आहे. श्रीविल्लीपुत्तुरच्या दक्षिणेस जमीन लालसर असून विकास साधारण आहे. ह्या जिल्ह्यांत रयतवारी पद्धत आहे व कांहीं जमीनदाऱ्या आहेत जमीनदाऱ्या सोडतां क्षेत्रफळ ३९८५ चौ. मै.; जंगल ४३० चौरस मैल; पिकाऊ जमीन २६८४ चौ. मै. पाटाच्या पाण्यानें भिजली जाणारी जमीन ४६२ चौरस मैल आहे. धान्यें—तांदूळ, चोलम, कम्बू, रागी. जिल्ह्याच्या दक्षिणेस व नैर्ऋत्य भागांत कडधान्यें पिकवितात. पैकीं हरभऱ्याचें पीक मुख्य होय.

कापसाचें उत्पन्न मुख्य असून सोनामुखीचें उत्पन्न त्याच्या खालोखाल आहे. ताडी काढण्याचा धंदा वरेच लोक करतात. अर्थात ताडीच्या झाडांची लागवड हाहि एक धंदाच होऊन बसला आहे. लोक उत्साही व उद्योगी आहेत. त्यांना खताचें, पेरणीच्या कालाचें वगैरे चांगलें ज्ञान आहे. जिल्ह्यांत कांहीं ठिकाणीं गुरांचे मोठे बाजार भरतात. ह्या जिल्ह्यांत एकंदर २३०० तलाव आहेत व शिवाय ताम्रपर्णीच्या पाण्याचे कालवे आहेत. जंगल सह्याद्रीवर आहे तेवढेंच, पैकीं दोनतृतीयांश सरकारी राखलेलें आहे व उरलेलें सिन्गमपट्टी, सेशूर व सिवगिरीच्या जमीनदारांच्या ताब्यांत आहे. जंगलांत सागवान सांपडतें. सह्याद्रीच्या उतारांत वेलदोडे होतात. पहिल्यानें ह्यांची लागवड सरकारनेंच केली होती. पण पुढें इतर लोकांस परवानगी दिली. सूत काढणें व विणणें हे मुख्य धंदे होत. पूर्वी येथून कच्चा कापूस वाहेरगांवीं पाठवीत असत.

अम्बासमुद्रम् तालुक्यांत वीरवनल्लूर व कलिदईकुरिची येथें विणकाम मोठ्या प्रमाणावर चालतें. त्रावणकोर संस्थानांतील लोकांस लागणारे मुन्डुस वगैरे कपडे येथेंच तयार होतात. श्रीविल्लीपुत्तुर येथें रुमाल ( टावेल ) तयार होतात. मेलपालेयम येथें सतरंज्या तयार करतात. अम्बासमुद्रमनजीक मन्नारकोविल व वगैकुलम येथें पितळेचीं व कांशाचीं भांडीं तयार करतात. सेरमादेवीनजीक पट्टमडई येथें उत्तमपैकीं चटया होतात. येथें जिन व प्रेस आहेत. मिठागरेंहि आहेत. येथें साखरेचे कारखानेहि काढले आहेत. बाहेर पाठविला जाणारा माल कापूस, मिरची, तंबाखू, मीठ, सुके व खारे मासे व गुरें हा असून आंत येणारा माल ताग, परदेशी कापड, मातीचें तेल. बंदरें—तुतिकोरिन कुलशेखरपट्टनम व कायलपट्टनम्. पैकीं पहिल्याचें महत्त्व सर्वांत अधिक आहे. रंगून, मद्रास, सिलोन येथें सुके व खारे मासे पाठवितात.

तिनेवेल्ली पूर्वी सोनामुखीच्या व्यापाराकरितां फार प्रसिद्ध होता. तुतिकोरिन येथें दोन सट्टयाच्या व्यापाराच्या पेढ्या आहेत. बंदरांतील व्यापार लब्बई लोकांच्या ताब्यांत आहे. ह्या जिल्ह्यांतून सौथ इन्डियन कंपनीची लाईन जाते. जमीनसारावसूली ( १९०३-०४ ) ३६१८ हजार. एकंदर उत्पन्न ५८५३ हजार. स्थानिक व्यवस्था लोकलबोर्डाकडे सोंपविली आहे. शिवाय तिनेवेल्ली, तुतिकोरिन, सर्मादेवी व सात्तुर अशीं चार तालुकाबोर्डें आहेत.

शिक्षणाच्या बाबतींत ह्या जिल्ह्याचा पांचवा नंबर लागतो. शेंकडा १० लोकांस वाचतां येतें. तेनकासी, अम्बासमुद्रम व तिनेवेल्ली ह्या तालुक्यांतून शिक्षणाचा प्रसार बराच झाला आहे. ( १९०३-०४) १२९७ प्राथमिक शिक्षणाच्या शाळा, ७५ दुय्यम शिक्षणाच्या, ३ कॉलेजें, १२ डिसपेन्सऱ्या व ११ दवाखाने आहेत.

ता लु का.—मद्रास, तिनेवेल्ली जिल्ह्याच्या मध्यमार्गी हा तालुका आहे. क्षेत्रफळ ३२८ चौरस मैल. १९२१ सालीं लोकसंख्या २२१०३५. सारा व कर यांचें १९०३-०४सालांत ३,८१,००० लक्ष रुपये उत्पन्न होतें. यांत १२३ खेडीं असून तिनेवेल्ली हें मुख्य ठिकाण आहे. यांतील बऱ्याच जमीनीला ५ कालव्यांच्या योगानें पाणी मिळतें.

गां व.—हें गांव ताम्रपर्णी नदीच्या डाव्या तीरावर वसलें असून जिल्ह्यांतील सर्व गावांत मोठें आहे. १५६० सालांच्या सुमारास नाइक घराण्याचा संस्थापक विश्वनाथ यानें हें गांव पुन्हां वसविलें. यानेंच या गांवांत पुष्कळ देवालयेंहि बांधिलीं या गांवची लोकसंख्या १९२१ सालीं ५३८१० होती. १९०३-१९०४ सालीं म्युनिसिपालिटीचें उत्पन्न ५८७०० रुपये होतें. या गांवांत पाणी पुरेसें नाहीं. या गांवांत एक हिंदु व एक खिश्चन अशीं दोन कॉलेजें आहेत. यांत यूरोपीयन लोकांची गूळ तयार करण्याची पेढी असून यूरोपीअन लोकांच्या व्यवस्थेखालीं साखरेचे दोन कारखाने

आहेत. याशिवाय या गांवांत इमारती लोकडाचा व्यापारहि चालतो.

**तिपतूर**—म्हैसूर,टुमकुर जिल्ह्यांतील हा नैऋत्येकडील तालुका आहे. क्षेत्रफळ ५०८ चौरस मैल.१९०१ सालीं याची लोकसंख्या ९०७०९ होती. यांत तिपतूर, तुरुवेकेर, होन्नावल्ली आणि नोण्हिनेकर हीं चार मोठीं गांवें आहेत. पैकीं तिपतूर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. तालुक्यांत ३९१ खेडीं आहेत. १९०३-४सालीं जमीनीच्या धाऱ्याचें उत्पन्न २०००० रुपये होतें.

**तिमय्यासाती**—राजमहेंद्री येथील राहणारा हा कवि जातीचा तैलंग होता. याच्या बापाचें नांव विमार्तसाती व आजाचें नांव पद्मलगोरय्या होतें. कन्यकापुराण नांवाचा जो तेलंगी भाषेंत ग्रंथ आहे तो यानेंच केलेला आहे. पूर्वी राजमहेंद्रीजवळ पेनुगोंडा या गांवांत विष्णुवर्धन या राजपुत्रानें एका वैश्य कन्येवर बलात्कार केला त्या खेदामुळें त्या कन्येनें देहत्याग केला, कारण तिच्या कुंवारपणाचा भंग झाला; त्याबरोबर तिच्या घरच्या शंभर माणसांनीं जाळून घेतलें. त्या ठिकाणीं हल्लीं देऊळ आहे व धाणी लोक त्याची पूजा करतात व ती नवसाला पावते असें सांगतात. ही गोष्ट कन्यकापुराणांत करुणरसभरित वर्णिली आहे. [ कविचरित्र-अर्वाचिन कोश.]

**तिपिटक**—ज्ञानकोश विभाग ४ था, प्रकरण ११ पहा.

**तिबेट**—आर्य लोकांचा मूळचा प्रदेश. हा हिमालयाच्या उत्तरभागीं आहे. आर्यविद्यासुधाकर ग्रंथांत त्याचे कर्ते म्हणतात कीं, याचें मूळचें नांव त्रिविष्टप ( भौमस्वर्ग) असून त्याचा अपभ्रंश तिबेट होय. मध्यआशियांतील हा देश जगांतील अत्यंत उंचवटयाचा असा प्रदेश आहे. यांतील पठारें समुद्रसपाटीपासून १६५०० फूट उंच आहेत. याच्या पूर्वेस चीन, पश्चिमेस काश्मीर, दक्षिणेस हिंदुस्थान, नेपाळ व भूतान आणि उत्तरेस तुर्कस्तान असे देश आहेत. या देशाचें क्षेत्रफळ १०००००० चौरस मैल असून लोकसंख्या सुमारें ३०००००० आहे. लासा ही तिबेटची राजधानी होय.

तिबेटांतील लोक आपल्या देशास बोद अशी संज्ञा देतात. अलीकडील ल्हासा भाषेंत याचें रूपांतर भो असें झालें आहे. हिंदवासीयांनां भोतियांचा हा देश पूर्वीपासून माहीत आहे. तिबेटी रहिवाशी स्वतःस बोदपा अथवा भोपा असें म्हणवितात. यूरोपियांनां हा देश तिबेट म्हणूनच माहीत आहे.

न द्या.—तिबेटांत अनेक सरोवरें असून बऱ्याच नद्यांचे उगमहि आहेत. होअंगहो, यांगत्सीकिंग, मेकांग, ब्रह्मपुत्रा, सिंधू, सतलज यांचे उगम या देशांत आहेत.

स रो व रें.—मानस, रावणऱ्हद, टॅम्री, पालटी इत्यादि सरोवरें असून सृष्टिसौन्दर्याविषयीं मानससरोवर सर्व जगांत अपूर्व आहे.

ह वा मा न.—हा देश समशीतोष्ण कटिबंधांत आहे. म्हणून हवा मध्यम असावयाची; परंतु या प्रदेशाची उंची सुमारें १५००० फूट असल्यानें कांहीं प्रदेशांत हवा फारच थंड आहे. समुद्र दूर म्हणून हवा विषम आहे.

पि कें, ख नि ज, प्रा णी, व गै रे.—मुख्य धान्यें सातू व तांदूळ आहेत. सोनें, रुपें, पारा, टांकणखार हे खनिज पदार्थ होत. मोठ्या वनगाई विपुल आहेत.

लो क.—तिबेटी लोक मंगोलियन जातीचे आहेत. ते फार काटक असून त्यांचा धंदा गुरें पाळणें हा आहे. तिबेटी लोकांची इंडोचिनी राष्ट्रांत गणना करणें रास्त नाहीं, परंतु त्यांचा व चिनीचा संबंध इतका निकट आहे कीं तसें करणें फार सोईचें दिसतें

बोद देशांत पश्चिम चीनमधून मंगोलियन लोक आले आणि ते भोंवतालच्या प्रदेशांतील इतर लोकांशीं मिसळून त्यांची सरतेशेवटीं एक मजबूत, काटक व लालसर रंगाची निराळीच भोपा ( बोद-पा ) अथवा तिबेटी लोकांची जात तयार झाली. तिबेटो-ब्रह्मी लोक जी भाषा बोलत असत तीच पुढें त्यांची भाषा झाली. तीच पुढें थानमी सम्भोटा यानें ७व्या शतकांत बुद्ध भिक्षूंच्या साहाय्यानें त्या कालच्या एका लिपिमध्यें लिहिण्याची सुरवात केली.

ध र्म.—ह्यांचा बौद्ध धर्म असून लामा हा यांना धर्मगुरु सर्वश्रेष्ठ मानला जातो. ' ॐ मणिपद्मेहुम् ' या मंत्राच्या जपानें सर्व पापें जातात अशी त्यांची समजूत आहे. हा मंत्र एका कागदावर अथवा पत्र्यावर लिहून तो एका नळकांड्यावर अथवा रहाटासारख्या चक्रावर लावितात व तें नळकांडें फिरवितात. नळकांड्याचे जितके फेरे अधिक तितका जप होऊन तितकें पुण्यहि अधिक अशी त्यांची समजूत आहे.

रा ज की य वि भा ग.—अमडो, खाम, यू , टींसंग व नारी असे तिबेटचे पांच विभाग पाडण्यांत आले आहेत. टींसंग व नारी हे लामाच्या नेतृत्वाखालीं आहेत.

व सू ल व व्या पा र.—कराची वसुली वस्तुरूपानें अनेक प्रसंगीं करण्यांत येते. कर घेण्याच्या ऑफिसास लामाचें स्वयंपाकगृह असें म्हणतात. तेथें येऊन पडणारा माल म्हटला म्हणजे जंव, गहूं, बिया, कापूस, बकव्हीट्, पीठ आणि लोणी हा होय. पोमळीं, रेशीम व लोकर यांचें कापड, मनुका आणि पांच फळें इत्यादि सर्व वस्तू करामध्यें स्वीकारल्या जातात. या सर्व जिनसांचे भाव बदलतात व त्यामुळें वसुलाच्या बाबतींत अनिश्चितता असते. वजनें आणि मापें यांचीहि अनिश्चितताच असते.

फौ ज.—तिबेटांतील फौज ५ हजार आहे अशी लोकवार्ता आहे परंतु ती तीन हजार आहे असें कावागुची म्हणतो. तिबेटची लोकसंख्या ६० लक्ष आहे; आणि एवढ्या लोकांचें संरक्षण करण्यास ही फौज अत्यंत अपुरी आहे. तिबेट हा देश दडपशाहीमुळें अगर लष्करी हुकुमानें शासित होत नसून धर्मविचाराच्या प्राबल्यानें शासित झाला आहे.

आणि यामुळेंच मोठ्या खड्या फौजेची आवश्यकता तिबेटास वरेच दिवसांत भासली नाहीं. नेपाळशीं चकमकी होऊन आणि ब्रिटिशांशीं थोडासा प्रसंग पडल्यामुळें हें थोडेसें तरी सैन्य उत्पन्न झालें. तिबेटी शिपायाचा दरमहा पगार म्हणजे १ बुशेल सातु असतो. त्यानें पोटाकरितां दुसरेंहि काम करावें. तिबेटांतील खरें सैन्य म्हटलें म्हणजे २ हजार चिनी शिपाई, लढवय्ये व हजारों भिक्षु हें होय.

तिबेटमध्यें दोन प्रकारचे भिक्षु असतात. एक लॉंव नयएर ( पंडित भिक्षू ) आणि थॉम्टो ( लढवय्ये भिक्षू ). लढवय्ये भिक्षू बहुतकरून गरीब असतात आणि त्यांनां आपली उपजीविका मठांत काम करूनच करावी लागते. त्यांचीं रोजचीं कामें म्हटलीं म्हणजे अलगुर्जे, वीणा इत्यादि वाद्यें वाजविणें आणि देवाचा नैवेद्य तयार करणें वगैरे असतात. दररोज हे लढाऊ भिक्षू टेंकडीवर जातात आणि मोठमोठे धोंडे घेऊन नेम मारण्याचा उद्योग करतात. कधीं कधीं ते मोठ्यानें गाणीं म्हणतात, उंच कड्यावरून उड्या मारतात, आणि हातांत काठ्या घेऊन एकमेकांशीं लढतात.

चा ली रि ती.—हे लोक फार घाणेरडे आहेत. वर्षा-वर्षांतून स्नान करीत नाहींत. कित्येकांनीं साऱ्या जन्मांत स्नान केलेलें नसतें. यांच्या स्वच्छतेच्या कल्पनांचा उच्चनीच-त्वाशीं संबंध आहे.एखाद्या पेल्यांतून हलक्या पदवीचा गृहस्थ चहा प्याला तर तो पेला विटाळतो. या लोकांचे हात व तोंड खेरीज करून इतर भाग निग्रोप्रमाणें अंगावर सांचलेल्या मळानें काळे झालेले असतात; आणि त्यांचे कपडे मळाच्या थरांनीं कांक्रीटप्रमाणें घट्ट झालेले असतात. उपवर मुली घाणीनें काळ्या किती झाल्या आहेत हेंहि पाहातात. जर मुलीचें तोंड आणि हात स्वच्छ असले तर तिनें आपलें सुदैव धुवून टाकलें असें समजतात. तिबेटी लोकांचें पंचांग हिंदु-स्थानी अगर चिनीप्रमाणें नाहीं,तें तुर्की आहे. तथापि तिबेटी वर्ष तुर्की वर्षाच्या १ वर्ष पाठीमागें आहे. त्यांच्यामध्यें ४ वर्षांनीं एकदां लीप वर्ष असतें. वर्षप्रतिपदेचा दिवस साजरा करण्यांत येतो.

तिबेटांत गोड्या पाण्यांत मासे सांपडतात. पण तिबेटी लोक मासे फारसे खात नाहींत. याक, मेंढ्या, बकरीं यांच्या मांसाचा आहार होतो पण मासे मारणें ते पाप समजतात. चिनी लोकांशीं संबंध आलेले तिबेटी डुकराचें मांस खातात. तिबेटी लोक गारांस फार भितात. एकंदर ८ तऱ्हेचीं भुतें आहेत आणि त्यांच्यामुळें गारा पडतात,अशी त्यांची समजूत आहे आणि तेथें गारा पडणें बंद करणारे भिक्षु देखील आहेत.

ति बे टी वि धी-हाडांचीं उपकरणीं:—कांहीं विधींसाठीं हे लोक माणसांच्या, डोक्यांच्या व तंगड्यांच्या हाडांचीं उप-करणीं करतात. कावागुची तिबेटांत फिरत प्रवास करीत असतां त्यास माणसांचे अनेक सांपळे सांपडले. त्यांतील वर सांगितलेलीं हाडें काढून नेलीं होतीं.

ला मां ची आ शी र्वा द प द्ध तिः—ज्याला आशिर्वाद द्यावयाचा त्याच्या महत्वाप्रमाणें आशीर्वाद देण्याचे चार प्रकार आहेत. ( १ ) डोक्यास डोकें लावून आशीर्वाद. ( २ ) दोन हातांनीं दिलेला आशीर्वाद. ( ३ ) एक हाताचा आशीर्वाद. ( ४ ) काठीचें टोंक डोक्यास लावून दिलेला आशीर्वाद. चवथा प्रकार फक्त अत्यंत श्रेष्ठ लामा उदा. ल्हासा येथील " दलाई लामा " आणि शिगत्से येथील " पंचेनरिन पोचे " आपल्यापेक्षां कनिष्ठास देतात.

लो का चा र.—यांच्यांत सतत सौख्यास "चाचंगपेम्म" असें म्हणतात. " चाचंगपेम्म " म्हणजे चहा व दारू हीं एकामागून एक पिणें तिबेटी चहा करण्याची पद्धत येणेंप्रमाणें: चहा पाण्यांत दोन तास कढविणें, मग त्यांत मीठ व लोणी टाकणें व कढविणें, नंतर पंचपात्रीच्या आकाराचा दट्या वर खालीं करून त्यानें घुसळणें व मग पिणें. अशा तऱ्हेनें बनलेल्या चहास ' सोलच्या ' असें म्हणतात.

चो रां ची री तः—तिबेटी चोरांमध्यें असा नियम आहे कीं चोरांनीं वाटसरांस लुटलें तर वाटसरानें मागितल्यास व तो धर्मवाक्यें वाचणारा असल्यास त्यास तीन दिवस पुरेल इतकें अन्न द्यावें.

प शु ह त्या.—लोकांचा सार्वजनिक कसाईखाना असतो तेथें पशूंची हत्या करावयाची ती भिक्षु बोलावून मंत्रोच्चार-पूर्वक करतात.

श्रमण एकई कावागुची नामक प्रवाशी तीन वर्षें तिबेटांत राहिला होता. मुख्य रस्ते चुकवून आड रस्त्यानें त्यानें तिबेटांत ल्हासापर्यंत प्रवेश केला. यानें आपल्या प्रवासाचें वृत्त लिहून ठेविलें, त्याचें इंग्रजींत भाषांतर प्रसिद्ध झालें आहे ( मद्रास १९०१ ). हा प्रवाशी नेपाळांतून मानससरोवरास वळसा देऊन तिकडून ल्हासापर्यंत जाऊन दार्जिलिंगकडून परत आला होता.

ति बे टी स्त्रि या.—बहुपत्नीत्व तिबेटांत क्वचितच आढळतें. कधीं कधीं दोन तीन बहिणी काटकसरीसाठीं एकच नवरा करतात.तिबेटी स्त्रियांमध्यें एका बाईनें अनेक नवरे करण्याची चाल आहे. त्या पद्धतीचे प्रकार येणेंप्रमाणें. प्रकार पहिला–सर्व भाऊ एकाच बाईशीं लग्न करतात. २ प्रकार रा–निरनिराळे लोक आपापसांत ठराव करून एकच बायको कर तात. प्र.३ रा–एखादी लग्न झालेली बाई आपल्या नवऱ्याच्या संमतीनें आणखी एक नवरा करते. प्र.४था-एखाद्या घराण्यां-तील आई वारली असतां बाप किंवा मुलगा लग्न करतो आणि ती घरांतील सर्व पुरुषांची बायको होते. तथापि इतकें जरी आहे तरी तिबेटी लोकांतहि लग्नासंबंधी निर्बंध आहेतच. बहीणभाऊ एकमेकांशीं लग्न करीत नाहींत आणि चुलत भाऊ चुलत बहिणी या एकमेकांत लग्न करीत नाहींत. तसें करणें म्हणजे केवळ अनीति होते असेंच नाहीं

तर तो गुन्हाहि होतो. वायकोंचा अधिकार नवऱ्यांवर मोठा असतो. नवरा मिळवून आणील तें त्यानें बायकोच्या हवाली केलें पाहिजे. लग्न करतेवेळीं जो ठराव करावयाचा त्या ठरावांत नवऱ्यानें अगर बायकोनें खुशी वाटल्यास दुसऱ्यास सोडून जावें अशी मोकळीक ठेवलेली असते. २० पासून २५ वर्षांपर्यंत बहुतकरून लग्नें होतात.लग्नाच्या वेळेस मुलीस नवऱ्या मुलाकडून देणग्या मिळतात आणि आईबापास हुंडा मिळतो; त्यास स्तनद्रव्य म्हणतात. बहुतेक मुलींची संमतीशिवाय लग्नें होतात त्यामुळें घटस्फोटहि पुष्कळ होतात. मुलींचें लग्न झाल्यानंतर नवऱ्यास जर ३।४ भाऊ असतील तर त्या प्रत्येक भावाशीं दोन चार महिन्यांच्या अवधीनें लग्नें होतात आणि त्यावेळेस ३।४ दिवस तिचा पहिला नवरा बाहेरगांवीं गेलेला असतो. जरी बहुपतित्वाची चाल आहे तरी बायकोपाशीं एकाच नवऱ्यानें नेहमीं रहावें व इतरांनीं हिंडावयास जावें अशी योजना केलेली असते.

तिबेटामध्यें कधीं कधीं एखादी बाई एकच नवरा करते आणि अशा वेळेस बहुतकरून नवरा कोणी तरी पदवीचा किंवा मोठा मनुष्य असतो. टिबेटी बायका शरीरानें मजबूत असतात. बहुतेक स्त्रियांस घोड्यावर चांगलें बसतां येतें. बायकांनां व्यवहारज्ञान चांगलें असतें आणि त्या व्यापारधंद्यांत प्रमुख आहेत. बहुतेक कामकरी बायकांस पुरुषांप्रमाणेंच पगार मिळतो.

भा षा.— तिबेटी भाषेत पांच स्वर आहेत असें युरोपीय वैयाकरणी लिहितात. पण तिबेटी लिपीचा उत्पादक "थुमि संबोत "हा फक्त चारच स्वर तिबेटी भाषेत आहेत असें म्हणतो. कावागुचीच्या मताप्रमाणें सितुलामा हा श्रेष्ठ तिबेटी वैय्याकरण होय. न्गुलच लामाचें एक व्याकरण तेथें प्रसिद्ध आहे. तिबेटी भाषेस बोडस्काद असें म्हणतात. एकंदर तीन प्रांतिक भाषा येथें रूढ आहेत. ल्हासा, यू व संग येथील भाषा हीच तिबेटची सर्वसामान्य भाषा होय. पश्चिमेच्या बाजूस लाडक, लाहुल, बाल्तिस्थान, पुरीग या प्रांतिक भाषा असून खाम प्रांताची पूर्वेकडील भाषाहि प्रसिद्ध आहे. भाषेच्या दृष्टीनें तिबेटचा ब्रह्मदेशीय भाषांशीं फार निकट संबंध आहे.सातव्या शतकांत एका हिंदी बौद्धभिक्षूच्या साहाय्यानें तिबेटांत प्रथम लिपी लिहिण्यास सुरवात झाली. तिबेटी बोलीचे व लिहिण्याचे प्रकार यांत फार अंतर असल्यानें व्युत्पत्तिशास्त्रज्ञांस या भाषेचा अभ्यास करणें फार मनोरंजक होईल.

वा ङ्म य.—या देशांत धार्मिक वाङ्मय बरेंच झालें आहे. छापखाने भटभिक्षुकवर्गाच्या हातीं असल्यामुळें धर्मांखेरीज अन्य जातींच्या वाङ्मयोत्पादनास फारसा अवकाश राहिला नाहीं. मिलरासपाचीं हजारों गीतें तेथें प्रसिद्ध आहेत. मिलरासपा उर्फ मिला हा ११व्या शतकांतील बौद्ध भिक्षु असून त्यानें धर्मांतरकार्यप्रीत्यर्थ तिबेटांत बराच प्रवास केला होता. टीसंगबियांग ग्यामटकृत प्रेमगीतेंहि फार प्रसिद्ध आहेत. हीं गीतें १७०१ सालीं पदच्युत झालेल्या रंगेल दलाईलामावर रचण्यांत आलीं होतीं. दंतकथा, गोष्टी वगैरे बऱ्याच असून जुनीं नाटकेंहि आहेत. केसरमहाकाव्य हें उत्तर आशियांतील एका वीर पुरुषासंबंधीं आहे. ए. एच्. फ्रँके यानें या काव्याचें भाषांतर केलें आहे.

" जियुंगयी " नामक एक कथात्मक ग्रंथ हा खाममध्यें राष्ट्रीय महाकाव्यग्रंथ म्हणून प्रसिद्ध आहे. गद्यपद्यांत हें काव्य लिहिलेलें असून तात्त्विक चर्चा व विनोदात्मक कथानकें यांत बरींच आहेत. जियुंगलिंग, होलिंग व जियालिंग असे याचे तीन विभाग आहेत. या ग्रंथांपैकीं कांहीं भाग बऱ्याच तिबेटी लोकांनां पाठ असतो. "ग्यालइ रंग" नांवाचें एक महाकाव्य प्रसिद्ध आहे. रामायणाचें भाषांतर करण्यांत आलें आहे.

पु स्त कें.—ल्हासा येथें बुद्ध शाक्य मुनीच्या देवळासमोरील मैदानांत पुस्तकांचीं दुकानें मांडलेलीं आहेत. सर्व प्रसिद्ध पुस्तकें दुकानांत मिळत नाहींत. त्यांचे कायम ठसे करून कोणत्या तरी मठांत ठेवलेले असतात. त्यांपैकीं कोणास एखादें पुस्तक पाहिजे असल्यास तें छापून मिळण्याबद्दल अर्ज करावा लागतो व कांहीं देणगीहि पाठवावी लागते.

शि क्ष ण.—अनेक शतकांपूर्वी हिंदुस्थानांतून तिबेटमध्यें पांच शास्त्रांच्या ज्ञानाचा प्रसार केला गेला.तीं शास्त्रें(१)मातृका (२) वैद्यक, (३) न्यायशास्त्र, (४) शिल्पशास्त्र, (५) धर्मशास्त्र आणि धर्मविषयक तत्त्वज्ञान इत्यादि होत. या शास्त्रांचें ज्ञान आज कोठें फारसें दिसून येत नाहीं.

वं श व जा ति भे द.—दक्षिणेकडील मंगोलांपासून तिबेट लोकांची उत्पत्ति झाली असावी. या वंशाच्या तीन शाखा उपलब्ध आहेत. ( १ ) बोडपाः— ही थोडीशी सुधारलेली जात शहरांत व खेड्यांत आढळते. ( २ ) द्रूपाः—ही अर्धवट रानटी जात उत्तरेकडील पठारावर तंबू ठोकून राहते. ( ३ ) टंगटः—ही जात ईशान्येकडील भागांत आढळते.

द्रूपा ही जात अजून मूळस्थितींत असलेली आढळते. कारण त्यांना युरोपियन व मंगोली तुर्क वगैरे जातींशीं अद्याप फारसा संबंध आला नाहीं. बोडपा जात मात्र हिंदु व चिनी लोकांशीं बऱ्याच प्रमाणांत संमिश्र झालेली आहे.

हिंदुस्थानाप्रमाणें तिबेटांतहि जातिभेद आहे. कोळी, हुंडीवाले, लोहार व खाटीक ह्या जाती अगदीं हलक्या समजल्या जातात. उच्च समजल्या जाणाऱ्या जाती चार आहेत. (१)गेर–पा ( सरदार ), (२) न्गोक्–पा ( मांत्रिक), (३) बोन–बो ( जुन्या धर्माचे प्रतिनिधी ) (४) शाल्—न्गो ( जुनीं राजघराणीं ).

सरदार मंडळीमध्येंहि अनेक भेद आहेत. यांमध्यें यबशी नांवाचा वर्ग सगळ्यांत श्रेष्ठ आहे. यबशी वर्गामध्यें जुन्या श्रेष्ठ तेरा लामाकुळांचा व तिबेटचा पहिला राजा तिचेनिह्हा कियरी ह्याच्या वंशजांचा अंतर्भाव होतो. या यबशी कुळांतीलच पुरुषांनां तिबेटांतील मुख्य प्रधानाच्या व १

महत्त्वाच्या जागा मिळतात. सरदार मंडळींतला दुसरा एक वर्ग म्हटला म्हणजे दे-पोन्चेका हा होय. तिबेटांतील थोर सेनापतींच्या कुटुंबांचा हा वर्ग आहे.

सरदारघराण्याचा तिसरा वर्ग म्हटला म्हणजे तिबेटमध्यें नांवाजलेल्या ऐतिहासिक पुरुषांच्या वंशजांचा होय. ह्या वर्गांतील लोकांस देखील तिबेटांतील मुख्य प्रधान होणें शक्य असतें. सरदारघराण्याच्या खालोखाल वर्ग म्हटला म्हणजे मांत्रिकांचा होय. कांहीं करांचें उत्पन्न ह्यांस मिळतें तरी हे बहुधां गरीबच असतात. तथापि ह्या वर्गास सन्मान मोठा असतो. प्रसंगीं अत्यंत गरीब मांत्रिकास देखील एखादा श्रीमंत यवशी भेटला असतां यवशी घोड्यांवरून उतरून अभिवंदन करतो.

उच्च वर्गांतील तिसरा वर्ग म्हटला म्हणजे बोन्बोचा. तिबेटांत बौद्ध संप्रदाय येण्यापूर्वी जो धर्म होता त्या धर्माचा प्रतिनिधि हाच. या वर्गाचें महत्त्व अजूनहि समारंभांत दिसून येतें. उदाहरणार्थ, तिबेटी ज्या वेळेस लग्न लावितात त्या वेळेस ते बोनबोस उपासना करण्यास सांगतात. पुष्कळदा स्थानिक अधिकारी व न्यायाधीश ह्या लोकांतीलच असतात.

बहुतेक गांवांत ह्या जातीचीं एकदोन घरें असतात. कधीं कधीं कोन्याकोपऱ्यांतल्या एखाद्या खेड्यांत आढळतात. उदाहरणार्थ हिमालयांतील त्सारका या गांवीं सर्व घरें याच जातीचीं आहेत. बोन्बो हे लोक आपल्या धर्माचा प्रसार करीत नाहींत तर परंपरागत उपदेश व ज्ञान आपल्या मुलांस शिकवितात.

उच्चवर्ग व कनिष्ठवर्ग ह्यांच्यामधील सामान्य लोक म्हणजे वैश्य वर्ग, या वैश्य वर्गाचे तोंग्-वा व तोंग्-दु असे दोन वर्ग आहेत. तोंग्-वा हे सामान्यतः श्रीमान आहेत व तोंग-दु हे गरीब आहेत, तथापि पुष्कळदां उलट प्रकारहि दिसतो. तोंग्-दु व तोंग्-वा ह्यांच्यामध्यें सहभोजन व परस्पर लग्नव्यवहार होत नाहीं, व वर ज्या चार कनिष्ठ जाती सांगितल्या त्याच्यामध्येंहि सहभोजन व परस्पर लग्नव्यवहार नाहीं. मिश्रणापासून झालेला विदुर वर्गहि तेथें आहेच, त्यास ताक् ता रिल् असें म्हणतात. हें सर्वांत कनिष्ठ होत.

इ ति हा स.—अकराव्या शतकापासून चिनी इतिहासांत तिबेट लोक कियांग ( धनगर ) ह्या नांवानें प्रसिद्ध आहेत. तिबेटी लोकांचा स्वतःचा इतिहास दंतकथेच्या रूपानें सहाव्या शतकापासून सुरू होतो. ह्यावेळीं त्यांचा ग्न्या-ख्रित्सानपो ह्या नांवाचा राजा होता. तो कोसलच्या अथवा अयोध्येच्या प्रसेनजित् राजाचा पांचवा मुलगा असल्यामुळें त्याचा हिंदुस्थानशीं प्रत्यक्ष संबंध येतो. तिबेट देशाच्या दंतकथेनंतर चीन घराण्यांतील दक्षिण लियांगमधील पहिली प्रसिद्ध व्यक्ति फानी दुबाट ही होय. हा प्रसिद्ध गृहस्थ उत्तर लियांगमधील लोकांच्या धाकानें स. ४३३ मध्यें पळून गेला व त्यानें कियांग लोकांमध्यें आपलें राज्य स्थापिलें. त्याचा वारस ग्न्यान-सान, याच्या कारकीर्दींत तिबेटी लोकांचा नेपाळच्या उत्तरेकडील बौद्ध धर्माशीं पहिल्यानें संबंध आला, आणि स्ट्रॅांग-सान नांवाच्या एका प्रमुख वंशजाच्या वेळीं तिबेट हें एक प्रसिद्ध पौरस्त्य राष्ट्र झालें. ह्यानें हिंदुस्थानांतील आणि चीनमधील राजघराण्याशीं लग्नसंबंध केले. ६३९ मध्यें ह्यानें ल्हासा शहर वसविलें व ह्याच्याच उत्तेजनामुळें तिबेटमध्यें बौद्ध धर्मास व त्यांतील वाङ्मयास प्रवेश मिळाला. ह्यावेळीं चिनी राज्य उत्तरेच्या बाजूस आशियामध्यें व दक्षिणेकडे बंगालपर्यंत पसरलें असलें पाहिजे असें चिनी इतिहासावरून व इतर पुराव्यावरून लक्षांत येतें. स्ट्रॅांगसान गाम्पो याच्या नंतर जे वंशज होऊन गेले त्यांपैकीं धर्माची फळफळ वाहणाऱ्या लोकांमध्यें ख्री-स्ट्रॅांग दी-सान या मनुष्याचेंच नांव प्रसिद्ध आहे. त्याचा मुलगा मुनी साम्पो यानें आपल्या सत्तेखालील प्रजेच्या सर्व वर्गांची सामाजिक व सांपत्तिक स्थिति सुधारण्याची बरीच खटपट केली. परंतु त्यास यश आलें नाहीं. दुसऱ्या एका राळपाचेन नांवाच्या बौद्धधर्मी व शूर वंशजानें चीनशीं तह केल्याचे शिलालेख ल्हासा येथें कोरले. बौद्धधर्माचा कट्टा शत्रु लान्गधर्म ह्यानें त्याला ठार मारलें व आपण त्याच्या गादीवर बसला; पण ह्याचाहि लवकरच ( इ. स. ८५० त )खून झाला. ह्यावेळीं त्याच्या दोन मुलांनीं तिबेटी राज्याचे पूर्वेकडील भाग आणि पश्चिमेकडील भाग असे दोन तुकडे केले. ह्या दोन्ही भागांत पुढें तेथील अंतस्थ भांडणांमुळें बरीच बेंडाळी माजली व नंतर पश्चिम भागांतील घराण्याचे बरेच लहान लहान भाग होऊन त्यांतून शांटंगचें खोरें आणि यू चें थींपुंग अशीं दोन घराणीं उदयास आलीं. खोरें घराण्यांतील एकानें अतीश नांवाच्या हिंदुस्थानांतील एका बौद्ध यतीस नारी येथील थाडिंगच्या मठावर मुख्य नेमलें. ज्यांनीं भिक्षुसत्ता सर्व देशभर स्थापन केली त्यांपैकीं अतीश हा एक होय. १२४६-४८ त अतीशचा वारस शाक्यपंडित, मंगोलराजा ओगडाईखान ह्याचा वंशज कूयक ह्याच्या दरबारांत गेला.

१२४३ सालीं कुब्लाईखानानें पूर्व तिबेट जिंकलें आणि शाक्यपंडिताचा पुतण्या व वारस फागसपा लोडोई ग्यालत्शान ह्यास बोलावून आणून स्वतः तिबेटी बौद्धधर्माची दीक्षा घेतली व सर्व तिबेट प्रदेश शाक्यपंडितांना देऊन टाकिला. ह्यावेळेपासून पुढें ७० वर्षेपर्यंत( १२७०-१३४० ) शाक्यपलामा शाक्यप मठामध्यें राहून आपल्या प्रतिनिधींच्या द्वारें तिबेटवर सत्ता चालवीत असत. पुढें ह्यांच्याशीं चढाओढ करणाऱ्या दुष्ट भिक्षूंनीं ही सत्ता उलथून पाडली व फागमोढू ह्यास धर्मोपाध्यायेतर राज्य प्रस्थापित करण्यास मदत केली. ह्या राज्यांत देखील यादवी माजल्यामुळें मंगोलांना तिबेटी राज्यकारभारांत हात घालण्याची संधि मिळाली.

१४४७ त संघाट गेनडूनडब ह्यानें ताशील हुनपो मठांची स्थापना केली. आणि त्याचा तिसरा वारस सोदनाम

रियामतूसो याला ल्हासाजवळील गुळडन मठाच्या अधिक महत्वाच्या जागीं नेमलें. मंगोल खानांच्या मदतीनें व चीनच्या मिंग घराण्याच्या संमतीनें त्याला १५७६ त 'वज्र दलाई लामा' असा किताब देण्यांत आला. या प्रख्यात किताबाचा मान पहिल्यानें यालाच मिळाला. त्याच सुमारास मंगोलखान त्यांच्या मुलकी राज्यकारभारांत ढवळाढवळ करूं लागले तेव्हां त्यांनां लाच देऊन परत लावलें. परंतु पहिल्या मंचु राजाची कुमक मागितल्यामुळें मंगोलांनीं पुन्हां स्वारी करून सर्व देश जिंकला आणि त्यांनीं पांचव्या दलाईलामाला १६४५ सालीं सर्व तिबेटचा राजा केलें. शेवटीं १७२० मध्यें चीननें हा देश जिंकून तेथें चिनी अंबन लोकांच्या देखरेखीखालीं दलाईलामाचें राज्य स्थापिलें.

१८७२ नंतर ब्रिटिश व रशियन राष्ट्रांमध्यें तिबेटांत व्यापार करण्यासंबंधीं चढाओढ सुरू झाली व या चढाओढींत दलाईलामानें ब्रिटिशांशीं असमाधानकारक वर्तन केलें व सरतेशेवटीं त्याचा परिणाम असा झाला कीं, दलाईलामास तेथून पळ काढावा लागून ब्रिटिशांशीं व्यापारी तह करावा लागला. यानंतर १९०७ मध्यें अँग्लोरशियन कॅनव्हेन्शननें अधिराज्य कबूल करून, १९०८ सालीं दलाईलामाला पुन्हां राज्य परत केलें. पण लवकरच चिनीशीं त्याचें न जमून त्याला पदच्युत करण्यांत आलें; परंतु ब्रिटिशांच्या मदतीनें तो १९१२ त पुन्हां परत आला.

तिबेटचा रशियाशीं संबंधः—तिबेटमध्यें इंग्लंडपेक्षां रशियाचा हात अधिक शिरकला आहे आणि याचें कारण रशियाची कुटिल नीति आणि इंग्लंडचा साळसूदपणा हीं होत, असें कावागुचीं समजतो. शिवाय तिबेटी लोकांस राष्ट्रहिताची फारशी चाड नाहीं आणि रशियानें आपल्याकडे लोक वळवून घेण्यासाठीं तिबेटी अधिकाऱ्यांमध्यें बराच सुवर्णप्रयोग केला आहे. रशियानें युरोपांत आणि सैबेरियांत जरी ग्रीक संप्रदाय वाढविण्याचा प्रयत्न केला आहे तरी बुरियात नांवाच्या एका मंगोली जातीशीं त्याचें वर्तन अगदीं निराळें आहे. बुरियात हें राष्ट्र पूर्वी चीनचें मांडलिक होतें पण तें आतां रशियाचें मांडलिक झालें आहे. यांच्यामध्यें ख्रिस्ती संप्रदायाचा प्रसार न करतां उलट यांच्या बौद्ध संप्रदायासच उत्तेजन देण्याचें रशियानें ठरविलें. आणि त्यांस आपले मठ बांधण्यासाठीं देणग्याहि देण्याचें सुरू केलें आहे; शिवाय शेकडों विद्यार्थी ल्हासा व इतर तिबेटी विद्यापीठांच्या ठिकाणीं पाठविणें सुरू केलें आहे. अशांपैकीं डोर्जे नांवाचा एक विद्यार्थी सध्याच्या दलाई लामाचा (त्याच्या अल्पवयांत) शिक्षक बनला होता. त्याला त्सानी केन्बो म्हणजे लामाग्रंथशिक्षक असा किताब मिळाला. या त्सानी केन्बोस रशियानें कांहीं काम सांगितलें असावें. हा रशियांत खेप करून पुन्हां परत आला तेव्हां यानें रशियांतून पुष्कळ सोनें व उत्तम चिजा आणून लोकांस वांटल्या आणि त्यामुळें लोकांस तो अत्यंत प्रिय होऊन गेला. आणि अशामुळें त्याचें वजन लोकांत फार वाढलें.

तिबेटमध्यें पूर्वी एका भविष्यवाद्यानें असें भविष्य करून ठेविलें होतें कीं, काश्मीरच्या उत्तरभागाकडून एक बलाढ्य राजा येईल आणि तो धर्मजागृति करील व देशास दैदीप्यमान स्वरूप देईल. या सर्वत्र पसरलेल्या भविष्याचा रशियानें फायदा घेतला. त्या राजाची राजधानी काश्मीरच्या उत्तरेस चांग शंभल येथें असेल; आणि त्या राजाचें नांव जेत्सांग खापा असें असेल असेंहि भविष्य होतें.

त्सानी केन्बोनें या समजुतीचा फायदा करून घेतला तो येणेंप्रमाणें–त्यानें एक ग्रंथ लिहिला; त्यांत असें सांगितलें कीं, चांग शंभल याचा अर्थ रशिया आणि रशियाचा झार हा जेत्सांग खापाचाच अवतार आहे. आणि ही गोष्ट लोकांच्या मनावर त्यानें इतकी पटविली कीं हिच्या सत्यत्वाविषयीं जो शंका घेईल तो पाखंडी आणि बौद्ध संप्रदायाचा शत्रु आहे असें लोकांस वाटावें.

आधुनिक राजकारण.—सन १९१० मधील फेब्रुवारी महिन्यांत जनरल चनलिंगच्या आधिपत्याखालीं चीनच्या सैन्यानें तिबेटवर स्वारी केली. तिबेटचा दलाई लामा हा तिबेटमधून पळून जाऊन दार्जिलिंग येथें आश्रयार्थ राहिला व चीननें तिबेटवर आपली सत्ता स्थापन केली. दलाई लामानें ब्रिटिश सरकारला विनंति करून या बाबतींत चीनची कानउघाडणी करावयास सांगितलें पण ब्रिटिश सरकारनें तसें करण्याचें नाकारलें. पण त्याबरोबरच १९०६ सालीं जो चीन व इंग्लंडमध्यें तह झाला होता त्या तहाप्रमाणें नेपाल-भूतान व सिक्किम यांच्या सरहद्दीला कोणताहि उपसर्ग पोहोंचतां कामा नये असें चीन सरकारला कळविलें. अशा रीतीनें तिबेटवर चीनचें वर्चस्व प्रस्थापित झालें खरें पण हें वर्चस्व फार वेळ टिकलें नाहीं. १९११ सालीं चेओ एर्ह फेंग या तिबेटमधील झेच्युएन प्रांताच्या सुभेदाराचा खून झाल्यावर लगेच तिबेटनें चीनच्या सत्तेला झुगारून दिलें. तिबेटनें अशा रीतीनें सत्ता झुगारून दिलेली पहातांच ल्हासा येथें चीनचें लष्कर होतें त्यानें ल्हासामध्यें तिबेटियन लोकांचा छळ करण्यास व त्यांच्या घरादारांची लुटालूट करण्यास सुरवात केली. पण तिबेटमधील दलाई लामानें आपलें सैन्य गोळा करून या बंडवाल्यांच्या हल्ल्याला चांगलेंच तोंड दिलें. दलाई लामा हाहि हिंदुस्थानमधून परत आला व त्यानें ही लढाई बंद करून तह घडवून आणला. या तहान्वयें ल्हासामधील सर्व चिनी सैन्यानें तिबेट सोडून जावें असें ठरलें. याच वेळीं पूर्व तिबेटमधील डोंगरी संस्थानांच्या राजांनीं चीनच्या सैन्याची धूळधाण उडवून आपलें वर्चस्व पुन्हां स्थापन केलें होतें. तिबेटियन लोकांनां चांगला हात दाखवावा अशी चीनची इच्छा होती व त्याप्रमाणें चीननें आपलें सैन्य गोळा करून तिबेटवर धाडलेंहि होतें. पण ग्रेटब्रिटन मध्यें पडल्यामुळें चीनला स्वारीचा बेत रहित

करावा लागला. अशा रीतीनें चीननें तिबेटवर स्वारी करणें म्हणजे १९०६ सालच्या तहाच्या अटीविरुद्ध जाणें होय असें ग्रेटब्रिटनचें म्हणणें होतें; व तिबेटवरील चीनचें स्वामित्व जरी ग्रेटब्रिटनला मान्य होतें तरी चीननें शस्त्रांच्या जोरावर तिबेटवर वर्चस्व स्थापित करणें ग्रेटब्रिटनला पसंत नव्हतें. त्यामुळें तिबेटचा दर्जा कोणता आहे हें ठरविण्या-संबंधीं वाटाघाट करण्याकरतां चीनच्या वकिलाशीं ग्रेटब्रिटननें बोलणें सुरू केलें. पण तिबेटवर आपलें स्वामित्व असल्या-कारणानें त्याच्याविरुद्ध बंड करणाऱ्या लोकांचा मोड करणें हें आपलें कर्तव्य आहे व १९०६ च्या तिबेट व चीनच्या तहानुसार तिबेटमधील व्यापारी ठिकाणें व दळणवळणाचे मार्ग यांचें रक्षण करणें चीन सरकारला आवश्यक आहे असें चीन सरकारनें ग्रेटब्रिटनला कळविलें. त्यामुळें वाटा-घाट थांबली. चीननें आपलें सैन्य तिबेटवर पाठविलें पण तिबेटनें चीनचा पराजय करून चिनी सैन्याला तिबेटमधून हुसकावून लावलें. अशी स्थिति पाहतांच चीनचे डोळे उघ-डले व चीननें तिबेटशीं तहाचें बोलणें सुरू केलें. ग्रेटब्रिटन-नेंहि वाटाघाटीसंबंधानें आपली संमति प्रदर्शित केली व अशा रीतीनें सिमला येथें ग्रेटब्रिटन, चीन व तिबेट या राष्ट्रांचे प्रतिनिधी जमून वाटाघाटीला सुरवात झाली.

पण या वाटाघाटींत कांहींच निष्पन्न झालें नाहीं. तिबेटवर आपलें स्वामित्व असावें, तिबेटच्या अंतर्गत कारभारांत आपण हात घालणार नाहीं असें चीनचें म्हणणें होतें, तर याच्या उलट आपल्याला पूर्ण स्वातंत्र्य मिळालेंच पाहिजे असें तिबेटचें म्हणणें होतें. ग्रेटब्रिटननें निराळाच मार्ग सुचविला. तिबेटचे बाह्य तिबेट व अंतस्तिबेट असे दोन भाग पाडून अंतस्तिबेट हें पूर्णपणें स्वतंत्र असावें व बाह्य तिबेटच्या भागावर चीनचें स्वामित्व असावें अशी तडजोड ग्रेटब्रिट-ननें सुचविली. पण चीनला हें कबूल नव्हतें त्यामुळें या वाटा-घाटीचा कांहींच परिणाम झाला नाहीं. तिबेटवर पुन्हां सैन्य पाठवण्याचें चीन सरकारनें ठरविलें पण झेच्यूएन प्रांताच्या सरहद्दीवर मात्र चीननें आपली फौज सज्ज ठेवली. १९१७ च्या जुलै महिन्यांत चामडोजवळ दोन गृहस्थांना चीनच्या सैन्यानें पकडल्यामुळें चीन व तिबेट सरकारमध्यें पुन्हां वेबनाव उत्पन्न झाला. यासंबंधीं वाटा-घाट करून हें भांडण मिटविण्यासाठीं कलोंगच्या लामानें चीनला विनंति केली. पण चीननें त्या विनंतीचा अव्हेर केला व झेच्यूएन प्रांताच्या सरहद्दीवरील चिनी सैन्याच्या सेना-पतीनें चीन सरकारला न कळवितां तिबेटशीं लढाई आरं-भिली. पण या लढाईत चीनच्या सैन्याचा पराभव झाला. चामडो येथील चिनी लष्कराला तिबेटनें शरण यावयास भाग पाडलें; व यांगत्सी नदीच्या तीरापर्यंतचा सर्व मुलूख तिबेटनें आपल्या ताब्यांत घेतला. अशी बिकट परिस्थिति उत्पन्न झाल्यामुळें चीननें तिबेटशीं तहाची वाटाघाट कर-ण्याचें ठरविलें चामडो येथें तहाची वाटाघाट करण्याकरतां ग्रेटब्रिटन, तिबेट व चीन या राष्ट्रांचे प्रतिनिधी जमले. पण यून व झेच्यूएन येथील क्षत्रपांनीं चीनची सत्ता झुगारून दिल्यामुळें मध्येंच नवीन भानगड उपस्थित झाली; व त्याच-प्रमाणें बाह्यतिबेटची सरहद्द ठरवण्याच्या बाबतींतहि चीन व तिबेटचें ऐकमत्य होईना, त्यामुळें ही वाटाघाट फुकटच गेली.

यूरोपियन लोकांच्या तिबेटाकडे सन १९२० पासून कित्येक सफरी झाल्या आहेत. १९०४ सालीं ब्रिटि-शांनीं तिबेटावर केलेल्या मोहिमेपासून चीन, तिबेट व ग्रेट-ब्रिटन यांमध्यें राजकीय लढा उत्पन्न झाला. शिक्षण, रेल्वे इत्यादि सुधारणेच्या व व्यापाराच्या गोष्टी आपल्या देशांत व्हाव्या अशी तिबेटी लोकांना इच्छा उत्पन्न झाली. चीन-तुर्कस्तानमधून १९२० सालीं बोल्शेव्हिक हेर तिबेटांत येऊन पोंचले होते. वरील दोन कारणामुळें तिबेटनें चीनच्या मध्यस्थीशिवाय स्वतंत्रपणें आपल्याशीं तह करावा अशी इंग्लंडास गळ घातली. निश्चित असा तह न करतां राजकीय गोष्टींबद्दल तडजोड करून, सिक्किम येथील अधि-कारी डॉ. चार्लस बेल हा १९२२ सालच्या जानेवारींत इंग्लं-डास परत गेला.

मानुष्यकशास्त्राबद्दल माहिती मिळविणें, तिबेट व इतर बौद्ध लोक यांमध्यें भ्रातृभाव उत्पन्न करणें, बौद्ध विश्व-विद्यालय स्थापणें आणि ल्हासा येथें एक रुग्णालय काढणें इत्यादि हेतूनें प्रेरित होऊन ब्रिटिश बुद्धमिशन व डॉ. एम्. गोव्हर्न यांनीं तिबेटांत बरेच श्रम केले. ल्हासानजीकच्या मठांतील कांहीं भिक्षूंनीं आपलें वजन कमी होईल या भीतीनें फार विरोध केला. वरील ब्रिटिश मिशनचा ल्हासा येथें प्रवेश होण्यास दलाई लामा व त्याचें मंत्रिमंडळ अनुकूल होतें. डॉ. गोव्हर्न हा ल्हासा येथें १९२३ सालच्या आरंभीं पोंचला व तेथें त्यास महत्वाची माहिती मिळाली.

तिबेटी राजकारणांत दोन प्रबल पक्ष आहेत. प्रगमनशील अग्र पक्षाचें नेतृत्व दलाइ लामाकडे असून त्यास सेनापति, सरदार लोक व सामान्य शेतकरी वर्ग यांचा पाठिंबा आहे. दुसरा पक्ष राष्ट्रीय मंडळ हा होय व त्यांत ल्हासाजव-ळच्या तीन मोठ्या मठांतील भिक्षूंचे प्रतिनिधी आहेत. हे दोन्ही पक्ष सामर्थ्यवान असून लोकमतनिदर्शक असे मुळींच नाहींत. तथापि ' भिक्षुपक्ष ' हा मोठा जुलमी व पुराण-मतवादी असा आहे. ल्हासा व भियँगटिसीच्या दरम्यान तारायंत्राची योजना करावी ही गोष्ट या पक्षास सम्मत नाहीं. दलाइलामाची मात्र फार चमत्कारिक स्थिति आहे. कारण नांवाला मात्र सरकारी कारभार त्याच्या ताब्यांत आहे पण वस्तुतः तो भिक्षूंच्याच आधीन आहे. सध्याचा दलाई लामा हा परंपरेनें तेरावा होय. दलाई लामा निवर्तल्यावर भिक्षु-वर्ग एखाद्या अर्भकास गादीवर बसवितात. तिबेटचे सर्व दलाई लामा अल्पायुषी ठरल्यामुळें भिक्षुकांच्या हातीं वरीच सत्ता गेली होती. परंतु सध्याचा दलाईलामा प्रबळ

असून भिक्षूंनां जुमानीत नाहीं. या भिक्षूंचें येथेंहि सैन्य आहे व तें बरेंच प्रबळ आहे. टीसरांग शापे नामक सेनापतीच्या धोरणावरच तिबेटाचें भवितव्य अवलंबून आहे. १७ वर्षांपूर्वी, दलाईलामा हिंदुस्थानांत पळून येईपर्यंत त्यानें चिनी लोकांत थोपवून धरलें होतें.

नूतन संवत्सरारंभीं ल्हासाचा सर्व कारभार दोन भिक्षूंच्या ताब्यांत तीन आठवडेपर्यंत देण्याची जी चमत्कारिक पद्धत तिबेटांत आहे तीवरून भिक्षूंची सत्ता पूर्वापर तेथें केवढी आहे याची कल्पना होते. उपर्युक्त २१ दिवसांत दलाईलामा व त्याचें मंत्रिमंडळ अधिकारच्युत होत असतें व त्या काळांत भिक्षुकवक्षाचें फावतें. हे भिक्षू कट्टे अहिंसावादी आहेत. तथापि वादाच्या भरांत परस्परांचे जीव घेण्यांत त्यांनां अहिंसेची स्मृति रहात नाहीं. हलक्या दर्जाचे भिक्षू वाटमाऱ्यांचा धंदा करतात. मठाची सांपत्तिक स्थिति मात्र चांगली असते.

तिबेटांत तुरुंग नाहींत. जुने कायदे गेले व त्यामुळें हल्लीं गुन्ह्याचें स्वरूप पाहून शिक्षा देण्यांत येते. डोळे काढणें व देहविच्छेद करणें वगैरे शिक्षा दलाईलाम्यानें रद्द केल्या आहेत. खुनासहि फटके व हद्दपारी वगैरे शिक्षा आहेत. शिक्षा कमी करण्याच्या बाबतींत लाचलुचपतीचा प्रकार तेथें चालू असतो. १९२३ सालीं 'परकीयांची कत्तल करा' असा एकच घोष ल्हासाच्या भिक्षूंनीं केला होता व डॉ. गोव्हने यांचें रक्षण त्या वर्षी दलाई लामाच्या पक्षानें केलें.

१९२४ सालीं वेंब्ले प्रदर्शनार्थ तिबेटी नर्तक पाठवावे असें ठरलें. त्यावेळीं तिबेटांत धार्मिक चळवळ व प्रक्षोभ होईल असें सुचविण्यांत आलें होतें.

१९२१ ते १९२४ च्या दरम्यान ब्रिगेडियर जनरल जॉर्ज पेरिस यानें पेकिन ते ल्हासापर्यंत पायी प्रवास केला. १९२४ फेब्रुवारी व मार्चमध्यें एक फ्रेंच विदुषी तिबेटांत होती व तिनें कित्येक तिबेटी पुस्तकें व जुने कागदपत्र गोळा केले. ब्रिटिश ट्रेड एजंटच्या विनंतीवरून १९२४ च्या डिसेंबरांत सात तिबेटी भिक्षुक लंडनास गेले होते. एव्हरेस्ट शिखराचें वर्णन ज्यांत आहे अशा एका चित्रपटासंबंधीं त्यास पाचारण करण्यांत आलें होतें.

सर चार्लस बेलकृत "टिबेट पास्ट अँड प्रेझेंट" नामक एक पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. तिबेट व इंग्लंडचा प्रत्यक्ष व्यवहार असावा, ब्रिटिशांचा खुल्या व्यापाराबद्दल असलेला दुराग्रह निंद्य अतएव त्याज्य मानला जावा व नकारांबद्दल तिबेटी लोकांचें म्हणणें इंग्लंडनें मान्य करावें अशा तऱ्हेचीं तत्त्वें त्यांत प्रतिपादन केलीं आहेत.

[संदर्भग्रंथः—ब्ल्यूबुक ऑन अँग्लो तिबेटन रिलेशन्स (१९१०); स्वेनहेडिन-ट्रॅन्स हिमालय (१९१३); रेजीनल्ड कॅरर-ऑन दि ईव्हज ऑफ दि वर्ल्ड (१९१७); दि चायना ईयर बुक (१९१९); एन्सायक्लोपेडिया ब्रिटानिका]

**तिमोर**—हें मलाया द्वीपसमुहांतील 'लेसर सुन्डा' बेटांतील सर्वांत मोठें बेट आहे. या बेटाची सर्वसाधारण रुंदी ६० मैल असून क्षेत्रफळ सुमारें १२५०० चौरस मैल आहे. या बेटाचा कांहीं भाग डच लोकांकडे व कांहीं पोर्तुगीज लोकांकडे आहे. उत्तरेकडील भागांत कावालकी पर्वत आहे. हवा फार कोरडी आहे. येथें कोळसा व पेट्रोलिअम सांपडतें. येथें पाऊस थोडा पडतो. येथें नाना प्रकारचे खनिज पदार्थ असले तरी ते थोड्या प्रमाणांत निघतात. येथून चंदन व तट्टे बाहेर पाठविली जातात. येथील बहुतेक लोक पापुअन जातीचे आहेत. अनेक मिश्र जातीचे लोकहि येथें दृष्टीस पडतात. येथील लोक मलाया व पापुअन भाषा बोलतात. येथें बहुतेक (१५२२) स्पॅनिश लोकांच्या अगोदर पोर्तुगीज लोक आले असावे. १६१३ सालीं यांस डच लोकांनीं कूपांग पासून हांकून लावलें व १८ व्या शतकांत या दोन्हीं राष्ट्रांत चकमकी सुरू होत्या. शेवटीं स. १८५९ मध्यें यांची सरहद्द ठरविण्यांत आली. पुढें नवीन तह १८९३ च्या जून महिन्यांत लिस्बन येथें झाला. या तहांत नवीन सरहद्दी ठरविण्यांत आल्या.

**पोर्तुगीज तिमोर**.—यांत पुलोकाम्बिंग बेट असून या भागाचें क्षेत्रफळ सुमारें ७४५० चौरस मैल आहे. लोकसंख्या सुमारें ५० लक्ष आहे. उत्तर किनाऱ्यावर डिली हें राज्यव्यवस्थेचें मुख्य ठिकाण आहे व मुख्य वसाहतीच्या शहरांत ३००० लोकवस्ती असून क्वचितच युरोपीयन आढळतो. मकाओ हें शहर १८९६ सालपावेतों पोर्तुगीज तिमोरला राजकीयदृष्ट्या जोडलें होतें. हल्लीं येथून कांहीं खंडणी येते. येथून काफी व मेण बाहेरगांवीं पाठवितात.

**डच तिमोर**.—या विभागाचें क्षेत्रफळ ५,००० चौरस मैल आहे. या रेसीडेन्सीचें मुख्य शहर कूपांग हें आहे. शहरची लोकसंख्या ८००० आहे. येथून चंदन, तट्टे, गुरें, पिनांग येथील काठिण कवचीची फळें वगैरे माल बाहेरगांवीं जातो. लोकसंख्या (१९०५) ३०८५००.

**तिमोर लॉट**—तिमोरलॉट हा मलाया द्वीपसमूहांतील व अ.यु बेटांच्या नैर्ऋत्येकडील बेटांचा एक समूह आहे. हा समूह डच लोकांनीं आम्बोयना रेसिडेन्सींमध्यें समाविष्ट केला असून या बेटांचे लाराट व सेरा असे दोन जिल्हे पाडले आहेत. यांत अनेक लहान लहान बेटें येतात. सर्वांत मोठ्या यामडेना बेटाचें क्षेत्रफळ सुमारें ११०० चौरस मैल असून बाकी भागाचें क्षेत्रफळ एकंदर १०० चौरस मैल आहे. येथील लोकसंख्या सुमारें १९००० आहे. येथील रानटी लोक ६ फुटांपेक्षां देखील उंच आहेत. लोकांची कलाकुशलतेबद्दल फार प्रसिद्धि आहे. शेतकी, टरटल मासे धरणें, आणि गुरें पाळणें यांवर हे लोक निर्वाह करितात. येथून फक्त ८५० पासून १६५० पौंडांचा माल बाहेर जातो.

**तिरखेडी-मालपुरी जमीनदारी**- जिल्हा भंडारा. ही इस्टेट तिरोरा तहशिलींत असून दोन जमीनदाऱ्या मिळून झाली आहे. तिरखेडीचें क्षेत्रफळ १५ चौरस मैल आहे. मालपुरीचें क्षेत्रफळ २१ चौरस मैल आहे. खेडीं ७८. बहुतेक भाग जंगलाचा असून त्याचें उत्पन्नहि चांगलें आहे. मराठा सरकारशीं इमानीपणानें वागल्याबद्दल पांडू पोवार यास १८१५ सालीं या जमीनदाऱ्या मिळाल्या. हल्लींचा जमीनदार तुळशीराम म्हणून आहे व तो तिरखेडी येथें राहतो. तिरखेडी गांव सालेकता स्टेशनहून ४ मैल लांब असून त्याची लोकसंख्या २८१५ आहे. तिरखेडी जमीनदारीचें उत्पन्न ३००० रुपये व टाकोळी ९५० रुपये. मालपुरीचें उत्पन्न २००० रुपये व टाकोळी ६५० रुपये आहे.

**तिरगुळ**—हे यजुर्वेदी, तैत्तिरीय आपस्तंब ब्राह्मण असून यांची वस्ती मोंगलाईंत व महाराष्ट्रांत ( सोलापूर, नगर, पुणें, सातारा या जिल्ह्यांत) विशेष आहे. यांचा मूळ देश तेलंगण ( राजमहेंद्री, मच्छलीपट्टण व महादेवपुर ) असून हे आपला मूळदेश सोडून वर सांगितलेल्या भागांत पसरले. यांची मूळची भाषा तेलगु असून इकडे आल्यानंतर कानडी व कुणबाऊ मराठी या भाषा यांनीं उचलिल्या. जातिनिर्णयात्मक प्राचीन ग्रंथांत तिरगुळ शब्द कनिष्ठजातिदर्शक सांपडतो. पद्मपुराणांत " चौल त्रिगुड सौपराः " यांना पंक्तिदूषक ब्राह्मण म्हटलें आहे. रा. राजवाडे यांच्या मतें, त्रिगुड म्हणजेच (त्रैकूटक = त्रिगुडअ = त्रिगुड = तिरगूळ ) हल्लींचे तिरगुळ असून ते (पद्मपुराणकारांच्या मतानें) दुष्टाचारवान ब्राह्मण असल्यानें पंक्तिदूषक होते. ( भा. ई. सं. मं. इतिवृत्त, १८३६. पृ. २२ )

हे लोक आपला मूळ देश सोडून इकडे आल्यानंतर त्यांची संख्या थोडी असल्यामुळे व बरोबर उपाध्याय वर्ग नसल्यामुळें इकडील ब्राह्मणांशीं त्यांचा प्रथम अन्नव्यवहार होत असावा. परंतु पुढें यांनीं पानमळ्याचा धंदा उचलल्यानें व खेड्यांत राहून कुणब्याकडेच विशेष लक्ष दिल्यामुळें व हळू हळू आपल्या उपाध्यायांस इकडे आणून त्यांच्याकडून धार्मिक कृत्यें करविण्याचा परिपाठ घातल्यामुळें इकडील ब्राह्मणवर्गानें त्यांना हलके समजून पंक्तिबाह्य ठरविलें असावें असें दिसतें. महाराष्ट्रांत यांची संख्या एकंदर महाराष्ट्र ब्राह्मणांत शेंकडा पांचांपेक्षांहि कमी असून मुख्य वस्ती मंगरूळ, करकंब, निमगांव, चन्होली, परिंचें वगैरे गांवीं ( ज्या ठिकाणीं पानमळ्याला योग्य अशी जमीन आहे तेथें ) आहे. यांना कांहीं आक्षेपक लोक ते आपल्यांत गोळकांचा समावेश करून घेतात म्हणून 'मिश्र गोळक' ( तीन गोळक ) मानतात. परंतु तें म्हणणं चुकीचें असावें. रा.वडवळकर म्हणतात कीं अलीकडे कोहीं गोळक व तिरगुळांचे लेकवळेहि आपणांस तिरगुळ म्हणवूं लागले; त्यामुळें मूळच्या तिरगुळांस हीन लेखण्यांत येऊं लागलें.

अलीकडे शंकराचार्यांनीं(शृंगेरी व हंपी विरुपाक्ष) तिरगुळ हे पंक्तिपावन असल्याबद्दलचीं आज्ञापत्रें काढिलीं आहेत. तसेंच यांच्यांत अग्निहोत्री व वैदिक कर्में करणारीं घराणीं आहेत. कांहीं ठिकाणीं यांच्या घराण्यांचा इतर ऋग्वेदी घराण्यांशीं शरीरसंबंध घडल्याचींहि उदाहरणें आहेत. महाराष्ट्रांतून मोंगलाईत गेलेले हल्लींचे सुशिक्षित तिरगुळ येथील जुन्या तिरगुळांशीं, हे ब्राह्मण नाहींत असें म्हणून पंक्तिव्यवहार करीत नाहींत.

यांच्यांत मेंडसुर, नारकर, शेंदरकर, राडकर, कमठाण, तवडे, धर्म, वडवळकर, कानडे, म्हात्रे, अरणकल्ले, विंचिले, वाम्रस वगैरे आडनांवें आहेत. गांवास कर हा प्रत्यय लावून जशीं मराठी आडनांवें बनतात तशीं 'रस' हा प्रत्यय लावून यांचीं आडनांवें बनलीं आहेत; उदा. वांबोचे वाम्रस; हंपीचे हंप्रस.

तिरगुळ या शब्दाच्या व्युत्पत्तीबद्दल अनेक तर्क आहेत. उदाहरणार्थ तेलंगणांतील त्रिगळप्रांतावरून हें नांव पडलें; एका ब्राह्मणानें ब्राह्मण, क्षत्रिय व कुंभार स्त्रियांशीं लग्न केल्यामुळें त्रिकुल या शब्दापासून हा शब्द निघाला; त्रिकूट पर्वतावरून हें नांव पडलें; गॅझेटिअरमध्यें तिनगोल-तीन पिढ्या गोलक असलेले-अशी व्युत्पत्ति दिली आहे व पेशवाईंतील पंढरपुरास पाठविलेल्या गरोदर विधवांची ही संतति होय अशी आख्यायिका म्हणून दिली आहे.

रा. वडवळकर म्हणतात कीं, तित्तिर पक्ष्याच्या रूपानें वेद गिळणारा तो तित्तिरगळू उर्फ तिरगुळ होय. शंकराचार्यांच्या आज्ञापत्रांत त्रिगर्त, त्रिगूळ, त्रिगोळ, त्रिगल, तिगड अशीं नांवें येतात. कानडींत तिरु म्हणजे भटकणारा आणि गळु म्हणजे समुदाय असा अर्थ होतो. त्यावरून तिरगुळ म्हणजे भटक्या वर्ग होय अशीहि एक व्युत्पत्ति देण्यांत आली आहे. परंतु हें प्रादेशिक नांव असून त्रिगळ प्रांतावरून पडलें असण्याचा बराच संभव दिसतो. बाकीच्या व्युत्पत्तींस दिलेले आधार आम्हांस पुरेसे वाटत नाहींत.

मोंगलाईंत चितापूरची नागम्मादेवी, यादगिरीचा व मैलारचा खंडोबा, बावगी व गिरीचा बालाजी हे यांचे कुलदेव असून यांच्यांत भारद्वाज, वत्स, काश्यप, बादरायण, लुहित वगैरे गोत्रें आहेत. महाराष्ट्रांत हे उपरी असल्यानें यांना वृत्त्या, वतनें किंवा जहागिरी नाहींत. मोंगलाईमध्यें मात्र थोडी फार आहेत.

[ संदर्भग्रंथ—सोलापूर ग्या.झि;रा. दा. ना. शेंदरकर; शि. ग. वाम्रस व रा. दी. ना. वडवळकर यांनीं पाठविलेली माहिती. ]

**तिरवा**, त ह शी ल—संयुक्त प्रांत. फरूकाबाद जिल्ह्यांतील ही एक दक्षिणेकडील तहशील आहे. या तहशीलींत तिखा, सौरिख, सकतपूर आणि सहरावा हे परगणे आहेत. क्षेत्रफळ ३८० चौरस मैल. १९०१ सालीं लोकसंख्या १८००८६ होती. तहशिलींत २३६ खेडीं असून तिरवा हें

मुख्य ठिकाण आहे. साऱ्याचें उत्पन्न २५३००० व करांचें उत्पन्न ४५००० रुपये होतें (१९०३-४). याच सालांत वहीत जमीन १९७ चौरस मैल होती. पैकीं १०१ चौरस मैल जमिनीला कालव्याचें पाणी दिलें होतें.

गां व.—संयुक्त प्रांत. फरुखाबाद जिल्ह्यांतील तिरवा तालुक्याचें हें मुख्य ठिकाण आहे. येथें एक सुंदर किल्ला असून त्यांत तिरव्याचा राजा राहतो. येथील एका राजानें किल्ल्याजवळच एक सुंदर देवालय व तलाव बांधला आहे. या गावांत २ शाळा आहेत.

**तिरहुत**—हा पूर्वी बंगालचा जिल्हा होता. १८७५ सालीं याचे मुझफरपूर व दरभंगा असे दोन जिल्हे केले.

**तिरावरी**—पंजाब, जिल्हा कर्नाल. कर्नाल तालुक्यांतील हें खेडेंगांव आहे याच ठिकाणीं ११९१ व ११९२ सालांत पृथ्वीराज चव्हाण व महंमद घोरी यांच्यांत लढाया झाल्या. इ. स. १७३९ त नादीरशहा याच गांवांत उतरला व येथूनच महमदशहावर चालून गेला. या खेड्यांत मोठी सराई आहे. याच्या सभोंवताली असणारा तट अद्यापि उत्तम स्थितींत आहे.

**तिराह**—वायव्य सरहद्दीवरील प्रांतांत हा एक राज्य-व्यवस्था नसलेला डोंगराळ प्रदेश आहे. उन्हाळ्यांत ओक्झई लोक या प्रदेशांत येऊन राहतात. येथील मूळचे राहणार लोक तिराह हे तिराही किंवा ताजिकचे असून, पिरीरोशन-यानें यांनां येथून हांकलून लाविलें. इ. स. १६२० मध्यें काबूलचा सुभेदार मोहबतखान यानें ३०० दौलतझई ओक्झई या लोकांची कत्तल केली. पुढें इ. स. १६५८ त बादशहाचा काबूल येथील दिवाण मीर याकूत यानें या लोकांवर स्वारी करून त्यांची सत्ता कमी केली. इ. स. १८९७ त हे लोक कांहीं धर्मसंबंधी कारणामुळें इंग्रजांशीं भांडूं लागले. इंग्लि-शांनीं यांच्यावर कांहीं लोक पाठवून यांचा पूर्ण बंदोबस्त केला.

**तिरुक्कलीक्कुनरम्** (किंवा पक्षितीर्थ)—मद्रास, चिंगल-पट जिल्हा व तालुक्यांत हें गांव आहे. लोकसंख्या १९०१ सालीं ५७२८ होती. या गांवाजवळच ५०० फूट उंच असणाऱ्या टेंकडीवर महादेवाचें देवालय आहे. हें ठिकाण क्षेत्र म्हणून प्रसिद्ध आहे. प्रत्येक दिवशीं दोन गरुडपक्षी या टेंक-डीवर येतात व देवालयांतील पुजारी त्यांनां खीर खावयास घालतो. या गांवांत असणाऱ्या तलावांत पक्ष्यांचें स्नान कर-ण्याचें स्थान आहे. त्यांत स्नान केल्यानें सर्व प्रकारचे रोग बरे होतात अशी समजूत आहे. उदार अंतःकरणाच्या कांहीं सद्गृहस्थांनीं या ठिकाणीं यात्रेकरूंकरितां कित्येक धर्मशाळा बांधिल्या आहेत.

**तिरुकोयिलूर**, तालुका व गांव.—मद्रास. दक्षिण अर्काट जिल्ह्याच्या मध्यभागीं असणारा हा एक तालुका आहे. क्षेत्र-फळ ५८४ चौरस मैल. १९२१ सालीं लोकसंख्या २२२३१५ होती. या तालुक्यांत ३५० खेडीं असून तिरुकोयिलूर हें मुख्य ठिकाण आहे. १९०३-४ सालांत सारा व कर यांचें उत्पन्न ५,८४,००० रुपये होतें. या तालुक्यांतून पोन्नैयार व गडीलम या दोन नद्या वाहतात. तिरुकोयिलूर गावांत दोन प्रसिद्ध देवळें आहेत. यांतील एक विष्णूचें व दुसरें महादेवाचें आहे. १९०१ सालांत या गांवाची लोकसंख्या ८,६१७ होती.

**तिरुचुली**—मद्रास. मदुरा जिल्ह्यांतील रामनाद पोट-विभागांतील ही एक जमीनदारी तहशील आहे. लोकसंख्या १९०१ सालीं १,६६,७६९ होती. या तहशिलींत ३५४ खेडीं असून आरुप्पुक्कोट्टइ आणि पालैयमपट्टी हीं दोन मोठीं गांवें आहेत. पैकीं आरुप्पुक्कोट्टइ हें मुख्य ठिकाण आहे. येथील मुख्य धंदा म्हणजे जाडाभरडा कपडा विणणें हा होय.

**तिरुचेंगोडू**, तालुका व गांव.—मद्रास. सालेम जिल्ह्याच्या कोंपऱ्यांत हा एक तालुका आहे. क्षेत्रफळ ६२७ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) ३३३३५२ या तालुक्यांत १६६ खेडीं असून तिरुचेंगोडू हें मुख्य ठिकाण आहे. १९०३-४ सालीं सारा व कर यांचें उत्पन्न रुपये ४,८८००० होतें. तिरुचेंगोडूगांवची १९०१ सालीं लोकसंख्या ८,१९६ होती. येथें असणाऱ्या देवालयामुळें हें गांव प्रसिद्ध आहे व म्हणूनच हजारों यात्रेकरू येथें येतात

**तिरुचेंदूर**—मद्रास. जिल्हा तिनेवेल्ली. श्रीवैकुंठम् तालु-क्याच्या किनाऱ्यावर हें एक यात्रेचें प्रसिद्ध ठिकाण आहे. या ठिकाणीं एक मोठी नेमणूक असलेलें देवालय आहे. या देवालयाचा उंच घुमट नावाडी लोकांनां कित्येक मैल अंतरा-वरून दिसतो. उन्हाळ्यांत राहण्यासाठीं हें ठिकाण फार मजे-दार आहे.

**तिरुत्तनी**, तहशील.—मद्रास. उत्तर अर्काट जिल्ह्यां-तील ही एक जमीनदारी तहशील आहे. क्षेत्रफळ ४०१ चौरस मैल. लोकसंख्या (१९०१) १७१,००५. तह-शिलींत ३२७ खेडीं असून तिरुत्तनी हें मुख्य ठिकाण आहे.

गां व.—हें खेडें मद्रास इलाखा, उत्तरआर्कोट जिल्ह्यांतील कारवेतनगर जमीनदारीच्या जमीनदारी (तिरुत्तनी) तहशि-लीचें मुख्य ठिकाण आहे. लोकसंख्या (१९०१) ३,६९७. येथें एका टेंकडीवर सुब्रह्मण्यस्वामीचें देवालय फार महत्त्वाचें आहे.

**तिरुत्तरैप्पुंडी**, तालुका.—मद्रास, तंजावर जिल्ह्यांतील आग्नेयीकडील हा एक तालुका आहे. क्षेत्रफळ ४८५ चौरस मैल. लोकवस्ती १९२१ सालीं १९१३९८ होती. यांत १४३ खेडीं असून तिरुत्तुरैप्पुंडी हें मुख्य ठिकाण आहे. १९०३-४ सालीं सारा व कर यांचें उत्पन्न ५,०९,००० रुपये होतें. तंबाखू व नारळ हे येथें फार पिकतात.

गां व.—मद्रास, तंजावर जिल्ह्यांतील तिरुत्तरैप्पुंडी तालु-क्याचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या १९०१ सालीं ५,४०० होती. या गांवांत महादेवाचें एक जुनें देवालय आहे.

**तिरुपती**—मद्रास, उत्तर अर्काट जिल्हा. चंद्रगिरी तालुक्यांत हें एक गांव आहे. उ. अ. १३°३८′ आणि पू. रे.

७९° २४'. लोकसंख्या ( १९०१ ) १५३८१. या गांवांत अनेक प्रसिद्ध देवळें आहेत. येथील पितळेचा धंदा प्रसिद्ध आहे. लांकडावरचें कोरीव काम येथें बरेंच चांगलें होतें. यात्रेचें हें प्रसिद्ध स्थान असून येथें एक प्रचंड देवालय आहे. या गांवच्या आसपासचा प्रदेश फार पवित्र मानला जातो. १८७० सालापर्यंत येथें कोणत्याहि यूरोपियनाचा प्रवेश झाला नव्हता. परंतु हल्लीं एखादा गोरा माणूस या भागांत आला असतां कांहीं गवगवा होत नाहीं. ज्या डोंगरावर हें गांव वसलें आहे तो डोंगर मेरु पर्वताचा एक भाग आहे अशी दंतकथा आहे. या पर्वतश्रेणीचीं सात मुख्य शिखरें असून प्रत्येकाला निरनिराळें नांव आहे आणि स्वतंत्र दंतकथा आहे. यांपैकीं 'शेषाचलम' असें एका शिखराचें नांव असून तें वायुदेवतेनें जोराचें वादळ करून उडविल्यामुळें सध्यां असलेल्या ठिकाणीं तें खालीं पडलें अशी एक दंतकथा आहे. या शिखरानजीकच विष्णूचें प्रचंड देवालय असून यूरोपियन लोकांस देवळांत प्रवेश करण्यास मनाई आहे. इमारतीचें नक्षीकाम अगर कलाकुसरीचें काम विशेष वाखाणण्यासारखें नाहीं. तथापि आंतील श्री विष्णूची चतुर्भुज मूर्ति पाहण्यालायक आहे. ती पाषाणाची असून, ७ फूट उंच आहे. मूर्तीच्या तीन हातांत शंख, चक्र, आणि पद्म अशीं आयुधें असून चौथा हात पर्वतशिखर दर्शवितो. या देवाचीं १००८ निरनिराळीं नांवें असून त्यांपैकीं, 'श्रीनिवास' आणि 'व्यंकटाचलपति' अशीं दोन नांवें सर्वसाधारणपणें प्रचारांत आहेत. दक्षिण आणि उत्तर हिंदुस्थानांतील यात्रेकरू या मूर्तीस बालाजीची मूर्ति या नांवानें संबोधितात. पुष्कळ भाविक यात्रेकरू श्रीविष्णूस आजारांतून बरें व्हावें अगर पुत्रप्राप्ति व्हावी म्हणून नवस करतात.

**तिरुप्पत्तुर**, त ह शी ल व गां व.—मद्रास, मदुरा जिल्ह्यांतील रामनाद पोटविभागांत असणारी, शिवगंगा जमीनदारीची ही तहशील आहे. लोकसंख्या( १९०१ ) २०९०३६ या तहशीलींत खेडीं ३६६ असून तिरुप्पत्तुर (वस्ती५८८१)व कारैकुडी हीं दोन गांवें आहेत. पैकीं पहिलें गांव मुख्य आहे. येथें पितळेचीं भांडीं तयार होतात.

**तिरुप्पत्तुर**, ता लु का व गां व—मद्रास, सालेम जिल्ह्यांतील हा एक तालुका आहे. क्षेत्रफळ ५३९ चौरस मैल. याची लोकसंख्या १९०१ सालीं २०५९८६ होती. यांत ३२३ खेडीं असून तिरुप्पत्तुर व वानीयंबाडी हीं दोन गांवें आहेत.पैकीं तिरुप्पत्तुर हें मुख्य ठिकाण असून लोकसंख्या १८६८९ आहे. १९०३—४ सालीं साऱ्याचें उत्पन्न २,००,००० रुपये होतें.

**तिरुप्पुवनम्**—मद्रास, जिल्हा मदुरा. रामनाद पोटविभागांतील शिवगंगा जमीनदारीची जमीनदारी तहशील. हिची लोकसंख्या ( १९०१ ) २९,२६१ या तहशिलींत ६६ खेडीं असून तिरुप्पुवनम् हें मुख्य ठिकाण आहे.

**तिरुमकूदल-नरसीपूर**—म्हैसूर संस्थान, म्हैसूर जिल्ह्याच्या मध्यभागीं असणारा हा एक तालुका आहे. क्षेत्रफळ २२५ चौरस मैल. याची लोकसंख्या (१९०१) ८७६८०. यांत बन्नूर, तिरुमकूदल, नरसीपूर, तलकाड आणि सोसले अशीं चार मोठीं गांवें आहेत. पैकीं तिरुमकूदल नरसीपूर हें मुख्य ठिकाण आहे. कावेरी नदी या तालुक्यांतून वाहते. १९०३—०४ सालांत जमीनीच्या साऱ्याचें उत्पन्न १,४७००० रुपये होतें.

**तिरुमंगइ आळवार**— हा शेवटचा आळवार ( पद्य ) होय. यानें वैष्णवप्रबन्धांतील ४९०० श्लोकांपैकीं १३६१ श्लोकरचना केली आहे. हा तंजावर जिल्ह्यांतील कुरुगूर येथें जन्मला. हा जातीचा कळार असून एका लहानशा प्रांताचा कारभार पाहून लुटारूचा धंदा करीत असे. एका वेळीं त्यानें एका ब्राम्हणाचें वऱ्हाड लुटलें. तेव्हां त्यास पश्चात्ताप होऊन तेथेंच त्यानें त्या ब्राह्मणापासून "नारायण" मंत्र घेतला. नंतर तो तीर्थयात्रा करून श्रीरंगम् येथें येऊन राहिला. त्यानें वेगापठ्ठम् येथील बौद्धस्थान लुटून श्रीरंगम येथील देवळांचा जीर्णोद्धार केला; व त्यानें नम्माळवार याच्या तिरुवयमोली ग्रंथाचें वार्षिक पठण होईल अशी तजवीज केली. श्रीरंगम् येथील देवळाच्या वर्णनांत ( कोईलो लुछु ) या नांवाचा एक रस्ता असल्याचा उल्लेख आहे. वैष्णव लोक आचार्यांपेक्षां आळवारास जास्त पूज्य मानतात. पहिला आचार्य नाथमुनी हा आळवारानंतर ३१४ शें वर्षांनीं झाला असावा, ( बिशप काल्डवेल म्हणतो कीं, हा रामानुजाचा शिष्य असावा पण रामानुजाचा गुरु तिरुकोट्टियारनंबी हा तिरुमंगइची आपल्या काव्यांत स्तुति करतो ), ( श्रीरंगम् येथील देवालयाच्या वर्णनांत राजमहेन्द्र राजाच्या रस्त्याचें नांव तिरुमंगइ याच्या रस्त्याच्या आधीं ठेवल्याबद्दलचा उल्लेख आहे. हा राजा इ. स. १०५२ त होता यावरून गोपिनाथराव हे तिरुमंगईचा काल इ. स. १०५० च्या नंतरचा असावा असें मानतात ).

नाथमुनींचा काल इ. स. १० वें शतक हा होय; व तो ३४० वर्षें योगसमाधींत होता असा उल्लेख आहे. हा त्याच्या पूर्वी होऊन गेला. अकराव्या शतकांत याच्या काव्या(तिरुनेदुनुदांडहम्)चें पठण करण्याची व्यवस्था चोल-केरल राजानें केल्याचा उल्लेख सांपडतो. याच्या काव्यांत कोच्चेंगन नांवाचा चोल राजा व कांचीचा राजा परमेश्वर विण्णगर ( पल्लव ) यांचें वर्णन आहे. हा पल्लव राजा परमेश्वरवर्मा ( दुसरा ) असावा असें डॉ. हुल्टझ्श याचें मत आहे. यावरून कृष्णअय्यंगार यांनीं अनुमान काढिलें आहे कीं, तिरुमंगई याचा काल इ. स. ८००-८५० हा असावा. याचा ज्ञानसंबंदर या शैवाबरोबर वाद झाल्याची दंतकथा आहे.

**तिरुमंगलम तालुका**—मद्रास. जिल्हा मदुरा. मदुरा पोटविभागांतील पश्चिमेकडील हा तालुका आहे. क्षेत्रफळ७४५ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) ३१९७२७.यांत २७६ खेडीं असून तिरुमंगलम् हें मुख्य ठिकाण आहे.१९०३-४ सालीं सारा व कर यांचें उत्पन्न ४५०००० रुपये होतें.

मुख्य गांव तिरुमंगलम् लोकसंख्या. (१९०१) ८८९४. येथील हवेमुळें दम्याचा विकार नाहींसा होतो असें म्हणतात.

**तिरुमल**—मद्रास, उत्तरअर्काट जिल्ह्यांतील चंद्रगिरी तालुक्यांत या नांवाच्या २५०० फूट उंच अशा एका पवित्र टेंकडीवर विष्णूचें अतिशय पवित्र देवालय आहे. हें देवालय पूर्वी इतकें पवित्र मानीत कीं, मुसुलमान व ख्रिस्ती लोकांनां या टेंकडीवर देखील चढूं देत नसत. १८७० सालापासून युरोपीयन मॅजिस्ट्रेट व पोलिस अधिकारी मात्र प्रसंगोपात कामासाठीं वर जातात. असें जरी आहे तरी आजपावेतों कोणत्याहि यूरोपीयनला देवालयाच्या आंत येऊं दिलें नाहीं. हिंदुस्थानच्या सर्व भागांतून हजारों लोक देणग्या घेऊन या ठिकाणीं येतात. १८४३ पर्यंत हें इंग्लिशांच्या ताब्यांत असून त्याचें वार्षिक उत्पन्न २ लक्ष रुपये होतें. हल्लीं हें महंताच्या ताब्यांत असून उत्पन्नहि कमी झालें आहे याच टेंकडीवर पवित्र व अतिशय मनोहर अशीं पुष्कळशीं स्नानास योग्य अशीं कुंडें आहेत.

**तिरुरंगडी**—मद्रास, जिल्हा मलबार. एर्नाद तालुक्यांतील हें एक गांव आहे. लोकसंख्या ( १९१० ) ५४००असून हें गांव डेप्युटी तहशिलदार व सबमॅजिस्ट्रेटचें मुख्य ठिकाण आहे. येथें मासे, नारळ व सुपाऱ्यांचा व्यापार चालतो.

**तिरुवन्नमलै, तालुका.**—मद्रास. दक्षिण अर्काट जिल्ह्यांतील वायव्येकडील हा सर्वांत मोठा तालुका आहे. क्षेत्रफळ १००९ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) ३,०५,२१७. यांत ४०० खेडीं असून तिरुवन्नमलै हें मुख्य ठिकाण आहे. यांतील जंगलांत चंदन, साग व इमारतीचें लांकूड बरेंच आहे.

**गांव.**—मद्रास, दक्षिणअर्काट जिल्ह्यांतील तिरुवन्नमलै तालुक्याचें हें गांव मुख्य ठिकाण आहे. येथील लोकसंख्या (१९२१) २१९१२ असून या गांवाच्या नांवाचा अर्थ 'पवित्र अग्नीची टेंकडी' असा आहे व याबद्दल एक दंतकथाहि सांगतात. कर्नाटकच्या युद्धांत या गांवचा बराच संबंध आला आहे व त्यामुळें याला ऐतिहासिकदृष्टया बरेंच महत्त्व आहे. गांवांत चांगल्या पाण्याचा बराच तुटवडा आहे.

**तिरुवलम**—मद्रास, त्रावणकोर संस्थानांतील नेय्यात्तिंकर तालुक्यांत या नांवाचें खेडें व देवालय आहे. येथें असणारें विष्णूचें देवालय फार पवित्र व अतिशय जुनें आहे.

**तिरुवल्लूर, तालुका.**—मद्रास, चिंगलपट जिल्ह्यांतील वायव्येकडील तालुका. क्षेत्रफळ ७४४ चौ. मैल. लोकसंख्या १९२१ सालीं २०७१९९ होती. या तालुक्यांत ४६४ खेडीं असून तिरुवल्लूर हें मुख्य ठिकाण आहे. १९०३–४ सालीं सारा व कर यांचें उत्पन्न ४३२००० रुपये होतें. कोरत्तलैय्यार, आरनी, कूकम या नद्यांचें पाणी या तालुक्यांतील जमिनीला पुरविलें जातें.

**गांव.**—तिरुवल्लूर तालुक्याचें हें मुख्य ठिकाण असून येथें असणाऱ्या अहोबिलम् मठामुळें या गांवाचें महत्त्व फार आहे. यांत एक महादेवाचें व तीन विष्णूचीं अशीं चार देवळें आहेत. महादेवाच्या सभोंवतालीं असणाऱ्या आवाराची लांबी ९४० फूट व रुंदी ७०१ फूट आहे. ज्या ठिकाणीं हें देवालय आहे त्याच ठिकाणीं पूर्वी विक्षारण्य नांवाचें अरण्य होतें.

**तिरुवादी**—मद्रास, तंजावर जिल्हा व तालुका यांमध्यें हें गांव आहे. याची लोकसंख्या १९०१ सालीं ७८२१ होती. १८६० सालपर्यंत हें गांव ह्याच नांवाच्या तालुक्याचें मुख्य ठिकाण होतें. या गांवाला तिरुवैयार म्हणजे 'पांच पवित्र नद्या' असेंहि म्हणतात. याचें कारण असें कीं कोलेरून, कावेरी, कोमुरुत्ती, वेत्तर आणि वेन्नर या पांच नद्या या गांवापासून ६ मैल अंतरावर एकमेकींनां समांतर वाहतात. कावेरी नदीच्या दक्षिण तीरावरून पाहिलें म्हणजे येथील देवालयांचा देखावा जवळ जवळ काशींतील देवालयांच्या देखाव्याप्रमाणेंच दिसतो. येथें असणाऱ्या ७ देवालयांनां सप्तस्थलम् असें म्हणतात. येथें दरवर्षी भरणाऱ्या जंगी यात्रेंत सर्व देवालयांतील देव या मुख्य देवळांतील देवाच्या भेटीला आणतात. गांवांत एक संस्कृत, वैदिकपाठशाळा व इंग्लिश हायस्कूल आहे. पैकीं संस्कृत हायस्कूल लोकलबोर्ड चालवितें व बाकीचीं दोन देशी सद्गृहस्थ चालवितात.

**तिरुवडमरुदूर**—मद्रास, तंजावर जिल्ह्यांतील कुंभकोणम् तालुक्यांत हें एक गांव आहे. लोकसंख्या १९०१ सालीं ११२३७ होती. या गांवांत महादेवाचें फार जुनें देवालय आहे. हें गांव डेप्युटी तहशिलदाराचें मुख्य ठिकाण आहे.

**तिरुवलूर**—मद्रास, तंजावर जिल्ह्यांतील नेगापट्टम् तालुक्यांत हें एक गांव आहे. लोकसंख्या १९०१ सालीं १५४३६ होती. या गांवांत एक मोठा तलाव असून त्याच्या पूर्वेकडील किनाऱ्यावर अचलेश्वराचें प्रसिद्ध देवालय आहे. येथें दरवर्षी मोठी यात्रा भरते. या देवालयांत चोल, (राजराजा राजेंद्र) आणि पांड्य या राजघराण्यांचे लेख आहेत. या गांवांत एक हायस्कूल व एक तांदुळाचा बाजार आहे.

**तिरुव्वादानै**—मद्रास. मदुरा जिल्ह्याच्या रामनाद पोटविभागांत ही एक जमीनदारी तहशील आहे. लोकसंख्या १९०१ सालीं १५५६४३ होती. या तहशिलींत ८०९ खेडीं असून देवकोट्टा हें एक बरेंच मोठें गांव आहे. तिरुव्वादानै हें मुख्य ठिकाण आहे. मुख्य लोकवस्ती कलन, मरवन, अगमुदैय्यान या लोकांची आहे. परंतु यांच्यापेक्षांहि जास्त व वजनदार लोक म्हणजे नात्तुकोट्टैचेट्टी हे होत व हे लोक सावकारीचा धंदा फार मोठ्या प्रमाणावर करतात.

**तिरुव्वुर तहशील**—मद्रास, कृष्णा जिल्ह्यांतील ही एक जमीनदारी तहशील आहे. क्षेत्रफळ ३३८ चौरस मैल. १९०१ सालीं लोकसंख्या ६९२१९ होती. या तहशिलींत

८८ खेडीं असून तिरुव्वुर हें मुख्य ठिकाण आहे. १९०३-०४ सालांत सारा व कर यांचें उत्पन्न ३६००० होतें.

**तिरुज्ञान संबंदर**—दक्षिण हिंदुस्थानांत शैव समाजांत तिरुज्ञानसंबंदर याचें नांव फार पूज्य मानितात. सर्व शैव विशेषतः अब्राह्मण शैवसमाज त्याला फार श्रेष्ठ व त्याच्या ग्रंथाला वेदतुल्य समजतात.

तामिळ ग्रंथांत त्याला धर्माचार्य मानिलें असून, त्याची पूजाहि देवालयांतून करण्यांत येते व त्याच्या चरित्रावर नाटकेंहि झालीं आहेत; ग्रंथकार ग्रंथारंभीं त्याला नमन करतात. हा कवि होता. याचें चरित्र पेरियपुराणांत आलें आहे. चिंदबर शहराजवळील शियली (काली) या गांवीं हा जन्मला. याचें गोत्र कौंडिण्य, बापाचें नांव शिवपादहृदय व आईचें भगवति. याचें पहिलें नांव आळुदैय पिल्ले परंतु देवीनें याला प्रत्यक्ष दूध पाजल्यानें तिरुज्ञानसंबंदर (ज्ञानामुळें देवाशीं ज्याचा संबंध आला तो) हें नवीन नांव मिळालें. या पुढें तो कविता करूं लागला. यानें मदुरेच्या कून पांडयराजाला जैन धर्म सोडून पुन्हां सनातनधर्मी शैव बनविलें. नंतर यानें सर्व तामीळ प्रांतांत हिंडून आपल्या शैव पंथाचा प्रसार केला व बौद्ध धर्माचा पाडाव केला .याचें लग्न झाल्यावर मंडपांत एक दैवी अग्नि उत्पन्न झाला व तेथेंच हीं वधुवरें व सर्व मनुष्यें स्वर्गास गेलीं. यावरून लग्नमंडप पेटून त्यांत हीं सर्व जळालीं असें दिसतें.

कून पांडयाचा काल काल्डवेल यानें स. १२९२ हा दिला आहे. कून म्हणजेच सुंदर पाण्डय व मार्को पोलोचा सेंदर बेंडी होय असें काल्डवेल म्हणतो. नेल्सनच्या मतें कून हा अकराव्या शतकाच्या उत्तरार्धांत झाला. पी. सुंदरम पिल्ले याच्या मतें प्राचीन चोलांचा नाश होऊन नूतन चोल-पल्लव वंश भरत असतां तिरुज्ञान झाला (५-६ वें शतक); कून पाण्डयाच्या वेळीं नव्हे; कारण नवव्या शतकांतील एका काव्यांत त्याचा उल्लेख स्पष्ट आहे.

आद्य शंकराचार्यांच्या सौंदर्यलहरींतील द्रविड शिशु म्हणजे तिरुच होय. भक्तविलास, शिवभुजंग, शिवानन्दलहरी (आचार्यांची) या काव्यांतहि त्याचा उल्लेख आहे. त्यावरून आचार्यांच्या पूर्वी हा होऊन गेला; म्हणजे ७ व्या शतकाच्या आधीं झाला.

तिरु याचा मठ मदुरा येथें असून मठपति आपल्याला तिरुपासून ११५ वा पुरुष म्हणवितो, त्यावरून तिरुचा काल २३०० येतो व दामोदर पिल्ले वगैरे तत्प्रांतस्थ लेखक हा काल ग्राह्य धरतात पण त्यास ऐतिहासिक आधार नाहीं. पी. कुमारस्वामीहि त्याला सीलोनच्या गजबाहूचा समकालीन (स. ११३) मानतो. [ काल्डवेल-द्रविडियन ग्रामर;मदुरा डिस्ट्रिक्ट मॅनुअल; एस. चेट्टी-तामील प्लुटार्क; हल्टस्-सा. इं. इन्स्क्रिप्शन्स. पु. २; एपि. इंडिका पु. ४; इंडि. अँटि. पु. २५. ]

**तिरोडा**, त ह शी ल.—जिल्हा भंडारा. भंडारा जिल्ह्यांतील ही उत्तरेकडची तहशील आहे. उ. अ. २१°१०' ते २१° ४७' व पू. रे. ७९° ४३' ते ८०° ४०. याच्या पश्चिमेस भंडारा तहशील. उत्तरेस बालाघाट जिल्हा पूर्वेस नांदगांव; दक्षिणेस साकोली तहशील. क्षेत्रफळ १३२८ चौरस मैल. या तहशिलींत १३ जमीनदाऱ्या असून त्यांचें क्षेत्रफळ ७२० चौरस मैल आहे. लोकसंख्या (१९०१) २९१५१४. जमीनदारींतील एकंदर लोकसंख्या १६०५७० मालगुझारी जमीनीपैकीं ७६ चौरस मैल सरकारी जंगल आहे. जमीनदारींत १६४ चौरस मैल जंगल आहे. १९०५-०६ सालीं लागवडीखालीं जमीन ३६८००० एकर होती. या तहशिलींतील मुख्य पीक भ्हटलें म्हणजे भात हें होय. इतर पिकें जंवस, हरबरा आणि डाळीचीं पिकें हीं होत.

गां व.—जिल्हा भंडारा. हें तिरोडा तहशिलीचें मुख्य ठिकाण असून बंगाल-नागपूर रेल्वेचें एक स्टेशन आहे. लोकसंख्या (१९०१) ३६००. स्टेशनपासून हें खेडेंगांव एक मैल असून नवीन वस्ती स्टेशनाच्या आसपास होत आहे. दर रविवारीं येथें तांदुळाचा मोठा बाजार भरतो.

**तिलकवाडा**—बडोद्याच्या तिलकवाडा पोटभागाचें (मुंबई इ.) मुख्य ठिकाण. येथें सरकारी कचेऱ्या, पोलिस ठाणें, धर्मशाळा, शिक्षणाकरितां गुजराथी शाळा आहेत. मणिनागेश्वर, सप्तमातृका व तिलकेश्वर यांचीं देवळें मुख्य समजतात. धान्याचा व्यापार बराच चालतो.

**तिलिन**—वरचा ब्रह्मदेश. पकोक्कू जिल्ह्यांतील ही एक पश्चिमेकडील टाऊनशिप आहे. क्षेत्रफळ ४८८ चौरस मैल. लोकसंख्या (१९०१) १२१८३. येथें फक्त तांदुळाचेंच पीक आहे. १९०३-०४ सालीं बहुतेक जमीन ६ चौ. मै. असून सारा व कर यांचें उत्पन्न २७००० रुपये होतें.

**तिलिचेरी गांव**—हें गांव, मद्रास, जिल्हा मलबार, कोट्टयम् तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. पूर्वी हें गांव महत्त्वाचें नव्हतें, परंतु इ. स. १७०० मध्यें इंग्लिशांनीं या गांवांत वखार घातल्यापासुन फार प्रसिद्धीस आलें आहे. हल्लीं हें मलबारच्या बंदरांत तिसऱ्या नंबरचें बंदर असून १९०३-४ मध्यें यांत येणाऱ्या मालाची किंमत ४ लक्ष रुपये होती, व यांतून बाहेर जाणाऱ्या मालाची किंमत १०३ लक्ष रुपये होती. यांत चंदनाचें लांकूड व नारळ यांचा व्यापार वाढत्या प्रमाणावर आहे. या गांवांत १९०१ सालीं लोकसंख्या २७,८८३ होती.

**तिल्हर**, त ह शी ल.—संयुक्त प्रांत शाहाजानपूर जिल्ह्यांतील ही एक वायव्येकडील तहशील आहे. या तहशिलींत तिल्हर, मीरानपूर, कट्रा, निगोही, खेरवजेर, आणि जलापूर हे परगणे आहेत. क्षेत्रफळ ४१८ चौरस मैल.लोकसंख्या (१९०१) २५७०३५. १९०३-४ सालीं साऱ्याचें उत्पन्न ३,४६००० रुपये व करांचें उत्पन्न ५६००० रुपये होतें. १९०३-४ ३३० चौरस मैल जमीन वहीत आहे.

व हिंदुस्थानांत ६ व्या नंबरचें गणलें जातें. या ठिकाणीं सुताची एक गिरणी असून कापूस दाबण्याचे ५ कारखाने आहेत.

तुतिकोरीन बंदर चांगलें आहे. पण तोंडाशीं पाण्याची खोली फार कमी आहे. उत्तरोत्तर तुतिकोरीनचा व्यापार वाढत आहे. १९०३–०४ सालीं निर्गत २८६ लक्ष असून आयात १६१ लक्षांची होती निर्गत मुख्य जिन्नसः—कच्चा कापूस, जनावरें, काफी, कापूस, कापड, वनस्पती, औषधें, ढेप, तांदूळ, कच्चीं व कमावलेलीं कातडीं, मसाले व चहा हीं होत. आयात जिन्नसः--विलायती कापड व सूत, पेट्रोलियम, यंत्रें, लोखंडी सामान व इमारतीचें लांकूड वगैरे होत. सिलोन( कोलंबो )शीं तुतिकोरीनचें दळणवळण पुष्कळ असून मनुष्यांचें जाणें येणें जलमार्गानें अतिशय आहे.

**तुतीचें झाड**—मोरस मलबेरी झाडांचा किंवा झुडपांचा हा एक वर्ग आहे. याच्या तीन जाती हिंदुस्थानांत होतात, त्यांपैकीं मोरस इंडिका ही प्रसिद्ध आहे. मोरस आल्बा या झाडाचीं पानें वर्षास गळून पडतात. हें मूळचें उत्तर आणि पश्चिम आशियामधील आहे, पण याची लागवड ११०० फूट उंचीवर उत्तर हिंदुस्थानांत व सिंधूनदीच्या पलीकडील भागांत करतात. पंजाब आणि काश्मीरमध्यें मुख्यतः याच झाडांवर रेशमी किडे पोसतात. याचीं फळें खातात. तुतीला फेब्रुवारीमध्यें फुलें येतात व मे आणि जूनमध्यें फळें तयार होतात. एक घनफूट लांकडाचें वजन १९ ते २८ शेर असतें. हें लाकूड इमारतीला लावतात. तसेंच याच्या बोटी, घरगुती लांकडी सामान आणि शेतकीचीं अवजारें करतात.

दुसऱ्या जातीला मोरस इंडिका, तुत,तुनि, छोटाकिंबू,मेकप, सिगनेंक, करन, जोकुल, अंबोर, कंकिलिपूच, हिप्पल-नेराली व पोस अशीं नांवें आहेत.ही जात खालचा हिमालय व ब्रह्मदेशांतील शान डोंगर( ४००० फुटांवर ) येथें आढळते. तसेंच निलगिरी पर्वतावर हीं झाडें लावलेलीं आहेत. याचीं प्रथम रोपें तयार करून नोव्हेंबर डिसेंबरमध्यें लागवड करतात. याला मधून मधून पाणी देतात. १०।१२ वर्षें पीक घेतल्यावर झाडें कापून टाकतात. त्यांस पुन्हां फूट येते. याचीं फळें खातात व त्यांपासून दारू तयार करतात. उंच व पाण्याचा चांगला निचरा असलेल्या जमिनींत हीं झाडें लावतात. चिकण मातीची जमीन असल्यास उत्तम. जमिनींत बीं खोल पेरणें अत्यावश्यक आहे. पण कांहीं जागीं ३ ते ६ फूट रुंद व भाताच्या खाचर जमीनीपेक्षां ३ ते ४ फूट उंच, बांध तयार करून त्यांत बीं पेरतात. बंगाल जिल्ह्यांतील लागवडीची पद्धत हिंदुस्थानांत जेथें जेथें रेशीम काढतात तेथें तेथें प्रचारांत आहे. लागवडीची पद्धत सामान्यतः येणेंप्रमाणेंः—पावसाळ्यानंतर जमीन १८ इंच खोल खणून मग दोनदां नांगरून सारखी करून चांगलें पाणी देतात. १८ इंच अंतरावर ६ इंच खोल व १८ इंच व्यासाचे खड्डे करून त्यांत १५ नोव्हेंबरपासून १५ डिसेंबरपर्यंत त्यांत पूर्वी तयार केलेल्या कलमांची लागण करतात. खड्ड्यांत कलमें लावल्यावर त्यांना आठवड्यांतून एकदां पाणी द्यावें लागतें म्हणजे मग याला मुळें धरतात. हीं झाडें हातभर उंच झालीं म्हणजे सर्व शेताला पाणी द्यावें लागतें व २ ते ३ फूट उंच झालें म्हणजे दीड किंवा दोन महिन्यांनीं एकदां पाणी द्यावें लागतें.

तिसऱ्या जातीचें झाड मूळ चीनमधील होतें. पूर्वे तुर्कस्तानांत याचा कागद तयार करण्याच्या कामीं उपयोग करीत असत. परंतु कागदाचा रंग चांगला नसतो. याच्या सालीपासून एक प्रकारचा तंतू निघतो त्यापासून ज्याला चिनी चर्मपत्र म्हणतात तें तयार करतात. या झाडाचा मुख्य उपयोग म्हणजे याच्या पानावर रेशमाच्या किड्यांची उपजीविका होते हा होय.

याला अनंत कोंब फुटतात व हें झाड तोडलें असतां पुन्हां मुळापासून वाढतें. डेराडूनला याची लागवड झालेली होती; जंगलांत किंवा रुक्ष जागीं हें उगवत नाहीं. त्याचप्रमाणें अतिशय थंडीहि यास मानवत नाहीं. बंगाल, ब्रह्मदेश व मलबार या ठिकाणच्या पडित जमिनींत याची लागवड केल्यास ती फायदेशीर होण्याचा संभव आहे.

**तुनी तहशील**—मद्रास गोदावरी जिल्ह्याच्या ईशान्येस असलेली एक जमिनदारी तहशील क्षेत्रफळ २१६ चौ. मै. लोकसंख्या ( १९०१ ) ५८७६२. सबंध तहशिलींत तुनी नांवाचें एकच शहर असून त्याची लो. सं. ८८८२ व खेड्यांची संख्या ४८ आहे. १९०३–०४ सालीं काळीचें व इतर मिळून उत्पन्न ४१००० रुपये होतें. तहशिलीचा बराच मोठा भाग डोंगराळ व पहाडी आहे.

**तुंबड्या लावणें** ( कपिंग )—सुक्या तुंबड्या लावणें म्हणजे त्वचेवर एक पैसा ठेवून त्यावर कापूर ठेवून तो जळतांना त्यावर एक लहान पोकळ पात्र हळू हळू पालथें ठेवावें म्हणजे कापूर विझून चामडी वर फुगून येऊन तें भांडें त्वचेस चिकटतें. यासच घटिकाचूपण म्हणतात. हें भांडें चिकटण्याचें कारण हवेचा दाब उष्णतेमुळें नाहींसा होऊन भांडें चिटकतें व त्वचेच्या पृष्ठभागीं खोल जागेंतील साखळलेलें रक्त येतें व आंतील दाहवेदना शमतात. कांचेच्या हंडीसारख्या आकाराच्या पात्राचाहि उपयोग करतात व कापराऐवजीं स्पिरिटचे थेंब त्या कांचपात्रांत जाळून तें पात्र त्वचेस चिकटून बसेल अशा बेतानें तें पात्र त्वचेवर पूर्ण स्पिरिट जळून जाई तों लावतात. मान, कमर, छाती, पोट अगर जेथें दर्द असेल त्या ठिकाणीं ह्या घटिकाचूपणानें वेदनाशमन करतां येतें. एकापेक्षां अधिक पात्रें म्हणजे चार पांचहि जरूर तर लावावींत. तुंबड्या ( ओल्या ) लावून रक्त काढणें म्हणजे वरच्याप्रमाणें पृष्ठभागीं रक्त आणून त्यावर थोड्या, चोंचावल्याप्रमाणें बारीक व पुष्कळ जखमा शस्त्रानें अगर विशिष्ट यंत्रानें करून पुन्हां तेथें घटिकाचूपणक्रियेनें कांचपात्र लावलें म्हणजे हवेचा दाब नसल्यामुळें रक्त बाहेर शोषलें जाऊन पात्र रक्तानें भरून जातें. याप्रमाणें

१२ अगर अधिक पात्रें लावावींत. पात्रें रक्तानें भरल्यावर तीं काढावीं कारण तीं सुटण्याच्या बेतांतच असतात. आणखी रक्त काढवून वेदना व दाहरोगशमन व्हावें अशी इच्छा असल्यास पुन्हां त्याच जागीं कांचपात्रें लावून आणखी रक्त काढावें.

या कृत्यास जरा चलाखी व सराव पाहिजे. थोड्या वेळांत अंग न भाजतां त्या पात्रांत एकदम जितकी अधिक निर्वाततता करता येईल तितका पृष्ठभाग अधिक आकर्षिला जाऊन पात्र तितकें चांगलें चिकटतें; व वेदना व रोगशमनाचें कार्य तितकें अधिक चांगलें घडतें. घटिकाचूषण ( सुक्या तुंबड्या ) म्हणजे एक चांगला सुलभ व गुणकारी घरगुती उपाय आहे.

तुंबरु ( तुंबुरु )—प्राधेच्या गंधर्वपुत्रांतील एक. याची स्त्री रंभा होती. व हा शापानें दंडकारण्यांत विराध झाला होता. हा चैत्रमासीं सूर्यासमागमें संचार करणाऱ्या गणांतील गंधर्व होय. एका ऋषीचेंहि तुंबरु असें नांव होतें.

तुमकूर, जिल्हा.—म्हैसूर संस्थानच्या ईशान्येस हा जिल्हा असून याचें क्षेत्रफळ ४१५८ चौ. मै. आहे. या प्रदेशांत नारळाचीं व ताडाचीं झाडें विपुल आहेत. तुमकूर जिल्ह्याचा ईशान्य भाग अतिशय सुपीक असून त्यास पाटाचें पाणी मिळतें येथील हवापाणी सुंदर व निरोगी असून युरोपीयन व एतद्देशीय लोकांनां सारखें सुखावह आहे. उष्णतेचें मान ७४ पासून ८३ अंशापर्यंत असतें; व दरसाल पावसाचें मान ६९ इंच असतें.

इतिहासः—तुमकूर येथें पुरातन काळीं गंग सत्ताधीश होते. सांप्रत ज्या ठिकाणीं सिरा तालुका आहे त्याच्या सरहद्दीवर हेमवती असून पूर्वी हिला पेन्जेरु अथवा हेन्जेरु असें म्हणत असत; या ठिकाणीं पल्लवांची राजधानी होती, व निदुगल येथें त्यांचा किल्ला होता. राष्ट्रकूटांच्या हातीं या प्रदेशाची सत्ता आल्यावर त्याचा विस्तार फार झाला. गंग घराण्यानंतर होयसळांनीं पेन्जेरु व निदुगल येथील नाइकाचा पराभव करून नंतर ते राज्य करूं लागले. त्यानंतर विजयानगरचे राजे येऊन देवरायदुर्ग येथें त्यांनीं आपलें मुख्य ठाणें केलें. विजयानगर नामशेष झाल्यावर विजापूरच्या बादशहानीं १६३८ सालीं तुमकूर जिल्हा आपल्याकडे ठेवून तेथें शिवाजीचा बाप शहाजी याला देखरेख सांगितली. मराठे १७५७ सालीं सिरा भागांत आले. सन १७६१ त निजामाचा भाऊ बसालतजंग यानें हैदरअलीला सिराचा नवाब करून तुमकूर जिल्हा व्यापून टाकला. १७६६ सालीं सिरा टिप्पूपासून मराठ्यांनीं पुन्हां सर केलें. सिरा येथें मुसुलमानांच्या मशिदी पाहण्यासारख्या आहेत. त्यांत मलिक रहीमचें थडगें व जुम्मामशीद हीं मुख्य होत. त्याजवरील शिलालेखांचे तरजुमे करून छापलेले आहेत. तुमकूर जिल्ह्याचा लो. सं. १९११ सालीं ७३५३४६ होती.

शेतकीः—मद्दागिरी, चिक्कनायकनहल्ली हे तालुके व सिरा व कारेटगिरचा उत्तर भाग सोडून बाकीची जमीन हलकी व कडक आहे. दक्षिणेकडील व पश्चिमेकडील जमीन लाल असून तींत तलाव मोठे आहेत. पूर्वेकडील तालुक्याची जमीन रेताड असून उत्तरेकडची जमीन काळी आहे. यांत रागी, हरभरा, तांदूळ वगैरे पिकें होतात. सन १९०४ सालीं राखीव जंगल १७५ चौ. मै. होतें. व १९०–०४ सालीं. जंगलउत्पन्न ६१००० रुपये झालें. चिक्कनायकहल्ली व त्याच्या आसपास अशोधित लोखंड पुष्कळसें सांपडतें. चुनखडी सर्वत्र सांपडते. सन १९०२ त चिक्कनायकहल्ली तालुक्यांत बेळारा गांवीं सोनें काढण्याचे प्रयत्न झाले असून त्यांत थोडें फार यश आलें होतें.

व्यापारी जिन्नसः—जाड भरडे कापसाचें कापड, रेशमी कापड, घोंगड्या, दोरखंड, सण, ताग आणि मुंज गवत हे व्यापारी जिन्नस होतात. लोखंड व साखरेचे कारखानेहि आहेत.

दळणवळणः—जिल्ह्यांतील व्यापार बहुधां लिंगायत लोकांच्या हातीं आहे. गुब्बी ही त्यांची मुख्य पेठ असून येळवी, तुरुवेकर, तिपटूर, चिक्कनायकहल्ली याहि मोठ्या बाजारच्या पेठा आहेत. बाहेरून येणाऱ्या मौल्यवान जिन्नसांत रेशीम, कापूस, साखर व खाण्याचे पदार्थ यांचा समावेश होतो; व बाहेरगावीं पाठविण्याचे जिन्नस नारळ, सुपारी, गळिताचीं धान्यें व तेलें हे होत या जिल्ह्यांत दक्षिण मराठा रेल्वे ६१ मैल आहे. या जिल्ह्यांत ८ तालुके आहेत. चिक्कनायकनहल्ली, गुब्बी, कुनीगल, मद्दागिरी, पावुगड, सिरा, तिपटूर, आणि तुमकूर.

तालुका.—म्हैसूर, तुमकूर जिल्ह्यांतील पूर्वेकडील तालुका. क्षे. फ. ४५५ चौ. मै. (१९११) लोकसंख्या ११६८५४ तुमकूर तालुक्यांत ३ शहरें असून ४७७ खेडीं आहेत १९०३–०४ सालीं वसुलीचें उत्पन्न १९५००० होतें. याच्या उत्तरेस देवरायदुर्ग डोंगर असून सभोंवताली जंगल आहे. जयमंगली नांवाची नदी याच ठिकाणीं उगम पावते देवरायदुर्गाच्या दक्षिणेस सुंदर तलाव असून सभोंवतालचा प्रदेश फार सुपीक आहे. उत्तर भाग जरा नीरस आहे नारळ व सुपारीचे मळे पुष्कळ दृष्टीस पडतात.

शहर.—म्हैसूर तुमकूर जिल्हा आणि तालुक्याचें मुख्य शहर. हें शहर सदर्न मराठा रेल्वेवर बंगलोरपासून वायव्येस ४३ मैलांवर आहे. लोकसंख्या १९११ सालीं ६०३९ होती. हें शहर देवराय दुर्ग डोंगराच्या नैर्ऋत्येस उंचावर वसलेलें असून जवळ एक मोठा तलाव आहे. तलावाच्या सभोंवतीं सुंदर केळींचे व ताडांचे बगीचे असून मनोहर वृक्षराजी आहेत. प्रस्तुतचें शहर म्हैसूर घराण्यापैकीं एक कांत अरसू नांवाच्या पुरुषानें स्थापलेलें आहे असे म्हणतात. याच्या तटाच्या भिंती जमीनदोस्त ...

येथें म्यु. कमिटीची व्यवस्था १८७० साली झाली. १९०३–०४ साली उत्पन्न १०००० आणि खर्च १५००० रुपये झाला.

**तुमसर**—मध्यप्रांत. भंडारा जिल्हा आणि तहसिलींतील शहर. हें बंगाल–नागपूर–रेल्वेवर भंडाऱ्यापासून २७ मैल व मुंबईपासून ५७० मैल लांब आहे. याची लोकसंख्या १९११ सालीं ४३७८ होती. तुमसरला म्यु. कमिटी १८६७ सालीं स्थापन होऊन १९०३–०४ सालीं ४००० रुपये उत्पन्न झालें. हें व्यापारी गांव असून सिवनी व बालाघाटा जिल्ह्यांतील माल याच ठिकाणीं येतो. तुमसरच्या आसपास तांदुळाचें उत्पन्न उत्तम प्रकारचें असून पुष्कळ असतें. कापसाचें कापड विणून तयार करणें हा तेथील लोकांचा मुख्य धंदा समजला जातो. कापडाची वडामोड ३ लक्ष रु. पर्यंत जाते. शिवाय तुमसर येथें चाकजोड्या तयार करून बाहेरगांवीं नागपूर व वऱ्हाड या प्रांतांत विक्रीला जातात. या ठिकाणीं एक मराठी शाळा, एक मुलींची शाळा व एक दवाखाना आहे.

**तुरटी**—फिटकारी, फटकिरी, स्फटिकारी, इतर नांवें शिव, क्षिक फटकी, चंकाचिन, आहेत. बहार, पंजाब व कच्छमध्यें कित्येक ठिकाणीं तुरटी तयार करतात. वरच्या ब्रह्मदेशांतहि तुरटी सांपडते; पण तेथें ती तयार केली जात नाहीं. एकेकाळीं चीनमधून हिंदुस्थानांत बरीच तुरटी येत असावी. हिंदुस्थानांत तयार होणाऱ्या मालाचें प्रमाण अनिश्चित आहे; परंतु दर वर्षास १००० टनांपेक्षां अधिक तुरटी निघत नसावी. शिवाय येथील तुरटी आयात तुरटीइतकी पांढरी नसते. १९०६–७ सालीं ३१९४०७ रु. किंमतीची ७२३४४ हं. तुरटी हिंदुस्थानांत आली. तुरटीचा मुख्य उपयोग रंगकामांत रंगबंधकर म्हणून होतो; परंतु औषधाकरितां, फोटोग्राफीमध्यें व शिरका शुद्ध करण्याकरितांहि तिचा उपयोग करतात.

रासायनिक परिभाषेंत $म_2 गप्र_4 . म_3 (गप्र_4)_3 . {}^{24} उ_2 प्र$ या सूत्रानें दर्शविल्या जाणाऱ्या स्वेदार गंधकितांनां हें नांव दिलेलें आहे. या ठिकाणीं म ही आल्कली धातू पालाश (पोट्याशियम) सिंधु (सोडियम), रुबीडियम, केशियम, रुपें, किंवा अन्न (अमोनियम) यांबद्दल खूण असून $म^3$ या अक्षरानें अल्युमिनियम्, क्रोमियम् किंवा लोहिक लोखंड या त्रिशाफिक धातूंपैकीं एक दर्शविली जाते. या क्षारांचा रंगाऱ्या व इतर औद्योगिक कामांत फार उपयोग होतो. ते पाण्यांत विरतात, व त्यांची चव तुरट, आंबट व गुळचट लागते. लिटमसवर त्यांचा परिणाम अम्लांसारखा होतो. व त्यांचे समकोन अष्टकोनाकृति स्फटिक बनतात. तापविले असतां ते वितळतात व ही क्रिया चालू ठेविल्यास स्फटिकीभवनाचें पाणी निघून जातें, क्षारावर फेस येऊन त्याचा आकार वाढतो व शेवटीं पिठुळ भुकटी उरते. बाजारांत मिळणारी तुरटी ही पालाश (पोट्याशियम) धातूचा क्षार होय. पूर्वींचे लोक सोरा व तुरटी या दोहोंनांहि एकाच नांवानें संबोधीत असत. तुरटी तयार करण्याकरितां पुष्कळ खनिज पदार्थांचा उपयोग केला जातो त्यांपैकीं तुरटीचा दगड, बॉक्साइट व क्रायोलाइट हे मुख्य आहेत.

तुरटीच्या दगडापासून तुरटी तयार करण्याकरितां त्याची भुकटी करून ती उघड्या हवेंत ठेवतात. हवेंत ठेवली असतां तिला एकसारखें पाणी दिलें जातें त्यामुळें अखेर फार बारीक पूड खाली पडते. नंतर त्या भुकटींतील क्षार काढून घेण्याकरितां तींत ऊन पाणी घालून वरचें पाणी ओतून घेतात व मग स्फटिकीभवन होण्याकरितां ठेवतात.

बॉक्साइट किंवा मातीपासून तुरटी तयार करतांना प्रथम त्याची हळूहळू भुकटी करून त्यांत गंधकाम्ल मिसळतात, व तें उकळूं लागेपर्यंत सावकाश तापवितात. कांहीं वेळ तें तसेंच ठेवल्यानंतर वरचें स्वच्छ द्रावण ओतून घेऊन *त्यांत अम्लपालाशगंधकित मिसळतात व स्फटिकीभवन* होण्याकरितां ठेवून देतात. तुरटी तयार करण्याकरितां क्रायोलाइटचा उपयोग करणें असल्यास, त्यांत खटकर्वित मिसळून तापवितात. त्यायोगानें (सिंधुस्फादित सोडियम अल्युमिनेट) बनतो. तो पाण्याबरोबर काढून घेऊन त्या द्रावणांत सिंधुद्विकर्वित टाकून किंवा कर्बद्विप्राणिदाचा प्रवाह सोडून सांका काढतात. हा सांका गंधकाम्लामध्यें विरविल्यानंतर, त्यामध्यें जरूर तेवढें पालाशगंधकित मिळवून तें द्रावण स्फटिकीभवन होण्याकरितां ठेवून देतात.

तुरटीचे स्फटिक समकोन अष्टकोनाकृति असून, ती पाण्यांत पुष्कळ विरते. द्रावणाच्या योगानें लिटमस तांबडा होतो व द्रावण तुरट लागतें. तुरटी लाल होईपर्यंत तापविली असतां तिचा भुसभुशीत व ठिसूळ गोळा बनतो; त्याला तुरटीची लाही असें म्हणतात. ती ९२° ला वितळते. तुरटीच्या द्रावणांत सिंधुकर्वित मिळविल्यानें शिथिल तुरटी मिळते; रंग पक्का करण्याकरितां तिचा फार उपयोग होतो. हातानें तयार केलेल्या कागदांनां लावण्याचा रंग तयार करण्याकरितां व गढूळ द्रवपदार्थ स्वच्छ करण्याकरितां तुरटीचा उपयोग करतात.

**तुरय्यूर**—मद्रास, त्रिचनापल्ली जिल्हा. यांतील मुसिरी तालुक्यांतील एक शहर. याची लो. सं. (१९११) १३२४९ असून तुरय्यूर जमिनदारीचें हें मुख्य शहर असल्यामुळें नायब तहशिलदार व सब मॅजिस्ट्रेटच्या कचेऱ्या येथें असल्याकारणानें तुरय्यूर फार लवकर महत्त्वाला आलें. जमिनदाराची स्थिति व कारकीर्द विविध प्रकारची आहे. स. १७५२त त्रिचनापल्लीच्या वेढ्यात म्हैसूरच्या लष्करनें तुरय्यूरवर स्वारी करून तेथील जमीनदाराला राज्यभ्रष्ट करून त्याचा चुलत भाऊ गादीवर बसविला. त्यानें खंडणी दिली नाहीं म्हणून १७५५सालीं त्याला गादीवरून काढून पूर्वीच्या जमिनदाराला गादी दिली. सन १७७३ त जमीनदार व त्याचा मुलगा यांत

तंटा उत्पन्न झाला. या तंट्यांत खंडणीची रक्कम मात्र अर्काटच्या नबाबानें वाढविली. बापलेकांचा मेळ झाला पण खंडणी देणें दोघांच्याहि शक्तीबाहेर होतें. सबब दोघे तंजावरास पळून गेले; पैकीं बाप तेथें मरण पावला. १७९६ सालीं मुलानें थोडे हातपाय हलविण्याचा प्रयत्न केला. शेवटीं नबाबानें त्याला दर महिना १००० रुपये द्यावे व जमिनदारीची व्यवस्था पहावी असें ठरलें. ती जमिनदारी इंग्रजांकडे शेवटीं आली. इंग्रज सरकारनें त्याची व्यवस्था करून सनद करून दिली. जमीनदार तेलगू असून रेड्डी वंशापैकीं आहेत. ती नुकतीच अविभाज्य अशी ठरली आहे.

तुरा—आसाम. गारोहिल्स जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें खेडें समुद्रसपाटीपासून १३०० फूट उंचीवर सपाट भागावर वसलेलें आहे; आणि ज्या मुलक्यापासून त्याला तुरा हें नांव मिळालेलें आहे तो मुलका समुद्रसपाटीपासून ४५०० फूट उंच सारखा गेलेला आहे. डालूला येथून गाडीरस्ता गेलेला आहे. १९११ सालीं तुऱ्याची लो. सं. १५८६ होती. १८६९ सालीं गारोहिल्स हा नवा जिल्हा करतेवेळेस तुरा त्याचें मुख्य ठिकाण करावें असें वाटत होतें. तुऱ्याच्या आसपास जंगल असल्यामुळें व वस्तीपासून पहाडाचा देखावा भव्य असल्यामुळें तुऱ्याला एक प्रकारची विलक्षण शोभा आलेली आहे. दरसाल पावसाचें मान १२५ इंच असतें व हवा उष्ण असून रोगट असते. पाण्याचा पुरवठा या ठिकाणीं चांगला आहे. येथें बाजार चांगला भरतो

तुरी—यांची एकंदर लोकसंख्या ( १९११ ) ९०३७८. तुर अथवा भेरी वाजविणारे. हे बहुधा गुजराथ प्रांत व एतद्देशीय संस्थानांतून आढळतात. त्यांच्याच सांगण्यावरून ते भाटांचे वंशज असावे असें दिसतें. त्यांच्या संबंधानें दुसरी अशी माहिती सांगण्यांत येते कीं, ही व भंगी मुसुलमान जातींच्या वेश्यांपासून उत्पन्न झालेली तुरी जात होय. जातींत धेड व भंगी यांच्यामध्यें तुरी लोक येऊं शकतात. यांत विधवेनें दिराशीं लग्न करण्याची चाल आहे. तुरी लोकांत घटस्फोट करतात. ते मांसाहारी असून दारू पितात. त्यांच्या मुख्य देवता रामिया व हर्षिद होत. त्यांचे उपाध्ये गुरुदास अथवा धेड ब्राह्मण असतात. ते मृताला पुरतात. आसामांतहि या नांवाची एक जात असून ते मूळचे छोटानागपुराकडील अनार्य असावे. हे मजुरी करतात. लोकसंख्या ( १९११ ) १६५०१.

तुरुवन्नूर—म्हैसूर, चितलदुर्ग जिल्हा व तालुक्यांतील एक शहर. हें चितलदुर्गपासून ११ मैल आहे. १९०१ सालीं लोकसंख्या ५०३५ होती. तेथील लोकांचा उद्योग मुख्यत्वेंकरून कापसाचें कापड व घोंगड्या विणणें हा होय. लालरंग येथें चांगला होतो. १८९९ सालीं म्यु. कमिटी स्थापन झाली. १९०३-०४ सालीं उत्पन्न ८०० रुपये व खर्च २००० झाला.

तुर्भे—मुंबई. ठाणें जिल्हा साष्टी तालुक्यांतील एक बंदर. मुंबई शहरापासून ईशान्येस ३ मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९०१ ) २७७२ होती. हें एक लहानसें खेडें असून या ठिकाणीं जकातीचें ठाणें, एक मिठागर व एक पंडकें पोर्तुगीज देऊळ आहे. व्यापारी धडामोड १९०३-०४ सालीं ७१॥ लक्ष झाली. आयात ४०॥ लक्ष, निर्गत ३१ लक्ष. मुख्य आयात जिन्नस गुरें, गोणपाट, गवत, साग असून तांदूळ, मीठ, सरपण आणि गवत इत्यादि निर्गत माल आहे.

तुरुष्क—सुमारें ८५० सालीं लिहिलेल्या सागरताल लेखांत " तुरुष्क " असें एका प्रदेशाचें नांव सांगितलें आहे. तुरुष्क हे कोणत्या प्रांताचें नांव असावें हें समजत नाहीं. तुरुष्क हा शब्द " तुर्क " या शब्दापासून निघाल्याचा बराच संभव आहे. पण तुर्कांनीं इ. स. १० व्या शतकाच्या उत्तरार्धांत म्हणजे सबक्तगीनाच्या वेळीं हिंदुस्थानांत प्रवेश केला. त्याच्या आधीं तुर्कांचा उल्लेख हिंदुस्थानांत आल्याचा सांपडत नाहीं. महाभारतांत तुरुष्क हा शब्द कोठेंहि उपलब्ध नाहीं. भागवतांत तुरुष्क हा शब्द सांपडतो; पण भागवत हा ग्रंथ ८ व्या शतकानंतर लिहिला गेला तेव्हां त्याचाहि फारसा उपयोग नाहीं. स्मिथनें असा तर्क बसविला आहे कीं, तुरुष्क-तुर्क हें अरबांचें नांव असावें; पण रा. वैद्यांस हें मान्य नाहीं. अरबांना " ताजिक " अशी संज्ञा आहे व प्रसंगीं त्यांनां बर्बर असेंहि म्हणत. पण ८५० च्या पूर्वी त्यांनां तुरुष्क असें कोठेंच म्हटलेलें आढळत नाहीं. रा. वैद्यांचा तर्क असाः—इ. स. ६०० ते ८०० पर्यंत हिंदुस्थानांत एकावर एक सारख्या स्वाऱ्या करण्यांत अरबांचें सैन्य संपत आलें व त्यांनां नवीन स्वारीकरितां तयार होणाऱ्या सैन्याचा तुटवडा पडूं लागला असावा, व हिंदुस्थानांत अगणित संपत्ति मिळाल्यामुळें बगदादचे खलीफाहि आपला काल ऐषारामांत घालवूं लागले होते. अशा वेळीं हिंदुस्थानांत म्हणजे सिंधमध्यें जें सैन्य अरबांतर्फे पाठविलें जात असावें त्यांत तुर्क लोकांचा भरणा विशेष होत असावा; आज ज्याप्रमाणें हिंदी सैन्य इंग्रजांच्या वतीनें जर्मनांशीं लढलें त्याप्रमाणें पगारी तुर्कांचा अरबांच्या सैन्यांत झपाट्यानें प्रवेश होत असावा; त्यामुळें ९ व्या शतकानंतर सर्वच परकीयांनां तुर्क असें नांव एतद्देशीय लोक देत असावे. [ मध्ययुगीन भारत, भा. २ रा. पृ. १८०. ]

तुर्क लोक—राजकीय, भाषाविषयक व मानवजातिशास्त्रीय अशा तिन्ही दृष्टींनीं पाहिलें असतां तुर्क शब्दाचे तीन निरनिराळे अर्थ होतात. राजकीय दृष्ट्या तुर्क लोक म्हणजे तुर्कस्तानच्या सुलतानाच्या अंमलाखालचे लोक असा अर्थ होतो. भाषेप्रमाणें पाहिलें असतां उरल् अल्टाइक भाषा बोलणाऱ्या लोकांनां तुर्क लोक म्हणतात. मानववंशशास्त्रदृष्ट्या तुर्क लोकांचे विशेष शारीरिक गुणधर्म सांगतां येत नाहींत; कारण यूरोपांत आल्यावर त्यांनीं मिश्र विवाह केले व त्याचप्रमाणें

ख्रिस्ती मुलें घेऊन त्यांनां भाषा, रीती वगैरे बाबतींत तुर्क बनविलें. या कारणांमुळें अर्वाचीन तुर्क लोक शारीरिक दृष्ट्या यूरोपांतील लोकांप्रमाणें आहेत. ( याचप्रमाणें त्यांनीं मध्य आशियांतहि केलें ). यांनींच यूरोपांत व हिंदुस्थानांत महंमदी धर्माची स्थापना केली. भाषा व अंशतः जातिदृष्ट्या तुर्क लोकांचे पुढे दिलेले पोटविभाग आहेत.

(१) याकुत लोक लेना नदीच्या मधल्या व खालच्या भागावर रहातात. ते तुर्क भाषा बोलतात. शिल्पकला, व्यापार व शेती या कामांत ते फार हुशार असून मेहनती आहेत.

(२) रशियांतील तुर्क भाषा बोलणाऱ्या मुसुलमानांनां तातार ( तार्तर ) म्हणतात.

(३) किरघिज लोक आशियांतील रशियांत रहातात. कांहीं चीनच्या राज्यांत रहातात. गुरांचे कळप पाळून त्यावर हे लोक उपजीविका करतात.

(४) उझबेग जात मिश्र असून त्यांच्यामध्यें तुर्क लोकांचे विशेष गुणधर्म बऱ्याच प्रमाणांत आढळतात.

(५) मोंगल, इ. स. १५२० मध्यें हिंदुस्थानावर स्वारी करणाऱ्या तुर्क लोकांनां मोंगल हें नांव दिलेलें आहे.

(६) कास्पिअन समुद्र व ऑक्सस नदी यांच्यामधील प्रदेशांत राहणाऱ्या लोकांनां तुर्कोमन म्हणतात.

(७) सुलतानाच्या मुसुलमानी प्रजेला ऑटोमन अथवा ओस्मानली म्हणतात, परंतु अरब व अल्बेनियांतील लोकांनां हें नांव लावीत नाहींत.

इ ति हा स.—चीनच्या इतिहासांत ख्रि. पू. १४०० व विशेषतः ख्रि. पू. २०० नंतर ह्विंग-नु नांवाच्या भटकणाऱ्या लष्करी बाण्याच्या लोकांचा उल्लेख आहे. इ. स. ४३३ या वर्षी असेना नांवाची ह्विंग-नु जातीची एक शाखा, ज्वेन-ज्वेन नांवाच्या दुसऱ्या ह्विंग-नु जातीच्या शाखेच्या आश्रयाला गेली. ते अर्वाचीन शानतन शहराजवळ रहात होते. त्यांच्या वसतिस्थानाच्या नजिक एक तुर्क नांवाची टेंकडी होती. त्या टेंकडीच्या नांवावरून तेथील असेना शाखेच्या लोकांचा चीनच्या इतिहासांत तुर्क नांवानें उल्लेख आहे. तुर्क लोकांनीं ज्वेन-ज्वेन लोकांचा पराभव करून त्यांनां नामशेष केलें. पुढें इ. स. ५६० च्या सुमारास तुर्क लोक ओक्सस नदीच्या कांठच्या प्रदेशांत येऊन इ. स. ५६७ त त्यांनीं पूर्व रोमचा सम्राट दुसरा जस्टिन याच्याकडे आपला वकील पाठविल्याबद्दल उल्लेख सांपडतो. इ. स. ६२०–२८ या काळांत तुर्क लोकांनीं हिरॅक्लिअस याला इराणच्या विरुद्ध मदत केली. मध्यंतरीं तुर्क लोकांचे दोन विभाग झाले. एकाला उत्तर तुर्क म्हणत, हे बैकल सरोवरांच्या जवळ रहात होते; व दुसऱ्याला पश्चिम तुर्क म्हणत; हे तारकंदच्या उत्तरेस रहात होते. या लोकांपासून चीनच्या साम्राज्याला धोका पोहोंचू नये म्हणून चिनी लोक तुर्क लोकांत फूट पाडून तंटे उपस्थित करण्याचा प्रयत्न करीत.

इ. स. ६३० मध्यें उत्तर तुर्कांनां चीनी लोकांनीं जिंकलें. त्यानंतर एक शतकपर्यंत तुर्क लोकांची माहिती इतिहासांत आढळते. व पुढील दोन शतकांचा इतिहास मुळींच उपलब्ध नाहीं. इ. सनाच्या दहाव्या शतकांत तुर्क लोकांनीं गिझनी येथें गिझनी घराणें स्थापिलें व त्याच कालांत सेल्जुक लोकांचा उदय झाला. हे लोक कवक नांवाच्या राजघराण्यांतील असून ते घुज्ज नांवाच्या राष्ट्र जातीचे होते. त्यांचे नायक तोघ्रल व चाकिर यांनीं गिझनी घराण्याच्या लोकांनां हिंदुस्थानांत हांकून दिलें; व स्वतः अब्बासीद खलिपाचे रक्षणकर्ते झाले.

चाकिरचा मुलगा अल्प-अर्स्लेन यानें बायझंटाइन लोकांचा पराभव केला व अशा रीतीनें ऑटोमन साम्राज्याचा पाया घातला. त्याचा मुलगा मलिकशहा याचें राज्य अर्वाचीन ( आशियांतील ) तुर्कस्तानावर होतें. त्याच्या मृत्यूनंतर ( १०९२ ) त्याच्या राज्याचे पुष्कळ विभाग झाले; व आणखी कांहीं नवीन राज्यें तुर्क लोकांनीं स्थापिलीं. इ. स. १२१९ मध्यें मध्य आशियांतून यूरोपकडे तुर्क लोकांची एक टोळी देश जिंकण्याच्या उद्देशानें आली. तिचें आधिपत्य चेंगीझ खानाकडे होतें. त्यानें सर्व लहान लहान राज्यें जिंकलीं. त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या राज्याचे विभाग झाले. त्याचा मुलगा जगतै याला गिझनी, काश्गर, बल्ख वगैरे प्रांत मिळाले. चेंगीझ व त्याचे अनुयायी मोंगल होते. इ. स. १३७० मध्यें तैमूरलंगच्या स्वारीमुळें याचा पाडाव झाला. तैमूरलंग हा तुर्क होता. तैमूरलंगाचें घराणें समरकंद येथून जिंकलेल्या प्रदेशाचा राज्यकारभार पहात होतें. त्यांच्या राज्यांत उत्तर अफगाणिस्तान, इराण, ट्रान्सओक्झिआना व तुर्कस्तान हे प्रदेश होते.

शैबानि नांवाच्या वंशानें तैमूरलंगाच्या घराण्याचा पाडाव केला. त्यांनां उझबेग असें म्हणत. हल्लींच्या तुर्क साम्राज्याचें उत्पादक ओस्मन घराणें असून तें खोरासानहून आशियामायनरमध्यें आलें.

तुर्क लोक अनुकरणप्रिय असावे असें दिसतें; कारण आजपर्यंत ज्या लोकांशीं त्यांचा संबंध आला त्यांच्या चालीरीती तुर्क लोकांत दृष्टीस पडतात. इस्लाम धर्म स्वीकारण्याच्या पूर्वी त्यांनीं अंशतः तरी बौद्धधर्म, अग्निपूजा व नेस्टोरियन ख्रिस्ती धर्म स्वीकारला असावा; कारण अगदीं अलीकडे खोतानमध्यें बौद्ध संस्कृति प्रचलित असावी या बद्दलचा पुरावा सांपडला आहे. तुर्क अथवा तातार-तुर्क ही भाषा उरल्-अल्ताइक भाषाविभागापैकीं एक आहे.

**तुर्कस्तान,** प श्चि म क डी ल—यांत आशियांतील व यूरोपांतील दोन्ही तुर्कस्तानांचा समावेश होतो आणि तुर्की साम्राज्यांत यूरोपांतील तुर्कस्तान, आशियांतील तुर्कस्तान, ट्रिपोली व बारका ( बेंगझी ) वगैरे आफ्रिकेंतील प्रांत आहेत. याशिवाय कांहीं मांडलीक संस्थानें व परकीय अमलाखालीं

असलेले प्रांत येतात. (ही महायुद्धापूर्वीची स्थिति होय. नंतरचे फेरफार लेखाच्या शेवटीं दिले आहेत).

यूरोपांतील तुर्कस्तान हें बाल्कन द्वीपकल्पाच्या मधोमध आहे. ह्याच्या उत्तरेस सर्व्हिया व बल्गेरिया; पूर्वेला काळा समुद्र व बास्फरस, दक्षिणेला मार्मोराचा समुद्र, डार्डोनेल्स, इजियन समुद्र व ग्रीस; पश्चिमेला आयोनियन व आड्रियाटिक समुद्र आहेत. आशियांतील तुर्कस्तानच्या उत्तरेस काळा समुद्र, पश्चिमेस इजियन समुद्र, पूर्वेस इराण व ट्रान्सकाकेशिया आणि दक्षिणेस अरबस्तान व भूमध्य समुद्र आहे.

बाल्कन द्वीपकल्पांतील बास्फरस ते आड्रियाटिकपर्यंतच्या भूभागावर तुर्क सुलतानाची मालकी आहे. १८९८ त ग्रेटब्रिटन फ्रान्स, इटली व रशिया यांच्या संरक्षणाखालीं क्रीट बेटाला स्वातंत्र्य दिलें सुलतान हा केवळ क्रीटबेटाचा नांवाचा मालक आहे. आशियांतील तुर्कस्तानांत मुसुलमानी धर्माचें अतिशय वर्चस्व असल्यामुळें ओटोमन घराण्याचा मुख्य आधारस्तंभ साम्राज्यांतील हाच भाग होय. यांत अनाटोलियाचें डोंगरपठार (आशिया मायनर), आर्मिनिया व कुर्दिस्तानचा डोंगराळ प्रदेश, मेसापोटेमियाचा सखल प्रदेश, सीरिया व पॅलेस्टाईनचा डोंगरी भाग व अरबस्तानचा किनारा इत्यादिकांचा समावेश होतो. तुर्की अरबस्तानांत एल–हसा, तेहामा, हजाझ व येमेन इत्यादि भाग येतात.

आफ्रिकेंतील ट्रिपोली व बारका हे फक्त तुर्कस्तानच्या अंमलांत आहेत. तुर्कसत्तेखालीं ईजिप्त देश होता. पण १८४१ त तो स्वतंत्र झाला व १८८१ पासून ब्रिटिशांच्या संरक्षणाखालीं आला. नाममात्र तुर्क अंमलाखालीं असलेला ईजिप्त व इतर प्रांत धरून तुर्क साम्राज्याची एकंदर लोकसंख्या १९१० सालीं सुमारें ३६३२३५३९ भरली. खास तुर्क अंमलाखालील लोकसंख्या २५९२६००० होती.

जाती व धर्मः—येथें इस्माली अथवा तुर्क सुमारें १ कोट आहेत. ह्यांच्यापैकीं १५ लाख युरोपीय तुर्कस्तानांत आहेत. सेमिटिक शाखेपैकीं अरब, यहुदी व सीरियन लोक आहेत. आर्य शाखेपैकीं स्लाव्हसर्ब, बल्गेरियन, पोमक, कोसाक व ग्रीक लोक आहेत. १९१० सालच्या खानेसुमारीवरून असें दिसतें कीं, शेकडा ५० मुसुलमान व शेकडा ४१ रुढधर्म पंथाचे असून बाकीचे इतर लोक आहेत. इतर धर्मीय लोकांना स्वतःच्या धर्मसंस्था स्थापण्यास परवानगी असून, स्वतःच्या शाळा, मठ व रुग्णालयें यांवर त्यांची देखरेख आहे.

राज्यकारभारः—१९०८ सालची राज्यक्रांति होईपर्यंत तुर्कस्तानची राज्यपद्धति धर्मसत्तायुक्त (थिऑक्रॅटिक) अनियंत्रितराज्यसत्ताक (ॲब्सोल्यूट मॉनर्की) होती. सर्व सत्ता सुलतानाच्या हातांत असून त्याची राज्यपद्धति एकतंत्री तऱ्हेची होती. सुलतान हा महंमदाच्या गादीवर बसणारा खलिफा असा मुसुलमान लोकांचा समज असल्यामुळें धार्मिक बाबतींत त्याचें वजन मुसुलमान लोकांत फार आहे.

खलिफ ओमार याच्या राज्यपद्धतीमुळें जित ख्रिस्ती व जेते तुर्की मुसुलमान यांच्यांत ऐक्य घडून आलें नाहीं. त्यामुळें ओटोमन राष्ट्र कधींच बनलें नाहीं असें म्हटलें तरी चालेल. तिसऱ्या सेलिम (१७८९—१८०७) पासून ऐक्य घडवून आणण्याकरितां बरेच प्रयत्न झाले. सर्वांत दांडगा प्रयत्न अबदुल मजीद (१८३९—६१) यानें केला. परंतु तो अकालीं झाल्यामुळें फसला. उलेमा व जवळचे मंत्री यांच्या प्रतिगामी धोरणामुळें गादीवर बसल्यानंतर लगेच सुलतान हमीद यानें 'मिश्रराज्यपद्धती' चें अवलंबन केलें; हा देखील प्रयत्न फसला. उलेमा ही एक दांडगी संस्था आहे. हिचा मुख्य हा वजीराच्या दर्जाचा असतो. राज्यपद्धतींत फेरफार व सुधारणा होण्याच्या मार्गांत उलेमानें बरेच अडथळे केले. सुधारणा करणाऱ्या 'तरुण तुर्क' नांवाच्या पक्षाचा छळ झाला. यामुळें साम्राज्यांत जुन्या राज्यपद्धतीविरुद्ध चळवळ सुरु झाली. या चळवळीचा स्फोट १९०८ सालच्या राज्यक्रांतींत झाला. स. १९०९ मध्यें पुन्हां क्रांतिकारक पक्षाचा जय झाला. यावेळीं शेव्हकेट पाशानें कान्स्टांटिनोपल घेतलें व अबदुल हमीद पदच्युत होऊन त्याच्यानंतर त्याचा धाकटा भाऊ रशेद एफेंदी हा पांचवा महंमद या नांवानें गादीवर बसला. या वेळेपासून एका नवीन राज्यपद्धतीचा पुरस्कार करण्यांत आला. सुल्तान हा सनदशीर पद्धतीवर झालेला राजा होता. याला कार्यकारी मंत्रिमंडळाचें साहाय्य असतें. या मंडळांतील प्रत्येक मंत्र्याच्या ताब्यांत एकेक खातें होतें. सर्व प्रजेस राजकीय व दिवाणी हक्क सारखेच होते व लष्करी नोकरीच्या निर्बंधास फांटा दिला. सुलतान हा धार्मिक बाबतींत मुख्य समजला जात असे. सरदार आझम किंवा मुख्य वजीर यांची नेमणूक सुलतान करी व हा मजलिची–इ–खासचा सरकारी अध्यक्ष असे. यांत अंतरराष्ट्रीय व परराष्ट्रीय मंत्री, युद्धमंत्री, फडणीस, व्यापारमंत्री, शिक्षणमंत्री वगैरे असतात. साम्राज्याचे व्हिलाएत (प्रांत), संजाक (जिल्हा), व संजाकचे काझा वगैरे विभाग होते.

शिक्षणः—सरकारी व खाजगी अशा दोन तऱ्हेच्या शाळा येथें आहेत. प्राथमिक, दुय्यम व वरिष्ठ हे शिक्षणाचे प्रकार होत. प्राथमिक शिक्षण फुकट व सक्तीचें आहे. वरिष्ठ शिक्षण मोफत किंवा शिष्यवृत्तीनें मिळतें. दुय्यम शिक्षणासाठीं शाळा आहेत. वरिष्ठ शिक्षणासाठीं कान्स्टॅंटिनोपलचें विश्वविद्यालय, शिक्षकांची शाळा, कला व वैद्यक शाळा येथें आहेत.

साधारण समज आहे त्यापेक्षां येथें शिक्षणाचा जास्त प्रचार झाला आहे, याचें बहुतेक श्रेय ख्रिस्ती समाजाकडे आहे. चांगल्या शिक्षणसंस्था स्थापन करण्यासाठीं व ज्या स्थापन झालेल्या आहेत त्यांच्या मदतीसाठीं मोठमोठ्या रकमा देणगी म्हणून मिळतात. अमेरिकन विद्यालयानें देखील बरेंच शिक्षणाचें काम केलें आहे.

सैन्यः—पूर्वी लष्करी नोकरी मुसुलमानांत सक्तीची होती. परंतु ख्रिस्ती लोकांनां कांहीं कर देऊन मुभा मिळत असे. नवीन पद्धतीप्रमाणें सर्व 'ऑटोमन' लोकांनां लष्करी नोकरी करावी लागे. तरी पण कांहीं अटींवर व कांहीं कर देऊन मुभा मिळते. १९१० सालीं लष्करी पद्धतीची पुनर्घटना झाली. लष्करी नोकरी वयाच्या २० व्या वर्षापासून ४० व्या वर्षापर्यंत म्हणजे सुमारें २० वर्षे असे. १९०४ सालीं एकंदर ओटोमन सैन्य १७९५३५० होतें. यांत पायदळ, घोडदळ, रेडिफ घोडदळ, तोफखाना व यांत्रिकदळ इत्यादि आहेत.

आरमारः—तुर्कीची समुद्रावरील सत्ता निरनिराळ्या कारणांमुळें संपुष्टांत आली. अबदुल अझीनें ब्रिटिश आरमारावरील अधिकाऱ्यांच्या मदतीनें इंग्लिश व फ्रेंच गोदींत तयार केलेलीं चिलखती जहाजें तुर्की आरमारांत भरती केली. परंतु सुलतान अबदुल हमीद यानें आरमार वाढविलें नाहीं. परंतु उलट आरमारी सत्ता कमी करण्याचा यत्न केला. नूतन अंमलाखालीं तुर्की सरकारनें आरमाराची सुधारणा व घटना करण्याकडे चांगलें लक्ष पुरविलें. १९१० सालीं दरसाल ५००००० पौंड खर्चाची मंजुरी तुर्की पार्लमेंटनें दिली. ही रक्कम वर्गणी करून जमवावी व तिची हमी सरकारनें घ्यावी असें ठरलें होतें. कामगारांनां आरमारी शिक्षण मिळावें व आरमाराची सुधारणा व्हावी म्हणून ब्रिटिश आरमारी अधिकाऱ्यांनां नोकरीस ठेविलें होतें.

दळणवळणाचे मार्गः—येथील दळणवळणाचे मार्ग चांगले नसल्यामुळें साम्राज्यांतील सांपत्तिक वाढ झाली नाहीं. जरी साम्राज्यांत चांगल्या सडका नाहींत तरी अलीकडे रेल्वे, कालवे, नद्यांतील जल-मार्ग इत्यादि गोष्टींची वाढ बरीच झाली आहे. १८८५ सालीं १२५० मैल रेल्वे होती ती १९०९ त ४४४० मैल झाली. अबदुल हमीदच्या कारकीर्दींत हेजाझ रेल्वे तयार झाली. ह्या रेल्वेंत भांडवल, देखरेख वगैरे गोष्टी परकीयांच्या मदतीशिवाय झाल्या.

उत्पन्न व उद्योगधंदेः—तुर्की साम्राज्याची सुपीकता बरीच प्रसिद्ध आहे.ह्या गुण धाडस व कौशल्य यांच्या अभावीं व्यर्थ होय. १८९२ सालीं एक शेतकी खातें निर्माण करून त्याला खाणी व जंगलखातीं जोडण्यांत आलीं. ह्याच वेळीं एक शेतकरी पेढी स्थापन झाली; ती शेतकऱ्यांनां रकमा कर्जाऊ देते. शेतकी शाळा व नमुन्याचीं शेतें देखील आहेत. जंगलाचा नाश होऊं नये म्हणून जंगलशाळा स्थापिलेल्या आहेत. गहूं, मका, ओट, जंव व राय हीं मुख्य धान्यें होतात. कापसाची वाढ होत असून तंबाखू सर्वत्र होते. पॅलेस्टाईनमध्यें संत्री व घसरा येथें ( तुर्की अरबस्तानांत ) खजूर यांचा व्यापार चालतो. द्राक्षांचे मळेहि साम्राज्यांत आहेत.मीठ पुष्कळ तयार होतें. परदेशांत जाणाऱ्या $\frac{1}{2}$ मिठापैकीं $\frac{1}{2}$ मीठ हिंदुस्थानांत येतें. मासे धरण्याचीं ठिकाणें पुष्कळ आहेत. गुलाबी अत्तर येथें तयार होतें. खनिज पदार्थ पुष्कळ सांपडतात. परंतु ते खणून काढण्यासाठीं भांडवलाची जरूर आहे. येथील मुख्य उद्योगधंदे म्हणजे कातडीं कमावणें, मलमल, रेशीम, गालीचे, व नक्षीदार शस्त्रें इत्यादि तयार करणें हे होत.

जमावंदीः—पूर्वी तुर्क सरकारचें बजेट प्रसिद्ध होत नसे, परंतु अलीकडे तें प्रसिद्ध होऊं लागलें आहे. एकंदर उत्पन्नाच्या सात बाबी आहेत. त्या अशाः—(१) अपरोक्षकर. (२) स्टाम्पची फी. (३ परोक्ष कर. (४) कुलहक्क.(५)व्यापार व उद्योगसंस्था. (६) सरकारी मालकीची जमीन.(७) खंडणी. यांपैकीं पहिल्या बाबीपासून एकंदर उत्पन्न १३७२५८९२ पौंड, दुसऱ्या बाबीपासून १११३४५२ पौंड, तिसऱ्या बाबीपासून ४८२५८१२ पौंड, चवथ्या बाबीपासून ३२६१४२५ पौंड, पांचव्या बाबीपासून ४०२८८९ पौंड, सहाव्या बाबीपासून ५१३६५१ पौंड, व सातव्या बाबीपासून ८७१३१६ पौंड असें उत्पन्न होतें. सर्व साम्राज्याचें एकंदर उत्पन्न २५८४८३३२ पौंड आहे.

खर्चाच्या बाबतींत प्रथमस्थान सार्वजनिक कर्ज फेडण्याला दिलें जातें. खाजगीकडील नेमणुकीसाठीं ४४३८८० पौंड, जमावंदीखात्याला २९८९६०० पौंड, परोक्ष खर्च अथवा जकातीबद्दल ५१२६७० पौंड, अंतर्राष्ट्रीय खात्याला ११५७२३० पौंड, लष्करी खात्याला ८२८०४५२ पौंड, आरमारखात्याला १०००३२७ पौंड व व्यापार वगैरे खात्याला ८८३१६१ पौंड, अशा तऱ्हेनें खर्चाची विल्हेवाट होते. तुर्क सरकारला अल्प मुदतीचें कर्ज सुमारें २५०००००० पौंड असावें असा अंदाज १९१०-११ सालीं करण्यांत आला.

पेढ्याः—१८५६ सालीं कान्स्टांटिनोपलला ऑटोमन बँक नांवाची पेढी स्थापन झाली. नंतर हिचेंच रूपांतर इंपीरियल ऑटोमन बँकेंत झालें. तीच नॅशनल बँक ऑफ टर्की होय. दुसऱ्या पुष्कळ पेढ्या आहेत. यांपैकीं इंपीरियल बँकेलाच फक्त नोटा काढण्याचा हक्क आहे.

चलनी पद्धतिः—पिआस्टर ( $2\frac{1}{2}$ पेन्स ) हें नाणें मुख्य आहे. एका सुवर्णाच्या पौंडाबरोबर ( १८ शि. २ पे. ) १०० पिआस्टर असतात.५ पौंड (तुर्की ),१ पौंड, $\frac{1}{2}$ पौंड. $\frac{1}{4}$ पौंड, अशीं सोन्याचीं नाणीं आहेत. चांदीचें नाणें मेजिदी नांवाचें आहे. याची किंमत २० पिआस्टरच्या बरोबर होते. यांच्याशिवाय अल्टिक, बेशलिक, मेटेलिक या नांवाचीं चलनी नाणीं वेगवेगळ्या राजांच्या वेळेस पाडण्यांत आलीं.

धारापद्धतिः—चार तऱ्हेची आहे. ( १ ) मुल्क. ह्यांत जमिनीची वाटेल ती विल्हेवाट लावण्याचा मालकास अधिकार असतो. ( २ ) एमिरिये, ही सार्वजनिक मालकीची जमीन असून धान्यानें लाविली जाते. ( ३ ) वकुफ, देवाला अर्पण केलेल्या जमिनी; यांचें उत्पन्न गरीब लोक व धर्मदाय याजकडे लावितात. ( ४ ) कालिये अथवा मेवाद, यांत डोंगरावरील खडकाळ व जंगल असलेल्या जमिनी येतात. जंगल कापून जमीन नांगरण्यास फुकट दिली जाते. परंतु त्यानंतर

तिला शेतकी कायदे लाविले जातात. खाणी खणण्यासाठीं परवाने घ्यावे लागतात. शहरें, खेडीं, गांवें, जंगलें यांत शोध करण्याची मनाई आहे.

इतिहासः—ओटोमन तुर्कांचा मूळ पुरुष काराखान याचा मुलगा ओघुझ हा होय, अशी एक दंतकथा आहे. हे लोक इ. स. १२२७ च्या सुमारास ऐतिहासिक दृष्ट्या प्रसिद्धीस आले. या वर्षी दोन हजारांपासून चार हजारांपर्यंत तुर्की लोक मोंगलांच्या भीतीनें सोडलेल्या आपल्या मातृभूमीस परत जात होते. वाटेंत त्यांनीं कोनियाचा अल्लाउद्दीन कैकोबाद यास मदत करण्याविषयीं पुष्कळ विनंति केली पण ती सर्व व्यर्थ गेली. याप्रमाणें ते युफ्रेटीस नदीपर्यंत येऊन पोहोंचले. ही नदी ओलांडीत असतां त्यांचा नायक पाण्यांत बुडाला. पुढें ज्यांनीं या वेळेस नदी ओलांडिली होती अशा ४०० घोडेस्वारांनीं ( कांहींच्या मतें २००० ) आपल्या नायकाचा मुलगा एर्तोघ्रल याच्या नेतृत्वाखालीं वागण्याचें ठरविलें. यानंतर अल्लाउद्दिनानें अंगोराजवळील काराजा दाघ हा प्रदेश या लोकांस रहावयास दिला. आणखी कांहीं दिवसांनीं सेल्जुक बादशहा एर्तोघ्रल यानें केलेल्या मदतीचा मोबदला म्हणून त्यास सुगुट प्रांत जहागीर दिला. १२८८ त एर्तोघ्रल मरण पावला व त्याच्या मागून त्याचा मुलगा ओसमान हा तुर्की लोकांचा नायक झाला. यानें सेल्जुक साम्राज्याच्या आपत्काळीं आपली साम्राज्यनिष्ठा ढळूं न देतां साम्राज्यास बरीच मदत केली. यानें ग्रीक लोकांचा पाडाव केला व १२९५ सालीं काराजाहिसर काबीज केलें. दुसऱ्या अल्लाउद्दीन केकोबादनें, यानें जिंकलेले प्रदेश याच्या स्वाधीन केले व याचा मोठा गौरव करून याला स्वतंत्र सेनापतित्वाचा अधिकार दिला. पुढें यानें ग्रीक लोकांपासून आयनेग्यूएल, बिलेजिक व यारहिसर प्रांत काबिज केले. यानंतर दुसरा अल्लाउद्दीन कैकोबाद मेल्यावर एर्तोघ्रल स्वतंत्र राजा झाला. यानें १२३६ पर्यंत राज्य केलें. याच्या राज्यांत सकरिआ व अङ्गानोस या खोऱ्यांचा समावेश होत असून दक्षिणेस व उत्तरेस त्याची मर्यादा कुटाइह व मार्मोराच्या समुद्रापर्यंत जाऊन भिडली होती. याच्या मागून ओरखान गादीवर आला. यानें सन १३२६–१३५९ पर्यंत राज्य केलें. यानें ब्रुसा येथें आपल्या सैन्याची तयारी करून ग्रीक लोकांवर चाल केली व त्यांपासून १३२८–३८ च्या दरम्यान आयडॉस, निकोमेडिया, हीरीकी, निकाइ, टाराक्री, गेम्लीक व कार्टालपर्यंत सर्व मार्मोरा समुद्राचा किनारा काबीज केला. यानंतर यानें मुसुलमानांपासून कारासी हें शहर घेतलें. १३४१ सालीं यानें जॉन पालेलोगस याच्या विरुद्ध कॅन्टाकुझेनस याला मदत करण्याकरितां आपला मुलगा सुलेमान पाशा याची रवानगी केली. यानें बाल्कनपर्यंत चाल करून कॅन्टाकुझेनस याच्या शत्रूचा बीमोड करून १३५५ सालीं यानें ( सुलेमान पाशानें ) गॅलिपोली किल्ला व बुलायर मालगारा, इप्साला व रोडोस्टो हीं शहरें घेतलीं. ओरखान मेल्यावर त्याचा मुलगा पहिला मुराद हा गादीवर बसला. यानें १३५९–१३८९ पर्यंत राज्य केलें. यानें १३६१ सालीं यूरोपवर स्वारी केली व ग्रीक सम्राटापासून ॲड्रिआनोपल पर्यंतचा मुलूख ताब्यांत घेतला. यानंतर बाल्कनपलीकडील रानटी लोकांस याची भीति उत्पन्न होऊन त्यांनीं सर्व्ह, हंगेरियन, वालेशियन व मोल्डेव्हियन लोकांची ६ लक्ष फौज याच्या विरुद्ध पाठविली पण त्याचा सेनापति हाजी अलबेई यानें फौजेनिशीं पाडाव केला. यानंतर याला सर्व्हिया बिझुर्स्टेडिल, निकोपोलिस सिलिस्ट्रिया या देशांचे राजे लोक खंडणी देऊं लागले. पुढें यांनीं पर्लेपी, बोस्निया व हर्झेगोव्हिना यांचा कांहीं भाग काबीज केला. कांहीं दिवसांनीं हा यूरोपांत नाहीं ही संधि साधून करामानियन राजा अली बे यानें पहिल्या मुरादाविरुद्ध युद्ध पुकारलें. परंतु त्याचा कोनिया येथें पराभव होऊन त्यास हार खावी लागली. याच सुमारास बोस्नियाच्या राजानें मुरादाच्या सेनापतींचा पराभव करून त्याच्या फौजेची दाणादाण केली. यामुळें पूर्वी जे राजे मुरादास खंडणी देत होते त्यांस धैर्य येऊन त्यांनीं त्याच्याविरुद्ध बंड केलें. याचा मुरादास फार राग आला व त्यानें बल्गेरियाचा पराभव करून सर्व्हियनांचा कासोव्हो येथें ता. २७ ऑगस्ट १३८९ रोजीं पाडाव केला. पुढें हा लवकरच मरण पावला. याच्यानंतर त्याचा मुलगा पहिला बायेझिद हा राज्यपदारूढ झाला. यानें १३८९–१४०३ पर्यंत राज्य केलें. याला ग्रीक राजपुत्र अँड्रोनिकस यानें ३० हजार डुकाट देऊं करून आपल्या बापास पदच्युत करून आपल्यास गादीवर बसविण्याविषयीं त्याची प्रार्थना केली. बायेझिद यानें त्याच्या म्हणण्याप्रमाणें घडवून आणल्यावर त्याचा बाप जॉन पालेलोगस यानेंहि अशीच मागणी करून ३० हजार डुकाट शिवाय या कामास १२ हजार फौज देण्याचें कबूल केलें. या मदतीस आलेल्या फौजेनें अला शेहर किल्ला काबीज केला. आयदिन, मेन्टेशी, सरूखान, केरमेन हीं संस्थानें बायेझिद याच्या राज्यास जोडण्यांत आलीं. या वेळीं तुर्की फौज उत्तम समजली जात असून तींत ग्रीक राजपुत्र मॅनुअल पालेलोगस हा नोकरीस राहिला होता. पुढें बायेझिद हा आशियांत परत आल्यावर त्यानें करामानियाच्या बंडखोर राजाचा पराभव केला. या शिवाय आशियांत यानें आणखी विजय मिळवून कायसराएह, सिव्हास, टोकाट, सिनोप, कास्टामुनी, सामसुन हे प्रदेश काबीज केले. १३९१ त जॉन पालेलोगस याच्या मरणानंतर त्याचा मुलगा मॅनुअल हा न विचारतां सैन्यांतून निघून जाऊन राज्यपदारूढ झाला. याबद्दल त्यास शासन करण्याकरितां बायेझिद यानें ग्रीस देशावर स्वारी केली. या स्वारींत यानें ग्रीसच्या मदतीस आलेल्या हंगेरी व पोलंड यांच्या फौजेचा निकोपोलिस येथें पाडाव केला. पुढें १४०२ सालीं जगप्रसिद्ध तैमूरलंग या मोंगलानें याचा अंगोरा येथें पराजय करून याला कैद केलें. यानंतर हा

लवकरच मरण पावला. ह्या मेल्यावर स.१४१३ पर्यंत मोंगल स्वारीनें उत्पन्न केलेली अस्वस्थता कायम होती. १४१३ साली याचा मुलगा पहिला महम्मद हा सिंहासनारूढ झाला. यानें १४२१ पर्यंत राज्य करून पुन्हां साम्राज्यस्थापना केली. याच्यानंतर याचा मुलगा दुसरा मुराद हा राजा झाला. यानें १४२१–१४५१ पर्यंत राज्य केलें. हा मारल्यावर याचा मुलगा जेता दुसरा महम्मद हा गादीवर बसला. यानें १४५१—१४८१ पर्यंत राज्य केलें. यानें ता. ३ मे १४५३ रोजीं कॉन्स्टांटिनोपल काबीज करून वाल्कनद्वीपकल्प जिंकलें. १४८६ साली यानें बेलग्रेड शहरास वेढा घातला परंतु या प्रयत्नांत याला यश आलें नाहीं व यामुळें हंगेरीचा बचाव झाला. याच वर्षी यानें पिलोपोनेसस घेतलें. पुढें १४७०, १४७४ व १४७८, सालांत अनुक्रमें अल्बानिया, क्रिमिया व मोल्डेव्हिया हे प्रदेश काबीज केले. यानें आपल्या राज्यांतील फौज वाढवून दहा हजार केली. याशिवाय जेनेसरीज लोकांचा पगार वाढवून त्यांची संख्या १२हजार केली. नवीन जिंकलेल्या प्रदेशांपैकीं कांहीं प्रदेश हा जहागीर देऊन बाकीचा, मस्जीदी, विश्वविद्यालयें, शाळा व इतर धार्मिक संस्थांस देत असे. यानें पुष्कळ शिक्षणविषयक व पारमार्थिक संस्था स्थापन केल्या. तुर्कस्तानांत उलेमाचा वर्ग यानेंच निर्माण केला. याच्यानंतर याचा मुलगा दुसरा बायेझिद हा गादीवर आला. यानें १४८१–१५१२ सालपर्यंत राज्य केलें ह्या मेल्यावर पहिला सेलिम गादीवर आला. यानें १५१२-२० पर्यंत राज्य करून आशियाचा नैर्ऋत्येकडील व आफ्रिकेचा उत्तरेकडील भाग काबीज करण्यांत आपलें सर्व लष्करी सामर्थ्य खर्च केलें. याच्या मागून दुसरा सुलेमान यानें १५२०–१५६६ सालपर्यंत राज्य केलें. याच्या कारकीर्दीत उस्मानली साम्राज्याचा उत्कर्ष कळसास पोहोंचून त्याची सर्व ख्रिस्ती यूरोपास दहशत बसली.१५५१ साली यानें हंगेरी देशांत शिरण्याचें नाकें बेलग्रेड शहर हें काबीज केलें. १५२२ साली ऱ्होड्स घेतलें. व २९ ऑगस्ट १५२६ रोजीं मोहाक्स येथें याचें व हंगेरियन मग्यार लोकांचें तुमुल युद्ध होऊन मग्यारांचा पाडाव झाला. यामुळें ते आपल्या स्वातंत्र्यास मुकून मध्यहंगेरी देश तुर्कांच्या ताब्यांत आला. यानंतर १५२९ साली यानें व्हिएन्ना शहरावर चाल करून वेढा दिला. परंतु तेथें त्याला हार खावी लागली. यानें अल्जीरिया व आफ्रिकेचा पूर्वेकडील उत्तर किनारा काबीज करून भूमध्यसमुद्रावर आपलें स्वामित्व स्थापन केलें. याच्यानंतर दुसरा सेलिम गादीवर आला. यानें १५६६–१५७४ सालपर्यंत राज्य केलें. याच्या कारकीर्दीत सायप्रस व बरींच आयोनियन बेटें काबीज करण्यांत आलीं. ह्या मेल्यावर तिसरा मुराद (१५७४–१५९५), तिसरा महम्मद (१५९५—१६०३) व पहिला अहंमद (१६०३—१६१७) या तीन राजांनीं राज्य केलें. या राजांच्या अमदानींत तुर्की साम्राज्यास उतरती कळा लागली.

१६ व्या शतकांतील ओटोमन राजनीतिः—बादशाही-दिवाणखान्यांत मोठमोठे अमीर उमराव जमून राजकीय गोष्टींचा खल करीत असत. पहिल्यानें चर्चा करण्याच्या वेळेस स्वतः बादशहा येथें हजर राहून अध्यक्षस्थान स्वीकारीत असे. परंतु पुढें सुलेमानाच्या कारकीर्दीपासून बादशहा फक्त कांहीं विवक्षित प्रसंगीं या सभांस जाऊं लागला.

सरकारी अधिकाऱ्यांचे (१) राज्यकारभार पहाणारे, (२) धार्मिक, (३) चिटनिशींचें काम पाहाणारे व (४) लष्करी असे चार वर्ग असत. कझ्यांचा अथवा परगण्यांचा राज्यकारभार कादी व मोठमोठ्या जहागिरदारांवर सोंपविला असे. निरनिराळ्या खात्यांवर देखरेख ठेवण्यास अलाइबे अथवा मिर–ई–लिव्हा (कर्नल अथवा ब्रिगेडियर) नांवाच्या पाशांची नेमणूक केली होती. प्रांतांचा बंदोबस्त ठेवण्याकरितां यांपेक्षां वरिष्ठ पाशांची योजना केली होती. यांनां बेलरबेन अथवा मिर–ई–मिरान म्हणत असत. हे सर्व लष्करी अधिकारी असून यांच्याकडे राज्यकारभाराशिवाय लढाईच्या वेळीं सरंजामी फौजा जमा करून त्यांचें नायकत्व स्वीकारण्याचेंहि काम असे. मंत्र्यांची संख्या ७–८ असून त्यांवर एक मुख्य प्रधान असे. हे मंत्री वर सांगितलेल्या मसलतीच्या बैठकीस हजर रहात. सर्व आधिकार मुख्य प्रधानाच्या हातांत असून त्याला बादशाही शिक्कामोर्तब बाळगण्याचा मान असे. प्रारंभीं धार्मिक अधिकाऱ्यांकडे फक्त न्याय देण्याचें काम असे पण पुढें सर्व धार्मिक बाबतींचा निकाल लावण्याचें काम त्यांच्यावरच सोपविण्यांत आलें. लष्करी अधिकाऱ्यांचे पगारी व बिन पगारी असे दोन वर्ग असत. पगारी अधिकारी लष्करी छावणींत राहत असत. त्यांनां 'राजवाड्यांतील गुलाम' ही संज्ञा होती. जेनेसरीज यांचा पहिल्या वर्गांत समावेश होत असे. जाहागिरी वतनाच्या सनदा स्वतः बादशहा देत असून त्या वंशपरंपरा चालत नसत. कोणताहि नवीन प्रदेश जिंकल्यावर विशेजी आधिकारी त्याची खास, झिआमत, टिमार व वकूफ या चार सदरांखालीं जहागीरी विभागणी करीत असत. १ लक्ष अस्पार उत्पन्नाच्या जहागिरीस खास म्हणत व या जहागिरीच्या मालकास दर ५ हजार अस्परामागें एक हत्यारबंद शिपाई लढाईस द्यावा लागे. २ लक्ष ते एक लक्ष उत्पन्नाच्या जहागिरीस झिआमत म्हणत.३ हजार ते२० हजार उत्पन्नाच्या जहागिरीस टिमार म्हणत व हिच्या मालकास दर ३ हजार अस्परामागें एक हत्यारबंद शिपाई द्यावा लागे. जहागीरदारास आपल्या जहागिरीच्या ठिकाणींच रहावें लागत असे.

पहिल्या अहंमदानंतर १६४८ सालपर्यंत पहिला मुस्तफा (१६१७–१८ व १६२२–२३), दुसरा उस्मान (१६१८ ते २२), चवथा मुराद (१६२३–१६४०) व इब्राहिम (१६४०–४८) हे राजे झाले; व १६४८ साली चवथा महंमद गादीवर आला. यानें १६४८–१६८७ पर्यंत राज्य केलें. याच्या कारकिर्दीत मुख्य प्रधान महम्मद व त्याचा

मुलगा अहमद कोप्रिली या दोघांनीं आपल्या बौद्धिक सामर्थ्यानें व कर्तबगारीनें तुर्की साम्राज्यास पुन्हां चांगले दिवस आणले. यांनीं क्रीट, पोडोलिया व युक्रेन काबीज केलें. स.१६८३ त यांनीं व्हिएन्ना शहरास वेढा दिला. परंतु त्यांनां यश आलें नाहीं. अहमदनंतर दुसरा सुलेमान (१६८७–९१) व दुसरा अहमद (१६९१-१६९५) या राजांनीं राज्य केलें. यांच्या मागून दुसरा मुस्तफा गादीवर आला. यानें १६९५–१७०३ पर्यंत राज्य केलें. याच्या कारकिर्दींत स.१६८३च्या वेढ्यावद्दल ऑस्ट्रियन सम्राटाशीं अपमानकारक तह करावा लागला. या तहाच्या कलमान्वयें तुर्की लोकांस बनातशिवाय सर्व हंगेरी देश ऑस्ट्रियनांस द्यावा लागला. याशिवाय मोरियास व्हेनिस, पोलंडला पोडोलिआ व रशियाला अझोव्ह द्यावे लागले. याच्या नंतर तिसरा अहम्मद राज्यपदारूढ झाला. यानें १७०३–१७३० सालपर्यंत राज्य केलें. याच वेळेस रशियांत पिटर दि ग्रेट हा राज्य करीत होता. यानें रशियापासून अझोव्ह पुन्हां परत घेतलें. यानें ऑस्ट्रियाशींहि युद्ध केलें पण त्यांत त्याला अपयश आलें. स.१७१८ त यानें ऑस्ट्रियाशीं सारोविट्झ येथें तह केला. या तहान्वयें तुर्कांस लहान वालेशिया, बोस्निया व सर्व्हिया यांचा बराच भाग ऑस्ट्रियाला द्यावा लागला. तिसऱ्या अहमदानंतर पहिला महमूद गादीवर आला. यानें १७३०–१७५४ सालपर्यंत राज्य केलें. याच्या कारकिर्दींत तुर्कांनीं रशिया व ऑस्ट्रियाविरुद्ध फ्रान्सला मदत केली. व ऑस्ट्रियाचा पराजय केला. पुढें १७३९ सालच्या बेलग्रेडच्या तहांत तुर्कांस, त्यांच्यापासून स. १७१८ त घेतलेला बहुतेक मुलूख परत दिला. याच्यानंतर तिसरा उसमान गादीवर आला. यानें १७५७ सालपर्यंत राज्य केलें.हा मेल्यावर तिसरा मुस्तफा गादीवर आला. यानें १७५७–१७७३ पर्यंत राज्य केलें. याच्या कारकीर्दींत रशियाशीं पोलंडबद्दल लढाई सुरू झाली. ही लढाई १७६८–१७७४ पर्यंत चालली होती. या लढाईत तुर्कांस अपयश येऊन त्यांनां रशियास कुबान व दक्षिण रशियांतील कांहीं शहरें द्यावीं लागलीं. याच्यानंतर पहिला अबदुल हमीद गादीवर आला.यानें १७७३–१७८९ पर्यंत राज्य केलें. याच्या कारकीर्दींत ऑस्ट्रिया व रशिया यांनीं तुर्कांवर पुन्हां चाल केली. यानें त्यांस परतवून लावण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण तो यशस्वी न झाल्यामुळें याची हिंमत खचली व तो मरण पावला. पुढें याचा पुतण्या तिसरा सेलिम (१७८९–१८०७) हा गादीवर आल्यावर इ. स. १७९२ त जेसी येथें तह झाला. या तहान्वयें तुर्कांस दक्षिण रशियांतील ठाणीं व क्रिमिया यांवरील आपला हक्क सोडावा लागला. या पराजयामुळें तुर्की सरकारची सत्ता डळमळित होऊन साम्राज्यांत बंडाळी माजली. याच सुमारास तिसरा सेलिम व त्याच्या मागून गादीवर आलेला चवथा मुस्तफा याचे खून झाले (स. १८०८). यानंतर दुसरा महमूद यानें १८०८–१८३९ सालपर्यंत राज्य केलें. यानें १८२६ त जेनेसरीज लोकांचा पाडाव करून व बंडाळी मोडून राज्यांत सर्वत्र शांतता राखण्याचा प्रयत्न केला. याशिवाय यानें आपल्या सैन्याची मांडणी यूरोपियन पद्धतीवरहुकूम केली होती. ग्रीक बंडखोर लोकांस क्रूरतेनें वागविल्याबद्दल सर्व यूरोप याच्यावर क्रुद्ध झाला. याच वेळेस रशियन लोकांनीं तुर्की आरमाराचा १८२७ सालीं नॅव्हॅरिनो येथें पाडाव करून ॲड्रिआनोपलपर्यंतचा मुलूख काबीज केला. यानंतर १८२९ सालीं तह होऊन तुर्कांनीं सर्व्हिया व डान्यूब नदीथडीवरील संस्थानास कांहीं विशेष हक्क देऊन ग्रीस देशास स्वातंत्र्य दिलें. याच्या साम्राज्यएकीकरणाच्या प्रयत्नांचा अगदीं उलट परिणाम होऊन साम्राज्यास ईजिप्त देश अंतरावा लागला व पुढें अबदुल मज्जीद (१८३९–१८६१) गादीवर आल्यावर यूरोपियन राष्ट्रें मध्यस्थी पडल्यामुळेंच ईजिप्तच्या महंमदअलीपासून साम्राज्याचें रक्षण झालें. याच्या नंतर अबदुल मज्जीद यानें एक जाहीर पत्रक काढून आपल्या सर्व प्रजाजनांस सारखे हक्क दिले;व स.१८४१मधील लंडनच्या तहान्वयें बॉसफरस व डार्डानेल्स सामुद्रधुनींत लढाऊ जहाजांस येण्याची मनाई केली. १८५३ त पॅलेस्टाइनमधील ख्रिस्ती लोकांस रशियन सम्राट निकोलस यानें मागितलेले हक्क न दिल्यामुळें रशियाशीं पुन्हां युद्ध सुरू झालें. या युद्धांत तुर्की शिपायांनीं चिकाटी धरून डान्यूब नदीवर स्वसंरक्षण केलें व तुर्कांना मदत करणाऱ्या यूरोपियन राष्ट्रांनीं क्रिमियांत रशियाचा समाचार घेतला.स. १८६१ त अबदुल अझीझ गादीवर आला यानें १८७६ पर्यंत राज्य केलें.याच्या कारकीर्दींत बेसुमार उधळेपणानें तुर्की सरकारास बरेंच कर्ज झालें. याशिवाय रशियाचें वर्चस्व पुन्हां प्रस्थापित होऊन त्याच्यामुळेंच अब्दुल अझीझ पदच्युत झाला (१८७६). याच्यानंतर पांचवा मुराद राज्यपदारूढ झाला.याच सुमारास रशियाच्या चिथावणीवरून बल्गेरियन लोक मुसुलमानांस बल्गेरियांतून हांकून देऊं लागले; परंतु हें बंड मोडण्यांत आलें. पुढें मुराद याला राज्यव्यवस्था चालवितां न आल्यामुळें त्याचा भाऊ दुसरा अब्दुल हमीद गादीवर आला. याच वेळेस इंग्लंडनें ओटोमन साम्राज्य कायम राखून बाल्कन प्रदेशांतील शासनसत्ता कशी चालवावी हें ठरविण्याकरितां कॉन्स्टांटिनोपल येथें एक परिषद भरविली परंतु तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं. पुढें १७८७ त रशियानें साम्राज्याशीं पुन्हां युद्ध सुरु केलें. पहिल्यानें तुर्की सैन्यापुढें रशियनांचा टिकाव लागेना. पण त्यांनां रुमानियन लोकांची मदत मिळाल्यावर त्यांनीं तुर्कांचा पाडाव केला व त्यांस सॅन स्टेफनो येथें मार्च ३ १८७८ रोजीं तह करावयास लाविलें. या तहान्वयें तुर्कांनीं रुमानिया व सर्व्हिया या दोघांस पूर्ण स्वातंत्र्य दिलें, व सर्व्हिया, मॉन्टेनेग्रो यांचा त्यांनीं जिंकलेल्या भागावरील ताबा कबूल केला. याशिवाय बल्गेरिया स्वसत्ताक करून रशियास डोबुजा प्रांत दिला. यानंतर

पौरस्त्य प्रश्नांचा निकाल लावण्याकरितां बर्लिन शहरीं तहपरिषद भरली.या परिषदेनें स्वसत्ताक बल्गेरियाची मर्यादा उत्तरेस बाल्कन जिल्ह्यापर्यंत ठरवून दक्षिणेकडील भागाचा एक निराळा प्रांत बनविला व तो तुर्कांच्या ताब्यांत दिला. बोस्निया व हर्झेगोव्हिना हे प्रांत ऑस्ट्रियास जोडले. व ग्रीस देशास आपल्या सरहद्दींची हितावह दुरुस्ती करून घेण्यास सवलत दिली. १८८१ साली टर्कीनें ग्रीसला थेसले व आर्टी हे दोन प्रांत दिले. १८८० साली जर्मन अधिकाऱ्यांनीं तुर्की फौजेची पुनर्घटना करून सर्व साम्राज्याकरितां लष्करी कायद्याचा मसुदा तयार केला. या मसुद्यांतील कायदे १८८७ सालीं अमलांत आले यानंतर १० वर्षे तुर्की सरकारचें धोरण शांतता राखण्याचें होतें. १८९७ त ग्रीस देशानें तुर्कांविरुद्ध लढाई पुकारली. व एदेमपाशा यानें ग्रीसचा सहजगत्या पाडाव करून थेसली प्रांत काबीज केला. अलीकडे तुर्की सरकारच्या दुर्वर्तनामुळें तुर्की साम्राज्यांत असंतोष उत्पन्न झाला असून 'तरुण तुर्क' या नांवाचा एक पक्ष निर्माण झाला असून याला पुष्कळ समंजस अधिकाऱ्यांचा पाठिंबा आहे. या पक्षांतील लोकांस बंडखोर समजून तुर्की सरकारनें दाबून टाकण्याचा प्रयत्न केला पण बल्गेरियांत मॅसेडोनियाच्या मुक्ततेबद्दल जेव्हां चळवळ होऊं लागली तेव्हां तुर्की सरकारास अतिशय त्रास पडला व यूरोपियन राष्ट्रांनीं आपलीं लढाऊ आरमारें पाठवून त्यांची चांगली कानउघाडणी केली ( १९०५ ). ट्रिपोलींतील ओसाड मैदानांतील जॅनेट नांवाचा ओलतर प्रदेश घेतल्याबद्दल फ्रान्स देशाशीं, व पर्शियन सरहद्दीवरील कांहीं जिल्हे तुर्की साम्राज्यास जोडल्याबद्दल इराण देशाशीं तुर्की-साम्राज्याचा बेबनाव झाला. परंतु त्या दोन्हीहि बाबतींत तुर्कांस हार खावी लागली. १९०७ सालीं मॅसेडोनियांत जिकडे तिकडे रक्तपात व लुटालूट सुरू झाली होती. १९०८ सालीं 'तरुण तुर्क' पक्षानें आपलें ठाणें पॅरिसहून उठवून सालोनिका येथें आणलें व जुनी बेबंदशाही राज्यपद्धती काढून टाकण्याबद्दल जिकडे तिकडे जारीनें चळवळ सुरू केली. या चळवळीस सैन्यांतील असंतोषाचा दुजोरा मिळाल्यामुळें तुर्की सरकारानें पार्लमेंट स्थापन करण्याकरितां एक सभा भरविली व ता. २४-जुलै १९०८ रोजीं नियंत्रित राज्यपद्धति अमलांत आणण्याचें जाहीर केलें. नवी पार्लमेन्ट सभा १७ डिसेंबर १९०८ रोजीं उघडण्यांत येऊन तिच्या अध्यक्षाचा मान अहमदरिझा या 'तरुण तुर्क' पक्षाच्या पुढाऱ्यास मिळाला. पण यानंतर लवकरच तुर्की सरकारानें याच्या अगदीं उलट धोरण स्वीकारलें. ता. २४ एप्रिल १९०९ रोजीं मॅसेडोनियन सैन्यानें कान्स्टांटिनोपलमध्यें जबरदस्तीनें शिरकाव केला. याच महिन्याच्या २६व्या तारखेस प्रधानमंडळानें राजीनामा दिला व दुसऱ्या दिवशीं राष्ट्रीयमंडळाचें अधिवेशन झालें. या मंडळानें सर्वानुमतें अब्दुल हमीद यास पदच्युत करून पांचवा महम्मद याच्या नांवानें द्वाही फिरविली, कान्स्टांटिनोपल येथें १९१०पर्यंत लष्करी कायदा अमलांत आणण्याचें ठरविलें. १९०९ सालीं तुर्की साम्राज्यांत जिकडे तिकडे अस्वस्थता व बंडाळी माजली होती. साम्राज्यांत या प्रकारें धामधूम चालली असतां १९०८ सालीं ऑस्ट्रियानें बोस्निया व हर्झेगोव्हिना हे प्रान्त आपल्या राज्यास जोडले व १९०९ सालीं पार्लमेन्टसभेनें यास संमति दिली. कांहीं दिवसांनीं बल्गेरियासहि स्वातंत्र्य देण्यांत आलें. १९१० सालीं साम्राज्यांत एक मोठें बंड झालें व याच वर्षाच्या सप्टेंबर महिन्यांत टर्की, रुमानिया व ग्रीस, आणि क्रीट यांच्यामध्यें युद्ध सुरू झालें. १९११ हें वर्ष साम्राज्यानें मोठ्या संकटांत घालविलें. सप्टेंबर महिन्याअखेर ट्रिपोलींत अंधाधुंदी चालू असून तुर्की सरकार त्याकडे लक्ष पुरवीत नाहीं या सबबीवर इटलीनें साम्राज्याविरुद्ध लढाई पुकारली. ५ आक्टोबर रोजीं इटालियनांनीं ट्रिपोली शहर काबिज केलें.

तु र्क स्ता न व बा ल्क न यु द्ध ( १९१२-१९१३ ).— इटली व तुर्कस्तान यांजमध्यें अशा प्रकारें झगडा चालला असतां व त्यांत तुर्कस्तानचा पराभव होऊं लागला असतां दुसरीकडे तुर्कस्तानवर आणखी एक संकट ओढवूं पहात होतें. १९१२ सालीं तुर्कस्तानविरुद्ध व मॅसिडोनियाचें तुर्कस्तानपासून संरक्षण करण्याकरितां ग्रीस, बल्गेरिया, सर्व्हिया इत्यादि राष्ट्रांनीं आपापसांत 'बाल्कन अलायन्स' नामें जूट केली. तुर्कांनीं मॅसिडोनियामधील ख्रिस्त्यांची कत्तल केल्यामुळें बाल्कनराष्ट्रांनीं लढाई पुकारली. यूरोपियन प्रमुखराष्ट्रांनीं एकदम युद्ध न पुकारण्याची बाल्कन राष्ट्राला धमकी दिली, तथापि तिला न जुमानतां युद्ध पुकारलेंच. या युद्धांत तुर्कांचा चोहोंकडून पराभव होत गेल्यामुळें १९१२ सालीं तुर्कस्ताननें तहाचें बोलणें सुरू केलें. पण बाल्कनराष्ट्रांनीं मांडलेल्या तहाच्या अटींना तुर्कस्तान मुळींच संमति देईना. ॲड्रियानोपल बल्गेरियाला व ईजीयन बेटें ग्रीसला देण्याचें तुर्कस्ताननें साफ नाकारलें. यूरोपियन राष्ट्रांनीं बाल्कनराष्ट्राच्या अटी मान्य करण्याबद्दल तुर्कस्तानला परोपरीनें विनंति केली, पण तरुण तुर्की पक्षानें ती जुमानली नाहीं व लढाईला सुरवात होऊन तुर्कांचाच पराभव झाला. पुढें लंडन येथें तह होऊन, तुर्कस्तानच्या ताब्यांतील यूरोपमधील मुलूख यूरोपीयांच्या ताब्यांत गेला. त्यामुळें बाल्कनराष्ट्रांत कलागत होऊन सर्व्हिया, मॉंटेनीग्रो, ग्रीस, रुमानिया या राष्ट्रांनीं बल्गेरियावर शस्त्र उपसलें. तुर्कस्ताननें धूर्ततेनें बल्गेरियाविरुद्ध ग्रीस वगैरे राष्ट्रांच्या बाजूनें लढाई पुकारली. हींत बल्गेरियाचा पाडाव झाला. पण या लढाईनंतर झालेल्या तहांत तुर्कस्तानला कांहींच वाटा मिळाला नाहीं. हें पहातांच तुर्कस्ताननें मागील तहाला न जुमानतां ॲड्रियानोपल ताब्यांत घेतलें. बल्गेरियाहि अगदीं हतबल झाला असल्याकारणानें त्यानें तें तुर्कांच्या हातीं राहूं दिलें. या बाल्कन युद्धामुळें तुर्कस्तानची यूरोपमधील सत्ता पुष्कळ अंशीं नष्ट झाली; व ऑस्ट्रिया हंगेरीचें या मुलुखांत जें प्रस्थ होतें तें कमी करण्याकडे इंग्लंड, फ्रान्स, रशिया इत्यादि यूरोपीयन राष्ट्रांचें लक्ष्य वेधलें.

१९१४ साली ज्या अगडण्याळ महायुद्धाला सुरुवात झाली. त्यामध्ये सर्वच यूरोपियन राष्ट्रांचे प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष हितसंबंध गुंतले गेले. तुर्कस्तानहि त्याला अपवाद नव्हता. तुर्कस्तानचे जे हितशत्रू, ग्रीस, रशिया वगैरे देश त्यांना आंतून इंग्लंडचा पाठिंबा होता व याच्या उलट, जर्मनीनें तुर्कस्तानच्या महत्त्वाकांक्षांना आपली सहानुभूति दर्शविली होती. अर्थात तुर्कस्तान हें जर्मनीच्या बाजूनेंच महायुद्धांत पडणार अशी सर्वांची अपेक्षा होती. पण महायुद्ध सुरु झाल्यावर तुर्कस्ताननें एकदम कोणतीहि गोष्ट न करण्याचें ठरविलें. इंग्लंडशीं जाहीर तऱ्हेनें वैर पत्करण्याला तुर्कस्तान सहजासहजीं धजावेना. तरी पण तुर्की सैन्याचीं सर्व सूत्रें जर्मन अधिकाऱ्यांच्या हातीं असल्यामुळें तुर्कस्तानची फौज बाल्कन प्रदेशांत लढण्याला आपल्याला खास मदत करील अशी कैसरची अपेक्षा होती व ज्यावेळीं जर्मनीनें व आस्ट्रियानें बाल्कनच्या मोहिमेला सुरुवात केली त्यावेळीं तुर्कस्ताननें जर्मनीच्या बाजूनें युद्धांत पडण्याचें ठरविलें.

म हा यु द्धः—महायुद्धामध्यें तुर्कस्तानानें जो भाग घेतला होता त्याचें विवेचन करावयाचें म्हणजे त्याचे चार भाग पडतात. ( १ ) कॉकेशसमधील लढाया, ( २ ) मेसापोटेमियांतील लढाया, ( ३ ) सिनाई टापूंतील लढाया ( ४ ) व सीरियामधील लढाया.

( १ ) कॉकेशसमधील लढायाः—कॉकेशसच्या टापूंतील लढायांचें वर्णन देण्यापूर्वी,रशिया व तुर्कस्तानच्या मधील सरहद्दीची स्थिति काय होती हें सांगणें जरूर आहे. या सरहद्दीच्या टापूमध्यें एकहि रेल्वे नव्हती व युद्धाचा दारूगोळा, मोठमोठ्या तोफा वगैरे सामान नेण्याला दळणवळणसाधनांची कोणतीच सोय नव्हती. त्यामुळें लहान लहान रस्ते व वाहतुकीचीं जनावरें यांशिवाय दुसऱ्या कोणत्याहि तऱ्हेनें, लढाईचें सामान नेतां येत नसे. अशी स्थिति असल्यामुळें या टापूंतलि लढाया फार जाचक होत असत. अर्झेरुम ते अंगोरा एवढ्या टापूंतच काय ती आगगाडी होती व तेथून कॉकेशसच्या टापूंत उंटाच्या साहाय्यानें सर्व दारूगोळा न्यावा लागत असे. दुसरा एक मार्ग म्हटला म्हणजे, कान्स्टांटिनोपलपासून ट्रेबिझांडपर्यंत समुद्रमार्गानें युद्धसामुग्री नेऊन नंतर अर्झेरुमपर्यंत रस्त्यानें ती न्यावयाची हा होय. म्हणून काळासमुद्र आपल्या ताब्यांत ठेवणें तुर्कस्तानला आवश्यक होतें. पण थोड्या काळपर्यंतच तुर्कांच्या हातून हा समुद्र ताब्यांत ठेवणें शक्य झालें.

१९१४–१८ च्या दरम्यान या टापूंतील लढायांचें क्षेत्र तुर्की आर्मेनिया हें होतें. हा टापू लष्करी दृष्ट्या मुळींच सोयीचा नाहीं. या टापूंत अनेक लहान मोठ्या पर्वतांच्या रांगा पसरल्या असून, येथील थंडी फार कडक असते. तुर्कांपेक्षां रशियनांच्या ताब्यांत जो थोडाबहुत टापू आहे तो विशेष सोईचा आहे. युद्ध सुरू होतांच रशियानें आर्मेनियाचा बराचसा भाग आपल्या ताब्यांत आणून तुर्कांच्या सरहद्दीपर्यंत तात्पुरती रेल्वे तयार केली व चांगले रस्तेहि बांधून काढले. त्यामुळें रशियाला या टापूंत लढाई चालविणें बरेंच सोपें झालें. तुर्कांचा लष्करमंत्री एनवर पाशा याला या रशियाच्या लष्करी हालचालींचें मर्मच समजलें नाहीं. तो आपल्याच घमेंडींत होता. कॉर्सचा किल्ला आपल्या ताब्यांत घेऊन रशियाला कैचींत धरण्याचा त्यानें बेत केला. एवढेंच नव्हे तर त्यानें अफगाणिस्तानच्या मार्गानें हिंदुस्थानावर स्वारी करण्याचाहि घाट घातला. पण रशिया हें सर्व जाणून होता. रशियन सैन्यानें अर्झेरुमच्या किल्ल्यावर चाल करण्यासाठीं कूच केलें. तुर्की सैन्यानें कोप्रूक्यूई येथें रशियन सैन्यावर हल्ला केला. प्रथम प्रथम तुर्कस्तानच्या सैन्याला कांहीं ठिकाणीं जय मिळाला. पण पुढें रशियन सैन्यांच्या पुढें तुर्की सैन्याचा टिकाव लागणें अशक्य झालें. त्यामुळें हसन इजत पाशा या तुर्कांच्या सेनापतीनें रशियन सैन्यावर हल्ला करण्याचा बेत रहित केला.

एनवर पाशानें काळ्या समुद्राच्या मार्गानें आपलें सैन्य नेऊन रशियांत घुसण्याचा व रशियन सैन्यावर हल्ला करण्याचा बेत केला. त्याप्रमाणें तुर्की सैन्य अर्दहन येथें आलें. तेथें रशियन सैन्याची व तुर्की सैन्याची गांठ पडून त्यांत तुर्कांचा पराभव झाला. एनवर पाशानें धीर न सोडतां अर्झेरुमकडे स्वतःच्या देखरेखीखालीं आपलें तुर्की सैन्य नेलें व आपल्या सैन्याच्या निरनिराळ्या तुकड्या करून, अर्झेरुमच्या टापूंत रशियाला घेरून टाकण्याचा बेत केला. पण तुर्की सैन्याची स्थिति फार वाईट असल्यानें या सैन्याच्या हातून हें अवघड काम तडीस जाणें शक्य नव्हतें व त्याप्रमाणें तुर्की सैन्याला त्यांत अपयशच आलें. यापुढें एनवरपाशानें या महायुद्धांत फारसा भाग घेतला नाहीं. तुर्कस्तानच्या ग्रँड वझीरानें, महमद केमाल याला सेनाध्यक्ष नेमलें. अर्झेरुम येथें तुर्कांचा पराभव झाल्यानंतर तावडतोब रशियनांनीं तुर्कांना सतावण्यास प्रारंभ केला असता तर तुर्की सैन्याची वाताहातच झाली असती पण पोलंडच्या टापूंत रशियनांना आपलें सैन्य गुंतविणें जरूरीचें झाल्यामुळें कॉकेशसटापूंत मुबलक सैन्य पाठवणें रशियाला शक्य नव्हतें. त्यामुळें रशियन सैन्याचा या टापूंत जितका जोर असावा तितका नव्हता. त्यामुळें महंमद केमालला आपल्या तुर्की सैन्याची संघटना करणें सोपें गेलें. जर्मनांचीं गोबेन व ब्रेस्लॉ हीं जहाजें काळ्या समुद्राच्या रक्षणासाठीं येथें येऊन बसलीं होतीं पण त्यांनां डार्डानेल्सच्या संरक्षणासाठीं जावें लागल्यामुळें, रशियाला काळ्या समुद्रांत धुडगूस घालण्याला आयतीच संधि मिळाली. रशियन सैन्यानें झंगुलडक,व एरग्ली येथील कोळशांच्या खाणी उध्वस्त करून टाकल्या व ट्रेबिझांड बंदरावर तोफांचा मारा सुरू केला.

इकडे महंमदकेमालनें आपलें सैन्य वाढवून अर्झेरुमच्या टापूचें संरक्षण करण्यासाठीं त्या सैन्याला आज्ञा केली. या

टापूंत लढाई करण्याची धमक रशियन सैन्याच्या अंगीं नव्हती. तेव्हां रशियन सैन्यानें ओल्टिच्या घाटानें, टर्टम येथें कूच केलें. त्याचप्रमाणें अर्धादघच्या घाटानें मेलासगर्टपासून बिट्टिसकडे आपल्या सैन्याची एक तुकडी रशियानें पाठवून दिली; या सैन्यानें बिट्टिस काबीज केलें. याच वेळीं रशियानें या बाजूला आपलें आधिक सैन्य पाठवून देऊन मोसलकडे चाल करून तैग्रिस नदी गांठली असती, अगर युफ्रेटिसच्या मार्गानें खरपूतकडे आपला मोर्चा वळविला असता तर येथील तुर्की सैन्याचा पराभव होऊन, इंग्लंडला तुर्कस्तानला शह देतां आला असता. पण रशियाच्या ताब्यांत इतका सैन्याचा पुरवठा नव्हता. त्यामुळें अर्झेरुमच्या बाजूला फारशी भीती उरली नाहीं अशी स्थिति पहातांच केमालनें आपल्या सैन्याच्या दोन तुकड्या, बगदादकडे पाठविल्या. पण याच सुमारास रशियन बादशहा निकोलस यानें काकेशसच्या टापूंतील सैन्याचें आधिपत्य आपल्या ताब्यांत घेऊन, अर्झेरुमचा किल्ला काबीज करण्याचा निश्चय केला. रशियन सैन्यानें अर्झेरुमच्या आसपासचा टापू थोडक्याच दिवसांत काबीज केला. या टापूंतील तुर्की सैन्याचा अधिपति अबदुल करीमपाशा हा होता. याच्या अंगात लष्करी सेनापतीचे गुण नव्हते त्यामुळें त्याच्या सैन्याला रशियन सैन्यापुढें हार खावी लागली व अर्झेरुमचा किल्ला १९१६ च्या फेब्रुवारी महिन्यांत रशियनांच्या हातीं पडला. एवढ्यानेंच निकोलसचें समाधान न होतां, त्यानें तुर्की सैन्याच्या कमकुवतपणाचा फायदा घेऊन, पुढें कूच करून ममखटन शहर काबीज केलें व थोडक्याच दिवसांत ट्रेबिझांडहि आपल्या ताब्यांत आणिलें. ट्रेबिझांड ताब्यांत आल्यामुळें रशियनांच्या ताब्यांत काळ्या समुद्राचें नाकें आल्यासारखें झालें व रशियन सैन्य खुद्द कॉन्स्टांटिनोपलवरहि चाल करून येईल अशी अकारण भीति तुर्कांनां वाटूं लागली. तेव्हां मात्र तुर्कांचे डोळे उघडले. या रशियनांच्या प्रगतीला आळा घालण्याची आवश्यकता तुर्कांनां वाटूं लागली व त्याप्रमाणें या टापूंत त्यांनीं आपलें सर्व सैन्य एकवटण्यास सुरवात केली; व या सैन्याच्या साह्यानें अर्झेरुमच्या मागून व पुढून रशियनांनां शह देण्याची तुर्कांनीं तयारी केली. पण तुर्की सैन्याची व्यवस्था फार वाईट होती; व त्यामुळें त्यांचा हा बेत त्यांनां सिद्धीस नेतां आला नाहीं. इकडे तुर्की सैन्याच्या दुसऱ्या एका तुकडीनें ट्रेबीझांडच्या पूर्वेस कांहीं ठिकाणें सर केलीं व ट्रिबिझांड शहर काबीज करण्याचा घाट घातला. पण या बेताची बित्तंबातमी रशियनांनां अगाऊच समजल्यामुळें त्यांनीं तुर्की सैन्याची डाळ शिजूं दिली नाहीं. एर्झिझन व बैबर्ट येथील लढायांत तुर्की सैन्याचा पूर्ण पराजय होऊन तुर्की सैन्य रानोमाळ धांवत सुटलें. अशा रीतीनें सर्व बाजूंनीं तुर्की सैन्याला अपयशच येत गेलें.

याच सुमारास ॲड्रिया येथें वहाबी पाशा तुर्की सैन्याची उत्कृष्ट तऱ्हेनें संघटना करण्यासाठीं खटपट करीत होता. मुस्ताफा केमाल पाशा याला सैन्याचें आधिपत्य देण्यांत आलें होतें. या सैन्याकडे आर्मेनियाचा टापू ताब्यांत घेण्याचें काम देण्यांत आलें होतें. पण आर्मेनियांतील लष्करीदृष्ट्या सर्व महत्वाचीं ठाणीं रशियाच्या ताब्यांत होतीं. शिवाय काळा समुद्र देखील रशियाच्याच ताब्यांत होता. अशा स्थितींत तुर्की सैन्यानें रशियन सैन्यावर चढाई करूं पाहणें म्हणजे शुद्ध वेडेपणाचें होतें, उलट रशियन सैन्यानेंच चढाई करण्याची तयारी चालविली होती. बगदादच्या टापूंत इंग्लिश सैन्यालाहि जय येत चालला होता. पण खुद्द रशियांत दुसरीकडे व्होलिनिया येथें ब्रूसिलाव्ह सेनापतीनें जर्मनीविरुद्ध चढाई करण्याचा घाट घातल्यानें, रशियन सैन्य या बाजूला गुंतविणें भाग पडूं लागलें. अर्थातच कॉकेशस टापूंतील बरेंच सैन्य तेथून काढून नेणें रशियाला आवश्यक झालें. शिवाय रशियांतच बंडाळी सुरू झाली. व रशियाचें लक्ष अंतःस्थ परिस्थिति सुधारण्याकडे लागलें. या कठिण परिस्थितीचा फायदा तुर्कस्ताननें घ्यावयाला पाहिजे होता. पण उत्कृष्ट सैन्याच्या अभावीं व चतुर सेनापतीचें साहाय्य नसल्यानें हा फायदा तुर्कांनां घेतां आला नाहीं. पण जर्मनीला मात्र तुर्क सेनापती धडधडीत खोटे संदेश पाठवीत होते व आपल्या पराक्रमाच्या थापा मारून त्यांनीं जर्मनीला झुलवित ठेवलें होतें.

बगदाद इंग्लंडच्या ताब्यांत आलें त्यावेळीं रशियनांनीं मोसल काबीज करण्याचा प्रयत्न केला असता तर त्यांत त्यांनां सहज यश मिळालें असतें. पण रशियांतील अंतःस्थ परिस्थिति फारच बिघडल्यामुळें रशियाला युद्धापासून पराङ्मुख होऊन मध्य यूरोपीयन राष्ट्रांशीं तह करावा लागला. त्यामुळें आपलें सर्व सैन्य कॉकेशस टापूंतून काढून घेणें रशियाला भाग पडलें. त्यामुळें तुर्की सैन्यानें हा टापू काबीज करण्याची पुन्हां उमेद धरली. अर्थात या टापूंत कोणाचाच विरोध नसल्यामुळें हा टापू काबीज करणें फारसें अवघड नव्हतें. पण कॉकेशसच्या टापूचा नसता बागुलबोवा करून तुर्कांनीं आपलें सैन्य याच ठिकाणीं एकत्र केलें. या तुर्की सैन्यानें थोडक्याच दिवसांत सर्व कॉकेशसचा टापू आपल्या ताब्यांत घेऊन तो आपल्या साम्राज्याला जोडून घेतला.

या कॉकेशस टापूंतील विजयामुळें तुर्कांनां आतां स्वर्ग दोन बोटें उरला. पण अद्यापि दुसरीं युद्धक्षेत्रें तुर्कांनां लढवावयाचीं होतीं. पण तिकडे लक्ष द्यावयाचें सोडून तुर्की सैन्य याच टापूंत मजा मारीत बसलें. जर्मनीसारख्या मुत्सद्दी राष्ट्रालाहि या तुर्की सैन्याच्या विजयाचा उन्माद चढला. अशा वेळीं खरा मार्ग म्हणजे कॉकेशियामधून सर्व सैन्य काढून नेऊन ज्या ठिकाणीं सैन्याची जरूरी असेल त्या ठिकाणीं त्याचा उपयोग करावयाचा; पण कॉकेशसमध्येंच जर्मनांनीं आपलें सैन्य पाठविण्यास सुरवात केली. अंतःस्थ हेतु हा कीं या टापूमध्यें आपलें वर्चस्व पूर्णपणें प्रस्थापित करून हिंदुस्थानावर स्वारी करावयाची. असल्या पोरकट

कल्पनेला एनवरपाशानें थारा दिला यांत विशेष आश्चर्यकारक कांहींच नाहीं, पण जर्मन मुत्सद्यांनीं या कल्पनेचे देव्हारे माजवावेत यापरतें आश्चर्य तें कोणतें?

मेसापोटेमियामधील युद्धें:—महायुद्धांत मेसापोटेमियाच्या भागांत इंग्लिश व हिंदी सैन्यानें जीं युद्धें केलीं त्या युद्धांच्या मुळाशीं तीन हेतू होते. (१) करून येथील अँग्लोपर्शियन तेलाच्या कोठारांचें रक्षण करणें, (२) बुशाच्या भोंवतालचा प्रदेश ताब्यांत घेऊन, इराणच्या आखाताभोंवतालच्या टापूंत आपला ताबा प्रस्थापित करणें व (३) आटोमन साम्राज्याच्या व हिंदुस्थानच्या दरम्यानच्या टापूंत आपला वचक बसविणें. तुर्कांनीं ज्यावेळीं दोस्तराष्ट्रांविरुद्ध युद्ध पुकारलें त्याच वेळीं इंग्रजांनां खात्रीपूर्वक असें वाटत होतें कीं, जर्मनांच्या चिथावणीनें तुर्की सरकार आपलें सैन्य इराण व अफगाणिस्तान येथें धाडून देऊन या भागांत पुष्कळ धुमाकूळ घालील. त्यामुळें हिंदी सैन्याच्या ६व्या तुकडीला या भागांत पाठवण्याची कामगिरी ब्रिटिश सरकारनें अगोदरच करून ठेविली होती.

सर ए. बॅरेटच्या हाताखालीं सैन्य देऊन त्यास या भागांत रवाना केल्यानंतर थोडक्याच दिवसांत बगदाद हें शहर ब्रिटिशांच्या ताब्यांत आलें. पण तुर्की सैन्य या टापूंत मोठ्या प्रमाणावर येऊं लागलें होतें व त्यापैकीं कांहीं अहवाझ शहराजवळ व उरलेलें नासीरियाच्या आसपास जमूं लागलें होतें. अर्थातच या टापूंत आपली सत्ता असणें हिंदुस्थान सरकारला अवश्य वाटल्यावरून या सरकारनें आपलेंहि सैन्य वाढविण्यास प्रारंभ केला. निक्सन यास बॅरेटच्या जागीं सेनाध्यक्ष करण्यांत आलें व सहाव्या तुकडीवर जनरल टाउनशेंड याची नेमणूक करण्यांत आली. तुर्की सैन्याची अहवाझ येथें अँग्लोइंडियन सैन्याशीं लढाई झाली तींत तुर्की सैन्याचा पराभव झाला व नसीरिया येथील तुर्की सैन्याला ब्रिटिश सैन्यापुढें हार खावी लागली. यामुळें उमेद येऊन निक्सननें अमरा शहर काबीज केलें व नसीरिया शहरहि थोडक्याच दिवसांत आपल्या ताब्यांत घेतलें.

अशा रीतीनें हिंदुस्थान सरकारला या टापूंत जय मिळत गेल्यामुळें मेसापोटेमियाचा बहुतेक भाग काबीज करण्याची महत्वाकांक्षा या सरकारच्या मनांत प्रादुर्भूत झाली; व त्याप्रमाणें कुट येथें जाऊन तें शहर काबीज करण्याचें निक्सननें ठरविलें. कुट येथें नूरउद्दिनबेच्या आधिपत्याखालीं तुर्की सैन्य जमत आहे अशी बातमी निक्सन यास समजली होती. निक्सननें कुट येथें जाणाऱ्या अँग्लोइंडियन सैन्यावर टाउनशेंडची नेमणूक केली होती. त्याप्रमाणें तो कूच करीत कुटपासून १५ मैलांवर येऊन ठेपला. तेथें असलेल्या तुर्की सैन्याचा त्यानें पराभव करून नुरउद्दीनबेशीं लढाई देण्यासाठीं तयारी देण्यांत कांहीं दिवस घालविले. १९१४ सालच्या आक्टोबरच्या अखेरीस त्यानें नूरउद्दिनच्या सैन्यावर हल्ला करून तुर्की सैन्याचा पराभव केला.

कुट हें शहर लष्करीदृष्ट्या महत्त्वाचें होतें. येथें तैग्रीस व युफ्रेटीस नद्यांच्या प्रदेशांत जाणारे रस्ते एकत्र मिळाले होते. बगदाद, नासिरीया अगर अमदा या शहरांकडे जाणारे रस्ते याच शहरांवरून जात होते. अशा या महत्त्वाच्या ठिकाणचा टाउनशेंडनें कबजा घेतला. पण तो ताबा राखणें फार कठिण काम होतें. तुर्की साम्राज्याच्या खास टापूंतच या सैन्यानें आपला तळ दिला होता जवळपास या सैन्याला मदत मिळण्याची आशाहि नव्हती. त्यामुळें कुट राखणें म्हणजे फारच प्रयासाचें काम होतें. पण ब्रिटिशांचा हेतु कुटपासून बगदादवर चाल करून तें शहर ताब्यांत घेण्याचा होता. त्याचप्रमाणें हिंदुस्थान सरकार व ब्रिटिश सरकारनें परस्पर खल करून टाउनशेंड यास बगदादकडे कूच करण्याचा हुकूमहि दिला होता, त्याप्रमाणें कूच करीत करीत टाउनशेंड हा टेसीफॉन शहराच्या जवळ येऊन पोहोंचला. या ठिकाणीं तुर्की सैन्यानें आपला तळ दिला होता व शत्रूशीं युद्ध करण्यासाठीं कडेकोट तयारी केली होती. या भागांत रोज तुर्की सैन्य नवें नवें जमा होत होतें. शेवटीं या दोन्ही सैन्यांची एकदांची गांठ पडून चकमक झडली. त्यांत प्रथम ब्रिटिश सैन्याचा जय झाला. पण उत्तरोत्तर तुर्की सैन्याची संख्या फुगूं लागल्यामुळें टाउनशेंडला आपल्या बळाबद्दल संशय उत्पन्न होऊं लागला व मार्गे परतण्यांतच आपलें हित आहे असें वाटूं लागलें व त्याप्रमाणें त्यानें मार्गे पाय घेण्यास सुरवात केली.

टाउनशेंडनें पिछेहाट सुरू केली एवढें तुर्की सैन्याला कळतांच मग काय विचारतां? या सैन्यानें टाउनशेंडला हरतऱ्हेनें सताऊन सोडण्यास सुरुवात केली. तथापि अनेक संकटांनां तोंड देऊन टाउनशेंड कसाबसा कुट येथें येऊन पोहोंचला. पण तेथें येतांच त्याच ठिकाणीं मुक्काम करण्याचा हुकूम त्याच्या हातांत पडला. त्यामुळें त्याला आपल्या कमकुवत झालेल्या सैन्याच्या बळावर विसंबून तेथेंच रहाणें भाग पडलें. टाउनशेंडला कुमक मिळावी यासाठीं ब्रिटिश सरकारनें आइलमीरच्या हाताखालीं बरेंच सैन्य देऊन रवाना केलें. या सैन्याची मध्यंतरीं एक दोनदां तुर्की सैन्याशीं चकमक झडून त्यांत तुर्की सैन्याला हार खावी लागली. पण हन्ना येथें मात्र ब्रिटिश सैन्याचा पराभव झाला. पुढें आइलमीरच्या जागीं गॉरिंजची नेमणूक झाली. त्यानें हन्ना शहर आपल्या ताब्यांत घेतलें पण पुढें कूच करतांना त्याला तुर्कांच्या पुढें हार खावी लागली. इकडे कुट ठाणें तुर्की सैन्यानें घेरल्यामुळें कुट येथील सैन्याला तुर्कांनां शरण जाणें भाग पडलें.

ब्रिटिशांनीं हा आपला अपमान नाहींसा करण्यासाठीं आतां कंबर बांधली. जनरल मॉड याला अँग्लोइंडियन सैन्याचा अधिपति नेमण्यांत आलें. यानें मागील सेनापतींनीं आपल्या आवांक्याबाहेरच्या कामगिरीसाठीं हात घातलेला होता तसें न करतां त्यानें आपल्या सैन्याची

कडेकोट तयारी केली व नंतर तो आपल्या सैन्यासह सन्नाइनत येथें आला. तेथील तुर्की सैन्याचा त्यानें पराभव करून त्यांना पिटाळून लावलें. लगेच त्यानें पुढें कूच करून कुट शहरावर हल्ला केला व तेंहि शहर काबीज केलें. यानंतर त्यानें बगदादला शह देण्याची तयारी चालविली. कांहीं दिवस विश्रांति घेऊन त्यानें आपल्या सैन्याला बगदादकडे कूच करण्याचा हुकूम फर्मावला. वाटेंत त्यानें एक दोनदां तुर्की सैन्याचा पराभव करून बगदाद गांठलें. तेथील तुर्की सैन्यानें भीतीनें आपला पाय अगोदरच काढला होता. त्यामुळें बगदाद हें शहर विन प्रयासानें मॉडच्या हातीं पडलें. अशा रीतीनें अवघ्या चार साडेचार महिन्यांच्या अवधींत मॉडनें बगदादवर ब्रिटिश निशाण फडकाविलें व अशा रीतीनें ब्रिटिशांचा झालेला अपमान पार धुवून टाकण्याच्या कार्यांत त्यानें यश मिळविलें.

बगदाद शहर हातीं आल्यावरोबर मॉडनें कुट ते बगदाद पर्यंत रेल्वे तयार केली. यानंतर त्यानें पर्शियामध्यें घुसण्याचा निश्चय केला. इकडे तुर्क व जर्मन सैन्यानें बगदाद शहर परत मिळविण्यासाठी तयारी चालविली होती. पण तिकडे लक्ष न देता मॉडनें युफ्रेटीस नदीच्या कांठचें रमडी हें शहर काबीज करून घेतलें. पुढें तैग्रिस नदीवर तिंक्रिट हेंहि ठाणें त्याच्या हातीं पडलें. पण याच सुमारास मॉड हा कॉलऱ्यानें आजारी पडून मरण पावला व त्याच्या जागीं मार्शल याची नेमणूक झाली.

कॉकेशस टापूंतील लढाईत वाक हें तुर्कांच्या हातीं लागल्या मुळें मार्शल यास बगदादकडून मोसलकडे चाल करून जाण्याचा हुकूम झाला. त्याप्रमाणें मार्शल हा सैन्यासह मोसलकडे निघाला. या प्रांतांत तुर्की सैन्य मोठ्या प्रमाणावर जमा झालेलें होतें; व लष्करीदृष्ट्या महत्त्वाचीं ठाणीं तुर्कांच्या हातीं होतीं. त्यामुळें मार्शलनें वळणावळणानें तुर्की सैन्याला शह देण्याचा बेत केला. त्यानें कॉब सेनापतीच्या हाताखालीं सैन्य देऊन मोसलकडे रवाना केलें व स्वतः त्यानें आपलें सैन्य फथाच्या बाजूकडे आणलें. अशा रीतीनें दोन्ही बाजूस तुर्की सैन्याला जेरीस आणलें. अशी परिस्थिति पहाताच तुर्कांचा सेनापति इस्माइल हक्की पाशा यानें पिछेहाटीचें धोरण स्वीकारून, तो लेसरझाब नदीच्या कांठीं आला. पण आंग्लोइंडियन सैन्यानें त्या ठिकाणांतहि तुर्की सैन्याला गांठून त्याचा पराभव केला. पुढें मोसलच्या आसपासहि या दोन्ही सैन्यांची लढाई होऊन शेवटीं त्यांत तुर्की सैन्याचा हिरमोड झाला. मोसल ब्रिटिशांच्या ताब्यांत पडलें. पुढें दोनच दिवसांनीं दोस्त राष्ट्रें व जर्मनी यांच्यामध्यें युद्धतहकुबीच्या खलित्यावर सह्या झाल्याचें वर्तमान जाहीर झालें.

सिनाई टापूंतील लढाईः—इ. स. १९१६ च्या जानेवारी महिन्यांत डार्डानेल्सची स्वारी शेवटास गेली व या टापूंतील सैन्याला ईजिप्तकडे जाण्याचा हुकूम झाला. ईजिप्तवर तुर्कांची स्वारी झाल्यास ईजिप्तचें संरक्षण करण्यासाठींच ब्रिटिशांनीं ही आगाऊ तरतूद केली होती. या सैन्यावर सर आर्चिबाल्ड मरे याची नेमणूक झाली होती. मरेच्या हाताखालीं यावेळीं मुबलक सैन्य होतें पण थोडक्याच दिवसांत त्यापैकीं निम्याहून अधिक सैन्य, फ्लँडर्सच्या टापूंत जरूरी असल्यामुळें नेण्यांत आलें. उरलेल्या थोड्या सैन्याच्या सहाय्यानें मरे याला ईजिप्तचें संरक्षण करणें भाग पडलें. लगेच मरेनें, सुवेझच्या कालव्यापासून २५ मैल अंतरावर उत्तरसिनाई पर्वताच्या आश्रयानें आपली सेना कडेकोट तयारींत ठेवण्याचा उद्योग सुरू केला. रोमानी येथें त्यानें आपलें सैन्य एकत्र केलें होतें. या ठिकाणापासून जवळच शत्रुसैन्याची छावणी होती.

कांहीं दिवस विश्रांति घेतल्यानंतर त्यानें ईजिप्तच्या सरहद्दीकडे आपला मोर्चा वळविला. १९१६ च्या ऑगस्ट महिन्यांत तुर्कांनीं ब्रिटिश सैन्यावर हल्ला केला पण या चकमकींत तुर्की सैन्याचा पराभव झाल्यामुळें, तुर्कांनां कोटिया शहर सोडावें लागून डोंगरांचा आश्रय घेणें भाग पडलें. पण या ठिकाणींहि ब्रिटिश सैन्यानें त्यांनां सतावून टाकण्यास सुरवात केली. प्रथम तुर्कांनीं ब्रिटिशांनां दाद दिली नाहीं. पण पुढें त्यांनां आपली जागा सोडून पिछेहाट करणें जरूरीचें झालें व त्याप्रमाणें तुर्की सैन्य एलरिझच्या आसपास येऊन राहिलें. पण कांहीं काळानंतर येथेंहि ब्रिटिशांनीं त्यांचा पाठलाग केला व त्यांच्या सैन्याची दुर्दशा करून टाकली. त्यामुळें तुर्कांनां या टापूंतून आपला पाय काढूनच घेणें भाग पडलें. आतां या टापूंत तुर्की सैन्य जवळ जवळ २ हजार उरलें होतें व पॅलेस्टाईनच्या आसपास त्या सैन्याचा तळ होता. या सैन्याला हुसकून लावण्याचें काम जनरल चेटवुडकडे देण्यांत आलें होतें. खेलाल येथें दोन्ही सैन्यांची तुंबळ लढाई होऊन मोठ्या मुष्किलीनें ब्रिटिशांचा जय झाला, व सिनाई टापूंतील तुर्की सैन्य जवळ जवळ नाहींसेंच झालें.

गाझा व बीरशेबा यांच्या दरम्यानचा टापू अद्यापि तुर्कांच्या ताब्यांत होता. ईजिप्तहून पॅलेस्टाईनवर स्वारी करावयाची असल्यास या मुलुखाचा ताबा असणें अत्यावश्यक होतें. पण यासाठीं जितकी फौज असावयास पाहिजे तितकी फौज ब्रिटिशांजवळ नव्हती. शिवाय इतक्यांत या प्रांतांत चढाईचें धोरण स्वीकारूं नये असें युद्धमंडळानें मरे यास कळविलें होतें. त्यामुळें मरेला स्वसंरक्षणाच्या पलीकडे कांहींच करतां येत नव्हतें.

गाझा येथें तुर्कांचें सैन्य जवळ जवळ ७००० होतें व इतकेंच सैन्य, टेलेश शरिया व बीरशेबा या टिकाणीं होतें. त्यामुळें या सैन्याला तोंड दिल्याशिवाय तर मरेला गत्यंतर नव्हतें तेव्हां त्यानें चढाईचें धोरण स्वीकारण्याबद्दल कशी बशी परवानगी युद्धमंडळाकडून मिळविली व सैन्यावर हल्ला करण्याच्या कामीं जनरल डोबेल व जनरल चेटवुड यांची नेमणूक केली.

गाझाला जाणारा रस्ता फार खराब होता. शिवाय डोवेल व चेटवुड यांच्या जवळचें सैन्यहि पुरेसें नव्हतें. तेव्हां अशा अपुऱ्या सैन्याच्या साहाय्यानें गाझा येथील तुर्की सैन्याला हांकून लावावयाचें म्हणजे त्यांच्यावर अचानक छापा घालून त्यांनां पळावयास लावणें एवढाच उपाय होता व त्याप्रमाणेंच डोवेलनें करावयाचें ठरविलें. आपल्या सैन्याला अगदीं आवश्यक अशा सामानसुमानासकट त्यानें रात्रीच्या वेळीं प्रवास करून सकाळीं तो एकदम गाझाजवळ येऊन धडकला. त्यामुळें तुर्की सैन्याची घांदल उडून गेली. तरी पण त्यांतल्यात्यांत तुर्कांनीं व्यवस्थितपणें इंग्रजांबरोबर लढाई सुरु केली. तुर्की सैन्यानें या लढाईत चांगला पराक्रम गाजविला. पुष्कळदां डोवेल यास माघार घ्यावी लागली. भरपूर सामानाच्या अभावीं इंग्रज सैन्याचे फार हाल झाले. तथापि संकटाला न जुमानतां, लष्करी डावपेंचांच्या साहाय्यानें एक दिवस लढाई करून आपलें असंख्यात सैन्य बळी देऊन, डोवेलनें गाझा शहर आपल्या ताब्यांत घेतलें.

पण गाझा शहराच्या आसपासचा टापू अद्यापि इंग्रजांच्या ताब्यांत आला नव्हता व तो आल्याशिवाय नुसतें गाझा शहर जिंकण्यानें कांहींच कार्यभाग होण्यासारखा नव्हता. पण आसपासचा टापू जिंकावयाचा म्हणजे, इंग्रजांची फौज पुष्कळच वाढावयाला पाहिजे होती. नवीन दळणवळणाचीं साधनें तयार करणें जरूर होतें. यासाठीं मरे यास पुष्कळ दिवस स्वस्थ बसावें लागलें. शेवटीं तयारी झाल्यानंतर मोहिमेला पुन्हां सुरवात झाली. तुर्कांनींहि आपली तयारी जय्यत केली होती. त्यामुळें इंग्रजांनां तुर्कांबरोबर लढतांना पुष्कळवेळां हटावें लागलें. त्यामुळें पुष्कळ दिवस लढाई करून इंग्रजांच्या हातीं फारसा मुलूख लागला नाहीं. जेवढा मुलूख मिळेल तेवढ्याची पूर्ण व्यवस्था लावून मग पुढें जावयाचें असा इंग्रजी फौजेचा क्रम होता. पण उत्तरोत्तर मरेच्या सैन्याचें तुर्कांच्या पुढें कांहीं चालेना व मिळालेल्या मुलुखावरहि या टापूंतील लढाई ब्रिटिश सैन्याला बंद ठेवावी लागली.

पॅलेस्टाईनमधील लढायाः—१९१७ च्या एप्रिल महिन्यांत जर्मनीच्या प्रचंड हल्ल्याविरुद्ध इंग्रजांनीं गाझा शहराचें रक्षण केलें. हें पहातांच जर्मनांनीं तुर्कस्तानच्या गाझा-बीरशेबा टापूमध्यें पुष्कळ सैन्य जमवून गाझा शहरांतून इंग्रजांनां हांकून लावण्याचें ठरविलें. पण या सुमारास तुर्कस्तानांत विश्वेस्लाम(पॅन इस्लाम)पक्ष जोरांत असल्यानें तुर्कांचें लक्ष बगदाद, मक्का, इत्यादि धर्मदृष्ट्या पवित्र मानलेलीं शहरें पुन्हां परत मिळण्याकडे लागलें होतें. त्यामुळें जर्मन सैन्याच्या वरील विनंतीला मान देण्याइतकें तुर्कस्तानला स्वास्थ्य नव्हतें. कॉन्स्टांटिनोपल मधून इराक परत मिळविण्यासाठीं एकसारख्या सैन्याच्या तुकड्याच्या तुकड्या रवाना होत होत्या. पण थोडक्याच दिवसांत, तुर्क सरकारला समजूं लागलें कीं पॅलेस्टाइनमध्यें जर आपली सेना तावडतोब पाठविण्यांत न येईल तर, त्या भागांत शत्रूंची सत्ता प्रस्थापित होऊन, त्याचे भयंकर परिणाम झाल्याशिवाय राहाणार नाहींत. पण विश्वेस्लाम पक्षाच्या विरोधामुळें, तुर्कस्तानला बराच काळ आपली फौज पॅलेस्टाइन टापूंत पाठवितां आली नाहीं व ज्यावेळीं पाठवली त्यावेळीं तिचा फारसा उपयोग झाला नाहीं. उशीरानें कां होईना पण जी फौज पॅलेस्टाईनमध्यें पाठविण्यांत आली, त्या फौजेचा सेनापति मार्शल फाकेन हाइन होता. त्यानें ब्रिटिशांच्याहल्ल्यापूर्वीच ब्रिटिश फौजेवर चढाई करण्याचा घाट घातला पण या भागांत दळणवळणाचीं मुबलक साधनें नसल्याकारणानें व हेदरपाशाचा सुभेदार अहंमद जमालपाशा हा जर्मनांचा पक्षपाती नसल्यानें, या तुर्की फौजेला चढाई करण्याला फार विलंब लागला. या टापूंतील इंग्रज सैन्याचा सेनापति जनरल अलेनबी हा होता. तुर्की फौजेचा उद्देश ध्यानांत येतांच त्यानें तोंड देण्याच्या हेतूनें कडेकोट तयारी केली. आक्टोबरच्या ३०–३१ तारखेला यों दोन्ही सैन्यांमध्यें रणकंदनाला सुरवात झाली. शेवटीं भयंकर कत्तलीनंतर इंग्रजांनीं बीरशेबा हें शहर काबीज केलें.

त्यानंतर अलेनबीनें गाझा शहराकडे आपलें लक्ष्य दिलें. त्याच्या पूर्वी इंग्रज सैन्यानें 'अंब्रेला हिल' हें ठिकाण काबीज केलें. पुढें कांहीं दिवसानंतर कुविलेफ हें शहर काबीज केलें. अशा रीतीनें तुर्कांनां गाझाच्या टापूंत कोंडून, अलेनबीनें गाझा शहरावर हल्ला करण्याचा बेत केला. तुर्कांनीं तर या ठिकाणीं कडेकोट तयारी केली होती. त्यामुळें अलेनबीला गाझा शहर ताब्यांत येणें फार अवघड गेलें. पण सैन्यांतील शिस्तीच्या जोरावर व लष्करी डांवपेंचानें त्यानें शेवटीं गाझा शहर आपल्या ताब्यांत घेतलेंच. याच्या पुढचा अलेनबीचा बेत जेरूशलेम हें तुर्कांचें पवित्र स्थान काबीज करणें हा होता. त्यामुळें त्यानें तिकडे मोर्चा वळविला. तुर्कांनींहि हें धर्मक्षेत्र राखण्याचा अटोकाट प्रयत्न करण्याचें ठरविलें. अलेनबीचें सैन्य हळू हळू एकेक ठिकाण काबीज करीत पुढें चाललें. तुर्कांनींहि जागजागीं त्यांनां विरोध करण्याचा सपाटा चालू ठेवलाच होता. पण विरोध सहन करूनहि इंग्रज फौज हळू हळू पुढचा मार्ग आक्रमीत होतीच. कुस्तुल, सोभा, तेबी समविल इत्यादि महत्त्वाचीं ठिकाणें तुर्कांनां सोडावीं लागलीं होतीं. पण तेबी समविल येथें इंग्रज सैन्य येतांच अलेनबीनें तेथेंच कांहीं दिवस विश्रांति घेण्याचा बेत केला. सारखे महिनेच्या महिने विश्रांतीशिवाय इंग्रज फौजेला लढावें लागल्यामुळें, विश्रांतीची अत्यंत आवश्यकता भासणें साहजिकच होतें. पण या विश्रांतीच्या काळांत तुर्कांनींहि आपल्या सैन्याची व्यवस्था लावली व कांहींहि करून जेरूशलेमचें रक्षण करण्याची त्यांनीं प्रतिज्ञा केली.

विश्रांति घेऊन झाल्यानंतर पुन्हां हालचालीला सुरवात झाली. इंग्रज सैन्यानें कूच करून मोठ्या मुष्किलीनें हिरात शहर काबीज केलें. त्यानंतर पुन्हां इंग्रजी सैन्यानें लिफ्टा

शहरावर हल्ला केला, व तेंहि शहर काबीज केलें. लिफ्टा शत्रूंच्या ताब्यांत पडतांच तुर्की सैन्याचें धाबें दणाणलें; व त्यांनीं जेरुशलेमपासून मार्गे हटण्यास प्रारंभ केला. याच वेळेस अलेनबीनें तुर्कांचा पाठलाग केला असता तर तुर्कांची दाणादाण उडून गेली असती. पण जेरुशलेम आपल्या हातीं सहज पडणार अशी अलेनबीला खात्री वाटत असल्यानें त्यानें शांततेनें तें शहर काबीज करण्याचा निश्चय केला. थोडक्याच दिवसांत जेरुशलेम हें इंग्रजांच्या हातीं कांहींहि भानगड न होतां पडलें. यरुशेलेम हातीं आल्यानंतर त्याची बंदोबस्ती करण्यास अलेनबी लागला. जेरुशलेम काबीज करण्याचा तुर्क खात्रीनें प्रयत्न करणार असें अलेनबीला वाटत होतें व त्यासाठीं त्यानें आसपासच्या मुलुखामध्यें बंदोबस्त ठेवून तुर्कांच्या स्वारीला तोंड देण्याच्या तो तजविजीला लागला.

अलेनबीच्या अंदाजाप्रमाणें तुर्की सैन्यानें जेरुशलेम ताब्यांत घेण्याचा प्रयत्न केलाच. पण ब्रिटिश फौजेची जय्यत तयारी असल्यामुळें बिचाऱ्या तुर्कांचें कांहींच चाललें नाहीं. माऊंट एफ्राहिम येथील लढाईत तुर्कांचा पूर्ण पराभव झाला. पण अद्यापिहि जोरिच व जॉर्डनचा टापू तुर्कांच्या ताब्यांत होता. तो हस्तगत केल्याशिवाय हा टापू निर्धास्त झाला असें म्हणतां येत नव्हतें. यासाठीं जोरिचवर ब्रिटिश सैन्य पाठवण्यांत आलें. या सैन्यानें जोरिच काबीज केलें. पुढें अलेनबीनें जॉर्डन ताब्यत घेऊन,घोरनिर्येचा पूल ताब्यांत घेतला. नंतर एससाष्ट शहर जिंकण्यांत आलें, पण उत्तरोत्तर तुर्कांचा विरोध अधिक होऊं लागल्यामुळें अलेनबीला जलदी करतां येईना. तशांत फ्रान्सच्या रणक्षेत्रावर सैन्याची जरूरी भासूं लागल्यामुळें अलेनबीच्या सैन्यांतील जवळ जवळ निम्में सैन्य तिकडे पाठवावें लागलें व त्याच्या बदली हिंदुस्थानांतील सैन्य अलेनबीला देण्यांत आलें. या सैन्याला शिक्षण देण्यांत अलेनबीचा बराच वेळ मोडला. अशा रीतीनें कांहीं दिवस व्यर्थ गेल्यानंतर पुन्हां मोहिमेला सुरवात झाली. अलेनबीच्या सैन्यानें तुलकेरम आपल्या ताब्यांत घेतलें. त्यानंतर कार्मेल टेकडी आपल्या ताब्यांत घेऊन, मेगोडोच्या घांटानें नाझरेथवर चाल करून तें शहर अलेनबीनें जिंकून घेतलें. यानंतर नॅबुलस शहर इंग्रजांच्या हातीं लागलें. अम्मन शहराजवळ तुर्कांनीं जोराचा विरोध केला पण त्या ठिकाणींहि शेवटीं तुर्कांनां हार खावी लागली.

यानंतर अलेनबीनें दमास्कसवर हल्ला करण्याचें ठरविलें. अक्रे आणि हैफ येथें तुर्कांनीं ब्रिटिश सैन्याला पुष्कळ वेळ थोपवून धरलें पण शेवटीं तुर्कांची फळी फोडून इंग्रज फौजेनें जय मिळविला. अशाच प्रकारचा विरोध जिस्र बनत याकुब येथें ब्रिटिशांनां झाला. पण तुर्कांची कांहीं मात्रा चालली नाहीं. शेवटीं दमास्कसवर ब्रिटिश फौजेनें चढाई करून तुर्कांची दाणादाण करून सोडली व दमास्कस शहर आपल्या ताब्यांत आणलें. या लढाईत बरेंच तुर्की सैन्य ब्रिटिश सैन्याच्या हातीं लागलें.

अशा रीतीनें दक्षिण व मध्य सीरिया अलेनबीच्या हातांत पडला. या सर्व प्रदेशाची पूर्ण व्यवस्था लावल्यानंतर, तुर्की सैन्याचा पाठलाग करण्याच्या बेतास अलेनबी लागला. अलेनबीनें आपल्या सैन्याचा कांहीं भाग टायरकडे पाठवून तें शहर जिंकलें त्यानंतर बैरुट, ट्रिपोली हेंहि टापू इंग्रजांच्या ताब्यांत आले. दुसऱ्या तुकडीनें अलेप्पोवर स्वारी करून तें शहर आपल्या ताब्यांत घेतलें व अलेक्झांड्रेटा मार्गांत तुर्कांचा पराभव करून त्यांनां बगदादच्या पलीकड पार पिटाळून लावलें.

म हा यु द्ध सं प ल्या नं त र.—तुर्कस्तानमधील राष्ट्रीय पक्षानें इसवी सन १९१९–२० मध्यें राष्ट्रीय तुर्कस्तान नांवाचें एक स्वतंत्र संस्थान स्थापन केलें. दोस्त राष्ट्रांनीं आपल्या विजयानंतर, तुर्कस्तानवर ज्या अटी लादल्या त्या राष्ट्रीय तुर्कांनां मान्य झाल्या नाहींत. या अटींप्रमाणें तुर्की अरबस्तान, पॅलेस्टाइन, मेसापोटेमिया इत्यादि प्रदेशांनां तुर्कस्तान मुकावयाचा होता. तुर्कस्तानच्या जमाबंदीवर परराष्ट्रांनी देखरेख रहावयाची होती. एशियन ते काळा समुद्र या टापूमधील प्रांतावर सर्व राष्ट्रीय ताबा रहावयाचा होता. अशा प्रकारच्या जाचक अटी देखील तुर्कांनां मान्य झाल्या असत्या पण, स्मर्ना व थ्रेस हे प्रांत ग्रीसला देण्यांत आल्यानें मात्र तुर्कस्तानचें पित्त खवळून गेलें. ग्रीसनें ज्यावेळीं हे प्रांत आपल्या ताब्यांत घेतले त्यावेळीं तुर्कस्तानमध्यें भयंकर खळवळ उडून तुर्क राष्ट्रीय पक्षाला आपली चळवळ जोरानें फैलावण्यास नामी संधि मिळाली.

मुस्ताफा केमाल पाशा यानें १९१९ च्या जून महिन्याच्या १९ व्या तारखेस खवसा येथील जाहीर सभेत, राष्ट्रीय पक्षाच्या चळवळीची घटना पुढें मांडली व त्या दिवसापासूनच जाहीर तऱ्हेनें ही चळवळ सुरू झाली असें मानण्यास हरकत नाहीं. या घटनेच्या अन्वयें आशियामायनरमध्यें तरुण तुर्कांची मोठी सेना उभारावयाचें ठरून तुर्कस्तानच्या ताब्यांतील प्रदेशाची फाळणी होऊं न द्यावयाची असें ठरविण्यांत आलें. आर्मिस्टिसच्या अटींप्रमाणें जो भाग सार्वराष्ट्रीय देखरेखीखालीं रहावयाचा होता त्यावर कोणत्याहि एका राष्ट्रानें देखरेख ठेवावी असें या पक्षानें जाहीर केलें. ही राष्ट्रीय चळवळ तरुण तुर्कांमध्यें हां हां म्हणतां पसरली. ऑगस्टमध्यें एर्झेरम येथें या पक्षानें एक तात्पुरतें सरकार स्थापन केलें. सप्टेंबरमध्यें सिवस येथें राष्ट्रीय पक्षाची कांग्रेस भरून ऑटोमन साम्राज्याचे हितसंबंध पूर्णपणें राखावयाचे व खलीफा व सुलतान पद यांचें रक्षण करावयाचें असें त्यांत ठरलें. कांहीं आठवड्यांनंतर अंगोरा येथें सरकार नेण्यांत आलें. १९१९ सालच्या अखेरीस ही चळवळ आशियामायनरभर पसरली होती व तुर्की सरकारची सत्ता जवळ जवळ नामशेषच झाली होती.

या राष्ट्रीय चळवळीस तुर्की सैन्याचा पूर्ण पाठिंबा होता. व त्याशिवाय 'ऐक्य व प्रगति'-नांवाची एक गुप्त कमिटीहि याला मनोभावें साहाय्य करीत होती. तलातपाशा, एनवरपाशा, जेलमपाशा, इलांमपाशा इत्यादि मर्डी मर्डी घेंडें या चळवळींत प्रामुख्यानें भाग घेत होतीं. यांनीं या राष्ट्रीय चळवळींच्या ध्येयांत विश्वेस्लामप्रसाराचें तत्व घुसडून दिलें.त्यामुळें या चळवळीचा ब्रिटिश हिंदुस्थानांतील मुसुलमानांवरहि फार परिणाम होऊन खिलापत चळवळ येथें सुरू झाली; व खिलापत कमिटीतर्फे एक प्रतिनिधिमंडळ लंडन येथें पाठविण्यांत आलें. शांततापरिषदेच्या वेळीं कॉन्स्टांटिनोपल तुर्कांच्या हातीं ठेवण्यांत यावयाचें ठरविलें गेलें. याच सुमारास तुर्क राष्ट्रीय पक्षानें, सायलेशियामध्यें लष्करी हालचाल करण्यास सुरवात केली. त्याचबरोबर ग्रेसमध्येंहि त्यानें ग्रीक लोकांनां विरोध करण्यास सुरवात केली.

राष्ट्रीय पक्षाची चढती कमान होत चाललेली पाहून तुर्की सरकारला भय उत्पन्न झालें. व सरकारनें तुर्कस्तानमधील मवाळ लोकांनां आपल्या पंखाखालीं आणून व राष्ट्रीय पक्षाला बंडखोर ठरवून त्या पक्षाला दडपून टाकण्यास सुरवात केली. येवढ्यावरच न थांबतां सरकारनें ब्रुसा ताब्यांत घेण्याकरतां अंझहूरपाशाच्या ताब्यांत सैन्य देऊन त्याला पाठविलें. पण ब्रुसाला पोहोंचण्यापूर्वीच हें सैन्य राष्ट्रीय पक्षाला जाऊन मिळालें.

इकडे सुप्रीम कौन्सिलांत तुर्कस्तानसंबंधींचा खलिता तुर्की सरकारच्या ताब्यांत दिला गेला. तो खलिता राष्ट्रीय पक्षाच्या पसंतीला न उतरल्यामुळें त्यांनीं या खलित्याप्रमाणें न वागण्याचें ठरविलें व तुर्कस्तानसरकार जर त्या खलित्याला मान्यता देईल तर या सरकारला देखील जुमानावयाचें नाहीं असें राष्ट्रीय पक्षानें ठरविलें. अर्थातच या राष्ट्रीय पक्षाला या अटी मानण्यास लावण्याची दोस्त राष्ट्रांवर मोठी जबाबदारी येऊन पडली. ग्रीक लोकांनां आशियामायनरमध्यें चढाई करण्यास दोस्त राष्ट्रांनीं परवानगी दिली. त्याचप्रमाणें ग्रीक सैन्यानें आशियामायनरमध्यें स्वारी करून त्यांतील बराच भाग आपल्या ताब्यांत घेतला. पण राष्ट्रीय पक्षहि लेचापेचा नव्हता. त्यानेंहि रशियाशीं आपलें कारस्थान रचण्यास सुरवात केली व रशियानें बोल्शेव्हिक मताचा प्रसार करण्याच्या लोभानें या राष्ट्रीय पक्षाला सैन्य व दारूगोळा पुरविण्याचें अभिवचन दिलें. यामुळें राष्ट्रीय पक्षाला जोर चढला. हें पाहून तुर्की सरकारनें या पक्षाशीं समेट करण्याची खटपट करून पाहिली पण ती साधली नाहीं.

इकडे रशियानें आशियामायनरमध्यें राष्ट्रीय पक्षाला साहाय्य करण्याकरितां सैन्य पाठविण्याचें ठरवलें व त्या निमित्त सुलभ दळणवळणाचीं साधनें तयार करण्यास सुरवात केली. पण तुर्कस्तान व अझरबिजन या टापूंच्यामध्यें एरिव्हनचें प्रजासत्ताक राज्य व आर्मेनियन संस्थान होतें; व हीं संस्थानें तर राष्ट्रीय पक्षास विरोधी होतीं. त्यामुळें एरिव्हनच्या राज्याला नमतें घेण्यास भाग पाडल्याशिवाय गत्यंतरच उरलें नाहीं. यासाठीं रशियानें या राज्यावर स्वारी करून तें राज्य जवळ जवळ उध्वस्त करून आपल्या ताब्यांत घेतलें व एरिव्हनकडून तुर्कस्तानला कार्स व अर्दहन हे प्रांत देवविले.पण १९२० च्या अखेरीस व्हेरिझोलायचें मंत्रिमंडळ पदच्युत होऊन कॉन्स्टंटाइन राजा राज्यारूढ झाला. अर्थातच या राजाविरुद्ध दोस्त राष्ट्रें असल्यानें दोस्त राष्ट्रांनीं ग्रीकला मदत करण्याचें रहित केलें. पण तुर्कस्तानचा प्रश्न सोडविणें अत्यावश्यक असल्यामुळें दोस्त राष्ट्रांनीं हा प्रश्न मिटवून टाकण्यासाठीं ग्रीस व तुर्कस्तान यांच्या प्रतिनिधिमंडळाला लंडनमध्यें बोलावलें. त्यांत अंगोरा सरकारच्या प्रतिनिधींनां घ्यावयाचें ठरविण्यांत आलें. दोस्त राष्ट्रांनीं आपापसांत खल करून या प्रतिनिधिमंडळापुढें आपल्या अटी ठेवल्या. या अटींमध्यें ज्या प्रमुख अटी होत्या त्या म्हणजे तुर्कस्तानला कॉन्स्टांटिनोपल मिळावयाचें, तुर्कस्तानला सैन्यवाढीची परवानगी द्यावयाची, स्मर्ना टापूवर तुर्कांचें स्वामित्व रहावयाचें या होत. या अटी ग्रीसनें नाकारल्या; व राष्ट्रीय पक्षाविरुद्ध स्वारी करून अंगोरा गांठण्यासाठीं व राष्ट्रीय पक्ष चिरडून टाकण्यासाठीं ग्रीसनें आपलें सैन्य रवाना केलें. पण कर्मधर्मसंयोगानें १९२१ सालच्या मार्चच्या अखेरीस एस्कीशेहर येथें ग्रीक सैन्याचा प्रचंड पराजय होऊन ग्रीस सैन्याला ब्रूसा व इशकच्या टापूंचा आश्रय घेणें भाग पडलें. जुलै महिन्यांत ग्रीसनें मोठ्या प्रमाणावर लष्करी हालचाली सुरू करून तुर्की सैन्याचा पराभव करण्याचा प्रयत्न केला. त्याप्रमाणें करहिसर, कुटहिया, एस्कीशेहर हीं शहरें त्यांनीं जिंकूनहि घेतलीं. पण ऑगस्ट महिन्याच्या अखेरीस सकरिया नदीच्या कांठीं जी मोठी लढाई झाली तींत ग्रीक सैन्याला हार खावी लागून त्या सैन्याला पाठीमागें हटावें लागलें.

याप्रमाणें ग्रीकांच्या पराजयामुळें त्याच सालीं पॅरिस येथें भरलेल्या दि निअर ईस्ट परिषदेनें तुर्को-ग्रीकामध्यें त्रैमासिक युद्धतहकुबी असावी या गोष्टीस आपली संमति दिली. आर्मेनियन प्रांताचेंच संरक्षण व्हावें ही योजना बदलून, सार्वत्रिक संरक्षणाची योजना पास झाली. लष्करी दोस्तअधिकाऱ्यांकडून रॉडॉसटो हें टर्कीस द्यावें व बाबा एस्की व किर्कफिलिसे ग्रीकांनां द्यावेत अशी शिफारस करण्यांत आली. ग्रीकांच्या हातीं असलेले पूर्वीचे प्रांत टर्कीला मिळावे व भूमध्यसमुद्रापासून काळ्या समुद्रापर्यंत आणि ट्रॅन्सकॉकेशिया व पर्शिया यांच्या सरहद्दीपासून इजियनसमुद्रापर्यंत आणि आशियामायनरमधील तुर्की सत्तेचें क्षेत्र असावें असें शेवटीं ठरून गेलें. ग्रीकांनीं पैशानें भरपाई करावी व सुलतानची सत्ता अबाधित रहावी अशा दोस्तांच्या मागण्या कांहीं अटींवर मान्य करण्यांत आल्या. आक्टोबर १९२२ सालीं म्यूडॅनिया येथें एक परिषद भरली होती. तुर्कांनीं पूर्व ग्रेसमध्यें आपली पूर्ण सत्ता पुन्हां प्रस्थापित करावी अशी लॉर्ड कर्झन व एम्. पाइंकारे यांनीं कबुली दिली. ब्रिटन व टर्की

यांमध्यें ११ आक्टोबर १९२२ रोजीं तह झाला. त्यांतील मुख्य मुद्दे खालीं दिल्याप्रमाणें आहेतः—

( १ ) परकीयांनीं पंधरा दिवसांत थ्रेस प्रांत सोडावा व तुर्कांनीं आपली सत्ता तेथें एक महिन्यांत स्थापन करावी. ( २ ) तुर्की सैन्याची ( जेंडारमेरी ) मर्यादा ८ हजार पर्यंत असावी. ( ३ ) मारिटझच्या पश्चिम किनाऱ्यावर दोस्तांचें सैन्य असावें. ( ४ ) स्ट्रेटस हें तटस्थ ठिकाण (न्यूट्रल झोन) मानावें व उभय पक्षांनीं लष्करी दळणवळण व किल्ले बांधण्याचें काम करूं नये. स्मर्नाच्या यशामुळें तुर्की लोक अधिक मागण्या करतील असें दोस्तांनां भय वाटत होतें. इस्मिद्कडे फ्रेंच व इटालियन सैन्य पाठविण्यांत आलें.

इकडे खुद्द तुर्कस्तानांत राज्यक्रांति होऊन सुलतानपद रद्द करण्यांत आलें आहे असें ग्रँड नॅशनल असेंब्लीनें नोव्हेंबर १९२२ सालच्या पहिल्या तारखेस प्रसिद्ध केलें. *यापुढें खलीफ पदाकरितां उस्मान घराण्यांतील* राजपुत्रांची निवडणूक करावयाची असें ठरलें. अंगोरासरकारच्या वतीनें ता. ४ नोव्हेंबर १९२२ रोजीं रफेत पाशानें कॉन्स्टांटिनोपलचा कारभार आपल्या हातीं घेतला, व त्याच दिवशीं कॉन्स्टांटिनोपल येथील प्रधानमंडळानें राजीनामा दिला. सुलतान तेथून ब्रिटिश जहाजांत बसून निघाला व त्याचा पुतण्या अबदुल मजीद याची खलिफा म्हणून नेमणूक झाली. परंतु मार्च १९२४ सालीं खलिफा हें पदच अजिबात रद्द करण्यांत आलें. आक्टोबर १९२३ सालीं ग्रँड नॅशनल असेंब्लीनें प्रजासत्ताक राज्याची द्वाही फिरविली व केमालपाशा हा अध्यक्ष झाला. अंगोरा तुर्कस्तानची राजधानी झाली व सर्व खातीं त्या ठिकाणीं नेण्यांत आलीं. ग्रँड नॅशनल असेंब्लीच्या सदस्यांची निवडणूक दोन वर्षांनीं होत असते. १९२४ सालापासून प्रजासत्ताक राज्याचा अध्यक्षच कौन्सिलच्या अध्यक्षाची निवडणूक करतो व कौन्सिलचा अध्यक्ष इतर कमिशनर नेमतो. इस्मतपाशा यानें पहिलें प्रजासत्ताकमंत्रिमंडळ आक्टोबर १९२३ सालीं स्थापन केलें.

नोव्हेंबर १९२२ सालीं केमालिस्ट पक्षानें अशी मागणी केली कीं, सर्व राष्ट्रांच्या लढाऊ जहाजांनीं स्ट्रेट्समधून जाण्याबद्दल तुर्कांची परवानगी घेतली पाहिजे. त्याच वेळीं लॉसेन परिषदेंत, १९१३ सालीं ज्या सरहद्दी होत्या त्यांच्या संबंधीं तुर्कांनीं मागणी केली. बल्गेरियास ईजिअनसमुद्रावर व्यापार करण्याची परवानगी मिळावी असें ठरलें. तुर्कांचा हल्ला होईल या भयानें इंग्लंडनें कॉन्स्टांटिनोपल येथील आपलें लष्करी सामर्थ्य वाढविलें. स्ट्रेट्सच्या स्वातंत्र्यासंबंधीं तुर्क लोक व बाल्कन संस्थानें यांमध्यें डिसेंबरांत एक करार झाला परंतु तुर्कस्तान व रशिया यांचें मात्र पटलें नाहीं. तुर्कांनीं मोसलबद्दल मागणी केली; परंतु बगदाद व इराक हीं ठिकाणें निराधार होतील म्हणून दोस्तांनीं ही *मागणी नाकारली.* त्यानंतर इस्मतपाशानें दोस्तांची मुख्य मागणी मान्य केली व स्ट्रेट्समधील परकी जहाजांनां पूर्ण स्वातंत्र्य दिलें. ख्रिस्ती अल्पसंख्याकांच्या लष्करी नोकरीसंबंधीं तुर्कांनीं आपली सम्मति देण्याचें नाकारिलें.

लॉसेनपरिषदेच्या वाटाघाटीनंतर शांततेचा तहनामा तुर्कांनां ता. १ फेब्रुवारी १८२३ रोजीं सादर करण्यांत आला. आर्थिक प्रश्नाच्या सबबीवर तुर्कांनीं त्यावर सही करण्याचें नाकारिलें. बऱ्याच आर्मेनियन लोकांची सोय जॉर्जियामध्यें करण्याचें रशियानें कबूल केलें. लॉसेनपरिषदेंत फारच तडजोडीचें धोरण स्वीकारल्याबद्दल अंगोरा सरकारनें इस्मतपाशास दोष दिला. मार्च अखेर लॉसेनच्या अटी पुन्हां तुर्कांनां सादर करण्यांत आल्या. चेस्टर सवलतींचा स्वीकार अंगोरा असेंब्लीनें केल्यामुळें फ्रान्समध्यें मोठी खळबळ उडाली. मे १९२३ मध्यें लॉसेन येथें पुन्हां असें ठरलें कीं आर्थिक तह रद्द व्हावा व तुर्की आणि परस्थ *यांच्यावरील कराबद्दल समानत्वाचें धोरण असावें.* कॉन्स्टांटिनोपल येथील बँक ऑफ अथेन्स व इतर परकीय बँका, तुर्कस्ताननें जबरदस्तीनें बंद केल्यामुळें फ्रेंच भांडवलावर त्याचा परिणाम झाला व दोस्त सरकार व फ्रान्स यांकडून निषेध करण्यांत आला. टर्की व ग्रीस यांमध्यें तडजोड झाली. सैन्याबरोबरच आरमारी दळ हलवावें या गोष्टीवर तुर्कांनीं भर दिला. नंतर २४ जुलै १९२३ रोजीं लॉसेनच्या तहावर सह्या झाल्या. फ्रेंच रेल्वे व व्हिकर्स आर्मस्ट्राँग या बाबतींत समान वागणुकीचें धोरण ठरविण्यांत आलें. या तहान्वयें इराक व पॅलेस्टाइन येथील ब्रिटिश सैन्य कमी करण्यांत आलें. अमेरिका व तुर्कस्तान यांमध्येंहि एक सामान्य तह झाला. मिळविलेलें सर्व घालविलें असें हा तह पाहून कांहीं ब्रिटिश लोकांनां वाटूं लागलें. तथापि ब्रिटिशांचें तुर्कस्तानांतील वर्चस्व कायमच राहिलें. १९२४ सालीं तुर्कांचा जर्मनांशीं स्नेहाचा तह झाला व मेमध्यें हंगेरीशीं झाला. मोसलचा प्रश्न लीग ऑफ नेशन्सकडे सोंपविण्याबद्दल तुर्की लोक विरुद्ध होते. सप्टेंबर १९२४ मध्यें मोसलवर स्वारी करून टर्कीनें ब्रिटिशांशीं केलेला तह मोडला. यामुळें इंग्लंडास राग आला. कॉन्स्टांटिनोपलहून कॉन्स्टंटाइनची उचलबांगडी करण्यांत आल्यामुळें ग्रीस व टर्की यांच्यांत लढा सुरू झाला. हेग कोर्टाकडे ग्रीसनें गाऱ्हाणें नेलें. इतर राष्ट्रांनीं मध्येंच उगीच लुडबूड केली व ब्रिटननें दोन मोसल तज्ज्ञांच्या वागणुकीबद्दल निषेध केला. या तिन्ही बाबतींसंबंधीं तुर्कांनीं आपली नापसंति व्यक्त केली. ग्रेसकडे तुर्की सैन्याची हालचाल होत असलेली पाहून ग्रीसमध्यें अस्वस्थता उत्पन्न झाली. कुर्दिश संस्थानांत खिलाफतीची पुन्हां स्थापना व्हावी या हेतूनें ७०००० कुर्द लोकांनीं बंड केलें. परंतु हें बंड मोडण्यांत आलें, पुढाऱ्यांनां ठार करण्यांत आलें. बंडखोरांनीं बऱ्याच तुर्की अधिकाऱ्यांचे खून केले. मार्च १९२५ सालीं जहालांच्या चळवळीमुळें फेथिबेच्या प्रधानमंडळानें *राजीनामा दिला.*

शिक्षणः—१९१३ सालच्या कायद्यान्वयें ७ ते १६ वर्षांच्या मुलांस सक्तीचें प्राथमिक शिक्षण देण्यांत येतें. कॉन्स्टांटिनोपल विश्वविद्यालयांत पुष्कळ तुर्की विद्यार्थिनी शिक्षण घेत असतात. १९२३ सालपासून तुर्की इतिहास, भूगोल व भाषा यांचें शिक्षण तुर्की शिक्षकांकडून देण्याची योजना करण्यांत झाली आहे.

सामाजिक सुधारणाः—लुटारू लोकांचा नायनाट करण्याचे प्रयत्न करण्यांत येत आहेत. लुटारू लोकांच्या शासनाबद्दल एक कायदा १९२३ सालीं करण्यांत आला होता परंतु तो असेंब्लींत पास झाला नाहीं. 'न्यू टर्किश कंपनीज ॲक्ट'-प्रमाणें धंद्याच्या प्रत्येक शाखेप्रीत्यर्थ १५ हजार टर्किश पौंड अनामत ठेवावे असें प्रसिद्ध झाल्यामुळें तुर्कस्तानांतील ब्रिटिश विमा कंपन्यांनां धंदा आटपावा लागला होता. १९२३सालच्या फेब्रुवारींत एक वैवाहिक कायदा पुढें आला. आशियामायनरची लोकसंख्या वाढवावी अशा अर्थाचें एक बिलहि पुढें आलें परंतु तें अंगोरा नॅशनल ॲसेंब्लीनें पास केलें नाहीं. १९२४ सालीं एकविवाहमताचें तत्व सामान्यतः मान्य करकरण्यांत आलें व दुसऱ्या लग्नास मॅजिस्ट्रेटची परवानगी घ्यावी असें कायद्यानें ठरविण्यांत आलें. केमालपाशाची बायको इंग्लंड, फ्रान्स वगैरे देशांत चांगली शिकलेली आहे. जुन्या लोकांची निंदा सोसूनहि केमालची स्त्रियांच्या चळवळीस चांगली मदत होत आहे.

रात्रीं ११॥ चे पुढें नाटकगृहें व इतर करमणुकीचीं ठिकाणें बंद ठेवावीं असा कायदा करण्यांत आला. यासंबंधानें कॉन्स्टांटिनोपल येथें बराच वाद झाला. हा कायदा रद्द होईल असें दिसतें. जवळजवळ वीस वर्षें सतत युद्ध चालल्यामुळें कामकरी वर्गाची स्थिति फार खालावलेली आहे. उद्योगी व कसबी प्रौकांचें उच्चाटण झाल्यामुळें मजुरांचा प्रश्न जास्त बिकट झाला आहे.

लोकसंख्याः—तुर्कस्तानची (१९२५) सध्याची लोकसंख्या सुमारें एक कोटीपेक्षां जास्त नाहीं. सर्वांत मोठीं शहरें कॉन्स्टांटिनोपल व स्मर्ना हीं आहेत व त्यांची लोकसंख्या अनुक्रमें ८८०९९८ व १८८४६ इतकी आहे.

[ संदर्भग्रंथ—ग्रेव्हीकृत 'हिस्टरी ऑफ दि ओटोमन टर्क्स'; लेनपूलकृत 'टर्की'; सदरलंडमेंझीकृत 'टर्की, ओल्ड ॲंड न्यू.' ]

तु र्की वा ङ्म य.—ओटोमन तुर्कांच्या वाङ्मयाचे, नवा व जुना असे दोन संप्रदाय असून जुना संप्रदाय अभिजात पर्शियन वाङ्मयाच्या वळणावर गेलेला आहे, आणि नव्या संप्रदायानें यूरोपिय वाङ्मयाचें अनुकरण केलें आहे. जुन्या काव्यसंप्रदयाचे तीन विभाग पडतात. साम्राज्यस्थापनेपासून पहिल्या सुलेमानपर्यंत ( १३०१–१५२० ); सुलेमानपासून पहिल्या महंमदापर्यंत ( १५२०–१७३० ) आणि महंमदापासून अवदुल अझीझपर्यंत (१७३०–१८६१) अशीं ओटोमन वाङ्मयाचीं तीन युगें पडतात.

जुनें काव्य पर्शियन थाटाचें असून इराणी कवींचे गुणदोष त्यांत आढळतात. अद्भुतरसोत्पादक काव्यांत त्यांनीं, मजनून व लैली, खुश्रु व शिरीन, यूसफ व झुलेखा असे फारसी काव्य-विषय घेऊन ते बहारीनें वर्णन केले आहेत. शाहनामा नामक फारसी ग्रंथांतील अनेक कथानकें त्यांच्या प्रतिभाशक्तीनें संजीवित झालेलीं आहेत. तुर्की कवींनीं फारसी वृत्तेंच उचललेलीं असून मेस्नेवी, कासिद व गझल हीं वृत्तें जुन्या ओटोमन कवींनां फार प्रिय असत. त्यांचें गद्यपद्यात्मक वाङ्मय बरेंच मोठें आहे

पहिल्या उस्मानच्या कारकीर्दींत सुलतान वलद हा कवि होऊन गेल्यावर आशिकपाशा हा गूढ कवी, आपल्या 'दिवाण' या काव्यावरून प्रसिद्धीस आला. 'खुश्रु वशिरिन' या विषयावर कर्मियानच्या शेखीनें एक काव्य रचलें आहे. 'महमदीया' नांवाचें मोठें काव्य याझिजी यानें लिहिलें आहे. 'चाळीस वजीरांची कथा' तुर्क वाङ्मयांत प्रसिद्ध आहे. ओटोमन तुर्कांच्या हातीं कॉन्स्टांटिनोपल पडल्यानंतर, मिरअलीशीर यानें गझल लिहिण्याची पद्धत प्रचारांत आणली. 'तझारूआत' हा धार्मिक गद्यग्रंथ सिनातपाशा यानें लिहिला. नेजती व झती हे दोन कवी उत्कृष्ट भावनात्मक काव्याबद्दल विख्यात आहेत. झेनाब व मिहिरी या कवयित्रींनीं चांगलीं काव्यें लिहिलीं आहेत. दुसरा महंमद हा मोठा रसिक होता व त्यानें अन्यान्य कवींनां आश्रय दिला. पहिल्या सेलीमच्या काळीं केमलपाशा झादा हा उदयास आला. 'निगारिसान' हा याचा काव्यग्रंथ सादीच्या गुलिस्तानच्या धर्तीवर लिहिलेला आहे. पहिल्या सुलेमानच्या कारकीर्दीपासून तुर्की अभिजातवाङ्मयास सुरवात होते. या काळांत उत्कृष्ट कवी व गद्यलेखक होऊन गेले. फुझूली हा अत्यंत प्रतिभासंपन्न कवि होता. 'दिवाण' या काव्यांत त्याची स्वतंत्र कल्पनाशक्ति दृग्गोचर होते. 'मजनून आणि लैली' हें त्याचें काव्यहि अत्यंत हृदयंगम असेंच आहे. बाकी नामक कवीनें पहिल्या सुलेमानावर एक शोकगीत रचलें आहे. ओटोमन कवींचा या बाबतींत हा मखंडा आहे. रुही, लामी,नेव्ही,यावेग,मुफ्ती,एवुसुद व दुसरा सेलीम या सर्वांनीं कवी या नात्यानें चांगला लौकिक मिळविला आहे. नबी कवीनें सादीचें उत्कृष्ट अनुकरण केलें आहे. तिसऱ्या अहंमदाच्या वेळेचा नेदीम हा कवी सर्व जुन्या कवींत श्रेष्ठ होय. अलीचेलेबीनें 'हुमायून नामा'म्हणून एक मोठा गद्यग्रंथ लिहिला आहे. सादुद्दिननें 'ताजत् तवारिक' नांवाचा एक साम्राज्याचा इतिहास लिहिला आहे. नाइमा व एलिया नांवाच्या दोन इतिहासज्ञांनीं अनेक ग्रंथ लिहिले आहेत. हाजी खलिफा हा तुर्की राज्यांतील अत्यंत मोठा विद्वान मनुष्य होऊन गेला. यानें इतिहास, चरित्र वगैरे अनेक विषयांवर ग्रंथ लिहिले आहेत. इब्राहिम म्हणून नांव धारण करणाऱ्या

एका हंगेरियन मनुष्यानें टर्कीमध्यें पहिला छापखाना काढला असें म्हणतात.

अभिजात युगानंतर तिसऱ्या सेलीमच्या राजवटींत पर्तेव, नेशत् व शेख घालीम असे कवी होऊन गेले. राशद व असिम हे या काळचे मोठे गद्यलेखक होत. कामस नांवाचा अरेबिक भाषेंतील ग्रंथ व 'बुर्हानी काटी' नांवाचा पर्शियन भाषेंतील ग्रंथ तुर्की भाषेंत आणण्याचें श्रेय वरील लेखकांनीं संपादिलें. जुन्या कवींत कानी नांवाच्या मोठया विनोदी गद्यलेखकाची गणना करण्यांत येते.

ओटोमन इतिहासांतील संक्रमणकालास दुसऱ्या महंमदाच्या कारकीर्दीपासून सुरवात होते व या कालांत पाश्चात्य सुधारणेचे किरण पौरस्त्यावर पडूं लागलेले दिसून येतात. फाझिलबे, वासफि, इझतमुल्ला, आकीफ पाशा वगैरे कवी आणि फितने व लैला प्रभृति कवयित्री अभिनवकाव्यसंप्रदायाच्या प्रवर्तक म्हणून गणल्या जातात. पाश्चात्य वाङ्मयाचा विशेषतः फ्रेंच वाङ्मयाच्या या आधुनिक कवींवर बराच परिणाम झाला. रशीद व आकीफपाशा यांच्या राजकीय लेखांतहि हा बदललेला मनु पहावयास मिळतो. शिनाशीनें यूरोपीय लेखनशैली उचलली व उत्तरोत्तर ओटोमन वाङ्मयाचें स्वरूप बदलूं लागलें. पाश्चात्यांच्या निरनिराळ्या काव्यरीतींचें अनुकरण करण्यांत येऊं लागलें. नवीन नाटकें अस्तित्वांत येऊं लागलीं, व पाश्चात्य भौतिक शास्त्रांचाहि अभ्यास सुरू झाला. झियापाशा, एकरमबे, हमीदबे, केमालबे यांची नवयुगीन वाङ्मयेतिहासांत प्रसिद्धि आहे. 'झेमझेमा' हा एकरमबेचा काव्यसंग्रह उत्कृष्ट आहे, केमालबे यानें नाटकें, इतिहास, नीतिशास्त्र, काव्य वगैरे विषयांवर अनेक ग्रंथ लिहिले असून या विद्वान गृहस्थाचें तरुण तुर्कांवर बरेंच वजन आहे.

**तुर्कस्तान, पूर्वेकडील.**—उत्तरेस सायबेरिया, व दक्षिणेस तिबेट, हिंदुस्थान व अफगाणिस्तान यांच्यामधील मध्य आशियांतील प्रदेशास हें नांव साधारणपणें लावतात. या प्रदेशाची पश्चिम मर्यादा कास्पीयन समुद्र व पूर्वमर्यादा मंगोलिया व गोबीचा निर्जनप्रदेश होय. तुर्कस्तान याचा खरा अर्थ तुर्क जातींचें स्थान असा असला तरी सध्यां तेथें तुर्क व इतर जाती देखील राहतात. या प्रदेशाचे नेहमीं रशियन तुर्कस्तान व चिनी तुर्कस्तान असे दोन विभाग करण्यांत येतात.

र शि य न तु र्क स्ता न.—सैबेरिया खेरीजकरून आशियांत जेवढा रशियाचा मुलुख आहे त्याचा या तुर्कस्तानांत समावेश होतो. यांत फरघन, समरकंद, सिरदर्या वगैरे प्रांतांचा अन्तर्भाव होतो. ट्रान्सकास्पियन भाग आणि बुखारा व खावी हीं अर्धस्वतंत्र संस्थानें देखील रशियन तुर्कस्तानांत येतात.

रशियन तुर्कस्तानचें एकंदर क्षेत्रफळ अंदाजें १२९०००० चौरस मैल आहे. या प्रदेशाच्या भूगर्भांत फारच प्रचंड क्रांति घडून येत आहे. नद्यांनीं आपले पूर्वीचे प्रवाह, व सरोवरांनीं पूर्वीच्या मर्यादा बदलल्या आहेत. पूर्वीच्या नद्या व खाड्या—ज्यांच्या कांठचा प्रदेश एकेकाळीं भरभराटींत होता त्या—आतां नाहींशा झाल्या आहेत, आणि या नद्या सरोवरांबरोबरच पूर्वीच्या सुधारणा व संस्कृती नामशेष झाल्या.

रशियन तुर्कस्तानची हवा फारच रुक्ष आहे. या ठिकाणीं वनस्पतींचा अभाव असल्यामुळें येथें उष्णता फारच असते. व उलटपक्षीं हिवाळ्यांत कडाक्याची थंडी पडते. पाऊस तर बहुधा पडतच नाहीं. ऑव्हिस पोलो नांवाचा भव्य प्राणी पामीर डोंगरांत सांपडतो. हा प्राणी मेंढयांचा पूर्वज असावा असा तर्क आहे. रानटी घोडा, रानउंट, वाघ, कोल्हे वगैरे प्राणीहि सांपडतात. सिरदर्या नदीच्या दक्षिणेकडील लोक राय व गव्हांची लागवड करितात. त्याचप्रमाणें ॲपल, ॲप्रिकॉट, बदाम वगैरे फळांच्या लागवडीलाहि बरेंच महत्त्व आहे. खोजंद व फरघन यांच्या आसमंतांत शेती व बागाईत फारच पूर्णत्वाला पोंचली आहे. कापसाची लागवड सारखी वाढत्या प्रमाणांत आहे. सुधारलेल्या यंत्रांच्या योगानें चालणारे कारखाने तुर्कस्तानांत नाहींतच म्हटलें तरी चालेल, पण तांबें, पितळ, लोखंड, चांदी इत्यादि धातूंचीं नकशीदार कामें या ठिकाणीं पुष्कळ होतात. व्यापार फारच जोरांत चालू आहे. काशगर, व बुखारा, हीं व्यापाराचीं मुख्य ठिकाणें होत.

लोकवृत्तः—लढाया, देशान्तर यांमुळें याठिकाणीं बरेच परदेशीय लोक आल्यामुळें तुर्कस्तानच्या लोकसंख्येंत विलक्षण प्रकारची भेसळ झालेली आहे. आर्यन व मंगोल या दोन्ही जाती या ठिकाणीं आढळतात. उरल् अल्ताइकांचें लोकसंख्येंत प्रमाण जास्त असून इर्कोमन, किरगिझ, उझबेग, व सार्ट या लोकांचाहि त्यांत अन्तर्भाव होतो. कराकल्पाक हे लोक मध्य व्होल्गा वरील बल्गेरियन साम्राज्यांतून सिरदर्याच्या कांठीं अगदीं अलीकडील काळांत आले असावेत असा समज आहे. या लोकांचा स्वभाव शांत असल्यामुळें किरगिझ लोकांनीं यांच्यावर स्वाऱ्या करुन त्यांनां या जागेवरुन त्या जागेवर असें नाचावयास लाविलें. शेवटीं १७४२ सालीं यांनां रशियन अंमलापुढें मान वाकवावी लागली. येथील विस्तीर्ण माळरानांचे व डोंगर पठारांचे मालक किरगिझ लोकच आहेत. या लोकांचेहि दोन भाग आहेत, एक कोझॉक अथवा कोसॅक किरगिझ व दुसरा काळा अथवा ब्लॅक किरगिझ. उझबेग लोकांचीहि पुष्कळ घराणीं आहेत. रशियाच्या ताब्यांत हा प्रदेश जाण्यापूर्वी हे लोक राजकारणांत बराच प्रमुख भाग घेत असत. सार्ट लोकांत इराणी रक्ताची भेसळ फार आढळते. काल्मक व टारगोड ह्या जाती मंगोल वंशापैकीं आहेत. गालचा लोक हे आर्यवंशज होत. वेस्ट तुर्कस्तानांत बुद्धिमान जर कोणी लोक असतील तर ते हेच होत. थोडेंबहुत इराणी, हिंदी व रशियन लोकहि येथें आहेत. रशियन तुर्कस्तानची लोकसंख्या १९०६ सालीं ५७४६६०० होती.

शिक्षणः—शिक्षणाच्या बाबतींत नांवाजण्यासारख्या सुधारणा अद्या अजून झालेल्या नाहींत. ताश्कंद येथें एक औद्योगिक शिक्षणाची शाळा व शेतकीप्रयोग शाळा आहे. तुर्कस्तानांत फक्त दोन लोहमार्ग आहेत. एक ट्रान्सकॅस्पियन रेल्वे व दुसरा ओरेंबर्ग ताश्कंद रेल्वे. इस्लामधर्माचा प्रसार झाल्यानंतरच्या आरंभींच्या शतकांत तुर्कस्तानची सुधारणा फारच उच्च दर्जाची होती. तो काल आतां राहिला नाहीं. जुन्या काळच्या भव्य मशिदी, प्राचीन काळचीं विद्यालयें, अरबी शिल्पपद्धतीनें बांधलेलीं स्मारकें, सुंदर सुंदर टोलेजंग इमारती, ह्या सर्व आतां गतकालच्या गोष्टी झाल्या आहेत. मुसुलमान संस्कृति व यूरोपीय संस्कृति यांचा जात्याच विरोध असल्यामुळें रशियाचा अंमल राष्ट्रीय उन्नतीच्या दृष्टीनें येथें कितपत यशस्वी होईल हा एक प्रश्नच आहे. जमिनीचा सर्वस्वी मालक प्रासादिक पुरुष असून या सर्वांच्या साधारण मालकीची अशी मुसुलमानांची धार्मिक भावना असल्यामुळें त्यांना जमिनीवरील अनियंत्रित मालकीचें युरेपीय तत्त्व अर्थातच मान्य नाहीं. रशियानें येथील गुलामगिरीला पायबंद घातला आहे व इतरहि कांहीं सुधारणा केल्या आहेत. पण अगणित असे नवीन प्रकारचे कर बसविल्यामुळें लोक फार गांजले आहेत.

अलीकडील माहितीः—रशियांतील राज्यक्रांतीनंतर पश्चिम तुर्कस्तानचा समावेश सोव्हिएट प्रजासत्ताक राष्ट्रसंघांत होऊं लागला. रशियन तुर्कस्तानमध्यें सेमीरेचेंशिया, सिरदर्या, फरघन, समरकंद, व ट्रान्सकास्पिया हे प्रांत होते. बुखारा व खीवा हे प्रांत मात्र पुढें सोव्हिएट सरकारनें आपल्या ताब्यांत घेतले. वरील पांचहि प्रांतांचा कारभार प्रजासत्ताक राष्ट्रसंघाच्या ठरावाप्रमाणें प्रांतिक कार्यकारी मंडळामार्फत चालविला जातो व हीं कार्यकारी मंडळें प्रजासत्ताक राज्यसंघाच्या मध्यवर्ती कार्यकारी मंडळांत आपापले प्रतिनिधी निवडून पाठवितात. या मध्यवर्ती कमीटींत ७५ सभासद असतात व या मध्यवर्ती कमीटीकडून मास्को येथील अखिल रशियन प्रजासत्ताक संघाच्या बैठकीला प्रतिनिधी पाठविले जातात. मास्को येथील या कमीटीनें आपल्यावर वर्चस्व गाजवावें हें तुर्कस्तानला मनातून नको आहे. तुर्कस्तानमधील मध्यवर्ती कमिटी आपलें छोटेसें मंत्रिमंडळ बनविते व त्या मंत्रिमंडळामार्फत, निरनिराळ्या खात्यांचा कारभार चालविला जातो. कम्यूनिस्ट पक्षाच्या सभासदांनाच फक्त मतदानाचा अधिकार आहे; व त्यामुळेंहि या कमीटीचा कारभार सुलतानशाही पद्धतीच्या वळणावरच चालतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण पश्चिम तुर्कस्तानमध्यें शेंकडा ५ एवढीच रशियन लोकांची वस्ती असतांना, व बाकीची सर्व वस्ती मुसुलमानांची असतांना, फक्त रशियन अल्पसंख्याकांनाच फायदो मतदानाचा अधिकार आहे.

या रशियन तुर्कस्तानांत खोकंद, तमंगन, समरकंद, ताश्कंद हीं मोठीं शहरें असून त्यांची लोकसंख्या प्रत्येकीं लाखाच्या पुढें आहे. बोल्शेविझमच्या धुमाकुळीनें १९२१ सालीं येथील व्यापार जवळ जवळ बंदच होता म्हटलें तरी चालेल. फरघन प्रांतांत कापसाचें पीक मोठें आहे. वास्तविक तुर्कस्तान हा गव्हाबद्दल फार प्रसिद्ध आहे. असें असून सुद्धा कापसाला भाव चांगला येत असल्याकारणानें गव्हाऐवजीं कापसाचें पीकच करण्यांत येऊं लागलें असून खुद्द तुर्कस्तानला धान्यासाठीं मात्र परराष्ट्राकडे तोंड पसरण्याची पाळी येऊं लागली आहे. कापूस पिंजणें व कपाशीचें तेल काढणें यासाठीं फरघन प्रांतांत पुष्कळ गिरण्या निघालेल्या आहेत. या गिरण्या क्रूड ऑईलच्या साहाय्यानें चालतात. कापसाशिवाय ताश्कंद व समरकंद प्रांतांत द्राक्षांचें उत्पन्न मोठें असून त्यापासून उत्तम दारू तयार करण्यांत येते. ही दारू मुख्यतः रशियामध्यें निर्गत होते.

पश्चिम तुर्कस्तानांत नारिंग, पीयर, पीच, ॲप्रिकॉट इत्यादि पुष्कळ जातींच्या फळफळावळांची लागवड होत असून मध्य युरोपमध्यें यांचा खप आहे. तुर्कस्तानांत खनिजसंपत्ति पुष्कळ आहे. पण दळणवळणाच्या साधनांच्या अभावीं, व यांत्रिक साधनांच्या अभावीं खनिखोदनाचें काम होत नाहीं. फरघनमधील कोळशाच्या व तेलाच्या खाणी खोदण्याचें काम चालू झालें आहे. बुखारामध्यें कर्कुल नांवाच्या कातड्यांची फार पैदास होते व त्याची परदेशीं मोठ्या प्रमाणावर निर्गत होते. तुर्कस्तानमध्यें चांगले रस्ते नाहींत, त्यामुळें व्यापाराला फार प्रतिबंध होतो. रेल्वे देखील फारच लहान टापूंत आहे. सेमीरेचे-चेलसक्य रेल्वे बांधण्याची योजना चालू आहे. कगन ते करशी करकी, टर्मेझपर्यंत, व अंदीजान जलालबाद कोळशाच्या खाणीपर्यंत रेल्वे पसरलेली आहे.

चि नी तु र्क स्ता न.—हा मध्य आशियांतील प्रदेश असून त्यास कधीं कधीं कासगारिया असेंहि म्हणतात. या प्रदेशाच्या उत्तरेस थिअनशान पर्वताच्या रांगा असून दक्षिणेस कुएनलन पर्वत आहे. हा चीनचा मुलुख असून सिनकिअन नांवानें प्रसिद्ध आहे.

लोकः—चिनी तुर्कस्तानमध्यें राहणारे लोक, आर्येन. यूरल अलताई वंशाचे व मिश्र रक्ताचे असे आहेत. झुंगारियांतील डुंगन व डुंगन लोक ही एक तुर्की तातेर जात असून ते मुसुलमान धर्माचा अभिमान बाळगतात, कुलजामध्यें तातार, मोंगल, डुंगन वगैरे जाती आहेत. जगताइ टर्कीश हीच चिनी तुर्कस्तानांतील सार्वत्रिक भाषा होय. बहुतेक सर्व व्यापार चिनी लोकांच्या ताब्यांत आहे. कुलजा व झुंगारिया सोडून एकंदर लोकसंख्या सुमारें २०,००,००० आहे. झुंगारियाची संख्या ६००००० आणि कुलजाची संख्या १२०००० इतकी आहे. यारकंद, खोतान, काश्गर, अक्सू, केरिया, कुलजा, झुंगारिया वगैरे मुख्य शहरें आहेत, महम्मदी हाच अखिल चिनी तुर्कस्तानचा एक धर्म होय. राजकीय दृष्ट्या हा देश चीनच्याच ताब्यांत आहे.

एका हंगेरियन मनुष्यानें टर्कीमध्यें पहिला छापखाना काढला असें म्हणतात.

अभिजात युगानंतर तिसऱ्या सेलीमच्या राजवटींत पर्लेव, नेशत् व शेख घालीम असे कवी होऊन गेले. राशद व असिम हे या काळचे मोठे गद्यलेखक होत. कामस नांवाचा अरेबिक भाषेंतील ग्रंथ व 'बुर्हानी काटी' नांवाचा पर्शियन भाषेंतील ग्रंथ तुर्की भाषेंत आणण्याचें श्रेय वरील लेखकांनीं संपादिलें. जुन्या कवींत कानी नांवाच्या मोठ्या विनोदी गद्यलेखकाची गणना करण्यांत येते.

ओटोमन इतिहासांतील संक्रमणकालास दुसऱ्या महंमदाच्या कारकीर्दीपासून सुरवात होते व या कालांत पाश्चात्य सुधारणेचे किरण पौरस्त्यावर पडूं लागलेले दिसून येतात. फाझिलबे, वासफि, इझतमुल्ला, आकीफ पाशा वगैरे कवी आणि फितने व लैला प्रभृति कवयित्री अभिनव-काव्यसंप्रदायाच्या प्रवर्तक म्हणून गणल्या जातात. पाश्चात्य वाङ्मयाचा विशेषतः फ्रेंच वाङ्मयाच्या या आधुनिक कवींवर बराच परिणाम झाला. रशीद व आकीफपाशा यांच्या राजकीय लेखांतहि हा बदललेला मनु पहावयास मिळतो. शिनाशीनें यूरोपीय लेखन-शैली उचलली व उत्तरोत्तर ओटोमन वाङ्मयाचें स्वरुप बदलूं लागलें. पाश्चात्यांच्या निरनिराळ्या काव्यरीतींचें अनुकरण करण्यांत येऊं लागलें. नवीन नाटकें अस्तित्वांत येऊं लागलीं, व पाश्चात्य भौतिक शास्त्रांचाहि अभ्यास सुरू झाला. झियापाशा, एकरमबे, हमीदबे, केमालबे यांची नवयुगीन वाङ्मयेतिहासांत प्रसिद्धि आहे. 'झेमझेमा' हा एकरमबेचा काव्यसंग्रह उत्कृष्ट आहे, केमालबे यानें नाटकें, इतिहास, नीतिशास्त्र, काव्य वगैरे विषयांवर अनेक ग्रंथ लिहिले असून या विद्वान गृहस्थाचें तरुण तुर्कांवर बरेंच वजन आहे.

**तुर्कस्तान, पूर्वेकडील.**—उत्तरेस सायबेरिया, व दक्षिणेस तिबेट. हिंदुस्थान व अफगाणिस्तान यांच्यामधील मध्य आशियांतील प्रदेशास हें नांव साधारणपणें लावतात. या प्रदेशाची पश्चिम मर्यादा कास्पीयन समुद्र व पूर्वमर्यादा मंगोलिया व गोबीचा निर्जनप्रदेश होय. तुर्कस्तान याचा खरा अर्थ तुर्क जातींचें स्थान असा असला तरी सध्यां तेथें तुर्क व इतर जाती देखील राहतात. या प्रदेशाचे नेहमीं रशियन तुर्कस्तान व चिनी तुर्कस्तान असे दोन विभाग करण्यांत येतात.

र शि य न तु र्क स्ता न.—सैबेरिया खेरीजकरून आशियांत जेवढा रशियाचा मुलुख आहे त्याचा या तुर्कस्तानांत समावेश होतो. यांत फरघन, समरकंद, सिरदर्या वगैरे प्रांतांचा अन्तर्भाव होतो. ट्रान्सकास्पियन भाग आणि बुखारा व खावी हीं अर्धस्वतंत्र संस्थानें देखील रशियन तुर्कस्तानांत येतात.

रशियन तुर्कस्तानचें एकंदर क्षेत्रफळ अंदाजें १२९०००० चौरस मैल आहे. या प्रदेशाच्या भूगर्भांत फारच प्रचंड क्रांति घडून येत आहे. नद्यांनीं आपले पूर्वीचे प्रवाह, व सरोवरांनीं पूर्वीच्या मर्यादा बदलल्या आहेत. पूर्वीच्या नद्या व खाड्या—ज्यांच्या कांठचा प्रदेश एकेकाळीं भरभराटींत होता त्या—आतां नाहींशा झाल्या आहेत, आणि या नद्या सरोवरावरोबरच पूर्वीच्या सुधारणा व संस्कृती नामशेष झाल्या.

रशियन तुर्कस्तानची हवा फारच रुक्ष आहे. या ठिकाणीं वनस्पतींचा अभाव असल्यामुळें येथें उष्णता फारच असते. व उलटपक्षीं हिंवाळ्यांत कडाक्याची थंडी पडते. पाऊस तर बहुधा पडतच नाहीं. ऑव्हिस पोली नांवाचा भव्य प्राणी पामीर डोंगरांत सांपडतो. हा प्राणी मेंढ्यांचा पूर्वज असावा असा तर्क आहे रानटी घोडा, रानउंट, वाघ, कोल्हे वगैरे प्राणीहि सांपडतात. सिरदर्या नदीच्या दक्षिणेकडील लोक राय व गव्हांची लागवड करितात. त्याचप्रमाणें ॲपल, ॲप्रिकॉट, बदाम वगैरे फळांच्या लागवडीलाहि बरेंच महत्त्व आहे. खोजंद व फरघन यांच्या आसमंतांत शेती व बागाईत फारच पूर्णत्वाला पोंचली आहे. कापसाची लागवड सारखी वाढत्या प्रमाणांत आहे. सुधारलेल्या यंत्रांच्या योगानें चालणारे कारखाने तुर्कस्तानांत नाहींतच म्हटलें तरी चालेल, पण तांबें, पितळ, लोखंड, चांदी इत्यादि धातूंचीं नकशीदार कामें या ठिकाणीं पुष्कळ होतात. व्यापार फारच जोरांत चालू आहे. काशगर, व बुखारा, हीं व्यापाराचीं मुख्य ठिकाणें होत.

लोकवृत्त:—लढाया, देशान्तर यांमुळें याठिकाणीं बरेच परदेशीय लोक आल्यामुळें तुर्कस्तानच्या लोकसंख्येंत विलक्षण प्रकारची भेसळ झालेली आहे. आर्यन व मंगोल या दोन्ही जाती या ठिकाणीं आढळतात. उग्र् अल्ताइकांचें लोकसंख्येंत प्रमाण जास्त असून इर्कोमन, किरगिझ, उझबेग, व सार्ट या लोकांचाहि त्यांत अन्तर्भाव होतो. कराकल्पाक हे लोक मध्य व्होल्गा वरील बल्गेरियन साम्राज्यांतून सिरदर्याच्या कांठीं अगदीं अलीकडील काळांत आले असावेत असा समज आहे. या लोकांचा स्वभाव शांत असल्यामुळें किरगिझ लोकांनीं यांच्यावर स्वाऱ्या करून त्यांना या जागेवरून त्या जागेवर असें नाचावयास लाविलें. शेवटीं १७४२ सालीं यांना रशियन अंमलापुढें मान वाकवावी लागली. येथील विस्तीर्ण माळरानाचे व डोंगर पठारांचे मालक किरगिझ लोकच आहेत. या लोकांचेहि दोन भाग आहेत, एक कोझॅक अथवा कोसॅक किरगिझ व दुसरा काळा अथवा ब्लॅक किरगिझ. उझबेग लोकांचींहि पुष्कळ घराणीं आहेत. रशियाच्या ताब्यांत हा प्रदेश जाण्यापूर्वी हे लोक राजकारणांत बराच प्रमुख भाग घेत असत. सार्ट लोकांत इराणी रक्ताची भेसळ फार आढळते. कालमक व टारगॉड ह्या जाती मंगोल वंशापैकीं आहेत. गालचा लोक हे आर्यवंशज होत. वेस्ट तुर्कस्तानांत बुद्धिमान जर कोणी लोक असतील तर ते हेच होत. थोडेंबहुत इराणी, हिंदी व रशियन लोकहि येथें आहेत. रशियन तुर्कस्तानची लोकसंख्या १९०६ सालीं ५७४६६०० होती.

शिक्षणः—शिक्षणाच्या बाबतींत नांवाजण्यासारख्या सुधारणा अशा अजून झालेल्या नाहींत. ताश्कंद येथें एक औद्योगिक शिक्षणाची शाळा व शेतकीप्रयोग शाळा आहे. तुर्कस्तानांत फक्त दोन लोहमार्ग आहेत. एक ट्रान्सकॅस्पियन रेल्वे व दुसरा ओरेंबर्ग ताश्कंद रेल्वे. इस्लामधर्माचा प्रसार झाल्यानंतरच्या आरंभीच्या शतकांत तुर्कस्तानची सुधारणा फारच उच्च दर्जाची होती. तो काल आतां राहिला नाहीं. जुन्या काळच्या भव्य मशिदी, प्राचीन कालचीं विद्यालयें, अरबी शिल्पपद्धतीनें बांधलेलीं स्मारकें, सुंदर सुंदर टोलेजंग इमारती, ह्या सर्व आतां गतकालच्या गोष्टी झाल्या आहेत. मुसुलमान संस्कृति व यूरोपीय संस्कृति यांचा जात्याच विरोध असल्यामुळें रशियाचा अंमल राष्ट्रीय उन्नतीच्या दृष्टीनें येथें कितपत यशस्वी होईल हा एक प्रश्नच आहे. जमिनीचा सर्वस्वी मालक प्रासादिक पुरुष असून या सर्वांच्या साधारण मालकीची अशी मुसुलमानांची धार्मिक भावना असल्यामुळें त्यांनां जमिनीवरील अनियंत्रित मालकीचें युरोपीय तत्त्व अर्थातच मान्य नाहीं. रशियानें येथील गुलामगिरीला पायबंद घातला आहे व इतरहि कांहीं सुधारणा केल्या आहेत. पण अगणित असे नवीन प्रकारचे कर बसविल्यामुळें लोक फार गांजले आहेत.

अलीकडील माहितीः—रशियांतील राज्यक्रांतीनंतर पश्चिम तुर्कस्तानचा समावेश सोव्हिएट प्रजासत्ताक राष्ट्रसंघांत होऊं लागला. रशियन तुर्कस्तानमध्यें सेमीरचेशिया, सिरदर्या, फरघन, समरकंद, व ट्रान्सकास्पिया हे प्रांत होते. बुखारा व खीवा हे प्रांत मात्र पुढें सोव्हिएट सरकारनें आपल्या ताब्यांत घेतले. वरील पांचाहि प्रांतांचा कारभार प्रजासत्ताक राष्ट्रसंघाच्या ठरावाप्रमाणें प्रांतिक कार्यकारी मंडळामार्फत चालविला जातो व हीं कार्यकारी मंडळें प्रजासत्ताक राज्यसंघाच्या मध्यवर्ती कार्यकारी मंडळांत आपापले प्रतिनिधी निवडून पाठवितात. या मध्यवर्ती कमीटींत ७५ सभासद असतात व या मध्यवर्ती कमेटीकडून मास्को येथील अखिल रशियन प्रजासत्ताक संघाच्या बैठकीला प्रतिनिधी पाठविले जातात. मास्को येथील या कमीटीनें आपल्यावर वर्चस्व गाजवावें हें तुर्कस्तानला मनांतून नको आहे. तुर्कस्तानमधील मध्यवर्ती कमिटी आपलें छोटेसें मंत्रिमंडळ बनविते व त्या मंत्रिमंडळामार्फत, निरनिराळ्या खात्यांचा कारभार चालविला जातो. कम्यूनिस्ट पक्षाच्या सभासदांनांच कायतो मतदानाचा अधिकार आहे; व त्यामुळेंहि या कमीटीचा कारभार सुलतानशाही पद्धतीच्या वळणावरच चालतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण पश्चिम तुर्कस्तानमध्यें शेंकडा ५ एवढीच रशियन लोकांची वस्ती असतांना, व बाकीची सर्व वस्ती मुसुलमानांची असतांना, फक्त रशियन अल्पसंख्याकांनांच कायतो मतदानाचा अधिकार आहे.

या रशियन तुर्कस्तानांत खोकंद, तमंगन, समरकंद, ताश्कंद हीं मोठीं शहरें असून त्यांची लोकसंख्या प्रत्येकी लाखाच्या पुढें आहे. बोल्शेविझमच्या धुमाकुळीनें १९२१ सालीं येथील व्यापार जवळ जवळ बंदच होता म्हटलें तरी चालेल. फरघन प्रांतांत कापसाचें पीक मोठें आहे. वास्तविक तुर्कस्तान हा गव्हाबद्दल फार प्रसिद्ध आहे. असें असून सुद्धां कापसाला भाव चांगला येत असल्याकारणानें गव्हाऐवजीं कापसाचें पीकच करण्यांत येऊं लागलें असून खुद्द तुर्कस्तानला धान्यासाठीं मात्र परराष्ट्राकडे तोंड पसरण्याची पाळी येऊं लागली आहे. कापूस पिंजणें व कपाशीचें तेल काढणें यासाठीं फरघन प्रांतांत पुष्कळ गिरण्या निघालेल्या आहेत. या गिरण्या क्रूड ऑईलच्या साहाय्यानें चालतात. कापसाशिवाय ताश्कंद व समरकंद प्रांतांत द्राक्षांचें उत्पन्न मोठें असून त्यापासून उत्तम दारू तयार करण्यांत येते. ही दारू मुख्यतः रशियामध्यें निर्गत होते.

पश्चिम तुर्कस्तानांत नारिंग, पीयर, पीच, ॲप्रिकॉट इत्यादि पुष्कळ जातींच्या फळफळावळीची लागवड होत असून मध्य युरोपमध्यें यांचा खप आहे. तुर्कस्तानांत खनिजसंपत्ति पुष्कळ आहे. पण दळणवळणाच्या साधनांच्या अभावीं, व यांत्रिक साधनांच्या अभावीं खनिखोदनाचें काम होत नाहीं. फरघनमधील कोळशाच्या व तेलाच्या खाणी खोदण्याचें काम चालू झालें आहे. बुखारामध्यें कर्कुल नांवाच्या कातड्यांची फार पैदास होते व त्यांची परदेशीं मोठ्या प्रमाणावर निर्गत होते. तुर्कस्तानमध्यें चांगले रस्ते नाहींत, त्यामुळें व्यापाराला फार प्रतिबंध होतो. रेल्वे देखील फारच लहान टापूंत आहे. सेमीरचे-चेनसकय रेल्वे बांधण्याची योजना चालू आहे. कगन ते करशी करकी, टर्मेझपर्यंत, व अंदीजान जलालबाद कोळशाच्या खाणीपर्यंत रेल्वे पसरलेली आहे.

चि नी तु र्क स्ता न.—हा मध्य आशियांतील प्रदेश असून त्यास कधीं कधीं कासगारिया असेंहि म्हणतात. या प्रदेशाच्या उत्तरेस थिअनशान पर्वताच्या रांगा असून दक्षिणेस कुएनलन पर्वत आहे. हा चीनचा मुलुख असून सिनकिअन नांवानें प्रसिद्ध आहे.

लोकः—चिनी तुर्कस्तानमध्यें राहणारे लोक, आर्यन. यूरल अलताई वंशाचे व मिश्र रक्ताचे असे आहेत. झुंगारियांतील झुंगन व डुंगन लोक ही एक तुर्की तार्तर जात असून ते मुसुलमान धर्माचा अभिमान बाळगतात, कुलजामध्यें तार्तार, मोंगल, डुंगन वगैरे जाती आहेत. जगताइ टर्कीश हीच चिनी तुर्कस्तानांतील सार्वत्रिक भाषा होय. बहुतेक सर्व व्यापार चिनी लोकांच्या ताब्यांत आहे. कुलजा व झुंगारिया सोडून एकंदर लोकसंख्या सुमारें २०,००,००० आहे. झुंगारियाची संख्या ६००००० आणि कुलजाची संख्या १२०००० इतकी आहे. यारकंद, खोतान, काश्गर, अक्सू, केरिया, कुलजा, झुंगारिया वगैरे मुख्य शहरें आहेत, महम्मदी हाच अखिल चिनी तुर्कस्तानचा एक धर्म होय. राजकीय दृष्ट्या हा देश चीनच्याच ताब्यांत आहे.

व्यापार व उद्योग.—कृषिकर्म, गुरांची जोपासना व मासे धरण्याचा धंदा या ठिकाणीं चांगला चालतो. सोनें, जस्त, तांबें, पेट्रोलियम, कोळसा, मीठ वगैरे खनिज पदार्थ विपुल सांपडतात. खोतान येथें रेशीम व गालिचे तयार होतात; काशगर येथें कापसाचा व्यापार चालतो; फाराशार येथें कातड्याचा धंदा चांगला चालला आहे. लोंकर, कातडीं, कापूस, गालिचे, रेशीम, धान्य, मेव्या व फळें इत्यादि मालाची निर्गत होते. चहा, रुपें व अफू चीनमधून आणलीं जाते. किराणा माल हिंदुस्थानांतून तेथें नेला जातो व कापड, साखर, काचेच्या पेट्या व कातडें वगैरे वस्तू रशियन तुर्कस्तान व रशियामधून या ठिकाणीं आणल्या जातात. उंट, घोडे, बैल वगैरे बाळगणाऱ्या कारवान लोकांकडूनच साधारणतः व्यापारी दळणवळण ठेवलें जातें.

इतिहास.—स्लाव व टयूटानिक वंशाचे मूळ पुरुष असे जे आर्य लोक त्यांची वस्ती चिनी तुर्कस्तानांत अत्यंत प्राचीन काळीं होती व तारिम प्रदेशांत बॅक्ट्रियाशीं समान अशा तऱ्हेची सुधारणा फैलावली होती. ख्रिस्ती शकाच्या आरंभीं तारिम प्रदेशांत आर्य व यूरल अल्ताइ लोक रहात होते असें दिसतें. आर्यांची एक टोळी वाखन येथें गेली; वैदिक व झेंद भाषांची फारकत होण्यापूर्वीच्या कालाइतकी प्राचीन अशी वाखन येथील विद्यमान भाषा असावी असें दिसतें. पांचव्या व सातव्या शतकांत तेथें बौद्धांचा चांगलाच पगडा बसला. त्या काळीं खोतान येथें शंभर मठ व पांचशें भिक्षू असून हिंदी वाङ्मय प्रसृत झालें होतें. ७९० सालीं पूर्व तुर्कस्तान तिबेटी लोकांच्या ताब्यांत होतें. अकराव्या शतकांत मोंगलांच्या टोळ्या चिनी तुर्कस्तानांत प्रवेश करूं लागल्या. १२२० सालीं चेंगीझखान यानें तुर्कस्तान व कासगारिया हे प्रांत काबीज केले. चौदाव्या व पंधराव्या शतकांत बुखारा व समरकंद हीं ठिकाणें विद्यास्थानें बनलीं होतीं. व तेथून बरेच विद्वान लोक कासगारियास गेले होते. चोहोंकडे धर्मस्वातंत्र्य देण्यांत आलें होतें. बुखारा येथील मुल्लांनीं चिनी तुर्कस्तानांत एक प्रबळ खोजा वर्ग निर्माण केला व नंतर अंतस्थ बंडाळी माजू लागली. चिनी लोकांनीं या संधीचा फायदा घेतला व सर्व चिनी तुर्कस्तान जवळ जवळ आपल्या ताब्यांत घेतला; १८५७ त मोंगलांनीं चिनी सत्ता उधळून लावण्याचा प्रयत्न केला होता. पण तो फसला व अशा रीतीनें चिनी तुर्कस्तान हा भाग चीनचा एक प्रांत बनला.

प्राचीन अवशेषः—खोतानपासून फार दूर नसलेल्या एका वाळवंटांत १८९६ सालीं डॉ. व्हेन हेडिन यांस कांहीं जुनीं रत्नें, बुद्धाच्या मूर्ती व नाणीं सांपडलीं. ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकांतील या वरील वस्तू असाव्या असें म्हणतात. टकला माकन नामक एक जुनें शहरहि सांपडलें आहे. मातीचीं भांडीं मूर्ती, पुतळे, नाणीं; संस्कृत ब्राम्ही; व चिनी लिपींत लिहिलेले जुने लेख, वगैरे वस्तू डॉ. स्टेन यास सांपडल्या आहेत. यांचा काळ ख्रिस्त शकारंभ असावा असें म्हणतात. डॉ. हेडिन यास १९०१ सालीं तिसऱ्या शतकातलें लौलन शहर सांपडलें. १९०४ सालीं डॉ. व्हॉन ली कॉक यासहि बरेच जुने लेख व वस्तू सांपडल्या. १९०६-१९०८ सालीं डॉ. स्टेन यानें चिनी तुर्कस्तानांत ठिकठिकाणीं बरेंच संशोधन करून अनेक जुन्या वस्तू मिळविल्या व विविध माहिती गोळा केली.

**तुळजापूर**, ता लु का.—हैद्राबाद संस्थानांतील उस्मानाबाद जिल्ह्यांतील एक तालुका. लो. सं. जहागीर धरून ( १९०१ ) ५८४१५. क्षेत्रफळ ४११ चौ. मै. परंतु १९०५ सालीं नळदुर्ग तालुका यांत मिळाल्यामुळें क्षेत्रफळ ७८१ चौ. मै. होऊन लोकसंख्या ११४७५० झाली. सबंध तालुक्यांत एक तुळजापूर व दुसरें मोरम् हीं दोन शहरें आहेत. तुळजापूर तालुक्यांत १३४ खेडीं असून यांतील १६जहागिरी आहेत. काळीचें उत्पन्न ३ लक्ष ( १९०१ ). लोहारे व रानजोरी याच तालुक्यांत मोडतात.

श ह रः—तुळजापूर शहर सोलापूरपासून २८ मैल व उस्मानाबादपासून १४ मैलांवर आहे. लो. सं. ( १९०१ ) ६६१२. या ठिकाणीं करोडगिरीचें नाकें, दवाखाना, टपालऑफीस व पोलीस कचेरी हीं असून व्यापारी पेठ आहे. डोंगराच्या पायथ्याशीं तुळजा भवानीचें देऊळ आहे. दसऱ्याच्या पौर्णिमेस या ठिकाणीं मोठा मेळा भरतो. कोल्हापूर आणि सातारच्याच्या राजांनीं भवानीचें देऊळ बांधलें असें म्हणतात. दर मंगळवारीं येथें आठवडाबाजार भरतो.

**तुळशीदास**—सुप्रसिद्ध हिंदी कवि व महान् रामभक्त. याचा जन्म इ. स. १५३२ त राजापूर नांवाचें यमुनेच्या दक्षिण तीरावर एक गांव आहे तेथें झाला. हा सरजूपुरी ब्राह्मण होता असें त्याच्या कवितावलीवरून समजतें. याचा जन्म ' अभुक्तमूल ' या अशुभ योगावर झाल्यामुळें त्याच्या आईबापांनीं त्याला टाकून दिलें व एका साधूनें त्याचा प्रतिपाळ करून त्याला वाढविलें. या साधूबरोबर तीर्थाटन करण्यांत व रामकथा श्रवण करण्यांत त्याचा लहानपणचा काळ गेला. तुळशीदासाचा बाप कोणी पाराशर गोत्री आत्माराम शुक्ल दुबे म्हणून होता. याच्या आईचें नांव हुलसी. तुळशीदासाच्या गुरूचें नांव नरहरी. शूकरक्षेत्रीं त्याचें अध्ययन होऊन त्याचें लग्न झालें. याच्या सासऱ्याचें नांव दीनबंधु पाठक व स्त्रीचें नांव रत्नावली. त्याला लवकरच मुलगा झाला, त्याचें नांव तारक असें होतें. स्त्रीवर तुळशीदासाची अत्यंत प्रीति होती. एकदां तो परगांवीं गेला असतां त्याची बायको माहेरीं गेली. तुळशीदास घरीं येतांच त्याला बायको माहेरीं गेली आहे असें कळलें. तो तडक तिकडे निघाला. तेथें पतिपत्नीच्या भेटीनंतर पत्नीनें त्याच्या अविचारी प्रेमाबद्दल खालील शब्दांत कानउघाडणी केली.

' लाज न ऽ.त आपुको दौरे आयेहु साथ ।
धिक् धिक् ऐसे प्रेमको कहा कहीं मे नाथ ॥
अस्थिचर्ममय देह मम तामें जैसी प्रीत ।
तैसी जौ श्रीराममहँ होत न तौ भवभीत ॥ '

या कानउघाडणीनें तुळशीदासाचे डोळे उघडले व वैराग्य पन्न होऊन तो अयोध्येस गेला; व तीर्थाटणें करण्यांत ाळ घालवूं लागला. अयोध्येस असतांना एकदां प्रभु राम- द्र तुळशीदासाच्या स्वप्नांत येऊन त्यांनीं सुलभ प्राकृतांत मायणाची रचना करावी अशी तुळशीदासास आज्ञा केली व ाप्रमाणें रामनवमी (१५७४) या दिवशीं त्यानें रामा- ण रचण्यास सुरवात केली. पुढें त्याचें अयोध्येंतील वैरागी ण्यवाशीं पटेनासें झालें त्यामुळें तो काशीस येऊन राहिला. ाशीस तो असीघाट येथें रहात असे. या ठिकाणीं १६२३ ध्यें तो मरण पावला.

तुळशीदास हा अकबराच्या कारकीर्दीच्या शेवटीं व जहां- ीरच्या कारकीर्दीच्या प्रारंभीं झाला. तोडरमल, अबदुल ्हिमखान खाना, जयपूरचे महाराज मानसिंह इत्यादि मोठ- ोठे लोक याचे स्नेही होते व ते त्याच्या नित्य दर्शनास ात असत. तोडरमल्लाशीं तुळशीदासाचा फार दाट परिचय ोता. तोडरमल वारल्यावर तुळशीदासाला फार दुःख झालें . तोडरमलावर त्यानें एक सुंदर शोकगीत लिहिलें आहे. यांतील एक दोन दोहे खालीं दिले आहेत.

महतो चारो गांवको मनको बडो महीप।
तुलसी या कलिकालमे अपसे तोडर दीप॥
तुलसी राम सनेहको सिरधर भारी भार।
तोडर धरे नखांदहू जग कर रह्यं उतार॥
तुलसी उर थाला विमल तोडर गुणगण बाग।
समुझि सुलोचन सींचिहे उमगि उमगि अनुराग।
रामधाम तोडरगये तुलसी भयौ निसौच।
जियबो मीत पुनीत बिनु यही बडे संकोच।

हें शोकगीत अत्यंत करुणरसपूर्ण व स्नेहरसानें ओथंबलेलें आहे. याच्या संबंधीच्या पुष्कळ आख्यायिका आहेत. त्यांवरून त्याची कीर्ति पुष्कळ पसरली होती असें सहज अनुमान होतें. त्याच्या नांवावर लहानमोठे एकवीस ग्रंथ प्रसिद्ध आहेत. पण त्यांपैकीं १२ ग्रंथच तुळशीदासाचे असावेत असें दिसतें. ते ग्रंथ येणेंप्रमाणें:- (१) रामललानहछु. (२) वैराग्यसंदीपनी- याचे संतस्वभाववर्णन, संतमहिमावर्णन, शांतिवर्णन असे भाग पाडण्यांत आले असून त्याची दोहा, सोरठ व चौपाइ या छंदांत रचना केली आहे. (३) बरवे रामायण-हें बरवा छंदांत लिहिलें आहे. (४) पार्वतीमंगल-हें पार्वतीच्या लग्नाबद्दल आहे. याची अरुण व हरिगीती छंदांत रचना केली आहे. (५) जानकीमंगल, (६) श्रीरामाग्या उर्फ श्रीराम सगुणावली, (७) दोहावली-या ग्रंथांत निरनिराळ्या विषयावर ५७३ दोहे व सोरठ आहेत. (७ अ) सतसई- या ग्रंथांत भक्तिप्रेमनिर्देश, उपासना-पराभक्तिनिर्देश, सांकेत वक्रोक्ति-रामरसवर्णन, आत्मबोधनिर्देश, कर्मसिद्धांतयोग, ज्ञानसिद्धांतयोग व राजनीतिप्रस्तावर्णन या विषयांवर काव्यरचना आहे. पण पुष्कळांच्या मतें हा ग्रंथ तुळशी- दासाचा नसावा. (८) कवितारामायण. (९) गीतारामायण. (१०) कृष्णगीतावली. (११) विनयपत्रिका. (१२) राम- चरित मानस.

रामचरित-मानस हें तुळशीदासाचें अत्यंत प्रसिद्ध काव्य होय. इंग्रज अगर ख्रिस्ती मनुष्य शेक्सपियर अगर बायबलास जितका मान देतो तितका किंबहुना त्याच्याहून अधिक मान या ग्रंथाला हिंदी मनुष्याकडून मिळतो. उत्तर हिंदुस्थानांत तुळशीरामायण न वाचणारा माणूस विरळा. या ग्रंथांत म्हणींची तर समृद्धिच आहे. या ग्रंथावरील रूपक बहारीचें आहे. रामचरित्र हें मानससरोवर कल्पून त्यांत उतरण्यासाठीं या काव्याचे सात सोपान केले आहेत. त्यांत रामयशरूपी जल भरलें आहे. चौपाईरूपी त्यांत दाट कमळांचीं पानें लागलीं आहेत. अशाच तऱ्हेनें हें रूपक लांबवलेलें आहे.

या काव्याचा प्रारंभ अयोध्येस झाला व त्याची परिपूर्ति काशींत झाली. वाल्मीकी रामायणाच्या आधारें हें काव्य लिहिलेलें असलें तरी वाल्मीकी रामायणाच्या कथाभागांत पुष्कळच फरक तुळशीदासानें केला आहे.' कैकेयी आणि मंथरा संवाद ' व ' रावण-अंगद-संवाद ' हे वाल्मीकीच्याहून निराळे आहेत. सृष्टिवर्णनेंहि तुळशीदासानें आपलीं स्वतःचीं घातलीं आहेत. रूपकावर व दृष्टांतावर तुळशीदासाचा भर फार आहे. त्याचे दृष्टांत समर्पक व मार्मिक असतात. त्याचें सृष्टिनिरीक्षण सूक्ष्म होतें. उदाहरणार्थ, ' पंकनरेणु सोह अरू धरणी। नीतिनिपुण नृपकी जस करणी ' ॥ किंवा ' फूले कमल सोह सर कैसें '। निर्गुण ब्रह्म सगुणमय जैसे ॥ अशीं शेकडों उदाहरणें देतां येतील. तुळशीदासाच्या उक्ती बेकनच्या वाक्याप्रमाणें नीतिसूत्ररूपी असतात. त्यामुळें तुळशीरामायण म्हणजे एक मोठा नीतिग्रंथच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. क्वचित ठिकाणीं रसपरिपोषांत कमीपणा वाटतो पण तो लक्षांत घेण्यासारखा नाहीं. ऐतिहासिक दृष्ट्या याची फारशी किंमत नाहीं.

या काव्याची भाषा पुराणी अवधी आहे. यांत चौपाया, दोहा, सोरठ व लाव वृत्ताचे छंद आहेत. सर्व वृत्तें मात्रावृत्तें आहेत. या ग्रंथाची भाषा पाल्हाळिक नाहीं, सूत्रमय आहे. त्यामुळें पुष्कळदां त्यांत क्लिष्टता आली आहे. पण या काव्या- मध्यें त्याच्या भाषाप्रभुत्वाची साक्ष उत्तम पटते. त्याची कविता प्रासादिक, भक्तिप्रधान व मधुर आहे.

तुळशीदास कट्टा शैव किंवा वैष्णवहि नव्हता. रामभक्तीचा तुळशीदासानें फार प्रसार केला. तुळशीदासाच्या काळीं कृष्णोपासना, शाक्तमत व निरनिराळ्या ग्रामदेवतांची उपासना इत्यादि अनेक मतें प्रचलित होतीं, पण कृष्णोपासनेशिवाय इतर सर्व मतांनां पाठीमागें टाकून तुळशीदासाची रामोपासना उत्तरहिंदुस्थानांत फार फैलावली व त्याचा तत्कालीन समाजा- वर फार उत्तम परिणाम झाला असें दिसून येतें.

**तुळस**—या वनस्पतीचें झाड सुमारें दोन हात उंच वाढतें. तुळस ही हिंदुस्थानांतच आढळते. काळी व पांढरी अशा

हिच्या दोन जाती आहेत. तुळशीच्या पानांचा व मंजिऱ्यांचा देवपूजेकडे उपयोग करितात. तुळस ही विष्णूला फार प्रिय असल्याचें पुराणांत वर्णन आहे. वैष्णव लोकांत तुळशीचें माहात्म्य फार आहे. कार्तिकांतील द्वादशीस दरवर्षी विष्णूचा तुळशीशीं विवाह लावण्याची चाल हिंदु लोकांत आहे. तुळशीची पूजा नित्य करण्याबद्दल ( विशेषतः स्त्रियांनीं ) वराहपुराणादि ग्रंथांत विवेचन आहे. आर्यवैद्यकाप्रमाणें तुळशीच्या रसाचा अनेक औषधांत उपयोग केला जातो. ( वनौषधिगुणादर्श भा. ४ था पहा ).

**तुळसीबाई**—ही यशवंतराव होळकराची एक आवडती राख असून यशवंतरावाचें वेड वाढून जेव्हां त्याला अटकेंत ठेवण्याची पाळी आली ( इ. स. १८०८ ) तेव्हां रामपुरा मुक्कामीं असें ठरलें कीं अमीरखान पेंढारी यानें तुळसीबाईचें नांव पुढें करून राज्याचा सर्व कारभार पहात जावा. तुळसीबाई ही फार सुंदर, शिकलेली, हुशार, पण दुष्ट, रागीट, सूड उगवणारी व अत्यंत बदफैली होती. दुसऱ्यास मोह पाडण्याचा गुण तिच्या अंगीं विशेष होता. हिनें होळकरशाहीचा कारभार दहा वर्षें केला. यशवंतरावाच्या मृत्यूपूर्वीच तिनें केसरबाईपासून झालेला त्याचा मुलगा मल्हारराव यास दत्तक घेतलें होतें; मात्र कारभार स्वतः तुळसीच पाही. यशवंतराव होळकर मरण पावल्यावर ( २० आक्टोबर १८११ ) हिनें मल्हाररावाच्या नांवानें उघडपणें आपण स्वतः राज्यकारभार हांकण्यास सुरुवात केली.

मल्हाररावाच्या दत्तविधानानंतर अमीरखान लवकरच पुन्हां राजपुतान्यांत गेला. तथापि त्यानें जातांना गफूरखान ( जावऱ्याच्या नवाबाचा पूर्वज ) नांवाच्या आपल्या एका नातलगास तुळसीबाईकडून जहागीर देववून त्याला आपला प्रतिनिधि म्हणून बाईजवळ ठेविलें.

तुळसीबाई कारभार पाहूं लागल्यापासून सरकारसारा रीतसर वसूल होईना,सैन्य कह्यांत राहीना व संस्थानचा खर्चहि भागवितां येईना. राज्यांत सर्वत्र घोटाळे होऊन फौजेंत बखेडे माजले. परंतु अमीरखानानें ते तात्पुरते मोडले. या सुमारास पुढील एक गोष्ट घडली. फौजेंत धर्मोकुंवर म्हणून एक महत्त्वाकांक्षी अहीर सरदार होता. त्यानें मल्हारराव व तुळसी यांनां मारून सत्ता बळकावण्याचा कट केला व त्यांनां पकडून कैद केलें. तेव्हां अमीरखान परतला व त्यानें त्यांनां मुक्त करून अहीरास फांशीं दिलें. तरी सुद्धां राज्यांत सर्वत्र अंदाधुंदी झाली. बाईच्या बदफैलीपणामुळें जवळचे लोकहि तिचा तिटकारा करूं लागले. आपापसांतच लूट व मारामारी होऊं लागली. शेतीं ओसाड पडलीं. खजिन्यांत पैसा नसल्यामुळें निरनिराळ्या व्यक्तींच्या हाताखालीं फौजा देऊन त्यांनां वाटेल ते उपाय योजून आपलें पोट भरण्याकरितां व पैसा मिळविण्याकरितां रवाना करण्यांत येऊं लागलें. पैसा गोळा करीत असतांना शेजारच्या संस्थानाचे हक्क पायाखालीं तुडविले जात. तुळसीबाईच्या कारकीर्दीस आरंभ झाल्यानंतर लवकरच महमदखान बंगष याच्या हाताखालचे लोक बंडखोर बनून ते खानदेशप्रांत लुटूं लागले. निजामाच्या मुलुखांत शिरून ते होळकराच्या अंबर जिल्ह्यांतहि घुसले.

होळकराच्या राज्यांत आतां दोन तट पडले होते. एक मराठ्यांचा व दुसरा पठाणांचा.ह्या दोन्ही तटांतील लोक एकमेकांविरुद्ध कारस्थानें करण्यांत गुंग झाले होते. दरबारांत खून, फांशीं व लांचलुचपत आणि बाहेर लुटालूट, जाळपोळ, व रक्तपात ह्याशिवाय दुसऱ्या गोष्टी नव्हत्या. तेव्हां अमीरखानानें व शिंद्यानें ही स्थिति सुधारण्याचा प्रयत्न केला.

स. १८१७ त रावबाजीनें मल्हारराव होळकरास आपल्या मदतीस बोलाविलें. होळकरी फौज कूच करून महेश्वराष आली असतां माल्कमनें मल्हाररावास पेशव्यांकडे न जाण्याबद्दल कळविलें. इंग्रजांशीं तह करण्याचा तुळसीचाहि विचार होता; परंतु तें तिचें म्हणणें सैन्यांतील अधिकाऱ्यांस पसंत नव्हतें; म्हणून तराणे गांवीं त्यांनी एके दिवशीं ( २० डिसेंबर १८१७ ) पहाटे प्रथम मल्हाररावास तुळसाबाईच्या तंबूंतून निराळें काढून नेलें व त्याच रात्रीं तिचा वध करून तिचें प्रेत क्षिप्रेंत फेंकून दिलें. तिच्याबद्दल फारसें कोणाला वाईट वाटलें नाहीं. [ डफ; नाडकर्णी–होळकरांच्या राज्याचें सामान्य वर्णन. ]

**तुळाजी आंग्रे**—तुळाजी हा कान्होजी आंग्र्याचा रक्षापुत्र ( राजवाडे खं. ६. ले. ४५३ ). त्याच्या आईचें नांव गहिनाबाई. स. १७३४ त हा आपला सावत्र बंधु संभाजी याजबरोबर हबशापासून अंजनवेल काबीज करण्यास गेला. संभाजी दौलतीवर असतां हा त्याचा कारभारी होता. सन १७४० त हिराकोटाजवळ संभाजीच्या व पेशव्यांच्या लोकांत जी झटपट झाली तींत हा जखमी होऊन पेशव्यांचा हातीं सांपडला. पुढें(१७४१डिसेंबर)संभाजी मरण पावल्यावर याचें व पेशव्याचें सडकून वैर जुंपलें. यानें यमाजी शिवदेवाच्या वशिल्यानें मानाजीविरुद्ध शाहूकडे कारस्थान चालविलें. तेव्हां जो अंजनवेल घेईल त्यास सरखेलचें पद देऊं अशी शाहूनें अट घातली, त्याप्रमाणें तुळाजीनें स. १७४२ त अंजनवेलचा किल्ला घेतला. त्यावर आंग्रे घराण्यांतील तंटा मिटविण्याकरितां शाहूनें मानाजीस वजारतमाब हा किताब देऊन त्यास कुलाब्याचा अधिकार दिला व तुळाजीस सरखेल ही पदवी देऊन सुवर्णदुर्गापासून थेट दक्षिण कोंकणपर्यंतची हद्द वाटून दिली. ही तडजोड तुळाजीस पसंत पडली नाहीं. त्यानें मानाजीचे कविले अडकवून ठेविल्यामुळें ब्रह्मेंद्रस्वामीनें ते सोडून देण्याविषयीं त्यास एक पत्र लिहिलें. शाहूच्या पश्चात् तर तुळाजीचें वर्तन अनावर झालें. रा. वासुदेवशास्त्री खरे म्हणतात कीं तुळाजी हा चित्पावनांचा कट्टा द्वेष्टा असून तो त्यांचा फार छळ करीत होता ( मराठे व इंग्रज प्रस्तावना, पृ. १८ ). त्यानें ब्राह्मणांस फार उपद्रव केला. रयतेस छाडाछेड केली. तो सरकारांत नेमणुकीप्रमाणें ऐवज न भरतां

उद्दामपणें वागूं लागला व पेशव्यांस मुळींच जुमानीनासा झाला.ताराबाईचा व पेशव्यांचा तंटा जोरांत असतां तुळाजीनें उचल घेतली; आरमाराच्या जोरानें पेशव्याविरुद्ध वावरणाऱ्या तुळाजीस नुसत्या फौजेच्या बळावर जिंकणें पेशव्यांस शक्य नव्हतें.या कारणास्तव आरमारास प्रतिआरमार आणून तुळाजीशीं युद्ध करण्याचा व्यूह रचला. तुळाजीचा नाश करण्यास इंग्रज टपलेलेच होते. यामुळें पेशव्यांनीं इंग्रजांची मदत मागतांच त्यांनीं ती मोठ्या खुषीनें देऊं केली.

यावेळीं रत्नागिरी किल्ला बावडेकर अमात्यांचा असून तो तुळाजीनें हस्तगत केला होता, तो व सुवर्णदुर्ग असे दोन किल्ले तुळाजीजवळ पेशव्यानें मागितले. तुळाजी म्हणाला कीं सुईच्या अग्राइतकी मृत्तिका देणार नाहीं.तेव्हां पेशव्यानें "रामाजी महादेव यांस सांगून, इंग्रज अनुकूल करून तुळाजीवर मसलतीचा योग मांडिला. सुवर्णदुर्गांत व विजयदुर्गांत वगैरे फितुरांची संधानें रामाजी महादेव खेळूं लागले."

तुळाजीविरुद्ध पेशव्यांनीं करवीरकरांशींहि कारस्थान आरंभिलें तेव्हां करवीरकर यांनीं तुळाजीकडून अंमल दूर करून सरकारांत दिला ( १८ फेब्रुवारी १७५५ ).

रामाजी महादेवामार्फत इंग्रज व पेशवे यांच्या दरम्यान करार होऊन(१९ मार्च १७५५)इंग्रजांचें आरमार मुंबई बंदर सोडून निघालें(२२ मार्च).दुसऱ्या दिवशीं कमांडर जेम्स यानें राजापुरी बंदराबाहेर आंग्र्यांच्या १८ जहाजांचा पाठलाग करून त्यांना पळवून लाविलें. पुढें पेशव्यांचीं ७ तारवें, १ घातेला व ६० गलबतें इंग्रजांस मिळालीं (ता. २५).ता. २९ ला इंग्रजांचा व आंग्र्यांचा सामना होऊन, इंग्रज आंग्र्यांचा पाठलाग करीत जयगडपावेतों जाऊन दुसऱ्या दिवशीं सुवर्णदुर्गास परत आले. त्याच वेळीं रामाजीपंत हा किल्ल्यावर मारा करीत होता. त्यास इंग्रजांनीं मदत केली. किल्ल्यांतील लोकांचाहि मारा कांहीं कमी नव्हता.ता.३एप्रिल रोजीं किल्ल्यांतील दारूखाना आग लागून उडाला व यामुळें किल्ल्यांतील लोक सैरावैरा पळूं लागले. दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं तहाचें बोलणें लावण्यास किल्ल्यांतील लोक रामाजीपंताकडे आले. परंतु ते बोलाचालींत वेळ काढून बाहेरच्या मदतीची वाट पहात आहेत अशी शंका येऊन रामाजीपंतानें ता. १२ रोजीं तोफांचा मारा करून किल्ला घेतला.सुवर्णदुर्गाशिवाय मराठ्यांनीं तुळाजीचे आणखी सहा किल्ले इंग्रजांच्या मदतीनें काबीज केले. नंतर पावसाळा सुरू झाल्यामुळें मोहीम थांबली. पावसाळा संपल्यावर मोहिमेस पुन्हां सुरवात झाली. आंग्रे दरसाल पेशव्यास कांहीं खंडणी पाठवीत असत. ती तुळाजीनें बंद केल्यामुळें ती मागण्याकरितां पेशव्यांचे वकील मध्यंतरीं तुळाजीकडे गेले असतां त्यानें त्यांचीं नाकें कापून परत पाठविलें होतें, त्यामुळें पेशवे जास्त चिडले. पेशव्यांची फौज खंडोजी माणकराच्या हाताखालीं आंग्र्यांच्या मुलुखांत शिरून त्याचा प्रदेश काबीज करीत चालली. तिनें विजयदुर्ग किल्ल्याशिवाय बाकीचा सर्व प्रदेश काबीज केला ( जाने. १७५६ ). तेव्हां तुळाजी आंग्रे पंताकडे येऊन तहाच्या खटपटीस लागला. त्यावेळीं ( फेब्रु. १७५६ ) इंग्रजी आरमार विजयदुर्गापुढें येऊन दाखल झालें, त्यावेळीं तुळाजीचें व पेशव्यांचें तहाचें बोलणें चाललें असल्याचें इंग्रज अधिकारी वाटसनला कळलें. परंतु तुळाजीशीं तह करावयाचा नाहीं, असा निश्चय करून एकदम किल्ला स्वाधीन करण्याविषयीं वाटसननें त्यास निरोप पाठविला व वेळेवर जबाब न आल्यामुळें आणि पेशवेहि जरा कांकूं करीत आहेत असें पाहून ता. १२ रोजीं इंग्रजांनीं किल्ल्यावर तोफांचा मारा सुरू केला. चार वाजतां इंग्रजांचे गोळे आंग्र्यांच्या जहाजांवर पडून त्यांचीं सर्व लढाऊ जहाजें जळून खाक झालीं.ता. १३ रोजीं सकाळीं इंग्रजांचे कांहीं लोक जमिनीवर उतरले. पेशव्यांची फौजहि उतरणार होती. तीस उतरूं देऊं नये म्हणून इंग्रजांनीं पुन्हां किल्ल्यावर मारा सुरू केला. कॅप्टन फोर्ड आपले लोक बरोबर घेऊन संध्याकाळीं किल्ल्यांत शिरला; आणि त्यानें वर इंग्रजांचें निशाण लाविलें. तहाची वाटाघाट चालू असतां इंग्रजांनीं किल्ल्यास वेढा दिला म्हणून तो उठविण्याबद्दल रामाजीपंतानें पुष्कळ प्रयत्न केले. इंग्रजांस किल्ल्यांत दहा लक्षांचा ऐवज मिळाला. तो त्यांनीं सर्व 'तुम्ही तुळाजीशीं संधान ठेवून करार मोडला अशी' उलट सबब सांगून एकट्यांनींच दडपला. वास्तविक इंग्रज हे मदतीस आले होते व मराठे सांगतील त्याप्रमाणें त्यांनीं वागण्याचें काम होतें. असें असतांना किल्ला घेण्यासाठीं व मराठे आरमारांत दुफळी जाणून इंग्रजांनीं किल्ला घशांत उतरविला. यानंतर एक महिन्यांत तुळाजीचा सर्व प्रांत व २७ किल्ले दोस्तांनीं घेतले

शेवटीं तुळाजी हा पेशव्यांचा खंडोजी माणकर यांच्या स्वाधीन झाला. त्यास मरेपर्यंत कैदेंत ठेविलें. तुळाजीनें कैदेंत असतांनाच फंदफितुरी करून पेशव्यांस बराच उपद्रव दिला. नानासाहेबांच्या मृत्युसमयीं तुळाजी दंगा करणार होता. तुळाजीस वंदन, सोलापुर, राजमाची, विसापुर, नगर, चाकण, दौलताबाद वगैरे ठिकाणच्या किल्ल्यांत कैदेंत ठेविलें होतें. अखेर तो वंदन येथें कैदेंतच मेला. कैदेंत त्याच्या पायांत बेडी असे. मात्र त्याचे पुत्र व बायका बरोबर असत. पुत्रांनींसुद्धां बंड वगैरे केलीं. त्या सर्वांच्या पोटगीचा बंदोबस्त पेशव्यांनीं ठेविला होता.तुळाजीचे दोन मुलगे बारा चौदा वर्षांनीं कैदेंतून पळून मुंबईस इंग्रजांच्या आश्रयास गेलें असें म्हणतात.

एका इंग्रज व्यापाऱ्यानें तुळाजीचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे. "तुळाजी निमगोरा, उंच, भव्य देखणा व अत्यंत दबावदार होता. त्याला पाहिल्याबरोबर मूर्तिमंत शौर्याची कल्पना मनांत येई. त्याची कृतीहि रूपास साजेशीच होती. कोणतेंहि जहाज त्याच्या तावडींत सांपडलें म्हणजे तें सहसा सुटून जात नसे. इंग्रज व्यापारी त्याच्या त्रासास इतके कंटाळले कीं, 'देवा कसेंहि करून यास आमच्या तावडींत आणून दे,' अशी परमेश्वराची ते करुणा भाकूं लागले. तुळाजी १

शक्ति व तयारी परिपूर्ण होती. त्याची बंदरें भरभराटींत असून रयत सुखी होती. तीस हजार फौज त्याजपाशीं जय्यत होती. तोफखान्यावर अनेक कुशल यूरोपीय लोक लष्करी व आरमारी कामें करून करीत होते. त्याच्या आरमारांत साठांवर जहाजें असून शिवाय हत्ती, दारुगोळा व शस्त्रास्त्रें असंख्य होतीं. [ राजवाडे खंड १, २, ३, ६; शाहुमहाराज चरित्र; धाकटे रामराजेचरित्र; ब्रह्मेंद्रचरित्रः पत्रें यादी; इ.सं. आंगरे हकीगत; कैफियती; नानासाहेबांची रोजनिशी; फॉरेस्ट-मराठा सिरीज; एडवर्ड ईन्ड-व्हायेज ऑफ इंडिया; डफ.]

**तुळापूर**—पुण्याच्या ईशान्येस १६ मैलांवर ज्या ठिकाणीं भीमा व इंद्रायणी या दोन नद्यांचा संगम होतो तेथें हें खेडें आहे. याचें मूळचें नांव नागरगांव असें होतें. याला तुळापुर हें नांव कसें पडलें याविषयीं अशी एक आख्यायिका आहे कीं, एकदां आदिलशाही सरदार मुरारपंत याच्या हत्तीचें वजन करण्याकरितां या ठिकाणीं शहाजीनें त्या हत्तीस एका नावेंत चढविलें, व हत्तीच्या वजनामुळें पाण्यांत नाव किती बुडाली तें पाहून नंतर त्यानें त्या हत्तीस बाहेर काढून त्याच्या जागीं ती नाव तितकीच पुन्हां पाण्यांत बुडेपावेतों बरेचसे दगड टाकले. मग या सर्व दगडांचें निरनिराळें वजन करून शहाजीनें त्या हत्तीचें वजन किती होतें तें मुरारपंतास सांगितलें; व म्हणूनच या खेड्याचें नांव बदलून त्यास तुळापूर असें नवीन नांव देण्यांत आलें. या सुमारास सूर्यग्रहण असल्यानें मुरारपंतानें आपली तुळा करून ती ब्राह्मणांस वांटून दिली व सबंध गांव अग्रहार म्हणून ब्राम्हणांस इनाम दिला. यास ऐतिहासिक आधार सांपडले आहेत व कदाचित या गोष्टीनेंच तुळापुर हें नांव पडलें असावें. १६८९ सालीं येथें अवरंगझेबाची छावणी असतांना संभाजीचा या ठिकाणीं हाल हाल करून वध करण्यांत आल्यामुळें या गांवास ऐतिहासिक दृष्ट्या महत्व आलेलें आहे. [ डफ; वाड-सनदा पत्रें.]

**तूद**—भाषेचें नांव. निलगिरी पर्वताच्या रांगांमध्यें रहाणाऱ्या एका रानटी जातीची ही भाषा आहे. हे तूद अगर तुदवर लोक या पर्वतांत रहाणारे मुळचे रहिवाशी नव्हत असें सिद्ध झालें आहे. पण ते कोठून आले हें मात्र निश्चितपणें सिद्ध झालें नाहीं. या लोकांची संख्या हजारापेक्षां जास्त नाहीं. तथापि यांच्यामधील कांहीं विलक्षण चालीरीतींवरून या जातीला थोडें फार महत्व प्राप्त झालें आहे. रेव्हरंड मेरक्ष नांवाच्या एका मिशनऱ्यानें या लोकासंबंधीं व त्यांच्या भाषेसंबंधीं परिश्रमपूर्वक माहिती जमा केली आहे व पोप नांवाच्या एका इंग्रजानें तूद उर्फ तोड भाषेसंबंधीं एक व्याकरणहि तयार केलें आहे. तूद अगर तोद हा शब्द तामील तोर म्हणजे धनगर या शब्दापासून आलेला आहे असें त्यांचें म्हणणें आहे पण तें बरोबर दिसत नाहीं. हे तूद लोक अफू खाणारे असून त्यांच्यांत बहुभर्तृकत्वाची चाल आहे. यांच्यामध्यें पूर्वी बालहत्या प्रचारांत असल्याकारणानें स्त्रियांची संख्या फार कमी होऊन त्यामुळें ही बहुभर्तृकत्वाची चाल प्रचारांत आली असें कांहीं विद्वानांचें मत आहे.

**तूर**—या झाडास लॅटिनमध्यें कजानस इंडिकस, इंग्रजींत पिजनपी, मराठींत तूर, हिंदींत तुवार, (तुवर) इत्यादि नांवें आहेत.

इ ति हा स.—हें झाड हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे. परंतु तुरीचीं झाडें आपोआप होत असल्याचें कोणीं लिहिलें नाहीं. यावरून हें पीक मूळचें येथील नसून बाहेरून आलें असलें पाहिजे. आफ्रिकेंत याचीं झाडें आपोआप होतात. चीनमध्यें हें मुद्दाम करतात व आपोआपहि होतें. परंतु पूर्वीच्या चिनी लोकांस याची माहिती असल्याचें दिसून येत नाहीं. फिजीमध्यें पाद्री लोकांनीं हें आणलें व मादागास्करमध्यें तें पूर्वीपासूनच आहे.

कडधान्याच्या सर्व झाडांत तुरीच्या झाडाचा विस्तार जास्त होतो. तुरीचें झाड चार फुटांपासून सहा फुटांपावेतों उंच वाढतें. खेडा जिल्ह्यांत गोराडू जमीनींत व बिलासपूरकडे तें याहूनहि उंच वाढतें. तुरीचीं मुळें जमीनींत खोल जातात व तळजमीनींतील पोषकद्रव्यें पृष्ठभागीं आणतात. तुरीची शेंग दोन ते ३ इंच लांब असते. उत्तर हिंदुस्थानांतील अरहर(तूर)चें झाड फार मोठें वाढतें. तुरींत दोन तऱ्हेचीं फुलें आढळतात. पैकीं पिंवळीं फुलें सर्वत्र आढळतात; व तांबडीं, म्हैसुराकडील तुरींत आढळतात. या तुरीची शेंग व दाणेहि मोठे असतात. तुरींत दोन जाती आहेत; हळवी व गरवी. खानदेशांतील व बारामतीकडील तूर हळवी असते; बाकी सर्व तुरी गरव्या होत. म्हणजे पेरिल्यापासून सात ते दहा महिन्यांत त्या तयार होतात.

रंगावरून हिच्या मुख्य दोन जाती पडतात. पांढरी व तांबडी. पैकीं पांढरी तूर फार करून गुजराथेंत पिकते. तिला सुरती किंवा अंबूसरी असें म्हणतात. ह्या तुरीची डाळ लवकर शिजते. उत्तर हिंदुस्थानांतलि अरहरचा रंगहि पांढरा भुरकट असतो. तांबडी तूर सर्वत्र होते. हिला घांटी तूर म्हणतात. ही शिजण्यास जरा जास्त वेळ लागतो.

तूर ही बहुतकरून स्वतंत्र पेरीत नाहींत. तर ती खरिपांतील ज्वारी, बाजरी, तीळ, कोद्रा वगैरे धान्यांशीं मिसळून किंवा मोगणपद्धतीनें पेरितात. दर एकरीं तुरीचें बीं सुमारें २ ते ४ पौंड लागतें. भडोच व सुरतकडे तूर हें पीक खरीप व रब्बी यांच्या दरम्यान म्हणजे आगस्ट सप्टेंबरांत पेरितात. गुजराथेंत तूर व तीळ अशीं मिसळून पेरितात. उत्तर गुजराथेंत कित्येक वेळां हें पीक स्वतंत्र करितात. कोंकणांत तूर जुजबी पेरितात. उत्तर कोंकणांत हिची थोडी लागवड आहे. मळखंड जमीनींत हें पीक रब्बी हंगामांत पेरितात. तुरीबरोबर पेरलेलीं बाजरी व ज्वारी हीं पिकें कापून घेतल्यावर तुरीचा जास्त विस्तार होतो. देशावर " बाजरी काढ व तूर पाड " अशी म्हण आहे. त्याप्रमाणें

बाजरीचें पीक काढतांना तूर जितकी तुडविली जाईल तितका तिचा विस्तार अधिक होतो असें म्हणतात. तूर जाने-वारीपासून मार्चपावेतों तयार होते. केव्हां केव्हां तुरीच्या वरच्यावर शेंगा काढून घेतात. पण जेव्हां पीक फार असतें त्यावेळीं झाडें कापून त्याच्या पेंढ्या बांधतात व त्या लागलीच वाहून आणून खळ्यांत वाळवितात. त्या शेतांत ठेविल्यास शेंगा उन्हानें फुटून धान्य शेतांत पडतें. दाणे तयार करण्यासाठीं एकेक झाड किंवा लहान पेंढ्या घेऊन फळीवर घडवितात. तुरीच्या बीवडांत दुसऱ्या सालीं विन-खतानें चांगलें पीक येतें.

सरासरी दर एकरी उत्पन्न. (आंकडे पौंडांचे)

| | |
|---|---|
| मिसळीचें पीक बीं | १००—१५० |
| उत्तर गुजराथेंतील बीं | ३००—५०० |
| स्वतंत्र पीक बीं | १२००—१५०० |
| भुस्सा वगैरे | २००—३०० |

रोग.—रोपें लहान असतांना तीं सबंध उपटून मरतात. ढग आले म्हणजे फुलें गळून पडतात. शेंगा आल्या म्हणजे तुरीवर बारीक किडे पडतात. ते शेंगांत शिरून आंतील दाणे खातात. हे किडे शेतकरी लोक मोठी पाटी दोरीनें गळ्यांत बांधून तुरीच्या ओळींमधून फिरून एका काठीनें झाड पाटीमध्यें वांकवून झाडतात व झाडावरील किडे पाटींत पाडतात. नंतर ते किडे जमीनींत पुरून टाकितात. हें काम शेतकरी लोक मोठ्या पहांटे करतात.

तुरीच्या पानांचें व शेंगांचें भुस हें गुरांचें पौष्टिक व आव-डतें खाद्य आहे. तुरीच्या झाडाचे ओले शेंडेहि गुरांस खाव-यास घालतात. उत्तर बंगाल व आसामांत लाखेचा किडा पोसण्यास तुरीची लागवड करतात. मादागास्करमध्यें तुरीचीं पानें एकप्रकारच्या रेशमाच्या किड्यास खावयास घालतात. तुरीच्या पिठाचें पोटीस करतात. तूर, तुरट, गोड, पचनास हलकी, कफ व पित्तहारक आहे.

**तूलू**—द्राविडी भाषा. तामिळी, तेलगू व कानडी या सुसंस्कृत भाषांच्या खालोखाल तूलू भाषेचा नंबर लागतो. १९१० मध्यें ही भाषा बोलणाऱ्या लोकांची संख्या ५३१४९८ होती. तूलू व कानडी या दोन्ही भाषांची वर्ण-माला सारखीच आहे. या भाषेंतील वाङ्मय मात्र फारच थोडें आहे. किंबहुना नाहींच म्हटलें तरी चालेल.' तरी पण वाङ्मयाच्या अभावीं सुद्धां या भाषेची बरीच वाढ झाली होती असें दिसतें. चंद्रगिरी व कल्याणपुरी या दोन नद्यां-मधील प्रदेशामध्यें हिचा प्रचार होता. पण हल्लीं या भाषेचा फारसा प्रचार नसल्यामुळें ती भाषा मागें पडूं लागली आहे. तरी पण ही भाषा बोलणारे तूलू लोक हे पुराणमताभिमानी असल्यामुळें अद्यापहि त्यांनीं आपली भाषा जिवंत ठेवली आहे. ख्रिस्ती धर्मांत गेलेल्या तूलू लोकांनां कानडी व तूलू या भाषा शिकविण्यांत येतात.

तूलू याचा मूळ अर्थ मृदु अगर नम्र असा आहे यावरून हें नांव प्रथम लोकांनां लावण्यांत येत असावें व नंतर लोकांच्या नांवावरून भाषेला तें नांव पडलें असावें. तूलू भाषा ही मलयाळम भाषेची एक पोटभाषा असावी असा कित्येक विद्वानांचा समज होता. याचें कारण तूलू ब्राह्मण संस्कृत मलयालम लिपींत लिहीत असत. पण तूलू भाषेच्या अभ्यासकांनीं तूलू भाषा ही मलयालम भाषेची पोटभाषा नसून ती स्वतंत्र भाषा आहे असें निर्विवाद सिद्ध केलें आहे. ब्रिगेल नामक यूरोपियन पंडितानें 'तूलू भाषेचें व्याकरण' हा ग्रंथ प्रसिद्ध करून त्या भाषेसंबंधीं महत्त्वाचे शोध लावले आहेत. तूलू भाषा मलयालम अगर तामीळ भाषेहून अगदीं निराळी असून तिचें कानडी भाषेशीं किंचित् सादृश्य दिसतें असें त्यानें म्हटलें आहे. मद्रासच्या आसपासच्या भागांत बेल्लाळ लोकांची वस्ती असून ते आपल्याला तूलू व बेल्लाळ असें म्हणवून घेतात असें एलिस म्हणतो. पूर्वी या भागांत कुरुंबर नांवाची एक मेंढपाळांची जात होती. तिला हांकून देऊन तूलू लोकांनीं या भागांत वस्ती केली होती असें दिसतें. तरी पण या भागांत तूलू लोकांची मोठी वस्ती नव्हती व त्यांच्या भाषेचा तामीळ भाषेवर कांहींच परिणाम घडून आलेला दिसत नाहीं.

**तेओंथर**—मध्य हिंदुस्थान, रेवासंस्थानांत ही एक तहशील आहे. क्षेत्रफळ ८१६ चौरस मैल. तहशिलींत ५०५ खेडीं असून १९०१ सालीं लोकसंख्या १०५११५४ होती. उत्पन्न ३·३ लक्ष रुपये. मुख्य गांव तेओंथर. लो. सं. (१९०१) १५९३. येथें एक शाळा व दवाखाना आहे.

**तेकरीराज**—बंगाल, गया जिल्ह्यांतील जहागीर. सुर-वातीस धीरसिंग नांवाच्या बहानशा जमीनदारानें ही जहा-गीर स्थापिली. धीरसिंगाचा मुलगा सुंदरसिंग यानें नादीर-शहाच्या स्वारीनें १७३९ सालीं झालेल्या गडबडीचा फायदा घेऊन शक्य तेवढी जहागीर वाढविली. याला अहमदशा-हानें राजा ही पदवी दिली. याचा दत्तक पुत्र बुनीआद हा याच्या मागून गादीवर आला, परंतु १७६२ सालीं कासीमअलीनें त्यास कपटानें बुडवून मारलें. नंतर मोठ्या मुष्किलीनें याचा मुलगा ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या स्वाधीन केला. हा मुलगा सन १८४० मध्यें मरण पावल्यावर हें राज्य त्याच्या हितनारायण व मोदनारायण नांवाच्या दोन मुलांत वाटलें गेलें. पुढें हितनारायण साधू बनल्यामुळें आपलें राज्य महाराणी इंद्रजीत कुंवर नांवाच्या आपल्या बायकोस दिलें. या राणीनें महाराजा रामनारायण कृष्णसिंह यास दत्तक घेतलें. परंतु हा लवकरच मरण पावल्यामुळें सर्व राज्य महाराणी राजरूप कुंवर नांवाच्या त्याच्या बायकोस दिलें. या राणीनें सर्व राज्य आपली मुलगी राधेश्वरीकुंवर हिला दिलें. सन १८८६ मध्यें हिचा मुलगा महाराजा कुमार गोपालशरण नारायण-सिंग यास ९ आणे हिश्याचें सर्व राज्य मिळालें. उत्पन्न ७·३४ रुपये आहे.

७ आण्यांचा हिस्सा मोदनारायणसिंगाच्या नंतर त्याच्या दोघी बायकांना मिळाला. त्यांनीं १८७८ सालीं बाबूराम बहादूरसिंग नांवाच्या आपल्या पुतण्यास सर्व राज्य दिलें. यानें मरणानंतर आपल्या नातेला दिलें व तिनें आपली मुलगी राजकुमारी भुवनेश्वरकुंवर हिला दिलें.या७ आण्यांच्या हिश्याच्या राज्यांत ७१५ खेडीं असून क्षेत्रफळ ५२३ चौरस मैल आहे. उत्पन्न सरासरी ६ लक्ष.

**तेझ्पूर**—हें गांव, आसाममध्यें, दरंग जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून ब्रह्मपुत्रा नदीच्या उजव्या तीरावर वसलें आहे. हें गांव पौराणिक वाणराजा याच्या राजधानीचें शहर होतें, व याच राजानें श्रीकृष्णाबरोबर युद्ध केलें असें सांगतात. हल्लीं येथें डेप्युटी कमिशनरचें ऑफिस आहे, याच ठिकाणीं या राजाचा राजवाडा होता असें तेथील लोकांचें म्हणणें आहे. यांत सर्व साधारण सार्वजनिक इमारती असून शिवाय वेडयांचें हॉस्पिटल व दवाखाना आहे. येथील व्यापारी लोक कापड, मीठ, तेल विकतात व रबर, मोहऱ्या व इतर पदार्थ विकत घेतात. येथें एक हायस्कूल आहे.

**तेनकासी**,ता लु का व गां व.-मद्रास तिनेवेल्ली जिल्ह्यांतील एक पश्चिम घांटाच्या पायथ्याशीं असलेला तालुका. क्षेत्रफळ ३७४ चौरस मैल. लोकसंख्या १९२१ सालीं २२२४८८ होती. यांत तीन मोठीं गांवें असून ९३ खेडीं आहेत. मोठीं गांवें:—तेनकासी, कदैयनल्लूर आणि सुरंदई. यांतील जमीनीला चित्तार नदीच्या कालव्यांचें पाणी पुरविलें जातें. मुख्य ठिकाण तेनकासी. येथील व्यापार भरभराटीचा असून हें क्षेत्र आहे. ‘ कुट्टालम ’ चा प्रसिद्ध धबधबा या गांवापासून ३ मैलांच्या अंतरावर आहे.

**तेनासरीम**, ता लु का व गां व.—खालचा ब्रह्मदेश, मिरगुइ जिल्ह्यांत अगदीं पूर्वेकडील तालुका. क्षेत्रफळ ४०३३ चौरस मैल. १९०१ सालीं लोकसंख्या १०७१२ होती. यांत ११४ खेडीं आहेत. अर्ध्यापेक्षां जास्त जमीनींत तांदुळ व बाकीच्या जमीनींत इतर पीक होतें.

शेंकडों वर्षेंपर्यंत हें गांव सयामशीं होणाऱ्या व्यापाराचें मुख्य बंदर होतें. येथें एक दगडी खांब असून बायका या खांबाला नेहमीं भेटण्याकरितां येतात व त्याला सोन्याचीं पानें चिकटवतात. या गांवांत असणाऱ्या टेंकडीवर नुकताच एक शिलालेख सांपडला असून ‘ विजयरनराजानें १४९१ ते १५२६ सालपर्यंत पेगू येथें राज्य केलें ’ असें त्यांत लिहिलें आहे.

**तेनालरामलिंग**—हा कवि शालिवाहनाच्या १५ व्या शतकांत तेनाली खेड्यामध्यें ईश्वर प्रगट बारु नामक ब्राह्मण कुलांत जन्मला होता. कृष्ण रायलु राजाच्या दरबारांत जे प्रख्यात आठ कवी होते, त्यांत हा होता असें म्हणतात. यानें भट्टपालक्या नांवाच्या राजाजवळील कवींपैकीं एकाजवळ राहून संस्कृत भाषा व तेलंगी भाषेचें व्याकरण यांचा अभ्यास केला होता. यानें कृष्णदेवाच्या राणीवर एक काव्य रचून दरबारांत प्रवेश मिळविला असें सांगतात. यास राजाश्रय मिळाल्यावर यानें पांडुरंगमहात्म्य नांवाचें एक रसाळ काव्य लिहिलें. हा अतिशय थट्टेखोर असून याच्याबद्दल अनेक गोष्टी कालिदास व भोजराजा किंवा अकबर व बिरबलप्रमाणें प्रचलित आहेत. [ कवि चरित्र. ]

**तेरकनांबी**—संस्थान म्हैसूर, जिल्हा म्हैसूर, गुंडलपेट तालुक्यांतील गांव. याचें पूर्वींचें नांव त्रिकदंबपूर असें होतें. इ. स. १६२४ त म्हैसूरच्या राजानें हें गांव घेतलें. इ. स. १७४७ मध्यें मराठे लोकांनीं येथें असलेल्या किल्ल्याचा विध्वंस केला.

**तेरदाळ**—मुंबई, संस्थान सांगली, तेरदाळ विभागाचें हें गांव मुख्य ठिकाण आहे. हें कृष्णा नदीच्या उजव्या तीरावर वसलें असून लोकसंख्या १९०१ सालीं ६१२५ होती. हें गांव व्यापाराचें मोठें ठिकाण असून येथील लोकांचा मुख्य धंदा म्हटला म्हणजे साड्या, धोतरें, आणि कांबळीं करणें हा होय. पूर्वी या गांवांत तांबें व पितळ यांचा बराच व्यापार चालत असे. येथें प्रभूस्वामी व नेमनाथ या नांवांचीं ११८७ सालीं बांधलेलीं जैन लोकांचीं फार महत्वाचीं अशीं दोन देवळें आहेत.

**तेरी तहशील**—वायव्य सरहद्दीवरील प्रांत, कोहात जिल्ह्यांत ही एक तहशील आहे. क्षेत्रफळ १६१६ चौरस मैल असून लोकसंख्या १९०१ सालीं ९४३६३ होती. कर व जमीनमहसुलाचें उत्पन्न ९५००० रुपये. लोकवस्ती खटक जातीच्या पठाण लोकांची असून खानबहादूर अबदूल गफूरखान हा त्यांचा मुख्य आहे. हा तालुका त्याच्या जहागिरिचा आहे.

**तेरुवेल्लूवर**—प्रख्यात जी अव्हैयर तिचा भाऊ. हा कवि होता. मैलापूर येथील वेल्लूवर नामक पुरुषानें यास वाढविलें. तेथें हा चांगला विद्वान झाला. पुढें वयांत आल्यावर मदुरा शहरास गेला व तेथील वेदशेखर राजाच्या दरबारांतील ४९ पंडितांस जिंकलें. हा नीच जातीचा असतांहि यास तामिळ विद्यालयांत येऊं देत, इतकेंच नव्हे तर तेथें याचा मोठा सत्कारहि करीत. व्यालुवर कोलर म्हणून जो ग्रंथ यानें तामिळ भाषेंत केला आहे, त्यांत यानें मानवी प्राण्याच्या आयुष्यांतील निरनिराळ्या स्थितींचें उपदेशरूपानें श्लोकबद्ध असें क्रमवार वर्णन केलें आहे. या ग्रंथाची प्रसिद्धि सर्व दक्षिण हिंदुस्थानभर आहे; व तामीळ भाषेंत जे जे ग्रंथ आहेत त्या सर्वांत याची रचना सर्वोत्कृष्ठ मानलेली आहे. एलिसनें याचें इंग्रजींत भाषांतर केलें आहे. वेल्लूवर यानें यास वाढवून विद्या शिकविल्यामुळें याच्या नांवापुढें त्याचें नांव जोडलें असावें असें दिसतें. असें सांगतात कीं नीतिविषयपर याची कविता पुष्कळ असून यानें आपल्या इतर भावंडांप्रमाणेंच लग्न केलें नव्हतें. [ कविचरित्र. ]

**तेल**—तेलाचे मुख्य तीन प्रमुख विभाग आहेत. ( १ ) खानिज तेल, ( २ ) उद्भिज अथवा वनस्पतिज तेल

आणि ( ३ ) प्राणिज अथवा सेंद्रिय तेल. वनस्पतिज तेलांत दोन प्रकार आहेत. ( अ ) सर्व वनस्पतींमध्यें सामान्यपणें असणारें सामान्य तेल व ( आ ) फक्त कांहीं वनस्पतींतून निघणारें सुवासिक तेल.

ख नि ज ते ल —खनिज तेल म्हणजे भूगर्भातून निघणारें तेल होय. तेल हा शब्द साधारणतः सर्व तेलांसच लाविण्यांत येतो. त्यामुळें बऱ्याच चुका होण्याचा संभव असतो. वस्तुतः खनिज तेल व प्राणिज अथवा वनस्पतिज तेल यांमध्यें इतकें मोठें अंतर आहे कीं, तेल ही संज्ञा त्या सर्वांस लाविणें फार चुकीचें आहे. हेंच काय, पण त्याहून अगदीं भिन्न अशा गंधकापासून तयार होणाऱ्या ' सल्फ्यूरिक ॲसिड ' सारख्या द्रव्यास देखील तेल ही संज्ञा वापरण्यांत येते. उदाहरणार्थ, ऑईल ऑफ व्हिट्रिअल, हें एक त्याचें जुनें नांव आहे. कोणत्या सर्वसाधारण गुणधर्मामुळें तेल ही एकच संज्ञा या भिन्न भिन्न पदार्थांस लाविण्यांत येते याचा विचार केल्यास असें आढळून येईल कीं, हे सर्व पदार्थ पाण्यासारखे प्रवाही आहेत. त्या सर्वांत एक प्रकारचा दाट व चिकटपणा सर्व साधारण आहे, व रंगहि बऱ्याच अंशीं निघून जाण्यासारखा आहे इत्यादि. रसायनशास्त्रदृष्ट्या खनिज तेलाची रचना प्राणिज अथवा वनस्पतिज तेलांच्या रचनेपासून फारच निराळी आहे. खनिज तेलांतील अंतर्द्रव्यें पाहूं गेल्यास, तीं बहुधा कर्ब व उज्ज या दोन मूलद्रव्यांपासून झालेल्या निरनिराळ्या पदार्थांचें मिश्रण आहे असें आढळून येईल व याच कारणामुळें त्यांस कर्बोज्ज ( कार्बोन्हायड्रेट्स् ) असें एक सामान्य नांव देण्यांत आलें आहे. आतां त्यांत कांहीं अंशीं गंधक, नत्र, प्राण यांच्या मिश्रणाचींहि कांहीं द्रव्यें आहेत व तीं सर्व कशा रीतीनें भूगर्भांत मिश्र झालीं असावीं या संबंधानें अनेक विचारसरण्या आहेत. या प्रश्नास भूस्तरशास्त्र दृष्ट्या व रसायनशास्त्रदृष्ट्या असें दुहेरी महत्त्व असल्यामुळें त्याकडे बऱ्याच शास्त्रज्ञांचें लक्ष वेधलें आणि यामुळें बरेच निरनिराळे तर्क प्रस्थापित झाले, व अद्यापि देखील त्यांतील खरा कोणता व खोटा कोणता हें ठरावयाचें आहे. प्रत्येक विचारसरणीस पुष्टिदायक व घातक होणारीं अशीं उदाहरणें देण्यांत येतात. त्यांतील तीन तर्क जे दूरवर पसरले आहेत ते येणेंप्रमाणें:—

( १ ) सर्वांत जुनी विचारसरणी अशी कीं, तेलाची उत्पत्ति मूल निरिंद्रिय खनिज द्रव्यापासून झालेली आहे. हिच्या उत्पादक व अनुवादक लोकांचें म्हणणें असें कीं, भूगर्भांतील असामान्य उष्णतेमुळें व तींत सतत होत असणाऱ्या ज्वलनप्रयोगामुळें आंत असलेलें लोखंड अथवा इतर कांहीं खनिज द्रव्यें व कोळसा यांचें एकप्रकारचें मिश्रण तयार होत असलें पाहिजे ( उदा॰ आयर्न कार्बाईड ); पुढें या मिश्रणावर जमीनींत असलेलें पाणी अथवा पाण्याची वाफ पडून तिच्यापासून मेथेन, ईथेन इत्यादि वायू तयार होतात व पुढें त्यांच्या मिश्रणापासून व एकमेकांवर होणाऱ्या परिणामापासून तेल तयार होतें. या तर्कास मुख्य विघातक गोष्ट म्हणजे सर्व खनिज तेलांचा "वर्तुलाकार गतिधर्म" ही होय. या तर्काला 'इमॅनेशन थिअरी' अशी प्रचलित संज्ञा आहे.

( २ ) दुसरा तर्क असा आहे कीं तेल हें प्राणिज द्रव्यांपासून तयार होत असावें; प्राणिज अथवा सेंद्रिय द्रव्यें म्हणजे सर्व प्रकारचीं रासायनिक द्रव्यें होत ( त्यांमध्यें कोळसा हें एक मुख्य अंतर्द्रव्य होय ). येथें प्राणिज ( ऑर्ग्यानिक ) या शब्दाचा अर्थ फक्त प्राणिमात्रापासून होणारा एवढाच आकुंचित घेत नाहींत. कांहीं शास्त्रज्ञांनीं प्राणिज म्हणजे फक्त प्राणिमात्रांपासून किंवा फक्त वनस्पतींपासून अथवा दोहोंच्या मिश्रणापासून होणारे पदार्थ असा अर्थ केला आहे. 'सी एन्ग्लर' नामक विख्यात तैलशास्त्रज्ञाच्या म्हणण्याप्रमाणें या बनावांत भूगर्भांतील प्राणिमात्रांच्या अवशेषांचाच उपयोग होत असावा. पृथ्वीच्या पृष्ठभागावरील निरनिराळ्या थरांमुळें एकेकाळीं पृष्ठभागावर असलेले हे सर्व अवशेष भाग कांहीं काळानंतर आंत खोल गेले व वरील प्रचंड दडपणामुळें ते कुजून जाऊन त्यांमधून निघणारे निरनिराळे प्रवाही वायू एकत्र जमून त्यांच्यापासून तेल होत असावें, असें त्याचें म्हणणें आहे. तेलांत असणाऱ्या गंधक किंवा नत्र (नायट्रोजन) वगैरे द्रव्यांमुळें या विचारसरणीस बरीच पुष्टि मिळाली आहे. तरी पण वर सांगितलेल्या वर्तुळाकार गतिधर्मामुळें हिलाहि धक्का बसतोच. कारण खनिज तेलांची गति उजवीकडून डावीकडे आहे व प्राणिमात्रांच्या अवशेषांतील निरनिराळ्या द्रव्यांची गति डावीकडून उजवीकडे आहे.

( ३ ) वनस्पतिमात्र पदार्थांच्या द्रव्यांची व विशेषतः वनस्पतिज तेलांची गति डावीकडेच असल्यामुळें, प्राणिज याचा अर्थ वनस्पतींपासून होणारे व कर्ब हें मुख्य द्रव्य ज्यांत आहे ते पदार्थ असा करून कांहीं लोकांनीं एक तिसरीच विचारसरणी पुढें केली आहे. पण असें धरल्यास गंधक व नायट्रोजन हे कोठून आले हा प्रश्न राहतोच.

अमुक एके ठिकाणीं तेल आहे किंवा नाहीं, हें भूगर्भशास्त्रांतील कांहीं विवक्षित ठोकताळ्यावरून कळतें. अलीकडे या कामासाठीं एक नाजुक यंत्र तयार करण्यांत आलें आहे. बहुधा रुक्ष, खडकाळ, डोंगरी व उष्णकटिबंधांत असलेल्या जमिनींतून तेल आढळतें. तेलाचा वर लिहिल्याप्रमाणें तपास लागल्यानंतर, जमिनींत भोंक पाडून त्यांतून नळ आंत खोल उतरवितात. हे नळ तेलाच्या पृष्ठभागाहून खोल, थेट तेलाच्या बुडापर्यंत तीनचारशें अथवा त्यांहूनहि जास्त फूट जमिनींत नेलेले असतात. आंत असलेल्या तेलाच्या पृष्ठभागावर तेलांतून निघालेले वायू ( ग्यासेस ) कित्येक शतकांपासून जमलेले असल्यामुळें, त्यांनें एक प्रचंड वजन पृष्ठभागावर पडलेलें असतें. अशा तेलांत नळ खुपसल्यास पृष्ठभागावरील वजनामुळें खालनें तेल नळांतून बाहेर उसळूं लागतें. कित्येक वेळां तर तें इतक्या उसळतें कीं, नळ खोदण्यास केलेलीं यंत्रें ( जीं

असतात तीं ), आंतील नळ, व इतर जिनसा यांस तें दूरवर फेंकून देतें; व तेलाचा एक प्रचंड स्रोत शें दोनशें फूट उंच ( कित्येक दिवस ) उडत रहातो, व लाखों ग्यालन तेल जमिनीवर पाण्यासारखें वहात जातें. सुरवातीला वायूच्या वर्जनामुळें तेल पृष्ठभागावर आणण्यासाठीं इतर कोणत्याहि प्रकारची शक्ति लागत नाहीं. परंतु पुढें पुढें मात्र तिची गरज लागते. याप्रमाणें तेल वर काढल्यानंतर तें शुद्ध करून मग उपयोगांत आणितात. आज जगामध्यें रशिया, बाल्कनराष्ट्रें, उत्तर व दक्षिण अमेरिका, मेक्सिको व ब्रह्मदेश येथें तेलाच्या खाणी आहेत. दर वर्षी सुमारें पांच कोटि टन तेल याप्रमाणें वर काढण्यांत येतें. त्यापैकीं तीन कोटि वीस लक्ष टन फक्त उत्तरअमेरिकेंतील खाणींतून निघतें व दहा लक्ष टन हिंदुस्थानच्या वाट्यास येतें.

वर काढलेलें कच्चें तेल म्हणजे एक अठरा धान्यांचें कडबोळें होय. त्यामध्यें नाना प्रकारचे आणि नाना तऱ्हेचे इतर पदार्थ मिश्र झालेले आढळतात. हें तेल वर काढल्यानंतर त्याला गंधकाम्ल( सल्फ्युरिक ॲसिड )नें साफ करण्यांत येतें. पुष्कळ वेळां हा विधि ' फुलर्स अर्थ' नांवाच्या एका भुसभुशीत अशा मातीच्या योगानेंच उरकण्यांत येतो. ह्या तेलांतून नंतर इतर पदार्थ भिन्न करावे लागतात, व पुढें ते आपापल्या गुणधर्माप्रमाणें कमी जास्त मोलानें विकले जाऊन त्यांचा निरनिराळ्या ठिकाणीं उपयोग करण्यांत येतो. हे पदार्थ म्हणजे (१) बेन्झीन (प्रवाही शक्ति, मोटर्स वगैरे चालविण्याकरितां ), (२) केरोसीन तेल ( जाळण्याकरितां ), (३) हलकीं तेलें ( प्रवाही शक्ति-मध्यम प्रकारच्या यंत्राकरितां, ) (४) पॉलिश-ऑईल ( सफाई तेल ), (५) गॅसोलीन ( प्रवाहि शक्ति ), ( ६ ) रिगोलिन ( ७ ) पॅराफिन ( सफेत दिसणारें नरम मेण, मेणवत्ती व औषधीकामाकरितां ), (८) जड तेल ( प्रवाही तेल, बॉयलरकरितां ). (९) अस्फाल्ट ( डांबर व इतर उपयोगांकरितां ). ह्या तेलांचा उपयोग उष्णता मिळविण्याकडे दिवसेंदिवस जास्त होत आहे. आधुनिक काळांत गिरण्यांचे बॉयलर आगगाड्यांचीं एंजिनें व आगबोटींचीं एंजिनें, तसेंच इतर हजारों कामांत त्या तेलाचा अथवा त्यांतील कांहीं विवक्षित पदार्थांचा उपयोग केला जातो. त्यामुळें तेलास प्रवाही जळण (लिक्विड फ्युएल) ही एक संज्ञा देण्यांत आली आहे. कोळशापेक्षां हें ठेवण्यास व इकडून तिकडे हलविण्यास जास्त सोईस्कर असल्यामुळें व विशेषतः त्यांतील उष्णता उत्तम दगडी कोळशाच्या उष्णतेपेक्षां सव्वापटीनें जास्त असल्यामुळें, हें जळण म्हणून आज कोळशापेक्षां उपयुक्त झालें आहे.

व न स्प ति ज ते ल( व्हेजिटेबल ऑईल. ).—वनस्पतिज तेलाची मूळ रचनाच खनिज तेलांच्या पदार्थरचनेहून भिन्न आहे. खनिज तेलाची रचना जितकी सरळ तितकीच ह्याची अवघड आहे. हीं तेलें मुख्यत्त्वेंकरून ' ग्लिसरीन ' व ' फॅटी ॲसिड्स् ' अशा दोन भिन्न प्रकारच्या पदार्थांपासून झालेलीं आहेत. ह्या सर्वांच्या मुळाशीं ग्लिसरीन हें मुख्य आहे व त्याला निरनिराळ्या ॲसिडांची जोड मिळून मग निरनिराळीं तेलें तयार झालीं आहेत. मुख्यतः स्टियरीक, पालिमिटिक, ओलेयीक, मिरिस्टिक, लीनोलिक, ॲरॅचिक, कॅप्रिक, व्हॅलेरीक, ब्युटीरिक, असेटिक इत्यादि ॲसिडस् हीं मुख्य आहेत. ह्याशिवाय इतरहि बरींच ॲसिडस् आढळण्यांत येतात. कार्बनमध्यें प्राणोज्ज श्रेणी (ओ-एच ग्रूप) मिश्र केली तर तीस हैड्रोक्सील अथवा अल्कोहोलिक श्रेणी म्हणतात. ग्लिसरीन हें अशा तीन श्रेणी मिळून झालेलें सर्वांत साधें असें तिहेरी अल्कोहोल होय. ह्या तीन श्रेणींपैकीं प्रत्येकांतील (उज्ज) हयड्रोजन काढून या ऐवजीं फॅटी ॲसिड तेथें ठेविल्यास जी एक नवी रचना तयार होते, ती सर्व प्रकारच्या वनस्पतिज व प्राणिज तेलांच्या मुळाशीं आढळते. मात्र त्यांत थोडेफार फरक असतात. तथापि त्या सर्वांचें मूल तत्त्व हेंच होय. हीं तिन्हीं ॲसिडें अथवा त्यांतील एखादें दुसरें, अथवा त्यांचीं निरनिराळीं प्रमाणें हीं या सर्व तेलांत असतात.

फॅट याचा अर्थ मराठींत चरबी असा आहे. इंग्रजींत तिचा प्राणिज तेल असा सर्वसामान्य अर्थ असला तरी रसायनशास्त्रज्ञ निराळा अर्थ करतात. फॅट म्हणजे नैसर्गिक स्थितींत घट्ट होणारें तेल होय. मग तें प्राणिज असो. अथवा वनस्पतिज असो. खरें पाहूं गेल्यास रसायनशास्त्रदृष्ट्या त्या दोहोंत फारसें अंतर नाहीं. त्यांची रचना व त्यांत असलेलीं बहुतेक द्रव्यें सारखींच असतात. वनस्पतिज तेलांतहि पुष्कळ तेलें अशीं आहेत कीं तीं साधारणपणें घट्टच असतात. उदाहरणार्थ, खोबऱ्याचें, ताडाचें, मोहाचें, कोकंबीचें तेल इत्यादि. या तेलास इंग्रजींत बटर ( लोणी ) अथवा ' फॅट ' ( चरबी ) अशा संज्ञा प्रचलित आहेत. मराठींत मात्र चरबी म्हणजे प्राण्याच्या अंतर्भागांतून निघालेलें घट्ट तेल होय. खोबऱ्याचें तेल कितीहि घट्ट असलें तरी त्यास खोबऱ्याची चरबी अथवा खोबऱ्याचें लोणी म्हटल्याचें कोठेंच आढळत नाहीं. तेल पातळ असो वा घट्ट असो, तें उन्हांत ठेविल्यास पातळ होतें व थंड केल्यास घट्ट होतें. पातळपणा व घट्टपणा फक्त त्यांत असलेल्या निरनिराळ्या अम्लांवर अवलंबून आहे, ह्याशिवाय दुसरा कोणताहि भेद त्यांत नसतो. सर्व प्रकारच्या चरब्या साधारणतः हवेंत ठेविल्यास घट्ट दिसतात. मात्र माशांचीं तेलें पातळ असल्यामुळें त्यास ट्रेन-ऑइल्स् असें म्हटलें जातें.

ह्या तेलांचा प्रसार वनस्पतिराज्यांत सर्वत्र दूर प्रसरलेला आहे. सूक्ष्मदर्शकयंत्रानें पाहिल्यास वनस्पतींचीं पानें, फुलें, फळें, फांद्या, व मुळें हीं साधारणतः एकप्रकारच्या अतिसूक्ष्म अशा चौकोनी अथवा लंबवर्तुलाकार पेशींच्या (सेल्स) समूहाचीं असतात. त्यांमध्यें जीवनरस, पेपीरस, जीवस्थान, गर्भ व पोकळी इत्यादींचा समावेश झालेला असतो. यामध्यें अथवा या जीवनरसांत मिश्र स्थितींत व पेपीरसांत लहान बिंदूंच्या रूपानें तेल आढळतें. त्याचप्रमाणें लहान मोठ्या

प्रमाणात तें वनस्पतीच्या इतर प्रत्येक भागांतहि दृष्टीस पडतें. अशा तेलांत स्टार्च, क्लोरोफील, गोंद व कांहीं रंग इत्यादि मिश्र असतात.

प्रत्येक जातीची वनस्पति व तिचा प्रत्येक भाग ह्यांत तेल असतें. तथापि तेलाचा खरा सांठा वनस्पतीच्या बीजांत असतो. या ठिकाणीं देखील हे तेलाचे कण, जीवनरसांतील प्रोटीन या पदार्थाबरोबर मिश्र होऊन स्निग्ध (एमलशन) स्थितींत असतात. या स्थितींत ते ताप-विल्यास त्यांतील पदार्थ पुन्हां स्वतंत्र होतात. त्यामुळें तेल लवकर निघून त्याना अवशेषहि बराच कमी होतो. त्याच कारणास्तव तेलाचें बीं अथवा त्याचें बारीक केलेलें पीठ ह्यांस तापवावें लागतें.

बियांमध्यें एकहि बी बिनतेलाची आढळावयाची नाहीं; मात्र निरनिराळ्या बियांमध्यें तेलाचें प्रमाण कमी-जास्त असतें. एवढेंच नव्हे तर, एकाच जातीच्या बीमध्यें निरनिराळ्या हवामानांत निरनिराळें प्रमाण आढळतें. उत्तर अथवा दक्षिणध्रुवापासून निघून जसजसें आपण उष्ण भागांत जावें, तसतसें तेल असलेल्या बियांच्या लागवडीचें मान जास्त जास्त आढळतें व साधारणतः समशीतोष्ण व उष्ण कटिबंधांत हें प्रमाण फार आहे. हिंदुस्थान, उत्तर व दक्षिण आफ्रिका, उत्तर अमेरिका, ब्राझिल अरजेन्टाईन-रिपब्लिक इत्यादि देश म्हणजे ह्या तैल-बियांचीं कोठारेंच होत.

जरी वनस्पतीच्या प्रत्येक भागांत तेल असतें, तरी तेल काढण्यास फक्त बियाच घेतात. वनस्पतींच्या दुसऱ्याहि कांहीं भागांचा उपयोग ह्या कामी क्वचित होतो. उदाहरणार्थ, ऑलिव्ह व ताडाचें तेल हीं त्या त्या फळांच्या रसांतून काढतात. व्हवारवर तेल हें मुळापासून, व मिरयल तेल हे देठांपासून निघतें. ज्या बीमध्यें 'स्टार्च' जास्त असतो तींत तेल थोडें निघतें व ज्यांत स्टार्च थोडा तींत तेल जास्त निघतें. तेल निघणाऱ्या वनस्पतींची संख्या अपार आहे. त्यांतील प्रमुखांची यादी येणेंप्रमाणें:—

| नांव | तेलाचें शें. प्रमाण टक्के | नांव | तेलाचें प्रमाण शेंकडा तेल |
|---|---|---|---|
| नारळ | ४०–४५ | ताड | ६५–७२ |
| बदाम | ४८–५० | राई | २२–२८ |
| सरसु | ३३–४३ | भुईमूग | ४५–५० |
| एरंडेल | ४६–५३ | मोह | ५०–५५ |
| तीळ | ५०–५८ | सूर्यफुल | २१–२२ |
| रामतीळ | ४२–४८ | करडई | ३०–३५ |
| रतनज्योत | ३५–४० | जवस | ३२–४१ |
| सरकी | २४–२६ | अक्रोड | ६०–६५ |
| ताग | २५–३५ | खसखस | ४१–५० |
| कांकडी | २३–२५ | कोको | ४५–४७ |
| चहाचें बी | ४० | चौलमुग्रा | ५०–५२ |
| ऑलिव्ह | ४०–६० | तंबाखू | ३० ३२ |

वनस्पतिज-पातळ तेलांचे मुख्यतः तीन विभाग केलेले आहेत. (१) वाळणारीं तेलें, (२) अर्धवट वाळणारीं तेलें, व (३) न वाळणारीं तेलें.

(१) वाळणारीं तेलें.—या तेलांत लिनोलेनीक, आयसोलिनोलेनीक, इत्यादि असंपृक्त ॲसिडस जास्त प्रमाणांत असतात. हा संपृक्त अथवा असंपृक्तपणा (सॅचुरेटेड किंवा अनसॅचुरेटेड) त्यांतील आयोडीनच्या प्रमाणावरून कळतो. वाळणाऱ्या तेलांत हा प्रमाण अंक फारच मोठ्या प्रमाणांत आढळतो. उदाहरणार्थ, तागाचें तेल प्रमाण अंश १५७–१६६, जवसीचें तेल प्र. अं. १७१-१९० इ.

(२) अर्धवट वाळणारीं तेलें.—ह्यांमध्यें वरील ॲसिड्स थोड्या कमी प्रमाणांत असून ओलेईक इत्यादि संपृक्त ॲसिड्स जास्त प्रमाणांत असतात उदा. तिळाचें तेल, कापशीचें तेल इ. यांचा प्रमाण अंश १३० च्या आंत आहे.

(३) न वाळणारीं तेलें.—ह्यांत ओलेईक जातीचीं संपृक्त ॲसिड्स जास्त व असंपृक्त कमी. उदाहरणार्थ, ऑलिव्ह, बदाम, भुईमूग इत्यादि तेलें प्र. अ. १०० च्या आंत

तेल काढण्यास कोठें व कोणत्या देशांत सुरवात झाली हें सांगणें बरेंच कठिण आहे. पाश्चिमात्य लोकांना तरी निदान ही माहिती इजिप्शियन लोकांकडून मिळाली ह्याबद्दल मुळींच शंका नाहीं. होमरनें (ख्रि. पू. ९००) 'ट्रोजन' लढाईच्या वेळीं प्रकाश पाडण्यासाठीं फक्त लांकडाचाच उपयोग केला जात असे, असें लिहिलें आहे. तेव्हां त्यावेळीं तरी ही माहिती त्या लोकांस नसली पाहिजे. पुढें (ख्रि. पू ४००) हिरोडोटस असें म्हणतो कीं, तेलाची माहिती यूरोपमध्यें प्रथम ग्रीक लोकांसच झाली व त्याचा उपयोग त्यांनीं खाणें, शरीररक्षण, केसांचीं जोपासना व जाळणें इत्यादि कामांत केला. यावरून ग्रीक लोकांस ही माहिती या कालापूर्वी थोडे दिवस होऊन ती बहुतकरून त्यांच्या सोलन, पायथॅगोरस,डेमोक्रीटस, प्लेटो यांसारख्या नामांकित विद्वानांनीं ईजिप्शीयन लोकांकडून मिळविलेली असेल. ईजिप्शियन लोकांकडून फोनिशियन व त्यांच्याकडून यहुदी लोकांनीं ही माहिती यूरोपमध्यें नेली असावी असाहि तर्क आहे. एवढें मात्र खरें कीं, ईजिप्शीयन लोकांस ही माहिती यूरोपियन लोकांपूर्वी कळलेली होती. मात्र ईजिप्शीयन लोकांनीं ही माहिती कोठून मिळविली तें समजत नाहीं. कदाचित त्यांनां ही माहिती त्यांच्यांपेक्षां जुन्या व त्यांच्यापूर्वी सुधारणेच्या शिखरावर असलेल्या असुर लोकांकडून मिळालेली असावी व असुरांनींहि ती इतरांपासून घेतलेली असावी. हे लोक म्हणजे हिंदुस्थानांतील इंडोचिनी होत. ईजिप्शीयन लोक प्रथमतः ऑलिव्ह तेलाचा व मग इतर म्हणजे तीळ, आळशी, एरंडेल वगैरे बियांतून निघणाऱ्या तेलांचा उपयोग करीत होते परंतु त्यांचा मुख्य शोध ऑलिव्ह तेलाचा होय. ऑलिव्ह तेल फळाच्या रसांतून निघणारें

असल्यामुळें तें काढणें बियांमधील तेल काढण्याच्या कृतीपेक्षां जास्त स्वल्प आहे. फळांमधील गीर काढून तो पाण्यांत उकळविल्यावर ऑलिव्ह तेल निघतें. ही कृति मुख्यतः तेल व पाणी यांच्या एकमेकांत मिश्र न होणाऱ्या पूर्वज्ञानामुळेंच कल्पनेंत आली असली पाहिजे; व हें ज्ञान होण्यास उपयोगांत आलेलें तेल म्हणजे त्याहून अधिक रानटी व मेहनतीच्या अशा रगडून अथवा भार देऊन काढलेल्या अशाच एखाद्या कृतीनें मिळविलें असावें. एकंदरींत तेल काढणें हें ईजिप्शियन लोकांच्या पूर्वी दुसऱ्या कोणांस माहीत होतें व त्यावेळीं तें रगडून व भार देऊन काढण्यांत येत होतें असें दिसतें.

ह्या रगडण्याच्या तऱ्हा प्राचीन काळीं चीन, हिंदुस्थान व ईजिप्त ह्या तिन्ही देशांत अगदीं बाल्यावस्थेंत असाव्यात. अद्यापि देखील ही तऱ्हा आढळते. हिंदुस्थान व ईजिप्तमधील घाणे म्हणजे हीच तऱ्हा होय.

घाणी अथवा घाणा यांतील मुख्य भाग म्हणजे एक लांकडाची मोठी उखळी, लांकडाची खालून गोल केलेली व खांबाप्रमाणें लांब असलेली लाट व लाटेस दडपण देणारें वजन हे होत. उखळीस खालीं तेल सांचण्यास एक लहानशी जागा असते व तिला बाजूला भोंक पाडलेलें असून त्या मार्गानें तेल बाहेर काढण्यांत येतें. लाटेचें गोल केलेलें टोंक उखळींत असतें व दुसरें टोंक वर साधारण तिरपें असें गेलेलें असतें व तें खालच्या वजनास बांधून त्यायोगें उखळींत असलेल्या दुसऱ्या टोंकावर एकप्रकारें वजन टाकूं शकतें. दुसरीकडून तें घाण्यास जुंपलेल्या जनावराच्या जुंशीं बांधलेलें असतें. उखळीच्या बाजूस अर्धें वेष्टण घातलेलें व उखळीच्या मध्यभागीं असलेल्या निमुळत्या भागांत नीट बसलेलें नालाच्या आकाराचें दुसरें एक लाकूड असून, त्याचीं दोन्हीं सुटीं टोंकें एका मोठ्या धोंड्यास बांधलेलीं असतात. ह्याच्या वरच आणखीं कांहीं वजनें ठेवून हें सर्व लाटेच्या वरच्या टोंकास दोरीनें टांगून ठेवण्यांत येतें. त्याच धोंड्यास दुसरा एक दांडा आडवा लावून त्याचा जुंवासारखा उपयोग करण्यांत येतो. उखळींत असलेलें बीं, उखळ व लाट यांच्यामध्यें रगडलें जातें, व त्यांतील तेल बाहेर पडून खालच्या अंगच्या भोंकांतून खालीं साठा करण्याच्या जागेंत जातें. याप्रमाणें लाट गोल फिरविल्यामुळें बियांचा एकानंतर दुसरा सर्व भाग त्याच्या खालीं दबून तेल काढण्याचें कार्य होतें. पुष्कळ वेळां बीं थोडेंसें तापविण्यांत येतें व कित्येक वेळां तें साधारण तापलें गेल्यावर त्यांत थोडें पाणीहि टाकण्याचा प्रघात आहे. घाणीच्या पेंडींत शेंकडा १५–१९ इतकें तेल शिल्लक रहातें.

चिनी लोकांची कृति यापेक्षां वेगळी आहे. एक सपाट केलेल्या दगडावर दुसरा गोल दगडी गोटा फिरविण्यांत येतो. तो असा कीं खालच्या दगडाचा सर्व भाग वरच्या गोट्याच्या प्रत्येक फेरीस एकदां तरी त्याच्या खालीं येतो. वरील वरवंट्याच्या दुसऱ्या टोंकास एक फावड्यासारखें लांकूड असतें. त्यायोगानें वरचें बारीक झालेलें पीठ एकत्र केलें जाऊन सांठविलें जातें. पुढें हें पीठ पाण्यांत तापवून वर आलेलें तेल पाण्यापासून वेगळें करण्यांत येतें. याशिवाय दोन लांकडांच्या सांध्यांत बीं ठेंचून त्याचें तेल काढण्याच्याहि निरनिराळ्या युक्त्या आढळतात. त्यांतील भिनत्त्व फक्त दडपण देण्याच्या कृतींतच आहे. अलीकडे निघालेले हायड्रोलिक प्रेस याच तत्त्वावर तयार केलेले आहेत. त्यांत जरूर असणारें दडपण पाण्याच्या घट्टपणाच्या धर्मावरून मिळविण्यांत येतें. पाण्याचे निरनिराळे घटक एकमेकांपासून इतके जवळ जवळ आहेत कीं लोखंड किंवा इतर जड धातू जसे वजनानें संकुचित होतात तसें पाणी फारच थोड्या प्रमाणांत संकोच पावतें. ह्याच तत्त्वावर ब्रॅह्म यानें १७९५ सालीं एक नवा प्रेस तयार केला व त्याचाच आज सर्वत्र उपयोग केला जातो. बियांचें पीठ करून व तें साधारण तापवून त्याच्या पातळ लाद्या करतात, व त्या गोणपाटाच्या आंत ठेवून मग प्रेसमधील दोन लोखंडी सपाट पाटांत ठेवतात व नंतर प्रेस सुरू करतात. पाण्याच्या दाबानें लोखंडी पाटे दाबले जाऊन तेल निघतें. प्रत्येक प्रेसमध्यें एकाच वेळीं अशा १२ ते २८ लाद्या घालतां येतात. या यंत्रांतून निघालेल्या पेंडींत सुमारें शेंकडा १०–११ टक्के तेल बाकी राहतें.

यानंतर १९ व्या शतकाच्या मध्यांत डाईस या फ्रेंच गृहस्थानें तेल काढण्याची आणखी एक नवीन युक्ति काढली. ती अशी कीं, तेल ज्यामध्यें द्राव्य होतें अशा प्रकारचीं कांहीं रसायनिक द्रव्यें घेऊन यांत तेल विरघळविणें व पुढें त्यापासून तें अलिप्त करणें. या कामीं प्रथम पाणी अथवा इतर प्रवाही पदार्थांचा उपयोग करण्याचे प्रयत्न केले गेले, परंतु त्यांत फारसें यश आलें नाहीं. याचें कारण पाण्यांत तेल विरघळूं शकलें नाहीं व इतर पदार्थांत तेलाबरोबरच बियांमधील इतर द्रव्येंहि येऊं लागलीं. डाईस यानें १८५६ ( फेब्रुवारी ) मध्यें पेटंट घेऊन कार्बनबायसल्फाईड याचा उपयोग केल्याचें जाहीर केलें. याच वेळीं त्यानें बेन्झीन, ईथर, क्लोरोफॉर्म, कार्बन, टेट्राक्लोराईड इत्यादि प्रमुख द्रव्येंहि सुचविलीं. पुढें त्यांवर पुष्कळसे प्रयोग होऊन बहुमतानें 'कार्बनबायसल्फाईड' व 'बेन्झीन' हीं दोन द्रव्यें पसंत केलीं. या कामीं उपयोगांत येणाऱ्या द्रव्यांत खालील मुख्य धर्म असावे लागतात.

( १ ) तीं पेट घेणारीं अथवा स्फोटक असूं नयेत. ( २ ) त्यांची वाफ सहज व लवकर व्हावी व त्यांच्यापासून कोणत्याहि प्रकारचा वास मागें राहूं नये. ( ३ ) तें एक सहज न तुटणारें रसायनिक द्रव्य असावें. ( ४ ) त्यांत तेलाखेरीज इतर द्रव्यें द्राव्य नसावींत. ( ५ ) तीं विषारी नसावींत ( ६ ) तेल अथवा बियांमधील गाळ वगैरेबरोबर त्यांचें रासायनिक मिश्रण होऊं नये व ( ७ ) तीं महाग नसावींत.

'कार्बन टेट्रॉक्लोराइड' जरी इतर सर्व बाबतींत फार उपयोगी असलें तरी भारी किंमतीमुळें त्याचा आज सर्वांस उपयोग होऊं शकत नाहीं. शिवाय लोखंडी भांड्यांवर त्याचा परिणाम होत असल्यामुळें, तें द्रव्य वापरणें झाल्यास त्यान्याशी संबंध येणारी सर्व यंत्रसामुग्री व भांडीं एनॅमल केलेलीं (जास्त किंमतीचीं) घ्यावीं लागतात. या कामीं उपयोगांत येणाऱ्या यंत्ररचनेंत एकंदर तीन मुख्य प्रयोग अव्याहतपणें चाललेले असतात ते असेः—

(१) वारीक केलेल्या बियांच्या पिठांत बेन्झीन (किंवा इतर उपयोगांत आणलेलें) द्रव्य मिसळून तें त्या पिठांत असलेल्या तेलाचा कांहीं अंश खेचून घेतें. (२) असें हें तेलमिश्रित द्रव्य कांहीं काळ पिठांत राहून नंतर सर्व एकदम दुसऱ्या भांड्यांत जातें. (३) तेथें पुन्हां उष्णतेमुळें बेन्झीनचीच वाफ होऊन ती वर जाते व तेथें पुन्हां थंड होऊन पिठावर पडते.

या यंत्रांतून निघालेल्या पेंडींत शेंकडा एक किंवा त्याहून कमी टक्का तेल राहतें. एकंदरींत शेंकडा ५० टक्के तेल असलेलें बीं जर आपण घेतलें, तर घाण्यांत त्यापासून ३२-३५ टक्के तेल निघतें; हायड्रॉलिक प्रेसमधून ४० टक्क्यां-पर्यंत निघतें व या तिसऱ्या प्रकारानें काढल्यास ४९ टक्के निघतें जगांतील गळिताच्या धान्याची एकंदर उत्पत्ति व तिचें हिंदुस्थानाशीं असलेलें प्रमाण यांचें कोष्टक खालीं देतों. कोष्टकांतील आंकडे हजारांचे आहेत

| गळिताचें नांव | जगांतील एकंदर उत्पत्ति टन | हिंदुस्थानांत उत्पत्ति टन | हिंदुस्थानांतील लागवड एकर |
|---|---|---|---|
| सरकी | ... | २,४१२ | २३३८३ |
| भुईमूग | २४४५ | २२०० | २,५८६ |
| अळशी | ४,५०० | ४९२ | ३,१०३ |
| सरसु व राई | १,९०० | २,५०० | ५,८९५ |
| तीळ | ... | ४५० | ४,२२४ |
| खोबरें | ... | ... | ४०० |

सरकीमध्यें अमेरिकेच्या खालोखाल हिंदुस्थानचा नंबर दुसरा आहे. अळशींत अरजेन्टाइन रिपब्लिकच्या खालोखाल हिंदुस्थानचा नंबर आहे. भुइमूगाचें पीक जगांतील पिकाच्या अर्ध्यानें येथें होतें. सरसु व राई यांचें पीक जगांतील पिकाच्या ४/५. हिश्शानें असून एरंडेल तेल तर हिंदुस्थाना-शिवाय इतरत्र कोठें होतच नाहीं.

हिंदुस्थानांत दर वर्षी सुमारें ७५ कोटि रुपये (५ कोटि पाऊंड) किंमतीच्या तेलाचें बीं उत्पन्न होतें व त्यांतील सुमारें ३०-३५ कोटि रुपये किंमतीचें बीं परदेशीं रवाना होतें व उलट हिंदुस्थानांत ह्याच तेलापासून बनलेला दुसरा माल इतका अपार येतो कीं (फक्त एकाच वर्षाचें अनुमान घेतल्यास) सन १९१८-१९ त म्हणजे पाश्चात्त्य राष्ट्रें लढाईचे खटाटोपांतून मुक्त होतात न होतात, तोंच बाहेरून २,४७,९१,१७३ पाउंड किंमतीचा म्हणजे सुमारें ३१ कोटि रुपयांचा माल हिंदुस्थानांत आयात झाला. शिवाय कोटयावधी रुपयांची शेतकीच्या कामीं अत्यंत उपयोगी असलेली पेंड हिंदुस्थानांतून निर्गत होते ती वेगळीच. खोबऱ्याचें तेलच कां बाहेर जावें व भुईमूग, सरसु राई, व एरंडी यांचें बींहि इतक्या जास्त प्रमाणांत कां जातें याचें उत्तरहि त्यांतच आहे. जगामधील एकंदर तेलाच्या व्यापाराशीं हिंदुस्थानांतील व्यापाराची तुलना खालील कोष्टकांत दिली आहे (आंकडे हजारांचे आहेत).

तेलाचा एकंदर व्यापार व हिंदुस्थान.

| गळिताचें नांव | जगांतील निर्गत. टन बीं. | हिंदुस्थानांतील निर्गत. टन बीं | हिंदुस्थानांतील निर्गत. तेल गॅलन |
|---|---|---|---|
| सरकी | ९०० | २८४ | ३५ |
| भुईमूग | ७८० | ३८४ | २८८२ |
| अळशी | २१५० | ४१४ | १०३४ |
| सरसु व राई | ३८५ | २४९ | ४०७० |
| तीळ | २६४ | ११२ | २०८० |
| खोबरें | ५३७ | ३८ | १०९१० |
| एरंडेल | १३७ | १३५ | १००७० |

वरील कोष्टकांत खोबऱ्याचें तेल, तसेंच एरंडाचें बीं व तेल यांचे आंकडे विशेष महत्वाचे आहेत.

वनस्पतिज तेलांचे (इसेन्शियल) सुवासिक (इथीरियल), उडून जाणारीं (व्होलाटाईल) तेलें हा एक वनस्पति राज्यांतील फार विस्तृत वर्ग आहे. प्रत्येक वनस्पतीला जो एकप्रकारचा विवक्षित वास येत असतो, तो त्यापासून होय. हीं तेलें इतर तेलाप्रमाणें वनस्पतींतील कोणत्याहि एका विशिष्ट ठिकाणीं व विशिष्ट प्रमाणांत न सांपडतां तीं वनस्पतींतील वेष्टित गाठींत, पोकळींत व इतर अलिप्त अथवा गोंदासारख्या इतर द्रव्यांत मिश्र झालेलीं सांपडतात. मिश्र स्थितींत तीं पातळ असल्यास त्यांस चीक व घट्ट किंवा अर्ध-घट्ट असल्यास त्यास गोंद असें म्हणतात. कडू बदामाचें व राईचें सत्त्व इत्यादि कांहीं तर प्रथम अपूर्ण स्थितींतच असतात; व मग रासायनिक फेरफारांत तीं तयार होतात. हीं तेलें पाण्यांत विद्राव्य असून, अल्कोहोल, ईथर व इतर वनस्पतींत व प्राणिज तेलांत द्राव्य असतात. तीं सहज पेट घेतात व पेटतांना पुष्कळ धूर सोडतात. कारण त्यांमध्यें कोळशाचें प्रमाण फार जास्त आहे. स्पर्श केल्यास तीं तेला-प्रमाणें चिकट लागत नाहींत व त्यांचा कागदावर डागहि पडत नाहीं. त्यांस एक प्रकारचा वास असून तीं भिंगावर ठेविल्यास जळजळतात. त्यांची वाफ थंड झाल्यानंतर तीं पुन्हां पूर्ववत (आंत कांहीं एक फरक न होतां) तेलाच्या रूपांत येते. पाण्यापेक्षां तीं बहुतेक हलकीं असतात. तरीपण त्यांत कांहीं कांहीं जडहि आहेत. पाण्याशीं तुलना केल्यास हें प्रमाण साधारण ०.८५० पासून १.१४२ निघतें. खनिज, वनस्पति अथवा प्राणिज तेलांप्रमाणें यांची रचना साधारणतः

नसून त्यांत निरनिराळे वर्ग आहेत, शिवाय ते सर्व वर्ग पूर्वीच्या तीन वर्गांहून अगदीं भिन्न आहेत. ते येणेंप्रमाणें:-

( १ ) खनिज तेलाप्रमाणें फक्त हायड्रोजन व कार्बन या दोन द्रव्यांपासून झालेला ज्यांनां ' हायड्रोकार्बन्स ' ही सामान्य संज्ञा आहे. तो उदा. ( अ ) ' टरपेन्टाईन ' तेलांत येणारें ' पिनीन, ( आ ) ' सिट्रोनेला ' तेलांतील ' कॅम्फीन ', ( इ ) लिंबू आणि नारिंगाच्या सालींत असलेलें ' लिमोनेन ', ( ई ) लवंगांमध्यें असलेलें ' कॅरियोफिलीन ' ( उ ) ओंवा व जिरें यांत असलेलें ' क्युमीन ' इत्यादि.

( २ ) ' केरोन्स ' अथवा एका कार्बनश्रेणींत एक ऑक्सिजन व दोन कार्बन, परमाणू जोडलेलें. द्रव्य उदा. कापुराच्या झाडांत येणारें कॅंफर, ओरीस नामक मुळ्यांतील आयरोन इत्यादि.

( ३ )फेनोल्स. लवंगांतील ओयगेनोल, ओंव्यांतील थायमोल, ससाफ्रा वृक्षांतील सॅफ्रोल, बडीशोपमधील अॅनीथोल इत्यादि

( ४ )अल्डेहाईड्स. लिंबु आणि लेमनग्रासमधील सिट्राल आणि सिट्रोनेलाल, कासियांतील अल्डेहाईड, गम् बेन्झॉईनमधील व्हॅनिलीन, स्फिरेईमधील हेलियोट्रोपीन इत्यादि.

( ५ ) अल्कोहोल आणि त्यांची अल्कांबरोबर झालेलीं मिश्रणें अथवा 'एस्टर्स'. उदा. गुलाबांच्या फुलांत व जिरेनियम तेलांत येणारें 'जिरॅनियोल,, बरगॅमोट व लव्हेंडर तेलांत येणारें 'लिमॅलोओल', गुलाबाच्या तेलांतील ॲसेटिक एस्टर, वेलदोडयाच्या तेलांत येणारें टरपिनोल, पेपरमिंट तेलांत येणारें ' मेंथोल , युकॅलिप्टस तेलांतील युकॅलिप्टोल आणि रोजमेरी तेलांत व बोर्नियोमधील कापुरांत येणारें बोर्निओल इत्यादि.

( ६ )अम्लें आणि त्यांच्यापासून झालेलीं' ॲनहायड्राईड्स उदा. ' पेरुबालसाम' मध्यें असलेलें 'सिनॅमीक ॲसिड', 'टुङ्फेमधील 'कुमारीन' इत्यादि.

( ७ ) नत्रसंमिश्र द्रव्यें. राईचें सत्व, 'जस्मिन' तेलांतील इंडोल, ज्स्मिन व नेरोल तेलांत असलेलें ॲन्थॉनिलिफमेथील-एस्टर. इत्यादि.

हीं सर्व नैसर्गिक तेलें होत. हीं पातळ ( इलयेप्टेन )व घट्ट ( स्टेआरोप्टेन ) असतात. याशिवाय पुष्कळ कृत्रिम तेलेंहि (सिंथेटिकल) तयार केलेलीं आहेत. नैसर्गिक तेलें मिळविण्याचे मुख्य पांच प्रकार आहेतः—

(१) डिस्टीलेशन.—वाफेच्या रूपानें काढून तेल पुन्हां थंड करणें. यांत कोरडा व ओला हे प्रकार आहेत. या प्रकारांत ज्यापासून तेल काढावयाचें असेल तो पदार्थ एका भांड्यांत ठेवून त्यास बाहेरून उष्णता देण्यांत येते. हीं तेलें थोड्या उष्णतेनें वाफ होऊन मिश्र पदार्थातून बाहेर पडतात व नंतर त्यांस थंड केल्यास पुन्हां पूर्ववत तेलाच्या रूपांत मिळतात. ओल्या प्रकारांत पदार्थ नुसतेच भांड्यांत न ठेवितां, ते पाणी अल्कोहल किंवा अशाच कांहीं पातळ द्रव्यांबरोबर ठेविण्यांत येतात व पुढें तेलाबरोबर ह्या द्रव्यांचेहि वाफ होऊन बाहेर पडल्यानंतर, व यांनां पुन्हां पूर्वरूप आल्यानंतर तीं तेलापासून दूर करावीं लागतात.

( २ ) एक्स्प्रेशनः—अथवा पिळून काढणें. तेल असलेले पदार्थ तेलाच्या पिशव्यांपासून पिळून काढून, त्यांपासून निघालेल्या रसांतून निरनिराळ्या यंत्रांच्या सहाय्यानें तेल निराळें करणें.

( ३ ) एक्स्ट्रॅक्शन-अथवा खेचून घेणें. यांत तेलाच्या पदार्थास अल्कोहोल, ईथर, बेन्झीन, तेल, पाणी इत्यादि द्रव्यांत बराच वेळ भिजवून ठेवतात. हे तेलार्क त्या द्रव्यांत द्राव्य असल्यामुळें ते मूळ पदार्थापासून खेंचले जातात. पुढें ते त्यापासून वेगळे करण्यांत येतात.

( ४ )एन्फ्लुअरेजः—अथवा खेंचून घेणें.- यांत वनस्पतिज तेलें, खनिज तेलें, अथवा अल्कोहोल यांस एका भांड्यांत ठेवून त्यावर त्यांत भिजेल अशा रीतीनें एक फडकें पसरण्यांत येतें व त्या फडक्यावर तेलार्क ज्यांतून काढावयाचे असतील त्या पदार्थांचा एक बारीक थर करून तो कित्येक तास तसाच ठेवण्यांत येतो. नंतर शेष पदार्थ काढून टाकून फडक्यामध्यें तेलांत मिश्र झालेले अथवा फडक्याच्या खालील तेलांत गेलेले तेलार्क निराळे करण्यांत येतात.

( ५ )मॅसरेशनः—अथवा चुरडून काढणें. यांत तेलार्कपदार्थास गरम केलेल्या तेलांत अथवा पदार्थांत खूप चुरडून तेल काढण्यांत येतें. नंतर गाळून त्यांत स्वच्छ निर्मळ अशा मद्यार्काच्या ( अल्कोहोल ) सत्वाबरोबर मिश्र करून त्यांतून तें सत्त्व वेगळें करण्यांत येतें. हे सुवासिक तेलार्क मद्यार्काच्या बरोबरच बाहेर पडतात व त्यांतून मद्यार्काचें प्रमाण कमी करून ते उपयोगांत आणतात. या तेलार्कांचा मुख्य उपयोग, सुगंधी तेलें, अत्तरें, ( सेंट्स ) व अर्क तयार करण्यांत, खाद्य वस्तू सुगंधित करण्यांत व औषधोपचारांकडे केला जातो.

प्रा णि ज ते लें—वनस्पतिज तेलांप्रमाणेंच या तेलांची रचना असून रसायनशास्त्रदृष्ट्या हीं दोन्हीं प्रकारचीं तेलें एकाच जातीचीं आहेत. त्यांच्यांतहि ग्लिसिरीन हेंच मुख्य तिहेरी मद्यार्क असून त्याला जोडलेल्या इतर अम्लश्रेणी दोहोंनां सामान्य अशाच आहेत. यांची भिन्नता अथवा मिश्रणें शोधून काढावयाचीं असल्यास त्यांत अगदीं थोड्या प्रमाणांत असलेलीं ( शेंकडा ०.२ पासून ०.४ पर्यंत-क्वचित् २.० पर्यंत ) कांहीं ' स्टेरोल ' नांवाचीं मद्यार्क जातीचीं द्रव्यें उपयोगी पडतात. त्याखेरीज इतर खास्त्रीयक असें कांहीं सांपडत नाहीं.

प्राणिवर्गांत तेल हें प्राणिमात्रांत व त्याच्या प्रत्येक अवयवांत असतें. त्याचप्रमाणें मूत्राशयाखेरीज करून शरीरांतील इतर सर्व प्रवाही द्रव्यांतहि तें थोडेबहुत प्रमाणांत आढळतें. दुधामध्यें तर तें पुष्कळच असतें. गाईच्या दुधांत

तें शेंकडा ३.७; स्त्रियांच्या दुधांत ३.८; शेळीच्या दुधांत ४.८; मेंढीच्या दुधांत ६.८; हरणीच्या दुधांत १७.०; हत्तिणीच्या दुधांत २०.० व डेल्फिन माशाच्या दुधांत ४६.० याप्रमाणें सांपडतें (लहान मुलास व अशक्त माणसास स्त्रियांचें, गाय अथवा शेळी यांचें दुध देण्याचें मुख्य कारण, पचनास जड असें जें तेल-आपण ज्यास तूप म्हणूं-त्याचें त्यांतील कमी प्रमाण हें होय).प्राण्यांच्या शरीराची सूक्ष्म रचना वनस्पतींच्या सूक्ष्मरचनेप्रमाणें असल्यामुळें येथेंहि तेल तशाच प्रकारच्या पेशींमध्यें असतें, व वनस्पतींप्रमाणेंच तें शरीरांतील निरनिराळ्या भागांत निरनिराळ्या प्रमाणांत आढळतें. शरीरांतील सर्वांत मऊ भाग म्हणजे हाडांच्या मधील पोकळींत असलेला, ज्यास मॅरो म्हणतात तो होय. त्यांत तेलाचें प्रमाण शेंकडा ९० वर असतें. त्यानंतर मूत्राशयपिंड, पोट, आंतडीं, हृदयासभोंवतालचा भाग आणि चामडीच्या आंतील तिच्या लगतचा भाग, यांत शेंकडा ८० व पाठींत शेंकडा २४ असतें. हाडें, रक्त, व लाळ यांत मात्र तें बिलकूल नसतें. शरीरांत तेल हें एकमेकांस जोडलेल्या बंधकरफगोलों (बाईंडींग टिस्स्यूज )मध्यें एका सूक्ष्म पटलाच्या आंत एकावर एक थराप्रमाणें असतें. सजीव प्राण्यांमध्यें हीं तेलें नेहेमीं प्रवाही स्थितींत असतात व मृत्यूनंतर तीं थिजून जातात. पाण्यांत राहणाऱ्या बहुतेक प्राण्यांचीं तेलें बाहेर इतर्वेत पातळ स्थितींत राहतात. त्यास 'ट्रेन ऑईल्स' म्हणतात. मेलेलीं जनावरें, मारलेल्या जनावरांचे विशिष्ट भाग व अनेक प्रकारचे मासे यांच्यापासून प्राणिजतेल काढतात.देवमासे तर अशा तेलाचीं हालतीं चालतीं कोठारेंच होत. प्रत्येक देवमाशांतून कितीतरी मण तेल निघतें.

ज्यापासून तेल काढावयाचें असेल ते (मृत शरीराचे) निरनिराळे भाग पहिल्या प्रथम पाण्यानें धुवून रक्तादि इतर गाळापासून स्वच्छ करण्यांत येतात. यासाठीं ते सर्व एका टाकींत ठेवून तींत एकीकडून स्वच्छ पाणी आंत सोडण्यांत येतें व दुसरीकडे घाण झालेलें पाणी बाहेर काढलें जातें. त्यानंतर त्या भागाचे लहान लहान तुकडे करण्यांत येतात व मग ते उपयोगांत घेतात. या कामीं मुख्यतः उपयोगांत असलेली रीत म्हणजे, तेल उष्णतेनें पातळ करून इतर भागांपासून निराळें करणें. त्यांत दोन मुख्य प्रकार आहेत व त्या प्रत्येकाचे पुन्हां चार चार गौण प्रकार आहेत.

(अ) कोरडी रीत—(१) प्रत्यक्ष विस्तवावर वितळविणें, (२) अप्रत्यक्ष वाफेनें वितळविणें, (३) उष्ण पाण्यानें वितळविणें व (४) उष्ण हवेनें वितळविणें.

(आ) ओली रीत.—(५) शुद्ध पाण्यांत वितळविणें, (६) आम्लयुक्त पाण्यांत वितळविणें, (७) अल्कली असलेल्या पाण्यांत वितळविणें व (८) वाफेंत वितळविणें.

पहिल्या प्रकारांत तेल असलेले भाग एका चाळणीवर ठेवून त्यास पहिल्या ४ तऱ्हेनें उष्णता देण्यांत येते. पातळ झालेलें तेल हळूहळू बाहेर गळून चाळणीच्या खालीं असलेल्या भांड्यांत सांठतें. ओल्या प्रकारांत, त्याचप्रमाणें पातळ होऊन वाफेच्या पाण्याच्या योगानें तें लवकर खालीं येतें. सहाव्या प्रकारांत शेंकडा ५—८ पर्यंत सल्फ्युरिक ॲसिड घालण्यांत येतें. त्यामुळें तेलाभोंवतीं असलेल्या पटलाचा नाश होऊन तेलाचा मार्ग मोकळा होतो व तें लवकर खालीं येतें. सातव्या प्रकारांत सरसरी शेंकडा १—२ पर्यंत 'सोडियम हायड्रोक्साईड' वापरतात. त्याचा मुख्य उद्देश तेलांत स्वतंत्र असलेलीं अम्लें बांधून टाकण्याकरितां असतो.

प्राणिज तेलें काढण्याचा प्रघात बराच जुना असावा. आपल्याकडे औषधांसाठीं कित्येक लहान मोठ्या जनावरांचीं व प्राण्यांचीं तेलें काढण्यांत येतात; मात्र तीं शास्त्रशुद्ध रीतीनें न काढतां त्यांत कांहीं मिश्रणें असतात. मोठ्या प्रमाणांत असलें तेल काढण्यास स्पिट्स्बर्गेन येथें १५९६सालीं सुरवात झाली व त्यानंतर त्याचा दुसरीकडे प्रसार झाला असावा.

वनस्पतिज व प्राणिज तेलांचा उपयोग खालीं दिल्याप्रमाणें करण्यांत येतोः—

खाण्याकडेः—लोणी, कृत्रिम लोणी, मार्गरीन व तेल.

जाळण्याकडेः—तेल, मेणबत्ती.

शरीरास अथवा केंसास लावण्याकडेः—केसाचें तेल, अंगास लावण्याचें तेल व साबू.

कपड्यास लावण्याकडेः—मेणकापड करण्यांत अथवा कपडे धुण्याचे साबू.

लांकडांस लावण्याकडेः—तेल, रंग, रोगण.

यंत्रसामुग्रीकडेः—ओंगण (लुब्रीकंट) म्हणून तेल अथवा इतर मिश्रण.

यांशिवाय कांच चिकटविण्याची लांबी, लाख, पितळेचीं वगैरे भांडीं साफ करण्याचीं मिश्रणें इ० अनेक लहानसहान गोष्टींतहि तेलाचा उपयोग केला जातो.

या तेलांचे मुख्य धर्म म्हणजे पाण्याहून हलकेपणा, ज्वालामाहीपणा, मद्यार्क, ईथर, ॲसीटोन, कार्बन टेट्राक्लोराईड-बेन्झीन, कार्बनद्वाय सल्फाईड इत्यादि द्रव्यांत द्राव्यता (कांहीं कांहीं अपवाद सोडून), एक प्रकारचा चिकटपणा, पृष्ठभाग-आकर्षण-शक्ति, स्पर्श केल्यास लागणारा तेलकटपणा व कागदावर डाग पाडण्याचा धर्म हे होत.

[संदर्भग्रंथः—ल्युकोविच-केमिकल टेक्नॉलॉजी ॲंड ॲनॅलिसीस ऑफ ऑईल्स, फॅट्स ॲंड वॅक्सीस, पु. १—३; हेफ्टर—टेश्नोलोगी डर डफुेटे ऊंड फेटे, पु. १-३; युवेलोहडे ॲंड गोल्डस्मिथ हांडबुख डर डयुलेऊंड फेटे, पु. १—२; होल्डे—उंटर सुखुंग डर कोहलेनवासर स्टफ इयुले ऊंड फेटे; एन्गलर-युफर डस एर्डे डयुल, झाइने फिजीक, शेमी, गेओलोगी, टेश्नोलोगी ऊंड विर्टशा फ्ट्सलेबन. पु. १—४; फाहरियोन-श्रेमीडर ट्रोकेन्डेन डयुले; सेलिगमन—हांडबुख डर लाक ऊंड फिर्निसइंडस्ट्री; ॲलन—कॅमर्शियल ऑरगॅनिक ॲनॅलिसिस, पु. २ भा. २ रा; हायड्रोकार्बन्स, पेट्रोलियम, टार

प्रॅाडक्ट्स, फेनोल्स; गिल्डेमाईस्टर अँड होफर्मन--इसेन्शीयल ऑईल्स, पु. १ इत्यादि ] ( ले. वामन द्वारकानाथ कोर्डे. )

**तेलंग, काशीनाथ त्र्यंबक** (१८५०-१८९३)— एक महाराष्ट्रीय विद्वान् व देशसेवक. काशीनाथपंताचा जन्म १८५० साली आगस्टच्या ३० व्या तारखेस झाला. काशीनाथपंताच्या वडिलांनीं त्यास आपले बंधु त्रिंबकराव यांस दत्तक दिलें होतें. काशीनाथपंताची तीव्र बुद्धि त्यांच्या अल्प वयांतच दिसून आली. पांचव्या वर्षी त्यास शाळेंत घातलें. दहाव्या वर्षी ते इंग्रजी शिकूं लागले. आणि चवदाव्या वर्षी ते मॅट्रिक्युलेशन झाले. सन १८६७ साली त्यांची बी. ए. ची परीक्षा उतरली व लागलीच त्यांस कॉलेजांत दक्षिणा-फेलोची जागा मिळाली. शाळेंत काशीनाथपंताच्या सहाध्या-यांपैकीं कै. श्रीपाद बाबाजी ठाकूर हे होते व त्यानींच प्रथमतः संस्कृतची त्यास गोडी लावून दिली असें म्हणतात. १८६८ सालीं काशीनाथपंतास भगवानदास पुरुषोत्तमदास स्कॉलरशिप मिळाली, व अनुक्रमें १८६९ व ७२ सालीं त्यांनीं एल्. एल्. बी. व ॲड्व्होकेटची परीक्षा दिली. यावेळीं काशीनाथपंतांचें वय फक्त बावीस वर्षांचेंच होतें. पण आपल्या बुद्धीच्या जोरावर त्यांनीं लवकरच चांगली कीर्ति संपादन केली. कोणताहि विषय घेतला असतां त्याचें मार्मिक रीतीनें विवेचन करण्याची शक्ति, सरळ, शुद्ध आणि गोड इंग्रजी लिहिणें व बोलणें आणि अपूर्व विनयसंपन्नता या गुणांनीं लवकरच सर्वांस ते प्रिय झाले. मुंबईस त्यावेळीं ज्या मोठमोठ्या सभा होत त्या सर्वांत काशीनाथपंतांचीं भाषणें नेहमीं गोड, सुद्देसूद व चटकदार होत असत; त्यामुळें त्यांच्या वक्तृत्वशक्तीची लवकरच जिकडे तिकडे ख्याति झाली. ॲड्व्होकेट झाल्यावर त्यांनीं हायकोर्टामध्यें वकिली करण्यास सुरवात केली. तेलंगांच्या वेळीं लॅथॅम, ॲट्किन्सनसारखे नामांकित बॅरिस्टर हायकोर्टामध्यें होते. अशाच्या बरोबर तेलंग कितपत टिकतील हा प्रश्नच होता. पण थोडक्याच दिवसांत त्यांनीं आपली छाप हायकोर्टामध्येंहि पाडली. त्यांची सूक्ष्म व विवेचक बुद्धि, प्रामाणिकपणा व कायद्याचा मार्मिक अभ्यास व वक्तृत्व यामुळें त्यांना पुढें येण्याला फारसे प्रयास पडले नाहींत.

याच वेळीं मुंबईस फेरोजशहा मेथा व बद्रुद्दिन तय्यबजी हेहि उदयास येत चालले होते. त्यांचा व काशीनाथपंत यांचा अपूर्व संयोग होऊन मुंबईस राजकीय चळवळीचें काम त्या वेळीं मोठ्याच झपाट्यानें व जोरानें चाललें. मेथा यांच्या अंगांत जे कांहीं गुण होते ते काशीनाथपंताच्या अंगीं नव्हते हें खरें पण यूरोपियन व नेटिव्ह या दोघांचें प्रेम संपादन करण्यासारखे दुसरे कित्येक गुण काशीनाथपंताच्या अंगीं स्वभावतः असल्यामुळें त्यांची उत्तरोत्तर जास्त जास्त भरभराटच होत गेली. १८८२ सालीं सरकारनें जें एज्युकेशन कमिशन नेमिलें होतें त्यांत यास मेंबर नेमलें व त्यांनीं सदर कमिशनचें काम करण्याच्या कामीं जी मेहनत घेतली तीबद्दल पुढें लवकरच त्यांस सी. आय ई. हा किताब मिळाला. मुंबई युनिव्हर्सिटींत सिंडिक या नात्यानें त्यांचा यापूर्वीच प्रवेश झाला होता, व अखेरपर्यंत तें काम त्यांनीं मोठ्या आस्थेनें व हौसेनें चालविलें होतें. १८८३ व १८८४ सालीं मुंबई म्युनिसिपालिटींत व कायदेकौन्सिलांत त्यांचा प्रवेश झाला, व दोन्ही ठिकाणीं त्यांनीं फार चांगली कामगिरी केली. १८८५ सालीं राष्ट्रीयसभा मुंबईस पहिल्यानेंच भरली. तेव्हां मि. तेलंग हे तिच्या पुरस्कर्त्यांपैकीं होते व १८८९ सालींहि अशाच रीतीनें त्यांच्याकडे पुरस्कर्तृत्व येऊं पाहात होतें; पण तेव्हां त्यांनीं हायकोर्टाच्या जज्जाची जागा पतकरल्यामुळें एकंदर सार्वजनिक संस्थांचें बरेंच नुकसान झालें. १८७२ ते १८८९ सालापर्यंत तेलंगानीं राजकारणांत प्रत्यक्ष असा भाग घेतला व प्रेस ॲक्ट, इलबर्टबिल, लायसेन्स टॅक्स वगैरे विषयांवरील त्यांचीं भाषणें प्रसिद्ध आहेत. राजकारणांत ते मेथा, तय्यबजी. दादाभाई नौरोजी प्रभृतींच्या मताचे होते. तेलंग हे समाजसुधारक होते. तथापि आपल्या संस्कृतीचा त्यांनां पूर्ण अभिमान असल्यामुळें इतर कित्येक सुधारकांप्रमाणें ते कधींच वाहावले नाहींत. त्यांची धर्मश्रद्धा सदैव जागृत असे. काशीनाथपंतांच्या मागें इतके व्यवसाय असूनहि त्यांचा विद्याव्यासंग नेहमीं चालू असे. निरनिराळ्या विषयांवर त्यांनीं बरेच निबंध लिहिले आहेत. रामायण हे होमर कवीच्या इलियड काव्यावरून रचलें असावें अशी एका जर्मन पंडिताची कल्पना होती. काशीनाथपंतांनीं तिचें मुद्देसूद खंडण करून रामायणाचें प्राचीनत्व स्थापित केलें. भगवद्गीता व शंकराचार्य इत्यादि विविध विषयांवर काशीनाथपंताचे अनेक निबंधहि सुप्रसिद्ध आहेत. काशीनाथपंत ३० आगस्ट १८९३ रोजीं मृत्यु पावले.

**तेलगू**, भाषा.— द्राविडी भाषेच्या आंध्र वर्गांत तेलगू भाषा मोडते. तेलगू भाषा बोलणारांची एकंदर लो. सं. (१९११) २३५४२८६१ आहे. ही भाषा बोलणारे लोक हिंदुस्थानांत सर्वत्र असून, विशेषतः मद्रास इलाखा (१५७३५८३५) आणि निजामाचें राज्य ( ६०१५१७४- १९२१ सालीं ) यांत जास्त आहेत. निजामाच्या राज्यांत मुख्य ज्या चार भाषा आहेत, त्यांत तेलगू ही एक आहे. १८८१ पासून मोंगलाईतील ही भाषा बोलणाऱ्यांची संख्या शेकडा ५०नें वाढली आहे. निजामाच्या राज्यांत या लोकांचा एक स्वतंत्र तेलंगण नांवाचा प्रांतच आहे. मोंगलाईतलि दुसरा भाग जो मराठवाडा त्यांतील करीमनगर, मेदक व नळगोंडा या जिल्ह्यांत यांची संख्या शें. ९० आहे. तेलंगणांत यांच्या लोकसंख्येची वाढ गेल्या वीस वर्षांत शेंकडा ५२.३ नें झाली आहे. रायचूर, बेदर, गुलबुर्गा इकडेहि तेलंगी भाषा बरीच प्रचारांत आहे. खुद्द हैद्राबाद शहरांत (१९११) १५८८८९ इतकी तेलगू भाषा बोलणारांची लोकसंख्या आहे. निजामाच्या राज्यांत मराठी भाषा बोलणारांपेक्षां ही भाषा बोलणारांची संख्या दुप्पट आहे. याशिवाय अंदमान,

आसाम, बंगाल, बिहार-ओरिसा, ब्रह्मदेश, मुंबई इलाखा, मध्यप्रांत, वऱ्हाड, कूर्ग व म्हैसूर संस्थान या देशांतहि तेलगू लोकांची वस्ती कमीजास्त प्रमाणांत आहे.

तामीळ भाषेपेक्षां तेलगू भाषेचा प्रसार जास्त आहे. साधारणतः हिच्या चतुःसिमा पुढीलप्रमाणें ठरतातः—उत्तरेस मध्यप्रांतांतील चांद्यापासून ते ओरिसामधील चिकाकोलपर्यंत; पश्चिमेस मोंगलाईंना मराठवाडा; दक्षिणेस मद्रासपर्यंत, म्हणजे जेथें तामीळ भाषेस सुरवात होते तेथपर्यंत; आणि पूर्वेस किनाऱ्यापर्यंत. पश्चिम किनाऱ्यावर मात्र यांची तेलगूंची मुळींच वस्ती नाहीं.

याच प्रांतास प्राचीन काळीं आंध्र देश म्हणत असत. हल्लींचें तेलिंगण हें नांव मुसुलमान लोकांनीं दिलें आहे. त्यावरूनच सांप्रत येथील भाषेस तेलगू किंवा तेलिंग असें म्हणतात. तामील भाषेच्या खालोखाल हिच्या शब्द-संग्रहाचा भरणा असून हिचे उच्चार मधुर असतात. संस्कृति व सुधारणा या बाबतींत ही तामिळच्याच जवळ जवळ आहे. प्रत्येक शब्दाचा शेवट स्वरांत होत असल्यामुळें हिला पूर्वेकडील ' इटालियन भाषा' असें म्हणतात. मधुरोच्चारामुळें व सांस्कृतिक परिणामामुळें जेंटू असेंहि हिला कांहीं विद्वानांनीं नांव दिलें होतें; हल्लीं मात्र तें नांव फारसें प्रचारांत नाहीं.

लि पि.—तेलगू लिपि स्वतंत्र असून, ती तामीळसारखी मूळ अशोकाच्या ब्राह्मी लिपीच्या वंशांतील आहे. मात्र सातव्या शतकांतील वेंगी आणि चालुक्य यांच्या राजवटीचा परिणाम तिच्यावर होऊन तिचें प्राचीन रूप बरेंचसें बदललें आहे. कानडी लिपीचेंहि मूळ याचप्रमाणें असून, तेलगू व कानडी या दोन्ही लिपी १३ व्या शतकापर्यंत एकाच स्वरूपांत पहावयास सांपडत असत. पुढें मात्र त्यांत फरक पडत जाऊन १९ व्या शतकांत तर मुद्रणकलेच्या प्रसारामुळें दोहींचें स्वरूप बरेंच भिन्न दिसूं लागलें. सांप्रत या दोन्ही लिपी अगदींच स्वतंत्र झाल्या आहेत. ज्याप्रमाणें जुन्या वत्तेळुत्तु मूळाक्षरांतील वर्णांची संख्या ठराविक नव्हती त्याचप्रमाणें तेलगूचीं मूळाक्षरें ठराविक नाहींत. मलयालम् वर्णाप्रमाणेंच तेलगू वर्णहि पुष्कळ आहेत. तेलगू अक्षरांना जी वाकडीं अथवा गोल वळणें दिलेलीं आढळतात, त्याचें कारण पूर्वी ताडपत्रावर लोखंडाच्या लेखणीनें लिहितांना, लेखणी पानांच्या शिरांत घुसून अक्षरें फाटून जाऊं नयेत हें होय.

तेलगू भाषेंत संस्कृत शब्दांचा भरणा पुष्कळ असून लिखाणहि बरेंच आहे. तिच्या उपभाषा फार नाहींत. मध्यप्रांतांतील कोमटी ( लोकसंख्या ३४९० ), यानादि व मद्रासकडील चेंचु ( जेंटू ? ) असल्या कांहीं किरकोळ भाषा या उपभाषांमध्यें गणल्या जातात. कैकाडी आणि वडार हे जी भाषा बोलतात तीहि अपभ्रष्ट तेलगूच होय. द्रविड भाषांमध्यें तेलगूचें स्थान बरेंच महत्त्वाचें व स्वतंत्र असल्यामुळें, प्राचीन संस्कृत लेखकांनीं हिला आंध्र असें स्वतंत्र नांव देऊन इतरांचा समावेश द्रविड या सर्वसामान्य नांवाखालीं केला आहे.

प्राचीन शिलालेखांत पांचव्या शतकापासून या लिपीचा उपयोग केलेला आढळतो. तेव्हांपासून चौदाव्या शतकापर्यंत हिच्यांत हळू हळू रूपांतर होत होत आजची तेलगू लिपि बनली आहे. त्वरेनें लिहिणें व वर सांगितल्याप्रमाणें तें ताडपत्रावर लिहिणें हीं कारणें या लिपीच्या सांप्रतच्या वळणास मुख्यत्वेंकरून घडलीं आहेत. याच कारणामुळें कानडीमध्येंहि फरक होऊन या दोहोंची सांप्रत अगदींच फारकत झालेली आढळून येते. पल्लव, कदंब, पश्चिम आणि पूर्व चालुक्य, राष्ट्रकूट, गंग व काकतीय वगैरे राजवंशांच्या दानपत्रांत व शिलाशासनांत तेलगू लिपि योजली गेली असून त्या सर्वांत तिचें प्रथमपासून शेवटपर्यंतचें परिवर्तन पहावयास सांपडतें.

आंध्रांचें ( तेलगू ) राज्य दक्षिणेस स्थापन झाल्याचा काल साधारणपणें ख्रि पू. २४० वर्षांचा धरतात. त्यांनीं नेपाळांतहि राज्य स्थापल्याचा उल्लेख आढळतो. आंध्रांचा उल्लेख अशोकाच्या शिलालेखांत आढळतो. तेलगू राजांची सत्ता नाशिकपासून कृष्णेपर्यंत पसरली होती. ख्रिस्ती शकाच्या पहिल्या सनाच्या शेवटीं तेलगू राजांचें माळवा, गुजराथ येथील राजांशीं आणि काठेवाडांतील यवन, शक व पल्लव यांच्याशीं युद्ध झालें. त्यानंतर तेलंगणावर चालुक्य, राष्ट्रकूट व देवगिरीकर यादव यांचें राज्य होतें. सन १२९६ मध्यें महंमद तुघलखानें वरंगळच्या काकितय या तेलगू राजावर पहिली मोहीम केली; परंतु तींत त्याचा पराजय झाल्यामुळें स. १३०९ मध्यें त्यानें आपला सेनापति मलिक काफर यास तेलंगणावर पाठविलें. या स्वारींत काकिटयाचा पराभव होऊन तो मुसुलमानांचा मांडलिक बनला व आंध्रांचें स्वातंत्र्य नष्ट झालें. पुढील सालीं काफरनें बल्लाळ राज्यावर स्वारी करून त्याचा पराभव केला, आणि सहाशें हत्ती, ९६ हजार मण सोनें, वीस हजार घोडे व अगणित जड-जवाहीर लुटून नेलें, अशा रीतीनें दक्षिणेंतील तेलगू लोकांचें राज्य नामशेष झालें.

लो क, हैद्राबाद संस्थानांतलि सांप्रतची तेलगू समाजाची परिस्थितिः—शेतकरी मजूर वगैरे तेलंगी वर्ग सांप्रत अत्यंत दरिद्री व कंगाल आहे. त्यास मानवीपणाचें कर्तव्य आणि हक्क यांची ओळखच नाहीं. त्यांतल्या त्यांत भोई जातीचे तेलगू लोक जे हलक्या नोकऱ्या करितात त्यांची स्थिति अतिशय वाईट आहे. शारीरिक व मानसिक दुर्बलतेमुळें सांप्रतचे तेलगू लोक भित्रे बनले आहेत. दारिद्र्य आणि अज्ञान यांचींहि त्यांत भर पडली आहे. त्यांची रहाणी म्हणजे खावयास तांदुळाची पेज, नेसावयास लंगोटी व रहावयास एखादी गलिच्छ झोंपडी अशी आहे. तेलगू ~

कांहीं जहागीरदार, जमीनदार, देशमूख, सावकार व सुखवस्तु पांढरपेशे आहेत, पण त्यांची संख्या फार थोडी असून त्यांचें लक्ष्य या गरीब लोकांकडे असावें तसें नाहीं. बरेच दिवस दास्यांत राहिल्यानें कोणत्याच तऱ्हेची प्रगति करण्याचें धाडस यांच्यांत दिसून येत नाहीं. राजकीयप्रमाणें सामाजिक सुधारणेच्या बाबतींतहि हा समाज अत्यंत मागसलेला आहे. [ तेलगू समाचार, मे १९२५. ]

शे त की.—या लोकांचा मुख्य भर शेतकीवरच आहे. त्यामुळें इतर व्यवसायाकडे हे लोक फारसें लक्ष्य देत नाहींत. शेतींतहि अर्वाचीन साधनांचा उपयोग हे करीत नाहींत. यंत्रें, कृत्रिम खतें, निरनिराळीं पिकें, फळांची सुधारलेली लागवड इकडे यांची मति चालत नाहीं. त्यामुळें त्यांची आर्थिक स्थितीहि असमाधानकारक आहे. ते बरेचसे कर्जबाजारी आहेत. पड जमीनहि पुष्कळ पडून राहिली आहे. पतपेढ्यांच्या साहाय्यानें आपली स्थिति सुधारण्याचा प्रयत्न अद्यापि यांनीं सुरू केलेला दिसत नाहीं.

व्या पा र.—व्यापारांत यांचें लक्ष फारसें नाहीं. कोमटी खेरीज यांच्यांतील इतर लोक व्यापार, किंवा वाणिज्य यांस गौण समजून त्यांत लक्ष्य घालीत नाहींत. बँका, पेढ्या किंवा वाणिज्यसंघ वगैरे संस्था यांच्यांत चांगल्याशा नाहींत.

कोथल्टा व शिवंपेठ येथें कागद; मट्टेवाड व सिद्दीपेठ येथें धोतरें व लुगडीं; मह्बुबनगर येथें घोंगड्या; गढवाल येथें व नारायणपेठ येथें लुगडीं; पेंबर्ती येथे चंबू व इतर पितळी सामान कोंदाडू येथें हस्तिदंती व शिंगाच्या जिनसा; देवरकोंडा येथें रुमाल; याप्रमाणें वस्तू तयार होतात. या शिवाय लाखेच्या बाहुल्या, मातीचीं चित्रें, मेणे, हत्यारें व लांकडी वस्तूहि तयार करतात; परंतु प्रोत्साहन व भरपूर द्रव्य साहाय्य नसल्यानें ही कला बुडत चालली आहे.

आंध्र प्रांतांत गिरण्या फारच थोड्या आहेत व आहेत त्याहि सरकी काढण्याच्या व भात कांडण्याच्या आहेत.

महाराष्ट्रीयांनां परिचित अशा तेलगू लोकांचा समाज म्हणजे तेलंगी ब्राह्मण होत. यांचा लौकिक इकडे सर्वांनां माहीत आहे. यांचा मुख्य धंदा म्हणजे वेदपठण करून दक्षणा मिळविण्याचा. हे उत्तम वैदिक असून त्यांच्यांत पुष्कळसे लोक जटापाठी आणि घनपाठी असतात. दोनतीन वर्षांनीं हे लोक आपला देश सोडून बाहेर दक्षिणा मिळविण्यासाठीं प्रवासास निघतात. सूपशास्त्रांतहि ते प्रवीण आहेत, यज्ञयागांतील होता, अध्वर्यु वगैरे ऋत्विजांचीं कामें या लोकांकडे असतात. जानवीं करणें वगैरे किरकोळ गोष्टींशिवाय हे कोणताहि धंदा करीत नाहींत. यांच्यांत पोटभेद नाहींत. आंगिरस, भारद्वाज, कौंडिण्य, काश्यप, कौशिक वगैरे गोत्रें यांच्यांत आहेत. चलावारू, चलवतावारू, पीदरुवंतावारू, रंतावंतावारू असलीं यांचीं आडनावें असून पुरुषांच्या नांवाच्या शेवटीं अय्यां व स्त्रियांच्या नांवाच्या शेवटीं अम्मा असे शब्द असतात. हे लोक उंच, मजबूत, वर्णानें काळे व आळशी आहेत. अंगास खोबरेल तेल नेहमीं चोपडण्याची यांस आवड आहे. यांच्या शेंड्या फार मोठ्या असतात. यांनां अर्धवट मराठी भाषा बोलतां येते. यांचा आहार फार असून सारभात अथवा ताकभात त्यांनां फार आवडतो. अगांतुकी लावण्यांत तेलंगी ब्राह्मण पटाईत आहेत. यांचा नेहमींचा पोषाख म्हणजे एक नेसतें धोतर व अंगावर एक उपरणें हा होय. स्वभावानें हे फार रागीट असतात. हे धार्मिक असून स्मार्तपंथी, अद्वैतमताचे आहेत. यांचे कुलदेव जगदंबा, व्यंकोबा ( तिरुपतीचा ) व कटेरी ( कांची येथील ) देवी हे होत. जादू, मंत्रतंत्र, शकून, भुतेंखेतें, शाप देणें वगैरेंवर यांचा फार विश्वास असतो. कांहीं तेलगू निरनिराळ्या जातींतून सांपडतात. त्यांचीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत.

(१) वंजीगारः—हे ब्राह्मणेतर असून मूळचे मद्रासकडील आहेत. धारवाड वगैरे भागांत हे पसरले असल्यामुळें तेलगू शिवाय तामिळ आणि कानडी या भाषाहि त्यांनां येतात. यांच्यांत १८ पोटशाखा आहेत; त्यांचा परस्पराशीं अन्न व लग्नव्यवहार होत नाहीं. हे काळे, उंच व बांधेसूद असतात. हे लोक ताटांत कधींहि जेवीत नाहींत. केळीच्या पानांवर अथवा वडाच्या पत्रावळींवर जेवितात. हे मद्यपी व मांसाहारी असून हुशार, टापटिपीचे, इमानी आणि कष्टाळू आहेत. यांचा मुख्य धंदा कापडाचा आणि धान्याचा व्यापार करणें हा होय. हल्लीं कांहीं लोक सावकारी व नोकरीहि करतात. हे आपलीं सर्व धर्मकृत्यें ब्राह्मणांकडून करवितात. यांच्यांत अंगावर तप्तमुद्रा घेण्याची चाल फार आहे. यांचा धार्मिक गुरू तिरमल ताताचार्य हा आहे. याची गादी कांची येथें असून तो वैष्णवपंथी आहे. तोच या लोकांनां तप्तमुद्रा देतो. विष्णूच्या हातांतील शंख, चक्र, गदा, आणि पद्म या चार वस्तूंच्या या मुद्रा असतात; त्या तापवून माणसाच्या दोन्ही दंडावर उठवितात. या लोकांचा भुतांखेतांवर भरंवसा आहे. लग्नाच्या दिवशीं नवऱ्यामुलाची मुंज लावितात. लग्नाच्या चौथ्या दिवशीं नागावली नांवाचा कुलाचार होतो. मृत्यूनंतरच्या और्ध्वदेहिक क्रिया सतानि जातीचा उपाध्याय करितो. प्रेताच्या हाताला थोडावेळ बांबूचीं शंखचक्रें करून बांधतात, व नंतर सोडून पांच दिवसपर्यंत घरांत ठेवितात. पांचव्या दिवशीं राख भरून ज्यावेळीं पाण्यांत विसर्जन करावयाची त्यावेळींच हीं शंखचक्रेंहि विसर्जन करितात. यांच्यांत पुनर्विवाहाची चाल नाहीं. शिक्षणाचा प्रसार बराच आहे. यांच्या पंचायती असून किरकोळ भांडणें पंचायती तोडतात व महत्त्वाचे तंटे गुरुकडून मिटविले जातात.

( २ )ओशनमारुः—ही तेलंगी जात वंजीगारसारखी मूळची तेलंगणांतली असून हल्लीं मोंगलाई व कर्नाटक इकडेहि आढळते. मंडी, बोशेट्टी, धनशेट्टी, सतनूर वगैरे आडनावें यांच्यांत असून, हनुमान, हुलगव, यल्लम्मा ( सौंदत्तीची ) हे कुलदेव आहेत. यांच्यांत पोटभेद नाहींत; मात्र अविंधु,

कमळ, निळ, पळ व पसणी अशीं पांच गोत्रें आहेत. यांचा यांचा वंजीगारखारखाच असतो. हे उत्तम स्वयंपाकी असतात. वडे ( डाळीचे ), मासे, वदकें व सागोती यांच्यावर यांची विशप भक्ति आहे. हे मद्यपान करितात. पुरुष कानांत कुडी घालतात. हे कष्टाळू असून यांचा मुख्य धंदा कुंकू व अत्तर करण्याचा आहे. धार्मिक कृत्यास हे स्वतःचा उपाध्याय आणतात. यांच्या जातीचा गुरु वंजीगाराप्रमाणें कांचीचा ताताचार्य असतो. यांच्यांत मुलाचें नांव नवव्या दिवशीं ठेवितात. जंगमांप्रमाणें प्रेताला विमानांत बसवून नेतात व पुरतात. पुनर्विवाह यांच्यांत रूढ आहे. वंजीगाराप्रमाणें यांच्यांतील लहान तंटे पंचायतीकडून व मोठे तंटे गुरुकडून निवडले जातात. गुरूची आज्ञा मोडल्यास बहिष्काराची शिक्षा मिळते. यांच्यांत शिक्षणाचा प्रसार फार थोडा झाला आहे.

( ३ ) तोत्तीयनः—तेलगू शेतकऱ्यांची ही एक जात आहे. विजयानगरच्या राजवटींत या लोकांचे पूर्वज सैनिक होते असें म्हणतात. सांप्रत हे शेती व मजुरी करितात. यांच्यांत आतेबहिणीशीं आणि चुलतबहिणीशीं लग्नें लावितात. वधुवरांच्या वयांतील अंतराकडे यांचे विशेष लक्ष नसतें. यांच्या स्त्रिया ब्राह्मणांच्या हातचें खात नाहींत. हे प्रेतें पुरतात. सर्पदंशाचें वीष मंत्रानें उतरविण्यांत यांची प्रसिद्धी आहे.

अगसा, वलिजा, देवांगा, येरूर, होलेय, कुंवार, वेल्लाल, वगैरे दक्षिणेकडील जातींतहि बरेच तेलगू सांपडतात. [ सेन्सस रिपोर्ट १९११ व १९२१; सोलापूर व धारवाड ग्याझे.; भारतीय लिपिमाला; भांडारकर–दख्खन; आयंगार–एन्शन्ट इंडिया; तेलगूसमाचार. ]

**तेलगू वाङ्मय**—तेलगू या शब्दाच्या व्युत्पत्तीसंबंधानें तेलंगणांत एक आख्यायिका प्रचलित आहे. तिचा उल्लेख पुष्कळ एतद्देशीय ग्रंथकारांनीं आपल्या ग्रंथांत केला आहे. मामीडी व्यंकय्या म्हणून मच्छलीपट्टम येथील एका विद्वान् ग्रंथकारानें आपल्या तेलगू भाषेच्या कोशाच्या प्रस्तावनेंत सदर आख्यायिकेचा उल्लेख केला आहे. शिवाय "आंध्र कौमुदी" वगैरे तेलगू ग्रंथांत याच आख्यायिकेस विशेष महत्त्व दिलें आहे. तेलगू भाषेचें मूळचें नांव व ही ज्या देशाची भाषा आहे त्याचें नांव त्रि–लिंगम्, अथवा शुद्ध तेलगू भाषेत म्हणावयाचें झाल्यास, मोडोगा–लिंगम् म्हणजे तीन लिंगांच्या मधील प्रदेशाची भाषा असें आहे. तेलगू हा त्रिलिंग याचा अपभ्रंश नसून त्रिकलिंग याचा अपभ्रंश आहे असें रा. राजाराम रामकृष्ण भागवत हे वि. विस्तारांत म्हणतात.

तेलगू हा शब्द "तेलू" या विशेषणापासून निघाला असावा असा देखील कदाचित संभव आहे. कारण, तेलू म्हणजे सुंदर, पांढरा असा अर्थ होतो, आणि हें विशेषण बहुतकरून तेलंगणच्या लोकांची इतर देशाच्या लोकांशीं तुलना करतांना लाविलें असल्याचें संभवतें, असें रा. शंकर सायन्ना परब हे म्हणतात.

तेलगू भाषा द्राविडी भाषासंघांतील आहे हें आजचें भाषाशास्त्र सांगतें. तथापि जुन्या ग्रंथकारांनीं इतर प्राकृत भाषांप्रमाणें तेलगू ही देखील संस्कृतचें अपत्य म्हणून धरली होती. उदाहरणार्थः—

> तल्ली संस्कृतम्ब–एल्ला भाषलाकुन
> दानिवलना गोंता गाना बडिये ।
> गोंता दान गलीगे–नंतुयुनेकमें
> तेलगू भाषनगा विनुतिकेक्क ॥

अर्थ—संस्कृत ही सर्व भाषांची माता होय. प्राकृत भाषा ही तिजपासून उत्पन्न झाली आहे. कांहीं भाषा प्राकृत भाषेपासून निघाल्या आणि त्या सर्व एक होऊन त्यांपासून तेलगू भाषा उत्पन्न झाली.

तेलगू भाषेंतील शब्दांसंबंधानें व्याकरणदृष्टीनें ४ मुख्य भेद आहेत ते असेः–तत्सम, तद्भव, देशी व ग्राम्य. तत्सम म्हणजे संस्कृतसम. संस्कृत शब्द जसाचा तसा घेऊन त्यास तेलगू प्रत्यय लावून जो शब्द योजिला जातो त्यास तत्सम म्हणतात. आतां दुसरा प्रकार तद्भव हा होय. संस्कृतांतून किंवा प्राकृतांतून अपभ्रंश होऊन तेलगूंत आलेले शब्द तद्भव होत. तद्भव शब्दांपैकीं निम्मे शब्द संस्कृत भाषेंतील शब्द होत व बाकीच्या निम्या शब्दांहून थोडेसे अधिक शब्द महाराष्ट्र प्राकृत भाषेंतील होत. तेलगू तद्भव शब्द हे केवळ संस्कृत भाषेंतील अथवा ज्या सहा प्राकृत भाषा आहेत त्यांच्यापासून निघालेले असावे असें वाटतें. तेलगू भाषेंतील शुद्ध शब्द कोणते व तद्भव शब्द कोणते हें ओळखणें कित्येकदां कठिण पडतें. तेलगूंतील शब्दसंग्रहापैकीं एकचतुर्थांश शब्द तद्भव आहेत. देशी म्हणजे इतर कोणत्याहि देशांतले नसून केवळ तेलगी देशांतलेच शब्द. ग्राम्य शब्द म्हणजे प्राकृत जन भाषणांत जे ग्राम्य शब्द वापरतात ते. ग्राम्य शब्द ग्रंथांत अनुकरणाकरितांहि योजण्याचा पूर्णपणें निषेध आहे. ग्राम्य किंवा अलाक्षणिक ( व्याकरणविरुद्ध ) शब्दप्रयोग भाषेत होऊं न देण्याविषयीं तेलगू भाषालक्षणवेत्ते फार काळजी घेतात. आंध्रदीपिका नामक तेलगू व्याकरणाचा कर्ता मामीडी व्यंकय्या यानें आपल्या व्याकरणांत निरनिराळे पंचवीस शब्द घेऊन त्यांपैकीं शुद्ध तेलगू शब्द कोणते व अशुद्ध तेलगू शब्द कोणते हें दाखविलें आहे. शुद्ध तेलगू शब्दांस 'अच्चा तेलगू' म्हणतात. व जे अशुद्ध तेलगू शब्द भाषेत मिसळले आहेत त्यांस ग्राम्य तेलगू म्हणतात. तेलगू भाषेचा प्रसिद्ध वैय्याकरण नन्नयभट्ट होय आणि त्यानें आपला व्याकरणग्रंथ संस्कृतमध्यें लिहिला आहे.

तेलगू कवींनीं सर्व संस्कृत वृत्तें घेतलीं आहेत; पण विशेषतः ते संस्कृतवृत्तांपैकीं शार्दूलविक्रीडित, मत्तेभविक्रीडित, उत्पलमाला व चंपकमाला हीं चार वृत्तें वापरतात. संस्कृत वृत्तें जरी घेतलीं आहेत तरी त्यांत तेलगू लोकांनीं प्रास व यति असे दोन आपलेच नियम घालून दिले आहेत. तेलगू कवितेस अंत्य यमकांची शृंखला नाहीं. तेलगू पद्यांच्या चारी चरणांस

प्रास पाहिजे, व प्रत्येक चरणास यति पाहिजे. म्हणजे श्लोकाच्या चारहि चरणांचें द्वितीयाक्षर एकच व्यंजन पाहिजे. स्वरभेद असल्यास चिंता नाहीं. या पहिल्या चरणाचें दुसरें अक्षर जर 'क' असेल तर बाकीच्या चरणांचें द्वितीयाक्षर कच्या बाराखडीतलेंच पाहिजे; दुसरें कोणतेंहि द्वितीयाक्षर जर जोडाक्षर असेल तर बाकीच्या चरणांचीं द्वितीयाक्षरें याच जोडाक्षराच्या बाराखडींतल्यापैकीं पाहिजेत. यति म्हणजे विश्रामस्थान—चरण वाचतांना थांबण्याची जागा. पण तेलगू यतीचा असा नियम आहे कीं, थांबून पुन्हां ज्या अक्षरापासून वाचावयाला सुरवात करावयाची तें अक्षर व चरणाचें पहिलें अक्षर हीं समोच्चरणाचीं (सारख्या उच्चाराचीं) पाहिजेत; पण दोन्हीं ठिकाणीं प्रासाप्रमाणें एकच अक्षर पाहिजे असा कडक नियम नाहीं. कित्येक अक्षरांकरितां दुसरीं कित्येक अक्षरें यतिस्थानीं राहूं शकतात व अशा अक्षरांत यतिमैत्री आहे असें म्हणतात; उदाहरणार्थ च, छ, ज, झ, श, ष, व, स या अक्षरांत यतिमैत्री आहे. प्रत्येक सर्गाच्या पहिल्या चार अक्षरांत परस्पर यतिमैत्री आहे. तसेंच इतर तेलगू छंदःशास्त्राविषयीं बरेच बारीक नियम आहेत.

तेलगू देशांत फार प्राचीन काळापासून काव्यें किंवा इतर ग्रंथ कोणास तरी अर्पण करण्याची चाल आहे. ही चाल इतकी प्राचीन व अखंडित चालत आलेली आहे कीं, कोणासहि अर्पण केलेलें नव्हे असें एखादें तरी तेलगू काव्य सांपडेल किंवा नाहीं याची शंका आहे. या अर्पणक्रियेला तेलंगी कवि 'अंकित करणें' असें म्हणतात. अंकिताचे दोन प्रकार आहेतः—(१) नरांकित व (२) देवांकित. कित्येकांनीं आपलीं काव्यें धनादिकांच्या लोभानें मनुष्यांस अंकित केलीं आहेत व कित्येकांस तें न आवडून त्यांनीं तीं शिव, विष्णु इत्यादि देवांस अर्पण केलीं आहेत.

काव्यास प्रारंभ करण्याची सर्व कवींची तऱ्हा सारखीच आहे. काव्य नरांकित करावयाचें असेल तर प्रथम दोन चार श्लोकांत देवाचें वर्णन करून, असा असा देव कृतिभर्ता (ज्यास कृति अंकित केली असेल त्यास कृतिभर्ता म्हणतात) जो अमका अमका त्यास कल्याण देवो, अशी प्रार्थना करावयाची. नंतर मी एक काव्य करण्याच्या विचारांत असतां कृतिभर्त्यानें अमुक प्रकारच्या सभेंत बसून मला बोलाविलें व माझी विशिष्ट शब्दांनीं स्तुति करून "एक काव्य करून मला अर्पण करा" अशी माझी प्रार्थना केली असें सांगावयाचें. नंतर कृतिभर्त्याच्या वंशाचें व वाटल्यास आपल्याहि वंशाचें वर्णन करावयाचें. पुढें कृतिभर्त्याचीं षष्ठ्यंत विशेषणें ("अमकयाचा" अशा स्वरूपाचीं विशेषणें) दोन चार पद्यांत आणून त्याच्यापुढें (अमक्या गुणविशिष्टाच्या) अभ्युदयपरंपराभिवृद्धीकरितां रचावयाच्या काव्याचा प्रारंभ असा—असें म्हणून मूळ कथेस सुरवात करावयाची. प्रत्येक काव्यांत हा सर्व प्रकार असावयाचाच. या पद्धतीमुळें कृतिभर्त्याच्या काळावरून कवींचा कालनिर्णय करण्यास तेलगू इतिहाससंशोधकांस फार सोपें जातें व या पद्धतीनेंच हजारों राजांच्या व प्रसिद्ध पुरुषांच्या वंशावळी अजरामर झाल्या आहेत.

काव्याच्या प्रारंभीं जसा हा सर्व विधि असतो, तसा काव्याच्या प्रत्येक सर्गाच्या शेवटीं व आरंभीं एक विधि करावयाचा असतो; पण तो फार कठिण नाहीं. तो हा कीं, सर्गाच्या शेवटीं एक दोन श्लोकांनीं व सर्गाच्या प्रारंभीं एका श्लोकानें कृतिभर्त्यास संबोधावयाचें. या पद्यांतलि सर्व पदें संबोधनांत असावयाचीं. कृतिभर्त्यानें आपणांस कृति अर्पण करण्यास कृतिकर्त्याची स्तुति केली असें जरी प्रत्येक काव्यांत वर्णिलेलें असतें तरी प्रत्येक काव्याविषयीं कवीस विनवणी केली जातेच असें नाहीं. कवि अगोदर मूळ काव्य रचितो. नंतर त्या काव्याचें रंगाधिरोहण होतें (सभेंत काव्य वाचण्याच्या प्रसंगाला रंगाधिरोहण म्हणतात). काव्य ज्याच्या नांवानें अंकित करावयाचें असेल तो मालक मोठी सभा भरवितो. तेथें मोठमोठे कवी व विद्वान येतात, त्या सर्वांच्या पुढें तें काव्य वाचलें जातें. सभेंतलि प्रत्येकास त्या काव्यावर टीका करण्याचा अधिकार असतो. प्रत्येकानें काढलेल्या आक्षेपास उत्तर देण्याची जबाबदारी कवीकडे असते. अशा रीतीनें सर्वांचें समाधान होऊन तें काव्य जर निर्दोषी ठरलें तर कृतिभर्ता तें स्वीकारतो व कवीची चांगली संभावना करतो. इतक्या बिकट कसोटींतून उतरावें लागत असल्यामुळें काव्यांत कोणत्याहि प्रकारचे दोष न राहूं देण्याविषयीं तेलगू कवीस फार जपावें लागत असे हें खरें आहे; पण आक्षेपक जर सांप्रतच्या कित्येक पंडितंमन्य मराठी टीकाकारांप्रमाणें परोत्कर्षासहिष्णु असेल, तर उत्तम उत्तम काव्यकारांचाहि सभेंत पराभव होऊन त्यांस आपल्या काव्यांसह निमूटपणें सभेंतून उठून जावें लागत असे. प्रत्येक संस्थानिकाच्या दरबारीं (मग तो लहानसा जमीनदार कां होईना) एक तेलगू कवि असावयाचाच. अशा कवीस त्या संस्थानाचा आस्थानकवीश्वर म्हणतात. सध्यां देखील ही चाल विजयानगर, बोब्बीली, गद्वाल (मोंगलाईतील) इत्यादि तेलंगणी संस्थानांत पाळली जाते. या उत्तम पद्धतीमुळें उत्तम काव्यें निर्माण झालीं व अन्यथा अप्रसिद्ध राहणाऱ्या राजांचीं नांवेंहि अजरामर झालीं.

संस्कृतांतील चंपूकाव्याप्रमाणें, आंध्रकाव्यें गद्यपद्यांनीं युक्त असतात. आंध्र भाषा व तिच्या छंदःशास्त्राचे कडक नियम असे आहेत, कीं मध्यें गद्य घातल्याशिवाय पूर्वापार पद्यांचा संबंध जुळून वर्णनपूर्ति होऊंच शकत नाहीं. गद्याशिवाय एखादें काव्य रचल्यास त्याच्या नांवांतच तें निर्वचन आहे असें अभिमानानें सांगतात. उदाहरणार्थ तिक्कनकृत निर्वचनोत्तर रामायण. आंध्र लोकांस शतकें रचण्याचा छंद फार आहे. या भाषेंत कमींत कमी पांच सहास्रें शतकें असतील. हीं बहुतेक शतकें ईश्वरस्तुतिपर आहेत. कांहीं इतर

विषयांवरहि आहेत. प्रत्येक शतकांत शंभर पद्यें असावयाचीं. ध्रुपदाप्रमाणें प्रत्येक पद्याच्या शेवटीं तेच ते शब्द येतात. उदाहरणार्थ—दाशरथीशतकाच्या प्रत्येक पद्याच्या शेवटीं 'दाशरथी करुणापयोनिधि' हे शब्द व वीरभद्र शतकाच्या प्रत्येक पद्याच्या चतुर्थचरणीं 'करुणाकर वीरभद्र कारुण्यनिधि' असे शब्द येतात. प्रत्येक शतकांत, केकावलीप्रमाणें, निरनिराळ्या तऱ्हांनीं त्या त्या देवाचा धांवा केलेला असतो. कित्येक शतकें भक्तिरसानें ओथंबलेलीं असतात तर कित्येक इतर विषयांवरहि असतात. उदाहरणार्थ,सुमतिशतक म्हणून प्रत्येक सुमतीस संबोधिलेलें एक शतक आहे. त्यांत प्रत्येक पद्याच्या शेवटीं 'हेसुमति' असें संबोधन असून, त्यांत लहान मुलास उत्तम बोध आहे. हें शतक लहान मुलांकडून पाठ करविलें जातें. कुमारीशतकहि फार प्रख्यात आहे. त्यांत मुलीस बोध केलेला आहे. शतकें काव्यांत गणलीं नसल्यामुळें हीं अंकित करण्याची पद्धत नाहीं.

शतककार व पदें रचणारे यांस सोडून (कारण यांस प्रबंध रचणाऱ्यांच्या इतका मान नाहीं) काव्य-प्रबंध-रचणाऱ्या कवींची संख्या कमींत कमी दोनशें आहे. याशिवाय कित्येक मोठमोठ्या कवींचीं काव्यें नष्ट झालीं आहेत. उदाहरणार्थ, भीमकवि व अमरेश्वर या दोघांस त्यांच्या अप्रतिम काव्यांबद्दल पूर्व कवींनीं स्तविलें आहे. पण यांचें एकहि काव्य आज उपलब्ध नाहीं. नष्ट समजलीं जाणारीं कित्येक काव्यें आजकाल शोधकांच्या परिश्रमानें उपलब्ध होत आहेत. तेलंगणांत कोठेंहि न सांपडणारीं-तस्मात नष्ट समजलीं जाणारीं-तीन चार उत्तम काव्यें कांहीं दिवसांमागें तंजावरास सांपडलीं. त्या तामीळ (द्रविड) देशांत तेलंगी काव्यें असण्याचें कारण काय अशी सहज शंका येईल. कृष्णदेवरायाच्या वेळीं सर्व द्रविड देश आंध्रांनीं जाकिला होता. तेव्हां तेथें आंध्र सुभेदार ठेवण्यांत आले. त्या नायकांनीं केलेला हा ग्रंथसंग्रह होय. त्याप्रमाणें आंध्र सारस्वत फार अगाढ्य असल्यामुळें येथें सर्व कवींविषयीं त्रोटक माहिती देणें शक्य नाहीं व आवश्यकहि नाहीं. म्हणून मुख्य मुख्य कवींचें व त्यांच्या काव्यांचें वर्णन येथें दिलें आहे.

**न न्न य भ ट्ट**.—हा आंध्र भाषेचा आद्यकवि. याचा ख्रि. श. च्या ११ व्या शतकाच्या प्रारंभीं राजनरेंद्राच्या सभेंत फारच गौरव झाला. यानें राजनरेंद्राच्या विनंतीवरून तेलगूंत महाभारत रचण्यास प्रारंभ केला व अरण्यपर्व अर्धें रचून तो निवर्तला. महाभारताचीं हीं पहिलीं तीन पर्वें त्यानें राजनरेंद्रासच अर्पण केलीं. नन्नयभट्टास शब्दानुशासन अशी पदवी आहे. याचें कारण असें कीं ज्याप्रमाणें पाणिनि, पतंजल्यादि सूत्रकारांनीं गीर्वाणभाषा सुसंस्कृत व नियमबद्ध करून संस्कृत बनविली, त्याचप्रमाणें नन्नयभट्टानें आंध्रशब्दचिंतामणी नामक व्याकरण रचून तेलगू भाषा नियमबद्ध केली.

नन्नयभट्ट जरी आद्यकवि मानला जातो तरी त्याच्यापूर्वी निदान हजार वर्षांपासून तरी आंध्र कवित्व चाललें असावें असें त्याच्या काव्यावरूनच व्यक्त होत आहे. त्याचें काव्य प्रौढ वृत्तांनीं, यमकप्रासादि शब्दालंकारांनीं, उत्तम अर्थालंकारांनीं व आंध्र व्याकरणाच्या कोणत्याहि नियमास बाध न आणतां अप्रतिहत गतीनें वहात जाणाऱ्या शब्दप्रयोगांनीं इतकें सुशोभित आहे कीं, कालिदासाच्या किंवा भारवीच्या वेळीं संस्कृत भाषा ज्या स्थितींत होती. त्याच स्थितींत नन्नयाच्या वेळीं आंध्र भाषा होती असें कोणत्याहि भाषाशास्त्र्यास कबूल करावें लागेल.

**ति क्क न सो म या जी**.—नन्नयभट्टानंतर झालेल्या कवींत अतिविख्यात, आणि वर्णनशैलीविषयीं व ग्रंथबाहुल्याविषयीं सर्व आंध्र कवींत श्रेष्ठ असा कवि हाच होय. यास 'कवि ब्रह्म' असें नांव आहे. हा कवि नेल्लूरचा राजा जो मनुमासिद्धि त्याच्या सभेंत तेराव्या शतकाच्या मध्यकालीं होता, आजपर्यंत याची केवळ कवि या नात्यानेंच ख्याति होती. पण यास अर्पण केलेल्या व नुकत्याच तंजावरास सांपडलेल्या आंध्र दशकुमारचरित्रावरून हा मनुमसिद्धीचा प्रधानहि होता व फार राजकार्यकुशल होता असें सिद्ध झालें आहे. यानें यज्ञ केल्यामुळें यास सोमयाजी म्हणत असत. याचीं उपलब्ध असलेलीं काव्यें दोन : एक निर्वचनोत्तर रामायण व दुसरें विराटपर्वापासून स्वर्गारोहणापर्यंत भारताचीं पंधरा पर्वें. पहिलें काव्य यानें मनुमसिद्धीस अर्पण केलें व दुसरें नेल्लूर येथील हरिहरनाथ नामक देवास अर्पिलें.

सोमयाजीची वर्णनशैली फारच सुरेख आहे. संस्कृत भारतापेक्षां तेलगू भारत प्रत्येक बाबतींत श्रेष्ठ झालें आहे, असें के. व्हीं. लक्ष्मणराव म्हणतात. युद्धवर्णनांत सोमयाजीची बरोबरी करणारा कवि दुसऱ्या कोणत्याहि भाषेंत झाला नसेल. सोमयाजी उभयभाषांत (संस्कृत व आंध्र) प्रवीण होता म्हणून तो नेहमीं आपणास उभयकविमित्र म्हणवून घेत असे. त्याचें एखादें पद्य पाहिल्यास तें संस्कृत पदांनीं भरलेलें दिसावयाचें; दुसरें एखादें पद्य पाहिल्यास त्यांत देश्य शब्दच दिसावयाचे. सोमयाजीकृत भारत वाचतांना नेहमीं मोरोपंताच्या भारताची आठवण होते.

**ए र्रा प्र ग्ग ड**.—हा तिसरा आंध्र कवि, कोंडविडु राज्याचा अधिपति जो अनवेमारेड्डि त्याचा आश्रित होता. हरिवंश नांवाचें उत्तम काव्य करून एर्राप्रग्गड कवीनें या राजास अर्पण केलें, पण हा कवि या हरिवंशाकरितां विशेष प्रख्यात नाहीं. तर यानें भारत रण्यपर्वाचा राहिलेला जो भाग तो रचिला म्हणून याची फार ख्याति आहे. यास 'प्रबंध परमेश्वर' अशी पदवी आहे. याला आंध्र वाङ्मयांत फार मान आहे. मागील दोन कवींप्रमाणें हाहि आंध्र भाषेस सर्वस्वी आधारभूत आहे.

**ना च न सो म**.—हा 'उत्तरहरिवंश' काव्याचा कर्ता. यास 'सर्वज्ञ' म्हणतात. याची कविता इतकी प्रौढ आहे कीं, कोणी कोणी यास वरील कवित्रयापेक्षांहि अधिक मानतात. हरिवंशकाव्य-विशेषतः त्यांतील उषाकन्याप्रकरण इतकें सुरेख

घठलें आहे कीं तें एकदां हातीं घेतल्यास खालीं ठेववतच नाहीं. प्रौढता, अर्थगौरव, पदलालित्य इत्यादि सर्व गुण याच्या काव्यांत पदोपदीं दृष्टीस पडतात. कालिदासाची प्रसन्नता, भारवीचा भारदस्तपणा, दंडीचें पदलालित्य व जगन्नाथपंडिताचा प्रसाद इतके सर्व उत्तमोत्तम गुण नाचनसोमाच्या काव्यांत एकत्र झाले आहेत. नाचनसोम हा चवदाव्या शतकाच्या शेवटीं होऊन गेला.

श्री ना थ.—ह्याला आंध्र भाषेंत फार मान आहे. हा पंधराव्या शतकारंभीं राजमहेंद्री येथील रेड्डी राजांच्या आश्रयास होता. यानें आपलीं सर्व काव्यें राजमहेंद्रीच्या राजांस व त्यांच्या मंत्र्यांस अर्पण केलीं आहेत. याच्या सर्व काव्यांत 'आंध्रनैषध' हें फार प्रख्यात आहे. याचें दुसरें विख्यात काव्य काशीखंड.हें वीरभद्र रेड्डी या राजास यानें अर्पण केलें आहे. या कवीचें 'वीथिनाटक' (सडकेवरचें नाटक) या नांवाचें एक लहानसें पण चमत्कारिक काव्य आहे. यांत कवि रस्त्यावर उभा राहून तेथून जेणाऱ्या आणाऱ्या बायकांचें वर्णन करतो. याला राजांचा व त्यांच्या प्रधानांचा पूर्ण आश्रय असल्यामुळें हा फार सधन होता.

व म्म न पो त रा ज—हा वरील कवीचा मेहुणा. साधु तुकारामाप्रमाणें हा मोठा निरिच्छ भगवद्भक्त होता. याचें प्रसिद्ध काव्य श्रीमद्भागवत होय. के. व्ही. लक्ष्मणराव यांच्या मतें या काव्यांतील प्रल्हादचरित्र,गजेंद्रमोक्ष, रुक्मिणीकल्याण इत्यादि प्रकरणें केवळ अद्वितीय आहेत. संस्कृत भागवतापेक्षां आंध्र भागवत फारच रम्य झालें आहे. संस्कृत भागवत पुराणशैलींत आहे व आंध्र भागवत प्रबंधशैलींत आहे. हा ग्रंथ सर्व भक्तजनांस व रसिकांस अत्यंत पूज्य आहे; तरी वैय्याकरणांनीं व साहित्यशास्त्रज्ञांनीं यास बहिष्कार घातला.

नन्नयभट्ट, तिक्कनसोमयाजी, एर्राप्रगड, नाचनसोम, श्रीनाथ, बम्मन पोतराज, इत्यादि कवींस पूर्वकालीन कवी म्हणतात. या वेळेपर्यंत म्हणजे पंधराव्या शतकापर्यंत जे आंध्र कवी होऊन गेले त्या सर्वांनीं संस्कृत ग्रंथांस अनुसरूनच भाषांतररूपानें काव्यें रचिलीं; स्वतंत्र काव्यें रचिलीं नाहींत. हीं भाषांतरें शब्दशः नाहींत. ज्या दृष्टीनें मोरोपंतकृत महाभारतास संस्कृत भारताचें भाषांतर म्हणतां येईल त्याच दृष्टीनें हीं आंध्र काव्यें संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें होत. कालिदासकृत कुमारसंभव व ज्या पुराणाच्या विस्तृत कथानकास अनुसरून तें रचलें आहे त्यांत जो फरक दिसतो, तोच आंध्रभाषांतरांत व मूळ संस्कृत काव्यांत आहे असें म्हणतां येईल. आंध्र काव्यें कथानकपरंपरेसंबंधानेंच भाषांतरें होत असें म्हणतां येईल. बाकी तीं स्वतंत्र काव्येंच म्हणण्याला हरकत नाहीं.

कृ ष्ण दे व रा य.—हा विजयानगरचा महाप्रतापी राजा इतिहासांत फार प्रसिद्ध आहे. यानें इ. स. १५०९ पासून १५३० पर्यंत राज्य केलें. हा राजा आंध्र व संस्कृतांत फार प्रवीण होता. यानें तेलगूंत 'आमुक्तमाल्यदि' किंवा 'विष्णुचित्तीय' या नांवाचें महाकाव्य रचिलें. इ. स. १५१५ मध्यें कृष्णराय कालिंगदेश जिंकण्याकरितां निघाला. रस्त्यांत आंध्रमधुमथन (विष्णु) क्षेत्र नांवाचा एक पर्वत आहे. त्या पर्वतावर विष्णुदर्शनास राजा गेला व त्या रात्रीं तेथेंच राहिला. रात्रीं विष्णूनें स्वप्नांत येऊन तेलगूंत एक काव्य कर व मला अर्पण कर अशी आज्ञा केली व नंतर राजानें हें काव्य रचिलें असें या काव्यांतच सांगितलें आहे. या काव्यांत कवीचें उभयभाषाप्रावीण्य उत्तम रीतीनें व्यक्त होत आहे हें खरें.पण यामुळें काव्य येथून तेथून नारिकेलपाकांत उतरलें आहे. फार मेहनत घेऊन वाचणाऱ्यास हें काव्य फार आनंददायक आहे यांत संशय नाहीं. कृष्णदेव राजास आंध्र भाषेविषयीं फार अभिमान असे. यानें आपल्या महाकाव्यांत स्वप्नांतल्या देवाकडून 'देशभाषलंदु तेलुगु लेस्स' म्हणजे 'सर्व देशी भाषांत तेलगू श्रेष्ठ होय' असें वदविलें आहे.

अ ल्ल सा नि पे द्द ना:—कृष्णरायाच्या सभेंतील सर्व कवींत हा अग्रगण्य होय. 'मनुचरित्र' नामक प्रख्यात प्रबंध रचून यानें राजास अर्पिला व त्याच्यापासून 'आंध्रभाषापितामह' अशी पदवी मिळविली. राजास याच्याविषयीं फार पूज्यबुद्धि होती. एकदां सभेंत यानें राजाच्या सांगण्यावरून बत्तीस चरणांची कविता कशी असावी या विषयावर एक उत्पलमालिका एकदम रचिली.

मनुचरित्रांत स्वारोचिष मनूच्या उत्पत्तीची कथा आहे. ही लहानशी कथा मार्कंडेयपुराणांतून घेऊन त्यावर हें महाकाव्य रचलेलें आहे. आंध्र विद्यार्थ्यांस शिकाव्या लागणाऱ्या पंचकाव्यांत हें पहिलें काव्य आहे. रघुवंश किंवा कुमारसंभव यांच्या बरोबरीची याची योग्यता आहे.

नं दि ति म्म ना.—हा पारिजातापहरण नामक मधुर काव्याचा कर्ता. हें काव्य यानें कृष्णरायास अर्पण केलें आहे. हा कवि सुंदर कवित्वाविषयीं फार प्रख्यात आहे. कृष्णरायकालीन सर्व कवींत 'मुद्दुपुलुकु' म्हणजे 'गोड बोलणारा' म्हणून याची फार ख्याति होती.

पारिजातापहरण काव्यांत असा कथभाग आहे कीं, एकदां कृष्ण रुक्मिणीच्या महालांत तिच्याबरोबर द्यूत खेळत बसला होता. इतक्यांत कलहभोजन मुनि–नारद यांची स्वारी तेथें प्राप्त झाली. त्यानें नंदनवनांतून आणलेलें एक पारिजाताचें पुष्प कृष्णास दिलें. तें कृष्णानें रुक्मिणीस दिलें. त्यावर मुनि रुक्मिणीस म्हणाले 'तुझ्या सर्व सवतींपेक्षां कृष्णास तूंच अधिक प्रिय आहेस हें आतां यावरून स्पष्ट होत आहे. सत्यभामेस मी नवऱ्याची आवडती असा जो गर्व होता तो आतां पार नाहींसा होईल.' असें बोलून नारद चालते झाले. हा सर्व प्रकार तेथें असलेल्या एका दासीनें सत्यभामेस कळविला. तेव्हां ती रागावून मलिनवस्त्र परिधान करून कोपगृहांत जाऊन निजली.

नंतर कृष्ण तिच्या मंदिरांत गेला. नेहमीप्रमाणें भामा केलीगृहांत नसल्यामुळें तो कोपगृहांत गेला. तेथें त्या दंपतीचा झालेला प्रणयकलह कवीनें इतक्या स्वाभाविक व गोड रीतीनें वर्णिला आहे कीं तसलें वर्णन कोणत्याहि भाषेंत अजरामर झालें असतें. कितीहि समजावून सांगितलें तरी जेव्हां भामेचा कोप जाईना तेव्हां कृष्णानें तिला साष्टांग नमस्कार केला; तरी ती शांत न होतां त्यास वामपादानें दूर सारती झाली 'एका पारिजात पुष्पाची विशाद ती काय; तुझ्याकरितां नंदनवनांतून पारिजात पुष्पांचा वृक्षच आणीन' असें शेवटीं जेव्हां कृष्णानें कबूल केलें तेव्हां तिचा राग शांत झाला. नंतर तिला बरोबर घेऊन कृष्ण स्वर्गास गेला व इंद्रादिकांशीं युद्ध करून पारिजात वृक्ष घेऊन आला. अशी या सुरस काव्यांतील कथा आहे.

या काव्याच्या उत्पत्तीविषयीं एक मजेदार गोष्ट आहे. एकदां कृष्णरायाची राणी श्री चिन्नादेवी ती कांहीं कारणानें रायावर रागावली. रायानें तिला पुष्कळ समजाविलें पण ती शांत झाली नाहीं. राय शेवटीं तिच्या पायीं पडला तरी त्यास धुडकावून लावून ती तेथून चालती झाली; हा सर्व प्रकार जरी प्रणयकलहसंबंधीं होता तरी, नमस्कार केल्यावरहि आपणांस लाथ मारून निघून गेल्यामुळें तिचा रायाला फार राग आला व त्यानें त्या दिवसापासून तिच्याशीं बोलणें सोडून दिलें. अशा रीतीनें कित्येक दिवस गेल्यावर ही गोष्ट प्रस्तुत कवि जो तिम्मन्ना त्यास समजली. तेव्हां त्यानें राजाचा राणीवरचा राग जाण्यास हें काव्य रचिलें. त्यांतला कृष्णसत्यभामेचा प्रेमकलह, विशेषतः भामेकडून पायीं नत झालेल्या कृष्णास झालेली संभावना वाचून कृष्णराय उमजला; काव्यांतला तोच भाग सुंदर स्वभावोक्तींनीं भरलेला आहे अशी त्यानें कवीची तारीफ केली.

धू र्ज टि.—हा एक रसिकशिरोमणि महाकवि आहे. याची ग्रंथसंख्या जर फार असती तर यास आंध्र भाषेचा मिल्टन म्हणण्यास कांहीं हरकत नव्हती. सर्वसाधारण किंवा तुच्छ वाटणाऱ्या विषयाचें सर्वांस अत्यंत चित्ताकर्षक होईल असें वर्णन करण्यांत हा फार कुशल होता. अरण्यांतल्या भिल्लभिल्लिणींचें तसेंच त्यांच्या झोंपड्यांचें फारच सुंदर वर्णन याच्या काव्यांतून आढळतें. मिल्टनच्या कवितेप्रमाणेंच याची कविता देखील फार गंभीर व उदात्तरसपूर्ण असते. पण याच्या कवितेची संख्या फारच थोडी आहे. हा मोठा शिवभक्त होता. मोठा भक्त व कवि अशी याची प्रख्याति होती. 'याची कविता अतुलितचातुर्यमहिमान्वित असते' असें कृष्णदेवरायानें म्हटलें आहे. कवितेंतील गुणावगुण ओळखण्यांत हा मोठा कुशल असल्यामुळें यास रसिकाग्रणीहि म्हणत. पण वारवनितेशीं संबंध असल्याशिवाय रसिकता प्राप्त होऊं शकत नाहीं अशी जुन्या लोकांची चमत्कारिक समजूत असल्यामुळें हा वेश्यांगनालोलुप होता अशी दंतकथा पडली आहे. पण हा भक्तीविषयीं फार प्रख्यात असल्यामुळें या दंतकथेवर सबळ प्रमाणाशिवाय आमचा विश्वास बसूं शकत नाहीं.

मा द य गा रि म ल न्नाः—पारिजातापहरण कर्त्याचें व याचें कवित्व अगदीं एकसारखें आहे. याच्या काव्यांत आणखी एक असा विशेष आहे कीं इतर काव्यांत ज्याप्रमाणें हा अमुक एक भाग इतर भागापेक्षां उत्तम असें दाखविण्यास त्रास पडतो त्याप्रमाणें याच्या काव्यांत सर्व भागापैकीं कमी सुंदर भाग कोणता हें शोधून काढणें मोठें मुष्किलीचें काम आहे. म्हणजे पहिल्यापासून तो शेवटपर्यंत एकसारखी सुंदर शैली आहे. म्हणून कित्येक भागांच्या सौंदर्यविषयीं प्रख्यात असलेल्या पारिजातापहरणकारापेक्षां हा कवि विशेष प्रशंसनीय होय यांत संशय नाहीं. या कवीच्या काव्याचें नांव राजशेखरचरित्र. हा कवि मुक्कुतिम्मन्नाइतका विख्यात झाला नाहीं याचें कारण हेंच कीं पारिजातापहरणाप्रमाणें यानें आपलें काव्य कोणा मोठ्या राजास अर्पण केलें नाहीं. हें काव्य अनेक वेळां वाचलें तरी तें हातीं घेतल्यावरोबर पुन्हां वाचल्याशिवाय रहावतच नाहीं असें के. व्ही. लक्ष्मणराव म्हणतात.

आंध्र कवींच्या अनेक सुंदर आंध्रकाव्यांविषयीं येथें एक सांगितलें पाहिजे कीं यांतल्या काव्यरचनेइतकें कथानक सुंदर अन्यत्र नसतें. या कविश्रेष्ठांस जर सर वाल्टर स्कॉटच्या काव्यांतल्या कथानकाप्रमाणें उत्तम कथानकें मिळालीं असतीं तर हीं काव्यें साऱ्या जगांत अद्वितीय झालीं असतीं असें म्हणणें अतीशयोक्तीचें होणार नाहीं. या कवींचीं कथानकें म्हटलीं म्हणजे पुराणांतील राजे, राजकन्या, देवासुर, यक्षराक्षस यांच्या कथा होत असेंहि के. व्ही. लक्ष्मणरावांनीं आपलें मत नमूद केलें आहे.

रा म भ ट.—यानें सकलकथासारसंग्रह नामक काव्य रचिलें. हें यानें कृष्णरायाच्या आज्ञेवरून सुरू केलें. त्या वेळच्या कवित्वाच्या मानानें हें काव्य विशेष प्रशंसनीय आहे असें नाहीं. रामाभ्युदय नामक आणखी एक काव्य यानें रचिलें आहे, तें चांगलें उतरलें आहे.

रा म रा ज भू ष ण.—हा जातीचा भाट. याची जात सांगण्याचें कारण असें कीं आंध्र भाषेंत ब्राह्मणेतर प्रख्यात कवि हा एकटाच. याला रामराजभूषण असेंहि दुसरें नांव आहे. याचे प्रख्यात ग्रंथः-वसुचरित्र, हरिश्चंद्रनलोपाख्यान व नरसभूपालीय. यांपैकीं वसुचरित्र फारच प्रख्यात आहे. हें आंध्रकाव्यपंचकांतलें एक आहे. हें सर्व तऱ्हेनें माघकृत शिशुपालवधाच्या तोडीचें आहे. पदोपदीं श्लोकांत संपूर्ण श्लेष साधल्याशिवाय कवीच्यानें राहवलें नाहीं. यांतील वर्णनें फार आल्हादकारक, रसभावादि यथायोग्य आहेत. या काव्यांतील पद्यें म्हणजे साहित्यशास्त्रांतल्या रसप्रकरण, भावप्रकरण, अलंकारप्रकरण, इत्यादिकांकरितां तयार केलेलीं उत्तम उदाहरणेंच कीं काय असा भास होतो. याचें दुसरें काव्य हरिश्चंद्रनलोपाख्यान हें संपूर्ण द्व्यर्थी काव्य आहे.

या काव्यांत हरिश्चंद्राची व नलाची अशा दोन कथा आहेत. असलीं काव्यें क्लिष्ट असतात व विशेष रम्य नसतात हें खरें. पण शद्वार्थज्ञानजिज्ञासु विद्यार्थ्यांच्या सोईकरितां प्रौढ वाङ्मयांत असलीं एक दोन तरी काव्यें असलीं पाहिजेत. या कवीचा तिसरा ग्रंथ नरसभूपालीय होय. हा साहित्यशास्त्राविषयींचा ग्रंथ आहे. नरसराजनामक संस्थानिकास अर्पण केल्यामुळें या ग्रंथास हें नांव पडलें आहे. हा ग्रंथ मुख्यतः ओरंगल येथील विद्याधर कवीनें केलेल्या प्रतापरुद्रीय नामक साहित्यग्रंथाच्या आधारें रचिला आहे.

पिं ग ली सु र न्ना.—हा कवि मुख्यतःराघवपांडवीय नामक संपूर्ण द्व्यर्थी काव्याबद्दल प्रख्यात आहे. या राघवपांडवीय काव्यांत रामाची व पांडवांची अशा दोन कथा वर्णिल्या आहेत. या काव्याशिवाय या कवीचीं कलापूर्वोदय व प्रभावतीप्रद्युम्न अशीं दोन काव्यें आहेत. या काव्यांची रचना पारिजातापहरण व राजशेखरचरित्र या काव्यांच्या धोरणावरच आहे. म्हणूनच हीं काव्यें देखील रसिकप्रिय झालीं आहेत. रायानंतर हा साठ सत्तर वर्षांनीं उदयास आला राघवपांडवीय या काव्याचा असा चमत्कार आहे कीं, हें द्व्यर्थी असूनहि क्लिष्ट नाहीं. मोरोपंत समजण्यास मराठीचें जितकें ज्ञान पाहिजे तितकें तेलंगीचें असलें म्हणजे या काव्याचे दोनहि अर्थ समजतात. हें काव्य अक्लिष्ट असल्यामुळेंच या काव्याची व या कवीची आंध्रदेशांत फारच ख्याति आहे.

ते न्ना लि रा म कृ ष्ण.—या कवीस रामलिंग असेंहि नांव आहे. हा पांडुरंगविजय नामक काव्याचा कर्ता. पदगुंफनाविषयीं याची विशेष ख्याति आहे कविजनांत हा कवि जरी पांडुरंगमाहात्म्याविषयीं प्रख्यात आहे तरी सामान्यजनांत नकल्या व थट्टेखोर म्हणून याची ख्याति आहे रोज कोणाची तरी थट्टा फजिती केल्याशिवाय यास चैनच पडत नसे. कित्येक प्रसंगीं राजपुत्र व राजकन्या यांचीहि थट्टा करण्यास यानें मागेंपुढें केलें नाहीं. राजाच्या दरबारीं अप्पयादीक्षित व ताताचार्य असे दोघे विद्वान होते. रामकृष्ण हा अप्पयादीक्षितांचा शिष्य होता. ताताचार्यांच्या शिष्यांनीं आपले गुरु दीक्षितांपेक्षां अधिक पूज्य असें म्हटलें म्हणून रामकृष्णांनीं त्यांची फजिती केली. याच्या काव्यांत अर्थकाठिण्य फार आहे अशी सामान्य जनांची समजूत आहे, पण ती खरी नव्हे. त्या कालच्या कवित्वाप्रमाणेंच याचेंहि कवित्व फार हृदयरंजक आहे.

नृ सिं ह क वि.—हा कवि कर्णरसायन नामक मांधातृचरित्राचा कर्ता. हा कृष्णरायाचा समकालीन होता. हा आपलें सुंदर काव्य घेऊन रायास अर्पण करण्याच्या उद्देशानें विजयनगरास गेला व राजाची भेट करविण्याविषयीं मनुचरित्राचा कर्ता जो अलसानि पेद्दन्ना त्याची प्रार्थना करूं लागला. पण याच्या सुंदर काव्यापुढें आपलें काव्य फिक्कें पडेल अशी यास भीति पडल्यामुळें त्यानें रायाची व नृसिंहकवीची भेट करून दिली नाहीं. अशा रीतीनें उद्विग्न झालेल्या त्या कवीनें खाण्यास कांहीं नसल्यामुळें जातां जातां त्या काव्यांतली एक कविता विकली. हें काव्य इतकें सुंदर होतें कीं ह्या कवीच्या मरणानंतर कांहीं कारणानें रायास ती कविता समजली तेव्हां असलें उत्तम काव्य आपल्या हातून गमाविलें म्हणून रायास वाईट वाटलें.या कवीची काव्याच्या प्रारंभीं अशी प्रौढी आहे कीं ' माझ्या काव्यांतील शृंगारवर्णन ऐकून यति विट झाल्याशिवाय राहणार नाहीं; व वैराग्यवर्णन ऐकून विट यति झाल्याशिवाय राहणार नाहीं. '

कु मा र धू र्ज टि.—हा मोठ्या धूर्जटीचा नातू. यानें कृष्णदेवरायविजय नामक ऐतिहासिक काव्य रचलें आहे. या काव्याची संपूर्ण शुद्ध प्रत कोणासहि मिळाली नाहीं. हें काव्य या दृष्टीनें उत्तमच आहे. पण इतिहासकारांसहि याचा उपयोग होण्याचा संभव आहे. यांत कित्येक अतिशयोक्तीचे भाग आहेत हें खरें पण फेरिस्तादिक इतिहासकारांनीं लपविलेला इतिहासाचा कांहीं भाग यांत आहे असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

वैं क य्या.—यानें रामराजीय उर्फ नरपतिविजय नामक काव्य रचिलें. हें काव्य इतिहासकारांस उपयोगाचें आहे. यांत कृष्णरायाचा जांवई रामराजा—जो तालीकोटच्या लढाईंत पडला—त्याचें व त्याच्या पूर्वजांचें चरित्र वर्णिलेलें आहे.

अ द्दं कि गं गा ध र —हा तपतीसंहारणोपाख्यानाचा कर्ता. यानें आपलें काव्य गोलकोंडा—ज्यास महाराष्ट्र लोक गोवळकोंडे म्हणतात— येथील नबाब जो इब्राहीम कुत्ब त्यास अर्पण केलें आहे.याचा वडील भाऊ गादीवर असतां त्याच्या भीतीनें हा रामराजाच्या आश्रयास विजयनगरास जाऊन राहिला. तेथें रामराजभूषण इत्यादि आंध्र कवींची व याची मैत्री जमून यानें आंध्रभाषेचा अभ्यास केला. तेव्हांपासून हा आंध्र भाषेचा व आंध्र कवींचा मोठा आश्रयदाता बनला.

मो ल्ला.—ही आंध्र भाषेतील एक कवयित्री आहे. ही जातीची कुंभारीण, पण हिची कविता मात्र ब्राम्हणासहि लाजविण्यासारखी आहे. शुद्ध भाषा लिहिण्यांत ही पंतांस हार जाणारी नव्हे. शुद्ध भाषा व स्पष्ट विचार हे हिचे विशिष्ट गुण आहेत. शार्दूलादि सर्व प्रौढ वृत्तांचा हिनें उपयोग केलेला आहे. हिचें रामायण ' मोल्लरामायण ' या नांवानें प्रसिद्ध आहे.

वा ल स र स्व ती.—हा एक मोठा वैय्याकरण व कवि होता. याचें विशेष प्रख्यात असें काव्य म्हटलें म्हणजे 'राघवयादवपांडवीय ' हें होय. हें संपूर्ण त्र्यर्थी काव्य आहे. यांत रामायणाची, महाभारताची व भागवताची अशा तीन कथा आणिल्या आहेत. या कवीचें चंद्रिकापरिणय नांवाचें एक काव्य आहे. तें निजामशाहींतील परितियाल येथील वेंकटाद्रि राजास अर्पण केलें आहे.

'राघवयादवपांडवीय' हें काव्य दोन अर्थ करण्यांत विशेष क्लिष्ट नसून तिसरा अर्थ करण्यांत वरेंच क्लिष्ट असें आहे. असलें काव्य रचणें फार श्रमाचें व विद्वत्तेचें काम आहे यांत संशय नाहीं.

कूचिमंचि तिम्म कवि.—अठराव्या शतकाच्या प्रारंभीं झालेला हा एक मोठा कवि होय. इतर कवींपेक्षां याची ग्रंथ-संख्या फार आहे. आजपर्यंत याचे ग्रंथ मिळाले आहेत तेः—रुक्मिणीपरिणय, राजशेखरविलास, सिंहशैलमाहात्म्य, नीलसुंदरीपरिणय, रसिकजनमनोभिराम, सर्पपुरमाहात्म्य, शिवलीलाविलास, शुद्धांध्ररामायण व लक्षणसारसंग्रह.

वरील ग्रंथांपैकीं शेवटचा ग्रंथ व्याकरणछंदोविषयावरचा ग्रंथ आहे. शुद्धांध्ररामायणांत पहिल्यापासून शेवटपर्यंत एक संस्कृत ( तत्सम ) शब्द सांपडावयाचा नाहीं. म्हणजे तद्भव व देश्य शब्दच असावयाचे. शुद्धांध्र काव्यास आंध्र-भाषेत पहिल्यापासूनच फार महत्त्व आहे. असलें काव्य रचणें फार विद्वत्तेचें काम आहे. असल्या कवीस शुद्धांध्रकोश व तद्भवाचे नियम इत्यादिकांची चांगली माहिती पाहिजे. भाषावेत्त्यांस याचा विशेष अभ्यास करावा लागतो.

कूचिमंचि जग्ग कवि.—हा कूचिमंचि तिम्म कवीचा धाकटा भाऊ. हा उत्तम प्रकारचा कवि म्हणून प्रख्यात आहे असें नाहीं. परंतु हा शापकवित्वाविषयीं प्रख्यात आहे. या कवीचें शापकवित्वाविषयीं एक काव्यच आहे. या काव्याचें नांव चंद्ररेखाविलाप. या काव्याच्या उत्पत्तीची कथा कांहींशी चमत्कारिक आहे. विजयनागरच्या राजाचा मेहुणा जो नीलाद्रिराजा त्यानें या कवीस बोलावून आपली वेश्या जी चंद्ररेखा तिला नायिका कल्पून आल्यावर एक काव्य रचण्यास त्यास सांगितलें. त्यावर कवीनें चंद्ररेखाविलास नामक शृंगारपरकाव्य रचून आणलें. पण राजानें त्याची योग्य संभावना केली नाहीं. त्यामुळें कवीस फार राग येऊन त्यानें तें काव्य फाडून टाकलें व चंद्रशेखरविलाप नामक दुसरें एक काव्य रचिलें. या काव्यांत त्या राजाची खूप निंदा केली आहे. याशिवाय या कवीचीं सुभद्रापरिणय व सोमदेवराजीय अशीं दोन काव्यें आहेत. चंद्रशेखरविलाप नामक काव्य एकंदरींत म्याकफ्लाकने' व 'डन्सिअड' इत्यादि काव्यांप्रमाणें एक थट्टेचें काव्य आहे.

मुद्दुपळनि.—ही कवयित्री राधिकासांत्वन नांवाच्या काव्याची कर्त्री. ही जातीची वेश्या. ही तंजावर येथील प्रतापसिंहमहाराजाच्या पदरची वेश्या होती असें समजतें. तंजावरचा प्रतापसिंह इ. स. १७६५ च्या सुमारास मरण पावला. म्हणून ही इ. स. १७६० च्या सुमारास तंजावरास होती असें वाटतें. ही संगीत, साहित्य व भरतशास्त्रांत फार प्रवीण होती. हिचें राधिकासांत्वन काव्य फार गोड आहे. पण जातीची वेश्या असल्यामुळें सभ्य गृहस्थांस व कुलीन स्त्रियांस वाचण्यास अयोग्य अशीं वर्णनेंहि हिनें आपल्या काव्यांत केलीं आहेत. एकंदर हिचें कवित्व फार प्रशंसनीय आहे. संस्कृत व आंध्र शब्द जणू काय हिच्या ताब्यांत आहेत.

हिच्या काव्यांतून उदाहरणादाखल संबोधनप्रचुर व संस्कृतशब्दभूयिष्ठ एक असें पद्य मत्तेभविक्रीडित वृत्तांतील उतरून घेतोः—

यमुनातीरविहार । हारसदृशोद्यत्कीर्तिसंभार । मा—
रमणीयाकृतिभार । मारसिकताप्रावीण्यसंसार । सा —
रमरंदोक्तिविचार । चारणमदप्रख्याताविस्तार । ता—
रमहीभृत्समधीर । धीरमुनिवाराधार । राधारता ।

तरिगोंड वेंकम्मा.—ही एक ब्राह्मणी कवयित्री. ही लहानपणींच विधवा झाली. तेव्हांपासून ही ईश्वरभजनांत वेळ घालवीत असे. हिचे सांप्रत दोनच ग्रंथ उपलब्ध आहेत. ( १ ) वेंकटाचलमहात्म्य व ( २ ) राजयोगसार. वेंकटाचल-महात्म्यांत गिरीच्या बालाजीची कथा मोठ्या सुंदररीतीनें वर्णिलेली आहे राजयोगसारांत भागवतपुराणांतर्गत कपिल-देवहूतसंवाद वर्णिलेला आहे. हिच्या कवितेचा उत्पलमाला-वृत्तांतील थोडासा मासला येथें देतो.

रामनृपाल । घोरतररावणशौर्यविफाल । भव्यसुग्राम-सुरार्ययोगिजनतापरिपाल । कृपालवाल । श्रीभूमिसुतास्मलोल। परिपूर्णसुकीर्ति विशाल । इत्यादि इत्यादि.

सुभद्रम्मा.—हिनें जरी कोणतेंहि काव्य रचिलें नाहीं तरी हिचीं वरींच शतकें प्रसिद्ध आहेत. रघुनायकशतक, केशवशतक, कृष्णशतक व राववरामशतक हीं हिचीं शतकें होत. हिचा जन्म इ. स. १८८१ त झाला. ही राजा गोडे नारायण गजपति यांची आत होय. हिची उत्पालमाला-वृत्तांतील एक कविता देतों.

श्रीरमणीकलत्र । सरसिरुहनेत्र । जगत्पवित्र । सत्सारस-वृंदमित्र सुरसन्नुतिपात्र । नरेंद्रपुत्र । शृंगारसमग्रगात्र । जन-कर्मविदारण कृचरित्र । श्रीनारदमौनिगीतचरणा । रघुनायक। दीनपोषक । [ के. व्ही. लक्ष्मणराव, वि. ह्या पु. ३२ ]

तेलगू गाण्याचा नमुना.—तेलगू पदें ऐकण्याला फार गोड असतात. पण त्यांचा अर्थ ती भाषा न कळणारांना समजणारा नसल्यानें अर्थासहित कांहीं पद्यें दिलीं आहेत. वीर-मेडपि नगरींत ब्रह्मनायनाचा पुत्र बालचंद्र हा बापाला मदत करण्यास लढाईवर जाण्याची परवानगी असावी म्हणून अयितम्मा नामें आपल्या आईची विनवणी करूं लागला. परंतु तत्क्षणींच पुत्रवियोगाचें चित्र डोळ्यासमोर उभें राहि-ल्यानें त्या माउलीच्या हृदयांत कालवाकालव सुरू होऊन व तज्जन्य दुःख तिला सहन न होऊन तिनें रडून रडून आकांत केला. तेव्हां बालचंद्रानें आपल्या पूज्य मातेचें खालील शब्दांनीं शांतवन केलें.:—

" निर्वेरंगेनि धर्ममेनेंरुगुदुने । प्रकृतभामल पगिदि-
वल्केदवु । वेरितनंवेल वीरुनिपतिकि । गायमनित्यंबु
कलिमहुल्लविक । जलबुद्बुदविधंबु क्षणभंगुरमुल । षट्-
चक्रवर्तुलु सकल भूपतुल्लु । चरिनिनब्रह्मेन्द्रादि सर्व देवतल्लु ।
भूतंबुलैदुनु योल्लियुबुनुंड्डु । शौर्यसत्कीर्तुलु समयवेनाटिकि ।
सकलपुराणमुल् सध्दर्मकथल्लु । नीतिशास्त्रंबुल नविरुंगदुवु ।

पौरुषाधिकतचे ब्रतुकुटलेस्स । जननमरणमुलु मनुलकुनिक्का मालयंबुननुन्न नडविलोनुन्न । दप्पक तार्कोनु तथ्यंबुगानु ( दध्यंबुगानु ) पुण्यलोकंबुनु पोन्दु मार्गमुल । तिनिपिंतुने सालि विशदंबुगानु । सज्जनसंगति संसार मेडल । गुरुवु-बोधिंचिन गुरिमीदमनसु । निलिपिनरणमोंदु निश्चयुडोकडु। प्राज्य साम्राज्य संरक्षण मंदु । घनरणम्मुन रोम्मुगायानोंद। मनसुचलिंपक मरणंबुनोन्दु । शौर्यपराक्रमसंपन्नडोकडु । वीरलिद्दरु लेस्स विनुर्वीधिकेगि । यादित्य मंडलं बरुदार-जिंचि । पोयि पुण्यंबुल भूमिर्जेदुदुरु । मोदटि कार्यमु वूनू मुख्यतलेदु । शौर्यंबुचे माकु संपाद्य मगुनु "

अर्थ—तुला कळत नाहीं. तो धर्मच मला कळतो ग आई! अडाणी वायांसारखें उगीच काय बोलतेस. वीरपतीला वेड कोठलें? काया अनित्य आहे. जीवित, श्रीमंती, पैसा अडका हा सर्व मिथ्याभास आहे, हे सर्व पाण्याच्या बुड-बुड्याप्रमाणें क्षणभंगुर आहेत. सारे षट्चक्रवर्ती राजे गेले; ब्रह्मा,इंद्र आदिकरून सकल देवता, तशींच हीं पंचमहाभूतें लयाला जाणारीं आहेत. शौर्य गाजवून सत्कीर्ति मिळवून मरण आलें तर त्याला शाश्वति आहे. सर्व पुराणें, सध्दर्मकथा, नीतिशास्त्रें तूं जाणतेस. पौरुषाधिक्यानें जगणें बरें. मनुष्याला जन्ममरण हीं चुकावयाचीं नाहींत, मग तो एखाद्या राना-वनांत असो, का एखाद्या लहानशा सांदीकोपऱ्यांत असो. ह्यांतलें सार तूं जाण म्हणजे झालें. आई, मला तूं पुण्यलोक-प्राप्तीचे मार्ग विशद करून सांग. या संसारांत सज्जनसंगति लागून गुरूपदेशाप्रमाणें गुरूला मन अर्पण करून मरण प्राप्त करून घेणारा खात्रीनें एखादाच सांपडतो. असा प्राणी फार विरळा. तसेच अनेक साम्राज्यांच्या संर-क्षणाच्या कामीं मोठमोठाल्या रणसंग्रामांत मनाची चल-बिचल न होऊं देतां छातीठोकपणें शत्रूला तोंड देऊन शौर्य पराक्रम गाजवून मरण संपादन करणारा पुरुषहि एखादा दुसराच. हे दोन्ही प्रकारचे लोक गगनमार्गे आक्रमून आदित्यमंडळ वरोबर जिंकून पुण्यभूमीवर वस्ती करतात. तूर्त आपल्या दृष्टीनें पाहिलें असतां पहिल्या प्रकाराला प्राधान्य देतां येत नाहीं. आपल्याला शौर्यसंपादनाकडेच पाहिलें पाहिजे. अशा प्रकारें शांतवन केलें.

एक वीरपत्नी आपल्या पतीला रणांगणावर जाण्यास निरोप देत आहेः—

"रतिराज सौन्दर्य रणरंगधीर । कमलबांधवतेज करुणा-ल-वाल । विनतात्मजुनिलावु वेसनीकु गलगु । सामीरि यममैन साहसम्मब्बु । गृष्णुनि केनयैन कीर्ति घटिल्लु । रविकांतियुतुडवै रंजिल्लचुंडि । यलराजु पगदीर्पु मनुजुल तोड । पटुतर विक्रम प्रौढिम मेरय । श्रीगिरिलिंगुडु जेन्न-केशवुडु । वरमुलोसंगग वर्धिल गलरु । शात्रव विजयंबु समकूरु मीकु । नीयायुघमु वाडि निच्चुसुजयमु । कलि-युगंबुन मीकु घनपूजल मरु । "

अर्थ—" हे रतिराजसुन्दरा, रणरंगधीरा, कमलबांधव तेजा, करुणालया, गरुडाचें अतिचापल्य तुला लाभो; हनु-मन्तासारखें अचाट पराक्रम तुजकडून घडोत; कृष्णाप्रमाणें तुझी कीर्ति होवो. रविकांतियुत होऊन सर्वांनां आनंद देऊन अलराजाच्या कलहाचा शेवट लाव. मनुजांबरोबर पटुतर पराक्रम करून आपली मर्दुमकी गाजव. श्रीगिरिलिंगाचा व केशवाचा तुमच्यावर वरदहस्त असला म्हणजे तुमची फत्ते होईल, शत्रूवर तुम्हाला जय मिळेल, तुमच्या आयु-धांनीं लवकर यशप्राप्ति होईल; मग कलियुगांत तुम्हाला सर्व भजूं लागतील. "

दुसऱ्या तेलगू संमेलनाच्या आरंभीं म्हटलेल्या पद्यांत पुढील तेलगू राष्ट्रगीतें होतींः—

अन्निदेशमुलंदु नान्ध्रनिर्मितमुलौ,
वस्तुजाम्मुलु वरलुचुण्ड.
अन्निदेशमुलंदु नान्ध्रुलशौर्याग्नि,
विमल तें जंबुतो वेलुगुचुण्ड,
अन्निदेशमुलंदु नाध्रभाषायोष,
यद्भुतंबुगनाट्या माडुचुण्ड.
अन्निदेशमुलंदु नान्ध्रुलसुगुणालि,
परमप्रशंसनु बडयुचुण्ड ॥

अर्थः—सर्व देशांत आंध्रनिर्मित वस्तुजातांचा ( आन्ध्रांनीं तयार केलेल्या वस्तूंचा ) प्रसार होवो. सर्व देशांत आन्ध्र-शौर्याग्नि विमल तेजानें प्रकाशमान होवो; सर्व देशांत आन्ध्र-भाषा ( रूपी ) योषिता ( स्त्री ) अद्भुत नृत्य करो; सर्व देशांत आन्ध्रांच्या श्रेष्ठ गुणांची परम प्रशंसा होवो.

गांचु सौभाग्यमेन्नडु गल्गुनोक्को,
यंचुदमितो निरीक्षिंचे नाध्रमात ।
नक्षिकोरिक नेरवेर्चि धन्युलगुडु,
अमलगुणसान्ध्रुलार ! यो यांध्रुलार ॥

अर्थः—अहो, अमलगुणसंपन्न आन्ध्रजनहो! आपल्या-कडे उत्सुकतेनें पहात असलेल्या आन्ध्रमातेच्या इच्छा पूर्ण करून आपण धन्य झालों हें बघण्याचा सुदिन आपणांस केव्हां येईल.

रत्नम्मुलनुराज रत्नम्मुलनुगन्न, यांध्रमातकुजय-मगुनु-गात । संघसंस्कर्तल सद्गुरुलनुगन्न, यांध्रमातकुजय-मगु-नुगात । विद्यानुरक्तुल विविधभक्तुलगन्न, यांध्रमाताकुजय-मङ्गुनुगात । मानवन्तुलनु विज्ञानवन्तुलगन्न, यांध्रमाता-कुजय-मगुनुगात ॥

अर्थः—जी रत्नगर्भा आंध्रमाता राजरत्नें प्रसवली, त्या आंध्रमातेचा जयजयकार असो;ज्या आंध्रमातेच्या उदरीं संघ-संस्कर्ते व सद्गुरु निर्माण झाले, त्या आन्ध्रमातेचा जयजय-कार असो; ज्या आंध्रमातेच्या उदरीं नाना प्रकारचे भक्त व विद्यानुरक्त विभूती जन्मास आल्या, त्या आन्ध्रमातेचा जय-जयकार असो; ज्या आन्ध्रमातेनें अनेक मानी पुरुषांनां व ज्ञानवंतांनां जन्म दिला; तिचा जयजयकार असो.

तेलगूंच्या वाङ्मयासंबंधानें विचार करतां आपल्यापुढें अनेक प्रकारची दृष्टि उत्पन्न होते. संस्कृत भाषेंत जी महत्त्वाची ग्रंथरचना झाली तींत आंध्रांनीं काय भर घातली ही तेलगूंच्या ग्रंथरचनाशक्तीची मोजदाद करण्याची एक बाजू झाली व त्यांनीं स्वकीय भाषेंत ग्रंथरचना काय केली हें पाहणें ही दुसरी बाजू झाली. या दोन्ही बाजूंनीं माहिती दिली म्हणजे तेलगू राष्ट्रानें वाक्कौशल्य कशाच अंशीं दिल्यासारखें होईल. श्रौतसंस्थांमध्यें शाखाभेद उत्पन्न होत होता त्या कालापासून आंध्रांची कामगिरी देतां येते हें आंध्र राज्यांतील आपस्तंबाच्या उदाहरणावरून देतां येईल.द्राविडांत अनेक आचार्य होऊन गेले. दक्षिणेंत नवीन अनेक विचारपद्धती उत्पन्न झाल्या आणि त्यांचा प्रसार उत्तरेकडे झाला. प्रसंगीं असले जे मोठे कार्यकर्ते पुरुष होऊन गेले त्यांनीं देशीभाषेंत जरी संवाद आणि व्याख्यानें दिलीं असलीं तरी ग्रंथरचना संस्कृतमध्यें केली. अनेक द्राविड आणि आंध्र पंडित जन्मानें जरी दक्षिणेकडले असले तरी त्यांचें कार्यक्षेत्र उत्तरेकडेच झालें. वल्लभाचार्यांचें उदाहरण अशांतलेंच आहे. तेलगु वाङ्मयाचे जे इतिहास आज प्रसिद्ध आहेत त्यांत तेलगूंतील धार्मिक, बौद्धिक व सामाजिक चळवळींचा व संस्कृत व देशी वाङ्मयांशीं अन्योन्याश्रय दिला नाहीं व जे इतिहासकार झाले आहेत त्यांस एकंदर भारतीय वाङ्मयाशीं क्वचितच परिचय असतो, आणि त्यामुळें त्यांस आपल्या वाङ्मयांतील नाविन्यहि चांगल्या तऱ्हेनें मांडतां येत नाहीं. दक्षिणेकडे आर्य संस्कृतिसंवर्धन जें संस्कृत ग्रंथांमार्फत झालें त्याचें विवेचन हा प्रकृत विषय नसल्यामुळें केवळ तेलगु भाषेंतीलच वाङ्मयाकडे वळतों.

तेलगू वाङ्मयाची भारतीय वाङ्मयदृष्टीनें योग्यता:–तेलगू ग्रंथांत केवळ रामायण महाभारतादि पौराणिक ग्रंथापेक्षां नावीन्य काय आहे याचा शोध भारतीय वाङ्मय या दृष्टीनें परीक्षण करतांना प्रथम झाला पाहिजे. या दृष्टीनें पहातां या वाङ्मयांत चार क्रिया झालेल्या दृष्टीस पडतात त्या येणेंप्रमाणें (१) पौराणिक कथासूत्रसंबद्ध, पण स्वतंत्र काव्यरचना; (२) स्थानिक इतिहासपर ग्रंथरचना; (३) नवलकथा किंवा ऐतिहासिक कादंबरी या दृष्टीनें ग्रंथरचना; (४) केवळ सामाजिक काव्यरचना. या दृष्टींनीं पाहिल्यास तेलगू लोकांच्या कवींचें विषयस्वातंत्र्य नजरेस येतें. अलसानी पेद्दनाचें स्वारोचिष मनुचरित्र जरी पुराणमूलक आहे तरी पुराणांतलि तो अप्रसिद्ध विषय घेऊन त्यावर चरित्रग्रंथ गुंफला आहे. स्थानिक देवतांवरील माहात्म्यग्रंथ सामान्यतः बरेच रद्दके असतात. पण धूर्जटीचें "कलहस्तिमाहात्म्य" याची गणना काव्यग्रंथांत होते. "वसुचरित्र" हा देखील पुराणसंबद्ध पण कविस्वातंत्र्य दाखविणारा ग्रंथ होय. जितकी पुराणांतील कथा अपरिचित व दुर्ग्यम प्रकारची तितकें कविस्वातंत्र्य जास्त ही गोष्ट तेलगू कवींनीं चांगली ओळखलेली दिसते. "प्रभावती प्रद्युमन" या पिंगळी सुरनाच्या नाटकरूपी काव्याची गोष्ट अशीच आहे. यांत इंद्र व मातलि यांचा संवाद दिला आहे. तेनाली रामकृष्ण या विनोदी व्यक्तीस महाराष्ट्रांत प्रतिस्पर्धीच कोठें आहे? सर्व परिचित विषय आंध्रकवींनीं सोडले असे नाहीं, पण त्यांतहि कांहीं वैयक्तिक कवित्व करण्यास साधन म्हणून वापरले आहेत. उदाहरणार्थ कृष्णराधासंबंध घ्या. मुद्दपळिनि या वेश्येच्या "राधिका सांत्वन" या काव्यांत सभ्य स्त्रीपुरुषांस वाचण्यास अयोग्य असे प्रसंग व वर्णनें अनेक आहेत, असा आक्षेप तिच्यावर जे करतात तेच तिच्या भाषेच्या मोहकतेसंबंधानें व भाषाप्रभुत्वासंबंधानें पुरावा देतात. भाषेचे खेळ करणारी, मोहक काव्य करणारी आणि त्यांत अतिप्रसंग करणारी वेश्या कवियित्री कोणत्याहि भाषेस लाज आणणार नाहीं. पुराणांतील व्यक्ती घेऊन त्यांच्या चरित्रास काल्पनिक कथांच्या पुरवण्या जोडल्याचीं उदाहरणें तेलगू वाङ्मयांत अनेक आहेत. उदाहरणार्थ चेन्नमाचें चारुचंद्रोदय हें काव्य घ्या. यांत कृष्णास रुक्मिणीपासून चारुचंद्र नांवाचा मुलगा झाल्याचें कल्पिलें आहे आणि त्याचें पद्मकार राजाची मुलगी कुमुद्वती हिजबरोबर लग्न लावलें आहे. व्यंकट नरसय्या यानें देवमालाचरित्र म्हणून जो प्रबंध लिहिला आहे त्यांतहि त्यानें तोच प्रकार केला आहे. "वज्रदंत" राक्षसाच्या नाशासाठीं देवमालाला ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें आणि देवमालानें राक्षसाचा नाश केल्यावर देवांनीं त्यास एक शहर व स्त्री दिली असा कथाभाग त्यांत आणिला आहे. मयासुराची कन्या शांता कल्पून तिचा सूर्याबरोबर विवाह लावणारें भानुकल्याण काव्य याच कोटींत घालतां येईल. "ऐरावत चरित्रांत गांधारीनें इंद्राच्या ऐरावतास नैवेद्य दाखवितांना कुंतीस बोलाविलें नाहीं त्यामुळें कुंतीचा अपमान झाला. तेव्हां कुंतीनें मुलांजवळ तक्रार केली. अर्जुनानें इंद्रास ऐरावत पाठविण्यास भाग पाडलें, व त्यावेळीं गांधारीस बोलावून तिला लाजविलें अशी कथा यांत आहे. यांत न बोलाविण्याबद्दल व्यक्तीचा अपमान कसा होतो, त्यानें उद्दिष्ट व्यक्तीनें कसें काढावें हा प्रकृत विषय असून त्याची मांडणी करण्यासाठीं पौराणिक नांवांची जोड दिली आहे. भद्रराजचरित्रांत व्यंकटाचार्य कवीनें राजाच्या अद्भुत पराक्रमाच्या गोष्टी पुराणांतून न घेतां स्वयंकल्पनेनें रचल्या आहेत. चंद्रभानुचरित्र हें कृष्णाचा सत्यभामेपासून झालेला मुलगा चंद्रभानु याच्या चंद्ररेखेवरील प्रीतीविषयीं काव्य आहे. रसानकविजयांत बृहस्पतीची पत्नी तारा हिचा चंद्रानें उपभोग घेतला त्यामुळें जी लढाई झाली तिचें वर्णन आहे.

याप्रकारचीं अनेक उदाहरणें देतां येतील. या तऱ्हेच्या अनेक गोष्टींचें अवलोकन करतां असें दिसतें कीं या पौराणिक कथांमध्यें कथित कथेचें देशी भाषेंत निरूपण हा हेतु प्रधान नसून वाटेल त्या विषयावर कविता करावी, वाटेल तें कथानक तयार करावें आणि तें कसेंतरी आणि

पौरुषाधिक्यतचे म्रतुकुटलेस्त । जननमरणमुलु जनुलकुनिक्का मालयंबुननुन्न नडविलोतुन्न । दप्पक तार्कोनु तध्यंबुगानु ( दध्यंबुगानु ) पुण्यलोकंबुनु पोन्दु मार्गमुल । तिनिपिंतुने तल्लि विशदंबुगानु । सज्जनसंगति संसार मेडल । गुरुवु-बोधिंचिन गुरिमीदमनसु । निलिपिनरणमोंदु निश्चयुडोकड्डा प्राज्य साम्राज्य संरक्षण मंदु । घनरणम्मुन रोम्मुगायानोंद। मनसुचलिंपक मरणंबुनोन्दु । शौर्यपराक्रमसंपन्नडोकडु । वीरलिद्दरु लेस्स विनुर्वाधिकेगि । यादित्य मंडलं बरुदार-जिंचि । पोयि पुण्यंबुल भूमिर्जेदुदुरु । मोदटि कार्यमु वूनू मुख्यतलेदु । शौर्यबुचे माकु संपाद्य मगुनु ''

अर्थ—तुला कळत नाहीं. तो धर्मच मला कळतो ग आई ! अडाणी वाऱ्यासारखे उगीच काय बोलतेस. वीरपतीला वेड कोठलें ? काया अनित्य आहे. जीवित, श्रीमंती, पैसा अडका हा सर्व मिथ्याभास आहे, हे सर्व पाण्याच्या बुड-बुडयाप्रमाणें क्षणभंगुर आहेत. सारे षट्चक्रवर्ती राजे गेले; ब्रह्मा,इंद्र आदिकरून सकल देवता, तसेंच हीं पंचमहाभूतें लयाला जाणारीं आहेत. शौर्य गाजवून सत्कीर्ति मिळवून मरण आलें तर त्याला शाश्वति आहे. सर्व पुराणें, सद्धर्मकथा, नीतिशास्त्रें तूं जाणतेस. पौरुषाधिक्यानें जगणें बरें. मनुष्याला जन्ममरण हीं चुकावयाचीं नाहींत, मग तो एखाद्या राना-वनांत असो, का एखाद्या लहानशा सांदीकोपऱ्यांत असो. ह्यांतलें सार तूं जाण म्हणजे झालें. आई, मला तूं पुण्यलोक-प्राप्तीचे मार्ग विशद करून सांग. या संसारांत सज्जनसंगति लागून गुरूपदेशाप्रमाणें गुरूला मन अर्पण करून मरण प्राप्त करून घेणारा खात्रीनें एखादाच सांपडतो. असा प्राणी फार विरळा. तसेंच अनेक साम्राज्यांच्या संर-क्षणाच्या कामीं मोठमोठाल्या रणसंग्रामांत मनाची चल-बिचल न होऊं देतां छातीठोकपणें शत्रूला तोंड देऊन शौर्य पराक्रम गाजवून मरण संपादन करणारा पुरुषहि एखादा दुसराच. हे दोन्ही प्रकारचे लोक गगनमार्ग आक्रमून आदित्यमंडळ बरोबर जिंकून पुण्यभूमीवर वस्ती करतात. तूर्त आपल्या दृष्टीनें पाहिलें असतां पहिल्या प्रकाराला प्राधान्य देतां येत नाहीं. आपल्याला शौर्यसंपादनाकडेच पाहिलें पाहिजे. अशा प्रकारें शांतवन केलें.

एक वीरपत्नी आपल्या पतीला रणांगणावर जाण्यास निरोप देत आहे:—

''रतिराज सौन्दर्य रणरंगधीर । कमलबांधवतेज करुणा-ल-वाल । विनतात्मजुनिलाघु वेसनीकु गलगु । सामीरि ग्राममैन साहसम्मब्बु । गृष्णुनि केनयैन कीर्ति घटिल्लु । रविकांतियुतुडवै रंजिल्लचुंडि । यलराजु पगदीर्पु मनुजुल तोड । पटुतर विक्रम प्रौढिम मेरय । श्रीगिरिलिंगुंबु जेन्न-केशवुडु । वरमुलोसंगग वर्धिल्ल गलरु । शात्रव विजयंबु समकूरु मीकु । नीयायुघमु वंदि निच्चुसुजयमु । कलि-युगंबुन मीकु घनपूजल मरु । ''

अर्थ—'' हे रतिराजसुन्दरा, रणरंगधीरा, कमलबांधव तेजा, करुणालया, गरुडाचें अतिचापल्य तुला लाभो; हनु-मन्तासारखें अचाट पराक्रम तुजकडून घडोत; कृष्णाप्रमाणें तुझी कीर्ति होवो. रविकांतियुत होऊन सर्वांना आनंद देऊन अलराजाच्या कलहाचा शेवट लाव. मनुजांबरोबर पटुतर पराक्रम करून आपली मर्दुमकी गाजीव. श्रीगिरिलिंगाचा व केशवाचा तुमच्यावर वरदहस्त असला म्हणजे तुमची फत्ते होईल, शत्रूवर तुम्हाला जय मिळेल, तुमच्या आयु-धांनां लवकर यशप्राप्ति होईल; मग कलियुगांत तुम्हाला सर्व भजूं लागतील. ''

दुसऱ्या तेलगू संमेलनाच्या आरंभीं म्हटलेल्या पद्यांत पुढील तेलगू राष्ट्रगीतें होतीः—

अखिलदेशमुलंदु नान्ध्रनिर्मितमुलौ,
वस्तुजाम्मुलु वरलुचुण्ड.
अखिलदेशमुलंदु नान्ध्रुलशौर्याग्नि,
विमल तें जंबुतो वेलुगुचुण्ड,
अखिलदेशमुलंदु नाध्रभाषायोष,
यद्भुतंबुगनाट्या माडुचुण्ड.
अखिलदेशमुलंदु नान्ध्रुलसुगुणालि,
परमप्रशंसनु बडयुचुण्ड ॥

अर्थः—सर्व देशांत आंध्रनिर्मित वस्तुजातांचा ( आन्ध्रांनीं तयार केलेल्या वस्तूंचा ) प्रसार होवो. सर्व देशांत आन्ध्र-शौर्याग्नि विमल तेजानें प्रकाशमान होवो; सर्व देशांत आन्ध्र-भाषा ( रूपी ) योषिता ( स्त्री ) अद्भुत नृत्य करो; सर्व देशांत आन्ध्रांच्या श्रेष्ठ गुणांची परम प्रशंसा होवो.

गांचु सौभाग्यमेब्बडु गल्गुनोक्को,
यंचुदमितो निरीक्षिंचे नाध्रमात ।
नल्लिकोरिक नेरवेर्चि धन्युलगुड,
अमलगुणसान्द्रुलार ! यो यांध्रुलार ॥

अर्थः—अहो, अमलगुणसंपन्न आन्ध्रजनहो ! आपल्या-कडे उत्सुकतेनें पहात असलेल्या आन्ध्रमातेच्या इच्छा पूर्ण करून आपण धन्य झालों हें बघण्याचा सुदिन आपणांस केव्हां येईल.

रत्नम्मुलनुराज रत्नम्मुलनुगन्न, यांध्रमातकुजय-मगुनु-गात । संघसंस्कर्तल सद्भक्तलनुगन्न, यांध्रमातकुजय-मगु-नुगात । विद्यानुरक्तुल विविधभक्तुलगन्न, यांध्रमाताकुजय-मद्गुनुगात । मानवन्तुलनु विज्ञानवन्तुलगन्न, यांध्रमाता-कुजय-मगुनुगात ॥

अर्थः—जी रत्नगर्भा आंध्रमाता राजरत्नें प्रसवली, त्या आंध्रमातेचा जयजयकार असो,ज्या आंध्रमातेच्या उदरीं संघ-संस्कर्ते व सद्भक्त निर्माण झाले, त्या आन्ध्रमातेचा जयजय-कार असो; ज्या आंध्रमातेच्या उदरीं नाना प्रकारचे भक्त व विद्यानुरक्त विभूती जन्मास आल्या, त्या आन्ध्रमातेचा जय-जयकार असो; ज्या आन्ध्रमातेनें अनेक मानी पुरुषांनां व ज्ञानवंतांनां जन्म दिला; तिचा जयजयकार असो.

तेलगूंच्या वाङ्मयासंबंधानें विचार करतां आपल्यापुढें अनेक प्रकारची दृष्टि उत्पन्न होते. संस्कृत भाषेंत जी महत्त्वाची ग्रंथरचना झाली तींत आंध्रांनीं काय भर घातली ही तेलगूंच्या ग्रंथरचनाशक्तीची मोजदाद करण्याची एक बाजू झाली व त्यांनीं स्वकीय भाषेंत ग्रंथरचना काय केली हें पाहणें ही दुसरी बाजू झाली. या दोन्ही बाजूंनीं माहिती दिली म्हणजे तेलगू राष्ट्राचें वाक्कौशल्य यथार्थ अंशीं दिल्यासारखें होईल. श्रौतसत्रांमध्यें शाखाभेद उत्पन्न होत होता त्या कालापासून आंध्रांची कामगिरी देतां येते हें आंध्र राज्यांतील आपस्तंबाच्या उदाहरणावरून देतां येईल. द्राविडांत अनेक आचार्य होऊन गेले. दक्षिणेंत नवीन अनेक विचारपद्धती उत्पन्न झाल्या आणि त्यांचा प्रसार उत्तरेकडे झाला. प्रसंगीं असले जे मोठे कार्यकर्ते पुरुष होऊन गेले त्यांनीं देशीभाषेंत जरी संवाद आणि व्याख्यानें दिलीं असलीं तरी ग्रंथरचना संस्कृतमध्यें केली. अनेक द्राविड आणि आंध्र पंडित जन्मानें जरी दक्षिणेकडले असले तरी त्यांचें कार्यक्षेत्र उत्तरेकडेच झालें. वल्लभाचार्यांचें उदाहरण अशातलेंच आहे. तेलगु वाङ्मयाचे जे इतिहास आज प्रसिद्ध आहेत त्यांत तेलगूंतील धार्मिक, बौद्धिक व सामाजिक चळवळींचा व संस्कृत व देशी वाङ्मयांशीं अन्योन्याश्रय दिला नाहीं व जे इतिहासकार झाले आहेत त्यांस एकंदर भारतीय वाङ्मयाशीं क्वचितच परिचय असतो, आणि त्यामुळें त्यांस आपल्या वाङ्मयांतील नाविन्यहि चांगल्या तऱ्हेनें मांडतां येत नाहीं. दक्षिणेकडे आर्य संस्कृतिसंवर्धन जें संस्कृत ग्रंथांमार्फत झालें त्याचें विवेचन हा प्रकृत विषय नसल्यामुळें केवळ तेलगु भाषेंतीलच वाङ्मयाकडे वळतों.

तेलगू वाङ्मयाची भारतीय वाङ्मयदृष्टीनें योग्यता:—तेलगू ग्रंथांत केवळ रामायण महाभारतादि पौराणिक ग्रंथापेक्षां नावीन्य काय आहे याचा शोध भारतीय वाङ्मय या दृष्टीनें परीक्षण करतांना प्रथम झाला पाहिजे. या दृष्टीनें पहातां या वाङ्मयांत चार किंवा झालेल्या दृष्टीस पडतात त्या येणेंप्रमाणें (१) पौराणिक कथासूत्रसंबद्ध, पण स्वतंत्र काव्यरचना; (२) स्थानिक इतिहासपर ग्रंथरचना; (३) नवलकथा किंवा ऐतिहासिक कादंबरी या दृष्टीनें ग्रंथरचना; (४) केवळ सामाजिक काव्यरचना. या दृष्टींनीं पाहिल्यास तेलगू लोकांच्या कवींचें विषयस्वातंत्र्य नजरेस येतें. अलसानी पेद्दन्नाचें स्वारोचिषमनुचरित्र जरी पुराणमूलक आहे तरी पुराणांतलि तो अप्रसिद्ध विषय घेऊन त्यावर चरित्रग्रंथ गुंफला आहे. स्थानिक देवतांवरील माहात्म्यग्रंथ सामान्यतः बरेच रडके असतात. पण धूर्जटीचें "कलहस्तिमाहात्म्य" याची गणना काव्यग्रंथांत होते. "वसुचरित्र" हा देखील पुराणसंबद्ध पण कविस्वातंत्र्य दाखविणारा ग्रंथ होय. जितकी पुराणांतील कथा अपरिचित व दुष्प्राप्य प्रकारची तितकें कविस्वातंत्र्य जास्त ही गोष्ट तेलगू कवींनीं चांगली ओळखलेली दिसते. "प्रभावती प्रद्युम्न" या पिंगळी सूरनाच्या नाटकरूपी काव्याची गोष्ट अशीच आहे. यांत इंद्र व मातलि यांचा संवाद दिला आहे. तेन्नाली रामकृष्ण या विनोदी व्यक्तीस महाराष्ट्रांत प्रतिस्पर्धीच कोठें आहे? सर्व परिचित विषय आंध्रकवींनीं सोडले असे नाहीं, पण त्यांतहि कांहीं वैयक्तिक कवित्व करण्यास साधन म्हणून वापरले आहेत. उदाहरणार्थ कृष्णराधासंबंध घ्या. मुद्दुपळिनि या वेश्येच्या "राधिका सांत्वन" या काव्यांत सभ्य स्त्रीपुरुषांस वाचण्यास अयोग्य असे प्रसंग व वर्णनें अनेक आहेत, असा आक्षेप तिच्यावर जे करतात तेच तिच्या भाषेच्या मोहकतेसंबंधानें व भाषाप्रभुत्वासंबंधानें पुरावा देतात. भाषेचे खेळ करणारी, मोहक काव्य करणारी आणि त्यांत अतिप्रसंग करणारी वेश्या कवियित्री कोणत्याहि भाषेस लाज आणणार नाहीं. पुराणांतील व्यक्ती घेऊन त्यांच्या चरित्रास काल्पनिक कथांच्या पुरवण्या जोडल्याचीं उदाहरणें तेलगू वाङ्मयांत अनेक आहेत. उदाहरणार्थ चेन्नमाचें चारुचंद्रोदय हें काव्य घ्या. यांत कृष्णास रुक्मिणीपासून चारुचंद्र नांवाचा मुलगा झाल्याचें कल्पिलें आहे आणि त्याचें पद्मकार राजाची मुलगी कुमुद्वती हिजबरोबर लग्न लावलें आहे. व्यंकट नरसय्या यानें देवमालाचरित्र म्हणून जो प्रबंध लिहिला आहे त्यांतहि त्यानें तोच प्रकार केला आहे. "वज्रदंत" राक्षसाच्या नाशासाठीं देवमालाला ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें आणि देवमालानें राक्षसाचा नाश केल्यावर देवांनीं त्यास एक शहर व स्त्री दिली असा कथाभाग त्यांत आणिला आहे. मयासुराची कन्या शांता कल्पून तिचा सूर्याबरोबर विवाह लावणारें भानुकल्याण काव्य याच कोटींत घालतां येईल. "ऐरावत चरित्रांत गांधारीनें इंद्राच्या ऐरावतास नैवेद्य दाखवितांना कुंतीस बोलाविलें नाहीं त्यामुळें कुंतीचा अपमान झाला. तेव्हां कुंतीनें मुलांजवळ तक्रार केली. अर्जुनानें इंद्रास ऐरावत पाठविण्यास भाग पाडलें, व त्यावेळीं गांधारीस बोलावून तिला लाजविलें अशी कथा यांत आहे. यांत न बोलाविण्याबद्दल व्यक्तीचा अपमान कसा होतो, त्याचें उट्टें व्यक्तीनें कसें काढावें हा प्रकृत विषय असून त्याची मांडणी करण्यासाठीं पौराणिक नांवांची जोड दिली आहे. मद्रराजचरित्रांत व्यंकटाचार्य कवीनें राजाच्या अद्भुत पराक्रमाच्या गोष्टी पुराणांतून न घेतां स्वयंकल्पनेनें रचल्या आहेत. चंद्रभानुचरित्र हें कृष्णाचा सत्यभामेपासून झालेला मुलगा चंद्रभानु याच्या चंद्ररेखेवरील प्रीतीविषयीं काव्य आहे. रसानकविजयांत बृहस्पतीची पत्नी तारा हिचा चंद्रानें उपभोग घेतला त्यामुळें जी लढाई झाली तिचें वर्णन आहे.

याप्रकारचीं अनेक उदाहरणें देतां येतील. या तऱ्हेच्या अनेक गोष्टींचें अवलोकन करतां असें दिसतें कीं या पौराणिक कथांमध्यें कथित कथेचें देशी भाषेंत निरूपण हा हेतु प्रधान नसून वाटेल त्या विषयावर कविता करावी, वाटेल तें कथानक तयार करावें आणि तें कसेंतरी आणि

कोणत्यातरी पौराणिक व्यक्तीस चिकटवून घावें असा त्या कवींचा हेतु दिसतो; आणि याचें कारणहि निराळें असावें. संस्कृत ग्रंथाचें ज्ञान म्हणजे पांडित्य, स्वतंत्र कविताकरणारांनीं संस्कृत भाषेशीं परिचय दाखविला पाहिजे एवढेंच नव्हे तर संस्कृत ग्रंथांमुळें जे विषय सोंवळे झाले आहेत त्यांवरच कविता झाली पाहिजे अशा पंडितवर्गाच्या आग्रहांत कविसंघ सांपडला असावा आणि अशा परिस्थितींत त्यांनीं आपला वैयक्तिक काव्यगुण पूर्ण बद्ध होऊं न देतां पांडित्यानें उत्पन्न केलेल्या मनोवृत्तींशीं तड जोड केली असावी अशा तऱ्हेचा यौक्तिक इतिहास या सर्व प्रयत्नांत दडलेला दिसतो. पुराणांचें विस्तरण करावें, त्यास वाटेल तीं कथासूत्रें जोडून आपला काव्यगुण दाखवावा आणि नंतर केवळ काल्पनिक ग्रंथरचना करावी, व तशीच कविताशक्ति अर्वाचीन वीरांच्या किंवा आश्रयदात्यांच्या स्तुतीस किंवा चरित्रवर्णनास लावावी असा क्रम तेलगू कवींनीं आचरला होता.

पुराणांतील अत्यंत अप्रसिद्ध व्यक्ती किंवा त्यांच्या संबंधी व्यक्ती घेऊन आपल्या कविनेस आणि कल्पनाशक्तीस निरंकुश ठेवून काव्य करण्याची पद्धति व निव्वळ रोमान्ससारखी रचना करण्याची पद्धति या दोहोंमध्यें एका प्रकारापासून दुसऱ्या प्रकारापर्यंत नेणारे कथाग्रंथ इतके विविध व इतक्या थोड्याथोड्या फरकानें दूर जाणारे आहेत कीं या दोहोंमधील भिन्नत्व दाखविणारी रेषा अस्पष्ट होते.

आतां स्थानिक इतिहासपर ग्रंथरचनेकडे वळूं. चरित्रग्रंथ काव्यस्वरूपांत लिहिले गेल्यामुळें ऐतिहासिकत्व बरेंच कमी होण्यास अवकाश असतो आणि त्यामुळें त्या पुस्तकास ऐतिहासिक ग्रंथ म्हणण्यापेक्षां ऐतिहासिक कादंबरीचें स्वरूप येतें; तसेंच ज्या देशांत इतिहासलेखन पद्धतशीर नाहीं त्या देशांतील चरित्रस्वरूपी काव्यें खरोखर ऐतिहासिक पुरुषासंबंधानें आहेत कीं केवळ काव्यहेतूसाठीं कोणी काल्पनिक पुरुष घेतला आहे हें देखील समजेनासें होतें. असें जरी आहे तरी तेलगूमधील चरित्रकाव्यग्रंथ ऐतिहासिक शोधकांनीं विवेचिले पाहिजेत. तेलगूंतील प्रसिद्ध चरित्रग्रंथ म्हणजे कृ ष्ण रा य च रि त्र होय. हा विजयानगरच्या स्वराज्या नरपतिरायाच्या कृष्णराया नांवाच्या दासीपुत्राच्या कारकीर्दीचा कविताबद्ध इतिहास आहे. हें काव्य असंगडी काशीपतींचा मुलगा धूर्जटी याचें होय तसेंच रा म रा ज च रि त्र हेंहि महत्त्वाचें चरित्रकाव्य होय. हें वेंकय्यानें लिहिलें म्हणून सांगितलेंच आहे. यांत मुसुलमानांशीं झालेल्या लढायांचें वर्णन आहे. जं ग म क ल ज्ञा न हाहि महत्त्वाचा लिंगायत ग्रंथ आहे. यानें विज्जल व विज्जलोत्तर राजे यांचें चरित्र वर्णिलें आहे. क ता मा रा जा हा चारित्रग्रंथ, वारंगळचा नाश झाल्यानंतर मांडलिक राजांत जी यादवी चालली होती तिचा द्योतक आहे. पा ल ना ड वी र च रि त्र यामध्यें दोन जमीनदारांची कोंबड्यांच्या झुंजीवरून झालेली लढाई वर्णिली आहे. न व चो ल च रि त्र, हा जंगमग्रंथ वीरशैव चळवळ चोलराजापर्यंत नेऊन भिडविण्याच्या उद्देशानें लिहिला आहे. अशाच तऱ्हेचा ब स वे श्व र क लं म हा ग्रंथ होय, याचाहि हेतु प्रचाराचा दिसतो. कांहीं चरित्रग्रंथ किंवा ऐतिहासिक काव्यग्रंथ "वंशावली" असें विनयशील नांव धारण करीत आहेत, त्यांपैकीं "नंदाल कृष्णम्मा वंशावळी", "वल गुट्टी वारु वंशावळी", "काशीखंड मोलू चुना रेड्डीवार वंशावळी" व करकालापुडी गोपाळ चायकाराव वंशावळी, या वंशावळ्या प्रसिद्ध आहेत. दुसरी राजकुलचरित्रें म्हणजे तं जा व र रा य च रि त्र (मदुरेच्या नायकांचें) व त्रि च ना प ल्ली रा य च रि त्र; हीं चरित्रें वंशावळींच्या पलीकडे फारशीं गेलेलीं नाहींत. मा क रा ज घो ष्मा रा ज च रि त्र हेंहि एका जमीनदारावरील काव्य होय. रं ग रा य च रि त्र, मा. बुसीच्या बोबिलीवरील हल्ल्याचें वर्णन करतें. सिंहलद्वीपावर तेलगू राज्य कांहीं दिवस होतें त्यामुळें तेथील राजेहि चारित्रविषय झाले आहेत.

या वऱ्याच चरित्रग्रंथांवरून एक विशिष्ट सामाजिक स्थिति मनांत भरते. विजयानगरचें राज्य भारतीय संस्कृतीचें महत्त्वाचें केंद्र झालें होतें आणि त्यामुळें राज्याचें संस्कृतिवर्धक कार्य कांहीं तरी महत्त्वाचें आहे, राजानें कवींस व पंडितांस उत्तेजन दिलें पाहिजे ही कल्पना त्या राज्याशीं संबंद्ध असलेल्या मोठ्या जमीनदारांत बरीच वाढली असली पाहिजे, आणि तिचा परिणाम असा झाला कीं, राज्यनाशानंतरहि दक्षिणेकडील जमीनदार, पाळेगार वगैरे मंडळी कवींस आश्रय देऊं लागली आणि आपलीं वंशचरित्रें लिहून घेण्यास उद्युक्त झाली. यावरून तेथील जमीनदारांचा वर्ग मराठा जमीनदारांपेक्षां अधिक सुशिक्षित दिसतो. रामदेवरावाचें राज्य गेल्यानंतर मराठे जमीनदार चोहोंकडे होते पण त्यांनीं आपल्या पदरीं कवी ठेवून चरित्रें लिहिण्यास उत्तेजन दिलें नाहीं.

धार्मिक चळवळींतील पुरुष हे काव्यनायक करण्यास तेलगू ग्रंथकारांनीं कमी केलें नाहीं. बसवेश्वरचरित्र, पंडिताराध्यचरित्र, यमुनाचारी (यामुनाचार्य) चरित्र, नारायण जिआराकथा, शंकरचरित्र (शंकराचार्यावर), इत्यादि चरित्रग्रंथ यांची साक्ष देतील. अमुक्तमाला हें संतचरित्र, ज्यांत अलवारांपासून यामुनाचार्यापर्यंत हकीगत आहे व याचें कर्तृत्व महाकवि अलसानी पेदन्नास देण्यांत येत आहे एवंच हाहि भाग तेलगू ग्रंथांतील विचार करण्याजोगा आहे. यांत नाविन्य काय आहे हें पाहिलें पाहिजे. धार्मिक कथा कानडीवरून किंवा दुसऱ्या भाषेंतील ग्रंथांवरून घेऊन पुन्हां त्यांत स्वतःची काल्पनिक भर घालून लिहिल्या तर त्यांत कवनस्वातंत्र्य या दृष्टीनें जरी त्यांची किंमत कमी होते, तरी भाषांतरास जितकें व्यापक पौराणिकेतर

क्षेत्र शोधलें असेल त्या मानानें त्याची किंमत ठरविण्यास हरकत नाहीं.

आतां केवळ कल्पित कथांकडे जाऊं. पौराणिक आणि ऐतिहासिक गोष्टी आणि केवळ काल्पनिक गोष्टी यांतील भिन्नत्वदर्शक रेषा सहज सांपडणार नाहीं, आणि एका प्रकारापासून दुसऱ्या प्रकारापर्यंत संक्रमण फारच स्वाभाविक तऱ्हेनें झालें आहे हें मागें सांगितलें आहेच. प्रेमाची कथा कोणत्या तरी राजामध्यें आणि राजकन्येमध्यें प्रसंग उत्पन्न करून करावी हा काल्पनिक कथानकाचा सामान्य नमुना आहे. पण प्रसंगीं व्यभिचारिणी, प्रसंगीं वेश्या यांसहि कथाविषय केलें आहे. या प्रकारचीं प्रमुख आख्यानें म्हटलीं म्हणजे भोगिनीदंडक, केयुराभाऊचरित्र, रुक्मांगदचरित्र, चंद्रिकापरिणय इत्यादि होत भोगिनी दंडक ही सर्वज्ञ सिंगम अथवा सिन्हभूप याच्या भोगिनी नामक एका स्त्रीवर असलेल्या प्रेमाची हकीगत आहे. केयुराभाऊ चरित्र हें कलिंग देशाचा राजा केयुराभाऊ याचें लग्न, म्हणजे गवसंती म्हणून लाट अथवा लाड देशाची राजकन्या हिच्याबरोबर झालें, अशा संविधानकावर माचन्न कवीनें लिहिलें आहे. मांधाताचरित्र (नृसिंहकृत),यांत सूर्यवंशी राजा मांधाता याचें कुंतल देशची राजकन्या विमलांगी हिच्याबरोबर लग्न होतें. राजनीति ( जगन्नाथकृत ).हें नांव दाखविते त्याप्रमाणें यांत वर्णन नसून कनकशेखर आणि कनकरेखा यांचा विवाह वर्णिते. रुक्मांगदचरित्र यांत रुक्मांगद राजाचा विवाह विंध्यावळी राजकन्येबरोबर झाला त्याचें वर्णन (मल्लन्नाकृत) आहे. चंद्रिकापरिणय हेंहि त्याच प्रकारचें रोमान्समध्ये मोडेल असें काव्य आहे. याचा कर्ता माधवराज हा राजकारणांतील मनुष्य असून तो जातीचा वेलमा होता. स्त्री चरित्राचे अनिष्ट मासले म्हणून किंवा वेश्यांस कविता विषय करून जीं कांहीं काव्यें लिहिण्यांत आलीं त्यांत सारंगधर चरित्र, हंसविंसति, चंद्ररेखाविलाप, रूपावतीचरित्र इत्यादि येतील. सारंगधरचरित्र, राजमहेंद्रीच्या राजमहेंद्र राजाचा मुलगा सारंगधर याची सावत्र माता चित्रांगी ही त्यावर आसक्त होते, व तो तिची निर्भर्त्सना करतो त्यामुळें ती राजाकडून त्याला शासन करविते वगैरे हकीकत चामकुरी व्यंकटपति कवीनें या काव्यांत लिहिली आहे. हंसविंसति ( के. अयाला नारायण ) हंसानें विष्णुदास नांवाच्या एका गृहस्थाच्या गैरहजेरींत त्याच्या स्त्रीस गोष्टी सांगून तिचें मन व्यभिचारापासून परावृत्त केलें इत्यादि गोष्ट आहे. रूपावतीचरित्र यांत व्यंकटगिरीचा मुसलीराया यानें एका रूपवती नामक नृत्यांगनेवर मन बसतें तत्संबंधीं हकीकत चिकटपल्ली लक्ष्मीराया यानें लिहिली. चंद्ररेखाविलाप (कवि जगन्नाथ ) या काव्यामध्यें नीलाद्रीराव व चंद्ररेखा नामक नृत्यांगना यांच्या प्रेमाची हकीकत आहे. विद्यावटी मंजरीत ( कवि शेषाचल पोलीगार कृत) एका नृत्यांगनेच्या मदुरामराया याच्यावरील प्रेमाची हकीकत दिली आहे. कांहीं ऐतिहासिक स्वरूपाचे विषय काव्य विषयच झाले नाहींत तर त्या विषयांच्या विशिष्ट स्वरूपामुळें तेलगू जनतेवर परिणामकारी झालेले दिसतात. विष्णुवर्धन राजानें एका वैश्यकन्येवर बलात्कार केला आणि त्यामुळें तिनें व तिजबरोबर अनेक कुटुंबांनीं जो अग्निप्रवेश केला त्याचें वर्णन देणारीं तिमय्यासति, व गुरुवय्या यांचीं कन्यकापुराण व कन्यकाचरित्र या नांवाचीं पुस्तकें आहेत. जेथें तिनें अग्निप्रवेश केला तेथें देवालय बांधलें आहे. त्यास कन्यकापरमेश्वरी म्हणतात; ही वैश्यांची देवी आहे.

केवळ सामाजिक विषयावर काव्यहि तेलगूंत आहे,एवढेंच नव्हे तर तेलगू वाङ्मयाचा सुवर्णकाल येण्यापूर्वी देखील अशा प्रकारची काव्यरचना झाली होती, यास श्रीनाथाचें वीथिनाटक ( सडकेवरचें नाटक ) साक्षीभूत आहे. यांत कवि उभा राहून रस्त्यावरून येणाऱ्या जाणाऱ्या बायकांचें वर्णन करतो. यांत पंधराव्या शतकांतल्या सर्व तेलगू स्त्रियांच्या ( ब्राह्मणांपासून अस्पृश्यांपर्यंत ) पेहेरावांचें व दागिन्यांचें सुरेख वर्णन आहे.

तेलगू कवींची याद पाहिली असतां तींत अनेक महत्त्वाचे राजकारणी पुरुष दिसतात. म्हणजे वाङ्मयाच्या सेवेला लागलेला वर्ग महाराष्ट्रांतील वर्गापेक्षां अधिक उच्चप्रकारचा दिसतो. आणि यामुळें विषयाचें विविधत्व,अनुभवमूलक लेखन इत्यादि गोष्टींत तेलगू वाङ्मय जुन्या मराठी वाङ्मयापेक्षां, काव्यदृष्टीनें अधिक श्रेष्ठतेचें ठरेल यांत शंका नाहीं.

गीर्वाणविषयक जागृति.—गेल्या पंचवीस वर्षांत तेलगू समाजांत वाङ्मयविषयक बरीच जागृति झाली आहे. या चळवळीस तत्रस्थ महाराष्ट्रभाषाभिज्ञ आणि महाराष्ट्रीय लेखकहि कांहीं अंशीं कारणीभूत आहेत. स्वदेशी चळवळीच्या काळीं बिपिनचंद्र पाल यांच्या व्याख्यानांचाहि परिणाम आंध्र तरुणांच्या मनावर झाला; परंतु तो कमी टिकला. राजकीय बाबतींत तरुण आंध्रांची मनोवृत्ति राष्ट्रीयपक्षास अधिक मिळती असते. औद्योगिक बाबतींतहि त्यांची थोडीफार चळवळ चालू आहे. सध्यां जास्त तीव्रतेनें राजकीय मतें व्यक्त करणारांशीं ते सहकारिता करतात. वाङ्मय सुधारावयाचें, परंतु त्याबरोबरच ज्या भाषेंत तें असतें ती भाषाच सुधारावयाची अशी एक रीत असते; तिकडे या आंध्रांचें लक्ष्य वेधलें आहे. त्याबरोबरच आंध्र प्रांत ( तेलगू भाषा बोलणारा ) हा स्वतंत्र करावा व तेलगू भाषेंतून उच्च शिक्षण मिळावें अशी प्रांताभिमानाची चळवळ त्यांच्यांत सुरू आहे; स्वतंत्र युनिव्हर्सिटी ते मिळवीत आहेत. तामीळ लोक कांहीं काळ या चळवळीच्या विरुद्ध होते. या चळवळीस ते " आंध्रोद्यमम्ु " म्हणतात. आंध्रांचा स्वतंत्र राजकीय विभाग व्हावा यापेक्षां व्यापक आंध्रहितसंवर्धनाच्या हेतुसाठीं ही चळवळ आहे.

तेलगूवाङ्मयाचे अग्रणी राजमहेंद्रीचे के. वीरेश लिंगम् पंतुलु होत हे तेलगू पंडित म्हणून प्रख्यात होते. त्यांच्या

इतका प्रचंड तेलगू लेखक साऱ्या आंध्रांत ( त्यांच्या वेळीं ) नव्हता. यानीं प्रहसनें, निबंध वगैरे ४० च्या वर लिहिले होते; म्हणून यानां अर्वाचीन तेलगूचा निर्माता म्हणत. कांहींनां हें म्हणणें पसंत नाहीं. पंतुलु मूळचे आराध्य ब्राह्मण असून पुढें ब्रम्हो झाले. हे सुधारकाग्रणी व स्त्रीशिक्षणाभिमानीहि होते. यांचें एक आत्मचरित्र प्रसिद्ध झालें आहे. त्यांत कांहीं आत्मप्रशंसेच्या व कांहीं तत्कालिन, सामाजिक व राजकीय इतिहासाच्या गोष्टी आल्या आहेत; स्वदेशी चळवळीच्या काळीं ( १९०६–०८ ) आपण कितपत राजनिष्ठ होतों त्याचें प्रदर्शन त्यानीं या पुस्तकांत केलें आहे. त्यांच्या पालकत्वाखालीं असलेल्या एका अज्ञान मुलीच्या बाबतींत यांच्या चारित्र्यावर शिंतोडा उडाल्यामुळें त्यांच्या शेवटच्या वर्षांत त्यांजवरील सार्वजनिक विश्वास कमी झाला.

तेलगू भाषेत " आंध्रपत्रिका " नांवाचें एक दैनिक आहे व साप्ताहिकें मात्र बरींच आहेत. " कृष्णापत्रिका " या साप्ताहिकानें राजकीय विषयावर उहापोह करून तेलगूस राजकीय विषयावर वादविवाद करणारी भाषा बनविली असें पत्रिकेचे चहाते म्हणतात. मासिकांत आंध्रभारती हें प्रमुख आहे. तेलगूंत स्त्रीसंपादिकाहि दिसत असून त्यांनीं कांहीं मासिकें चालविलीं आहेत. 'हिंदुसुंदरी'ची संपादिका श्री. बालाग्रपु शेषम्मा व सावित्रीची संपादिका श्री. पुलुगुर्ता लक्ष्मीनरसीमांबा या त्यांत अधिक विश्रुत आहेत. तेलगू देशांत धंदेवाल्या नाटककंपन्या फारशा नाहींत; नाट्यसमाज मात्र आहेत. त्यांत बल्लारीची सरसविनोदिनी सभा आणि मद्रासची सुगुणविलाससभा, या प्रमुख आहेत. पहिलीचे अध्यक्ष रावबहादूर गौड म्हणून महाराष्ट्रीय गृहस्थ होते. या समाजाकडून नवीन नाटकरचनेस उत्तेजन मिळतें. यांचा मुख्य नाट्यलेखक राजारामराव तोरगड (हा गौडांचा जांवई) आहे. तेलगू गीर्वाणाच्या उन्नतीसाठीं " विज्ञानचंद्रिकामंडळी ", " आंध्र साहित्य परिषद " यांसारख्या संस्था खटपट करीत आहेत. पहिली संस्था गुंटूर येथें पांच गृहस्थांनीं स. १९०६ मध्यें काढली. तिचा उद्देश पाश्चात्य ज्ञान स्वभाषेतून पसरविण्याचा आहे. हिनें अब्राहाम लिंकनचें चरित्र हें पहिलें पुस्तक प्रसिद्ध केलें. संस्थेचें कार्यालय प्रथम हैदराबादेस कै. आर. व्ही. रंगराव यांच्या येथें होतें, हल्लीं १९०८ पासून मद्रासेस डॉ. लक्ष्मीपति यांच्याकडे आहे. या संस्थेनें प्रसिद्ध केलेल्या पहिल्या २३ पुस्तकांत १२ शास्त्रीय, ५ ऐतिहासिक, ४ चरित्रें व दोन ऐतिहासिक कादंबऱ्या आहेत. या संस्थेचे संपादक कै. के. व्ही. लक्ष्मणराव होते. ते पूर्वी मराठींत लिहित असत; पुढें त्यांनीं तेलगूंत लिहिण्याचा प्रघात पाडला व महाराष्ट्रीय इतिहास व कल्पना यांचा तिकडे प्रसार करण्यास प्रारंभ केला. त्यांनीं शिवाजीचें चरित्र लिहिलें आहे. त्याचप्रमाणें रा. कोमुरी वीरभद्रराव यानीं आंध्रचरितें हा एक महत्त्वाचा व भाषांतर करण्याजोगा ग्रंथ लिहिला आहे. या मंडळीच्या ग्रंथांनां लोकाश्रय चांगला आहे; मद्रास युनिव्हर्सिटीच्या शिक्षणखात्याकडून आश्रय मिळतो. त्यामुळें ग्रंथांच्या हजारों प्रती काढून स्वल्प किंमतींत देण्यास परवडतें. शास्त्रीय ग्रंथांच्या तर ५१९ हजार प्रती खपल्या आहेत. या संस्थेनें वाङ्मय, इतिहास व भौतिकशास्त्रें या विषयांत निरनिराळ्या ठिकाणीं स्त्रीपुरुषांच्या परीक्षा घेऊन व त्यांनां बक्षिसें आणि प्रमाणपत्रें देऊन मॅट्रिक पास न झालेल्यांनां एक सोय करून दिली आहे. के. व्ही लक्ष्मणराव, डॉ. लक्ष्मीपती व रा. काळेश्वरराव ( बेझवाडा ) इत्यादि मंडळींच्या खासगी प्रयत्नानें तेलगू ज्ञानकोश ( आंध्र विज्ञानसर्वस्वमु ) तयार करण्याचें व छापण्याचें काम चालू आहे. आंध्रसाहित्यपरिषद ही रा. जयंति रामय्या पंतलु यांच्या यत्नानें स्थापली गेली. यानीं विशेषकरून " शासनें " छापण्याकडे या संस्थेचें बल लावलें आहे.

तेलगू भाषेत ग्राम्य व ग्रांथिक असे प्रकार ( मराठीपेक्षां जास्त ) असल्यानें मध्यंतरीं भाषेंत कोणता प्रकार जास्त प्रचारांत आणावा याबद्दल वाद माजून ग्राम्य प्रयोगांस थोडासा प्रवेश मिळाला. या परिषदेच्या तर्फे तेलगू भाषेचा कोश तयार होत आहे. याला सरकारनें मदत देऊं केली होती, पण परिषदेनें ती नाकारली. याशिवाय इतिहाससाधनें वगैरे साहित्य मासिकद्वारां प्रसिद्ध होत असतें. पिठापुरम् येथील एक श्रीमन् जमिनदार वाङ्मयाचे मोठे अभिमानी आहेत. याप्रमाणें आंध्र लोक कांहीं बाबतींत महाराष्ट्राच्या पुढें आहेत तर बऱ्याच बाबतींत मागें आहेत. त्यांच्यांत लो. टिळक, ना. गोखले, न्या. रानडे यांच्यासारखे सर्वराष्ट्रीय पुढारी अद्यापि झाले नाहींत. आपल्या सामाजिक परिस्थितीची झळ ते वाङ्मयचळवळीस लागूं देतात. त्यांच्यांत वैदिकी ( भिक्षुक ) व नियोगी ( गृहस्थ ) असे दोन वर्ग असून ते परस्परांचा मत्सर करतात. वास्तविक हे दोघेहि अद्वैतमतानुयायी असतां ( गुंटूरचे ) नियोगी आपल्याला ' देवाद्वैती ' म्हणवून, वैदिकांनां ' असुराद्वैती ' म्हणतात; एवढेंच नव्हे तर जातिभेदाचा काव्याभिज्ञतेसहि स्पर्श झाला आहे. वैदिकी व नियोगी यांतील दोन्ही पक्ष आपलें कवित्व वरिष्ठ दर्जाचें मानून विरुद्ध पक्षाचें कनिष्ठ होय असें म्हणत. कोप्पुरपुबंधु व शतावधानी या दोन भिन्न जातींच्या कवींनां अग्रस्थान देण्यासाठीं प्रत्येकाच्या जातीनें मिरवणुकी वगैरेहि काढल्या होत्या. [ महाराष्ट्रसाहित्य पत्रिका व. २, अं. ३-४; डॉ. केतकर यांचा लेख. ]

आंध्राचा भाग बराचसा निजामच्या राज्यांत असल्यामुळें आंध्र वाङ्मयासहि बराचसा धक्का पोंहोचला आहे. निजामचें राज्य स्थानिक देशी भाषांच्या उत्कर्षास अपकर्षक आहे. या राज्यांत महाराष्ट्रीय, कानडी व तेलगू ह्या तीन भाषांचे लोक आहेत व या तिन्ही भाषांच्या विकासास या राज्यानें व्यत्यय केला आहे. मराठीपेक्षां तेलगू भाषेस हा व्यत्यय अधिक भासत असला पाहिजे कां कीं इतर लोकांपेक्षा तेलगूंचीच संख्या यांत अधिक आहे.

**तेली**—यांची मुंबई इलाख्यांत लो.सं.(१९११) ९०१६०. तेल विकणारी ही धंदेवाईक जात असून दक्षिण प्रांत व कोंकणभर ही पसरलेली आहे. नारळ, तीळ व दुसरीं गळितांचीं धान्यें यांपासून तेली तेल काढतात. शनीपासून आमची उत्पत्ति आहे असें ते म्हणतात. शिवानें करडासुर, अंबाडासुर, करलासुर, जवसासुर व तिलासुर असे पांच असुर मारण्याकरितां या जातीची उत्पत्ति केली अशी दंतकथा सातारा जिल्ह्यांत प्रसृत आहे. ही असुरांचीं नावें गळिताच्या पांच धान्यांपासून बनलेलीं आहेत हें लक्षांत घेतलें म्हणजे सदरहू दंतकथेतील रहस्य लक्षांत येतें. यांचे आचारविचार मराठ्यांसारखे असल्यामुळें तेली मूळचे मराठे असावे अशी कल्पना होते. तेली जातींत १२॥ भेद असून त्यांचा आपसांत रोटीबेटी व्यवहार होत नाहीं. त्यांचे भेद पुढीलप्रमाणें:—

(१)पंचम किंवा लिंगायत,(२)कानडे, (३)लाड,(४)गुजर, (५) अयार,(६)कडु अथवा अकरमाशे, (७)कंडी,(८)शनवार (बेनी इस्रायल), (९)शुक्रवारी, (१०) राठोड, (११) परदेशी, (१२)तिळवण, सोमवार, अथवा मराठे (॥) गंधी या भेदापैकीं तिळवण अगर मराठे तेली हे असंख्य आहेत. त्यांना सोमवार म्हणण्याचें कारण ते सोमवारीं काम करीत नाहींत. त्यांचीं आडनांवें आमले, बेंद्रे, भागवत, भिसे, भोज, चव्हाण, दळवे, देशमाने, दिवकर, डोळसे, गायकवाड, घोडके, हाडके, घार्पे, कस्तुरे, कादेकर, कोर्डे, लोखंडे, महाले, राणे, तिळेकर, विभुते, झगडे वगैरे असतात. पुण्याकडील तेल्यांच्या देवकांत पहार व घाणा अवश्य असतो. रत्नागिरीकडे कळंब, उंबर, आपटा वगैरे झाडांचीं पानें असतात. कांहीं ठिकाणीं पंचपल्लवी ( आंबा, उंबर, शमी, जांभुळ व रुई ) असते. यांत पुनर्विवाह होतात पण सातारा खेरीजकरून घटस्फोट कोठेंहि संमत नाहीं. मृताला जाळतात अगर पुरतात. तेली मांसाहारी असून मद्यपी आहेत. मराठे व कुणबी यांच्या हातचें अन्न तेली खातात पण तेल्याच्या हातचें अन्न मराठे अगर कुणबी खात नाहींत. नाशिककडे तेली फक्त ब्राह्मणांच्या हातचें जेवतात.

पंजाबांतील तेली मुसुलमान आहेत. लो. सं. २९५९७१. ही जात प्राचीन असून तेली लोकांचा सामाजिक दर्जा जुल्हाप्रमाणें आहे. मुलतान व मुझफरगड येथें तेल्यांस चाकी असें नांव आहे. काश्मीरमध्यें तेल्याला तेलवाणी म्हणतात. हे हिंदु व मुसुलमानहि आहेत. हे बैलांवरून सामान वहाण्याचा धंदाहि करतात. लो. सं. ११३०९.

आसामांतील तेल्यांची लोकसंख्या ( १९११ ) ३८७५७ आहे. सिलहटमध्यें ही तेल्यांची जात स्थानिक असून लोकसंख्या ( १९११ ) २८१५६ आहे. बंगालमध्यें तेल्याच्या वरिष्ठ पोटजातींतील लोकांचा नामवस्त लोकांत समावेश करतात; पण बिहारमध्यें तसें करीत नाहींत. मध्यप्रांतांत यांची संख्या ९०००००, असून संख्येच्या मानानें पाहतां मध्यप्रांतांत यांचा ५ वा नंबर लागतो.-यांपैकीं फक्त शेंकडा सात तेल काढण्याचा धंदा करतात. व बाकीचे लोक शेती, व्यापार, सावकारी व इतर धंदे करतात.

छत्तीसगडांत यांचे हालिया, झाडिया, व एकबादिया असे तीन वर्ग आहेत. हे ब्राह्मणांकडूनच आपलीं लग्नें लावितात. एकबादियांच्या बायका एका हातांत कांचेच्या व एक हातांत धातूच्या बांगड्या घालतात. माडपोतवा, कोसल, व छोटे तेली असे आणखीहि यांचे वर्ग आहेत. शेवटला वर्ग कुमारिकांच्या किंवा स्वैरसंबंधाच्या मुलांचा आहे.

नागपुरांत एक बैले व दोन बैले अथवा तराणे अशा नांवांचे तेल्यांचे वर्ग आहेत. यांच्यांत एरंडे तेली असाहि एक वर्ग आहे. याच्या बायका एक मूल झालें म्हणजे चोळी घालणें सोडतात. रुथिया वर्गाचे लोक आपण नागापासून जन्मलों असें म्हणतात. वर्धास साव तेली हे प्रतिष्ठित गणले जातात. यांच्यांत निरनिराळ्या कुळांचीं नांवें, पदव्या, टोपण नांवें, गांव इत्यादिकांपासून पडलीं आहेत. एकाच कुळाच्या मुलाचा व मुलीचा विवाह निषिद्ध आहे. मामे व मावस भावंडांचे विवाह देखील निषिद्ध आहेत. बायको जिवंत असतांना तिच्या धाकट्या बहिणीबरोबर लग्न करतां येतें पण मोठ्या बहिणीबरोबर करतां येत नाहीं.

ब्राह्मण लोक यांच्या हातचें पाणी पीत नाहींत. बंगाल्यांत मात्र यांचा दर्जा इतका नीच नाहीं. याचें कारण पूर्वी ग्रामव्यवस्थेप्रमाणें तेली हा नीच कामें करणारा समजला जाई; पण बंगालमध्यें ग्रामव्यवस्था इंग्रजी कायमधाऱ्याच्या पद्धतीनें अजिबात मोडली व पुष्कळ लोक शहरांत राहूं लागले म्हणून त्यांचा दर्जा वाढला. हे लोक कुरमी व कुणब्यांच्या हातचें जेवतात व ढीमर लोक यांच्या घरीं जेवतात. बऱ्हाणपुरांतील तेल्यांची स्थिति मुसुलमानी राज्यांत फारच खालावली आहे, पण पुष्कळ तेली लोक आतां बरेच सधन झाले आहेत. [ सेन्सस रिपोर्ट; गॅझेटिअर; एथ्नाग्राफिकल सर्व्हे ]

**तेल्हारा**—तालुका अकोट, जिल्हा अकोला. अकोटपासून १७ मैलांवर हा गांव आहे. लोकसंख्या ( १९०१ ) ५११० आहे. या ठिकाणीं मारवाडी लोकांची फार वस्ती आहे. अलीकडे एका जैनानें येथें पद्मप्रभूचें मंदिर ४००० रुपये खर्चून बांधलें. जुनें असें पाहण्यासारखें कांहीं नाहीं. येथें आठवड्याचा बाजार दर रविवारीं भरतो. इतर दिवशीं त्या जागेंत कापसाचा बाजार भरतो. पोलिस कचेरी, दवाखाना, टपाल व तारघर आणि शाळा येथें आहेत. या गांवास चांगले रस्ते नसल्यामुळें व्यापारास अडचण होते.

**तेहरान**—हें शहर इराणची राजधानी आहे. पूर्वी याचा विस्तार ४ मैल होता शहराभोंवती भिंत आणि खंदक होता. पण १८६९ सालीं शहानें विस्तार वाढविण्याचें ठरवून भिंत पाडवून टाकली व खंदक बुजविला. हल्लीं शहराला १२ दरवाजे असून ते रात्रीं ९ वाजतां बंद करण्यांत येतात व सकाळीं ५ वाजतां उघडले जातात. शहराच्या मध्यभागीं लहानसा किल्ला असून त्यांत राजवाडा व कित्येक सरकारी

कचेऱ्या आहेत. किल्ल्याच्या एका बाजूला बाजार, दुसरीकडे लष्करी कवाइतींचें व तोफखान्याचें मैदान, व एकीकडे जुनी वस्ती आहे. गांवांत ट्रामचा एकेरी रस्ता असून रेल्वेचें स्टेशन आहे. पाणी पुरेसें असून गांवांत तें कालव्याच्या साह्याय्यानें दिलें जातें. गांवांत मशिदी पुष्कळ असून त्यांपैकीं दोन उत्तम आहेत. कॉलेजें, शाळा बऱ्याच आहेत व कांहीं-तून यूरोपियन शिक्षक आहेत. लोकसंख्या ३५०००० आहे. हवा आरोग्यास अपायकारक आहे. १६२७ सालीं तेथें ३ हजार घरें होतीं. १७२३ सालीं अफगाणांनीं शहराचा नाश केला. या शतकाच्या शेवटीं आगा महंमदखा यानें येथें आपली राजधानी केल्यापासून शहर सुधारूं लागलें.

**तेहरी संस्थान**—संयुक्त प्रांताच्या सरकारच्या हाता-खालीं असलेलें एक देशी संस्थान. क्षे. फ. ४२०० चौरस मैल. मर्यादा:—उत्तरेस पंजाबांतील राविन व बशाहर हीं संस्थानें आणि तिबेट; पूर्वेस व दक्षिणेस गऱ्हवाल जिल्हा; आणि पश्चिमेस डेहराडून. हें सर्व संस्थान हिमालयाच्या प्रदेशांत असून, त्यांत डोंगरांच्या पुष्कळ रांगा व मधून मधून अरुंद खिंडी आहेत. डोंगरांची उंची समुद्रसपाटीच्या वर २०००० ते २३००० फूट आहे. गंगा व यमुना या नद्या ह्याच संस्थानांत उगम पावतात, व जिल्ह्यांतील सर्व पाणी त्यांनाच मिळतें. गंगा नदी १३५७० फूट उंचीवर गोमुख नांवाच्या ठिकाणापासून निघते. हिला प्रथम भागी-रथी असें नांव आहे. तिला भैरोघांटीजवळ जान्हवी नदी मिळते. भागीरथी ही प्रथम नैर्ऋत्य दिशेनें व नंतर आग्नेय दिशेनें वहात जाऊन देवप्रयाग येथें अलकनंदेला मिळाल्यावर तिला गंगा हें नांव प्राप्त होतें. अलकनंदा व गंगा या नद्या कांहीं मर्यादेपर्यंत दक्षिण सरहद्दीवरून जातात. यमुना नदी ही बंदरपूंच शिखराच्या पश्चिमेस उगम पावल्यानंतर नैर्ऋत्य दिशेनें वहात जाऊन संस्थानच्या पश्चिम सरहद्दी-वरून गेली आहे. त्याच शिखराच्या उत्तरेस सूपिन नदी उगम पावते; तिला रुपिन नदी मिळाल्यावर टोन्स असें म्हणतात. गंगा व यमुना या नद्यांच्या उगमाजवळ गंगोत्री व जम्नोत्री हीं यात्रेचीं मोठीं ठिकाणें आहेत. संस्थानच्या उत्तर भागांत वाघ, पश्चिम भागांत चित्ते, कांहीं ठिकाणीं काळीं अस्वलें व रानटी कुत्रे, आणि बनगायी, सांबर, कस्तुरी मृग व निरनिराळ्या प्रकारचीं हरणें हे प्राणी संस्थानांत आढळतात. संस्थानची हवा गऱ्हवाल जिल्ह्याच्या हवेसारखी आहे. हिवाळ्यांत ४००० फुटांपर्यंत बर्फ पडतें.

हें संस्थान व गऱ्हवाल जिल्हा हीं पूर्वी एकाच घरा-ण्याच्या ताब्यांत असल्यामुळें याचा पूर्वेतिहास गऱ्हवाल ( पहा ) प्रमाणेंच आहे. शेवटला राजा पर्दुमनशहा गुरख्यांशीं झालेल्या लढाईंत मारला गेला; परंतु १८१५ सालीं नेपाळचें युद्ध संपल्यानंतर, इंग्रजांकडून त्याचा मुलगा सुदर्शनशहा याला हल्लींचें तेहरी संस्थान मिळालें. राजा सर कीर्तिशहा इसवसिन १८९४ सालीं गादीवर बसला. या संस्थानांत २४५६ खेडीं आहेत; परंतु मोठें गांव एकहि नाहीं. लोकसंख्या ( १९०१ ) २६८८८५. शेकडा ९९ पेक्षां जास्त लोक हिंदु आहेत. येथें मुख्यतः मध्य पहाडी भाषा चालते. शेकडा ८८ लोकांचा उदरनिर्वाह शेतीवर होतो.

शे ती, जं ग ल.—तांदूळ, झंगोरा, मरुआ व गहूं हीं येथील मुख्य पिकें आहेत. जंगलांत चीर, देवदार, साल, ओक वगैरे झाडें आहेत. इमारती लांकूड, तांदूळ व बटाटे हे निर्गत आणि कापड, साखर, मीठ, लोखंड, पितळेचीं भांडीं, मसाले व तेल हे आयात जिन्नस होत. मसूरी हें व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे.

राज्यकारभार:—येथील राजा तेहरी येथें रहातो. त्याला संस्थानांत पूर्ण अधिकार आहेत. कुमाऊनचा कमिशनर हा संयुक्त प्रांताच्या सरकारतर्फे तेहरीचा पोलिटिकल एजंट असतो. संस्थानचे कार्यकारी अधिकार वजिराकडे आहेत. व मुलकी कामें तहशिलदार आणि तीन डेप्युटी कलेक्टरां-कडे आहेत. १९०३–४ सालीं संस्थानचें उत्पन्न ४.२५ लक्ष रुपये होतें; पैकीं जंगलखातें; ( १.७५ लक्ष रुपये ) जमीन महसूल, ( ९५ हजार रुपये ) व स्टॅंप, अबकारी व नजराणा ( ६५ हजार रुपये ); ह्या उत्पन्नाच्या मुख्य बाबी होत. सकलानाच्या जहागीरदार खेरीज इतर कोणालाहि जमिनीवर मालकी हक्क नाहींत. १९०१ सालीं शेकडा ४.४ पुरुषांनां व शेकडा ०.१ स्त्रियांनां लिहितां वाचतां येत होतें. संस्थानांत दोन रुग्णालयें आहेत. देवी काढविण्याची सक्ति कोठेंहि नाहीं.

**तैकल**—हें गांव पूर्वी राजधानीचें ठिकाण असून, खालचा ब्रह्मदेश, थाटोन जिल्ह्याच्या बिलिन टाऊनशिप-मध्यें आहे. येथें असलेल्या जुन्या लेखांत खालील मजकूर आहे 'पूर्वी येथें सिरिमसोक या नांवाच्या राजानें सुवर्णभूमीवर राज्य केलें.' या गांवांत विटांचीं व धाब्याचीं घरें फार असल्यामुळें याला अद्यापि 'गोलामट्टिका नगर' असें म्हण-तात. सन १७०० पर्यंत हें फार महत्त्वाचें बंदर होतें.

**तैक्यिय**—खालच्या ब्रह्मदेशांतील हंथवड्डी जिल्ह्याची एक उत्तरेकडील टाउनशिप. क्षेत्रफळ७९८ चौ.मै. लोकसंख्या ( १९०१ ) ७३२६३. खेडीं ४७०. पश्चिम भाग सखल आहे. करेन लोकांची बरीच वस्ती आहे. मुख्य ठिकाण तैक्यिय.

**तैत्तिरीय शाखा**—यजुर्वेदाच्या अनेक भेदांपैकीं हा एक शाखाभेद आहे. या शाखेचे आणखी औखेय आणि खांडिकेय असे दोन भेद आहेत. तैत्तिरीय संहिता, तैत्तिरीय ब्राह्मण व तैत्तिरीय आरण्यकें असे या शाखेचे ग्रंथ आहेत. बौधायन, आपस्तंब, सत्याषाढ, भारद्वाज, वैखानस, व वाधूल हे या शाखेचे सूत्रभेद आहेत. याज्ञवल्क्याचें गुरुशीं भांडण होऊन त्यानें वमन केलेला वेद तित्तिरपक्ष्यानें ग्रहण केला म्हणून या शाखेचें तैत्तिरीयशाखा हें नांव पडलें अशी भागवतादि पुराणग्रंथांवरून या शाखेची उपपत्ति

देण्यांत येते. परंतु सत्याषाढ गृह्यसूत्रांत ब्रह्मयज्ञांग ऋषितर्पणांत तित्तिरनामक ऋषीचा उल्लेख येतो. यावरून तित्तिर नांवाचा शाखाप्रवर्तक कोणी ऋषि असून त्यावरून हें नांव पडलें असावें व पुढील कल्पित कथा याज्ञवल्क्यानुयायांनीं रचिलेली असावी असें दिसतें.

तै त्ति री य सं हि ता.—या संहितेसंबंधीं सविस्तर विवेचन वेदविद्या या विभागांत (पृष्ठ ७२ ते १४१) आलें आहे. ही संहिता मंत्रब्राह्मणात्मक आहे, म्हणजे या संहितेंत मंत्र दिले असून त्यांचा विनियोगहि ठिकठिकाणीं दिला आहे. हा ग्रंथ विशेषतः गद्य असून मंत्रभागहि थोडासा आहे. संहितेंतील कथा किंवा आख्यायिका सदरहू विभागांत (पृष्ठ २२७ ते २३५) दिल्या आहेत.

तै त्ति री य ब्रा ह्म ण.—तैत्तिरीयशाखेचें ब्राह्मण. या संबंधीं विवेचन वेदविद्या विभागांत (पृष्ठ १५१) आलें आहे.

तै त्ति री य आ र ण्य क व उ प नि ष द्.—या आरण्यकाचे एकंदर दहा प्रपाठक असून त्यांपैकीं ७ ते ९ प्रपाठकांनाच तैत्तिरीय उपनिषद् व दहाव्या प्रपाठकाला महानारायणीय उपनिषद् म्हणतात. याची अनुक्रमणिका 'वेदविद्या' विभागांत (पृष्ठ ११० ते ११४) दिली आहे. तीवरून त्यांतील विषयांची कल्पना येईल. यांतील तत्त्वज्ञान इतर उपनिषद् ग्रंथांतल्यासारखेंच आहे. यांतील विषय व लेखनपद्धतीवरून हें संहितेपेक्षां बरेंच उत्तरकालीन असावें असें वाटतें.

**तैमूर (लंग)**—अमीर तैमूर हा तुर्क होता. याचा जन्म १३३६ (९ एप्रिल) सालीं कुश या गांवीं झाला. त्याच्या बापाकडे कुश प्रांताचा कारभार होता. कांहीं म्हणतात कीं, तैमूरचा बाप मेंढक्या होता व कांहीं तो प्रख्यात चेंगीझखानाचा वंशज होता असें म्हणतात. त्याचें नांव अमीर तुराघाई होतें. तैमूरच्या आईचें नांव तकीना खातुन होतें. तैमूर तीव्र बुद्धीचा व फार धाडसी होता. लहानपणापासून त्याला लढायांचा अभ्यास होता. तो पंचवीसाव्या वर्षी मध्यआशियांतील तुर्कस्तानचा राजा झाला. पुढें लवकरच त्याच्यावर मोठीं संकटें येऊन तो रानोमाळ भटकूं लागला. संकटसमयीं धैर्य खचूं न देतां हातीं घेतलेलें काम शेवटास न्यावयाचें, हा त्याचा मोठा गुण होता; या गुणामुळेंच तो ऐश्वर्यास चढला पुढें त्यानें शत्रूंचा पाडाव करून समर्कंदचें राज्य मिळविलें (१३६९). पुढें खोरासनचा राजा अमीर हुसेन याच्यावर एकाएकीं स्वारी करून व त्याला ठार मारून त्यानें त्याचें राज्य घेतलें आणि बल्ख येथें तख्तारोहण केलें (एप्रिल १३७०). या हुसेनची बहीण तैमूरची बायको होती. त्यानंतर त्यानें कंदाहार, इराण, बगदाद हे देश जिंकिले. सर्व जग जिंकण्याची त्याला हांव होती. निरनिराळ्या ठिकाणीं त्यानें एकंदर ३५ स्वाऱ्या करून, पश्चिमेकडे इराण, दक्षिणेस हिंदुस्थान व पूर्वेस चीनच्या हद्दीपर्यंतचा प्रदेश काबीज केला.

हिंदुस्थान जिंकण्याचा आपला बेत जेव्हां त्यानें आपल्या सल्लागार मंडळापुढें मांडला, तेव्हां तेथें पुष्कळ चर्चा झाली. अनेक लोक या स्वारीच्या विरुद्ध होते. तथापि तैमूरनें आपला हट्ट सोडिला नाहीं. हिंदु लोकांवर स्वारी करून त्यांस मुसुलमानी धर्मांत आणून त्यांचीं देवळें व मूर्ती नाहींशा कराव्या अशी त्याची इच्छा होती. शेवटीं तैमूर समर्कंदहून निघून (१३९८ मार्च) कटकजवळ सिंधुनद उतरून (२४ सप्टेंबर) तुलुंब शहरांतील लोकांची त्यानें कत्तल केली. तेथें काश्मीरचा राजा त्याला शरण गेला. तेथून शाहानवाज शहरीं जाऊन पाहिजे तेवढें धान्य घेऊन बाकीचें त्यानें जाळून टाकिलें व फत्तेबाद, राजपूर, पानिपत वगैरे अनेक शहरांत जाऊन तेथें कत्तल करून यमुना ओलांडून तो दिल्लीकडे वळला. तेथील बादशहा महंमूद तुघ्लक व वजीर मल्लू इक्वालखान यांनीं तैमूरवर हल्ला केला. मोठी लढाई होऊन तैमूरला जय मिळाला (१७ डिसेंबर १३९८). महंमूद गुजराथकडे पळून गेल्यामुळें, तैमूरनें दिल्लीचें बादशाही पद स्वीकारिलें. त्याच्या फौजेनें दिल्लींत पंधरा दिवस लुटालूट केली व एकसारखा रक्तपात चालविला. हिरे, माणकें, सोनें वगैरे जें लुटलें त्याची गणतीच नाहीं. लूट, जाळपोळ व कत्तल यांचा एकसारखा सपाटा चालला होता; बहुतेक दिल्ली शहर ओस पडलें. पंधरा दिवसांनीं बगदाद प्रांतानें बंडाळी केल्यानें ती मोडण्यासाठीं तो तिकडे गेला (२३ फेब्रु.). परत जातांना बागपत, मिरत, हरद्वार, जम्मू, नगरकोट वगैरे शहरीं हिंदु लोकांची कत्तल करून त्यानें अगणित द्रव्य पैदा केलें व मुलतान, लाहोर व देपाळपूर या प्रांतांवर त्यानें खिजरखान सय्यद नामक सरदाराची नेमणूक केली. यावेळीं तैमूरचें वय ६३ होतें. बगदादला जाऊन तेथील बंड मोडून ८० हजार लोकांनां त्यानें फांशी दिलें. चीन देशांत मुसुलमानी धर्माचा प्रसार करण्यासाठीं यानें स्वारी करण्याचें ठरविलें होतें परंतु तो त्या वेळीं एकाएकीं आपल्या वयाच्या ७१ व्या वर्षी मरण पावला; त्यामुळें चीनवरचें संकट टळलें (१८ फेब्रु. १४०५). एका लढाईंत जखम लागून त्याचा हात व पाय लंगडा झाल्यामुळें त्यास लंग हें नांव पडलें. ग्रीक बादशहाच्या विनंतीवरून तैमूरनें तुर्क बादशहा बायाझीद यास कान्स्टांटिनोपलचा वेढा उठविण्यास दरडाविलें असतां त्यानें तैमूरवर स्वारी केली, परंतु तींत त्याचाच फ्रिजीआ येथें पराभव झाला (जुलै १४०२) व त्याला पकडून लोखंडी गजांच्या पिंजऱ्यांत घालून तैमूर यानें कैदेंत ठेविलें. यानंतर त्यानें ईजिप्त जिंकून तेथील संपत्ति लुटली व समर्कंद ही आपली कायमची राजधानी केली. या सुमारास कान्स्टांटिनोपलचा राजा पॅलिओलोगस व कॅस्टिलेचा राजा तिसरा हेन्री यांनीं त्याचें मित्रत्व स्वीकारलें. तैमूरनें ३६ वर्षे राज्य केलें. त्याची कबर समर्कंद येथें आहे. मृत्यूनंतर त्याला फिरदौसमकानी (स्वर्गाधिकारी) ही पदवी मिळाली.

त्याला चार पुत्र होते. त्यांपैकीं जहांगीर मिर्झाचा पुत्र पीर मुहम्मद म्हणजे त्याचा नातु यास त्यानें आपल्या मागें गादीचा वारस ठरविलें होतें; परंतु तें साधलें नाहीं. त्याचा दुसरा नातु सुलतान 'खलील यानें पीरचा खून करून तक्त बळकाविलें. त्याच्या मागून तैमुरचा सर्वांत धाकटा मुलगा शाहरुख मिर्झा हा राजा झाला.

मनुष्यजातीचे शत्रू या नांवानें ज्या व्यक्ती प्रसिद्ध आहेत, त्यांत तैमूरची गणना केली जाते. त्याचें लष्कर तहान, भूक वगैरे संकटें सोसण्यास फार कंटक होतें तैमूरचा दरबार बराच सुधारलेला होता. त्याची टापटीप, व्यवस्था व काम करण्याची शैली उत्तम होती. तो एखाद्या शहरीं गेला म्हणजे प्रथम तेथील लोकांपासून सर्व संपत्तीची दरडावून मागणी करी; नंतर सर्व लोकांस एकत्र जमा करी; आणि मग कारागीर व विद्वान लोकांस वेगळे काढून, इतरांचा जीव घेऊन त्यांच्या शिरांचा ढीग रची. हिंदुस्थानांत मोंगल बादशाहीची सुरवात त्यानेंच केली असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण हिंदुस्थानचा पहिला मोंगल राजा बाबर हा याच्याच वंशांतील होता; त्याच्या हयातींपर्यंत हिंदुस्थानांत त्याच्याच नांवानें खुत्बा वाचण्यांत येत असे. तो जन्मापासून संकटांत वाढलेला असल्यामुळें सोशिक व कावेबाज होता. त्याला लिहितां वाचतां येत नव्हतें. एकदां राजाच्या तोंडून शब्द गेला म्हणजे कांहीं झालें तरी तो अंमलांत आलाच पाहिजे, असें त्याचें तत्त्व होतें. त्यानें राज्यकारभारांत धर्माचा संबंध येऊं दिला नाहीं. त्याचें वर्तन कडक होतें, तरी कुटुंबांतील माणसांवर त्याचें फार प्रेम होतें. त्याच्या लष्करची शिस्त कडक होती. त्याच्याजवळ नेहमीं २ लाख फौज तयार असे. त्यानें तत्कालीन सर्व मोठमोठीं राज्यें पादाक्रांत केलीं; त्याला मानवजातीचा संहारकर्ता असें इतिहासकार म्हणतात. तथापि अचाट बुद्धिमत्तेनें त्यानें विजय मिळविले होते. त्याला साहिब किरान अशी पदवी होती.

तैमूरनंतर त्याच्या वंशांत समर्कंद येथें राज्य करणारे पुढील पुरुष झाले. तैमूरचा मुलगा मिरानशहा, याचा पुत्र (१) खलील सुलतान. त्याच्या मागून तैमूरचा सर्वांत लहान मुलगा (२) शाहरुख मिर्झा. नंतर त्याचा पुत्र (३) अल्लाउद्दौला मिर्झा.त्याच्या मागें त्याचा भाऊ(४) उलुघबेग मिर्झा. (५) मिर्झा बाबर. हिंदुस्थानचा पहिला मोंगलराजा. (६) मिर्झा अबदुललतीफ.(७)मिर्झा शाहमुहंमद. (८) मिर्झा इब्राहिम ( ९ ) सुलतान अबुसयीद व ( १० ) मिर्झा यादगार मुहम्मद [ माबेल डफ; मुसुलमानी रियासत; स्टॅन्ले लेनपूल; बील. ]

तैलयंत्र (आईल इंजिन)—तैलयंत्र म्हणजे तेल वापरून त्यापासून शक्ति उत्पन्न करणारें यंत्र. याचें इंग्रजी नांव आईल इंजिन. आपल्याकडेहि तें आईल इंजिन याच नांवानें ओळखलें जातें. हें मूळ कधीं निघालें हें कांहीं नक्की सांगतां येणार नाहीं पण ग्यासइंजिनच्या मागून हें निघालें. हें चालण्याचें मूळ तत्त्व असें आहेः—पहिल्यानें तेलाची वाफ व हवा यांचें मिश्रण हें सिलिंडरमध्यें येतें, नंतर दुसऱ्या वेळेस हें मिश्रण चांगलें दाबलें जातें. नंतर तिसऱ्यानें हें मिश्रण एकदम पेटून त्याचा जोरानें स्फोट होतो; या स्फोटामुळें खूप जोराचे पण जळलेले वायू तयार होतात. या वायूचा जोर मोठा असल्यामुळें त्यामुळें इंजिनमधला दट्टया (पिस्टन) पुढें जातो. शक्ति उत्पन्न करण्याची या इंजिनमधली जागा येवढीच. यानंतर चौथ्यानें हें जळलेलें सर्व मिश्रण बाहेर जातें. नंतर पुन्हां तेलाची वाफ आंत येणें वगैरे रहाटगाडें सुरू होतें. इंजिन चालू असेपर्यंत हें सर्व चालू असतें.

आईल इंजिनच्या आंतील क्रियांवरून चार धावी व दोन धावी अशा मुख्य दोन जाती आहेत. वर सांगितलेलें (१) मिश्रण आंत येणें- श्वसन, (२) मिश्रण दाबणें –दबन, (३) मिश्रण पेटून स्फोट होणें व त्याच्या जोरानें पिस्टन पुढें जाणें– स्फोट व प्रसारण- (४) व जळलेले वायू बाहेर जाणें– निकास (निकाल )या चारी क्रिया प्रत्येक इंजिनमध्यें चालू असतातच. या चारी गोष्टी एकामागून एक होत असल्याशिवाय इंजिन चालणें शक्यच नाहीं. इंजिनचा पिस्टन एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत मागें जाणें किंवा पुढें जाणें याला एक धांव असें म्हणतात. कांहीं इंजिनमध्यें वर सांगितलेल्या प्रत्येक क्रियेला एक एक धांव लागते. असल्या इंजिनला चार धांवी इंजिन ( फोर स्ट्रोक सायकल इंजिन ) असें म्हणतात. हींच इंजिनें अजून पुष्कळ प्रचारांत आहेत व हीं जास्त चांगलीं चालतातहि, पण हीं जरा जास्त भानगडीचीं असतात. दुसऱ्या जातीचीं इंजिनें आहेत यांत वरील चार क्रिया दोन धांवांतच म्हणजे इंजिनच्य एक फेऱ्यांतच होतात. म्हणून या इंजिनला दोनधांवी इंजिन ( टू स्ट्रोक सायकल ) इंजिन असें म्हणतात. हें इंजिन फारच कमी भानगडीचें असें असतें. त्याला पडदे (व्हाल्व्ह) कमी असतात. याला तेल जरा जास्त लागतें. हीं इंजिनें अलीकडे नवीनच जास्त जास्त प्रचारांत येत आहेत. यांचा विशेष गुण साधेपणा हाच आहे.

आईल इंजिनचे त्याला लागणाऱ्या तेलावरूनहि प्रकार करतात. ग्यास इंजिनें निघाल्यानंतर इंजिनला लागणाऱ्या ग्यासच्या ऐवजीं तेलाची वाफ ग्यासच्या जागीं वापरण्याची कल्पना निघून त्यापासून आईल इंजिनें निघालीं. तेव्हां पहिल्यानें ज्या तेलाची वाफ अगदीं फारच थोड्या श्रमानें व सहज करतां येईल त्या तेलानेंच चालणारीं इंजिनें निघालीं. असलीं पहिलीं इंजिनें पेट्रोलनें चालणारीं होतीं. चांगल्या पेट्रोलची वाफ साध्या उघड्या हवेंत सुद्धां बाहेरची उष्णता न लावतां होते. ही वाफ इंजिनमध्यें अगदीं ग्यास ( कोळशाचा धूर ) प्रमाणें चालते. या इंजिनमध्यें तेलाची वाफ उत्पन्न करणाऱ्या भागाशिवाय जास्त कोणताहि भाग लागत नाहीं. तसेंच पहिल्यानें या तेलाला

जवळ जवळ कांहींच किंमत नव्हती त्यामुळें हें फार स्वस्त मिळत असे. पुढें पुढें मोटारगाड्या निघावयास लागून या तेलाचा खप फार वाढला व यास किंमतहि जास्त यावयास लागली. उलट केरोसीन ( राकेल ) जास्त स्वस्त मिळावयास लागलें. तेव्हां केरोसीननें चालणारीं इंजिनें निघालीं. या जातीच्या इंजिनमध्यें इंजिनच्या पाठीमागें तेलाची वाफ करणारा ( व्हेपोराइझर ) बसविलेला असतो. तसेंच तेल व हवा यांचें मिश्रण पेटण्याकरितां एखादा गोळा किंवा नळी बसविलेली असते. जुन्या इंजिनमध्यें हा गोळा किंवा नळी इंजिन चालू असतांना खालीं दिवा ठेऊन सदोदित तापलेली ठेवावी लागत असे. अलीकडच्या नव्या इंजिनमध्यें वाफ करणारा व नळी या दोहोंचेंहि काम करणारा एकच भाग असतो. हा बहुतकरून वाटोळा असल्यामुळें यास गरम वाटोळा गोळा असें म्हणतात. इंजिन जर अगदींच कमी शक्ति उत्पन्न करीत असेल तर या गरम गोळ्याखालींहि दिवा ठेवावा लागतो.

राकेल तेल, पेट्रोल, वंगणाचीं तेलें, खनिज मेण व ग्रीज हीं सर्व जमिनींतून निघणाऱ्या अशुद्ध तेलापासून निरनिराळ्या उष्णतामानावर उकळून काढतात. हीं काढून घेतल्यानंतर शेवटीं जाड मधासारखा, केव्हां केव्हां त्याहूनहि जाड असा पदार्थ रहातो. याला क्रूड ऑईल असें म्हणतात. वास्तविक हें नांव चुकीचें आहे. पण आज तें रूढ आहे म्हणून आपण तेंच धरून चालूं. याचा उपयोग कांहींच करितां येत नसे; हें अगदीं फेंकून द्यावें लागे. यामुळें हें अगदीं मातीमोल किंमतीस मिळत असे, पण हें तेल जाळलें असतां यापासून साध्या तेलाइतकी किंबहुना जास्त शक्ति उत्पन्न करण्याचा याचा गुण आहे. म्हणून या तेलानें चालतील अशीं इंजिनें करण्याची खटपट कांहीं संशोधक करीत होते. सरते शेवटीं डाक्टर डिझेल या जर्मन संशोधकानें असलें इंजिन तयार करण्यांत यश मिळविलें, त्यावरून या जातीच्या इंजिनांनां त्यांचेंच म्हणजे डिझल इंजिन असें नांव मिळालें आहे. या इंजिनचें व साध्या ऑईल इंजिनचें मूलतत्व एकच आहे. पण प्रत्यक्ष प्रकार मात्र कांहीं निराळा आहे. या इंजिनमध्यें पहिल्या म्हणजे श्वसनाच्या धांवेला नुसती हवाच इंजिनमध्यें येते. दुसऱ्या दबनाच्या धांवेला ही हवा दावली जाते पण यावेळीं हवेचा दाब फारच म्हणजे सुमारें पांचशें पौंड असतो. हवा जोरानें व लवकर दबली जात असल्यामुळें ही हवा फार गरम होते. इतकी कीं या हवेंत कसलेंहि तेल आलें तरी तें तावडतोब पेट घेतें. यामुळें डीझल इंजिनमध्यें व्हेपोराइझर मुळींच नसतो. पण पांचशें पौंड दाबाच्या हवेमध्यें नुसतें तेल येणें शक्य नसतें व तेल एकदम येण्यापेक्षां फुटून आलेलें जास्त चांगलें. कारण त्यामुळें तें चांगलें जळलें जातें. चांगलें जळल्यामुळें इंजिनमध्यें घाण सांचत नाहीं. सांचल्यास फार कमी सांचते. म्हणून हें तेल आंत जाण्याकरितां दुसरा एक हवा दावण्याचा पंप ठेवावा लागतो. या पंपानें हवा इंजिनमध्यें दावल्या जाणाऱ्या हवेपेक्षां सुमारें दोनशें रत्तल म्हणजे ७०० । ७५० पौंडांपर्यंत जास्त दावली जाते. या पंपाचा उपयोग इंजिन चालू करण्याकरतां लागणारी हवा ज्या बाटल्यांत भरलेली असते तें बाटलें भरण्याकडेहि होतो. हीं इंजिनें शक्ति उत्पन्न करण्याकरतां सरासरीनें फारच थोडें तेल जाळतात. त्यांमध्यें हवेचा दाब फार असल्यामुळें इंजिनांचें भागहि मोठमोठे जाड बनवावे लागतात. याच जातीचीं इंजिनें फार मोठीं म्हणजे पांचपांचशें ते दोनदोन हजार हॉर्सपावरचीं करतात. क्वचित हल्लीं बोटींत घालण्याचीं इंजिनें चार पांच हजार हॉर्सपावरचींहि प्रचारांत येऊं लागलीं आहेत.

क्रूड ऑईलनें डिझल इंजिनें चांगलीं चालतात असें दिसून आल्यावर साधीं इंजिनेंहि क्रूड ऑईलनें चालविण्याची कांहीं तरी योजना करण्याकडे शोधकांचें लक्ष लागलें. यावेळेस डिझल इंजिनमध्यें जास्त दाबाची हवा व क्रूड ऑईलचें–तेलाचें–अगदीं पुरें फुटून जाणें या दोन्ही गोष्टी डोळ्यासमोर होत्या. त्यांपैकीं हवा डिझेलइतकी दावणें त्यांनां अशक्यच होतें; परंतु त्यांनीं तो दाब २५० पौंडांपर्यंत वाढविला; व त्या दाबाच्या योगानें होणाऱ्या उष्णतेचा फायदा घेतला. तसेंच त्याच वेळेस मागें सांगितलेला वाटोळा गरम गोळाहि ठेवला. नंतर तेल जावयाचें तें दाट न जाऊं देतां एका जोरकस पंपाच्या योगानें बारीक छिद्रांच्या चक्रतींतून इंजिनमध्यें सोडलें. यामुळें तें अगदीं फुटून आंत गेल्यामुळें दावलेल्या हवेचा गरमपणा व गरम गोळ्याची उष्णता ही दोन्हीं एकत्र मिळून एकंदर उष्णतेमुळें तेलाची तावडतोब वाफ होऊं लागली. तसेंच तेलाची वाफ हवेचा द.व पुष्कळ असल्यामुळें त्यांत चांगली मिसळावयास लागली. यामुळें इंजिनचे भागहि लहान करतां येऊं लागले. इंजिनेंहि मोठमोठीं म्हणजे पन्नासपासून शंभर हार्सपावरपर्यंतचीं होऊं लागलीं. पण अद्याप हीं इंजिनेंहि स्फोटकच होतीं.

यानंतर कांहीं शोधक आणखी पुढें गेले. मुळींच न तापवितां इंजिन कां चालवितां न यावें याबद्दल प्रयत्न सुरू झाला व हल्लीं चार पांच वर्षें बाजारांत ऑईल इंजिनें मुळींच न तापवितां चालू करतां येणारीं निघालीं आहेत. यांचें मुख्य तत्त्व असें आहे कीं इंजिनमध्यें ३५० पौंडपर्यंत हवा दावली असतां तीमध्यें कसलेंहि तेल जळेल इतकी उष्णता उत्पन्न होते. तथापि डिझलमध्यें दाब जास्त असल्यामुळें तसेंच जास्त दाबाचे वायू कांहीं वेळ पावरस्ट्रोकच्या वेळेस ठेवतां येण्याची पद्धत असल्यामुळें जो सरासरी दाब वाढतो तो या जातीच्या इंजिनमध्यें नसतो. तसेंच तेल जाण्यासाठीं जास्त दाबाची हवा न वापरतां पंपच वापरलेला असतो. हा यांत व डिझेल इंजिनमध्यें फरक आहे. या जातीच्या इंजिनमध्यें जर कांहीं कारणामुळें हवा कमी दावली गेली तर इंजिन चालूं होत नाहीं (ले.

**तोडभीम**—हें गांव राजपुताना, जयपूर संस्थानांतील हिंदौन निझामतीच्या तोडभीम तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. येथील लोकसंख्या १९०१ सालीं ६६२९ होती. या गांवांत ८ शाळा आहेत.

**तोडरमल** ( राजा )—हा अकबर बादशहाचा प्रसिद्ध दिवाण जातीनें खत्री रजपूत असून अतिशय हुषार आणि बुद्धिमान होता. प्रथम लष्करी खात्यांत तो एक लहानसा नोकर होता. परंतु पुढें त्याच्या अंगचे मुत्सद्दीपणादि गुण अकबराच्या नजरेस आल्यावर त्यानें त्यास मोठ्या योग्यतेस चढविलें. इ. स. १५६७ त अयोध्याप्रांतांत शिकंदरशहाचा पराभव करण्याकरितां ६००० सैन्यानिशीं तोडरमलाची रवानगी करण्यांत आली. या कामगिरीमध्यें त्यानें चांगलें यश मिळविलें. ह्याप्रमाणें ज्या ज्या स्वारीमध्यें अकबर बादशहा त्याची योजना करी त्या त्या स्वारींत तो यशस्वी होई. पुढें ( १५७६ ) गुजराथ प्रांताची व्यवस्था करण्यासाठीं व सरकारसारा ठरविण्यासाठीं पाठविलें असतां तिकडे जाऊन त्यानें फार चांगली कामगिरी बजावली. सुरतेपर्यंत सर्व प्रांताची पहाणी करून जागजागचे संस्थानिक व जहागिरदार यांनां अकबराचे मांडलिक बनविलें. याची ही गुजराथेंतील कामगिरी पाहून अकबर त्याजवर फार खूष झाला व त्यानें ओरिसा प्रांताच्या दाउदखान नामक सुभेदारावर त्यास पाठविलें. तोडरमलानें खानाचा पराभव करून सर्व प्रांत जिंकला. यानंतर गुजराथमध्यें पुन्हां बंडाळी झाल्यामुळें ती मोडण्यासाठीं अकबरानें तोडरमलास गुजराथेंत पाठविलें ( १५७८ ). त्यानें वजीरखानाचा पराभव करून तिकडे शांतता प्रस्थापित केली व याबद्दल अकबरानें त्यास आपला वझीर नेमिलें.

तोडरमल गुजराथेंतून परत आला नाहीं तोंच बंगाल आणि बिहार प्रांतांमध्यें बंडें उद्भवलीं. तोडरमल यानें पुन्हां बहार प्रांतावर स्वारी व मोंगीरचा किल्ला हस्तगत केला. तेथील बंडखोरांशीं मोठ्या शिताफीनें लढून व त्यांचा पूर्ण नाश करून तो दिल्लीस परत आला. इ. स. १५८४ मध्यें तोडरमलानें बंगाल देशाचा बहुतेक भाग दिल्लीपतीच्या सार्वभौमत्वाखालीं आणिला. ह्या कामगिरीबद्दल अकबर बादशहानें त्यास 'दिवाण' ही पदवी दिली. राजा तोडरमल हा जसा समशेर गाजविण्यांत कुशल होता तसाच मुत्सद्देगिरीमध्येंहि तो अद्वितीय होता. पराक्रमी योद्धा या नात्यापेक्षां कुशल बुद्धीचा मुत्सद्दी म्हणून त्याचें नांव इतिहासांत प्रसिद्ध आहे. अकबराच्या राज्यांतील ( कायमधाऱ्याच्या ) वसूलपद्धतीची जी अजरामर कीर्ति झाली तिचें श्रेय तोडरमल ह्यासच देणें योग्य आहे.

तोडरमल याच्या वसूलपद्धतीस 'असल-इ-जमा-इ-तुमार' असें नांव आहे. प्रथमतः तोडरमलानें प्रत्येक प्रांतांतील जमिनींची एका प्रमाणांत मोजणी केली. मोजणीचें सारखें प्रमाण ठरवून त्यास त्यानें 'इलाही गज' असें नांव दिलें. प्रमाणें ठरविल्यावर जमिनीचें वर्गीकरण करण्यांत आलें. सुपीक ( पुलेज ), मध्यम व रेताड अगर बरड ( बंजर ) जमीन अशी जमिनीची वर्गवारी लावून त्यावरून एकंदर जमीनधाऱ्याचा अजमास आंखण्यांत आला.

पहिल्या दोन वर्गांतल्या जमिनींचा शेतसारा नक्त घेण्याचा परिपाठ होता. या नवीन वसूलपद्धतीप्रमाणें अकबराच्या राज्याचा एकंदर जमीनमहसूल ९०७४३८८१ रुपये झाला. बंगालमधील हल्लीं प्रचलित असलेल्या कायमधाऱ्याच्या पद्धतीचा मूळ उत्पादक तोडरमलच होय.

तोडरमलानें सर्व मुलकी खात्यांत हिंदी भाषेच्या ऐवजीं फारसी भाषा उपयोगांत आणिली. ह्यामुळें सर्व राज्याचे हिशोब याच भाषेमध्यें होऊं लागले तेव्हां साहजिकच पुष्कळ हिंदु लोक ही भाषा शिकून हींत प्रवीण झाले.

वसूलपद्धतीप्रमाणेंच तोडरमलानें टांकसाळेमध्येंहि सुधारणा करून त्यानें चांगलें नांव मिळविलें. त्यानें पूर्वीच्या नाण्यांत सुधारणा करून नवीन मोहरा व रुपये पाडिले. ता. १० नोव्हेंबर १५८९ रोजीं ५४ वर्षांचा होऊन तो लाहोर येथें मरण पावला. मुसुलमान इतिहासकारांनींहि तोडरमलाची फार प्रशंसा केली आहे. अबुलफझल यानें त्याचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे. "तोडरमल हा फार हुषार आणि मेहनती असून त्याला द्रव्यलोभ बिलकुल नव्हता. त्याचा स्वभाव फार करारी असे. हिंदूंचे पवित्र सण तो फार कडकपणानें पाळी. प्रतिदिवशीं आपला कांहीं काळ तो ईश्वरभजनामध्यें नियमितपणें घालवीत असे. तो पुष्कळ दानधर्महि करी. एकंदरींत तो इतका भाविक होता कीं, खुद्द अकबरासारख्या थोर आणि परधर्मसहिष्णु मोंगल बादशहानेंहि त्याच्या विलक्षण धर्मश्रद्धेबद्दल त्यास दोष दिला."

तोडरमलासारखे हिंदु मंत्री अकबराजवळ मोठ्या योग्यतेस चढल्यामुळेंच हिंदु लोकांच्या उन्नतीस पुष्कळ साहाय्य झालें. मृत्युसमयीं तोडरमलास एक पुत्र होता. त्याजकडेहि सातशें स्वारांची मनसब असून तोहि अकबराच्या कारकीर्दींत प्रसिद्ध योद्धा होता. तो ठठ्ठा येथें समरांगणावर मृत्यु पावला. तोडरमलास अकबरानें 'मुश्रीफ-इ-दिवाण' असा मोठा अधिकार दिला होता. [ इतिहाससंग्रह. पु. १, अं. ४; बील. ]

**तोंडली**—या वेलास लॅटिनमध्यें सेफालँड्रा इंडिका, संस्कृतमध्यें तुडिकेरी, मराठींत तोंडली-तेंडली असें म्हणतात. तोंडल्याचे वेल असतात, ते अनेक वर्षे जगतात. सरदगरम हवेंत सर्व वर्षभर फळें येतात. वेल मांडवावर अगर दुसऱ्या झाडावर चढवितात. थंडीच्या दिवसांत फळें कमी धरतात. उन्हाळ्यांत व पावसाळ्यांत विपुल धरतात. कोंकणांत पाऊस जास्त असल्यामुळें पावसाळ्यांत फळें कुजतात त्यामुळें थंडी व उन्हाळ्यांतच फळें जास्त येतात. वेलास फातर अगर चिरकीं पानें येतात. फुलें पांढरीं येतात. फळें तुळतळीत हिरव्या रंगाचीं सुमारें इंचभर जाड व २।३ इंच लांब येतात. हिरवेपणीं

खाण्यास कांकडीसारखीं लागतात. त्यांत कांकडीसारखा चीक असतो. फळांत कांकडीप्रमाणें बिया असतात. फळ पिकल्यावर तांबडें होतें. बी सुकल्यावर लावण्यास उपयोगी पडतें. परंतु वेलाची कडीं अगर कलमें लाविल्यापासून त्यांस लवकर धुमारे फुटतात व त्यांचे चांगले जोरदार वेल वाढतात म्हणून हीं घरून त्यापासून नवे वेल करण्याच्या भानगडींत कोणी पडत नाहीं. वेलाची कडीं उन्हाळ्यांत लावावीं. देशावर पावसाळ्यांत लावावीं. तोंडल्याची भाजी राजमान्य आहे. वांगीभाताप्रमाणें तोंडली-भात करतात, तोहि प्रसिद्ध आहे. तोंडलें बुद्धिनाशक आहे असें म्हणतात.

**तोतया भाऊसाहेब**—पानिपतांत सदाशिवरावभाऊ पडल्यानंतर त्याचा एक तोतया निघाला होता. त्या काळीं अशा तोतयांचा बराच सुळसुळाट होई. जनकोजी शिंदे, यशोदाबाई पेशवे, रामराजा छत्रपति वगैरे मोठमोठ्या लोकांचे तोतये तर निघालेच होते; परंतु शिपायी प्याद्यांचेहि तोतये निघाल्याचा दाखला आढळतो. भाऊसाहेबांच्या तोतयाची हकीकत अशीः---भाऊंच्या विषयीं कित्येक सामान्य समजुतींच्या माणसांचा त्यावेळीं असा तर्क होता कीं, ते पानिपतांतून वांचून कोठें तरी गुप्तपणें राहिले आहेत. खुद्द पार्वतीबाई ( भाऊंची पत्नी ) हिनें ही समजूत उराशीं बाळगून ती सौभाग्याचीं सारीं चिन्हें अंगावर बाळगून असे. या भ्रमाचा फायदा घेऊन लुच्चा लोकांनीं दौलतींत बखेडे उत्पन्न केले. पानिपतानंतर ७।८ महिन्यांनीं महाराष्ट्रांत प्रथम बातमी पसरली कीं, भाऊ जिवंत आहेत. त्यावर लागलीच मसलती सुरू होऊन लोक तर्कवितर्क करूं लागले. परंतु अखेर ती बातमी खोटी ठरली. थोड्या दिवसांनीं पुन्हां अशी बातमी पसरून ती खोटी ठरली. तिसऱ्यानें १७६३ सालीं एक माणूस माळव्यांत फौज जमा करून भाऊ म्हणवून दंगा करूं लागला; परंतु मल्हारराव होळकरानें त्याला पकडून कैदेंत ठेविलें. त्यानंतर हा पुढील तोतया निर्माण झाला.

बुंदेलखंडांत छत्रपूर जवळील कनोल गांवीं सुखलाल नांवाचा कनोजा ब्राम्हण होता; त्याच्या बापाचें नांव रामानंद व आईचें नांव अन्नपूर्णा. भाऊबंदांच्या तंट्यास त्रासून सुखलाल घरून निघून नरवर येथें आला. तेथें थकून एका वाण्याच्या दुकानीं बसला असतां दोन तीन दक्षिणी माणसांनीं त्याला पाहून म्हटलें कीं, तूं भाऊसाहेबासारखा दिसतोस, तुला पेशवाई देऊं, चल. सुखलाल धाडशी व धूर्त होता. त्यानें या साम्याचा फायदा घेऊन त्यांच्या म्हणण्याप्रमाणें भाऊ म्हणून आपल्यास जाहीर केलें. नरवर येथें शंभुपुरीपंथाच्या गोसाव्यांचा एक मठ होता, तेथील पुष्कळ गोसावी सुखलालास मिळाले व हें खूळ झपाट्यानें वाढलें; तोतयानें फौजहि जमविली. या खुळांत जे बडे लोक मिळाले त्यांच्या वर्तनांत लबाडी किंवा भोळेपणा किती होता हें ठरविणें बरेंच कठिण आहे. एवढें खरें कीं, पार्वतीबाईशिवाय पेशवेकुटुंबांत व पेशवाई सरदारांतहि कोणीहि तोतयावर विश्वास ठेविला नाहीं.

नरवरहून जवळ करेरा येथें झांशीचा सुभेदार नारोशंकर यांचा पुतण्या विश्वासराव राहत होता. त्याला तोतयानें तेथील किल्ला आपल्याला देण्याबद्दल कळविलें. त्यानें दोनदां माणसें पाठवून खात्री करून घेऊन मग किल्ला स्वाधीन केला. त्याबरोबर हिंदुस्थानांतील ठिकठिकाणचे मामलेदार भेटीस येऊन वसूलहि मिळूं लागला. शिंद्यांच्या चिटणिसाकडूनहि तोतयानें पैका घेऊन फौज चाकरीस ठेवली. त्यानें खरोखरीच्या पेशव्याप्रमाणें फौज, तोफा, गारदी, डेरेराहुट्या, हत्ती, पालख्या वगैरे सारा सरंजाम ठेवून तो दक्षिणेकडे आला. या स्वारीच्या खर्चासाठीं त्यानें वाटेंतील मराठ्यांचेच गांव लुटले.

समशेर बहादुराच्या मेव्हण्यानें नारायणराव पेशवे यास व दोन भिक्षुकांनीं खुद्द पार्वतीबाईस पत्रें लिहिलीं कीं, भाऊ खरे आहेत. शिवाय उत्तरेकडून अनेक सरदारांच्याकडे भाऊ खरे असल्याबद्दल पत्रें आलीं. तोतया नर्मदा व तापी उतरून खानदेशांत दंगा करूं लागला; तेव्हां थोरल्या माधवरावांनीं फौज पाठवून त्याला पकडून धनगडास कैदेंत टाकलें. पुढें त्यांची व जनकोजीच्या तोतयाची पुणें येथें जाहीर चौकशी करून ते खोटे असें नक्की ठरल्यावर त्यांनां प्रतिबंधांत ठेविलें( १७६७ ). भाऊच्या तोतयास नगरच्या किल्ल्यांत पाठविलें.

तोतयाला एके जागीं न ठेवितां निरनिराळ्या किल्ल्यांवर ठेवीत. दौलताबाद, मिरज, रत्नागिरी वगैरे ठिकाणीं त्याला ठेविलें ( १७७५ ).रत्नागिरीचा सुभेदार रामचंद्र नाईक परांजपे हा होता, त्यानें फितूर होऊन तोतयाला सोडून त्याची द्वाही फिरविली ( १७७६ एप्रिल ). तोतयानें फौज जमवून कोंकणांत धुमाकूळ घातला. सरकारचें सर्व आरमारहि त्याच्या स्वाधीन झालें. कोंकणांतील बहुतेक किल्ले व मुलूख काबीज करून बोरघांट चढून त्यानें राजमाची घेतली व सिंहगडाकडे मोर्चा लाविला ( आक्टोबर ). यावेळीं त्याला इचलकरंजीकर घोरपडे,इंग्रज,कोल्हापूरकर,हैदर यांनीं मदत केली. इतकें झाल्यावर नाना फडणिसानें शिंदे, होळकर व पानशे यांनां तोतयावर पाठविलें.महादजीनें प्रथम सिंहगडचा बंदोबस्त केला; पानशे यानें तोतयावर हल्ले करून त्याला मार्गे हटविलें व राजमाचीहून त्याला हांकलून दिलें; तेव्हां तो कोंकणांत पळाला. त्याच्या मागें शिंद्यानें आपला दिवाण बाळाराव यास पाठविलें. तोतया वेलापुरास येऊन गलबतांतून इंग्रजांकडे मुंबईस निघाला. राघोजी आंग्र्यानें बातमी राखून त्यानें गलबत मध्येंच पकडलें व त्याच्या सर्व लोकांनिशीं त्याला पुण्याला आणलें ( नोव्हेंबर ).

तोतयानें पुन्हां आपली चौकशी करावी म्हणून विनंति केल्यावरून नानानीं, रामशास्त्री, गोपीनाथ दीक्षित, हरिपंत फडके, बापूजी नाईक बारामतीकर वगैरे पंच नेमून जाहीर चौकशी केली. तींत तोतया सर्वानुमतें खोटा ठरल्यावर त्याची धिंड काढून व शहरांतील सर्व लोकांस

व सर्व सैन्याची नीट व्यवस्था करण्यांत आली. नेपोलियनच्या सर्व लढाया तोफखान्यांच्या वळावरच जिंकल्या गेल्या. तोफखान्याच्या हालचालीवरून तो सर्वदा यशस्वी होत असे.

सन. १८१५ – १८७० या कालांत तोफांच्या बाबतींत बरीच यांत्रिक सुधारणा अमलांत आली. अमेरिकन सिव्हिलवॉरमध्यें, लांब पल्ल्याच्या बंदुका असलेलें पायदळ आधारास ठेवून तोफखाना मार्गे ठेवण्यांत आला होता. स.१८७० मधील फ्रँकोजर्मन युद्धांत सुधारलेल्या जर्मन तोफखान्यापुढें फ्रेंचांचा टिकाव लागला नाहीं. प्रथम तोफांचा मारा करून नंतर पायदळ पुढें पाठवावें व हल्लयास सुरवात करावी अशी युक्ति या युद्धांत अमलांत आली होती. १८९१ सालीं जर्मन सैन्यांतील जनरल बुइली यानें 'फील्ड गन ऑफ दि फ्यूचर' नामक एक पुस्तक लिहिलें व त्यांत अनेक शोध ग्रथित केले. १८९२ सालीं एका फ्रेंच तज्ज्ञानेंहि कांहीं शोध लाविले. नव्या शोधांचा प्रसार होऊन जलद उडणाऱ्या तोफा अस्तित्वांत आल्या. तोफ उडाल्यावर पुनः दारूगोळा भरण्याची व कालक्षेप करण्याची आतां अवश्यकता उरली नाही. पूर्वी धुरामुळें नेम धरण्यास कठिण पडत असे परंतु हल्लीं विन धुराच्या तोफाहि अस्तित्वांत आल्या आहेत.

घटनाः—रणक्षेत्रावरील तोफखान्यांत मुख्यतः तीन गोष्टी असतात. पहिली गोष्ट साहित्य ही होय; यांत, तोफा गाड्या, दारूगोळा व इतर सामान यांचा अन्तर्भाव होतो. तज्ज्ञ लोकांमध्यें वरिष्ठ अधिकारी, गोलंदाज, गाड्या हांकणारे व कारागीर यांचा समावेश होतो. तिसरी गोष्ट म्हणजे घोडे, मोटारगाड्या व यांत्रिक सामान इत्यादि होत. या वस्तूंची रणमैदानावर फार जरूरी असते. पॉम पॉम नामक यांत्रिक तोफा व हॉविट्झर तोफा यांचाहि उपयोग करण्यांत येतो. क्यू. एफ्. तोफ निघाल्यापासून भरपूर दारूगोळा ठेवण्यांत येऊं लागला. पूर्वी एका तोफेस एक वॅगन दारूगोळा पुरत असे; हल्लीं तीन वॅगन दारू दर तोफेजवळ असावी लागते. इंग्लंडांत तोफखान्यावरील अधिकाऱ्यांचे हुद्दे मेजर व कॅप्टन असे आहेत. प्रत्येकी दोन तोफांच्या तीन तुकड्या मिळून एक बॅटरी होते. या तुकड्यांची पुन्हां एक एक तोफेची पोटतुकडी असते. घोडदळाचा तोफखाना, रणक्षेत्रावरील तोफखान्याहून भिन्न असतो. डोंगरावरील तोफखाना नेआण करण्याकरितां खेचरें वगैरे ठेवावीं लागतात. इंग्लंडमधील, रॉयल रेजिमेंट ऑफ आर्टिलरीचे रॉयल हॉर्स, रॉयल फील्डर व रॉयल गॅरिझन आर्टिलरी असे तीन विभाग आहेत व प्रत्येक विभागास रिझर्व व टेरिटोरियल तोफखाना जोडण्यांत आला आहे.

डा व पें चा चें का म.-रणभूमीवरील तोफखान्याचें मुख्य काम म्हणजे ज्या विवक्षित जागेवर हल्ला करणें इष्ट असेल तेथें गोळयांचा वर्षाव करणें हें होय. विशिष्ट ठिकाणीं राहून मारा करणें ही दुसरी महत्त्वाची बाब असते. 'एलिव्हेशन', 'डिरेक्शन' व 'लेइंग' असे तीन युक्तींचे प्रकार तोफा रोखण्याच्या कामीं योजण्यांत येतात. 'रेंजिंग' म्हणजे विस्तार व अंतर शोधून काढणें हें होय. परंतु या कामीं सरावतीची पाहणी करणें जरूर असतें. किंबहुना या पाहणीवरच अचुक 'रेंजिंग' करतां येणें शक्य असतें. कमांडर किंवा ऑब्झर्विंग पार्टीकडून ही पाहणी, तोफेचे गोळे सोडून, करण्यांत येत असते. एका तुकडींतील दोन तोफा कांहीं अंतर सोडून उडविल्या जातात व दरम्यानचें अंतर निश्चित करून मारा अचूक करतां येतो. 'टाइमश्रॅपनेल' हेंच सर्वांत श्रेष्ठ अस्त्र होय असें जर्मनांचें मत आहे. युद्धक्षेत्रावरील तोफांचें कार्य तीन प्रकारचें असतें. युद्धारंभीं आघाडीच्या सैन्यांत मदत करणें, पायदळी हल्लयाची तयारी करून देणें व त्यास आधार देणें हीं मुख्य कामें होत. तोफांचें मुख्य कार्य शत्रूंच्या तोफांवर व गोलंदाजांवर मारा करणें हेंच असतें. पायदळ व तोफखाना यांचें नेहेमीं सहकारित्व असावें लागतें. हल्लीं तोफांचा मारा पायदळाच्या डोक्यावरून केला जातो. जलद मजल मारणें, रणक्षेत्रावरील संचार, एकाच ठिकाणीं सर्व सामर्थ्य केंन्द्रीभूत करणें इत्यादि अनेक युक्त्या योजण्यांत येतात. हल्ली लांब पल्ल्याच्या तोफामुळें बरीच क्रांति घडून आली आहे.

म हा यु द्ध का ल.—महायुद्धापूर्वी तोफा उडविण्याच्या पद्धतीविषयींच्या व तोफांच्या उपयुक्ततेविषयींच्या कल्पना सर्व राष्ट्रांत जवळ जवळ सारख्याच होत्या. पण महायुद्धामध्यें तो सर्व प्रकार बदलून, ज्या राष्ट्राला जी जी पद्धत स्वीकारावीशी वाटली त्या त्या पद्धतीचा त्यानें स्वीकार केला व त्यामुळें निरनिराळ्या पद्धती अस्तित्वांत आल्या आहेत. या महायुद्धांतील महत्त्वाच्या पद्धती म्हणजे ( १ ) परमुलुखावर बेधडक चाल करून जाणें, ( २ ) खंदकाच्या आश्रयानें लढाई चालविणें व ( ३ ) शत्रूची फळी फोडणें या होत. पहिल्या पद्धतीमध्यें ज्यावेळीं शत्रु परमुलुखावर स्वारी करून जातो त्यावेळीं त्याला शक्य तितकी झपाट्यानें चाल करावी लागते. त्यामुळें सैन्य व तोफा जितक्या लवकर नेल्या जातील तितकें अधिक फायद्याचें असतें. यासाठीं मोटारींचा फार उपयोग होतो. मोठमोठ्या तोफा घोड्यांच्या करवीं ओढून नेण्याची पद्धत अलीकडे कुचकामाची ठरली आहे व तीबद्दल मोटारींचा उपयोग करण्यांत येऊं लागला आहे; व थोडक्याच काळांत ही पद्धत सरसहा अमलांत येईल असें वाटतें. त्याचप्रमाणें तोफा रस्त्यावरून नेण्याऐवजीं त्या रुळांवरून मोटारींच्या द्वारें नेण्याची पद्धत अधिक हितावह आहे असें आढळून आलें आहे. याचा उपयोग जर्मनांनें बेल्जममधील व उत्तर फ्रान्समधील किल्ले जमीनदोस्त करण्याच्या कामीं केला. त्यांनीं किल्ल्याकडे रस्त्यानें तोफा न नेतां रेल्वे-रुळांच्या साहाय्यानें नेल्या.

पायदळ व गोलंदाजांचें सैन्य ( तोफखाना ), यांचें परस्पर साहाय्य असल्यास त्याचा अधिक उपयोग होतो असें अलीकडे प्रत्ययास येत चाललें आहे. अर्थात पायदळ व

तोफखाना यांनीं परस्परांनां साहाय्य व्हावयाचें म्हणजे त्यांच्यामध्यें कायमचें दळणवळण पाहिजे. हें दळणवळण चालू ठेवण्याचीं पुष्कळ साधनें निघालीं. 'लाईट सिग्नल' हा जर्मनांचा उपाय अधिक उपयुक्त आहे. त्याशिवाय, 'बॅरेजची' युक्ति अमलांत आलेली आहे. प्रत्येक पायदळाच्या तुकडीबरोबर, 'गन्स ऑफ अकंपनीमेंट' ठेवण्याची सोय करण्यांत येऊं लागली आहे. कारण कदाचित तोफखान्यामधील व पायदळामधील दळणवळण नाहींसें झाल्यास, पायदळावर आपत्ति येण्याचा संभव असतो. या 'गन्स ऑफ ॲकंपनीमेंट्स' चा नाश करावयाचा असल्यास तो तोफांच्या योगानें केला पाहिजे.

खंदकाच्या आश्रयानें चालणाऱ्या लढाईमध्यें तोफखान्यासाठीं तीन भागा ठेवलेल्या असतात. एक खुद्द रणक्षेत्रामध्यें, दुसरी मध्यभागीं व तिसरी सैन्याच्या पिछाडीला. तोफखान्याचा एकतृतीयांश भाग आघाडीला असतो व बाकीचा मध्यभागीं असतो.

वरील फील्ड आर्टिलरीशिवाय, मध्यम व मोठ्या अशा दोन्ही प्रकारच्या तोफा फील्ड आर्टिलरीच्या पाठीमागें असतात. खंदकामध्यें घुसणाऱ्या गोळ्यांची या महायुद्धांत जरूरी भासूं लागल्यामुळें, हॉवित्झर तोफांचा मोठ्या प्रमाणावर उपयोग करण्यांत येऊं लागला. शिवाय लांववर गोळी जाणाऱ्या तोफाहि तयार करण्यांत येऊं लागल्या. जर्मनीनें अशा प्रकारच्या तोफा तयार केलेल्या होत्या. त्यांतून ११७०० यार्ड म्हणजे जवळ जवळ ७ मैल लांब गोळा जाऊं शकत असे. त्यामुळें फ्रेंचांनांहि तशा प्रकारच्या तोफा तयार करणें अवश्य झालें. जर्मनीनें तर या कामीं कमालच चालविली होती. १९१५ सालीं जर्मनांनीं २५ मैल अंतरावरून डंकर्कवर तोफा डागण्यास सुरवात केली होती व प्रसंग अनुकूल आल्यास यॉर्कमाऊथपासून साउदॅम्पटनच्या सर्व तटावर ११० मैलांवरून भडिमार करूं शकणारी अशी तोफ त्यांनीं तयार केली होती. इंग्रज व फ्रेंच यांच्या जवळ १०० मैलांवर गोळा उडविण्याच्या तोफा नव्हत्या असें नाहीं. पण जर्मनांची तोफ ११० मैल जाणारी होती व त्यामुळें या तोफांच्या बाबतींत जर्मनीनेंच सर्वांत अघाडी मारली असें म्हणण्यास हरकत नाहीं. याशिवाय या महायुद्धांत तोफखान्यासंबंधीची आणखी एक सुधारणा घडून आली व ती म्हणजे, बिन ठिणगीची दारू शोधून काढणें ही होय. त्यामुळें शत्रूला कोठून व किती अंतरावरून तोफ डागली गेली हें कळण्यास बरेंच कठिण जाऊं लागलें. याशिवाय तोफांच्या द्वारें विषारी गॅस पसरणें, शत्रूंच्या बॅटरी उध्वस्त करणें, इत्यादींसंबंधीच्या महत्त्वाच्या सुधारणा घडून आल्या.

शत्रूची फळी फोडण्याच्या बाबतींत शत्रूवर एकदम हल्ला करतांना तोफखाना पायदळाबरोबर चालू ठेवणें जरूरीचें असतें. अशा वेळीं हल्ल्याचें क्षेत्र विस्तृत ठेवणें फायद्याचें आहे. ज्या दिवशीं हल्ला करावयाचा त्या दिवशींच्या पूर्वींच्या रात्रीं युद्धक्षेत्रांत सर्व तोफा आणून त्यांची व्यवस्थित मांडणी करावी लागते. १९१६-१७ च्या अवधींतील युद्धांत तोफखान्याच्या मदतीनें शत्रूवर सात आठ दिवस हल्ला करण्याची पद्धत असे. पण त्यामुळें शत्रूला आपली तयारी करण्यास अवसर मिळे त्यामुळें सहा तासपर्यंत अतिशय जोरानें हल्ला करून शत्रूला नामोहरम करण्याची युक्ति १९१८ सालीं जर्मनीनें अस्तित्वांत आणली.

तोफांमध्यें घालावयाच्या गोळ्यांचे निरनिराळे प्रकार आहेत. त्यांचीं नांवें—गनशार्पनेल, हॉवित्झर शार्पनेल, हाय-एक्स्प्लोझिव्ह शेल, माईननेल, स्मोक शेल उर्फ धुराचे गोळे, इनसेंडियरी शेल, इल्यूमिनेटिंग उर्फ चकाकणारे गोळे, व आरमर-पीयर्सिंग शेल हीं होत.

हिंदुस्थान —वेदकालीं तोफा होत्या असें कांहींनीं म्हणणें आहे. ऋग्वेदांत अश्महन्मन् व अथर्ववेदांत उरुग्राह किंवा शतघ्नि असे शब्द येतात. पण तीं आयुधें तोफाप्रमाणेंच असतील असें सांगतां येत नाहीं. पौराणिक कालांत दशघ्नी, शतघ्नी हे शब्द प्रचारांत आले होते. हीं शस्त्रें तोफांसारखीं असावींत असें म्हणणारा एक पक्ष आहे. भारतीय युद्धांत व रामरावणयुद्धांत त्यांचा उपयोग बराच केलेला आढळतो. मध्यंतरीच्या काळांत ( मध्ययुगांत ) हिंदुस्थानांत तोफा होत्या कीं नाहीं याचा स्पष्ट उल्लेख आढळत नाहीं. यवन ( ग्रीक ) लोकांनीं हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या त्यावेळीं तोफा उपयोगांत आणल्या होत्या.

मुसुलमान लोकांनीं हिंदुस्थानावर स्वाऱ्या करतांना तोफा बऱ्याच उपयोगांत आणल्या. त्यावेळीं इकडे गजदळ हें लढाईतील एक अंग असे. या हत्तींनां पळावयास लावण्यांत तोफांचा उपयोग होई.

मोंगल घराण्यांत बादशाही सैन्याबरोबर तोफखाना ठेवीत असत. त्याच्याच जोरावर विजापुर, गोवळकोंडा, नगर, दौलताबाद वगैरे मजबूत ठिकाणें मोंगलांनीं काबीज केलीं. या तोफखान्यावर बहुधा युरोपियन गोलंदाज व अधिकारी असत; त्यांत पोर्तुगीज, फ्रेंच या युरोपियनांचा भरणा विशेष असे.

बाबर व अकबर यांचा तोफखाना बरा असे. मात्र मोंगल तोफखान्यासंबंधीं युरोपियन लोकांचें मत चांगलें नाहीं. दारू भरून २।३ तास गोलंदाज चिलमी फुंकीत बसत अशा प्रकारें दोन तासांत तीनचारदां बार काढीत असें या लोकांनीं त्यांचें वर्णन केलें आहे. साधारण हें वर्णन पेशवाईंतील इब्राहिमखान व युरोपियन दरोगे यांच्या देखरेखीखालील तोफखाने सोडून बाकीच्या बहुतेक तोफखान्यांनांहि लागू पडे. मोंगली तोफा फार जड व दिखाऊ असून, त्यांचीं नांवें, गाझीखान, धूमधाम, गडभंजन, फतेलष्कर अशीं असत. शीख लोकांनीं लांकडी तोफा कोचीन-चीनमधून आणल्या होत्या असें म्हणतात.

हलक्या तोफांत सुतर ( उंटावरील ) व हाथ ( हत्तीवरील ) नाळा या मुख्य असत. त्या सोडतांना त्या त्या जनावरांना खालीं बसवून व त्यांचे पाय बांधून मग सोडीत. मोंगली तोफखान्यांत यूरोपियन दरोग्या( गोलंदाज )चा पगार दरमहा २०० पर्यंत असून त्यास मीर आतश म्हणत. तोफखाना हा खास सरकारचा असे. सरंजामदारी सरदारांचा त्यांवर अधिकार नसे.

मराठ्यांमध्यें फक्त शिवाजीनें प्रथमपासूनच तोफखान्याचें महत्त्व ओळखलें होतें. त्यानें इंग्रज व पोर्तुगीज यांच्याशीं तोफा पुरविण्याबद्दल तहहि केले होते. पेशव्यांनींहि या लोकांपासून तोफा खरेदी केल्या होत्या व तोफा ओतण्याचे कारखानेहि (थोडकेसे ) आपल्या राज्यांत(पुणें, मिरज, वगैरे ठिकाणीं ) काढले होते. तोफखान्याचें एक स्वतंत्र खातें काढून त्यावर पानसे या घराण्यांतील मंडळीस नेमण्यांत आलें होतें. १७६० सालीं पुण्यास दुसरा एक नव्या तोफा करण्याचा कारखाना काढला होता; त्यांत चौंडसीसाठीं जी माती लागे ती साष्टी प्रांतांतील मौजे वडवली येथून आणीत असत. पेशवाईंतील कांहीं तोफा दहापासून तीस शेर वजनी गोळे फेंकणाऱ्या होत्या. या तोफा ओढण्यास बैल लावीत. फार प्रचंड तोफा असल्यास हत्तींचा उपयोग करीत. घनगर्ज, कडकबिजली, गणेश, कालापहाड, हणमंत, जयवंती, गरुड, राजहंस, मकरध्वज वगैरे नांवें तोफांनां देत. भक्कम तट फोडण्यास हल्लींच्या हॉविट्झरसारख्या तोफा असत. त्यांना दिवाळतोड किंवा गरनाळ तोफा म्हणत. गरनाळींत पंचरसी पोकळ गोळे ( आंत स्फोटक द्रव्यें भरलेले ) घालीत. आज माऊंटनगन्स म्हणून जशा तोफा आहेत, तशा त्यावेळीं जंबूरा, सुतरनाला म्हणून लहान लहान व उंटावर नेतां येणाऱ्या तोफा असत व त्यांचे गोळे १ शेर वजनी असत. लंवछडी नांवाचा एक तोफांचा त्या वेळचा प्रकार सांप्रतच्या लांब पल्ल्याच्या ( लॉंग रेंज ) तोफासारखाच असावा.

तोफा बिडाच्या तशाच पंचरसीहि ओतीत व त्यांचा आकारहि त्यांच्या उपयोगाप्रमाणें निरनिराळा असे. १७७१त असीरगडास ज्या पंचरसी तोफा होत्या त्यांपैकीं कांहींचीं नांवें: चांद, लक्ष्मी, गुलाब, यशवंती, मार्तंड, भवानीप्रसाद, लक्ष्मण, महबूब अशीं होतीं; विजापुरची प्रख्यात तोफ मुलुख-ई-मैदान ही पंचरसी असून ( त्या वेळच्या मानानें ) फार प्रचंड आहे. हल्लींच्या तोफखान्याच्या बॅटरीप्रमाणें त्या वेळीं तोफखान्याची जी तुकडी असे तिला अराबा म्हणत व त्यावरील वरिष्ठ अधिकाऱ्यास दरोगा म्हणत. तोफखान्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्यास तोफखाने व गोलंदाजास तोफची अशीं नांवें आढळतात; शिवाय तोफदाज, देगंदाज, बंधानी, सारवे वगैरे अधिकारदर्शक नांवेंहि सांपडतात. तोफेच्या गोळ्यांत स्फोटक द्रव्यें जशीं असत तसेच कांहीं गोळे असेहि असत कीं, त्यांत खिळे, चाकू, कात्र्या वगैरे तीक्ष्ण वस्तू असत. न उडतां फुकट गेलेल्या गोळ्यांनां उकाल अशी संज्ञा असे.

तोफांशिवाय दारूचे बाण ( हल्लींचे रॅकेट ) असत. हे लोखंडी पोकळ नळीचे व आंत दारू भरलेले असत. या बाणांनां पेटवून मग ते शत्रूवर सोडावयाचे असत. हें काम करणाऱ्या लोकांनां बाणदार म्हणत. बाणाच्या जुडग्यांनां कैची म्हणत. बहुधा २४ ते ३० बाणांची एक कैची असे व त्या कैच्या उंटावर लादीत. कैचीदारास दरमहा ७ रु. पगार असे. बाणांचा कारखाना नाशिक येथें बाळा खंडेराव यानें काढला होता ( १७६५ ). त्यावेळीं दर बाणास ५ रुपये किंमत पडे.

तोफखान्याकडे लागणारें लोखंड, पेशवे हे मुंबईस ( इंग्रजांकडील ? ) खरेदी करीत. बिडाच्या लहान तोफेस एक हजारापर्यंत किंमत पडे. तोफा विकत घेऊन अथवा ओतवून मग ठिकठिकाच्या ठाण्यांवर ( किल्ले, पेठ्या, शहरें वगैरे) त्या त्या ठाण्यांच्या महत्त्वाप्रमाणें पाठवीत. तोफखान्याच्या सबनिशी कामाचे सरकारी नियम पुढीलप्रमाणें ( १७५५ सालीं ) होते. सबनिसानें सर्वांची हजेरी घ्यावी, पगार त्यानेंच द्यावा. पगारपत्रकावर अनुमतिदर्शक रुकार फडणिसानें करावा. तोफखान्यावरील वरिष्ठ अधिकाऱ्याच्या तैनाती नेमणुकपत्रावर खुद्द पेशव्यांचा रुकार असावा. मोर्चांतील नेमणुकी सबनिसानें कराव्या व त्या लोकांच्या पाठीवर उभें राहून त्यांच्याकडून काम त्यानेंच करून घ्यावें. त्यांनां बक्षिसें द्यावयाचीं असल्यास त्यानें यादी करून पेशव्यांची अनुमति घ्यावी. तोफखान्यावर सबनिसाप्रमाणें पोतनीस असे त्यास सालिना १५० रु. पगार असे.

पुणें येथील आप्पाजी कोकीळ कासार हा तोफखान्याकडील ( सरकारी ) नोकर असून तोफेचे गोळे तयार करीत असे. उदगीरच्या मोहिमेसाठीं त्यानें पांच हजार गोळे तयार केले होते. रत्नागिरीचा देवशेट कासार हा गरनाळीचे गोळे तयार करी. जुन्नर तालुक्यांत आंबेगव्हाण येथेंहि गरनाळी गोळ्यांचा कारखाना होता स. १७९६ मध्यें रावबाजीनें जी इंग्रज पलटण चाकरीस ठेविली होती तींत तोफखान्याकडे पुढीलप्रमाणें असाम्या असून त्यांनां दरमहा पगार पुढीलप्रमाणें असे. मुख्य कपितान ( कॅप्टन ) हा इंग्रज होता, त्याचा पगार ४५० रु., मुख्य गोलंदाजास ६० रु., जमादारास ३० रु., हवालदारास १८ रु., साध्या गोलंदाजास १२ रु., खलाशास १० रु., सुतारास १२ रु., लोहारास ११ रु., बेलदारास ८ रु., तबेलदारास ९ रु., दारूवाल्यास १५ रु., चौधऱ्यास १० रु., गाडीवानास ७ रु. व चांभारास ६ रु. मुंबईहून तोफांप्रमाणें तोफांचे गोळेहि इंग्रजांकडून घेत, त्या कामीं ( १७६४ सालीं ) रत्नोजी आगरवाला व पालणजी पारशी हे दलाल होते. राघोबादादानें यांच्यापासून ३० हजार गोळे घेतले, त्यांची किंमत दर हंड्रेडवेटास १९ रु. होती. अठरा कारखान्यांत तोफखाना येतो; राजव्यवहारकोशांत त्याला यंत्रशाला नांव आहे. किल्ल्यावर तोफखान्याचा मुख्य कामगार कारखानीस असे.

हवार्गांच्या वेळीं त्याच्या मोठया दोनशें तोफा होत्या. प्रत्येक तोफेचें सामान व कामगार दुहेरी ठेविले होते; बैलांप्रमाणें हत्तीहि तोफा ओढण्यास ठेविले होते. खरें म्हटल्यास मराठी राज्यांत तोफखान्याकडे उत्तरोत्तर सुधारणा करण्याचें मराठ्यांनीं टाळलें; त्यामुळें इंग्रजांचीं व फ्रेंचांचीं बरोबरी त्यांनां करतां आली नाहीं. त्या लोकांनीं सारखी सुधारणा चालवेली व यांनीं जुनाच (सोळाव्या शतकांतील) कित्ता गिरवेला व तोहि फिरंग्यांनींच घालून दिलेला.

इंग्रजांनीं तोफखान्याच्या बळावर विजयदुर्ग, मालवण, ठाणें वगैरे ठिकाणें भराभर घेतलीं; तर "शिवलंका (मालवण) असाध्य पण घेतली" असें आम्हीं नुसतें चरफडत बसलों. सावध झालों नाहीं; तोफांच्या बळावर किल्ले राखण्याचेंहि शिकलों नाहीं; तेव्हां रायगड, सिंहगडसारखे प्रचंड किल्ले इंग्रजांनीं सपाट्यानें घेतल्यास त्यांत दोषी कोण? तोफा व दारूगोळे तयार करणारे क्वचक आमच्यांत होते पण स्वस्त मिळत म्हणून हे जिन्नस परक्यांकडून (एका दृष्टीनें शत्रूंकडून) आम्ही विकत घेत होतों. त्याचा परिणाम असा झाला कीं, लांब पल्लयाच्या तोफा त्यांनीं स्वतःजवळ ठेवून कमी पल्लयाच्या तोफा आम्हांस दिल्या. एवढेंच नव्हे तर आमच्याजवळ कोणकोणत्या व किती पल्लयाच्या तोफा आहेत याची माहिती इंग्रजांना पुरी होती. अशा स्थितींत शेवटच्या प्रसंगांत आमचा भराभर पराभव होऊन इंग्रज विजयी झाला यांत आश्चर्य काय? त्यांत आमच्या तोफखान्याची शिस्त कुचकामाची होती व बाकव कामगारांचीहि टंचाई होती याबद्दल तत्कालीन इंग्रज प्रेक्षकांनींचें लिहून ठेविलें आहे. स. १७७४ ते ८१ पर्यंत इंग्रजांशीं मराठ्यांनीं राहून राहून लढाया दिल्या, पण त्यांत मराठ्यांच्या तोफखान्यानें म्हणण्यासारखा पराक्रम मुळींच गाजविला नाहीं.

शिंद्यांचा तोफखाना इंग्रजांच्या बरोबरीचा होता असें त्यांनींहि कबूल केलें होतें; परंतु त्यांत दोष एवढाच होता कीं, त्यावरील सर्व मुख्य अधिकारी फ्रेंच व इंग्रजच होते; त्याचा परिणाम असा झाला कीं, अखेरच्या वेळीं या अधिकाऱ्यांनीं दगा देऊन ते उलट इंग्रजांसच मिळाले. खुद्द सर्व पलटणावरचा मुख्य मुसा पेरु यानेंच सर्वांच्या आधीं फितुरी केली व तो विलायतेस निघून गेला; त्यामुळें त्यानें घातलेले तोफांचे व बंदुकीचे कारखाने दारूगोळ्यांसह आयतेच इंग्रजांच्या हातीं लागले. फिरंगी अधिकारी जे मराठ्यांच्या पदरीं नोकरीस राहत ते त्याच वेळीं आम्हीं आपल्या जातभाईविरुद्ध लढणार नाहीं, असा करार करूनच रहात. रावबाजीचीं इंग्रज पलटणें जीं शेवटीं फितलीं त्याचें कारणहि हेंच. सारांश, तोफांच्या व एकंदर तत्कालीन शास्त्रीय शोधांच्या कामीं आम्हीं दुर्लक्ष्य केल्यानेंच मराठी साम्राज्य थोड्याच अवधींत घडघडलें. स्वराज्यस्थापनेच्या कामीं या शोधांचा उपयोग करून घेणें हें प्रथमचें काम असतें.

[नानासाहेबांची रोजनिशी भा. १; थोरले माधवराव रोज. भा. १; सवाईमाधवराव रोज. भा. २; रावबाजी रोज; सप्तप्रकरणात्मक बखर; मराठे व इंग्रज.]

**तोबटेकसिंग**—पंजाब, लियालपूर जिल्ह्यांतील हा एक तालुका आहे. क्षेत्रफळ ८६५ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) २३२४२६ होती. या तालुक्यांत ३४२ खेडीं असून तोबटेकसिंग हें मुख्य ठिकाण आहे. शिवाय गोजा हें एक गांव असून येथें धान्याचा बाजार मोठया प्रमाणांत भरतो. सारा व कर यांचें उत्पन्न १९०५-६ सालीं ४.७ लक्ष रुपये होतें.

**तोबालस्क**—आशियामधील रशियांतील एक शहर. पश्चिम सायबेरीआंत तोबालस्कचें जें राज्य आहे त्याची ही राजधानी आहे. हें शहर इर्तिश नदीच्या दक्षिण तीरावर आहे. १९०० सालीं याची लोकसंख्या २१४०१ होती. या शहराची १५८७ सालीं कोसाक लोकांनीं स्थापना केली. तोबालस्क राज्याची लोकसंख्या १९०६ सालीं १६५६७०० होती. या राज्यांत रशियनांशिवाय तातार, ओस्तिआक, सॅमोयीर्डी, व्होगल, जर्मन व यहुदी इत्यादि लोक राहतात. या राज्याचे दहा जिल्हे पाडण्यांत आले आहेत. हा भाग शिक्षणांत फार मागसलेला आहे. येथील लोक मुख्यतः शेतीचा धंदा करतात.

**तोमर**—हें दिल्ली येथें राज्य करणारें एक प्राचीन क्षत्रिय घराणें होतें. चाहमान घराण्यांतील दुसऱ्या गूवकाचा मुलगा जो चंदन त्यानें या तोमरवंशातील रुद्रेण नामक राजाचा पराभव करून विशाल कीर्ति संपादन केली असें वर्णन आढळतें (९१३). त्यावरून असें दिसतें कीं, या सुमारास तोमरांचे पाय हिंदुस्थानांत चांगलेच रुतले असून त्यांची मजल राज्यस्थापनेपर्यंत आली होती. पुढें चंदनाचा नातू व वाक्पतीचा मुलगा सिंहराज यांनीं तोमराचा पूर्ण पराभव केला (९२८-४३).

दिल्ली हें पूर्वी अगदींच लहान गांव होतें; तेथें प्रथम अनंगपाल तोमरानें लहानसें राज्य स्थापिलें असें दिसतें. ह्या राज्याचा उत्कर्ष यापुढील दोनशें वर्षांत झाला. पण चाहमानांचीं तोमरांशीं १० व्या शतकांत सारखीं युद्धें होत असत असें लेखादिकांवरून दिसतें. दिल्लीचे तोमर व सांबरचे चाहमान ह्यांचें जवळ जवळ हाडवैरच असे; कारण दोघांचींहि राज्यें एकमेकांस अगदीं लागलेलीं असत. चाहमान चंदनराजाचें तोमर रुद्रेणाशीं इ. स. ९१३त युद्ध झालें, तसेंच ९४३ सालीं वाक्पतिराजानें तोमर तंत्रपालाचा पराभव केला; व वाक्पतीचा मुलगा सिंहराज यानेंहि एका तोमराचा पराभव केला वगैरे वरील माहिती हर्षशिलालेखावरून आढळते; पण ती खुद्द तोमरांच्या लेखावरून मिळते असें नाहीं. एकंदरीनें तोमरांचे फारच थोडे लेख सांपडतात. पण जे सांपडतात त्यांवरून असें दिसतें कीं तोमरांचे

कनोजचे मांडलिक होते. तोमर म्हणजेच तुंवर होत. विग्रहराज (वीसलदेव) चाहमाना(चव्हाण)नें दिल्ली एका तोमर राजापासून शेवटची जिंकून घेतली. विग्रहाचाच पुतण्या प्रख्यात पृथ्वीराज चव्हाण होय. शेवटचा तोमरराज हा अनंगपालाचा वंशज होय. अनंगपालानेंच दिल्लीचा लालकिल्ला ( लालकोट ) बांधला ( ९९३ ). पुढील एका तोमरराजानें मथुरेहून चंद्र याचा लोहस्तंभ आणून दिल्लीस पुरला ( १०५२ ). यालाच पृथ्वीराजाची लाट म्हणतात. त्याच्यावर लेख आहे. माळव्याच्या भोजांनां या तोमरांनीं जिंकल्याचा उल्लेख आढळतो ( १२ वें शतक ).

[ मध्य. भारत पु. २; मालकम–सेन्ट्रल इंडिया; ललितविग्रहराज नाटक; पृथ्वीराजरासा; स्टीफन—आर्किआलॉजी ऑफ दिल्ली; फानशॉ–दिल्ली पास्ट अँड प्रेझेंट; कनिंगहॅम–रिपोर्टे; इंडि. अँटि. १९१२. ]

**तोरगळ**—हें गांव मुंबई, कोल्हापूर संस्थानांतील तोरगळ नांवाच्या जहागिरीचें मुख्य ठिकाण आहे. हें कोल्हापूरच्या नैर्ऋत्येस १०० मैलांवर आहे. लोकसंख्या १९०१ सालीं २,४७७ होती. हें गांव सुमारें स.११००च्या सुमारास भूतकुश नांवाच्या एका सरदारानें वसविलें अशी दंतकथा आहे. पुढें १६९०सालीं नरसोजीराव शिंदे यानें विजापूरच्या सुलतानापासून हें गांव जिंकून घेतलें व राजाराम छत्रपतींनीं तें नरसोजीरावाला सरंजामांत जहागीर म्हणून लावून दिलें. येथें भूतकुशांनें बांधलेलें एक भूतनाथाचें जुनें देवालय आहे. गांवाभोंवतीं पडका तट आहे. त्याच्या आंत जहागिरदाराचा वाडा आहे; तो स. १७०० त बांधला आहे. [ कोल्हापूर गॅझेटियर. ]

**तोरणमाळ**—मुंबई, पश्चिम खानदेश. तळोदें तालुक्यांतील सातपुडा पर्वताची एक टेंकडी. मांडु लोकांचें हें मुख्य ठाणें होतें. तोरणमाळ टेंकडीचें क्षेत्रफळ सरासरी १६ चौरस मैल असून समुद्रसपाटीपासून ३३०० पासून ४००० फूट उंचीवर आहे टेंकडीवर एक सुंदर तलाव असून पडकीं देवळें पुष्कळशीं आहेत. गोरक्षनाथ या नांवाचे साधू याच ठिकाणीं पूर्वी राहत होते असें म्हणतात. येथें नाथपंथी मठ आहे. टेंकडीच्या दक्षिणेस पारसनाथाचें एक जैन देवालय असून दरसाल आक्टोबरमध्यें मोठी यात्रा भरते. थोडे भिल्ल खेरीजकरून टेंकडीवर मनुष्यवस्ती बहुधा नसते.

**तोरणा**—पुण्याच्या नैर्ऋत्येस वीस मैलांवर नीरानदीच्या उगमाजवळ असलेला एक किल्ला. इ.स. १६४६ त आपल्या वयाच्या एकोणिसाव्या वर्षी शिवाजीनें प्रथमच हा हस्तगत केला. या किल्ल्याची मजबुती करण्यासाठीं डागडुजी करीत असतां शिवाजीला पडलेल्या भागाखालीं मोठा सुवर्णनिधि सांपडला. हा हल्लीं भोरकर पंतसचिवाच्या ताब्यांत आहे. पुण्यांतील लकडीपूल व फर्ग्युसन कॉलेजच्या मागील टेंकडीवरून हा किल्ला स्पष्ट दिसतो. यासच प्रचंडगड असें दुसरें नांव आहे.

**तोरवी**—मुंबई. विजापूर जिल्हा. विजापूरच्या दक्षिणेस ४ मैलांवर हें खेडें आहे. दुसऱ्या अदीलशहानें या खेड्यास महत्त्व आणिलें. त्यानें येथें पुष्कळ इमारती बांधल्या. या ठिकाणीं नरसिंहाचें देऊळ व एक कुंड आहे. त्याला नरसिंहतीर्थ म्हणतात. या ठिकाणीं परशुरामभाऊ पटवर्धन यांनीं बांधलेलें लक्ष्मीचेंहि एक देऊळ आहे.

**तोरु, दत्त**—या बंगाली कवयित्रीचा जन्म कलकत्ता येथें ता. ४ मार्च १८५६ रोजीं झाला. विद्वत्तेबद्दल दत्तघराण्याचा मोठा लौकिक असून तोरुचे अथवा तोरुलतेचे वडील गोविंदचंद्र दत्त हे मोठे श्रीमंत व विद्वान होते. दत्तघराणें पूर्वीपासून ख्रिश्चन झालेलें होतें, व त्यामुळें ज्या घराण्यांत रमेशचंद्र दत्तांचा जन्म झाला त्या घराण्यापासून गोविंदचंद्राचा संबंध तुटला होता. तोरूला एक भाऊ व आरु नामक बहीण होती परंतु तीं दोघें लहाणपणींच वारलीं. लहाणपणींच तोरूचे वडील कुटुंबासह यूरोपांत गेले व त्यांनीं इंग्लंड व फ्रान्स येथें बरींच वर्षे काढलीं. तोरूचें सर्व शिक्षण इंग्लंड व फ्रान्समध्यें झाल्यानें तिला फ्रेंच व इंग्रजी भाषा चांगल्या अवगत झाल्या. १८७३ सालीं हें दत्त कुटुंब परत बंगाल्यांत आलें. १८७६ सालीं तोरूचा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला व तिची चोहोंकडे कीर्ति झाली. १८७७ सालीं ही २१ वर्षांची तरुण कवयित्री मृत्यु पावली.

तिचा, 'ए शीफ ग्लीन्ड इन फ्रेंच फील्ड्स' नामक काव्यग्रंथ प्रसिद्ध झाला व त्यांत बहुतेक प्रसिद्ध फ्रेंच कवींच्या कविता आहेत. या काव्यग्रंथाचा फ्रान्समध्यें बोलबाला झाला. एडमंड गॉसमुळें तोरूच्या काव्याची इंग्रजांनां प्रथमच ओळख झाली. 'एन्शंट बॅलड्स् अँड लीजंड्स्' हा काव्यग्रंथहि फार प्रसिद्ध आहे. 'वूमन इन एन्शंट इंडिया' व 'बॅलड्स् अँन्ड लीजंड्स ऑफ हिंदुस्थान' यांत तोरूनें हिंदी संस्कृतीचें पाश्चात्यांनां रहस्य सांगण्याचा प्रयत्न केला आहे. सावित्री, सिंधू, उमा, प्रल्हाद, लक्ष्मण, वगैरे व्यक्तींसंबंधीं तोरूनें काव्यपूर्ण वर्णनें केलेलीं आहेत. एक प्रसिद्ध फ्रेंच टीकाकार तोरूसंबंधानें लिहितो कीं, जन्मानें हिंदी, शिक्षणानें इंग्रजी व अंतःकरणानें फ्रेंच, असलेल्या या अल्पायु कवयित्रीला फ्रेंच वाङ्मयांत अवश्य स्थान मिळालें पाहिजे. टॉमसन, मिंटो वगैरे लोकांनींहि तोरूच्या काव्याची फार स्तुति केली आहे. बेडस या फ्रेंच विदुषीला व मिस मार्टिन नामक इंग्रज विदुषीला तोरूनें लिहिलेलीं अनेक पत्रें अत्यंत हृदयस्पर्शी व काव्यपूर्ण अशीं आहेत. फ्रेंच भाषेंत अनेक कविता व एक कादंबरी तोरूनें लिहिली त्यामुळें तद्देशीयांमध्यें तिची बरीच कीर्ति झाली. बंगालीपेक्षां इंग्रजींतच तोरूचें बरेंच काव्य लिहिलें गेलें तथापि तिच्या काव्यसंग्रहावरून तिचें बंगाली अंतःकरणच स्पष्ट होतें यांत शंका नाहीं.

**तोलीगंज**—बंगाल. चोवीसपरगणा जिल्ह्यांतील मुख्य पोटविभागांत हें एक गांव आहे. १९०१ साली लोकसंख्या १२८२१ होती. या गांवांत हल्लीं टिप्पू सुलतानचे वंशज राहतात.

**तोवरघर** ( ह्यांत सिकरवारी येते )—मध्यहिंदुस्थानांतील ग्वाल्हेर संस्थानाचा एक जिल्हा. क्षेत्रफळ १८३४ चौ. मै. ग्वाल्हेरच्या उत्तरेकडील सपाट प्रदेशांत हा आहे. सिकरवार व तोंवर (तोमर) ठाकुरांपासून हीं नांवें आलीं. सिकरवार हे बरगुजर रजपुतांपैकी होत. अलवारचा राजा ईश्वरदास ह्यानें आपली मुलगी देण्याचें नाकारल्यावरून बरगुजर ठाकुरांचा संहार करण्यांत आला. पैकीं एक दल्कुराव हा फत्तेपूर शिक्रीस पळाला व तेथें त्यानें सिकरवर नांव धारण केलें. पुढें १८ व्या शतकांत सिकरवारी शिंद्यांनीं घेतली. तोंवर हे यदुवंशी असून दिल्लीच्या प्राचीन राजाचे वंशज होत. ह्यांच्याकडे १३९८ ते १५१८ सालपर्यंत ग्वाल्हेरचा किल्ला होता. लो. सं. (१९११)३७६६५९. मोठा गांव गोहद. खेडीं ७०४ पैकीं जोरा हें मुख्य ठिकाण होय. परगणे चार. गोहद, अम्बा, जोरा व नुराबाद. सारा उत्पन्न रु. १११२०००.

**तोहाना सबतहशील**—पंजाब. हिस्सार जिल्ह्यांतील फत्तेबाद तहशिलीची ही सबतहशील आहे. क्षेत्रफळ ४५० चौरस मैल तहशिलींत ११७ खेडीं असून कर व सारा यांचें उत्पन्न १९०३-४ सालांत ८६००० रुपये होतें. तोहान हें तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. लोकसंख्या १९०१ सालीं ५९३१ होती. दिल्लीचा तोमरवंशीय राजा अनंगपाल यानें हें गांव वसविलें आहे.

**तौसनी**—मनोहरदासाचें हें कविनाम होतें. हा जातीनें जरी हिंदु होता तरी त्यास महंमद मनोहर अथवा मिर्झा मनोहर असेंहि म्हणत. अकबराच्या कारकीर्दींत हा होऊन गेला. यास त्याच्या काळीं चांगली मान्यता मिळत असे. त्याच्या बापाचें नांव लोणकरण ( मिठाचा व्यापार करणारा ) असें असून तो सांबरचा राजा होता.

**त्यामगोंदल**—म्हैसूर, बंगलूर जिल्हा. यांतील निलामंगल तालुक्यांतील एक शहर. दोड्डबेले रेल्वेस्टेशनपासून २ मैलांवर हें आहे. लोकसंख्या १९०१ सालीं ४०९९ होती. येथून कांहीं मैलांवर वायव्येस निजगल नांवाचें खेडें आहे. तेथील बहुतेक लोक या ठिकाणीं आल्यामुळें त्यामगोंदल गांव बरेंच मोठें झालेलें आहे. पुष्कळ व्यापारी येथें रहात असून धान्याचा व्यापार चांगला चालतो. १८७० सालीं म्यु. कमिटीची स्थापना झाली. १९०३-०४ सालीं उत्पन्न २५०० व खर्च २००० झाला.

**त्रांकिबार**—मद्रास. तंजावर जिल्ह्यांतील मायावरम् तालुक्यांत हें एक गांव व बंदर आहे. या गांवाच्या नांवाचा अर्थ ' लाटांचें खेडें ' असा आहे. १९११ सालीं लोकसंख्या १३२६८ होती. इ. स. १६२० मध्यें डॅनिश ईस्ट इंडिया कंपनीनें या ठिकाणीं किल्ला बांधला. १६२४ सालीं हें गांव डेनमार्कच्या राजाच्या ताब्यांत गेलें. इंग्रज लोकांनीं १८०१ सालीं हें गांव घेतलें, परंतु लवकरच तें त्यांच्या ताब्यांतून गेलें. पुढें १८४५ सालीं इंग्रजांनीं हें गांव १२॥ लाख रुपये देऊन विकत घेतलें. हें गांव १८४५ ते १८६० पर्यंत तंजावरच्या कलेक्टरचें व १८६० ते १८८४ पर्यंत डिस्ट्रिक्ट जज्जाचें मुख्य ठिकाण होतें. हल्लीं या ठिकाणीं डेप्युटि तहशिलदार हाच मुख्य ऑफिसर आहे.

**त्रावणकोर संस्थान**—त्रावणकोर (तिरुवांकूर, तिरुवालंकोडु ' महालक्ष्मीचें स्थान' ) हें संस्थान दक्षिणेस असून याचा राजकीय संबंध मद्राससरकारकडे आहे. जवळच कोचीन संस्थान असून दोन्ही संस्थानांवर एक रेसिडेंट देखरेख करीत असतो. त्रिवेंद्रम हें राजधानीची मुख्य जागा आहे. संस्थानच्या उत्तरेस कोचीन संस्थान व कोइमतूर जिल्हा हीं आहेत. दक्षिणेस हिंदी महासागर, पश्चिमेस अरबी समुद्र असून पूर्वेस पश्चिम घांट व पलीकडे कोंइमतूर, मदुरा व तिनेवेल्ली हे जिल्हे आहेत.

संस्थानची आकृति सरासरी त्रिकोनी आहे. याचें क्षेत्रफळ ७०९१ चौ. मै. आहे; पैकीं २५०० चौ. मै. जंगल असून २००० चौ. मै. डोंगराळ कुरण आहे. तत्रापि एकंदरींत त्रावणकोर फार सुपीक असून सुंदर आहे. पहाडी प्रदेश बराचसा असल्यामुळें व सपाटीची जमीन काळीभोर असल्यामुळें नैसर्गिक शोभा अत्यंत मनोहर आली आहे. पश्चिम घांटांतून पुष्कळसे नदीनाले उगम पावून नागमोडी रस्त्यानें वाहत जाऊन पूर्वेकडे समुद्रास मिळतात. संस्थानांत गोड्या पाण्याचीं सरोवरें थोडींच आहेत; त्यांत त्रिवेंद्रमजवळ वेलानी व क्विलनजवळ संस्थानकोट हीं सर्वांत मोठीं होत. घाटाच्या कडेची जमीन सदा हिरवीगार असते. तळमागावर ताडाचीं, माडाचीं व नारळाचीं झाडें विपुल आहेत. पहाडांत आणि मोठ्या जंगलांत शिकार मुबलक सांपडते. हत्ती असंख्य आहेत. त्याचप्रमाणें वाघ, चित्ते, अस्वल, सांबर आणि सर्व प्रकारचीं हरणें कळपकरून फिरत असलेलीं दिसतात.

येथील हवा समशीतोष्ण आहे. उन्हाळ्यांत पारा ९० पेक्षां जास्त कधींहि चढत नसून कमींत कमी ७० अंशांहून खालीं कधींहि उतरत नाहीं. येथें पाऊस अतिशय पडतो. मे व आगस्टमध्यें पावसाचें मान वाढतें असून आक्टोबर महिन्यांत उतरतें असतें. दरवर्षी ५८ इंच पाऊस पडतो; पिरमेड टेंकडीवरचें मान२०० इंच आहे.

लो क सं ख्याः— १९०१ सालीं त्रावणकोर संस्थानची लोकसंख्या २९५२१५७ होती. संस्थानांत एकंदर ९ शहरें असून ३८८५ खेडीं आहेत. एकंदर लोकसंख्येपैकीं २०३५६१५ हिंदु, ६९७३८५, ख्रिस्ती ११०५६६, मुसलमान असून बाकी इतर आहेत. येथें विशेषेंकरून कनिष्ठ जातींत वारसा मुलीकडे जातो. लग्न हा एक साधारण करारनामा असून दोघोंपैकीं कोणीतरी तो

ब्राह्मणांत नंबुद्रि ब्राह्मणांचें विशेष महत्त्व असतें व उपजीविकेचें साधन शेतकी आहे. ख्रिस्ती लोकांची संख्या मनस्वी आहे. सन १९०५ पासून संस्थानांत जन्ममरणाची नोंद ठेवूं लागले.

शे ती.—संस्थानची जमीन अनेक प्रकारची आहे. किनाऱ्यावरील जमीन उत्तम पांढरी वाळूची असून काळ्या जमिनीचें थोडेसें मिश्रण असतें. मुख्य धान्य भात असून, निर्गत मालांत नारळ मुख्य आहे. शिवाय मिरीं, सुपारी, फणस वगैरे जिन्नसहि पिकतात. कापड विणण्याचा व काथ्याच्या हातऱ्यांचा धंदा बराच चालतो. संस्थानांत पाट, कालवे वगैरे असल्यानें वाहतूक चांगली आहे. नद्यांतून नावांच्यामुळें व्यापाराची सोय बरी झाली आहे. पहाडावर वेलदोडे, चहा व काफीची लागवड चांगली होते. शेतकीचें काम करण्याकडे मुख्यत्वें बैल व रेडे उपयोगांत आणतात. शेतकऱ्यांजवळ पुरेसा सांठा नाहीं आणि चांगल्या गुरांची पैदास्त केली जात नाहीं. तांदुळाचा पेरा जरी पुष्कळ आहे तरी लोकसंख्या दाट असल्यामुळें तो अपुरा होतो व यामुळें पुष्कळ तांदूळ बाहेरून आणावे लागतात. दुष्काळांत लोक वाहतूक करून निर्वाह करतात. जंगली उत्पन्नांत इमारतीचें सागवान मुख्य असून कोचीनहून तें मुंबईस जातें. इतर बाकीच्या लांकडांचा व्यापार अरबस्तानापर्यंत चालतो. निर्गत इमारतीच्या लांकडाचें उत्पन्न १९०३-०४ सालीं ३७९००० रुपये झालें. त्याच वर्षी जंगलउत्पन्न ६७३००० झालें. येथें दुष्काळ बहुधा पडत नाहीं.

उ द्यो ग धं दे.—कापड विणणें व नारळाच्या काथ्याच्या हातऱ्या करणें हे मुख्य धंदे होत. पुष्कळ तऱ्हेचा कापूस व कपडा संस्थानांत तयार करून विकतात. सूत व चटया बाहेरगांवीं पाठवितात. १९०३-०४ सालीं संस्थानांत १३ कारखाने होते. पैकीं क्विलनला ३ असून अलेप्पीला १० होते. शिवाय चहाकाफीचे कारखाने ३० आहेत व त्यांत ४८६६ मजूर काम करतात. कलेमध्यें हस्तिदंताचें नक्षीकाम मुख्य मानलें जातें व त्यास संस्थानांतून चांगला आश्रय मिळतो. १९०३ सालीं दिल्लीस जें प्रदर्शन झालें होतें त्यांत त्रावणकोरचें हस्तिदंती नमुन्यानें एक पदक मिळविलें होतें. केळीच्या झाडाचे तंतू विणण्याचा प्रयत्न सुरू असून त्यांत यशहि येत आहे.

व्या पा रः—अलीकडे व्यापार फार वाढला आहे. कोलचेल क्विलन, अलेप्पी, कोतार, कायनकुलम्, चंगनाचेरी वगैरे व्यापारी पेठा आहेत. बाहेर जाणारे मुख्य जिन्नस नारळ, मिरीं, चहा, सुंठ, इमारतीचें लांकूड, कातडीं व काफी वगैरे. बाहेरून येणारे मुख्य जिन्नस तंबाखू, तांदूळ, कापूस आणि सूत वगैरे होत.

द ळ ण व ळ ण.—दळणवळणाचीं साधनें त्रावणकोरला चांगलीं आहेत. १९०३-०४ सालीं एकंदर रस्त्यांची लांबी ३०२६ मैल होती. ज्या ठिकाणीं पहाडी प्रदेशांतून गाडीरस्ता करणें अशक्य होतें त्या ठिकाणीं पायरस्ते अगर घोडे जाण्याचे रस्ते केलेले आहेत. साधारण संस्थानच्या मधोमध पूर्वेकडून पश्चिमेकडे ५० कोसांचा असा एक आगगाडीचा फांटा असून पुढें तो किनाऱ्याकिनाऱ्यानें गेला आहे. याशिवाय अधिक रस्ते काढण्याची योजना सुरू आहे. संस्थानचें स्वतःचें टपालखातें आहे. १९०३-०४ सालीं संस्थानांत टपालऑफिसें १५० होतीं टपालाचें दळणवळण ९२८ मैल लांबीचें होतें. इंग्रज पद्धतीसारखीच मनीआर्डरपद्धत नुकतीच सुरू केली आहे. संस्थानाला टपालखात्यापासून उत्पन्न ( १९०३-४ ) २९२००० होतें. पोस्टाचीं तिकिटें व कार्डें संस्थानचीं स्वतःचीं असतात.

रा ज्य का र भा र.—संस्थानांत पद्मनाभ, त्रिवेंद्रम, क्विलन व कोटायम हे ४ जिल्हे असून ३१ तालुके आहेत. ते वरील ४ जिल्ह्यांत अनुक्रमें प्रत्येकीं ५, ४, ११, व, ११ असे आहेत. प्रत्येक जिल्ह्यावर एक अधिकारी असतो; त्याला दिवाण पेष्कार आणि जिल्हा मॅजिस्ट्रेट म्हणतात. इंग्रजी जिल्ह्यांत कलेक्टरला जीं कामें करावीं लागतात तींच कामें पेष्कार आणि जिल्हा माजिस्ट्रेट करतो. तालुक्याचा अधिकारी तहशिलदार २ वर्ग माजिस्ट्रेट असतो. ४ पेष्कार म्याजिस्ट्रेटांशिवाय आणखी २ जिल्हा म्याजिस्ट्रेट असतात. एक अलेप्पीचा कमार्शीयल एजंट व 'कार्डेममहिल'चा सुपरिंटेंडंट. याशिवाय न्यायखातें, मोजणी, टपाल, जंगल, शिक्षण व औषधि वगैरे बरींच खातीं आहेत व सर्वांची रचना बहुत करून इंग्रजपद्धतीवर आहे. संस्थानचा मुलकीकारभार दिवाणमार्फत राजेसाहेब चालवितात. एक महाजनसभा आहे. तींत तालुक्यांतून व शहरांमधून प्रतिनिधी निवडून पाठवितात. महत्त्वाच्या राजकीय बाबतींत सार्वजनिक मत काय आहे म्हणून महाजनसभेला विचारणा करतात. संस्थानांत १८८८ सालापासून एक कौन्सिल असून त्यातर्फे कारभार चालतो. त्यांत बिनसरकारी सभासदांचें बहुमत असतें. अंदाजपत्रकावर मत देण्याचा व प्रश्न वगैरे विचारण्याचा हक्क त्यांना आहे. निवडणुकींत मत देण्याचा व सभासद होण्याचा हक्क बायकांनांहि मिळालेला आहे. सर्व हिंदुस्थानांतील इतर कोणत्याहि संस्थानांत ही सुधारणा अद्याप झालेली नाहीं. श्रीमूलम नांवाची एक लोकसभा असून तिचे सर्व सभासद लोकनियुक्त असतात; ती वर्षांतून एकदां भरते. राज्यकारभारांत करावयाच्या सुधारणा व गरजा ही सभा थेट दिवाणापुढें मांडते व त्याचा विचार दिवाण करतो. आणिबाणीच्या प्रसंगीं कायदेकारीमंडळाच्या मध्यस्थीवांचून एखादा नियम करतां येतो परंतु त्याची मुदत ६ महिन्यांहून जास्त नसते. त्रिवेंद्रम येथें हायकोर्ट असून २५ दिवाणी व ६४ फौजदारी कचेऱ्या आहेत. हायकोर्टांत एक मुख्य न्यायमूर्ति असून ३ इतर न्यायाधीश असतात. या तिघांत १ युरोपियन असतो. फौजदारी प्रकरणांवर आरोपीला फांशीची शिक्षा हायकोर्टांनीं दिली तरी राजेसाहेबांच्या मंजुरीवांचून अमलांत आणतां येत नाहीं. मोठे गुन्हे फार करून होत



त्रावणकोरचे नूतन बालमहाराज.



थोरल्या महाराणी ( रीजंट )



धाकट्या महाराणी ( बालमहाराजांची माता. )



पहिले तुकोजीराव होळकर.



श्री. सरकार मल्हारराव पवार, ( देवास २. )



तैमूरलंग.



दोस्तमहंमद.

नाहींत. कारण लोक अतिशय गरीब व कायद्याला भिऊन वागणारे आहेत. हलक्या चोऱ्या व मारामाऱ्या हे गुन्हे होतात. दस्तैवज नोंदण्याचें एक स्वतंत्र खातें आहे, त्रावणकोरच्या नोंदणीखात्याचे ३ जिल्हे असून प्रत्येक जिल्ह्यावर एक जिल्हारजिष्टर असतो. ५१ नोंदणी कचेऱ्या आहेत, त्यांवर १ दुय्यम रजिष्टर असतो. १९०३-०४ सालीं १८०३६१ दस्तैवज नोंदले गेले, व उत्पन्न १०२०१९०० रुपये झालें.

काळीचें उत्पन्न.—त्रावणकोरची जमाबंदीपद्धत मानगदीची आहे. तत्वतः रयतवारीच आहे. कारण कांहीं जमीन भरपूर आकाराची, कांहीं निम्मे आकाराची व कांहीं पूर्ण माफीची आहे. जन्मम् आणि सरकार असे दोन जमीनींचे भेद केलेले आहेत. जन्मम् जमीनी ३ प्रकारच्या असून सरकार जमीनी ६० प्रकारच्या आहेत. पहिली मोजणी १८०२ सालीं झाली आणि दुसरी १८३६ सालीं झाली. यावरून पाटाखालच्या जमिनीवर दर एकरीं २ रुपये व इतर जमिनीला दर एकरीं रु. १-२-८ याप्रें लागत. या मोजणींत पुष्कळ व्यंगें राहिलीं तेव्हां तीं दूर व्हावीं म्हणून १८८३ सालीं पुन्हां मोजणी करावी लागली. तींत पाटखालच्या जमिनीला दर एकरीं ४ व तहर दर एकरीं १ रुपाया असा ठराव झाला. संस्थानचें अवांतर उत्पन्न म्हणजे तंबाखू, मीठ, अफू आणि मद्य यांच्यावर बसवलेली जकात हें होय. हें वर दिलेले जिन्नस खेरीजकरून दुसऱ्या कोणत्याहि आयात मालावर संस्थानची जकात नाहीं. मीठ बहुतेक मुंबईहून येतें. दर मणी ॥। आण्याप्रमाणें मिठावर जकात आहे. संस्थानांत एकंदर मिठाचा खप वार्षिक २६००० टन आहे. पैकीं २०००० टन मुंबई पुरवते व ६००० टन मीठ संस्थानांत उत्पन्न होतें. सन १९०३-०४ सालीं उत्पन्न, खर्च वजा जातां निव्वळ १४६३०-० रु. झालें. अबकारी उत्पन्न त्याच सालीं (१९०३-०४) ७८६००० झालें असून खर्च २१ हजार झाला. दारूच्या किरकोळ विक्रीच्या दुकानाला परवाना घ्यावा लागतो. त्याबद्दल ५० रुपये व ठोक विक्रीच्या दुकानाला ३० रुपये परवाना पडतो. तंबाखूचें उत्पन्न संस्थानला १९०३-०४ सालीं १२३२००० रुपये झालें. जाफ्ना, कोइमतूर व तिनेवेल्ली येथील तंबाखू प्रथमतः मोठमोठ्या वखारींत भरून ठेवतात. तंबाखूच्या मोठ्या वखारी कोत्तार, त्रिवेंद्रम, क्विलन, अलेप्पी, मुत्तुपूल व आलवाई या ठिकाणींच फक्त आहेत. वखारींतून तंबाखू बाहेर नेतेवेळीं दर खंडीला ९० रुपयेप्रमाणें जकात चुकवावी लागते.

सार्वजनिक खातें.—सार्वजनिक कामें दोन प्रकारचीं आहेत. (१) मोठीं व महत्वाचीं इमारतींचीं कामें व (२) मरामत कामें. पहिल्यांवर एक मुख्य एंजिनीयर नेमलेला असून मरामत कामें साधारण कामदार करूं शकतात. मरामतखातें सन १८३३ पासून अस्तित्वांत असून सार्वजनिक खातें १८६० सालापासून सुरू आहे. संस्थानांतील पुष्कळ इमारती सार्वजनिक खात्याकडून झालेल्या आहेत. कित्येक मैलपर्यंत पक्क्या सडका झालेल्या असून ४ मोठ्या नद्यांवर पूलहि बांधले गेले आहेत. त्रावणकोर संस्थानांत ३ तुरुंग; पैकीं १ मोठा त्रिवेंद्रम येथें असून २ जिल्हातुरुंग आहेत.

शिक्षण.—१८९०-९१ सालीं त्रावणकोर संस्थानांत सर्व जातींच्या मिळून २४१८ संस्था असून विद्यार्थ्यांची संख्या १०४६१६ होती. दहा वर्षांनीं हेंच प्रमाण द्विदीनें वाढलें. यांत लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट एवढी कीं स्त्रीशिक्षणानें आपली प्रगति फार केली, सर्व संस्थांतून शिक्षण मोफत दिलें जातें. मागसलेल्या लोकांना व जंगली जातींना शिक्षण देऊन त्यांना सुशिक्षित करण्याचे प्रयत्न त्रावणकोर संस्थानांत विशेष रीतीनें नजरेस येतात. मिशनरी लोकांचा या कामांत पुढाकार नेहमीप्रमाणें बराच आहे. संस्थानाला शिक्षणाकडे खर्च एकंदर ६ लक्षावर आला. फीचें उत्पन्न सरासरी १। लक्ष झालें. वरिष्ठ शिक्षणाच्या ५ पाठशाळा त्रिवेंद्रम येथें आहेत. शिवाय संस्कृत पाठशाला औद्योगिक शाळा, शिकवणाऱ्या शाळा (मुलांकरितां १ व मुलींकरितां १) आहेत. औद्योगिक शाळेतून एक हस्तिदंती कोरींव कामाचा नमुना दिल्ली येथें प्रदर्शनांत पाठविला होता व तो उत्तम ठरला जाऊन सोन्याचें पदक बक्षीस मिळालें. वर्तमानपत्रें व मासिकें पूर्वी मुळींच नव्हतीं. अलीकडे मात्र कांहीं नजरेस येत आहेत. १९०३-४ सालीं १९ वर्तमानपत्रें व ४ मासिकें निघत होतीं.

आरोग्य.—संस्थानांत २२ हास्पिटलें (रुग्णालयें) असून ३० मोफत दवाखाने आहेत. त्यांत १२१५ रोगी राहूं शकतील अशी व्यवस्था आहे. १९०३-४ सालीं १५७०० रोगी रुग्णालयांत राहून औषधपाणी घेत होते. ६०८००० रोगी रुग्णालयांत न राहून औषध घेणारे होते. शस्त्रक्रियांची संख्या २६७०० होती व खर्च २७३००० होता. शिवाय १ पागलखाना व रक्तपिती रोग्यांकरिता एक औषधालय आहेच. या सर्वांवर मुख्य अधिकारी यूरोपियन डॉक्टर असून महाराजांकडे राजवैद्य तोच असतो. त्रिवेंद्रम् येथें एक गुरांचा दवाखाना आहे.

इतिहास.—संस्थानच्या इतिहाससंबंधानें फारसें माहीत नाहीं. दंतकथेवरून असें आढळतें कीं पुरातन केरळराजे त्रावणकोरपैकीं बऱ्याच भागांत होते. सरासरी अकराव्या शतकाच्या सुमारास चोल राजांनीं त्रावणकोरचा भाग केरळांपासून जिंकला. पुढें एका शतकानंतर केरळ राजांनीं चोलांचा पराभव करून नष्ट वैभव संपादन केलें. तेराव्या शतकांत मदुराच्या पांड्यराजांनीं त्रावणकोरचा आभय भाग व्यापून टाकला, तरी केरळांनीं त्यांना फार दिवस टिकूं दिलें नाहीं. १५४४ सालीं विजयानगरचा राजा अच्युतराय यानें त्रावणकोरवर स्वारी केली होती. १५६५ सालीं तालीकोटची लढाई झाली तींत विजयानगरचें घराणें अगदीं ना[illegible]

होऊन त्रावणकोरास मदुराचे नाईक सत्ताधीश झाले. अठराव्या शतकांत नाईक राजांपैकीं मार्तंडवर्म्यानें बाकीच्या नाईकांचा पराभव करून त्रावणकोर आपल्या सत्तेखालीं आणलें. मार्तंडवर्मा व त्याचा दिवाण रामाय्यन हे फार कर्ते पुरुष होते. त्यांनीं पुष्कळशा सुधारणा केल्या; व्यापार वाढविला, मोठाले राजवाडे व अन्य मंदिरें बांधिलीं, काळीच्या वसुलाचा उत्तम प्रकारें बंदोबस्त केला, शहराची तटबंदी केली वगैरे बऱ्याच लोकोपयोगी गोष्टी घडवून आणल्याबद्दल अद्याप तेथील लोक मार्तंडवर्मा व दिवाण रामाय्यन यांची फार वाखाणणी करतात.

इंग्रजांनीं या संस्थानांत प्रथम अंजनगांव येथें १६८४त आपली वखार स्थापून व्यापारास सुरवात केली. म्हैसूरचें राज्य हैदरअल्लीकडे होतें त्यावेळीं हैदरअल्लीनें त्रावणकोरवर स्वारी करण्याचा दोनदां प्रयत्न केला. त्यांत जरी हैदरअल्लीस फारसें यश आलें नाहीं तरी हैदरअल्ली व त्याच्या नंतर टिप्पूनें त्रावणकोरचा शह सोडला नाहीं. अखेर १७८४ सालीं मंगलोरचा तह झाला. त्यांत त्रावणकोरच्या सरहद्दीवर इंग्रजांच्या दोन पलटणी संरक्षणार्थ रहाव्या व त्यांचा खर्च त्रावणकोर संस्थाननें सोसावा असें ठरलें व याच तहांत त्रावणकोरकराला म्हैसुरकरानें त्रास न देण्याबद्दलहि एक कलम इंग्रजांनीं घातलें होतें. १७८९ सालीं टिप्पूनें त्रावणकोरवर हल्ला केला पण त्याचा पराभव झाल्यामुळें पुन्हां एकवार त्यानें उचल घेतली. परंतु इंग्रजांचें पाठबळ असल्याकारणानें त्रावणकोर त्याच्या हातीं येईना. १७९५ सालीं इंग्रज व त्रावणकोरचे राजे यांत तह झाला. कर्नाटकांत १८ व्या शतकांतील इंग्रजांच्या व इतर राजांच्या ज्या लढाया झाल्या त्या सर्वांत त्रावणकोरच्या राजांनीं इंग्रजांना मदत केल्यामुळें या राज्यास इंग्रजांचे दोस्त म्हटलें आहे. सुमारें तीन वर्षांनीं त्रावणकोरचा राजा मरण पावला. त्यावेळेस त्याचा दिवाण राजा केशवदास नांवाचा होता. तो फार लोकप्रिय असून राजनीतिनिपुण होता. रामवर्म्यानंतर त्याचा पुतण्या बलरामवर्मा गादीवर बसला. हा इभ्रतदार नसल्यामुळें कारस्थानांना सुरवात झाली. बलरामवर्मा १८१० सालीं मरण पावला. यावेळीं त्रावणकोरच्या राजावर ८ लाखांची खंडणी लादण्यांत आली. त्यानंतर लक्ष्मीराणी तख्तनशीन झाली तेव्हां इंग्रजांनीं तें संस्थान आपल्या रक्षणाखालीं घेऊन तेथें रेसिडेंट नेमला. इंग्रज रेसिडेंट कर्नल मनरो याच्याच सल्ल्यानें तिनें राज्यकारभार चालविला व त्या दिवसापासून त्रावणकोर संस्थान भरभराटीला आलें. लक्ष्मीराणी १८१५ सालीं वारली. तेव्हां तिची बहीण पार्वतीराणी लक्ष्मीराणीचा मुलगा रामवर्मा वयांत येईपर्यंत राज्यकारभार पाहूं लागली. रामवर्मा १८२९ सालीं सज्ञान होऊन राज्यकारभार पाहूं लागला. १८४६ सालीं तो मेल्यावर त्याचा भाऊ मार्तंडवर्मा गादीवर बसला; त्यानें १८६० सालपर्यंत राज्य केलें. त्यानंतर त्याचा पुतण्या रामवर्मा गादीवर बसला. १८६२ सालीं लार्ड क्यानिंग साहेबानीं औरस वारस नसल्यास दत्तक घेण्याबद्दलची सनद दिली. १८८० सालीं तो वारला. रामवर्मानंतर रामवर्मा याच नांवाचा त्याचा भाऊ होता, त्यानें १८८५ सालपर्यंत राज्य केलें. नंतर महाराज सर श्रीरामवर्मा हे गादीवर आले. इंग्रजसरकाराकडून यास २१ तोफांची सलामी मिळे. हे ऑगष्ट १९२४ सालीं वारले. हल्लीं हें राज्य रीजन्सी नेमून (तींत राणी मुख्य आहे) चालविलें आहे. ( १९२५ मे ).

पुढें १९२२ सालीं त्रावणकोरचें कायदेमंडळ स्थापण्यांत आलें. १९२३ सालीं वसाहतीची योजना पुढें मांडण्यांत आली होती. काड्याच्या पेटयांचा व साखरेचा कारखाना काढण्याबद्दल सवलती देण्यांत आल्या. संस्थानचा वसूल दोन कोट असून खर्च २ कोट ३ लाख रुपये आहे. १९२२ सालीं इन्कमटॅक्स सुरू करण्यांत आला. जातवार प्रतिनिधीबद्दल हिंदू व ख्रिस्ती यांनीं चळवळ केली परंतु दिवाणानें ती अमान्य केली. १९२३ च्या जुलैंत श्रीमूलम नामक एका लोकसंस्थेस कायदेमंडळाबाहेरचे अधिकार असावे म्हणून एक चळवळ सुरू होती. मीठ व अबकारीमुळें उत्पन्नांत ७ लाखांची वाढ झाली संस्थानची पेढी काढण्याचें ठरलें आहे. अधिकृत भांडवल ३० लाख असून जमा झालेले १० लाख रुपये होते. १९२३ आक्टोबरमध्यें ग्रामपंचायतबिल कायदेमंडळांत आलें होतें. साउथ इंडियन रेल्वेमार्फत संस्थानचा ९६ मैलांचा लोहमार्ग तयार आहे. कोचीन बंदराबद्दल संस्थाननें तीन लाख रुपये गुंतविले आहेत.

या संस्थानांत साक्षरतेचें प्रमाण शेंकडा २९ आहे. १९२३ सालीं आर्मस्ट्रान्ग कंपनीला लांकूड गोळा करण्याप्रीत्यर्थ ८००० एकर जंगल संस्थाननें देऊ केलं होतें. पेंप्लर नदीचा उपयोग वीज करण्याकडे करावा असा १९२३ सालीं प्रयत्न करण्यांत आला. अलेप्पीच्या पूर्वेस तेलाच्या खाणी आहेत असें म्हणतात. ब्रिटिश मुलुखांत वीज उत्पन्न करून ती संस्थानांत आणावी असें दरबारचें मत आहे. १९१३ सालीं ३२७ कारखाने संस्थानांत होते, बहुतेक कारखाने चहाचेच आहेत. दोन मिठाचे कारखाने, एक कागदाची गिरणी व ८ तेलाच्या गिरण्या वाफेवर चालतात. १९१३ ते १९२३ सालच्या दरम्यान उद्योगधंद्यांची वाढ झाली आहे असें आढळून येतें.

या राज्यांत वायकोम येथें १९२४ सालीं अस्पृश्यांनीं तेथलि त्यांना बंदी असलेल्या रस्त्यांचा उपयोग करून देवदर्शनाला जाण्याबद्दल सत्याग्रह केला. तो पुष्कळ दिवस चालू होता. हल्लीं ( १९२५ ) राणीनें लोकांचें म्हणणें ऐकून घेऊन कांहीं तडजोड काढिली आहे. हल्लींचे दिवाण टी. राघवय्या यांची मुदत थोड्याच दिवसांत संपत आहे. त्यांच्या नंतर राणीची इंग्रज शिक्षकीण हिचा एक भाऊ विलायतेस बॅरिस्टर आहे, त्याची नेमणूक बहिणीच्या शिफारसीवरून

दिशाच्या भागीं होणार अशी बातमी आहे. याबद्दल सांप्रत संस्थानांत विरुद्ध चळवळ चालू आहे ( १९२५ मे ).

**त्रिकोणमिति**—त्रिकोणांतील दिलेल्या विवक्षित अवयवांवरून राहिलेल्या अवयवांचा निर्णय करणें हेंच त्रिकोणमितीचें कार्य असलें तरी, अवयवांच्या परिमाणांची यथातथ्य कल्पना त्यांनां मोजण्याच्या कांहीं योजना निश्चित केल्याशिवाय येणें कठिण आहे. यास्तव त्यांचें विवरण प्रारंभींच करून नंतर मुख्य विषयाकडे वळणें हेंच रास्त होईल.

स र ल रे षी य अ थ वा त ल त्रि को ण मि ति.—त्रिकोणाच्या एकंदर सहा अवयवांपैकीं तीन भुज अगर बाजू सरल रेषात्मक असतात. व त्यांनां मोजण्याची विविधमापन साधनाचीं कोष्टकें इतरत्र ( अंकगणितामध्यें ) दिलीं असल्याकारणानें या ठिकाणीं त्यांची पुनरुक्ति न करतां इतर ३ अवयवांचें म्हणजे कोणांचें मापन कोणकोणत्या पद्धतीनें केलें जातें त्यांचाच येथें गोषवारा देतों. परंतु तत्पूर्वी कोणाची उत्पत्ति कशी होते हेंहि सांगणें गैर होणार नाहीं. समजा ० या एका बिंदूंतून ० य अशी अगदीं सरळ उजव्या बाजूला एक रेषा काढलेली आहे.या बिंदूला आपण प्रस्थानबिंदु असें म्हणूं व त्या रेषेला प्रस्थानरेषा म्हणूं. आतां ० मधूनच जाणारी दुसरी एक रेषा त्याच्या भोंवतालीं फिरते आहे असें समजूं. ही रेषा प्रस्थानरेषा सोडून निघाल्यावरोबर तिला कललेली दिसेल व हा कल अथवा कोण भ्रमण कमी अधिक होईल, त्या मानानें मोठा अगर लहान असणार. पण हें भ्रमण सुद्धां २ भिन्न मार्गांनीं होऊं शकेल व त्यायोगें कोणोत्पत्ति कोणत्या मार्गानें झाली आहे हें ठरविणें संशयित होईल. एतदर्थ घटियंत्रांतील कांट्यांच्या भ्रमण दिशेच्या विरुद्ध दिशेनें ही चलरेषा फिरून त्यायोगें कोण निर्माण झालेला असला तर त्याला धनकोण समजण्याचा परिपाठ अगर संकेत आहे. व तोच अन्यतर मार्गभ्रमणानें निर्माण झालेला असल्यास त्याला ऋण समजतात. चलरेषेचें एक पूर्ण भ्रमण होऊन ती पुन्हां प्रस्थान अगर अचल रेषेवर येते तेव्हां तीमुळें उत्पन्न झालेला कोण ४ काटकोणांसमान समजला जातो; व ज्याप्रमाणें हें भ्रमण धन किंवा ऋण दिशेनें होतें त्याप्रमाणें तो कोण + ४ काटकोण अगर −४ काटकोण होतो. पूर्णभ्रमणामध्यें रेषेला त्याच त्याच स्थानांतून जावयाचें असल्याकारणानें प्रस्थान रेषेचें व चलरेषेचें एखादें विशिष्ट स्थल यांनीं मर्यादित केलेले अनेक कोण असूं शकतात. उदाहरणार्थ चलरेषा ०क या स्थानीं जर असेल ( आकृति नं. १ पहा. ) तर ०क व ०य यांमधील सर्वांत लहान धनकोण आकृतींत ज्यावर खूण केली आहे तेवढाच असेल परंतु चलरेषा एक पूर्ण भ्रमण करून शिवाय दर्शविलेला कोण आक्रमून गेल्यास पुन्हां ० क याच स्थानीं येणार, म्हणजे सर्वांत लहान कोण श नें दर्शविण्याचें मान्य केल्यास श ± ४ काटकोण याचेहि भुज तेच असतील; इतकेंच काय पण चलरेषेनें कितीहि पूर्ण भ्रमणें केलीं तरी शेवटीं ०पर्यंत ती श हाच कोण आक्रमण करते तोंपर्यंत त्या सर्व कोणांचे मर्यादादर्शक भुज तेच असणार म्हणजे क०य या चिन्हानें केवळ श एवढयाच कोणाचा बोध होतो असें नाहीं तर श ± ४ ग काटकोण ( ग = गच्छ, प = पद हे संक्षेप त्यापुढें कोणतेहि पूर्णांक व्यंजक म्हणून योजिले आहेत. ) इतक्यात सर्व कोणांचा त्यामध्यें अंतर्भाव होतो.

कोण कसे निर्माण करतां येतात यांचें येथवर विवरण झाल्यावर त्यांची परस्परांशीं तुलना करण्याला सुलभ जावें म्हणून ज्या तीन प्रकारच्या मापनपद्धतींचा अवलंब केला जातो त्यांपैकीं पहिली फार पुरातन कालापासून म्हणजे बाबिलोनियन लोकांच्या सुधारणेच्या कालापासून आजतागायत सारखीच प्रचारांत आहे. हिला षष्ठ्यंशपद्धति असें म्हणतात. यामध्यें प्रत्येक काटकोणाचे ९० समभाग समजले जातात व त्यांनां अंश ही संज्ञा आहे. या प्रत्येक अंशाचे ६० समभाग कल्पून त्यांनां प्रत्येकीं कला ही संज्ञा आहे; व प्रत्येक कलाहि पण ६० विकलांची झालेली असते. याहीपेक्षां सूक्ष्म कोणमापनाची बहुधा कधींहि आवश्यकता नसते. तथापि जेथें ती भासते तेथें तो कोण विकलांच्या दशांशरूपानें व्यक्त करण्याचा परिपाठ आहे. या पद्धतीनें मापलेला कोण अंश, कला व विकला यांच्या अंकांच्या उजव्या हाताला डोक्याजवळ अनुक्रमें °, ′, ″ या चिन्हांनीं व्यक्त करतात जसें २३° ३४′ १७.२९″ म्हणजे २३ अंश, ३४ कला व १७.२९ विकला असलेला कोण.

श तां श ( शतभाग ) प द्ध ति.—या पद्धतीप्रमाणें काटकोणाचे १०० समान भाग कल्पिले जातात व त्या प्रत्येकाला क्रम ( ग्रेड ) ही संज्ञा आहे. या प्रत्येक क्रमाच्या १०० कला असतात; व प्रत्येक कला १०० विकलांची झालेली असते असें समजतात. षष्ठ्यंशपद्धतीप्रमाणें यांतीलहि निरनिराळ्या मापांचीं दर्शक म्हणून ग, ′ ″ अशीं चिन्हें योजितात. जसें १३ग २१′ ३७″ म्हणजे १३ क्रम, २१ कला व ३० विकला असलेला एक कोण.

वर्तुलमापन अगर चापीयमापनपद्धतींतील विशेष हा आहे कीं कोण लहान असो अगर थोर असो त्याला मोजण्याचें परिमाण अवघें एकच आहे. म्हणून प्रत्येक कोण त्या परिमाणाच्या कितव्या पटीवरोबर अगर अंशावरोबर आहे एवढेंच या पद्धतीप्रमाणें मोजावयाचें झाल्यास ठरवितां येतें. व हें परिमाण म्हणजे त्रिज्यातुल्यचापानें वर्तुलाच्या मध्यबिंदूशीं किंवा केंद्राशीं केलेला कोण होय. परिमाणें नेहमीं अविकारी व स्थिर असावीं लागतात. या नियमाला अनुसरून हेंहि अचल आहे हें खालील दोन सिद्धांतांवरून सहज लक्ष्यांत येण्यासारखे आहे.( १ ) वृत्तांचे परिघ अथवा पालि त्यांच्या त्रिज्यांशीं समप्रमाणांत असतात.व (२) वृत्ताचे चाप तदभिमुख केंद्रस्थ कोणांशीं समप्रमाणांत असतात. पहिल्या सिद्धांतावरून एवढें कळून चुकलें असेल कीं वृत्ताचा परिघ हा त्याच्या त्रिज्येच्या

एका विशिष्ट पटीसमान असतो, व दुसऱ्या सिद्धांताच्या आधारानें उपरिव्याख्यातचापीय परिमाण हें काटकोणाच्या विशिष्ट अंशांबरोबर आहे अतएव तें अविकारी आहे असें सिद्ध करतां येतें ( आकृति नं. २ पहा ) असें :—य० यं र० रं या मध्यबिंदूतून दोन परस्परांना लंब असे व्यास काढल्यास ते परिघाचे किंवा पाळीचे चार समखंड करितात हें उघड आहे. तेव्हां पाळी त्रिज्येच्या ज्या विशिष्टपटीसमान आहे त्यापटीला $\pi$ या विशिष्ट दोन चिन्हानें दर्शविण्याचें मान्य केल्यास य क र हा चाप $\frac{\pi}{२}$×त्रिज्या तुल्य होतो म्हणून यक हा चापच त्रिज्यातुल्य घेतल्यावर

$$\frac{यक}{यर} = \frac{\angle य०क}{\angle य०र}\text{ परंतु } \angle य०र = \text{काटकोण म्हणून}$$

$$\angle य०क = \frac{त्रिज्या}{\frac{\pi}{२}\times त्रिज्या}\ \text{काटकोण} = \frac{२}{\pi}\ \text{काटकोण} = \frac{१८०}{\pi}$$

अर्वाचीन काळांच या स्थिरपदाची पाहिजे तेवढी सूक्ष्म किंमत न्यूटन, व्हायटाबॉलिस, ग्रेगरी वगैरे गणितज्ञांनीं श्रेढीच्या रूपानें काढलेल्या त्याच्या विस्तारावरून शक्य झाली आहे. पुरातनकाळच्या भूमितींतील ३ अत्यंत प्रसिद्धीस आलेल्या सिद्धांतांपैकींच तत्वतः हा एक आहे. वृत्ताचें क्षेत्र निश्चित करण्यामध्यें काय किंवा परिघ निश्चित करण्यामध्यें काय त्याच स्थिरपदाची किंमत ठरविणें अपरिहार्य असतें व ही किंमत पृथक्करणात्मक त्रिकोणमितीमध्यें बरीच प्रगति होईपर्यंत पाहिजे तेवढी सूक्ष्म काढतां येणेंच अशक्य होतें. याची २० दशांशस्थळांपर्यंत किंमत ३.१४ १५९२६५३५८९७९३२३८४६ इतकी आहे व त्याच्या व्युत्क्रमा( $= \frac{१}{\pi}$ )ची ०.३१८३०९८८६१८३७९०६७१५३ आहे. निरनिराळ्या गणितज्ञांनीं यांच्या अधिकाधिक सूक्ष्म अशा किंमती निश्चित केल्या आहेत व एका आंग्ल प्रोफेसरनें तर यांच्या व त्याच्या बरोबर उच्च गणितामध्यें हरहमेश उपयोगांत येत असणाऱ्या आणखीहि इतर कांहीं विवक्षित स्थिर संख्यांच्या अर्धीचशेंवर दशांश स्थलांपर्यंत किंमती काढलेल्या आहेत. शेवटच्या प्रकरणांत दिलेल्या ॥ चे अनंत श्रेण्यात्मक विस्तारांवरून त्याची किंमत अनंतदशांश किंवा अपरिच्छेद्य अपूर्णांक असावी हें कोणीहि अनुमान करील. वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें एका चापीयमापनपरिमाणामध्यें $\frac{१८००}{\pi}$ म्हणजे, ५७°१७′ ४४.८०६२४७०९६४″ असतात. तेव्हां ध्रुचापयि मापन असलेल्या कोणामध्यें $\frac{१८०}{\pi}$ श अंश असणार हें स्पष्ट आहे एकच परिमाण असल्यामुळें या पद्धतीचा प्रत्यक्ष व्यवहारामध्यें जरी फारसा उपयोग होत नसला तरी पृथक्करणात्मक त्रिकोणमितींत त्याच्या योगें पुष्कळसें काम सुकर झालें आहे. कोणाप्रमाणेंच रेषाहि धन किंवा ऋण समजण्याचा परिपाठ आहे व हा भेद, कोणाप्रमाणेंच ती कशी निर्माण होते यावर अवलंबून आहे म्हणजे य ० यं ही रेषा दोन तऱ्हेनें निर्माण करतां येते. बिंदु य पासून यं कडे जाण्यानें उत्पन्न होते किंवा यं पासून य कडे जाण्यानेंहि उत्पन्न होते. आणि या दिशा परस्परविरुद्ध असल्यामुळेंच एका दिशेला धन तर दुसरीला ऋण असें समजण्यांत येतें व साधारणपणें प्रस्थान रेषेची म्हणजे ० य ही दिशा व तिला उत्तरलंब अशी ० र दिशा या दोन्ही धनदिशा समजल्या जातात व तद्विरुद्ध दिशा ऋण समजतात.

वृत्तगुणोत्तरांच्या व्याख्या देण्यापूर्वी आणखी एखाद्याचा निर्देश करणें क्रमप्राप्त आहे व तो म्हणजे प्रत्यालेखन (प्रोजेक्शन) पद्धतीबद्दल होय. एका बिंदूपासून एखाद्या रेषेला काढलेला लंब तिला ज्या ठिकाणीं छेदतो त्या बिंदूला त्या पूर्वोक्त बिंदूचा प्रत्यालेख म्हणतात. प्रत्यालेखाच्या या व्याख्येच्या साह्यानें रेषेचाहि प्रत्यालेखनिर्णय करतां येण्यासारखा आहे. कारण रेषा ही बिंदूचा आक्रमणमार्ग असल्यानें तिचा प्रत्यालेख म्हणजे बिंदूचाच प्रत्यालेखमार्ग समजला तरी चालेल. याच विचारसरणीच्या साह्यानें रेषा सरळ असो वा वक्र असो ती अखंड असल्यास तिचा प्रत्यालेखहि अखंड किंवा अविच्छिन्न असणार हें अनुमान करणें कठिण नाहीं. तसेंच पुरोगामी परिच्छेदांत ठरविल्याप्रमाणें ही रेषा अमुक एका विशिष्ट दिशेनें आक्रमिली गेली असेल तर तिचा प्रत्यालेख त्याच दिशेनें आक्रमिला जाईल ( आ. नं. ३ पहा) जसें.—क ख ही रेषा क पासून उत्पन्न होऊन ख मध्यें संपलेली असली म्हणजे तिचा प्रत्यालेख क′ पासून उत्पन्न होऊन ख′ मध्यें संपतो व क′ ख′ ही दिशा धन मानली तर मग ख′ क′ ऋण होते. आतां क ख रेषेचा आकार कसाहि असला तरी तिचा प्रत्यालेख अग्रबिंदूंच्या प्रत्यालेखांवरच अवलंबून राहतो. या सिद्धांतावरून एखादी रेषा निरग्र म्हणजे तींतील कोणत्या बिंदूत उगम पावली आहे असें समजलें तरी पुन्हां तेथेंच संपते अशी असेल तर तिचा प्रत्यालेख अर्थात पूज्य असणार. याचा अर्थ असा कीं कोणत्याहि परिवृत बहुभुजाचे यथाक्रम प्रत्यालेख काढल्यास त्यांची बेरीज पूज्य होते. इतकेंच काय पण कोणत्याहि सर्वतः परिवृत वक्र रेषेचा देखील प्रत्यालेख पूज्यच असतो.

य ० यं व र ० रं या दोन अनुक्रमें पूर्वापरगामी व दक्षिणोत्तर म्हणजे एकमेकांना लंब अशा ० मधून जाणाऱ्या २ रेषा काढल्या असतां सर्व पातळीचे त्यायोगें ४ भाग होतात. या तलचतुर्थांना पाद अशी संज्ञा आहे. व पूर्वोक्त रेषांना अनुक्रमें कोटयक्ष व भुजाक्ष या संज्ञा आहेत. पातळींतील कोणत्याहि बिंदूंचीं या दोन अक्षांपासूनचीं अंतरें दिलीं असतां बिंदूचा स्थलनिर्णय करणें फार सुलभ होतें, हीं अंतरें रेषेच्या कोणत्या बाजूला मोजावयाचीं हा

प्रश्न उद्भवतो,परंतु या प्रश्नाचें अंशतः उत्तर मागील एका परिच्छेदांत दिलेलें आहेच. समजूं क हा एक पहिल्या पदांतील बिंदु आहे व कख, कग हे अक्षांना काढलेले लंब आहेत. आकृतीवरून (नं ४ पहा) कख ०ग हा आयत (रेक्टँगल) असणार व त्यामुळें कग हा ०ख बरोबर असतो व त्यामुळें कग, कख देणें काय किंवा ०ख, खक देणें काय सारखेंच. आतां ० पासून क पाशीं अक्षांना समांतर रेषांवरूनच जावयाचें म्हटलें तर प्रथम ०ख ही रेषा आक्रमण करावी लागेल व नंतर कख या कोट्यक्षाला समांतर रेषेनें जावें लागेल. अशा रीतीनें ० पासून क कडे जातांना प्रथम आक्रमण करावें लागणारें ०ख हें अंतर भुजाक्षावर मोजलें असल्याकारणानें त्याला भुजांतर अशी संज्ञा प्राप्त झाली आहे. व खक हें दुसऱ्या कोट्यक्षाला समांतर मोजलें असल्यामुळें त्याला कोट्यंतर म्हणतात. ०य ही भुजाक्षाची धन दिशा होय. म्हणजे ० पासून क पाशीं वर विहित केलेल्या मार्गानें जातांना प्रथम ० य या दिशेनें जावें लागत असल्यास त्या बिंदूचें भुजांतर धन समजलें जातें व ० यं या दिशेनें जावें लागत. असल्यास त्याचें भुजांतर ऋण समजण्याचा प्रघात आहे. थोडक्यांत लिहावयाचें म्हणजे र ० र या अक्षाच्या उजव्या हाताला कोठेंहि बिंदु असला म्हणजे त्याचें भुजांतर धन असतें. परंतु तो डाव्या बाजूला असल्यास तें ऋण असतें. तसेंच खक हें अंतर ०रे या दिशेनें आक्रमण झालेलें असल्यास त्याला धन कोट्यंतर समजतात. परंतु तेंच ० रं या दिशेनें मोजलें गेलें असेल तर तें ऋण कोट्यंतर होतें. म्हणजे य ० यं या रेषेच्या वर कोठेंहि बिंदु असला तरी त्याचें कोट्यंतर धन असतें व बिंदु खालीं असेल तर तें ऋण असतें. या दोन मूलभूत संकेतांवरून बिंदू ० य व ० र या दिशांमध्यें असेल म्हणजे प्रथम पादांत असेल तर त्याचें भुजयुग्म ऋण असतें. यं ० र मध्यें म्हणजे द्वितीय पक्षांत असेल तर भुजांतर ऋण पण कोट्यंतर धन असतें. $\angle$ यं ० रं या कोणांत म्हणजे तृतीयपादांत बिंदु असतो तेव्हां त्याचे दोन्ही भुज ऋण असतात व शेवटच्या पादांत असतां त्याचें भुजांतर धन परंतु कोट्यंतर ऋण असतें.

कोणाच्या कोणत्याहि भुजावरील यदृच्छया घेतलेल्या बिंदूपासून दुसऱ्या भुजावर लंब काढून जो त्रिकोण उपलब्ध होतो तो एका विशिष्ट जातीचा असतो म्हणजे त्याचे कोण नेहमीं तेच असतात(आ.नं.५पहा). प्रथम कख हे बिंदू एकाच भुजावर घेऊं. आतां $\angle$ककं ० = खखं ० = काटकोण; शिवाय $\angle$० हा दोन्ही त्रिकोणांना साधारण आहे म्हणून $\angle$० ककं = ०खखं. नंतर क ग हे दोन बिंदु निरनिराळ्या भुजांवर घेऊं. तेव्हांहि $\angle$० हा दोन्ही त्रिकोणांनां साधारण असतो व $\angle$० ककं = $\angle$० गगं = काटकोण, म्हणून $\angle$०ककं = $\angle$०गगं. यावरून बिंदुद्वय कोणत्याहि भुजांवर व कोठेंहि घेतले तरी त्यांपासून वरील निर्माण होणारे त्रिकोण समकोण असतात म्हणजे परस्परांनां सदृश असतात; यास्तव

$\frac{\text{ककं}}{\text{०क}} = \frac{\text{खखं}}{\text{०ख}} = \frac{\text{गगं}}{\text{०ग}}$ वगैरे म्हणजे जोंपर्यंत $\angle$० हा कोण स्थिर किंवा अविकारी आहे तोंपर्यंत उपरिनिर्दिष्ट त्रिकोणाच्या भुजांची परस्परांशीं गुणोत्तरें अविकारीच असतात. परंतु त्रिकोणाच्या भुजत्रयांपासून ३ निरनिराळीं भुजद्वयें करतां येतात व प्रत्येक भुजद्वयापासून २ गुणोत्तरें प्राप्त होतात. तेव्हां एकंदरींत प्रत्येक कोणाशीं अशीं ६ गुणोत्तरें निगडित असतात हें कळून येईल. कोण व त्यांचीं गुणोत्तरें यांच्या या निकटसंबंधामुळें त्रिकोणमितीमध्यें ज्या ज्या ठिकाणीं म्हणून कोणांशीं कांहीं कर्तव्य असतें त्या त्या ठिकाणीं प्रत्यक्ष त्या कोणाचा संबंध अगर समीकरणें न देतां त्यांच्या गुणोत्तरांच्याच रूपानें ते दिले जातात व या योजनेनें कोणपरिमाणनिर्णय व व त्यांचे परस्परांशीं संबंधहि अधिक सुसाध्य होतात. कोण स्थिर आहे तोंपर्यंत त्याचीं हीं ६ गुणोत्तरें विवक्षित स्थिर राशी असतात. म्हणून १ पासून ९० अंशांपर्यंत सर्व कोणांचीं एकेक कलांच्या अंतरानें गुणोत्तरें निश्चित करून तीं एकदां ग्रथित करून ठेवलेलीं आहेत.

आतां या भिन्न गुणोत्तरांच्या व्याख्या देतांना त्रिकोणाच्या भुजांनां अनायासानें ओळखतां यावें यास्तव त्यांनां कांहीं संज्ञा देऊं. समजा $\angle$य०क हा कोण श आहे. मग $\angle$कं वगैरे कोण काटकोण असल्यानें ०क वगैरेनां कर्ण म्हणतां येईल. किंवा श हा कोण ०क च्या भ्रमणानें प्राप्त झालेला असल्यामुळें त्याला चलरेषा असेंहि संबोधितात. ०कं याला कोणनिकटवर्तीभुज,क या बिंदूचें भुजांतर किंवा ०ककं त्रिकोणाचा पाद समजूं. मग राहिलेली बाजू म्हणजे ककं हिला कोणसंमुखभुज अथवा बिंदूचें कोट्यंतर किंवा ०ककं या त्रिकोणाचा लंब म्हणण्याचा परिपाठ आहे. चलरेषा ही कोणत्याहि पादांत असली तरी, चिन्ह निरपेक्ष म्हणजे नेहमींच धन समजलें जातें; परंतु त्रिकोणाचे दुसरे दोन भुज मात्र धन किंवा ऋण असणें हें सर्वस्वीं या चलरेषेच्या स्थानावर म्हणजे अप्रत्यक्षपणें कोणाच्या कमी अधिक प्रमाणावर अवलंबून रहातें. यावरून हीं गुणोत्तरें धन व ऋण दोन्हीं असूं शकतात हें स्पष्ट आहे. आतां ( आ. नं. ७ व ८ पहा. )

$\frac{\text{कोट्यंतर}}{\text{चलरेषा}}$ = निर्मित कोणाची भुजज्या = भुज्या श

$\frac{\text{भुजांतर}}{\text{चलरेषा}}$ = निर्मित कोणाची कोटिज्या = कोज्या श

$\frac{\text{कोट्यंतर}}{\text{भुजांतर}}$ = ,, ,, स्पर्शज्या = स्पज्या श

$\frac{\text{चलरेषा}}{\text{कोट्यंतर}}$ = ,, ,, कोछेदज्या = कोछेज्या श

$\frac{\text{चलरेषा}}{\text{भुजांतर}}$ = ,, ,, छेदज्या = छेज्या श

$\frac{\text{भुजांतर}}{\text{कोट्यंतर}}$ = ,, ,, कोस्पर्शज्या = कोस्पज्या श

या मूलभूत गुणोत्तरषट्काशिवाय त्याच्या पासूनच निर्माण केलेल्या अशा आणखी दोन राशींचा केव्हां केव्हां उपयोग होतो म्हणून त्यानांहि गुणोत्तर हीच संज्ञा प्राप्त झाली आहे. १-कोज्याश∠ = शची उत्क्रमज्या = उज्याश, आणि १-भुज्याश = ∠ शची कोट्युत्क्रमज्या = कोउज्याश. कोणत्याहि दोन भुजांपासून दोन गुणोत्तरें होतात व तीं परस्परांचे व्युत्क्रम असतात. तसेंच कोणत्याहि गुणोत्तरां-मध्यें एक तरी भुज सारखा असतो.यावरून या गुणोत्तरांमध्यें परस्परसंबंध असावेत हें अनुमान कोणालाहि काढतां येणें सोपें आहे.

$$\text{कोछेज्याश} = \frac{\text{चलरेषा}}{\text{कोटयंतर}} = १ \div \frac{\text{कोटयंतर}}{\text{चलरेषा}} = \frac{१}{\text{भुज्याश}}$$

$$\text{तसेंच छेज्याश} \quad ,, \quad ,, \quad = \frac{१}{\text{कोज्याश}}$$

$$\text{व कोस्पज्याश} \quad ,, \quad ,, \quad = \frac{१}{\text{स्पज्याश}}$$

$$\text{शेवटीं स्पज्याश} = \frac{\text{कोटयंतर}}{\text{भुजांतर}} = \frac{\text{कोटयंतर}}{\text{चलरेषा}} \div \frac{\text{भुजांतर}}{\text{चलरेषा}} = \frac{\text{भुज्याश}}{\text{कोज्याश}}$$

$$\text{म्हणून कोस्पज्याश} = \frac{\text{कोज्याश}}{\text{भुज्याश}}$$

त्रिकोणमितीची सर्व इमारत या गुणोत्तरांच्या पायावर रचलेली असल्याकारणानें प्रत्यालेखाच्या उत्पत्तीच्या आधारानें देतां येत असलेल्या त्यांच्या व्याख्या पुन्हां देऊन नंतर त्यांच्या विशिष्ट लक्षणाकडे वळूं. य० यें व र० रें हे परस्परांनां लंब असे दोन अक्ष आहेत व ०क ही चलरेषा धनभ्रमणानें ०य शीं श हा कोण करते असें समजूं. म्हणजे ( आ. नं. १०पहा) ०क च्या य०यें अक्षावरील प्रत्यालेखाच्या ०क शीं गुणोत्तराला शची कोज्या, कोभुजज्या किंवा कोज्याश अशी संज्ञा आहे. ०क च्या र० रें अक्षावरील प्रत्यालेखाच्या ०क शीं गुणोत्तराला शची भुजज्या अथवा भुज्याश म्हणतात. य०यें वरील प्रत्यालेखाच्या र०रें वरील प्रत्यालेखाशीं गुणोत्तराला शची कोस्पर्शज्या अगर कोस्पज्याश अशी संज्ञा आहे. ०क च्या त्याच्या य०यें वरील प्रत्यालेखाशीं गुणो-त्तराला श ची छेदनज्या अथवा छेज्याश असें समजतात. ०क च्या त्याच्या र०रें वरील प्रत्यालेखाशीं गुणोत्तराला शची कोछेदनज्या अगर कोछेज्याश अशी संज्ञा आहे. व शेवटीं र० रें वरील प्रत्यालेखाच्या य०यें वरील प्रत्या-लेखाशीं असलेल्या गुणोत्तराला शची स्पर्शज्या अगर स्पज्याश अशी संज्ञा आहे.

प्राचीन ग्रीक गणितयांना ∠ यें०क या कोणाची ( आ. नं. ११ पहा) गुणोत्तरें तर राहूंद्याच. पण ०कर्क या त्रिकोणाच्या दुसऱ्या भुजांचाहि उपयोग करितां येत नसे. ते त्याऐवजीं कय या चापाच्या दुप्पट चापाची ज्या म्हणजे कख या पूर्णज्येचा उपयोग करीत व टॉलेमीनंतर त्यांचीं अशीं कोष्टकेंहि केलेलीं होतीं. प्राचीन आर्य गणितयांनां ०क व कय या दोहोंचीहि उपयुक्तता पूर्णपणें कळून चुकली होती व त्यांनीं ३॥ अंशांच्या अंतरानें १ ते ९० अंशांपर्यं-तच्या सर्व कोणांच्या (ज्यांच्या) किंमतीहि ग्रथित करून ठेविल्या आहेत.याच रेषांनां ते अनुक्रमें कोटिज्या व भुजज्या म्हणत असत.त्यांनां उत्क्रमज्या व कोटि-उत्क्रमज्या यांच्याहि उपयुक्तेची जाणीव होती व भास्कराचार्यांनीं तर कोणार्धाच्या भुजज्येची किंमत उत्क्रमज्येच्या साहाय्यानें किती सुलभतेनें निश्चित करतां येतें हेंहि दर्शविलें आहे. याबद्दलचें विवरण पुढें योग्य स्थळीं येईलच.या पद्धतींत सुद्धां एक गौणत्व आहे व तें हें कीं गुणोत्तरांप्रमाणें कोण कळला तरी त्याच्या किंमती त्यामुळें पूर्णपणें निश्चित होत नाहींत.कारण कोणाबरोबर ०क अगर वृत्ताची त्रिज्याहि पण कळावी लागते.

गुणोत्तरांच्या परस्परांमधील संबंधापैकीं कांहींचा उल्लेख वर झालेलाच आहे तरी पायथॅगोरसच्या विख्यात सिद्धांतावरून आणखी *तीन नित्य समीकरणें प्रस्थापित* करतां येतात. कोण लघु असो, विशाल असो वा अतिविशाल असो. (आ. ६-७-८-९) यांवरून भुजांतर$^{२}$ + कोटयंतर$^{२}$ = चलरेषा$^{२}$ आतां या सूत्राला प्रत्येक पदानें अनुक्रमें भागलें म्हणजे

$$१ + \frac{\text{कोटयंतर}^{२}}{\text{भुजांतर}^{२}} = \left\{ \frac{\text{चलरेषा}}{\text{भुजांतर}} \right\}^{२} \text{ म्हणजे } १ + \text{कोस्पज्या}^{२}\text{श} = \text{कोछेज्या}^{२}\text{श}$$

$$\left\{ \frac{\text{भुजांतर}}{\text{कोटयंतर}} \right\}^{२} + १ = \left\{ \frac{\text{चलरेषा}}{\text{कोटयंतर}} \right\}^{२} \text{ म्हणजे स्पज्या}^{२}\text{श} + १ = \text{छेज्या}^{२}\text{श}$$

$$\text{व } \left\{ \frac{\text{भुजांतर}}{\text{चलरेषा}} \right\}^{२} + \left\{ \frac{\text{कोटयंतर}}{\text{चलरेषा}} \right\}^{२} = १ \text{ म्हणजे भुज्या}^{२}\text{श} + \text{कोज्या}^{२}\text{श} = १$$

अशीं तीन नित्य समीकरणें उपलब्ध होतात.

गुणोत्तरांच्या वर दिलेल्या व्याख्यांवरून त्यांच्या परस्परां-मधील संबंधावरून त्यांचे खालील गुणधर्म सहज पटण्या-सारखे आहेत.:—

( १ ) कोण लघु असला तर आकृतींत दर्शविल्याप्रमाणें ( आ. नं. १२ पहा ) प हा बिंदूच प्रथमपादांत असतो व त्यानें भुजयुग्म धनच असतें. अतएव प्रत्येक गुणोत्तर धन असणार हें उघड आहे. शिवाय य०फ हा कोण य०प या कोणाहून मोठा कल्पिल्यास फर्फ > पर्प परंतु फर्फ$^{२}$ + ०फ$^{२}$ = ०फ$^{२}$ = ०प$^{२}$ = ०पप$^{२}$ + ०प$^{२}$ यास्तव फर्फ > पर्प असेल तर ०फं < ०पं म्हणजे कोण जसजसा वाढत जाईल तशी त्याची भुज्या वाढत जाईल तर त्याची कोटिज्या कमी होत जाईल व याच कार-णामुळें त्याची स्पर्शज्या वाढत जाईल व शेवटचीं तीन गुणोत्तरें तर याच गुणोत्तरांचे व्युत्क्रम असल्यामुळें कोछेज्या

व कोस्पर्शज्या ही गुणोत्तरें कोणाच्या वाढीबरोबर अनुक्रमें क्षीण पावतात तर छेज्या वृद्धिंगत होत जाते.

( २ ) कोण विशाल असतो त्यावेळीं भुजांतर ऋण असल्यामुळें ज्या चार गुणोत्तरांमध्यें तें समाविष्ट असतें तीं सर्व ऋण असतात. तसेंच केवळ परिमाणाचा विचार करतां कोण वाढत जातो तसतसें त्याचें भुजांतर वाढत जात असल्यानें त्याचें कोटयंतर उत्तरोत्तर क्षीण होत गेलें पाहिजे, म्हणजे परिमाण व चिन्ह या दोन्ही गोष्टी लक्षांत घेतां भुज्या व कोछेज्या दोन्ही धन असतात व पूर्वोक्त क्षीण होत जाते तर उत्तरोक्त वृद्धिंगत होते. कोज्या व छेदज्या दोन्हीहि ऋण परंतु नुसत्या परिमाणाचाच विचार करितां भुजांतर वाढतें म्हणून कोज्या कमी होत जाते आणि त्याच्या बरोबरच छेदज्या वृद्धिंगत होत जाते व शेवटीं स्पर्शज्या व कोस्पर्शज्या दोन्ही ऋण परंतु त्यांपैकीं पूर्वोक्त वाढते व उत्तरोक्त क्षीण होत जातें ( आ. नं. १३ पहा ).

( ३ ) कोण १८० व २७० या अंशांमध्यें असतो त्या वेळीं त्याचीं दोन्हीं अंतरें ( भुजांतर व कोटयंतर ) ऋण असल्यानें त्या दोघांपासून निर्माण केलेलीं म्हणजे स्पर्शज्या व कोस्पर्शज्या एवढीं दोन गुणोत्तरें धन असतात.

आतां येथें ( आ. नं. १४ पहा ) परिमाणकृति लक्षांत घेतां पफं > पपं म्हणून ० फं $\angle$ ० पं म्हणजे भुज्या उत्तरोत्तर कमी होत जाते व कोछेदज्या वृद्धिंगत होते. तसेंच कोटिज्या वाढते तर छेदज्या कमी होते व शेवटीं स्पर्शज्या वृद्धिंगत होते व कोस्पर्शज्या क्षीणता पावते. अखेरीस कोण २७० व ३६० या अंशांमध्यें असेल तर भुजांतर ऋण असतें व शिवाय तें परिमाणानेंहि कमी कमी होत जातें ( आकृति नं. १५ पहा ). म्हणून भुज्या उत्तरोत्तर वृद्धिंगत होते म्हटलें तरी चालेल; कोज्या तर धन असते व तीहि उत्तरोत्तर वाढतच राहते व स्पर्शज्या ऋण असूनहि वाढत जाते. या कोणाचें कोटयंतर ऋण असल्यानें कोटयंतर विरहित म्हणजे फक्त भुज्या व कोछेदज्या गुणोत्तरें धन असणार.

या पद्धतीनें निरनिराळ्या कोणांच्या गुणोत्तरांच्या किंमती निर्णीत करतां येण्यासारख्या असल्या तरी प्रत्येक खेपेला त्याच घोपट मार्गाचें अवलंबन करण्यापासून बराच कालव्यय होणें अपरिहार्य आहे. यास्तव संयुक्त कोणद्वयांच्या गुणोत्तरांच्या परस्परसंबंधावरून केवढ्याहि मोठ्या कोणाच्या गुणोत्तरांच्या किंमती निश्चित करणें तदनुरूप लघुकोणाच्या गुणोत्तरांच्या साह्यानें किती सुलभ होऊं शकतें हें पुढील विवेचनावरून कळून येईल.

(अ) प्रथम पूरक कोणद्वयांची तुलना करूं ( आ. नं. १६ ते १९ पहा ).

$\angle$ य०फ = ९० − $\angle$ य ०प; ०प = ० फ व पपं फफं, ०य या लंब आहेत.

यांपैकीं कोणतीहि आकृति विचारांत घेतली तरी प्रथमतः तींतील त्रिकोण एकरूप आहेत असें तेव्हांच कळून येण्यासारखें आहे. इतकेंच नव्हे तर सजातीय भुजचिन्हसंकेत लक्षांत घेतां ही एकमेकासमान आहेत हें दिसून येईल म्हणजे—

०प = ०फ, ०फं = पपं, व फफं = ०पं

अतएव य०प व य०फ यांना श व प या संज्ञांनीं संबोधिलें तर

$$\text{भुज्याप} = \frac{\text{फफं}}{\text{०फ}} = \frac{\text{०पं}}{\text{०प}} = \text{कोज्याश};$$

$$\text{कोज्याप} = \frac{\text{०फं}}{\text{०फ}} = \frac{\text{पंप}}{\text{०प}} = \text{भुज्याश}$$

तसेंच स्पर्शज्याप = कोस्पज्याश. कोछेज्याप = छेज्याश, छेज्याप = कोछेज्याश व कोस्पज्याप = स्पज्याश.

( आ ) कोणद्वयांमध्यें काटकोणाइतकें अंतर असल्यास म्हणजे $\angle$प = ९० + $\angle$श असल्यास पूर्वप्रमाणेंच आकृति पूर्ण केल्यावरहि ( आकृति नं. २० ते २३ पहा ).

त्रिकोणांची तुलना केली असतां सजातीय भुजपरिमाणाकडेच लक्ष्य दिलें असतां, समान आहेत हें खरें परंतु चिन्हांच्या संकेताचा विचार करितां ० फं व पपं हे भुज भिन्नचिन्हयुक्त आहेत असें कळून येईल व त्यामुळें, भुज्याप =

$$\frac{\text{फफं}}{\text{०फ}} = \frac{\text{०पं}}{\text{०प}} = \text{कोज्याश}; \text{कोज्याप} = \frac{\text{०फं}}{\text{०फ}} = \frac{-\text{पंप}}{\text{०प}} =$$

भुज्याश,

तसेंच स्पर्शज्याप = −कोस्पज्याश, कोछेज्याप = छेज्याश, छेज्याप = −कोछेज्याश व कोस्पज्याप = −स्पज्याश.

( इ ) प = १८० − श, म्हणजे कोण परस्परांचे परिपूरक असतात त्यावेळीं ( आ. नं. २४ ते २७ पहा )

०फ = ०प, फफं, = पपं, व ० फं = ० पं म्हणून

$$\text{भुज्याप} = \frac{\text{फफं}}{\text{०फ}} = \frac{\text{पपं}}{\text{०प}} = \text{भुज्याश}; \text{कोज्याप} = \frac{\text{० फं}}{\text{०फ}} = \frac{-\text{०पं}}{\text{०प}}$$

= −कोज्याश

तसेंच स्पज्याप = −स्पज्याश, कोछेज्याप = कोछेज्याश, छेज्याप = −छेज्याश व कोस्पज्याप = −कोस्पज्याश.

(ई) प = −श असेल तेव्हां ( आ. नं. २८ ते ३१ पहा )

० फ = ० प, फल = −पल व ० ल हा भुज तर दोन्ही त्रिकोणांना साधारणच असतो त्यामुळें भुज्याप

$$= \frac{\text{फल}}{\text{०फ}} = \frac{-\text{पल}}{\text{०प}} = -\text{भुज्याश}, \text{कोज्याप} = \frac{\text{०ल}}{\text{०फ}} = \frac{\text{०ल}}{\text{०प}} =$$

= −कोज्याश

तसेंच स्पज्याप = −स्पज्याश, कोछेज्याप = −कोछेज्याश, छेज्याप = −छेज्याश व कोस्पज्याप = −कोस्पज्याश.

उपरिनिर्दिष्ट सारणीसमुदायांच्या साह्यानें कोणत्याहि लहान मोठ्या कोणांचीं गुणोत्तरें निश्चित करणें सुलभ होतें हें खरें, परंतु कोण कितीहि मोठा असला तरी ०पर्यंत त्याची चळरेषा वरील ४ पादांपैकीं कोणत्या तरी एका

पादांतच पडणार व त्यांचीं गुणोत्तरें या रेषेच्यां स्थानावरच अवलंबून रहाणार तोंपर्यंत कोणामध्यें ४काटकोणांची कितीहि पट मिळविली किंवा त्यामधून कितीहि पट वजा केली तरी त्यामुळें त्याच्या गुणोत्तरांच्या किंमतीत फरक होण्याचें प्रयोजन नाहीं. यास्तव कोण धन असेल तेव्हां त्यांतून ४ काटकोणाची जेवढी पूर्ण पट वजा केली असतां बाकी धन राहून ४ काटकोणांपेक्षां कमी राहील ( किंवा ऋण असल्यास जेवढी पट मिळविली असतां बेरीज धन होऊन पूर्ववत् ४ काटकोणापेक्षां कमी राहील ) तेवढी वजा करून ( किंवा मिळवून ) प्राप्त झालेल्या कोणाचीं गुणोत्तरें निश्चित करणें हा मार्ग त्याहिपेक्षां सुलभतर आहे. या विशिष्ट धर्मामुळेंच या गुणोत्तरांनां आवर्तमानराशि असें म्हणतात व ४ काटकोण हा त्यांचा आवर्त होय. स्पर्शज्या व कोस्पर्शज्या यांचा आवर्त तर २ काटकोणाएवढाच असतो.

येथवर अन्योन्यसंलग्न अशा कांहीं कोणद्वयांच्या गुणोत्तरांमधील परस्परसंबंध प्रस्थापित केल्यानंतर अनेक प्रसंगीं उपयोगांत आणणें आवश्यक असलेल्या अशा कांहीं विशिष्ट लघु कोणांचीं गुणोत्तरें ठाम करणें हें ओघानेंच आलें. प्रथमतः आपण ० अंश असलेल्या कोणाचा विचार करूं ( आ. नं. ३२ पहा. )

अ०प हा अगदीं लहाण कोण आहे असें कल्पूं. मग पपं सुद्धां अत्यल्प असल्यानें ०पं हा जवळ जवळ ०प एवढाच असणार म्हणजे पं हा बिंदु अ ला अगदीं निकटतर आहे असें समजावयाला प्रत्यवाय नाहीं. आतां ०प ही चलरेषा ऋण दिशेनें म्हणजे जेणेंकरून अ०प हा कोण अधिकाधिक कमी होईल अशा रीतीनें भोंवती फिरविली तर शेवटीं ०प ही रेषा ०अच्या इतकी निकट जाऊं शकेल कीं, दोहोंमधील अंतर अदृश्य, अपरिमेय, अगोचर आहे अशी कल्पना करणें गैर होणार नाहीं. पण या स्थितींत पपं रेषा सुद्धां इतकी सूक्ष्म असेल कीं ती मापण्याच्या आटोक्याच्या बाहेर असेल; म्हणजे ०पं व ०अ यांमध्यें क्वचितच अंतर राहील. तेव्हां अशा कोणाचीं म्हणजे $0^\circ$ चीं गुणोत्तरें खालीलप्रमाणें असणार हें उघड आहे. भुज्या

$$० = सी\frac{पपं}{०प} = \frac{०}{०प} = ०, \text{ कोज्या}० = सी\frac{०पं}{०प} = \frac{०प}{०प} = १$$

तसेंच स्पज्या० = ०, कोछेज्या = ∞ छेज्या = १, कोस्पज्या ∞ या गुणोत्तरांवरून ९०°, १८०°, २७०° वगैरे अंश असलेल्या कोणांचीं गुणोत्तरें तेव्हांच काढतां येतात. कोण ४५° अंशाचा असल्यास ( आ. नं. ३३ पहा ).

$$०पं = पपं \text{ व } ०प = \sqrt{२}पपं$$

$$\text{सबब भुज्या}४५ = ४५\sqrt{\tfrac{१}{२}} = \text{कोज्या } ४५$$

$$\text{स्पज्या } ४५ = १ = \text{कोस्पज्या } ४५$$

$$\text{कोछेज्या } ४५ = \sqrt{२} = \text{छेज्या } ४५$$

कखग या समभुजत्रिकोणाचा कोणताहि उच्छ्रय काढला असतां ( आ. नं. ३४ ) त्यायोगें ज्या शीर्षामधून तो काढला असेल त्या शीर्षामधील कोणाचे दोन समविभाग होतात तसेंच त्यायोगें तदभिमुख भुजाचेहि पण दोन समविभाग होतात म्हणून कग = २ कंग व कक = कंग $\sqrt{३}$

$$\text{यावरून भुज्या } ३० = \frac{कंग}{कग} = \text{कोज्या } ६० = \tfrac{१}{२}$$

$$\text{कोज्या } ३० = \frac{ककं}{कग} = \text{भुज्या } ६० = \tfrac{\sqrt{३}}{२}$$

$$\text{स्पज्या } ३० = \text{कोस्पज्या } ६० = \tfrac{१}{\sqrt{३}}$$

वगैरे काटकोणाचीं गुणोत्तरें स्वतंत्र देतां येतात (आ.नं ३२ पहा ). अ०क हा कोण जवळजवळ काटकोण आहे असें कल्पूं मग क हा बिंदू इला अगदीं निकट असणार. तसेंच कं हा ० समीप असणार म्हणजे ०कं सूक्ष्म असणार अर्थात् त्यामुळें ककं ची लांबी जवळ जवळ ० क इतकी असणार. आतां हा कोण वाढवीत वाढवीत शेवटीं तो काटकोणाइतका मोठा केला म्हणजे त्याची भुजज्या =

$$ख \frac{ककं}{०क} = १; \text{ व कोज्या} = सी\frac{०कं}{०क} = ० \text{ येते.}$$

यावरून राहिलेल्या गुणोत्तरांच्या किंमती काढतां येतील.

कित्येक प्रसंगीं ३६° चीं गुणोत्तरेंहि माहीत असणें अपरिहार्य असतें व तीं भूमितींतील खालील सिद्धांताच्या साह्यानें निश्चित करतां येतात. हा सिद्धांत म्हणजे अंत्यमध्यगुणोत्तरांत दिलेल्या रेषेचे दोन खंड करण्याविषयींचा होय. म्हणजे रेषा अशा दोन खंडांत छेदणें कीं, जेणेंकरून एका खंडावरील चौरस, सबंध रेषा व राहिलेला खंड यांचे आयत समान होईल. एका रेषेच्या दोन बिंदूमध्यें ( एकदां अंतः व एकदां बाह्य ) असे छेद करतां येतात व वरील उल्लेखित खंडांपैकीं पूर्वोक्त खंडाच्या रेषेशीं नेहमीं अनुक्रमें

$\frac{\sqrt{५}-१}{२}$ व $\frac{\sqrt{५}+१}{२}$ हें गुणोत्तर पडतें. याप्रमाणें अंतश्छेद केलेल्या रेषेवर वर उल्लेख केलेल्या खंडाएवढा पाया असलेला समद्विभुजत्रिकोण काढला असतां त्याचे ३६, ७२, ७२ असे कोण होतात.

$कघ^२$ = कख× घख, ( आ. नं. १६ पहा ) कख = कग व खग = कघ म्हणून खग = घग.

आतां घडकगला लंब काढला असतां

$$\text{कोज्या } ३६ = \frac{कट}{कघ} = \frac{१}{२}कग \div \frac{\sqrt{५}-१}{२}कख$$

$$= \frac{१}{\sqrt{५}-१} = \frac{\sqrt{५}-१}{४}$$

यावरून इतर गुणोत्तरांची निष्पत्ति करतां येईल.

आतां कोणाचें एखादें गुणोत्तर दिलें असतां कोणार्धाचीं गुणोत्तरें निश्चित करण्याच्या एका रीतीचें विवेचन करूं.



आ. २७



आ. २८



आ. २९



आ. ३०



आ. ३१



आ. ३२



आ. ३३



आ. ३४



आ. ३५



आ. ३६



आ. ३७



आ. ३८



आ. ३९

आ. ५०




आ. ५१




आ. ५२




आ. ५३




आ. ५४




आ. ५५




आ. ५६




आ. ५७
ग
ख
क
o
क
ख
ग


आ. ५८
क
क
ख
घ
ङ
ग
ग
ख


आ. ५९
क
o
ख
क
ख
ग
घ
ग
ङ


आ. ६०
य
क
ङ
ख
o
छ
च
ग


आ. ६१
क
ग
म
ख
ख
क
ग


आ. ६२
क
क
o
ग
ग
ख


आ. ६३
ख
क
$\frac{\pi}{2}$-क
$\frac{\pi}{2}$-ख
$\frac{\pi}{2}$-ग


आ. ६४
ख
ग
क
क
ख
ग

समजूं (आ. नं. ३७ पहा) कखर्क या दिलेल्या श कोणाची[1] भुज्या प आहे. मग फर्क खर्क ला लंब असल्यास व खक हीच मापनपरिमाणरेषा धरल्यास फर्क = प व खर्क = $\sqrt{१ - प^{२}}$. आतां खग = खक घेऊं म्हणजे ग हा कोण $\frac{श}{२}$ होईल व गर्क = गख + खर्क = $१+\sqrt{१ - प^{२}}$

म्हणून स्पज्या $\frac{श}{२} = \frac{प}{१+\sqrt{१-प^{२}}}$ यावरून इतर गुणोत्तरें साध्य होतात.

या रीतीचें अवलंबन केल्यास ३० पासून १५, ७॥, ३॥। वगैरे; ३६ पासून १८, ९, ४॥ वगैरे व ४५ पासून २२½, ११¼ वगैरे अंशांच्या कोणांचीं गुणोत्तरें साध्य होतात. आतांपर्यंतच्या विवरणावरून कोण ० पासून ४ काटकोणापर्यंत वाढत जातांना त्याच्या निरनिराळ्या गुणोत्तरांच्या किंमतींत परिमाण व चिन्ह या दोन्ही दृष्टींनीं पहातां कसकसा फेरफार होतो हें खालील कोष्टकावरून सुबोध होईल.

| कोणांश | ० | ० ते ९० | ९० | ९० ते १८० | १८० | १८० ते २७० | २७० | २७० ते ३६० | ३६० |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| भुज्या | ० | + | १ | + | ० | − | −१ | − | ० |
| कोज्या | १ | + | ० | − | −१ | − | ० | + | १ |
| स्पज्या | ० | + | ±∞ | − | ० | + | ±∞ | − | ० |
| कोछेदज्या | ±∞ | + | १ | + | ±∞ | − | −१ | − | ±∞ |
| छेदज्या | १ | + | ±∞ | − | −१ | − | ±∞ | + | १ |
| कोस्पज्या | ±∞ | + | ० | − | ±∞ | + | ० | − | ±∞ |

[1] कांहीं कोणांचीं गुणोत्तरें पुढील कोष्टकांत दिलीं आहेत येथें प्रथित केलेल्या कोणांपैकीं एखाद्याचें गुणोत्तर पहावयाचें असल्यास कोण डावीकडील असेल तर त्याचा संबंध फक्त शिरोभागीं दिलेल्या गुणोत्तरांशींच आहे व उजव्या बाजूकडील असेल तर त्याचा फक्त अधोभागीं दिलेल्या गुणोत्तरांशींच संबंध आहे असें समजावें.

| | १५° | १८° | ३०° | ३६° | ४५° | |
|---|---|---|---|---|---|---|
| स्पज्या | $२-\sqrt{३}$ | $\frac{\sqrt{२५-१०\sqrt{५}}}{५}$ | $\frac{१}{\sqrt{३}}$ | $\sqrt{५-२\sqrt{५}}$ | १ | कोस्पज्या |
| कोज्या | $\frac{\sqrt{६}+\sqrt{२}}{४}$ | $\frac{\sqrt{१०+२\sqrt{५}}}{४}$ | $\frac{\sqrt{३}}{२}$ | $\frac{\sqrt{५}+१}{४}$ | $\frac{१}{\sqrt{२}}$ | भुज्या |
| भुज्या | $\frac{\sqrt{६}-\sqrt{२}}{४}$ | $\frac{\sqrt{५}-१}{४}$ | $\frac{१}{२}$ | $\frac{\sqrt{१०-२\sqrt{५}}}{४}$ | $\frac{१}{\sqrt{२}}$ | कोज्या |
| | ७५° | ७२° | ६०° | ५४° | ४५° | |

वरील दोन कोष्टकांहूनहि गुणोत्तरांच्या विशेषांचा परिचय त्यांच्या आकृतींत (नं ३८–४१) दिलेल्या आलेखांवरून होण्यासारखा आहे.

र = प्र (य) (प्र = प्रपंच (फंक्शन) (य) असें कल्पिल्यास य हा राशि सुद्धां रचा प्रपंच आहे असें समजणें गैर नाहीं. परंतु रच्या यशीं संबंधापासून याचा राशीं असलेला संबंध ओळखतां यावा एतदर्थ या संबंधाला आपण विपर्यस्त अगर विपरीत संबंध असें मानूं व हा संबंध $य = प्र^{-१}(र)$ या चिन्हानें दर्शवूं. व या चिन्हाचा असा अर्थ करूं कीं, य किंवा $प्र^{-१}(र)$ हा राशि असा आहे कीं त्याची उपरिनिर्दिष्ट प्रकारच्या प्रपंचाची किंमत र आहे. आतां एखादा प्रपंच आवर्तमान (पीरिऑडिक) असला म्हणजे निरनिराळ्या अनेक राशींच्या एका विशिष्ट प्रपंचाची किंमत एकच असेल तर विपर्यस्त राशीच्या तितक्या निरनिराळ्या किंमती असणार हें ओघानेंच आलें. म्हणजे असला विपर्यस्त प्रपंच विविध मूल्य असतो व हीं मूल्यें कांहीं विशिष्ट नियमबद्ध असतात.

उदाहरणार्थ आपण भुज्या हा प्रपंच विचारांत घेऊं. श या कोणाची भुज्या क आहे असें समजूं. मग $श \pm २प\pi$ या राशीमध्यें समावेश होत असलेल्या सर्व कोणांचीहि भुज्या कच असते हें आपण पूर्वी पाहिलेंच आहे. म्हणजे क ही भुज्या असलेले अनंत कोण असतात. परंतु १८०−श या कोणाचीहि भुज्या तीच असते, म्हणजे तीच भुज्या असलेली आणखीहि एक अनंत कोणाची श्रेणी असूं शकेल व हे सर्व $१८०-श \pm २प\pi$ म्हणजे $\pm(२प+१)\pi - श$ या राशींमध्यें समाविष्ट होऊं शकतात व या दोन्ही [illegible]

श्रेणींतील कोणाच्या $\pm$ प $\pi$ + $(-1)^{प}$श या एका राशीनें व्यक्त करतां येतात. येथें प म्हणजे पद कोणतांहि धनपूर्णांक ( पॉझिटिव्ह इंटीजर ) समजावा.

कोज्या$^{-1}$( क ) हीहि राशि अनंतमूल्य आहे व श ही त्याची किंमत असली तर इतर सर्व किंमतींचा समावेश $\pm$२प $\pi$ $\pm$ श यामध्यें करतां येण्यासारखा आहे.

स्पर्शज्येचा आवर्त $\pi$ असतो सबब स्पज्या$^{-1}$ क याची एक किंमत श असली तर इतरांचा समावेश + प $\pi$ +श यामध्यें होतो.

वरील विवेचनावरून कोछेज्या$^{-1}$ क व कोस्पज्या$^{-1}$ क यांच्या सर्वसामान्य किंमती अनुक्रमें $\pm$ प $\pi$ $\pm$ $(-1)^{प}$श $\pm$ २ प $\pi$ $\pm$ श, $\pm$ प$\pi$ +श असणार हें उघड आहे.

आतां या अनंतमूल्य राशींच्या ज्या किंमती परिमाणाच्या दृष्टीनें सर्वांत लहान असतात ( मग त्या धन असोत वा ऋण असोत ) व त्यांनाच त्यांच्या प्रधान किंमती समजतात, त्या अनुक्रमें भुज्या$^{-1}$ ( क ) वगैरे संकेतांनीं व्यक्त करण्याचा परिपाठ आहे. म्हणजे क धन असेल तर भुज्या$^{-1}$ ( क ) = श धन असून लघु असावयाला पाहिजे; क ऋण असेल तर भुज्या$^{-1}$ क = श ऋण असून लघु असावयाला पाहिजे म्हणजे भुज्या$^{-1}$ क केव्हांहि –९० ते + ९० यांमध्यें असावयाला पाहिजे. तसेंच स्पज्या$^{-1}$ ( क ) हा कोण नेहमीं –९० ते + ९० यांमध्यें असावयाला पाहिजे, परंतु कोज्या$^{-1}$ ( क ) मात्र ० ते १८० मध्यें असतो. या तिहींच्या प्रधान किंमतीवरून कोछेज्या$^{-1}$क व कोस्पज्या$^{-1}$क छेज्या$^{-1}$ (क) यांच्या किंमतींहि अर्थात् –९०ते + ९० – ९० ते + ९० व ० ते १८० मध्यें असल्या पाहिजेत.

विपरीत राशींच्या याप्रमाणें व्याख्या केल्या असतां भुज्या$^{-1}$ क + कोज्या$^{-1}$ ( क )=$\frac{\pi}{2}$, छेज्या$^{-1}$ ( क ) + कोछेज्या $^{-1}$( क ) = $\frac{\pi}{2}$ व स्पज्या$^{-1}$क +कोस्पज्या$^{-1}$ क = या $\pi$ सारख्या यथार्थ असल्याचें तेव्हांच समजून, येणारें आहे प्रधान किंमत व इतर किंमती या दोहोंशींहि कर्तव्य असल्याकारणानें त्यांच्यामधील भेदाविष्करण करण्याचा प्रसंग येईल तेव्हांच वर सुचविलेलीं दोन भिन्न निदर्शकें उपयोगांत आणलीं जातात. अन्यप्रसंगीं भुज्या$^{-1}$( क ) वगैरेंचा अर्थ त्यांच्या प्रधान किंमतींच होत अशी रूढी आहे.

विपरीत राशींच्या अनंत किंमती असतात हें पुढील आकृतींवरून कळून येईल. ( आ. नं. ४२ पहा. )

आकृतींतील ०प मापनपरिमाण समजूं; मग क धन असेल तर ० अ = क घेऊन य० यें याला अ मधून समांतर काढतां प०य व फ०य या दोन्ही परिपूरक कोणांची भुज्या क असल्याचें समजून येतें. म्हणून या प्रत्येकापासून २प $\pi$ मिळवून अगर उणे करून दोन अनंत श्रेणी प्राप्त होतात. क ऋण असेल तेव्हां ० आ विरुद्ध दिशेनें घेऊन पूर्ववत् दोन श्रेणी प्राप्त होतात.

या ठिकाणीं ( आकृति नं. ४३ पहा ) ० अ व ०आ भुजाक्षावर घेऊन पूर्ववत् आकृती पूर्ण केल्यास श व –श असे कोण निघतात व त्यांवरून २प $\pi$ मिळवून अगर वजा करून २ अनंतश्रेणी उपलब्ध होतात.

पं फं या व्यासाच्या अग्रांतून ( आ. नं. ४४ पहा ) त्याला दोन क लांबीचे लंब उभारले असतां श व श + १८० अशी कोणनिष्पत्ति होते व पूर्ववत् २प$\pi$ मिळवून अगर वजा करून सर्व कोण उपलब्ध होतात.

योग व घात सूत्रां विषयीं.—हीं सूत्रें वर एके ठिकाणीं विवरण केलेल्या प्रत्यालेखाच्या उपपत्तीच्या साहायानें, टॉलेमीच्या भूमितींतील विख्यात सिद्धांताच्या आधारानें व भूमिति व त्रिकोणमिति यांच्या अगदीं मूलभूत अशा कल्पनांच्या आधारें निर्माण करतां येतात. परंतु प्रथमोक्त पद्धतीनेंच हीं सूत्रें कोणांच्या सर्वसामान्य परिमाणांनां लागू असल्याचें सिद्ध करितां येतें. इतर पद्धतींत कोण विवाक्षित मर्यादेपेक्षां(म्हणजे काटकोणापेक्षां ) मोठे नाहींत असें गृहीत धरूनच तीं सूत्रें प्रस्थापित करितां येतात व नंतर कोण मर्यादेपेक्षां विशाल आहेत असें मानलें तरी त्यायोगें सूत्रांनां इरताळ लागत नाहीं. अतएव तीं सर्व परिमाणांच्या कोणांनां सारखींच लागू असतात असें अनुमानानें ठरवितां येतें.

य०र व र०ल हे धन दिशेनें निर्माण केलेले ( = श व प ) कोणतेहि दोन कोण आहेत (आ. नं. ४५ पहा).अतएव य०ल हा त्यांच्या बेरजे( = श + प )समान आहे.$\therefore$ सबब ०क या रेषेचा ०य या रेषेवरील प्रत्यालेख ०क × कोज्या (श + प) एवढा असणार. तसाच तो ०ढं व कं क यांच्या म्हणजे ०क च्या ०र वरील प्रत्यालेखांच्या ०य या रेषेवरील प्रत्यालेखांच्या बेरजेसमानहि असणार. परंतु ०कं = ०क × कोज्याप व कं क = ०क × भुज्याप. शेवटीं ०कं हा ०र वरील प्रत्यालेख असल्यानें त्याचा ०य वरील प्रत्यालेख ०कं × कोज्याश असतो व कंक, ०र याला धन दिशेनें लंब असल्याकारणानें तिचा प्रत्यालेख कंक × कोज्या ( श + ९० ) अतएव ०ककोज्या ( श+प ) = ०क कोज्याश कोज्याप + ०क कोज्या (श+९०)× भुज्याप
$\therefore$ कोज्या (श + प ) = कोज्याशकोज्याप—भुज्याशभुज्याप हें सूत्र कोणत्याहि दोन कोणांनां सारखेंच लागू असल्यानें प बद्दल – प योजला तरी त्यामुळें सूत्राला प्रत्यवाय येण्याचें प्रयोजन नाहीं. किंवा ०र पासून ऋण दिशेनें भ्रमणानें–प हा कोण निर्माण करून

ॅल ही चलरेषा प्राप्त झाली असेल तर वर निर्देश केलेल्या पद्धतींचा अवलंब केल्यानें कोज्या(श−प) = कोज्याशकोज्याप + भुज्याशभुज्याप याप्रकारचें सूत्र स्वतंत्रपणें प्रस्थापित करतां येतें.

वरील आकृतींतील ०फ ० क आणि कंक यांचे ०य ला घन दिशेनें लंब अशा रेषेवर प्रत्यालेख घेतल्यानें भुज्या (श+प) = भुज्याशकोज्याप + कोज्याशभुज्याप असें सूत्र उपलब्ध होतें. शेवटीं भुज्या( श−प ) याचा विस्तार, कोज्या (श−प ) याचा विस्तार ज्या मार्गांनीं करतां येतो त्याच मार्गांनीं करतां येण्यासारखा आहे व तो भुज्याशकोज्याप−कोज्याशभुज्याप आहे.

( आ )टॉलेमीसिद्धांत—वृत्तांतर्गत चतुष्कोणाच्या परस्पर संमुख भुजद्वयांच्या आयतांच्या बेरजेसमान त्याच्या कर्णांचा आयत असतो. आतां (आ. नं ४६ पहा)∠घकख = ९०−प ∴ ∠घकग = ९०−श−प.

कोणत्याहि पूर्ण ज्येची किंमत व्यास × ज्यासंमुख वृत्तपाली(परिघ) वरील कोणाची भुजज्या इतकी असल्यामुळें कघ × खग + कख×घग = कग × खघ यांचे २ त्रि (त्रिज्या) × भुज्याप × २ त्रि × भुज्याश + २ त्रि × २ त्रि × भुज्या (९०−श−प) = २त्रि×कोज्याश × २ त्रि × कोज्याप, म्हणजे कोज्या (श + प) = कोज्याशकोज्याप−भुज्याशभुज्याप असें रूपांतर होतें. या आकृतीत (नं. ४७ पहा) गखघ हा कोण ९० −श+प आहे तेव्हां वरील टॉलेमीसिद्धांताधारें कोज्या (श−प) =कोज्याशकोज्याप − भुज्याशभुज्याप ही सारणी उत्पन्न होते. बाकीच्या दोन सारण्या दिलेल्या आकृतींच्या ( आ. न. ४८ पहा ) साहाय्यानें प्रस्थापितां येतात.

टॉलेमीसिद्धांताधारें हीं सूत्रें निर्माण करण्यामध्यें नकळत आपण श व प हे कोण लघु आहेत असें गृहीत धरून चालतों. तरी मर्यादित मूल्य क्षेत्रामुळें उत्पन्न होणारा गौणपणा दूर करतां येतो. तो असा ( आ. ४९ पहा ) समजूं शं = ९०+श: मग कोज्या (शं + प ) = −भुज्या ( श+प ) = −भुज्याशकोज्याश—कोज्याशभुज्याप = कोज्याशं कोज्याप−भुज्याशंभुज्याप. श कोण विशाल असला तरी सूत्रें अबाधित राहतात हें यावरून समजतें व याच विचारसरणीचा विस्तार केला असतां श व प हे कोण केवढेहि असले तरी सूत्रचतुष्टयाला यत्किंचितहि बाध येत नाहीं हें कळून येईल.

$$\text{आतां स्पज्या ( श} \pm \text{प )} = \frac{\text{स्पज्याश} \pm \text{स्पज्याप}}{1 \mp \text{स्पज्याशस्पज्याप}}$$

वरील सूत्रचतुष्टयामध्यें श + प = स व श−प = ह म्हणजे $\text{श} = \frac{\text{स + ह}}{२}$ व $\text{प} = \frac{\text{स−ह}}{२}$ अशी योजना केली असतां त्यापासून बेरीज वजाबाकीनें

$$\text{भुज्यास + भुज्याह} = २\ \text{भुज्या}\ \frac{\text{स + ह}}{२}\text{कोज्या}\ \frac{\text{स − ह}}{२}$$

$$\text{भुज्यास − भुज्याह} = २\ \text{भुज्या}\ \frac{\text{स − ह}}{२}\text{कोज्या}\ \frac{\text{स + ह}}{२}$$

$$\text{कोज्यास + कोज्याह} = २\ \text{कोज्या}\ \frac{\text{स + ह}}{२}\text{कोज्या}\ \frac{\text{स − ह}}{२}$$

$$\text{कोज्याह − कोज्यास} = २\ \text{भुज्या}\ \frac{\text{स + ह}}{२}\text{भुज्या}\ \frac{\text{स − ह}}{२}$$

अशीं नवीनच आणखी ४ सूत्रें निर्माण करतां येतात

हीं सूत्रें पुरोगामी प्रत्यालेख ( आ. नं. ५० पहा ) उपपत्तीच्या साहाय्यानेंहि प्रस्थापित करतां येतात.

य०ल = स, य०र = ह व ८र = ०ल असें कल्पू मग ०व हा लंब रलचे सम विभाग करतो व तो ०य आणि ०र या रेषांशीं अनुक्रमें $\frac{\text{स + ह}}{२}$, $\frac{\text{स − ह}}{२}$ हे कोण करतो.

आतां ०व चा प्रत्यालेख ०ल, लव तसेंच ०र, रव यांच्या प्रत्यालेखासमान असतो व पुन्हां रव = लव. म्हणून २०व चा प्रत्यालेख ०ल, ०र यांच्या प्रत्यालेखांच्या बेरजेसमान असणार हें स्पष्ट आहे. तेव्हां हे प्रत्यालेख ०य या रेषेवर घेतल्यास

$$\text{०ल कोज्यास + ०र कोज्याह} = २\ \text{०व कोज्या}\frac{\text{स + ह}}{२}$$

$$= \text{२०र कोज्या}\ \frac{\text{स − ह}}{२}\ \text{कोज्या}\ \frac{\text{स + ह}}{२}$$

$$\text{म्हणजे कोज्यास + कोज्याह} = २\ \text{कोज्या}\ \frac{\text{स + ह}}{२}\ \text{कोज्या}\ \frac{\text{स − ह}}{२}$$

०र, ०व आणि ०ल, लव यांच्या प्रत्यालेखांच्या बेरजेऐवजीं त्यांचें अंतर काढल्यास तें रलच्या प्रत्यालेखासमान असणार हें उघड आहे व पूर्वोक्त पद्धतीनें त्यापासून

$$\text{कोज्याह−कोज्यास} = २\ \text{भुज्या}\ \frac{\text{स + ह}}{२}\ \text{भुज्या}\ \frac{\text{स − ह}}{२}$$

अशी सारणी प्राप्त होते. उपर्युक्त प्रत्यालेख ०य वर घेण्याऐवजीं तिला लंब अशा रेषेवर घेतले असतां राहिलेल्या दोन सारण्या उपलब्ध होतात

कोणद्वयांच्या बेरजेच्या भुज्याकोज्या काढण्याच्या पद्धतींच्या पुनः पुनर्योजनेनें ३ अगर अधिक कोणांच्या बेरजेच्या भुज्याकोज्याहि मिश्र करतां येतात. कारण भुज्या (श + प + स) = $\Sigma$ भुज्याश कोज्यापकोज्यास

−II भुज्याश

= II कोज्याश ( $\Sigma$ स्पज्याश−II स्पज्याश )

---

$\Sigma$ सर्वधन = ( यापुढील तत्सदृश राशींची बेरीज या चिन्हानें समजावी ).

II = सर्वघात ( या चिन्हापुढील तत्सदृश सर्व राशींचें हें द्योतक आहे).

व कोज्या ( श + प + स ) = $\Pi$ कोज्याश(१-$\Sigma$ स्पज्याश स्पज्याप )

तसेंच भुज्या(श+ प + स + ह) = $\Pi$कोज्याश ($\Sigma$ स्पज्याश-$\Sigma$ स्पज्याशस्पज्यापस्पज्यास )

व कोज्या(श + प + स + ह) = $\Pi$ कोज्याश ( १-$\Sigma$ स्पज्याश स्पज्याप-$\Pi$स्पज्याश )

या विस्तारावरून उत्तरोत्तर अधिकाधिक कोणांच्या बेरजेच्या भुज्या अगर कोज्यांचे विस्तार अनुमानानें ठरवूं लागल्यास ते

$$\text{भुज्या } (श_1+श_2+ \dots \dots + श_ग) = \prod_{प=1}^{प=ग} \text{कोज्याश}_प \; (\Pi_1-\Pi_3 + \Pi_5 \dots\dots)$$

$$\text{व कोज्या } ( श_1 + श_2 + \dots\dots श_ग ) = \Pi \text{कोज्या}_प \; (1-\Pi_2 + \Pi_4 \dots\dots)$$

असणार हें सहज कळून येईल. समजूं. पूर्वोक्त पद्धतीच्या पुनर्योजनेनेंच हे प कोणाच्या बेरजेच्या भुज्या व कोज्यांचे विस्तार प्राप्त झाले आहेत.

$$\text{मग कोज्या } ( श_1 + \dots श_ग + श_{ग+1}) = \text{कोज्या } ( श_1 + \dots\dots + श_ग ) \text{ कोज्याश}_{ग+1} - \text{भुज्या } ( श_1 +\dots+ श_ग ) \text{ भुज्याश}_{ग+1}$$

$$= \prod_{प=1}^{प=ग} \text{कोज्याश}_प \; (1-\Pi_2+\Pi_4) \dots \text{कोज्याश}_{ग+1}$$

$$- \prod_{प+1}^{प=ग} \text{कोज्याश}_प \; (\Pi_1-\Pi_3+ \Pi_5 \dots ) \text{भुज्याश}_{ग+1}$$

$$= \prod_{प=1}^{ग+1} \text{कोज्याश}_प \; ( 1-\Pi_2 + \Pi_4 \dots\dots)$$

$$-\prod_{प=ग}^{ग+1} \text{कोज्याश}_प [( \text{स्पज्याश}_{ग+1} (\Pi_1-\Pi_3 +\Pi_5 \dots)]$$

[आतां येथें ग + १ कोणांपैकीं प्रत्येक वेळीं प कोण घेऊन त्यांच्या स्पज्यांच्या घातांच्या बेरजेला $\Pi_प$ या चिन्हानें दर्शविण्याचा संकेत मान्य केल्यास ]

$$= \prod_1^{ग+1} \text{कोज्याश}_प \left\{ 1-(\Pi_2+\Pi_1 \text{स्पज्याश}_{ग+1}), \right.$$

$$\left. +( \Pi_4+ \Pi_3 \text{स्पज्याश}_{ग+1})-(\dots \right.$$

$$= \prod_1^{ग+1} \text{कोज्याश}_प \left\{ 1-\Pi'_2 + \Pi'_4 \dots \dots \right\}$$

याच पद्धतीनें भुज्या ( श₁ +......+ श$_ग$ + १)

$$= \prod_1^{ग+1} \text{कोज्याश}_प \left\{ \Pi'_1 -\Pi'_3 + \dots \dots \right\}$$

हें सिद्ध करतां येतें

आतां ग आणि ग + १ कोणांच्या भुज्याकोज्यांच्या या विस्ताराची तुलना केल्यास असें दिसून येईल कीं,त्यांचे विस्तार अगदीं एकजातीय असल्यानें व ग कोणाचे विस्तार यथार्थ असल्यास ग + १ कोणाचेहि विस्तार यथार्थ ठरत असल्यानें ग चीं कोणतीहि एखादी किंमत असतां जर वरील सूत्रें सत्य असतील तर त्यापेक्षां एकानें अधिक एवढी किंमत असतांहि तीं सत्य असतील. परंतु हीं सूत्रें गची किंमत ३ किंवा ४ असल्यास यथार्थ असतात हें आपण पाहिलेंच आहे. तेव्हां किंमत ५ असली तरी सूत्रें बरोबर असली पाहिजेत, म्हणून तीं ६ असतां यथार्थ असणार व यास्तव ७, ८, ९... वगैरे किंमती असतांहि सूत्रें अबाधित असणार. सारांश कोणसंख्या कितीहि असली तरी सूत्रें सारखींच सत्य ठरतात,

भुज्याकोज्यांच्या विस्तारांच्या साह्यानें

$$\text{स्पज्या}(श_1+श_ग) = \frac{\Pi_1 - \Pi_3 + \dots}{1 - \Pi_2 + \Pi_4 \dots} \dots +$$

असें सिद्ध होतें.

या तीन सारण्यांत $श_1 = श_2 = \dots \dots श_ग = श$ अशी योजना केल्यास

$$\text{कोज्यागश} = \text{कोज्या}^ग श - \frac{ग(ग-1)}{2!} \text{कोज्या}^{ग-2} श \times \text{भुज्या}^2 श + \dots \dots \dots$$

$$\text{भुज्यागश} = \frac{ग}{1!} \text{कोज्या}^{ग-1} श \text{ भुज्याश} - \frac{ग(ग-1)(ग-2)}{3!} \times \text{कोज्याश}^{ग-3} \text{ भुज्याश}^3 + \dots$$

$$\text{स्पज्यागश} = \left\{ \frac{ग}{1!} \text{स्पज्याश} - \frac{ग(ग-1)(ग-2)}{3!} \times \text{स्पज्या}^3 श + \dots \dots \right.$$

$$\left\{ \div 1 - \frac{ग(ग-1)}{2!} \text{ स्पज्या}^2 श \dots \dots \dots \right\}$$

$$\text{कोज्याश} = \text{कोज्या}^2 \frac{श}{2} - \text{भुज्या}^2 \frac{श}{2} = 1-$$

$$2 \text{ भुज्या}^2 \frac{श}{2} = 2 \text{ कोज्या}^2 \frac{श}{2} - 1$$

---

$\Pi_प$ = दिलेल्या ग कोणांच्या स्पज्यांपैकीं प्रत्येक वेळीं प घेऊन त्यांच्या घातांची बेरीज असें गृहीत धरलें आहे.

१-२--३--४-ग या पहिल्याच प पूर्णांकाच्या घाताला परंपरित ग अशी संज्ञा आहे व ती ग ! या चिन्हानें व्यक्त करण्याचा परिपाठ आहे.

तेव्हां $\text{भुज्या}\frac{\text{श}}{२} = \pm\sqrt{\frac{१-\text{कोज्याश}}{२}}$ ; $\text{कोज्या}\frac{\text{श}}{२} = \pm\sqrt{\frac{१+\text{कोज्याश}}{२}}$, $\text{स्पज्या}\frac{\text{श}}{२} = \pm\sqrt{\frac{१-\text{कोज्याश}}{१+\text{कोज्याश}}}$

या सारण्यांवरून $\text{भुज्या}\frac{\text{श}}{२}$ व $\text{कोज्या}\frac{\text{श}}{२}$ यांच्या किंमती संदिग्ध निघणें अपरिहार्य आहे. ही संदिग्धता शच्या परिमाणाच्या अव्यक्ततेमुळें आहे व शचें परिमाण समजलें असतां ती दूर करतां येण्यासारखी आहे. $(\text{प}+१)\pi > \frac{\text{श}}{२} > \text{प}\,\pi$ असल्यास व प सम ( = २ फ, ) असल्यास म्हणजे $\frac{\text{श}}{२}$ चा चलभुज प्रथम अगर द्वितीय पादांत असल्यास त्याची भुज्या धन असते. पण प विषम (=२फ+१) असतो तेव्हां भुज्या ऋण असते यास्तव

पची किंमत $\text{प}+१ > \frac{\text{श}}{२\pi} > \text{प}$ यावरून काढल्यास $\text{भुज्या}\frac{\text{श}}{२}$ ची किंमत $(-१)^{\text{प}}\sqrt{\frac{१-\text{कोज्याश}}{२}}$ समान असते असें समजण्यास प्रत्यवाय नाहीं. कारण प सम असतां हा राशि धन बनतो पण विषम असल्यास तो ऋण बनतो.

$\text{कोज्या}\frac{\text{श}}{२}$ ची किंमत ठरवितांना चलभुज ४ व १ पादांत पडतो किंवा २ व ३ पादांत पडतो त्याप्रमाणें ती धन किंवा ऋण असते म्हणजे

$\text{प}\pi + \frac{\pi}{२} > \frac{\text{श}}{२} > \text{प}\pi - \frac{\pi}{२}$ मध्यें प सम असेल किंवा विषम असेल त्याप्रमाणें ती धन किंवा ऋण असणार. म्हणून वरील संबंधावरून पची किंमत काढली आहे असें मानल्यास $\text{कोज्या}\frac{\text{श}}{२}$ ची किंमत $(-१)^{\text{प}}\sqrt{\frac{१+\text{कोज्याश}}{२}}$ आहे असें समजल्यास आपत्ति नाहीं.

शेवटीं $\frac{\text{श}}{२}$ चा चलभुज १ किंवा ३ या पादांत पडतो अगर २ किंवा ४ पादांत पडतो त्याप्रमाणें त्याची स्पर्शज्या धन किंवा ऋण असते म्हणजे—

$\frac{\text{प}+१}{२}\pi > \frac{\text{श}}{२} > \frac{\text{प}}{२}\pi$ यामध्यें किंवा $\text{प}+१ > \frac{\text{श}}{\pi} > \text{प}$ यामध्यें प सम अगर विषम असेल त्याप्रमाणें स्पर्शज्या धन अगर ऋण असते म्हणजे—

$$\text{स्पज्या}\frac{\text{श}}{२} = (-१)^{\text{प}}\sqrt{\frac{१-\text{कोज्याश}}{१+\text{कोज्याश}}}$$

भुजज्येच्या साहाय्यानें कोणार्धाची गुणोत्तरें खालील पद्धतीनें निश्चित करतां येतात.

$$१+\text{भुज्याश} = \text{भुज्या}^२\frac{\text{श}}{२} + \text{कोज्या}^२\frac{\text{श}}{२} + २\text{भुज्या}\frac{\text{श}}{२}\,\text{कोज्या}\frac{\text{श}}{२}$$
$$= \left\{\text{भुज्या}\frac{\text{श}}{२} + \text{कोज्या}\frac{\text{श}}{२}\right\}^२$$

$$\therefore \text{भुज्या}\frac{\text{श}}{२} + \text{कोज्या}\frac{\text{श}}{२} = \pm\sqrt{१+\text{भुज्याश}}$$

$$\text{तसेंच भुज्या}\frac{\text{श}}{२} - \text{कोज्या}\frac{\text{श}}{२} = \pm\sqrt{१-\text{भुज्याश}}$$

$$\text{आतां भुज्या}\frac{\text{श}}{२} + \text{कोज्या}\frac{\text{श}}{२} =$$
$$\sqrt{२}\left\{\text{भुज्या}\frac{\text{श}}{२}\,\text{कोज्या}४५ + \text{कोज्या}\frac{\text{श}}{२}\,\text{भुज्या}४५\right\}$$
$$= \sqrt{२}\,\text{भुज्या}\left\{\frac{\text{श}}{२} + \frac{\pi}{४}\right\}$$

व $(\text{प}+१)\pi > \frac{\text{श}}{२} + \frac{\pi}{४} > \text{प}\pi$ म्हणजे

$\text{प}+१ > \frac{\text{श}}{२\pi} + \frac{१}{४} > \text{प}$ यांमध्यें प सम अथवा विषम असेल त्याप्रमाणें $\text{भुज्या}\left(\frac{\text{श}}{२} + \frac{\pi}{४}\right)$ धन अगर ऋण असते म्हणजे

$$\text{भुज्या}\frac{\text{श}}{२} + \text{कोज्या}\frac{\text{श}}{२} = (-१)^{\text{प}}\sqrt{१+\text{भुज्याश}}$$

( अ ) असें समजल्यास प्रत्यवाय नाहीं व त्याच विचारसरणीनें $(\text{फ}+१)\pi > \frac{\text{श}}{२} - \frac{\pi}{४} > \text{फ}\pi$ किंवा

$\text{फ}+१ > \frac{\text{श}}{२\pi} - \frac{१}{४} > \text{फ}$ यांत फ सम अथवा विषम असेल त्याप्रमाणें $\text{भुज्या}\left(\frac{\text{श}}{२} - \frac{\pi}{४}\right)$ धन अथवा ऋण असणार

म्हणजे $\text{भुज्या}\frac{\text{श}}{२} - \text{कोज्या}\frac{\text{श}}{२} =$ $(-१)^{\text{फ}} \times \sqrt{१-\text{भुज्याश}}$ ( आ ) असणार असें मानल्यास हरकत नाहीं.

आतां ( अ ) व ( आ ) वरून—

$$२\,\text{भुज्या}\frac{\text{श}}{२} = (-१)^{\text{प}}\sqrt{१+\text{भुज्याश}} + (-१)^{\text{फ}}\sqrt{१-\text{भुज्याश}}$$

$$\text{व } २\,\text{कोज्या}\frac{\text{श}}{२} = (-१)^{\text{प}}\sqrt{१+\text{भुज्याश}} - (-१)^{\text{फ}}\sqrt{१-\text{भुज्याश}}.$$

शचें परिमाण माहीत असतां हीं सूत्रें तेव्हांच उपलब्ध होतात.

पूर्वीच सिद्ध केल्याप्रमाणें $(प+१) > \frac{श}{२\pi}+\frac{१}{४} > प$ यामध्यें प सम अगर विषम असेल त्याप्रमाणें भुज्या $\frac{श}{२}$ + कोज्या $\frac{श}{२}$ धन किंवा ऋण असणार; म्हणजे $\frac{श}{२}$चा चलभुज यावत्काल ऋण ४५° पासून धन १३५° एवढ्या अवकाशांत असतो तावत्काल तो धन असणार व अन्यत्र पडतो तेव्हां-उघडच आहे--तो ऋण असणार. तसेंच $\frac{श}{२}$ चा चलभुज यावत्काल + ४५° पासून +२२५° एवढ्या अवकाशांत पडतो तावत्काल भुज्या $\frac{श}{२}$ —कोज्या $\frac{श}{२}$ हा राशि धन असतो व चलभुज अन्यत्र पडतो त्या वेळी तो राशि अर्थात् ऋण असणार.

स्पज्याश वरून स्पज्या $\frac{श}{२}$ ची किंमत काढतांनाहि चिन्हांची संदिग्धता उत्पन्न होतेच, कारण स्पज्याश = $\frac{२\ स्पज्या \frac{श}{२}}{१-स्पज्या^{२} \frac{श}{२}}$ ∴स्पज्या $\frac{श}{२}$ = $-कोस्पश \pm \sqrt{कोस्प^{२}श+१}$

आतां $\sqrt{कोस्प^{२}श+१}$ हा राशि कोस्पशपेक्षां मोठा असल्यामुळें $(प+१)\frac{\pi}{२} > \frac{श}{२} > \frac{प\pi}{२}$ यामध्यें प सम अगर विषम असेल त्याप्रमाणें स्पज्या $\frac{श}{२}$ धन अगर ऋण असणार म्हणजे वरील सारणींतील दक्षिण पक्षांतील करणीचें रूप धन अगर ऋण असणार; म्हणून स्पज्या $\frac{श}{२}$ = —कोस्पश $+ (-१)^{प} \sqrt{कोस्प^{२}श+१}$

त्रि को णां चे गु ण ध र्म (अ)(आ. नं. ५१ पहा)—कख ही एक ज्या आहे व प, फ हे पालीखंडांवरील प्रत्येकावर एक असे दोन बिंदू आहेत व कग हा व्यास आहे. तेव्हां

कख = कग भुज्या कगख

= कग भुज्या कपख

= कग भुज्या कफख

यावरून असें अनुमान निघतें कीं वृत्तावर प हा बिंदु कोठेंहि असला तरी कख या ज्येची किंमत कग × भुज्या कपख एवढी असते.

यास्तव कखग या त्रिकोणाच्या परिगत वृत्ताची त्रिज्या त्रिनें दर्शविण्याचा संकेत केल्यास खग = २ त्रि × भुज्याक म्हणजे $\frac{खग}{भुज्याक}$ = २ त्रि म्हणून

$$\frac{क}{भुज्याक} = \frac{ख}{भुज्याख} = \frac{ग}{भुज्याग} = २\ त्रि. \quad (१)$$

(आ) कर्क हा कखगचा उछ्रय असल्यास त्रिकोणाचें क्षेत्रफल $\triangle = \frac{१}{२}$ क×कर्क = $\frac{१}{२}$ क × ख × भुज्याग = $\frac{१}{२}$ क×ग×भुज्याख व म्हणून तें $\frac{१}{२}$ ख×ग× भुज्याक समानहि असणार.

यास्तव भुज्याक = $\frac{२\triangle}{ख×ग}$ वगैरे (२)

भुज्याची ही किंमत (१) मध्यें ठेवून

$$\frac{क}{भुज्याक} = = = २\ त्रि = \frac{क×ख×ग}{२\triangle} \therefore \quad त्रि = \frac{कखग}{४\triangle} \quad (३)$$

(इ) कखग या त्रिकोणाचा कोणताहि भुज इतर दोहोंच्या प्रत्यालेखांचा योग आहे असें मानण्यास कसलाहि प्रत्यवाय नाहीं तेव्हां

$$\left.\begin{aligned} क &= ख \times कोज्याग + ग \times कोज्याख \\ ख &= ग \times कोज्याक + क \times कोज्याग \\ ग &= क \times कोज्याख + ख \times कोज्याक \end{aligned}\right\} (४)$$

या तीन सारण्यांनां अनुक्रमें —क, ख, ग यांनीं गुणून फलांची बेरीज केल्यास

$$\left.\begin{aligned} ख^{२}+ग^{२}-क^{२} &= २\ ख \times ग \times कोज्याक \\ \text{म्हणून } ग^{२}+क^{२}-ख^{२} &= २\ ग\ क\ कोज्या\ ख \\ क^{२}+ख^{२}-ग^{२} &= २\ कख\ कोज्या\ ग \end{aligned}\right\} (५)$$

यांपैकीं पहिल्या सारणीच्या आधारें

भुज्या$^{२}$क = १ — कोज्या$^{२}$क = (१+कोज्याक) × (१ — कोज्याक)

[ आतां क + ख + ग = २ यु ( = युति, योग ) असा संकेत स्वीकारल्यास ]

$$= \frac{४\ यु\ (यु-क)\ (यु-ख)\ (यु-ग)}{ख^{२} \times ग^{२}}$$

$$\text{म्हणून भुज्याक} = \frac{२\ \sqrt{यु(यु-क)(यु-ख)(यु-ग)}}{ख\ ग}$$

$$\text{परंतु (२) वरून} = \frac{२\triangle}{खग}$$

$$\text{अतएव } \triangle = \sqrt{यु\ (यु-क)\ (यु-ख)(यु-ग)} \quad (६)$$

या सरणीचें स्पष्टीकरण आर्यभटानें पुढील गीतींत केलें आहे.

"सर्वं भुजैक्यदलितं चतुःस्थितैर्बाहुभिः क्रमाद्रहितम्। तद्‌घातपदं त्रिभुजे क्षेत्रे स्पष्टं फलं भवति॥"

पुन्हां कोज्या $\frac{क}{२} = \sqrt{\frac{१+कोज्याक}{२}}$,

भुज्या $\frac{क}{२} = \sqrt{\frac{१-कोज्याक}{२}}$

व स्पज्या $\frac{क}{२} = \sqrt{\frac{१-कोज्या\ क}{१+कोज्या\ क}}$

$$\left.\begin{aligned} \text{म्हणून भुज्या}\frac{\text{क}}{२} &= \sqrt{\frac{(\text{यु}-\text{ख})(\text{यु}-\text{ग})}{\text{खग}}} \\ \text{भुज्या}\frac{\text{ख}}{२} &= \sqrt{\frac{(\text{यु}-\text{ग})(\text{यु}-\text{क})}{\text{गक}}} \\ \text{भुज्या}\frac{\text{ग}}{२} &= \sqrt{\frac{(\text{यु}-\text{क})(\text{यु}-\text{ख})}{\text{कख}}} \end{aligned}\right\} (७)$$

$$\text{कोज्या}\frac{\text{क}}{२} = \sqrt{\frac{\text{यु}(\text{यु}-\text{क})}{\text{खग}}} \text{ वगैरे } \Big\} (८)$$

$$\text{व स्पज्या}\frac{\text{क}}{२} = \sqrt{\frac{(\text{यु}-\text{ख})(\text{यु}-\text{ग})}{\text{यु}(\text{यु}-\text{क})}} \text{ वगैरे } \Big\} (९)$$

(ई) त्रिकोणसाधन नामक खंडांत त्रिकोणाचे दोन भुज व तदंतर्गत कोण दिलेले असतां अन्यतर कोण निश्चित करतांना पुढील सूत्रांचा फार उपयोग होतो.

$$\text{स्पज्या}\frac{\text{ग}-\text{ख}}{२} = \frac{\text{ग}-\text{ख}}{\text{ग}+\text{ख}}\text{कोस्पज्या}\frac{\text{क}}{२} \text{ वगैरे } \Big\} (१०)$$

क केंद्र कल्पून कख त्रिज्येनें काढलेलें वृत्त (आ.५२ पहा) कगला घङ येथें छेदतें असें समजूं व घमधून खङला समांतर काढलेली रेषा कगला चमध्यें छेदते असें समजूं, मग

$\text{गङ} = \text{कख}+\text{कग} = \text{ख}+\text{ग}$ व $\text{गघ} = \text{ग}-\text{ख}$

$\angle\text{घखच} = \frac{\text{ग}-\text{ख}}{२}$, व $\angle\text{ङखघ} = \angle\text{खघच} = ९०^\circ$ म्हणून

$$\frac{\text{गघ}}{\text{गङ}} = \frac{\text{ग}-\text{ख}}{\text{ग}+\text{ख}} = \frac{\text{घच}}{\text{खङ}} = \frac{\text{खघस्पज्याघखच}}{\text{खङ}} = \text{स्पज्याङ स्पज्या घखच}$$

$$= \text{स्पज्या}\frac{\text{क}}{२}\text{स्पज्या}\frac{\text{ग}-\text{ख}}{२}$$

$$\text{म्हणून स्पज्या}\frac{\text{ग}-\text{ख}}{२} = \frac{\text{ग}-\text{ख}}{\text{ग}+\text{ख}}\text{कोस्पज्या}\frac{\text{क}}{२}.$$

(उ) त्रिकोणांतर्गत वृत्ताचा केंद्र म हा कखग या शीर्षांना सांधला असतां जे त्रिकोण प्राप्त होतात त्या सर्वांचे उच्छ्रय वृत्तत्रिज्यातुल्य असतात तेव्हां

$$\triangle = \tfrac{१}{२}\text{क}\times\text{त्रि} + \tfrac{१}{२}\text{ख}\times\text{त्रि} + \tfrac{१}{२}\text{ग}\times\text{त्रि} = \text{त्रि}\times\text{यु}$$

$$\therefore \text{त्रि} = \frac{\triangle}{\text{यु}} \qquad (११)$$

आतां घङच हे भुजांशीं वृत्ताचे स्पर्शबिंदू कल्पिल्यास खघ = खङ = यु−ख वगैरे म्हणून

$\text{त्रि} = (\text{यु}-\text{क})\text{स्पज्या}\frac{\text{क}}{२} = (\text{यु}-\text{ख})\text{ स्पज्या}\frac{\text{ख}}{२} = (\text{यु}-\text{ग})\text{स्पज्या}\frac{\text{ग}}{२}$ शेवटीं. $\text{क} = \text{खग} = \text{खघ} + \text{घग} =$ $\text{त्रि}\times\text{ कोस्प}\frac{\text{ख}}{२} + \text{त्रि}\times\text{कोस्प}\frac{\text{ग}}{२}$ (१२)

$\therefore \text{त्रि} = ४\text{ त्रि}\times\text{भुज्या}\frac{\text{क}}{२}\text{ भुज्या}\frac{\text{ख}}{२}\text{भुज्या}\frac{\text{ग}}{२}$ (१३)

(ऊ) मच्या ऐवजीं वहिर्गत वृत्तांचे केंद्र $\text{म}, \text{म}_२, \text{म}_३$ हे शीर्षांना सांधून वरील पद्धतीचा अवलंब केल्यास

$\text{त्रि}_१ = \frac{\triangle}{\text{यु}-\text{क}}; \text{त्रि}_२ = \frac{\triangle}{\text{यु}-\text{ख}}; \text{त्रि}_३ = \frac{\triangle}{\text{यु}-\text{ग}}$ अशीं सूत्रें प्राप्त होतात.

तसेंच घ, ङ, च, वगैरे हे त्यांचे स्पर्शबिंदू कल्पिल्यास

$$\left.\begin{aligned} \text{कच}_१ = \text{कङ}_१ = \text{यु म्हणून त्रि}_१ &= \text{यु स्पज्या}\frac{\text{क}}{२} \\ \text{तसेंच त्रि}_२ &= \text{यु स्पज्या}\frac{\text{ख}}{२} \\ \text{व त्रि}_३ &= \text{यु स्पज्या}\frac{\text{ग}}{२} \end{aligned}\right\} (१५)$$

$$\text{शेवटीं त्रि}_१ = ४\text{ त्रि भुज्या }\frac{\text{क}}{२}\text{ कोज्या }\frac{\text{ख}}{२}\text{ कोज्या}\frac{\text{ग}}{२} \text{ वगैरे.} \Big\} (१६)$$

(ऋ) कक, खख, गग हे भुजांना लंब आहेत व प हा त्यांचा संपातबिंदु आहे. मग गखगख, पकगख वगैरे चतुष्कोण वृत्तांतर्गत होण्याजोगे असल्याकारणानें पादोत्पन्न त्रिकोणाचे कोण अनुक्रमें १८०−२क, १८०−२ख व १८०−२ग व भुज अनुक्रमें क × कोज्याक, ख×कोज्या ख, ग × कोज्याग असतात. या लंबीय त्रिकोणाचे अवयव याप्रमाणें निर्णीत झाल्यावर त्याच्या लंबीय त्रिकोणाचे अवयवहि ठरविणें फारसें कठिण नाहीं.

(ॠ) म व म हे परिवृत्त व अंतर्वृत्त यांचे केंद्र आहेत (आ. नं. ५३ पहा). मम ही रेषा परिवृत्ताला पफ मध्यें छेदते. अतएव मप ×मफ = मक ×मव पण, मप×मफ = $\text{मप}^२ - \text{मम}^२ = \text{त्रि}^२ - \text{मम}^२$ व मफ = त्रि × कोछेज्या $\frac{\text{क}}{२}$ व मव = गव = २ त्रि भुज्या $\frac{\text{क}}{२}$

$\therefore \text{त्रि}^२ - \text{मम}^२ = \text{मक}\times\text{मव}^२ = २\text{त्रि त्रि}.$

$\therefore \text{मम}^२ = \text{त्रि}^२ - २\text{ त्रित्रि}$ तसेंच $\text{मम}^२ = \text{त्रि}^२ + २\text{ त्रित्रि}$, वगैरे. (१७)

कखगघ हा एक चतुष्कोण आहे (आ. ५४ पहा) व समजू $\angle\text{घकख}+\angle\text{खगघ} = २\angle\text{श}$ व चतुष्कोणाचें क्षेत्रफळ$\triangle$ आहे मग $२\triangle = \tfrac{१}{२}\text{ क}\times\text{घ भुज्याक}+\tfrac{१}{२}\text{ ख}\times\text{ग}$ भुज्या (२श−क) आणि $\tfrac{१}{२}(\text{क}^२+\text{घ}^२-\text{ख}^२-\text{ग}^२) = \text{क}\times\text{घ}$ कोज्या क−ख×ग कोज्या (२ श−क).

आतां या दोन्ही सारण्यांतील पक्षांचे वर्ग करून बेरीज केल्यावर

$$४\triangle^२ + \tfrac{१}{४}(\text{क}^२+\text{घ}^२-\text{ख}^२-\text{ग}^२)^२ = \text{क}^२\times\text{घ}^२+\text{ख}^२\times\text{ग}^२$$
$$-२\text{ कखगघ कोज्या २ श}.$$

$$= (\text{क}\times\text{घ}+\text{ख}\times\text{ग})^२ - २\text{ कखगघ }(१+\text{कोज्या २ श})$$

$$\therefore ४\triangle^२ = \tfrac{१}{४}(\text{क}^२+\text{घ}^२-\text{ख}^२-\text{ग}^२)^२ -$$
$$(\text{क}\times\text{घ}+\text{ख}\times\text{ग})^२ - ४\text{ क ख ग घ कोज्या}^२\text{ श}$$

[ आतां येथें क+ख+ग+घ = २ यु अशी योजना मान्य केल्यास ]

$$= ४(\text{यु}-\text{क})(\text{यु}-\text{ख})(\text{यु}-\text{ग})(\text{यु}-\text{घ})$$
$$-४\text{ क खग घ कोज्या}^२\text{ श}.$$

$$\therefore \triangle = \sqrt{(\text{यु}-\text{क})(\text{यु}-\text{ख})(\text{यु}-\text{ग})(\text{यु}-\text{घ}) - \text{कखगघ कोज्या}^२\text{ श}} \quad (१८)$$

चतुष्कोण वृत्तांतर्गत असता तर २श = १८०° असते व मग

$$\triangle = \sqrt{(\text{यु}-\text{क})(\text{यु}-\text{ख})(\text{यु}-\text{ग})(\text{यु}-\text{घ})} \text{ असतें} (१९)$$

व तेव्हां $\tfrac{१}{२}(\text{क}^२+\text{घ}^२-\text{ख}^२-\text{ग}^२) = $ कोज्या क (कघ+खग)

म्हणजे $कोज्याक = \frac{क^2+घ^2-ख^2-ग^2}{२(कघ+खग)}$ } असतात (२०)

व त्यावरून $भुज्याक = \frac{२\triangle}{कघ+खग}$ } वगैरे निघतात (२१)

तसेंच चतुष्कोण वृत्तांतर्गत असतांना–कर्णांच्या वर्गाच्या किंमती $खघ^2 = क^2+घ^2-२क\times घ$ कोज्याक व $कग^2 = क^2+ख^2-२क\times ख$ कोज्या ख यांच्या आधारें निश्चित करतां येतात व त्या अनुक्रमें---

$$\frac{(कग+खघ)(कघ+खग)}{कख+गघ} \quad व \quad \frac{(कख+गघ)(कग+खघ)}{कघ+खग}$$ } असतात (२२)

शेवटीं या चौकोनाच्या परिवृत्ताची त्रिज्या $= \frac{१}{२}\frac{खघ}{भुज्याक}$

$= \frac{१}{४\triangle}\sqrt{(कख+गघ)(कघ+खग)(कग+खघ)}$ (२३)

हे त्रिकोणगुणधर्म पुरे करण्यापूर्वी आणखी एका मुद्याचा निर्देश करणें अवास्तव होणार नाहीं. वरील सर्व धर्म सर्व त्रिकोणांनां लागू पडतात हें स्पष्टच आहे. तेव्हां मूलभूत त्रिकोणापासूनच कांहीं विशिष्ट प्रकारानें नवीन त्रिकोण उपलब्ध झालेला असेल तर त्याचेहि कोण व भुज वरील सूत्रांनींच बद्ध असावयाला पाहिजेत. वास्तव वरील प्रत्येक सूत्रापासून अशा तऱ्हेनें निर्माण केलेल्या प्रत्येक त्रिकोणाच्या साहाय्यानें एकेक नवीनच सूत्र उपलब्ध होणें साहजिकच आहे. उदाहरणार्थ वर (ऋ)या परिच्छेदांत सुचविल्याप्रमाणें उच्छ्रय अगर लंबविषयक त्रिकोणाचे कोण व भुज अनुक्रमें १८०−२ क वगैरे व ककोज्याक वगैरे असतात. तेव्हां $क^2 = ख^2+ग^2-२खगकोज्याक$ सूत्राधारें $क^2 कोज्या^2 क = ख^2 कोज्या^2 ख + ग^2 कोज्या^2 ग + २ खगकोज्याखकोज्यागकोज्या२क$ असें सूत्र निर्माण करता येतें. तसेंच तन्निर्दिष्ट मार्गाचा पुन्हां पुन्हां अवलंब केल्यानें प या उच्छ्रयत्रिकोणाचे अवयव

$(-१)^{प-१}$ कोज्याक कोज्या २ क ... $कोज्या२^{प-१}क$ वगैरे असतात असें सिद्ध करतां येईल व या प्रत्येक त्रिकोणापासून अनेक सूत्रें निर्माण करतां येण्यासारखीं आहेत.

अंतर्गत वर्तुलाच्या स्पर्शबिंदूंचा एक त्रिकोण होऊं शकतो. नंतर याला अतर्गत अशा वृत्ताच्या त्याच्या भुजांशीं स्पर्शबिंदूंचा दुसरा त्रिकोण निर्माण करतां येतो. यापासून तिसरा असें परंपरेनें पवेळा केल्यास त्या त्रिकोणाचे अवयव

$\frac{\pi}{३} + (-२)^{-प}\left(क - \frac{\pi}{३}\right)$ वगैरे असतात. यांपासून आणखीं सूत्रें प्रस्थापित करणें सुलभ आहे.

याच विचारसरणीचा विस्तार केला तर त्रिकोणांच्या कोणांचे कोणत्याहि संबंधांमध्यें कखग बद्दल अनुक्रमें अक+आख+इग, इक + अख + आग व आग + इख + अग हे राशी ठेविले तरी उत्पन्न होणाऱ्या संबंधांत कांहीं विसंगतता उद्भवत नाहीं; मात्र अ + आ + इ + १ ही ६ ची धन अगर ऋण कोणती तरी पूर्ण पट असावयाला पाहिजे व शेवटीं सूत्रांत भुज्यांचा धनर्णव्यत्यास म्हणजे त्यांचीं चिन्हें बदलावयाला पाहिजेत. कारण या कोणांना कं खं गं या संज्ञा दिल्या तर

$२\pi - कं + २\pi - खं + २\pi - गं = १८०^\circ$ तेव्हां $भुज्या२\pi-कं = -भुज्याकं$ व $कोज्या२\pi-कं = कोज्याकं$ यावरून भुज्यांचीं चिन्हें बदलण्याचें प्रयोजनहि कळून येईल.

त्रि को ण सा ध न.—त्रिकोणाचा एक कोण काटकोण असतो तेव्हां दिलेल्या आणखी दोन अवयवांच्या किंमतीवरून शेष अवयव निश्चित करण्याच्या रीती फारच सुगम असल्यामुळें त्यांचें स्पष्टीकरण करण्याचें प्रयोजनच रहात नाही. अन्य त्रिकोणांचे अवयवत्रय दिलें असतां शेषावयवसाधन करतांना ५ भिन्न प्रकार उद्भवतात.

(१) दिलेले अवयव तिन्ही भुज असतील त्यावेळीं:—

$स्पज्या \frac{क}{२} = \sqrt{\frac{(यु-ख)(यु-ग)}{यु(यु-क)}}$ वगैरे सूत्रें घातांक गणिताला फार सोयीचीं असल्यामुळें त्यांच्याच साहाय्यानें भुजांच्या किंमती काढण्याचा परिपाठ आहे. कारण घातांकगणना करतां यांच्यावर संस्कार केले असतां त्यांचीं

$$कोघा\ स्पज्या \frac{क}{२} = १० + \frac{१}{२}घा(यु-ख) + \frac{१}{२}घा(यु-ग) - \frac{१}{२}घायु - \frac{१}{२}घा(यु-क)$$

वगैरे रूपांतरें होतात.

यांच्याप्रमाणें कोणार्धांच्या भुज्या व कोज्यांच्या किंमतीवरूनहि कोणांचीं परिमाणें ठरवितां येतात. परंतु तसें करतांना क, ख, ग व यु, यु−क, यु−ख, यु−ग या सात राशींचे घातांक पाहावे लागतात व स्पज्यांवरून कोण काढतांना अवघ्या ४ च म्हणजे यु, यु−क, यु−ख, यु−ग एवढ्याच राशींचे घातांक पाहूनहि काम भागतें.

(२) भुजद्वय व तदंतर्गत कोण दिले असतां:—समजं ख,ग व क दिले आहेत—ख+ग = १८०−क.तेव्हां खगचें अंतर कळलें तर त्यांचें सम्यग् ज्ञान होऊं शकेल व हें अंतर

$स्पज्या \frac{ग-ख}{२} = \frac{ग-ख}{ग+ख} कोस्पज्या \frac{क}{२}$ पासून घातांकगणना करतां आवश्यक ते संस्कार केल्यानें त्यांचें जें रूपांतर होतें त्याच्या साहाय्यानें निश्चित करतां येतें. हें रूपांतर म्हणजे

$$कोघा\ स्पज्या \frac{ग-ख}{२} = घा(ग-ख) - घा(ग+ख) + कोघा\ कोस्पज्या \frac{क}{२}$$

घा = घातांक, जसें घा (यु − ख) = लॉग (एस−बी). कोघा – कोष्टकगतघात.

क व ख या कोणांची याप्रमाणें निष्पत्ति झाल्यावर

$$\frac{ख}{भुज्याख} = \frac{क}{भुज्याक} \text{ अथवा}$$

घाक = घाख+कोघाभुज्याक– कोघाभुज्या ख या सारण्यावरून कचीहि किंमत काढतां येते.

( ३ ) भुजद्वय व अन्यतरसंमुख कोण दिले असतां खालील विविध प्रकार उत्पन्न होतात ( आ. ५५ पहा ). समजूं ख, ग व ∠ख हे अवयव दिलेले आहेत.

प्रारंभीं ∠ख लघु आहे असें कल्पूं मग

$$भुज्या\ ग = \frac{ग}{ख} भुज्या\ ख.$$

आतां ( अ ) जोंपर्यंत ख < गभुज्याख तोंपर्यंत $\frac{ग}{ख}$ भुज्या ख याची किंमत १ पेक्षां अधिक निघत असल्याकारणानें ग या कोणाची यथातथ्य ( यथार्थ ) किंमत निघत नाहीं. म्हणजे या परिस्थतींत त्रिकोणच शक्य नसतो.

कारण क याला केंद्र कल्पून ख त्रिज्येनें वृत्त काढलें असतां तें ख घ या पदाला छेदीतच नाहीं. तर त्याच्यावरच रहातें.

( आ ) ख = ग भुज्या ख असल्यास हें वृत्त खघला घ येथें स्पर्श करतें व त्यामुळें एकच त्रिकोण प्राप्त होतो व तोहि पण काटकोणत्रिकोण असतो.

( इ ) ख > ग भुज्या ख असतो त्यावेळीं $\frac{ग}{ख}$ भुज्याख एकापेक्षां कमी होत असल्यानें गच्या अन्योन्यपरिपूरक अशा दोन किंमती निघूं शकतात. परंतु या दोन्ही किंमती ग्राह्य असतातच असें एवढ्यावरूनच सांगतां येत नाहीं.

समजूं ख < ग मग ∠ख, < ∠ग; व पूर्वकोण लघु असल्यानें उत्तरोक्त कोणाच्या दोन्ही किंमती ग्राह्य असतात व हें वरील आकृतीवरून कळण्यासारखें आहे कीं ख < ग असल्यास कखग₁ कखग₂ असे दोन त्रिकोण प्राप्त होतात.

जेव्हां ख = ग तेव्हां ∠ख = ∠ग म्हणजे गची एकच किंमत शक्य असते व शिवाय तेव्हां त्रिकोण समद्विभुज असतो.

शेवटीं ख > ग असल्यास ∠ख > ∠ग परंतु पूर्वोक्त कोण लघु असल्यामुळें उत्तरोक्त कोणहि लघुच असला पाहिजे. म्हणजे गच्या दोन किंमतींपैकीं विशाल किंमत त्याज्य होय. वास्तव याहि परिस्थितींत एकच त्रिकोण साध्य होतो.

∠ख काटकोण असल्यास गपेक्षां ख मोठा पाहिजे व तो तसा असला तर एक त्रिकोण शक्य असतो.

शेवटीं ∠ख विशाल असेल तर तो ∠गपेक्षां मोठा असणार हें उघड आहे; कारण एकाच त्रिकोणांत २ विशाल कोण संभवत नाहींत अतएव ग कोणाची लघु किंमत तेवढाच ग्राह्य असते. यास्तव एकच त्रिकोण संभवतो. दुसऱ्या प्रकारामध्यें त्रिकोणसाधन इतर प्रकारांप्रमाणें सुलभ रीतीनें करतां येत नाहीं. व इ ( य ) या पोटप्रकारांत तर त्रिकोणद्वयांचीच निष्पत्ति होत असल्यानें म्हणजे त्यांपैकीं कोणता त्रिकोण ग्राह्य करावयाचा हा संशय उपस्थित होत असल्यामुळें या प्रकाराला संदिग्ध प्रकार अशी संज्ञा आहे.

( ४ ) कोणद्वय व कोणताहि एक भुज हे दिले असतां तत्क्षणींच तिसरा कोण काढतां येतो आणि नंतर

$$\frac{क}{भुज्याक} = \frac{ख}{भुज्याख} = \frac{ग}{भुज्याग}$$ या सारणीच्या घातांक गणनाला उपयुक्त अशा रूपांतरावरून शेष भुजांचीं परिमाणें निश्चित करण्यांत येतात.

( ५ ) शेवटीं कोणत्रय दिले असतां भुजांचीं परस्पराशीं गुणोत्तरेंच फक्त ठरवितां येतात यामुळें अशा वेळीं त्रिकोणसाधन पूर्ण होऊं शकत नाहीं. व कोणताहि एक भुज विशिष्ट परिमाणाचा धरला तर त्याला अनुरूप असे इतर दोन भुज काढतां येतात. यास्तव असे अनंत त्रिकोण निर्माण करतां येतात व हे त्रिकोण परस्परांनां सदृश असतात हें सांगणें नकोच.

सरळ त्रिकोणमितीवरील हें प्रकरण संपविण्यापूर्वी एका किरकोळ मुद्याचा थोडासा परिचय करून देणें अप्रस्तुत होणार नाहीं, व तो म्हणजे कोणत्याहि एका लघु कोणाचें चापीयमापनश असलें तर भुज्या श < श < स्पज्या श ( आ. नं. ५६ पहा. ).

कय, खघ या दोन रेषा एका वृत्ताला स्पर्श करणाऱ्या आहेत. कख ही पूर्णज्या कयख या चापापेक्षां अर्थात लहान असणार हें उघड आहे. व क०य ( = श ) हा कोण लघु असेल तर कयख हा चाप कघ+खघ याच्यापेक्षां लहान असतो हेंहि सिद्ध करतां येतें. परंतु स्थळसंकोचास्तव आपण तसें गृहीत धरूं. मग कग < कय < कघ

म्हणून $\frac{कग}{०क} < \frac{कय}{०क} < \frac{कघ}{०क}$

म्हणजे भुज्याश < श < स्पज्याश

या विषमसंबंधाला भुज्याशनें भागून

$$१ < \frac{श}{भुज्याश} < \frac{१}{कोज्याश}$$

आतां श उत्तरोत्तर लहान केला गेल्यास कोज्याश वाढूं लागतें. व शेवटीं शची किंमत जितकी शून्याच्या जवळ तितकी कोज्याशची किंमत १ च्या जवळ. पण त्यावेळीं $\frac{१}{कोज्याश}$ ही जवळ जवळ १ च असणार म्हणून श अति सूक्ष्म म्हणजे जवळ जवळ शून्य असतो त्यावेळीं $\frac{श}{भुज्याश}$ ची किंमत १ असते म्हणजे श हा कोण भुज्याश तुल्य असतो असें ....

प्रत्यवाय नाहीं. तसेच कोज्याश $< \frac{\text{श}}{\text{स्पज्याश}} <$ १ म्हणून श जवळ शून्य असतो तेव्हां $\frac{\text{श}}{\text{स्पज्याश}}$ चीहि किंमत १ असते. म्हणजे कोणाची स्पज्याहि त्याच्याबरोबर असते.

गो ली य त्रि को ण मि ती.—गोलीय भूमितींतील ज्या मूलभूत स्थूल सिद्धांतांवर गोलीय त्रिकोणमितीची उभारणी केलेली आहे. ती स्थलसंकोचास्तव येथें प्रस्थापित करणें अनुचित असल्यामुळें येथें जेथें त्यांचा उपयोग केला आहे तेथें तेथें त्यांचें सत्यत्व गृहीत धरलें आहे.

बृहद्वृत्ताच्या चापत्रयानें मर्यादित अशा गोलाच्या पृष्ठभागाला गोलीय त्रिकोण ही संज्ञा आहे. कखग असा एक त्रिकोण असल्यास खग, गक, कख यांनां अभिमुख असे जे केंद्रस्थ कोण त्यांनां त्रिकोणाचे भुज व खग,गक,कख यांतून जाणाऱ्या बृहद्वृत्तांच्या पातळ्यांमधील कोणांनां त्याचे कोण समजण्याचा प्रघात आहे. कोणत्याहि तीन बृहद्वृत्तांचे ६ छेदबिंदू असतात. परंतु त्यायोगें सर्व गोल एकंदर ८ त्रिकोणांत विभागला जातो (आ. ५७ पहा). आतां कख, खग, गक व कख, खग व गकंबाकं असे अनुक्रमें भुजत्रय असलेले दोन त्रिकोण गोल पृष्ठावर आहेत परंतु यांच्या तिसऱ्या भुजांची बेरीज नेहमीं गकं गंक २$\pi$ = अचल असल्यामुळें पूर्वोक्त त्रिकोणगुणधर्मांवरून उत्तरोक्त त्रिकोणाचे गुणधर्म अनायासानेंच निश्चित करतां येतात. वास्तव यापुढें त्रिकोणगुणधर्म अगर साधन वगैरे तद्विषयक कोणत्याहि व्यवहारामध्यें त्याचा कोणताहि भुज $\pi$ पेक्षां मोठा नसतो असें गृहीत धरून चालल्यास त्यामुळें वस्तुविपर्यय अगर सूत्रसिद्धांताच्या सार्वत्रिक सत्यतेमध्यें गौणत्व प्राप्त होतें असें मानण्याचें प्रयोजन नाहीं.या प्रकारचे–आपण यांनां अति विशाल अशी संज्ञा देऊं–अति विशालकोण विचारक्षेत्रांतून दूर केल्यानंतर पृष्ठावरील विविध त्रिकोणांचें अवलोकन केल्यास असें आढळून येईल कीं कखग व कं खं गं हे त्रिकोण एकरूप आहेत. कारण त्यांचे भुज व कोण परस्परांनां समान आहेत. यावरून सकृद्दर्शनीं ते सर्वतोपरी एकरूप असावेत असें वाटतें खरें परंतु तो भास आहे. कारण या एकरूपत्वामध्यें एक गौणत्व रहातेंच तें हें कीं सरल भूमीतींतील त्रिकोणांप्रमाणें हे एकमेकांवर स्थापनीय असे नाहींत. राहिलेल्या ६ त्रिकोणांपैकीं खग कं व खं गं क हेहि वरील त्रिकोणांप्रमाणेंच एकरूप आहेत व यांचे अनुक्रमें खग व खं गं हे भुज कखग म्हणजे मूलभूत त्रिकोणाच्या खगसमान आहेत व तदभिमुख कोणहि क या कोणाबरोबर आहे. परंतु शेषावयव मात्र मूलभूत त्रिकोणाच्या सजातीय अथवा समधर्मीय अवयवांचे परिपूरक आहेत. म्हणजे त्यांचे शेषभुज $\pi$–ख व $\pi$–ग आहेत व शेषकोण $\pi$–ख व $\pi$–ग आहेत. △ गकखं व △ गं कंख तसेंच अवशिष्ट राहिलेले दोन त्रिकोण हेहि परस्परांशीं एकरूप असून वर वर्णन केलेल्या कोटींतील आहेत. या मूलभूत त्रिकोणद्वयांच्या त्रयाला आपण मूलभूत त्रिकोणाचे संगामी अथवा संलग्न त्रिकोण अशी संज्ञा देऊं. त्रिकोणषट्काच्या मूलभूत त्रिकोणाशीं केलेल्या या तुलनेनें एवढें कळून चुकलें असलें पाहिजे कीं उत्तरोक्त त्रिकोणसाधन अगर गुणधर्म अवगत झाल्यासारखेच आहेत.

कं खं गं हे अनुक्रमें ( आ. नं. ५८ पहा ) खग, गक, कख यांचे ज्या बाजूला क, ख, ग हे शीर्ष आहेत त्या बाजूचे त्यांचे ध्रुव असले म्हणजे त्यांच्या त्रिकोणाला ध्रुवत्रिकोण ही संज्ञा आहे व मग खकं = खगं = कखं = कगं = गकं = गखं = $\frac{\pi}{2}$ असल्याकारणानें कखग हाहि कं खं गं याचा ध्रुवत्रिकोण होतो.

आतां कं हा खगचा ध्रुव आहे म्हणून ∠ कं = घङ परंतु ख व ग हे अनुक्रमें कं गं व कं खं यांचे ध्रुव असल्यानें खङ = घग = $\frac{\pi}{2}$ म्हणून $\pi$ = खङ+गघ = खग+घङ = खग+∠ कं ∴ ∠ कं = $\pi$–क

यावरून ∠ खं = $\pi$–ख, ∠ गं = $\pi$–ग,
क = $\pi$ कं ,ख = $\pi$– खं व ग = $\pi$– गं असणार हें स्पष्ट आहे. या संबंधाच्या आधारानें कोणत्याहि त्रिकोणाच्या सिद्धांतावरून ध्रुवत्रिकोणाला लागू असलेले सिद्धांत सौकर्यानें निर्माण करतां येतील.

० गोलकेंद्र, कखं हा ०गला लंब व ककं हा ० खग या पातळीला लंब आहेत असें समजूं ( आ. ५९ पहा ). मग ०कचा ०ख वरील प्रत्यालेख ० खं , खंक व ककं यांचे ०ख वरील प्रत्यालेखांच्या बेरजेसमान असणार पण ककं ही रेषा ० खग या पातळीलाच लंब असल्याकारणानें तिचा त्या पातळीवरील प्रत्यालेख शून्य असतो. म्हणून

० क कोज्या. ग = ० खं कोज्या क + खं कं भुज्याक परंतु ० खं = ० क कोज्या ख, खं कं = कखं कोज्या ग = ०क भुज्या ख कोज्या ग.

| | |
|---|---|
| यास्तव कोज्या ग = कोज्या क कोज्या ख<br>+ भुज्या क भुज्या ख कोज्या ग<br>तसेंच कोज्या ख = कोज्या ग कोज्या क<br>+ भुज्या ग भुज्या क कोज्या ख<br>व कोज्या क = कोज्या ख कोज्या ग<br>+ भुज्या ख भुज्या ग कोज्या क | अल्बाटाणी यांचीं सूत्रें |

हीं सूत्रें वरीच महत्त्वाचीं असल्याकारणानें तीं प्रस्थापित करण्याच्या आणखी एका रितीचें विवेचन करणें गैर होणार नाहीं.

कघ, कङ या कख, कग यांनां स्पर्श करणाऱ्या रेषा ०ख, ० ग यांनां घ व ङ येथें छेदीपर्यंत वाढविलें असतां

घङ$^2$ = कघ$^2$ + कङ$^2$ – २ कघ × कङ कोज्या क
( △कघङ वरून )

तसेंच = ० घ$^2$ + ०ङ$^2$ – २ ० घ ×०ङ कोज्या क
(△०घङ वरून ) आतां वजाबाकी करून

$०=२०\text{क}^२ + २\ \text{कघ} \times \text{कङ कोज्या क} - २\ ०\text{घ} \times ०\text{ङ कोज्या क}.$

$\therefore \text{कोज्या क} = \frac{-०\text{क}}{०\text{घ}} \times \frac{०\text{क}}{०\text{ङ}} + \frac{\text{कघ}}{०\text{घ}} \times \frac{\text{कङ}}{०\text{ङ}} - \text{कोज्या क}$

$\therefore \text{कोज्या क} = \text{कोज्या ख कोज्या ग} + \text{भुज्या ख भुज्या ग कोज्या क}.$

या सूत्रावरून $\text{भुज्या}^२\ \text{क} = (१ - \text{कोज्या क}) = (१ + \text{कोज्या क})(१ - \text{कोज्या क})$

$$= \frac{१ - \text{कोज्या}^२\text{क} - \text{कोज्या}^२\text{ख} - \text{कोज्या}^२\text{ग}}{\text{भुज्या}^२\text{ख भुज्या}^२\text{ग}} + \frac{२\ \text{कोज्या क कोज्या ख कोज्या ग}}{\text{भुज्या}^२\text{ख भुज्या}^२\text{ग}}$$

[ येथें क + ख + ग = २ यु ही योजना मानल्यास ]

$$= \frac{४\ \text{भुज्या यु भुज्या (यु} - \text{क) भुज्या (यु} - \text{ख) भुज्या (यु} - \text{ग)}}{\text{भुज्या}^२\text{ख भुज्या}^२\text{ग}}$$

कोणांच्या भुज्यांच्या किंमतींचीं हीं रूपें ऑयलरनें प्रथम शोधून काढलीं असल्यामुळें त्याच्या नांवाच्या आद्याक्षरानें $\sqrt{\text{भुज्या यु भुज्या (यु}-\text{क) भुज्या (यु}-\text{ख) भुज्या (यु}-\text{ग)}}$ ह्या राशी दर्शविण्याचे पसंत केल्यास

$\text{भुज्या क} = \frac{२\ \text{ऑ}}{\text{भुज्या ख भुज्या ग}}$ असें सूत्र प्राप्त होतें पण यावरून

$$\frac{\text{भुज्याक}}{\text{भुज्याक}} = \frac{\text{भुज्याख}}{\text{भुज्याख}} = \frac{\text{भुज्याग}}{\text{भुज्याग}} = \frac{२\ \text{ऑ}}{\text{भुज्याक भुज्याख भुज्याग}} \quad (२)$$

अशींहि सूत्रें उपलब्ध होतात.

०क वरील कोणत्याहि एका (व) बिंदूपासून (आ.नं. ६०) घङ, घच व घछ असे अनुक्रमें ०ख, ०ग व ०खग यांनां लंब काढले तर घछ च्या घच व घङ यांच्या मद्तीनें मिळालेल्या किंमतीवरूनहि (२) मधील सूत्रें मिळतात. (१)मधील सारणींत मूलभूत त्रिकोणाच्या अवयवांबद्दल ध्रुव-त्रिकोणाच्या अवयवांच्या किंमती ठेवल्या म्हणजे त्यांपासून

$$\left.\begin{aligned} \text{कोज्या क} &= -\text{कोज्या ख कोज्या ग} + \text{भुज्या ख भुज्या ग कोज्या क} \\ \text{कोज्या ख} &= -\text{कोज्या ग कोज्या क} + \text{भुज्या ग भुज्या क कोज्या ख} \\ \text{व कोज्या ग} &= -\text{कोज्या क कोज्या ख} + \text{भुज्या क भुज्या ख कोज्या ग} \end{aligned}\right\} (३)$$

अशा तीन सारण्या उपलब्ध होतात.

व (२)च्या सारणीसमुच्चयांत त्याच किंमती ठेवल्यास व क+ख+ग याला २यु या संकेतानें व्यक्त करण्याचें ठरविल्यास

$$\frac{\text{भुज्या क}}{\text{भुज्या क}} = \frac{\text{भुज्या ख}}{\text{भुज्या ख}} = \frac{\text{भुज्या ग}}{\text{भुज्या ग}} = \frac{२\left\{-\text{कोज्या यु कोज्या (यु}-\text{क) कोज्या (यु}-\text{ख) कोज्या (यु}-\text{ग)}\right\}}{\text{भुज्या क भुज्या ख भुज्या ग}}$$

$$(४) = \frac{२\ \text{ऑ}}{\text{भुज्या क भुज्या ख भुज्या ग}}$$

( १ ) च्या सूत्रगणांतील शेवटच्या दोन सारणींतून कोज्या ख दूर करून कोज्या क भुज्या ग = भुज्या ख भुज्या ग कोज्या क + भुज्या ग कोज्या ग भुज्या क × कोज्या ख

म्हणून $\text{कोस्पक भुज्या ग} = \frac{\text{भुज्या ख}}{\text{भुज्या क}}\text{कोज्या क} + \text{कोज्या ग कोज्या ख}$

$= \text{भुज्या ख कोस्प क} + \text{कोज्या ग कोज्या ख}$

या सारखींच ५ सूत्रें निर्माण करतां येतात.

$$\left.\begin{aligned} \text{कोस्प क भुज्या ग} &= \text{कोस्प क भुज्या ख} + \text{कोज्या ग कोज्या ख} \\ \text{कोस्प क भुज्या ख} &= \text{कोस्प क भुज्या ग} + \text{कोज्या ख कोज्या ग} \\ \dots & \dots \dots \dots \end{aligned}\right\} (५)$$

या सारण्या पुढील नियमाच्या रूपानें अल्पायासानें लक्षांत ठेवतां येण्यासारख्या आहेत. २ भुजांमधील कोणाला अंतर्गत कोण व २ कोणांनां निकटवर्ती भुज्याला अंतर्गतभुजा अशीं संज्ञा दिल्यास तो नियम असा आहे:—

कोज्या ( अंतर्गत भुज ) कोज्या ( अंतर्गत कोण )

= भुज्या ( अंतर्गत भुज ) कोस्प ( इतर भुज )

− भुज्या ( अंतर्गत कोण ) कोस्प ( इतर कोण )

कोज्याकवरून खालील सूत्रगण निर्माण करतां येतात.

$$\left.\begin{aligned} \text{भुज्या}\frac{\text{क}}{२} &= \sqrt{\frac{\text{भुज्या (यु}-\text{ख) भुज्या (यु}-\text{ग)}}{\text{भुज्या ख भुज्या ग}}} \\ \text{कोज्या}\frac{\text{क}}{२} &= \sqrt{\frac{\text{भुज्या यु भुज्या (यु}-\text{क)}}{\text{भुज्या ख भुज्या ग}}} \\ \text{व स्पज्या}\frac{\text{क}}{२} &= \sqrt{\frac{\text{भुज्या (यु}-\text{ख) भुज्या (यु}-\text{ग)}}{\text{भुज्या यु भुज्या (यु}-\text{क)}}} \end{aligned}\right\} (६)$$

इतर कोणार्धांच्या गुणोत्तरांचेहि यांनां सदृश असे पर्याय काढतां येण्यासारखे आहेत.

तसेंच ( ३ ) मधील कोज्याकच्या किंमतीवरून

$$\left.\begin{aligned} \text{भुज्या}\frac{\text{क}}{२} &= \sqrt{\frac{\text{कोज्या यु कोज्या (यु}-\text{क)}}{\text{भुज्या ख भुज्या ग}}} \\ \text{कोज्या}\frac{\text{क}}{२} &= \sqrt{\frac{\text{कोज्या (यु}-\text{ख) कोज्या (यु}-\text{ग)}}{\text{भुज्या ख भुज्या ग}}} \\ \text{व स्पज्या}\frac{\text{क}}{२} &= -\sqrt{\frac{\text{कोज्या यु कोज्या (यु}-\text{क)}}{\text{कोज्या(यु}-\text{ख) कोज्या(यु}-\text{ग)}}} \end{aligned}\right\} (७)$$

हीं सूत्रें अवगत होतात.

वर सुचविल्याप्रमाणें इतर कोणार्धांच्याहि गुणोत्तरांचे याच जातीचे पर्याय साध्य करणें फारसें कठीण नाहीं. ६ व ७ हे सूत्रसमुच्चय कोटिज्यांचे पर्याय गृहीत न धरितां दुसऱ्या सूत्रसमुदायाच्या साहाय्यानेंहि स्वतंत्रपणें निर्माण

करितां येतात. म हा कखग या त्रिकोणाचा अंतःकेंद्र समजूं (आ. ६१). मग मर्क, मखं, मगं हे चाप भुज्यांनां लंब काढतां कखं = कगं, खकं = कगं व गकं = गखं यावरून खकं = ½ (ग+क-ख) = यु-ख, गकं = यु-ग व ∠खमर्क = १८०-∠कंमग म्हणून

$$\frac{\text{भुज्या ग}}{\text{भुज्या मख}} = \frac{\text{भुज्या कमख}}{\text{भुज्या }\frac{क}{२}} \text{ तसेंच } \frac{\text{भुज्या ख}}{\text{भुज्या मग}} = \frac{\text{भुज्या कमग}}{\text{भुज्या }\frac{क}{२}}$$

$$\text{अतएव भुज्या }\frac{क}{२} = \frac{\text{भुज्या मख भुज्या मग भुज्या खमर्क भुज्या गमर्क}}{\text{भुज्या ख भुज्या ग}}$$

परंतु भुज्या खम भुज्या खमर्क = भुज्या खकं = भुज्या (यु-ख).

तसेंच भुज्या गम भुज्या गमकं = भुज्या( यु-ग )

$$\text{म्हणून भुज्या }\frac{क}{२}\left\{\frac{\text{भुज्या (यु-ख) भुज्या (यु-ग)}}{\text{भुज्या ख भुज्या ग}}\right\}^{\frac{1}{2}}$$

हेंच सूत्र π-क, π-ख, ग; π-क, π-ख, ग, हे अवयव असणाऱ्या संलग्न त्रिकोणाला लागू केलें असता

$$\text{कोज्या }\frac{क}{२} = \left\{\frac{\text{भुज्या यु भुज्या ( यु-क )}}{\text{भुज्या ख भुज्या ग}}\right\}^{\frac{1}{2}}$$

निष्पन्न होतें.

व या दोहोंपासून स्पज्या $\frac{क}{२}$ चा पर्याय निघतो व हींच सूत्रें ध्रुव त्रिकोणाला लागू केलीं असता

$$\text{भुज्या }\frac{क}{२} = \left\{-\frac{\text{कोज्या यु कोज्या ( यु-क )}}{\text{भुज्या ख भुज्या ग}}\right\}^{\frac{1}{2}}$$

वगैरे सूत्रें निष्पन्न होतात.

वर प्रस्थापित केलेलीं सर्व सूत्रें सर्व त्रिकोणांनां सारखींच लागू पडतात. तेव्हां एखादा कोण काटकोण असल्यास त्रिकोणाच्या निरनिराळ्या अवयवांमधील परस्परसंबंधांचीं रूपांतरें वरील सूत्रांवरून अल्पायासानें समजण्यासारखीं आहेत हें जरी खरें आहे तरी पण त्या रूपांतरांच्या महत्त्वाकडे लक्ष्य देतां जसजशी परिस्थिति उत्पन्न होईल तसतशीं तीं निर्माण करण्यापेक्षा आगाऊच तीं साध्य करून ग्रथित करणें अधिक फायदेशीर होईल. शिवाय हीं रूपांतरें मूल सूत्रांपेक्षां स्मरणांत ठेवणें पुष्कळच सुलभ आहे. समजूं ∠ग = ९०° मग

१ल्या सारणीसमुच्चयावरूनकोज्या ग = कोज्याक कोज्याख १

२ऱ्या " " भुज्या ख = भुज्याख भुज्या ग } २
भुज्याक = भुज्याक भुज्याग }

व ५ व्या " " स्पज्याक = स्पज्याक भुज्याख = स्पज्याग कोज्याख } ३
स्पज्याख = स्पज्याख भुज्याक = स्पज्याग कोज्याक }

आतां १', २', ३', यां पासून आणखी तीन सूत्रें निर्माण करतां येतात व तीं अशीं आहेत.

कोज्या ग = कोस्प क कोस्प ख ४'

कोज्या क = कोज्या क भुज्या ख } ५'
कोज्या ख = कोज्या ख भुज्या क }

हीं सूत्रें स्वतंत्र रीतीनेंहि दिलेल्या आकृतीवरून (आ. ६२) उपलब्ध होऊं शकतात ∠ग = ९०°, खगं खकं या रेषा खग, खक यांनां स्पर्श करणाऱ्या आहेत. आतां कं खगं ही पातळी ० खला लंब आहे म्हणून ती ०ख मधून जाणाऱ्या ०खगं पातळीलाहि लंब आहे तसेंच ० कं गं ही पातळी ० खगं या पातळीला लंब आहे म्हणून कं गं ही रेषा ० खगं या पातळीला लंब असणार हें उघडच आहे.

अतएव कंखगं, कं ० गं, गं ०ख, कं ०ख हे सर्व काटकोणत्रिकोण आहेत. सबब

$$\text{कोज्याग} = \frac{०ख}{०कं} = \frac{०ख}{०गं}\cdot\frac{०गं}{०कं} = \text{कोज्या क कोज्या ख } १$$

$$\text{नंतर भुज्या ख} = \frac{गं कं}{खकं} = \frac{गं कं}{०कं}\cdot\frac{०कं}{खकं} = \frac{\text{भुज्याख}}{\text{भुज्याग}}$$

यावरून भुज्या ख = भुज्या ख भुज्या ग } २'
तसेंच भुज्या क = भुज्या क भुज्या ग }

$$\text{कोज्या ख}\frac{खगं}{खकं} = \frac{खगं}{०ख}\cdot\frac{०ख}{खकं} = \frac{\text{स्पज्याक}}{\text{स्पज्याग}}$$

म्हणजे स्पजा क = कोज्या ख स्पज्या ग } ३' (अ)
तसेंच स्पज्या ख = कोज्या क स्पज्या ग }

$$\text{स्पज्या ख} = \frac{गं कं}{खगं} = \frac{गकं}{०गं}\cdot\frac{०गं}{खगं} = \frac{\text{स्पज्या ख}}{\text{भुज्या क}}$$

म्हणजे स्पज्या ख = स्पज्या ख भुज्या क } ३' (आ)
तसेंच स्पज्या क = स्पज्या क भुज्या ख }

आतां हीं ३' (आ) मधील सूत्रें एकमेकांनां गुणलीं असता

$$\text{स्पज्या क स्पज्या ख} = \frac{\text{स्पज्या क स्पज्या ख}}{\text{भुज्या क भुज्या ख}} = \frac{१}{\text{कोज्या क कोज्या ख}} = \frac{१}{\text{कोज्याग}}$$

म्हणजे कोज्याग = कोस्पज्याक कोस्पज्या ख ४'

नंतर ( २' ) मधील दुसरें व ( ३' ) मधील पहिलें हीं सूत्रें वजाभ्यासाच्या रीतीनें पूर्वोक्त सूत्राचे वाम दक्षिण पक्षांनां उत्तरोक्त सूत्राच्या अनुक्रमें दक्षिण व वाम पक्षांनीं गुणलें असतां

*भुज्या क कोज्या ख स्पज्याग = स्पज्या क भुज्या क भुज्या ग*

$$\text{म्हणून कोज्या ख} \frac{\text{भुज्या क कोज्या ग}}{\text{कोज्या क}} = \text{भुज्या क कोज्या ख}$$

म्हणजे कोज्या ख = भुज्या क कोज्या ख } ५'
तसेंच कोज्या क = भुज्या ख कोज्या क }

या पांच सूत्रगणांत मिळून प्रस्थापित केलेल्या एकंदर १० सारणींवरच काटकोणत्रिकोणसाधन पूर्णपणें अवलंबून असतें. एतदर्थ त्या निमिषार्थांत अंशाच्या तशा प्राप्त करतां येणें सुलभ जावें यास्तव घातांकगणनपद्धतीचे विख्यात शोधक जॉन नेपियर यानीं खालील दोन नियम सुचविले आहेत.

दिलेल्या दोन आकृतींची ( आ. नं. ६३ ) तुलना करितां असें दिसून येईल कीं, त्रिकोणाच्या समीपवर्ती क या भुजापासून प्रारंभ करून फिरावयाला सुरवात केली असतां ज्या अनुक्रमानें त्रिकोणाचे निरनिराळे अवयव मार्गांत भेटतात त्याच अनुक्रमानें ते सोधतच्या वृत्तांतहि केंद्रासभोंवतीं मांडलेले आहेत. मात्र ग हा कोणच अशीवात या वृत्तांतून गाळून टाकला आहे. शिवाय क व ख हे भुज असेच्या तसेच न मांडतां त्याबद्दल ग चे पूरक म्हणून घेतले आहेत. आतां या ५ वृत्तभागांतील निरनिराळ्या राशींपैकीं कोणत्याहि एकाला मध्यभाग असें समजूं व तदनुरोधानें त्याच्या दोन्ही बाजूला शेजारीं असलेल्या राशींनां समीपवर्तीभागद्वय व अवशिष्ट दोघांनां अभिमुख अथवा संमुखभागद्वय असें म्हणूं.

पहिला नियमः—भुज्या ( मध्यभाग ) = समीपवर्तीभागद्वयाच्या स्पर्शज्यांचा घात.

दुसरा नियमः—भुज्यामध्यभाग = संमुख भागांच्या कोज्यांचा घात.

वृत्तभाग ५ असल्यानें व कोणताहि भाग मध्यभाग होऊं शकत असल्यांकारणानें प्रत्येक नियमामध्यें ५ सूत्रें समाविष्ट आहेत हें सहज पटण्याजोगें आहे.

हेच नियम ज्यांत गोंवलेले आहेत अशा दोन कविता कैं० वे० शा० विनायकशास्त्री खानापूरकर यानीं ग्रथित केल्या आहेत. त्या वरील सूत्रनियमांच्या पेक्षांहि स्मरणांत ठेवणें अधिक सोयीचें व सुलभ म्हणून येथें देतों.

"मध्यप्रभागोयभुजज्यकासमा स्पार्शायरेयाहतिरत्रभागयोः।
संलग्नयोर्दूरतरप्रभागयोः कोभुज्यका संहतिरिस्युदीरयेत् ॥
कोणेच कर्णे सति पूरकोणको ग्राह्यः"

शेवटच्या चरणाचा अर्थ स्पष्टच आहे; कोण व कर्ण याबद्दल त्यांच्या पूरक राशींची योजना करावयाची ( ले. प्रो. एस्. बी. बोंडाळे ).

**त्रिंकोमाली**—त्रिंकोमाली हें शहर सीलोनच्या ईशान्य किनाऱ्यावर आहे. हें पूर्वी आरमाराचें ठिकाण होतें. कँडीच्या ईशान्येस हें १०० मैल आहे. १९०१ सालीं येथील लोकसंख्या ११२९५ होती. त्रिंकोमाली उपसागराच्या उत्तर बाजूवर हें वसलेलें आहे. येथील बंदराचे दोन भाग आहेत. एक आंतील; येथें जहाजें लागण्याच्या धक्क्याजवळ पाणी खोल असून जहाजांनां सुरक्षित आहे. दुसरा बाहेरील, याचें क्षेत्रफळ ४ चौरस मैल आहे व ७० वाव खोल पाणी आहे. जगांतील मोठ्या नैसर्गिक पांच सहा बंदरांपैकीं हें एक आहे. ईस्ट इंडियन आरमाराच्या ॲडमिरलचें हें मुख्य ठिकाण होतें व त्याच्या बरोबर ब्रिटिश तोफखाना व पायदळाची शिबंदी होती. प्रवाशांची व मालाची बोट कोलंबोहून येथें दर आठवड्यास येते व येथून परत जाते. १८९३ सालीं आरमारी ठिकाण या दृष्टीनें त्रिंकोमालीच्या महत्त्वाकडे अधिकारी कमिशनरचें लक्ष गेलें व त्यानें याचा आधुनिक किल्ला करावा अशी शिफारस केली व हें काम १८९८ सालीं सुरू होऊन १९०४ सालीं पुरें झालें. हल्लीं सुद्धां एक लढाऊ जहाज येथें रक्षणाकरितां ठेविलेलें असतें.

हें शहर तामिल लोकांच्या सिलोनमधील वसाहतींचें पहिलें ठिकाण होतें. त्यांनीं येथें एक देऊळ बांधलें. परंतु १६२२ सालीं पोर्तुगीज लोकांनीं हें शहर घेतलें तेव्हां त्या देवळाचा नाश करून त्याचें सामान किल्ल्यास लावलें. हें शहर नंतर डच लोकांनीं १६३९ सालीं घेतलें. स. १६७३ त फ्रेंच लोकांनीं, व १६७४ डच लोकांनीं हें शहर घेतलें. १७८३ त पुन्हां डच लोकांनीं घेतलें. १७९५ सालीं ३ आठवड्यांच्या वेढ्यानंतर हें ब्रिटिशांनीं घेतलें. व १८०६ सालीं अमेन्सच्या तहान्वयें इतर सिलोनमधील डच प्रदेशाबरोबर हेंहि ब्रिटिशांनां देण्यांत आलें.

**त्रिचनापल्ली**, जि ल्हा.—हा मद्रास इलाख्याच्या दक्षिणेस आहे. क्षेत्रफळ ३६३२ चौ. मै. त्रिचनापल्लीचें मूळचें नांव त्रिशिरापल्ली म्हणजे त्रिशिर नांवाच्या राक्षसाचें शहर. त्रिशिर हा रावणाचा भाऊ होता. त्रिचनापल्लीच्या दक्षिणेस पुदुकोटा संस्थान, पश्चिमेस कोइमतूर व मदुरा जिल्हे, उत्तरेस दक्षिण अर्काट व सालेम जिल्हे व पूर्वेस तंजावर. कावेरी नदी संबंध जिल्ह्यांतून पश्चिमेकडून पूर्वेस वाहते. श्रीरंगम या ठिकाणीं कावेरीचे दोन फांटे होतात. कावेरीच्या उत्तरेस आणि दक्षिणेस स्फटिक चुनखडी निरनिराळ्या रंगाची विपुल सांपडते. चित्ते आणि अस्वल पुष्कळ सांपडतात. त्यांशिवाय दुसरे वन्यपशू नाहींत. त्रिचनापल्लीची हवा एतद्देशीयांना व इंग्रजांना सारखीच निरोगी असते. उष्णमान ८४ अंशावर असतें. दरसाल पाऊस ३४ इंच पडतो. पावसाळ्यांत वादळ अगर तुफानें क्वचित होतात. दुष्काळ फार करून पडत नाहीं म्हटल्यास चालेल. कारण कावेरी आणि कोलेरून या नद्यांचे मोठे पाट जिल्ह्यामधून वाहतात व त्यांनीं बरीच जमीन भिजते,

इतिहास.—त्रिचनापल्लीचा इतिहास पुरातन आहे. ख्रिस्ती शकापूर्वी तिसऱ्या शतकांत अशोक शिलालेखांत चोल नांवाचे राजे राज्य करीत होते म्हणून उल्लेख आहे. त्यांची राजधानी त्रिचनापल्ली होती; व टॉलमीनें चोलांची राजधानी उरय्यूर येथें होतीअसें म्हटलें आहे व उरय्यूर हा त्रिचनापल्ली शहराचा भाग एक होय. नंतर अकराव्या शतकांत चोलांची राजधानी उरय्यूर बदलून गंगाइकोंडपूर येथें नेली. सरासरी १३ व्या शतकांत द्वारसमुद्राच्या बल्लाळ राजांनीं त्रिचनापल्ली घेतली.कांहीं दिवस मदुराच्या पांड्यांनीं ती सर केली परंतु अखेरीस अल्लाउद्दीनचा सुभेदार मलिकाफर यानें स्वारी केली त्यावेळीं विजय नगरचे राजे त्रिचनापल्लीस सत्ताधीश

होतें. पुढें सोळाव्या शतकांत ज्यावेळेस विजयानगरचें राज्य नामशेष झालें त्या वेळेस मदुराच्या नाइकांनीं त्रिचनापल्ली आपल्याकडे घेतली. या नाइक घराण्याचा मूळपुरुष विश्वनाथ यानें त्रिचनापल्लीचा कोट बांधला असें म्हणतात; व १७ व्या शतकाच्या मध्यांत चोक्कनाथ नाइकानें आपली राजधानीची जागा मदुराहून त्रिचनापल्लीस आणली. १७३१ सालीं नाइक घराण्याचा शेवटचा पुरुष निपुत्रिक वारला. तेव्हां वारसाचा प्रश्न उत्पन्न झाला. अर्काटच्या नबाबाचा चंदासाहेब या नांवाचा दिवाण होता, त्यानें त्रिचनापल्ली सर करून राणी मीनाक्षीला विश्वासघातानें बंदींत टाकलें ( चंदासाहेब पहा ).

यानंतरच्या युद्धांतील क्लाइव्हनें उठविलेला त्रिचनापल्लीचा वेढा प्रसिद्ध आहे. त्रिचनापल्लीस दुसरा वेढा १७५३ सालीं म्हैसूरचा सरदार नंजराज यानें दिला. तो मेजर लॉरेन्स यानें उठविला. पुढें १७५६ सालीं फ्रेंचांनीं उचल घेऊन त्रिचनापल्ली वेढिली. त्याच वेळेस मदुरेहून क्याप्टन क्यालियड या नांवाच्या सरदारानें येऊन तो हटविला. १७५९ सालीं फ्रेंच गव्हर्नर लाली यानें त्रिचनापल्ली घेण्याचा प्रयत्न केला परंतु वांदिवाशच्या लढाईत त्याचा पूर्णपणें पराभव झाला ( इ. स. १७६० ). यावेळीं महंमद अल्ली कर्नाटकचा नबाब असून त्रिचनापल्ली त्याची राजधानी होती. १७६८ सालापासून हैदरअल्ली व टिप्पू यांच्या स्वाऱ्या झाल्या. अखेर ब्रिटिश सत्तेचा दक्षिणहिंदुस्थानांत विजय होऊन त्रिचनापल्ली शहर इंग्रजांच्या ताब्यांत गेलें. त्रिचनापल्ली येथें मराठ्यांचा अंमल वास्तविकरीतीनें इ.स. १७४१ पासून १७४४ पर्यंतच होता. परंतु त्यांनीं तेथील खंडणी वसूल करण्याचा प्रयत्न पुढें पुष्कळ दिवस केला होता असें तत्कालीन कागदपत्रांवरून दिसतें. पिरंवलूर तालुक्यांत अतिशय जुनीं खडकामधून कोरलेलीं थडगीं कधीं कधीं आढळतात. त्यांत १८६७ सालीं एक अशाच प्रकारचें थडगें आढळलें. त्यांत मानवी हाडांचे तुकडे, सहा इंच रुंदीचें एक मातीचें लहान सुंदर भांडें आणि तलवारीचा अग्रभागहि सांपडला. कांहीं रोमन नाणींहि त्यांसमवेत होतीं. त्रिचनापल्ली, पिरंवलूर, कुलितलाइ तालुक्यांत पाषाणाच्या बुद्धाच्या मूर्ती अद्याप अस्तित्वांत आहेत. पांड्य, चोल आणि कोंगू हीं घराणीं त्रिचनापल्ली जिल्ह्यांत जवळ जवळ असल्याकारणानें तेथें अनेक ऐतिहासिक अवशेष सांपडण्याचा संभव आहे. त्रिचनापल्ली येथील खडकावर व श्रीरंगम् येथें सुंदर मंदिरें आहेत. उदयारपलियम येथील जमिनदाराचा राजवाडा ही प्रेक्षणीय इमारत आहे. त्रिचनापल्ली जिल्ह्यांत ९३७ खेडीं आहेत. लो. सं १९२१ सालीं १९०२८३८ होती. मद्रास इलाख्यांत त्रिचनापल्लीसारखी दाट वस्ती दुसऱ्या ठिकाणीं क्वचित् असेल. या जिल्ह्यांत ५ तालुके असून मुख्य शहरें त्रिचनापल्ली, श्रीरंगम्, तुरय्यूर, उदइयरपाल्यायम आणि अरय्यलूर हीं होत. सर्व साधारण बोलण्यांत तामिल भाषा असते. तेलगू व कानडी फार थोडी प्रचारांत आहे. जिल्ह्यांतील सर्वसाधारण लोकाचा उद्योग शेतकी होय. याचें प्रमाण शेंकडा ७३ आहे एकंदर ३६३२ चौ. मै. पैकीं रयतवारी व इनाम जमीन २८२० चौ. मै.; जमिनदारी ६३४ चौ.मै. असून पूर्ण माफीचीं १७८ खेडीं आहेत. खाण्याचीं मुख्य धान्यें तांदूळ, रागी, वरगू आणि चोलम हीं होत.

वहित जमिनीच्या मानानें जिल्ह्याचीलो. सं. बाढत्या प्रमाणावर आहे. अद्यापि ३०० चौ. मै. क्षेत्रफळ वहितीला घेण्यासारखें आहे. तक्कावी तगाई सढळ रीतीनें रयतेला दिली जाते. शेतकीकामाकडे बहुधा बैल व रेडे उपयोगांत आणितात. गुरांचा मोठा बाजार अरय्यलूर, तुरैय्यूर आणि मनपराई या ठिकाणीं भरतो. गुरांची पैदास्त चांगली नसते. चांगलीं गुरें सालेम व म्हैसूरहून समयपुरमच्या यात्रेंत विक्रीस येतात. कावेरी व कोलेरून या दोन नद्यांचे पाट पूर्वीपासून आहेत. सरासरी १६० चौ. मै. जमीनीस पाटाचें पाणी मिळतें. तलावांची संख्या १५९० असून तळाव व विहिरी मिळून २७०० क्षेत्रफळ जमीन भिजते.

त्रिचनापल्ली जिल्ह्यांत राखीव जंगल ३०५ चौ. मै. आहे. त्यांत साग, शिसू, चंदन आणि वांबू विपुल होतात. तंजावर जिल्ह्यांतील जंगल जवळ लागून असल्यामुळें त्रिचनापल्लीस जंगलकामदारांची कचेरी असून दोन्ही जिल्ह्यांचें जंगल त्याच्याच देखरेखीखालीं असतें.

जिल्ह्यांत उद्योगधंदे फारसे नाहींत. थोडे लोक विणकरी आहेत. ते जाडेंभरडें कापड विणतात. त्रिचनापल्ली शहरांत मात्र रेशमी, सुती व जरीकांठी बारीक कापड तयार होतें. कुंभकोणेला असेंच कापड निघतें. घोंगड्या, कांबळी हीं लहान लहान खेड्यांतून निघतात. पांढऱ्या लोंकरीच्या सतरंज्या व सकलादी या जिल्ह्यांत बऱ्याच होतात. त्रिचनापल्ली एका कालीं सोन्यारुप्याच्या घडामोडीबद्दल प्रसिद्ध होते. अजूनहि स्थानिक मागणी चांगली आहे. तांब्यापितळेचे पत्रे त्रिचनापल्ली व आसपासच्या गांवीं तयार करतात. गोवानीज तांब्याचीं भांडीं करतात. जिल्ह्यांतील एका गांवीं कांचेच्या बांगड्या दरसाल १२००० रुपयांच्या होतात. इमारती व अस्तित्वांत असलेलीं भव्य मंदिरें यांवरून लोकांच्या कसबाची व कलेची साधारण कल्पना करतां येते. हस्तिदंती काम तर फारच प्रेक्षणीय असून त्यास दिल्ली प्रदर्शनांतून बक्षिस मिळालें आहे. त्रिचनापल्लीस कापूस दाबण्याचा एक कारखाना आहे व कातडीं कमावण्याचे कारखाने ६ आहेत. कमावलेलें कातडें सरासरी ५ लाखांचें निघतें व तें इंग्लंडकडे पाठविलें जातें. त्रिचनापल्लीस तंबाखूचे चुट्टे तयार होतात. दरसाल पाऊण लाखाचे चुट्टे परदेशीं रवाना होतात. दिंडिगल तंबाखू वापरतात. जिल्ह्यांतून बाहेर जाणारे व्यापारी जिन्नस, खाण्याचे पदार्थ, डाळी, मिरची, नारळ, केळीं, सुपारी, साखर, कमावलेलीं कातडीं, एरंडीतेल, ढेप, स्लेटीचा दगड व चुट्टे इत्यादि होत. तसेंच बाहेरून येणारे जिन्नसः—धान्य, डाळी, एरंडी, सरकी,

खोबरेल तेल, मिरीं, सुपारी, कच्ची तंबाखू, राकेल तेल, सूत, मीठ इत्यादि. यामुळें त्रिचनापल्ली ही एक महत्त्वाची व्यापारी पेठ बनून गेलेली आहे. व्यापारी लोकांत मुख्यत्वें-करून चेट्टी, गुजराथी व मारवाड्यांचा भरणा विशेष आहे.

साउथ इंडियन (दक्षिण हिंदुस्थान) रेल्वे जिल्ह्यामधून गेलेली आहे. तिचा एक फांटा त्रिचनापल्लीवरून ईरोडला गेलेला आहे. तंजावरपासून त्रिचनापल्ली व नंतर ईरोड फांटा १८६२ त सुरू केला आहे; व करुरला(कोइमतूर-मधील) १८६६ सालीं तोच फांटा नेलेला आहे.

ता लु का.—मद्रास, त्रिचनापल्ली जिल्ह्यांतील तालुका. क्षेत्रफळ ५४२ चौ. मै. तालुक्यांतील खेड्यांची संख्या १९३. कावेरी व कोल्हेरून या नद्यांनीं त्रिचनापल्ली पोटविभागाचे बरोबर २ भाग झालेले आहेत. कार्डांचें उत्पन्न इतर वावी मिळून १९०३-०४ सालीं ८१३००० रु. झालें होतें.

श ह र.—मद्रास इलाखा, त्रिचनापल्ली जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठाणें. कावेरी नदीच्या उत्तरकिनाऱ्यावर हें असून मद्रासपासून गाडीरस्त्यानें १९५ मैल व रेल्वेनें २५० मैल आहे. एकंदर लोकसंख्या (१९११) १२०४२२. हें रेल्वेचें महत्त्वाचें स्टेशन असल्यामुळें लोकसंख्येचें मान भराभर वाढत आहे. इंग्रजांकडे त्रिचनापल्ली आल्यावर त्यांनीं आपलें लष्करी मुख्य ठाणें येथें ठेविलें. येथील किल्ला फार मोठा असून तो कावेरी नदीच्या दक्षिण तीरावर आहे. कावेरी नदीच्या प्रवाहानें निसर्गतःच बनलेल्या अत्युच्च खडकावर फार प्राचीन काळीं हा गांव वसलेला आहे. या किल्ल्याची उंची सुमारें ६०० फूट असून तो १६ व्या शतकाच्या उत्तरार्धामध्यें बांधला असें म्हणतात. पूर्वी या किल्ल्यासभोंवतीं उत्तम तटबंदीचें काम केलें असून खोल खंदकहि खणलेला होता. या किल्ल्याच्या मध्यंतरीं सुमारें २७३ फूट उंचीचा एक उंच खडकाचा सुळका असून, त्याच्या माथ्यावर शिवमंदिर बांधलेलें आहे. या किल्ल्यापासून थोड्याशा अंतरावर '*नबाबाचा राजवाडा*' म्हणून एक मोठी इमारत आहे. ही इमारत सुमारें सव्वा दोनशें वर्षांपूर्वी चोकनाइक नामक राजानें बांधिली व तेथेंच अर्काटच्या नबाबांनीं आपलें निवासस्थान केलें; म्हणून त्यास 'नबाबाचा राजवाडा' असें नांव पडलें आहे. ब्रिटिश सरकारनें या राजवाड्याची १८७३ सालीं दुरुस्ती केली असल्यामुळें तो अद्यापि चांगल्या स्थितींत आहे. सन १८६६ त त्रिचनापल्लीस म्युनिसिपल कमिटी स्थापन झाली. कावेरीचें पाणी शहरांत पुरविलें आहे. किल्ल्याजवळ चंदासाहेबाचें थडगें नादीरशहाच्या मशीदींत आहे. थडग्याभोंवतीचें धातुकाम उत्कृष्ट शिल्पांपैकीं आहे. मशिदीवरील घुमट चंदासाहेबानें स्वतः बांधलेला असून त्याचें व महंमदअलीचें थडगें जवळ जवळच मशिदीच्या आंत आहेत. याशिवाय किल्ल्यांत म्यु. कमिटीनें स्वतःकरितां एक दिवाणखाना, बाजार व एक दवाखाना बांधलेला आहे. शहरांत कांहीं बाग व उद्यानें आहेत.

त्रिचूर—मद्रास.कोचीन संस्थानमधील त्रिचूर तालुक्याचें मुख्य ठाणें. क्षेत्रफळ ३॥ चौ. मै.; लो. सं. (१९०१) १५५८५. पश्चिम किनाऱ्यावरील त्रिचूर अतिशय जुन्या शहरांपैकीं एक होय; व परशुरामानें त्या शहराची स्थापना केली अशीहि दंतकथा आहे. ऐतिहासिक गोष्टी त्रिचूर येथें थोड्या फार घडलेल्या आहेत. स. १७६० मध्यें झामोरिन यानें तें काबीज केलें होतें. हैदरअली व टिप्पू यांची नजर त्रिचूरकडे गेलेली होती. १७७४ सालीं त्रिचूर गांवाला मातीच्या भिंतीची तटबंदी, खंदक वगैरे केलेला होता. आतां तीं सर्व नामशेष झालेलीं आहेत. आरमारी दळणवळण व रेल्वे स्टेशन यामुळें त्रिचूर व्यापारी पेठ झालेली आहे. येथें ख्रिस्ती वस्ती बरीच असल्यामुळें ये...ऊ व्यापारी वर्गांत ख्रिस्ती व तिन्नेवेल्लीचे ब्राह्मण मुख्यत्वें मोडतात. त्रिचूरास राजवाडा, रेसिडेंटचा बंगला, व इतर सरकारी कचेऱ्या आहेत. मुलांचीं तीन हायस्कुलें आणि मुलींच्या ३ दुय्यम शाळा आहे. ख्रिस्ती लोकांचीं देवळें ३ आहेत. वडकुनाथाचें देऊळ व शंकराचार्यांच्या शिष्यांनीं स्थापन केलेले तीन मठ प्रसिद्ध असून पाहाण्यासारखे आहेत. वडकुनाथाच्या मंदिराचें सालिना उत्पन्न रु. ३०००० च्या वर आहे. मठांना मोठा आश्रय देणगीरूपानें आहे. एका मठांत नंबुद्री ब्राह्मणांकरितां अन्नछत्र व पाठशाळा आहे.

त्रिदोष—त्रिदोष या शब्दांत दोन पदें आहेत. त्रि आणि दोष. त्रि म्हणजे तीन आणि दोष म्हणजे दुष्ट करणारे (विघडविणारे). आर्यवैद्यकांत दोष या नांवानें समजले जाणारे तीन पदार्थ आहेत. त्यांचीं नांवें वायु, पित्त व कफ अशीं आहेत. शरीरांत कोणताहि विघाड होतो तो प्रथम दोषांमध्यें होतो व हे दोष म्हणजे वायु, पित्त व कफ हे विघडले म्हणजे शरीरांतील इतर पदार्थ जे धातु (सात) व मल त्यांस विघडवितात. म्हणून धातू व मल यांस विघडणारे अशा अर्थानें (दूषयंति इति दोषाः) वायु, पित्त व कफ यांस दोष हें नांव मिळालें.

वास्तविक आर्यवैद्यकांत वायु, पित्त व कफ हे विघडले नसतील तेव्हां शरीराची सुस्थिति कायम राखणारे पदार्थ आहेत व तेव्हां त्यांस (म्हणजे दोषांस) त्रिधातु असें म्हणतात (शरीरधारणाद्धातवः). दोष व धातु हे दोन्ही शब्द सहजीं पुष्कळ ठिकाणीं समानार्थदर्शक म्हणून वापरले आहेत. पण प्रत्येकाचा खरोखर शब्दार्थ निराळा आहे. त्रिधातु समस्थितींत असतां शरीरांतील क्रिया (इंग्रजी वैद्यकाप्रमाणें इंद्रियविज्ञानप्रतिपादित) करणारे अतएव आरोग्य कायम राखणारे स्थूल व सूक्ष्म शक्तिमान असे पदार्थ आहेत; व विकृत शरीराचेंहि मूलकारण तेच पदार्थ आहेत. आयुर्वेदांतील वाङ्मयांत दोष व धातू हे शब्द पुष्कळ ठिकाणीं समानार्थ योजले आहेत. पण त्यांत इंगित इतकेंच दिसतें कीं जे धातू समस्थितींत असतां शरीराचें धारण-संवर्धन करतात तेच धातू दुष्ट झाले तर शरीरांत रोग उत्पन्न

करण्यास कारणीभूत होतात(य ए व देहस्य समाविवृध्यै त एव दोपा विषमावधाय ).

आतां हे दोष म्हणजे कोणते पदार्थ आहेत तें पाहूं. अगदीं सोप्या शब्दांत दोष म्हणजे कोणते पदार्थ हें सांगावयाचें तर असें सांगतां येईल कीं सप्तधातू म्हणजे रस, रक्त मांस, मेद, अस्थि, मज्जा व शुक्र आणि मल (पुरीष, मूत्र, घाम इत्यादि ),यांशिवाय शरीरांत जे पदार्थ आहेत ते दोष होत. ते सूक्ष्म व स्थूल अशा दोन्ही प्रकारांनीं शरीरांत असतात. अन्नपचनाच्या वेळीं अन्नामध्यें जेव्हां कफ व पित्त यांचें मिश्रण होतें त्यावेळीं या दोन दोषांचें स्वरूप स्पष्ट दिसतें. तीन दोषांपैकीं कफापेक्षां पित्त व पित्तापेक्षां वायु जास्त सूक्ष्म असतो. म्हणून वायूचें स्वरूप शरीरांत कोठेंच डोळ्यांनीं दिसत नाहीं. त्याचें ( वायूचें ) अस्तित्व त्याच्या कार्यावरूनच सिद्ध आहे. आर्यवैद्यकवाङ्मयाशीं अगदीं अपरिचित अशा लोकांच्या कानावर वरील दोष या शब्दाचा शरीरांतील मलरूपद्रव्यें असा अर्थ नेहमीं पडतो. आणि वरील अर्थच प्राधान्येंकरून त्यांच्या मनांत वागत असल्यामुळें ते त्रिदोषतत्त्वाचें आकलन करूं शकत नाहींत. वायु या शब्दाचा अर्थ किती व्यापक आहे हें चरकसंहितेच्या सूत्रस्थानांतील बाराव्या अध्यायांतील एक उतारा खालीं देत आहे त्यावरून कळून येईल.

"वायुस्तंत्रयंत्रधरः प्रवर्तकश्चेष्टानां उच्चावचानां नियंता प्रणेताच मनसः सर्वेंद्रियाणामुद्योगकरः। सर्वेंद्रियार्थानां अभिवोढा, सर्व शरीरधातुव्यूहकरः, संधानकरः शरीरस्य,प्रवर्ताको वाचः, प्रकृतिः स्पर्शशब्दयोः, श्रोत्रस्पर्शनयोर्मूलं, हर्षोत्साहयोर्योनिः । समीरणः अग्नेः दोषसंशोषणः । क्षेप्ता बहिर्मलानां, स्थूलाणुस्त्रोतसां भेत्ता, कर्ता गर्भाकृतीनां, आयुषोनुवृत्तिप्रत्ययभूतो भवति अकुपितः। "

शरीर धारण करणें, सर्व इंद्रियांनां आपापल्या विषयांकडे प्रवृत्त करणें, इंद्रियविषयांचें ज्ञान मनाला कळविणें, शरीरांतील धातूंची रचना करणें, शरीर जुळवून ठेवणें, वाणीचें प्रवर्तन करणें, हर्ष व उत्साह उत्पन्न करणें, शब्दज्ञान व स्पर्शज्ञान यांचें कारण, अग्नीस प्रेरण करणें, मलांनां बाहेर टाकणें, स्थूल व सूक्ष्म स्रोतसांचें भेदन करणें, गर्भाला आकृति देणें, इत्यादि कार्यें चांगल्या स्थितींत असलेला वायु करतो असा वरील उताऱ्याचा सारांश आहे. यावरून वायु, पित्त व कफ हीं शरीरांतील तत्त्वें किती व्यापक आहेत तें कळून येईल. वायु, पित्त व कफ म्हणजे त्रिदोष यांचीं विशेष स्थानें, ते अविकृत असतां शरीरसंवर्धक असणारीं त्यांचीं कार्यें, व विकृत असतां शरीरविघातक होणारीं त्यांचीं कामें या सर्व गोष्टींची विशेष सविस्तर माहिती ज्ञानकोश ग्रंथांत वायु, पित्त व कफ या शब्दांच्या विवरणांत दिली आहे ती पहावी.

त्रिदोषपद्धति नीट न समजल्यामुळें या पद्धतीवर आजपर्यंत अनेक लोकांनीं आक्षेप घेतले आहेत. या आक्षेपकांपैकीं कै. डॉ. गर्दे हे प्रमुख आहेत. त्यांनीं त्रिदोषपद्धतिविरुद्ध आपलें म्हणणें सार्थ अष्टांगहृदय ( वाग्भट ) ग्रंथाच्या प्रस्तावनेंत सविस्तर मांडलें आहे. त्यांच्या आक्षेपांस अनेक लोकांनीं अनेक वेळां उत्तरें दिलीं आहेत. डॉ. गर्दे यांनीं वैद्यकांतील वायु, पित्त व कफ या शब्दांच्या अर्थाचा विपर्यास केला आहे. त्यांच्या मतें वायु म्हणजे श्वासोच्छ्वासांतून व गुदद्वारांतून बाहेर पडणारा जो वारा तो, व पित्त म्हणजे वांतींतून हिरवें पिवळें पडतें तें, व कफ म्हणजे खोकला या विकारांत जो घशांतून चिकट पदार्थ पडतो तो. हे वायु, पित्त व कफ आर्यांनीं रोगकारण मानले (कारण प्रत्यक्ष दिसतात) व नंतर जसजशी त्यांची समजूत वाढली तसतसे सर्व शरीरांतील कार्यांचे ते ( त्रिदोष ) प्रवर्तक होत अशी त्यांनीं आपली समजूत करून घेतली. डॉ. गर्दे यांच्या आक्षेपाचें स्वरूप थोडक्यांत वरीलप्रमाणें आहे; व पुढें त्यांनीं असेंहि म्हटलें आहे कीं, हल्लीं आंग्लवैद्यकांतील रोगकारणांचें ज्यांस ज्ञान आहे त्यांस त्रिदोष हे रोगकारण आहेत ही गोष्ट मिथ्या वाटणारी आहे. वरील डॉ. गर्दे यांच्या म्हणण्यांत मुख्य मुद्दा हा आहे कीं आंग्लवैद्यकांत जसें ( विकृत अवयव हें ) रोगांचें कारण हल्लींच्या शास्त्रांनीं प्रत्यक्ष दाखवितां येतें तसें त्रिदोष हें रोगांचें कारण म्हणून दाखवितां येत नाहींत. यावर आर्यवैद्यकाचें म्हणणें असें कीं, रोगकारण डोळ्यांनीं जें दिसतें ( म्हणजे विघडलेले सप्तधातू ) तें खरें कारण नाहीं.खरें रोगकारण म्हणजे हे धातू ज्या पदार्थांनीं बनतात त्या अन्नावर ज्या पदार्थांचे संस्कार घडतात व ज्यांच्या साहाय्यानें तें अन्न धातुरूप पावतें त्या पदार्थांतील विकृति नाहींशी केली म्हणजे धातूंवर ( शरीरावयवांवर ) दिसत असलेला रोग नाहींसा होतो.

इंग्रजी वैद्यकांत रोगाचें निदान म्हणजे विघडलेल्या शरीरावयवाचें वर्णन होय. उदाहरणार्थ एक प्रकारचें डोकें दुखणें ( ब्लड प्रेशर ) या रोगाचें कारण डोक्याकडे रक्तप्रवाह जास्त गेल्यानें तेथील वातवाहिन्यावर रक्ताचा जास्त दाब पडला असतां तो दाब कमी करणारीं म्हणजे रक्तप्रवाह मंद करणारीं औषधें म्हणजे हृदयाची क्रिया मंद करणारीं औषधें देणें, ही डोकें दुखण्याची चिकित्सा होते. आर्यवैद्यकाप्रमाणें वायु हा दोष विघडल्यानें डोकें दुखतें व तो वायु प्रथम स्वतःच्या आशयांत (स्थानात) वाढून जेव्हां तो रक्तावर परिणाम करतो तेव्हां शिरोरोग होतो. म्हणजे रक्ताचा दाब जास्त होणें हें डोकें दुखण्याचें जें स्थानिक कारण तो रोग नसून डोक्याकडे रक्तप्रवाह जास्त करणारा जो वायु तोच खरा रोग होय; व आर्यवैद्यकाच्या मतें त्या वायूवरच उपचार केले पाहिजेत. तात्पुरती हृदयाची क्रिया मंद केल्यानें डोकें दुखणें तात्पुरतें थांबेल परंतु मूळ कारण जें वात कोप तें दूर होणार नाहीं. चरकाचार्यांनां शिरोरोगांत रक्तदुष्टि होते ही गोष्ट माहीत होती. कारण शिरोरोगाचें निदान लिहितांना " वातादयः प्रकुप्यंति शिरस्यस्त्रं प्रदुष्यति।"( चरक सूत्रस्थान, अध्याय १७ श्लो. ११ ) असें म्हटलें आहे. या

श्लोकावरील टीकाकार चक्रदत्त यानेंहि " असें प्रदुष्यतीत्यभिदधानः सर्व शिरोरोगे रक्तदुष्टिं दर्शयति । " असें लिहिलें आहे. परंतु शिरोरोगाचें खरें कारण वातादिकांची दुष्टि हेंच आहे असें लिहून औषधोपचार दोषांवरच करावे असें लिहिलें आहे. रक्त दुष्ट होतें ही गोष्ट माहीत असून ती गोष्ट चरकाचार्यांनीं गौण मानली आहे.

प्रत्येक रोगांत कोणता तरी शरीरावयव बिघडतो ही गोष्ट प्राचीन वैद्यांस माहीत होती. चरकाचार्यांनीं सूत्रस्थानांतील त्रिशोधीयाध्यायांत कांहीं उदाहरणें देऊन ही गोष्ट स्पष्ट केली आहे. तथापि त्यांचा मुख्य रोगवर्णनाचा रोख विकृत अवयवांवर नसून विकृत दोषांचें त्या त्या रोगांत वर्णन करण्यावर आहे. म्हणून त्याच्या पुढील अष्टोदरीयाध्यायांत कोणताहि शरीरावयव बिघडलेला रोग दोषांनींच होतो अशा अर्थाचें विधान स्पष्ट केलें आहे ( तथा स्वधातुवैषम्य निमित्ताः सर्व विकाराःवातपित्तकफान्नातिवर्तंते । ). यावरून आर्यवैद्यकांतील प्राचीन ग्रंथकारांस प्रत्येक रोगांत शरीरांतील कोणता तरी अवयव विकृत होतो ही गोष्ट पूर्णपणें कळून आली होती. परंतु या अवयवविकृतिवर्णनानें खरें विकृति वर्णन होत नाहीं असें त्यांचें अनुभवसिद्ध मत असल्यामुळें प्रत्येक रोगांत विकृतावयवांचेंच वर्णन न करतां खरें रोगकारण जे दोष त्यांचेंच वर्णन केलें आहे व यामुळें आजच्या इंग्रजी वैद्यकांतील रोगनिदान, मुख्यतः अवयवांच्या विकृत स्थितिवर्णनावर अधिष्ठित आहे म्हणून, आर्यवैद्यकाच्या निदानाशीं जुळत नाहीं. आजचें म्हणण्याचें कारण इंग्रजी वैद्यक सुद्धां जंतुशास्त्र आणि अंतर्ग्रंथिशास्त्र यांच्या मार्गें आर्यवैद्यकाप्रमाणेंच विकृत अवयवापेक्षां सूक्ष्म अशा रोगकारणांच्या शोधास लागलें आहे. सदरहू म्हणण्याच्या पुष्टिकरणार्थ आर्यवैद्यकासंबंधानें मद्रासकडील रिपोर्टांतील श्रीनिवासमूर्ति यांच्या लेखांतील पुढील उतारा देतों.

" अलीकडील पाश्चात्य इंद्रियविज्ञानशास्त्रवेत्त्यांचें पेशीकल्पना ( सेल्युलर थिअरी )हें आरंभस्थान होय; आणि या कल्पनेच्या वाढीमुळें ग्रीक लोकांच्या त्रिरसात्मकल्पने- (ह्युमरल थिअरी)चें उच्चाटण झालें आहे. परंतु पाश्चात्य पेशीकल्पनेंतील पेशीच्या सूक्ष्मपणापेक्षां कितो तरी पटीनें अधिक सूक्ष्मपणा आयुर्वेदांतील त्रिधातुकल्पनेमध्यें अभिप्रेत आहे. कारण त्रिदोषांचा संबंध सूक्ष्म अशा पंचमहाभूतांशीं व त्रिगुणाशींहि आहे. किंबहुना पाश्चात्य वैद्यकांतील पुराणपेशी कल्पना जेथें संपते तेथून पुढें आयुर्वेदाच्या त्रिदोषकल्पनेस सुरवात होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणून प्रचलित पाश्चात्य इंद्रियविज्ञानांतील कोणत्याहि भागाशीं त्रिदोषांच्या उपपत्तीची बरोबर तुलना आज करतां येणार नाहीं असें वाटतें. परंतु थोड्याच दिवसांत अशा प्रकारची तुलना करतां येईल असें दिसतें. या बाबतींतील पाश्चात्य शास्त्रज्ञांचे अगदी अलीकडील शोध हे पुष्कळसे आयुर्वेदीय भासतात. जीवनरस ( प्रोटोप्लझम ), चैतन्यबिंदु ( न्यूक्लियस ), व मध्यस्थान ( सेंट्रोसेम ) हेच ज्यांतील मुख्य भाग आहेत अशा साध्या पेशींमध्यें सुद्धां अलीकडील जीवशास्त्रज्ञांस, याहिपेक्षां सूक्ष्मतर असे क्रोमोसोम, इदस्, बायोफोर व आणखीहि महत्त्वाचे अवयव दिसूं लागले आहेत ( अशा प्रकारचे अणुपरमाणू हे मात्र वात, पित्त, कफ, यांच्या परिमाणाप्रमाणें भासतात.).' रोगप्रतिबंधक - कोच्या कल्पना ( थिअरी ऑफ इम्युनिटी ) क्षेत्रांत जर आपण पाहूं लागलों तर पूर्वीची पेशींची साधी कल्पना पार जाऊन, त्यामध्यें हेप्टोफोर, अॅबेसेप्टर, कांप्लीमेंटोफाईल, अर्गोफोर, आपसोनिनस्, आग्लुटिनिनस्, प्रेसिपिटिनस्, सायटोलायसिनस्, अलेक्झीनस्, सेनसिटायझेशन, अनाफिलाक्सीस् यांसारखे अति सूक्ष्म व गुंतागुंतीचे आणि कल्पनामय असे निरनिराळे अवयव जुन्या पेशीकल्पनेच्या पुरस्कर्त्यांनां दिसूं लागले आहेत. नूतन कल्पनांचा हा आश्चर्यमय पसारा आधुनिकांनीं ज्या गोष्टींच्या वर्णनाकरितां मांडलेला आहे, त्या गोष्टी तरी त्रिधातुकल्पनेइतक्याच बहुशः कल्पनामय आहेत; आणि त्यांचाहि कलुष ( कोलॉइड्स् ) व जीव रसायनांतील ( बायोकेमिस्ट्री ) रसकल्पनेकडे स्पष्ट कल दिसत आहे.

त्याचप्रमाणें अंतर्मुखपिंड व मन यांसंबंधीं विवेचन करतांना पाश्चात्य शास्त्रज्ञहि आतां शारीररस आणि मानसिक भावना यांचा परस्परावर प्रभाव चालतो असें बोलूं लागले आहेत. मग हे आधुनिकांचें म्हणणें आणि वाताची, उत्साहास, कफाची क्षमेस, व पित्ताची बुद्धीस प्रेरणा मिळते हें आयुर्वेदिकांचे म्हणणें यांत तफावत ती काय ? या माझ्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ पाश्चात्य शास्त्रज्ञ प्रो. गुडार्ड यांचा एक दाखला देतों. ते आपल्या ग्रंथांत म्हणतात, 'कॅननने असें दाखविलें आहे कीं अधिवृक्कपिंडास प्रेरणा दिली असतां क्रोधाचा प्रादुर्भाव होतो, आणि उलट अन्य रीतीनें क्रोध उत्पन्न झाला असता अधिवृक्कपिंड स्रवूं लागतो. असे अनेक अंतर्मुखपिंड शरीरामध्यें असून ते अनुवर्तिनसाव्यूहांत गुंफलेले आहेत व त्यांचाहि वरील उदाहरणाप्रमाणें मनोभावनांवर प्रभाव चालत असण्याचा संभव आहे.'

**त्रिपपूर**—मद्रास. त्रावणकोर संस्थानांतील त्रिवेंद्रम् तालुक्यांतील एक लहानसें गांव आणि मंदिर. हें त्रिवेंद्रमपासून उत्तरेस ५ मैल आहे. सन १९०१ सालीं लोकसंख्या १९२७ होती. या मंदिरांत विष्णुपदाची पूजा करतात. त्रावणकोरच्या राजाची पिढीजाद देवता अनंतपद्मनाभ नांवाची आहे. त्या देवतेचें डोकें तिरुवल्लमला असून शरीर त्रिवेंद्रमला व पाय त्रिपपूर येथें आहेत. त्रिपपूर हा त्रिपादपुरमचा अपभ्रंश होय. त्रावणकोरच्या राजांची प्रथम या मंदिरांत मुगुट धारण करण्याची प्राचीन पद्धत आहे. यावरून त्रिपपूर त्रावणकोरची पहिली राजधानी असावी असा तर्क होतो. निदान राज्याभिषेकोत्सव तरी या ठिकाणी होत असला पाहिजे.

**त्रिपुनिथूर**—मद्रास. कोचीन संस्थानांतील कनयनूर तालुक्यांतील एक शहर. हें एर्नाकुलपासून २ मैल व कोचीन ( ब्रिटिश ) पासून ८ मैल आहे. लोकसंख्या (१९०१) सुमारें ३०००. कोचीन राजघराण्यांतील कांहीं लोक या ठिकाणीं येऊन राहातात. व त्यांच्याकरितां या ठिकाणीं मोठमोठे राजवाडेहि बांधले आहेत. शहरापासून १॥ मैलांवर एका टेंकडीवर एक सुंदर राजवाडा कोचीनच्या महाराजांनीं बांधलेला आहे. येथें सांप्रतचे महाराज राहाण्यास येतात.

**त्रिपुर**—त्रिपुर किंवा त्रिपुरासुर असें बाणासुराला नांव होतें असें हरिवंशपुराणांत आहे.पण महाभारतांत पुढील माहिती आढळते.पूर्वी देवदानवांचा दीर्घकाळ संग्राम होऊन दानवांचा पराभव झाल्यावर मयासुरानें तप करून ब्रह्मदेवा पासून वर मागितला कीं, ' मला शत शत योजनांच्या अंतरावर देवास अभेद्य अशीं तीन फिरतीं पुरें करतां यावीं व तीं ब्राह्मणांच्या शापास अभेद्य असून महादेवाच्या बाणानें कदाचित् त्यांचा नाश झाला तरी त्यांतून जें पुर अवशेष राहील त्याचा नाश होऊं नये. ' ब्रह्मदेवानें ' तथास्तु ' म्हटल्यानंतर मयासुरानें पुष्यनक्षत्रांवर लोह, रजत, आणि सुवर्ण यांचीं एकावर एक अशीं सारख्या अंतरानें तीन पुरें निर्माण केलीं आणि तेथील आधिपत्य अनुक्रमानें त्याचे पुत्र तारकासुर, कमलाक्ष आणि विद्युन्माली या तिघांस दिलें. याशिवाय त्या तीन पुरांच्या आसमंतात आणखीहि कित्येक अंतरिक्षपुरें निर्मून त्यांत अन्य असुरांची राहण्याची व्यवस्था केल्यावर, सर्वांच्या ऊर्ध्वप्रदेशीं अति दिव्य पुर निर्मून त्यांत स्वतः आपण राहिला.

मयासुरानें अशी व्यवस्था करून सर्वांस असें सांगितलें कीं, तुम्ही इतःपर आपण होऊन देवांच्या वाटेस जाऊं नये व उन्मत्तपणानें आचारहीन होऊन ईश्वरोपासनेचा अनादर करूं नये. बऱ्याच काळानंतर ते सर्व नियम त्यांनीं हळूहळू सोडण्यास आरंभ केला. तेव्हां देवांनीं असुरांचा नाश केला; मात्र मयासुर परमनियमशाली व ईश्वरोपासक असल्यामुळें तेवढा वांचला. हें त्रिपुराख्यान थोडया फार फरकानें अनेक पुराणांत आढळतें.

**त्रिंबकजी डेंगळे**—हा आरंभीं दुसऱ्या बाजीरावाच्या पदरीं जासूद किंवा हेर म्हणून एक नोकर होता. इ. स. १८०२ मध्यें बाजीराव जेव्हां होळकराच्या तडाक्यांतून सुटण्याकरितां पुण्याहून महाडास पळून गेला तेव्हां त्रिंबकजीनें अगदीं थोड्या वेळांत बाजीरावाचें पुण्यास एक पत्र पोहोंचवून त्याचें तावडतोब उत्तर आणून दिल्यामुळें पेशव्याची मर्जी प्रसन्न होऊन त्याला खास तैनातींतील जागा मिळाली. तेथें त्रिंबकजीची हुषारी, तडफ, तरतरीतपणा, व कामांतील दक्षता विशेष दिसून तो बाजीरावाचा विश्वासु बनला. पुढें पेशव्यानें तोफखान्यावरील सरदार गणपतराव पानसे याची जहागीर जप्त करून त्रिंबकजीची त्याच्या जागेवर नेमणूक केली. त्रिंबकजी प्रथम माणकेश्वर व खुश्रुजी यांची मर्जी संपादन करण्याची खटपट करीत होता. परंतु त्यांचा अर्धवट कल इंग्रजांकडे दिसूं लागल्यामुळें ही गोष्ट त्यानें लागलीच बाजीरावाच्या कानावर घातली. पुढें माणकेश्वराच्या जागीं तो स्वतःच बाजीरावाचा मंत्री झाला.

इ. स. १८१२ मध्यें चतरसिंगानें पेशव्याविरुद्ध दंगा माजवून तो बागलाणांतून स्वदेशीं जात असतां यानें त्यास कैद केलें व बेडया घालून कांगोरीच्या किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. चतरसिंगास सोडविण्याचे अनेक प्रयत्न झाले व एका तोतयानें तर त्याच्या नांवावर बंड आरंभून लुटालूट सुरू केली. तत्पक्षीय लोक संधि सांपडतांच त्रिंबकजीचा जीव घेण्यास टपून बसले होते. पुढें १७१३ साली खुश्रुजीनें कर्नाटकच्या सरसुभेदारीच्या जागेचा राजीनामा दिला तेव्हां बाजीरावानें त्या जागीं त्रिंबकजीची नेमणूक केली.

वसईच्या तहानें आपलें स्वातंत्र्य नष्ट झाल्याची जाणीव रावबाजीस मधून मधून होई व तें पुन्हां मिळविण्याची त्याची इच्छाहि होती.पण स्वतःच्या तेवढा धीर व धाडशी नसल्यानें कोणाची तरी त्याला मदत लागे. असे विश्वासु मदतनीस त्याच्याजवळ यावेळीं फारसे कोणी शिल्लक राहिले नव्हते. बहुतेकांनीं इंग्रजांशीं स्वतंत्र तह करून आपापला स्वार्थ सांभाळला होता. त्यामुळें व त्रिंबकजी धाडशी असल्यानें पेशव्यानें त्यालाच हाताशीं धरिलें. त्रिंबकजी हा इंग्रजांचा द्वेष्टा होता. इंग्रजांचा कावा ओळखून त्याला तोंड देणारा व मराठी साम्राज्य टिकविण्यासाठीं धडपडणारा त्रिंबकजी हा बापू गोखल्याप्रमाणें पेशवाईतील शेवटचा पुरुष. त्यानें फौज जमविण्यास प्रारंभ केला व तिच्या जोरावर पुन्हां इंग्रजांशीं दोन हात करून पहाण्याचा उद्योग चालविला या कामीं इतर सरदारांनीं मदत करावी म्हणूनहि त्यानें खटपट चालविली. त्यांश हीं सर्व कृत्यें इंग्रजांच्या हेतूच्या ( पेशवाई घेण्याच्या ) आड येत म्हणून त्यांनीं त्रिंबकजीचा कांटा दूर करण्याचें ठरविलें. नाना फडणीसानंतर इंग्रजांना त्रिंबकजीचा धाक होता.

त्रिंबकजीनें महत्त्वाचीं ठाणीं आपल्या विश्वासू माणसांच्या ताब्यांत देण्याचा उपक्रम केला. दक्षिणेंत धारवाडचा किल्ला मजबूत असल्यानें तो कबजांत घेण्याची त्यानें खटपट केली, परंतु तेथील किल्लेदार किल्ला त्याच्या हवालीं करीना, तेव्हां बापू गोखले यानें मध्यस्थी करून किल्ला त्रिंबकजीस देवविला (१८१४).या वर्षी त्रिंबकजीनें पेशव्यास सल्ला देऊन त्याच्याकडून होळकर, शिंदे, भोंसले व पेंढारी यांच्या दरबारीं इंग्रजांविरुद्ध दोस्ती करण्यासाठीं आपले वकील रवाना केले. पुढल्या वर्षी त्रिंबकजीची ब्रिटिश वकीलातीकडे नेमणूक झाली. अशीक डे पेशवे त्याच्या मुठींत आले होते. यावेळीं त्यानें राज्यांतील अव्यवस्था मोडण्यास प्रारंभ केला. तो कडक शिस्तीचा होता. त्याच्या शिक्षा सौम्य तर कधीं अत्यंत कडकहि असत. ठरल्याप्रमाणें इनामदार लोकांनीं चुकारपणा करून वसूल भरणा केला नाहीं, तर तो त्यांना शिक्षा करी.

१८१४ सालीं त्रिंबकजीनें गुजराथेंत सरकारी फौज पाठवून गायकवाडाकडे इजाऱ्यानें असलेला प्रांत ताब्यांत घेतले. कारण, यावेळीं गायकवाडाचा गुजराथ या इजाऱ्यांचा करार संपला होता व नवीन करार करावयाची गायकवाडाची इच्छा होती. त्यासाठीं त्यांचा दिवाण गंगाधरशास्त्री पटवर्धन हा पुण्यास पेशव्यांकडे आला. शास्त्री फार हट्टी, हेकट व इंग्रजांच्या बळावर सर्वांस तुच्छ लेखणारा होता. गायकवाडाकडे सरकारची बाकी १ कोटी निघाली. ती देऊन मग वाटल्यास पुन्हां इजारा देण्यांत येईल असें दरबारांत ठरलें; परंतु गायकवाडानें (शास्त्र्यानें) तें नाकारिलें व प्रकरण चिघळत चाललें. इतक्यांत पंढरपुरास शास्त्र्याचा खून झाला. या खुनाचा आरोप इंग्रजांनीं त्रिंबकजीवर केला; परंतु यास स्पष्ट आधार त्यांनीं दिले नाहींत. अलीकडील ऐतिहासिक शोधावरून हा खून त्रिंबकजीनें केला नाहीं उलट गायकवाडांतील शास्त्र्याच्या विरुद्ध पक्षांतील लोकांनींच केला असें ठरत आहे. त्यावेळीं सिताराम नांवाच्या एका प्रभु माणसाची खटपट शास्त्र्याऐवजीं आपल्याला गायकवाडाची दिवाणगिरी मिळावी अशी होती. त्यासाठीं त्यानें फौज जमवेली होती व याच सुमारास इंग्रजांनीं त्याला कैदेंतहि ठेविलें होतें; यावरून त्याच्या पक्षाकडून हा खून झाला असावा. इंग्रज त्याला दिवाणगिरी देत नव्हते. शिवाय शास्त्र्याचा खून करण्यांत पेशव्यांचा (अर्थात् त्रिंबकजीचा) मुळींच फायदा नव्हता, कारण त्यामुळें गुजराथ हातची जात होती, उलट जिवंत राखण्यांतच फायदा होता असें क. वॉलेस म्हणतो. अर्थात् आपल्या मार्गांतील कांटा काढण्यासाठीं इंग्रजांनीं खुनाचा आरोप त्रिंबकजीवर केला.

त्रिंबकजीनें आपला खुनाशीं कांहीं संबंध नाहीं किंवा आपणांस त्यासंबंधीं कांहीं माहितीहि नाहीं असें स्पष्ट सांगितलें. तथापि इंग्रज रेसिडेंटानें आपल्या फौजेच्या बळावर त्रिंबकजीस आपल्या स्वाधीन करण्याविषयीं बाजीरावाच्या मागें लकडा लावला. पण बाजीराव त्यास इंग्रजांच्या हवालीं करण्यास कांकूं करूं लागला. शेवटीं नाइलाजानें बाजीरावानें त्रिंबकजीस वसंतगड नामक किल्ल्यांत अटकेंत ठेविलें; तरीहि इंग्रजांचें समाधान न होतां त्यांनीं त्रिंबकजीस आपल्याच हवालीं करण्याचा तगादा लाविला तेव्हां गांगरून (आणि अंगीं धैर्य नसल्यानें) बाजीरावानें त्यास इंग्रजांच्या स्वाधीन केलें (२५ सप्टेंबर १८१५).

इंग्रजांनीं त्रिंबकजीस ठाण्याच्या किल्ल्यांत अटकेंत ठेविलें. त्याच्यावर जे पहारेकरी ठेविले होते त्यांस बहुधा, खबर लागू न देण्याच्या उद्देशानेंच, एकहि हिंदी माणूस ठेवला नव्हता. याचा फायदा घेऊन त्रिंबकजीनें सप्टेंबरच्या १२ व्या तारखेस (१८१६) संध्याकाळीं सात व आठ यांच्या दरम्यान तटावरून उडी मारून आपली सुटका करून घेतली. त्रिंबकजी निसटून जाण्याच्या कांहीं दिवस अगोदर त्याची मित्रमंडळी व नोकरचाकर आसमंतांत येऊन त्याची वाट पहात होते. त्रिंबकजीस त्यांचा निरोप कळविण्याचें काम किल्ल्यांतील एका अधिकाऱ्याच्या मोतद्दारानें केलें. त्रिंबकजीस ज्या खोलींत ठेविलें होतें तिच्या खिडकीखालीं आपल्या घोड्याची चाकरी करीत असतां हा मोतद्दार त्रिंबकजीस कळवावयाची माहिती अगदीं बेफिकीरपणानें गात असे. पहारेकऱ्यांस मराठी येत नसल्यामुळें त्यांनां ही लबाडी ओळखतां आली नाहीं. त्रिंबकजीनें ज्या अडचणींतून आपली सुटका करून घेतली ती हकीकत ऐकून लोकांत त्याच्याबद्दल कौतुक व आदर वाढला. यानंतर त्रिंबकजीनें पुन्हां फौज जमवून कधीं नाशिक व संगमनेर यांच्या आसमंतांतील डोंगरांत, कधीं खानदेश बागलाणांत, तर कधीं साताऱ्याकडील महादेव पर्वतांत फिरून इंग्रजांच्या विरुद्ध त्यानें दंगा उसळून दिला. त्याला पकडण्यासाठीं इंग्रजांनीं फार खटपट केली, परंतु पुष्कळ दिवस ती सिद्धीस गेली नाहीं. त्याचा खरा पत्ताच लागेना. तो आपल्या सासुरवाडीस (नाशिक जिल्हा, निफाड तालुका, निफाडहून वायव्येस ५ कोसांवर) अहिरगांवीं गुप्तपणें राहिला होता.

यावेळीं कोरेगांवची लढाई होऊन एल्फिन्स्टननें आपला जाहीरनामा प्रसिद्ध केला होता; त्याप्रमाणें पेशवाईंतील सर्व मराठे सरदार, इनामदार इंग्रजांनां मिळाले होते व रावबाजी एकटे पडले. इंग्रजांनीं तशाहि स्थितींत त्रिंबकजी हा पेशव्यांच्या तर्फे धुमाकूळ घालीत असल्यानें त्याला पकडण्यासाठीं मोठमोठीं बक्षिसें लाविलीं. तेव्हां एका स्त्रीनें व त्रिंबकजीचा नोकर नाना यानें फितूर होऊन, मिग यांस त्रिंबकजीच्या ठिकाणाची माहिती दिली. कॅ. स्वान्स्टन हा एक हजार घोडदळाची पलटण घेऊन अहिरगांवीं आला. यावेळीं त्रिंबकजी तेथें एकटाच होता; फौजफांटा मुळींच नव्हता. गांवची नाकेबंदी करून इंग्रजांनीं पहाटे त्रिंबकजीच्या वाड्यास गराडा दिला. वाडा दोनदां तळघरें बळदांसकट शोधला, परंतु त्रिंबकजी सांपडेना. शेवटीं तिसऱ्यानें पुन्हां शोधला तेव्हां मात्र त्रिंबकजी सांपडला. एका बळदांत एका लोखंडी चोरदाराच्या पलीकडे बुरुजावर जाण्याचा एक जिना होता. तेथली भिंत त्रिंबकजी फोडीत होता. त्याला धरण्यास जात असतां जिन्यावरील एका मराठ्यानें त्यांनां अडथळा केला. जीं जीं माणसें धरण्यास गेलीं तीं या मराठ्यानें आपल्या भाल्यानें ठार केलीं. त्यांची संख्या तीस भरली. शेवटीं स्वान्स्टननें भालाइतावर गोळ्या झाडण्यास हुकूम केला व त्यामुळें मात्र तो मराठा पडला. असा तो शूर भालाईत पुरुष नसून (त्रिंबकजीची) स्त्री आहे हें समजल्यावर स्वान्स्टन यास फार आश्चर्य वाटलें. त्रिंबकजी भिंत फोडीत असतां, त्याच्या अंगावर जाण्याची हिंमत कोणाचीच होईना तेव्हां निराशेनें त्रिंबकजी आपणच होऊन इंग्रजांच्या स्वाधीन झाला. त्यास नंतर बंगालमध्यें एका किल्ल्यांत (चुनार) अखेरपर्यंत कैदेंत ठेविलें. त्याची ९० हजार रुपयांची मालमत्ता इंग्रजांनीं जप्त करून ती स्वान्स्टन

यास बक्षीस दिली (जून १८१८). [डफ; नाशिक ग्याझेटियर; राजवाडे खंड ४.]

**त्रिंबकराव मामा पेठे**—बाळाजी विश्वनाथ पेशवे यांची मुलगी अनुबाई ही इचलकरंजीकर व्यंकटराव नारायण यास दिली होती; त्यांची मुलगी वेणुताई ही त्र्यंबकराव मामाची बायको. या नात्यावरून पेशवे घराण्यांत त्र्यंबकराव मामा असें टोपण नांव यास मिळालें व तेंच प्रख्यात झालें; शिवाय मामांची बहीण चिमाजीआप्पा यांची पहिली बायको (रखमाबाई) होती, त्यामुळें यांचें पेशव्यांशीं तिकडूनहि हें नातें होतें. मामांचे वडील विसाजी कृष्ण पेठे हे नागपूरकराच्या पदरीं होते, पुढें नागपूरकरानें त्रिंबकराव विश्वनाथ यास आपला वकील म्हणून शाहूच्या दरबारीं ठेविलें होतें. नंतर पेशव्यांनीं त्यानां आपल्याकडे घेतलें.

शाहूच्या मृत्यूनंतर मामा हा पेशव्यांच्या कारभारांत त्यांचा मुख्य हस्तक होता. बाळाजी विश्वनाथाच्या नंतर बाजीरावास पेशवाई मिळवून देण्याच्या कामीं ज्यांनीं खटपटी केल्या त्यांत विसाजीपंत हेहि होते. पुरंदरे हे पेशव्यांचे पुण्याचे कारभारी असत. नानासाहेबांच्या वेळीं पुरंदरे (महादोबा) हा रुसला तेव्हां त्याच्या जागीं पेशव्यानें मामाला नेमिलें (१७५१ फेब्रु०); परंतु पुढें महादोबाची समजूत झाल्यावर मामाला साताऱ्यास ताराबाईच्या बंदोबस्तास ठेविलें. मध्यंतरीं ताराबाईचा व पेशव्यांचा समेट झाला. तरी पण ती आपला हेका (कारभार पहाण्याचा) सोडीना; ती पुण्यास आली असतां (आक्टोबर) मामा तिच्याबरोबर आला होता, परंतु बाईची समजूत पटली नाहीं म्हणून पुन्हां तिच्यावर देखरेख ठेवण्यास मामाला साताऱ्यास पाठविलें. दमाजी गायकवाडाचा साताऱ्यास गेंडेमाळावर पेशव्यांच्या सरदारांनीं जो पराभव केला, त्या सरदारांत मामा हे प्रमुख होते. थोरल्या माधवरावाच्या कारकीर्दींत मामांनीं कर्नाटकावर स्वाऱ्या केल्या होत्या. मामानें या स्वाऱ्यांत (मुख्यतः मोती तलावाच्या) हैदराची खूप खोड मोडली, इतकी कीं पेशवे थेउरास फार आजारी असल्याचें ऐकून मामा परतले तरीहि हैदरानें २६ लक्ष खंडणी व १४ लक्ष स्वारीखर्च व कोल्हार वगैरे पांच प्रांत मामांच्या हवालीं केले. पेशव्यांच्या शेवटच्या दुखण्यांत मामा थेऊरासच होते. नारायणरावांच्या खुनानंतर नदीवर ज्या मंडळींनीं (नाना, बापू, हरिपंत तात्या) नानासाहेबांचा वंश चालविण्याबद्दल गुप्तपणें शपथा घेतल्या त्यांत मामाहि होते. दादासाहेबांच्या कारकीर्दींत बारभाईच्या कारस्थानांत मामा प्रमुख होते. तेच यावेळीं सेनापति होते. दादानें त्याला घेऊन निजामावर स्वारी केली होती. पुढें कर्नाटकांत दादानें मोहीम केली, त्यावेळीं एक एक मंडळी त्याला सोडून पुण्यास आली. पुढें दादाला ही मसलत (बारभाईचें कारस्थान) समजल्यावर दादा परतला. मामाला भोंसल्यावर दादानें पाठविलें होतें. तो तिकडे न जातां दादावर स्वारी करण्याची वाट पहात बसला (१७७४ डिसेंबर).

त्याच्यावर भोंसले, फडके व मामा यांनां कारभाऱ्यांनीं पाठविलें. त्यांची गांठ पंढरपुराजवळ कासेगांव येथें पडली. मामानें घाई व उतावीळ करून दादावर हल्ला केला, त्यांत त्याचा मोड होऊन मामा फार जखमी होऊन पाडाव झाला (२६ मार्च १७७४). त्यावर बऱ्हाणपुराकडे शिंदे होळकरांची मदत घेण्यास दादा जात असतां वाटेंत पाडाव झाल्यावर दुसऱ्याच दिवशीं मामा वारला. आनंदीबाईनें मामाला पकडल्यावर त्याची फार निंदा केली; तेव्हांचें मामाचें सडेतोड उत्तर प्रसिद्ध आहे. मामाचा मुलगा विश्वासराव हा पुढें पेठ्यांच्या पथकाचा मुख्य झाला. त्याचा पुत्र अमृतराव हा पेशव्यांच्या दरबारीं कांहीं दिवस त्यांचा मुतालिक होता. त्याचा मुलगा त्रिंबकराव हा खर्ड्यांच्या लढाईत हजर होता. पेठ्यांना मामांच्या कारकीर्दींतच ताराबाईनें व पेशव्यानें सरंजामासाठीं नेमणुका व जहागिरी दिल्या होत्या (१७४७, १७५७ इ.). मामाच्या वेळीं एकंदर सरंजाम मोठा होता. तो शेवटीं दुसऱ्या त्र्यंबकरावाच्या वेळीं १ लक्ष १५ हजारांपर्यंत राहिला. दोनशें स्वार बाळगण्याचा या त्र्यंबकरावाचा करार असे व त्याबद्दल सालिना ६० हजार रु. मिळत; ५० हजारांचें खासगत इनाम असे. रावबाजीनें पूर्वीचें वैर आठवून पेठ्यांचा सरंजाम सर्व जप्त केला (१८०३). इंग्रजी झाल्यावर इंग्रजांनींहि सरंजाम जप्तच करून दुसऱ्या त्रिंबकरावास फक्त सालिना दोन हजारांचें पोलि. पेन्शन करून दिलें. आपला सरंजाम परत मिळविण्याबद्दल या त्रिंबकरावानें केलेली खटपट इंग्रजांनीं चालू दिली नाहीं. पेशवाईंत पेठ्याकडे पुढील मान असत. छत्रपतीकडून जी पेशवाईचीं वस्त्रें आणावयाचीं तीं यांनीं आणावीं. छत्रपती पुण्यास आल्यास त्यांची बरदास्त ठेवावी; दसऱ्याचीं ३०० रुपयांचीं मानाचीं वस्त्रें पेशव्यांकडून यास मिळत. सरकारांतून हत्ती, पालखीचा मान असे. पुणें येथें मामाचा वाडा कसबा पेठेंत तांबटाच्या हौदाजवळ होता. तो ७-८ वर्षांखालीं पडला. त्यांचा वंश सातारा जिल्ह्यांतील चिंघोली या त्यांच्या इनामगांवीं व नाशिक येथें असे. [ग्रांट डफ—कैफियती; भारतवर्ष शकावली; पेशव्यांची बखर; काव्य. इ. सं. शकावली; धाकटे राजारामचरित्र; राजवाडे खंड २, ६; पत्रें यादी.]

**त्रिवेणी**—बंगाल. हुगळी जिल्हा व पोटविभागांतील एक खेडें. हल्लीं बन्सबेरिया म्युनिसिपल कमिटींत याचा समावेश होतो व बंगाल प्रांतिक रेल्वेच्या फांट्यांशीं मगराजवळ तें जोडलेलें आहे. यास त्रिवेणी नांव पडण्याचें कारण येथें गंगा, यमुना व सरस्वती या तीन नद्यांचा संगम झालेला आहे. सरस्वतीच्या उत्तरेस त्रिवेणी घाट आहे. ओरिसाच्या गजपती राजांपैकीं शेवटचा राजा मुकुंददेव यानें तो घाट बांधला असें म्हणतात. घाटाच्या दक्षिणेस त्रिवेणी गांव आहे. हें क्षेत्र असें मानतात. 'कलकत्ता रिव्ह्यू' त रेव्हरेंड लॉंग हा म्हणतो कीं, हिंदुस्थानांत ४ विद्यापीठें होतीं. पैकीं त्रिवेणी एक होतें. बाकीचीं तीन नवद्वीप,

शांतिपुर आणि गुलीपार. त्रिवेणीस पूर्वी ३० संस्कृत शाळा होत्या आणि तेथील व्यापारहि नांवाजलेला होता. त्रिवेणीच्या दक्षिणेस एक मोठी मशीद आहे. तींत जाफरखान याचें थडगें आहे. त्रिवेणीस मुख्य हिंदु मेळे खालीं लिहिल्या-प्रमाणें भरतात. मकरसंक्रांतीचा मेळा, विषुवसंक्रांतीचा मेळा, वारुणीमेळा, दशहरामेळा व कार्तिकपूजामेळा.

**त्रिमूर्ति**—त्रिमूर्ति तत्त्व हें हिंदु अगर ईजिप्शियन अगर इतर कांहीं धर्मांत आढळत असलें तरी ख्रिस्ती धर्मांत त्याला विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे. हिंदु धर्मांत ही त्रिमूर्तिकल्पना प्रथमतः मैत्रायणोपनिषदांतील दोन मंत्रांत आढळून येते. एका मंत्रांत निर्गुण निराकार अशा ब्रह्माच्या ब्रह्मा, विष्णु, महेश या तीन सगुण मूर्ती होत असें म्हटलें आहे. व दुसऱ्या मंत्रांत प्रकृति ही सत्त्व, रज व तम या तीन गुणांनीं युक्त असून सत्व म्हणजे विष्णु, रज म्हणजे ब्रह्मा व तम म्हणजे शिव होय अशी कल्पना आढळते. या उपनि-षदांतील प्राचीन तत्त्वाला पुढें सांप्रदायिक स्वरूप येत जाऊन, ज्याचा जो देव असेल त्याने त्यास मुख्य परमेश्वर असें समजून त्याचे, ब्रह्मा, विष्णु, महेश हे व्यक्त अंश होत असें प्रतिपादन करण्यास सुरवात झाली. उदाहरणार्थ वैष्णव लोक विष्णु हा ब्रह्म असून त्याचे ब्रह्मा,विष्णु महेश असे तीन अवतार मानितात,तर शैव लोक शिव ब्रह्माचे वरीलप्रमाणें तीन भाग पाडतात. विधार्कपंथी, गाणपत्य, शाक्त या पंथांतहि त्यांच्या त्यांच्या मुख्य देवतेला ब्रह्म समजून त्यांचे वरील-प्रकारें तीन भेद झालेले आहेत असें मानण्यांत येतें. अशा प्रमाणें ही त्रिमूर्तीची कल्पना केवळ धर्मग्रंथांतच आढळून येते असें नाहीं तर शिल्पामध्येंहि तिला स्थान मिळालें आहे. ‘ एलेफंटा केव्ह ’ या लेण्यामध्यें त्रिमूर्तिची मूर्ति आढळून येते. तथापि, त्रिमूर्तितत्त्वाला हिंदु धर्मांत विशेष प्राधान्य दिलेलें दिसत नाहीं.

ईजिप्शियन धर्मग्रंथांत ऑसिरीस, इसिस व होरस या त्रिमूर्तीची कल्पना आढळून येते. निओप्लेटॉनिक पंथामध्यें ही कल्पना तत्त्वज्ञानाच्या रूपांत आढळून येते. पण ख्रिश्चन धर्मामध्यें मात्र या तत्त्वाला प्राधान्य आलेलें आहे; व याचें कारण ख्रिस्ती धर्मांतील अवताराची कल्पना हें होय असें ख्रिस्ती धर्मपंडित म्हणतात. इतर धर्मांमध्यें जरी अवतार-कल्पना आढळते तरी त्या कल्पनेला धर्मतत्त्वांत थारा मिळालेला नाहीं. उलटपक्षीं परमेश्वर हा ख्रिस्ताच्या रूपानें या जगतीतलावर प्रत्यक्ष अवतीर्ण झाला आहे व चर्चमध्यें अद्यापिहि त्याचा साक्षात्कार होणें शक्य आहे हें ख्रिस्ती धर्माचें आद्य तत्त्व आहे असें ख्रिस्ती धर्मपंडितांचें म्हणणें आहे. जुन्या करारामध्यें या तत्त्वाची कल्पना आढळून येत नाहीं व नव्या करारांतहि या कल्पनेला मूर्त स्वरूप आलेलें दिसत नाहीं. पण पुढें मात्र चर्चच्या इतिहासांत या त्रिमूर्ति-तत्त्वाची कल्पना प्रामुख्यानें उदयास येत चालली. तत्पूर्वी परमेश्वरच बाप, मुलगा व आत्मा हीं तीन रूपें धारण करतो अशी कल्पना होती. पण पुढें तत्त्ववेत्त्यांनीं या कल्पनेचें तात्त्विक विवेचन करण्यास सुरवात केली. त्यांनीं असें प्रति-पादन केलें कीं परमेश्वर प्रेमस्वरूपी असून, त्याच्यामध्यें तीन वस्तू राहतात. या तिन्ही वस्तु स्वतंत्र असून त्या प्रत्येक वस्तूमध्यें परमात्म —तत्त्व सारख्या अंशांनीं भरलेलें आहे. या तीन वस्तूंपैकीं एक वस्तु जगाची निर्मात्री आहे. तिला ‘ बाप ’ असें नांव देण्यांत आलेलें आहे. दुसरी वस्तू जगाची उद्धारक आहे. तिला ‘ मुलगा ’ असें नांव दिलें आहे. तिसरी वस्तु आत्मा ( पवित्रभूत ) ही होय. हिचें मुख्य कार्य ‘ पवित्रीकरण ’ होय. आत्म्याला परमात्म-स्वरूपी बनविणें हें तिसऱ्या वस्तूचें स्वरूप आहे.

अशा रीतीनें त्रिमूर्ति-तत्त्वाचें तात्त्विक दृष्टीनें विवरण करण्यांत आलें असलें तरी त्यानें पुष्कळ ख्रिस्ती पंडितांचें अद्यापिहि समाधान झालेलें नाहीं. अशी एक शंका उपस्थित होण्याचा संभव आहे कीं, जर ख्रिस्ती धर्म एकेश्वरी आहे तर त्रिमूर्ति-तत्त्वाला मान्यता दिल्यास त्याला अनेकेश्वरी धर्माचें स्वरूप प्राप्त होईल. यावर ख्रिस्ती धर्मज्ञांनीं असा जाब दिला आहे कीं या त्रिमूर्तितत्त्वाप्रमाणें एका परमेश्व-रामध्यें या तीन स्वतंत्र वस्तू आहेत तरी एकच परमात्म-तत्त्व या तिन्हींमध्यें सारख्या अंशांनीं व्याप्त असल्यामुळें त्या तिन्ही वस्तूंचें त्याच्या ठायीं ऐक्यच आहे; व अशा दृष्टीनें पाहिल्यास ख्रिस्ती धर्म एकेश्वरीच आहे असें सिद्ध होतें.

[ संदर्भ ग्रंथः—साटरलंड्स-दि इंपॉर्टन्स ऑफ दि डॉक्ट्रिन ऑफ होली ट्रिनिटी; इलिंगवर्थ-डॉक्ट्रिन ऑफ ट्रिनिटी; अॅडॅम्स ब्राउन-दि ट्रिनिटी अँड मॉडर्न थॉट; फार्कुव्हर-रिलिजस लिटरेचर ऑफ इंडिया ( १९२० ). ]

**त्रिवेंद्रम्**—मूळ शब्द तिरु-अनंतपुरं; अनंताचें पवित्र शहर. मद्रास. त्रावणकोरची राजधानी क्षेत्रफळ ९ चौ. मै. लो.सं. (१९०१) ५७८९०. त्रिवेंद्रम् हें त्रावणकोर संस्थानांत सर्वांत मोठें शहर असून राजाची राजधानी व इंग्रज रेसिडेंटचें राहाण्याचें स्थान होय. येथून समुद्र अवघा २ मैल आहे. या ठिकाणीं एक किल्ला असून त्याच्या जवळच्या गांवांत लोकवस्ती फार दाट आहे व मध्यभागीं महाराजांचा राजवाडा आहे. अनंत पद्मनाभस्वामींचें देवालय किल्ल्याच्या आंत आहे. यामुळें त्रिवेंद्रम् क्षेत्राचें स्थान बनलेलें असून हिंदुस्थानच्या दरएक भागांतून येथें यात्रेकरू येत असतात. देवलयाचें उत्पन्न पाऊण लाखाचें असून एकंदर व्यवस्था विशिष्ट पद्धतीनें लागलेली आहे. किल्ल्यापासून एक मैलावर दिवाणसाहेबांची कचेरी व वरिष्ठ कोर्टें असून कचेरीच्या उत्तरेस मुलांच्या पाठ-शाळा आहेत. लगतच व्हिक्टोरिया जुबिली हॉल, औद्योगिक शाळा, सार्वजनिक वाचनालय, ख्रिस्ती देऊळ व लष्करी छावणी हीं आहेत. उद्योग आणि व्यापारासंबंधानें त्रिवेंद्रमशिवाय संस्थानांत दुसरीं चांगलीं शहरें आहेत. येथून मोठमोठ्या शहरांना पक्के रस्ते नेऊन दळणवळण वाढविलें आहे.

**त्रिशंकु**—इक्ष्वाकुकुलोत्पन्न अरुणराजाचा पौत्र, व निबंधन राजाचा ज्येष्ठ पुत्र. मूळचें याचें नांव सत्यव्रत. हा दुर्मार्गवर्ती असून विवाहित ब्राह्मण स्त्रिया हरण करणारा होता. उपदेशाचा परिणाम होत नाहीं असें पाहून निबंधनानें त्याला राज्याबाहेर घालवून दिलें व आपण सचिवाच्या हातीं राज्य सोपवून अरण्यांत तप करूं लागला. अयोध्येंत राजा नसल्यामुळें प्रजा अधर्मानें वागूं लागली व नऊ वर्षे अवर्षण पडून मनुष्यास अन्न मिळेनासें झालें. त्यांत विश्वामित्राची स्त्री व तीन पुत्र हे सांपडले होते पण त्यांस त्रिशंकूनें मोठया प्रेमानें कांहीं मांस प्रत्यहीं आणून देऊन वांचविलें. हा क्रम चालू असतां त्यांत एकदां वसिष्ठ ऋषीची गाय वधिली गेली. त्यानें त्यास शाप दिला कीं ब्राह्मण स्त्रियांचा अपहार, पित्याचा क्रोध आणि धेनूचा वध या तीन शंकूस्तव (पातकांस्तव) सत्यव्रत हा त्रिशंकु नांव पावो. तेव्हांपासून हा बुद्धिभ्रंश होऊन अरण्यांत पिशाचाप्रमाणें फिरूं लागला. या अनवस्थेमुळें पुन्हां परत येऊन निबंधन राजानें सत्यव्रतास अयोध्येस आणविलें, व सदुपदेश करून राज्यावर बसविलें. त्रिशंकूनें पुष्कळ काळपर्यंत चांगल्या नीतीनें राज्य केलें व पुढें देहासह स्वर्गाला जाऊन तेथील दिव्य भोग भोगावे या हेतूनें एक यज्ञ करावा हा हेतु त्यानें वसिष्ठास सांगितला; पण असें होणें शक्य नाहीं म्हणून वसिष्ठानें सांगितल्यावर हा म्हणाला, ‘ पूर्वी मी आपली धेनू मारली या द्वेषानें आपण असें बोलतां तर मी दुसरा उपाध्याय पाहून स्वर्गास जातों कीं नाहीं पहा.’ वसिष्ठानें ‘ तूं चांडाळ हो ’ असा शाप देतांच हा काळा व कुरूप बनला. तेव्हां “ आपण माझा या अवस्थेंतून उद्धार करा ” अशी त्यानें विश्वामित्राची प्रार्थना केली. त्यानें तूं कांहीं काळजी करूं नकोस म्हणून सांगून तीन दिवसांतच यज्ञाची तयारी केली. परंतु चांडाळ यजमान व क्षत्रिय उपाध्याय अशी वसिष्ठानें निंदा केल्यावरून बहुतेक ब्राह्मणांनीं यज्ञाला येण्याचें नाकारलें, व हविर्भाग घेण्यास देव येईनात. असें पाहून विश्वामित्रानें त्रिशंकूस असें सांगितलें कीं, आतां कांहीं स्वार्जित पुण्य असेल तर स्वर्गी जाशील ’ इतकें म्हणतांच त्रिशंकु पक्ष्याप्रमाणें उडून स्वर्गी जाऊं लागला. त्यावरून इंद्रास क्रोध येऊन त्रिशंकु त्याजवळ आतांच, त्यानें त्यास सांगितलें कीं गुरुशापानें दग्ध झालेला जो तूं त्या तुला मर्त्यदेहानें स्वर्गाचा अधिकार नाहीं, यास्तव खालीं पतन पाव. तेव्हां त्रिशंकु खालीं पडूं लागला व ओरडूं लागला. तें ओरडणें ऐकून विश्वामित्रानें “ तिष्ठ तिष्ठ ” असें म्हटलें, तेणेंकरून हा तेथेंच अंतरिक्षांत स्थिर झाला. नंतर विश्वामित्रानें प्रतिसृष्टी व स्वर्ग निर्माण करून इष्टि आरंभिली व कांहीं पदार्थ उत्पन्नहि केले. त्यावरून इंद्रानें त्याची समजूत करून मर्त्यदेहाचा त्रिशंकुकडून त्याग करवून त्यास दिव्यदेही केल्यावर स्वर्गास नेलें. [ वाल्मिकी रामायण, बालकांड. स. ५८–६०; देवी. भाग. ७ स्कंदपुराण; १०–१४. ]

**त्रिषष्टिशलाकापुरुषचरित्र**—हेमचंद्रकृत जैन ग्रंथ. यांत पुढें दिलेल्या ६३ पुरुषांचीं चरित्रें आहेत. २४ तीर्थंकर, १२ चक्रवर्ती, ९ नारायण, ९ प्रतिनारायण आणि ९ बलिभद्र मिळून ६३ शलाकापुरुष होतात. जैन कालगणने प्रमाणें चतुर्थकालाच्या आरंभापासून अखेरपर्यंत हे ६३ शलाका पुरुष होऊन गेले.

चो वी स ती र्थं क रां चीं नां वें.–(१) ऋषभ, (२) अजित, (३) शंभव, (४) अभिनंदन, (५) सुमति, (६) पद्मप्रभ, (७) सुपार्श्व, (८) चंद्रप्रभ, (९) पुष्पदंत, (१०) शीतल, (११) श्रेयान्, (१२) वासुपूज्य, (१३) विमल, (१४) अनंत, (१५) धर्म, (१६) शांति, (१७) कुंथु, (१८) अर, (१९) मल्लि, (२०) मुनिसुव्रत, (२१) नमि, (२२) नेमि, (२३) पार्श्व, (२४) वर्धमान ( महावीर ).

बा रा च क्र व र्तीं चीं नां वें.—(१) भरत, (२) सगर, (३) मघवा, (४) सनत्कुमार, (५) शांतिनाथ, (६) कुंथुनाथ, (७) अरनाथ, (८) सुभौम, (९) पद्मनाथ, (१०) हरिषेण, (११) जयसेन, (१२) ब्रह्मदत्त.

न उ ना रा य णां चीं नां वें.—(१) त्रिपुष्ट, (२) द्विपुष्ट, (३) स्वयंभु, (४) पुरुषोत्तम, (५) नरसिंह, (६) पुंडरीक, (७) दत्तदेव, (८) लक्ष्मण, (९) कृष्ण.

न ऊ प्र ति ना रा य णां चीं नां वें.—(१) अश्वग्रीव, (२) तारक, (३) मेरक, (४) शंभु, (५) मधुकाटिक ( मधुकैटभ ), (६) प्रल्हाद, (७) बलिसेन, (८) रावण, (९) जरासंध.

न ऊ ब लि भ द्रां चीं नां वें.—(१) विजय, (२) अचल, (३) धर्मप्रभ, (४) सुप्रभ, (५) सुदर्शन, (६) नंदिसेन, (७) नंदिमित्र, (८) रामचंद्र, (९) पद्म ( बलराम ).

**त्र्यंबकराज**—हा एक ब्राह्मण नामांकित वैद्य होऊन गेला. हा विद्वान व पद्महस्ती असल्यामुळें यास लोक धन्वंतरी असें म्हणत. याच्या हातून शेंकडों लोकांचे असाध्य रोग बरे झाले. यानें अनेक प्रकारचे नवे नवे औषधि कल्प अनुभवून योजून त्यांवर त्र्यंबकी नांवाचा एक ग्रंथ रचिला व तो आपल्या स्त्रीस पढविला. याचें कारण हेंच कीं, यास पुत्रसंतति नव्हती. त्र्यंबकी ग्रंथ जसा त्यानें स्त्रीस पढविला त्याचप्रमाणें रसायनें व त्यांच्या सिद्ध करण्याच्या कृतीहि शिकविल्या. असें सांगतात कीं त्र्यंबकराज मरण पावल्यावर त्याच्या स्त्रीनें वैद्यक्रिया बहुत दिवसपर्यंत उत्कृष्ट रीतीनें केली व पैसादि कोणाचा घेतला नाहीं. त्र्यंबकराज कोल्हापुरास राहात : असे. त्यास होऊन गेल्यास २५० वर्षे झालीं असें म्हणतात. ही जर गोष्ट खरी असेल तर हा शालिवाहन शके १५५० त होता असें म्हणण्यास शंका रहात नाहीं.

त्र्यंबकी ( वैद्यकीवरील ग्रंथ ) करणारे त्र्यंबक व बालबोध करणारे त्र्यंबक यांचें वर्णन बहुतेक जुळतें; सबब हे एक

असावेत असें वाटतें. तसें असल्यास मूळस्थान कोल्हापूर बालबोधकार त्र्यंबक आपले गुरु कमलाकर देतात. यांचा काल १४९० च्या पूर्वीचा. शिवकल्याणाचे पणजे कमलाकर होते त्यांचाहि तोच काल येतो. परंतु त्या दोन्ही व्यक्ती एकच कीं नाहीं हें निश्चित नाहीं. ग्रंथ—त्र्यंबकी, बालबोध (१४९०). [ अर्वाचीन कोश व सं. क. का. सू. ]

**त्र्यंबकेश्वर**—मुंबई, नाशिक जिल्हा. त्र्यंबकेश्वर हें सुमारें ३.४ हजार वस्तीचें गांव असून प्रसिद्ध यात्रेचें ठिकाण आहे. हें नाशिकच्या नैर्ऋत्येस २० मैलांवर सह्याद्रीच्या एका फांट्यावर वसलेलें आहे. येथें नाशिकपासून सडक आहे. गांवांतील रस्ते बहुतेक फरसबंदी आहेत. गांव खळग्यांत असल्यामुळें हवा निरोगी नाहीं. येथें आठ तळीं असून त्यांपैकीं दोहोंतील पाण्याचा उपयोग पिण्याच्या कामीं करतात. यांपैकीं गंगातलाव फार मोठा असून यांतून वाहून गेलेल्या पाण्यानेंच गोदावरीचा उगम होतो. हा प्रवाह एका देवळाजवळून जाऊन कुशावर्त कुंडांत जातो. हें कुंड फार पवित्र मानतात. पावसाळ्यामध्यें व त्यानंतर कांहीं दिवस त्र्यंबकेश्वराच्या कळ्यामधून एका कोनाड्यांत असलेल्या एका देवीच्या मूर्तीच्या खालच्या बाजूस असलेल्या गायमुखांतून पाणी पडतें. हा गोदावरीचा मूळ उगम समजतात. हा प्रवाह मध्येंच टेंकडींत गुप्त होऊन नंतर कुशावर्त कुंडांत पडतो. येथें १८६६ त म्युनिसिपालिटी स्थापन झाली. येथें त्र्यंबकेश्वराच्या देवळाजवळ कार्तिक शु॥ १५ (त्रिपुरी पौर्णिमा) व माघ व॥ १४ (महाशिवरात्रि) या दिवशीं व निवृत्तिनाथाची पुण्यतिथि पौष व॥११ या दिवशीं अशा तीन वार्षिक यात्रा भरतात. हें एक ज्योतिर्लिंग आहे.

त्र्यंबकेश्वराचें देऊळ बाळाजी बाजीराव पेशव्यांनीं पूर्वीच्या जुन्या लहान देवळाच्या जागीं बांधलें. याच्यावर पुष्कळ नक्षीकाम आहे. या देवळास कांहीं जमीन इनाम असून १२ हजार रुपयांचें वर्षासन आहे. विंचुरकरांनीं एक रथ दिला आहे. या देवळाची व्यवस्था जोगळेकर नांवाच्या ब्राह्मण घराण्याकडे आहे. देवाला तीन वेळां नैवेद्य होतो व दर सोमवारीं पालखी निघते. सिंहस्थामध्यें गोदावरीच्या उगमाजवळ फार मोठी जत्रा भरते. यात्रेकरू प्रथम कुशावर्तांत स्नान करून त्र्यंबकेश्वराचें दर्शन घेतो व श्राद्ध करावयाचें असल्यास करून निरनिराळीं स्थळें पहावयास निघतो. प्रथम एक ७०० पायऱ्यांची चढण चढून गेल्यावर एक ओटा लागतो. या ओट्याच्या पाठीमागच्या कड्यांतून एका गायमुखांतून पाणी पडत असतें; व तें एका कुंडांत जमा होतें. जवळच एक देवीचें देऊळ आहे. पश्चिमेकडे गोरखनाथाच्या गुहेकडे रस्ता जातो. येथून फार अप्रतिम देखावा दिसतो. त्र्यंबकेश्वर व अंजनेरी यांच्या दरम्यान सपाटीवर एक मठ व प्रयागतीर्थ नांवाचें कुंड आहे. येथें निर्वाणि गोसावी रहातात.

येथील किल्ला समुद्रसपाटीपासून ४२४८ फूट उंच असून १८१८ सालीं हा आजिंक्य म्हणून वर्णन केलेला आहे. हा डोंगर १० मैल घेराचा असून वरच्या माथ्याचा घेर ४ मैल आहे. समोंवतीं सर्व बाजूंनीं २००।४०० फूट उंचीचा उभा कडा असून दोन दरवाज्यांशिवाय कोठेंहि रस्ता नाहीं. मुख्य दरवाजा दक्षिणेस असून त्यांतून शिबंदीस धान्य वगैरेंचा पुरवठा होत असे. उत्तरेकडच्या बाजूस फक्त एक दरवाजा असून त्याला एक मनुष्यास एक वेळीं जातां येईल इतक्या दगडांत खोदलेल्या उभ्या पायऱ्यांचा रस्ता आहे. माथ्यावर एक इमारत असून तोंडावर दोन दरवाजे आहेत. यांतून पुढें गेल्यावर वेस लागते. उत्तरेकडची बाजू दक्षिण बाजूइतकी उंच नाहीं तरी या बाजूला कडा फारच उभा आहे. या दरवाज्यांखेरीज कांहीं बुरूज वगैरे बांधलेले आहेत. येथील तळघरें व राहण्याच्या जागा वगैरे सर्व खडकांत खोदलेल्या आहेत. कड्याच्या पायथ्याशीं उत्तरेच्या बाजूला एका खेड्याचे अवशेष आहेत.

नाशिक व त्र्यंबक हीं देवगिरीचा यादव राजा रामचंद्र (१२७१–१३०८) याच्या भावाच्या ताब्यांत होतीं. मोंगलांच्या अमदानींत याचा पुष्कळ वेळां उल्लेख आढळतो (१६२९, १६३३, १६३५). इ. स. १६३६ मध्यें शहाजीनें त्रिंगलवाडी, हरिश्चंद्रगड वगैरेंबरोबर त्र्यंबक किल्ला खानजमान याच्या हवाली केला. इ. स. १६८२ त औरंगझेबाचा सरदार येथें आला होता. इ. स. १७१६ त शाहूनें मोंगलाकडे या किल्ल्याची मागणी केली परंतु तो इ. स. १७२० मध्यें निझामच्या ताब्यांत जाईपर्यंत मोंगलांकडेच होता. इ. स. १७३० मध्यें तो कोळ्यांनीं घेतला होता. परंतु निझामनें तो पुन्हां परत घेतला. परंतु १७५२सालीं त्याच्यापासून तो एका मराठा सरदारानें घेतला. मराठ्यांच्या आमदानींत हा एक महालाचें ठिकाण असून त्याचें उत्पन्न ८४८२ रुपये होतें. इ. स. १८१८ मध्यें हा ब्रिटिशांनीं वेढा देऊन घेतला. इ. स. १८५७ मध्यें येथें कांहीं भिल्ल व ठाकुरांनीं बंडाळी केली होती.

**त्रेतायुग**—' युग ' पहा.

**त्वक्स्फोट अगर शोफ** (मराठी फोड)—त्वचा भाजल्यामुळें अथवा पोळल्यामुळें अथवा वरेच घर्षण होऊन घट्टे पडण्याच्या ऐवजीं त्वचेचा बारीक पापुद्रा फुगून त्यांत पाण्यासारखी लस जमून जो लहान अगर मोठा फोड येतो त्यास हें नांव आहे. कांहीं दाहक पदार्थ त्वचेस लागले असतां त्वचाप्रकोपनक्रियेस सुरवात होऊन प्रथम लाली येऊन नंतर तिचा वरीलप्रमाणें फोड बनतो. खोल भागांत शरीरामध्यें दाहक्रिया सुरू असतां त्वचेवर मोहरी अथवा स्फोटमाक्षिका इत्यादि औषधें लावून तेथें उलट कृत्रिम दाहक्रिया सुरू केली असतां खालील खोल भागांतील दाहाचें शमन होतें. याचें कारण त्वचेमध्यें ज्या सूक्ष्मरक्तवाहिन्या व केशवाहिन्या आहेत त्या प्रसरण पावून त्यांतून

मोठा रक्तप्रवाह सुरू होतो व तेथें लाली येते. त्याच प्रमाणांत खालील खोल भागांतील रक्तहि कमी होऊन तेथील दाह शमन होतो. याप्रमाणें कृत्रिम रीतीनें उत्पन्न केलेला फोड फोडून त्यांतून लस वाहूं देतात व नंतर थंड मलम लावून तो फोड बरा करतात.

**त्वग्रुक्षतारोग**—या रोगामध्यें त्वचेवर लाली, पुरळ, फोड येऊन नंतर मानसिक औदासिन्य व शेवटीं भ्रमिष्टपणा अगर वेड लागणें हीं लक्षणें प्रमुख असतात.

का र णें.—मका खाल्यापासून हा रोग होतो असा पूर्वी समज असून अनुभवानंतर तो खोटा ठरला. ज्याप्रमाणें हिंवताप डांसामुळें पसरतो त्याप्रमाणें एक प्रकारच्या माशांच्या दंशानें हा रोग पसरतो असें मानण्यांत येत असे, व तेंहि मागाहून खरें नाहीं असें ठरलें. अद्याप नक्की कारण समजलें नाहीं, तथापि हा वाळूमिश्रित जमिनीवर घरें बांधून त्यांत रहाणाऱ्या लोकांत विशेष आढळतो. या मातीमुळें पाण्यांत सिलिका म्हणजे वाळूच्या क्षारांचें प्रमाण फार वाढतें व म्हणून इतर क्षार सांचतात व त्यांशीं युक्त असलेली आसिडें मात्र सुटीं होतात. या कल्पनेस पुष्टि येवढ्यावरून मिळते कीं, समस्थितींतील सोडियम सैट्रेट हा क्षार पोटांत दिल्यामुळें हा रोग पुष्कळ बरा होतो. स्पेन, इटली, फ्रान्स, रुमानिया, हंगेरी, कार्फ्यू, मिसरदेश, दक्षिण अमेरिका, ब्राझिल देश, आर्जेंटिना व वेस्टइंडीज बेटें आणि ग्रेटब्रिटन बेटांतहि हा रोग वेळोवेळीं उत्पन्न होतो. अति कोमल अर्भकें व म्हातारे खेरीज करून सर्व वयाच्या माणसांनां हा रोग होतो. खेडेगांवांत व विशेषतः गरीब लोकांत हा रोग जास्त दिसून येतो. गवंडी, मजूर, कुंभार, फकीर, फेरीवाले, भणंग, भिकारी अशा लोकांत वसंत ऋतूंत म्हणजे मार्चपासून मेपर्यंत बहुधा रोगास प्रारंभ होतो. पण मिसर देशांत मात्र आरंभ जानेवारी किंवा फेब्रुवारी महिन्यांत होतो.

ल क्ष णें.—प्रथम अशक्तपणा, डोकें दुखणें, झोंप न येणें, ग्लानि, कोठेंतरी कळा सुरू होणें, पायांत गोळे येणें, चक्कर, घेरी, मोंवळ व अपचन हीं लक्षणें सुरू होतात. नंतर तोंड, छाती, दंड, हात, कोंपरें, पावलें, पाय, मांड्या, गुडघे या नेहमीं उघडे असणाऱ्या व ऊन लागणाऱ्या अवयवांवर उन्हानें अंग करपावें त्याप्रमाणें लाली येण्यास प्रारंभ होतो; व यावरून यास शुद्ध त्वग्रोगच आहे असें मानीत असत. या अवयवांच्या बाहेरील बाजूसच लाली विशेष असते. या लालीबरोबर कंडू व आगहि उत्पन्न होते; व नंतर त्यावर ओरखडे, अंगावर रक्त फुटल्याप्रमाणें दिसणें व फोड दिसतात. पंधरा दिवसांनीं लाली कमी होते व नंतर करड्या अगर पिंगट रंगाचा कोंडा निघून जाऊन खालीं रेघा असलेली व सुरकुत्या असलेली जाड त्वचा रहाते. दरवर्षी हा प्रकार पुन्हां उद्भवल्यास व असा क्रम कांहीं दिवस चालल्यामुळें त्वचा सुरकुतलेली, कोरडी व निस्तेज दिसते. अपचनाचे विकार बळावत जातात; व पोटशूळ, वात धरणें, तहान हीं लक्षणें सुरू होतात. जीभ ठिकठिकाणीं सोलल्याप्रमाणें होते. पुढें अतिसाराचें दुखणेंहि रोग्यास जडतें. पृष्ठवंशरज्जूमध्यें बिघाड झाल्यामुळें पाठींत वेदना, पाठीच्या व कमरेच्या मणक्यावर धक्का सहन न होण्यासारखें दुःख, गुडघ्यावर लहान आघात केल्यानेंहि तो बेसुमार हलणें ( जान्वाघात क्षेप ), चालतेवेळीं कंप, अशक्तपणा, पायांत व सांध्यांत ताठपणा हीं लक्षणें होतात. रोगाच्या अखेरीस सर्वांगास अर्धांगवायूप्रमाणें लुलेपणा, जान्वाघात झाल्यानें मुळींच हालचाल नसणें, लघवी व मलोत्सर्जन या क्रियांवर मुळींच ताबा नसणें हीं लक्षणें होतात. आरंभीं असलेलें मानसिक औदासिन्य वाढून त्याचें गुंगी, झांपड, चित्तभ्रम, विस्मरण, निद्रानाश, चैन न पडल्यामुळें एकसारखी उलघाल, चिरडखोरपणा, वेड वगैरे रूपांतर होत जातें. तीन चार वर्षेपर्यंत या लक्षणामध्यें चढउतार होऊन शेवटीं रोगी कायमचा वेडा, भ्रमिष्ट व उदास होतो. निरनिराळ्या देशांतील वेड्यांच्या आतुरालयांत तपास केल्यावर असें आढळलें कीं, त्यांपैकीं पुष्कळ जणांनां अगोदर हा रोग झाला होता. या वेड्यांनां दरवर्षी अंगावर त्या ठराविक ऋतूमध्यें त्यांच्या खाण्यांत मका हा पदार्थ वर्ज्य करूनहि पुन्हां लाली अंगावर उठते. हे रोगी मृत झाल्यावर त्यांचा पृष्ठवंशमज्जारज्जु, मान व छातींतील ठिकाणें विकृत झाल्याचें आढळून येतें. मेंदूमध्यें क्षीणता आल्यामुळें तो लहान झालेला आढळतो. शरीरांतील बहुतेक इंद्रियांवर आणि त्वचेवर विशिष्ट प्रकाराचा रंग आलेला दिसून हृदय, यकृत, मूत्रपिंड आणि प्लीहा यांच्या ठायीं वसावृद्धि अगर तंतुरचनावृद्धि झालेली आढळते. यावरून रोगलक्षणें होतात व त्याचें कारण उघड होतें.

रो ग नि दा न.—ज्या देशांत हा रोग होतो तेथें तो ओळखण्यास अडचण पडत नाहीं; परंतु या लक्षणासमान जे इतर वातरोग ( पृष्ठवंशरज्जुधाराक्षीणता, ) वगैरे आहेत ते वेगळे ओळखतां आले पाहिजेत.

सा ध्या सा ध्य वि चा र.—हा रोग असाध्य अगर कष्टसाध्य आहे; तथापि लवकर इलाज केलेले रोगी सुधारल्याचीं व अगदीं बरे झाल्याचींहि उदाहरणें आहेत.

उ प चा र.—मका खाण्यानें हा रोग होतो असा समज असल्यामुळें तो पदार्थ खाणें अगदीं वर्ज करावें, असा आजपर्यंत प्रघात होता. तथापि तें कारण नाहीं असें सिद्ध झाल्यामुळें तो पदार्थ वाटल्यास वर्जावा; शिवाय उपचार म्हणजे उत्तम व पुष्कळ हवा, पाणी, उजेड, पैाष्टिक अन्न, स्वच्छता, वगैरे साधनांनीं पचनक्रिया, मलशुद्धि, या क्रिया सुस्थितींत ठेवणें येवढेच होत. यशिवाय औषधोपचारासाठीं सर्वसामान्य जीं ठरीव पौष्टिक औषधें आहेत तींच या रोगांत दिल्यानें गुण वाटतो. यावर स्वतंत्र म्हणून औषध नाहीं. तथापि एटाक्सील हें औषध अर्धा ग्रेन आठवड्यांतून एकदां द्यावें. तसेंच टोचून घालण्याची लसहि निघाली आहे. दोन्हींहि औषधें गुणकारी आहेत.

**त्वग्रोग** ( स्किन डिसीझेस )—शरीरांतील इंद्रियें व रचना या ठिकाणीं ज्याप्रमाणें नाना रोग उत्पन्न होतात तसेच ते त्वचा या रचनेमध्येंहि होतात या रोगांपैकीं कांहीं मुख्यांचें स्वतंत्र वर्णन दुसरीकडे आलें आहे. शरीराची इतर सर्व ठिकाणची रचना, संधायक रचनेमध्यें नाना प्रकारच्या जीवनपेशींच्या योगानें बनली आहे. तशीच स्थिति त्वचेचीहि आहे. मात्र फरक एवढाच कीं, त्यापैकीं बाह्य त्वचेंतील पेशी एकमेकांस चिकटून पसरून त्याचा विस्तार होत असतो. इतर रचनेप्रमाणें तो विस्तार त्वचेची जाडी अगर खोली वाढविण्यांत खर्च होत नाहीं. म्हणून त्वचेचे रोग आंत फारसे खोल न शिरतां त्यांची भोंवतालीं पसरण्याची प्रवृत्ति असते व बहुतेक त्वचेच्या रोगांचा आकारहि बहुधा वर्तुळाकार असतो. हे रोग परोपजीवी जंतूमुळें ( गजकर्ण वगैरे ) उद्भवले असतील तर हा वर्तुलाकार विशेष लक्षांत येण्यासारखा व नियमित असतो. दुसरें हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, एकंदर त्वचेच्या क्षेत्रफळाचा विचार केला असतां व त्वचा ही नेहमीं उघडी असल्यामुळें कोणतेहि दाह, इजा, मारहाण, शीतोष्णादि कारणांचे परिणाम तिजवरच अधिक घडण्याचा संभव असल्यामुळें जंतुजन्य व इतर रोग कातडींत फार होतात यांत नवल नाहीं, मात्र आरंभापासून रोगाचें प्रत्येक स्थित्यंतर या त्वग्रोगाचें जसें आपणास पाहण्यास मिळतें तसें इतर रोग पहातां येत नाहींत.

या त्वग्रोगाचें वर्गीकरण तरी कोणत्या दिशेनें व कोणत्या तत्त्वावर करावें याविषयीं वरच्यावर मतें पूर्वी बदलत गेलीं आहेत. पूर्वी जेव्हां जंतुशास्त्र व सूक्ष्मदर्शकयंत्र अज्ञातावस्थेंत होतें तेव्हां फक्त बाह्य रोगलक्षणांवरून—म्हणजे लाली, फोड, खपल्या, कोंडा, यांपैकीं जो आकार व जें स्वरूप दिसेल तसें—वर्गीकरण करीत असत; व ते शास्त्रशुद्ध नसलें तरी सोयीच्या दृष्टीनें जंतुजन्य त्वग्रोगाची संख्या जोपर्यंत थोडी होती तोंवर तें वर्गीकरण अगदींच टाकाऊ नव्हतें. परंतु पुढें जंतुशास्त्राची फार प्रगति होऊन असें होऊं लागलें आहे कीं, एका रोगास एका पंडितानें जंतुजन्य म्हणावें व दुसऱ्यानें त्यास मज्जाविकृतिजन्य म्हणावें व तिसऱ्यानें कारण अज्ञात आहे.असें म्हणावें. याप्रमाणें पूर्वापेक्षां हल्लीं वर्गीकरण बदलत आहे. बाह्यत्वचेचे पांच पापुद्रे असतात, व अंतस्त्वचा अगर खरी त्वचा दोन पापुद्र्यांची बनलेली आहे. याशिवाय त्वचेंत रक्तवाहिन्या, केश, घर्मपिंड, तैलपिंड वगैरे त्वचेसंबंधीं रचना आहेत त्या सर्वांनां रोग हे होतातच. तेव्हां या सर्वांचें नक्की ज्ञान वैद्यास अवगत पाहिजे. ज्याविषयीं विशेष वाद नाहीं अशा प्रकारच्या रोगांचें कारणानुसार वर्गीकरण खालीं दिलें आहे.

त्वचेंतील मज्जातंतूंत विकृति उत्पन्न होऊन झालेले रोग.—यांतहि उपभेद आहेत ते:—( अ )स्पर्शसंज्ञानांत विकृति होऊन त्वचेंतील सुनबधिरेपणा, मिरमिरणें, मुंग्या येणें व कंडुरोग. (आ) सूक्ष्म रक्तवाहिन्यांतील विकृतीमुळें पित्ताच्या गांधी अंगावर उठणें, अंगावर लाली उठणें, त्वचेवर सूज ( मज्जाविकृतिजन्य ) येणें, त्वग्रूक्षता अथवा पेलाग्रारोग, नीलरक्तपित्त, कांहीं प्रकारचे इसब, चिखल्या, अंग फुटणें, बारीक ग्रंथियुक्त त्वचेवर लाली, नर उतणें, पांढरें कोड व त्वचेचे व्रणसंबंधी रोग. ( इ ) त्वचापोषणक्रिया बिघडल्यानें होणारा त्वचाघनतारोग, खोल चरत जाणारा पावलांतील व्रण, सांध्यांतील चार्कोटरोगसंबंधी व्रण, व शय्याक्षतें, महारोगापैकीं त्वचेवरील कांहीं रोग, रेनांडेचा दोन्ही बाजवांकडे होणारा कोथरोग, त्वग्स्फोट, ल्यूपसरोग वगैरे. (ई) घर्मपिंड, तैलपिंड, केश व नखासंबंधीं रोग –जसे, घर्माधिक्यरोग, रक्तघर्मरोग, ब्रोमाइडोत्तेजक पुळ्या, घामोळ्याच्या पुटकुळ्या, उन्हामुळें अंग फुटणें; तैलपिंडमुखावरोधामुळें पुटकुळ्या, गळवें, बहुस्निग्धतारोग वगैरे.

त्वचेमध्यें संसर्गामुळें रुजण्यासारखे रोग.— हे रोग नाना प्रकारच्या जंतूंमुळें होतात. त्यांचे प्रकारः ( अ ) प्राणिजजंतुजन्य; जसे खरूज, उवा, नारू, डुकराच्या व इतर चांगलें न शिजलेल्या मांसाहारामुळें येणारा स्नायुस्तंभतारोग (ट्रायकीनोसिस ), हस्तिपादरोग ( एलेफंटायासिस ), शेतांतील मत्कुणदंशरोग, जिग्गरदंशरोग, व वाळूमक्षिकादंशरोग ( हे शेवटचे रोग उष्णकटिबंधांतील प्रदेशांत आढळतात ). ( आ ) उद्भिज्जजंतुजन्य रोगः–गजकर्ण, छत भरणें, दाढीस होणारें गजकर्ण व दद्रुरोग, पुळीचा मदुरा, पावलाचा रोग, ऍस्परजिलोसिस व पिंटोरोग (हा खपुतरें पाळून त्यांनां चारा घालणारांनां होतो ). (इ) सूक्ष्मदर्शनीय स्ट्रेप्टोकॉकाय आणि स्टॅफिलोकॉकायनामक पूयोत्पादकजंतूमुळें होणारीं गळवें, काळपुळी, व इतर नाना प्रकारचे त्वचेचे रोग व इसबाचे कांहीं प्रकार; विशेषतः पू होऊन चिघळणारे व लस वहाणारे. यांपैकीं कांहींचे जंतु अद्याप नक्की समजले नाहींत.

एकंदर शरीरांत भिनलेले अगर भिनण्यासारखे रोग.—क्षयजंतू त्वचेंत रुजून त्यामुळें होणारा ल्यूपस नामक रोग तत्संबंधी व चामखीळ, लाली व व्रण. या सर्वांत कॉकनें शोधून काढलेला क्षयजंतू विकृत त्वचेमध्यें सांपडतो. स्पायरोकेटा पॅलिडानामक फिरंगोपदंशाच्या जंतूमुळें त्या रोगाच्या तीनहि अवस्थांतील नाना प्रकारचे अंगावर उठलेले पुरळ, फोड फापरें, गळवें, व्रण, क्षतें, डाग, लाली, गांठी, मोड, घरें, चरे, कोंडा, खरका, पुळ्या. त्याचप्रमाणें महारोग अगर गलत्कुष्ठांतील नाना प्रकारचे त्वचेवरील रोगप्रकार, ग्लॅन्डर्स, ऍथ्राक्स हे रोग तसेंच, देवी, गोंवरादि सांथीच्या तापांतील येणारा पुरळ, फोड वगैरे.

ज्यांचें कारण अद्याप निश्चित समजलें नाहीं असे रोग.—त्वचेचे खवले व कोंडा यांचे मोठाले पापुद्रे निघणें, तांबडे शिबें व इतर कांहीं रोग.

पोटांत कांहीं प्रकारचीं औषधें घेऊन त्वचेवर दिसणारे प्रकार.—क्लोरल, बेलाडोना, कोपेबा ऍंटिपैरिन, पारा,

फोयनेल, डामर, स्ट्रॅमोनियम, सल्फोनल, सॅलिसिलिक आसिड व सोडासॅलि सिलेट यामुळें व रोग बरे करण्यासाठीं लस टोंचून घालतात तेव्हां कधीं त्वचेवर पुरळ व लाली येते.

त्वचेवर नवीन गांठी प्रमाणें उत्पन्न होणारे रोग.— (अ) सुसाध्य–जखमांचे व इतर व्रण,तंतुरचनामय वारिक ग्रंथि, रक्तवाहिनीयुक्त वारिक गांठी,रसग्रंथि, स्नायुग्रंथि कॉलीफ्लावर-प्रमाणें दिसणाऱ्या ग्रंथि, वारिक पिंडग्रंथि, त्वचाग्रंथि,चामखीळ त्वचेवरील धारिक कोटरग्रंथि वगैरे असाध्य व कष्टसाध्य ग्रंथियुक्त त्वचारोग. सार्कोमा, कॅन्सर, खोल चरत जाणारा चेहऱ्यावरील व्रण.

त्वचारोगासंबंधीं कांहीं लक्षांत ठेवण्यासारखे मुद्देः— (१) त्वचा हें हि एक महत्वाचें इंद्रिय असल्यामुळें इतर रचना व इंद्रियें यांना, रक्ताभिसरणांतील फेरबदल, दाह, सूज, परोपजीवीजंतु, नवग्रंथिरोग, स्थूलीभवन, विरलता, क्षीणता,गात्रसंकोचन या कारणांमुळें रोग होतात तसे ते त्वचेसहि होतात.

मूळ रोग एक असून त्यानें बाह्यचिन्ह त्वचेंत दिसून येणें हा प्रकार उन्माद रोगामध्यें स्पर्शज्ञानविकृत होणें व मोठे मज्जातंतु बिघडल्यामुळें शय्याक्षतें अगर खोल चरत जाणारे व्रण, महारोग वगैरे रोगांमुळें दिसून येतो. (२) कांहीं खनिज प्रकारचीं विषें (फास्फरस, पारा यांसारखीं ) अगर नील रक्तपित्त व अन्य कांहीं रोगांत एक प्रकारचें विष शरीरांत आपोआप बनून त्यामुळें त्वचारोग उत्पन्न होतो. ह्याच विषयाचेंहा परिणाम देवी, गोंवर, मधुरा, विषमज्वर, क्षय या रोगांत त्वचेवर दिसून येतो. (४) अंगावर एकाएकीं पित्ताच्या गांधी उठतात तीहि एक प्रकारची आत्मविषबाधाच कांहीं विशिष्ट प्रकारचें आपणास न मानवणारें अन्न खाल्यामुळें होते व पांडुर कुष्टवात व मुरलेला हिमज्वर यासारख्या प्रकृतींत मुरलेल्या कारणामुळेंहि ह्या पित्ताच्या गांधी उठतात, मनोवृत्तींत गहिंवर, चंचलता, राग, लोभ, या कारणानें पालट होऊनहि व कांहीं कीटकांचा दंश होऊन त्यामुळें गांधी उठतात व एकाएकीं लवकर मावळतात. (५) लाली-म्हणून एक त्वचारोगप्रकार वरील रोगनामावलींत आहे त्याचीहि कारणमीमांसा दाह व सूज (कारण यांतहि लाली असते) यांशीं न जमतां पित्ताच्या गांधीच्या कारणांशीं अधिक जुळते. (६)कांहीं औषधें बाहेरून त्वचेस लागल्यास फोड व पुरळ येतो–जसें, जायफळाचें तेल व दुसरीं औषधें; कांहीं औषधामुळें तीं थोड्या प्रमाणांत कांहीं थोडे दिवस लावल्यानें कांहीं प्रकृतीच्या माणसांनां इसबासारखा रोग होतो. (७) इसब हा एक महत्वाचा रोग आहे, तथापि गजकर्ण व खरुज या रोगांत विकृत भागांत खाज सुटून त्या दाहामुळें त्या जागीं मुळ त्वचारोग व इसब हे दोन्ही रोग जडतात.(८) वरील रोग बहुधा बाह्य त्वचेंतील रोग असतात. परंतु अंतस्थ त्वचेंत विशिष्ट प्रकारच्या नाना जंतूंमुळें होणारे धांवरे, पळवें, एंथ्राक्स, ग्लॅंडर्स. (९)त्वचा रोगांतील पुरळ व फोडास स्वयंनिर्णय जणूंकाय सामर्थ्य असावें अशाप्रमाणें पुष्कळ रोगांत ठराविक जागींच उद्भव होतो. इसब, कंडुरोग, कांहीं औषध पोटांत घेऊन व लस टोंचल्यामुळें येणारी लाली, देवी गोंवरादि सांथीच्या तापांचे फोड व पुरळ, फिरंगोपदंशांतील प्रथमावस्थेंत दिसणारे फोड व पुरळ हे शरीराच्या डाव्या व उजव्या दोन्ही बाजूंस व सर्वांगावर दिसून येतात; परंतु जर उठल्याचे फोड, गजकर्ण, फिरंगोपदंशाचे तृतीयावस्थेंतील फोड, पुरळ व क्षतें, व्रण, नवग्रंथीचा उद्भव हे त्वचारोग कोणत्या तरी एका बाजूसच दिसतात हातापायाच्या तळव्याकडील भाग व आपोआप झांकले मिटले जाणारे असे मांडी कोपर, कांख, यांतील बेचकळ्या या ठिकाणीं इसब होतें. व त्याच्या उलट शरीराची त्वचा खवले व कोंडा रूपानें निघून जाण्याचा रोग हातापायांच्या बाहेरील बाजू व मांडी, कोपर, कांख, गुडघा यांच्या बाहेरील बाजूस होतो. एखादा लहान मोठा मज्जातंतू ज्या मार्गानें जातो त्याच्या बरोबर वरील त्वचेवर जर उठल्याचे मौक्तिकबिंदूप्रमाणें फोड येतात व हा प्रकार मज्जाविकृतिजन्य इतर त्वचारोगांचाहि आहे. मुखावर दिसणारे त्वचारोग, लाली, ल्युपस, मुरुमाच्या व इतर प्रकारच्या पुटकुळ्या, इसब, फिरंगोपदंशसंबंधी व कष्टसाध्य ग्रंथिव्रण हे होय. या शेवटच्यापैकीं खोल चरत जाणारा व्रण नाक, डोळा या ठिकाणीं होतो. मस्तकावर ओले फोड येतात ते इसब, ऊत मरणें, आगपैण, यामुळें व कोरडे खवले, खपल्या व कोंडा जाणारे मस्तकाचे रोगः– कोंडा जाणारा रोग, गजकर्ण, फिरंगोपदंश .जननेंद्रियावर दिसणारे रोगः–खरूज, गजकर्ण,जर उठण्याचे फोड, उपदंशाचे चट्टे हे रोग. हातापायांवर व बोटांच्या बेचकळ्यांत, मनगटाच्या व घोट्याच्या बाजूस व ढुंगणाच्या बेचकळ्यांत व बाजूस खरुज येते. रकेल तेलवाले, हलवाई, डांबर, मीठ, चुन्याच्याकळ्या, गंधक यांची स्वतः देवघेव करणारांनां तसेंच कातडीं कमावणारे, रंगारी, औषधें विकणारे, गंधी, भटारी, परीट, सोन्यारुप्याचा मुलामा करणारे,आचारी, पाणके यांनां विविक्षित व्यवसाय व धंद्यामुळें विविक्षित स्थळीं विधिक्षित प्रकारचे त्वचारोग होतात.

**त्वंते तालुका**—खालचा ब्रह्मदेश- इंतवडी जिल्ह्यांतील एक तालुका. याचें क्षेत्रफळ ३६९ चौ. मै. असून लोकसंख्या १९०१ सालीं ८५४४१ होती. तालुक्याचें मुख्य ठिकाण त्वंते हें असून येथील लो. सं. ४००० आहे. या तालुक्यांत २४२ खेडीं आहेत. जमीन फार सुपीक असून लोकवस्ती दाट आहे;कालींचें उत्पन्न ५॥ लाख असून १९०३–०४ त एकंदर क्षेत्रफळांपैकीं २७२ चौ. मै. क्षेत्रफळ लागवड केलेलें होतें. त्वंते या नांवाचा एक कालवाहि आहे.

**त्वष्टा**—ऋग्वेदांतला विश्वकर्मा म्हणजे देवांचा शिल्पी. यानें सर्व विश्व निर्माण केलें. यानें आपली कन्या त्वाष्ट्री नामांतरानें प्रसिद्ध जी शरण्यू ( भागवतांतील नांव संज्ञा ) ती विवस्वान् आदित्यास दिली होती. म्हणूनच यानें विवस्वानाचें शरण्यूस सहन न होणारें तेज न्यून केलें. दधीच ऋषीच्या अस्थींचें इंद्रास यानेंच वज्र करून दिलें होतें.

थ—या अक्षराची पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार शिलालेखांत; आणि दुसरी व

थ = O θ 8 ४ थ

तिसरी अवस्था राजा यशोधर्मन् ( विष्णुवर्धन ) याच्या वेळच्या मंदसोर येथील शिलालेखांत ( स. ५३२ ) आढळते. चवथी अवस्था थोड्याशा फरकानें देवल, धार व उज्जनी येथील लेखांत आढळते. देवल येथील लेख छिंदवंशी लल राजाचा ( स. ९९२ ) आहे; धार येथील शिलालेख भोज राजानें रचिलेल्या ' कूर्मशतक ' नामक काव्याचा ( ११ वें खिस्ती शतक )आहे, आणि उज्जनीचा लेख उदयादित्याच्या वेळचा ( ११ वें खिस्ती शतक ) असून त्यांत सर्व वर्णमाला दिली आहे. [भारतीय प्राचीन लिपिमाला ].

**थइ भाषा**—सविस्तर माहितीसाठी ज्ञानकोश विभाग १ ला, पान १८४ पहा.

**थॅकरे, विल्यम मेकपीस**—(१८११–१८६३) एक इंग्रज कादंबरीकार. ईस्टइंडिया कंपनीच्या नोकरींत असलेल्या रिचमंडचा हा मुलगा कलकत्यास जन्मला. १८१६ सालीं त्याचा बाप वारल्यावर त्यास इंग्लंडांत पाठविण्यांत आलें. १८२२ ते १८२६ पर्यंत तो चार्टरहाऊस नामक शाळेंत होता. मध्यंतरीं त्याच्या आईनें १८१८साली पुनर्विवाह केला होता. १८२९ सालीं केंब्रिज येथील ट्रिनिटि कॉलेजांत त्यानें नांव घातलें. तेथें हुशार विद्यार्थी म्हणून तो प्रसिद्धीस आला नव्हता. त्या ठिकाणीं टेनिसनप्रभृति कांहीं लोकांशीं त्याचा चांगला स्नेह जमला. 'स्नॉब' व'गाउन्समन' नामक नियतकालिकांत तो आपल्या कविता देत असे. १८३१ सालीं त्यानें यूरोपांत प्रवास केला. परत आल्यानंतर त्यानें कायद्याच्या अभ्यासाला सुरवात केली. परंतु तो विषय त्यास न आवडल्यामुळें त्यानें वृत्तपत्रांच्या धंद्याकडे लक्ष पुरविलें व दोन पत्रेंहि काढलीं. परंतु त्यांत त्यास तोटा आला व जवळचें वडिलार्जित सर्व द्रव्य या धंद्यांत बुडाल्यामुळें स्वतःच्या श्रमावर उपजीविका करण्याची त्याजवर पाळी आली. १८१६ सालीं तो पॅरिस येथें कलेचा अभ्यास करण्याकरितां गेला. या सालीं त्यानें इसाबेलाशीं लग्न झालें. इंग्लंडास परत आल्यावर तो 'फ्रेसर्स मॅगेझिन' मध्यें लेख लिहूं लागला. पंच, बुक ऑफ स्नॉब्ज व जेमीज डायरी यांतील लेखांमुळें त्याची प्रसिद्धि होऊं लागली. १८४७–४८ सालीं त्याची 'व्हॅनिटी फेअर' ही कादंबरी मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध झाली. या कादंबरीमुळें त्याला फील्डिंग इतका दर्जा प्राप्त झाला व डीकन्सखेरीज त्याला कोणी प्रतिस्पर्धी राहिला नाहीं. १८४८–१८५० च्या दरम्यान 'पेंडेनीज' ही आत्मचरित्रपर कादंबरी प्रसिद्ध झाली. १८५१ सालीं व्याख्याता म्हणून तो पुढें आला व 'इंग्लिश ह्युमरिस्ट्स ऑफ दि एटीन्थ सेंचरी' या विषयावर त्यानें व्याख्यान दिलें. १८५५ सालीं 'फोर जॉर्जेस'वर त्यानें अमेरिकेंत जाऊन व्याख्यानें दिलीं. मध्यंतरीं १८५२ सालीं 'एसमंड', १८५३ सालीं 'दि न्यु कम्स' व १८५७–१८५९ सालीं 'दि व्हर्जिनिअन्स' अशा कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. १८६० सालीं कॉर्नहिल मासिक, थॅकरेच्या नेतृत्वाखालीं सुरू करण्यांत आलें व त्यांत ' लोवेल दि विडोअर ' हें नाटकी कथानक प्रसिद्ध होऊं लागलें. 'दि ॲडव्हेंचर्स ऑफ फिलिप, ' 'दि राउंड अबाउट पेपर्स ' वगैरे लेखहि छापण्यांत आले होते. यानंतर थॅकरेनें 'दि रोज ॲंड दि रिंग' व 'किकलेबरीज ऑन दि ऱ्हाइन' अशीं दोन पुस्तकें लिहिलीं. त्यानें कित्येक कविताहि लिहिलेल्या आहेत. विनोदाचें व करुणरसाचें सम्यक् मीलन कसें करावें हें थॅकरेला उत्तम साधलें होतें. 'फिलिप' व 'डेनिसडयुव्हल' या कादंबऱ्या क्रमशः प्रसिद्ध होत असतां वयाच्या ब्रेपन्नाव्या वर्षी १८६३ च्या डिसेंबरांत थॅकरे कालवश झाला.

थॅकरेनें थोड्याच कविता लिहिलेल्या आहेत व त्यांत सौन्दर्य व स्फूर्ति हे गुण दिसून येतात. 'दि क्रॉनिकल ऑफ दि ड्रम' हें तेजस्वी काव्य असून त्यावरून कवीची काव्यशक्ति व्यक्त होते. विनोदी व करुणरसपूर्ण असे कांहीं पोवाडेहि त्यानें रचले आहेत. जें जें वाईट असेल त्या बाबतींत व्याजोक्ति व मर्मोक्ति यांचा तो उपयोग करीत असे; तथापि मनुष्यप्राणी हा मात्याचा दुर्बळ आहे याची त्यास जाणीव असल्यामुळें त्याचा उपहास प्रेमळ भावनेचा असे. त्याची लेखनशैली अप्रतिम असून मनुष्यस्वभावाचें त्याचें ज्ञानहि अचूक व विस्तृत असल्याचें त्याच्या ग्रंथांवरून दिसतें. आंग्ल कादंबरीकारांत त्याचें स्थान फार श्रेष्ठ दर्जाचें आहे. कधीं कधीं थॅकरे व डीकन्स यांच्यामध्यें तुलना करण्यांत येत असते. वास्तविक हे दोन कादंबरीकार अत्यंत भिन्न प्रकृतीचे असून, दोघेहि श्रेष्ठ असेच मानले जातात. कोण जास्त चांगला हा प्रश्न टीकेच्या क्षेत्रांत फारसा येत नसल्यानें तो व्यक्तीच्या आवडीनिवडीवरच अवलंबून राहणार हें उघड आहे.

**थझी टाउनशिप**—ब्रह्मदेश, मिक्टिला जिल्ह्यांतील ही आग्नेयीकडील टाउनशिप आहे. क्षेत्रफळ ९९६ चौरस मैल. लोकसंख्या १९०१ सालीं ४९८२४. हींत ३१६ खेडीं असून थझी ( लो. सं. १८०३ ) हें मुख्य ठिकाण आहे. १९०३–०४ सालीं वहित जमीन १०३ चौरस मैल

होती. सारा व थायमेला यांचें उत्पन्न एक लक्ष अकरा हजार रुपये होतें.

**थटोन,** जिल्हा —खालच्या ब्रम्हदेशांतील तेनासरीम विभागाचा समुद्रालगतचा एक जिल्हा. ह्या जिल्ह्यांत सालविन नदांच्या दोन्हीं थडीवरील प्रदेशाचा समावेश होतो. क्षेत्रफळ ५०७९ चौ. मैल. या जिल्ह्यांत डोंगर पुष्कळ असून नौन्गिन, ह्न्गथवे, सालविन आणि विलिन या नद्या आहेत. जिल्ह्याच्या ईशान्य व वायव्य भागांत रानटी हत्ती आढळतात. व कधीं कधीं चित्तेहि दृष्टीस पडतात. वाघ फार कमी. अस्वलें मात्र पुष्कळ आहेत. शिवाय निरनिराळ्या प्रकारचीं हरिणें आहेत.हवा सर्द आहे.मार्तवान आखाताच्या बाजूनें थंडवारा वहातो. इतर जिल्ह्यांपेक्षां येथें पाऊस अधिक पडतो. थटोन येथें १९०१ सालीं पाऊस २०१ इंच पडला.

ह्या जिल्ह्यांत प्राचीन तलैंग राज्याचा बराच भाग येतो. पाली वाङ्मयांत यास रमण्णदेश ही संज्ञा होती. ब्रह्मदेशांत बौद्ध धर्माचा प्रवेश थटोन येथें प्रथम झाला. तलैंग राज्याची राजधानी तैक्कल किंवा कलतेक असावी असें कल्याणी लेखांतील गोलमट्टीक नगरावरून उघड होतें. विलिन टाउनशिपमधील एका डोंगराच्या पायथ्याशीं हें गांव आहे; व येथें पुरातन वैभवाची साक्ष पटविणारे अवशेष आहेत थटोन हें देखील जुनें गांव आहे. थामल राजा येथूनच पेगु शहराची स्थापना करण्याकरितां पश्चिमेकडे गेला होता. मार्तवान हें देखील त्याच वेळीं (इ. स. ५७५) वसलेलें असावें. पेगू शहर अस्तित्वांत आल्यानंतरहि मार्तवान किंवा थटोन हें तलैंग राज्याच्या पूर्व भागाची राजधानी राहिलें किंवा नाहीं याबद्दल थोडी शंकाच आहे, तरी पण ज्या अर्थी ११ व्या शतकांत, पगनचा राजा अनव्रत यानें पेगू घेतलें व थटोन शहर धुळीस मिळविलें तेव्हां राज्यकारभार चालविण्याचें मुख्य गांव हेंच होतें असें अनुमान निघतें. १२६९ सालीं पगनच्या राजानें मार्तवान शहराची पुनश्च स्थापना केली व अशा रीतीनें पुन्हां त्या गांवास पूर्वस्वरूप प्राप्त झालें. ब्रह्मी राजानें कोणा अलिनमा यास मार्तवानचा अधिकारी नेमिलें. त्यानें कांहीं उद्धटपणाचें वर्तन केल्यावरून त्यास काढून टाकून त्याच्या ऐवजीं दुसऱ्या एकास नेमिलें. पण अलिनमा परत आला व त्यानें नवीन अधिकाऱ्याचा खून करून सयामचा अंकित म्हणून तो कारभार पाहूं लागला. पण १२८१ सालीं मार्तवानच्या एका रहिवाश्यानें अलिनमाचा खून पाडला व तो स्वतः अधिकारी बनला. त्यानें वरीयु हें नांव धारण केलें.पगनच्या राजास हांकून लावण्यांत त्यानें पेगूच्या राजास चांगलीच मदत केली; पण पेगूच्याच राजावर उलटून त्यानें पेगू बळकाविलें.त्याच्या नंतरच्या अधिकाऱ्यानें तेनासरीम ते प्रोम व बसीनपावेतों राज्यविस्तार केला. ब्रह्मी व सयामी लोकांत जीं युद्धें झालीं त्यांत राजधानीवर बऱ्याच वेळां हल्ले चढविले गेले. हें शहर पहिल्या ब्रम्ही युद्धांत ( १८२४ ) इंग्रजांनीं सहज घेतलें, पण नंतर तें परत केलें. दुसऱ्या ब्रह्मी युद्धांत जनरल गॉडविनच्या सैन्यानें स. १८५२ मध्यें मार्तवान शहर घेतलें. युद्धसमाप्तीनंतर सर्व जिल्हाच त्याच्या ताब्यांत आला.स.१८९५ मध्यें थटोनचा एक वेगळा जिल्हा करण्यांत आला. १८८५–८६ सालीं वरचा ब्रह्मदेश ब्रिटिश राज्यास जोडण्यांत आल्यामुळें ह्या जिल्ह्याच्या पश्चिम भागांत बंडाळी माजली होती. पण सैन्याची मदत घेऊन ती मोडण्यांत आली.

केलय पर्वतांतील केलय शिखरावर धमचेटी राजानें बांधलेलें पागोडा–देवालय आहे. पूर्वेस दुसऱ्या एका शिखरावर कियक्तिओ पागोडा आहे. हें ब्रम्ही बौद्धांचें पवित्र स्थान आहे. भाविक लोक येथें गौतमबुद्धाचा एक केस आहे असें मानितात. इतर पागोडा–देवालयांची नांवें:—थटोन येथील थगीय (पागोडा) देवालय; सितांग येथील क्यैकलनपन; कैक्कय येथील पागोडा देवालयें; झोकथोक येथील तिझौंग; व मार्तवानच्या वायव्येकडील क्षिगेक पर्वतावरील क्षिगेक पागोडा हीं होत. शिवाय बुद्धाच्या मूर्ती असलेलीं कावगन, धम्मय, बिंगई व पगत; येथें लेणीं आहेत. आणखी ऐतिहासिकदृष्ट्या एके काळीं अत्यन्त महत्त्वाचें असलेलें सितान्ग गांव ह्याच जिल्ह्यांत आहे. सितान्ग हें पूर्वी राजधानीचें गांव होतें व तेथें किल्ला होता. लोकसंख्या ( १९०१ ) ३४३५१०. थटोन व कियक्तो हीं दोन मोठीं गांवें असून खेडीं ११७१ आहेत.

येथें तांदुळाचें उत्तम पीक येणारी जमीन सितान्ग नदीच्या प्रदेशांत व मार्तवानच्या आखाताच्या प्रदेशांत असल्यामुळें लोकसंख्या झपाट्यानें वाढत आहे. बहुतेक अम्हर्स्ट जिल्ह्यांतून लोक इकडे येतात. बहुतेक लोक बौद्धधर्मी आहेत. सुमारें ⅔ लोक ब्रह्मी व करेन भाषा बोलतात. तलैंग व टौन्गथु ह्या भाषाहि कांहीं लोक बोलतात.

बहुतेक करेण जातीचे लोक आहेत ब्रह्मी फक्त ७०००० आहेत व तेहि कैकत्तो विभागांत रहातात. बहुतेक सर्व करेन सालवीन नदीच्या पूर्वेकडे रहातात. तलैंग लोक पअन पान्ग टौनशिपमध्यें रहातात. थोडेसे सयामी व चिनी लोकहि आहेत. हे लोक पहाडांच्या उतारावर शेतकी करतात. सर्व साधारणतः जमीन सुपीक आहे. दक्षिण व पश्चिम भागांत तसेंच समुद्रकांठानें तांदुळाचें पीक उत्तम होतें. थोड्या प्रमाणानें त्यास पाणीहि देतात.

नद्यांच्या पुरापासून धोका पोहोंचणार नाहीं अशा रीतीनें पिकें पेरतात. करेण लोक तर डोंगराळ प्रदेशांतच पिकें पेरतात. मुख्य उत्पन्न तांदुळाचें आहे. शानसव, तवळ व पटा असा तीन तऱ्हेचा तांदूळ होतो. पटा तांदुळास फक्त पाटानें पाणी द्यावें लागतें. १९०३–०४ सालीं ८७१ चौ. मै. जमिनींत तांदूळ पेरला होता. येथें केळीं मुबलक होतात. रबराची लागवड झपाट्यानें होत आहे. इकडील लोकांस गुरें पाळण्याचा मोठा नाद आहे. येथें शर्यतीचे बैल मिळतात. विलिन नदीचा एक पाट काढला आहे. थौनगिन व

पश्चिम सालवीन असे जंगलाचे दोन विभाग केले आहेत. कांहीं ठिकाणीं सागवानी लांकूड राखून ठेवलेलें जंगल आहे. समुद्रकिनाऱ्याजवळ नेहमीं हिरवीगार असलेलीं जंगलें आहेत. नद्यांच्या पात्रांतून इमारती लांकडाची ने आण करतात. ह्या जिल्ह्यांत चुनखडीचे डोंगर आहेत. त्यामुळें ह्या जिल्ह्यास बरेंच व्यापारी महत्त्व प्राप्त झालें आहे. डोनयमी नदीच्या कांठानें चुन्याच्या भट्या लावतात. समुद्रालगतच्या टाउनशिपमध्यें मीठ तयार करतात.

मुख्यत्वेंकरून भात बाहेर पाठवितात. कैकती येथील माल रंगूनच्या बाजारांत विकावयास जातो व मौलमिनासहि जातो. मौलमिन बाजाराकरितां भात बहुतेक विलिनडोनयमी व मालविन नद्यांच्या पात्रांतून नेतात. जळाऊ लांकूड व इमारती सागवानहि ह्या जिल्ह्यांतून बाहेर जातें. आंत येणारा माल गुरें, रुपें व बाहेर जाणारा माल सुती माल, रेशमी माल, व रुपें. पेगू ते मार्तबान अशी एक रेल्वे आहे. सितान्ग नदीच्या कालव्यांतून कैकतोत्तीपर्यंत होड्यांत बसून भातो येतें.

१९००—०१ सालीं जमीनसाराउत्पन्न ११ लाख रुपये. थटोन व कियकतो येथें म्युनिसिपालिटया आहेत. शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा अजून मागासलेला आहे. तलैंग, करेण व तांगथु हे लोकच मुळीं सुधारणाप्रिय नाहींत. शेंकडा १४.३ शिक्षितांचें प्रमाण पडतें.

टा ऊ न शि प.—खालचा ब्रह्मदेश. थटोन जिल्ह्यांतील ही एक टाऊनशिप आहे. क्षेत्रफळ ४१७ चौरस मैल. लोकसंख्या १९०१ सालीं ६७,९२८. हींत १८३ खेडीं असून थटोन हें मुख्य ठिकाण आहे. १९०३—०४ सालीं वहित जमीन २०७ चौरस मैल असून उत्पन्न ३,००,६०० रुपये होतें.

गां व —थटोन गांव हें पूर्वी भरभराटीचें बंदर असून 'रमणदेश' या नांवाच्या स्वतंत्र राज्याच्या राजधानीचें ठिकाण होतें. लोकसंख्या १९०१ सालीं १४३४२ होती. सिलोनमध्यें बौद्ध लेखांवरून असें समजतें कीं, पाटलीपुत्र येथें भरलेल्या तिसऱ्या बुद्धसभेंत बौद्ध धर्म शिकविण्याकरितां सर्वत्र बौद्ध प्रचारक पाठवावे असें ठरलें. त्याप्रमाणें सोन व उत्तर या नांवाचे दोन प्रचारक सुवर्णभूमि नांवाच्या देशाला पाठविले. त्यावेळेस थटोन हें याच देशाच्या राजधानीचें ठिकाण होतें. पुढें ११०० सालीं 'पगन'चा ब्रह्मी राजा अनवरत यानें थटोनला वेढा घातला व लुटलें. यांत टौंगथु, थोडेसे करेण आणि पुष्कळसे हिंदुस्थानांतील मूळचे रहिवासी आहेत.

**थॅप्सस्**—हें द्वीपकल्प सिसिलीला लहान व अरुंद अशा संयोगभूमीनें जोडलें आहे. खि. पू. ४१४ पर्यंत या द्वीपकल्पांत फारशी वस्ती नव्हती. खि. पू. ४१४ त सिरॅक्युझवर स्वारी करतांना अथेनियन लोकांनीं हें दर्यावर्दी ठाणें केलें होतें. १८९४ सालीं कांहीं थडगीं खणतांना सांपडलीं तीं बहुधा १००० ते ९००( खि.पू. ) कालचीं असावीं असा अंदाज आहे.

**थवीक्यीन**—वरचा ब्रह्मदेश. रुबीमाइन्स जिल्ह्याच्या नैर्ऋत्य कोपऱ्यांत असलेली ही एक नदीकांठची टाउनशिप (तालुका) आहे. क्षेत्रफळ ६८८ चौरस मैल. हींत ७४ खेडीं असून १९०१ सालीं लो. सं. ९७८७ होती. थवीक्यीन हें मुख्य ठिकाण इरावती नदीच्या डाव्या तीरांवर वसलें आहे. १९०३-०४ सालीं ३००० एकर जमीन लागवडीखालीं असून उत्पन्न १०००० रुपये होतें.

**थवीगन**—खालचा ब्रह्मदेश. हंथवडी जिल्ह्यांतील एक टाउनशिप. क्षेत्रफळ ३१४ चौरस मैल. हिच्यांत १५५ खेडीं असून लोकसंख्या १९०१ सालीं ५१३९० होती. थवीगन हें गांव या टाउनशिपचें मुख्य ठिकाण आहे. १९०३-०४ सालीं वहित जमीन २२५ चौरस मैल असून उत्पन्न ४३७००० रुपये होतें.

**थबौंग**—खालचा ब्रह्मदेश, जिल्हा बेसीन, बेसीनपोटविभागाची अगदीं उत्तरेकडील ही एक टाउनशिप आहे. क्षेत्रफळ १११८ चौरस मैल. हिच्यांत ४४० खेडीं असून लोकसंख्या(१९०१)४७८०२. मुख्य ठिकाण थबौंग असून तें बेसीन नदीच्या उजव्या तीरावर वसलें आहे. १९०३-०४ सालीं ८१ चौरस मैल जमीन लागवडी खालीं असून ११३००० रुपये उत्पन्न होतें.

**थयेटचवंग**—खालचा ब्रह्मदेश. तवॉय जिल्ह्याच्या दक्षिणेकडे ही एक किनाऱ्यावरची टाउनशिप आहे. क्षेत्रफळ ७९१ चौरस मैल. लोकसंख्या १९०१ सालीं ३०४२४. हींत खेडीं ९१ असून थयेटचवंग हें सर्वांत मोठें व मुख्य ठिकाण आहे. मुख्य लोकवस्ती ब्रह्मी लोकांची आहे. तरी पण करेण लोकहि बरेच आहेत. १९०३-०४ सालीं वहित जमीन ५९ चौरस मैल असून सारा ७८००० रुपये होता.

**थयेतम्यो**, जि ल्हा.—ब्रह्मदेशांतील मिनबु विभागाचा एक जिल्हा. क्षेत्रफळ ४७५० चौरस मैल. चतुस्सीमाः— उत्तरेस—मिनबु व मगवे जिल्हे. दक्षिणेस—प्रोम. पूर्वेस— यमेथिन व टॉन्गु. पश्चिमेस—सॅन्डोवे. पश्चिमेस अराकानयोमा पर्वत असून पूर्वेस पेगूयोमा आहे. अराकानयोमाची उंची ४००० ते ५००० फूट आहे. पेगूयोमाची फक्त २००० फूटच आहे.

जिल्ह्याच्या पश्चिम भागांत चुनखडी सांपडते. बराच प्रदेश जंगलानें व्यापलेला असून सागवान विपुल आहे. रानडुकरें व हरणें बरींच आढळतात. योमाच्या दाट जंगलांतून वाघ, चित्ते हत्ती, अस्वलें वगैरे सांपडतात. हवा शुष्क आहे. हिवाळ्यांत पारा ४२° च्या खालीं जातो; व उन्हाळ्यांत १०५° वर चढतो. एकंदर हवामान आरोग्यदायक आहे. कधीं कधीं कालऱ्याची सांथ येते. पावसपाणी जरा कमीच व तेंहि अशाश्वत आहे. मिन्डन येथें पाऊस ४३ इंच पडतो.

इतिहासः—ह्या जिल्ह्याचा पूर्वेतिहास फारसा उपलब्ध नाहीं. ब्रह्मदेशाच्या इतिहासांत ह्या जिल्ह्याचें नांव फार क्वचित् येतें. येथील लोक बौद्धधर्मी झाल्यानंतर ह्या जिल्ह्याच्या दक्षिणभागाचा थरेखेत्र राज्यांत समावेश होत असे व उत्तरभागाची व्यवस्था पगनकडे होती. १८ व्या शतकाच्या मध्यकालीं तलैंगांनीं राजधानीचा नाश केल्यामुळें प्रोमच्या पळपुट्या राजानें अराकानयोमाच्या पायथ्याशीं मिंडन गांवाची स्थापना केली. ह्याच राजास पुन्हां पगनचें राज्यपद प्राप्त झालें. व सरासरी ५०० वर्षेपर्यंत या जिल्ह्याचा त्यानें स्थापन केलेल्या राज्यांत समावेश होत असे. थयेतम्योकरितां अधिकाऱ्यांची नेमणूक पगनहूनच होत असे. पण पुढें पगन घराणें संपुष्टांत आल्यानंतर राज्यांत मोठी बंडाळी माजली. १८५२ सालीं हा जिल्हा ब्रिटिश राज्यास जोडण्यांत आला व त्यावेळीं हा फक्त प्रोम जिल्ह्याचा एक पोटविभाग होता. स. १८७० मध्यें येथें एका वेगळ्या डेप्युटी कमीशनरची नेमणूक करण्यांत आली व स. १८८६ मध्यें ह्यांत वरील ब्रह्मदेशाचा मिन्डल पोटविभाग मिळविण्यांत आला. जिल्ह्याच्या या पोटविभागाचें मुख्य ठाणें मिन्हल येथेंच असून येथें एक पडका किल्ला आहे. त्याचा सध्यां बाजाराकरितां उपयोग करतात. स. १८८५ मध्यें ब्रह्मी लोकांनीं ब्रिटिशांस येथेंच जोराची टक्कर दिली होती. शेवटीं सुरुंग लावून हा किल्ला घेण्यांत आला. स. १८८६ मध्यें वरचा ब्रह्मदेश खालसा केल्यानंतर ह्या जिल्ह्यांत डाकू लोकांनीं मोठा धुमाकूळ माजविला होता. स. १८८८ मध्यें बंडखोरांचा नायक न्गास्वे ह्यास ठार मारण्यांत आलें. तेव्हां पुन्हां सर्वत्र शांतता स्थापित झाली.

थयेतम्यो गांवाच्या उत्तरेस कांहीं मैलांवर श्विनडव पागोडा देवालयें आहेत. कम्मटाउनशिपमध्यें इ. स. १०० मध्यें बांधलेलें श्वेमिनडीन देवालय आहे. तसेंच थयेतम्यो गांवांत स. १३७३ मध्यें बांधलेलें श्वेयेटलट देवालय आहे. हें आव्हाच्या राजानें बांधलें. मिन्डल पोटविभाग वगळला तर लोकसंख्या (१९०१) १७४६४६. मिन्डल पोटविभाग धरून ( १९०१ ) २३९७०६. जिल्ह्यांत थयेतम्यो व अलनम्यो हीं दोन गांवें व खेडीं १२७५ आहेत. बहुतेक लोक बौद्धधर्मी आहेत. स्त्रियांची संख्या पुरुषांहून अधिक आहे. शेंकडा ८९ लोक ब्रह्मी भाषा बोलतात. दुसरी भाषा चिन होय. येथील लोक चिनी व ब्रह्मी आहेत. चिनी लोक आराकान योमाच्या प्रदेशांत वस्ती करून रहातात. कांहीं थोडेसे पेगू योमाच्या भागांतहि आहेत. शेंकडा ७२ लोक शेतकीवर उपजीविका करतात. टेंकड्यामधील उथळ खोऱ्यांतून तांदूळ पिकवितात. तसेंच मटोन नदीच्या प्रदेशांत व अलम्यो टाउनशिपमध्येंहि तांदूळाचें पीक फार चांगलें येतें.

पाऊस वक्तशीर व चांगला पडला तर हा प्रदेश फार सुपीक आहे. पण बहुतेक मनाजोगता पाऊस पडत नाहीं; व पाटानें जमीनी भिजविण्याची इतकी मोठी सोयहि नाहीं. म्हणून तांदुळाचें उत्पन्न व्हावें तसें होत नाहीं. शेतीकडे बैलांचा उपयोग करतात. मिंडन खोऱ्यांत कांदे पिकवितात. पिकाऊ जमीन २७२ चौ. मै.; पाटाच्या पाण्यानें भिजणारी जमीन २३ चौ. मै. व जंगल ३३४१ चौ. मैल. मुख्य उत्पन्न तांदुळाचें आहे. इतर धान्यें राळे, मका, चणे; राळयाचें उत्पन्नहि बरेंच होतें. व तें विशेषेंकरून मिलहल पोटविभागांत बरेंच होतें. १९०३–०४सालीं ८७०० एकर जमीनींत मका पेरला होता. गळिताच्या धान्यांपैकीं तिळाचें उत्पन्न मुख्य आहे. कापूस बऱ्याच मोठ्या प्रमाणावर पिकतो. सरकीपासून साबण तयार करतात. तंबाखूचेंहि उत्पन्न बरेंच होतें. बागाइताकडे ४७००० एकर जमीन अडली आहे. केळयाचें उत्पन्न मुख्य आहे. जिल्ह्याच्या उत्तर भागांतील लोक गुरें पाळण्याचा धंदा करतात. पण कधीं कधीं चाऱ्याचा दुष्काळ पडतो. तलाव फार थोडे आहेत व त्यांचें पाणी उन्हाळ्यांत आटतें. मिंथेदे पोटविभागांत व कम्मटाउनशिपमध्यें पाटाचें पाणी पुरविण्याची व्यवस्था केली आहे.

पूर्वेस पेगूयोमा पहाडावर उत्तमपैकीं सागवानी लांकूड आहे. येथें बांबूचा मोठा व्यापार चालतो ६४१ चौ. मै. जंगल राखलेलें आहे. १९०३–०४ सालीं जंगलापासून उत्पन्न २·६ लाख रुपये झालें होतें.

खनिजद्रव्यें:—तेल, चुनखडी वगैरे. थियेम्योच्या पश्चिमेस पडाकपिन येथें तेल सापडतें. कापसाचें व रेशमाचें सूत काततात. थयेतम्यो येथें सोनार लोक उत्तम नक्षीकाम करतात. येथून खालच्या ब्रह्मदेशांत विणलेल्या चटया पाठवितात. मालाची ने आण इरावती नदीच्या पात्रांतून होते. आंत येणारा माल—साळी, तांदूळ, मासे, तेल वगैरे. बाहेर जाणारा माल—चटया, कापूस, तिळाचें तेल, तंबाखू, कांदे, चुना, गुरें. थयेतम्यो व अलनम्यो हीं व्यापाराचीं केंद्रस्थानें होत. येथून रंगूनला कापूस पाठविला जातो. येथें आगगाड्या नाहींत. सर्व दळणवळण बोटींनीं व डोंग्यांनीं चालतें.

जमीनसाराउत्पन्न १९०३-०४सालीं २३६ हजार रुपये होतें. एकंदर उत्पन्न ६०१ हजार रुपये. थयेतम्यो गांव व अलनम्यो अशा दोन म्युनिसिपालिट्या आहेत. थयेतम्यो येथें पायदळाची एक तुकडी ठेवण्यांत आली आहे. येथें एक जुना किल्ला आहे. शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा साधारण बरा आहे. शेंकडा ४८·७ लोकांस लिहितां वाचतां येतें. येथें दुय्यम शिक्षणाच्या व प्राथमिक शिक्षणाच्या शाळा आणि रुग्णालयें आहेत.

टा उ न शि प.—ब्रह्मदेश. थयेतम्यो जिल्ह्यांतील ही एक टाउनशिप आहे. क्षेत्रफळ १९२ चौरस मैल. १९०१ सालीं लोकसंख्या ३७,५९९. या टाउनशिपमध्यें १०६ खेडीं असून थयेतम्यो हें गांव जिल्ह्याचें व टाउनशिपचें मुख्य ठिकाण आहे. या गांवाशिवाय सर्व जिल्ह्यांत ब्रह्मी भाषा बोलणारे लोक आहेत. १९०३–०४ सालीं वहित जमीन २५ चौ. मै. असून साऱ्याचें उत्पन्न १९,००० रु. होतें.

गांव.— थयेतम्यो जिल्ह्याचें हें गांव मुख्य ठिकाण आहे. हें गांव इ. स. १३०६ च्या सुमारास 'पगन' च्या शेवटच्या मुलानें वसविलें. यांत बौद्ध लोकांचें एक भव्य मंदिर असून तें अशोक राजानें बांधिलें आहे असें म्हणतात. या गांवांत लहानसा किल्ला आहे. त्यांत हल्लीं लष्करी तुरुंग आहे. येथें सातव्या इयत्तेपर्यंत शिक्षण मिळतें. या गांवाच्या हद्दीवर एक मोठा तुरुंग आहे. नदीमधून जाणाऱ्या बोटी येथें थांबतात, व त्यामुळें हें बरेंच महत्त्वाचें आहे. येथील नांवाजलेला धंदा म्हटला म्हणजे चांदीचें काम करणें हा आहे.

**थरवड्डी**, जिल्हा.—खालच्या ब्रह्मदेशांतील पेगू विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ २८५१ चौ. मैल. उत्तरेस प्रोम जिल्हा; पूर्वेस पेगूयोमा; दक्षिणेस ह्न्यवड्डी जिल्हा; पश्चिमेस इरावती नदी. ह्या नदीपलीकडे हेन्झड जिल्हा आहे. नदीकांठचा प्रदेश पाणथळ आहे. मुख्य नदी म्यिनमका हिचा उगम प्रोम जिल्ह्याच्या दक्षिणेस असलेल्या इनमातलावापासून होतो. पुढें रंगून नदी हें नांव तीस प्राप्त होऊन शेवटीं ती समुद्रास जाऊन मिळते. ह्या नदीच्या पात्रांतून इमारती लांकडांचा व्यापार चालतो. इरावती व म्यिनमका ह्या दोन नद्यांमधील प्रदेश सखल आहे.

पेगूयोमा पहाडाच्या एका खोल दरीवर दगडाचा निसर्गनिर्मित पूल आहे. त्याची लांबी ५६० फूट आहे. जंगली श्वापदें—रान हत्ती, वाघ, चित्ते, गेंडे, हरिणें, अस्वलें वगैरे. हवा सर्द आहे. उन्हाळ्यांत पारा १०३° पावेतों चढतो. पावसाळा जून ते आक्टोबरपर्यंत. पाऊस ७९ इंच असतो.

१८ व्या शतकांत इरावती व पेगूयोमामधील प्रदेशास थरवड्डी ही संज्ञा होती. दुसऱ्या ब्रह्मी युद्धानंतर जेव्हां पेगूचा प्रांत घेण्यांत आला तेव्हां थरवड्डी व हेन्झड ह्या दोन जिल्ह्यांचा 'थरवाव' नांवाचा एकच जिल्हा बनविण्यांत आला होता. तेव्हां १८७८ पावेतोंच्या थरवड्डी व हेन्झडचा इतिहास एकसारखाच आहे. पेगूचा प्रांत ब्रिटिश राज्यास जोडण्यापूर्वी थरवड्डी हा पेगूच्या तेलैंग राज्याचा एक भाग होता. १९ व्या शतकांत येथील लोकांनीं फारच त्रास दिला. त्यांचा मुख्य कोणी गांगगेइ म्हणून होता. पहिल्यानें त्यानें कर देण्याचें नाकारिलें व सरकारनें नेमलेल्या माणसास त्यानें हांकून लाविलें. त्यास ब्रह्मी सरकारची आंतून फूस होती. १८५५ सालीं त्यास ब्रह्मी राज्यांत हांकून लाविलें. सध्याचा जिल्हा १८७८ सालीं बनविण्यांत आला. या जिल्ह्याची लो. सं. (१९०१) ३९५५७०. साऱ्या ब्रह्मदेशांत थरवड्डी ह्या जिल्ह्यांत लोकसंख्या सर्वांत अधिक आहे. मोठीं गांवें लेटपडन, गियोबिनगाक, थोन्झ, झिगन, व मिन्हल; पैकीं, पहिल्या तीन गांवीं म्युनिसिपालिटया आहेत. बहुतेक लोक बौद्धधर्मी आहेत.

ब्रह्मी व करेण ह्या दोन भाषा आहेत. खेडीं १८१९. टौनशिप६–थरवड्डी, लेटपडन, मिन्हल, मोनयो, गोयबिनगाक व तपून. लोक ब्रह्मी, करेण व शान असे तीन तऱ्हेचे आहेत.

येथें पाऊस नियमित व पुरेसा पडत असल्यामुळें जमीन अत्यंत सुपीक आहे. पाटाच्या पाण्याची किंवा खताची फारशी जरूरी नसते. म्यिनमका व इरावतीमधील प्रदेश अत्यंत सुपीक आहे. पण पुरामुळें पीक वाहून जाण्याची भीति असते. येथें तांदुळाची लावणी करतात. पहाडांच्या उतारांतूनहि पिकाची लागवड करितात. शेतकरी लोक आपआपल्या जमीनींत लागवड करितात, त्या लावून देत नाहींत. मुख्य पिकें तांदूळ, बटाटे, तंबाखू, ऊंस व मका हीं आहेत.

पेगूयोमा डोंगरावरील जंगलांत सागवानी लांकूड सांपडतें राखून ठेवलेलें जंगल ७३६ चौ. मैल. सनिवे नांवाच्या खेडेगांवीं लांकडांची खूप जंगी वखार आहे. येथें मातीचीं भांडीं तयार करितात. इतर धंदे करून वेळेनुसार हा धंदा केला जातो. झिगन पोटविभागांत कापड वगैरे विणतात. मुख्यत्वेंकरून कांबळी जास्त विणतात.

रंगून ही मुख्य बाजार पेठ आहे, तेव्हां लांकूडफांटा वगैरे माल रंगूनास पाठविला जातो. आंत येणारा माल:— सर्व तऱ्हेचा परदेशी माल, कपडे, सुकी मच्छी, तेल वगैरे. दळणवळण रेल्वेनें आणि इरावती व म्यिनमका नद्यांच्या पात्रांतून चालतें. रंगून ते प्रोमला असणारी रेल्वे लाईन ह्या जिल्ह्यांतून जाते. नुकतीच लेटपडनहून थरेवावपर्यंत एक रेल्वेलाईन सुरू करण्यांत आली आहे.

१९०३–०४ सालीं जमिनीपासून उत्पन्न ११२२ हजार रुपये झालें व एकंदर उत्पन्न २३२७ हजार रुपये झालें. झिगन व मिन्हल ह्या दोन ठिकाणीं गांवकमेटया आहेत. शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा बराच पुढें सरसावत आहे. येथें रुग्णालयें व बऱ्याच शिक्षणसंस्था आहेत.

टाउनशिप–याच जिल्ह्यांतील दक्षिणेकडील टाउनशिप. क्षेत्रफळ ३९१ चौरस मैल. १९०३–०४ सालीं ९७ चौरस मैल जमीन वहितीची होती, व उत्पन्न २१३००० रुपये होतें.

गांव:—याच जिल्ह्याचें हें मुख्य ठिकाण आहे. लोकसंख्या १९०१ सालीं १६९३. यांत मामुली कचेऱ्या, फॉरेस्टस्कूल व इतर इमारती वगैरे आहेत. येथें पाण्याचा पुरवठा चांगला असल्यामुळें हें गांव जिल्ह्याचें मुख्य ठिकाण केलें आहे.

**थर व पारकर**—मुंबई इलाख्यांतील सिंध प्रांतांत पूर्वेकडील एक जिल्हा. १९०५–०६ सालीं क्षेत्रफळ १३९४१ चौ. मैल. उत्तरेस खैरपूर संस्थान, पूर्वेस जेसलमीर, मलानी व जोधपूर संस्थानें व कच्छचें रण, दक्षिणेस कच्छचें रण व पश्चिमेस हैद्राबाद जिल्हा.

ह्या जिल्ह्याचे दोन विभाग केले आहेत. पैकीं एकास 'पाट' म्हणतात. ह्या विभागांत नारा या पाट पोटविभागाचा समावेश होतो. दुसऱ्या भागास 'थर' म्हणतात. थर म्हणजे 'ओसाड प्रदेश'. पाटचा प्रदेश समुद्रसपाटीपासून ५० ते १०० फूट उंच असून बहुतेक सपाट आहे. पूर्व नार कालवा झाल्यापासून 'पाट' विभागास आतां बरेंच पाणी

मिळतें. थरच्या ओसाड वाळूच्या प्रदेशांतून पूर्वी सिंधूचें पाणी वरेंच खेळत असावें असा अंदाज आहे. थर विभागांत वाळूच्या टेंकड्या आहेत. पारकर विभागांत खडकमय टेंकड्या आहेत. पारकरचा त्रिकोणाकृति विभाग आग्नेयीकडील बाजूनें थोडा कच्छच्या रणांत शिरला आहे. नगर पारकरजवळील कारुंजहार टेंकड्या बऱ्याच उंच आहेत.

नाराखोऱ्यांत, बाभूळ, लिम्ब, पिंपळ, सिरिह्, लई, किरीर हे वृक्ष आहेत. या जिल्ह्यांत डुकर, फारा (हरणाच्या जातीचें डुकर ), लांडगा, कोल्हा व ससा वगैरे प्राणी आहेत.

ह्या जिल्ह्याचा पूर्वेतिहास उपलब्ध नाहीं. ओसाड भाग व पारकर हे कच्छच्या पोलिटिकल एजंटाच्या हाताखालीं होते. १२२६ सालीं उज्जनकडून ह्या भागांत परमार सोद लोक आले व येथील राजांस हांकून देऊन आपण जागा बळकाविली. १६ व्या शतकारंभीं त्यांनीं सुम्राज ( सुमेरा ) जवळून हा प्रांत विकत घेतला असें म्हणतात. १७५० सालीं हा विभाग सोदजवळून कल्होर्‍यांनीं घेतला. कल्होर्‍यानंतर हा तालपूराच्या हातीं गेला. त्यांनीं ह्या प्रदेशांत बरेच किल्ले वगैरे उठविले.

मिथी व इस्लामकोट प्रदेशांतून तालपूर राजे उत्पन्न सान्यादाखल घेत असत असें म्हणतात. १८३० व १८३५ त ह्या भागांत बंडाळी माजली तेव्हां शांतता राखण्याकरितां मिरानीं मोठें सैन्य पाठविलें व त्यांस चांगली शिक्षा केली. पुढें थर व पारकर जिल्ह्यांत एका डाकूनें मोठा धुमाकूळ माजविला. कच्छ व इतर जिल्ह्याच्या लोकांस त्यानें फार त्रास दिला. तेव्हां १८३२ सालीं इंग्रज सरकार मध्यें पडून ती बंडाळी मोडली. हा जिल्हा कच्छमध्यें मोडला जावा अशी येथील लोकांची फार इच्छा होती व त्याच दृष्टीनें १८४४ सालीं बल्यारी, दिप्लो, मिथी, इस्लामकोट, सिंगाल, विरावह, पित्तापूर, मोडेसर व पारकर हे भाग संस्थानास देण्यांत आले. उमरकोट, गढ्रू व इतर प्रदेश हे मीरपूर पोटविभागांत आले. त्यापुढें लोकांच्या हातून शस्त्रें काढून घेण्यांत आलीं. त्यामुळें स. १८४६ मध्यें बंड झालें. पण लवकरच शांतता करण्यांत आली. सोड रजपुतांच्या कांहीं मागण्या व हक्क सरकारनें कबूल केले. १८५६ सालीं हा जिल्हा सिंध प्रांतांत घेण्यांत आला; तदनंतर १८५९ सालीं एक बंड झालें तेव्हां कर्नल इव्हान्स साहेबानें नगर पारकर गांव घेतलें व राण्यास कैद केलें. सन १६६८ मध्यें राण्यास व त्याच्या प्रधानास अनुक्रमें १४ व १० वर्षांची हद्दपारी मिळाली, तेव्हांपासून ह्या जिल्ह्यांत पूर्ण शांतता नांदत आहे.

जिल्ह्याच्या पारकर विभागांत कांहीं प्राचीन देवालयांचे अवशेष दिसतात. पैकीं वीरवाहच्या वायव्येस एक जैन देवालय आहे व जवळच पुरातन पारीनगरच्या अवशेषखुणा दृग्गोचर होतात. हें शहर ४५६ सालीं बालमीरच्या जेसो परमारनें बांधलें असें म्हणतात. १६ व्या शतकांत हें शहर नामशेष झालें असें म्हणतात.

अत्युच्च शिल्पकलाज्ञान व सुंदर नक्षीकामाची साक्ष पटविणारे येथें अजूनहि कांहीं ५१६ जुन्या जैन देवालयांचे अवशेष आहेत. क्षिप्रा शहराच्या दक्षिणेकडील दुसरें नामशेष झालेलें शहर गतकोट हें होय. मिरपूरखासनजीक कहूचा कांहीं अवशेष आहे. सिंधमधील सुम्र व सुम्मच्या कारकीर्दींत हें गांव फार भरभराटींत होतें. दिल्लीच्या अल्लाउद्दिनानें किंवा अरोरच्या दोलोर राजानें ह्या शहराचा नाश केला म्हणतात. इस्लामकोट, मिथि, नवकोट व सिगाल येथील किल्ले तालपूर राज्यांच्या कारकीर्दींत बांधले गेले असावेत. पण ते सध्यां पडक्या स्थितींत आहेत. अगदीं मोडकळीस आलेलें पुरातन ब्राह्मणाबाद शहर हें १८ व्या शतकांत भूकंपाच्या धक्क्यामुळें नाश पावलें. त्या काळचे अजूनहि कांहीं अवशेष आहेत. लो. सं. (१९०६) ३८९७१४. पंजाब व राजपुतान्यांतून शेतकी करण्याच्या उद्देशानें बरेच लोक येऊन वसाहत करूं लागल्यानें लो. सं. वाढली. भाषा-सिंधी व कच्छी; पैकीं शेंकडा ६३ लोक सिंधी बोलतात. मुसलमानांत बलुची लोकांचाच भरणा अधिक आहे. इतर जाती ढोर, कोळी, भिल; उदेज लोक येथील रहिवाशी होत हे लोक शरीरानें पिळदार व शेतकीचा धंदा करणारे असतात. इकडे खरीप, रब्बी व अढाब असे तीन हंगाम असतात. नारा विभागांतील व थर विभागांतील पेरणीची वेळ मात्र एकच नसते.

जमीन अस्सल काळीहि नाहीं व रेताडहि नाहीं, मध्यम आहे. जामराव कालव्यामुळें अधिक अधिक जमीन दरवर्षी लागवडीस आणली जात आहे. तांदुळ, ज्वारी, बाजरी, गहूं, कापूस हीं मुख्य पिकें होत. लागवडीस आणलेली एकंदर जमीन ३२९९ चौ. मै. पडीत २०३९ चौ. मै. व जंगल ६८ चौ. मैल. येथील गाढवांचा रंग पांढरा शुभ्र असतो. जामराव कालव्यामुळें ह्या जिल्ह्यांतील ३६५ एकर जमीन भिजते. हा कालवा १८९९-१९०० सालीं तयार झाला. कांहीं जंगल राखून ठेवलेलें आहे. तें डेप्युटी कमिशनरांच्या ताब्यांत आहे; येथील पाण्यापासून मीठ काढण्याची मनाई आहे. दिप्लो व मिथी तालुक्यांत खाऱ्या पाण्याचे मोठमोठे तलाव आहेत तेथून मात्र मीठ काढतात.

कारखानेः—गरम कांबळी व पिशव्या, उंटावरील खोगिरें व जाडेंभरडें सुती कापड. येथील बायका रेशमाचें विणकाम फार छान करतात मीरपूरखास येथें व शादीपली येथें कापसाचे जीन व प्रेस आहेत. शादिपली येथें दोन तांदूळ कांडण्याच्या गिरण्या आहेत. दिलियार व सरन येथें मीठ तयार करतात.

येथून बाहेर पाठविला जाणारा मालः—धान्य, लोंकर, तूप, उंट, चामडीं, मासे, मीठ इत्यादि. हा माल गुजराथ, पालनपूर, जोधपूरकडे पाठविला जातो. आंत येणारा मालः—कापूस, खनिजधातू, सुकी फळफळावळ, रंग, रेशीम, तंबाखू, ऊंस वगैरे.

अक्रीजवळील पिठोरो गांवीं दरवर्षी सप्टेंबर महिन्यांत जत्रा भरते ( येथें पिठोरा देव आहे ). लहान लहान जत्रा इतर ठिकाणीं भरतात. ह्या जिल्ह्यांत एकंदर ११ तालुके आहेत. त्यांची नांवें १ चाक्रो, २ दिप्लो; ३ खिप्री, ४ मिरपूरखास, ५ मिर्थी, ६ नगर, ७ जमेसाबाद, ८ सनघर, ९ अमरकोट, १० पिठोरो, ११ सिन्झोरो.

या जिल्ह्याचे दोन विभाग करून प्रत्येकावर एक डेप्युटि कलेक्टर नेमला आहे; व जिल्ह्याचा अधिकारी डेप्युटी कमिशनर आहे. फौजदारी मोकदम्मे चालविण्याकरितां नाराविभागांत मुखतियारकारांची नेमणूक आहे. उमरकोट, मिथी व मिरपूरखास येथें म्युनिसिपालिट्या आहेत. शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा फारच मागसलेला आहे. येथें ७ रुग्णालयें व १६४ शाळा आहेत.

**थराड**—पालनपूर ( मुं. इ. ) मधील एक संस्थान व जुन्या शहरांपैकीं एक शहर. उ. अ. २४°२०′ व पू. रे. ७१° ४८′. याची तटबंदी मोडकळीस आली आहे. येथें पाण्याचा पुरवठा चांगला नाहीं. परंतु हवा उत्तम आहे. एका दोहऱ्यावरून मारवाडांतील शिरपूरच्या थारापूर परमारनें हें शहर(स.११५) वसविल्याचें समजतें. १५ व्या शतकांत मुसुलमानांची सत्ता सुरू झाली व १७ व्या शतकांत तें मोंगलाकडे गेलें. १८२० सालीं याच्या भोंवतीं तटबंदी व खंदक असल्यामुळें हें फार मजबूत ठिकाण समजत. येथील वाणी व मेमन व्यापारी यांची स्थिति चांगली असून रजपूत व इतर लोक मध्यम स्थितींतील आहेत. धान्य, तूप, तीळ व बैल यांची निर्गत होते व कापड, गूळ, किराणामाल व तंबाखू यांची आयात होते. येथें ८ जैनांचीं, ४ ब्राह्मणांचीं व तीन मुसुलमानांचीं देवळें आहेत.

**थरोच**—पंजाब, सिमला. डोंगरी संस्थानांपैकीं हें एक संस्थान आहे. क्षेत्रफळ ६७चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) ४२१९. सान्याचें उत्पन्न ४०,००० रुपये. जेव्हां हें संस्थान ब्रिटिशांच्या ताब्यांत आलें तेव्हां ठाकूर करमसिंग हा नामधारी अधिपति असून त्याचा भाऊ जोबू हाच संस्थानचा कारभार पहात होता. १८१९ सालीं जोबूला या संस्थानाची सनद मिळून ह्याच्याच वंशजाकडे संस्थान राहील असें ठरलें. हल्लीचा संस्थानाधिपति ठाकूर सूरतसिंग हा लहान असल्यामुळें सर्व कारभार वजीराच्या हातीं आहे.

**थॅर्मापिली**—ग्रीस. लॉक्रीस व थेसलीच्या दरम्यान असलेली ग्रीसमधील एक खिंड. स्पार्टाचा राजा लीओनीडास यानें आपल्या ३०० सैनिकांसह क्सर्क्सीझ या इराणच्या राजाच्या अवाढव्य सैन्याचा पराभव केल्याबद्दल या खिंडीची फार प्रसिद्धि आहे. इ. स. २७९ या वर्षी अथेन्सच्या कॅलिपसनें गॉल्स लोकांनां या ठिकाणीं थोपवून धरलें होतें. लीओनिडासच्या वेळीं ही खिंड म्हणजे निरुंद असें सुमारें १४ यार्ड रुंदीचें स्थळ होतें. सध्यां १॥ पासून ३ मैलांपर्यंत यांची रुंदी वाढलेली आहे. या घाटाला ज्या गरम पाण्याच्या झऱ्यावरून थर्मापिली हें नांव पडलें आहे तो झरा टेंकडीच्या पायथ्याच्या लगतच असून तेथील पाण्यांत स्नान केल्यानें गालगंड, जंघापृष्ठशूल व संधिवातासारखे रोग बरे होतात असें सांगतात.

**थल**—वायव्यसरहद्दीवरील प्रांत, जिल्हा कोहट. हंगू तहशिलींत हें एक खेडें असून लष्करी छावणीचें ठिकाण आहे. हें कुर्रम नदीच्या डाव्या तीरावर वसलें आहे. येथें एक किल्ला असून त्याच्या संरक्षणार्थ एक घोडेस्वारांची व पायदळाची अशा दोन तुकड्या ब्रिटिश ऑफिसरच्या हाताखालीं ठेविल्या आहेत.

**थान**—मुंबई, काठेवाड. लखतर संस्थानांत हें एक खेडें आहे. या खेड्याच्या सभोंवतालीं कोट आहे. मेजर जी. डब्ल्यू. वाट्सन यानें खालीलप्रमाणें या खेड्याचें वर्णन दिलें आहे. "थान हें अतिशय जुनें असून याच्या आसपासची जमीन फार पवित्र आहे. थान हा शब्द संस्कृत स्थान या शब्दाचा अपभ्रंश आहे. येथून जवळच त्रिनेत्रेश्वर या नांवाचें सूर्याचें प्रसिद्ध देवालय असून वासुकि व वंडुक यांचीं दोन प्रसिद्ध देवालयें आहेत. थान सौराष्ट्रांत वसलें आहे व सौराष्ट्रलाच देवपांचाल असें म्हणतात व हीच द्रौपदीची जन्मभूमी होती. या ठिकाणीं पहिलें देवालय ( सूर्याप्रीत्यर्थ ) सत्ययुगांतील मांधाता राजानें बांधिलें. त्यावेळेस येथें ३६,००० ब्राह्मण, ७२,००० क्षत्रिय, ५५,००० वैश्य आणि ९०,००० शूद्र होते. एकंदर लोक २५००००. येथें श्रीकृष्ण रुक्मिणीसह आले होते. रुक्मिणीनें येथील तलावांत स्नान केलें. त्यामुळें या दोन्हीं तलावांचीं नांवें प्रियतमा व कमला अशीं पडलीं असें म्हणतात. जवळच आणखी एक कुंड आहे त्यांत स्नान केल्यानें सर्व पापें भस्म होऊन जातात व म्हणूनच या कुंडाला 'पापनाशन' असें नांव आहे.

**थानेसर**,(थानेश्वर)त ह शी ल.–पंजाब, कर्नाला जिल्ह्यांतील ही एक उत्तरेकडील तहशील आहे. ही यमुना नदीच्या पश्चिम तिरावर असून क्षेत्रफळ ५९९ चौरस मैल आहे. १९११ सालीं लोकसंख्या १४६६०१ होती. तहशिलींत ४१८ खेडीं असून थानेसर हें मुख्य ठिकाण आहे. १९०३-४ सालीं सारा व कर यांचें उत्पन्न २·८ लक्ष रुपये होतें.

गा व.—हें गांव, पंजाब, जिल्हा कर्नाला, थानेश्वर तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. याची लोकसंख्या १९०१ सालीं ५,०६६. कुरुक्षेत्राच्या भागांत हें गांव अतिशय पवित्र आहे. १०१४ सालीं गझनीच्या महंमदानें हें गांव लुटलें होतें. येथें महंमद घोरीनें पृथ्वीराजाचा पराजय केला ( ११९३ ).

**थॉमसन, जेम्स** ( १८२२–१८९२ )—या ब्रिटिश शास्त्रज्ञाचा जन्म बेलफास्ट येथें तारीख १६ फेब्रुवारी १८२२ रोजीं झाला. याच्या धाकट्या भावा( लार्ड केल्व्हिन )-प्रमाणेंच यानें अल्पवयांतच ग्लास्गो विश्वविद्यालयांत जाण्यास सुरुवात केली. यानें विश्वविद्यालयाची पदवी मिळविल्यानंतर एंजिनिअरिंगचा अभ्यासक्रम घेण्याकरितां

कित्येक एंजिनिअरींग ऑफिसें आणि कारखाने यांत काम करून पाहिलें; परंतु त्याची प्रकृति अशक्त असल्यामुळें हें काम आपणास झेपणार नाहीं असें पाहून त्यानें एंजिनिअर होण्याचा नाद सोडून दिला; व सिद्धान्तविषयक आणि यांत्रिक शोध लावण्याचें काम हातीं घेतलें. या सुमारास त्यानें गत्युष्णतेसंबंधानें शोध करून व कार्नोच्या तत्त्वाचा उपयोग करून एक महत्त्वाचा सिद्धांत मांडला. थिजत असतांना जर एखाद्या द्रव्याचें आकारमान वाढत असलें तर त्या द्रव्यावर दाब आणला असतां त्याचा थिजण्याचा बिंदु खालीं उतरतो; व जर तें द्रव्य थिजतांना कमी आकाराचें होत असेल तर दाबानें त्याचा थिजण्याचा बिंदु वर चढतो; व किती दाबाच्या योगानें थिजण्याचा बिंदु किती खालीं किंवा वर होतो याची त्यानें गणना केली. या सिद्धान्तासंबंधानें प्रत्यन्तर पहाण्याकरितां ग्लासगो विश्वविद्यालयांत लॉर्ड केल्व्हिनच्या देखरेखीखालीं प्रयोग करण्यांत आले; त्यायोगानें या सिद्धांतास प्रायोगिक दुजोरा मिळाला. निरनिराळ्या द्रव्यांचें स्फटिकीभवन होतें. या स्फटिकांवर दाब आणला असतां काय परिणाम होतात यासंबंधानें त्यानें प्रयोग करून बरीच नवीन माहिती उपलब्ध केली. पाणचक्कीसंबंधानें प्रयोग करून त्यानें नवीन पाणचक्की बसविली व तिचें पेटन्ट मिळविलें. नवीन यंत्र बनविण्याच्या कामांत याचें डोकें किती कल्पक होतें याची कल्पना येण्याकरितां पुढील उदाहरण पुरें होईल. हा सोळा वर्षांचा असतांना त्यानें जहाजाच्या गतिदायक चक्रांत सुधारणा करून दाखविली. सन १८५७ सालीं बेलफास्ट येथील क्विन्स कॉलेजांत त्याला सिव्हिल एंजिनिअरिंगचा प्रोफेसर करण्यांत आलें. यानंतर यानें एक दोन ठिकाणीं प्रोफेसरचें काम केलें. १८८९ सालीं त्याची दृष्टि जाऊन तो अंध झाला व त्यामुळें त्याला अध्यापकाचें काम सोडावें लागलें. तारीख ८ मे १८९२ रोजीं ग्लासगो येथें त्याचा मृत्यु झाला. भूस्तरशास्त्रांतहि यानें बरीच भर घातली आहे.

**थॉमसन, जोसेफ** (१८५८-१८९५)—आफ्रिकेंतील एक स्कॉटिश शोधक. विल्यम थॉमसनचा हा मुलगा पेनपॉंट येथें जन्मला. कांहीं वर्षे खाणींत काम केल्यानंतर तो एडिंबरो युनिव्हर्सिटींत गेला व तेथें १८७८ सालीं पदवीधर झाला. त्यानंतर भूगर्भशास्त्रज्ञ म्हणून त्यास रॉयल जिऑग्रॉफिकल सोसायटीबरोबर पूर्व आफ्रिकेंत जाण्याची संधि मिळाली. कीथ जॉन्स्टनच्या मृत्यूनंतर, न्यासा, टांगानिका वगैरे ठिकाणीं झालेल्या सफरींचें नेतृत्व थॉमसनकडेच आलें होतें. टांगानिकाच्या दक्षिण टोंकास वळसा घालून त्यानें रूकवा सरोवर शोधून काढलें. अनेक सफरी करून तो १८८० सालीं इंग्लंडास गेला. व त्यानें 'टु दि सेंट्रल आफ्रिकन लेक्स अँड बॅक' नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध केलें. यानंतर त्यानें मसाइलंड येथें सफर केली. या धाडसी प्रवासाचें वृत्त स. १८८४मध्यें त्यानें, 'थ्रू मसाइलंड' या पुस्तकांत प्रसिद्ध केलें आहे. नॅशनल आफ्रिकन कंपनीतर्फे त्यानें १८८५ मध्यें सोकोटोकडे सफर काढली व सोकोटो व ग्यानडो येथील सुलतानांकडून तहाबद्दल मान्यता मिळविली. नायगेरिया येथें ब्रिटिशांचें हित साधण्यास या तहामुळें फार मदत झाली. सन १८८८ मध्यें दक्षिण मोरोक्कोंत प्रवास करून त्यानें 'ट्रॅव्हल्स इन् दि ॲटलास अँड सदर्न मोरोक्को' नांवाचें पुस्तक लिहिलें. ऱ्होडेशिया प्रांतांत, ब्रिटिश साउथ आफ्रिकन कंपनीला, राजकीय व व्यापारी हक्क मिळविण्यास थॉमसनची फार मदत झाली. हा शोधक लंडन येथें मरण पावला. वरील पुस्तकांत न आलेल्या अशा त्याच्या प्रवासाच्या बऱ्याच मनोरंजक हकीकती कांहीं मासिकांतून व 'प्रोसिडिंग्ज ऑफ दि रॉयल जिऑग्रॉफिकल सोसायटी' मधून प्रसिद्ध झालेल्या आहेत. थॉमसन हा मोठा धैर्यशाली, निश्चयी व दमदार असा मनुष्य होता. पुढारी होण्याचे गुण त्याच्या अंगांत होते; त्यामुळें पहिल्या प्रतीच्या शोधकांत थॉमसनची गणना करण्यांत आली आहे.

**थॉयराइड पिंडवृद्धि रोग** (गॉइटर)—हा, पिंड कंठाचें झाड हातास लागतें त्या सुमारास त्वचा व स्नायूंच्या खालीं असतो व तो रोगामुळें वाढून रोगलक्षणें होतात.

कारणें.—ज्या प्रांतांत चुनखडीची जमीन असते अशा भागांत हा रोग होतो. परंतु त्या चुनखडीनें पाणी बिघडून हा रोग होतो किंवा कसें याविषयीं माहिती कळली नाहीं. हिंदुस्थान व इंग्लंड देशांत हा रोग आढळतो; परंतु स्विटझर्लंड, इटली, टायरोल, स्टिरिया, सॅव्हॉय वगैरे देशांत व प्रांतांत विशेष आढळतो. आपल्या देशांत चित्राळ आणि गिल्जित या खोऱ्यांत आढळतो; परंतु तेथें चुनखडी, म्याग्नेशिया अगर लोहमिश्रित जमीन व त्यामुळें बिघडलेलें जड पाणी यापैकीं कांहींच कारण संभवत नसल्यामुळें कसला तरी अज्ञात जंतु कारण असावा असा तर्क धावतो. या प्रांतांतील पाणी नेऊन तें गाळलें असतां गाळल्यावर जो चोथा रहातो तो एखाद्या मनुष्यास थोडथोडा सुमारें पंधरा दिवस पोटांत दिल्यानें हा रोग होण्यास आरंभ झालेला पाहिला आहे. परंतु पाणी उकळून नंतर गाळून चोथा खाण्यास दिला तर मात्र हा रोग उत्पन्न होत नाहीं, हाहि पण अनुभव घेऊन पाहिला. शिवाय ज्या ठिकाणीं हा रोग आढळतो तेथें शुद्ध हवेची कमतरता, गर्दी, अस्वच्छता हींहि कारणें त्याबरोबर असतात. इंग्लंडांत व आणखी कांहीं ठिकाणीं बायकांत हा रोग विशेष आढळून येतो. याचाच सांथीसारखा एक प्रकार आहे. त्यास क्रेटिन रोग म्हणतात. त्यांत रोगी खुजा, जाड व मोठ्या डोक्याचा, मंद, बुद्धिहीन, अर्धवट, बेडसर, मोठें पोट आणि वांकडे पाय असलेला, बटबटीत चेहरा व डोळ्यांमध्यें अंतर फार असलेला, फेपट्या व पसरट नाकाचा, सुरकतलेली खरखरीत त्वचा, चिंचोळी छाती अशा स्वरूपाचा असतो. हा सांथीचा रोग लहान मुलांत सुरू होतो; मुलांस बोलणें व चालणें व यौवनावस्था नेहमीं पेक्षां

फारच उशीरा येते व यौवनावस्था प्राप्त झाली तरी विषयोपभोग लालसा अल्पच असते.

ल क्ष णें.—ह्या पिंड त्यांत तंतुमय रचना वाढून मोठा होतो; अगर त्यांत क्यान्सरादि असाध्य ग्रंथि उत्पन्न होते. पिंडाची वाढ मध्यम व फार असते कंठाच्या दोन्ही बाजूस किंचित् फुगीरपणा येऊन अल्प आकारापासून कवठासारखे कंठाच्या पुढें आवाळूप्रमाणें दिसणाऱ्या मोठया गांठीप्रमाणें तें असतें. अंमळ जाड मान व कंठाच्या ठायीं फुगीरपणा येवढेंच लक्षण कांहींनां असतें;पण रोग मोठा असल्यास त्याचा दाब श्वासव अन्ननलिकेवर पडून खाणें व श्वासोछ्वास या क्रियांनां अडचण पडूं लागते. या दाबामुळें होणाऱ्या व्यतिरिक्त इतर कांहीं लक्षणें होत असतील तर या पिंडांतील रसाच्या कमतरतेमुळें थायरॉइड संकोचननामक रोगाचीं तीं चिन्हें जाणावीं. क्यान्सर रोगामुळें पिंड मोठा असल्यास तो चांचपतांना हातास कठिणपणा व टेंकाळें लागतात;व रोगी वयानें पन्नास वर्षांच्या पुढील असतो. सार्कोमा वगैरे असाध्य ग्रंथींहि या पिंडास होतात.

उ प चा र.—रोगट स्थानाचा त्याग करावा आणि हवा, पाणी, अन्न व व्यायामादि आरोग्यविषयक बाबी जेवढ्या सुधारतां येतील तेवढ्या सुधाराव्यात. बाष्पोदक अगर पावसाचें पाणी पिऊन राहून रोग बरा झाल्याचीं उदाहरणें आहेत. आयोडीन या औषधाचा अर्क ( २ थेंब पाण्यांतून रोज ३ वेळां ) आणि त्याची वाफ ही या रोगावर महागुणकारी आहे. आयोडीनचें मलमहि बाहेरून चोळावें व त्याची बाष्पयुक्त हवा श्वासोच्छ्वासांत उपयोगी असते. पण या इलाजाचा अतिरेक झाल्यास या पिंडांतील उपयुक्त रसाचें आधिक्य होऊन प्रकृतीस त्रास होतो, तो न होईल इतक्या बेतानें औषध घ्यावें. जनावरांच्या थॉयराइड पिंडापासून केलेला अर्क व सत्व रोग्यास देऊन निदान तरुण रोग्याची व्याधि तरी दूर होते. पोटांत थायमल ( ओव्याचें सत्त्व ) व बेटानॅपथाल हीं व अशासारखीं जंतुघ्न औषधें देऊनहि फायदा झाल्याचें दिसून येतें. हे उपचार कित्येक महिने सुरु ठेवले पाहिजेत. अति मोठया रोगासाठीं व असाध्य ग्रंथींसाठीं शस्त्रवैद्याच्या साहाय्यानें ह्या रोग काढावा लागतो.

ग्रेव्ह अगर बेस्डो यांचा थॉ य रा इ ड वृ द्धि रो ग.—या थॉयरॉइड पिंडवृद्धीमुळें होणारा दुसरा एक रोग असून त्याचा ग्रेव्ह या इंग्रज वैद्यानें व बेस्डो या जर्मन वैद्यानें १८३५ व १८४० सालीं शोध लावून याचीं कारणें व बटबटीत पुढें येणारे डोळे, हृदयकंप व गात्रकंप वगैरे लक्षणें निदर्शनास आणली.

का र णें.—ह्या रोग पंधरापासून तीस वर्षांच्या स्त्रियांनां विशेषतः होतो; म्हणजे बारा रोगी असले तर त्यांपैकीं ११ स्त्रिया : १ पुरुष असें प्रमाण आंकड्यांवरून ठरतें. अगोदर पंडुरोग, रक्तदोष वगैरे रोग, तसेंच उन्मादरोग बहुधा झालेला असतो व तेंच दुखणें आहे असें या नवीन रोगाच्या आरंभीं वाटतें. दुखण्यास आरंभ राग, लोभ, मत्सर, अशा कांहीं मनोधर्मामुळें अगर डोक्यास इजा होऊनहि होतो. आईस रोग होतो व पुढें तो लेकीस झाला अशी कधीं कधीं आनुवंशिकताहि दिसून येते; व कांहीं कुटुंबांत बहिणी व भाऊ या सर्वांनां ह्या रोग होतो.

लक्षणेः—हीं फारच सावकाशपणें प्रगट होत असतात. प्रथम हृदयासंबंधीं:तें जोरानें व जलद धडधडणें व हात लावून पाहिलें तर त्याचा धक्का हातास नेहमींपेक्षां अधिक जागेपर्यंत लागणें हीं लक्षणें दिसून येतात. मानेंतील दोन्ही बाजूंकडील धमन्याहि इतक्या जोरानें उडतात कीं त्यांची जाणीव रोग्यास होते; व नाडीचें प्रमाण १२० ते १४० पर्यंत दर मिनिटास होतें; तथापि त्याचा आलेख काढला असतां त्यावरून कांहीं इतर रोगाचा बोध होत नाहीं.रोग्यास थोड्या श्रमानें धाप लागते व पुढें हृदय, स्नायु अशक्त व पातळ होऊन नंतर त्यांत जाडपणा येतो.

या रोगांतील पिंडवृद्धि पाहिली तर पूर्वी वर्णन केलेल्या रोगाएवढी नसते, तथापि गळ्यावर पिंडाच्या ठिकाणीं हात ठेवला तर त्याखालील मोठ्या, विस्तृत व जोरानें उडणाऱ्या धमन्यांत वहाणाऱ्या रक्तप्रवाहामुळें हातास त्यांची कंपयुक्त हालचाल कळते, व नलिकायंत्रानें त्यांत विकृत ध्वनि ऐकूं येतो. रोग्याच्या दोन्ही डोळ्यांतील बटबटीतपणामुळें तो घाबरट व कसासाच दिसून या डोळ्यांच्या लक्षणावरून रोगनिदान करणें सोपें जातें. डोळे इतके पुढें व बाहेर येतात कीं बुबुळाखालील व वरील पांढरा भाग हे दोन्ही एकाच वेळीं सहज दिसतात व रोग्यास त्यांवर पापण्या नीटपणें मिटून घेतां येत नाहीत. जागेपणीं पापण्या मिटतां येत असल्या तरी झोंपेत मात्र त्याचे डोळे उघडे रहातात, व हें फार वेळ चालूं राहिलें तर बुबुळावर फुलें पडून सारा येतो. रोग्यानें बुबुळ खालीं वर वगैरे फिरवलें असतां दुसऱ्या डोळ्याच्या पापण्यांचें त्या बुबुळाच्या हालचालीशीं असें स्वाभाविक साहचर्य व परस्परानुवर्ति हालचाल असावी तशी ती मुळींच नसते. हें लक्षण कधीं कधीं डोळ्यांच्या बटबटीतपणाच्या अगोदरहि दिसून येतें व क्वचित तें नसतेंहि यास त्याच्या महापंडित शोधकाच्या नांवावरून व्हॉन ग्रेफचें लक्षण असें म्हणतात.याशिवाय डोळ्यांच्या हालचालीसंबंधीं आणखी कांहीं दोष, ( दोन पदार्थ दिसणें वगैरे ) असतात; तथापि डोळ्यांच्या आंतील भाग यंत्रानें तपासला तर त्यांत अगर कनीनिका व तिची हालचाल यांत विकृति नसते. फक्त नेत्रांतील अंतस्थ शिरा रक्ताधिक्यानें फार फुगून नागमोडीसारख्या व लठ्ठ होतात. आणखी एक महत्त्वाचें व नेहमीं असणारें लक्षण म्हणजे साधारणपणें सतत चालू रहाणारा हातापायांतील—व एकंदर शरीरांतीलहि म्हटला तरी चालेल—असा सूक्ष्म कंप हें होय. आळस, सुस्ती, पांडुरता, श्रम थोडेसुद्धां हातून न होणें, भूक नसणें किंवा

अनियमित प्रकारची भूक, घावरटपणा, मस्तकशूळ, घेरी, मोंवळ, चिडखोरपणा, गहिंवर येऊन रडणें, उलघाल होणें, उन्माद होणें या व इतर चिन्हांवरून रोग्याचें आरोग्य बिघडलें आहे असें दिसतें. औदासिन्य, नाना प्रकारचा भ्रम, वेड हींहि लक्षणें आढळतात. हातापायांस मोठा कंप कधीं असतो व त्याकडे कोणी लक्ष लावून पहात आहे असें रोग्याच्या लक्षांत आलें तर घाबरटपणा व हृदयकंप फार वाढतो रोगी कृश होतो व अंगांत थोडाबहुत ज्वर असतो. कोणा रोग्याची त्वचा काळवंडते व कोणा रोग्याची पांढऱ्या कोडाप्रमाणें होते. अंगांत उष्णता वाढली आहे असें भासतें. मानेंत व मस्तकांत एकदम रक्त चढलें असें रोग्यास भासतें; एकदम घाम सुटतो अगर जुलाब होतात. मधून कांहीं काळपर्यंत लघवींत अलब्यूमिन अगर शर्करा जाते व असें झालें म्हणजे साखरेचे पदार्थ व साखर खाल्यानें प्रकृति बिघडते. रोग्याचें बोलणें व आवाज रडका, चिडका व अशक्त झालेला असतो. या सर्व लक्षणांत कधीं चढ तर कधीं उतार असा प्रकार होत असतो. हीं सर्व लक्षणें होण्याचें कारण थॉयरॉइडपिंडांच्या वृद्धीमुळें त्यांत फाजील रसोत्पत्ति होऊन तिचा शरिरांत सदुपयोग न होतां तिच्यापासून शरीरास पीडा होते हें होय.

साध्यासाध्य विचार.—हें चेंगट दुखणें बरें होण्यास फार वेळ लावा लागतो; कांहीं रोगी विवक्षित मर्यादेपर्यंत बरे होऊन नंतर त्याच्या पलीकडे सुधारणा होत नाहीं. कांहींचें बहुतेक दुखणें बरें होतें; परंतु डोळ्यांची विकृति वगैरे एखादें लक्षण शिलक रहातें. अशा रोग्यांची संख्या शेंकडा ६०।७० असते. शेंकडा १० ते १५ रोगी हृदयदौर्बल्य, क्षीणता यामुळें मरतात. याहून थोडे रोगी डोळे जाऊन अगर थॉयरॉइडसंकोचन रोग होऊन मरण पावतात.

औषधोपचार.—अमुकच औषध या रोगावर रामबाण आहे असें म्हणतां येत नाहीं म्हणून औषधोपचार बरेच दिवस चालू ठेवले पाहिजेत. डोंगरी हवा, पूर्ण विश्रांति, अल्प व्यायाम व हलकें परंतु साधें व पौष्टिक अन्न यांचा उपयोग फार होतो. चहा, काफी, दारू, तंबाखू यांच्या योगानें रोग वाढतो. सोमल, कॉनव्हालेरिया, स्ट्रोफॅथस, डिजिटालीस, बेलाडोना, अर्गट व पोटयाशियम ब्रोमाइड या औषधांनीं फायदा होतो. सोडा सॅलिसिलेट हेंहि चांगलें औषध आहे. विजेच्या पेटीची ऋण तार मानेवर व धन तार मानेच्या कण्यावर या तऱ्हेनें लावावी. तिचा प्रवाह हलका असावा व अशाच रीतीनें डोळ्यासहि तो लावावा. दररोज पांच दहा मिनिटें पिंडास 'क्ष' किरण घेतल्यानें बरें वाटतें. बर्फहि पिंडावर ठेवतात व त्यामुळें फायदा वाटतो. मूत्रपिंडावरील पिंडाचें सत्त्व गुणकारी आहे. थॉयराईड सत्वापासून रोग चढतो. जनावरांना तो पिंड चारून त्यांची लस टोंचून उपयोग झाला नाहीं, तथापि थॉयराइड पिंड काढून टाकलेल्या शेळीचें दुग्धपान केल्यानें गुण येतो. असल्या दुधाच्या वाळवून दुग्धशर्करामिश्रित वड्या गुणकारी आहेत. अशा प्राण्यांच्या वाळवलेल्या रक्तापासून थॉयरोडेक्टीन हें औषध करतात तेंहि चांगलें आहे. पहिलें व दुसरें औषध १ ड्राम आणि ५ ग्रेन या प्रमाणांत रोज ३।४ दां घेतात. भयंकर रोगलक्षणें असतां थॉयराइडमध्यें शिरणाऱ्या धमन्या तोडून त्यांचीं तोंडें बांधून नंतर त्या पिंडाचा जितका तुकडा तोडणें असेल तितका तोडून बाकीचा शिलक ठेवतात.

**थॉयराइड-संकोचनरोग** ( मीक्झीडेमा )—या रोगामध्यें थॉयराइड पिंडरसाची कमतरता त्या पिंडाच्या रोगामुळें व आकुंचनामुळें असते. हा रोग जन्मतः असला म्हणजे मूल खुळें होतें; व त्या रोगास क्रेटिन रोग म्हणतात. परंतु मोठेपणीं रोगास आरंभ झाला तर त्या रोगास वरील नांव आहे.

कारणें.—तीसपासून पन्नास वर्षें वयाच्या बायकांत हा रोग विशेष आढळतो. दारिद्र्य, आनुवंशिकता यांचाहि थोडा कारणसंबंध असावा; परंतु रोग्याचा धंदा, हवा, पाणी, जमीन यांचा कांहीं रोगोत्पत्तीशीं संबंध नाहीं. अगोदर कफक्षय, भ्रम असणें व वरचेवर प्रसूति हींहि कारणें असावींत.

लक्षणें.—रोग हळूहळू झाल्यामुळें त्याचें चिन्हाड कायम झाल्यावर पहिल्यापेक्षां अधिक रुंदट चेहरा, नाक, पापण्या व ओंठ जाड होणें हीं लक्षणें दिसूं लागतात; पिंवळट कांति व दोन्हीं गालांवर लाली आणि ओंठाचा रंग तांबडा अगर निळसर होतो. हातपाय सुजल्यासारखे, सर्वांगाची त्वचा जाड होणें, व खोऱ्याप्रमाणें हात व पाय रुंद होणें हीं लक्षणें असतात. त्वचा रुक्ष व कोंडा निघत असलेली, घाम न येणें, भिंवया, पापण्या व मस्तकाचे केश गळणें व नखें खुरटल्याप्रमाणें होणें हीं लक्षणें असून पडजीभ व घसा सुजतो आणि जीभ जाड होते. दांत किडतात व पडूं लागतात. रोगी स्त्री चालणें, बोलणें व विचारांत मंद व बुद्धिहीन व भ्रमिष्टाप्रमाणें होते. बोलणें देखील जड येतें. विस्मृति, चिडखोरपणा, संशयी स्वभाव, सुस्ती हे दुर्गुण जडून भ्रम, आंचके येणें व कंप हीं लक्षणें असतात. हातपाय गार असतात. सर्दी लवकर बाधते, नाडी जलद व रक्तांतील लाल पेशी कमी होऊन, पांडुरता, बद्धकोष्ठ, पाण्यासारखी लघवी व साखर कमीजास्ती खाल्ली तरी अपाय न होणें हीं लक्षणें असतात. आर्तव नष्ट होतें. घुणघुणा फुटणें, हिरड्यांतून रक्त अगर मूळव्याध यांपैकीं कांहीं होतें. रोग फार दिवस टिकल्यामुळें रोगी मध्येंच फुप्फुसदाह, खोकला, क्षय असल्या दुखण्यानें अगर थकून, झिजून मरतो.

उपचार.—इतर प्राण्यांच्या थॉयरॉइड पिंडापासून केलेलें सत्त्व अगर तो पिंडच किसून अगर कुटून खाल्यानें रोग बरा होतो; अगर मेंढीचा पिंड ताजा काढून रोग्याच्या त्वचेखालीं कलमाप्रमाणें चिकटवल्यानें अगर त्याचें ग्लिसरीनयुक्त सत्त्व टोंचून अंगांत घातल्यानें हा रोग आश्चर्यकारक रीतीनें बरा

होतो. यांपैकीं पहिला उपाय सोयीस्कर असून या पिंडाच्या वड्या विकत मिळतात. औषधानंतर लागलीच वरील सर्व रोगलक्षणें कमी होऊं लागतात. औषध जास्त काळ घेतल्यानेंहि डोकें दुखणें, जलद नाडी, ओकारी, मळमळ, जुलाब, मलूलपणा हीं लक्षणें होतात. म्हणून हीं लक्षणें न होतील अशा बेतानें औषध घ्यावें. अशा रीतीनें प्राण्यांचे शारीरिक पिंड पोटांत घेऊन रोग बरे करणें हा केवढा मोठा उपयुक्त व अजब शोध आहे बरें ! ज्याप्रमाणें लस टोंचल्याची चिकित्सा ( उपचार ) निघाली आहे तशीच या शारीरिक पिंडचिकित्सेचा पाया बराच मजबूत घातला गेला आहे; व या ओघानें ती माहिती ( अंतस्रावकपिंडचिकित्सा ) येथें देणें भाग आहे.

शरीरांत पाणथरी, रसग्रंथि, अस्थिमगज, या रक्त तयार करणाऱ्या रचना आहेत त्याप्रमाणें थॉयराइड, मूत्रपिंडस्थ लघु पिंड, स्त्रीअण्डाशय, वृषण वगैरे जे अनेक पिंड शरीरांत आहेत त्यांत रोग झाला तर ठराविक प्रकारचीं रोगलक्षणें होतात. यावरून असें अनुमान काढलें आहे व तें सिद्धहि झालें आहे कीं शरीरास उपयुक्त असा विशिष्ट रस या प्रत्येक पिंडांत जोंपर्यंत तयार होतो तोंपर्यंत आरोग्य असतें व त्या पिंडांच्या रोगामुळें त्यांतील विशिष्ट रसोत्पत्ति बंद झाल्यावर होणारीं रोगलक्षणें दुसऱ्या प्राण्यांतील त्या पिंडाचें सत्त्व दिल्यानें दूर होतात. या कांहीं पिंडामध्यें अन्य पिंडरसवर्धक व कांहीं पिंडांत अन्यपिंडरसोत्पत्तिनिग्रामक अगर प्रतिबंधक द्रव्य असतें; व या दोन्हीं द्रव्यांस अनुक्रमें "हारमोन" आणि "श्यालोन" हीं नांवें आहेत; व म्हणून आज कित्येक वर्षें या द्रव्याचा (इतर प्राण्याच्या पिंडापासून ) औषधाऐवजीं उपयोग केला जात आहे व त्यांत बऱ्याच कामीं यश आलें आहे.

हे अंतस्थ द्रवपिंड(आंत शरीरोपयोगी रस उत्पन्न करणारे) शरीरांत पुढें दिलेल्या प्रकारचे असतातः—( १ ) थायराईड, ( २ ) प्यारा थॉयरॉईड, ( ३ ) मूत्रपिंडावरील पिंडाचें वेष्टण ( ॲड्रिनलस ),( ४ ) पिच्युइटरी पिंड( मेंदूच्या खालीं असतो ), (५) थायमस ( गर्भाच्या छातींत असतो ), ( ६ ) पिनियल ( मेंदूमधील ), ( ७ ) ग्रीवाधमनीपिंड ( मानेंत ), ( ८ ) कटिरपिंड ( माकडहाडाच्या जवळील मोठ्या धमनीवर ), त्याचप्रमाणें ( ९ ) प्यांक्रिया पिंड- ( १० ) मूत्रपिंड, ( ११ ) वृषण आणि ( १२ ) स्त्रीअंडाशय. या सर्वांच्या अंतस्थ रसामुळें एकमेकांच्या कार्यावर व शरीरांतील आरोग्य राखण्याच्या कामीं उपयोग आहे; व यांच्या अंतस्थ सत्त्वाचा औषधाप्रमाणें उपयोग हल्लीं केला जातो. व उत्तम गुण येतो. मूत्रपिंडावरील पिंडास रोग झाल्यानें ॲडिसनचा रोग होतो व त्यांत अति दुर्बलता, वांति होणें व वर्ण पालटून काळा होणें हीं लक्षणें होतात. मूत्रपिंडस्थ पिंडाच्या वेष्टणाच्या ग्रंथिरोगामुळें मुलांनां अकालीं यौवन येतें व स्त्रियांनां मर्दानीपणाचीं चिन्हें दिसतात.पिच्युइटरी पिंडाच्या रोगामुळें मोठ्या माणसांनां मुखहस्तपादास्थिवृद्धिरोग ( एक्रोमेगॅली ) होतो व रोगी मूल असल्यास स्थूलशरीररोग होतो अगर षंढत्व येऊन शरीरांत मेदवृद्धि होते. पिनियल पिंडाच्या रोगामुळेंहि मेदवृद्धि होते पण षंढत्वाच्या ऐवजीं अकालीं म्हणजे बालपणांत विषयलालसा जागृत होते. दुसरी मौज अशी आहे कीं यांपैकी एखादा पिंड काढून टाकला तर त्याचें कार्य कांहीं बावतींपुरतें तरी इतर दोन अगर तीन ठराविक पिंड करतात व म्हणून ते पिंड मोठेहि होतात. अशा प्रकारची संघव्यवस्था व सहकार्यशक्ति त्यांच्यांत आढळते. थॉयराइड पिंड गरोदरपणांत व आर्तवकाळीं थोडासा वाढतो व थॉयराइड संकोचनरोगांत आर्तव नष्ट होतें. वृषणच्छेदनानंतर व गरोदरपणानंतर पिच्युइटरी पिंड वाढतो. या प्रकारचा हा नवीन, उपयुक्त व मनोरंजक शास्त्रविषय हल्लीं उदय पावत आहे.

**थॉर्नहिल, सर जेम्स** (१६७६-१७३४).—हा आंग्ल चितारी मेलकोंबरेजीस येथें जन्मला. बाळपणींच त्याचा बाप वारल्यामुळें, तिसऱ्या विल्यमचा चितारी थॉमस हायमूर याच्याकडे त्यास उमेदवार म्हणून ठेवण्यांत आलें. स. १७१५ मध्यें त्यानें हॉलंड, फ्लँडर्स व फ्रान्स येथें प्रवास केला. हायमूरच्या पश्चात् ॲनराणीनें त्यास आपला दरबारी चितारी म्हणून नेमलें. सेंटपॉलचर्चचा घुमट त्यानें आठ तऱ्हेनें रंगविला व त्यामुळें तो प्रसिद्धीस येऊं लागला. मूरपार्क व हर्टस् यांचे दिवाणखाने रंगविण्याचें काम थॉर्नहिलनेंच केलें होतें. ब्लेनहेमचा विस्तीर्ण दिवाणखाना, हँपटन कोर्ट येथील राजकन्येचें अंतःपुर, साउथसी कंपनीचा भव्य सोपान, विपोलचें देऊळ, ग्रीनविच रुग्णालयांतील प्रशस्त जागा इत्यादि विविध कामें त्यानें केलीं होतीं. क्वीन्स कॉलेज, मेलकोंबरेजीस चर्च, न्यूटन, हाऊस ऑफ कॉमन्स, इत्यादिकांचीं रम्य चित्रें त्यानें काढलीं आहेत. स. १७२४ मध्यें कलेचें शिक्षण देणारी संस्था काढावी असें त्यानें सुचविलें परंतु त्याची योजना सरकारनें विचारांत न घेतल्यामुळें त्यानें आपल्याच घरीं एक शाळा काढली.आपल्या कलेवर त्यानें बरेंच द्रव्यार्जन केलें.स.१७१५ त त्यास पहिल्या जॉर्जकडून 'नाइट' असा किताब मिळाला. १७१९ सालीं तो पार्लमेंटांतहि निवडून गेला. पुढें त्याच्या गांवींच थॉर्नहिलचा अंत झाला. त्याच्या मुलास नंतर दुसऱ्या जॉर्जचा चितारी म्हणून नेमण्यांत आलें. थॉर्नहिलच्या कामांत प्रसिद्ध चितारी रॅफेल याचें कसब व्यक्त होतें असें म्हणतात.

**थाळनेर**—मुंबई, जिल्हा पश्चिम खानदेश. शिरपुरं तालुक्यांतील तापी नदीवर वसलेलें हें एक खेडें आहे. ११२८ सालांत हें खेडें गौळी किंवा अहीर लोकांच्या ताब्यांत होतें. १४ व्या शतकांत फरुकी राजानें हें आपलें मुख्य ठिकाण केलें. पुढें १६ व्या शतकांत तें मोंगलांच्या ताब्यांत जाऊन १७७० सालीं हें गांव पेशव्यांच्या

मिळालें. पुढें कांहीं दिवस होळकराकडे राहून हें १८१८ मध्यें इंग्रजांकडे गेलें. येथें एक मजबूत किल्ला आहे.

**थाला**—मुंबई, खेडा जिल्ह्यांतील हा एक ईशान्येकडील तालुका आहे. क्षेत्रफळ २५० चौरस मैल. १९०१ साली लोकसंख्या ७२९८०. १९०३-०४ सालीं सारा व कर यांचें उत्पन्न २.१ लक्ष रुपये होतें. थाला हें या तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे.

**थिऑसफी, पूर्व परंपरा.**—थिऑसफी हा शब्द थिऑस् म्हणजे ईश्वर व सोफिया म्हणजे ज्ञान या शब्दांपासून झाला आहे. अर्थात थिऑसफी या शब्दाचा अर्थ ईश्वरविषयक ज्ञान, ब्रह्मज्ञान किंवा आत्मज्ञान असा आहे. थिऑसफी ही एकोणिसाव्या व विसाव्या शतकांतील सर्व पृथ्वीवर पसरलेली एक अध्यात्मिक चळवळ आहे व थिऑसॉफिकल सोसायटी नांवाच्या सार्वराष्ट्रीय संस्थेच्या द्वारानें ती चालविली जात आहे. थिऑसॉफीमध्यें असें कोणतेंहि तत्त्व नाहीं कीं जें सर्वस्वी नवीन आहे. पण थिऑसफी या नांवाखालीं ज्या अनेक गोष्टी आज मोडतात त्या पूर्वी केव्हांहि अशा रीतीनें दुसरीकडे एकत्र संघटित झालेल्या आढळत नाहींत. अनेक ठिकाणचे जुने मणी एकत्र गोळा करून ते एका विशिष्ट रीतीनें नवीन सूत्रांत ओंवल्यास त्या सरास एका अर्थानें नवीन म्हणावें लागतें व एका अर्थानें जुना म्हणावें लागेल. थिऑसफींत हा जुनेपणा कोणता आहे व त्यांत कोणतें नवीन सूत्र अनुस्यूत आहे हें समजण्यास जगांतील अनेक परमार्थसाधनांचा पूर्वेतिहास अवलोकिला पाहिजे.

सर्व धर्मांचा प्राचीन इतिहास पाहिला तर धर्मतत्त्वाचें ज्ञान युक्तिवादानें किंवा तत्त्वविचारानें होत नसून अनुभवानें होत असतें हा विचार त्यांत अनादिकालापासून दिसून येतो. भगवद्गीतेंत श्रीकृष्णांनीं स्वतःला आपल्या पूर्वजन्मांचें प्रत्यक्षज्ञान असल्याचें स्पष्टपणें सांगितलें आहे. गौतमबुद्धाचाहि स्वतःच्या पूर्वजन्मासंबंधानें असाच अनुभव दीघनिकायांतील सामञ्जफलसुत्तांत नमूद आहे. आर्यावर्तांतल्या प्राचीन काळच्या ऋषींस सामान्य मनुष्यास अज्ञात असलेल्या अनेक गोष्टींविषयींचें ज्ञान असे असे उल्लेख संस्कृत वाङ्मयांत जागोजाग आहेत. प्रत्येक धर्माचे संस्थापक किंवा त्यांतील प्रारंभींचे थोर पुरुष युक्तिवादप्रचुर तत्त्वविचारानें जाणारे नसून "द्रष्टे" होते. त्यांस "अपरोक्षानुभूति" होती असें सर्व धर्मांचें म्हणणें आहे. हा अनुभवाचा मार्ग व तद्विषयक संस्था यांचें अस्तित्त्व प्राचीन ऐतिहासिक प्रसिद्ध थिऑसफिस्टांच्या मतें पुराव्यानिशीं सिद्ध होण्याजोगें आहे. प्राचीन काळीं ईजिप्त देशांत "मिस्टरीज" नामक गुप्त धर्मसंप्रदाय होते अशा प्रकारचे प्लूटार्क व हिरोडोटस यांच्या ग्रंथांत उल्लेख आहेत. ग्रीस देशांत असले संप्रदाय असल्याचा भरभक्कम पुरावा असून ऑर्फिक व एल्यूसिनियन संप्रदायांचा उल्लेख प्लेटोनें आपल्या ग्रंथांत केला आहे. ख्रिस्तीधर्माच्या स्थापनेनंतर ख्रिस्ती लोक व इतर लोक यांच्यामध्यें जीं भांडणें झालीं त्यांच्या तत्कालीन वर्णनावरून त्यावेळीं गुप्त संप्रदाय असल्याचा पुरावा आज मिळत आहे. पायथॅगोरस् नामक पुरुषाचा क्रोटोना येथें गुप्त संप्रदाय होता ही गोष्ट इतिहासज्ञांस अवगत आहे. हे संप्रदाय गुप्त असल्यामुळें त्यांच्याविषयीं तुटपुंजीच माहिती इतिहासज्ञांस उपलब्ध व्हावी हें साहजिक आहे. कालवशात जशा उर्वच संस्था अवनत होतात तद्वत् हे संप्रदायहि जरी अवनत होऊन ध्येयच्युत झाले तरी ते मूळांत अपरोक्षज्ञान देण्याकरितां स्थापिले होते व त्यांच्या उत्कर्षाच्या दिवसांत तें ज्ञान त्यांत दिलें जात असे अशी आमची समजूत आहे. पायथॅगोरसच्या संप्रदायांत जाणारीं माणसें नीतीनें उच्च दर्जाचीं असावीं लागत. गणित, गायन, वादन वगैरे कला त्यांस शिकाव्या लागत, खाण्यापिण्यांत व राहण्यांत शुचित्व व साधेपणा त्यांस जरूर असे. इंद्रियें स्वाधीन ठेवणें, ध्यान करणें वगैरे विषयींचे धडे त्या संप्रदायांत शिकविले जात ही गोष्ट, व पायथॅगोरस पुनर्जन्मवादी होता व ट्रोजनयुद्धांत मी पूर्वजन्मीं यूफॉर्वस नांवाचा वीर होतों याची त्यास आठवण होती ही ग्रीक वाङ्मयांत लिहिलेली गोष्ट या, दोन्ही एकत्र केल्या म्हणजे पायथॅगोरसच्या संप्रदायाचा हेतु अनुभवाचा मार्ग दाखविण्याचा होता असें सहजच वाटतें. अलेक्झँड्रिया शहरांत इसवी सनाच्या तिसऱ्या शतकांत निओप्लेटॉनिझम नावाचा एक संप्रदाय असल्याचें नमूद आहे. त्याचा पुढारी प्लोटायनस म्हणून एक विख्यात पुरुष होऊन गेला. त्याला ध्यानादि साधनांनीं ईश्वराशीं एकरूप होण्याचा अनेकवार अनुभव आला होता असें त्याचा मित्र पारफिरी यानें लिहिलें आहे. रोझिक्रूशन संप्रदाय हिंदुस्थानांत कित्येक शतकें आहे. चैतन्य, नाथ वगैरे संप्रदाय हिंदुस्थानांत कित्येक शतकें आहेत. ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरीच्या शेवटीं आपल्या नाथ-संप्रदायाची परंपरा सांगितली आहे व ती साक्षात् श्रीशंकरापासून निघालेली आहे असें ते लिहितात. नाथसंप्रदायांत अनुभवमार्ग उघडा केला जात असे असें ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायावरून दिसून येतें. महाराष्ट्रांतले बरेच संत आम्हांस प्रत्यक्ष अनुभव आहे असें स्पष्ट म्हणतात व ते कोणत्यांना कोणत्या तरी संप्रदायांतले होते असें इतिहास सांगतो. या सर्व गोष्टींवरून या संप्रदायाचा मूळ हेतु अनुभवमार्ग उघडा करण्याचा होता असें कोणासहि वाटल्यावांचून रहाणार नाहीं, मग ते संप्रदाय आज कितीहि अवनत झालेले असोत. आत्मज्ञान व धर्म या बाबी युक्तिवादाच्या, तत्त्वविचाराच्या किंवा अंधश्रद्धेच्या आहेत असें एकोणिसाव्या शतकांतील बुद्धिमान् लोकांस वाटून व ती समजूत सर्वत्र पसरून धर्मास जेव्हां मालीन्य आलें, तेव्हां अनुभवाच्या मार्गावर विशेष जोर देऊन धार्मिक चळवळ करणें अवश्य झालें. थिऑसफीच्या

चळवळीचें हें विशेष धोरण होतें व आजहि आहे व त्यामुळें जडवादास बराच आळाहि पडला आहे.

**धर्मभेद व अंधश्रद्धा कमी करण्याची आवश्यकता.**—जगाचा इतिहास पाहिल्यास त्यांत धर्माच्या नांवावर माणसांनीं एकवटण्याऐवजीं एकमेकांचे गळेच कापले आहेत असें दिसून येतें. मनुष्यजातीसमोर आर्थिक, सामाजिक, संस्कृतिविषयक, शिक्षणविषयक वगैरे जे बिकट प्रश्न आहेत ते सोडविण्यास मनुष्यामनुष्यांनीं आपलीं भांडणें टाकून सहकारितेनें मोठ्या प्रमाणावर प्रयत्न केल्याविना चालवयाचें नाहीं हें अलीकडे अधिकाधिक स्पष्ट होत आहे. म्हणून सर्व मनुष्यांमध्यें बंधुत्वाची जाणीव उत्पन्न करावी असें थिऑसफीच्या चळवळीचें धोरण ठेवण्यांत आलें आहे. पण यांतहि अगदीं नवीन असें कांहींच नाहीं. गौतमबुद्धानें जेव्हां धार्मिक चळवळ केली तेव्हां त्याचा पेशा नवीन संस्थापक असा नसून हिंदुधर्माचा सुधारक असा होता, व जो विष्णु तोच बुद्ध असें विष्णूच्या अवतारांत बुद्धाचें नांव घालून हिंदुधर्महि म्हणूं लागला. या दोन्ही वृत्ती धर्मभेद कमी करण्याच्या आहेत हें उघड आहे. अकबरानें अबुलफाझल, फैजी वगैरे पंडितांस हातीं धरून सर्व धर्मांस सहानुभूति दाखविण्याचा जो प्रयत्न केला त्यांतहि धर्म ही शक्ति भेदसंवर्धक न होतां ऐक्यपोषक व्हावी हें धोरण होतें. या धोरणाचाच अधिक परिपोष थिऑसफीच्या चळवळींत करण्यांत येत आहे.

अलीकडच्या काळीं निरनिराळ्या देशांत जीं बुद्धिमान् व कार्यक्षम माणसें झालीं आहेत त्यांपैकीं बरींच धर्माविषयीं बेफिकीर किंवा धर्मास प्रत्यक्ष विरोध करणारीं आहेत ही गोष्ट कोणासहि नाकबूल करतां येण्यासारखी नाहीं. असें होण्याचें कारण धर्मांत श्रद्धेचा भाग अधिक येऊन विचारस्वातंत्र्यास फांटा मिळाला हें होय. आजच्या सुशिक्षित व हुशार लोकांचें पाठबळ धर्मास पाहिजे असेल तर त्यांस धर्मानें पूर्ण विचारस्वातंत्र्य दिलें पाहिजे, हें लक्षांत ठेऊन थिऑसफीच्या चळवळींत व्यक्तीस पूर्ण विचारस्वातंत्र्य देण्यांत आलें आहे. या धोरणांतहि अगदीं नवें असें कांहीं नाहीं. कारण हिंदुधर्मानें चार्वाकादि नास्तिकांस, अनीश्वर सांख्यांस किंवा आपल्या विचारांस मोकळें मैदान ठेवून योग्य दिसेल त्या दिशेनें जाणाऱ्या तत्त्ववादी लोकांस केव्हांहि आडकाठी केली नव्हती, व आजहि मनुष्याच्या विचारस्वातंत्र्याच्या आड हिंदुधर्म येत नाहीं. हेंच धोरण थिऑसफीच्या चळवळीनें सार्वत्रिक करण्याचा यत्न केला आहे व सर्व धर्मांचे व सर्व विचारांचे लोक धर्माभ्यासासाठीं एकत्र आणिले आहेत. नास्तिकांसहि या चळवळींत मज्जाव नाहीं. थिऑसफिस्टांनीं अमुक एका गोष्टीवर श्रद्धा ठेविली पाहिजे असा बिलकुल निर्बंध घातला नाहीं. असे निर्बंध घातल्यानें अप्रामाणिकपणा व दंभ यांस उत्तेजन मिळत असल्यानें, सर्वांशीं बंधुत्वानें वागण्याची ज्याची ज्याची इच्छा असेल मग त्याचीं मतें व त्याचा धर्म कोणताहि असो त्यास थिऑसफिकल सोसायटीचा सभासद होता यावें असें सोसायटीनें ठरविलें आहे. धर्माचा अभ्यास करून प्रत्येकानें आपलीं मतें विचारपूर्वक बनविल्यास त्यांस अंधश्रद्धेपेक्षां पुष्कळच अधिक किंमत आहे. या दृष्टीनें पाहिलें तर थिऑसफिकल सोसायटी हा धर्मजिज्ञासूंचा एक संघ आहे व सत्यजिज्ञासा हें एकच त्यांस त्या संघांत एकत्र ठेवणारें बंधन आहे.

**थिऑसफिकल सोसायटीची स्थापना व तिचे उद्देश.**—वरील धोरणानुसार थिऑसफीचा अर्थात् आत्मविद्येचा प्रसार करण्याकरितां थिऑसफिकल सोसायटी १७ नोव्हेंबर १८७५ सालीं अमेरिकेंत न्यूयॉर्क येथें स्थापण्यांत आली. ती स्थापण्याचें मुख्य श्रेय कर्नल ऑलकॉट व मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांस आहे. डब्ल्यू. क्यू. जज्, डा फेल्ट वगैरेंची त्यांस मदत होती. सोसायटीच्या स्थापनेच्या वेळीं जे उद्देश मुक्रर करण्यांत आले त्यांच्या शब्दांत वरील धोरणास अधिक स्पष्टीकरण यावें एतदर्थ नंतर फरक करण्यांत आलेला आहे. सोसायटीस १९०५ सालीं कायदेशीर स्वरूप देण्यांत आलें व तिचे जाहीर उद्देश पुढीलप्रमाणें आतां मुक्रर झाले आहेत:

( १ ) जात, धर्म, लिंग, वर्ण इत्यादि भेदांस बाजूस ठेवून मानवजातीच्या बंधुत्वाचा केंद्र बनविणें.

( २ ) धर्म, तत्त्वज्ञान व भौतिकशास्त्रें यांच्या तुलनात्मक अभ्यासास उत्तेजन देणें.

( ३ ) अज्ञात सृष्टिनियम व मनुष्याच्या अंतरंगांत असलेल्या गूढ शक्ती यांचें संशोधन करणें.

या हेतूंचें अधिक स्पष्टीकरण करण्याचें कारण नाहीं. जडवादास विरोध करून धर्माचें आजच्या काळास अनुरूप असें पुनरुज्जीवन करण्याचा सोसायटीचा कटाक्ष त्यांवरून उघड होत आहे.

**थिऑसॉफिकल सोसायटीचा प्रसार व सभासदांचे उद्योग.**—सोसायटी स्थापल्यावर थिऑसफीच्या प्रसारार्थ कर्नल ऑलकॉट व मॅडम ब्लॅव्हॅट्स्की हीं दोघें अमेरिका सोडून व वाटेंत इंग्लंडमध्यें उतरून १६ फेब्रुवारी १८७९ रोजीं मुंबईस आलीं त्यावेळीं इंग्रजांस हिंदुस्थानावर रशियाची स्वारी होण्याचें फार भय वाटत असे. मॅडम ब्लॅव्हॅट्स्की रशियन असल्यामुळें सरकारनें हिंदुस्थानांत गुप्तपोलिसांचें शुक्लकाष्ट त्यांच्या मागें लाविलें व थिऑसफीच्या प्रसारास प्रारंभीं विरोध केला. पुढें ही शंका अस्थानीं असल्याचें सरकारच्या नजरेस आलें. हिंदुस्थानांत सर्वत्र प्रवास करून या उभयतांनीं सोसायटीच्या अनेक शाखा स्थापन केल्या. आर्य समाजाचे स्वामी दयानंद सरस्वती व आपण सहकारिता करावी असें त्यांस वाटून त्या दिशेनें त्यांनीं प्रयत्नहि केले होते, पण आपला व स्वामींजींचा दृष्टिकोण अगदीं वेगळा आहे असें आढळून आल्यानंतर त्यांनीं तो प्रयत्न सोडून दिला. हिंदुस्थानांत त्यांस पायोनीअर पत्राचे संपादक मि. सिनेट हे भेटले व सिनेट यांस थिऑसफीची गोडी

लागून ते सभासद झाले. पुढें ते सोसायटीचे एक पुढारी झाले व त्यांनीं अनेक पुस्तकें लिहून थिऑसफीचा यूरोपियन राष्ट्रांत प्रसार करण्याचें श्रेय घेतलें. कर्नल ऑलकॉट यांनीं सीलोन व जपान येथें जाऊन बुद्ध धर्माचें पुनरुज्जीवन केलें. तसेंच सर्व जगभर हिंडून पुष्कळ ठिकाणीं सोसायटीच्या शाखा स्थापल्या. १८८२ सालीं मद्रासनजीक अड्यार येथें जमीन खरेदी करून सर्व सोसायटीचें आद्यपीठ तेथें त्यांनीं स्थापिलें. या ठिकाणीं सोसायटीचा अध्यक्ष रहावयाचा असतो. कर्नल ऑलकॉट यांच्या मृत्यूनंतर डा. ॲनी बेझंट या अध्यक्ष निवडून आल्या व त्यांनीं थिऑसफीच्या प्रसाराचें कार्य तसेंच पुढें चालविलें. आज ( म्हणजे १९२३ सालीं ) सोसायटीच्या सर्व जगातील शाखा १३६० आहेत व त्या सर्व देशांत आहेत. छत्तीस देशांतील शाखा संघरूपानें कार्य करण्याइतक्या कार्यक्षम झाल्यानें त्या प्रत्येक देशांत "सेक्शन" नांवाचा शाखांस एकवटणारा संघहि झाला आहे. सर्व जगांतील सोसायटीचे सभासद ३६७७३ आहेत. हिंदुस्थानांत शाखा ३९१ आहेत व सभासद ५०१६ आहेत. हिंदुस्थानांत लोक भोळे असल्यामुळें इतर देशांपेक्षां थिऑसफीस हिंदुस्थानांतच फार अनुयायी मिळाले आहेत. कित्येक थिऑसफीस विरोधी असणारांकडून विधान करण्यांत येतें तें चुकीचें आहे हें या आंकड्यांवरून उघड होत आहे. सोसायटीच्या सभासदांपैकीं हिंदी सभासद $\frac{1}{7}$ किंवा स्थूलमानानें $\frac{1}{7}$ आहेत व जगाच्या व हिंदुस्थानच्या लोकसंख्येची तुलना केल्यास हें हिंदी सभासदांचें प्रमाण कमीच आहे असें दिसून येतें. उलटपक्षीं इंग्लंडांत व अमेरिकेतील संयुक्त संस्थानांत अनुक्रमें ४६५८ व ६७६१ सभासद आहेत. हिंदुस्थानापुरतें सोसायटीनें मुख्य ठिकाण काशी हें आहे.

थिऑसफिकल सोसायटीच्या सभासदांस पूर्ण मतस्वातंत्र्य असल्यामुळें कोणतीहि स्थानिक चळवळ किंवा संस्था सोसायटीशीं एकरूप होऊं शकत नाहीं. पण अशा अनेक चळवळी व संस्था सोसायटीच्या सभासदांनीं आपल्या वैयक्तिक जबाबदारीवर सर्व जगभर चालविल्या आहेत. त्या सर्वांचा नामनिर्देश या छोट्या लेखांत करणें शक्य नाहीं. फक्त हिंदुस्थानांतलि कांहीं महत्त्वाच्या कार्यांचाच निर्देश येथें करतां येईल. कर्नल ऑलकॉट यांनीं सिलोनांत सुमारें २०० ते २५० शाळा स्थापिल्या आहेत; व तीन कॉलेजें काढिलीं आहेत. शाळांतील विद्यार्थ्यांची संख्या सुमारें ३००००आहे. तसेंच त्यांनीं अस्पृश्य वर्गाकरितां मद्रासनजीक पांच शाळा काढिल्या व त्यांतून ८०० ते १००० विद्यार्थी व विद्यार्थिनी शिकत असतात. कर्नलनीं अड्यार येथें एक लायब्ररी स्थापिली आहे व ताडपत्रावर लिहिलेल्या जुन्या पोथ्यांचा त्यांत मोठा संग्रह असल्यानें तीस तज्ज्ञांत फार मान आहे. डॉ. बेझंट यांनीं १८९८ सालीं कित्येक मित्रांच्या साहाय्यानें काशी येथें सेंट्रल हिंदु कॉलेज स्थापिलें व त्याची परिणति हिंदु युनिव्हर्सिटींत झाली आहे. त्याखेरीज त्यांनीं इतर अनेक कॉलेजें काढून चालविलीं आहेत व त्यांत काशीस एक स्त्रियांचें कॉलेजहि आहे. राजकीय चळवळीसाठीं त्यांनीं अनेक संस्था व वर्तमानपत्रें चालविलीं आहेत व थिऑसफीच्या प्रसारार्थ अनेक उद्योग सुरू केले आहेत.

मराठी भाषेंत अध्यात्मशास्त्राचें पुनरुज्जीवन व्हावें यासाठीं थिऑसफिकल सोसायटीच्या सभासदांनीं महाराष्ट्रांतील शाखांस केंद्रीभूत करून मराठी थिऑसॉफिकल फेडरेशन नांवाची संस्था काढिली आहे व ती एक मासिक पुस्तक व त्याशिवाय दुसरें वाङ्मय प्रसिद्ध करीत असते.

इतर देशांतहि असेच अनेक उद्योग सभासदांकडून होत आहेत. त्यांत सी. डब्ल्यू. लेडबीटर यांच्या परिश्रमानें ख्रिस्ती धर्माच्या शुद्ध्यर्थ स्थापिलेलें लिबरल कॅथॉलिक चर्च व आगामी जगद्गुरूंच्या आगमनार्थ स्थापलेली ऑर्डर ऑफ दि स्टार इन धि ईस्ट या संस्था प्रमुख आहेत. वरील संस्था सर्व जगभर पसरलेल्या आहेत.

सोसायटीचें काम सर्व जगभर व सर्व भागांतून चालतें. तें सर्वत्र नियमबद्ध असल्यामुळें पुष्कळ कठिण गोष्टी सोसायटींत सहज होतात. उदाहरणार्थ 'ॲट दी फीट ऑफ दी मास्टर' या पुस्तकाचा सर्व जगभर प्रसार करावा असें सभासदांस वाटल्यानंतर सत्तावीस भाषांत त्याचें भाषांतर होऊन त्या पुस्तकाच्या सुमारें एक लाख प्रती लोकांत प्रसृत करण्याचें काम सोसायटींत सहज होऊं शकलें.

थिऑसफीचीं तत्त्वें:—थिऑसफिकल सोसायटीच्या सभासदांनीं अमुक एका गोष्टीवर विश्वास ठेविला पाहिजे असा निर्बंध नाहीं. पण थिऑसफीचे ( आत्मविद्येचे ) असे कोणतेच सिद्धान्त नाहींत असें अनुमान काढल्यास तें चुकीचें होईल. थिऑसफीचे अनेक सिद्धान्त आहेत पण माणसाची खात्री पटल्याशिवाय त्यानें त्यांवर विश्वास ठेवावा असें बाह्य बंधन सोसायटींत नाहीं. लोकांच्या बुद्धीला पटतील अशा रीतीनें ते सिद्धान्त जनतेसमोर मांडिले म्हणजे 'सत्यमेव जयते नानृतम्' या न्यायानें आज नाहीं उद्यां ते विचारी लोकांस पटतील असा थिऑसफिस्ट लोकांचा विश्वास आहे. या सर्व सिद्धान्तांच्या मुळाशीं ते अनुभवगम्य आहेत हा विचार मुख्य आहे. थिऑसफीमध्यें शब्दप्रमाण व अनुमानें यांपेक्षां अनुभवास अधिक किंमत देण्यांत येते. गीतादि ग्रंथांत पुनर्जन्माचें शब्दप्रमाण आहे, व अनुमानप्रमाणाच्या साहाय्यानें पुनर्जन्माचा सिद्धान्त माणसास पटतो. या गोष्टी जरी खऱ्या आणि महत्वाच्या असल्या तरी जन्मविषयीं प्रत्यक्ष ज्ञान होऊं शकतें, कांहीं प्रक्रियेनें माणसास स्वतःचे पूर्वजन्म आठवतात व दुसऱ्यांचेहि पहातां येतात या गोष्टीस थिऑसफिस्ट लोक अधिक महत्व देतात; आणि गीतेच्या पूर्वींहि माणसें पुनर्जन्म घेत होतीं.अनुमानप्रमाणानें एखाद्या माणसाची पुनर्जन्माविषयीं खात्री न पटली तरी त्यासहि मरणोत्तर यथाकाल पुनर्जन्म घ्यावा लागेल असें

म्हणून धर्मसिद्धान्त अनुभवसिद्ध आहेत व शब्दप्रमाण व अनुमानप्रमाण हीं फक्त ते सिद्धांत सामान्य जनतेस बुद्धिगम्य करण्याचीं साधनें आहेत असें ते प्रतिपादितात. जर प्राचीन कालीं अमुक एका प्रक्रियेनें माणसास आपले पुनर्जन्म आठवत असत आणि पतंजली तसें स्पष्ट सांगतो, तर आजहि त्याच प्रक्रियेनें तोच अनुभव माणसास आला पाहिजे असें म्हणणें ओघानेंच येतें. विशेष प्रकारचा प्रयत्न करून कित्येक अतींद्रिय गोष्टींचा आम्हीं अनुभव घेतला आहे व कांहीं धर्मसिद्धान्ताचें अपरोक्ष ज्ञान संपादन केलें आहे असें कांहीं थिऑसाफिस्टांनीं आपल्या वाङ्मयांत स्पष्टपणें प्रतिपादिलें आहे. यासंबधाची थिऑसफिस्टांची विचारसरणी पुढीलप्रमाणें आहे. धर्माचें क्षेत्र भौतिकशास्त्राच्या क्षेत्राप्रमाणें प्रयोगगम्य आहे. इंद्रियास जें दिसतें व बुद्धीस जें आकलन करतां येतें त्याची योग्य शहानिशा करून मनुष्य भौतिक शास्त्रांत शोध करतो व तेथें यंत्रादि साधनांचा उपयोग करितो. मनुष्याच्या इंद्रियशक्तीस मर्यादा आहे ही गोष्ट पदार्थविज्ञानशास्त्रसिद्ध आहे. अमुक एका मर्यादेपेक्षां हवेचीं आंदोलनें अधिक जलद झालीं, तर त्यांचा ध्वनि माणसाच्या कानास ऐकूं येत नाहीं, आणि अमुक एका मर्यादेपेक्षां ईथरचीं आंदोलनें सावकाश झालीं तर त्यांचा प्रकाशहि माणसाच्या डोळ्यास दिसत नाहीं. याचें कारण मनुष्याचा कान व डोळा यांच्या शक्ती मर्यादित आहेत हें होय. आतां जर कांहीं प्रक्रियेनें मनुष्याचा कान व डोळा हीं अधिक नाजुक करतां आलीं, अर त्यांच्या शक्ती अधिक विकसित करतां आल्या तर हें अश्रुत ध्वनि व अदृष्ट प्रकाश त्याच्या इंद्रियाच्या टप्प्यांत येतील, व पूर्वी जेथें कांहीं ऐकूं येत नव्हतें किंवा दिसत नव्हतें तेथें ध्वनि व प्रकाश त्यास अनुभवास येऊन सामान्य माणसास इंद्रियातीत असणारे कित्येक प्रकार त्याच्या प्रत्यक्ष ज्ञानाच्या कक्षेंत येतील. सृष्टीमधल्या सर्वच गोष्टींस जर विकास व उत्क्रांति आहे तर इंद्रियांच्या शक्ती विकासक्षम असल्या पाहिजेत. इंद्रियांच्या शक्तींचा व बुद्धीच्या सामर्थ्याचा माणसानें विकास करावा म्हणजे इंद्रियांस न समजणाऱ्या गोष्टी त्यास पहातां येतील व बुद्धीस आकलन न होणारीं प्रमेयें समजूं लागतील. या मार्गानें कांहीं थिऑसफिस्ट लोकांनीं जाऊन अतींद्रिय गोष्टींविषयींचें संशोधन केलें आहे असें ते लोक सांगतात. कोणत्याहि मनुष्यास प्रयत्नतः हा विकास करतां येऊन त्यास संशोधक बनतां येईल असें त्यांचें म्हणणें आहे. मरणोत्तर स्थिति, सप्तलोक, मनुष्याचे सूक्ष्म कोष, पुनर्जन्म वगैरेसंबंधानें थिऑसफीच्या वाङ्मयांत, कोणत्याहि धर्मग्रंथांत आज उपलब्ध आहे त्यापेक्षां अधिक व तपशीलवार व व्यवस्थित माहिती दिलेली आहे व ती या मार्गानें मिळवलेली आहे असें थिऑसफीचे पुढारी प्रतिपादीत आहेत. हें सर्व संशोधन भौतिकशास्त्रांतील संशोधनासारखें आहे. त्यांत चुकण्याचा संभव नाहीं असें नाहीं, पण जरूर ती शक्ति पूर्ण विकसित झालेल्या अनेक संशोधकांनीं पुन्हां पुन्हां संशोधन केल्यास भौतिकशास्त्राप्रमाणें चुकी होण्याचा संभव येथेंहि पुष्कळच कमी करतां येतो. ज्यांस ही विचारसरणी पटून हें संशोधन बरेंचसें विश्वसनीय वाटत असेल त्यांच्या धर्मसमजुती अधिक दृढ व्हाव्या हें साहाजिक आहे. या संशोधनांत पुष्कळ नवीन माहिती आली आहे व आज जे नवीन प्रश्न उत्पन्न होत आहेत त्यांचीं उत्तरेंहि त्यांत मिळण्याजोगीं आहेत. तसेंच जगांतील धर्मांच्या मुख्य सिद्धांतांशीं हें संशोधन जमत असल्यामुळें ते सिद्धांत व संशोधन यांचा परस्परांस दुजोरा मिळत आहे. संशोधन-पद्धति कशा प्रकारच्या असतात याची माहिती लेडबीटर कृत 'क्लेयरव्हायन्स' या पुस्तकांत जिज्ञासूंस मिळेल.

पृथ्वी व रील धर्म.—संशोधनावर भिस्त ठेऊन थिऑसफीचा सर्व धर्मासंबंधानें असा सिद्धांत आहे कीं ज्या पुरुषांनीं आपल्या अंतर्गत शक्तींचा ज्ञान-क्रिया-प्रेम-शक्तींचा अतिशय विकास करून घेतला होता अशांनींच ते मुळांत स्थापिले आहेत, व म्हणूनच मुख्यांच्या गोष्टींविषयीं सर्व धर्मांत साम्य आलें आहे. उदाहरणार्थ, आत्मा, परलोक, कर्म, ईश्वर, पुनर्जन्म, त्रिमूर्ति, देवादि कोटी, इत्यादिक गोष्टी बहुतेक सर्व धर्मांस संमत आहेत, याचें कारण त्या गोष्टी सत्य आहेत व त्यांचें प्रत्यक्ष ज्ञान सर्व धर्मसंस्थापकांस होतें हें होय. जगांतील धर्मांच्या शिकवणुकींत मुळींच फरक नाहींत असें थिऑसफीचें म्हणणें नाहीं. ज्यांस धर्म शिकवावयाचा त्यांची परिस्थिति, त्यांची योग्यता, त्यांच्या गरजा वगैरे अनेक बाबींचा विचार करून धर्मसंस्थापकांनीं निरनिराळ्या सिद्धांन्तांवर अधिक जोर द्यावा, निरनिराळ्या प्रकारची धर्मांची मांडणी करावी किंवा आचरणाच्या बाबतींत निरनिराळ्या सवलती द्याव्या असें सहजच झालें आहे व त्यामुळें जगांतील धर्मांत मूळपासूनच कांहीं फरक आहेत. पण हे फरक बहुशः आचारांच्या बाबतींत असून मूलग्राही नाहींत. याशिवाय कालवशात् धर्म अवनत होऊन व त्यांत अज्ञ लोकांस फिरवाफिरव करण्यास वाव सांपडून धर्माधर्मांत भिन्नपणा व क्वचित् विरोधहि आले आहेत. पण ही भिन्नता सामान्यतः अज्ञानोद्भव आहे. ही दृष्टि पटली म्हणजे धर्माधर्मांमधील विरोध मावळून जातो व सर्वच धर्म मूलतः खरे असल्यामुळें ईश्वराकडे जाण्याचे निरनिराळे मार्ग म्हणून प्रत्येक विचारी माणसास ते सर्व धर्म कमी अधिक आदरणीयच वाटूं लागतात. यासंबधानें कांहीं थिऑसफीय संशोधकांचें असें म्हणणें आहे कीं, सर्व धर्म ज्ञानी माणसांनीं स्थापिले आहेत. इतकेंच नव्हे तर तींच तींच ज्ञानी माणसें पुनः पुनः जन्म घेऊन जगाच्या हितार्थ निरनिराळे धर्म स्थापतात. उदाहरणार्थ व्यास, हर्मीज्, झोरोआस्टर, आर्फियस् व गौतमबुद्ध हे एकाच पुरुषाचे निरनिराळे जन्म आहेत. गोपाळकृष्ण व ख्राइस्ट हे दुसऱ्या एका विभूतीचे दोन जन्म आहेत, असें त्यांनीं प्रतिपादिलें आहे.

जगास जर हें मान्य होईल तर धर्माधर्मामधील तंटे नाहींसे होतील हें उघड आहे. या दृष्टीनें पहातां " माझा धर्म श्रेष्ठ, तुझा कनिष्ठ, त्यांत मुक्ति नाहीं यासाठीं तूं माझ्या धर्मांत ये " असें सांगणारी मिशनरी वृत्ति थिऑसफीस मान्य असणें शक्य नाहीं. विशेष कारण असल्याशिवाय माणसानें एक धर्म टाकून दुसरा अंगिकारावा हें थिऑसफीच्या दृष्टीनें अयोग्य ठरतें. सर्व धर्मांविषयीं आदरबुद्धि माणसानें ठेवावी, व आपल्या स्वतःच्या धर्माचा अभ्यास करून त्यांत कांहीं अवनत झालेलें असल्यास नवीन कालास जुळेल अशा रीतीनें तें सुधारण्याचा त्यानें प्रयत्न करावा असा सर्वांस थिऑसफीचा उपदेश आहे. सर्व धर्मांस समान असणारा जो भाग वर सांगितला त्यासच कित्येकदां " थिऑसफी " असें नांव देण्याचा अनेक थिऑसफिस्टांचा संप्रदाय आहे.

ईश्वर व सृष्टीची रचना.—तत्त्वविचारापेक्षां संशोधनावर या थिऑसफीची अधिक भिस्त असल्यामुळें, ब्रह्म–माया, द्वैत–अद्वैत, सगुण–निर्गुण वगैरे जे अगदीं अंतिम भूमिकेवरचे प्रश्न, त्यांविषयीं थिऑसफींत फारसा ऊहापोह करण्यांत येत नाहीं. संशोधकांची जितकी संशोधन शक्ति विकसित झाली आहे त्याच्या पलीकडचे हे प्रश्न असल्यामुळें संशोधक त्यांविषयीं ठाम असें कांहींहि सांगूं शकत नाहीं. रेषा, बिंदु, वगैरेंच्या व्याख्या पूर्णपणें निर्दोष केल्याविना मी भूमिति शिकणार नाहीं असें अडेलपणानें न म्हणतां ज्याप्रमाणें भूमितीच शिकणारा विद्यार्थी सिद्धांत शिकावयास तयार असतो व भूमिति उत्कृष्ट अवगत झाल्यावर या व्याख्या आपणास अधिक चांगल्या करतां येतील असें मानितो, तद्वत् द्वैत–अद्वैतादि अंतिम प्रश्नांवर अडून न बसतां धर्मजिज्ञासूनें कर्म, पुनर्जन्म, मरणोत्तर स्थिति वगैरे अलीकडचे विषय समजून घ्यावे, व त्याच्या साहाय्यानें स्वतःस अधिक कर्तव्यदक्ष व स्वतःचें वर्तन अधिक शुद्ध करावें, व अशा रीतीनें त्याच्या अंतःशक्तींचा विकास झाला म्हणजे त्यास अंतिम प्रश्नाचा विचार करण्याचा अधिकार येईल असें थिऑसफिस्ट मानतात. सृष्टीचा प्रारंभ कसा व कां झाला, द्वैत खरें कीं अद्वैत खरें वगैरे फार पुढल्या प्रश्नांविषयीं संशोधन करण्याइतकें सामर्थ्य थिऑसफीय संशोधकांस अद्याप आलेलें नाहीं व स्वतःची प्रगति करण्याकरितां सध्यां तरी या प्रश्नांस पूर्ण समाधानकारक उत्तर शोधण्याची सामान्य माणसास जरूरी नाहीं. मनुष्य व ईश्वर मुळांत एकच आहेत व मनुष्य पूर्ण झाला म्हणजे तो ईश्वराशीं तादात्म्य पावणार आहे असा थिऑसफीचा सिद्धांत आहे; त्यावरून थिऑसफी अद्वैतास अनुकूल आहे असें एकाअर्थी दिसतें. पण थिऑसफीय संशोधक जितके पुढें गेले आहेत तेथवर तरी माणसाचा व्यक्तिरूप केंद्र नाहींसा झाल्याचा त्यास अनुभव नाहीं. इतकेंच नव्हे तर उलट " मुंगी उडाली आकाशीं । तिणें गिळिलें सूर्यासी । " या मुक्ताबाईच्या अनुभवाप्रमाणें व्यक्तीचें व्यक्तित्व कायम राहून सर्व सृष्टि त्यांतच सामावली आहे असा संशोधकांस अनुभव येत असल्यामुळें थिऑसफीस द्वैतवादी म्हणण्यासहि हरकत नाहीं. संशोधकानें उत्क्रान्तीच्या चढावाकडे दृष्टि फेंकली म्हणजे त्या मार्गानें त्यास एकाहून एक श्रेष्ठ अशा विभूतींची लांबच लांब मालिका दिसते; व ही मालिका कोठें संपते याचा त्यास थांग देखील लागत नाहीं. एका विशिष्ट पायरीवर त्यास आपल्या सूर्यमालेचा अधिपति दिसतो. त्याच्या पलीकडे त्याच्याहून अधिकाधिक उच्च अशा अनेक विभूति अस्तित्वांत आहेत, पण त्यांचा महिमा माणसास आकलन करण्यास जास्त जास्त कठिण आहे. सूर्यमालेचा जो अधिपति त्यास थिऑसफींत लोगॉस् किंवा ईश्वर असें म्हणतात. हा आपल्या सूर्यमालेचा जनक. ज्ञान, सामर्थ्य व आनंद यांच्या विशालपणाची मानवी मनानें कितीहि उच्च कल्पना केली तरी त्याच्या ज्ञानाच्या सामर्थ्याच्या पायरीपर्यंत त्यास पोहोंचतां येत नाहीं इतका त्याचा दर्जा मनुष्यांच्या मानानें उच्च आहे. सर्व सूर्यमालेस सबाह्याभ्यंतर व्यापून —पुरुषसूक्ताच्या भाषेनें बोलावयाचें असल्यास—तो आणखी पलीकडे दशांगुळें उरला आहे. प्रकृति व पुरुष हें द्वंद्व त्याच्या पूर्वीच उत्पन्न झालें आहे. पाण्याच्या मध्यभागीं नळीनें फुंकर घातल्यास पाण्यास बाजूस लोटून त्या पाण्यामध्यें जसा बुडबुडा उत्पन्न होतो त्याप्रमाणें सूर्यमालेच्या प्रारंभीं सूर्यमालेच्या क्षेत्रावरील द्रव्यांत असे अनेक बुडबुडे तयार करण्यांत आले व त्या बुडबुड्यांपासून सूर्यमालेंतील सर्व दृश्य–अदृश्य द्रव्य निर्माण करण्यांत आलें. घर जसें विटांनीं बांधिलेलें असतें तशी सूर्यमाला या बुडबुड्यांनीं बांधिली गेली आहे. हे बुडबुडे सर्व सूर्यमालेचे अंतिम परमाणू होत. ईश्वरानें आपल्या मनांत 'तन्मात्रा' कल्पाव्या व तदनुसार या परमाणूंचे संघात बनावे व या प्रत्येक संघातापासून निरनिराळ्या जातींचें द्रव्य बनावें असें होऊन आपल्या सूर्यमालेची उभारणी झाली आहे. आपल्या सूर्यमालेंत दृश्य–अदृश्य जीं द्रव्यें आहेत तीं सात प्रकारचीं आहेत. पृथ्वीसभोंवार जसें हवेचें आवरण आहे त्याप्रमाणें सूर्यमालेंतील सर्व गोलांभोंवतीं या सर्व द्रव्यांचीं आवरणें आहेत. ईश्वराचें स्वरूप ब्रह्मा, विष्णु व महेश असें त्रिविध असतें. ब्रह्मा या शक्तीच्या योगानें सूर्यमालेचीं द्रव्यें तयार होतात. विष्णु या शक्तीच्या योगानें या द्रव्यांचे पुन्हां लहानमोठे संघात तयार करण्यांत येतात व प्रत्येक संघाताच्या अंतर्यामी ती शक्ती जीवरूपानें स्वतः वास करीत असते. उद्भिज्जकोटी, वनस्पतिकोटी, प्राणिकोटी, हेच ते संघात होत. ईश्वरी चैतन्य जीवरूपानें या सर्व कोटींतून क्रमानें विकास पावत असतें व जसजसा विकास अधिक होईल तसतशी जडावस्था कमी होऊन देहांची रचना अधिक नाजुक व व्यवस्थित होत जाते. जीव मनुष्यकोटींत येईपर्यंत ब्रह्मा व विष्णु या दोनच शक्ती कार्य करीत असतात. पण मनुष्यकोटींत त्या जीवाचा प्रवेश झाला म्हणजे शिवशक्ति

त्याशीं संलग्न होते.त्यावेळीं त्यास कारणदेह नांवाचा एक नवीन देह प्राप्त होतो. प्राणिकोटींत जीवास हा देह असत नाहीं व मनुष्यकोटींत शिवशक्ति स्वसामर्थ्ये प्रगट होऊन त्यास हा देह मिळतो. थिऑसफीच्या दृष्टीनें मनुष्यकोटी व प्राणिकोटी यांमध्यें हा फरक आहे. कोणताहि जीव एका कोटींतले सर्व अनुभव घेऊन दुसऱ्या कोटींत जाण्यास फार काळ लागतो व ही सर्व उत्क्रांति सूर्यमालेंतील एकाच गोलावर होते असें नाहीं. आपल्या सूर्यमालेंत दृश्य व अदृश्य असे अनेक गोल आहेत, त्यांचीं अनेक मंडळें आहेत व प्रत्येक मंडळांतील सर्व गोलांवर क्रमानें जीव अनेकवार जातो. या विषयाचा अधिक तपशील येथें देण्यास अवकाश नाहीं. जिज्ञासूस तो "मॅनः व्हेअर, हौ अँड व्हिदर" या पुस्तकांत मिळेल. त्या पुस्तकांतील संशोधन विश्वसनीय मानल्यास पुराणांतील सप्त-समुद्र, सप्त-द्वीपें वगैरेंचीं वर्णनें कांहीं खोल अर्थ सुचवीत असावीं असें वाटूं लागतें. पृथ्वीवर हल्लीं असलेल्या मनुष्यांपैकीं बरीच पूर्वी मंगळावर होतीं असें संशोधक म्हणतात. पृथ्वीवरील मनुष्यांचे थिऑसफींत विभाग करण्यांत आले आहेत. आर्य लोकांस थिऑसफींत पांचवा मूळवंश असें नांव आहे. आर्य लोकांपूर्वी पृथ्वीवर चार मूळवंश होऊन गेले आहेत. चिनी लोक हे चवथ्या मूळवंशांतले आहेत. प्रत्येक मूळवंशांत सात शाखा उत्पन्न होतात. त्यांस उपवंश म्हणतात. आर्यमूलवंशाचा 'हिंदु' हा पहिला उपवंश होय, व 'इंग्रज' हा पांचवा उपवंश होय. दर मूलवंशांत व उपवंशांत कांहीं विशिष्ट गुण उत्क्रांत होतात व मानवदेहाची रचनाहि भिन्न असते. पृथ्वीवर आजपावेतों पांचव्या मूळवंशाचा पांचवा उपवंश उत्पन्न होण्यापर्यंत मजल आली आहे. एकंदर सात मूळवंश पृथ्वीवर व्हावयाचे आहेत, व ते सर्व विकसित झाले म्हणजे पृथ्वी लयावस्थेस जाऊन सर्व जीव पुढील उत्क्रान्तीकरितां बुधावर नेण्यांत येतील असें थिऑसफीच्या वाङ्मयांत लिहिलें आहे.

सप्तलोक सूर्यमालेंतील प्रत्येक गोल ( ग्रह ) वर लिहिलेल्या सात प्रकारच्या द्रव्यांनीं बनलेला आहे हें वर नुकतेंच सांगितलें आहे. हीं द्रव्यें मूळांत एकाच परमाणूपासून बनलेलीं आहेत खरीं, पण एक द्रव्य दुसऱ्यापेक्षां अधिक विरळ किंवा सूक्ष्म, दुसरें त्याहूनहि अधिक विरळ किंवा सूक्ष्म अशी त्यांची परंपरा आहे. सर्वांत घन किंवा जड असें जें आपल्या पृथ्वीवर द्रव्य आहे त्याचा भूलोक बनलेला आहे. भूलोक म्हणजे पृथ्वीचा आपल्या परिचयाचा भाग दगडासारखे घन पदार्थ, पाण्यासारखे प्रवाही पदार्थ, हवेसारखे वायुरूप पदार्थ, इत्यादिकांचा भूलोक बनलेला आहे. त्यांखेरीज "ईथर" नामक जो हवेहूनहि पातळ पदार्थ पृथ्वीवर आहे त्याचाहि समावेश भूलोकांतच होतो. म्हणून सर्व भूलोक मनुष्यास दृश्य नाहीं. त्यांतील हवा व ईथर त्यास दिसत नाहींत असें झालें. वर जीं सात प्रकारचीं द्रव्यें सांगितलीं त्यांपैकीं एकांत भूलोकांतील हें सर्व द्रव्य मोडतें तेव्हां त्यास भूद्रव्य असें मानण्यास हरकत नाहीं. ह्यापेक्षांहि अधिक विरळ व पातळ द्रव्य पृथ्वीवर आहे. त्या द्रव्याचा भुवर्लोक बनलेला आहे. भूद्रव्याचे जसे घनपदार्थ, प्रवाही, वायुरूप पदार्थ असे विभाग वर सांगितले तसे भुवर्द्रव्याचेहि विभाग आहेत. पृथ्वीवर असलेलें भुवर्द्रव्य घन पृथ्वीच्या आंतहि असून तिच्या सभोंवार चोहोंबाजूंनीं पुष्कळ अंतरापर्यंत पसरलेलें आहे. भूद्रव्यापेक्षां भुवर्द्रव्य अधिक विरळ असल्यामुळें हीं दोन्हीं एकमेकांस अडथळा न करतां एकत्र राहूं शकतात. हवेंत धूळ असतां ती धूळ व हवा जशी एकच जागा व्यापितात त्याप्रमाणें भूलोकाचें द्रव्य व भुवर्लोकाचें द्रव्य हीं एकच जागा व्यापून रहातात, व एक द्रव्य दुसऱ्याहून विरळ असल्यामुळें एकाची दुसऱ्यास अडचण होत नाहीं. याचा अर्थ असा कीं भूलोक व भुवर्लोक हे येथेंच आपणासभोंवार पसरलेले आहेत, पण भुवर्लोकाचें द्रव्य हवेपेक्षांहि विरळ असल्यामुळें तें माणसास दिसत नाहीं. भुवर्द्रव्याचा गुण असा आहे कीं माणसाच्या मनांत वासना उत्पन्न झाली कीं त्या द्रव्यांत आंदोलनें उत्पन्न होतात. भुवर्द्रव्याहूनहि अधिक विरळ द्रव्य पृथ्वीस आंत बाहेर व्यापून आहे. त्यास स्वर्द्रव्य म्हणतात व स्वर्लोक ( अर्थात स्वर्गलोक ) त्या द्रव्याचा बनलेला आहे. मनुष्याच्या मनांत विचार उद्भवला म्हणजे या द्रव्यांत लाटा उत्पन्न व्हाव्या असा या द्रव्याचा गुण आहे. अशीं एकंदरींत उत्तरोत्तर विरळ असणारीं सात प्रकारचीं द्रव्यें आपणासभोंवतालीं आहेत. ह्या सात प्रकारच्या द्रव्याच्या समुद्रांत जणूं आपण आहों. या एकेका द्रव्याचा एक एक लोक बनलेला आहे. आपल्या भूलोकीं जसे नाना पदार्थ आहेत तसे इतर लोकांतहि हजारों प्रकार आहेत, मात्र त्यांचें द्रव्य अतिशय विरळ किंवा सूक्ष्म असल्यामुळें मर्यादित शक्तींच्या आपल्या इंद्रियांस त्यांचें अस्तित्व जाणवत नाहीं. थिऑसफीच्या संशोधकांनीं या निरनिराळ्या लोकांच्या रचनेचें व त्यांत रहाणाऱ्या जीवांचें वर्णन आपल्या वाङ्मयांत दिलें आहे. अगदीं विरलतम द्रव्याचे जे लोक त्यांची फारशी माहिती त्यांनीं दिली नाहीं, पण भुवर्लोक व स्वर्लोक यांची बरीच तपशीलवार माहिती त्यांनीं दिली असून आम्हीं ती आमच्या अंतःशक्तींचा विकास करून प्रत्यक्ष मिळविली आहे असें त्यांनीं लिहिलें आहे. स्वर्लोकाहून सूक्ष्म असणारा जो लोक त्यांत माणसाचा आप-परभाव नष्ट होऊन एकत्वाचा अनुभव येतो व "बुद्धेः परतस्तु सः।" या गीतावचनांत जीस बुद्धि म्हटलें आहे त्या रूपानें मनुष्याची जाणीव व्यक्त व्हावयास लागून तर्कपद्धतीचा अवलंब केल्याशिवाय माणसास तिच्या साहाय्यानें एकदम सत्याची निवड करतां येते असा संशोधकांचा त्या भूमिकेविषयींचा अनुभव आहे. संस्कृत वाङ्मयांत दिलेले 'भुवः'

'स्वः' वगैरे सूक्ष्म लोक कोठें तरी दुसरीकडे अंतरावर नसून आपणासभोंवार येथेंच पसरून राहिले आहेत असें या संशोधनावरून सिद्ध होतें.

मनुष्याची रचना.—मनुष्यास अनेक देह किंवा कोष आहेत असा थिऑसफीचा सिद्धांत आहे. मनुष्य हा मूळांत ईश्वरी अंश असला तरी तो प्रकृतीच्या साम्राज्यांत अनुभव घेण्यासाठीं आला असल्यामुळें त्यास त्याकरितां साधन म्हणून अनेक देह दिलेले असतात एका देहापेक्षां दुसऱ्याचें द्रव्य विरळ असल्यामुळें जरी एकाच वेळीं माणसास अनेक देह असले तरी ते एकमेकांत पसरलेले—सबाह्याभ्यंतरनिविष्ट असूनहि परस्परास अडथळा करीत नाहींत. भूद्रव्याचा स्थूल देह बनलेला असतो व भूलोकांत मनुष्य त्या देहानें नाना प्रकारचे उद्योग करूं शकतो. स्थूल देहाचे दोन भाग असतात. एक अन्नमयकोष व दुसरा प्राणमयकोष. अन्नावर पोसलेला हाडामांसाचा जो देह तो अन्नमय कोष; जवळ जवळ त्याच आकारमानाचा प्राणमय कोष असतो. व तो अन्नमय कोषांत पसरून राहिलेला असतो. सूर्यापासून येणारें चैतन्य या कोषाच्या द्वारां शोषिलें जाऊन त्यामुळें स्थूल देह जगतो. प्राणमयकोष ईथरचा बनलेला असतो. भुवर्लोक ज्या द्रव्याचा बनलेला आहे त्या द्रव्याचा माणसाचा जो देह त्यास वासनादेह म्हणतात. मनुष्याच्या मनांत वासना आली कीं प्रथम या देहांत आंदोलनें होऊन तीं सभोंवारच्या भुवर्लोकाच्या द्रव्यांत पसरतात म्हणून या देहास वासनादेह म्हणतात. हा देह दीर्घवर्तुलाकार असून स्थूल देहाच्या बाहेर सर्व बाजूंनीं सुमारें दीड फूट आलेला असतो व या देहास भुवर्लोकांत संचार करून नाना प्रकारचे व्यवहार करतां येतात. यापेक्षांहि अधिक विरल द्रव्याचा—म्हणजे स्वर्द्रव्याचा—माणसास आणखी एक देह असतो त्याचें आकारमान सामान्यतः वासनादेहाइतकेंच असतें. विचारास प्रारंभ प्रथमतः या देहांत आंदोलन होऊन होतो म्हणून त्यास मनोदेह म्हणतात. स्वर्लोकांत व्यवहार करण्याचें हा देह साधन होय. हे सर्व देह दर जन्मीं नवीन असतात. मनोदेहापेक्षां अधिक सूक्ष्म द्रव्याचा जो आणखी एक देह मनुष्यास असतो त्यास "कारणदेह" म्हणतात व दर जन्मांत तो न बदलतां माणसानें अनेक जन्म घेतले तरी त्याचा कारणदेह पूर्वीचाच असतो. म्हणूनच या देहांत जाणीव नेल्यास माणसास पूर्व जन्माची आठवण होऊं शकते. जे अनेक सूक्ष्म देह ते सर्व व्यक्तींचे सारखे विकसित झालेले असतात असें नाहीं. याहिपेक्षां अधिक सूक्ष्म द्रव्याचे देह माणसास असूं शकतात, पण सामान्यतः आज फारच थोड्या माणसांच्या ठायीं त्याचा विकास झालेला आढळतो. सूक्ष्म देहाविषयीं बरीचशी तपशीलवार व सचित्र माहिती थिऑसफीच्या वाङ्मयांत आहे; व डब्ल्यू जे. किलर नामक विद्युत्संशोधकानें कित्येक रासायनिक द्रव्यांच्या पडद्यांमधून मनुष्याकडे पाहिल्यास त्याच्या सभोंवार कांहीं अभ्रासारखें आवरण दिसतें असा जो एक नवीन शोध आपल्या "ह्यूमन आटमॉसफीअर" नामक पुस्तकांत प्रसिद्ध केला आहे त्यावरून या थिऑसफीय संशोधनास थोडीफार पुष्टि येते.

गाढ झोपेंत स्थूल देह व इतर देह सुटे होतात व मनुष्याच्या वासनादेहाचा जितका विकास झाला असेल त्या मानानें तो वासनादेहानें भुवर्लोकांत कमी-अधिक व्यवहार करतो. तो जागा झाल्यावर सर्व कोष पुन्हां एकत्र येतात. भुवर्लोकांतील वासना देहाचे व्यवहार माणसास बहुशः स्थूलदेहांत आठवत नाहींत. पण क्वचित् प्रसंगीं त्याची वेडीवांकडी आठवण स्थूलदेहांत स्वप्नरूपानें येऊं शकते व ही आठवण नीटपणें जागेपणीं माणसास पाहिजे असेल तर त्यास राजयोगाच्या अभ्यासाची आवश्यकता आहे. सामान्य माणसाच्या मनोदेहाचा विकास फारच अल्प झाला असल्यामुळें त्यास त्या देहानें स्वर्लोकांत व्यवहार करतां येत नाहीं. स्वतःच्या सूक्ष्म देहांचा विकास करूनच आम्ही सूक्ष्म लोकांची माहिती मिळविलेली आहे असें थिऑसफीय संशोधकांनीं लिहिलें आहे.

मृत्यु.—मनुष्य मरण्याच्या वेळीं अन्नमयकोष व प्राणमयकोष हे परस्परांपासून सुटे होऊन त्यांमधील बंद तुटतो. नंतर अन्नमयकोषास जाळतात किंवा पुरतात. अन्नमयकोषाबरोबर प्राणमय कोषाचा नाश होतो. मग माणसाची *जाणीव वासनादेहांत जाते, अर्थात तो भुवर्लोकांत* जातो. भुवर्लोक आपणासभोंवतींच आहे. म्हणजे मृत माणसें मरणोत्तर दूर कोठें जात नाहींत असें झालें. पण आपणांस त्यांचे सूक्ष्म देह दिसत नाहींत म्हणून त्यांचें सान्निध्य आपल्यास समजत नाहीं. भुवर्लोक हें वासनेचें माहेरघर असून येथें वासना भूलोकापेक्षां फार अधिक जोरानें व्यक्त होते. मनुष्यानें आपल्या भूलोकांतील आयुष्यांत आपल्या वासना जितक्या प्रबळ केल्या असतील तितका अधिक काळ त्यास या लोकांत काढावा लागतो. वाईट वासना, व्यसनें वगैरे ज्या माणसानें स्वतःस लावून घेतलीं असतील त्यास येथें फार क्लेश होत असल्यानें या स्थितीस कित्येक धर्मांनीं "नरक" असें नांव दिलें आहे. दुर्वासनाधीन व व्यसनी माणसाच्या वासना मरणोत्तर या ठिकाणीं शतपट तीव्रपणानें प्रकट होऊं लागून त्या तृप्त करण्याचीं ऐहिक साधनें मात्र त्यास अलभ्य असल्यामुळें त्या मनुष्यास जणूं काय वासनांचा प्रळयकालीन ग्यास लागल्यासारखें होतें; व जशी एखादी वस्तु हळूहळू जळून नाहींशी व्हावी त्याप्रमाणें या क्लेशाग्निमध्यें जणूं त्याच्या वासना सावकाशपणें जळून नाहींशा होतात; यावेळीं होणारे क्लेश त्या माणसास शहाणपणा शिकवितात. या नरकांत दुसरा कोणी त्या मनुष्यास यातना करीत नसतो. येथें तो फक्त आपल्या कृतकर्मांचें प्रायश्चित्त भोगितो व व्यसन हें अनीतिकारक आहे असा धडा शिकतो. ज्यांच्या वासना वाईट नसतात अशा लोकांस भुवर्लोकांत

दुःख होत नाहीं व कित्येकांस तर सुखहि होतें. वासनांची शक्ति संपली म्हणजे वासनादेह गळून पडतो व मनुष्याची जाणीव मनोदेहांत जाऊन त्यास स्वर्गलोक समोंवार दिसूं लागतो. वाईट वासनांचा पूर्वीच क्षय झालेला असल्यामुळें चांगले विचार व स्वार्थरहित वृत्ति याच आतां त्याच्या अंतरंगांत शिल्लक राहिलेल्या असतात. पंधरा मिनिटांचें भोजन पचविण्यास जसा तीनें चार तासांचा काळ लागतो तद्वत् भूलोकच्या आयुष्यांतील प्रेम, शुद्ध व उदात्त वृत्ति आणि विचार जणूं आपल्या अंतरंगांत पचवून त्यांशीं त्या माणसाचा एकजीव व्हावयाचा येथें प्रयत्न असल्यामुळें येथें तो अतिशय काळ घालवितो. या ठिकाणीं प्रत्येक मनुष्य पराकाष्ठेचा आनंद अनुभवीत असतो. आपल्या सद्गुणांचा परिपाक करून व तो स्वतःच्या अंतरंगांत भिनवून पुन्हां तो मनुष्य जेव्हां जन्मास येईल तेव्हां त्याच्या शीलामध्यें ते गुण अधिक व्यक्त, अधिक भरींव व अधिक प्रबळ व्हावे अशी ही योजना असते. स्वर्गलोकांत माणसास ज्ञानी जीवांकडून उच्च दर्जाचें शिक्षणहि मिळूं शकतें. सद्वृत्तींच्या बरोबर आणिलेलें माणसाचें भांडवल संपलें म्हणजे मग मनोदेहहि गळतो, व त्याची जाणीव कारणदेहांत जाते. सामान्य माणसाच्या कारणदेहाचा बहुतेक मुळींच विकास झालेला नसल्यामुळें येथें तो अल्पकाळ रहातो, आणि पुनर्जन्म घेण्याकरितां स्वर्द्रव्य व भुवर्द्रव्य आकर्षून त्याचे नवीन मनोदेह व वासनादेह बनवितो, व प्रथम स्वर्लोकांत व नंतर भुवर्लोकांत उतरून मातेच्या उदरांत वाढत असलेल्या नवीन स्थूलदेहाशीं संबद्ध होतो आणि यथाकाल बालदेह धारण करून नवीन जन्म घेतो. पूर्वजन्माच्या शेवटीं जाळून किंवा पुरून टाकिलेल्या मागील स्थूलदेहाशीं या नवीन बालदेहाचा कांहींच संबंध नसल्यामुळें त्या नवीन स्थूलदेहाची जाणीव असतांना त्यास मागील जन्माची आठवण सहजच रहात नाहीं. पण सर्व जन्मांत जो कारणदेह कायम असतो त्यांत त्यास जर प्रयत्नतः जाणीव नेतां आली तर त्यास मागील जन्माचा इतिहास आठवूं शकतो.

**पुनर्जन्म व कर्म.**—या क्रमानें माणसानें बऱ्यावाईट गोष्टींचें भांडवल भूलोकांत दर जन्मीं जमवावें, त्यांतील हिणकस भाग मरणोत्तर भुवर्लोकांत धुवून टाकावा व बाकी राहिलेल्या भांडवलाचा परिपाक स्वर्लोकांत करून त्याशीं एकरूप व्हावें व पुन्हां तें सर्व संस्काररूपानें नवीन जन्मीं बरोबर आणून त्याच्या जोरावर अधिक मोठें भांडवल भूलोकांत गोळा करावें आणि असें दर जन्मीं करीत करीत शेवटीं पूर्णज्ञानी, पूर्ण समर्थ व पूर्ण प्रेमी असें त्यानें बनावें ही त्याची भवितव्यता. दर जन्मीं नवीन अधिक अनुभव गांठीं पडावा यासाठीं पुनः पुनः माणसाचे हे जन्म विवक्षित क्रमानें होतात असें संशोधनावरून दिसतें. उदाहरणार्थ मनुष्याचे जन्म वारंवार निरनिराळ्या मानववंशांत, वेगळाल्या संस्कृतींत तसेंच भिन्नभिन्न देशांत व धर्मांत होतात व अशा रीतीनें हरएक प्रकारचे गुण त्याच्या अंगीं येऊन त्याचा विकास चोहोंबाजूंनीं होतो. तसेंच प्रायः सर्व मनुष्यें अनेकवार स्त्री व पुरुष या दोन प्रकारच्या देहांत जन्म घेतात व स्त्रीदेहांत प्रामुख्यानें प्रेम, वात्सल्य, शांतपणा, स्वार्थत्याग इत्यादि श्रेष्ठ भावना व पुरुषदेहांत प्रामुख्यानें बुद्धि, कर्तबगारी, निर्धार, वगैरे अनेक गुण संपादन करून आपली उत्क्रांति करून घेतात. प्रत्येक माणसास जी दर जन्मीं परिस्थिति दिली जाते ती केवळ त्याच्या उत्क्रांतीस पोषक असते. एका जन्मांत माणसास अनेकांचें साहाय्य असेल, पण त्यानें जे गुण संपादन केले असतील ते दृढ व्हावे म्हणून दुसऱ्या जन्मीं त्याचें सर्व साहाय्य काढून घेण्यांत येऊन त्यास आपल्या पायावर उभें रहाण्यास शिकविण्यांत येईल; जास्त उत्क्रांति झालेला मनुष्य लवकर शिकत असल्यामुळें, सामान्य मनुष्यास ज्या संक्रांतींत दोन तीन वेळां जन्मास घालणें अवश्य तेथें त्यास एकच वेळ जन्म देण्यांत येईल; असे अनेक प्रकार पुनर्जन्माच्या क्रियेंत संशोधकांस सांपडले आहेत. तींच तींच माणसें निरनिराळ्या जन्मीं पतिपत्नी, पितापुत्र, गुरुशिष्य, धनीचाकर, स्नेहीस्नेही, बहीणभाऊ, वगैरे वेगळीं नातीं जोडून स्वतःच्या प्रेमास दृढपणा व सर्वांगीपणा आणितात असें संशोधनावरून दिसतें. उत्क्रांतिमार्गांत पुढें पाऊल टाकण्यास जी परिस्थिति योग्य तेथें माणसाचा जन्म होतो हा त्या संशोधनाचा इत्यर्थ दिसतो.

पण जर मनुष्यानें पूर्वी वाईट कर्म केलें असेल तर त्याचा परिणाम म्हणून त्याच्या उत्क्रांतीस पुढील जन्मीं जी स्थिति उत्कृष्ट असेल ती त्याच्या वांट्यास येण्यास प्रतिबंध होतो व कमी प्रतीच्या परिस्थितींत त्याचा जन्म होतो. तसेंच त्याचे ज्या व्यक्तींशीं प्रेमाचे किंवा द्वेषाचे ऋणानुबंध दृढ झाले असतील त्यांकडे तो जन्म घेतांना आकर्षिला जातो. अशा रीतीनें त्यानें जीं कर्में दर जन्मीं केलीं असतील त्यांचे परिणाम भोगणें त्यास भाग होतें. थिऑसफीच्या दृष्टीनें मनुष्य मूळांत ईश्वरांश असल्यानें ईश्वराइतकाच तो स्वतंत्र आहे. याचा अर्थ असा कीं त्याच्यावर बाहेरून दुसऱ्या कोणाचें बंधन नाहीं पण त्यानें स्वतः कोणतेंहि कर्म केलें म्हणजे त्यास त्याचे परिणाम भोगावे लागत नाहींत असें मात्र नाहीं. प्रत्येक कर्माचा परिणाम असतो व मनुष्यानें तें कर्म केल्यास तो अवश्यमेव भोगावा लागतो. तो त्यास नको असेल तर त्यानें तें कर्म करूं नये. मनुष्य हीं जीं स्वकर्मांचीं फळें भोगतो तीं त्यास कोणी देवानें आपल्या लहरीखातर भोगावयास लाविलेलीं असतात असें नव्हे तर तीं केवळ त्याच्या कृत्यांचे परिणाम असतात. भौतिकशास्त्रांत जशीं कारणांचीं कार्यें नियमानें व अचूक फलित होतात तसाच हा प्रकार आहे. कांहीं कर्मांचीं फळें उशीरां—दुसऱ्या जन्मीं—येतात, तर कांहींचीं लवकर येतात. जीं लवकर येतात त्यांचा कार्य-कारण-भाव मनुष्यास समजतो व जीं उशीरा

येतात त्यांचा समजत नाहीं इतकाच दोहोंमध्यें फरक. दुष्कर्मांचीं कटु फळें चाखून मनुष्य शहाणा होतो व पुन्हां दुष्कर्म करीत नाहीं हा कर्माच्या नियमाचा माणसास उपयोग होतो. एका माणसानें दुसऱ्याचें फार नुकसान किंवा फार फायदा केला असेल तर तीं माणसें इटकून पुन्हां कोणत्या तरी जन्मीं एकत्र येऊन कृतकर्मांची परस्पर फेड करतात, पण एकानें दुसऱ्याचें किंचितसें बरें किंवा किंचितसें वाईट केलें असेल तर तीं नीं कर्में जणूं अनामत खातीं लिहिली जाऊन त्यांची फेड अन्य माणसाच्या हातून होते, व स्वार्थबुद्धि पूर्ण सुटून गेल्याविना कर्माचें बंधकत्व नाहींसें होत नाहीं असा ह्या संशोधकांचा अनुभव आहे.

म नु ष्या चें ध्ये य.—थिऑसफीच्या दृष्टीनें मनुष्याच्या सर्व गुणांची पूर्णावस्था म्हणजे "मुक्ति" होय. या पायरीवर मनुष्य पोहोंचतो त्या वेळेस मनुष्यकोटींत ज्ञान, नीतिमत्ता, प्रेम, सामर्थ्य वगैरे गुणांचा जितका विकास होणें शक्य आहे तितका त्याचा विकास झालेला असतो. पण ही स्थिति म्हणजे उत्क्रान्तिमार्गाचा शेवट नव्हे. एम. ए. ची परीक्षा ही युनिव्हर्सिटींत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची अंतिमावस्था असली तरी त्याहीपुढें जसा पोस्ट ग्रॅज्युएट शिक्षणक्रम असतो त्याच न्यायानें 'मुक्तीच्या' पायरीपलीकडेहि उत्क्रान्तिमार्ग आहे, मात्र त्या मार्गावरून जाणारा मनुष्य मनुष्यकोटीच्या पलीकडे गेलेला असतो अशी थिऑसफीची शिकवण आहे. मुक्त झालेल्या पुरुषांचे अनेक वर्ग असतात व ते सृष्टींत निरनिराळ्या प्रकारचा लोकसंग्रह करीत असतात. ( लोकसंग्रह–विमुख व आपल्याच आनंदांत गढून राहून जगाविषयीं बेफिकीर असणारे "मुक्त" अस्तित्वांतच नसतात असें थिऑसफिस्ट लोक सांगतात ). कांहीं मुक्त लोकोपकारार्थ जड देह धारण करून पृथ्वीवर राहतात. त्यांस सदेह–मुक्त म्हणतात. कांहींनीं जड देहाचा त्याग केलेला असतो, त्यांस विदेहमुक्त किंवा निर्माण–काय असें नांव आहे. सदेहमुक्तांपैकीं कित्येक शिष्यांचा अंगिकार करतात. त्यांस इंग्रजींत मास्टर्स म्हणतात. हीं माणसें आजहि पृथ्वीवर आहेत. आम्हांपैकीं कांहीं त्यांचे शिष्य आहेत व कित्येकांनीं त्यांस चर्मचक्षूंनीं व कित्येकांनीं त्यांस अंतर्ज्ञानानें पाहिलें आहे असें थिऑसफिस्ट लोक म्हणत असून त्याविषयींचा पुरावा त्यांनीं आपल्या वाङ्मयांत दाखल केलेला आहे. "गुरुदेव" किंवा "ऋषि" हे मराठी शब्द "मास्टर" या शब्दाचे वाचक आहेत असें म्हटल्यास चालेल. सर्व जीवन्मुक्त सारखे नसतात व त्यांचें "व्यक्तित्व" नाहींसें झालेलें नसतें; पण ते सर्व सद्गुणांचे सागर असतात असें थिऑसफीय संशोधकांनीं त्यांचें वर्णन केलें आहे. थिऑसफिकल सोसायटी आम्हीं स्वतःच्या मतानुसार स्थापिलेली नसून कांहीं ऋषींच्या आज्ञेनें स्थापिलेली आहे व ते ऋषी सोसायटीचे पाठिराखे आहेत असें सोसायटीच्या संस्थापकांचें म्हणणें आहे. जीवन्मुक्त पुरुष व त्याहि दर्जाच्या वरचे पुरुष यांचा पृथ्वीवर एक संघ आहे व जगाच्या सर्व क्षेत्रांत जगाचा योगक्षेम हा संघ चालवितो. जीवन्मुक्ताच्या शिष्यांचाहि या संघांत समावेश होतो. लोकसंग्रहाच्या सोयीसाठीं या संघाचे विभाग पाडून त्यांतील कामें व्यवस्थेशीर रीतीनें वाटलेलीं असतात. संस्कृत वाङ्मयांत ज्यास सनत्कुमार असें नांव आहे तो या संघाचा अधिपति असून त्याच्या हाताखालीं देशोदेशींचें राजकारण, राष्ट्रांचे उत्कर्षापकर्ष, मनुष्यजातीचे वंश व उपवंश यांकडे लक्ष देणारा "मनु", धर्म व शिक्षण यांकडे लक्ष देऊन योग्य वेळीं जगांत निरनिराळे "धर्म" स्थापणारा "बोधिसत्त्व" व इतर सर्व क्षेत्रांवर देखरेख ठेवणारा "महाचोहण" असे अधिकारी असतात. आर्यवंशाचा मनु वैवस्वत आहे. त्यानेंच आर्य वंश जन्मास घालून उदयास आणिला. हल्लींच्या बोधिसत्वाचें नांव मैत्रेय आहे. पूर्वीचे जे बोधिसत्त्व त्यांनीं व्यास, हर्मीज्, झोरोऑस्टर, ऑर्फियस व गौतम बुद्ध इत्यादि अनेक जन्म घेऊन जगाच्या हितार्थ पुष्कळ धर्मांची संस्थापना केली. सिद्धसंघाचे अधिकारी कोणत्याहि एका जातीचे किंवा धर्माचे नसतात व ते जगांत निरनिराळ्या ठिकाणीं रहातात. योगशक्तीमुळें त्यांस कोठेंहि संचार करतां येतो व म्हणून सहकारितेनें त्यांस आपापलीं कामें करण्यास अडचण होत नाहीं. विद्यासंपन्न माणसास नांगर धरावयास लावलें म्हणजे जसा त्याच्या वेळाचा अपव्यय होय त्याचप्रमाणें जगांतील लोकांस जीं कामें करतां येतात तीं त्यांनीं करणें म्हणजे जीवन्मुक्तांच्या शक्तींचा अपव्यय असल्यामुळें, ते आपलीं उच्च दर्जाचीं कामें निर्वेध पार पडावीं म्हणून विशेष प्रसंगाखेरीजकरून जनसंमर्दापासून दूर रहातात. मनुष्याच्या स्वातंत्र्याच्या आड न येतां ईशसंकल्पानें आंखलेल्या मार्गानें जगाची सर्वतः प्रगति करणें हें सिद्धसंघाचें काम होय. आपल्या जगाची व्यवस्था येणेंप्रमाणें परमज्ञानी व परमकारुणिक अशा सिद्धांच्या संघाच्या हातीं असल्यामुळें जग भलतीकडे कोठें वहावत जाईल अशी भीति वाटण्याचें कारण नाहीं. पण मनुष्यास योग्य त्या मार्गानें जबरीनें ओढून नेलें तर तो फार तर सांगकाम्या नोकर बनेल, आणि आपण होऊन आपल्या जबाबदारीनें योग्य त्या गोष्टींचा अंगीकार करणारा व आपल्या स्वतःच्या पायांवर उभा राहणारा असा मर्द पुरुष बनणार नाहीं; यासाठीं मानवी स्वातंत्र्याच्या आड न येतां सिद्धसंघास आपलें काम करावें लागतें व म्हणून त्याच्या उद्योगास सरतेशेवटीं यश आलें तरी त्यास लोकांच्या अज्ञानामुळें उत्पन्न होणारे पुष्कळ अडथळेहि सहन करावे लागतात.

जरूर ती योग्यता अंगीं आणिल्यास कोणाहि माणसास सिद्धसंघांत जातां येईल. तेथें वशिल्याचा प्रश्न नसतो. सिद्धसंघांत जाण्यास काय काय गुण लागतात त्यांचें वर्णन थिऑसफीच्या वाङ्मयांत सविस्तर दिलेलें आहे. स्वार्थ

सुटल्याशिवाय व जनसेवेचें ध्येय माणसानें अंगिकारल्याशिवाय या मार्गांत त्याची गति होणें केवल अशक्य होय. जरूर ते गुण अंगीं येऊं लागले म्हणजे त्या मनुष्यास कोणी तरी जीवन्मुक्त हातीं धरतो; व स्वतःचा शिष्य करतो. या शिष्यस्थितीच्या अनेक पायऱ्या आहेत. त्यांचें वर्णन देण्यास येथें अवकाश नाहीं. शिष्य म्हणजे गुरूंचें जगांतील काम करणारे हस्तक. हे "अंकीं घेतां अंगाची झाला । भिन्न कधीं नच पुनः निघाला" या कविवचनाप्रमाणें गुरूशीं एकरूप झालेले असतात. शिष्य योग्य झाला म्हणजे त्यास पहिली महादीक्षा देण्यांत येते; व त्यावेळीं त्याच्या जाणीवेस एका उच्च भूमिकेवर नेण्यांत येतें. ही दीक्षा म्हणजे सिद्धसंघाचें प्रवेशद्वार होय. या द्वारानें आणखी पुढें जाऊन योग्य ते नवीन गुण अंगीं आणणें व दोष घालविणें हें कार्य शिष्य करीत राहिला म्हणजे त्यास दुसरी, तिसरी व चवथी अशा महादीक्षा सिद्धसंघाकडून क्रमानें दिल्या जातात. मग त्यापुढची पांचवी दीक्षा त्यास मिळाली म्हणजे तो 'मुक्त' होतो. पहिली दीक्षा घेतलेल्या शिष्यास "परिव्राजक", दुसरी घेतलेल्यास "कुटीरक", तिसरी घेतलेल्यास "हंस" व चवथी घेतलेल्यास "परमहंस" अशा शंकराचार्यांच्या संज्ञा आहेत असें डॉ. बेझंट यांनीं लिहिलें आहे. बुद्धधर्मांत या शिष्यांस स्रोतापत्ति, सकृदागमिन्, अनागमिन् व अर्हत् अशीं नावें आहेत. या दीक्षा--मार्गानें पुढें जाऊन जीवन्मुक्त होण्यास माणसास अनेक जन्मांचा अवधि लागतो; व निर्धारानें अवश्य ती योग्यता संपादन करण्यांत त्यास हा सर्वकाळ घालवावा लागतो. पूर्वकर्मार्जित देणींहि सर्व या मार्गावर माणसास भराभर फेडावीं लागतात व त्यामुळें त्याच्यावर मोठमोठालीं संकटें कोसळतात. या दीक्षामार्गानें–मुमुक्षुमार्गानें–जाणाऱ्या माणसास शेंकडों जन्मांत होणारी प्रगति थोड्या जन्मांत करावयाची असते; व म्हणून त्यास पराकाष्ठेचे श्रम पडतात. मनुष्याच्या भावी उत्क्रांतीची थिऑसफीप्रमाणें ही अशी रूपरेषा आहे.

नी ति अ नी ति.—सर्व जगाची उत्क्रान्ति व्हावी, एकूणएक सर्व जीवांचा विकास व्हावा असा ईशसंकल्प असल्यामुळें त्या संकल्पास जें जें पोषक तें तें नीतीचें व जें जें घातक तें तें अनीतीचें अशी थिऑसफीची नीति–अनीतीची कसोटी आहे. ईशसंकल्पाच्या प्रवाहांत जीव ज्या ठिकाणीं असेल त्या ठिकाणाहून पुढें जाणें ही त्या जीवास "नीति" असली तरी निरनिराळे जीव निरनिराळ्या ठिकाणीं असल्यामुळें जी गोष्ट एका जीवास नीतीची असेल तो दुसऱ्यास अनीतीची होऊं शकेल. अशा स्थितींत प्रत्येकानें "परधर्मो भयावहः" या गीतावचनाप्रमाणें दुसऱ्याच्या धर्माकडे, अर्थात् नीतीकडे न पाहतां आपली नीति कोणती हेंच पाहिलें पाहिजे. वनस्पतिकोटि व प्राणिकोटि यांत प्रत्येक जीवाची अहंभावना दृढ करण्याची उत्क्रांतिमार्गावरील योजना असते व म्हणूनच त्या कोटींत जीवनकलह विशेष तीव्रतेनें चालू राहून प्रत्येक जीवाचा केंद्र दृढ होत जातो. त्यामुळें दुसऱ्या प्राण्यास विरोध करून स्वतःचेंच सुख पहाणें ही गोष्ट प्राणिकोटींत "नीतीची" असते. पण सुसंस्कृत मनुष्य आज ज्या पायरीपर्यंत आला आहे त्या ठिकाणीं त्याचा केंद्र पाहिजे तितका दृढ झाला असून, पुढें त्या सर्व मुख्या व्यक्तींनीं आपलें अंतरंगांतील एकत्व ओळखावयाचें अशी त्याच्या उत्क्रांतीची दिशा असल्यामुळें दुसऱ्यास विरोध करणें ही गोष्ट त्यास अनीतीची होईल म्हणून "अभेदबुद्धि" हें सुसंस्कृत मनुष्याच्या नीतीचें मूळ होय. याचा अर्थ असा कीं ज्या ज्या गोष्टीपासून माणसामाणसांत प्रेम व बंधुभाव वाढतात, व सहकारिता उत्पन्न होते त्या त्या गोष्टी नीतीच्या व ज्या ज्या गोष्टींनीं लोकांत द्वेष व संशय वाढतात, विरोध व तक्रारी उत्पन्न होतात त्या अनीतीच्या होत. यासाठीं कोणतीहि गोष्ट करण्यास जरी थिऑसफिकल सोसायटीच्या सभासदांस मुभा असली तरी जेणेंकरून ऐक्य व प्रेम यांचें संवर्धन होईल व भेद आणि द्वेष यांचें निर्मूलन होईल अशा प्रकारचींच कार्यें त्यांनीं हातांत घ्यावीं अशी त्यांस थिऑसफीची शिकवण आहे, व सर्व जगभर सोसायटीच्या सभासदांनीं जीं जीं कामें करण्याचा उपक्रम केला आहे त्या सर्वांची दिशा हीच आहे. या संस्थेचे मूळ उत्पादक व मुख्य प्रचारक यांचा उल्लेख वर आला आहे. हिंदुस्थानांतील टी. सुब्बाराव. दा. के. मावळणकर, जिनराजदास, जे. कृष्णमूर्ति, बाबू भगवानदास, ग. भा. वैद्य हे या सोसायटीचे प्रमुख पुरस्कर्ते होत [ ले. राजाराम सखाराम भागवत ].

रा. भागवत यांनीं थिऑसफीची माहिती दिली. ही त्या संप्रदायाच्या मताचा चांगला गोषवारा आहे. केवळ सत्यसंशोधन हा हेतु संस्थेचा असूनहि "अतींद्रिय" ज्ञानासंबंधानें, अज्ञात सृष्टीसंबंधानें आणि अतींद्रिय संशोधनासंबंधानें आणि त्याच्या फलासंबंधानें जीं विधानें केलीं आहेत तींहि त्यांनीं दिलीं आहेत. जोंपर्यंत "अतींद्रिय" संशोधनाची पद्धति कोणत्याहि प्रसिद्ध थिऑसफिस्टांकडून शास्त्रीय पद्धतीचा संशयवाद असलेल्यांस पटेल इतक्या मोकळ्या तऱ्हेनें मांडली गेली नाहीं आणि आपल्या देशांतील किंवा पाश्चात्यांतील भौतिक व मानसिक शास्त्रज्ञांनीं संशोधन करून त्यावर सत्यतेचा शेरा मारला नाहीं तोंपर्यंत थिऑसफिस्टांनीं सांगितलेली अदृष्ट सृष्टिघटना येथील सुशिक्षितांस मान्य होण्याचा संभव नाहीं. थिऑसफिस्टांतलि 'संशोधक' म्हणून नाणावलेल्या व्यक्ति थोडया आहेत आणि ज्या आहेत त्यांची शास्त्रज्ञानसंपत्ति बेताचीच आहे. त्यामुळें त्यांचें म्हणणें विश्वासार्ह वाटत नाहीं. जगांतील गुरूपणाचे वगैरे मानवी मोह इतके प्रबल होतात कीं धार्मिक चळवळींत जे लोक पडतात त्यांवर त्यांचा परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं. ज्या गोष्टी लोकांस अज्ञात आहेत त्यांवर हवे तसे मारूत रचण्याची कामगिरी फार मोठ्या लोकांनीं केली आहे; आणि त्यामुळें "अतींद्रिय" भावाचें जें 'संशोधन

मांडण्यांत आलें आहे त्याची विश्वसनीयता पुराणांतील स्वर्गनरकविषयक विधानांपेक्षां अधिक वाटली नाहीं. [संपादक ज्ञानकोश]

**थिओक्रीटस**—गोपगीतकार. हा ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकांत झाला; याच्याबद्दल फारशी माहिती उपलब्ध नाहीं. यानें 'आयडील्स' नामक लहान कवितासंग्रह लिहिला आहे; त्यावरून तो सिरॅक्यूसन असावा असें दिसतें. डोरिअन भाषेंत त्यानें ब्यूकॉलिक कविता लिहिल्या आहेत. 'डॉटर्स ऑफ प्रोटिअस', 'होप्स', 'हिम्स', 'हिरॉइन्स', 'लिरिक्स', 'एपिग्रॅम्स', 'एलिजीज' इत्यादि काव्यें त्यानें रचलीं आहेत असें म्हणतात. 'स्टोरी ऑफ हेलाज अँड दि निंफस' हें त्याचें वीररसप्रधान असें काव्य प्रसिद्ध आहे. ब्यूकॉलिक व माइम्स असे त्याच्या काव्याचे दोन विभाग पडतात. पहिल्यांत खेडेगावांतील देखाव्यांची वर्णनें असून दुसऱ्यांत शहरासंबंधीं हकीगत दिलेली आहे. त्यानें महाकाव्य लिहिलें आहे. 'हिरॅक्लीज दि लायन स्लेयर' नांवाचें त्यानें काव्य मोठें मनोरंजक आहे. आयडील्समधील अन्तर्गत पुराव्याशिवाय या कवीबद्दल जास्त माहिती उपलब्ध नाहीं. सिरॅक्यूजहून कोसला जाऊन नंतर तो ईजिप्तमध्यें कायमचा राहिला होता असें म्हणतात. हा कवि स्वतंत्र बुद्धीचा असून ब्यूकॉलिक काव्याचा आद्यजनक होय.

**थिओडोरा**—सम्राट जस्टिनिअनची पत्नी. सहाव्या शतकारंभीं कॉन्स्टॉटिनोपल किंवा सायप्रस येथें ही जन्मास आली. ५४७ मध्यें तिचा अंत झाला. प्रोकॉपिअसच्या मतें लहानपणींच ती नाटकांत गेली होती. परंतु नृत्य व गायन मुळींच येत नसल्यामुळें छचोरपणाचा अभिनय व विनयशून्यता या गुणांवरच ती लोकांत इतकी प्रसिद्धीस आली. पुढें हेसेबोलस नांवाच्या एका अधिकाऱ्याबरोबर ती आफ्रिकेंत गेली व तेथें भांडण करून परत कॉन्स्टान्टिनोपल शहरीं आली व सूत काढून उपजीविका करूं लागली. जस्टिन बादशहाचा पुतण्या जस्टिनियन याचें त्याठिकाणीं तिनें मन आकर्षिलें. जस्टिनच्या संमतीनें त्यांचें लग्न झालें व बादशहाच्या पश्चात् थिओडोरा रोमन सम्राज्ञी बनली. जस्टिनिअन यास तिनें आपल्या मुठींत ठेविलें होतें व ती राज्यकारभारांत मुखत्यारीनें ढवळाढवळ करीत असे. ५३२ मधील बंडांत तिचें शौर्य दिसून आलें व त्यावेळीं तिनें जस्टिनिअनचें राज्य रक्षिण्यास फार मदत केली. अंमलदारांनां तिच्या पुढें राजनिष्ठेची शपथ घ्यावी लागे. तिचा परकीय वकिलांशींहि पत्रव्यवहार असे. तिचा वचक व दरारा विलक्षण होता. तिचे गुप्त हेर शहरभर संचार करीत. तिची अलंकारप्रियता व वागण्याची ऐट विलक्षण असून स्त्रीपुरुषांनीं आपल्या इच्छेप्रमाणें सक्तीचे विवाह लावण्यांत तिला भूषण वाटत असे. तक्रारी नवऱ्यांविरुद्ध स्वैर वर्तनी स्त्रियांचीच ती बाजू घेत असे. तथापि आपल्या राज्यांत नैतिक सुधारणा झाली पाहिजे याबद्दल तिचा मोठा कटाक्ष असे. थिओडोरास जस्टिनियनपासून फक्त एक मुलगीच झाली होती. परंतु लग्नापूर्वी तिला एक मुलगा होता असें प्रोकॉपिअसनें लिहिलें आहे. थिओडोरा नाजुक प्रकृतीची असून मोठी रूपवती होती. प्रोकॉपिअसच्या 'अनेक्डोटा' नामक ग्रंथांत या सम्राज्ञीची जी अतिशयोक्तिपूर्ण अशी हकीगत आढळते ती संशयास्पद असल्याचें अलीकडील नवीन पुराव्यामुळें सिद्ध होत आहे.

**थिओडोलाइट**—हें एक क्षेत्रमापन करण्याचें यंत्र असून त्याला अंशभाग पाडलेलीं परस्परांशीं काटकोन करणारीं दोन वर्तुळें बसवलेलीं असतात. या यंत्राच्या साहाय्यानें क्षितिजसमांतर व लंबरूप पातळींतील कोनांचें सूक्ष्म मापन करतां येतें. वर सांगितलेल्या उभ्या व आडव्या वर्तुळांच्या मध्यांशीं जोडून एक दुर्बीण बसविलेली असते व तिला दोन सूक्ष्ममानमापक (व्हर्निअर) जोडलेले असतात. हें यंत्र एका, खालीं स्क्रू असलेल्या बैठकीवर बसविलेलें असून त्या स्क्रूंच्या साहाय्यानें तें समपातळींत ठेवतां येतें. या यंत्रानें विशेषतः क्षितिजसमांतर पातळींतील कोन जास्त बिनचूक रीतीनें मोजतां येतो. व त्यावरच जमीनीची मोजणी विशेष अवलंबून असते. लंबरूप पातळींतील कोनांत पुष्कळदां विशेषतः दूर अंतरावर-वातावरणांतील प्रकाशवक्रीभवनानें चूक येण्याचा संभव असतो. हें यंत्र बरोबर लावल्यास उंचीमध्यें केवढेंहि मोठें—उदाहरणार्थ उत्तरध्रुव व पृथ्वीवरील एखादा पदार्थ एवढें- अंतर असलेल्या दोन पदार्थांतील क्षितिजसमांतर कोन बिनचूक मोजतां येतो. या यंत्राचे वाय, एवरेस्ट व चल (ट्रॅन्झिट) असे तीन प्रकार आहेत. जर्मनी व इतर कांहीं देशांत वक्रीभवनात्मक थिओडोलाइट व चलथिओडोलाइटचा क्षेत्रमापनाकडे उपयोग करतात. थिओडोलाइटसारख्याच एका दुर्बिणीला पाणसळ जोडून एका बैठकीवर आडव्या बसविलेल्या समपातळी दाखविणाऱ्या यंत्राचाहि क्षेत्रमापनाकडे उपयोग करतात.

**थिओफ्रेस्टस**—याचा जन्म ॲरिस्टॉटलच्या जन्माच्या सुमारास (म्हणजे ख्रि. पू. ३८४ च्या सुमारास) लेस्बॉस येथें झाला. हा प्लेटोच्या मरणापूर्वीच ॲरिस्टॉटलचा शिष्य बनला असावा असें वाटतें. ॲरिस्टॉटलच्या मरणानंतर ३५ वर्षेपर्यंत "पेरिपटेटिक" नांवाच्या पंथाचा हा मुख्य होता. यानें बरींच पुस्तकें लिहिलीं आहेत. त्यांपैकीं वनस्पतिशास्त्रावरलि दोन तर अप्रतिम आहेत.

**थिवा**—ब्रह्मदेशचा शेवटचा राजा. हा १८५८ त गादीवर आला. राजानें आठ राण्या व सरदार नजर करतील तितक्या रखेल्या बाळगावयाच्या ही पूर्वापारची चाल या थिबा राजानें मोडल्यावरून त्याच्या धार्मिक प्रजेला फार वाईट वाटलें. मुंबई व ब्रह्मदेश येथील इंग्रज कंपन्यांवर २३ लाखांचा कर बसवून व कंपनींतील लोकांनां कैद करण्याचा हुकूम करून, थिबानें आपला इंग्रजांविषयींचा तिरस्कार व्यक्त केला. फ्रेंचांच्या चिथावणीमुळें

अफगाणिस्तान व दक्षिण आफ्रिका या ठिकाणीं १८७९ त व १८८० सालीं इंग्रजाला पेंच पडला होता हें समजल्यामुळें थिबा चढून गेला होता. १८८५ सालीं यानें फ्रेंच सरकारशीं तह केला. लॉर्ड डफरीन यानें थिबावर सैन्य पाठविलें व शेवटीं इंग्रजांनीं मंडाले शहर हस्तगत केलें. थिबा व त्याची राणी यांनां पदच्युत करून रत्नागिरीस ठेवण्यांत आलें व १८८६ सालीं इंग्रजांनीं ब्रम्हदेश खालसा केला. हा दुर्दैवी राजा नुकताच मरण पावला.

**थिबा**—ब्रह्मदेशांतील उत्तर शान संस्थानांपैकीं हें एक संस्थान आहे. याचें क्षेत्रफळ ५०८६ चोरस मैल आहे. याच्या उत्तरेस मॉंगमिट व ट्वांगपेंग हीं संस्थानें आहेत. पूर्वेस सेनवी हें ठिकाण आहे. दक्षिणेस शान संस्थानें असून पश्चिमेस मंडाले जिल्हा आहे. थीबाचीं चार पोटसंस्थानें आहेत. १८८६ मध्यें हें संस्थान ब्रिटिशांच्या स्वाधीन झालें. स.१८९३ मध्यें येथील माजी संस्थानिक इंग्लंडास गेला होता. स.१९०२ मध्यें त्याचा मुलगा गादीवर बसला. या राजाचें शिक्षण इंग्लंडांत झालें. १९०१ सालीं या संस्थानची लोकसंख्या १०४७०० इतकी होती. थीबा संस्थान मंडालेपासून १३४ मैलांवर आहे व मंडाले याची राजधानी आहे. थीबा संस्थानचें उत्पन्न १९०३–०४ सालीं ३४३००० रुपये होतें. तीळ, तांदुळ कापूस, चहा, वगैरे पदार्थ तेथें होतात

**थिबिस**—ग्रीस.बिओशिया प्रांतांतील एक प्राचीन ग्रीक शहर. हें सीथेरॉन पर्वताच्या उत्तरेस असून अथेन्सपासून ४४ मैलांवर आहे. अथेन्सपासून थिबिसपर्यंत दोन गाडी रस्ते व एक लोहमार्ग (रेल्वे) १९०४ सालीं करण्यांत आले. येथें सुमारें ४८०० लोकवस्ती असून बिशप येथेंच रहात असतो. प्राचीन चालेकिल्ला क्याडमिआ या ठिकाणीं हें शहर वसविलें असून प्राचीन भिंतींचे दोन अवशेष अजून दृष्टीस पडतात. थिबिस हा जवळ जवळ निर्झरमय प्रदेश आहे असें म्हटलें तरी चालेल. आणि प्राचीन वाङ्मयांत त्याचें असेंच वर्णन आलेलें आहे. क्याडमिआ दुर्गाच्या आग्नेय दिशेला सेंट ल्यूकचें प्रार्थनामंदिर आहे. या प्रदेशांत पाणी मुबलक असल्यामुळें हा फार सुपीक असून बागबगीचे करण्याकरितां सोइस्कर आहे. तथापि लोकसंख्या फार नसून सध्यां या शहराला कांहीं फारसें महत्त्व नाहीं.

निरनिराळ्या दंतकथांच्या जाळ्यांतून थिबिसचा प्राचीन इतिहास हुडकून काढणें हें फार कठिण काम आहे. होमरनें या शहराचा उल्लेख न केल्यामुळें तर हें काम अधिकच कठिण झालें आहे. तथापि इतकें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं कीं, ग्रीसच्या अनेक प्राचीन जातींपैकीं ज्या कित्येक तत्संबंधीच्या शहरांत येऊन वस्ती करून राहिल्या त्यांमध्यें थिबिस येथील लोकांनां अग्रेसरत्व देतां येईल.

पूर्वीपासूनच थिबिस लष्करी दृष्ट्या समर्थ असल्यामुळें इतर शेजारच्या शहरांवर वर्चस्व स्थापन करण्याची त्याची प्रथमपासूनच मोठी महत्त्वाकांक्षा असे. ही महत्त्वाकांक्षा सुफलित करण्याकरितां थिबिस काय काय प्रयत्न करी याची फारशी माहिती उपलब्ध नाहीं. प्रथम थिबिसवर जमीनदार उमरावशाहीचा अंमल होता. इ. स. पूर्वी ६ व्या शतकाच्या अखेरीस थिबिसशीं व अथेन्सशीं वैरभाव होता म्हणून अथेन्सचें जें इतरांशीं भीषण युद्ध झालें त्यांतून थिबिसनें आपलें अंग राष्ट्रभक्ति विसरून काढून घेतलें. थिबिसच्या या औदासिन्याचा फायदा घेऊन अथेन्सचें वैभव डोळ्यांत सलत असलेल्या स्पार्टानें थिबिसशीं संगनमत केलें व इ. स. पूर्व ४२४ या वर्षी थिबिस जें अथेन्सचा पराभव करू शकलें तें तरी यामुळेंच होय. विजयप्राप्तीमुळें राज्यप्रसाराची धुंदी थिबिसच्या डोळ्यावर चढली यांत कांहीं नवल नाहीं. पूर्वीचा दोस्त स्पार्टा हा त्यास आतां शत्रूप्रमाणें भासूं लागला व आश्चर्याची गोष्ट ही कीं स्पार्टाला नमविण्याकरितां आपला पुरातन वैरी जो अथेन्स त्याच्याशीं सख्य जोडून तेथें लोकसत्तेच्या पुनरुद्धाराला मदत करण्यास थिबिस तयार झालें. कॉरिंथिअन युद्ध उपस्थित करून स्पार्टाविरुद्ध जो थिबिसनें संघ निर्माण केला त्याच्या मुळाशीं इराणनें दाखविलेलें सुवर्णप्रलोभन जरी असलें तरी स्पार्टाचा द्वेष मुळींच नव्हता असें नाहीं. या युद्धांत थिबिसचा जरी पराभव झाला नाहीं तरी त्याचे कटु परिणाम त्यालाच जास्त भोगावे लागले. कारण या युद्धामुळें त्याचा बिओशियांतील व शहरावरील ताबा अजीबात उडाला. तथापि पुढें ज्या स्पार्टाशीं लढाया झाल्या त्यांत थिबिअन सैन्यानें आपलें वर्चस्व कायम ठेवलें व बिओशियावरील आपली सत्ता परत मिळविली. इ. स. पूर्वी ३७१ त थिबिअन सेनापतींनीं स्पार्टन रणबहाद्दरांनां ल्युक्ट्रा येथें धूळ चारून स्पार्टन प्रभुत्वाचा डोलारा ढांसळून पाडला आणि मासिडॉन घेसली येथें सैन्य पाठवून तेथील अन्तर्व्यवस्थेंत ढवळाढवळ करण्यास कमी केलें नाहीं. येणेंप्रमाणें थिबिसच्या वैभवाची इमारत पूर्ण करण्यांत आली. पण तिचा पाया भरभक्कम नसून डळमळीत होता. भावी थिबिअन साम्राज्याचा अथेन्स कट्टा शत्रू होता व थिबिसनें आपल्या पोटांत गडप केलेलीं लहान लहान राष्ट्रें पोट फोडून बाहेर निघण्याचा प्रयत्न करीत होतीं. अशा आणीबाणीच्या वेळीं थिबिसचा प्रतापशाली एपामिनोंडास हा मरण पावल्यामुळें थिबिस हें दुय्यम प्रतीच्या राष्ट्राच्या स्थितीस येऊन पोंचलें. फोसीअन शत्रूंनां शासन करावें म्हणून मासिडोनच्या दुसऱ्या फिलिपला बोलावण्यांत थिबिसनें आपल्याच पायावर धोंडा पाडून घेतला. शेवटीं डेमास्थेनीसच्या वक्तृत्वपूर्ण उपदेशानें थिबिअन लोकांचे डोळे उघडून स्वातंत्र्ययुद्धांत फिलिपविरुद्ध अथेन्सच्या बाजूनें ते रणांगणांत उभे राहिले. चेरोनीआच्या लढाईंत त्यांची सररहा कत्तल उडाली व त्यांनीं फिलिपचा मुलगा अलेक्झांडर याच्या विरुद्ध बंड केल्यामुळें थिबिस हें संपूर्ण उध्वस्त करण्यांत आलें. कसांडरनें जरी त्याची पुनरुत्थापना

केली तरी चालसिस हें मध्यग्रीसचा मुख्य दुर्ग झाल्यामुळें त्याची कांहींच मातबरी उरली नाहीं. स्ट्रेबोच्या वेळीं तर तें एक लहानसें खेडें होतें आणि बायझंटाईन काळांत परकीय शत्रूंच्या स्वाऱ्यांपासून संरक्षण व्हावें म्हणून त्याचा गुप्तस्थळाप्रमाणें उपयोग होत असे.१० व्या शतकापासून तें रेशमाच्या व्यापाराचें एक मुख्य ठिकाण झालें. इ. स. ११४६ त नारमन लोकांनीं तें लुटलें व शेवटीं १३११ त क्याटलान लोकांनीं त्याचा विध्वंस केल्यानें पुढील इतिहासांत त्याचा मागमूसहि उरला नाहीं.

**थीअर्स** ( १७९७-१८७७ )—लुई अडोल्फ थीअर्स हा फ्रेंच मुत्सद्दी व इतिहासकार मार्सेल्स येथें स. १७९७ त जन्मला. त्याचे वाडवडील कापडाचे व्यापारी होते. थीअर्सनें २३ व्या वर्षी वकिलीचा धंदा सुरू केला. तथापि कायद्यापेक्षां त्याला वाङ्मयाची गोडी अधिक असल्यामुळें तो लवकरच कांस्टिट्यूशनलमध्यें लेख लिहूं लागला; पुढें प्रकाशकाचा तो सर्व धंदाच त्याच्या मालकीचा झाल्यामुळें त्याची सांपत्तिक स्थितीहि सुधारली. नंतर त्यानें फ्रेंच राज्यक्रांतीच्या इतिहासाचें १८२७ पर्यंत १० भाग प्रसिद्ध केले. त्यांत पुष्कळ चुकीची माहिती असल्याचें कार्लाइलचें म्हणणें आहे. परंतु राज्यक्रांतीविरुद्ध मताची वाढती लाट फ्रान्समध्यें त्यावेळीं असल्यामुळें थीअर्सचा इतिहास लोकांना चांगला आवडला. १८२९ मध्यें आर्मंड कॅरेल, मिग्नेट व इतरांच्या मदतीनें थीअर्सनें नॅशनल नांवाचें वृत्तपत्र सुरू केलें. तो पार्लमेंटांत एक्सतर्फे डेप्युटी निवडून आला, व १८३२ मध्यें त्याची अन्तःकारभारखात्यांत नेमणूक झाली. १८३६ मध्यें तो परराष्ट्रमंत्री होता, परंतु स्पेनबरोबरच्या धोरणांत मतभेद झाल्यामुळें त्यानें राजीनामा दिला. पुन्हां एकदां तो परराष्ट्रमंत्री झाला असतां त्याचें इंग्लंड व टर्की यांच्या विरुद्ध असलेलें धोरण इतरांस मान्य नसल्यामुळें त्याला राजीनामा देऊन राजकारण सोडावें लागलें. १८४० ते १८४६ पर्यंत त्यानें फ्रेंच कौंसलेटचा इतिहास लिहिला. नंतर तो पुन्हां राजकारणांत पडला.पुढें राज्यक्रांतीची चळवळ सुरू झाली तेव्हां लुई फिलिपनें थिअर्स याला प्रधानपद देऊं केलें; तें त्यानें नाकारलें. रिपब्लिकच्या काळांत तो कांझर्व्हेटिव्ह रिपब्लिकन पक्षाचा होता. लुई नेपोलियन प्रेसिडेंट व्हावा या मताचा तो असल्यामुळें त्यास एकदां हद्दपारीची शिक्षाहि झाली होती. त्यानंतर त्याची बरींच वर्षे कॉंसलेट व साम्राज्य हें पुस्तक लिहिण्यांत गेलीं.१८६३सालापासून सात वर्षे लोकसभेंत तो अँटि-इंपिरियालिस्ट ( साम्राज्यविरोधी ) पक्षाचा प्रमुख वक्ता होता. रिपब्लिकच्या वेळीं त्यानें निरनिराळ्या यूरोपियन दरबारांनां भेट दिली. प्रिन्स बिस्मार्कची भेट घेऊन त्यानें स. १८७१ मध्यें फ्रॅंको-जर्मन युद्धांतील तह घडवून आणला. त्याच सालीं तो रिपब्लिकचा प्रेसिडेंट झाला. तथापि त्याच्यामध्यें तडजोडीचें धोरण नसल्यामुळें १८७३ मध्यें प्रेसिडेंटचा अधिकार मर्यादित करणारा एक ठराव पुढें मांडला गेला;तो त्याला मान्य न झाल्यामुळें त्यानें राजीनामा दिला. अखेरचीं दोन चार वर्षे तो पार्लमेंटचा सभासद होता.तो स. १८७७ त मरण पावला. त्याचा विवाह पूर्ववयांतच झाला होता व त्याला एकच बायको होती.तो ठेंगणा व कुरूप असून त्याचा आवाज कर्कश होता, तरी तो फार परिणामकारक वक्ता होता.

**थुल**—मुंबई, सिंध. अपरसिंध सरहद्द जिल्ह्यांतील हा एक तालुका आहे. क्षेत्रफळ ४९६ चौरस मैल. लोकसंख्या १९११ मध्यें ५३१६९ होती. या तालुक्यांत ९६ खेडीं असून थुल हें मुख्य ठिकाण आहे.१९०३-०४ सालांत सारा व कर यांचें उत्पन्न २¾ लक्ष रुपये होतें.

**थुसिडाइडीझ**—हा अथेन्सचा इतिहासकार होय. त्याचा वृत्तांत समजण्याचीं साधनें फारच थोडीं आहेत. कांहींच्या मतें तो ख्रिस्तपूर्व ४७१ सालीं जन्मला असें आहे; तर कांहीं म्हणतात कीं, तो ख्रिस्तपूर्व ४६०सालीं जन्मास आला. त्याचा बाप अथेन्सचा रहिवाशी असून थ्रेसिअन प्रांतांत स्कॅप्टे हैले येथें त्याच्या सोन्याच्या खाणी होत्या.

थुसिडाइडीझ गर्भश्रीमंत असून अथेन्स व थ्रेस येथें रहात असे. त्याला प्रथम कांहीं दिवस राजकीय बाबींत मन घालतां आलें नाहीं. याचें कारण इतकेंच कीं, त्याला वरचेवर थ्रेस येथें जावें लागत असे. इ.स पू. ४३०त जी प्लेगची सांथ अथेन्समध्यें सुरू होती तींत हा अथेन्स येथेंच राहात असे व त्या प्रसंगीं तो लोकांच्या फार उपयोगीं पडला. इ. स. पू. ४२४ हें वर्ष त्याच्या आयुष्यांतलि क्रांतिकारक साल होय. थ्रेसकडील प्रांतांवर जे दोन सेनानायक नेमले होते त्यांपैकीं थुसिडाइडीझ हा एक व यूक्लिस हा दुसरा होता. यूक्लिस ॲम्फिपोलिसमध्यें असतांना अथेन्स येथील लोकांवर परचक्र आलें. त्यावेळीं थुसिडाइडीझच्या हातून थोडा हलगर्जीपणा झाल्यावरून त्याला हद्दपारीची शिक्षा देण्यांत आली. पुढें इ. स. पू. ४२४ पासून ४०४ पर्यंत तो थ्रेस येथें राहिला व तेथेंच त्यानें आपला इतिहास लिहिला. इ. स. पू. ४०४ त त्याला अखेर अपघातानें मृत्यु आला. त्याच्या ग्रंथाची समाप्ति एकदम मध्येंच झाल्यासारखी दिसते. यावरून तो अपघातानेंच मेला असला पाहिजे असें वाटतें. याचा इतिहास म्हणजे कोणत्याहि एका देशाचा किंवा कालाचा वृत्तांत नसून तो पेलोपोनेसियन युद्धाचा आहे. या ग्रंथाचा विशेष हा होय कीं, कोणत्याहि गोष्टीस सबळ पुरावा असल्याशिवाय ती केवळ अनुमानानें यांत नमूद केली नाहीं. यांत त्यानें वीरांचीं भाषणें दिलीं आहेत. भाषा जरी त्याची स्वतःची असली तरी मूळ भाषणाच्या मुद्द्यांत व रोखांत मुळींच फरक करण्यांत आलेला नाहीं. एप्रिलच्या आरंभापासून ऑक्टोबरच्या अखेरपर्यंतच्या कालास तो 'उन्हाळा' असेंच म्हणे. 'उन्हाळा' व 'हिंवाळा' असे वर्षाचे दोनच भाग तो करी.

**थूरेट, गस्टॅव्ह अँडॉल्फे** ( १८१७-१८७५ )—एक फ्रेंच वनस्पतिशास्त्रज्ञ; याचा जन्म पॅरिस येथें झाला. प्रथम यानें कायद्याचा अभ्यास केला; परंतु वनस्पतिशास्त्राची आवड असलेल्या एका गवई मित्राच्या संगतीनें त्याला वनस्पतिशास्त्राची गोडी लागली. जोसेफ डिकाइनें याच्या हाताखालीं कांहीं दिवस काम केल्यानंतर, फ्रेंच वकिलाबरोबर त्यास बोनदां कॉन्स्टांटिनोपल येथें जाण्याची संधि मिळाली.१८४१ सालीं सीरिया व ईजिप्त येथें प्रवास करून तो फ्रान्सला परत आला. १८४० सालीं त्यानें आपलें वनस्पतिशास्त्रावरील पुस्तक प्रसिद्ध केलें होतें. बॉरनेट व थूरेट यांनीं वनस्पतिसृष्टींतहि स्त्रीपुरुष भेद असून त्यांच्यामुळेंच झाडांची उत्पत्ति होते असें प्रतिपादन केलें आहे. १८५३ व १८५५ सालीं थूरेटनें एतद्विषयक पुस्तकें लिहून प्रसिद्ध केलीं. त्याची लेखनशैली सुबोध व साधी असून त्याचें ज्ञानहि खोल होतें. १८५७ सालीं थूरेट हा मेडिटरेनिअन किनाऱ्यानजीक अँटिबोस गांवीं जाऊन राहिला व तेथें त्यानें एक वनस्पतींची बाग तयार केली. त्याच्या मृत्यूनंतर हें स्थान संशोधकांची संस्था म्हणून प्रसिद्धि पावलें. नाइसला जात असतां थूरेट अकस्मात् वारला. हा मोठा श्रीमंत मनुष्य होता; तथापि चैनींत आपलें आयुष्य न दवडितां त्यानें आपला सर्व वेळ, शक्ति व पैका शास्त्रप्रगतिप्रीत्यर्थ खर्च केला.

**थेऊर**—पुण्याच्या पश्चिमेस सुमारें तेरा मैलांवर हें लहानसें खेडेगांव असून येथील गणपतीचें देवस्थान फार प्राचीन आहे. चिंचवड, आळंदी, देहू, जेजुरी, मोरगांव इत्यादि पुणें प्रांतांतील क्षेत्रस्थानांमध्यें थेऊरची गणना होते. येथील गणपतीची स्थापना चिंचवडचे सत्पुरुष चिंतामणदेव यांनीं केली असें म्हणतात. या गणपतीची गणना अष्टविनायकांमध्यें केली जाते.

येथील मूळचें देऊळ चिंचवडच्या चिंतामणदेवांनीं सुमारें चाळीस हजार रुपये खर्च करून बांधिलें. त्यानंतर सुमारें शंभर वर्षांनीं थोरले माधवराव पेशवे यांनीं देवालयाचा सभामंडप नवीन करून देवालय बरेंच विस्तीर्ण केलें. त्यानंतर हरीपंत फडके इत्यादि गणपतिभक्तांनीं त्यामध्यें बरेच फेरफार करून तें विशेष भव्य व शोभिवंत केलें.

थोरले माधवराव पेशवे यांना हें स्थान फार आवडल्यामुळें त्यांनीं येथें एक स्वतंत्र वाडा बांधून त्यास विशेष महत्त्व आणिलें. राज्यकारभाराच्या दगदगीमुळें त्रस्त झाले म्हणजे ते विश्रांतीसाठीं मधून मधून येथें येऊन रहात असत. त्यांची ह्या स्थलावर व येथील देवस्थानावर इतकी भक्ति होती कीं, इ. स. १७७२ मध्यें जेव्हां ते क्षयरोगानें अतिशय आजारी पडले तेव्हां ते मुद्दाम येथें येऊन राहिले. येथें त्यांनीं पुष्कळ औषधोपचार केले; परंतु त्याचा कांहीं उपयोग न होऊन त्यांस कार्तिक वद्य ८, बुधवारीं ( ता. १८ नोव्हें. १७७२ ) देवाज्ञा झाली. त्यावेळीं त्यांची पत्नी रमाबाई ही त्यांच्याबरोबर सती गेली. रमाबाई यांनीं ज्या ठिकाणीं सहगमन केलें ती जागा अद्यापि नदीतीरीं दृष्टीस पडते. तेथें पूर्वी सतीचें वृंदावन होतें. त्याचा सांप्रत जीर्णोद्धार झाला आहे. चिंचवडच्या संस्थानाकडून थेऊर येथील देवस्थानास हल्लीं दोन हजार रुपयांची वार्षिक नेमणूक मिळत असते व त्याची व्यवस्थाहि चिंचवडदेवस्थानाकडून होत असते. याशिवाय सरकाराकडून चौघड्याकरितां व दिवाबत्तीकरितां कांहीं वेगळी नेमणूक मिळत असते. येथील पेशव्यांचा वाडा हल्लीं पडून जाऊन त्याच्या भिंती व कूस हें मात्र अवशिष्ट राहिलें आहे. ( इतिहाससंग्रह. पु. ६ वें ).

**थेओग**—पंजाब, केऑथल संस्थानांतील ही एक लष्करी जहागीर आहे. क्षेत्रफळ १४४ चौरस मैल. लोकसंख्या १९२१ सालीं ६३०० व उत्पन्न ५००० रुपये असून ५०० रुपये खंडणी केऑथल संस्थानला द्यावी लागते. हल्लींचा अधिपति टीक समशेरचंद यास मृत्यूची शिक्षा देण्याखेरीज सर्व अधिकार आहेत.

**थेगोन**—खालचा ब्रह्मदेश, जिल्हा प्रोम. पौंगडे पोटविभागांतील ईशान्येकडील एक टाऊनशिप. हिच्यांतील जमीन सपाट, पिकाऊ असून लोकवस्ती दाट आहे. क्षेत्रफळ २४१ चौरस मैल. लोकसंख्या १९११ सालीं ६६७१८ होती. हिच्यांत ७७ खेडीं असून थेगोन हें मुख्य ठिकाण आहे. या टाऊनशिपमध्यें एक मोठें सरोवर आहे. त्याची लांबी १० मैल, रुंदी ४ मैल, आणि पावसाळ्यांत खोली १२ फूट असते.१९०३-०४सालीं वाहित जमीन ९३ चौरस मैल असून जमिनीच्या साऱ्याचें उत्पन्न १७,००० रुपये होतें.

**थेर**—संस्थान हैद्राबाद,उस्मानाबाद नांवाच्या जिल्ह्यांत व तालुक्यांत, हें गांव आहे. हें गांव १२ वाड्या मिळून झालें आहे. लोकसंख्या १९११ सालीं ७,९४८ होती. यांत पोलिस स्टेशन व शाळा आहे.

**थेरॉइने डी मेरिकू अॅनी जोसेफी**(१७६२-१८१७) -फ्रेंच राज्यक्रांतींत प्रसिद्धिस आलेली स्त्री; एका शेतकऱ्याची ही मुलगी मेरकू येथें जन्मली. ही सुशिक्षित, बुद्धिमती व रूपवती अशी होती. १७८९ ते १७९३ या काळांत ती फार पुढें आली. आपल्या अमोघ वक्तृत्वानें तिनें पॅरिसच्या लोकांवर छाप ठेविली होती. जलशांत गाणारी स्त्री या नात्यानें तिनें इंग्लंड, जिनोवा वगैरे ठिकाणीं प्रवास केला व १७८९ सालीं ती पॅरिसला परत आली. बॅसटिली घेण्यांत तिचें मुळींच अंग नव्हतें असें म्हणतात. १७९० सालीं, ती फ्रान्सहून लीजला जाण्यास निघाली व त्या ठिकाणीं ऑस्ट्रिअन सरकारनें तिला पकडलें. फ्रेंच राणीचा खून करण्याच्या कटांत ती सामील होती असा एक आरोप तिजवर होता. पण दुसऱ्या लिओपाल्ड बादशहाशीं तिची भेट झाल्यानंतर तिला सोडून देण्यांत आलें. १७९२ सालीं ती पुन्हां पॅरिसला आली. नॅशनल असेंब्लीवरल्या संस्थेंत व पॅरिस

येथील अनेक कृत्यांत ती भाषणें करीत असे. ' ला बेली लायगोइसे ' या नांवानें ती पुढें संबोधिली जात असे. पुरुषासारखा लष्करी पोषाख करून अश्वारूढ होऊन, ती हिंडत असे. क्रांतिकारकामध्यें तिचा फार लौकिक झाला होता. १७९३ नंतर जॅकोबिन पक्षाच्या स्त्रियांनीं तिचे फार हाल केले. पुढें तिला वेड लागलें व त्यांतून सुधारण्यापूर्वीच तिचा अंत झाला.

**थेल्स अथवा थेलीज**—या ग्रीक तत्त्ववेत्त्याचा जन्म ख्रि. पू. ६३६ च्या वर्षी झाला. याचा जन्म ज्या घराण्यांत झाला तें घराणें फार प्रतिष्ठित व इभ्रतदार असल्यामुळें त्यास देशाच्या राज्यकारभारांत पडावें लागलें. यास एकांतवासाची फार आवड होती व या कारणामुळें त्यानें राजकारणांत भाग घेतला किंवा नाहीं याविषयीं बराच मतभेद आहे. तसेंच यानें ईजिप्तमध्यें प्रवास करून गणितविषयाचें ज्ञान संपादन केलें. या विषयींहि फार मतभेद आहे. त्यानें आपणासभोंवार प्रत्यहीं घडत असलेले नानाविध जन्ममरणादि चमत्कार पाहिले तेव्हां या सर्व चराचर सृष्टीच्या मुळाशीं कांहींतरी एक तत्त्व असलें पाहिजे असें त्यास वाटूं लागलें. पुढें हें तत्त्व जल असावें असें त्यानें ठाम ठरविलें.

जल हें आदि तत्त्व मानण्यास त्यास पुढील कारणें सांपडलीं:– (१) समुद्रकिनाऱ्यावर रहात असल्यामुळें तो जिकडे पाही तिकडे त्यास पाणीच दिसे. (२) ग्रीक लोक पाण्यांत उभे राहून शपथा घेत व समुद्रास सर्व नद्यांचा जनक समजत. (३) घन, द्रव आणि वायु या तिन्ही रूपांत पाणी राहूं शकतें. (४) सर्व पदार्थांच्या बिया ओलसर असतात व त्यांच्या पोषणासहि पाणी अवश्यक आहे.

थेलीस यास आकाशांतील ताऱ्यांकडे पाहण्याचा फार नाद असे व असाच एके दिवशीं वर पहात चालला असता एका विहिरींत पडून तो मरण पावला. याविषयीं बेकन थट्टेनें म्हणतो कीं हा जर नग्न झाला असता तर यास पाण्यांत तारका दिसल्या असत्या व जीवहि बचावला असता. विश्वाच्या व्यापाराच्या बुडाशीं एखादी चालकशक्ति आहे व ती "आत्मा" आहे असें याचें मत होतें. सर्वाभूतीं परमेश्वर आहे असें यास वाटत असे.

विश्वात्मा एकच असून सर्व जीवमान प्राण्यांचे आत्मे त्याचे सूक्ष्म विभाग असून ते सर्व शेवटीं त्या विश्वात्म्यांतच विलीन होतात असें त्यास वाटे. या विश्वात्मवादास जर्मन भाषेंत "यूवर सीले" असें नाव आहे. थेलीस याची "ग्रीसच्या सात शहाण्या" लोकांत गणना केली जाते. याच्या शास्त्रीय व भूमितींतील शोधांबद्दल माहिती पूर्वी दिली आहे (विज्ञानेतिहास पृष्ठ २३३–३५ पहा).

**थेस्पी**—बिओशिया प्रांतांतील एक जुनें ग्रीक शहर. हें हेलीकॉन पर्वताच्या पायथ्यापासून पूर्वेस थिबिसकडे पसरलेल्या टेंकड्यांच्या पायथ्याजवळील सपाट भूमीवर वसलें आहे. येथें ईरास या देवतेच्या पूजेचा फार प्रचार असे. या ठिकाणीं याच देवतेची एक प्रसिद्ध मूर्ति असून तितकी सुन्दर व भव्य मूर्ति सबंध प्राचीन ग्रीसमध्यें नव्हती असें सांगतात. कॅलीगुला यानें ही मूर्ति बलात्कारानें रोमला नेली, ती क्लॉडीअसनें परत जशीच्यातशी दिली व फिरून नीरोनें हरण करून नेली. थेस्पीअन लोक ललितकलांच्या देवतांची ( म्यूझेस ) देखील पूजा करीत असत हा उत्सव हेलीकॉन पर्वतावर साजरा करण्यांत येत असे.

थेस्पी शहराचा इतिहास म्हणजे थेस्पीअन व थिबिअन यांतील वैराचा इतिहास होय. इराणच्या स्वारींत थेस्पिअनांनीं अथेन्सला एकनिष्ठपणें साहाय्य केलें व इराणी सैन्याला धरमापिली येथें थोपवून धरण्यांत लिओनिडासला बरीच मदत केली. इ. स. पूर्वी ४२४ या वर्षी त्यांच्या सैन्याचा डेलीअम येथें फार नाश झाला. कॉरिंथिअन युद्धांत थेस्पिअनांनीं स्पार्टाची बाजू धरून थिबिसशीं लढाई केली. ल्युक्ट्राच्या लढाईनंतर थिबिसनें थेस्पी शहरचा विध्वंस करून तेथील रहिवाशांना हद्दपार केलें. इ. स. पूर्वी १७१ सालीं थेस्पिअनांनीं रोमशीं सख्य जोडलें.

**थोंग्व**—खालचा ब्रह्मदेश. हंथवड्डी जिल्ह्यांतील ही एक आग्नेयेकडील टाउनशिप आहे. क्षेत्रफळ २१९ चौरस मैल. १९११ सालीं लोकवस्ती ४६२२८ होती. हिच्यांत ७१ खेडीं असून थोंग्व हें मुख्य ठिकाण आहे. १९०३–४४ सालांत वाहित जमीन १९९ चौरस मैल असून जमीनीच्या साऱ्याचें उत्पन्न ४८२००० रुपये होतें.

**थोंझ**—खालचा ब्रह्मदेश. थरवड्डी जिल्ह्यांतील ही एक टाउनशिप असून थरवड्डी पोटविभागांत याच नांवाचें एक गांव आहे. या गांवाची लोकवस्ती १९११ सालीं ६९२९ होती.

**थोरात**—अहमदनगर जिल्ह्यांतील अकोळे तालुक्यांत वीरगांवी एक थोरातांचें घराणें आहे. त्यास दिनकरराव ही पदवी आहे. ती थोरल्या शाहूनें या घराण्यांतील पुरुष शकोजी यास दिली असें म्हणतात. परंतु त्याच्याबद्दल जी हकीकत उपलब्ध आहे तिच्यावरून ती राजारामानें दिली असावी. शकोजीस मोकासा जहागीरहि त्याच वेळीं मिळाली होती. या वंशांतील आनंदराव हा सन १८५१ त हयात होता.

शाहूसंभाजीच्या झगड्यांत अनेक मराठे सरदारहि धंडाळी करूं लागले. अशांपैकींच एक सिधोजी थोरात होता. त्यानें शाहूची कामगिरी चांगली केल्यामुळें त्याला शाहूनें शाबासकी दिली होती. सिधोजीचा भाऊ सुभानजी यानें अष्टयाचें ठाणें घेतलें होतें. सिधोजी हा नारोपंत घोरपडे इचलकरंजीकर याच्या पदरीं होता; त्याला मिरजप्रांतीं सरंजाम मिळाला. सिधोजीचा बाप शिवाजी हाहि पुढें आलेला होता.

हिंगणगांवचा दमाजी थोरात हा रामचंद्रपंत अमात्याच्या पदरीं लष्करांत नौकर होता. जिंजीच्या वेढ्याच्या प्रसंगीं अमात्यानें त्याला सुपे व पाटस प्रांतीं जहागीर दिली. शाहूच्या वेळीं हा कोल्हापुरच्या पक्षांत गेला. पुण्याच्या पूर्वेस २० कोसांवर पाटसजवळ हिंगणगांव ( हिंगी ) येथें हा राही. तेथील त्याची गढी फार मजबूत होती. सभोंवतालच्या १५।२० कोसांत हा कोल्हापुरच्या नांवानें धुमाकुळ घालून खंडणी वसूल करी ( १७१३ ). पुढें बाळाजी विश्वनाथ यास शाहूनें याच्यावर धाडलें असतां, यानें त्याला बेलभंडार देऊन घरीं बोलाविलें व विश्वासघातानें कैद केलें. त्याच्यापासून खंडणी काढण्यासाठीं राखेचे तोबरे त्याला दिले पुढें पुरंदरे व पिलाजी जाधव यांनीं जामीनकी भरून व खंडणी देऊन बाळाजीस सोडविलें. या कैदेंत बाळाजीची बायकामुलेंहि होतीं ( १७१४ ). पुढें शाहूनें नारोपंत सचिवास दमाजीवर पाठविलें, परंतु दमाजीनें त्यालाहि कैद केलें. शाहूनें दंड भरून पुढें त्याला सोडविलें. अखेर स्वतः शाहूनें दमाजीस आपल्या भेटीस जेजूरी येथें बोलावून त्याची समजूत करण्याचा फार प्रयत्न केला पण त्यानें उलट उद्दामपणा दाखविला. विश्वास दाखवून त्याला आणल्यानें, कैद न करतां शाहूनें त्याला निरोप दिला ( १७१६–१७ ). शेवटीं बाळाजीनें सय्यदांची कुमक आणून दमाजीवर स्वारी करून त्याचा पराभव केला व त्यास पुरंदरच्या किल्ल्यावर कैदेंत ठेविलें; हिंगणगांवची गढी पाडून गांवावर गाढवांचा नांगर फिरविला ( १७१८ ). याप्रमाणें १७१४–१८ पर्यंत दमाजीनें शाहूशीं कटकट चालविली होती. शाहूनें त्यावर एकंदर तीन स्वाऱ्या केल्या होत्या. खर्ड्याच्या लढाईंत दमाजीचा वंशज पेशव्यातर्फे हजर होता. [ कैफियती; मराठी रियासत. म. वि. ३; का. सं. पत्रें यादी; भा. इ. मं. इतिवृत्त १८३५.]

**थोरी**—रजपुतान्यांत या जातीची वस्ती मोठी आहे. तेथें १९११ च्या खानेसुमारीच्या वेळेस, यांची संख्या २८४१३ भरली. गरासिया आणि मकवाना असे यांच्यांत दोन पोटभेद असून या दोघांत बेटीव्यवहार होत नाहीं. थोरी हे अस्पृश्य वर्गांतील एक आहेत. हे ओबडधोबड गुजराथी भाषा बोलतात. हिंदुस्थानी भाषाहि यांना चांगली समजते. वयांत आल्याखेरीज थोरी लोक आपल्या मुलींचीं लग्नें करीत नाहींत.

विधवेला आपल्या दीराशीं लग्न करतां येते. जर दीर नसलाच तर सासऱ्याच्या बाजूच्या एकाद्या नातलगाशीं ती लग्न लावते. पुनर्विवाहाच्या वेळीं जातिबांधवांस मद्य पाजण्यांत येतें. विधुराचा बाप विधवेस शुल्कादाखल लहानशी रक्कम बक्षीस देतो.

थोरी लोक खेतरा या एकाच देवतेची उपासना करतात. खेतरा मातेपुढें तुपाचा दिवा जळत ठेवून ते तिची प्रार्थना करतात. दसऱ्याच्या दिवशीं खेतरा देवीच्या पुढें म्हैस अथवा बकरूं मारून हे खातात. डुकराचें आणि गाईचें मांस थोरी लोक खात नाहींत.

देवीच्या आजारानें मृत झालेल्यास पुरण्याची चाल आहे. अन्य कारणांनीं मृत झालेल्या माणसांचें दहन करतात. मृताच्या तिसऱ्या दिवशीं त्याचे नातलग डाळीच्या पीठांत तूप व काकवी मिसळून त्याचे लाडू करतात व ते कुत्र्यांना खावयास देतात. मृत पुरुषाच्या बाराव्या दिवशीं व मृत स्त्रीच्या अकराव्या दिवशीं, जातिबांधवांना व नातेवाईकांना तूपभाताचें जेवण देतात. मुलाच्या मरणानंतर पांचव्या दिवशीं मुलांना जेवण देतात.

खत्रोट किंवा चाटवा नांवाचे लांकडी पलंग करून विकणें हें थोरी लोकांच्या उपजीविकेचें एक साधन होय. छेप अगर गोधड्या करूनहि हे विकतात. यांच्या बायका वेताच्या टोपल्या करून त्या विकतात अथवा धान्याचा मोबदला घेऊन देतात. ते धड उद्योग करीत नाहींत व धड भिक्षाहि मागत नाहींत. कित्येक प्रसंगीं ते गाऊन अथवा बासरीसारखीं वाद्यें वाजवून पैसे मिळवितात. थोरी लोक मामटेगिरी व उचलेपणाबद्दल प्रसिद्ध आहेत ( दि एथ्नॉग्राफिकल सर्व्हे ऑफ बॉम्बे ).

पंजाबांतहि ही जात असून त्यांची लो. सं. १६४५१ आहे. हे सर्व हिंदु आहेत व मुख्यतः हिसार, व फिरोजपूर जिल्हे, नहन, पतियाळा, भावलपूर व सिमला डोंगरी संस्थानें यांत आढळतात. हे डोंगरी जातीचे असून तीपैकीं बैलावर व्यापारी माल वाहून नेतात.

**थोरो, हेन्री डेव्हिड** ( १८१७—१८६२ )—अमेरिकन संन्यासी, प्राणिशास्त्रज्ञ व लेखक; संयुक्त संस्थानांपैकीं, मॅसेचुसेट्स या संस्थानांतील कॉन्कॉर्ड गांवीं हेन्रीचा जन्म झाला. त्याचा बाप पेन्सिली तयार करण्याचा धंदा करीत असे. थोरोचे आईबाप उद्यमशील व सुस्वभावी होते. लहानपणापासून थोरोला रानावनांतून फिरण्याचा छंद लागला होता व तो आमरण कायम टिकला. कॉन्कॉर्डमधील सृष्टिसौन्दर्याचा त्याच्या बालवयावर बराच परिणाम झाला असला पाहिजे. स. १८३३ मध्यें थोरोला हॉरवर्ड युनिव्हर्सिटींत पाठविण्यांत आलें. त्या ठिकाणीं इमर्सनची व त्याची मैत्री झाली. १८३७ साली थोरो पदवीधर झाला. कॉलेजांत असतांना तो फारसा प्रसिद्धीस आला नाहीं. तथापि त्याचें वाचन दांडगें होतें व रानावनांत हिंडण्याची व सर्वदा विचाराच्या तंद्रींत असण्याची त्याला पूर्वीपासूनच संवय होती. स. १८३८ मध्यें तो आपल्या गांवींच शिक्षकाचें काम करूं लागला. या सुमारास न्यू इंग्लंडमध्यें एका नवीन तत्त्वज्ञानाचा प्रसार होऊं लागला होता. या तत्त्वज्ञानाप्रमाणें वागणारांना ‘ रिॲलिस्ट ’ असें म्हणत असत. थोरोच्या गावीं ही चळवळ सुरू झाल्यानंतर, त्यानें शिक्षकाचा धंदा सोडला व तो जॉर्ज रिप्ले, अलकॉट व इमर्सन प्रभृतींना जाऊन मिळाला. परंतु चरितार्थाकरितां त्यानें वडिलांचा पेन्सिलीचा धंदा सुरू केला व त्यांत त्यास चांगलें यश आलें.

जमीनींची मोजणी करण्याचें कामहि त्यास उत्तम येत होतें. याच सुमारास व्याख्यानें देण्यास व लेख लिहिण्यास त्यानें सुरवात केली. स. १८३८त समाज या विषयावर त्याचें कंकॉर्डमध्यें पहिलें व्याख्यान झालें. तिशीच्या पूर्वी केलेल्या बऱ्याच कविता त्यानें जाळून टाकल्या व गद्यलेखनाकडे लक्ष वळविलें. आपले विचार तो रोजनिशींत नमूद करून ठेवित असे. स. १८४० मध्यें इमर्सननें डायल नांवाचें एक त्रैमासिक सुरू केलें व त्याची सर्व व्यवस्था थोरोकडे सोंपविली. या मासिकांत थोरोचे बरेच लेख व कविता प्रसिद्ध झाल्या. १८४१ मध्यें इमर्सननें थोरोला आपल्याच घरीं बोलाविलें व तेथें तो दोन वर्षे होता. स. १८४३ त थोरो हा इमर्सनच्या भावाच्या घरीं शिक्षकाचें काम करण्यास जाऊन राहिला. स. १८४५ मध्यें तो स्टेटन आयलंडाहून शिक्षकाची नोकरी सोडून परत आला. नंतर त्यानें कंकॉर्डपासून दक्षिणेच्या बाजूस दीड मैलावर असलेल्या एका सरोवराच्या काठीं आश्रम बांधून राहण्याचें योजिलें. आश्रमांत असतांना पहाटे उठून तलावांत रोज स्नान करणें, बागेंत सकाळीं काम करणें, माध्यान्ह स्नान करून विचारमग्न होऊन राहणें व रानावनांतून सतत संचार करणें असा त्याचा दिनक्रम असे. त्याचे कपडे जाडेभरडे असत व जेवणें अगदीं साधें असे. वनस्पतींचाच आहार त्यानें ठेविला होता. थोरो हा गुलामगिरीच्या अगदीं विरुद्ध होता व त्याचा आश्रम हें गुलामाचें एक आश्रयस्थान होतें. एकदां थोरोनें कर देण्याचें नाकारालें व त्यामुळें त्यास तुरुंगांत एक दिवस राहावें लागलें होतें. तथापि त्याच्या मनाची मुळींच चलबिचल झाली नाहीं. वॉल्डन येथील आश्रमांत दोन वर्षे काढल्यावर, थोरो स. १८३९मध्यें पुन्हा कंकार्ड येथें जाऊन राहिला. पशुपक्षी, मासे, सर्प, थोरोला अत्यंत वश असत. प्राणिसृष्टीवर थोरोचें अत्यंत प्रेम होतें. थोरोला लहान मुलेंहि फार आवडत असत.

कादंबऱ्या, मासिकें, व वृत्तपत्रें हीं त्यास आवडत नसत. गीता, मनुस्मृति, पंचतंत्र यांवर त्याचें अत्यंत प्रेम होतें. सादीचे ग्रंथ व होमर, व्हर्जिल, मिल्टन, वर्डस्वर्थ, कार्लाईल इत्यादि लोकांचे ग्रंथ त्याला फार आवडत असत. रेड इंडियनच्या वाङ्मयाचाहि त्याला फार नाद होता. १८४७ पासून थोरोनें वाङ्मयाकडे विशेष लक्ष घेतलें. त्या सालीं त्याचा कार्लाइलवरील एक लेख प्रसिद्ध झाला. १८४९ सालीं त्याचा 'सिव्हिल डिसओबीडियन्स' वरील प्रसिद्ध लेख लिहिला गेला. गांधींच्या सत्याग्रह चळवळींत हा लेख हिंदुस्थानांत फार प्रसिद्धीस आला होता. 'वीक ऑन दि कंकॉर्ड अँड मेरिमॅक रिव्हर्स' हा ग्रंथहि त्यानें लवकरच प्रसिद्ध केला. १८५४ सालीं त्याचें 'वॉल्डन' हें विख्यात पुस्तक प्रकाशित झालें. या पुस्तकामुळें त्याची जगभर कीर्ति झाली. स. १८४६ पासून १८६० पर्यंतच्या अवधींत त्यानें पुष्कळ पर्यटणें केलीं. बहुतेक प्रवास तो पायींच करीत असे. १८५९ सालीं जॉन ब्राऊन नामक गृहस्थाचें कंकॉर्ड येथें गुलामगिरीविरुद्ध भाषण झालें व त्या अपराधाबद्दल त्यास देहांत प्रायश्चित्त मिळालें होतें. थोरोनें या गोष्टीचा पूर्ण निषेध करणारें भाषण केलें व या कामीं सरकार व लोक यांची त्यानें मुळींच पर्वा केली नाहीं. १८६० सालापासून थोरोची प्रकृति बिघडूं लागली होती; शेवटीं १८६२ सालीं वसंत ऋतूंत थोरोनें शांतपणें इहलोक सोडला.

'वॉल्डन' व 'एक्सकर्शन' या ग्रंथांमुळें थोरोची फार कीर्ति झाली. वयाच्या तीस वर्षांपर्यंत त्यानें कविता केल्या परंतु उत्कृष्ट कवि म्हणून त्याचा फारसा लौकिक नाहीं. तत्त्वदर्शी व लेखक या दृष्टीनेंहि त्याच्यांत कांहीं दोष आढळतात. तथापि सृष्टीशीं एकतानता पावून मधुर गीतें गाणारा, सृष्टीचें अचुक निरीक्षण करणारा व दिव्य आणि स्फूर्तिदायक विचार प्रकट करणारा लेखक असा थोरोचा जगांत लौकिक आहे.

**थ्रेस**—ईस्टर ( डान्यूब ) नदी व हेमस यांमधील मोएशिआ प्रांताला, व स्ट्रीमन आणि नेस्टस नद्यांमधील प्रदेशाला हें नांव आहे. याच्या उत्तरेस हेमस, पूर्वेस, युक्झाईन समुद्र, दक्षिणेस प्रोपांटिज, हेलिस्पॉंट व ईजिअन समुद्र व पश्चिमेस नेस्टस आहे. हा प्रदेश बहुतांशीं खडकाळ व विषम असा आहे. येथील हवामान ग्रीक लोकांना फार प्रखर भासत असे. युक्झाईनकडील किनाऱ्याला नाविक लोक फार भीत. परंतु दक्षिण किनाऱ्याकडे तशी भीति नसल्यामुळें त्या ठिकाणीं ग्रीक लोकांच्या वसाहती होत्या. दरायस व त्याचे सेनापती यांनीं थ्रेसवर पुष्कळ स्वाऱ्या केल्या. तेथील ग्रीक वसाहतवालेहि त्यांना मदत करीत. थ्रेसियन जातीपैकीं अत्यंत शक्तिमान जात म्हणजे ओड्रिसी लोकांची होय. या जातीच्या टेरीज या राजानें ख्रिस्तपूर्व ५ व्या शतकांत आपल्या राज्याचा विस्तार बराच केला. पेलापोनेसिअन युद्धांत टेरीजच्या मुलानें मॅसिडोनियाच्या विरुद्ध अथेन्सला मदत केली. सर्सोब्लेप्टीज या राजानेंहि हेंच धोरण चालू ठेवलें. व्हेसपेसिअन राजाच्या अमदानींत थ्रेस रोमचें अंकित राष्ट्र बनलें. यानंतर गॉथ व हूण लोकांनीं थ्रेसवर पुष्कळ स्वाऱ्या केल्या. इ. स. १४५३ त संबंध थ्रेस तुर्कांच्या ताब्यांत जाऊन इ. स. १८७८ पर्यंत त्यांच्याकडे राहिला. त्या वर्षी बर्लिनच्या तहान्वयें थ्रेसच्या उत्तर भागाचें पूर्व रूमेलिआ या नांवाखालीं नवीन राज्य बनविण्यांत आलें. सध्यां पूर्व रुमेलीआ हें बल्गेरिआच्या राज्याचा एक भाग आहे व तेथील लोकवस्ती तुर्क, ग्रीक व बल्गेरियन यांनीं मिळून झाली आहे.

थ्रेसमधील मूळ रहिवाशांची नीतिमत्ता फारच हलक्या दर्जाची होती. लग्न होईपर्यंत ते आपल्या मुलींना वाटेल तसें आचरण करण्याची पूर्ण मुभा देत. थ्रेसियन लोक आपलीं अंगें गोंदून घेत असत. या लोकांत व इलीरिअन लोकांत फारच साम्य होतें.

द—या अक्षराच्या एकंदर सात अवस्था असून शेवटचें

द = ɔ ʕ ɖ ɕ ɖ ɖ ɖ वळण

पहिल्याच्या अगदीं उलट बनलेलें आहे. त्याची पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार येथील लेखांत, दुसरी पभोसा येथील लेखांत (ख्रि. पू. १ ल्या शतकाच्या सुमारास), तिसरी महाक्षत्रप (महाराज) शोडास याच्या वेळच्या मथुरा येथील जैन लेखामध्यें, चवथी कुशानवंशी राजाच्या वेळच्या (इ. स. १ लें व २ रें शतक) मथुरा येथील लेखांत, पांचवी राजा-धर्मन् (विष्णुवर्धन) याच्या वेळच्या (इ. स. ५३२) मंद-सोर येथील लेखांत आणि सहावी अवस्था जपानमधील होर्युजी येथील मठांत सांपडलेल्या ताडपत्रावरील 'उष्णीष-विजयधारिणी' या ग्रंथाच्या शेवटीं दिलेल्या (इ. स. ६ वें शतक) संपूर्ण वर्णमालेंत सांपडते.

दओस—राजपुतान्यांतील जयपूर संस्थानामध्यें दओस नांवाच्या निझामत व तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें जयपूर-हून ३८ मैलांवर आहे. लोकसंख्या. (१९११) ५१९१. कच्छवाह लोकांनीं मिनाजवळून अंबर घेण्याच्यापूर्वी दओस हें राजधानीचें शहर होतें. गांवाच्या पूर्वेस एक ओसाड टेंकाड आहे. त्यावर बरगुजर राजांच्या वेळीं बांधलेला एक किल्ला आहे. बरगुजर राजे हे कच्छवाह राजांच्या पूर्वी राज्य करीत होते. गांवाभोंवतीं एक मोडकळीस आलेला तट आहे. ईशान्येस भान्की येथें अभ्रकाच्या मोठ्या लाद्या तयार करून त्या दओस येथें पाठवितात व वायव्येस रेग्याला येथून मूर्ती तयार करण्याकरितां करडा-पांढुरक्या रंगाचा संगमरवरी दगड येतो.

दखिनपाट—आसामांतील शिवसागर जिल्ह्यांतील एक खेडें. हें ब्रह्मपुत्रा नदीच्या उजव्या तीरावर असून माजुली बेटांत आहे. येथें वैष्णवसत्र आहे. ह्या सत्राचा मुख्य गोसांई असून खेड्यांतील लोकांवर याची विलक्षण छाप असते. हें सत्र १६ व्या शतकांत अस्तित्वांत आलें असें म्हणतात. अहोम राजांच्या देणगीवर ह्या पीठाचा खर्च चालतो. हें एका फारच रमणीय जागीं बांधलें आहे. दखिनपाट येथील गोसांई यास सरकारी कोर्टात जावें लागत नाहीं.

दखिनशाहाबाझपूर—बंगाल. बकरगंज जिल्ह्याचा पोटविभाग व मेघना नदीच्या मुखाजवळील एक मोठें बेट. क्षेत्रफळ ७९२ चौ. मैं. लोकसंख्या (१९११) ३१८३३७. ह्या पोटविभागांत ५५२ खेडीं असून पैकीं भोला हें मुख्य ठिकाण आहे. मेघना नदीच्या मुखाशीं गाळ बसून हें बेट तयार झालें आहे. तुफानामुळें व चक्रवातामुळें येथें फार नुकसानी होते.

दंडक—(सू. वं.) इक्ष्वाकूच्या शतपुत्रांतील तिसरा पुत्र. यानें गुरुकन्येस भ्रष्ट केल्यामुळें गुरूच्या शापामुळें याचा नाश झाला. याच्या नांवावरूनच दंडकारण्यास नांव पडलें असें रामायणांत म्हटलें आहे (उत्तरसर्ग ७९–८१).

दंडक—या नांवाचा कोंकणपट्टींत प्राचीन काळीं एक देश होता. सहदेवानें पश्चिम किनाऱ्याचे जे देश जिंकले त्यांत शूर्पारक, दंडक आणि करहाटक या तीन देशांचीं नांवें आहेत. दंडक म्हणजे सध्याचें दंडकारण्य नव्हे तर शूर्पारकाच्या दक्षिणचें जें कोंकण तें. ह्या सध्या डंडाराजापुरी किंवा दंडाराजापुरी ह्या शब्दांत राहिला आहे. दंडक या संस्कृत शब्दाचें दंडअ हें महाराष्ट्रीय रूप असून डंडस हें शौरसेनी रूप आहे; आणि या दोहोंचीं डंडा आणि दंडा हीं गुजराथी व मराठी रूपें विद्यमान आहेत. दंडा किंवा डंडा हा शब्द कर्णाटांतील व सह्याद्रि पर्वतावरील मूळच्या लोकांचा असून त्याचा अर्थ डोंगराचा उतरता लांब फांटा असा आहे. दांड, डांड, डांग, डंग, डुंग, डोंगर, डोंगरी वगैरे शब्द सह्याद्रींतील कोळी लोकांत अद्यापहि प्रचलित आहेत. हे कोळ उर्फ कोल लोक सह्याद्रि पर्वतावरील मूळचे रहिवासी असावे. दंडाराजापुर प्रांतांतून घांटानें वर चढलें म्हणजे करहा-टक प्रांत लागतो.

दण्डी—एक संस्कृत कवि. माधवकृत शंकरविजयांत याचा उल्लेख बाणभट्ट व मयूरकवि यांच्या बरोबर केलेला आहे. दण्डी हा ब्राह्मण असून अवंतीस राहत असावा. निर्णयमालाकारांनीं बाणभट्टाचा काळ शके ५७२ हा ठरविला आहे. दण्डी हा बाणापूर्वी ११२ वर्षे होता असें म्हणतात. दण्डी हा भवभूतीचा समकालीन असावा असें कै. पिपळूण-करांनीं दशकुमारचरितांतील अंतःप्रमाणावरून सिद्ध केलें आहे. दशकुमारचरितांत बौद्धांचा उल्लेख आहे. कालिदा-साच्या ग्रंथांत किंवा सुबंधु व बाण यांच्यादि ग्रंथांत बौद्धांचा उल्लेख नाहीं. तो उल्लेख फक्त दण्डी व भवभूति यांच्या काव्यांतच आढळून येतो, ही गोष्टहि विचार करण्यासारखी आहे.

प्रतिहारेन्दुराम यानें प्रथमच दंडीचा निर्देश केलेला आढळतो. त्यानें बृहत्कथा व सेतुबंध यांचा उल्लेख केला आहे. परंतु त्यावरूनहि या प्रश्नावर कांहींच प्रकाश पडत नाहीं. कांची येथील पल्लव राजांचा त्यानें उल्लेख केलेला आहे त्यावरून तो दक्षिण हिंदुस्थानांतील असावा. या तर्कास द्रविडांच्या दंतकथेचाहि आधार आहे. नवव्या

शतकांतील अलंकारावरील एका ग्रंथांत दण्डीचा उल्लेख सांपडतो. कविराजमार्ग नामक एका कानडी काव्यांत दण्डीच्या कवितांचें हुबेहूब भाषांतर केलेलें आढळतें.

वामनापूर्वी दण्डी झाला व नववें शतक हाच दण्डीचा काल होय असें कित्येकांचें मत आहे. दण्डीची काव्यरीति अथवा मार्ग यांत वामनानें पूर्ण प्रगति केलेली आढळते. दण्डीनें दोनच प्रकारचे 'मार्ग' सांगितलेले आहेत; परंतु वामनानें 'रीती' चा नवीन उपक्रम केला. तो आठराव्या शतकाच्या अखेरीस व नवव्या शतकाच्या आरंभीं होऊन गेला असावा असें बऱ्याच विद्वानांचें मत आहे.

ख्रिस्ती शकानंतर ६०६--६४७ सालीं हर्षराजाच्या कारकीर्दीत बाण होऊन गेला. बाण व दण्डी हे समकालीन होते असें म्हणतात. दण्डी व माघ यांमध्यें विलक्षण साधर्म्य असल्याचें याकोबीनें दाखविलें आहे. पाठकांच्या मतें दण्डीकृत 'कर्माचे' तीन विभाग भर्तृहरीच्या वाक्यपदीची स्मृति करून देतात एतावता बाण, भर्तृहरि व माघ हे एकाच काळांत झाले असून सातव्या शतकाच्या मध्यास त्यांचा उत्कर्ष झालेला होता असें कित्येक मानतात.

उपर्युक्त मतांतरावरून नक्की काळ कोणता या प्रश्नाचा निर्णय झालेला नाहीं. दण्डीनें भामहावर टीका केलेली आहे. यावरून भामह हा दण्डीपूर्वी झाला हें उघड आहे. गौडी व वैदर्भ मार्ग, कथा व आख्यायिका यांमधील भेद व दशदोष यांसंबंधीं भामह व दण्डी यांमध्यें कसा मतभेद होता हें पाहणें दण्डीचा काळ ठरविण्यास एक गमक आहे. दण्डीनें भामहाचे ग्रंथ पाहिले होते व भामहाच्या मतांचा दण्डीनें ऊहापोह केलेला आहे. दण्डी हा भामहानंतर झाला ही गोष्ट मान्य केली म्हणजे, आठव्या शतकाचा आरंभ हाच दण्डीचा काळ होय ही गोष्ट स्पष्ट होते.

दण्डीनें भामहप्रभृति जुन्या विद्वान लोकांच्या ग्रंथांचा चांगला उपयोग करून घेतला आहे.काश्यप व वररुचि यांच्या ग्रंथांशीं त्याचा बराच परिचय होता असें दिसतें. हृदयंगमा नामक दण्डीवरील एक टीकाप्रबंध प्रसिद्ध असून तरुण वाचस्पतीनें दण्डीवर टीका केली आहे. बाकीच्या टीका आधुनिककालीन आहेत.

दण्डी व त्याच्यानंतर झालेला वामन यांनीं ज्या रीति-काव्याचा अवलंब केला ती पूर्वीपासूनच असल्याचें दिसून येते. भामहाची अलंकारपद्धति व वामनाची रीतिपद्धति या दोहोंच्या दरम्यान दण्डीचा अलंकार-संप्रदाय सुरू झाला होता. ध्वनि व अर्थ यांसंबंधीं दण्डी व भामह यांत मतभेद नाहीं. कथा व आख्यायिका यांच्या बाबतींत त्यांचा मतभेद असून या दोहोंतील भेद दण्डीनें फारसा मानलेला नाहीं. काव्याचे गद्य, पद्य व मिश्र असे भेद कल्पून दण्डीनें संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, व मिश्र असे चार भाषाभेदहि सांगितले आहेत. दण्डीनें चार प्रकारचे काव्यप्रबंध सांगितले आहेत. सर्गबंध ( महाकाव्य ) हा संस्कृतांत असतो, स्कंधक हा प्राकृतांत असतो, ओसर हा अपभ्रंशांत असतो व नाटकाची भाषा मिश्र असते असें दण्डीनें प्रतिपादन केलें आहे. श्राव्य व प्रेक्ष्य असे जुने प्रकारहि दण्डीनें मानलेले आहेत. काव्यास अलंकाराची जरूरी आहे परंतु त्यांत गुणहि असले पाहिजेत. रीतिबद्दल दण्डीनें मार्ग हा शब्द वापरला आहे. 'इष्टार्थव्यवच्छिन्ना पदावली' अशी त्यानें काव्याची व्याख्या केली आहे. वैदर्भ व गौड असे दोन मार्ग सांगून वैदर्भ मार्गच श्रेष्ठ असें त्याचें मत होतें. श्लेष, प्रसाद, समता, माधुर्य सुकुमारता, अर्थव्यक्ति, उदारत्व, ओजा, कांति व समाधि असे वैदर्भी-मार्गाचे दशप्राण आहेत. शब्दालंकार व अर्थालंकार हे महत्त्वाचे असून त्यापैकीं, अर्थालंकाराचे ३५ प्रकार व त्यांचे उपभेद त्यानें दाखविले आहेत. स्वाभाविक, उपमा, रूपक, दीपक, वृत्ति, श्लेष इत्यादि मुख्य ३५ अलंकार असून त्यांचे कांहीं पोटभेदहि आहेत. अलंकाराच्या व्याख्या देऊन त्यांच्या उदाहरणाचे श्लोक काव्यादर्शांत दिलेले आहेत. शिथिल, व्युत्पन्न, वैषम्य, दीप्त, अत्युक्ति, नेयत्व, इत्यादि काव्यदोषांची दण्डीनें चर्चा केलेली आहे. काव्यगुण वैदर्भरीतींत असून दोष गौडीरीतींत सांपडतात असें त्यानें म्हटलें आहे. पददोष, पदार्थदोष, वाक्यदोष व वाक्यार्थदोष असेहि त्यानें विभाग कल्पिले आहेत.

काव्यादर्शाशिवाय दण्डीचा दुसरा ग्रंथ 'दशकुमारचरित' हा होय. हा ग्रंथ अपूर्ण असून तो दुसऱ्या एकानें पुरा केलेला आहे. या उत्तर भागाचें नांव 'दशकुमारचरितशेष' असें आहे. या ग्रंथाचें साम्य पंचतंत्र, हितोपदेश वगैरे ग्रंथांशीं जितकें आहे तितकें 'वासवदत्ता,' 'कादंबरी' यांसारख्या ग्रंथांशीं नाहीं. साऱ्या कुमारचरितात शृंगार व वीर हे रस मुख्य आहेत. 'दंडिनः पदलालित्यं' ही गोष्ट प्रसिद्ध असून दण्डीचा निर्देश कालिदास, भारवी, माघ वगैरे कवींबरोबर करण्यांत येतो; व यावरून हा कवि फार उच्च दर्जाचा होता असें दिसतें. दशकुमारचरितावरून आढळून येतें कीं, गद्यरूप कविता लिहिण्याचा प्रकार यानेंच प्रथम सुरू केला. दण्डीची कीर्ति होण्याचें एक कारण असें आहे कीं, त्याच्या दशकुमार चरितांत तत्कालीन स्थितीचें चित्र प्रतिबिंबित झालें आहे. 'कविर्दण्डी कविर्दण्डी कविर्दण्डी न संशयः' या उक्तीवरून त्याची कीर्ति व योग्यता मोठी होती असें दिसतें. दशकुमारचरित लिहिणारा व काव्यादर्श लिहिणारा असे दोन निरनिराळे दण्डी नांवाचे कवी होऊन गेले असा एक वाद हल्लीं उपस्थित झाला आहे.

[ संदर्भग्रंथः—डे कृत "संस्कृत पोइटिक्स" (कलकत्ता); वेबर कृत "भामह आणि दण्डी"; चिपळूणकर कृत "संस्कृत कविपंचक"; मॅकडोनल्ड—हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर; अर्वाचीन कोश. ]

**दंतमंजन**—प्रातःकाळीं उठतांच दांत घांसण्याचा प्रघात सर्वत्र आहे. पण तेवढ्यानें दांत स्वच्छ राहत नाहींत. जेवण झाल्यावर दांत स्वच्छ व सावकाशीनें धुणें जरूर आहे. तसें न करतां राहिले तर दांतांच्या सांधींत अन्नाचे कण राहून तेथील उष्णता व ओलावा यामुळें ते कुजतात. त्यापासून तोंडास घाण येते व दांत किडतात. दांत स्वच्छ करण्यास पाश्चात्य लोक नाजुक लहान ब्रशांचा उपयोग करतात. दांतांस लावण्यास अनेक जातींचीं दंतमंजनें आहेत. हिंदुधर्मशास्त्रांत दंतधावन हा नित्य विधि सांगितला आहे. हिंदुस्थानांत पुष्कळ लोक रूई, वड, खैर, लिंब इत्यादि झाडांच्या ताज्या मृदु टोंकाच्या बारीक कांड्या घेऊन त्या चावून त्यांनींच दांत घांसतात व स्वच्छहि करतात. यानें ब्रशाचें व दंतमंजनाचें अशीं दोन्हींहि कामें होतात. दांत घांसण्यास राखुंडीपासून ते किंमतवान दंतमंजनापर्यंत कशाचाहि जरी उपयोग केला तरी हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, त्या पदार्थांत वाळूसारखे कठिण कण असूं नयेत. आपल्यामध्यें सुपारी, बदामाच्या साली इत्यादि जाळून त्याच्या कोळशाची पूड करतात पण ते पुरते जळले नसल्यामुळें त्या पुडीमध्यें कठिण कण राहतात. शिवाय तीपासून जीभ, दांत, ओंठ, हात इत्यादि काळे होतात व तो काळेपणा लौकर जात नाहीं हे या दंतमंजनांत दोष आहेत. शुद्ध खडू ( चॉक ) मध्यें जरूरीप्रमाणें व आवडीप्रमाणें कापूर, सावण, बकूल, बाभूळ, जांभूळ इत्यादिकांच्या सालींची पूड मिश्र करून दंतमंजन तयार करणें चांगलें.

दंतमंजन तयार करतांना पुढील गोष्टींकडे विशेष लक्ष पुरवावें लागतें. ( १ ) त्याच्या अंगीं दांत शुभ्र व स्वच्छ करण्याचा धर्म असला पाहिजे. ( २ ) चर्वण केलेल्या अन्नाचे बारीक कण दांतांत अडकून राहिल्यामुळें जी कीड उत्पन्न होते तिचा नाश करण्याची शक्ति त्याच्यांत पाहिजे. ( ३ ) दंतमंजनांत कृमिनाशाकरितां घातलेल्या रासायनिक द्रव्यानें मूळ दांतांवर कोणताहि वाईट परिणाम होऊं नये. ( ४ ) त्याला कोणत्याहि प्रकारची न आवडेल अशी चव किंवा वास नसावा. ( ५ ) लोखंडावरचा गंज काढण्याकरितां तें कानशीनें घासलें असतां गंज निघतो पण त्याबरोबर लोखंडहि झिजतें त्याप्रमाणें दंतमंजनानें दांत झिजतां कामा नयेत.

दंतमंजनांतील मुख्य घटक द्रव्यें.—(१) पाण्यांत कालवून ढवळाढवळ न करतां ठेवल्यावर तळीं बसलेला खडू याच्या अंगीं दांतावरील सर्व घाण काढून टाकून ते स्वच्छ करण्याचा धर्म असून शिवाय तो इतका मऊ असतो कीं, कसल्याहि किडलेल्या किंवा पातळ लुकण लावलेल्या दांतांना त्याच्या योगानें बिलकुल इजा होत नाहीं. खडूच्या ऐवजीं कोळसा, प्युमिस दगडाची भुकी, समुद्रफेंस वगैरे पदार्थांचा उपयोग केला तरी चालतो. पण खडूच्या अंगचे सर्व गुण ह्यांत नसल्यामुळें खडूच वापरणें जास्त चांगलें. ( २ ) क्यास्टाइल सोपः–लालाग्रंथींमधून निघणारा श्लेष्मा व दांतांवरील बुरशी नाहींशी करण्यास ह्या साबूसारखा दुसरा चांगला पदार्थ नाहीं; मात्र त्याला एक प्रकारची अरुचीकारक चव असल्यामुळें त्याचा उपयोग फार प्रमाणशीर केला पाहिजे. ( ३ ) फ्लोरेंटाईन ओरिसः-वेखंडाच्या जातींचें मूळ. क्यास्टाईल साबूचा वास मारण्याकरितां याचा उपयोग करतात. ( ४ ) चांगली चव आणि सुवास आणणारे पदार्थ साखर, सॅकरिन, लवंगांचें व दालचिनीचें तेल, पेपरमिंटचा अर्क, गुलाबी अत्तर वगैरे. सॅकरिन ही अतिशय गोड कृत्रिम साखर आहे. एक पौंड दंतमंजनांत फार तर २ तें ५ ग्रेन ती घातली म्हणजे बस होते. सॅकरिनच्या ऐवजीं दुग्धशर्करा अथवा ऊंसापासून तयार केलेली साखरहि वापरतात. ( ५ ) दंतमंजनाला रंग आणणारीं द्रव्यें:—कारमाइन, कोचिनिल वगैरे. दंतमंजन करतांना सर्व पदार्थांची चांगली भुकणी करण्याची अत्यंत अवश्यकता असते.

कृति १ ली.—द्रव्यें–प्रेसिपिटेटेड चॉक ( एक प्रकारचा खडू ) १ पौंड, कॅस्टाइलसाबू १ औंस, ओरिस २ औंस, साखर २ औंस अथवा सॅकॅरिन २ ग्रेन, व विंटरग्रीनचें तेल. या निरनिराळ्या पदार्थांची चांगली वस्त्रगाळ पूड करून चाळावी. थोडयाशा खडूंत विंटरग्रीनचें तेल घालून त्याचा मिलाफ झाल्यावर ती बाकीच्या खडूंत मिसळावी. नंतर सर्व पदार्थांचा एकजीव होण्यासाठीं ते सर्व पदार्थ पुन्हां एकदां वस्त्रगाळ करावेत. अथवा वस्त्रगाळ करण्याच्या ऐवजीं ८० नंबरच्या चाळणीचा उपयोग करावा. ही पावडर तयार करण्यास रत्तलीं सरासरी ६ आणे खर्च येतो.

कृति २ री.—क्यालवेल, हॅन्बर्ड, हडनट वगैरे गुलाबी रंगाची आणि वासाची टुथ-पावडर खालीं सांगितल्याप्रमाणें तयार करतात. तळचा गाळीव खडू १ रत्तल, ओरिस २ औंस, क्यास्टाइल साबू १ १/२ औंस, साखर १ १/४ औंस, कारमाइन रंग १५ ग्रेन, गुलाबी अत्तर १२ थेंब, लवंगांचें तेल ४ थेंब.

पहिल्या चार पदार्थांची निरनिराळी वस्त्रगाळ पूड करावी. ओरिसची पूड, लवंगांचें तेल व गुलाबी अत्तर एकत्र खलावें. थोडयाशा अमोनियांत रंग वितळवून पाव हिस्सा खडूंत घालून खलल्यानंतर तो कागदावर पातळसा वाळूं द्यावा म्हणजे अमोनिया उडून जाईल. अमोनियाचा बिलकुल वास राहिला नाहीं म्हणजे तो बाकीच्या खडूंत मिसळून सर्व पदार्थ पुन्हां एकदां एकत्र वस्त्रगाळ करावेत. गुलाबी अत्तराचा वास चांगला उठून यावा म्हणून जरी लवंगांचें तेल घालतात तरी तें फारच थोडया प्रमाणांत घालावें; नाहीं तर गुलाबी वास त्या तेलाच्या वासांत दडून जाईल. निळसर गुलाबी मंजन पाहिजे असेल तर कारमाइन रंग न घालतां व्हॉयोलेटचा अर्क ४ औंस घालून असा रंग पाहिजे असेल त्या मानानें एव्हरग्रीन रंग वापरावा.

कृति ३ री.—कीड लागलेल्या दांतांस फारच गुणकारक दंतमंजन पुढीलप्रमाणें तयार करितातः—टांकणखाराची लाही ५० भाग, सिलीस्यालिक ॲसिड ५० भाग,

ब्लड ५० भाग, खडू २० भाग, पिपरमिंटचा अर्क १२ भाग. ड्रेगन्सब्लड हा एक वनस्पतीपासून निघणारा राळेच्या रसासारखा पदार्थ आहे. वरील सर्व पदार्थांची चांगली वस्त्रगाळ पूड करून तिला पिपरमिंटच्या अर्काचा वास द्यावा.

कृति ४ थी.—दांतांवरील अल्कलाईन साल्टचें किटण नाहींसे करून दांत स्वच्छ करणारें मंजनः—खडू १० भाग, मॅग्नेशिअम कार्बोनेट ३० भाग, क्यास्टाईल सोप १० भाग, मेंथाल ½ भाग, सॅलोल ४ भाग व पुदिन्याचा अर्क १ भाग. हें मंजन तयार करतांनां १० ते २० भाग प्यूमिस दगडाची बारीक भुकी त्यांत मिसळावी.

कृति ५ वी.—मुख्य घटकावयव कोळसा असलेलीं मंजनें तयार करण्याच्या कृतीः— (१) कोळसा आणि साखर समभाग; वासाकरितां लवंगांचें तेल. (२) कोळसा ५० भाग; रेड किनो ५० भाग व साखर २ भाग. वासाकरितां पेपरमिंटचा अर्क घालावा. (३) साखर ६० भाग, तुरटी ५ भाग; क्रीम ऑफ टारटर १० भाग. यांच्या वस्त्रगाळ पुडीमध्यें कोचीनिल पूड तीन भाग मिसळून वस्त्रगाळ करणें. [भिषग्विलास व उद्यम मासिक.]

दंतवैद्यक—दंतवैद्यक हें हल्लीं निराळें व स्वतंत्र शास्त्र मानण्यांत येत असून त्याचा उद्देश मुख व त्यांतील दांत वगैरेंच्या रचनेसंबंधीं सोपपत्तिक आणि व्यावहारिक अभ्यास व त्यांचे नाना प्रकारचे रोग बरे करणें आणि किडके दांत भरणें अगर ते काढून टाकून नवे दांत अगर त्यांची कवळी बनवून ती बसविणें हा होय. ही विद्या अगदीं नवीन आहे असें नाहीं. खिस्ती शकापूर्वी ५०० वर्षे हिरोडोटस याच्या ग्रंथांत हा स्वतंत्र धंदा असल्याचा उल्लेख सांपडतो व त्याच्या अगोदर मिसर देशांत व हिंदुस्थानांत पडलेल्या दांताऐवजीं लांकूड किंवा हस्तिदंताचे दांत बसवीत अशी माहिती उपलब्ध आहे. इ. स. १३१ या वर्षी गॅलेन या वैद्यास दांत म्हणजे हाडाशीं साम्य असलेली रचना असून दांत गर्भावस्थेंत बीजरूपानें असतात आणि त्यांच्या वरच्या मज्जातंतूंचा संबंध नेत्राच्या मज्जातंतूंशीं आहे ही माहिती होतीसें दिसतें. त्यानंतर एका प्राण्याचा दांत काढून तो दुसऱ्या प्राण्याच्या जबड्यांत कलमाप्रमाणें बसवण्याची कला जॉन हंटरनें (१७२८-१७९३) प्रचारांत आणली. यानंतर या शास्त्राची प्रगति शास्त्रीय रीतीनें करण्याचा प्रयत्न फ्रेंच वैद्यांनीं करून त्यांपैकीं फॉचॉर्ड यानें हा धंदा व हें शास्त्र स्वतःच्या पायावर उभें राहील अशी योजना व प्रयत्न करून ग्रंथ लिहिले व म्हणून यास या विद्येच्या कलेच्या पितृस्थानीं मानतात. फ्रान्स देशांत यापूर्वी कोणीहि अडाणी मनुष्य हा धंदा कशाहि वाईट तऱ्हेनें करून पैसा मिळवी; हें फॉचॉर्डनें बंद करवून जे उमेदवार जुन्या अनुभविक दंतवैद्याजवळ ही कला रीतसर शिकले असताल त्यांची परीक्षा एका अधिकृत मंडळानें घेऊन त्यांतील यशस्वी उमेदवारांनीं या धंद्यांत पडावें असा प्रघात पाडला व तो लोकांनां आवडला. हाड किंवा हस्तिदंताच्या ऐवजीं पोर्सीलेन या पदार्थाचा उपयोग कृत्रिम दांत बनविण्याच्या कामीं करण्याचा प्रघात यानें पाडला. पोर्सेलिनचे दांत करण्याची कला प्रथम फ्रान्स व जर्मनींत गुप्त राखण्यांत आली होती; नंतर ती कला इंग्लंडांतहि एकानें नेली व लवकरच त्याचें गौप्य फुटून त्याची माहिती विद्यार्थ्यांनां रीतसरपणें शिकवूं लागले. जोसेफ फॉक्स व टॉमस बेल या इंग्रज दंतवैद्यांनीं व इतरांनीं १९ व्या शतकांत अनेक शोध लाविले; व या धंद्यांतील अडाणी लोकांची हकालपट्टी केली. तेव्हांपासून या धंद्याचे औषधीय व दंतशास्त्र वैद्यकासंबंधीं अभ्यास करणारे वैद्य आणि केवळ हुन्नरविषयक म्हणजे ज्यांत हस्तकौशल्य बरेंच लागतें असे व केवळ कृत्रिम दांत बनवण्याची कला शिकलेले हुन्नरी दंतवैद्य असे दोन वर्ग प्रचारांत आले. फ्रान्समध्यें मोठी क्रांति झाली त्या धामधुमीच्या काळांत पोट भरण्यासाठीं इंग्लंडांतून व विशेषतः फ्रान्समधून दोन्ही प्रकारचे पुष्कळ कुशल दंतवैद्य अमेरिकेंत जाऊन स्थाईक झाले, व तेथें त्यांनां अनुकूल क्षेत्र सांपडून त्यांजपासून खुद्द अमेरिकन लोकांनीं ही कला उमेदवारी करून उचलली. जुन्या डॉक्टरांजवळ अगोदर कांहीं वर्षे उमेदवारी करून नंतर धंदा करण्याचा परवाना मिळविणें ही चाल हल्लींच्या परीक्षेऐवजीं इतर डाक्टरवर्गांत पूर्वी होती व ती पुढें मोडली आणि विद्यापीठें, कॉलेजें व परीक्षा तिकडे अस्तित्वांत आल्या. त्याचा परिणाम असा झाला कीं, दंतवैद्यक शिकण्यास उमेदवारी करण्याची चाल मोडून तद्विषयक विद्यापीठें, शाळा व परीक्षा हाच क्रम सोईस्कर वाटूं लागला व तो हल्लीं तेथें चालू आहे. हिंदुस्थानांत मात्र इंग्रज व अमेरिकन दंतवैद्यांजवळ उमेदवारी अगर चाकरी करून या धंद्यास प्रथम मुंबईंत पारशी लोकांनीं आरंभ केला व फी घेऊन ते व इतर जातीचे दंतवैद्य आपल्या मर्जीनुरूप इतरांस ही कला शिकवितात. हिंदुस्थानांत दंतवैद्यक शाळा अगर कॉलेज अद्याप असावें तसें एकहि नाहीं व म्हणून तत्संबंधीं परीक्षा व पदव्याहि नाहींत ही उणीव होय. पाश्चात्य देशांत या दंतवैद्यक शाळांतील प्रवेशपात्रतेचा व अभ्यासक्रमाचा दर्जा सुधारत जाऊन हल्लीं तो इतर वैद्यकशाळेच्या तोडीचा केला आहे; व सर्व सुधारलेल्या देशांत या शाळा व कॉलेजांची संख्या झपाट्यानें वाढत आहे. दंतवैद्यकसंबंधी वरील सुधारलेल्या युरोपियन व अमेरिकन देशांत वजनदार व श्रमपूर्वक चालविलेलीं नियतकालिकें निघून त्यांच्या द्वारें शोध व अनुभव प्रगट होण्यास चालन मिळत आहे.

या वैद्यकास महत्त्व येण्यास अलीकडे एक महत्वाचें कारण झालें आहे. मुख व दांत हे चवर्णास व पचनास अत्यावश्यक आहेत हें सर्वांस ठाऊकच आहे; परंतु नवीन शोधानें असें सिद्ध झालें आहे कीं, या दांतांतील व मुखांतील मज्जातंतूंचा संबंध दूरवर असल्यामुळें व मुख म्हणजे नानाविध रोगबीजें शरीरांत प्रवेश करण्याचें आद्य महाद्वारच

होय; म्हणून दांत व मुख हे दुष्ट जंतूंचें केवळ आगर होय. मज्जातंतूंचा व इतर शारीरिक रोगांचा मूळांतच बीमोड करणें असल्यास हें शास्त्र जितकें अवगत असेल तितकी पुढील रोगांची अनर्थपरंपरा टळते. याविषयीं वरील सर्व देशांतील विद्वानांची एकवाक्यता झाल्यामुळें दांतांची सूक्ष्मदर्शनीय रचना, त्यांची गर्भावस्थेंतील वाढ यांविषयीं फार महत्त्वाचे शोध लागले आहेत. पादांगुष्ठवातरोग, अस्थिमार्दवरोग, रक्तपित्त, शिकताप्रमेह, खर पडणें, शिसें व पारदविषार व आणखी कांहीं रोगांमध्यें दांतांवर परिणाम होतो. कांहीं दूरस्थ रोगलक्षणें केवळ रोगट दांत काढून टाकल्यानें थांबतात. सर्वांत मोठा शोध बर्लिन येथील मिलर यानें लावला तो, हा कीं, अन्नांतील पिठूळ पदार्थ कुजून त्या अम्लोत्पत्तीमुळें व जंतूंच्या मध्यस्थीमुळें दांतांतील चुना, फास्फेट वगैरे रचना विरघळून जाऊन दांतांतील नाजुक मगज उघडा पडतो व तो कुजून जातो व दांतावर कीट जमतें व नंतर तो मगज निर्जीव होतो; परंतु या दुष्ट जंतुपूरित घाणीमुळें हाडीमण, क्षय, घांवरें, मस्तिष्कावरणदाह, फुप्फुसावरणपूयप्रचानदाह, गळवें, अर्धांग, वगैरे रोग होतात असें हल्लीं मत प्रचलित आहे. या विद्येंत शस्त्रदंतवैद्यक आणि दुसरीं दंतवैद्यक अशा दोन शाखा मानतां येतात व यांपैकीं दुसऱ्या कलेमध्यें किडक्या दांतांत चांदी, सोनें अगर इतर पदार्थ भरून त्यांतील भोंक बुजविणें या क्रियेचा समावेश होतो. ही कला १७ ते १९ व्या शतकांत प्रचारांत आली. जुन्या काळीं यासाठीं शिसें वापरीत. पुढें सोन्याचा वर्ख अगर पातळ पत्रा दांतांत कोंबून बसवीत व नंतर कानशीनें घांसून झिलई देत. जस्ताच्या पातळ पत्र्याचाहि उपयोग करीत. या कृती सदोष; म्हणजे पत्र्याच्या तुकड्यांत एकजीवतेचा अभाव असल्यामुळें भरलेलें लुकण पडून जाई. म्हणून या पत्र्याचे तुकडे हस्तिदंत, शिसें वगैरेंच्या हातोडीनें, कांटेरी दट्टयानें ठोकून बसवल्यामुळें पत्र्यांतील एकजीवता वाढली व लुकण मजबूत बसूं लागलें. या हातोड्यांतहि स्प्रिंग, हवेचा दाब, विद्युच्चुंबन व दंतयंत्र यांचा उपयोग करूं लागल्यामुळें या कलेस पूर्णता आली. दंतयंत्रांतील तत्त्व सामर्थ्यानें भोंक पाडणें हेंच आहे. दांतांतील किडक्या छिद्रास मोठें करून तें लुकणानें भरण्याजोगें करणें हें त्याचें मुख्य कार्य आहे; तथापि भरलेलें लुकण कानसणें, घासणें व त्यास झिलई देणें, दांतावरील कीट घांसून त्यांस शुभ्र तकाकी आणणें, वांकडे दांत घांसून व कानसून इतर दांतांबरोबर करणें या कामीं त्याचा उपयोग होतो. याशिवाय जबड्याच्या हाडास अगर डोक्याच्या कवटीस लहान मोठ्या आकाराचें छिद्र पाडून तेथील रोग काढून टाकणें या कामीं त्याचा उपयोग होतो. रबराचा तुकडा व सोन्याचा पातळ पत्रा बेमालूम ठोकून नाजुक रीतीनें बसवल्यामुळें मुखांतील दुष्ट जंतुमिश्र लालारस दांतांच्या छिद्रांत व फटींत शिरून वरील रोग होत नाहीं; तथापि हें सोन्याच्या लुकणाचें काम एकंदरींत अवघड व दिरंगाईचें असल्यामुळें गटापर्चा, सिमेंट, झिंक आक्साइड, झिंकक्लोराइड व फास्फारिक ॲसिड यांचा रांधा करून त्याचें लुकण बसवितात; अगर अगोदर प्लाटिनमचा अति पातळ पत्रा छिद्रांत पोकळ बसवून त्याचा सांचा करतात; त्यांत पोर्सेलिनचें चूर्ण व अल्कोहोल यांचा रांधा भरतात; व तें वाळल्यावर बाहेरील सांचा काढून घेऊन तें लुकण छिद्रांत बसवितात व त्यास झिलई देतात. दांताचा मगज उघडा पडल्यास त्यावर पातळ पत्र्याचें टोपण बंदोबस्तानें बसवतात. सोमलामध्यें (आर्सेनियस ॲसिड) हा मगज निर्जीव करण्याचा गुण आहे. पण तें झोंबतें म्हणून त्यांत मार्फिया वगैरे पदार्थ घालून ते तो मगज निरुपद्रवी करण्याच्या कामीं लावतात. सो क्रमहि हल्लीं मागें पडून कोकेननें मगज बधिर करून तो काढतात व त्यामुळें दांत पोखरतांना इजा व वेदना होत नाहींत. हा मगज मात्र पुरा काढला गेला पाहिजे. म्हणजे तो दांत पुष्कळ दिवस टिकतो व इतर दांतांस आधारभूत होतो. हा मगज निर्जीव झाल्यावर दांत काळवंडतो; पण हे क्यालशियम हैपोक्लोराइड व आसेटिक ॲसिड त्यांत थोडें भरण्यानें बंद झालें आहे. हें कार्य करणारीं दुसरींहि औषधें थोडीं आहेत.

वांकड्या तिकड्या अगर किडक्या दांतामुळें खोकला, पडसें, अजीर्ण, रूक्षता हे रोग अंगीं जडतात परंतु रोगट दांत उपटणें ही साधी कलाहि परवापर्यंत दंतवैद्यांस चांगलीशी साध्य नव्हती; व म्हणून दांत उपटतांना बरीच दांडगाई व आरडाओरड होई, परंतु आधुनिक पद्धतीचे व दंतरचनेबरहुकूम दांत उपटण्याचे वेगवेगळे चिमटे व सांचणें तयार केल्यामुळें हें अगदीं हुकमी, हिशेबी व बिनचुक शास्त्र व कला होऊन बसली आहे. प्रथम दांत बधिर करण्यासाठीं नायट्रस आक्साइडचा उपयोग करीत. क्लोरोफार्म व ईथर या गुंगी आणणाऱ्या औषधांचा उपयोग या कामीं क्वचित् करतात. कारण कोकेन व तत्सम औषधें हिरड्यांत टोंचून दांतांस बधिरता आणण्याच्या कामीं उपयोग होऊं लागल्यापासून ही मोठी गुंगी आणणारीं औषधें मागें पडलीं. परंतु हीं औषधें जास्त टोंचलीं तर हृदयावर परिणाम होतो व टोंचलेला भाग सडतो. पण योग्य काळजी घेतल्यास असें बहुतकरून घडत नाहीं. कारण त्याचें टोंचण्याचें प्रमाण थोडें असतें.

**कृत्रिम दंतपंक्ति करणें.**—हलणारे दांत अगर एखादा लांकडी शोभेचा कृत्रिम दांत शेजारच्या मजबूत दांतास तारेनें बांधणें ही कला पूर्वी अवगत होती व पत्रा ठोकून तयार केलेल्या पटावर कवळी बसविण्याची कला प्रचारांत येईपर्यंत हीच पद्धत चालू होती. पुढें हस्तिदंत अगर इतर प्राण्यांचा दात कुजलेला दांत काढून त्याच्या मुळांत बारीक खुंटी घुसवून बसवूं लागले. यानंतर सबंध कवळी बसवणें झाल्यास हिपोपोटेमसच्या हाडामध्यें कृत्रिम पोर्सेलेनच्या दांतांची सबंध कवळी बसवण्याची चेंगट व त्रासदायक

पद्धति कांहीं दिवस चालू राहिली. स्प्रिंगच्या तारांच्या योगानें कवळी तोंडांत ठेवीत. ती फार त्रासदायक होई. पुढें अशी युक्ति निघाली कीं प्रथम मेणानें दांतांचा व हिरड्यांचा सांचा घेऊन त्यापासून प्लास्टर ऑफ पारिसचा सांचा करावा. व त्यावरून पितळी अगर कथली सांचा करून नरमादी-प्रमाणें पूर्वीच्या साच्यांत बसणारा शिशाचा सांचा करावा व या दोहोंच्या मध्यें सोन्याचा अगर चांदीचा पत्रा ठोकून त्याचा सांचा शेवटीं तयार करून दांतांची कवळी बसवावी. स्प्रिंगशिवाय हवेच्या दाबानें ती तोंडांत राहते. पुढें पोर्सेलेनचे कृत्रिम दांत सोन्याच्या पत्र्यांत ठोकून त्याच्या खालीं व वर डांक लावून मजबूत बसवतात. अशा रीतीनें अर्धी अगर सबंध कवळी अगर सुटा एक किंवा दोन दांतहि तयार करतात व हिरड्यांच्या स्वाभाविक गुलाबी रंगाशी जुळेल अशा रंगाच्या टोपणावर ते बसवतात. यांत दोष हा आहे कीं या दांतांच्या फटींत अन्नकण व लाळ राहून कुजते. यास उपाय व सुधारणा म्हणून प्लाटिनम व सोनें यांचा उपयोग करून या फटी बुजवतात व शिवाय पोर्सेलेनच्या भुकटीचा लगदा करून त्यावर दांतांचा व हिरड्यांचा ठसा घेऊन तो चांगला भाजून त्यास हिरड्यांचा रंग देतात. ह्या कवळींत मात्र फटी रहाण्याचा दोष नसतो. यास आरंभ प्रथम फ्रान्समध्यें झाला. यानंतर १८५७ सालीं इंग्लंडमध्यें व्हल्कानाईट म्हणजे रबरापासून केलेल्या पदार्थांचा उपयोग दांत बसवण्याकडे होऊन त्याचें पेटंट घेतलें गेलें. यांत साधेपणा व स्वस्ताई हे गुण आहेत. कारण निवळ सोनें, चांदी व प्लाटिनमचे पत्रे महाग पडतात. या पदार्थांचा धातूंसहहि उपयोग करतात. व्हल्कनाइटचा उपयोग फुटलेल्या दांतास आधार अगर टाळूंतील भोंक बंद करण्यासाठीं केला जात असतो. व्हल्कनाईट प्रचारांत आल्यापासून सोनें व चांदी यांच्या पत्र्यांच्या आधारावर बसवलेल्या कवळ्या मागें पडत चालल्या. परंतु अलीकडे पूल बांधणीच्या रचनेप्रमाणें कवळ्या तयार करण्याची कला प्रचारांत आल्यामुळें दंतवैद्यांस हुन्नरकलेचें ज्ञान व हस्तकौशल्याची आवश्यकता व्हल्कनाईटच्या कामापेक्षां जास्त वाटूं लागली. पोर्सेलेनचा दांत सोनें अगर प्लॅटिनमच्या टांचण्यांच्या योगानें दांत कोरून तेथें लुकणानें बसवितात. दुसऱ्या प्रकारांत कृत्रिम दांत व कृत्रिम हिरडी यांमधील फटीवर धातूचें वेष्टण दिल्यानें मजबूतपणा येऊन फटींत अन्न कुजण्याचें बंद होतें. दोन्ही बाजूंस दोन कृत्रिम अशा घट्ट बसविलेल्या दांतांच्या पकडींमध्यें जरूर लागेल तितकी कृत्रिम दातांची पंक्ति डाक लावून अगर लुकणानें बसवितात. पूल बांधणीच्या रचनेबरहुकुम कवळ्या घालत्या काढत्या अगर पक्क्या बसविलेल्या अशा दोन तऱ्हेच्या असतात. घालती काढती कवळी धुवून पुसून स्वच्छ ठेवितां येतें हा तिच्यांत विशेष फायदा आहे. अनुकूल दंतरचना असल्यास ह्या पूलबांधणीच्या दंतरचनेनें कृत्रिम कवळी फारच सुंदर व बेमालुम तयार होते. ही कला वाढती आहे. ग्रेटब्रिटन, अमेरिका, फ्रान्स, जर्मनी वगैरे सर्व देशांत दंतवैद्यकीय पदवीधरांची संख्या वाढती आहे. इतर डॉक्टरांप्रमाणें त्यांच्या धंद्याची व शैक्षणिक कसोटी तेथें उच्च दर्जाची ठेविली आहे. यामुळें भाकबगार व शास्त्रशुद्ध असेच दंतवैद्य बहुधां तेथें आढळतात. त्यांची सर्वांत मोठी संख्या अमेरिकेंत आहे. १९१० सालीं सर्व संयुक्त संस्थानांत मिळून सत्तावीस हजार दंतवैद्य होते. तसेंच या व इतर सुधारलेल्या देशांत दंतवैद्यक शिकविण्याच्या पाठशाळांची संख्या वाढती आहे. तथापि हिंदुस्थानांत स्वतंत्र दंतविषयक पाठशाळा एकहि नसावी हें मोठें आश्चर्य व दुर्भाग्य होय.

**दतिया**, सं स्था न.—मध्य हिंदुस्तानांतील बुंदेलखंड एजन्सीपैकीं एक संस्थान. क्षे. फ. ९११ चौ. मै. ग्वाल्हेर व इतर संस्थानांचे भाग यांत आल्यामुळें हा प्रदेश बराच तुटलेला आहे. याच्या उत्तरेस ग्वाल्हेर व जालना जिल्हा; व पश्चिमेस ग्वाल्हेर व झांशी जिल्हा; पूर्वेस समथर व झांशी जिल्हा; व पश्चिमेस ग्वाल्हेर. सिंद व बेटवा या नद्यांमधील सपाट प्रदेशांत हें संस्थान वसलेलें असून यांतून सिंद व तिला मिळणारी पहूज या नद्या वाहतात. येथें हवा निरोगी व माळव्यापेक्षां उष्ण आहे. वार्षिक पाऊस सरासरी ३८ इंच पडतो.

**इतिहासः**—दतियाचे संस्थानिक ओर्छा घराण्यांतील बुंदेले रजपूत आहेत. १६२६ त, ओर्छाच्या बीरसिंग देवानें आपला मुलगा भगवानराव याला दतियाचें संस्थान दिलें. मूळच्या प्रदेशांत जिंकिलेल्या व दिल्लीच्या बादशहाकडून मिळालेल्या प्रदेशाची भर पडून अखेर उत्तरेस चंबळा व पूर्व पश्चिम बेटवा आणि सिंद यांच्या दरम्यानचा मुलूख या संस्थानांत समाविष्ट झाला. भगवानरावाच्या मागून १६५६ मध्यें, सुभकरण गादीवर बसला. औरंगझेब व त्याचे भाऊ यांच्यांमध्यें तंटे चालले असतां हा औरंगजेबास मिळाला होता. या घराण्यांतील चवथा राजा रामचंद्र याच्या मरणानंतर गादीसंबंधीं भांडण उपस्थित झालें, त्यावेळीं ओर्छाचा राजा उदोतसिंग यानें रामचंद्राचा नातु याचा पक्ष धरून त्यास गादी मिळवून दिली. ह्या सुमारास मराठ्यांनीं बुंदेलखंडावर स्वारी करण्यास सुरवात केली. १८०४ मध्यें, येथील राजानें ब्रिटिश लोकांबरोबर तह केला. देशांत शांतता स्थापन करण्यांत मदत केल्याबद्दल त्याला सिंधु नदीच्या पूर्वेकडील चौरासी इलाखा मिळाला. स. १८२६ त त्यानें विजयबहादुरसिंग नांवाच्या मुलाला दत्तक घेतल्यामुळें भगवानरावाचे वंशज जे बरोनीचे ठाकूर, त्यांनां आपणांपैकीं दत्तक न घेतल्याबद्दल राग आला. परंतु इंग्रजांनीं मदत केल्यामुळें विजयबहादुरसिंग हा गादीवर बसला. तो इ. १८५७त निपुत्रिक वारल्यामुळें राजा बीरसिंगदेवाचा भाऊ हरसिंगदेव, याच्या वंशांतील भसनई घराण्यापैकीं भवानी याला दत्तक घेऊन गादीवर बसविण्यांत आलें. हा

अज्ञान असतां राज्यकारभार प्रथम वरील राणीकडे व तिच्या मृत्युनंतर दुसऱ्या राणीकडे होता. येथील राजाला वंशपरंपरागत महाराजा लोकेंद्र अशी पदवी आहे. राजाला संस्थानांत सर्व प्रकारचे अधिकार आहेत. हल्लींचा राजा सर गोविंदसिंग बहादूर इ. स. १९०७ मध्यें गादीवर बसला. याला १५ तोफांच्या सलामीचा मान आहे.

संस्थानची लोकसंख्या १४८६५९ आहे. शेंकडा ९५ वर हिंदु आहेत. भाषा बुंदेलखंडी आहे. संस्थानची जमीन निकस आहे. येथें द्विदलधान्यें, गहूं, ज्वारी, कापूस, वगैरे पिकें होतात. ग्वाल्हेर-झांशी हा मोठा रस्ता व ग्रेट इंडियन पेनिन्शुला रेलवेची शाखा ह्या जिल्ह्यांतून गेलेली आहे.

संस्थानचें वार्षिक उत्पन्न सुमारें ११ लक्ष रु. आहे. पैकीं बरेचसें जमिनीच्या सान्यापासून. शिवाय १०००० रु. ब्रिटिश सरकारापासून मिठासंबंधीच्या ठरावाअन्वयें मिळतात. पूर्वी वर्षांतून ४ वेळ शेतांतील पिकाची पाहाणी करून उत्पन्नाचा अर्धा किंवा तिसरा भाग सान्यादाखल घेण्यांत येत असे. हल्लीं दोन हप्त्यांनीं व रोख रकमेच्या रूपानें कर वसूल केला जातो; व जमिनीची सुपीकता आणि पाण्याची सोय हीं पाहून कर ठरविण्यांत येतात. स. १९०३ पासून येथें ब्रिटिश नाणें चालू आहे.

शहर.—दतिया संस्थानचें राजधानीचें शहर. हें झांशीहून १६ मैलांवर असून समुद्रसपाटीपासून ९८० फूट उंच आहे. लोकसंख्या ( १९११ ) १७३२९. हा गांव लहान टेंकड्यांवर वसलेला असून एका टेंकडीवर राजा बीरसिंग देव याचा भव्य राजवाडा आहे. ह्या वाड्यावरील नक्षीकाम व एकंदर शिल्पकाम फार प्रेक्षणीय आहे. वाड्याच्या चार कोपऱ्यांवर चार अष्टकोनी उंच पांच मजली बुरूज आहेत. व वर सुंदर छत्री उभारली आहे. गांवाच्या पूर्वेस राजा शुभकरणाचा वाडा आहे. खुद्द गांवांत सरदारांचे चिरेबंदी मोठ मोठे वाडे आहेत. नगरोपान्त भागांत कुशलतेनें बांधलेल्या अनेक छत्र्या आहेत.

**दत्तक**—खरी उर्फ औरस संतति नसल्यास कृत्रिम रीतीनें वारस मिळविण्याच्या पद्धतीला दत्तक म्हणतात. एकमेकांशीं रक्ताचा उर्फ नात्याचा संबंध आहे अशा इसमांचाच समाज करून राहण्याची चाल रानटी लोकांत आढळते आणि समाजाच्या स्थैर्याकरितां व सुरक्षितपणाकरितां लोकसंख्या कमी असल्यास ती वाढविण्याकरितां परसमाजांतील व्यक्ति स्वसमाजांत कृत्रिम उर्फ मानीव नातें जोडून घेण्याचा प्रघात अशा रानटी जातींत आढळतो. तसेंच स्वतःला मुलेंबाळें नसलीं तर दुसऱ्याच्या मुलांनां स्वतःचीं म्हणून घेऊन औरस संततीची वाण भरून काढतात. शिवाय स्वतःची संतति असली तरी केवळ भूतदयेच्या प्रेरणेनें अनाथ मुलांनां स्वतःच्या अपत्यांप्रमाणें पाळणारे लोकहि असतात. इतकेंच नव्हे तर लढाईमध्यें कैद केलेल्या स्त्रीपुरुषांनां ठार न मारतां नातेवाईकांप्रमाणें मानून त्यांनां पाळगण्याची रीतहि रानटी लोकांत दिसते. अशा चाली पाप्युअन व उत्तर अमेरिकेंतील इंडियन लोकांत आहेत. ब्रिटिश न्यू गिनीनजीकच्या लोगी नामक बेटांतील रहिवाशांमध्यें कैदी इसमांपैकीं लिंग-वयभेदानुसार आई, बाप, बहिण, भाऊ, मुलगा, मुलगी वगैरे कृत्रिम नातें जोडून त्यांनां स्वकुटुंबी बनविण्याची चाल आहे. उत्तर अमेरिकेंत ओसेग व कान्सा या जातींत कैद्यांपैकीं मुलें व बायका यांनां स्वकुटुंबांत लढाई, आजार वगैरे कारणामुळें मृत झालेल्या माणसांची उणीव भरून काढण्याकरितां दत्तक घेण्याची चाल आहे.

अशा दत्तकपद्धतीनें एका कुटुंबांतील माणसाची दुसऱ्या कुटुंबांत पूर्णपणें बदली होते. ज्या कुटुंबांत जन्म झाला त्याच्याशीं असलेला नात्याचा संबंध तुटतो म्हणजे त्या कुटुंबासंबंधाचे त्याचे सर्व हक्क व कर्तव्यें नाहींशीं होऊन नव्या दत्तक गेलेल्या कुटुंबांत हक्क व कर्तव्यें उत्पन्न होतात, आणि या नव्या कुटुंबांतच जणुं काय तो जन्मला आहे असें मानण्यांत येतें. अशा दत्तक मुलाचीं मुख्य कर्तव्यें म्हणजे दत्तक घेणाऱ्या आईबापांची म्हातारपणीं व आजारांत शुश्रुषा करणें आणि मेल्यावर त्यांचा अंत्यविधी व इतर मृतात्म्याबद्दलचीं धार्मिक व सामाजिक कृत्यें करणें. ग्रीनलंडमधील एस्किमो लोक, आफ्रिकेंतील झुलु लोक, कँबोडियांतले कांबोडियन लोक, बोस्नियांतील तुर्क लोक, वगैरे या प्रकारें दत्तक घेतात. दत्तक घेण्याच्या वेळचे निरनिराळे विधी निरनिराळ्या लोकांत आढळतात; व त्यांत मुलाच्या जन्मकालच्या परिस्थितीचें अनुकरण करण्याची कोठें कोठें प्रवृत्ति दिसते. उदा० ब्रिटिश कोलंबियांतील सिमशियन लोकांत दत्तक घेणारी बाई खालीं बसून त्या मुलास आपल्या दोन पायांमध्यें ठेवते व तो नुकताच जन्मास येत आहे असें दर्शविते. उत्तर आफ्रिकेंतील कित्येक जातींत व हिंदुकुशपर्वतांतील काफीर लोकांत दत्तक घेणाऱ्या आईच्या अंगावर दुग्धपान करण्यानें दत्तकविधि पार पाडण्याची चाल आहे. या चालीला इतकें महत्त्व प्राप्त झालें आहे कीं, सिर्काशियन लोकांत एखाद्या खुनी अपराध्यानेंहि मृताच्या मातेच्या अंगावर स्तनपान करण्याचें येन केन प्रकारेण साधलें तर तो खुनी इसम तिचा दत्तकपुत्र मानला जाऊन मग साहजिकच त्याच्या अपराधाची त्याला क्षमा होते. याप्रमाणें रानटी जातींत दत्तकासंबंधाच्या ज्या चाली आढळतात त्या तोच समाज सुसंस्कृत बनत चालला म्हणजे नाहींशा होत जातात; इतकेंच नव्हे तर खुद्द दत्तकाची चालहि पूर्ण सुसंस्कृत बनलेल्या कित्येक समाजांतून नाहींशी झालेली आहे. तथापि सुसंस्कृत असलेल्या अशाहि बऱ्याच समाजांत दत्तकाची चाल आढळते.

सेमिटिक वंशी लोक.—( १ ) यांच्यापैकीं बाबिलोनियन लोकांच्या जुन्या कायदेग्रंथांत ( खमुरबीचें कोड ) दत्तकाचे निरनिराळे प्रकार दिलेले आहेत. वस्तुतः दत्तक मुलगा घेण्याची गरज स्वतःचा औरस मुलगा नसला म्हणजे उत्पन्न होते. पण बाबिलोनियन लोकांत प्राचीन यहुदी लोकांप्रमाणेंच निपुत्रिक स्त्रीच्या नवऱ्याला एखाद्या वेश्येच्या

ठिकाणी किंवा घरांतील अविवाहित मोलकरणीच्या ठिकाणी संतति निर्माण करण्याची परवानगी असे व त्यायोगानें संततीची वाण भरून निघत असल्यामुळें दत्तकाची जरूरी या समाजांत मुळींच पडत नव्हती. तथापि मुलेंबाळें असलेल्या कुटुंबांतहि दत्तक घेण्याचा प्रघात बाबिलोनियांत होता. कित्येकदां कामशिकाऊ उमेदवाराला (अप्रेंटिस), किंवा गुलामांनां दत्तक म्हणून मान्य करीत असत. या कृत्यासंबंधीं स्वतंत्र लेखी करार आणाशपथासह व साक्षीदारासमक्ष करावा लागे. असा लेखी कायदेशीर करार झालेला नसल्यास दत्तकाला मूळ जन्मदात्या कुटुंबांत परत जातां येत असे. मुलाप्रमाणें मुलगीहि दत्तक घेण्याची चाल असे. ( २ ) हिब्रू लोकांच्या ग्रंथांत दत्तकाच्या चालीचा उल्लेख नाहीं. या समाजांत निपुत्रिकपणावर उपाय म्हणून प्राचीन काळीं बहुपत्नीत्वाला परवानगी होती व नंतर घटस्फोट प्रचारांत आला. ( ३ ) अरब लोकांतहि ही दत्तकाची चाल होती अशाबद्दल स्पष्ट व निःसंदिग्ध पुरावा सांपडत नाहीं. दत्तकाची गरज उत्पन्न होईल अशा स्थितींत एकाहून अधिक बायका करण्याची परवानगी असे.

ग्री क.—प्राचीन ग्रीक व रोमन लोकांत कुटुंबासंबंधाचे धार्मिक विधि करण्याची जबाबदारी कुटुंबाची इस्टेट मिळणारांवर असे; आणि कुटुंबाचे धार्मिक विधी अबाधित चालावे म्हणून कुटुंबाचा निर्वंश होऊं नये अशीहि अत्यावश्यकता असे. मृतात्म्याबद्दलचे धार्मिक विधी न होणें ही मोठी आपत्ति गणली जाई. यामुळें कुटुंबांत संतति असण्याची अत्यंत आवश्यकता वाटे व या मनोधर्मामुळेंच दत्तकाची चाल निर्माण झाली. ग्रीक लोकांत दत्तक तीन प्रकारें होत असे; ( १ ) हयातींत घेतलेला, ( २ ) मृत्युपत्रानें ठरविलेला किंवा ( ३ ) तेढे वारसपणानें ( ॲबस्ट्रक्टेड हेरिटेजी ) इस्टेट मिळून त्या प्रकारें बनलेला दत्तक. दत्तक घेण्याचा हक्क वयांत आलेल्या निपुत्रिक पुरुषासच असे; स्त्रीस किंवा अज्ञानास ( अठरा वर्षांखालील पुरुषास ) नसे. मात्र सपुत्र पुरुषास प्रसंग पडल्यास मरणोत्तर दत्तक घेण्याची तजवीज मृत्युपत्रानें करून ठेवतां येत असे. दत्तक नातेवाईकांपैकींच घेतला पाहिजे असा निर्बंध नव्हता. दत्तकाचा धार्मिक विधि असे, त्यांत दत्तक घेणारा इसम जमलेल्या लोकांसमक्ष होम हवन करून शपथपूर्वक दत्तक घेई व नंतर दत्तक मुलाचें नांव त्या कुटुंबांत दाखल करण्यांत येत असे. हा विधि होतांच दत्तक मुलाला औरस मुलाप्रमाणें सर्व हक्क प्राप्त होत. या ग्रीकांतील दत्तकप्रकरणात एक विशेष हा असे कीं, दत्तक घेतलेल्या इसमाला औरस मुलगा झाला म्हणजे त्या दत्तक इसमाला आपल्या मूळ जन्मदात्या कुटुंबांत परत येतां येत असे. दुसरा एक विशेष असा कीं, दत्तक मुलाला, दत्तक बापाची अविवाहित मोठी मुलगी असल्यास तिच्याशीं लग्न लावतां येत असे. कुटुंबांतील धार्मिक विधि करण्याचा हक्क स्त्रियांनां नसल्यामुळें मुलगी दत्तक घेतां येत नसे.

रो म न—( १ ) रिपब्लिकच्या वेळीं दत्तक घेणाराला लोकसभेची परवानगी घ्यावी लागे. पण पुढें रोमन बादशाहांच्या किंवा प्रीटॉरच्या ( प्रांतिक गव्हर्नर ) परवानगीनें दत्तक घेतां येत असे. या रीतीला धार्मिक स्वरूप असे व 'ॲड्रोगेशिआ' पद्धतींत दत्तकाचा हक्क फक्त पॅट्रिशियन (उच्च रोमन ) लोकांनांच असे, ( २ ) दत्तकाचा दुसरा सामान्य लोकांतला प्रकार म्हणजे दत्तक देणारा व घेणारा यांच्यामध्यें प्रत्यक्ष विक्रयाप्रमाणें तराजू व किंमतीबद्दल पितळेची नाणीं यांच्यासह विधि होऊन दत्तक दिला जात असे; व हा विधि विक्रीची क्रिया तीन वेळां केल्याशिवाय पुरा होत नसे. याचें वर्णन 'ट्वेल्व्ह टेबल्स' नामक जुन्या रोमन कायद्यांत आहे. हा मानगडीचा विधि पुढें जस्टिनियन बादशाहानें सोपा केला आणि मॅजिस्ट्रेटसमोर कबुली दिल्यानें दत्तक कायम होऊं लागला. ( ३ ) तिसरा प्रकार असा होता कीं, दत्तक घेणारा इसम दत्तक हा आपलाच मुलगा आहे अशी फिर्याद लावी आणि त्याला खरा जन्मदाता बाप हरकत घेत नसे. त्यामुळें मॅजिस्ट्रेट फिर्यादीतर्फे निकाल देई, व अशा रीतीनें दत्तक मुलगा दत्तक बापाला प्राप्त होई. वयोमर्यादेसंबंधी असा कायदा होता कीं, दत्तक हा दत्तकबापापेक्षां निदान १८ वर्षांनीं तरी लहान असावा आणि विशेष कारणाशिवाय वयाच्या साठ वर्षांपूर्वी कोणी इसमानें दत्तक घेऊं नये. प्रथम स्त्रियांनां दत्तक घेण्याची परवानगी नव्हती, पण स. २९१ सालापासून ती मिळाली. ग्रीक लोकांच्या मानानें रोमन लोकांत दत्तकविधीचें धार्मिक स्वरूप फार लवकर नष्ट झालें. मृत्युपत्रानें दत्तक घेतां येत असे, व याबद्दलचें ज्युलियस सीझरनें आक्टेव्हिअसला दत्तक घेतल्याचें उदाहरण सुप्रसिद्ध आहे.

मु सु ल मा न.—अरबस्तानांत महमंद पैगंबराच्या वेळीं दत्तक घेतां येत असे, व खुद्द पैगंबरानें झैदइब्न हारिथ यास दत्तक घेतलें होतें. अरबी वाङ्मयांत दत्तकाचीं इतरहि अनेक उदाहरणें आहेत. तथापि निपुत्रिकाचा वंश चालण्याकरितांच केवळ दत्तक घेत असत असें दिसत नाहीं. दुसरींहि अनेक कारणें असत. विधवाविवाह रूढ असल्यामुळें तशा विवाहानंतर स्त्रीला पहिल्या नवऱ्यापासून झालेलीं मुलें दुसरा नवरा दत्तक म्हणून घेई. तसेंच एखाद्या गुलाम स्त्रीपासून मालकाला मुलें झाल्यास कधींकधीं त्यांनां तो दत्तक घेऊन औरस संततीच्या बरोबरीनें हक्क देई. तिसरा प्रसंग म्हणजे एका टोळीमधील इसम कांहीं गुन्ह्याचें कृत्य करून दुसऱ्या टोळींत पळून आश्रयास जाई, त्यावेळीं त्याला दत्तक समजून स्वकुटुंबांत आश्रय देण्याची चाल असे.

दत्तकाला औरसाच्या बरोबरीनें हक्क प्रथम मिळत असत. परंतु महंमद पैगंबराच्या चरित्रांतील पुढील गोष्टीमुळें इस्लामी धर्मांत दत्तकाचे हक्क कमी करण्यांत आले. महंमदानें दत्तक घेतलेल्या उपर्युक्त झैद याच्या बायकोवर महंमदानें इतकें मन गेलें कीं, त्यानें फाडीमोड करण्यास झैदचें

मन वळविलें व त्याच्या मायकोशीं निका लावला. अर्थात या गोष्टीबद्दल मोठा गवगवा झाला, कारण स्वतःच्या मुलाच्या मायकोशीं विवाह लावणें म्हणजे बापानें गोत्रगमन (इन्सेस्ट) करणें होय, असें कुराणांत वचन आहे (सुरा, ४. २७). हें वचन नजरेस आल्यावर कुराणामध्यें ३३(१ ते ५) व ३७ हीं वचनें प्रकट करण्यांत येऊन असें ठरविलें कीं, दत्तक मुलाला औरस मुलाप्रमाणें मानणें चूक आहे; कारण खरा रक्ताचा संबंध दत्तक पुत्रांत उत्पन्न होणें शक्य नाहीं. म्हणून मुलाच्या काडीमोड झालेल्या स्त्रीशीं बापानें विवाह करणें अल्लाच्या इच्छेविरुद्ध नाहीं.

चि नी.—दत्तकाची चाल चीनमध्यें असून तिला धार्मिक स्वरूप आहे म्हणजे मृतावद्दलचे धार्मिक विधी करण्याकरितां कुटुंबाची वारसपरंपरा सतत चालली पाहिजे अशी समजूत आहे. त्यामुळें ज्या पुरुषाला औरस मुलगा नसतो त्याला दत्तक घेणें भाग पडतें. दत्तक घेणें तो घेणाराच्या वंशांतला आणि दत्तक घेणाऱ्या बापाच्या मानानें पुढील पिढींतलाच असावा लागतो. अशा दत्तकाला औरस मुलाचे सर्व हक्क प्राप्त होतात. एकच मुलगा असल्यास तो दत्तक देऊन टाकतां येत नाहीं. दत्तक देतांना धार्मिक विधि करावा लागतो; लेखी करारपत्र वगैरे लागत नाहीं किंवा सरकारी अधिकाऱ्यांची परवानगीहि घ्यावी लागत नाहीं.

ज पा नी.—हल्लीं दत्तकाची चाल जपानांत फार पसरलेली आहे. ही चाल मूळची जपानांतील नसून चीनमधून राजकीय कारणाकरितां होजो रीजंटाच्या वेळीं (१२०५-१३३३) ती जपानांत प्रसृत करण्यांत आली. या चालीला सामाजिक व कायदेवावत महत्त्व आहे. दत्तकाचा धार्मिक विधि जपानांत नाहीं. मात्र दत्तक घेतांना जिल्ह्याच्या सरकारी ऑफिसांत नोंद करावी लागते.

भा र ती य.—या समाजांत दत्तक-पद्धति इतकी रूढ व सर्वमान्य झालेली आहे कीं, ती 'आमच्या पूर्वजांत-प्राचीन भारतीयांत-नव्हती' हें म्हणणें पुष्कळांस खरें वाटणार नाहीं. परंतु वस्तुस्थिति अशी आहे कीं वैदिक शब्दसृष्टींत पुत्र या अर्थी 'दत्तक' असा शब्द सांपडत नाहीं; इतकेंच नव्हे तर रामायण व महाभारत ह्या तत्कालीन स्थितीचें विस्तृत वर्णन करणाऱ्या ग्रंथांतहि दत्तक घेतल्याचें एकहि उदाहरण नमूद नाहीं. यावरून दत्तकाची चाल त्यावेळीं नव्हती असें म्हणावें लागतें. निपुत्रिक इसम नरकांत जातो ही कल्पना वैदिक वाङ्मयांतहि आढळते. औरस पुत्र नसल्यास दत्तक घेतां येत असे इतकेंच नव्हे तर कुटुंबांत चांगला गुणवान् इसम असावा एवढ्या कारणाकरितां औरस संतति असली तरी दत्तक घेत असत, असें विश्वामित्र व शुनःशेप यांच्या कथेवरून दिसतें. दशरथानें शांता नामक कन्या दत्तक घेतली होती असें रामायणांत आहे. असें असलें तरी मनुस्मृतिपूर्व कोणत्याहि संस्कृत ग्रंथांत दत्तक प्रकरणासंबंधीं सविस्तर विचार आढळत नाहीं, इतकेंच नव्हे तर खुद्द मनुस्मृतीमध्यें सुद्धां दत्तकासंबंधीं फारच थोडे श्लोक आहेत. दत्तकप्रकरणावरचे सविस्तर ग्रंथ दत्तकचंद्रिका व दत्तकमीमांसा हे होत, पण ते अगदीं अलीकडील आहेत.

चार पांच हजार वर्षांच्या जुन्या व उच्च अशा भारतीय संस्कृतींत औरस संततीच्या अभावीं वंशवृद्धीचा 'दत्तक' हा उचित मार्ग कां रूढ झाला नाहीं हा मोठा प्रश्न आहे. त्याला जॉन डी. मेन या इंग्रज कायदेपंडितानें असें उत्तर (ट्रीटाइज ऑन हिंदु लॉ अँड यूसेज) सुचविलें आहे कीं, पूर्वी औरस खेरीज इतर दहा बारा प्रकारचे पुत्र असत, आणि नियोगपद्धतीहि रूढ होती, म्हणून दत्तकाला विशेष महत्त्व नव्हतें. इतर प्रकारचे पुत्र आणि नियोगपद्धति मनूच्या काळीं अमान्य होत चालली होती, व त्याच सुमारास दत्तकाला महत्त्व येत चाललें. नियोगपद्धतीहि पूर्ण बंद होऊन औरस व दत्तक असे पुत्रांचे दोनच प्रकार सर्वमान्य ठरले. दत्तकासंबंधीं महत्त्वाचीं संस्कृत वचनें येणेंप्रमाणें:—

पुन्नाम्नो नरकाद्यस्मात् पितरं त्रायते सुतः।
तस्मात् पुत्र इति प्रोक्तः स्वयमेव स्वयंभुवः ॥
अपुत्रेण सुतः कार्यो यादृक् तादृक् प्रयत्नतः।
पिंडोदकक्रियाहेतोर्नामसंकीर्तनायच ॥
सपिंडानां सुतो मुख्यस्तदभावेऽपि गोत्रजः।
तदभावेऽन्य गोत्रोपि दत्तकः परिगृह्यते ॥
मातापिता वा दद्यातां यमद्भिः पुत्रमापदि।
सदृशं प्रीतिसंयुक्तं सज्ञेयो दत्रिमः सुतः ॥
स्वजातीयः सुतोग्राह्यः पिंड दाता स रिक्थभाक्।
तदभावे विजातीयो वंशमात्रकरःस्मृतः ॥
ब्राह्मणादि त्रयोनास्ति भागिनेयः सुतः क्वचित।
दत्तपुत्रे तथा जाते कदाचिदौरसोभवेत् ॥
पितुर्वित्तस्य सर्वस्य भवेतां सममागिनौ।
पुत्राभावे क्रियालोपात् वंशसंरक्षणात् तथा ॥
पुत्रप्रतिनिधिर्दत्तः कलौकर्तव्य उच्यते।
दौहित्रे भ्रातृपुत्रेच होमादि नियमो न हि ॥
वाग्दानादेव तत् सिद्धिरित्याह भगवान् यमः।
समानगोत्रजाभावे पालयेदन्यगोत्रजम् ॥
दौहित्रं भागिनेयंच मातृस्वसृसुतं विना।
दद्यात् माता पिता वा स पुत्रो दत्तको भवेत् ॥

उद्देशः—वंशविस्ताराकरितां, नांव चालवण्याकरतां, मातापितरांस सद्गति प्राप्त करून देण्याकरितां व जिनगीचें संरक्षण करण्याकरितां मुलगा दत्तक घेण्याची चाल आहे. दत्तकासंबंधीं हायकोर्टनिकालावरून पुढील विवेचन केलें आहे.

कोण दत्तक घेतां येतो:—मुलीचा मुलगा, बहिणीचा व मावशीचा मुलगा आणि ज्या स्त्रीशीं विवाह केला असतां विरुद्ध संबंध घडतो अशा वर्ज्य केलेल्या स्त्रियांचा मुलगा वर्ज्य करून बाकी कोणाचाहि मुलगा दत्तक घेतां येतो. मावशीचा मुलगा दत्तक घेतां येत नाहीं (३४ मुं. ४९१). दोन सख्या भावास दुसऱ्या कुटुंबांतील दोन सख्या बहिणी

बाधक झालेल्या असल्या तरी भावाचा मुलगा म्हणून त्यास दत्तक घेतां येत नाहीं. कारण तो मुलगा आपल्या आईच्या बहिणीचाच मुलगा असतो. शूद्र, जैन, सारस्वत ब्राम्हण यांच्यामध्यें बहिणीचा मुलगा दत्तक होतो(४मुं. ला. रिपोर्टर १४०; सारस्वत ब्राम्हण ). बायकोचा भाऊ दत्तक घेतां येतो ( ३ म. १५ ). मद्दाचार्यप्रमाणें करतां येत नाहीं ( म. चा. हिंदु ला, आ. ३ री, पा. ४१४ ). परंतु नियोगाचें तत्त्व मुंबई हायकोर्टास मान्य नाहीं म्हणून ( २२ मुं ९७३ ). मुंबई-लाप्रमाणें असें विधान सशास्त्र होईल. भावाचा मुलगा असला तरी तिन्हाईत मनुष्याचा मुलगा दत्तक घेतां येतो. सावत्र भावास दत्तक घेतला तरी चालतो ( ३९ मुं. ४१९ ). एकुलता एक मुलगा दत्तक घेतां येतो ( २६ इं. आ. ११३ ). वडील मुलगा दत्तक देतां व घेतां येतो ( २४ मुं. ३६७. ७ मुं. २२५ ). दत्तक घ्यावयाचा तो मुलगा दत्तक बापाच्या जातीचा असला पाहिजे. तो कितीहि वयाचा असला, दत्तक बापापेक्षां वडील असला, त्याचें लग्न होऊन तो मुलें झालेला असला तरी देखील चालतो. एकावेळीं एकापेक्षां जास्त मुलगे दत्तक घेतां येत नाहींत. दत्तक घेतलेला मुलगा जिवंत आहे तोंपर्यंत दुसरा मुलगा दत्तक घेतां येत नाहीं.

घेण्याची पात्रताः—दत्तक घेणें हा कायदेशीर व्यवहार आहे. हा व्यवहार करण्यास हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें निदान सोळा वर्षें पुरीं झालीं पाहिजेत. वेडा, खुळा, सारासार विचार करण्यासारखी ज्याची मानसिक स्थिति नाहीं किंवा अगदींच अल्पवयामुळें ज्यास व्यवहार समजूं लागला नाहीं अशा माणसानें दत्तक घेऊं नये. मुका, आंधळा, पांगळा, बहिरा, महारोगी यांनीं दत्तक घेतला तर सशास्त्र होईल कीं नाहीं याबद्दल शंका आहे. बंगाल्यांत महारोग्यास ( शूद्र जातीच्या) दत्तक घेतां येतो ( २८ क. १६८. ).

महारोग्यास धर्मविधी करतां येत नाहींत परंतु शूद्रांत विधी करण्याची जरूर नाहीं. यामुळें शूद्रास ऐहिक विधी म्हणजे दान व प्रतिग्रह यायोगें दत्तविधान संपादतां येतें. १५ वर्षांच्या पुरुषास आपल्या बायकोस दत्तक घेण्याचा अधिकार देतां येतो.

जरूर विधीः—दानप्रतिग्रह माता किंवा पिता यांनींच केलें पाहिजे ( २२ मुं. ५९० ). दान व प्रतिग्रह, दत्तहोम वगैरे विधींनीं दत्तक मुलगा जनक बापाच्या गोत्रांतून दत्तक पित्याच्या गोत्रांत सामील होतो. यांपैकीं माता किंवा पिता यांनीं दत्तक बाप किंवा दत्तक आई यास आपला मुलगा दान दिला पाहिजे व त्यांनीं त्याचा स्वीकार केला पाहिजे. हा विधि करण्याचा हक्क फक्त मातापितरांसच आहे. हा विधि झालाच पाहिजे. त्याशिवाय दत्तविधान कायदेशीर होत नाहीं. बाकीचे विधी करावे अशी शास्त्राचीं वचनें आहेत. पण ते न झाले तर त्यायोगें दत्तक रद्द होत नाहीं. देणें व घेणें या दोन गोष्टींशिवाय दत्तकाच्या कामीं इतर विधींचें फारसें महत्त्व राहिलें नाहीं. ते विधी करावे हें चांगलें व दत्तविधानाचा तो चांगला पुरावाहि होईल पण न केले तर त्यापासून दत्तकास कायद्यानें बाध येत नाहीं. अशा विधीस फॅक्टम व्हॅलेटचें तत्त्व लागतें. निपुत्रिक हिंदु पुरुषास व त्याच्या मागें त्याच्या विधवेस मुलगा दत्तक घेतां येतो. दानप्रतिग्रह झाल्याचें शाबीद झालें कीं इतर विधी झाले कीं नाहीं याचा पुरावा होण्याची जरूरी नाहीं ( २४ मुं. ४७३ ).

दत्तहोमः—मुलाच्या आईबापांनीं दानप्रतिग्रह केले असल्यास दत्तहोम वगैरे विधि इतर नातलगानें केले तरी त्यायोगें दत्तक अशास्त्र ठरत नाहीं ( २२ मुं. ५९० ). दत्तक बाप व दत्तक मुलगा हे एकाच गोत्राचे असले तर दत्तहोम करण्याची जरूरी नाहीं (११ म. २७. ५३८). शूद्रास सुतकांत दत्तक घेतां येतो ( ५ म. ३३८ ). पतीचें शव घरांत पडलें आहे अशा वेळीं द्विज जातीस सूतकांत दत्तक घेतां येत नाहीं ( ९ इं. मू. र. आ. ५०६. ).

अधिकारः—नवऱ्याच्या हयातींत बायकोस त्याच्या संमतीशिवाय दत्तक घेतां येत नाहीं. परंतु दत्तक घेण्यास बायकोची संमति घेण्याची नवऱ्यास जरूरी नाहीं. त्याची बायको गर्भार असली व ही गोष्ट नवऱ्यास माहीत असली तरी त्यास दत्तक घेतां येतो. बायकोनें दत्तक घेऊं नये अशी आज्ञा करून स्पष्ट मनाई केली असेल तर त्याच्या पश्चात् तिला दत्तक घेण्याचा अधिकार रहात नाहीं. पण अशी मनाई केली नसली तर विभक्त राहणाऱ्या हिंदूंच्या विधवेस त्याच्या मागें दत्तक घेण्याचा अधिकार आहे. मुंबई इलाख्यांत नवऱ्यानें स्पष्ट अधिकार देऊन ठेवला असेल तर किंवा ( अधिकार देऊन ठेवला नसला तरी ) इतर भागीदारांच्या समतीनें एकत्र कुटुंबांत असतां विधवेस आपल्या नवऱ्याकरतां दत्तक पुत्र घेतां येतो. एकत्र कुटुंबांत नवऱ्यानें अधिकार देऊन ठेवला तरी व सहभागीदारांची संमति नसली तरी विधवेला दत्तक घेतां येतो, असें अगदीं अलीकडे ठरलें आहे. मरणसमयीं नवरा विभक्त राहात असल्यास त्याच्या पश्चात् दत्तक घेण्यास तिला कोणाची परवानगी घ्यावी लागत नाहीं.

अनेक विधवा असतां अधिकारः—अनेक विधवा असल्यास नवऱ्यानें हयातींत जिला अधिकार देऊन ठेवला असेल तिलाच दत्तक घेतां येतो. तिच्याशिवाय इतर विधवांस तो अधिकार नसतो. अधिकृत विधवेस दुसऱ्याची सम्मति घेण्याची जरूरी नाहीं. असा अधिकार दिला नसेल तेव्हां सर्वांत वडील बायकोस दत्तक घेण्याचा अधिकार आहे.

मोठी व धाकटी अशा दोन विधवांपैकीं मोठीला दत्तक घेण्याचा अधिकार आहे. दोन विधवांस एकावेळीं दोन दत्तक घेतां येत नाहींत. वडील व धाकटी अशा दोघींसहि संमाईक अधिकार दिला असला तर वडील मेली तरी

धाकटीसच दत्तक घेतां येतां. वडील विधवेस धाकटीच्या संमतीशिवाय दत्तविधान करतां येतें ( २२ मुं. २०६ ). धाकट्या विधवेस मोठीच्या संमतीशिवाय दत्तक घेतां येत नाहीं ( १३ मुं.१६० ). मोठीस व धाकटीस दोघींसहि अधिकार दिला असेल तेव्हां मोठीनें दत्तक घेण्याचें नाकारलें तर धाकटीस दत्तक घेतां येतो ( १८ क. ६९ ). दत्तक घेण्याचा अधिकार लेखी किंवा तोंडीं देतां येतो. लेख केला तर तो दहा रुपयांच्या स्टँपवर लिहून रजिस्टर केलाच पाहिजे. हा अधिकार मृत्युपत्रांत जसा दिला असेल तसा तंतोतंत पाळला पाहिजे.

दोन विधवांपैकीं धाकटीस मुलगा असला व तो मयत झाला म्हणजे दोघीहि निपुत्रिक होतात. परंतु जिचा मुलगा होता ती त्या मुलाची वारस होते व तिला सर्व मिळकतीचा हक्क प्राप्त होतो. धाकटी विधवा आपल्या मुलाच्या पश्चात् त्याची वारस झाल्यानंतर वडील विधवेस दत्तक घेण्याचा अधिकार रहात नाहीं. मुलाची आई म्हणून वारस झाल्यावर धाकटीस दत्तविधान करण्याचा अधिकार आहे.

अधिकार अटीः—अमूक एक मुदतींत दत्तक घेतला पाहिजे अशी नवऱ्यानें अट घातली असली तर त्या मुदतींत दत्तक घेतलाच पाहिजे;ती मुदत निघून गेल्यावर विधवेस दत्तक घेतां येणार नाहीं. एखादा मुलगा नांवानें नमूद केला असला, व तोच मुलगा दत्तक घ्यावा, दुसरा घेऊंच नये असा निर्बंध केला असला तर दुसरा मुलगा दत्तक घेतां येत नाहीं. तो मुलगा त्याच्या आईबापांनीं दिला नाहीं तर दुसरा मुलगा दत्तक घेतां येत नाहीं. मुलाची निवड करणें ती अमुकच मनुष्याच्या पंसतीनें करावी अशी अट नवऱ्यास घालतां येते.

अमुक मुलगा दत्तक घ्यावा तो न मिळेल तर दुसरा घेऊं नये अशी स्पष्ट मनाई केली असेल तेव्हां नांवानें निर्देश केलेला मुलगा आधीं घ्यावा; व तो न मिळेलतर दुसरा घ्यावा असें समजावें, अशा प्रकारच्या अटी दत्तक अजीबात बंद करण्याकरितां नसतात; तर मुलगा कोणता पसंत करावा याबद्दल शिफारस म्हणून. मूळ दत्तक घेण्याचा हेतु विफल होईल असा अकुंचित अर्थ अशा अटींचा करूं नये. दत्तक घेण्याचा इरादा ही गोष्ट प्रधान आहे. अधिकार दिला असला तरी त्याप्रमाणें दत्तक घेणें किंवा न घेणें हें विधवेच्या मर्जीवर आहे. तिनें घेतलाच पाहिजे असें तिला भाग पाडतां येत नाहीं. दत्तक कोणत्या हेतूनें घेतला आहे म्हणजे दत्तक घेण्यांत विधवेचा हेतु मयताची मिळकत आपल्या बापाच्या घरांत जावी असा आहे किंवा नवऱ्याच्या कुटुंबांत राहूं नये किंवा ती अमूक एक माणसास मिळूं नये अशा प्रकारचा असला तर त्या हेतूकडे पाहण्याची जरूरी नाहीं. कारण दत्तक झाला कीं तो मयताचा पुत्र होतो व त्याला सद्गति देण्यानें व श्राद्धपक्ष केल्यामुळें त्याचा स्वर्गप्राप्तीचा मार्ग खुला होतो. यामुळें हा मार्ग कसा झाला, कोणत्या हेतूनें झाला हें पाहण्याची जरूरी नाहीं. विधवेनें दत्तक कोणत्या हेतूनें घेतला याचा तो दत्तक कायदेशीर आहे कीं, नाहीं याच्याशीं संबंध नाहीं.

अधिकार केव्हां नष्ट होतोः—दत्तक घेतलेला मुलगा वारला तर दुसरा मुलगा दत्तक घेण्यास हरकत नाहीं, परंतु दत्तक मुलगा मयत होऊन त्याच्या मागें त्याची बायको किंवा त्याचा मुलगा अगर दत्तक आईहून जास्त नजीकचा वारस अस्तित्वांत असला तर त्याच्या दत्तक आईस दत्तक पुत्राच्या मागें दुसरा दत्तक घेण्याचा अधिकार नाहीं. दत्तक मुलगा मयत झाला तर दुसरा दत्तक घ्यावा असा नवऱ्यानें अधिकार देऊन ठेवला असला तरी दत्तक मुलाचे वारस उत्पन्न झाले व ते जिवंत असले कीं मग हा अधिकार नष्ट होतो. तथापि दत्तक मुलास मुलगा, विधवा मुलगी, मुलीचा मुलगा वगैरे त्याचे दत्तक आईपेक्षां जास्त नजीकचा वारस नसला व दत्तक आई हीच त्याची आई म्हणून वारस झाली व त्याची मिळकत तिला प्राप्त झाली तर तिला दत्तक घेतां येतो व मिळकतींतील तिचे वारसाचे हक्क नष्ट करतां येतात. दत्तक घ्यावयाचा तो सरतेशेवटला जिनगी धारण करणारा पुरुष यास घ्यावयाचा या नियमास हा अपवाद आहे; व कोणा इसमाची एखादी मिळकत वारसानें झाली किंवा शेषाधिकारानें झाली कीं, नंतर दत्तक घेऊन त्याच्या संमतीशिवाय त्या मिळकतींतील त्याचे हक्कसंबंध नष्ट करतां येत नाहींत. या नियमासहि हा अपवाद आहे पण या कृत्यानें दत्तक आईचेंच हक्क नष्ट होतात म्हणून तिचे हक्क घालविण्याचाहि हक्क तिला आहे असें सशास्त्र मानलें जातें.

हा हक्क आजीस ठेवला नाहीं ( २६ मुं. ५२६). मिळकत ज्याच्या मालकीची झाली आहे त्याच्या संमतीनें विधवेनें दत्तक घेतला तर चालतो ( ८ मुं. ११४; २३ मुं. ३२७ ). एकत्र कुटुंबांतील विधवेस इतर सर्व भागीदारांच्या संमतीनें दत्तक घेतां येतो (१५ मुं. ११०; २३ मुं. २५०,. अधिकार देऊन ठेवलेला असला तर त्याच्या मागें एकत्र कुटुंबांत त्याच्या विधवेस दत्तक घेतां येतो (३१ मुं. ३७३, प्रि का.).

दत्तविधानाचे परिणामः—मुलगा सशास्त्र दत्तक झाला कीं, तो ज्या कुटुंबांत जन्मला त्या कुटुंबांतून निघून दत्तक बापाच्या कुटुंबांत सामील होतो. दत्तक आईबापांचा तो औरस पुत्राप्रमाणें पुत्र होतो. या कुटुंबांत औरस पुत्राची पदवी व त्याचे सर्व हक्क त्यास प्राप्त होतात. त्याचे मुळ कुटुंबांतील वारसाचे वगैरे सर्व मिळकतीचे हक्क नष्ट होतात. जनक आईबापांचा तो पुत्र म्हणून राहत नाहीं. त्याचें नातें बदलून तो त्यांना तिऱ्हाईत होतो. दत्तक मुलास त्याच्या मूळ कुटुंबांत दत्तक होण्यापूर्वी जर कांहीं मिळकत वारसाच्या हक्कानें अगर इतर रीतीनें मालकी हक्कानें मिळाली असली तर त्या मिळकतींतील देखील त्याचे हक्क नाहीसे होतात असेंमुंबई हायकोर्टानें ठरविलें आहे; तथापि दत्तक दिलेल्या मुलाचे लग्नसंबंधी व दत्तविधान करण्यासंबंधी

मूळ कुटुंबाशीं नातें तुटत नाहीं. म्हणजे लग्न करणें व दत्तक घेणें वगैरे बाबतींत तो मूळ कुटुंबांतील पुरुष आहे असें समजून त्यास वधुवरांचे नियम लागतील. म्हणजे तो मूळ कुटुंबांत असतांना ज्या स्त्रियांशीं त्यास लग्न लावतां आलें नसतें किंवा ज्या मुलास दत्तक घेतां आलें नसतें त्या स्त्रियांशीं त्यास दत्तक झाल्यावर लग्न करतां येणार नाहीं, किंवा त्या मुलाला दत्तक घेतां येणार नाहीं.

मुलगा दत्तक घेतल्यावर घेणारास औरस पुत्र झाला तर त्याच्या इस्टेटीपैकीं एकपंचमांश भाग दत्तक मुलास मिळतो. दत्तक मुलाचे मूळ कुटुंबांतील दत्तक होण्यापूर्वीचे मिळालेले मिळकतींतील हक्क जावे व औरस पुत्र झाल्यानें त्यास बापाची फक्त एकपंचमांश मिळकत मिळावी हें अन्यायाचें दिसतें. दत्तकाचा सर्व कायदा औरसपुत्राप्रमाणें आहे. पुत्राची ती छाया आहे या म्हणीवरच तो रचला आहे. जर त्याचे दत्तक होण्यापूर्वीचे हक्क नष्ट झाले तर त्यास तितकेच हक्क दत्तक कुटुंबांत मिळाले पाहिजेत. म्हणजे तो औरस पुत्राच्या बरोबर मानला पाहिजे व जितकी मिळकत औरस पुत्रास मिळते तितकीच दत्तक पुत्रास मिळाली पाहिजे नाहीं तर दत्तकपुत्र औरसपुत्राप्रमाणें होतो या म्हणण्यांत कांहींच अर्थ नाहीं.

अटीवर दत्तक ( सज्ञान-अज्ञान ):—सज्ञान झालेल्या दत्तक मुलास दत्तकविधान होण्यापूर्वी दत्तक आईबरोबर करार करून दत्तक बापाच्या इस्टेटींतील कांहीं भागावरील आपले हक्क कमी करतां येतात.

दत्तक द्यावयाचा मुलगा अज्ञान असेल तेव्हां त्याच्या जनक बापास दत्तक आईबरोबर करार करून मुलाचे हक्क कमी करतां येतात. परंतु हा करार योग्य व विवेकबुद्धीस पटेल असा असला पाहिजे. दत्तकबापाच्या मिळकतीचा कबजा दत्तक आईच्या हयातीपर्यंत तिच्याकडेच रहावा असा दत्तक आईबरोबर दत्तकाच्या जनक बापानें केलेला करार वाजवी आहे असें ठरलें ( २७ म. ५७७ ).

दत्तक बापानें आपल्या कांहीं मिळकतीचें मृत्युपत्र करून ती दुसऱ्यास दिली व त्याच वेळीं मुलगा दत्तक घेण्याचें ठरविलें; मृत्युपत्रानें दिलेल्या बक्षिसास त्याची संमति होती व अशी संमति दिली नसती तर त्याचा मुलगा दत्तक घेतला नसता हें जनक बापास माहीत होतें. अशा प्रकारचे दत्तक घेण्यापूर्वी केलेली व्यवस्था दत्तक मुलावर बंधनकारक ठरविली. दत्तक आईच्या फायद्याची अट नसून त्यायोगें तिची मुलगी किंवा भाऊ यांना फायदा करावा अशा तऱ्हेच्या अटी रास्त नाहींत ( ३७ मुं. २५१ ).

दत्तक आईनें हयातीपर्यंत तिच्या जवळची इस्टेट आपल्या कबजांत ठेवावी असा करार असला व त्याप्रमाणें त्या अटीवर दत्तक होऊन तो मुलगा मयत झाला तरी ( तिच्या नवऱ्याची दत्तकास मिळालेली मिळकत तिला ) तिच्या हयातीपर्यंत कबजांत ठेवण्याचा हक्क राहतो. दत्तक पुत्रास दत्तक आईच्या हयातीपर्यंत मिळकत कबजांत ठेवण्याचा ( वहिवाट करण्याचा ) हक्क मिळाला नव्हता. जे हक्क दत्तक पुत्रास प्राप्त नव्हते ते हक्क त्याच्या वारसास मिळावयाचे नाहींत. दत्तक पुत्राची बायको किंवा मुलगा यास दत्तकाची आई हयात आहे तोंपर्यंत मिळकतीची वहिवाट ( कबजा ) करण्याचा हक्क नाहीं. दत्तकाचें नुकसान होईल अशा तऱ्हेची दत्तक बापानें आपल्या इस्टेटीची विल्हेवाट लावूं नये अशा शर्तीवर जर दत्तक मुलगा दिला तर त्याचें नुकसान होईल. अशा तऱ्हेची विल्हेवाट दत्तक बापास करतां येत नाहीं.

दत्तक घेण्यापूर्वी दत्तक आईचे व्यवहारः—दत्तक मुलास दत्तक कुटुंबांत दत्तक झाल्या दिवसापासून इस्टेटींत हक्क उत्पन्न होतात. परंतु विधवा म्हणून दत्तक आईनें योग्य व कायदेशीर कारण नसतां स्थावर मिळकतीसंबंधीं गहाण, विक्री वगैरे व्यवहार केले असले तर ते दत्तक झाल्यावर त्यास रद्द करून घेतां येतात. दत्तक घेतल्यावर दत्तक आईस नवऱ्याच्या इस्टेटींत अन्नवस्त्रापलीकडे हक्क राहात नाहींत. विधवेनें केलेले व्यवहार तिच्या हयातीपर्यंत रद्द होत नाहींत. ( मे. व. २६३ )

द्विमुष्यायन दत्तकः—यांत दोन सख्खे भाऊ एका भावाच्या मुलास दोघांचाहि मुलगा म्हणून समजतात. हा दोघांचाहि दत्तकपुत्र होतो. दत्तक दोघांमिळून घ्यावयाचा असा दोन भावांमध्यें स्पष्ट करार ठरलेला पाहिजे तरच तो द्विमुष्यायन दत्तकपुत्र होतो.

मुलींचे दत्तकः—दत्तक घेणें ती मुलगी नसली पाहिजे असा नियम आहे, परंतु देवालयांत देवापुढें नृत्य व गायन करण्याकरितां स्त्रियांची नेमणूक असते, किंवा नृत्य व गायन करणाऱ्यांचा धंदा करणाऱ्या बायका असतात त्यांच्या जिनगीस वारस करण्याकरितां त्या मुली दत्तक घेतात अशी चाल आहे तीप्रमाणें मुली दत्तक होतात. कसब करण्याच्या धंद्यांत घालण्याकरितां कसबीणीस ( वेश्येस ) मुलगी दत्तक घेतां येत नाहीं (२७ मुं. ४५१). परंतु कसबीणीच्या इस्टेटीस फक्त वारस करण्याकरितां मुलगी दत्तक घेतां येते. ( १४ मुं. ९० )

कृत्रिम दत्तकः—'कृत्रिमस्यात् स्वयंकृतः ।' फक्त मिथिल प्रांत व त्याच्या आसमंतात अशा प्रकारचा दत्तक घेण्याची चाल आहे. यास दत्तक मुलाची संमति लागते. दत्तक बाप व मुलगा एकाच जातीचे पाहिजेत. त्यांचें एकमेकांचें नातें कोणतेंहि असलें तरी हरकत नाहीं. कोणतेहि विधी करण्याची जरूरी नाहीं. बायकोस सुद्धा दत्तक घेतां येतो. ज्यानें दत्तक घेतला त्याच्या मिळकतींत मात्र त्यास हक्क प्राप्त होतात. त्याच्या मूळ कुटुंबांतील त्याचे हक्क नष्ट होत नाहींत. पुनर्विवाह झालेल्या स्त्रीस पहिल्या नवऱ्यापासून झालेला मुलगा दत्तक घेण्यास अधिकार आहे. स्त्रीचें दुसरें लग्न केलें तरी माता व पुत्र हा संबंध तुटत नाहीं. सावत्र आईस सावत्र मुलगा दत्तक देतां येत नाहीं. ती त्याची माता नव्हे.

दत्तविधान करण्यास प्रतिनिधिः—

मातापितावादद्यातां यमद्भिः पुत्रमापदि ।
सदृशं प्रीतिसंयुक्तं सज्ञेयोदत्रिमःसुतः ॥

एक रजपूत मुसुलमान झाला, त्याची बायको मयत झाली होती. आपला मुलगा दत्तक देण्यास त्यानें त्याच्या भावास अधिकार दिला. धर्मांतर केलें तरी पित्याचा पुत्र दत्तक देण्याचा अधिकार जात नाहीं व तो अधिकार दुसऱ्यासहि देतां येतो ( त्याकरितां प्रतिनिधी नेमतां येतो. ). त्या रजपुतानें दिलेल्या अधिकाराप्रमाणें त्याचा मुलगा दत्तक देण्याचें दत्तविधान त्याच्या भावानें केलें ( २३ मु. ५५१ ). हें दत्तविधान सशास्त्र ठरविलें. दत्तक देण्याचें पित्यानें वचन दिलें असल्यास धाकट्या भावाचा दत्तक देण्याचा अधिकार मोठ्या भावास पोंहचतो.

ज्याच्याजवळ संपत्ति पुष्कळ आहे परंतु संतति नाहीं असे श्रीमंत लोकच मुलगे दत्तक घेतात. हा व्यवहार नेहेमीं दत्तकपुत्रास फार फायदेशीर असतो. म्हणून त्याचे जनक आईबाप त्यास दत्तक देतात. नुसतें दत्तकपत्र केलें व मुलास जवळ ठेवलें व त्यास पुत्राप्रमाणें मानिलें, किंवा त्यानें बापाचें नांव बदललें तर त्यायोगें दत्तकपुत्र होत नाहीं व त्यास दत्तकपुत्राचे हक्क प्राप्त होत नाहींत. मयतानें बायकोस दत्तक घेण्याचा अधिकार दिला होता; तिचें वय ११ वर्षांचें असतां तिनें बापाच्या सांगण्यावरून तिनें आपला भाऊ दत्तक घेतला. तिला निर्भिड स्वतंत्र सल्ला नव्हता. केवळ बापाच्या स्वार्थी विचारसरणीवरून तिनें दत्तक घेतला होता. हें दत्तविधान रद्द आहे व दत्तक आई वयांत आल्यावरहि हा दत्तक तिला मान्य करून (रॅटिफाय) फायदेशीर करतां येत नाहीं. [ म. ४०. ६२५ ( २९ म. ४३७ ही केस अमान्य केली.)]शूद्राचा दत्तकपुत्र व औरसपुत्र यांच्या दरम्यान वांटणी झाली तर दत्तकपुत्रास ¼ इस्टेट मिळते. [ ४० म. ६३२ .]

**दत्ताजी त्रिमल**—हा शिवाजीचा वाकनवीस उर्फ मंत्री असून अष्टप्रधानांतील चौथा होता. रोज जी कांहीं हकिकत खास छत्रपतींविषयीं घडून येईल ती यानें लिहून ठेवावयाची व छत्रपतींच्या सर्व खाजगी खात्यांवर देखरेख करावयाची ही याची कामगिरी असे. अठरा कारखाने, बारा महाल, हुजूरपागा व शिलेदारांचें पायदळ, खाजगीदप्तर व पत्रव्यवहार, भोजनाची तजवीज ( मुदबकखाना ), आमंत्रणें करणें हा सर्व कारभार त्याच्याकडे असे. छत्रपतीनें दिलेल्या राजपत्रां-( इनामाच्या )वर 'संमतमंत्री' व 'बार' या ( अक्षरांच्या ) निशाण्या त्यानें स्वदस्तानें करावयाच्या असत. प्रथम गंगो मंगाजी हा मंत्रि होता; परंतु त्यावर इतराजी झाल्यानें व दत्ताजी हा आग्र्यास शिवाजीबरोबर गेल्यानें आणि तेथें कामगिरी बजावल्यानें शिवाजीनें दत्ताजीस परत आल्यावर ही जागा दिली. हा प्रथम पागेकडे नोकर होता. मंत्रिपदावर हा शाहूच्या पूर्व कारकीर्दीपर्यंत होता. पुढें शाहूनें ही जागा १७१३ सालीं नारोराम शेणवी यास दिली. मंत्री हा दरबारांत छत्रपतींच्या उजव्या हातास बसत असे. शिवाजी दक्षिणदिग्विजयास गेला असतां दत्ताजीला देशी देशरक्षणासाठीं मोरोपंत पेशव्याबरोबर ठेविलें होतें.

शिवाजीच्या कारकीर्दीत प्रसंगीं दत्ताजीनेंहि मोहिमेचें काम केलें होतें. त्यानें शिवाजीची हकिकत लिहून ठेविली होती. परंतु ती हल्लीं उपलब्ध नाहीं. तिचा सारांश म्हणून एक नव्वदकलमी बखर प्रसिद्ध झालेली आहे. दत्तोपंताचें मूळ चरित्र रायगडास ( इंग्रजांनीं तो घेतला असतां लागलेल्या) आगींत जळून गेलें असावें. संभाजीनें जुने अधिकारी काढले होते, परंतु दत्ताजीस काढलें नाहीं. शाहूनें सातारा राजधानी केल्यावर दत्तोपंत हा तेथेंच रहात असे. तेथें त्याचा वाडा होता. साताऱ्यास १७५३ सालीं होळीच्या दिवशीं ( २० मार्च ) साताऱ्यास जी प्रचंड आग लागली तींत, पेशवे, पुरंदरे, चिटणीस यांच्या वाड्यांबरोबरच दत्तोपंताचाहि वाडा जळून गेला. दत्ताजी यानें समर्थांचा गुरुपदेश घेतला होता. [ राजवाडे. खंड. ६; सप्तप्रकरणात्मक बखर; हणमंतस्वामी बखर. ]

**दत्ताजी शिंदे**—हा राणोजी शिंद्याचा दुसरा मुलगा, जयाप्पाचा सख्खा व महादजीचा सावत्र बंधु. जयाप्पा मेल्यानंतर ( १७५५ ) शिंदे घराण्याची सरदारी जयाप्पाचा पुत्र जनकोजी यास मिळाली. परंतु तो लहान होता म्हणून दत्ताजीच कारभार पाही. या चुलत्यापुतण्यांनीं अनेक पराक्रम केले व उत्तर हिंदुस्थानांतील पुष्कळ प्रांतहि मराठी साम्राज्यांत समाविष्ट केले. कुकडीच्या लढाईत ज्या अकरा शूर असामींनीं थेट निजामाच्या हत्तीवर चाल करून त्याची ढोलाची अंबारी खालीं पाडिली, त्यांपैकीं दत्ताजी हा एक होता ( १७५१ ). त्यानंतर पुन्हां निजामानें उपसर्ग दिल्यानें पेशव्यांनीं दत्ताजीस मुख्य सेनापति करून व बरोबर विश्वासरावास देऊन निजामावर पाठविलें. त्यानें शिंदखेड येथें निजामाला गांठून पूर्ण मोड केला व पंचवीस लक्षांचा प्रांत व नळदुर्ग किल्ला मिळविला (१७५७). जयाप्पाचा ज्या विजेसिंगाच्या ( मारवाडवरील ) मोहिमेंत खून झाला, तींतहि दत्ताजी होता; खून झाल्यावर दत्ताजीनें तें दुःख एकीकडे ठेऊन विजेसिंगाचा मोड केला ( जून १७५५ ). पुढें दत्ताजीनें सर्व मारवाडचें राज्य घेऊन त्याचा तिसरा हिस्सा मराठी साम्राज्यांत दाखल करून पांच कोट रु खंडणी मिळविली ( १७५६ ). नंतर बुंदीच्या राणीस मदत करून व तिचा मुलगा गादीवर बसवून, दत्ताजीनें ४० लाख रुपये मिळविले व सरकारचें पांच कर्ज फेडलें (१७५६). पुढील सालीं दादासाहेब अबदालीवर गेला असतां व मल्हारराव होळकर, हिंगणे, राजेबहादर वगैरे मंडळी त्याला मदत करण्यांत कुचराई करीत असतां, त्यानें दत्ताजीसच धाडण्याबद्दल पेशव्यांस अनेक पत्रें लिहिलीं आहेत.

याबेळीं दत्ताजीनें आपलें लग्न उरकून घेतलें (१७५८). त्याच्या स्त्रीचें नांव भागीरथीबाई. लग्न उरकून दत्ताजी

मराठी साम्राज्याचे अभिमानी होऊन गेले. [ काव्येतिहास, पत्रें, यादी; इ. सं. ऐ. टि. भा. ३; का. इ. सं. शकावली; भारतवर्ष शकावली; भाऊसाहेबांची बखर ].

**दत्तात्रेय**-ब्रह्मा, विष्णु आणि महेश या देवत्रयीचा अंशरूप असा अत्रि व अनुसूया यांचा कौपीनवेशधारी पुत्र. तिन्हीं देवतांचा समावेश एका देवतेमध्यें म्हणजे दत्तात्रेयामध्यें होतो. या देवतेचा महाभारतांत दोन ठिकाणीं उल्लेख आहे. वनपर्व-अध्याय ११५ यांत असें सांगितलें आहे कीं, सहस्रार्जुनाला दत्तात्रेयप्रसादानें एक विमान मिळालें असें वर्णन केलेलें आहे. शांतिपर्व अध्याय ४९ यांत हीच कथा पुन्हां सांगितली आहे. याशिवाय अनुशासनपर्व अध्याय ९१ यांत दत्तात्रेय हा अत्रीचा पुत्र आहे असें वर्णन आलें आहे. परंतु महाभारतांत दत्तात्रेयाच्या जन्माची कथा सांगितलेली नाहीं. दत्तात्रेय ही देवता वैदिक नसली तरी ब्रह्मा, विष्णु, महेश या तीन वैदिक देवतांचीच ही झालेली आहे. दत्तात्रेयाच्या जन्मकालासंबंधीं कथा अशी आहे कीं, नारदमुनी सत्यलोकीं गेले असतां त्यांनां ब्रह्मा, विष्णु आणि महेश यांच्या स्त्रियांनीं असा प्रश्न केला कीं, मृत्युलोकांत आमच्यासारख्या पतिव्रता स्त्रिया आहेत काय ? त्यावर नारदांनीं अत्रिऋषींची स्त्री अनुसूया हिच्या सारखी पतिव्रता या त्रैलोक्यांत नाहीं असें स्तुतिपर सांगितलें. तें त्या तिघींनां न आवडून त्यांनीं अनुसूयेचें पातिव्रत्य भ्रष्ट करण्याकरितां आपापल्या पतींची प्रार्थना केल्यामुळें ब्रह्मा, विष्णु आणि महेश हे विप्रवेषानें माध्यान्हकाळीं अत्रीच्या आश्रमांत येऊन अनुसयेस नग्न होऊन वाढण्याचें भोजन मागूं लागले. तेव्हां ती फारच चिंतातुर झाली; परंतु पतीचें पादतीर्थोदक त्या त्रयीवर सिंचन केल्यामुळें ते तिघे त्रैलोक्यनाथ शिशुरूप झाले. त्या त्रयीला अंकावर घेऊन तिनें त्यांनां लागलेली क्षुधा शांत केली, व त्या बालकांनां पाळण्यांत घालून झोंके देऊं लागली. इतक्यांत पति आश्रमीं आलेले पहातांच झालेली गोष्ट तिनें पतीस निवेदन केली. अशा तऱ्हेनें बरेच दिवस गेले. इकडे नारदांनीं ही सर्व हकीकत पतीची वाट पहात बसलेल्या सावित्री, लक्ष्मी व पार्वती यांनां सांगितली. तेव्हां अभिमानानें पतीची सुटका करण्याकरितां त्या तिघी अत्रि ऋषींच्या आश्रमामध्यें आल्या, तेव्हां अनुसूयेनें त्यांनां मोठ्या आदरानें नमस्कार करून त्यांच्या आज्ञेवरून त्यांचे पती पुढें ठेविले; परंतु ते बालस्वरूप असल्यामुळें त्या तिघींनां आपापले पती ओळखतां येईनात. त्यांनीं अनुसूयेची प्रार्थना केल्यावर अनुसूयेनें आपल्या हस्तस्पर्शानें त्या तिघांनां पूर्वस्वरूप दिलें; त्यावेळीं सर्वत्रांस मोठा आनंद झाला. देव संतुष्ट होऊन त्यांनीं अत्रिऋषीस वर मागण्यास सांगितलें; तेव्हां तुमच्यासारखा पुत्र मजजवळ असावा अशी आशा प्रदर्शित केल्यामुळें दत्तात्रेय या नामाभिधानानें ब्रह्मा, विष्णु, आणि महेश या त्रयमूर्तीच्या अंशरूपानें मार्गशीर्ष पौर्णिमेस बुधवारीं सायंकाळीं अत्रीच्या आश्रमीं दत्तात्रयानें अवतार घेतला अशी लौकिक कथा आढळते. भागवतांत ( स्कं. ८.१ ) दत्त एकमुखी व विष्णूचा अंश मानला आहे.

दत्तात्रेय सपत्नीक असून निरंतर मद्यपान करतो असें वर्णन मार्केडेय पुराणांत आढळतें ( अ. १७-१९ ). दत्तभक्त गुरुचरित्राची पोथी वाचतात. हा ग्रंथ गंगाधर सरस्वती ( पहा ) यानें रचिला आहे. यांत श्रीपाद, श्रीवल्लभ व नरसिंहसरस्वति यांची कथा (त्यांना दत्तावतार समजून) आहे.

अलीकडे गौडसारस्वत वैष्णव ब्राह्मण कुमठा नारायणाचार्य यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'गुरुपरंपरामृत' नांवाच्या ग्रंथांत दत्तात्रेयाची त्रिमुखी व षड्भुज मूर्ति वैदिक-लौकिक धर्माच्या अगदीं उलट असून त्रिमुखी दत्ताचे उपासक ईश्वरद्रोही आहेत वगैरे टीका करून असल्या मूर्तीच्या उत्सवांत सामील न होण्याबद्दल लिहिलें आहे ( धर्म मासिक, ७।११।१९०५ पहा ). पण दत्तभक्तिसंप्रदाय जास्त वाढत आहे. सुशिक्षित लोकहि दत्ताची तसबीर आपल्या संग्रहीं बाळगतांना व गुरुवार करतांना दिसतात.

सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेलेले नरसिंह सरस्वती हे दत्ताचे अवतार होत अशी समजूत असून औदुंबर, गाणगापूर व नरसोबाचीवाडी या ठिकाणीं ते राहिल्यामुळें त्यांनां गुरुदत्ताचीं पवित्र क्षेत्रें म्हणून मोठें माहात्म्य प्राप्त झालेलें आहे ( नरसिंह-सरस्वती पहा ).

**दत्तापुर धामणगांव**—वऱ्हाड, तालुका चांदूर, जिल्हा उमरावती. पूर्वीं हीं दोन निरनिराळीं गांवें असून एक रेल्वेच्या उत्तरेस व दक्षिणेस अशीं होतीं. लोकसंख्या सुमारें दहा हजार आहे. हें रेल्वेस्टेशन आहे. कापसाचा बाजार १८८५ सालीं स्थापला गेला असून त्याचें उत्पन्न सालीना दोन पासून चार हजार रुपये आहे. सरकी काढण्याचे आणि रुई दाबण्याचे बरेच कारखाने येथें आहेत.

**दधीचि**—एक वैदिक ऋषि. हा स्वायंभु मन्वंतरांतील अथर्वण ऋषीच्या तीन पुत्रांपैकीं एक असून यालाच दध्यङाथर्वणहि म्हणतात. वृत्रासुरवधार्थ यानेंच आपल्या अस्थी इंद्रास दिल्या होत्या. इंद्रानें यास ब्रह्मविद्या शिकवून असें सांगितलें होतें कीं, जर तूं ही विद्या कोणास सांगशील तर मी तुझें मस्तक तोडीन. पुढें अश्विनीकुमारांनीं त्या विद्येविषयीं त्यास प्रार्थिलें. तेव्हां यानें इंद्राची प्रतिज्ञा त्यांस सांगितल्यावरून ते यास म्हणाले कीं, "हें तुझें प्रस्तुतचें शिर आम्हीं तोडून एकीकडे ठेवतों व तुला अश्वाचें शिर जोडितों. त्यानें तूं आम्हास ब्रह्मविद्या सांगितलीस कीं, इंद्र हें तुझें मस्तक तोडील. तसें होतांच तुझें मूळचें शिर जोडून तुला आम्ही सजीव करूं." या युक्तीनें अश्विनीकुमारांनीं त्याच्यापासून ब्रह्मविद्या संपादन केली अशी याची कथा आहे. याच्या अस्थीच्या वज्रानें इंद्रानें वृत्रास मारलें अशी ऋग्वेदांत व महाभारतांत कथा आहे.

**दनकौर**—संयुक्तप्रांतांतील बुलन्द शहर जिल्ह्याच्या सिकंदराबाद तहशिलींतील एक गांव. लोकसंख्या सुमारें ५ हजार. हा गांव भारतांतील द्रोणाचार्य यानें वसविला

असें म्हणतात. येथील एका तळयास व एका देवलयास द्रोणाचार्य हें नांव आहे. येथें तूप, साखर व धान्यांचा व्यापार मुख्यतः चालतो.

**दनखर**—पंजाब इलाख्यांतील कांग्रा जिल्ह्याच्या कुलु पोटविभागामधील स्पिटी भागाची जुनी राजधानी. समुद्रसपाटीपासून १२७०० फूट उंच आहे. येथें एक किल्ला आहे पण तो सध्यां सरकारच्या ताब्यांत आहे. येथील लोक तिबेटी आहेत.

**दनु**—दक्षाची मुलगी व कश्यपाची स्त्री. हिच्या शंभर पुत्रांस दानव असें म्हटलेलें आहे. त्यांची इंद्रजित्, एकचक्र, अश्वशिरा, अश्वपति, एकाक्ष, कपिश, केतु, केशी, सूर्य, चंद्र, नमूचि, नरक, तारक, बाण, मरीचि, वैश्वानर, वातापि, वृषपर्वा, शकुनि, शंवर, हिरण्यकशिपु इत्यादि नांवें आहेत.

**दनु**—वरचा ब्रह्मदेश व शान संस्थानें यांमधील प्रदेशांत राहणारे मिश्र शान ब्रम्ही लोक. ह्या लोकांची १९०१ सालीं लोकसंख्या ७०५४७ होती. बहुतेक लोक मंडाले जिल्ह्यांत व उत्तर व दक्षिण शान संस्थानांत रहातात; व त्यांच्या बोलण्याच्या भाषेवरून या लोकांचे 'ब्रह्मी दनु' व 'शान दनु' असे दोन भाग पडले आहेत. रहाणी वगैरेमध्यें हे लोक शान व ब्रह्मी लोकांसारखेच दिसतात व थोडे थोडे बौद्ध लोकांसारखेहि आहेत.

**दनुबियु**, टा उ न शि प.—खालच्या ब्रह्मदेशांतील मऊबिन जिल्ह्याच्या उत्तरेस असलेली एक टाउनशिप. क्षेत्रफळ ३०४ चौ. मैल. पूर्व सीमेवरून इरावती नदी वहाते. दनुबियु गांव हें मुख्य असून नदीच्या पश्चिम तीरावर आहे. सर्व टाउनशिपची जमीन सपाट व फार सुपीक आहे. त्यांत एक शहर व १२२ खेडीं असून लोकसंख्या १९११ सालीं ९१८९३ होती.

श ह र.—दनुबियु टाउनशिपमधील मुख्य गांव. इरावतीच्या पश्चिम तीरावर आहे. लोकसंख्या (१९११) ७६९५. ह्या गांवाचें कामकाज पहाण्यास येथें एक ८ माणसांची पंचायत नेमली आहे. ब्रह्मी लोकांच्या अमदानींत दनुबियूचें फारच महत्व होतें व पहिल्या ब्रह्मी युद्धांत तर येथील लोकांनीं चांगलाच जोर दाखविला होता. येथें १८२५ सालीं महाबंन्दुला हा मारला गेला. दुसऱ्या ब्रह्मी युद्धांत दनुबियु हा गांव ब्रह्मी लोकांनीं घेतला पण लौकरच त्यांनां तो सोडून द्यावा लागला. प्राचीन ब्रह्मी लोकांचे येथें अद्यापि अवशेष शिल्लक राहिले आहेत.

**दफ्ला**—आसाममधील दरंग व लखिमपूर जिल्ह्यांच्या उत्तरेस असलेला हिमालय पर्वताचा दफ्ला नांवाचा एक भाग आहे. या भागांत दफ्ला जातीचे रानटी लोक राहतात. १९०१ सालीं यांची संख्या ९५४ होती. मूळचे हे लोक तिबेटो—ब्रह्मी जातीचे असून शरीरानें ठेंगणे, अंगानें कसदार व मोंगोलिअन धर्तीवर चेहऱ्याची ठेवण असलेले आहेत. ह्या लोकांत एकीचें तत्त्व बाणलेलें नसल्यामुळें सरकारास ते इतके भयजनक नाहींत. अहोम राजांच्या कारकीर्दीत दफ्ला लोक खालील मैदानावरील लोकांजवळून धमकी देऊन लांच-पट्टी घेत असत. व असा त्रास त्यांनीं १८५२ पर्यंत दिला. १८७२ सालीं दरंग जिल्ह्यांतील एका गांवावर कांहीं कारणास्तव हे लोक तुटून पडले व दोघा जणांस ठार मारून ४२ लोक धरून, बांधून घेऊन गेले. १८७४-७५ सालीं ह्या लोकांचा बींमोड करण्याकरितां एक सैनिकांची तुकडी पाठविण्यांत आली होती. तिनें कैद करून घेऊन नेलेल्या लोकांपैकीं जिवंत राहिलेल्या लोकांस सोडवून आणण्याची कामगिरी केली. तेव्हांपासून ह्या लोकांपासून त्रास फारकमी पोंचतो व हे जरी कधीं कधीं मैदानावरील लोकांस पकडून घेऊन जातात तरी पण त्यांस ते लवकर सोडून देतात. यांचा मुख्य देव उद किंवा वी हा असून त्याचा दर्जा हिंदु यमदेवतेसारखा आहे. मिकिर लोकांप्रमाणें दफ्ला, यापुम् व ओरोम या दुष्ट देवतांचीहि ते आराधना करितात [डाल्टन—डिस्क्रिप्टिव्ह एथ्नॉलॉजी ऑफ बेंगाल; मॅकेंझी—हिस्टरी ऑफ रिलेशन्स ऑफ दि गव्हर्मेंट विथ् दि हिल् ट्राईब्स ऑफ दि एन्. ई. फ्रॉंटियर ऑफ बेंगाल; रिपोर्ट्स ऑफ दि सेन्सस ऑफ आसाम.]

**दब्राजपूर**—बंगाल्यांतील विरभूम जिल्ह्याच्या मुख्य पोटविभागांतील खेडें.हें सुरीच्या नैर्ऋत्येस १८मैल आहे.लोकसंख्या (१९०१) ६७१५. दब्राजपूरच्या भोंवतालीं तलाव असून त्याच्या कांठीं मोठे ताडवृक्ष आहेत. येथें तसर रेशीम व पितळेच्या भांड्याचे कारखाने आहेत.

**दमखन**—बंगालमधील शहाबाद जिल्ह्याच्या बक्सार पोटविभागांतील एक गांव. हें ईस्ट इन्डियन रेल्वेवर असून कलकत्त्याहून ४० मैल आहे. लोकसंख्या (१९०१) १७२३५. येथें राजवाडा व भव्य मंडप आहे. १८६९ सालीं म्युनिसिपालिटीची स्थापना झाली.

**दमण**—मुंबई इलाख्यांतील खंबायतच्या आखाताच्या मुखाशीं असलेली पोर्तुगीज वसाहत. हींत दमण व नगर हवेली असे दोन एकमेकांपासून तुटलेले भाग आहेत. ही वसाहत मुंबईच्या उत्तरेस १०० मैल असून नगर हवेली परगणा धरितां क्षेत्रफळ १४९ चौ. मै. भरेल. उत्तरेस भगवान नदी, पूर्वेस ब्रिटिश सरहद्द, दक्षिणेस कलेमनदी व पश्चिमेस खंबायतचें आखात आहे. दमण हें गांव पोर्तुगीजांनीं १५३१ सालीं लुटलें; पण तेथील रहिवाश्यांनीं तें पुन्हा वसविलें व पुन्हां १५५८ सालीं पोर्तुगीजांनीं घेतलें. खुद्द दमणचें क्षेत्रफळ २२ चौ. मैल असून २६ खेड्यांचा ह्यांत समावेश होतो. लोकसंख्या (१९२१) १७५६६. नगर हवेली परगणा पूर्वेस वसलेला असून क्षेत्रफळ ६० चौरस मैल आहे. लोकसंख्या (१९२१)३१०४८. हा परगणा मराठ्यांनीं पोर्तुगीजांस दिला.

नद्याः—भगवाननदी वसाहतीच्या उत्तरेकडून व कलेम नदी दक्षिणेकडून वहाते. संदलखाल किंवा दमणगंगा ही

दमणहून ४० मैल घाटांत उगम पावते. या सर्व नद्या खंबायतच्या आखातास येऊन मिळतात. येथील हवा स्वच्छ असते. येथें रोगराई वगैरे कांहीं नाहीं.

जमीन ओलसर असून सुपीक आहे. नगर हवेली परगण्यांतील जमीन तर चांगल्यापैकींच आहे. तांदूळ व गव्हाचें पीक मुख्य आहे.नगर हवेली परगण्यांत चांगलें जंगल आहे. ह्या जंगलांत ⅔ भागांत सागवान लांकूड आहे. ह्या जंगलांत असलेल्या इतर इमारती लांकडांचीं नांवें: सदर, खैर, शिसव, लालखैर, तिवा, सिवण डम्बोरा, हेदू, असाणा, टेम्बुर्णी, व बाभूळ.पोर्तुगीज लोकांची हिंदुस्थानांतील सत्ता कमी होण्याच्या पूर्वी दमण हें व्यापारी दृष्टीनें फार भरभराटीचें ठाणें होतें व बहुतेक सर्व व्यापार आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्याशीं चालत असे.गुजराथमध्यें तयार झालेलें कापड त्यावेळीं आफ्रिकेंत फार जात असे. १८१७ ते १८३७ सालीं चीन देशाशीं मोठ्या प्रमाणावर अफूचा धंदा सुरू करण्यांत आला. परंतु सिंधप्रांतावर इंग्रजांचा ताबा बसल्यामुळें त्यांनीं अफूचा व्यापार बंद केला व तेव्हांपासून दमणची सांपत्तिक स्थिति खालावली. पूर्वकालीं दमणची विणकामाबद्दल व रंगाबद्दल बरीच ख्याति होती व अजूनहि येथें तयार केलेला कपडा गोवा, मोझांबिक व दीव येथील लोक वापरतात. येथें मासे पकडण्याचा धंदा मुख्य आहे.

राज्यकारभारासाठीं ह्या सर्व प्रदेश एकच जिल्हा मानिला आहे. ह्या भागावर गव्हर्नरची नेमणूक असून त्याच्यावरचा अधिकारी गोंव्याचा गव्हर्नर जनरल आहे. नगर हवेली परगण्याचा कांहीं भाग ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत आहे. एकंदर उत्पन्न १९०३-०४ सालीं २ लाख रुपये होतें. येथें दोन किल्ले असून दमणगंगा नदीच्या दोन्हीं तीरांवर दोन असे आहेत. पैकीं एकांत गव्हरनरचें राहण्याचें ठिकाण, मिलिटरी बराकी, दवाखाना, म्युनिसिपालिटीचें ऑफिस, कोर्टहौस, जेल, मिशनऱ्यांचें घंटाघर वगैरे आहेत. दुसऱ्या पण जरा पहिल्यापेक्षां लहान असलेल्या किल्ल्यांत एक चर्च, एक पाद्रीघर व एक मृतांस मूठमाती देण्याची जागा आहे. दोन्हीं किल्ल्यांच्या तटावरून पितळेच्या व लोखंडी तोफा रोंखून ठेवलेल्या आहेत.

**दमयंती**—विदर्भ देशच्या भीम राज्याची कन्या व नलाची स्त्री. तिनें आपल्या अद्वितीय सौंदर्यानें सर्व सुंदर स्त्रियांचा गर्व हरण केला म्हणून तिला 'दमयंती' असें नांव पडलें. एका सोन्याच्या वर्णाच्या हंसाकडून तिनें नलराजाचे गुण ऐकले व त्या हंसामार्फत तिनें आपलें प्रेम नळाला कळविलें. पुढें स्वयंवर होऊन त्यांत जमलेल्या इंद्र, अग्नि, यम, वरुण वगैरे देवांनाहि अव्हेरून तिनें नलाला वरिलें. पण त्यांनां राज्यसौख्य फार वर्षे लाभलें नाहीं. कारण पुढें द्यूतामध्यें नळ आपलें सर्व ऐश्वर्य व राज्य हरला.त्यामुळें नल व दमयंती यांनां एकेक वस्त्रानिशीं वनांत जावें लागलें. या वनवासांतहि त्यांच्यावर अनेक संकटें आलीं. त्यामुळें चैतागून नल दमयंतीला ती निजलेली असतां सोडून गेला. तेव्हां ती आपल्या बापाच्या घरीं येऊन राहिली व नलाचा शोध न लागल्यामुळें तिच्या बापानें तिचें पुन्हां स्वयंवर करण्याचें जाहीर केलें. त्याच प्रसंगास नल परत येऊन त्यांचें पुढील आयुष्य पूर्ण सुखांत गेलें.

अशा तऱ्हेची नलदमयंतीची मूळ कथा महाभारतांत (वनपर्व अध्याय ७६) असून रघुनाथपंडितांचें मराठी 'नलदमयंती' आख्यान फार सुरस आहे. दमयंतीच्या दुसऱ्या स्वयंवराबद्दलचा वादविवाद रा. ब. चिंतामणराव वैद्य यांनीं 'महाभारताचा उपसंहार' (पृष्ठ २०७) यामध्यें केला आहे.

**दमरावनराज**—बंगालमधील शहाबाद जिल्ह्यांमधील एक इस्टेट. क्षेत्रफळ ७५८ चौ. मैल. येथील महाराजा राजाविक्रमादित्य राजाच्या वंशांतील आहे असें म्हणतात. ह्यांच्या पूर्वजांनीं बरींच वर्षेपर्यंत माळव्यांत उज्जनी नगरींत राज्य केलें. राजा शन्तन शाहीनें शहाबाद जिल्ह्यांत राज्य स्थापिलें. काहूर खेड्यांत तो १३२० सालीं येऊन राहिला. हुमायून व शेरखानमधील युद्धांत (१५३४--१५४०) गजनशाही व दलपतशाही हे दोघे वेगळ्या बाजूस जाऊन मिळाले होते. शेरशहाकडून गजनशाहीस रोहता व शहाबाद आणि राजा ही पदवी मिळाली. राजा नारायणमल्लाच्या ताब्यांत भोजपूर व जगदीशपूर हे होतें (१६०७–२१). त्याचा बंधु राजा रुद्रप्रताप ह्या नवीन भोजपुरास जाऊन राहिला. १७४५ सालीं दमरावन हें मुख्य गांव करण्यांत आलें. राजा महाराजा महेश्वर बक्षसिंग यानें बंडाच्या सालीं सरकारास चांगलीच मदत केली. त्याच्या पश्चात् राधाप्रसादसिंग गादीवर आला. पण १८९४ सालीं तो मरण पावला व त्याची विधवा राणी आपल्या मुलीच्या वतीनें राज्यकारभार पाहूं लागली. वरहपूर येथें फाल्गुन मासांत व वैशाख मासांत अशा दोन जत्रा भरतात. त्यावेळीं शेतकीचें व उद्योगधंद्यांचें प्रदर्शन होतें. खालच्या ब्रह्मदेशांतील टौंगू जिल्ह्यांतील १५००एकर जमीन राणीच्या मालकीची व माफीची आहे. १९०३–०४ सालीं सारा व इतर कर यांचे उत्पन्न ४.८ लाख होतें.

**दमा** (श्वास)—या रोगांत श्वासोच्छ्वासाची क्रिया फाजील जलद वाढून त्यामुळें रोग्यास गुदमरल्यासारखें होतें व त्यामुळें अतिशय हाल होतात व कांहीं काळानंतर दमा कमी होऊन साफ बरें वाटतें. नंतर कांहीं दिवस प्रकृति नीट असून पुन्हां वर वर्णिल्याप्रमाणें एखाद्या दिवशीं पुन्हां जीव गुदमरण्यापर्यंत दम लागतो. अशी दमा होण्याची खोड जडून मध्यें प्रकृति नीट रहाण्याचा काळ उत्तरोत्तर कमी होत जातो. याशिवाय श्वासास अडचण पडून दम लागणें हें लक्षण श्वसनेंद्रियांच्या अनेक रोगांत व रक्ताशयाच्या रोगांतहि होतें. पण येथें दिलेलें वर्णन फक्त रोग

नसून जो वरच्यावर दमा उसळतो त्याचेंच केलें आहे व वरील रोगांनीं युक्त असे इतर प्रकारचे श्वासरोग आहेत. त्यांचें स्वरूप क्षय, फुफ्फुसाचे व रक्ताशयाचे रोग यांच्या वर्णनांत सांपडेल.

पूर्वचिन्हें.—हीं कित्येक वेळां कांहींच होत नाहींत. व कित्येकदां तीं होतात. रोग्यास दम होणार हें कळून चुकतें. पोटांत जाडय रहातें अगर अशी विलक्षण झोंप व सुस्ती येते कीं, ती कितीहि आवरण्याचा रोग्यानें प्रयत्न केला तरी तो सिद्धीस जातच नाहीं. अगर सुस्तीच्या ऐवजीं डोक्यांत विलक्षण तरतरीच वाटूं लागते. कधीं पोटांत वात धरतो अगर शौचास अवरोध झाल्याचें निमित्त दमा होण्यास पुरतें. कित्येक रोग्यांना अगोदर पाण्यासारखी स्वच्छ रंगाची लघवी दिवसांतून पुष्कळ वेळां होते. रात्रीं अवचीत श्वासोच्छ्वासास अडचण होऊन रोगी एकाएकीं जागा होतो. छाती जणूं काय बांधून टाकली आहे व तींत पुरेसा हवेचा प्रवेश होत नाहीं असें वाटतें. रोगी मोठ्या कष्टानें हवा आंत घेतो व ती बाहेर सोडतानाहि त्यास फार यातना होतात. बाहेर हवा सोडण्यास एरवीं जो अवधि लागतो त्यापेक्षां या वेळेस फारच लागतो व त्यामुळें त्यास दम छाटत नाहीं व छातींतील उच्छ्वासाचे सूं सूं आवाज फार लांब व मोठ्यानें वाजतात व जवळच्या अगर दूरच्या माणसालाहि ऐकूं येतात. जणूंकाय भाताच चालला आहे असें होऊन त्यास बोलतांहि येत नाहीं कारण दम चालू असतो. त्याचा चेहरा चिंताक्रांत दिसतो व या संकटांतून पार कसें पडावें या विवंचनेंत तो असतो; व नवख्या माणसास असें वाटतें कीं न जाणों हा रोगी यांतच मृत्यु पावेल. शरीरावर घामाचे थेंब पडतात व अंग गार पडतें. नाडी जलद चालूं लागते. तोंड उघडें रहातें. डोकें वर धरलेलें असतें. थोडा खोकला येतो व कोणच्याहि उपायानें रोग्यास बरें वाटत नाहीं असें होतें. निजवत नाहीं; बसून आराम वाटत नाहीं. दमा कमी होण्याच्या आशेनें रोगी उठून उभा रहातो अगर पुढें तक्या घेऊन त्यावर कोपरें टेंकून बसून रहातो. खिडक्या उघड्या टाकतो. सारांश ज्या स्थितींत श्वास घेण्यास सुलभ पडेल त्या तजविजींत तो असतो. त्यास झोंप कोठची? कारण अशा स्थितींत तो दोन चार तासांपासून तों एक दोन दिवसपर्यंत काढल्यानंतर एकदम अगर हळू हळू त्यास बरें वाटतें व दमा कमी होत जातो. नंतर थोडा अगर पुष्कळ कफ पडतो व नंतर त्यास स्वस्थ झोंप लागते. जागा झाल्यावर त्याची मनस्वी श्रम झालेली छाती व पाठ दुखूं लागतात. कांहीं दिवसपर्यंत रोगी बरा असतो. मग पुन्हां दम कधीं उलटेल याचा नियम नसतो. कोणास दररोज एकदां, कोणास महिन्यांतून एकदां व कोणास वर्षांतून एक दोनदां दमा लागतो. दमा पुन्हां उलटेपर्यंत रोग्यास श्वासोच्छ्वासाची कांहीं अडचण न भासतां व प्रकृति अगदीं निरोगी असते. तरी पण कित्येक दमेकरी शरीरानें अशक्तच असतात. छातीचीं हाडें बाहेर निघालेलीं असून गालफडें बसलेलीं असतात. थोडा खोकला असतो. शेवटीं वारंवार दमा उसळल्यानें दुसऱ्या व्याधी जडतात, कफ वाढतो व घसा वाजतो. रक्ताशयाचे व इतर रोग उत्पन्न होतात व त्यामुळें रोग्याची आयुर्मर्यादा लवकर खुंटते. पण जर दमा वरचेवर होत नसेल तर रोग्याची प्रकृति चांगली असून तो अल्पायुषी होत नाहीं.

कारणें.—बहुतकरून आरंभ तारुण्यावस्थेंत होतो व स्त्रियांपेक्षां पुरुषांस विशेषेंकरून होतो. एकाच कुटुंबांत कित्येक वेळां हा रोग वंशपरंपरागत असतो. श्वासनलिकांचा क्षोभ होण्यास कांहीं तरी निमित्त घडतें; मिरच्यांचा धूर, तळकट फोडणीचा वास घरांत उघळणें, कसली तरी तिखट धुरी, दुर्गंधि अगर धूळ यांनीं दमा होतो. सर्दीनें दमा होतो. कोणास ही सर्दी उन्हाळ्यांतहि होऊन दमा होतो, तर कोणास हिंवाळ्यांत अगर फक्त पावसाळ्यांत सर्दी बाधते. कोणास स्वच्छ हवेंत राहिल्यापासून दमा होतो तर कित्येकांस घाणींत राहिल्यापासून होतो. कित्येकांस समुद्रकांठच्या हवेनें दमा उसळतो तर कित्येकांस त्या हवेंत बरें वाटतें. कोणच्या जातीच्या आहारानें दमा होतो तें निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. गर्भाशय, हृदय, मज्जातंतूचे रोग यांनींहि दमा होतो.

उपाय.—(१) प्रथम दमा होऊं न देण्याचा प्रयत्न करणें व यासाठीं प्रकृतिमानाप्रमाणें दम्यास उत्तेजक अशीं जीं कारणें शक्य असतील तीं टाळण्याचा प्रयत्न करावा. उदाहरणार्थ, अपचन झालेसें वाटल्यास उलटी अथवा मलशुद्धीचें औषध द्यावें. निदान एरंडेल तेल एक दोन रेच होतील इतकें द्यावें.

( २ ) दमा होण्यास आरंभ झाला असतां छातीवर मोहरी वाटून ती फडक्यावर पसरून ठेवावी. टरपेंटाइनचा व गरम पाण्याचा शेक करावा. पाय कढत पाण्यांत बुडवून ठेवावेत व त्यावेळीं थोडें थंड पाणी प्यावें. योग्य वैद्यास प्रकृति दाखवून औषधोपचार करावे व जें औषध आपणांस नेहमीं लागू पडतें असा अनुभव आहे तेंच घ्यावें. एकास जें औषध लागू पडेल तें दुसऱ्यासहि फायदेशीर होईल अशी खात्री नसते. यासाठीं औषधयोजनेसंबंधीं सविस्तर माहिती येथें दिली नाहीं. तथापि या रोगांत इपिक्याक्युआना, बेलाडोना, धोतरा, अफू, गांजा, लोबेलिया, ईथर, पोटॅश आयोडाइड इत्यादींपैकीं एक किंवा अनेक मिश्रित औषधें माहितगार वैद्याकडून घ्यावींत, याशिवाय हुंगण्यासहि क्लोरोफार्म, ईथर यांचा थोडथोडा वास दिला असतां उपयोग होतो. मार्फियाची पिचकारीहि त्वचेंत मारितात. आमिल नैट्रेट याचे दोन तीन थेंब रुमालावर टाकून हुंगले असतां उपयोग होतो. विडींतून अगर चिलमींतून धोतरा, बेलाडोना, मार्फिया, गांजा, सोरा,

इत्यादि औषधें योग्य प्रमाणांत मिसळून ओढल्यानें दमा कमी होतो. मार्फियाची पिचकारी मारणें हा जेव्हां निरुपाय असेल तेव्हां उत्तम उपाय आहे खरा पण ती संवय जडण्याचा संभव असतो म्हणून डाक्टरच्या सल्लयावांचून ती मारून घेऊं नये. सोऱ्याच्या पाण्यांत भिजविलेले कागद वाळवून प्रसंग पडेल तेव्हां त्यांची धुरी घेणें हा एक उपाय चांगला आहे.

( ३ ) दमा उलटूं न देण्यासाठीं रोग्यानें त्यास जी हवा मानवत असेल तेथेंच रहावें, वेळेवर जेवण करावें, रात्रीं, उशीरां जेऊं नये, जागरण करूं नये, जडान्न खाऊं नये व ज्या इतर पदार्थांपासून अजीर्ण होईल ते वर्ज्य केले पाहिजेत. ज्या पदार्थांनीं दमा होण्याचा संभव कमी असतो असें पथ्य पाळलें पाहिजे. एकच नियम या रोगांत विशेषतः सर्वांस लागू पडत नाहीं.

( ४ ) दमा जुनाट झाल्यासः—वरील औषधांशिवाय आर्य वैद्यकांत उंची कस्तुरी, श्वासकुठार, अडुळसा, पिंपळी, अभ्रक भस्म, अघाड्याचा क्षार इत्यादि औषधें आहेत तीं अनुभवशीर वैद्याच्या सल्ल्यानें घ्यावीत.

(५) नाकाच्या श्वासमार्गांत बारीक ग्रंथी होऊन जो दमा होतो त्या ग्रंथी शस्त्रक्रियेनें काढविणें हाच उपाय आहे.

**दमास्कस**—दमास्कस हें सीरियांतील मुख्य शहर असून त्याच नांवाच्या प्रांताची राजधानी आहे. हें उ. अ. ३३° ३०′ व पूर्व रेखांश ३६° १८′ यांवर आहे.

इतिहास.—सध्यां अस्तित्वांत असलेल्या सर्वांत जुन्या शहरांपैकीं दमास्कस हें एक शहर आहे अशी संशोधकाची समजूत आहे. अब्राहीमच्या संबंधांत या शहराचें नांव जुन्या करारांत येतें. पॅलेस्टाईनवर ईजिप्तची सत्ता होती त्यावेळेस दमास्कस हें उपी या लहानशा प्रांताची राजधानी होतें. आर्मेनियन लोकांनीं हा प्रदेश जिंकल्यावर येथें स्वतंत्र सत्ता सुरू झाली. डेव्हिडनें हें शहर जिंकिलें परंतु इस्रायल लोकांची सत्ता फार दिवस टिकली नाहीं. इस्रायल व सीरियन यांच्यामधील वैमनस्य अहाबच्या वेळेपर्यंत टिकलें. ख्रिस्तपूर्व ८४३ त बेहनचा खून करून हॅझेल दमास्कसचा राजा झाला. चवथ्या अदाद निरारीनें सीरियावर स्वारी केली व ख्रि. पू. ८०६ त दमास्कसला वेढा दिला. ख्रिस्त पूर्व ७३४ त अहाज जूडाचा राजा झाला. परंतु त्याच्यावर दमास्कसचा राजा रेझन ( रझुन, रेझिन ) यानें स्वारी केली. अहाजनें नजराणे पाठवून असुरियाच्या तिसऱ्या तिगलथ पिलेसरची मदत मागितली. त्यानें सीरियावर स्वारी करून ख्रिस्तपूर्व ७३२ त दमास्कस शहर घेतलें. ख्रिस्त पूर्व ३३३ त हें शहर फिडुरीनें अलेक्झांडरचा सेनापति पारमेनिओ याच्या ताब्यांत गेलें. तेथेंच दरायसचा खजिना व जनानखाना होता. अलेक्झांडरनंतर गादीबद्दल तंटे सुरू झाले. त्यावेळीं हें शहर ईजिप्शिअनांच्या ताब्यांत होतें. ख्रिस्तपूर्व ६३ त सीरिया हा रोमन प्रांत झाला. नव्या करारांत सेन्टपालच्या संबंधांत या शहराचा उल्लेख आहे. इ. स. १५० त ट्राजनच्या अमलाखालीं दमास्कस हें एक रोमन प्रांताचें मुख्य ठिकाण झालें. ख्रिस्ती धर्मस्थापना झाल्यावर दमास्कस येथें बिशप नेमण्यांत आला. आर्केडियसनें येथील मोठ्या देवळाचें चर्च बनविलें इ. स. ६३५ त दमास्कस हें खालिद इब्न वालीदनें जिंकिलें. चवथा खलीफ अली याचा खून झाल्यावर त्याच्यानंतरचा खलीफ मोआवियानें खलीफची गादी मक्केहून दमास्कसला आणिली. या उमयीद घराण्यानें ९० वर्षें राज्य केल्यावर अब्बासी घराणें आलें. त्यांनीं मेसापोटेमियांत राजधानी नेली. यानंतर ईजिप्शियन, कार्मेथियन व सेलजुक यांनीं हल्ला करून दमास्कस लुटिलें. ११२६ त धर्मयोद्ध्यांनीं दमास्कसवर हल्ला केला. हें सलादिनचें फ्रँक लोकांबरोबरच्या युद्धाच्या वेळीं मुख्य ठाणें होतें. १३९९ त तैमूरनें हें शहर लुटिलें. १५१६ त सुलतान सेलिमनें हें शहर जिंकून ऑटोमन साम्राज्यास जोडिलें. १८३२ त ईजिप्तचा इब्राहिम पाशा यानें दमास्कस घेतलें. १८४० त मित्रसंघानें ईजिप्शियनांना हांकून दिलें व १८६० त मुसलमानांनीं ख्रिस्ती लोकांची येथें कत्तल केली.

दमास्कस शहराची लोकसंख्या १५४००० पासून २२५००० पर्यंत असावी. हें अँटीलेबाननच्या पायथ्याशीं समुद्रसपाटीपासून २२५० फूट उंच वसलेलें आहे. बरदा नदी दमास्कसच्या मधून वाहत जाते. येथील जमीन फार सुपीक आहे. प्रसिद्ध 'दर्ब एलमिस्टेकीम' अथवा ' सरळ रस्ता ' अद्याप देखील शहराच्या पूर्वेकडून पश्चिमेकडे जातो. येथें एलमलिक एल अश्रफनें १२१९ त बांधलेला एक किल्ला आहे. आर्केडियसनें, सेंट जॉन दि बॅप्टिस्टच्या नांवानें बांधलेल्या चर्चचें मशीदींत रूपांतर पहिला खलीफ वालिद यानें ( ७०५–७१७ ) केलें. ही इमारत फार मोठी आहे. व्यापारांत अजून देखील दमास्कसचें महत्त्व आहे. सीरियांतून मक्केला जाणारे यात्रेकरू येथूनच जातात. येथें रेशीम, कापड, सोन्याचांदीचे दागिने, तांब्याचें व पितळेचें काम व इतर नक्षीचें काम तयार होतें. दमास्कस बाजार पेठा प्रसिद्ध आहेत. हें बैरुट व मेझरीब रेल्वेनें जोडिलें आहे.

**दमो**, जिल्हा.—मध्यप्रांत जबलपूर विभागांतील जिल्हा. क्षे. फ. २८१६ चौ. मै. हा जिल्हा मध्यप्रांताच्या अगदीं उत्तरेकडे असून विंध्य पठाराचा हा एक भाग आहे. पश्चिमेस हा जिल्हा, भूगोलदृष्ट्या व ऐतिहासिक दृष्ट्या संबंध असलेल्या सागर जिल्ह्याच्या सरहद्दीस लागलेला आहे. याच्या दक्षिणेस व पश्चिमेस नरसिंगपूर व जबलपूर; आणि उत्तरेस बुंदेलखंडांतील पन्ना व छत्तरपूर हीं दोन संस्थानें आहेत. उत्तरेकडील बाजूला दमो हा जिल्हा उतरता होत गेला असून त्याच बाजूला सर्व नद्या वाहतात. जिल्ह्यांत गोंड लोकांची वस्ती आहे. सोनार खोऱ्यांतील जमीन सुपीक आहे. विंध्य पर्वतांत गुलाबी रंगाच्या वाळूचे

थर आहेत, त्यावर पाण्याच्या लाटा आपटल्यामुळें हा रंग आला असावा. येथील खडकांत चुन्याचें प्रमाण फारच थोडें आहे. सांबर, नीलगाय, हरणें, व विशेषतः डुकरें हे येथील जंगली प्राणी आहेत. हवा हिंवाळ्यांत थंड व उन्हाळ्यांत समशीतोष्ण असते. दमोजवळ असलेल्या खडकाळ टेंकड्यांमुळें तेथील हवा जिल्ह्याच्या इतर ठिकाणापेक्षां उष्ण असते. वार्षिक पाऊस ५१ इंच पडतो.

इतिहासः—दहाव्या शतकांत हा जिल्हा महोबा घराण्यांतील चंदेल रजपुताच्या ताब्यांत होता; व नोहता त्यांची राजधानी होती. दमो गावांतील एका दरवाज्यावरच्या फारसी लेखावरून १३८३ सालीं हा जिल्हा दिल्लीच्या तघलख घराण्याच्या ताब्यांत होता असें दिसतें; पण येथें मुसुलमानांची सत्ता नांवाला मात्र असून खरी सत्ता गोंड सरदाराच्याच हातीं होती. १५६५ सालीं असफखानाच्या हाताखालीं मुसुलमानांनीं दमोवर स्वारी करून, सिंगोरगडच्या गढामंडला घराण्यातील दुर्गावती राणीच्या सैन्याचा पराभव केला. अकबराच्या वेळीं हा जिल्हा मोंगलांच्या ताब्यांत गेला; नव्वद वर्षांनंतर येथील मोंगल सैन्य मराठ्यांच्या विरुद्ध लढण्याकरितां गेलें असतां पन्नाच्या बुंदेल राजानें सागर व दमो हे जिल्हे आपल्या विस्तीर्ण राज्यास जोडले. बुंदेल्यांचें राज्य येथें सुमारें ६० वर्षे होतें, परंतु दक्षिणेकडील लोधी व गोंड सरदार बहुतेक स्वतंत्रच होते. १७२९ सालीं छत्रसाल यानें राज्यावर स्वारी येईल या भीतीनें, पेशव्यांची मदत मागून त्यानां राज्याचा तिसरा हिस्सा देऊं केला. त्यामध्यें सागर जिल्हा मराठ्यांस मिळाला. पुढें सागरचा सुभेदार गोविंदपंत बुंदेले यानें आपली सत्ता दमोवर स्थापन केली. मराठ्यांचें राज्य खालसा झाल्यावर ( १८१८ ) हे दोन्ही जिल्हे ब्रिटिश सरकारकडे आले. बंडाच्या वेळीं या जिल्ह्यात बरीच धामधूम झाली होती. सागरच्या सैन्यानें दमो शहर लुटून सरकारी कागद जाळून टाकिले. स. १८५८च्या मार्च महिन्यांत दमो पुन्हां इंग्रजांच्या ताब्यांत आलें.

रजपूत, गोंड, मुसुलमान व मराठे या लोकांनीं बांधलेल्या किल्ल्यांचे अवशेष या जिल्ह्यांत आहेत सिंगोरगड व नरसिंगगड येथील किल्ले हे मुख्य आहेत. दमोपासून २० मैलांवर कुंदालपुर येथें जैनांचीं ५० देवालयें आहेत. बांदकपूर ( दमोहच्या पूर्वेस १० मैल ) येथील महादेवाच्या दर्शनास पुष्कळ लांबून यात्रेकरू येतात. याशिवाय नोहता येथें हिंदु व जैन देवलयांचे अवशेष पुष्कळ आहेत.

या जिल्ह्याची लो. सं. १९२१ सालीं, २८७१२६ होती. बहुतेक सर्व लोक बुंदेली भाषा बोलतात. शें. सुमारें ७·५ पुरुषांना लिहितां वाचतां येतें. ६७ लोकांचा उदरनिर्वाह शेतकीवर होतो. गहूं, ज्वारी, हरभरा, जवस, तीळ व शिंगाडे हे येथें होणारे मुख्य जिन्नस आहेत.

व्यापार व दळणवळणः—बंस कलान, दमो, हिंदोरिया, सितानगर व हट्टा येथें लुगडीं तयार करतात. दमो, बंस, तखेंज व अस्लान येथें रंग देण्याचें काम होतें. हिंदोरिया येथें निळीच्या रंगाचें काम चालतें. दमो व हिंदोरिया येथें काशाचीं भांडीं होतात. दमोचीं मातीचीं भांडीं प्रसिद्ध आहेत. जबेरा येथें लोखंडाचा कारखाना आहे पंचमनगर येथें कापूस तयार होतो.

गहूं व गळिताचीं धान्यें हे येथील मुख्य निर्गत जिन्नस आहेत. सागवानी लांकूड, लाख व तूप हेहि जिन्नस बाहेर पाठविले जातात. सुती कापड, केरोसीन तेल, मीठ व साखर हे मुख्य आयात जिन्नस आहेत.

इंडियन मिडलंड रेल्वेची बीना–कटणी शाखा या जिल्ह्याच्या मध्यभागांतून जाते. बहुतेक व्यापार दमो स्टेशन वरून होतो. रेल्वेच्या उत्तरेस दमोपासून हटा व पुढें बैसावादपर्यंत, आणि दमोपासून नरसिंगगड व बतियागडपर्यंत रस्ते गेलेले आहेत. रेल्वेच्या दक्षिणेस जुजहारपासून नोहता व जबेरा यांवरून जबलपूरकडे जाणारा रस्ता; तेंदुखेडा व तेजगडपासून अभानकडे जाणारा रस्ता; व तारादेहीपासून रामगड व भूरीकडे जाणारा रस्ता; हे सर्व रस्ते दमोवरून जातात. या जिल्ह्यांत दोन तालुके असून त्यांवर तहशिलदार व नायब तहशिलदार आहेत. जिल्ह्याचा डेप्युटीकमिशनर दमो येथें रहातो. दमोच्या म्युनिसिपालिटीखेरीज इतर ठिकाणचा कारभार जिल्हा कौन्सिल व दोन स्थानिक बोर्डें यांच्याकडे आहे.

तहशील.—मध्यप्रांतांतील दमो जिल्ह्याची दक्षिण तहशील. क्षेत्रफळ १७९७ चौ. मै. लोकसंख्या ( १९११ ) २१०८९८. ह्या तहशिलीचें दमो हें मुख्य गांव आहे. ह्यांत खेडीं ७१३ आहेत. ५४३ चौ. मै. जागेंत जंगल असून उरलेली अर्धी अधिक जमीन शेतकीकडे उपयोगांत आणली गेली आहे. मायभ्येकडे सोनार नदी आहे व लहान टेंकड्यामंय जमीन आहे.

गांव.—दमो जिल्ह्याचें व त्यांतच असलेल्या दमो तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें बीना–कटणी रेल्वेवर आहे. मुंबईहून ७०२ मैल. नरवरचा राजा नल ह्याची पत्नी दमयंती हिजवरून हें नांव पडलें असावें असें वाटतें. लोकसंख्या (१९११) १७०४२. येथें आठवड्यास गुरांचा बाजार भरतो. येथें कांशाचीं व मातीचीं भांडीं तयार करतात. दमो हा गांव एका डोंगराच्या पायथ्याशीं वसलेला असल्यामुळें उन्हाळ्यांत उष्मा फार होतो.

**दयानंदसरस्वती** ( १८२४–१८८३ )—यांचें चरित्र ज्ञानकोश विभाग ८ [ (आ) पृष्ठ २४७] मधील 'आर्यसमाज' ह्या लेखांत पहा. दयानंदांचा शतसांवत्सरिक उत्सव मथुरा येथें फेब्रुवारी १९२४ सालीं एक आठवडाभर साजरा करण्यांत आला. सुमारें अडीच लाखपर्यंत लोक जमले होते. त्यावेळीं

स्वामी दयानंदांचें व आर्यसमाजाचें कार्य, वेद, अस्पृश्योद्धार व शुद्धिकार्य वगैरे विषयांवर व्याख्यानें झालीं. आर्यसमाजाच्या शिक्षणकार्याचाहि अहवाल त्याच सुमारास प्रसिद्ध झाला आहे. या समाजानें चालविलेल्या एकंदर ५०५ शिक्षणसंस्था असून त्यांत सुमारें ५५ हजार विद्यार्थी आहेत व वार्षिक खर्च १८लाख आहे व अडीच हजार शिक्षक आहेत. शिक्षणसंस्थांत १६ कालेजें, ७४ हायस्कुलें, १२२ मिडल स्कूलें, २२५ प्राथमिक शाळा, ८ संस्कृत पाठशाळा, ८० हिंदी शाळा, ३१ गुरुकुलें, १२ राञींच्या शाळा, ५५ अस्पृश्यवर्गाच्या शाळा, १० अनाथालयें, ३ औद्योगिक शाळा व ११ इतर याप्रमाणें वर्गवारी आहे. शुद्धिकरणाच्या कार्याकडेहि या समाजानें लक्ष दिलें असून १९०७ ते १९३० पर्यंतच्या काळांत त्यानें १०५२ मुसुलमान--रजपुतांना हिंदू करून घेतलें. समाजाचे एक प्रमुख श्रद्धानंद यांनीं स्वतःला अलीकडे सर्वस्वी या कार्याला वाहून घेतलें आहे.

**दयाबहादुर**—माळव्याचा एक सुभेदार. याची त्रोटक माहिती बाराव्या विभागांत गिरधर राजाबहादूर या नांवाखालीं आली आहे तिच्याशिवाय जास्त हकीकत या लेखांत सांपडेल. दयाराम हें याचें मूळ नांव. याचाच मुलगा राजा गिरिधर होय. दयाराम हा बहादुरशहाच्या अजीमुश्शान नांवाच्या मुलाच्या पदरीं होता. अजीम हा बंगालचा सुभेदार असतां त्यास दयारामची फार मदत झाली होती. बहादूर मेल्यावर (१७१२) त्याच्या मुलांत गादीविषयीं तंटा लागला. त्यांत अजीमचा पक्ष घेऊन दयाराम लढत असतां लढाईंत ठार झाला.

दयारामचा छबिलराम म्हणून एक भाऊ होता. त्याच्या पुत्राचेंहि नांव दयाराम उर्फ दयाबहादुरच होतें. राजा गिरिधर हा या दयाबहादुराचा चुलत भाऊ होता. तो पुष्कळ दिवस माळव्याचा सुभेदार होता. तो मराठ्यांच्या विरुद्ध वागे व जयपूरकर जयसिंगाचा द्वेष करी. त्यामुळें जयसिंगानें मराठ्यांना मदत करून त्यांना माळव्यावर आणलें. अनेक लढाया होऊन चिमाजीआप्पानें गिरिधरास सारंगपूरच्या लढाईंत ठार केलें (१७२४).

त्यानंतर बादशहानें गिरिधरच्या चुलत भावास (दयाबहादुरास) माळव्याचा सुभा नेमिलें. यानंतर दोन वर्षे पेशव्यांनीं निजामाशीं तंटा चालविल्यानें त्यांना माळव्याकडे लक्ष्य देण्यास सवड झाली नाहीं. यावेळीं दयारामनें इंदूरकर, नंदलाल, मंडलोई वगैरे सरदार मराठ्यांच्या विरुद्ध फोडण्याचा प्रयत्न केला होता. परंतु जयसिंग व होळकर यांनीं त्याचा प्रयत्न हाणून पाडला. या कामीं नारो शंकर, उदाजी पवार व खुद्द पेशवे हेहि खटपट करीतच होते. मालकम म्हणतो कीं, दयाबहादुरानें रयतेस इतकें पिळून काढलें कीं, तिनें व ठाकूर जमिनदार यांनीं थेट बादशहाकडे अनेकदां दाद मागितली; परंतु त्याचा उपयोग होईना; म्हणून जयसिंगामार्फत ते सर्व मराठ्यांस मिळाले.

पेशवे ब्रह्मणपुरास होते; तेथून बेत ठरल्याप्रमाणें नंदलालनें मल्हाररावास बारा हजार फौजेनिशीं अकबरपुरास नर्मदा उतरवून माळव्यांत आणलें. हें समजतांच दयारामानें तांडाघाट दावला, परंतु नंदलालनें अगाऊ इशारत दिल्यानें मल्हारबा मांडवगडच्या भैरव घाटानें वर आला व एकाएकीं (धार नजीक) तिरला गांवीं दयारामावर छापा घातला. या लढाईंत दयाराम ठार झाला (१२ डिसेंबर १७३१) व सबंध माळवा मराठ्यांच्या हातीं लागला. [निम्हद्रचरित्र; आयर्व्हिन; शाहूमहाराज रोजनिशी; मालकम पु. १; राजवाडे. खं. ६; होळकर कैफीयत.]

**दयाराम**—पश्चिम हिंदुस्थानांत गाजलेला शूर आणि धैर्यवान योद्धा म्हणून याचें नांव प्रसिद्ध आहे. याच्या अंगचें असामान्य धैर्य, पीळदार शरीरयष्टि, आणि अद्वितीय पराक्रम इत्यादि गुण फारच वाखाणण्याजोगे होते. हा जातीनें गवळी असून, फरुख-सियर बादशहाच्या कारकीर्दींत उदयास आला. हिंदुस्थानांतील कित्येक भागांतून दयारामचे असामान्य पराक्रमविषयक पोवाडे गाऊन दाखविण्यांत येतात. इ. स. १८३२ मध्यें कलकत्ता येथें प्रसिद्ध झालेल्या 'बंगाल ॲन्युअल' मध्यें या योद्ध्याविषयीं संपूर्ण माहिती आली आहे. [वील.]

**दयाळनाथ**—एक महाराष्ट्र कवि. हा वऱ्हाडांतील मुर्जी अंजनगांवच्या देवनाथाचा शिष्य. याचा जन्म १७८८ सालीं झाला व समाधि १८३६ सालीं घेतली. हा सुर्जिंझापूरचा रहिवासी, मौतसगोत्री यजुर्वेदी ब्राह्मण. याचें मूळचें नांव हरि. देवनाथानें याचें नांव दयाळ ठेविलें. सहाव्या वर्षीच याच्या बापानें याला देवनाथाच्या स्वाधीन केलें. देवनाथानेंच त्याची मुंज व लग्न लाविलें. याच्या स्त्रीचें नांव राधा. याची कविता मराठी व उर्दू भाषेंतील आहे. एलिचपूरचा नबाब, हैद्राबादचा निजाम, दिवाण चंदुलाल वगैरे लोक त्याच्या कथेस जमत. एका हरिदासानें मत्सरानें याला शेंदूर चारल्याची गोष्ट आहे. पेंढाऱ्याचा एक धनसिंग नांवाचा नाईक पश्चात्ताप पावून यांचा शिष्य झाला होता. दयाळानें आपल्या गुरूचें (देवनाथाचें) बरेंचसें कर्ज स्वतः फेडिलें. याची समाधि निजामहैद्राबादेस आहे. चंदुलालादि श्रीमान गृहस्थ त्याला इनाम वगैरे देत असतां त्यानें तें घेतलें नाहीं. याचा औरस वंश नाहीं. याचे (मुक्ताबाई नांवाच्या) मुलीचा वंश नागपूरजवळच्या रामटेक येथें आहे. नाथाचें बरेचसें काव्य हल्लीं छापून प्रसिद्ध झालें आहे. [महाराष्ट्र कविचरित्र, भा. ५.]

**दरक-दरकदार**—दरक हा शब्द अरबी असून त्याचा अर्थ वंशपरंपरागत मोठ्या दर्जाचा सरकारी नोकर असा आहे. त्यांत बहुधा पुढील आठ अधिकाऱ्यांचा समावेश होतो. (१) कारभारी किंवा दिवाण, (२) मुजूमदार, (३) फडनवीस, (४) दप्तरदार, (५) कारखानवीस, (६) चिटनीस, (७) जामदार, व (८) पोतनीस. दरकदारांना

आसामी असेंहि म्हणतात. या दरकदारांपासून दर दहा वर्षांनीं एकदां त्यांच्या शेतावरील सरकारी सारा वसूल करतात, त्यास दरकपट्टी म्हणतात.

**दरकोटी**-पंजाब इलाख्यांतील सिमला पहाडी संस्थानांतील एक संस्थान. क्षेत्रफळ ८ चौरस मैल लो. सं.(१९२१) ६१०. उत्पन्न सुमारें २००० रुपये. सध्याचा राजा राणा रघुनाथसिंग हा आहे.

**दरंग जिल्हा**—आसामांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ३४१८ चौ. मैल. मर्यादाः-उत्तरेस भूतान,तोवंग (तिबेटच्या सत्तेखालचा प्रांत.) आणि अका व दफ्ला डोंगर; पूर्वेस लखिमपूर जिल्हा; पश्चिमेस कामरूप; व दक्षिणेस ब्रह्मपुत्रा. हा जिल्हा म्हणजे हिमालयाच्या लहान रांगा व ब्रह्मपुत्रा नदी यांच्यामधील १२६ मैल लांबीचा आणि सरासरी २७ मैल रुंदीचा चिंचोळा प्रदेश आहे. या जिल्ह्यांत डोंगर फार थोडे आहेत. बहुतेक भाग सपाट मैदान असून त्यांतून ब्रह्मपुत्रेला मिळणाऱ्या पुष्कळ नद्या वाहतात. मैदानाच्या मध्यभागीं तांदुळाची लागवड उत्तम होते. उत्तरेकडे जमीन उंच होत गेली असून डोंगराच्या पायथ्याशीं अरण्यें आहेत. बर्नाडी, ननदी, धानसिरी, मानजई, बेलासिरी, भरेली, बरगांग व धुरई या नद्या ब्रह्मपुत्रेस मिळतात. या जिल्ह्यांत हत्ती, गेंडे, रेडे, गवे, वाघ, चित्ते, अस्वलें व निरनिराळ्या प्रकारचीं हरणें आढळतात.

आसाम खोऱ्यांतील इतर ठिकाणच्या हवेपेक्षां येथील हवा फारशी निराळी नाहीं. नोव्हेंबरपासून मार्चच्या मध्यापर्यंत हवा थंड व सुखकारक असते; परंतु इतर काळांत ती सर्द व उष्ण असते. उष्णमान ९०° पेक्षां ज्यास्त क्वचितच होतें. डोंगरपायथ्याची हवा मलेरियस आहे व एकंदरींत हा जिल्हा वरच्या आसामइतका आरोग्यकारक नाहीं. पाऊस पुष्कळ पडतो व पावसाच्या कमतरतेमुळें किंवा पुरामुळें नुकसान क्वचितच होतें. ब्रह्मपुत्रेच्या कांठीं वार्षिक पाऊस ७० इंच व डोंगराजवळ १०० इंच पडतो. १८९७ सालीं दरंगमध्यें धरणीकंपाचा मोठा धक्का बसला होता.

इ ति हा स.—श्रीकृष्णानें ज्याचा पराभव केला त्या बाण राजाच्या राज्यांत हा जिल्हा होता अशी दंतकथा आहे. जवळपास आढळून येणाऱ्या मोठमोठ्या दगडी इमारतींच्या अवशेषांवरून येथें पूर्वी प्रबळ व सुधारलेल्या राजांची राजधानी असावी व तें राजघराणें इ. स. १००० च्या सुमारास भरभराटीस आलेल्या पालराजांचें असावें असें वाटतें. तेजपूरपासून ३० मैलांवर, भरेलीच्या खिंडींत, भाल्लुकपांग येथें बाणाचा नातू भाल्लुक यानें बांधलेल्या किल्ल्याचे अवशेष आहेत. ऐतिहासिक काळांत सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धांत भरभराटीस आलेला कामरूपचा कोच राजा, नरनारायण याच्या राज्यांत दरंगचा समावेश झालेला होता. मरणापूर्वी त्यानें राज्याचे दोन भाग करून दरंग, कामरूप व गोलपाडा हा मुलूख आपला पुतण्या रघुराय याला दिला; त्याची राजधानी कामरूपच्या पश्चिमेस बरनगर येथें होती. रघुरायचे मुलगे परीक्षित व बलिनारायण यांच्या कारकीर्दीत मुसुलमानांनीं ह्या राज्यावर स्वारी केली; व वरच्या आसामांतील अहोमांनीं जरी बलिनारायणाला मदत केली तरी अखेर स. १६३७ त त्याचा पराभव होऊन तो मारला गेला त्याच्या मरणानंतर दरंगचे राजे केवळ मांडलिक बनून त्यांच्या सत्तेचा ऱ्हास होऊं लागला ६० वर्षांनंतर अहोम राज्य डळमळीत होऊन मो-ऱ्याच्या पंथास लागलें असतां येथील राजांनीं त्यांचें जूं झुगारून देऊन कामरूपचा कांहीं भाग घेण्याचा प्रयत्न केला, परंतु स. १७९२ त कॅप्टन वेल्शच्या आधिपत्याखालीं त्यांच्यावर चाल करून गेलेल्या सैन्यानें त्याचा पराभव केला व दरंग आणि आसामचा उरलेला भाग स. १८२६ त ब्रिटिशांच्या हातांत गेला. अहोम राजांचें वर्चस्व कमी झाल्यावर भोतिया, अका व दफ्ला यांनीं हिमालयाच्या पायथ्याशीं असलेल्या प्रदेशांत आपला हक्क स्थापित करण्याची संधि साधली. स. १८४१ त सरकारनें त्यांचा प्रदेश आपल्या राज्यास जोडून त्यांच्या हक्काबद्दल त्यांना मोबदला म्हणून वार्षिक कांहीं रक्कम देण्याचें ठरविलें. या पुढील महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे स.१८९४ त पाथरूघाट येथें जमाबंदीच्या फेरतपासणीच्या वेळीं झालेला दंगा होय. त्यांत पोलिसांनीं गोळ्या घालून १५ लोकांस ठार व ३७ लोकांस जखमी केलें.

तेजपूर येथील कोरीव दगडी स्तंभ व शेजारच्या टेकडीवरील दगडी देवालयाचे अवशेष यांशिवाय दुसरे प्राचीन अवशेष या जिल्ह्यांत फारसे नाहींत.

लो क व स्ती.—१९२१ सालीं या जिल्ह्याची लो. सं ४७७९३५ होती. पैकीं शें. ७१ हिंदु, शें. २३ वन्य हिंदु-टोळ्या व शें. ५ मुसलमान आहेत. ह्या जिल्ह्यांत परकी लोकांचें प्रमाण बरेंच आहे; यांपैकीं बहुतेक प्रथम चहाच्या मळ्यांवर मजूर म्हणून आलेले असून करार संपल्यावर येथील स्थानिक रहिवासी झालेले आहेत. यामुळें शें. फक्त ५१ आसामी भाषा बोलतात व शें. १६ बोडो, शें. १९ बंगाली व शें. ६ हिंदी आणि मुदारी या भाषा बोलतात. शें. ९२ लोकांची उपजीविका शेतकीवर चालते. लोकांत शिक्षणाचा प्रसार फारसा झालेला नाहीं. १९०१सालीं शें. फक्त ५.२ पुरुषांना लिहितां वाचतां येत होतें.

शे त की व जं ग लें.—तांदूळ व चहा हीं येथील मुख्य पिकें आहेत. कापूस, ताग, ऊंस वगैरे जिन्नस तयार करण्याचे प्रयत्न करण्यांत आले आहेत; पण नवीन पिकें तयार करण्याची किंवा असलेल्या पिकांत सुधारणा करण्याची हौस येथील लोकांत दिसून येत नाहीं.

बहुतेक राखलेलीं जंगलें उत्तर सरहद्दीवरील डोंगरांच्या पायथ्याशीं आहेत. यांत रबर, साल, खैर, गुनसेराई व साग हीं झाडें आढळतात. हे लोक झाडांच्या खोडांपासून होड्या व सिमुल झाडांच्या लाकडाच्या पेट्या तयार करतात.

खनिज पदार्थ काढण्याचे कारखाने या जिल्ह्यांत नाहींत. ब्रिटिश अमलापासून नदीच्या वाळूंतून सोनें काढण्याचा धंदा पार बुडाला आहे.

व्या पा र व द ळ ण व ळ ण.—दरंग जिल्ह्यांत कारखाने फारसे महत्त्वाचे नाहींत. कांहीं लोक पितळ व कांशें यांचें ओतकाम किंवा घडकाम करतात. घरकामापुरतें कापड घरोघरीं तयार होतें. बहुतेक व्यापार मारवाडी लोकांच्या हातांत आहे. तेझपूर, विंदुकुरि, बालिपार व बर्जुली हीं व्यापाराचीं ठाणीं आहेत. भरेलीच्या पूर्वेस चुटिया व मंगलदई, पनेरी व कलेगांव या ठिकाणीं मोठे बाजार आहेत. चहा, रबर, मोहरी, कातडीं व वेत हे मुख्य निर्गत जिन्नस, व तांदूळ, हरभरा, इतर धान्य, रॉकेल व इतर तेलें, कापड यंत्रें व मीठ हे आयात जिन्नस आहेत.

गोलुंदो व डिब्रुगड यांच्या दरम्यान ब्रह्मपुत्रा नदींतून चालणाऱ्या बोटींतून येथील बहुतेक व्यापार चालतो. ह्या बोटी तेझपूर व इतर पांच ठिकाणीं लागतात. तेझपूरपासून बालिपारपर्यंत आगगाडीचा फांटा गेलेला आहे.

रा ज्य व्य व स्था.—तेझपूर व मंगलदई असे या जिल्ह्याचे दोन पोटविभाग आहेत. जिल्ह्याचा डेप्युटी कमिशनर तेझपूर येथें असतो. मंगलदई पोटविभाग यूरोपियन मॅजिस्ट्रेटच्या ताब्यांत आहे. तेझपूरच्या म्युनिसिपालिटीशिवाय इतर ठिकाणचा स्थानिक कारभार बोर्डाकडे आहे. डे. कमिशनर व सब्डिव्हिजनल ऑफिसर हे त्या बोर्डाचे अध्यक्ष असतात.

**दरद**—गिलजित भोंवतालच्या प्रदेशांत काश्मीर व हिंदुकुश यांमध्यें दरद लोक रहातात. हे आर्यवंशाचे असून संस्कृतग्रंथांतून ज्यांना पिशाची लोक म्हटलें आहे त्यांचेच हे वंशज असावेत असें ग्रिअर्सनचें म्हणणें आहे (ए. रि. ए. मधील 'दर्द' हा लेख पहा). यांची भाषा मूळ आर्य असली तरी भारतीय किंवा इराणी शाखेची नाहीं. हिरोडोटसनें यांचा उल्लेख केलेला आहे (३.१०२-१०५) व संस्कृत ग्रंथकारहि दरदाः असा उल्लेख करतात. आजचे बहुतेक दरद मुसुलमान आहेत पण बाल्टिस्तानमधील ब्रोक्पा वसाहतीचा धर्म बौद्ध आहे. ब्रोक्पा हे दरद लोकांपैकींच आहेत. मुसुलमानी दरदांत कित्येक हिंदु चाली सांपडतात.

या लोकांत पडद्याची पद्धति नाहीं. यांच्या राजवाड्यांत परकीय लोकांचें पाहून ही पडद्याची चाल शिरली आहे. या लोकांत पुरुष व बायका एका ठिकाणीं बेबावयास बसतात. अस्टोरमध्यें एखाद्या पुरुषानें एखाद्या स्त्रीबरोबर निरसें दूध प्राशन केलें असतां त्यांचें बहिणभावांचें नातें होतें; व पुरुष एकत्र दूध प्याले असतां मित्र होतात. लग्न जमविण्याच्या वेळीं मुलाचा बाप मुलीच्या बापाकडे जाऊन त्यास एक १॥ फूट लांब चाकू, ४ वार कापड आणि एक भोपळा(कमंडलू)भर दारू नजर करितो. मुलीच्या बापानें तिचा स्वीकार केल्यास वाङ्‌निश्चय झाला असें समजतात. मुलीच्या पक्षास वाङ्‌निश्चय कधींच मोडतां येत नाहीं. पण वर पक्ष हा मोडूं शकतो.

हे लोक घोड्यांवरून चेंडूदांडूचा खेळ (पोलो) खेळतात हे गोळीबार करण्याचेहि फार शोकी आहेत. हे लोक शिकार करतात व यांच्या शिकारींत यांच्या राजाचा वाटा असे. चिलासी लोकांच्या बायका मनगटांत लोखंडाचीं कडीं घालून तीं मुठींवर आणून आपसांत मारामारीचा खेळ खेळतात. यांना कुस्ती मारण्याचा फार शोकी आहे. हे लोक सतार वगैरे तंतुवाद्येंहि वाजवतात. यांच्यामध्यें नाचण्याचेहि पुष्कळ प्रकार आहेत. त्यांतील एक, बारा जणांनीं तरवारी घेऊन नाचण्याचा नाच फारच प्रेक्षणीय होतो. हे तांदुळाची दारू करून पितात. त्याप्रमाणें हे द्राक्षांची दारू काढून ती सांठवून ठेवतात. यांचा मोठा सण म्हणजे वर्षारंभीचा होय. हा बारा दिवसांचा असतो. यास 'शिन-ओ-नाओ' म्हणतात. दुसरा तीन दिवसांचा सण 'नौरोझ' हा होय. याशिवाय रमजानईद, कुरबानईद आणि गिलजित यांचा दुमनिका; यास अस्टेरीकुइ-नाओ म्हणतात. हे सणहि हे लोक पाळतात.

यांचा अंत्यविधि फार साधा आहे. हे प्रेतयात्रेच्या वेळीं प्रेताभोंवतीं बसून द्राक्षें वगैरे खातात आणि मद्य पितात. मरणानंतर तीन दिवसांनीं सुपभाकरी वाटतात. प्रेत वाहकाचें काम पुण्यकारक समजलें जातें. प्रेत जमीनींत पुरतात. कधीं कधीं त्यावर दगडी बागाहि बांधतात. पीर अथवा साधु यांच्या थडग्यांवर एखादा दगड बसवितात. परंतु कोठेंहि मृत्युलेख सांपडत नाहीं.

दरदांना गाईचा मोठा तिटकारा आहे. ते गाईस शिवत देखील नाहींत. गाईचें दुध किंवा कांहींहि पदार्थ ते खात नाहींत. कारण त्यांपासून घेंड लागतें अशी त्यांची वेडी समजूत आहे. प्राचीन आर्यधर्मांतील अवशेष यांच्यांत दिसतात. [लीटन-दि लँग्वेजेस अँड रेसेस ऑफ दर्दिस्तान; बिड्डल्फ-ट्राईब्स ऑफ दि हिंदुकुश; शा-स्ट्रे अरैन्स इन् तिबेट; इं. अँ. १.]

**दरबान**—दरबान हें दक्षिण आफ्रिकेंत नाताळचें मोठें शहर व मुख्य बंदर आहे. हें दक्षिण अक्षांश २९° ५२' व पूर्व रेखांश ३१° ४२' यांवर आहे. १९१८ सालीं येथील लोकसंख्या ४८४७५ होती. हें दक्षिण आफ्रिकेंतील एक उत्तम शहर आहे. कांहीं गोरे लोक, आशियांतील लोक व कांहीं मिश्र जातीचे लोक येथें आहेत. येथील हवा जरी सर्द आणि उष्ण आहे तरी निरोगी आहे. दक्षिण आफ्रिकेंतील याच शहरीं फक्त हिंदू लोक आहेत. दरबान उपसागराच्या पूर्वेस हें शहर आहे.

स्मिथ, वेस्ट आणि पाइन हे येथील मुख्य रस्ते आहेत. वेस्ट सडकेवर सार्वजनिक बगीचे, मोठमोठ्या इमारती व चित्रसंग्रह आहेत. पाइन हें गॉथिक पद्धतीनें बांधलेलें कॅथोलिक पंथाचें मुख्य प्रार्थनामंदिर आहे. व्हिक्टोरिया नांवाचा रमणबाग व वनस्पति बाग येथें आहेत. बगीच्या

जवळ एक वेधशाळा आहे. सार्वजनिक बगीच्यांत व्हिक्टोरिआचा पुतळा आहे. विजेच्या ट्रामगाड्याशिवाय झूलू लोकांकडून ओढल्या जाणाऱ्या हातगाड्याहि ( रिक्शा ) येथें आहेत. शहराची सर्व व्यवस्था म्युनिसिपालिटीकडे आहे. अमलास नदीचें पाणी येथील लोक वापरतात. ह्या बंदराचें क्षेत्रफळ ७॥ चौरस मैल असून येथील गोदींत ८५०० टनांचें जहाज तरंगूं शकतें.

बंदराच्या ईशान्येस कॉंगेला येथें वजनदार माल जहाजांवर ठेवण्याकरितां किंवा जहाजांतून काढण्याकरितां धक्के बांधले आहेत. येथें कोठारें व रेल्वेचे कारखाने आहेत.

इ ति हा स.—दरबानचा आणि नाताळ वसाहतीचा पूर्वेतिहास जवळ जवळ एकच आहे. १८२४ सालीं इंग्लिश लोक येथें येऊन राहिले. सर बेन्जामीन दरबान हा यावेळेस केपकॉलनीचा गव्हर्नर होता म्हणून त्याच्या सन्मानार्थ या शहराला दरबान असें नांव देण्यांत आलें. १८३९ सालीं येथील ब्रिटिश लष्करी फौज उठविल्यामुळें डच लोकांनीं हें डिंगा व झुलु राजांचा पराभव करून काबीज केलें.एक वर्षाच्या आंतच डच लोकांनीं कॉंगेला वसाहत स्थापिली. आपलें स्वातंत्र्य जाहीर करून नाताळप्रजासत्ताकाचें निशाण फडकाविलें. १८४२ सालीं ब्रिटिशांनीं हें काबीज केलें व डच लोकांस ब्रिटिशांचें सार्वभौमत्व कबूल करावयास लाविलें. या वेळेपासून हें नाताळचें मुख्य शहर झालें. १८५३ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापण्यांत आली.ऑर्ज केटो हा येथील पहिला मेयर ( अधिकारी ) होता. १८६० सालीं पॉइंटपासून दरबानशहरापर्यंत प्रथमच रेल्वे सुरू झाली. रँडच्या सोन्याच्या खाणी सांपडल्यामुळें तर या बंदराचें महत्त्व जास्त वाढलें. १८८१ सालीं नेमलेल्या बंदराच्या नियामक मंडळानें या बंदरांत पुष्कळ सुधारणा केल्या. १९०४सालीं एक मोठी डाक आगबोट येण्याकरितां मार्ग तयार केला.

दरबान येथें हल्लीं बऱ्याच नांव घेण्याजोग्या इमारती झाल्या आहेत. कोर्टाच्या इमारती व टाउनहॉलची इमारत प्रेक्षणीय आहे. बंदराच्या समोर डिक् किंगचा मोठा पुतळा आहे. तसेंच थोड्याशा अंतरावर स्नानगृह आहे. सुंदर उपवनें व विश्रांतिगृहें यांची दरबानमध्यें रेलचेल आहे. या ठिकाणीं घोड्यांच्या शर्यती मोठ्या प्रमाणावर होतात.

बंदराच्या ईशान्येस मोठी गोदी बांधण्यांत आली आहे. नाताळच्या आसपास ज्या कोळशाच्या खाणी आहेत त्यांतून निघालेला माल परगांवीं जाण्याकरितां येथें येतो. त्यामुळें या शहराला फार महत्त्व प्राप्त झालें आहे. १९१८–१९ सालीं दरबान येथें ११९६००० टन कोळसा आला व १९१०सालीं येथें बिनतारी विद्युत्गृह बांधण्यांत आलें. स.१९१८ च्या अखेरीस दरबानचें उत्पन्न १०९५००० पौंड होतें व कर्ज ३१३५००० पौंड होतें.

**दरवडा**— 'चोरी '.ह्या. दरवडेखोरांना 'डकाइत ' असा हिंदी शब्द असून त्यापासून 'डेकाइटी ' ( दरवडा ) हा इंग्रजी शब्द बनला आहे ( 'डेकाइटी ' याचा पीनल कोडांतील अर्थ, पांच किंवा अधिक इसमांनीं धाकदपटशा देऊन मारहाण करून चोरी करण्याचा केलेला कट किंवा प्रत्यक्ष कृत्य असा आहे ). मराठी अम्मलानंतर ब्रिटिश अंमलाच्या संधिकालांत या डकाइट लोकांचा त्रास विशेष वाढला होता, पण त्याच्या पूर्वीपासून डकाइट लोकांची एक जातच होती. दरवडे हा त्यांच्या जातीचा एक धार्मिक व वंशपरंपरागत धंदा बनला होता. यांच्या जातींत इतरांची भरती होत असे. ( 'ठग' पहा ) अयोध्या संस्थानांत ( तें खालसा होण्यापूर्वी ) या जातीचें प्राबल्य फार वाढलें होतें. त्या संस्थानिकाला व त्याच्या शेजारीं असलेल्या इंग्रजांच्या ई. इं. कंपनीलाहि त्यांचा बंदोबस्त करतां आला नाहीं. इतर संस्थानांतहि हे लोक थोडे फार असत; आपल्या रहात्या संस्थानीं प्रजेवर हे डकाइट बहुधा हल्ला करीत नसत. संस्थानबाह्य प्रजेवर दरवडे घातल्यामुळें संस्थानी प्रजा ह्या डकाइटांकडे साधारण दुर्लक्ष करी. हे डकाइट लोक आपल्या दरवड्यांचे बेत मोठ्या कुशलतेनें पार पाडीत. यात्रेकरूंच्या, किंवा कावडवाल्यांच्या, किंवा बैलवाल्यांच्या (लमाण) वेषानें लहान टोळ्या करून हे हिंडत व दरवडा घातल्यावर एकदम फार दूर पळून जाऊन जंगलाडोंगरांतील आपआपल्या निवासस्थानांत लपून बसत. हे लोक हलक्या जातीचे असत. ते काली देवी व सोरुम देओता (सूर्य-देवता) यांची पूजा करीत. देवीची प्रार्थना करून व चांगले शकुन पाहून ते दरवड्याच्या कामाला निघत.धर्मसमजुती व इंग्रजांची मुकतीच बसणारी घडी यांमुळें यांचा धंदा निर्धोक चालू असे. याच कारणानें डकाइट लोकांचा बंदोबस्त करण्यास ब्रिटिश सरकारला बरींच वर्षें लागलीं. अयोध्या ( औध ) संस्थान खालसा झाल्यावर त्यांचा मुख्य आधार तुटला आणि १८५७ च्या बंडानंतर लवकरच त्यांचा बहुतेक नायनाट झाला. स्थानिक चोऱ्यामाऱ्या करणाऱ्या लोकांत शिरून ते आणखी कांहीं काळ राहिले होते, पण हळूहळू त्यांचाहि बीमोड होत आहे.

**दरवेशी**—हा पर्शियन शब्द असून त्याचा अर्थ भिक्षेकरी असा आहे. हे मुसुलमान व कांहीं ख्रिश्चन जातीचे असून काम न करतां भिक्षावृत्तीवर चरितार्थ चालविणें हा त्यांचा धंदा असतो. तथापि कांहीं दरवेशी काम करून आपली वृत्ति संभाळतात. पांचव्या व सहाव्या शतकाच्या पर्शियन वाङ्मयावरून दरवेशी हा संसारापासून मुक्त झालेला साधू म्हणून मानण्यांत येत असे. सूफी लोक विशिष्ट तत्त्वज्ञान सांगत असत व दरवेशी त्याचें प्रत्यक्ष आचरण करीत असत. दरवेशांस फकीर अशीहि संज्ञा देतात. सहाव्या शतकांत साधू लोकांचा एक संप्रदाय स्थापन झाला. अबदल कादीर व अहंमद रिफा हे लोक या साधुसंप्रदायाचे आद्य प्रवर्तक होत. हे संप्रदाय ३६ असून ओटोमन साम्राज्या पूर्वी १२ व नंतर २४ असे हे संप्रदाय अस्तित्वांत आले.

आचार व भक्ति हे या संप्रदायाचे गुण असून ' ला इलहा इला लहू ' या मंत्राचा निरनिराळ्या आवाजांत जप करण्यांत येतो. मौलवी दरवेशी तालसुरावर प्रार्थना करतात व स्कुटारी येथील रिफा दरवेशी प्रथम बसून व नंतर एक पायावर उभे राहून उपासना करितात. एकांतवासांत करावयाच्या प्रार्थनेकरितां निराळी व्यवस्था असते. संप्रदायानुरूप या लोकांचे विशिष्ट पोषाख असतात. कांहीं दरवेशी लोकांत गूढ सामर्थ्य असतें असें म्हणतात. रिफा दरवेशी चमत्कारांबद्दल विख्यात आहेत. जिवंत सर्पभक्षण करणें, अग्निप्रवेश करणें वगैरे कृत्यें हे लोक करूं शकतात. ओमन व ' मॉडर्न ईजिप्शिअन ' नांवाच्या ग्रंथांचा कर्ता लेन, यांनीं कांहीं चमत्कार वर्णन केले आहेत; परंतु या चमत्कारांचें रहस्यहि उकलतां येणें शक्य आहे असें आढळून आलें आहे. ह्मविया हे या संप्रदायाचें केन्द्रस्थान असून इतर ह्मवियांचे अध्यक्ष वरील मूळ संस्थेकडूनच नेमण्यांत येतात. या संप्रदायाच्या संस्थापकाचें नांव शेखे असें असून त्याच्या वारसांना खलीफ म्हणतात. इस्लामधर्मप्रसारकाचें कार्य करण्याकरितां हा दरवेशी पंथ निघाला आहे. आशिया व आफ्रिका या ठिकाणाहून यूरोपियनांचें उच्चाटण करण्याकरितांच या संप्रदायाचा प्रसार करण्यांत येत असतो असेंहि कांहीं लोकांचें मत आहे. काश्मीर येथें दरवेशांची एक जात असून तिची १९११ सालची लोकसंख्या ९१७५ होती. हे सर्व लोक मुसुलमानी धर्माचे आहेत.

**दरायस**—दरायस दि ग्रेट याच्यासंबंधीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं. बेहिस्तानच्या मोठ्या शिलालेखावरून पाहतां त्यानें राज्य कसें मिळविलें व बंडांचा मोड कसा केला यांबद्दल माहिती मिळते. हिरोडोटस यानें या राजासंबंधीं कांहीं माहिती दिली असून त्याच्याबद्दल अनेक दंतकथाहि आहेत. पार्शियन लोकांच्या साहाय्यानें त्यानें गादी पटकाविली. सुसिॲना, बाबिलोन, मीडिया, सर्गातिया इत्यादि ठिकाणीं शत्रू उत्पन्न झाले. दरायस यानें लवकरच सर्व बंडें मोडून टाकिलीं, व आपली सत्ता साम्राज्यांत स्थापन केली. शिलालेखावरून दरायस हा झोरोआस्टर धर्मानुयायी होता असें दिसतें. हा मोठा मुत्सद्दी व कर्तृत्ववान् पुरुष होता. त्यानें पार्शियन साम्राज्याचा विस्तार कॉकेशस पर्वतापर्यंत केला. प्रांतांची संघटना व खंडणी याबद्दल त्यानें काय व्यवस्था केली होती, तें ज्ञानकोशाच्या चवथ्या विभागांत ( पृ. ४४ ) दिलें आहे. त्यानें डॅरिकचें सोन्याचें नाणें आपल्या राज्यांत सुरू केलें. काबूल व इंडसच्या पलीकडे त्यानें एक मोहीम पाठविली. नाइल ते सुएजपर्यंत त्यानें एक कालवा खोदविला. कार्थेजशीं त्याचा संबंध असून सिसिली व इटलीचा किनारा यांची त्यानें पाहणी केली होती. जेरुसलेमचें देऊळ बांधण्यास त्यानें ज्यू लोकांनां परवानगी दिली. ईजिप्तमधील देवळांतून दरायसचें नांव कोरलेलें आहे. ईजिप्त येथील दंतकथांवरून हा दानशूर व धर्मशास्त्रज्ञ होता असें दिसून येतें. दरायसनें सिथिअन्सच्या विरुद्ध लढाई सुरू केली. परंतु पुढें तो लवकरच परतला. ग्रीसचा आशियामायनरच्या किनाऱ्याशीं संबंध होता; परंतु दरायस ग्रीकांच्या भानगडींत पडला नाहीं. ग्रीकांनींच पर्शियन लढायास सुरवात केली होती. छत्तीस वर्षें राज्य करून दरायस हा सुमारें ४८५ सालीं मरण पावला. त्याच्या पश्चात् दुसरा व तिसरा दरायस असे राजे झाले.

**दरेकसा जमिनदारी**—मध्यप्रांत, जिल्हा भंडारा. ही इस्टेट चिजलीच्या जमीनदारीच्या ताब्यांत आहे. खैरागड संस्थान आणि सालेकसा जमीनदारी यांच्या दरम्यान, टिरोरा तहशिलीच्या पूर्वेस ही जमीनदारी असून तिचें क्षेत्रफळ ४५ चौरस मैल आहे. त्यापैकीं बहुतेक भाग डोंगराळ असून जंगल आहे. येथील घराणें गोंडाचें आहे. उत्पन्न पांच हजारांचें असून सुमारें ⅔ उत्पन्न जंगलाचेंच असतें. दरेकसा हें रेल्वे स्टेशन असून येथें एक शाळा आहे. दरेकसा जवळच एक धबधबा असून तो पाहण्यालायक आहे. जवळच चांदसूरज येथें कचागड म्हणून लेणीं आहेत.

**दर्जी**—शिवणकाम करणारी जात. एकंदर हिंदुस्थानांत १९११ सालीं ७०५०३३ दर्जी होते. पैकीं ४६०३७० हिंदु व २४२१६६ मुसुलमान होते. संयुक्तप्रांत व मुंबई इलाखा यांतून यांची मोठी वस्ती आहे. मध्यप्रांत व वऱ्हाडांत यांतील निरनिराळ्या वर्गांत रोटीबेटीव्यवहार होत नाहींत कारण यांची उत्पत्ति फारच मिश्र आहे. कांहीं ब्राह्मणसंततीपैकीं आहेत; ही संतति सर्वांत उच्च मानली जाते. त्यानंतर राजदर्जी; त्यानंतर श्रीवास्तव नांवाची कायस्थांची संतति; त्यांनीं खऱ्या श्रीवास्तवांशीं संबंध जोडण्याकरिताच कीं काय आपल्यांतले विधवाविवाह बंद केले आहेत. चमरिया म्हणून एक चांभारांची संतति आहे. कांहीं माळवी, खानदेश, मयूरिया, कांहीं जुगिया, ठाकूर, जुजर, खवास, आणि वरोणी वगैरे जातींचे लोक आहेत. हे लोक धार्मिक वृत्तीचे असून ते नामदेवाची पूजा करतात.

पंजाबांतील दर्जी मुख्यत्वें हिंदु व मुसुलमानधर्माचे आहेत. हे पंजाबांत चहूंकडे आढळतात. येथें दर्जी हा धंदावाचक शब्द असे, परंतु हल्लीं तो जातिवाचक झाला आहे. परंतु हा धंदा करणारे लोक अजून पूर्वीची आपली जात कायम ठेवितात. काश्मीरांत दर्जींची स्थिति पंजाबांतल्याप्रमाणेंच असून तेथें त्यांची लोकसंख्या सुमारें ४ हजार आहे.

मुंबई इलाख्यांत दर्जी व शिंपी असे दोन मुख्य वर्ग आहेत. शिंप्यांची माहिती त्या नांवाखालीं आढळेल. या प्रांतांतील दर्जी लोक गुजराथ, काठेवाड व कच्छ या भागांत आहेत. यामध्यें चावडा, सोळंखी, परमार इत्यादि रजपूत आडनांवें असून यांचा धंदा शिवण्याचा आहे. परंतु कांहीं सुतार व शेतकरीहि आहेत. यांचा सामाजिक दर्जा लोहार लोकांबरोबर आहे. पंचमहालमधील दर्जी लोकांचा दर्जा घेढ

लोकांहून खालचा आहे. सुरत प्रांतांतील दर्जी कधीं कधीं भारवद लोकांचे उपाध्याय असतात.

या लोकांमध्यें १८ कुळें आहेत. यांच्यांत मामेबहिणीशीं लग्न करितां येतें, परंतु मावसबहीण व आतेबहीण यांच्याशीं लग्न करितां येत नाहीं. प्रौढविवाहहि या लोकांत रूढ असून पुनर्विवाह व घटस्फोट या दोन्ही चालीहि यांमध्यें आहेत. सुरत प्रांतांतील दर्जी लोकांखेरीज इतर दर्जी शाकाहारी आहेत. कुंभार व लोहार यांच्या हातचें जेवण हे जेवतात. हे रामानंदी, मध्वाचार्य, स्वामी नारायण मतपंथी व इतर पंथांचे असून यांचा वारसासंबंधीं कायदा हिंदूप्रमाणेंच आहे. हिंगलाज देवीची हे विशेषेंकरून पूजा करितात. पुष्कर्ण ब्राम्हण हे त्यांचे उपाध्याय असतात. यांच्यांत पंचायतसंस्था आहेत. सुरत शहरामधील दर्जी लोकांतील जातीसंबंधीं प्रश्नांचे निकाल जातीच्या लोकांनीं निवडलेल्या पुढाऱ्यांकडून दिले जाऊन दंडाचें उत्पन्न व्याजीं लाविलें जातें व त्याचें व्याज जातीच्या जेवणानिमित्त खर्चिलें जातें. सई सुतार ही एक त्या लोकांची पोटजात असून या जातींतील लोक सुतार आहेत व सुतार जातीचे सर्व नियम यांनां पाळावे लागतात.

म्हैसुरांतहि हे लोक बहुतेक सर्व जिल्ह्यांतून आढळतात. विशेषतः शिमोगा जिल्ह्यांत यांची बरीच वस्ती आहे. या लोकांपैकीं हे लोक शिंप्याच्या व रंगाऱ्याच्या धंद्यावर करतात. हे लोक महाराष्ट्र देशांतून इकडे आले असून ते विठोबा व कृष्ण यांची पूजा करतात. या लोकांपैकीं नामदेव जातीचे लोक आहेत ते शिंप्याचें काम करतात व रंगारी कपडे रंगवितात. ('शिंपी पहा').

**दर्दी जानबाई**—मुंबई इलाख्यांत काठेवाडामध्यें बाबर ठाण्यांतील एक लहानशी जहागीर. येथील जहागीरदार चारण जातीचा आहे. भावळीच्या रावानें हें गांव (जहागीर फक्त एकाच गांवाची आहे.) एका चारणास इनाम दिलें. फत्तेसिंग गायकवाडानें जहागीरदारास खंडणी माफ केली होती (१८०३). त्यावेळीं तेथील एक चारण जातीची स्त्री जानबाई ही प्रख्यातीस आली होती. तिला तिकडील लोक फार पवित्र मानीत. तिनें फत्तेसिंगास कांहीं चमत्कार करून दाखविल्यावरून त्यानें तिला ५०० रु. नजर करून गांवास खंडणी माफ केली. यावेळेपासून या गांवास जानबाईनी (ची) दर्दी म्हणतात. ती मेल्यावर फत्तेसिंगानें तिची समाधि बांधून सालिना १२५ रु. नेमणूक करून दिली. तेथें तिची मूर्ति असून, आसपासचे लोक तिची पूजाअर्चा करतात. तिचा नवरा भगत कानबद नांवाचा होता व राणू आणि भाऊ नांवाचे तिला दोन पुत्र होते. त्यांचा वंश हल्लीं तेथें नांदत आहे. [काठेवाड ग्याझेटियर.]

**दर्भंगा**, जि ल्हा.—बिहार-ओरिसा, तिरहुत विभागांतील जिल्हा. क्षेत्रफळ ३३४८ चौरस मैल. याच्या उत्तरेस नेपाळ; पूर्वेस भागलपूर जिल्हा; दक्षिणेस गंगानदी व भागलपूर जिल्हा; व पश्चिमेस मुझफरपूर.

भौगोलिक वर्णनः—हा जिल्हा उत्तरेकडून दक्षिणेकडे साधारणपणें उतरता होत गेलेला असून याचा मध्य भाग थोडा सखल आहे. यांत टेंकड्या किंवा डोंगर नाहींत, परंतु नद्यांच्या योगानें याचे स्वाभाविक विभाग झालेले आहेत. बडीगंडक नदीच्या पलीकडे जिल्ह्याचा नैर्ऋत्य भाग उंचवटयाचा व कोठें कोठें दलदलीचा आहे. बाघमती व बडीगंडक यांच्यामधील दुआब हा जिल्ह्यांतील सर्वांत सखल प्रदेश आहे. दर्भंगा व मधुबनी हे पोटविभाग मिळून होणारा बाकीचा भाग साधारणपणें सखल असून त्यांत प्रवाह व दलदलीच्या जागा पुष्कळ आहेत. या जिल्ह्यांत, गंगा, छोटी गंडक व कमला-तिलजुगा या मुख्य नद्या आहेत.

उन्हाळ्यांत पश्चिमेकडील कोरडे वारे वाहतात पण दक्षिण बहारइतकी उष्णता येथें नसते. जास्तींत जास्त सरासरी उष्णमान जानेवारींत ७३° व एप्रिल आणि मे महिन्यांत ९६° असतें. वार्षिक पाऊस सरासरी ५० इंच पडतो. १८९८, १९०२ व १९०६ या सालीं नद्यांनां मोठे पूर येऊन थोडीबहुत प्राणहानि व वित्तहानि झाली होती.

इतिहासः—प्राचीनकाळीं मिथिलेच्या राज्यांत या जिल्ह्याचा समावेश होत होता. पुढें पाल व सेन या घराण्यांच्या हातांतून गेल्यावर १२०३ सालीं महंमद-इ-बखत्यार खिलजी यानें तो जिंकून घेतला. चवदाव्या शतकाच्या मध्यापासून १५५६ सालीं मोंगल घराण्याकडे जाईपर्यंत हा जिल्हा एका ब्राह्मणी राजघराण्याकडे होता; पण मुसुलमानी अंमलापूर्वींचा येथील इतिहास अवगत नाहीं. अहिआरी येथें रामचंद्रानीं शिळा होऊन पडलेल्या अहिल्येचा उद्धार केला असें म्हणतात. या जिल्ह्यासंबंधींच्या सर्वांत जुन्या लेखांत मिथिलेच्या शिवसिंग राजानें विद्यापति कवीला इ. स. १४०० मध्यें बेणिपति ठाणा दिल्याचा उल्लेख आहे. धारूरचें राजघराणें या जिल्ह्यांत सर्वांत जुनें असावें. १७६५ सालीं हा जिल्हा इंग्रजांच्या ताब्यांत आला; त्यावेळीं तो बहार सुभ्यांत मोडत असे. जयनगर, बेरौतपूर, भवार, बलराजपूर व मंगल येथें जुने किल्ले आहेत.

लोकवस्तीः—१९२१ सालीं या जिल्ह्याची लोकसंख्या २९१३५२९ होती. येथें बहारी भाषेची मैथिली नांवाची पोटभाषा चालते. शें. ७ पुरुषांनां लिहितां वाचतां येतें.

शेतकीः—बडीगंडकीच्या नैर्ऋत्येकडील उंचवटयाचा प्रदेश सर्वांत सुपीक असून तेथें रब्बी व भदोई पिकें होतात. बाघमती व छोटी गंडकी यांच्यामधील सखल दुआबांत मुख्यत्वेंकरून रब्बी तांदूळ होतो. उरलेल्या भागांतहि महत्त्वाचें पीक तांदूळ हें आहे. या जिल्ह्यांत सरकारी पाटबंधारे आहेत.

व्यापार व दळणवळणः—जाडेंभरडें कापड, मातीचीं भांडीं व चटया तयार होतात. झंझारपूरचीं पितळी भांडीं

प्रसिद्ध आहेत. निळीचे कारखाने कायम धान्याच्या पद्धती-पासून सुरू आहेत, परंतु कृत्रिम नीळ निघाल्यापासून हे कारखाने कमी होऊं लागले आहेत.

तांदूळ, नीळ, हरभरा, मोहरी, जवस, गळिताचीं धान्यें, तंबाखू, कातडीं, इमारती लांकूड वगैरे पदार्थ येथून बाहेर जातात, व तांदूळ आणि इतर धान्यें, मीठ, केरोसीन तेल, पोतीं, कोळसा, विलायती कापड व कापूस हे जिन्नस बाहेरून येतात. दर्भंगा, समस्तीपूर, मधुवनी, रुसेरा, पुसा, कमतौल, दलसिंग सराई, नरहिया, आणि झंझारपूर हीं व्यापाराचीं मुख्य ठिकाणें आहेत.

जिल्ह्याच्या नैर्ऋत्य कोपऱ्यांतून बंगाल आणि नॉर्थवेस्टर्न रेल्वेचा मुख्य फांटा व हाजीपूरपासून बचवारापर्यंत जाणारी शाखा आहे. समस्तीपूरपासून दर्भंग्यापर्यंत एक फांटा जातो व तेथून एक शाखा वायव्येस कमतौल व जोगियारावरून सिनामर्ढीकडे व दुसरी शाखा पूर्वेस खानवा घाटापर्यंत जाते; यांची एकंदर लांबी या जिल्ह्यांत १४६ मैल आहे. मुझफरपूरपासून दर्भंगा व नरहिया ह्या गांवावरून पुरणियापर्यंत एक सडक जाते. दर्भंगा व इतर पोटविभागांच्या मुख्य ठिकाणांपासून जिल्ह्यांतील महत्त्वाच्या ठिकाणीं जाण्याकरितां, त्याचप्रमाणें दर्भंगा, सक्री, झंझारपूर, व निर्माली स्टेशनपासून नेपाळ सरहद्दीपर्यंत रस्ते झालेले आहेत गंगा नदींतून वर्षभर जहाजें चालतात. आगगाड्या सुरू झाल्यापासून बढीगंडक नदींतील व्यापार बराच कमी झाला आहे. इतर नद्यांतून पावसाळ्यांत बोटी जाऊं शकतात. पाऊस कमी झाल्यास किंवा वेळेवर न पडल्यास पिकांचें नुकसान होऊन दुष्काळ पडतो.

राज्यव्यवस्थाः—या जिल्ह्याचे तीन पोटभाग असून त्यांचीं मुख्य ठिकाणें दर्भंगा, मधुवनी, व समस्तीपूर येथें आहेत. दर्भंगा येथें जिल्ह्याचा मॅजिस्ट्रेट कलेक्टर व इतर पोटविभागावर आसिस्टंट मॅजिस्ट्रेट आहेत. पोटविभागांचीं मुख्य ठिकाणें व रुसेरा येथील म्युनिसिपालिट्यांखेरीज इतर ठिकाणचा स्थानिक कारभार जिल्हा बोर्डाकडे आहे.

पो ट वि भा ग.—दर्भंगा जिल्ह्याचा एक पोटविभाग. क्षेत्रफळ १२२४ चौरस मैल. लो. सं. ( १९११) १०६३८४९. जमीन सखल असून ठिकठिकाणीं ओढे व नाले आहेत. खरीपाच्या पिकांत तांदूळ चांगला होतो. यांत दर्भंगा व रुसेरा अशीं दोन गांवें असून १२६२ खेडीं आहेत.

ता लु का.—तालुक्याचें क्षेत्रफळ ४२८ चौरस मैल असून त्यांत १ गांव व ५४३ खेडीं आहेत. लो. सं. ( १९११ ) ४५५८३९आहे.

गां व.—विहारमधील दर्भंगा जिल्ह्याचें मुख्य ठाणें. छोट्या बाघमती नदीच्या डाव्या तीरावर आहे. दर्भंगीखान नांवाच्या एका लुटारूच्या नांवावरून हें नांव पडलें असावें. लोकसंख्या (१९११) ६२६२८. हिंदूंची लोकसंख्या अधिक आहे. बाहेर जाणारा माल—तूप, इमारती लांकूड. आंत येणारा माल—धान्य, मीठ, कापड, लोखंड. महाराजाच्या बगीचाच्या व दवाखान्याच्यामध्यें बाजाराकरितां मोठी इमारत बांधली आहे. गांवाच्या भोंवतालची जागा पावसाळ्यांत सखल असल्यामुळें दलदलीची होते; कारण कमला व छोटी बाघमतीचें पाणी भोंवतालच्या प्रदेशांत पसरतें.

दर्भंगाराज—विहार-ओरिसामधील एक छोटेसें राज्य. १६ व्या शतकाच्या आरंभीं महेशठाकूर हा जबलपूरहून आला व त्यानें हें मिळविलें असें सांगतात. जबलपूरहून आल्यानंतर तो राजा शिवसिंगच्या येथें पुरोहित म्हणून राहिला; पण मुसुलमानी सत्तेच्या उदयकालामुळें ह्या राज्यास उतरती कळा लागली व ह्या संधींत महेशठाकूरनें अकबर बादशहाजवळून दर्भंगा जहागीरी मागून घेतली; त्यानें व त्याच्या पुत्रपौत्रांनीं राज्याची फार चांगली काळजी घेतली व जरी कायमधारावंदीपद्धतीच्या वेळीं त्यांच्या राज्यापैकीं कांहीं भाग सरकारजमा झाला होता तरी त्यांस तो परत देण्यांत आला. १९ व्या शतकाच्या पूर्वार्धांत राज्याची बरोबर व्यवस्था नव्हती. स. १८६० पासून वीस वर्षेपर्यंत हें राज्य सरकारी देखरेखीखालीं होतें. दर्भंगा हें १७६२ सालापासून मुख्य गांव असून त्यापूर्वी मधुवनी हें होतें. सध्याचा राजा बहादुर सर रामेश्वरसिंग हा आपल्या बंधूच्या मरणानंतर १८९८ सालीं गादीवर आला. दर्भंगा, मुझफरपूर, गया, मोंगीर, पूर्णीया व भागलपूर इतक्या जिल्ह्यांत ह्या राज्याच्या जमीनी आहेत. एकंदर क्षेत्रफळ २४१० चौ. मै. महाराजाच्या खुद्द मालकीचे बंगले दर्भंगा, मुझफरपूर, पाटणा, बनारस, कलकत्ता, अलाहाबाद, दार्जिलिंग व सिमला येथें आहेत. मुझफरपूर जिल्ह्यांतील सरादिया व बचौर, दर्भंग्यांतील पन्डौल व पूर्णिआंतील गोंन्डवार येथील निळीच्या कारखान्यावरहि महाराजाची मालकी आहे. सालीना उत्पन्न साडेसात लाखांचें आहे. सध्याची व्यवस्था कोर्ट आफ वार्डनें अंमलांत आणली. ५० ते २०० असे खेड्यांचे वेगळे वेगळे संघ करून प्रत्येकावर एक सब्-म्यानेजर नेमला आहे. हा फक्त राजालाच जबाबदार आहे. सब्-म्यानेजरच्या खालील दर्जाचा मनुष्य तहशिलदार आहे. ह्याच्याकडे करवसूली वगैरे काम असतें. दरएक एकरास ४ रु. सारा आहे.

दर्यापुर, ता लु का.—वऱ्हाड, उमरावती जिल्ह्याचा हा पश्चिमेकडील तालुका आहे. हा उ. अ. २०° ४९' ते २१° २०' आणि पू. रे. ७७° ११' ते ७७° ३८' यांच्या दरम्यान आहे. क्षेत्रफळ ५०५ चौरस मैल. दर्यापूर तालुका हा पूर्वी एलिचपूर जिल्ह्यांत होता. परंतु १९०५ सालीं जिल्ह्याच्या इतर भागाबरोबर उमरावती जिल्ह्यांत सामील करण्यांत आला. या तालुक्यांत एकंदर २४५ गांवें आहेत. हा तालुका पाइनघाटच्या सुपीक खोऱ्यांत आहे. लोकसंख्या १९११ सालीं १२९५३४ होती.

शेतकी:—कापूस, ज्वारी, गहूं, जवस, तूर, खाण्याचीं पानें हे जिन्नस येथें होतात. खाण्याचीं पानें अंजनगांव, अचिं- वजपूर, शहापुर येथें चांगलीं होत असून तीं तिकडे प्रसिद्ध आहेत. या तालुक्यांत बागाईत जमीन फारच थोडी आहे.

गां व.—जिल्हा उमरावती,तालुका दर्यापुर. लोकसंख्या सुमारें पांच हजार. हें तालुक्याचें मुख्य ठिकाण असून चंद्र- भागा नदीच्या कांठीं मूर्तिजापुरपासून १८ मैलांवर आहे. हें कापसाच्या व्यापाराचें मुख्य ठिकाण असून येथें ५ सरकी काढण्याचे व ३ रुई दाबण्याचे कारखाने आहेत. रा. ब. भगवंतराव विनायक देशमुख यांचा मोठा वाडा येथें असून त्यांत कांहीं प्रेक्षणीय खोदकाम आहे. वऱ्हाडचा तिसरा स्वतंत्र राजा दर्याइमादशहा (इ. स. १५२९ ते १५६०) यानें हें वसविल्यावरून या गांवास दर्यापुर असें म्हणतात.

**दर्याबाई**—ही नागपूरकर जानोजी भोंसल्याची स्त्री. ही फार कारस्थानी होती. जानोजीच्या मृत्यूनंतर (१७७२) मुधोजी व साबाजी यांचा गादीबद्दल तंटा लागला होता. त्यांत दर्याबाई साबाजीच्या बाजूची होती. वास्तविक जानो- जीनें मुधोजीच्या मुलास दत्तक घेतलें होतें. पुढें लढाई होऊन तींत साबाजी पडला व मुधोजी कारभारी झाला. जानोजीच्या वेळीं पेशव्यांनीं साबाजीशीं त्याच्या विरुद्ध संगनमत चालविलें असतां हिनेंच त्याची समजूत केली होती. जानोजीच्या पश्चात दर्याबाई आपल्या दत्तक (रघूजी) पुत्रा- सह अकोटास राही. तिनें रघूजीला गादी मिळूं नये म्हणून आपण गरोदर असल्याचेंहि खूळ पिकविलें होतें. मुधोजी— साबाजी तंटा एलिचपूरच्या नबाबानें मिटविला होता. या दिरांच्या भांडणांत दर्याबाई कधीं कधीं दोहींकडेहि मिळे. तिच्यामुळें भोसल्यांच्या घरांत गृहकलह शिरला. बारभा- ईच्या कारभारांत दर्याबाई व रघूजी यांनीं भाग घेतला होता. त्यावेळीं रुक्तुद्दौला यानें बाई पुण्याकडे जात असतां घाटेंत वऱ्हाणपुर येथें तिला लुटलें. [भोसल्यांची बखर व कागदपत्रें.]

**दर्यावाद**—संयुक्त प्रांतांतील बाराबांकी जिल्ह्याच्या समसनेईघाट तहशिलींतील एक गांव. लोकसंख्या सुमारें पांच हजार. जोनपूरच्या महमदशहाच्या एका सेनापतीनें हा गांव वसविला म्हणतात. येथील हवा रोगकारक आहे.

**दर्यासारंग**—शिवाजीच्या आरमारावरील एक मुख्य अधिकारी. हा कोळी जातीचा होता. कोळ्यात सारंग ही एक कुळी किंवा आडनाव आहे. त्या कुळींतील हा दर्या नांवाचा पुरुष होय. हल्लीं इंग्रजींतील अॅडमिरल या शब्दास प्रतिशब्द म्हणून दर्यासारंग हा शब्द देण्याची चाल पडली ती चुकीची आहे. या घराण्याचे वंशज अलिबागेस आहेत. हें घराणें सोनकोळी जातींत वरेंच वरच्या दर्जाचें मानतात. दर्या याचें दुसरें नांव लायपाटील असावें. त्यानें जंजिरे राजापुरीच्या मसलतीच्या कामीं मोठी मदत केली; ही मोहीम मोरोपंत पेशव्याच्या देखरेखीखालीं झाली होती (१६७६) या घराण्यास आदिलशाहीपासून इनामाच्या बाबतींत हक्काच्या सनदा मिळाल्या होत्या. लाय पाटिलाच्या स्वाधीन शिवाजीनें आरमाराचा कारभार दिला होता. त्यास पालखी छत्रीचा मान असून शिवाय शिवाजीनें पालखी नांवाचें एक लष्करी (महागिरी) जहाज बांधवून तें खास लायपाटिलास दिलें होतें. तें त्याचें हल्लींप्रमाणें फ्लगशिप होतें. हें घराणें पुष्कळ काळपर्यंत मराठी आरमारांत प्रमुख होतें. आंग्रे हे आरमारी सुभेदार असतांना त्यांच्या हाताखालीं या घरा- ण्यांतील पुरुषांनीं कामें केलीं आहेत. [भा. इ. सं. त्रैमासिक, वर्ष ३ जोडअंक.]

**दर्श**—सौरमासाप्रमाणें महिन्याच्या शेवटीं येणाऱ्या अमावस्या तिथीस दर्श अशी संज्ञा आहे. या दिवशीं पितृ- गणांपैकीं पितृत्रयी व मातृत्रयी यांना उद्देशून श्राद्ध कराव- याचें असतें. याच दिवशीं अग्निहोत्र्यानें पितरांना उद्देशून पिंडपितृयज्ञ करावयाचा असतो. हा विधि मात्र गृह्यसूत्र- विहित आहे. स्मार्ताग्नि धारण करणारेहि पिंडपितृयज्ञ स्मार्ताग्नीवर करतात. अमावास्येच्या दर्शश्राद्धास पार्वणश्राद्ध असें म्हणतात. पार्वणश्राद्ध विधि सर्व गृह्यसूत्रग्रंथांत दिला आहे व पर्व दिवशीं केलें जाणारें श्राद्ध ते पार्वणश्राद्ध—दर्श श्राद्ध होय अशी स्मृतिग्रंथांत यानी संगति लावली आहे.

**दर्शक**—अजातशत्रूच्या नंतर त्याचा पुत्र दर्शक हा मगधाच्या गादीवर बसल्याचें पुराणांत वर्णन आहे. त्यास आतां इतर पुरावाहि आढळला आहे. बौद्ध वाङ्मयांत मात्र त्याचें नांव येत नाहीं; तें चुकीनें राहिलें असावें. हा राजगृह येथें (खि. पू. (सुमारें) ४७५ च्या सुमारास राज्य करीत होता. भासाच्या वासवदत्ता नाटकांत याचा स्पष्ट उल्लेख आहे व त्याला वत्सराज उदयन व अवान्तिराज महासेन यांचा समकालीन म्हटलें आहे. याला मत्स्यपुराणांत चुकीनें वंशक म्हटलें असून त्यानें २४ वर्षे राज्य केल्याचें लिहिलें आहे. [महावंश पुराण. ४; भास, वासवदत्ता; मत्स्यपुराण.]

**दर्शनें**—दर्शन शब्द संस्कृत वाङ्मयांत पारमार्थिकज्ञान या अर्थी उपयोजिला आहे. दर्शनें सहा असून त्यांचीं नांवें न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा हीं होत. या दर्शनांसंबंधीं माहिती त्या त्या शब्दाखालीं दिली आहे. पूर्वमीमांसेसंबंधीं सविस्तर विवेचन ज्ञानकोश विभाग पांच (पृष्ठ २१६) मध्यें आलेंच आहे. वरील सहा दर्शनां- शिवाय निरनिराळ्या संप्रदायानुसार पारमार्थिक ज्ञान उपबृं- हिणारीं चार्वाक दर्शनें, बौद्धदर्शन, अर्हतदर्शन, रामानुज- दर्शन, पूर्णप्रज्ञदर्शन नकुलीपाशुपतदर्शन, शैवदर्शन, प्रत्य- भिज्ञादर्शन, रसेश्वरदर्शन, औलुक्यदर्शन, अक्षपाददर्शन, पाणिनीदर्शन, शांकरदर्शन इत्यादि दर्शनें प्रचलित आहेत. यांतील कांहीं शैव व कांहीं वैष्णवमतानुसारी आहेत. दर्शनें हीं पारमार्थिक ज्ञान देणारीं असल्यामुळें त्यांस रसेश्वर या

वैद्यकशास्त्रविषयाचा व पाणिनी या शब्दशास्त्रविषयाचा दर्शनांत संग्रह असल्याचें पाहून शंका येते. परंतु वरील रसदर्शन व पाणिनिदर्शन यांत रस व शब्द हे ब्रह्मरूप असून त्या ब्रह्माचें ज्ञान होणारा ब्रह्मज्ञानी होतो असा विषय प्रतिपादिला असल्यामुळें त्यांचा दर्शनांत अंतर्भाव केला आहे. माधवाचार्यांनीं सर्व दर्शनांचा साररूप असा सर्वदर्शनसंग्रह नामक एक ग्रंथ लिहिला आहे.

**दर्शपूर्णमास**—हा शब्द तैत्तिरीय संहितेपासून आढळतो. अमावस्या व पौर्णिमा या दोन शब्दांचा समुच्चयरूप हा शब्द आहे. त्रैताग्नि धारण करणाऱ्या अग्निहोत्र्यानें पौर्णिमेनंतरच्या व अमावस्येनंतरच्या प्रतिपदेस करावयाच्या यागास दर्शपूर्णमास याग असें म्हणतात. यासंबंधीं माहिती ज्ञानकोश विभाग २ पृष्ठ ७४ वर आली आहे

**दर्सि**—मद्रास इलाख्यांतील नेल्लोर जिल्ह्याच्या उत्तरेस एक जमिनदारी तहशील. क्षेत्रफळ ६१६ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) ९४०४७. हींत खेडीं ११८ आहेत. दर्सि हें मुख्य ठिकाण आहे. वेंकटगिरी इस्टेटीचा ही तहशील एक भाग आहे. हा प्रदेश शुष्क व ओसाड आहे. या तहशिलींत झाडेंझुडपें फार कमी असून ठिकठिकाणीं टेंकड्या आहेत. गन्डलकाम्म व मुसी ह्या दोन नद्या ह्या प्रदेशांतून वहातात. हवा फार उष्ण असून उन्हाळ्यांत पाण्याची कमतरता पडते.

**दलमऊ, तहशील.**—संयुक्तप्रांतांतील रायबरेली जिल्ह्याची नैर्ऋत्येकडील एक तहशील. ह्यांत दलमऊ, सरेई व खिरन या परगण्यांचा समावेश होतो. क्षेत्रफळ ४७२ चौरस मैल. लोकसंख्या १९११ सालीं २७०४६८ होती. तहशिलींत खेडीं ५७५ असून दलमऊ हा एक गांव आहे. गंगा नदीच्या कांठची जमीन जरा सुपीक आहे.

**गां व.**—दलमऊ तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें गंगातटाकीं वसलेलें आहे. लोकसंख्या ( १९११ ) ५६००. कनोजचा राजा दलदेव यानें हें गांव वसविलें. सैय्यद सालारनें हें गांव घेतलें होतें. १४व्या शतकाच्या शेवटीं शेवटीं भर राजानें सैय्यद मुलींशीं विवाह करण्याची इच्छा दर्शविल्यावरून जोनपूरच्या इब्राहिमशहानें स्वारी केली व किल्ला घेतला. इब्राहिमशहाच्या नातवाची कबर तेथील एका बागेंत आहे. १८ व्या शतकांत निजाम सुजा-उद्दौलानें येथें एक वाडा बांधिला होता. अकबर व शहाजहान यांच्या वेळच्याहि येथें कांहीं इमारती आहेत. येथें लहान लहान शिट्या (गिड्या?) (गंगेचें पाणी भरून नेण्याकरितां) तयार करतात. येथें पावसाळ्यांत एक मोठी यात्रा भरते.

**दलमी**—विहार-ओरिसा इलाख्यांतील मानभूम जिल्ह्याच्या पोटविभागांत एक मोडकळीस आलेलें ठिकाण. हें सुवर्णरेखा तटाकीं आहे. येथें एक मोडकळीस आलेला किल्ला आहे. येथें एक आदित्याची मूर्ति असून एक लहानशी दशभुजा देवीचीहि मूर्ति आहे.

**दलहौसी**—पंजाब इलाख्यांतील गुरुदासपूर जिल्ह्याच्या पठाणकोट तहशिलीस जोडलेलें एक पहाडी हवा खाण्याचें ठिकाण. लोकसंख्या ( १९११ ) १५८२. हे पठाणकोटहून वायव्येस ५१ मैल व समुद्रसपाटीपासून ७६८७ फूट उंच आहे. खालीं वलुन येथें छावणी असून तेथेंच खालीं वनीखेट आहे. येथें उन्हाळ्यांत ब्रिटिश सैन्याची तुकडी असते. पूर्वेस दैन कुंड आहे. येथें उन्हाळ्यांत देखील बर्फ पडतें. कांहीं ठिकाणीं उंची ९००० फूट आहे. १८५१ सालीं नेपिअर साहेबानें हें आरोग्यस्थान करण्याची कल्पना काढली व ब्रिटिश सरकारनें ही जागा चंबा संस्थानच्या राजाजवळून घेऊन १८५४ सालीं हें ठाणें केलें; येथें लाहोर विभागाचा कमिशनर उन्हाळ्यांत रहाण्यास येतो.

**दलाल**—हा अरबी शब्द असून त्याला इंग्रजी शब्द 'ब्रोकर' हा आहे. याचा मूळ अर्थ व्यापारी एजंट. त्यानें काम माल विकत देणारे व विकत घेणारे यांनां एकत्र आणून त्यांचा सौदा जमवून देणें व त्याबद्दल मेहनताना वर्फ दलाली घेणें हें होय. पूर्वी खाण्यापिण्याचे जिन्नस विकण्यांतच दलाल असत, परंतु अलीकडे अनेक प्रकारच्या व्यवहारांत दलाल असतात. उदा. स्टॉक ब्रोकर (ठेव किंवा शेअरचे दलाल), एक्स्चेंज ब्रोकर (नाणेंदलाल), इंशुअरन्स ब्रोकर ( विमादलाल ), शिपब्रोकर, बिल-ब्रोकर ( हुंडीदलाल ). पॉनब्रोकर (गहाणदलाल) हा वास्तविक दलालच नव्हे, कारण तो एजंटाप्रमाणें नसून मालकाप्रमाणेंच असतो.

**दलाल व मालक यांचा संबंध.**—दलालाच्या ताब्यांत माल नसतो, अडत्याच्या ताब्यांत तो असतो; व हाच दलाल व अडत्या (फॅक्टर) यांच्यामधील मुख्य फरक आहे. दलालाचें काम मालक व गिऱ्हाईक यांच्यांमधील सौदा घडवून आणणें हें असतें. सौद्याच्या अटी ठरल्या कीं दलालाचें काम संपतें. पुष्कळदां दलाल हा अडत्याचेंहि काम करतो, पण या दोघांचे हक्क व कर्तव्यें अगदीं निराळीं असतात. दलालाचें कर्तव्य हें कीं, मालकाच्या सांगण्यावरहुकूम कौशल्यानें व प्रामाणिकपणानें घडवून आणणें; आणि विशेष खबरदारी घेणें ती ही कीं, प्रसंग पडल्यास मालकाला सौद्यासंबंधानें कोर्टांत दावा लावण्यास कोणतीहि अडचण पडूं नये.

इंग्लंडांत पहिल्या जेम्स राजाच्या कारकीर्दीपासून १८८४ सालपर्यंत दलालांनां लायसेन्स देण्याची पद्धत असे. पुढें दलालांच्या धंद्यावरील हें बंधन काढून टाकण्यांत आलें. दलालानें शर्तीप्रमाणें सौदा जमवून आणला म्हणजे त्याची दलाली लागू होते. तिचें प्रमाण बहुधां रीतरिवाजानें व कामाच्या स्वरूपाच्या मानानें कमजास्त असतें. जेव्हां तो गिऱ्हाइकाच्या पतीबद्दल हमी पत्करतो त्यावेळीं त्याची दलाली अधिक असते. शिवाय दलालानें कांहीं खर्च केला तर तोहि मालकाकडून भरून मिळण्याचा हक्क असतो. मात्र दलालाच्या ताब्यांत माल नसल्यामुळें स्वतः येण्याबद्दल

मालकाच्या मालावर तारकहक्क (लीन) नसतो. दलाल आपलें काम करण्यास चुकल्यास त्याची दलाली वगैरे तर बुडतेच व शिवाय झालेलें नुकसान भरून मागण्याचा कायदेशीर हक्क मालकाला असतो.

द ला ला चा इ त रां शीं सं बं ध.—सौद्याच्या बाबतींत दलालांविरुद्ध दावा लावतां येत नाहीं; तर दावा मालकाविरुद्ध करावा लागतो, पण दलालानें मालकाप्रमाणें वागून जबाबदारी पत्करल्यास दलालाविरुद्ध दावा चालेल. दलालाला किंमतीबद्दलचा पैसा घेतां येत नाहीं. अलीकडे ठिकठिकाणीं व्यापारीसंघ स्थापन झाले असून त्यांनीं केलेल्या नियमांप्रमाणें व्यापाऱ्यांनां व दलालांनां वागावें लागतें. संघानें नेमलेले पंच असतात ते भांडणांचा निकाल करतात.

स्टॉ क ब्रो क र ( ठेव किंवा शेअर दलाल ).—ठेवी व शेअर यांच्या संबंधाचे सौदे जमवून देणारांनां स्टॉक-ब्रोकर म्हणतात. इतर दलालांत व या दलालांत फरक हा आहे कीं, ठेव किंवा हिस्सा हा पदार्थ नसतो. स्टॉक-एक्स्चेंज संबंधानें निराळे नियम असतात व त्यांनां अनुसरून या दलालांनां वागावें लागतें.

इ न्शु अ र न्स ब्रो क र (विमादलाल).—या दलालांचें काम विमा ( पॉलिसी ) उतरण्याचे सौदे जमविणें. यांचे पोटप्रकार अनेक आहेत ते आयुष्याचा विमा, आगीचा विमा, जहाजाचा विमा वगैरे होत.

स्टॉ क ब्रो क र(हुंडी दलाल).—खेडेगांवांतील लोकांच्या हुंड्या शहरांत पटविण्याचें काम हे लोक करतात.

**दल्ली जमिनदारी**—मध्यप्रांत, जिल्हा भंडारा. हिचें क्षेत्रफळ ५२ चौरस मैल. १७५१ सालीं मांडाल्याच्या निजामशहानें या घराण्याच्या पूर्वजांस ही इनाम दिली. स. १७७२ मध्यें भोंसल्यांनीं यांच्याकडेच ही जमिनदारी ठेवली. जमिनदार राजगोंड आहे. हा साकोलीपासून १८ मैलांवर असलेल्या दल्ली गांवीं राहतो. हींत एकंदर १७ खेडीं आहेत. लोकसंख्या इ. स. १९०१ मध्यें ३००२ होती. सुमारें ½ जमिनींत जंगल असून लागवडीखालीं सुमारें ४००० एकर जमीन आहे. १७२५ रुपये टाकोळीदाखल ठरलेले आहेत. हल्लीं १३३५ रु. घेण्यांत येतात, याचें कारण उत्पन्न कमी झालें आहे.

**दंव**—रात्रीच्या समयीं जमिनीमध्यें गारठा उत्पन्न होऊन हवेंतील आर्द्रतेमुळें भूतलावर दंवबिंदू पडूं लागतात. दंव पडण्याची क्रिया संथपणानें, अकस्मात् व अदृश्यरीतीनेंहि होते. क्षणभंगुरत्वाला सार्थ उपमा म्हणजे रविकिरणामुळें क्षणांत बाष्पीभवन पावणाऱ्या दंवबिंदूंचीच होय. दंव आणि पाऊस यांमध्यें पूर्वीपासून भेद मानण्यांत आला आहे. दंवाचें विशेष असें शुक्याशींच साहचर्य आहे. १८१४ सालीं दंवाच्या उत्पत्तीची मीमांसा वेलनें केली आहे. त्यावरून प्राचीन काळच्या लोकांच्या ज्या धार्मिक व काव्यमय कल्पना दंवासंबंधीं होत्या त्यांच्या निरीक्षणामुळें प्राप्त झालेल्या एतद्विषयक आधुनिक ज्ञानाशीं कांहीं साम्य असल्याचें आढळतें. जुन्या ज्यू वाङ्मयांत दंवाचें साहचर्य वैभव, संपत्ति, पुनरुज्जीवन इत्यादि गोष्टींशीं विशेष असल्याचें सांगतात. ग्रीअस व इंदु यांची दंव ही कन्या होय. ग्रीक व लॅटिन लोकांची अशी समजूत होती कीं, सर्व आर्द्रतेचें आदिकारण चंद्र असून सूर्य हा सर्व उष्णतेचें कारण आहे. दिवसापेक्षां वनस्पतींची व प्राणिमात्रांची रात्रीच्या वेळींच जास्त वाढ होते ही गोष्ट आपल्या पूर्वजांनां माहीत होती. वर्धिष्णु व क्षय पावणाऱ्या चंद्रकलेवर मनुष्यांच्या रक्ताची वाढ व ऱ्हास ही अवलंबून असतात असें प्लीनी यानें म्हटलें आहे. दंव, आर्द्रता व वनस्पतींची वाढ चंद्रामुळेंच होते अशी प्राचीनांची समजूत होती. स्त्रियांच्या मासिक अभ्रस्तुतेचा चंद्राच्या चंचल कलेशीं संबंध जोडण्यांत आलेला असून गर्भधारणा चंद्रामुळेंच होते अशी ग्रीनलंडमधील लोकांची समजूत होती. हिंदु लोकांच्या विश्वरचनाशास्त्रांत स्वर्ग व पृथ्वी यांचें लग्न लागलें असून पर्जन्यापासून गर्भोत्पत्ति होते व पुरुष हा पर्जन्यरूपानें अवतरतो अशी कल्पना आढळते. ही कल्पना आर्द्रतेचा जीवनाशीं असलेला संबंध व्यक्त करते. दंवबिंदू म्हणजे स्वर्गीय बीजें होत व तीं पृथ्वीवर समृद्धि उत्पन्न करतात. स्पेनमध्यें कांहीं लोक दंवबिंदूंच्या समुदायांत लोळण घेतात. दंवानें त्वग्रोग नष्ट होतात असें ते म्हणतात. नॉर्मंडीमध्यें दंवाचें महत्त्व वैद्यकीय दृष्ट्या मानलें जातें. जावांतील लोक केस पांढरे होऊं नयेत म्हणून दंवानें न्हातात. मे महिन्यांत प्रातःकालीं दंवानें चेहरा धुण्याची चाल यूरोपांत आहे. दंवामुळें सौंदर्य वाढतें अशी त्यांची समजूत आहे. दंव हें स्वर्गस्थांचें एक मधुर पेय असून मृतात्मा दंवबिंदूंत लुप्त झालेला असतो अशीहि कांहीं लोकांची समजूत आहे. मनुष्याचें पृथ्वीवर झालेलें अवतरण व त्याचें मृत्यूनंतर होणारें स्वर्गारोहण या दोन्ही कल्पनांचा दंवोद्भव व दंवनाश या गोष्टींकडे धार्मिक दृष्ट्या संबंध जोडण्यांत आलेला आढळतो. अथीनिअन व हिब्रू धर्मांमध्यें दंवासंबंधीं अनेक कल्पनांची बरीच वाढ झालेली आढळून येते. मोत्याप्रमाणें तेजस्वी व स्फटिकवत् पारदर्शक असे दंवबिंदू अनेक कवींचे काव्यविषय झाले यांत फारसें नवल नाहीं.

**दवणा**—दवण्याचें झाड वीत दीडवीत उंच वाढतें. याचीं पानें कांहींशीं गाजराच्या पानांसारखीं असतात परंतु दवण्याचें पान थोडें अरुंद असतें. दवण्याच्या झाडास वास फार उग्र येतो. दुरून वास आला असतां मात्र बरा वाटतो. यास तुरे येतात, त्यासहि झाडाप्रमाणें वास येतो. दवण्याचा सुगंधी पदार्थांत पुष्कळ उपयोग होतो. दवण्याचीं झाडें घराच्या आसपास लावल्यानें घरांत सर्प येत नाहींत. दवणा तिखट, शीतळ, कडू, तुरट, व सुगंधी असून कुष्ठ, कंडू, संग्रहणी व ग्रहपीडा यांचा नाश करतो. सर्पाच्या विषावर दवण्याच्या मुळ्या व पानें देतात अगर त्याचा रस काढून देण्यांत येतो. गुरांसहि हें औषध दिल्यानें गुण येतो

गर्भावर दवणा, व मरवा यांचा सर काढून प्याला असतां गुण येतो. [ वनौषधिगुणादर्श. ]

**दवा जमीनदारी**—मध्यप्रांत, जिल्हा भांडारा. साकोली तहशिलीच्या पूर्वेस ही जमीनदारी असून हिचें क्षेत्रफळ २६ चौरस मैल आहे. मराठी अंमलपूर्वी ही जमीनदारी मुका ठाकूर हलबा याजकडे होती व १७७५ साली याज-कडेच कायम करण्यांत आली होती. चिखली जमीनदारी पूर्वी याच जमीनदारीचा भाग होता; परंतु पुढें ती धाकट्या पातीकडे गेली. दवा साकोलीपासून १८ मैल आहे. या जमीनदारींत एकंदर १२ खेडीं आहेत. लोकसंख्या १९०१ सालीं ४३२३ होती. एकंदर शेत-जमीन ४२०० एकर असून त्यापैकीं २२०० एकर वागाईत होणें शक्य आहे. उत्पन्न साधारण ४१०० रुपये असून टाकोळी २००० रुपये ठरली आहे.

**दश-दहा**, द श ग्रं थ.—संहिता, तिचें ब्राह्मण व आरण्यक; शिक्षा, कल्प, व्याकरण, निघंटु, निरुक्त, छंद व ज्योतिष या दशग्रंथांचें जो पारायण करतो तो दशग्रंथी.

द हा व्य स नें —यांनां दशकामज व्यसनें असेंहि म्हण-तात ( काम म्हणजे इच्छा ). मृगया, द्यूत, दिवसा झोप, मद्यपान, नृत्य, गायन, क्रीडा, शिवीगाळ, बाहेरख्याली व दांभिकपणा.

द हा दा नें.—गो-भूमि-तिल-सुवर्ण-घृत-वस्त्र-धान्य--गुड-लवण-गृह.

द श म ग्र ह.—जांवई.

द श म द्वा र.—ब्रह्मरंध्र.

**दशपुर**—दक्षिण विभागांतील एक शहर. याचा बृह-त्संहितेंत ( १४. १२ ) उल्लेख आहे. माळव्यांतील अर्वाचीन मंदसोर अथवा विशेषतः दसोर शहर हेंच होय. नाशिकच्या शिलालेखांत व खुद्द मंदसोर येथील शिलालेखांत याचा उल्लेख केलेला आहे.

**दशरथ**—( १ ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न रघुराजाचा पौत्र व अजराजाचा पुत्र. पित्याच्या मागें हा अयोध्येचें राज्य करूं लागला. वसिष्ठ हा कुलगुरु. कौसल्या, सुमित्रा व कैकेयी या त्याच्या तीन मुख्य स्त्रिया होत्या. त्यांनां बराच काळपर्यंत संतति नव्हती. यानें पुत्रप्राप्तीकरितां एक यज्ञ केला. हा यज्ञ शरयूनदीतीरीं झाला. अग्निकुंडांतून प्राजापत्य पुरुष निघाला व त्यानें राजास पायसपात्र दिलें; तें तिघींहि स्त्रियांस देतांच त्या तिघीहि गर्भिणी झाल्या.

पुढें कौसल्येस राम, कैकयीस भरत व सुमित्रेस लक्ष्मण, शत्रुघ्न असे पुत्र झाले. यथाकालीं उपनयनसंस्कार झाल्यावर अध्य-यनार्थ त्यांनां वसिष्ठाकडे दिलें. तेथें ते वेदवेदांगें शिकून धनुर्विद्या इत्यादिकांतहि प्रवीण झाले. नंतर विश्वामित्र ऋषि राक्षसांचा त्रास न व्हावा म्हणून रामास व लक्ष्मणास मागून घेऊन आश्रमीं गेला. विदेह राजकन्येचें स्वयंवर होत असतां तेथें शिवचापभंगाचा पण होता. चापाचा रामानें भंग केल्यामुळें सीतेनें त्यास वरिलें. नंतर चारी पुत्रांचे यथासांग विवाह झाले.

दशरथानें आपली वृद्धावस्था ध्यानात आणून रामास अभिषेक करण्याचें वसिष्ठादिकांच्या सल्ल्यानें ठरविलें. यामुळें सर्वांस आनंद झाला. मात्र कैकयीस मंथरेच्या भाषणानें विपरीत बुद्धि उत्पन्न होऊन ती क्रोधागारांत प्रविष्ट झाली. दशरथाचें कैकयीवर सर्वांत जास्त प्रेम होतें. तो तिच्या मंदिरांत गेल्यावर तिनें पूर्वी दिलेले दोन वर यावेळीं मागून घेतले. एका वरानें भरतास राज्य व दुसऱ्या वरानें रामास १४ वर्षे वनवास तिनें मागून घेतला. नंतर पितृ-वचन खरें करण्याकरतां राम वनवासांत जाण्यास निघाला. सीता व लक्ष्मण हीं बरोबर गेलीं. दशरथ अत्यंत दुःखी होऊन सारखा हा राम ! हा लक्ष्मण ! हा सीते ! असा दीर्घ उच्चार करून अश्रुपात करी, त्यायोगानें कांहीं मूर्च्छा कांहीं निद्रा, व कांहीं शोक याप्रमाणें त्यानें सहा दिवस घालविले आणि सातव्या दिवशीं पूर्वशापानुसार मरण पावला. [ रामायण-बालकांड. ]

( २ ) हा अशोक मौर्याचा नातु. याचे शिलालेख नागार्जुन लेण्यात आहेत. आजीविक भिक्षूंसाठीं त्यानें हीं लेणीं कोरविलीं. बहुधा अशोकानंतर हाच गादीवर आला असावा असें या लेखांवरून दिसतें. तसें असल्यास त्याचें राज्यारोहण ख्रि. पू. २३२ सालीं झालें असावें त्यानें आठ वर्षेच राज्य केलें. याला संप्रति नांवाचा एक भाऊ होता. या दोघां भावांत अशोकाचें साम्राज्य विभागून पूर्वभाग दशरथाकडे व पश्चिम भाग संप्रतीकडे गेला. [ वायु-विष्णु-पुराणें; इंडि. ॲंटि. पु. २०; जैनपरिशिष्टपुराण. ]

**दशार्ण**—एक प्राचीन देश. कालिदासानें मेघदूतांत याची माहिती दिली आहे. याची राजधानी वेत्रवती नदीच्या कांठीं विदिशा (मेघदूत, श्लोक २४,२५) नामक होती. रामायणांत किष्किंधाकांडांत दक्षिणचे देश आले आहेत त्यांत दशार्ण देश आला आहे. भारतांत दक्षिणेस दशार्ण देश आला नसून पूर्व व पश्चिम या दिशांस भीमें आणि नकुल यांस दशार्णदेश लागल्याचें वर्णन आहे. यावरून तेव्हां कदाचित् दक्षिणच्या दशार्णदेशाचें नांव लोपलें असावें. बृहत्संहितेंत या देशाचा उल्लेख आहे ( ५. ४०; १०. १५ ).

**दशावतार**—' अवतार ' पहा.

**दशाहार**—ज्येष्ठ महिन्यांतील प्रतिपदेपासून दशमी-पर्यंतच्या दहा दिवसांस दशाहार म्हणतात. या दशमीस गंगेची उत्पत्ति झाल्यामुळें हीस दशाहरा म्हणतात. या दहा दिवसांत गंगेची पूजा, उत्सव वगैरे करण्याचा गंगाकांठीं प्रघात आहे. ज्येष्ठ शुद्ध दशमीस बुधवार, हस्तनक्षत्र, व्यती-पात, आनंदयोग, गरकरण, कन्येचा चंद्र व वृषभेचा रवि हे योग आले असतां विशेष पुण्यकारक मानिले आहेत. दशाहारांत आचरावयाच्या विधींचें विवेचन धर्मसिंधु, निर्णय-सिंधु, वगैरे ग्रंथात दिलें आहे.

**दसक्रोई**—मुंबई इलाख्यांतील अहमदाबाद जिल्ह्याचा मुख्य तालुका.क्षेत्रफळ ३४५ चौरस मैल. लोकसंख्या(१९११) ३४६९२१.यांत अहमदाबाद हा फक्त एक गांव असून १३७ खेडीं आहेत. सर्व तालुक्याची जमीन सपाट आहे. साबरमती, खारी व मेश्वर ह्या नद्या वहातात. साबरमतीच्या कांठच्या प्रदेशांत कांहीं ठिकाणीं उसाचें व तंबाखूचें पीक आहे. हवा उष्ण व रुक्ष असून पाऊस २८ इंच पडतो.

**दसनामी**—'गोसावी' पहा.

**दसपल्ला**—विहार-ओरिसांतील एक मांडलिक संस्थान. क्षेत्रफळ ५६८ चौरस मैल. उत्तरेस अंगुल जिल्हा, नरसिंगपूर संस्थान; पूर्वेस खंडपारा व नयागड; दक्षिणेस मद्रासेंतील गंजम जिल्हा; पश्चिमेस बाड. दसपल्लाच्या पश्चिमेस व दक्षिणेस इमारती लांकडें असलेलीं जंगलें आहेत. नयागड व खान्डपारा येथील राजांनीं देणग्या दिल्यामुळें हें संस्थान तयार झालें आहे. येथील राजास राजा जोरेमुद दसपल्ला म्हणण्याची चाल आहे. मराठे राजे ह्या राजाजवळ खंडणी घेत नसत कारण येथील राजा जगन्नाथ येथील रथ तयार करण्याकरितां लांकूड प्रतिवर्षी फुकट पुरवीत असे. याची लोकसंख्या ( १९११ ) ५७०५३ असून बहुतेक सर्व हिंदूच आहेत इतर खोंड, चास व, गौर इत्यादि जातींचे लोक आहेत. खेडीं ४८५ असून पैकीं कुन्जबन हें मुख्य आहे.

**दसरा**—दशाह (दहावा दिवस) या संस्कृत शब्दापासून दसरा शब्द बनला आहे. अश्विन शु. प्रतिपदेपासून नऊ दिवस नवरात्र होऊन दहाव्या दिवशीं हा सण येतो. याच दिवशीं रामानें रावणाला मारिलें. पांडवांनीं शमीवर ठेवलेलीं हत्यारें उत्तरगोग्रहणप्रसंगीं या दिवशीं काढलीं म्हणून शमीचें पूजन करतात अशी परंपरा आहे.

दसरा हा देवीचा सण आहे. आणि देवी ही शक्तीची देवता आहे. यासाठीं अश्विन शुद्ध प्रतिपदेस देवीला सिंहासनावर बसवावयाची व रामनवमीप्रमाणें नऊ दिवस तिचें भजन, पुजन, कीर्तन करावयाचें. अष्टमीच्या दिवशीं सरस्वती स्वरूपी भगवतीचें पूजन, नवमीच्या दिवशीं शस्त्रगर्भा देवीचें पूजन व दशमीच्या दिवशीं शमीचें पूजन, असा हा विधि आहे. अष्टमीस विद्यांचें पूजन, नवमीस हत्यारें वगैरेंचें पूजन व दशमीस शांततेचें पूजन करावयाचें. मात्र तें पूजन गांवाच्या शिवेबाहेर जाऊन करावयाचें. बाहेर सर्वत्र शांतता राखण्यासाठीं शस्त्रें, अस्त्रें, सैन्य वगैरेंचें प्रदर्शन करावयाचें व शत्रु असेल तर या दिवशीं त्याच्या पारिपत्यासाठीं निघावयाचें असा या कृतीचा अर्थ आहे. दसरा झाल्यावर मराठे आपल्या शत्रूवर मोहीम करण्यास निघत व अगोटीच्या सुमारास परत येत. मराठ्यांचें लष्कर बहुतेक शिलेदारांचें असे. ज्यानें त्यानें आपले घोडे, माणसें वगैरे घेऊन दसऱ्याच्या मुहुर्तावर बाहेर पडावयाचें, चैत्रापर्यंत लढाई करावयाची, व मग फिरून पावसाळ्यांत घरीं परत यावयाचें व मग घरची शेती वगैरे करावयाची. हल्लीं लढाया बंद आहेत, तरी हल्लीं सुद्धां लोक दसरा झाला म्हणजे उद्योगधंद्यासाठीं मुंबई, सोलापूर, वऱ्हाड, खानदेश या देशांत जातात, व चैत्री पौर्णिमा झाली म्हणजे परत येतात. याप्रमाणें त्यांची परंपरा कायम आहे.

साताऱ्यास प्रतापसिंहाच्या वेळीं ( पेशवाईअखेर ) दसऱ्याचा( व नवरात्राचा)जो समारंभ होई त्याचें वर्णन आढळतें तें असें:—रंगमहालांतील ( हा थोरल्या शाहूनें बांधला ) देवघरांत हें देवीचें नवरात्र बसे. रोज सकाळीं नऊ वाजल्यापासून बारावाजेपर्यंत गाणें होई. नंतर एक तास बहुरूप्यांचा खेळ होई,नंतर नायकिणींचा नाच होई. रात्रीं कीर्तन व पुराण होई. शेवटीं मध्यरात्रींपासून पहाटेपर्यंत मंत्रजागरण चाले. ब्राह्मणभोजन व शिधा वाटण्याचें काम नऊ दिवस होई. शिलंगणास निघतांना प्रथम महाराज आपल्या हातें देवीला रेडा बळी देत ( किंवा त्यावर पहिला वार टाकीत ). यावेळीं ७५ हत्ती मिरवणुकींत असत. पर्वईच्या नाक्याकडे सडकेच्या दुतर्फा उभ्या केलेल्या लष्करी शिपायांच्या रांगेंतून परत मिरवणूक जाई. शिबंदीहि मिरवणुकींत असे. याच्या मागें मग शहरांतील प्रतिष्ठित सरदार, शेटसावकार वगैरे लोक आपापल्या अधिकाराप्रमाणें हत्तीवर, घोड्यावर पालखींत बसत व मानाप्रमाणें अबदागिर, छत्री किंवा मशाल वापरीत. या मिरवणुकींत सामान्य प्रजेस मिसळण्याची परवानगी नसे. मिरवणुकीचा जमाव कोस सव्वाकोस लांब असे.

पेशव्यांच्या वेळीं पुण्यास दसरा मोठ्या थाटाचा होई. शाहूराजाच्या अखेरीपर्यंत हा समारंभ साताऱ्यास होई. त्याच्या नंतर नानासाहेब पेशव्यानें हा समारंभ पुण्यास सुरू केला. मालकमनें हा समारंभ पाहून त्याचें वर्णन पुढीलप्रमाणें करून ठेविलें आहे. स्वारींत प्रत्येक सरदार आपापलें खास निशाण घेऊन सामील होई. सैन्याच्या प्रत्येक तुकडीचें निशाण निराळें असे. ठराविक पद्धतीनें पेशवे व त्यांच्या मागें सरदारमंडळी अशी मिरवणूक निघे. शमीपूजन झाल्यावर मग तोफांच्या व बंदुकीच्या फैरा झडत. नंतर शेतांतून बाजरी किंवा ज्वारीचें एक ताट पेशवे तोडीत; तेव्हां पुन्हां सलामीचे बार होत. मग इतरजण शमीपूजन व ज्वारीतोड करीत. मराठे लोक बोकड किंवा रेडा मारून त्याचें रक्त आपल्या घोड्यावर शिंपीत व बोकडाची सागुती वाटीत. याबद्दलचा खर्च सरकारांतून होई. परत आल्यावर दरबार भरून नजराणे व पोशाखवांटणी होई. इंग्रज वकिलासहि ६०० रु. चा पोशाख देत. राज्यांतलि सर्व छोटे मोठे अधिकारी यांनाहि वस्त्रें मिळत. ही पद्धत पेशवाईनंतर बरेच दिवस इंग्रजांनीं चालू ठेविली होती पुढें हा दरबार राजाच्या वाढदिवशीं भरूं लागले. [ सातारा गॅ; पारसनीस—पूना इन बायगॉन डेज. ]

**दसार**—झालावाड जिल्ह्याचा २२ खेडीं असलेला एक तालुका ( काठेवाड ). दसार शहर पात्री रेल्वे स्टेशनच्या उत्तरेस ११ मैलांवर आहे. येथील तालुकदार मुलतानी मलिक आहेत. लोकसंख्या सुमारें चार हजार आहे.

**दसूय**, त ह शी ल.—पंजाब इलाख्यांत होशियारपूर जिल्ह्याची एक तहशील. क्षे.फ. ५०१ चौरस मैल. लोकसंख्या (१९२१) २१५६००. दसूय, मुकरिआन, मिआना, व तान्द-उरमर हीं ४ शहरें व ६३३ खेडीं हींत आहेत. बिआस नदी या तहशिलीची ईशान्येकडील व पश्चिमेकडील मर्यादाच आहे. दक्षिणेकडील जमीन सुपीक आहे.

श ह र.—दसूय तहशिलीचें मुख्य ठाणें. होशियारपूर गांवापासून वायव्येस २५ मैल. लोकसंख्या (१९११)३५९७. महाभारतांतील पौराणिक राजा विराट याच्या वेळीं हें गांव राजधानीचें शहर होतें असें सांगतात. ऐने-इ-अकबरींत लिहिलेला किल्ला येथें अजून मोडकळीस आलेला दिसतो. रामगरियांचा हा एक अजिंक्य किल्ला असून तो रणजितसिंगानें १८१७ सालीं घेतला.

**दस्क** त ह शी ल.—पंजाब इलाख्यांतील सियालकोट जिल्ह्याचा एक पूर्वेकडील तालुका. क्षेत्रफळ ३५९ चौरस मैल उत्तरेस चिनाब नदी आहे. लोकसंख्या (१९११)१९१५७८. हींत दोन गांवें व ३३२ खेडीं आहेत. सियालकोटच्या सर्व तालुक्यांमध्यें हा तालुका सर्वांत सुपीक आहे.

गां व.—दस्क तहशिलीचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या (१९११) ६०४६. येथें पितळेचीं भांडीं फारच चांगलीं तयार होतात.

**दहाइत**—यांची बहुतेक वस्ती वऱ्हाड-मध्यप्रांतांत आहे. संख्या सुमारें १५००० आहे. यांचे व खंगारांचे पूर्वज एकच होते अशी एक कथा आहे. मंडाल्यांत यांचीं नांवें रेवातिया, कोल, मवासिया, सोनवानी, आणि राजवारिया अशीं आहेत. मवासिया कोरकू आहेत. सोनवानी हे जुने मूळचे रहिवाशी आहेत. राजवारिया मिरझापूरचे कोल आहेत. बिलासपुरांत जोहारिया व पैलागिया असे दोन वर्ग आहेत. यांचीं कुलनांवें बेल, दसहो व छेवला अशीं आहेत; व या शाखांनी या कुलाचे लोक कधींहि तोडीत किंवा दुखवीत नाहींत. लग्नाच्या वेळीं त्यांस निमंत्रण करतात. नागोतिया जातीचे लोक नागाच्या विळांत मैदर पोळी लग्नकार्याच्या वेळीं नेऊन ठेवितात. सिंह, वाघ वगैरे कुलांचे लोक या प्राण्यांची शिकार करीत नाहींत. त्यांचें चित्र काढून त्यांना मैदर पोळी वाहतात.

वधूच्या शुल्कास हे 'सुक' किंवा चारा म्हणतात. तें सहा रुपये, साखर, हळद, तिळाचें तेल इतकें वराच्या बापानें वधूस दिलें पाहिजे. बिलासपुरांत स्त्रियांना वैधव्य आल्यापासून पांच वर्षें लग्न करतां येत नाहीं. जर केलें तर या विधवेस बहिष्कार घालतात. घटस्फोट होतो, पण फार क्वचित. व्यभिचारांत धरलेल्या स्त्रीला पहिल्यांदा क्षमा करतात पण पुन्हां केल्यास बहिष्कार घालतात. नवऱ्यास सोडून कोणी स्त्री दुसऱ्याबरोबर राहूं लागली तर त्यानें नवऱ्याचा लग्नखर्च भरून दिला पाहिजे. जर कुणबी वगैरे वर्गांतील माणसानें दहाइत बाईबरोबर व्यभिचार केला तर त्यांला जातींत सामील करून घेतात. हे स्थानिक हिंदु देवांची पूजा करतात. मध्यहिंदुस्थानांतहि यांची थोडी वस्ती आहे.

**दहीकाला**—गोकुळअष्टमीच्या म्हणजे कृष्णजन्मोत्सवाच्या शेवटच्या दिवशीं हा विधि करतात. याची उत्पत्ति कृष्णापासून मानण्यांत येते. गुरें चारीत असतां आपल्या जवळील शिदोरीचा व गवळ्यांच्या पोरां (गोपाळां) जवळील शिदोरीचा जो काला श्रीकृष्ण करून गोपाळांसह खाई त्यास दहीकाला किंवा गोपालकाला म्हणत. एका मोठ्या मडक्यांत दहीं व लाह्या एकत्र कालवून दोरीनें तें मडकें देवासमोर टांगतात व उत्सवाची समाप्ति केल्यावर मुख्य उत्सवाधिकारी, हरिदास किंवा श्रीकृष्णाचें सोंग घेतलेला मुलगा काठीनें तें फोडतो व मग प्रसाद सर्वांना वाटतात व त्यांतील दहींताक अंगाला चोळून स्नान करतात.

**दहीहंडा**—वऱ्हाड-मध्यप्रांत, जिल्हा अकोला, तालुका अकोट. अकोल्यापासून १८ मैलांवर हें दोन हजार वस्तीचें खेडें आहे. हा गांव मिठाच्या विहिरींकरितां प्रसिद्ध आहे. परंतु हल्लीं या विहिरी पडून गेल्यामुळें नादुरुस्त झाल्या आहेत; यांची खोली साधारणपणें ९० ते १२० फूट व रुंदी ३ । ४ फूट असे; येथें अशा एकंदर ६० विहिरी होत्या. येथें सय्यद दाऊद याचा दरगा, व एक जुम्मा मशीद आहे. बालासाहेब आणि रूपनाथ अशीं दोन देवळें असून पहिल्या देवळास तीन गांवांची जहागीर आहे.

**दळवनपूरचे गंग राजे**—या गंग राजांना कोंगु असेंहि दुसरें नांव होतें. यांची नीटशी माहिती मिळत नाहीं. यांचा काल व स्थलहि अनिश्चित आहे. कांहींचें म्हणणें चेर व कोंगु एकच असावेत. चेरांच्या उत्तरेकडे गंग अथवा कोंगु हे राज्य करीत असत व त्या देशास कोंगुदेश म्हणत. कांहींचें म्हणणें हे गंग ख्रिस्ती शकाच्या आरंभापासून इ. स. ८९४ पर्यंत राज्य करीत होते; परंतु फ्लीट म्हणतो कीं, ते इतके जुने नाहींत. एका ताम्रपटांत या राजांचीं १७ नांवें आलीं असून, त्यांचा काळ इ.स. ९६८–१०८० असा निघतो.

एक सूर्यवंशी कोंगु राजवंश आढळतो, त्यांपैकीं कन्नडदेवराजाचा मंत्री एक नागानंदी नांवाचा जैन होता. यांची राजधानी स्कंदपूर होती; यानें चोल, पाण्ड्य, केरळ, मलयाळम्, कर्नाटक वगैरे देश जिंकले. याला आद्य शंकराचार्यांनीं जैनधर्मापासून परावृत्त करून वैदिकधर्मानुयायी बनविलें. या वंशांत सात राजे झाले; ते कोंगुदेशाचे प्राचीन राजे होत. यानंतर जे गंगराजे आले त्यांचा वंश निराळा होता म्हणतात.

जान्हवी गंगवंशांतील कण्वायनशाखेचा स्कंदपूरचा पहिला राजा कोंगणीवर्मा होय. त्याचा पुत्र माधव व त्याचा हरिवर्मा; यानें आपली राजधानी कर्नाटकांत दळवनपूर येथें केली. यापुढें दळवनपूर येथेंच हें घराणें राज्य करीत होतें. यांचा वंश पुढीलप्रमाणें:—( १ ) कोंगणीवर्मा पहिला, त्याचा पुत्र

( २ ) माधव, त्याला दोन पुत्र; ( ३ ) हरिवर्मा व मारसिंह. मारसिंहाची माहिती आढळत नाहीं. हरिवर्म्यानेंच स्कंदपूर येथून दळवनपुरास राजधानी बदलली. त्याचा पुत्र (४) विष्णुगोप, यानें पूर्वदेश जिंकिला. याला (५) माधव व ( ६ ) कृष्णवर्मा हे दोन पुत्र व एक कन्या होती. तिचा पुत्र ( ७ ) कोंगणी महाधिराय. हा आपल्या मामांच्या मागून राजा झाला. त्याचा पुत्र (८) भुवनीति, यानें दख्खनमधील बहुतेक राजे जिंकले असें म्हणतात; हा फार अन्यायी होता. त्याचा पुत्र ( ९ ) पुष्करराय, हाहि जुलमी होता. त्याचा ( १० ) तिरुविक्रम, त्याचा ( ११ ) भूविक्रम, याच्या पदरीं गजदळ फार होतें. याला ( १२ ) कोंगणी नवकाम हा पुत्र झाला. यानें बराच देश जिंकला. त्याचा पुत्र ( १३ ) राजगोविंद, त्याचा भाऊ ( १४ ) शिवमहाराय, त्याचा नातु ( १५ ) पृथ्वीकोंगणी, त्याचा मुलगा (१६) मलदेव, त्याचा ( १७ ) गंडदेव. यानें कांचीकर पल्लवांपासून खंडणी घेतली व चोलांचाहि पराभव केला. त्याचा पुत्र ( १८ ) सत्यवाक, त्याचा भाऊ ( १९ ) गुणात्तम, त्याचा भाऊ ( २० ) मलदेव. हा या घराण्यांतील शेवटचा राजा. मरकारा ताम्रपटावरून या घराण्यास खि. श. च्या पहिल्या शतकापासून प्रारंभ होतो; परंतु फ्लीट याचें म्हणणें दहाव्या शतकापासून होतो. सारांश यांचा काल अस्पष्ट आहे. या घराण्यास होयसल बल्लाळांनीं ( १०८० चा सुमार ) जिंकिलें व दळवनपुरास राजधानी केली. दळवनपूर म्हणजे तलकाड होय. म्हैसूर राज्यांत नीलगिरीच्या माथ्यावर हें गांव आहे. विजयानगरचें साम्राज्य नष्ट झाल्यावर एका गंगराजानें दळवनपूरच्या ईशान्येस शिवसमुद्र येथें एक लहानसें राज्य स्थापिलें, त्याचा नाश १७ व्या शतकाच्या आरंभीं झाला. ते आपणांस महाधिराय म्हणवीत [ इंडि. अँटि. पु. १ ते ४; सालेम डिस्ट्रिक्ट मॅनुअल; फ्लीट-कानडी डिनॅस्टीज. ]

**दळवाई**—म्हैसूर वडेयर राजघराण्याच्या सेनापतींना दळवाई ही पदवी असे. हे फार प्रबळ असत. ही सेनापतीची जागा बहुधा एकाच घराण्यांत पुष्कळ दिवस चालू होती. राजा दुर्बळ असल्यास सैन्याच्या जोरावर राज्याचा सर्व कारभार हे दळवाईच पहात. दोड्ड कृष्णराज मेल्यावर हे विशेष प्रसिद्धीस आले. यांनीं मुसुलमानांपासून आपल्या राज्याचें बरेच दिवस रक्षण केलें होतें. पहिल्या कृष्णराजाच्या नंतर तीन दळवाई भावांनींच राज्य संभाळलें होतें. हे दळवाई बहुधा राजघराण्यांतील असत. राजाखालोखाल हेच राज्यांतील मुख्य अधिकारी असत. मारनायक नांवाच्या एका दळव्यानें बंड केल्यामुळे कांहीं दिवस ही जागा खालसा केली होती. परंतु हैदरअलीनें राज्य बळकावण्यापूर्वी कांहीं दिवस दळवाईची नेमणूक पुन्हां अंमलांत आली. करिकल मल्लराजय या दळवाईनेंच पुढें हैदरास मदत करून वडेयर घराणें नामशेष केलें. त्यावेळीं देवराजकर्फ नंदराज नांवाचा दळवी फार प्रख्यात होता. त्याच्याच हाताखालीं हैदर होता. पुढें हैदरानें आपल्या मालकाला एकीकडे बसवून कांहीं दिवस आपणच दळवाईपण भोगिलें व शेवटीं राजास पदच्युत करून गादी बळकाविली. राजघराण्यांतलि दळवाई न नेमतां बाहेरचे नेमल्यास राज्याचा फायदा होई; राजघराण्यांतील दळवाई राजांनां चैनींत गुंगवून आपण कारभार बळकावीत. ही गोष्ट ताडून कंठीरव नरसा नांवाच्या एका राजानें बाहेरचे दळवाई नेमण्याची वहिवाट पाडली होती. जुलमी दळव्यांत कंठय, नंजराज ( नंदराज ),बसव, दुसरा नंज व वीरराज हे प्रमुख होते. यांच्या हातीं इतकी सत्ता ( लष्कराच्या बळावर ) होती कीं, यांनां राजकर्ते ( किंग मेकर ) म्हणत. [ विल्क्स—हिस्ट्री ऑफ म्हैसूर; प्यालेस हिस्ट्री; अय्यंगार—एन्शन्ट इंडिया. ]

**दक्ष**—याचा रूढ शब्दार्थ ' लक्षपूर्वक काम करणारा हुषार ' असा आहे. पुराणांत दक्ष हा ब्रह्मा याचा एक पुत्र व प्रजापतींपैकीं एक असें सांगितलें आहे. दक्षाबद्दल उल्लेख ऋग्वेद, शतपथ ब्राह्मण, रामायण, महाभारत व अनेक पुराणांत आहे; व त्याच्याबद्दलच्या कथांत थोडा फार फरक आहे. त्याची बायको प्रसूती ही मनूची नात असून त्यांना चोवीस, पन्नास किंवा साठ कन्या होत्या असा निरनिराळा उल्लेख आढळतो. या कन्यांपैकीं दहा धर्माला, तेरा कश्यपाला दिल्या व त्यांच्यापासून देव, दैत्य, मानव, पक्षी, सर्प इतर प्राणी उत्पन्न झाले. सत्तावीस कन्या चंद्राला व एक सती नांवाची शिवाला दिली. पुढें हा दक्ष एकदां कैलासास गेला असतां शंकरानें त्याचा सत्कार केला नाहीं त्यामुळें यानें त्याची फार निंदा केली व त्या दिवसापासून दक्ष त्याचा व सतीचा द्वेष करूं लागला.

दक्षानें यज्ञ केला त्यांत शिवाला निमंत्रण दिलें नाहीं. त्यामुळें रागावून शिवानें यज्ञाचा विध्वंस केला व दक्षाला शाप दिला.दक्षाला ठार मारलें असेंहि कांहीं पुराणांत आहे. हरिवंशांत असें सांगितलें आहे कीं, या भांडणांत विष्णु पडला व त्यानें शिवाची समजूत केली. या कथेचें मूळ तैत्तिरीय संहितेंत असून रामायण, महाभारत व पुराणें यांत ही कथा विस्तृत आहे. शिवाच्या शापामुळें दुसऱ्या मन्वंतरांत दक्ष पुन्हां जन्मला व त्याला क्रोध, तमस, दम, विकृत, अंगिरस, कर्दम व अश्व असे सात मुलगे झाले. दक्ष हा अठरा स्मृतिकारांपैकीं एक आहे असें मानतात.

याशिवाय प्राचेतस नांवाचा एक दक्ष होता. तो उत्तानपादवंशीय प्राचीनबर्हि राजाचा नातु व दहा प्रचेत्यांचा पुत्र असल्यामुळें त्यास प्राचेतस म्हणत. हा पूर्वीच्या दक्षाचाच अवतार होता असें म्हणतात. याला हर्यश्वप्रमुख दहा हजार पुत्र झाले. नारदानें त्यांनां ब्रह्मतत्त्वोपदेश करून निवृत्तिपर बनविल्यामुळें यानें दुसरे दहा हजार पुत्र निर्माण केले. परंतु नारदानें त्यांनांहि संसारपराङ्मुख केलें. तेव्हां त्यानें नारदास देहपाताचा शाप दिला [ मत्स्य, भागवत व इतर पुराणें. ]

दक्षिण व्युत्पत्ति.—दख्खन, हा संस्कृत 'दक्षिण' या शब्दाचा अपभ्रंश होय. नर्मदेच्या दक्षिणेकडील सर्व हिंदुस्थान म्हणजे सामान्य अर्थी दख्खन. संस्कृत ग्रंथांत 'दक्षिणापथ' शब्द विशेष येतो; पेरिप्लसचा कर्ता यास दखिनबदेश म्हणतो व फाहिआन (५ वें शतक) ताक्षिन असें म्हणतो.

व्याप्ति.—नर्मदेच्या दक्षिणेकडील सर्व हिंदुस्थानास पूर्वी दक्षिणापथ म्हणत. प्राचीन चेर, चोल, पाण्ड्यादि राज्यांचा समावेश दक्षिणापथांत केल्याचा उल्लेख मार्कंडेय (५७.४५), मत्स्य (४५. १२४), वायु (११२. ४६), महाभारत (सभापर्व, ३१. १७) वगैरे पुराणांत आढळतो. सहदेव दक्षिणापथांत आला होता. अलीकडील कालांत नर्मदा-कृष्णा दुआबास (अगदीं पूर्वेकडील भाग वगळून) हा शब्द लावितात; म्हणजे मराठी भाषा चालणारा प्रांत यानें दर्शविला जातो. गोदावरी-कृष्णादुआबासहि हें नांव देतात; रत्नकोशांत, महाराष्ट्रदेश हा वैदर्भ, तापीतट, नर्मदातट व कोंकणापासून निराळा असल्याचें म्हटलें आहे. संकुचितार्थी हल्लींचा महाराष्ट्र म्हणजे दख्खन व या अर्थाला अनुसरूनच पुढील माहिती दिली आहे.

आर्यांच्या वसाहती.—आर्यांनीं पूर्व अफगाणिस्तान, पंजाब, ब्रह्मावर्त अशा क्रमानें उत्तरहिंदुस्थानांत वसाहती केल्या. पुष्कळ काळपर्यंत त्यांची दक्षिणमर्यादा विंध्यपर्वत असावी. मनूनें (२.२३) व पतंजलीनें (२.४.१०) हिमविंध्यमध्यदेशालाच आर्यावर्त म्हटलें आहे. प्रथम विंध्य ओलांडून दक्षिणेंत येणारा आर्य अगस्तिऋषि होय. सूर्याला अडथळा करणाऱ्या विंध्यास त्यानें नमस्कार घातला असतां मी परत येईपर्यंत तूं निजलेलाच रहा, वाढूं नको, असें अगस्तीनें सांगितलें, अशी जी कथा आहे तिचा अर्थ असा असावा. त्यानें विदर्भराजाची मुलगी आपणास केली होती; यावरून आर्योंची दक्षिणेकडील पहिली वसाहत विदर्भ (वऱ्हाड)ची होय. रामायणांत सुग्रीवानें सीताशुद्धीसाठीं वानरांना जो मार्ग सांगितला, त्यांत दक्षिणेकडील देशांस विदर्भापासूनच प्रारंभ केला आहे. पंचवटी (सांप्रतचें नाशिक) ही अगस्त्याश्रमापासून गोदातटीं दोन योजनांवर होती. उत्तर हिंदुस्थानांत व नर्मदा-गोदादुआबांत आर्यांनीं आपली संस्कृति अनार्यांवर लादली; परंतु गोदावरीच्या खालीं त्यांना ती लादतां आली नाहीं; त्यामुळें कानडी, तेलगु, तामील वगैरे संस्कृती (त्यांच्या भाषांसह) तशाच राहिल्या. याचें कारण बहुधा असें असावें कीं, या लोकांची समाजघटना व शासनसंस्था आर्यांचा इकडे प्रसार होण्यापूर्वीच अस्तित्वांत आल्या असाव्यात.

वसाहतींचा काळ.—आर्यांनां खि. पू. ७व्या शतकाच्या पूर्वी दख्खनची माहिती नव्हती असें डॉ. रामकृष्णपंत भांडारकरांचें मत आहे. आर्यांनीं विंध्य न ओलांडतां प्रथम पूर्व बाजूनें ते हल्लींच्या उत्तरसरकारप्रांतापर्यंत आले व मग विदर्भ, दंडकारण्य वगैरे भागांत पसरले. खि. पू. ३५० च्या पूर्वीच तंजावरमदुराप्रांत त्यांनां माहीत झाला. पाणिनि दख्खनचा उल्लेख मुळींच करीत नाहीं; कात्यायन नासिक्य शहराचा स्पष्ट उल्लेख करतो (६.१, ६३); पतंजलीला तर चांगलीच माहिती होती. तो माहिष्मती(म्हैसूर किंवा महेश्वर), वैदर्भ (वऱ्हाड), कांचीपुरम् (कांजीवरम्), केरळ (मलबार), इत्यादि नांवें घेतो. पतंजलीचा काल साधारण खि. पू. १५०, पाणिनीचा खि. पू. ७ वें शतक आणि कात्यायनाचा खिस्त पू. ४ थें शतक असा धरितात. त्यावरून पाणिनि व कात्यायन यांच्या दरम्यान आर्यांनीं दख्खनमध्यें वसाहती केल्या असें दिसतें.

अशोकाचे लेख.—अशोकाच्या शिलाशासनांत दख्खनमधील नांवें येतात (खि. पू. ३ रें शतक). रास्टिक (राष्ट्रीक, राष्ट्रकूट), पेटनिक (पेठणचे), अपरांत (उत्तरकोंकण) या लोकांकडे अथवा प्रांतांमध्यें त्यानें धर्मप्रसारक पाठविले होते. राष्ट्रकूट हे महाराष्ट्रांत होते; यांनींच पुढें सौंदत्ती, मालखेड वगैरे ठिकाणीं राज्यें स्थापिलीं. हेच मूळचे रट्ट होत. त्यांनीं नंतर आपणांस महारट्ट म्हणविलें; त्यांचा देश तो महाराष्ट्र. भोजांचा व महाभोजांचाहि उल्लेख त्यावेळीं आढळतो. यावरून पतंजलीपूर्वी शेंदोडशें वर्षें उत्तरहिंदुस्थानचा दख्खनशीं संबंध येत होता असें दिसतें.

मौर्य.—खिस्तपूर्व महाराष्ट्राचा साधार इतिहास उपलब्ध नाहीं. पुराणांतील राजवंशावळीचा स्पष्ट बोध होत नाहीं. मौर्य चंद्रगुप्ताचें (खि.पू. ३२०) राज्य काठेवाडपर्यंत होतें. तर त्याचा नातु अशोक याचें सोपारा, म्हैसूर, मोंगलाई (निजामाचें राज्य) पर्यंत पसरलें होतें.

मध्यकाल.—मौर्यांनंतर पुढील राजांचीं नांवें शिलालेख व नाणीं यांच्यावरून आढळतात. (१) कृष्णराज, (२) सिमूकशातवाहन, (३) शातकर्णी, (४) क्षहराट नहपान व त्याचा जांवई, (५) उषवदात, (६) गोतमीपुत्र शातकर्णी, (७) वासिष्ठीपुत्र पुलुमायी, (८) गोतमीपुत्र श्रीयज्ञ शातकर्णी, (९) वासिष्ठीपुत्र चतुष्पर्ण शातकर्णी, व (१०) माधरीपुत्र शकसेन वगैरे. क्षहराट हा शक किंवा पल्हव असून शातकर्णी व गोतमीपुत्र शातकर्णी यांच्या दरम्यान या शकांची सत्ता महाराष्ट्रांत होती.

शातवाहन.—पुराणांत ज्यांनां आंध्रभृत्य म्हणतात तेच वरील शिलालेखांतील शातवाहन होत. उत्तरहिंदुस्थानांतील काण्वराजवंशानंतर सिप्रक अथवा शिसूक, (सिमूक शातवाहन?) यानें आपला राजवंश स्थापिला, त्यासच आंध्रभृत्य म्हणतात. पुराणांतील या आंध्रभृत्यांच्या याद्यांतील मोठमोठे राजे शिसूक, कृष्ण, शातकर्णी, गोतमीपुत्र, पुलिमत, शिवश्री नांवाचे आहेत. यांचीं व वरील कृष्णराज, सिमूक वगैरेंचीं नांवें एकच होत. यावरून आंध्रभृत्य व शातवाहन हे एकच असावेत. यांचा अंमल खि. पू. ७३ ते इ. सन २१८ पर्यंत महाराष्ट्रांत होता (मध्यंतरीं थोडे दिवस शक

आले होते ). शातवाहनांच्या राजवटींत महाराष्ट्र संपन्न होतें. शातवाहन हेच शालिवाहन होत. हें नांव घराण्याचें आहे; एका राजाचें नव्हे. परंतु हें लक्षांत नराहल्यानें बराच घोटाळा होऊन शालिवाहनाच्या दंतकथा प्रचारांत आल्या. यांच्या वेळीं वाङ्मयाची वाढ होत होती व बौद्ध आणि वैदिक हे दोन्ही धर्म भरभराटींत होते. व्यापारहि भरभराटला होता. मुसुलमान व पाश्चात्य लोक भडोच, सोपारें, चौल वगैरे बंदरांमार्फत देशांतील पैठण, तगर या राजधान्यांशीं मलमल, ओनिक्स दगड, कापड वगैरे वस्तूंचा व्यापार करीत. लोक सधन असल्यानें चैत्य, लेणीं, देवळें वगैरे इमारती बांधण्याकडे पैशाचा विनियोग होई. कार्लें येथील लेणें वैजयंतीच्या ( बनवासी ) एका शेठ्यानें तयार करविलें. कोष्टी, गंधी, तेली, भुसारी वगैरे लोकांचे संघ व पंचायती असत. व्याजाचा दर पांचपासून साडेसात टक्क्यांपर्यंत असे; ग्रामपंचायती वाढीस लागल्या होत्या; नाशिकच्या एका शिलालेखांत निगमसभेचा ( हल्लींच्या म्युनिसिपालिटीसारखी ) उल्लेख आहे. दळणवळण व प्रवास त्यावेळीं त्रासाचा नव्हता. कारण वैजयंतीचा सावकार व सोपाऱ्याचे लोक यांच्या देणग्यांचा उल्लेख कार्ल्यांच्या लेण्यांत आहे तर उत्तरहिंदुस्थानांतील व सिंधमधील दात्यांचा उल्लेख नाशिक लेण्यांत आहे. तसेंच कऱ्हाडकर व नाशिककर दात्यांचीं नांवें भेलसा, बरहुत येथील स्तूपांवर कोरलीं गेलीं आहेत. दळणवळण त्रासाचें असतें तर ही गोष्ट घडली नसती.

अभीरादि राजवंश —आंध्रभृत्यानंतर व सहाव्या शतकांतील चालुक्यांच्या पूर्वी, म्हणजे या ३०० वर्षांच्या अवधींत, दख्खनवरील राजवंशाची माहिती अंधुक आहे. यावेळीं आंध्रभृत्यांच्या एका शाखेंत सात राजे झाले होते असें मत्स्य व वायुपुराणें म्हणतात. या सुमारास क्षत्रप राजेहि झाले होते; त्यांचा पहिला राजा विजयसाह ( इ. स. २२२ ) व शेवटचा विश्वसाह ( ३०२ ) यांचीं नाणीं सांपडलीं आहेत. याच वेळीं अभीर ( गवळी ) राजांनीं ६७ वर्षे राज्य केल्याबद्दल वायुपुराण सांगतें. आणखीहि किरकोळ राजवंशांची माहिती पुराणांत आढळते; परंतु ती फार घोटाळ्याची आहे. भोज, रठी, महारठी वगैरे घराणींहि प्रख्यातीस आलीं होतीं. या रठ्ठांनीं आपला एक संघ ( कूट ) स्थापन करून ( राष्ट्रकूट ) बराच प्रदेश आक्रमिला होता. क्षत्रपानंतर व जयसिंह चालुक्याच्या राज्यस्थापनेपूर्वी ( तिसऱ्या शतकाच्या अखेरीपासून सहाव्याच्या प्रारंभापर्यंत ३०० वर्षे ) या राष्ट्रकूटांचीच सत्ता दख्खनवर होती.

प्राचीन राष्ट्रकूट.—या तीनशें वर्षे राज्य करणाऱ्या प्रथमच्या राष्ट्रकूटांचाहि इतिहास अस्पष्ट आहे. यांच्या वेळीं उत्तरकानड्याकडे कदंबांचें राज्य होतें व त्यांची राजधानी बनवासी होती. या राष्ट्रकूटांचा शेवटचा राजा कृष्णपुत्र इंद्र होता, त्याला अयोध्येकडून आलेल्या जयसिंह चालुक्यानें जिंकून तेथें आपलें राज्य स्थापिलें ( ५५० ).

पूर्व चालुक्य ( ५५१-७५३ ).— जयसिंहानें आपलें राज्य बरेंच वाढविलें. त्यानंतर या घराण्यांत पहिला पुलकेशी, कीर्तिवर्मा, मंगलीश, दुसरा पुलकेशी ( हा दख्खनचा सार्वभौम होता ) वगैरे प्रख्यात राजे झाले. या पुलकेशीच्या वेळींच चिनी प्रवाशी ह्युएनत्संग दख्खनमध्यें आला होता. त्यानें त्यावेळच्या भरभराटलेल्या महाराष्ट्राचें वर्णन केलें आहे. कनोजच्या प्रख्यात हर्षवर्धनाला दख्खन कांहीं ( पुलकेशीच्या पराक्रमामुळें ) जिंकतां आलें नाहीं. याचा मुलगा विक्रमादित्य याच्या वेळीं दख्खनमधील पल्लव, चेर, चोल, पाण्ड्य हे स्वतंत्र बनत चालले होते ( ७५३ ). या घराण्यांतील शेवटचा राजा दुसरा कीर्तिवर्मा याला दंतिदुर्ग राष्ट्रकूटानें जिंकलें. या घराण्यांत १९ राजे झाले. या चालुक्यांच्या राजवटींत जैनधर्मास फार महत्त्व आलें होतें; बौद्धधर्मास उतरती कळा लागून वैदिक ब्राह्मणीधर्मास पुन्हां सुरवात झाली. खुद्द सार्वभौम पुलकेशीनें अश्वमेध केला होता. पुराणांचें महत्त्व वाढून पौराणिक देवतांचीं देवळें बांधिलीं गेलीं. [ चालुक्यघराणें, तेरावा विभाग पहा. ]

उत्तर राष्ट्रकूट ( ६००-९७३ ).— दंतिदुर्गानें कांची, कलिंग, कोसल, मालव वगैरे देश जिंकून तो दख्खनमध्यें सार्वभौम बनला. त्याच्या पूर्वीहि याचे पूर्वज राजे होते. याच्या मागून कृष्णराज, ध्रुवराज, तिसरा गोविंद ( हा फार पराक्रमी होता; यानें माळव्यापासून कांचीपर्यंत सर्व देश जिंकून सार्वभौमत्व धारण केलें-सन ८०० ), कृष्ण अकालवर्ष ( आंध्र, कलिंग, गांग, मगधादि राजे जिंकून हाहि सार्वभौम बनला ), तिसरा अमोघवर्ष, तिसरा कृष्ण (याला सर्व हिंदुस्थानांतील राजे घाबरत) वगैरे पुरुष प्रख्यात झाले. या वंशांतील शेवटचा राजा कक्कल याला तैलप्प चालुक्यानें जिंकून पुन्हां चालुक्यांची सत्ता दख्खनवर स्थापिली ( ९७३ ). हे राष्ट्रकूट बलवान होते. वेरूळचीं लेणीं त्यांच्याच वेळचीं होत; त्यावरून त्यांचें वैभव दिसून येईल. बौद्धांचीं कान्हेरी येथील लेणींहि यांच्या वेळींच झालीं. ब्राह्मणीधर्म या राजवटींत पुष्कळ भरभराटीस आला; जैनधर्माचीहि थोडी प्रगति झाली. अरबांचे बल्हारा राजे म्हणजे हे राष्ट्रकूटच होत.

उत्तर चालुक्य ( ९७३--११५७ ).—पूर्व चालुक्यांचा शेवटचा राजा दुसरा कीर्तिवर्मा व उत्तर चालुक्यांचा पहिला तैलप्प यांच्या मधील ( ७५३-९७३ ) दोनशें वर्षांची या घराण्याची हकीकत अज्ञात आहे. तैलप्प हा फार पराक्रमी होता, त्यानें उत्तरेकडीलहि देश जिंकले होते. त्याच्या नंतर पुढील राजे प्रख्यातीस आले: जगदेकमल्ल ( यानें सप्तकोंकण जिंकिलें ), सोमेश्वर, विक्रमादित्य सहिला ( हा सार्वभौम असून त्यानें पन्नास वर्षे राज्य केलें, आपल्या नांवाचा शक सुरू केला, याच्या वेळीं रात्रीं घरें उघडीं टाकून लोक निजत इतकी प्रजा सुखी असे, याचें वर्णन बिल्हणानें असें केलें आहे. हा विज्ञानेश्वर याचा समकालीन होता) व तिसरा

सोमेश्वर. शेवटचा राजा दुसरा तैलप्प हा दुर्बळ होता. त्याचा सेनापति कलचुरी वंशाचा विज्जल यानें त्याचें राज्य बळकाविलें; तेव्हां तो अण्णेगिरीस पळून गेला ( ११५७ ).

कलचुरी ( ११५७—११८२ ).—कलचुरी ऊर्फ हैहय हे मूळचे जवलपुराकडील, चेदीदेशचे रहिवाशी. दख्खनमधील कल्याण येथें या कलचुरींपैकीं एका कृष्णराजानें गादी स्थापिली. त्याचा मुलगा जोगम, त्याचा परमर्दिन व त्याचा विज्जल. यानें दुसऱ्या तैलप्पाचें राज्य बळकाविलें; याचा प्रधान बसव होता; त्यानें लिंगायत पंथाची स्थापना करून विज्जलाला ठार मारून गादी बळकाविली (११६७). पुढें कलचुरींचा शेवटचा राजा संगम याच्यापासून दुसऱ्या तैलप्पाचा मुलगा चवथा सोमेश्वर यानें आपलें राज्य हिसकावून घेतलें. (११८२). या कामीं त्याचा ब्राह्मण सेनापति ब्रह्मदेव यानें फारच खटपट केली. पुढें थोड्याच दिवसांत उत्तरेचा भिल्लम यादव व दख्खनचा वीर बल्लाळ यादव उदयास आले: दोघेहि ब्रह्मदेवाबरोबर लढले; त्यांत वीर बल्लाळास यश येऊन त्यानें सोमेश्वर चालुक्याला हुसकावून लाविलें ( ११९० ).

उत्तर चालुक्य व कलचुरी अमदानींत धार्मिक व सामाजिक स्थिति पालटली. बौद्धधर्माचे शेवटचे अवशेष या काळांतील आहेत. व्यापारीवर्गांत लिंगायतधर्म जास्त पसरला व त्यामुळें त्यांचा पूर्वीचा जैनधर्म बराचसा लुप्त झाला. स्मृतीपुराणें यांवरील टीका याच वेळीं झाल्या.

देवगिरीकर यादव ( ११८७—१३२४ ).—यांचा मूळपुरुष सुबाहु हा द्वारकेकडे होता. त्याचा मुलगा दृढप्रहार. त्याची राजधानी चांदा ( मध्यप्रांत ) किंवा चांदोर ( नाशिक जिल्हा ) येथें होती. त्याचा पुत्र सेऊणचंद्र हा देवगिरी( दौलताबाद )चा पहिला राजा ( ८०० ) दृढप्रहारापासून ब्रह्मदेवाशीं लढणाऱ्या भिल्लमापर्यंत २२ पुरुष झाले. हे प्रथम चालुक्यराष्ट्रकूटांचे मांडलिक होते; विज्जलाच्या गडबडींत ते स्वतंत्र बनले. भिल्लमानें सोमेश्वराच्या दुबळेपणाचा फायदा घेऊन कृष्णेच्या उत्तरेकडील चालुक्यांचा सर्व प्रांत बळकाविला व देवगिरीस गादी स्थापिली ( ११८७ ). याची सरहद्द दक्षिणेच्या होयसळ यादवांच्या प्रांतांशीं भिडल्यानें देवगिरीकर व द्वारसमुद्रकर यादवांच्या झटापटी नेहमीं सुरू असत. भिल्लमाचा नातु सिंघण यानें द्वारसमुद्रकरांपासून दक्षिण कोंकण व दक्षिण महाराष्ट्र जिंकला; त्यानें अनेक ( दक्षिण उत्तरेकडील ) राजे जिंकून तो सार्वभौम बनला. याच्यावेळीं विद्येला पुष्कळ उत्तेजन मिळालें: खुद्द त्यानेंहि कांहीं ग्रंथ केले. त्याचा मुलगा कृष्ण हाहि फार शूर होता, त्यानेंहि अनेक राज्यें पादाक्रांत केलीं. त्याचा पुत्र प्रख्यात रामदेव; याचें राज्य म्हैसूरपर्यंत खालीं पसरलें होतें. मराठी भाषेच्या वाग्विलासास याच्या वेळीं प्रारंभ झाला. ज्ञानेश्वर, बोपदेव, हेमाद्रि वगैरे ग्रंथकार व मानभावपंथ याच्या वेळींच प्रसिद्धीस आले. दख्खनच्या स्वतंत्र राजांमध्यें हाच शेवटचा राजा होय. याच्यावर अल्लाउद्दीन खिलजीनें स्वारी केली; तेव्हां यानें धीर सोडून त्याच्याशीं खंडणी देण्याबद्दलचा तह केला ( १२९४ ); या वेळीं अल्लाउद्दीनानें अगणित संपत्ति नेली. रामदेवाच्या पश्चात् त्याचा मुलगा शंकरदेव यानें खंडणी पाठविण्याचें बंद केल्यानें मलिक काफरनें स्वारी करून देवगिरींचें राज्य बुडाविलें (१३२४). रामदेवाचा जांवई हरपाळदेव यानें मध्यंतरीं आपलें स्वातंत्र्य प्रस्थापित केलें होतें, परंतु मुसुलमानांनीं त्याचा पराभव केला व दख्खन आपल्या राज्यांत समाविष्ट केली.

कोल्हापूरचे शिलाहार.—शिलाहार ( शेलार ) नांवाचीं तीन घराणीं दख्खनमध्यें निरनिराळ्या ठिकाणीं राज्यें करीत होतीं. हे आपल्यास तगरपुरवराधीश्वर म्हणवीत, त्यावरून त्यांची राजधानी तगर येथें असावी. रा. राजवाडे यांच्या मतें हें तगर म्हणजे हल्लींच्या निझामाच्या राज्यांतील तावरगिरी होय. शिलाहारांचीं तीन महामंडलेश्वर घराणीं राष्ट्रकूट राजांच्या अमदानींत स्थापन झालीं. एक उत्तर कोंकण, दुसरें दक्षिण कोंकण व तिसरें कोल्हापुर, मिरज वगैरे भागांवर राज्य करीत असे; यांत कोल्हापूरकर शिलाहार पुढें प्रबळ झाले

याप्रमाणें चोल, आंध्र, सातवाहन, चालुक्य, राष्ट्रकूट, यादव, कदंब, शिंद वगैरे राजघराणीं दख्खनमध्यें झालीं. मुसुलमानी झाल्यावर महंमद तुघ्लकाच्या वेळीं दख्खन पूर्णपणें त्यांच्या ताब्यांत गेलें; पण थोड्याच दिवसांत बंड होऊन ब्राह्मणी राज्य स्थापिलें गेलें व त्यामुळें दिल्लीकरांचा अम्मल नर्मदेच्या खालीं नाहींसा झाला. ब्राह्मणी राज्यस्थापनेच्या सुमारासच विजयानगर येथें एक हिंदूंचेहि मोठें राज्य स्थापन झालें.

ब्राह्मणी राजांनी तेलंगणच्या राज्यांतील प्रदेश घेऊन १३७३ सालीं गोवळकोंड्यापर्यंत, स. १४२१ त वारंगळपर्यंत व १४७२ सालीं बंगालच्या उपसागरापर्यंत आपलें राज्य वाढविलें. पण स. १४८२ पासून हें राज्य विस्कळित होण्यास सुरवात होऊन, अखेर विजापूर, गोवळकोंडा, अहमदनगर, वेदर व वऱ्हाड अशीं त्याचीं पांच राज्यें झालीं. दक्षिणेकडे असलेलें विजयानगरचें मोठें हिंदू राज्य मुसुलमानांनीं आपसांत एकी करून १५६५ सालीं मोडून टाकिलें. ब्राह्मणी राज्यापासून झालेल्या पांच राज्यांपैकीं वेदर व वऱ्हाडचीं राज्यें स १६३० पूर्वीच नाहींशीं झालीं; उरलेलीं तीन राज्यें अकबर, शहाजहान व अवरंगझेब यांनीं जिंकून दिल्लीस जोडलीं. याप्रमाणें दख्खनमध्यें पुन्हां दिल्लीचा अंमल सुरू झाला; पण तो फार वेळ टिकला नाहीं. शिवाजी महाराजांनीं मराठी राज्याची स्थापना केली व १७०६ सालीं मराठ्यांनीं दक्षिणेंत खंडणी वसूल करण्याचा हक्क संपादन केला. पुणें येथें पेशव्यांचें वर्चस्व स्थापित झालेलें होतें. निजामउल्मुल्कानें दक्षिणेंतील मुसुलमानांच्या मदतीनें

हैद्राबाद येथें राज्य स्थापन केलें. बाकीचा प्रदेश तुंगभद्रेच्या दक्षिणेस किंवा उत्तरेस असेल त्याप्रमाणें निजाम किंवा पेशवे यांच्या वर्चस्वाखालीं असे. हैदरअल्ली यानें म्हैसूर येथें राज्य स्थापिलें. त्रावणकोरचें संस्थान अगदीं एकीकडे असल्यामुळें बहुतेक स्वतंत्र होतें. पोर्तुगीज, डच, फ्रेंच व इंग्रज यांनीं किनाऱ्यावर वस्ती केली होती. दक्षिणेंत झालेल्या भांडणांत फ्रेंच व इंग्रज विरुद्ध पक्षास मदत करीत. त्यांत अखेर इंग्रजांची सरशी होऊन हैद्राबाद येथें त्यांचें वर्चस्व स्थापन झालें. म्हैसूरच्या टिप्पू सुलतानचा त्यांनीं मोड केला व १८१८ सालीं पेशव्यांचें राज्य खालसा केलें. नागपूरच्या भोंसल्यांचें राज्य १८५४ सालीं खालसा झालें. हल्लीं दख्खनमध्यें मद्रास इलाखा, मध्यप्रांत, मुंबईइलाख्याचा कांहीं भाग आणि हैद्राबाद, म्हैसूर व दुसरीं देशी संस्थानें यांचा समावेश होतो.

याच्यांतील सह्याद्रि हा पर्वत मोठा असून तो थेट कन्याकुमारीपर्यंत गेला आहे. तो ४ हजार फुटांपेक्षां जास्त उंच आहे. पूर्वघाटहि थेट कारोमांडल किनाऱ्याभर पसरला असून तो व सह्याद्रि हे दोन उत्तरेस विंध्य पर्वतास जोडले गेले आहेत. पूर्व घाटाची सरासरी उंची १५०० फूट आहे.

पश्चिमेपेक्षां पूर्व बाजू जास्त सखल असल्यामुळें दख्खनमधील गोदावरी, कृष्णा, कावेरी ह्या मुख्य नद्या पश्चिम घाटांत उगम पावून पूर्वेकडे वहात जातात व पूर्व घाटांतून रस्ता काढून बंगालच्या उपसागरास मिळतात. पूर्वघाट व समुद्र यांच्यामधील जमीन थोडी उतरती असून ती गाळाची बनलेली आहे; पण पश्चिम घाट आणि समुद्र यांच्यामधील प्रदेश चढउताराचा असून त्यांत पश्चिम घाटाचे पुष्कळ फांटे आलेले आहेत. महाराष्ट्राचा प्रदेश साधारण डोंगराळ आहे; बाकीचा प्रांत सुपीक आहे.

[ महाभारत; मनुस्मृति; पातंजलमहाभाष्य; भांडारकरांची हिस्टरी ऑफ डेक्कन; अशोक इन्स्क्रिप्शन्स; वायु–मत्स्य–भागवतपुराण; इंडियन अँटि. पु. २, ५, ८; आर्किआलॉजिकल सर्व्हे, वेस्टर्न इंडिया, पु. ९, १०; रासमाला; विल्हणकृत विक्रमांकचरित्र; हेमाद्रि-व्रतखंड; इलियट; डॉसन; फेरिस्ता; डफ. ]

**दक्षिण अमेरिका**, खंडाची वाढ.—प्राचीन भूपृष्ठरचना सध्यां आहे त्यापेक्षां निराळी होती असें भूशास्त्रवेत्त्यांचें मत आहे. सर्वांत मोठें खंड रिओडिला प्लाटा नदीपासून अमेझॉन नदीपर्यंत होतें. व अमेझान खोऱ्याच्या उत्तरेस दुसरें खंड होतें. फॉकलंड बेटापासून सांप्रतच्या खंडाच्या पश्चिम बाजूस बराच द्वीपसमूह होता. कॅंब्रियन काळाच्या शेवटीं खंडाची वाढ होऊन पुष्कळ बेटें एकत्र झालीं. डेव्होनियन काळांत अधिक वाढ झाली. पर्मियन काळांत पॅराग्वे व ब्राझील यांत बराच फेरबदल झाला. क्रेटेसियस (सितोपल) युगांत याचा बराचसा भाग पाण्याखालीं गेला. तृतीय युगाच्या आरंभकाळांत पुन्हां बराच फरक होऊन एक भूखंड वर आलें. त्यावेळीं अंटार्क्टिक व फॉकलंड हीं बेटें त्या खंडास व दक्षिण अमेरिका, न्यूझीलंड व ऑस्ट्रेलिया यांनां जोडलेलीं होतीं. परंतु याच तृतीय युगाच्या शेवटीं अनेक भूपृष्ठविषयक फेरबदल होऊन त्या खंडाला सध्याचें वरेंचसें स्वरूप प्राप्त झालें. प्लिओसीन युगांत दक्षिण भाग अंमळ सखल असून त्यावर समुद्र असावा.

भूपृष्ठवर्णन.—या खंडाचा पश्चिम भाग उतरता आहे. व्हालपॅरेसोपासून पनामाच्या संयोगीभूमीपर्यंत म्हणजे ३००० मैलांपर्यंत अँडीझ पर्वतांची रांग असून त्याचा तळ १०००० फूट समुद्राखालीं खोल आहे.

जमीनीचे खालीलप्रमाणें मुख्य भाग पाडतां येतील. (१) अँडीयन पर्वतांची रांग व पॅसिफिकमधील सपाट मैदान, (२) ब्राझीलचें पठार, (३) ग्वायना व्हेनेझुएलाचें पठार, (४) ओरिनोको, अमेझान व पॅराग्वे या नद्यांच्या कांठीं असलेला सपाट प्रदेश पश्चिम किनाऱ्यावरील प्रदेश रमणीय आहे. केपहार्नपासून पनामा संयोगीभूमीपर्यंत कॉर्डीलेरापर्वत पसरलेला आहे. दक्षिणेकडे खाडया व लहान लहान बेटें आहेत. उत्तर टोंकाजवळ कार्डीलरोडचे तीन भाग पडतात. या पर्वतांचीं कांहीं शिखरें फार उंच आहेत. त्यांपैकीं अकामकाग्वा २३०८० फूट व मर्सेडरीओ १७५०० फूट उंच आहे.

अँडीजपर्वतांपैकीं कोटोपॅक्सी, टंगुराग्वा मैपो व सॅगाई हीं शिखरें जगांतील सर्वांत उंच व सध्यां जागृत असलेले ज्वालामुखी असून पर्वतांत बऱ्याच हिम नद्या आहेत. पूर्व किनाऱ्यावर जगांतील अत्युत्तम बंदरें आहेत. त्यांत रिओडीजॅनेरो, सँटोस व व्हिक्टोरिया हीं प्रसिद्ध आहेत. सेराडोमार नांवाची पर्वताची रांग उत्तरेस व पश्चिमेस पसरली आहे. पश्चिमेकडील भागास ब्राझिलियन उंचवट्याचा प्रदेश म्हणतात. याचें सर्वांत उंच शिखर इटटीआया हें असून त्याची उंची ९८२३ फूट आहे. अंब्रोल्हास बेटापासून केपसेंटरॉकपर्यंत बरेच पोवळ्याचे खडक आहेत. अमेझॉन नदीच्या मुखाच्या उत्तरेचा प्रदेश दलदलीचा व अरण्यमय आहे. व्हेनेझुएला, ग्वायना व उत्तर ब्राझिल यांत असलेल्या ग्वायनाच्या पठारावर दाट अरण्यें आहेत. अँडीज पर्वताच्या भागांत धरणीकंपाचे मोठाले धक्के बसतात.

बेटें.—पूर्व किनाऱ्यावर ट्रिनिदाद व मॅराजोखेरीज करून बाकीचीं बेटें लहान आहेत. ट्रिनिदाद (क्षेत्रफळ १७५५ चौ. मैल) व दक्षिण अमेरिका यांच्यामध्यें पेरिआचें आखात आहे; याच्या उत्तरेस टोबॅगो, मार्गारिटा, ब्लॅंकिला व क्युरासाओ व इतर ऐतिहासिक आणि व्यापारी महत्त्वाचीं लहान बेटें आहेत. फर्नांडोडी नारोन्हा, रोकास, फॉकलंड वगैरे दुसरीं बेटें आहेत. पश्चिम किनाऱ्यावर देराडेलफ्युगो, जॉनफर्नांडीझ व गॅलापॅगास बेटें यांचा समूह आहे.

नद्या.—अमेझॉन, ऑरिनोको व पॅराग्वे अथवा लाप्लाटा या मुख्य नद्या आहेत. त्या सुमारें सदतीस लक्ष चौरस मैलांतील पाणी वाहून नेतात. अमेझॉन (रिओडास अमेझान्स

अथवा अमेझॉन्स ) ही दक्षिण अमेरिकेंतीलच काय परंतु सर्व जगांत मोठी आहे. पॅराग्वेपासून हुआलागापर्यंत म्हणजे ३००० मैलपर्यंत हींत जहाजें चालतात. या नदीला पुष्कळ फांटे आहेत. ही ऑरिनोको, ब्राझिल व व्हेनेझुएला यांच्या दरम्यान उगम पावून अॅटलांटिक महासागरास मिळते. हिच्या कांठीं दाट अरण्यें व डोंगरपठारें आहेत. रिओदी लाप्लाटा नदींत उरुग्वे पॅराग्वे यांचा समावेश होतो. पराना ही पराग्वेची महत्त्वाची शाखा आहे. सान फ्रान्सिस्को ही मोठी नदी ब्राझीलमध्यें आहे. मॅगडालेना नदी कोलंबियांत आहे. ब्रिटिश ग्वायानांत एसेक्विबो नदी आहे.

सरोवरें.—टिटिकाका सरोवर बोलिव्हियांत असून त्याचें क्षेत्रफळ सुमारें ५००० चौरस मैल आहे. जुनीन अथवा चिंचैकोचा याचें क्षेत्रफळ २०० चौरस मैल आहे. दक्षिण अर्जेंटिनामध्यें बरींच लहान लहान सरोवरें आहेत. दक्षिण ब्राझीलमध्यें लॅगोआडॉसपेटॉस सरोवर आहे. व्हेनेझुएलाच्या किनाऱ्यावर माराकैबो सरोवर आहे.

वनस्पती.—या खंडांत उपयोगी अशा बऱ्याच वनस्पती आहेत. मौल्यवान् लांकूड, रबराचीं झाडें, कापूस, बटाटे, मका, सिंकोना, चाकोलेट व पॅराग्वे चहा वगैरे आहेत. शिवाय कॉफी, ऊंस, संत्रें, केळीं वरींच उत्पन्न होतात. अमेझॉन खोऱ्यांत दाट झाडी आहे. मोठाले ताड, वांबूचीं वनें आहेत. येथील जंगलें एकाच जातीच्या झाडांचीं नसतात.

प्राणी.—येथें सस्तन प्राण्यांच्या लहान जाती आहेत.टेपिर हाच काय तो मोठा प्राणी आहे. वानरांच्या पुष्कळ जाती आहेत. सुसरी, कांहीं सर्प, लोंकर असलेले लामा, अलपाका, व व्हिकुना हेहि आहेत. कोंडार हा सर्वात मोठा पक्षी आहे. अमेझॉन नदीमधील मासे फार चांगल्यापैकीं समजतात.

लोकवस्ती.—हें खंड सांपडलें त्यावेळीं येथील वेगवेगळया जातींत भाषा, चालीरीती व संस्कृति भिन्न होत्या. त्यांच्यांत विणणें, मांडीं तयार करणें, धातूचा उपयोग, स्थापत्यशास्त्र, शेतकी वगैरे कला बऱ्याच उन्नतदशेला पोंचल्या होत्या. यूरोपियन व नीग्रो लोकांमुळें यांचें संख्येनें प्रमाण कमी होत आहे परंतु कित्येक ठिकाणीं अद्याप यांचें प्रमाण जास्त असून त्यांच्याच देश्य भाषा चालू आहेत..

या खंडाचा शोध लागल्यावर पश्चिम व उत्तर भागांत स्पॅनिअर्ड व पूर्व भागांत पोर्तुगीज लोकांनीं वसाहती केल्या. नंतर आफ्रिकेंतील नीग्रो गुलामांनां येथें आणलें. अर्जेंटिना व दक्षिण ब्राझीलमध्यें इटालियन लोक सांप्रत जास्त येऊं लागले आहेत. व्हेनेझुएलच्या पूर्वेटोंकापासून उत्तर व पश्चिम भागांत स्पॅनिश भाषा चालते. सर्व ब्राझिलमध्यें म्हणजे सुमारें अर्ध्या खंडांत पोर्तुगीज भाषा चालते.

खंडाचा शोध वगैरे.—कोलंबसानें तिसऱ्या सफरींत १४९८ सालीं या खंडाचा शोध लाविला. यानंतर दुसऱ्या शोधकांनीं बरेच शोध लाविले. बलबोआनें १५१३ सालीं पॅसिफिक महासागराचा शोध लाविला. पुढें बहुतेक प्रदेशाची माहिती मिळाली. पेरू प्रांतांतील रुप्याच्या खाणी व ब्राझिलमधील सोनें व हिऱ्याच्या खाणी यांमुळें संशोधकांनां चांगलेंच उत्तेजन मिळालें.

हें खंड सांपडल्यावर त्यांत यूरोपियनांच्या वसाहती झाल्या त्या प्रथम स्पेन व पोर्तुगाल यांच्या अंमलाखालीं होत्या. पण पुढें स्वतंत्र झाल्या. प्रथम बरींच वर्षें बहुतेक प्रांतांत बंडें, क्रांत्या वगैरे उपस्थित होत असत. अलीकडे उद्योगधंदे व व्यापार बराच वाढून शासनपद्धति व्यवस्थित झाली आहे. ब्राझिल हा सर्वांत मोठा व महत्त्वाचा भाग आहे. वाकीच्याचे स्पॅनिश भाषा बोलणारीं प्रजासत्ताक राज्यें म्हणून विभाग पाडण्यांत आले आहेत. व्हेनेझुएला व ब्राझिलची सरहद्द यांच्या दरम्यान ब्रिटिश ग्वायना, डचग्वायना आणि फ्रेंच ग्वायना हींच काय तीं तीन संस्थानें यूरोपीय सत्तेखालीं आहेत. ट्रिनिदाद, टोबॅगो व फॉकलंड बेटें ब्रिटनच्या ताब्यांत आहेत. क्युरासाओ, ब्यूएनआयर व ओरूबा यांवर हालंडचा ताबा चालतो.

उद्योगधंदे व व्यापारः—रुप्याच्या खाणींमुळें येथें स्पॅनिश लोक भराभर येऊं लागले. बोलिव्हियांतील पोटोसी खाणींतून बरेंच रुपें बाहेर पडलें. पेरू व चिली यांच्या किनाऱ्यावरील ग्वानो ( पक्षिविष्ठा ) व सोरा यांचे थर फार महत्त्वाचे असत. चिली प्रांतांतील बोरॅक्स ( टांकणखार ) व बोलिव्हियांतील जस्त यांचा जगांत तिसरा नंबर लागे.इ. स. १६९३ त ब्राझिलमध्यें सोन्याच्या खाणी आढळल्या. लवकरच मिनासजेरेस नांवाचा खाणी असलेला प्रदेश वसला गेला. १७५२ ते १७६१ पर्यंत दरसाल ६० लाख डॉलरचें सोनें निघत असे. सन १७२९ च्या सुमारास ब्राझिलच्या सोन्याच्या खाणी असलेल्या प्रदेशांतच हिऱ्याच्या खाणी सांपडल्या. यामुळें यूरोपियन व नीग्रो गुलाम ब्राझिलमध्यें बरेच आले. दक्षिण आफ्रिकेंत हिऱ्याच्या खाणी सांपडेपर्यंत हिऱ्यांच्या पैदाशीच्या बाबतींत ब्राझीलचा नंबर पहिला होता. बहिआ भागांत कारबोनेडोज अथवा काळे हिरे सांपडतात. अलीकडे ब्राझिलनें मोनाझाईटच्या बाबतींत वरची पायरी पटकाविली आहे. मँगॅनीजच्या उत्पन्नांत ब्राझिल रशियाच्या खालोखाल होतें. मिनास व साओपॉलो या भागांत लोखंडाचे थर बरेच असून त्यांचें शोधन अद्याप झालें नाहीं. दक्षिण ब्राझिल गोमेद प्रसिद्ध आहेत.

रबर, कॅकाओ, कोफा इपेंकॅक, घासरूम, कोपैवा, सिंकोना, ब्राझिलनट व पॅराग्वे,चहा वगैरे वस्तू येथील जंगलांतून गोळा करण्यांत येतात. नक्षीकाम करण्याजोगें लांकूड बरेंच सांपडतें. ऊंस, साखर, कापूस, कॉफी वगैरे बाबतींत शेतकीची फारच सुधारणा झाली आहे. रिओडी जॅनेरोपासून उत्तरेकडे पूर्वकिनाऱ्यालगत साखर तयार होते. बाहिआपासून उत्तरेकडे

अन्तर्गत भागांत कापूस तयार होतो. ब्राझिलमध्यें कॉफी तयार होते. अर्जेंटाईनमध्यें गहूं पिकतो.

कारखान्याच्या बाबतींत अद्यापि फारशा सुधारणा झाल्या नाहींत. कारण प्रथम यूरोपियन देश स्वतःचा निर्गत व्यापार वाढविण्याच्या खटपटींत होते. त्यांनीं वसाहतींचा व्यापार आपल्या ताब्यांत घेतला परंतु पुढें वसाहती स्वतंत्र झाल्यावर हें पारडें फिरलें. अलीकडे कारखाने वाढत आहेत. परंतु दळणवळणाचीं साधनें चांगलीं नाहींत. दक्षिण अमेरिकेचा संबंध पूर्वी मुख्यतः पोर्तुगालशीं येत असे. हळू हळू हा संबंध कमी होत गेला. सध्यां खालील जिन्नसांची निर्गत विशेष होते (किंमतीचे आंकडे पौंडांचे आहेत.)

| देशाचें नांव | निर्गत माल | कोटी | लक्ष |
|---|---|---|---|
| अर्जेंटिना | गुरेढोरें. | ४ | ८० |
| | धान्य वगैरे | २ | ३० |
| ब्राझील | कॉफी, | ३ | ३० |
| | रबर | १ | ६० |
| चिली | नायट्रेट | १ | ७० |
| | तांबें | ० | २० |

वसाहती.—१९०५ साली दक्षिण अमेरिकेची लोकसंख्या ३८४८२००० होती. समुद्रकिनाऱ्यावर व त्याच्या जवळच्या भागांत साधारणतः दाट वस्ती आढळते. येथील मोठीं शहरें यूरोपखंडांतील शहरांच्या बरोबरीचीं असून त्यांना मुबलक पाणी व विद्युत्शक्तीनें होणाऱ्या सोई केल्या आहेत.

दळणवळण.—दक्षिणअमेरिकेंतील बंदरांचा संबंध सर्व जगाशीं येतो. पूर्वी आंतल्या भागाशीं केवळ बोटीनें दळणवळण ठेवतां येत असे किंवा कांहीं लोक घोड्यांवरून जात. पण अलीकडे रेल्वे तयार झाली आहे. खेरीज नदीमार्गानें व समुद्रानें दळणवळण वाढलें आहे. १९०९ सालीं खालीलप्रमाणें रेल्वेच्या लाइनी होत्या.

| मुख्य देश | मैल रेल्वे. |
|---|---|
| अर्जेंटाईनचें प्रजासत्ताक राज्य | ११४६० |
| ब्राझिल | १०४०८ |
| बोलिव्हिया | ७०० |
| चिली | २८०० |
| पेरू | ११४६ |
| उरुग्वे | १२१० |

[ब्राझील, पेरू, चिली इ. पहा.]

**दक्षिण आफ्रिका**—झांबेझी नदीच्या मध्य प्रवाहाच्या दक्षिणेस असलेला आफ्रिका खंडाचा एक भाग. भौगोलिक दृष्ट्या हा भाग दक्षिण अक्षांश १६° व ३५° आणि पूर्व रेखांश १२° व ३६° यामध्यें वसलेला आहे. याची नैर्ऋत्य-ईशान्य लांबी सुमारें १६०० मैल आहे. क्षेत्रफळ सुमारें १३३३००० चौरस मैल आहे. यांत दक्षिण आफ्रिका संघ, बासुटोलँड, बेच्वानालँड, स्वाझीलँड, दक्षिण ऱ्होडेशिया, सबंध ब्रिटिश मुलुख, जर्मन साऊथ-वेस्ट आफ्रिका, व पोर्तुगीज ईस्ट आफ्रिकेचा दक्षिण भाग, इत्यादि देशांचा समावेश होतो. सबंध दक्षिण आफ्रिकेंत भौगोलिक रचनेच्या बाबतींत डोळ्यांत भरण्याजोगा सारखेपणा आहे. कुनेन नदीच्या मुखापासून तो झांबेझीच्या मुखापर्यंतच्या सबंध किनाऱ्यावर फारच थोड्या खांचा किंवा खिंडी आहेत. एक दोन ठिकाणीं नैसर्गिक बंदरें आहेत एवढेंच. दक्षिण आफ्रिका म्हणजे द्वीपकल्प व बेटें यांनीं विरहित असा एक मोठा भूभाग आहे. दक्षिणेतील बहुतेक सर्व नद्या अटलांटिक महासागरास मिळतात व उत्तरेकडील नद्या हिंदी महासागरास मिळतात. बहुतेक नद्या मुखांपासून कांहीं दूरपावेतोंच नौकानयनार्ह आहेत. अन्तर्भागांतील डोंगरपठाराच्या मध्य भागास 'कलाहारी डेझर्ट' असें नांव आहे. दक्षिणेकडील व पूर्वेकडील समुद्रकांठच्या जमिनी फार सुपीक आहेत.

हवामान.—हिंदी महासागरांतील वृष्टि-वाहक वाऱ्यांच्या आड ड्रेकन्सबर्ग पर्वत येत असल्यामुळें अन्तर्भागांतील बऱ्याचशा भागावर पाऊस फार कमी पडतो. यामुळें व जमिनींच्या उंचीमुळें हवा कोरडी, उत्तेजक व यूरोपियन प्रकृतीस मानवणारी आहे. फक्त आग्नेय किनाऱ्यावर व नद्यांच्या कित्येक खोऱ्यांतून दरवर्षी ५० इंच पाऊस पडतो.

रहिवाशी.—बुशमेन व हॉटेंटॉट हे दक्षिण आफ्रिकेंतील मूळच्या रहिवाश्यांचे प्रतिनिधि होत. हे लोक कलाहारी व (जर्मन) साऊथ-वेस्ट आफ्रिकेच्या दक्षिण भागांत सांपडतात. बाकीचे एतद्देशीय लोक ज्यांना काफीर असें म्हणतात, ते बांटु-निग्रॉइड वंशांतील आहेत. या लोकांच्या तीन वेगळाल्या शाखा आहेत. (१) झुलु-क्षोसास, (२) बेच्युआना, व (३) ओव्हाहीरेरो व ओव्हाम्पो. सर्व मिश्र जातीचे बांटू लोक झांबेझीच्या पलीकडून या ठिकाणीं निरनिराळ्या काळीं आले. बेच्वाना हे बहुधा या ठिकाणीं प्रथम आले असावेत. अरबांनीं इ. स. नंतर ८ व्या शतकांत किनाऱ्यावर सोफाला येथें वसाहत केली होती. पण ते फारसे आंत घुसले नाहींत. डच, ब्रिटिश, जर्मन, पोर्तुगीज, इत्यादि गौरकाय लोक येथें राहतात. कांहीं हिंदी मजूरहि या ठिकाणीं आहेत.

आर्थिक स्थिति व व्यापार.—बराच काळपर्यंत दक्षिण आफ्रिकेची शेती हीच संपत्ति होती. मिलीज व गहूं यांचें पीक मुख्यतः येथें काढीत असत. लोंकर, शहामृगाचीं पिसें व तांबें हे जिन्नस परदेशीं व्यापारार्थ पाठविले जात. पण सुवर्णखाणींच्या शोधानें आर्थिक स्थितींत व दक्षिण आफ्रिकेच्या एकंदर इतिहासांत प्रचंड क्रांति घडून आली. दक्षिण आफ्रिकेंत सध्यां डाकसंघ, संदेशवाहकसंघ व जकातसंघ असे तीन संघ आहेत. जकाती ह्या संरक्षित स्वरूपाच्या आहेत. खुद्द दक्षिण आफ्रिका संघांत खुला व्यापार चालतो. दक्षिण आफ्रिकेशीं व्यापार

करणारे देश म्हटले म्हणजे, ग्रेटब्रिटन, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, जर्मनी, संयुक्त संस्थानें, कानडा, ब्राझील, हिंदुस्थान, बेलजम, हॉलंड व फ्रान्स हे होत. गौरकाय लोकांपैकीं बहुसंख्याक लोक प्रॉटेस्टंट पंथाचे आहेत.थोडे रोमनकॅथोलिकहि आहेत. १९ व्या शतकाच्या अखेरीस एतद्देशीयांपैकीं शेंकडा पांच लोक ख्रिस्तानुयायी झाले.

का य दा.—ब्रिटिश दक्षिण आफ्रिकेंतील कायदा हॉलंडमध्यें १८ व्या शतकाच्या अखेरीस प्रचलित असलेल्या रोमन–डच कायद्यावर उभारलेला आहे. ब्रिटिश अंमल केप प्रांतांत सुरू झाल्यापासून या कायद्यांत बऱ्याच सुधारणा व फेरफार झालेले आहेत. न्यायदानाची पद्धत बहुतेक इंग्रजी पद्धतीप्रमाणेंच आहे. गंभीर स्वरूपाचे फौजदारी गुन्हे न्यायाधीश व ज्यूरीसमोर निकालास येतात. फौजदारी मुकद्दम्यांत ज्यूरीचें एकमत होणें जरूर असतें. इंग्रजी व दक्षिण आफ्रिकन कायदेपद्धतींत मिळकतीच्या कायद्यासंबंधानें बराच फरक आहे. दक्षिण आफ्रिकेंत नोंदणीचें तत्त्व हें पाळलेंच पाहिजे असा सक्त कायदा आहे. वडील मुलासच इस्टेटीचा वारसा मिळावा असा कांहीं येथें कायदा नाहीं. मृत्युपत्र करून न ठेवतां जर कोणी मरण पावला तर त्याच्या इस्टेटीवरील वारसा कायद्यानें ठरविला जातो. बायकोच्या मिळकतीवर लग्न कायम असे तोंपर्यंत सर्वस्वी नवऱ्याचा हक्क असतो. नवऱ्यानें या हक्काचा दुरुपयोग केला असें आढळून आल्यास त्याची कानउघाडणी करण्याचा न्यायाधिशांना अधिकार आहे.

भा षा.—यूरोपियन रक्ताचे लोक इंग्रजी व डच भाषा बोलतात. डच भाषेला व्यावहारिक भाषेंत 'टाल' ही संज्ञा आहे. हॉलंडमधील १७ व्या शतकांतील जी डच भाषा तीच या भाषेचा पाया होय. हॉलंडमधील आजची डच भाषा व दक्षिण आफ्रिकेंतील चालू डच भाषा यांच्यांत फार फरक आहे. चालू दक्षिण आफ्रिकेंतील डच भाषा म्हणजे १७ व्या शतकांतील हॉलंडमधील डच भाषेची अवनत अशी आवृत्ति होय. दक्षिण आफ्रिकन डच भाषेंत शब्दसंग्रह फारच मर्यादित आहे. याचें कारण असें कीं, एतद्देशीयांनां आपली भाषा सुलभ रीतीनें समजावी म्हणून साहजिकच आरंभींच्या वसाहतवाल्यांनीं तिजमधील कठिण शब्द काढून टाकून तिची रचना जास्त सुलभ केली. पण त्याचवेळीं तिच्यांतील गांभीर्य व भरीवपणाहि नाहींसा झाला व ती डच भाषेची अशुद्ध अशी पोटभाषा बनली. प्रत्यहीं बोलण्यांत येणाऱ्या भाषेची अशी स्थिति असली तरी डच बायबलमधील भाषा शुद्ध व उदात्त आहे. डच चर्चमधील प्रार्थना साध्या पण व्याकरणशुद्ध डच भाषेंत चालविण्यांत येतात.शाळांतूनहि शुद्ध डच भाषा शिकविण्यांत येते.

शा स न प द्ध ति.—१९०९ सालच्या साऊथ आफ्रिका ॲक्टान्वयें केपकॉलनी, ट्रान्सव्हाल, नाताळ, आणि ऑरेंज रिव्हर कॉलनी यांचा ब्रिटिश छत्राखालीं एक संयुक्त संघ बनविण्यांत आला. या दक्षिण आफ्रिका–संघाची सन १९१० च्या मे महिन्याच्या ३१ तारखेस स्थापना करण्यांत आली. उपरिनिर्दिष्ट वसाहतींचें आतां संघाच्या प्रांतांत रूपांतर झालें. ऑरेंज रिव्हर कॉलनीला 'ऑरेंज फ्रीस्टेट प्रॉव्हिन्स' असें नांव देण्यांत आलें. वसाहतीय कायदेमंडळें मोडण्यांत येऊन, दुय्यम अधिकारांचीं प्रांतिक कौन्सिलें स्थापण्यांत आलीं. गव्हर्नरांनां काढून टाकण्यांत येऊन त्यांच्या जागीं प्रांतिक शासनकर्त्यांची योजना करण्यांत आली.

संघाच्या कार्यकारी शासनव्यवस्थेचे मुख्य चालक खुद्द राजेसाहेब आहेत. त्यांचा प्रतिनिधि म्हणून गव्हर्नर जनरल ती व्यवस्था पाहतो. गव्हर्नर–जनरलला प्रधानांनां बडतर्फ करण्याचा व पार्लमेंट मोडण्याचा अधिकार आहे. याला दरवर्षी १०००० पौंड पगार मिळतो. कार्यकारी मंत्रिमंडळाचे सभासद हा स्वतःच नेमतो. एतद्देशीय कारभाराचा व शासनव्यवस्थेचा ताबा सर्वस्वी गव्हर्नर व त्याचें कौन्सिल यांच्याकडे आहे.

राजा, सीनेट व 'असेंब्ली' या तिघांकडे कायदे करण्याची सत्ता सोंपविली आहे. सीनेटमध्यें ४० सभासद असतात. त्यांपैकीं प्रत्येक प्रांताचे ८ प्रतिनिधि असून ८ गव्हर्नर–जनरलनें नेमलेले असतात.स.१९१० त निवडलेल्या सीनेटच्या या सभासदांनां स. १९२० पावेतों सीनेटमध्यें राहण्याचा अधिकार आहे. त्यानंतर संघाच्या पार्लमेंटनें सीनेटच्या रचनेंत योग्य वाटतील ते फेरफार करावेत. सीनेटचा सभासद यूरोपियन रक्ताचा व ३० वर्षे वयाचा असावा लागतो.

'असेंब्लींत' १२१ सभासद असतात. त्यांत केप प्राव्हिन्सचे ५१, ट्रान्सव्हालचे ३६ व नाताळ व ऑरेंज फ्रीस्टेट यांच्या प्रत्येकीं १७ प्रतिनिधि असतात. 'असेंब्लींतील' सभासदहि यूरोपियन रक्ताचे ब्रिटिश प्रजाजन असावे लागतात. प्रत्येक पांचव्या वर्षी सर्वसाधारण निवडणूक होते. प्रतिवर्षी पार्लमेंटची बैठक झालीच पाहिजे असा नियम आहे.राजेसाहेबाच्या सैन्यांतील कोण्याहि पगारी नोकरास मतदानाचा हक्क नाहीं. ट्रान्सव्हाल व ऑरेंज फ्रीस्टेट या प्रांतांत वयांत आलेल्या ब्रिटिश पुरुष प्रजाजनांनांच मतदानाचा हक्क आहे. मतदारांजवळ अमुक इतकी मालमत्ता असलीच पाहिजे असा त्या ठिकाणीं निर्बंध नाहीं. नोंदून घेण्यापूर्वी सहा महिनेपर्यंत तो त्या प्रांतांत राहिला असला म्हणजे पुरे आहे. नाताळमध्यें मात्र मतदार होण्याकरितां थोडी मालमत्ता असणें जरूर असतें. काळ्या लोकांनां मतदानाचा केवळ नामधारी हक्क आहे. वस्तुतः त्यांनां मतदार होतांच येत नाहीं. केप प्रांतांत मात्र थोडेसे काफीर लोक मतदार आहेत. संघाच्या स्थापनेच्या वेळीं दक्षिण आफ्रिकेकरितां एक वरिष्ठ न्यायासन करण्यांत आलें. वसाहतींतील पूर्वीचीं वरिष्ठ व उच्च न्यायासनें

नूतन वरिष्ठ न्यायासनाचे प्रांतिक व स्थानिक विभाग केले आहेत. या नूतन वरिष्ठ न्यायासनाचे,' वरिष्ठ न्यायासन ' व ' अपील विभाग ' असे दोन भाग आहेत. संघांतील न्यायासनाचे अधिकार राज्यमंत्र्याकडे दिलेले आहेत.

इंग्रजी व डच ह्या संघांतील सरकारी भाषा होत. या दोन्ही भाषांना राजदरबारीं सारखाच मान आहे. दक्षिण आफ्रिका संघांत सर्वत्र खुला व्यापार आहे.

प्रां ति क रा ज्य व्य व स्था.—संघाच्या पार्लमेंटसभेला सर्व संघाकरितां कायदे करण्याची पूर्ण मुभा असली तरी प्रांतिक कारभाराचा प्रत्यक्ष ताबा, प्रांतिक कौन्सिलांना दिलेला आहे. स्थानिक उत्पन्नाकरितां कर बसविणें, केवळ आपल्या पतीवर कर्ज काढणें, त्याचप्रमाणें शेती, म्युनिसिपल संस्था व इतर स्थानिक संस्था यांचा कारभार पाहणें इत्यादि बाबतींत प्रांतिक कौन्सिलांना अधिकार दिलेले आहेत.

प्रांतिक कौन्सिलांतील सभासद जर संघाच्या पार्लमेंट सभेचा सभासद झाला तर त्याला असल्या कौन्सिलांतील सभासदत्वाचा त्याग करावा लागतो. प्रत्येक प्रांतिक कौन्सिलची मुदत तीन वर्षांची असते. प्रांतांतील कार्यकारी सत्ता ही सरकारनियुक्त प्रांतिक शास्त्याकडे असते. हा पांच वर्षेपर्यंत अधिकारावर असतो. याच्या सहाय्याकरितां चार सभासदांचें एक कार्यकारी मंडळ असतें.

इ ति हा स.—पोर्तुगीज लोक ज्यावेळीं आफ्रिकेच्या दक्षिण भागास जाऊन पोहोंचले त्यावेळीं त्या ठिकाणीं फक्त एकच अशी जागा होती कीं जेथें सुधारलेली जात राज्य करीत असे. ही जागा म्हटली म्हणजे सोफाला बंदर होय. येथून अरब लोक आंतील म्हणजे -होडेशियांतील बांटु लोकांशीं हस्तिदंत, सोनें व गुलामांचा व्यापार करीत. हे बांटु लोक ज्यावेळीं फार सुधारलेल्या स्थितींत होते, ज्यावेळीं युरोपियन लोक आफ्रिका खंडाच्या नैर्ऋत्य टोका-कडून हळूहळू उत्तरेकडे जाण्याचा प्रयत्न करीत होते, त्याच वेळीं बांटु निग्रो वंशांतील एक लढवय्यी जात देशाच्या पश्चिम बाजूकडून दक्षिणेकडे पसरण्याच्या प्रयत्नास लागली होती.

१५ व्या शतकांत पूर्वेकडील प्रचंड व्यापार व्हेनिसच्या द्वारें युरोपशीं चालत असे. त्याच शतकांत पोर्तुगाल एक समुद्रावरील बलाढ्य राष्ट्र म्हणून नांवास आलें व ज्या व्यापारानें व्हेनिस गबर झालें तो पूर्वेकडील व्यापार आपण काबीज करावा म्हणून ' इंडीज ' बेटांकडील जलमार्ग शोधून काढण्याकरितां त्यानें आपले दर्यावर्दी शोधक पाठविले. त्याप्रमाणें १४८८ सालीं बार्योलोम्यू डायझ यानें केप ऑफ गुडहोप व वास्को द गामा यानें १४९७ सालीं नाताळ शोधून काढिलें.

पण पोर्तुगीजांनीं खंडाच्या दक्षिण टोकाकडे वस्ती कर-ण्याची मुळींच पर्वा केली नाहीं. पश्चिम किनाऱ्यावर बेंग्वेला येथें त्यांचें एक ठाणें होतें. पूर्व किनाऱ्यावर स. १५०६ च्या सुमारास त्यांनीं सोफाला येथें एक व्यापारी ठाणें ठेविलें व १५४५ सालीं डेलागोआ येथें प्रथमच व्यापारी वखार घालण्यांत आली.

पोर्तुगीजांच्या पावलांवर पाऊल ठेवणारे दुसरे यूरोपियन म्हणजे इंग्रज लोक होत. इ. स. १६०१ मध्यें इंग्रजी ईस्ट इंडिया कंपनीनें दक्षिण आफ्रिकेच्या मोहिमेकरितां एक आर-मार तयार केलें. तें आरमार टेबलवे येथें नांगरण्यांत आलें. तेथें तें बरेच दिवसपर्यंत थांबलें. १६२० सालीं इंग्रजांनीं पहिल्या जेम्सच्या नांवानें केपचा ताबा घेतला. इकडे दक्षिण आफ्रिकेंतील साधनसंपत्ति पाहून डच ईस्ट इंडिया कंपनीच्याहि तोंडास पाणी सुटलें. स. १६५२ त टेबलवे येथें डचांनीं एक किल्ला बांधला. स.१६५७ त डच ई. ई. कंपनीनें कांहीं थोडे शिपाइ व नाविक या ठिकाणीं राहण्याकरितां पाठविले व त्यांच्या उपजीविकेकरितां त्यांना शेतें वांटून देण्यांत आलीं. याप्रमाणें या ठाण्याचें लवकरच वसाहतींत रूपांतर झालें.पुढें स.१६८८ व १६९९ या वर्षांच्या दरम्यान जवळ जवळ ३०० ह्यूजनॉट लोक येथें येऊन राहिल्यामुळें वसाहतीचा पाया भरभक्कम झाला. हळूहळू हे वसाहतवाले पूर्वेकडे सरकून स. १७५४ त अँगोलापर्यंतचा सर्व देश वसाहतवाल्यांनीं आक्रमिला.

याप्रमाणें देशविस्ताराच्या बाबतींत वसाहतीची डच ई. ई. कंपनीच्या अमदानींत सुधारणा झालेली दिसली, तरी इतर बाबींत तिची पिच्छेहाटच होत गेली. याचें कारण डच ई. ई. कंपनीचें स्वार्थी व बेजबाबदार धोरण होय.' राजकीय बाबींत अनियन्त्रितपणा, व व्यापारांत मक्तेदारी ' असें या कंपनीचें धोरण असे. वसाहतींत लोकांना येऊन राहण्याचा मोह पडावा व वसाहत मोठ्या प्रमाणावर वसविली जावी म्हणून कंपनीच्या नोकरींतून मुक्त झालेल्या शिपायांना व नाविकांना नागरिकांचे हक्क देण्यांत आले होते, पण कंपनीनें याप्रमाणें मुक्त झालेल्या लोकांना इतकेंच नव्हे तर त्यांच्या मुलांनाहि वाटेल त्यावेळीं नोकरींत खेंचण्याचा अधिकार आपल्या हातीं ठेवल्यामुळें, वरील देणगीचें शुष्क व दिखाऊ स्वरूप लोकांच्या लक्षांत तेव्हांच आलें. असल्या जुलमी पद्धतीच्या चरकांत पिळून निघाल्यामुळें लोकांचीं मनें बेताल होऊन त्यांनीं देशत्याग करण्यास सुरवात केली. बोअरांच्या देशत्यागाचें कारण डच ई. ई. कंपनीच्या स्वार्थी व जुलमी राज्यपद्धतींत आहे व देशत्यागास स. १८३५त नाहीं तर स. १७००च्याहि अगोदर सुरवात झाली असें इंग्रज इतिहासज्ञांचें मत आहे. स.१७९५ च्या सप्टेंबरांत, ब्रिटिशांनीं ही वसाहत काबीज केल्यामुळें, या बेलगामी पद्धतीचा अवतार संपला. एमिन्सच्या तहान्वयें स. १८०३ च्या फेब्रुवारींत ग्रेटब्रिटनला वसाहत बटेव्हिअन रिपब्लिकच्या स्वाधीन करावी लागली. १८०६ मध्यें ग्रेटब्रिटननें ती बटेव्हिअन रिपब्लिकपासून ( म्हणजे फ्रान्सपासून ) जिंकिली. स. १८१४ त ती पूर्णपणें


दक्षिण आफ्रिकेचा नकाशा
हिंदी महासागर
अटलांटिक महासागर
केनिआ
नैरोबी
एडवर्ड
फ्रेंच इक्वेटोरिअल आफ्रिका
कांगो फ्री स्टेट
टेबोरा
टँगानिका प्रांत
सरोवर
पेंबा
झांझिबार
दार एस्सलाम
माफिआ
अमिरांते
अल्दाब्रा
कोबंगो
अंगोला
पोर्तुगीज पश्चिम आफ्रिका
कोमोरो
न्यासा
झोंबा
मोझांबिक
मादागास्कर
मॉरिशस
रियूनिअन
सॉल्झबरी
बेरा
विन्होक
वॉलविस बे
आफ्रिका
जोहान्स बर्ग
प्रिटोरिया
ट्रान्सवाल
ऑरेंज रिव्हर कॉलनी
नाताळ
पीटरमारित्झबर्ग
डरबान
केप ऑफ गुड होप
केप कॉलनी
केप टाउन
केप ऑफ गुड होप
Poona Litho Works 589 Sadashiv Peth

ग्रेटब्रिटनच्या स्वाधीन करण्यांत आली व 'केपकॉलनी' या ब्रिटिश वसाहतींत तिचें रूपांतर झालें.

वसाहतीच्या जन्मदिवसापासून तों ती ब्रिटिशांच्या स्वाधीन होईपर्यंत तेथील यूरोपियनांत व एतद्देशीय राष्ट्रजातींत शत्रुत्वाच्या संबंधावांचून इतर कोणताहि संबंध नसे. हॉटेंटॉट,बुशमेन, बांटु अथवा काफीर ह्या जाती वसाहतवाल्यांची गुरें चोरून त्यांना भेडावून सोडीत अनेक काफीरयुद्धें जीं उपस्थित झालीं तीं यामुळेंच होत.

काफीर जात ही अतिशय शूर व लढवय्यी असल्यामुळें ब्रिटिशांनां तिचा वचक असे. वेळप्रसंग पडल्यास ब्रिटिश संख्याबल वसाहतींत जास्त असावें या हेतूनें १८२० सालीं ४००० ब्रिटिश लोक केप कॉलनींत वसाहतीकरितां पाठविण्यांत आले. त्यांनीं अँगोलाबे येथें पोर्ट एलिझाबेथ व 'अलबनी वसाहत' हीं ठाणीं स्थापन केलीं. या १८२० सालीं वसाहतवाल्यांत थॉमस प्रिंग्ले या नांवाचा एक प्रख्यात स्कॉटिश कवीहि होता.

१८ व्या शतकाच्या अखेरीस प्रॉटेस्टंट धर्मोपदेशक मंडळ्यांनीं आपले मत-प्रसारक देशी लोकांस उपदेश करण्याकरितां पाठविले होते. या मतप्रसारकांत लंडन मिशनरी संस्थेचा डॉ. जॉन फिलिफ हा एक प्रमुख होता. याच्या प्रयत्नांमुळेंच हॉटेंटॉट व इतर काळ्या लोकांचा दर्जा कायद्यानें गोऱ्या वसाहतवाल्यांच्या दर्जाबरोबर करण्यांत आला (१८२०). १८३४ सालीं 'गुलामांच्या मुक्ततेचा कायदा' सर्व ब्रिटिश साम्राज्यांत लागू करण्यांत आला. याचा परिणाम असा झाला कीं शेतकऱ्यांनां बरेच दिवसपर्यंत एतद्देशीय मजूर मिळेनात व यामुळें व्यापाराला बूड येत चालली तेव्हां डच वसाहतवाल्यांचीं मनें अर्थातच कलुषित झालीं.

रानटी जातींच्या हल्ल्यापासून वसाहतींचें व गोऱ्या लोकांच्या अतिक्रमणापासून एतद्देशीय सुधारलेल्या राष्ट्रांचें, संरक्षण व्हावें म्हणून डॉ. फिलिफ याच्या सल्ल्याप्रमाणें वसाहतींच्या उत्तर व पूर्व सरहद्दीवर तद्देशीय राज्यें स्थापावीं असें ठरलें. याप्रमाणें इ. स. १८३४ च्या डिसेंबरांत अँड्रीज वाटरबोअर नांवाच्या मुख्याबरोबर उपरोक्त धोरणास अनुसरून तह करण्यांत आला. त्याचप्रमाणें इतर तद्देशीय राष्ट्रजातींशींहि तह करण्यांत आले. असल्या प्रकारच्या तहांनीं निर्माण केलेल्या राज्यांस 'तह-राज्यें' असें म्हणत. अशा रीतीनें पुष्कळ 'तहराज्यें' निर्माण करण्यांत आलीं.

ज्या वर्षी पहिलें तह-राज्य निर्माण करण्यांत आलें त्याच म्हणजे स. १८३४ यावर्षी काफीर युद्धास सुरुवात झाली. वसाहतीचा गव्हर्नर सर बेंजामिन डी. अर्बन यानें देश-संरक्षणाच्या हेतूनें, वसाहतीची मर्यादा केईनदीपर्यंत लांबविली. पण सर बेंजामिन व वसाहत-मंत्री लॉर्ड ग्लेनेलग यांच्यांत मतभेद होऊन त्यानीं सर बेंजामिनला जिंकिलेला मुलुख सोडण्यास भाग पाडलें. ही वेळ (१८३९) दक्षिण आफ्रिकेंत फार आणीबाणीची होती. गुलामगिरी बंद झाल्यामुळें डच शेतकरी रुष्ट झालेले, सरकारी धोरण एतद्देशीयानुकूल होऊं लागल्यामुळें सर्व वसाहत नाखूष झालेली, पूर्व सरहद्द असंरक्षित असल्यामुळें केव्हां संकट उद्भवेल याचा नेम नसल्यामुळें सर्व लोक बावरलेले, अशा स्थितींत 'ग्रेट ट्रेक' म्हणून प्रसिद्ध असलेल्या बोअरांच्या देशत्यागास सुरुवात झाली. १८३६ ते १८४० च्या दरम्यान जवळ जवळ ७००००बोअरलोक ब्रिटिश अंमलास कंटाळून केपकॉलनींतून, ऑरेंजरिव्हरपलीकडील विस्तृत मैदानें ओलांडून नाताळ व ट्रान्सवर्ग या ठिकाणीं गेले.

ब्रिटिश सरकारशीं अतःपर आपला कांहीं एक संबंध नाहीं व स्वतंत्र राज्यें स्थापून आपला स्वतःचा कारभार आपण खुशाल पाहून घेऊं अशी केपकॉलनी सोडलेल्या बोअरांची समजूत होती पण ती लवकरच खोटी ठरली. १८३६ सालीं पास करण्यांत आलेल्या कायद्यान्वयें वसाहतीय न्यायासनांनां, दक्षिणआफ्रिकेंतील २५ दक्षिण अक्षांशापर्यंतच्या कोणत्याहि भागांत राहणाऱ्या ब्रिटिश प्रजाजनांच्या गुन्ह्यांची चवकशी करण्याचा अधिकार मिळाला होता. हा कायदा म्हणजे केप सरहद्दीकडील भागांत ब्रिटिश सत्तेच्या प्रस्थापनेचा पुकाराच होता म्हटलें तरी चालेल. केप सोडलेल्या बोअरांपैकीं कांहीं ड्रेकन्सबर्गच्या मार्गानें नाताळ येथें आले. परंतु कित्येक इंग्रज व्यापारी १८२४ सालापासूनच नाताळ बंदरांत येऊन राहिले होते. बोअरांनीं मॅरिट्झबर्ग येथें लोकसत्ताक राज्य स्थापिलें. पण १८४३ सालीं नाताळ ब्रिटिश वसाहत बनविलें गेल्यामुळें बोअरांनां येथून दूर आणखी भाग पडलें. १८५६ सालीं नाताळला केप सरकारपासून विभक्त करण्यांत आलें. १८९३ सालीं नाताळला स्वराज्य मिळालें.

डॉ. फिलिफ याच्या सल्ल्यानें स्वीकारलेलें 'तहराज्यधोरण' आतां ब्रिटिश सरकारनें सोडून दिलें व राज्यमर्यादाविस्ताराच्या धोरणाचा अंगीकार केला. १८४८ सालीं ऑरेंज व व्हाल या नद्यांमधील मुलुख ब्रिटिशसरकारनें खालसा करून त्याला 'ऑरेंजरिव्हर सॉव्हरेंटी' असें नांव दिलें. यामुळें व्हाल नदीपलीकडील बोअरांशीं व बासुटो लोकांशीं तक्रारी उत्पन्न होऊं लागल्या व कधीं कधीं तर रक्तपातापर्यंत मजल पोहोंचूं लागली. तेव्हां व्हाल नदीपलीकडील बोअरांचें व ऑरेंजरिव्हर सॉव्हरेंटीमधील लोकांचें स्वातंत्र्य मान्य करण्याचें ब्रिटिश सरकारनें ठरविलें. त्याप्रमाणें १८५२ सालीं ट्रान्सव्हालचें व १८५४ सालीं ऑरेंजरिव्हर सॉव्हरेंटीमधील लोकांचें स्वातंत्र्य मान्य करण्यांत आलें व ऑरेंजरिव्हर सॉव्हरेंटीचें ऑरेंजफ्रीस्टेटमध्यें रूपांतर झालें. याच सुमारास सर जॉर्ज ग्रे याला केपचा गव्हर्नर नेमण्यांत आलें. यावेळीं दक्षिण आफ्रिकेंत एकंदर पांच राज्यें होतीं; केप कॉलनी, नाताळ, ब्रिटिश काफ्रेरिआ, ट्रान्सव्हाल व ऑरेंजफ्रीस्टेट. त्यांपैकीं पहिलीं तीन ग्रेटब्रिटनचें वर्चस्व कबूल करणारीं व शेवटलीं दोन स्वतंत्र बोअर प्रजासत्ताक राज्यें होतीं.

अतःपर बोअर प्रजासत्ताक राज्यांच्या कारभारांत बिलकुल ढवळाढवळ करावयाची नाहीं असें धोरण ब्रिटिश सरकारनें जाहीर केलें. पण सर जॉर्ज ग्रे याला लवकरच या धोरणा विरुद्ध वागणें भाग पडलें. ऑरेंजफ्रीस्टेट व ट्रान्सव्हाल यांचें एकीकरण करण्याचे ट्रान्सव्हाल सरकारचे प्रयत्न चालले होते. इतक्यांत फ्रीस्टेट व बासुटो यांच्यांत भांडण उपस्थित झालें. या वेळोवेळीं उत्पन्न होणाऱ्या वादाचा व अडचणीचा निकाल दक्षिण आफ्रिकेंतील निरनिराळ्या राज्यांचा संयुक्त संघ बनविल्यावांचून लागणार नाहीं असें सर ग्रे याचें मत बनून त्यानें तसल्या प्रकारची योजना इ.स. १८५८ त वसाहत सेक्रेटरीपुढें व १८५९ साली केप पार्लमेंट पुढें मांडली. पण ती वसाहतवाल्यांनां पसंत पडली नाहीं व १८५९ साली ग्रेला आपल्या जागेचा राजीनामा द्यावा लागला. पण याच्या नंतर मात्र वसाहतवाल्यांस ग्रेच्या योजनेची सत्यता पटूं लागली. परदेशच्या कारभारांत ढवळाढवळ न करण्याचें १८५४ साली पुकारलेलें धोरण आतां सोडून देण्यांत आलें होतें. १८७१ साली बासुटो लँड खालसा करण्यांत आलें. इ. स. १८७१ पासून १८७२ पर्यंतचा काळ केप कॉलनीला फार स्वास्थ्याचा व सुबत्तेचा गेला. या अवधींत पुष्कळशा सुवर्णखाणींचा शोध लागल्या- मुळें देशाच्या संपत्तींत भर पडून सरकारी खजिनाहि बराच वाढला. याच सुमारास ( १८७२ ) केप कॉलनीस स्वराज्य देण्यांत आलें. यावेळीं लॉर्ड कारनरव्हॉन हे वसाहत-सेक्रेटरी होते. कॅनॅडिअन प्रांतांचा संयुक्त संघ बनविण्यांत याचें प्रमुख अंग असल्यामुळें तोच प्रयोग दक्षिण आफ्रिकेंतहि करून पहाण्याचें यानें निश्चित केलें. तेथील लोकमत या योजनेस कितपत अनुकूल आहे हें ताडून पाहतां लॉर्ड कारनरव्हान याची निराशा झाली.संयुक्त संघासंबंधाची चळ- वळ इंग्लंडांत नव्हे तर दक्षिण आफ्रिकेंत उत्पन्न झाली पाहिजे असें वसाहतवाल्यांचें मत पडलें व ही योजना अंम- लांत आणण्याची योग्य वेळ अजून आली नाहीं असेंहि त्यांचें मत दिसलें, पण लार्ड कारनरव्हॉन यानें आपल्या प्रयत्नांत बिलकुल कमतरता होऊं दिली नाहीं. ट्रान्सव्हाल- मधील अंदाधुंदी व अव्यवस्था ह्या दोन गोष्टी त्याची योजना अंमलांत येण्यास सबळ कारण आहेत असें वाटत होतें. इकडे १८७७ सालच्या जानेवारी महिन्यांत ट्रान्सव्हॉल खालसा करण्यांत येऊन ब्रिटिश अंमलास जोडण्यांत आलें. बोअरांनां तर हें कृत्य आवडलें नाहींच पण कित्येक ब्रिटिश मुत्सद्यांनां देखील तें पसंत पडलें नाहीं. लॉर्ड कारनरव्हॉन याची योजना अंमलांत येण्याचें कांहींच चिन्ह दिसेना तेव्हां त्यानें स. १८७८ मध्यें आपल्या जागेचा राजीनामा दिला. १८८० साली केप पार्लमेंटनें संयुक्त संघासंबंधीच्या सूचना धुडकावून लावल्या व अशा रीतीनें लॉर्ड कारनर- व्हॉन याच्या अत्यन्त मेहनतीनें तयार केलेल्या प्रिय योज- नेची वासलात लावण्यांत आली.

१८७९ साली झुलु लोकांत व ब्रिटिश सरकारांत बखेडा उत्पन्न झाला. उलुंदीच्या लढाईंत झुलु सत्तेचा पूर्ण मोड करण्यांत आला. एका बाजूच्या संकटाची याप्रमाणें विल्हे- वाट लावण्यांत आली असली तरी ट्रान्सव्हाल खालसा करून उत्पन्न करून ठेवलेल्या संकटाचा अजून बंदोबस्त कराव- याचा होताच. 'ट्रान्सव्हाल खालसा करणें म्हणजे ब्रिटि- शांच्या उज्वल कीर्तीवर एक मोठा कलंक होय' अशा प्रका- रच्या ग्लॅडस्टन साहेबांच्या टीकेमुळें तर बोअरांनां आपलें गतस्वातंत्र्य परत मिळविण्यास जास्तच उत्तेजन मिळालें. ब्रिटिशांच्या प्रधानमंडळाचा ट्रान्सव्हाल न सोडण्याचा निश्चय पाहून बोअरांची डोकीं भडकलीं व त्यांनीं बंड पुकारलें. मॅजुबा हिल येथील एका ब्रिटिश टोळीस बंडखोरांनीं धुड- कावून लावलें व स्वातंत्र्याचें निशाण उभारलें. आतां मात्र ब्रिटिश प्रधानमंडळाचें धाबें दणाललें व त्यांनीं २२मार्च१८८१ रोजीं तह करून ट्रान्सव्हालला ब्रिटिश आधिपत्याखालीं स्वराज्य दिलें. याच वेळीं ट्रान्सव्हालच्या परराष्ट्रीय हितसंबंधावरील सत्ताहि ट्रान्सव्हालला देण्यांत आला. स १८७८ त वालफि- शबे ब्रिटिश राज्यास जोडलें. स १८८४-८५ च्या दरम्यान ऑरेंज नदी व पोर्तुगीज सरहद्द यांमधील किनारा जर्मनीनें आपल्या संरक्षणाखालीं घेतला. स. १८८४ त सेंट लुसिआ बे मिळविण्याचा जर्मनीनें प्रयत्न केला पण तो फसला. सेंट लुसिआ बे हें झुलुराजा पांडा यानें १८४३ साली ग्रेटब्रिटनला दिलें होतें. स. १८८५ च्या जानेवारींत पांडोलँडचा समुद्र- किनारा ग्रेटब्रिटननें आपल्या संरक्षणाखालीं घेतला. डेलागो- आबेवर पोर्तुगाल व ग्रेटब्रिटन हीं दोन्ही राष्ट्रें आजपर्यंत आपला हक्क सांगत. आतां ट्रान्सव्हालमधील बोअर देखील त्यावर हक्क सांगू लागले. तेव्हां फ्रेंच लोकसत्ताक राज्याच्या अध्यक्षाकडे याचा निकाल सोपविण्यांत आला स. १८७५ त भांडणाचा निकाल लागून शेवटीं पोर्तुगीजच डेलागोआबेचे मालक ठरले. स १८८४ मध्यें बेच्वानालँड खालसा करण्यांत येऊन ब्रिटिश अंमलास जोडण्यांत आलें. याच वेळीं दक्षिण आफ्रिकेच्या इतिहासांत सेसिल ऱ्होड्स हा एक विख्यात राजकारणी पुरुष म्हणून प्रसिद्धीस आला. ब्रिटिश राज्याचा विस्तार मध्य आफ्रिकेंत नेऊन पोंचवावयाचा असें याचें मनोराज्य होतें. पण या मनोराज्याला प्रतिरोधक अशी शक्ति त्याच वेळीं उत्पन्न झालेली होती. ही शक्ति म्हटली म्हणजे 'दि ॲफ्रिकँडर बाँड' नांवाचा संघ होय. हा संघ केप कॉलनींत स्थापण्यांत आला होता. 'स्वतःच्या स्वतंत्र निशाणाखालीं सर्व दक्षिण आफ्रिचें एकीकरण' हा या संघाचा उद्देश होता. डच लोकांच्या मनांत या संघानें नूतन राष्ट्रीय जागृति उत्पन्न करून दिली.

स १८८६ च्या सुमारास ट्रान्सव्हालमध्यें बऱ्याचशा सुवर्ण क्षेत्रांचा शोध लागला. त्यामुळें ट्रान्सव्हालच्या संपत्तींत भर पडून 'सरकारी तिजोरी अतोनात फुगली स. १८८९ मध्यें केपकॉलनी व ऑरेंजफ्रीस्टेट या दोहोंत जकात-संघाची

स्थापना करण्यांत आली. ट्रान्सव्हाल खेरीज करून इतर सर्व दक्षिण आफ्रिकेंतील राज्यें या संघांत सामील झालीं. ट्रान्सव्हालमध्यें सुवर्णनदी वाहूं लागलेली पाहून यूरोपियन व अमेरिकनांचे थवेच्या थवे तेथें जाऊन राहिले. हें पाहून क्रूगरला मोठी चिंता उत्पन्न झाली. त्यानें त्यांच्या वर अवाढव्य कर लादून त्यांनां ट्रान्सव्हालमधील स्वतंत्र नागरिक होतां येऊं नये म्हणून मतदानाच्या कायद्यांत तावडतोब फरक घडवून आणला. या लोकांनां युइटलँडर्स असें म्हणत. यांनां वाईट रीतीनें वागविल्यामुळें ट्रान्सव्हालवर काय परिणाम झाला हें पुढें कळून येईलच. १८८९ सालीं प्रेसिडेंट क्रूगरनें ऑरेंजफ्रीस्टेटबरोबर 'चढाईचा व संरक्षित' स्वरूपाचा तह केला.

१८९० सालीं सेसिलऱ्होड्स हा केप कॉलनीच्या प्रधानमंत्र्याच्या जागेवर आला.ब्रिटिश राज्यमर्यादा मध्य आफ्रिकेंत नेऊन भिडविण्याच्या प्रयत्नास आतां तो जोरानें लागला. त्यानें १८८८ सालीं माटाबेली राष्ट्रजातीचा मुख्य लोबेंगुला याच्याशीं तह करून तो देश जर्मनी, पोर्तुगाल अथवा बोअर यांच्या हातीं पडण्याचा संभव नाहींसा केला. १८९० सालीं मार्शोनालँड काबीज करण्यांत आलें. याप्रमाणें लवकरच ब्रिटिश सत्तेचा प्रसार टांगानिका सरोवरापर्यंत झाला. १८९३ सालीं बुलावायो काबीज करण्यांत आलें. स. १८९४ मध्यें यालाच ऱ्होडेशिया हें नांव देण्यांत आलें.

ऱ्होड्सनें आपल्या अमदानींत परस्परविरोधी हितसंबंधांचें एकीकरण करण्याचा शक्य तेवढा प्रयत्न केला. एतद्देशीय लोकांचा प्रश्न सोडविण्याचा त्याचा तऱ्हा बहुतेक सर्वांनां पसंत पडण्याजोगी होती. दक्षिणआफ्रिकेंतील राज्यांचा व वसाहतींचा एक संयुक्त संघ बनविण्याच्या कल्पनेचा तो एक पुरस्कर्ता होता. लहान लहान संस्थानांतून व प्रत्येक वसाहतींतून रेल्वे नेऊन जकातपद्धती सर्व वसाहतींत सर्वसाधारण करून या कल्पनेला मूर्तस्वरूप यावें असा त्याचा विचार होता या त्याच्या प्रयत्नाला पद्धतशीर व कसून विरोध करणारें ट्रान्सव्हाल हें एकच राष्ट्र होतें. इकडे ट्रान्सव्हालमधील स्वच्छ आकाशांत काळेकुट्ट ढग डोकावूं लागले होते. सुवर्णखाणींचा धंदा किफायतशीर दिसून आल्यामुळें लोकांची ट्रान्सव्हालमध्यें अतोनात गर्दी होऊं लागली. उत्पन्नापैकीं जवळ जवळ ५/६ भाग या खाणीवाल्यांकडून-युइटलँडर्सकडून सरकारी तिजोरींत जाऊन पडत असे. तरी त्यांनां नुसते म्युनिसिपल हक्क देखील ट्रान्सव्हाल सरकार देईना उलट त्यांनां ट्रान्सव्हालमधील स्वतंत्र नागरिक होतां येऊं नये म्हणून स. १८८२ च्या मतदारासंबंधीच्या कायद्यांतील ट्रान्सव्हालमध्यें नागरिकत्वाचा हक्क प्राप्त होण्याकरितां राहण्यासंबंधाची पांच वर्षांची मुदत १४ वर्षांची करण्यांत आली. असल्या जुलमी धोरणाचा युइटलँडर्सनां संताप येणें साहजिक होतें. अर्जांचा व शिष्टमंडळादि उपायांचा कांहींच उपयोग होत नाहींसें पाहून त्यांनीं शेवट सशस्त्र प्रतिकाराचा जालीम उपाय योजण्याचें निश्चित केलें. या त्यांच्या कार्यांत ऱ्होड्स यानें त्यांनां मदत देण्याचें अभिवचन दिलें. त्यांच्या व ऱ्होडस याच्या मतानें ट्रान्सव्हालवर स्वारी करून प्रेसिडेंट क्रूगरला वठणीवर आणण्याचें ठरलें. सर्व सिद्धता झाली. डॉ. जामिसननें ट्रान्सव्हालकडे कूचहि केलें. पण मध्येंच या सर्व बेतावर विरजण घालणारी एक गोष्ट घडून आली. 'राज्यक्रांति ब्रिटिश निशाणाखालीं घडवून आणावयाची' असें ऱ्होडस याचें म्हणणें पडलें व 'ट्रान्सव्हालचें स्वातंत्र्य पूर्णपणें कायम राखून तेथें खऱ्याखुऱ्या लोकसत्ताक राज्याची उभारणी करावयाची' असें तर युइटलँडर्सनीं आपल्या जाहीरपत्रकांत नमूद करून ठेवलें होतें. या महत्त्वाच्या मतभिन्नत्वामुळें बंडखोरांकडून तडकाफडकी क्रिया होऊं शकली नाहीं, व बंडाचा तावडतोब बीमोड करण्यांत आला.

या बंडाचे परिणाम एकंदरींत दक्षिणआफ्रिकेला फारच घातुक असे झाले. आतांपर्यंत निदान केप कॉलनींतील डच व ब्रिटिश लोकांत ऐकमत्य असे. ऱ्होड्स व जामिसन यांचा या बंडांत संबंध होता हें बाहेर आल्यापासून डच लोकांनां ब्रिटिशांच्या हेतूविषयीं संशय येऊं लागला. केप कॉलनींतील डच आतां उघड उघड ट्रान्सव्हालविषयीं सहानुभूति दर्शवूं लागले. फ्रीस्टेट व ट्रान्सव्हाल यांच्यात संगनमत झालें. 'डच रिपब्लिकन निशाणाखालीं दक्षिणआफ्रिकेचें एकीकरण' असा ध्वनि ट्रान्सव्हालांत सर्वत्र घुमूं लागला. लंडनमधील वसाहत-कचेरीस या कटाचा सुगावा होता हें समजल्यापासून तर डच लोकमत जास्तच प्रक्षुब्ध झालें व ॲफ्रिकँडर बांड पुन्हां एकदां ब्रिटिश-विरोधी बनला.

बंडानंतर थोड्याच दिवसांनीं ऱ्होड्स यानें केप कॉलनीच्या प्रधानमंत्रिपदाचा राजिनामा दिला. सर गॉर्डन स्प्रिग यानें त्याची जागा घेतली. स. १८९८ च्या आक्टोबरांत त्यानेंहि राजिनामा दिला. तेव्हां डब्ल्यू. पी. श्रिनर याच्या नेतृत्वाखालीं बाँड पक्षाचें प्रधानमंडळ अधिकारारूढ झालें.

इकडे ट्रान्सव्हालांत युइटलँडर्स लोकांची स्थिति फारच शोचनीय होऊं लागली. मतदारीचा कायदा जास्तच संकुचित करण्यांत आला. कायदेकारी मंडळ अंमलबजावणी खात्याच्या सत्तेखालीं देण्यांत आलें. प्रिटोरिया शहराची तटबंदी करण्यांत आली व दारूगोळ्याचा सांठा करण्यांत येऊं लागला. ही तयारी पाहून ग्रेटब्रिटननें बाहें इणाणलें, व योग्य वेळ येतांच युइटलँडर्सचीं गाऱ्हाणीं ऐकण्यास ट्रान्सव्हालला भाग पाडण्यासाठीं एखाद्या करारी माणसाची हायकमिशनरच्या जागेवर नेमणूक करण्याचें ग्रेटब्रिटननें ठरविलें.

स. १८९७ च्या मे महिन्यांत सर आल्फ्रेड मिलनर केपमध्यें येऊन हायकमिशनरच्या जागेवर रुजू झाला. याच वर्षी प्रेसिडेंट क्रूगर यानें सोन्याच्या धंद्यासंबंधींच्या गाऱ्हाण्यांचा विचार करण्याकरितां एक कमिशन नेमलें. कमिशननें आपल्या रिपोर्टांत सुधारणांची आवश्यकता

प्रतिपादिली. परंतु कमिशनच्या शिफारशीप्रमाणें वागण्याचें क्रूगरनें नाकारल्यामुळें फिरून शेवटचा प्रयत्न करून पहावा असें युइटलँडर्सनीं ठरविलें व 'आपल्या संबंधांत आपण मध्यस्थी करावी' अशा अर्थाचा एक विनंती-अर्ज राणीसरकारकडे केला.

स. १८९९ च्या मे महिन्यांत सर आल्फ्रेड मिलनर यानें वसाहत-सेक्रेटरी मिस्टर चेंबरलेन याला एक खलिता पाठवून युइटलँडर्सच्या बाजूनें मध्यस्थी करण्याच्या आवश्यकतेचें जोरदार मत प्रतिपादन केलें.युइटलँडर्सच्या दुःखाची समाप्ति झाल्यास त्यांच्यांतील केवळ इंग्रजांचाच फायदा होणार नसून इतरहि लोकांचा फायदा होणार असल्यामुळें हें कृत्य आपमतलबीपणाचें न होतां भूतदयेचेंच होईल असें त्यानें आपलें मत दिलें. शिवाय ट्रान्सव्हालमध्यें खोल रुजत चाललेल्या ग्रेटब्रिटनपासून विभक्त होण्याविषयींच्या चवळीसहि यायोगें आळा पडेल असेंहि त्यानें प्रतिपादिलें. याच वर्षाच्या मे महिन्याच्या ३१ तारखेस ब्लोएमफाँटेन परिषदेंत मिलनर यानें क्रूगरबरोबर या प्रश्नाचा खल केला. परकीयांसंबंधींच्या मतदारांच्या कायद्यांत १४ वर्षांची मुदत न ठेवितां पूर्वीप्रमाणें ५ वर्षांचीच ठेवावी म्हणजे पांच वर्षें ट्रान्सव्हालांत राहिलेल्या परदेशी मनुष्यास मतदानाचा हक्क मिळावा असें मिलनर यानें क्रूगरला सुचविलें. तेव्हां आपल्या बाजूनें क्रूगरनेंहि कांहीं मागण्या मिलनरपुढें ठेविल्या, पण त्या त्याला अशक्य वाटून परिषदेचें काम तेथेंच आटोपलें. परिषदेचें गांभीर्य क्रूगरच्या लक्षांत येऊन त्यानें ७ वर्षांची मुदत घालून नवीन मतदारीचा कायदा पास केला. पण त्या कायद्याला बरेच निर्बंध घातले होते, असें इंग्रज इतिहासकारांचें म्हणणें आहे.

आपल्या म्हणण्याप्रमाणें वागावयास प्रेसिडेंट क्रूगरला भाग पाडण्यास लढाईशिवाय दुसरा मार्ग नाहीं असें ग्रेट ब्रिटनला वाटूं लागलें व पूर्ण स्वातंत्र्य जर मिळवावयाचें असेल तर ग्रेटब्रिटनशीं रणांगणांत दोन हात केल्याशिवाय गत्यन्तर नाहीं अशी क्रूगरचीहि खात्री झाली. स. १८९९ च्या आक्टोबरच्या ९ व्या तारखेस ट्रान्सव्हाल-सरकारनें ब्रिटिशसरकारास निर्वाणीचा खलिता पाठविला. त्यांतील अटी काय होत्या हें ट्रान्सव्हालच्या इतिहासावरील लेखांत आलें असल्यामुळें त्याची येथें पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. ब्रिटिश सरकारनेंहि तरवारीच्या खणखणाटानेंच या खलित्यास उत्तर दिलें. दोन्ही बाजूंचीं दळें सज्ज झालीं व लढाईस सुरवात झाली. या भीषण संग्रामाची साग्र हकीगत ट्रान्सव्हालवरील लेखांत आलीच आहे. स. १९०० च्या मेच्या २८व्या तारखेस फ्रीस्टेट खालसा करण्यांत आलें व सप्टेंबरच्या १ल्या तारखेस ट्रान्सव्हालहि ब्रिटिश अंमलाखालीं जोडण्यांत आला. ३१ मे १९०२ रोजीं प्रिटोरियाच्या तहावर बोअर लोकांनीं सह्या केल्या व हें २॥ वर्षेंपर्यंत लांबलेलें युद्ध एकदांचें संपलें. युद्धानंतर पुनर्घटनेचा प्रश्न ब्रिटिश मुत्सद्द्यांपुढें येऊन पडला. न्याय, शिक्षण व शेतकीखात्यांत सुधारणा करण्यांत आल्या. युइटलँडर्स लोक खाणीवर येऊन पूर्ववत काम करू लागले. या युद्धाचा असा एक परिणाम झाला कीं सुवर्णखाणी बंद पडल्या व त्यामुळें व्यापाराला बरीच ठोकर बसली. स. १९०३ च्या अखेरीअखेरीस खाणींच्या मालकांनीं खाणीवर काम करण्याकरितां चिनी मजूर बोलाविण्याची परवानगी घेतली.या लोकांनां तीन वर्षांच्या मुदतीनें बोलाविण्यांत आलें होतें. हे परकी लोक या ठिकाणीं येऊन देशाचा सर्व व्यापार काबीज करून बसतील या भीतीनें दक्षिण आफ्रिकेंतील लोकांनीं चिनी मजूर-पद्धतीस जोराचा विरोध केली. 'असंख्यात लोकांचें रक्त सांडून ग्रेटब्रिटनकरितां जिंकलेला देश आशियाखंडस्थ लोकांच्या भक्ष्यस्थानीं देण्यांत येत आहे' अशी चोहोंकडून हाकाटी होऊं लागली. तेव्हां मुदत संपल्याबरोबर देश सोडून गेलेंच पाहिजे असे व इतर प्रकारचे जाचक कायदे चिनी लोकांसंबंधीं करून टीकाकारांचें तोंड बंद करण्यांत आलें.

प्रिटोरियाच्या तहांत पुनर्घटनेचें कार्य संपल्यानंतर ट्रान्सव्हालला ब्रिटिश निशाणाखालीं स्वराज्य देण्यासंबंधीचें एक कलम होतें. त्याप्रमाणें स. १९०४ च्या जुलैमध्यें ब्रिटिश सरकारनें आपला हा उद्देश जाहीर केला, व स. १९०६ च्या डिसेंबरच्या १२ तारखेस ट्रान्सव्हालला स्वराज्य अर्पण करण्यांत आलें. स्वराज्यपार्लमेंटचा जनरल बोथा हा प्रधानमंत्री झाला व मिस्टर स्मट्स याला वसाहत-सेक्रेटरी नेमण्यांत आलें. पार्लमेंटमध्यें युइटलँडर्स लोकांनांहि जागा देण्यांत आल्या. दक्षिण आफ्रिकेंतील निरनिराळ्या राष्ट्रांचा व वसाहतींचा मिळून एक संघ बनविण्याच्या चळवळीस आतां जोर येऊं लागला. राष्ट्राराष्ट्रांतील आर्थिक चढाओढ व विरोध स. १९०६ च्या सुमारास फारच विकोपास जाऊन पोहोंचला होता. तेव्हां निरनिराळ्या वसाहतींनां व राष्ट्रांनां एका सर्वसाधारण मध्यवर्ती शासनसत्तेखालीं आणून एकत्रित केल्याशिवाय गत्यन्तर नाहीं असें ब्रिटिश मुत्सद्द्यांनां वाटूं लागलें, इतकेंच नव्हे तर बाँडप्रधानमंडळास व बोथाप्रधानमंडळासहि संयुक्त संघाची कल्पना पसंत पडली. या प्रश्नाचा विचार करण्याकरितां आक्टोबर स. १९०८ मध्यें दरबान येथें एक राष्ट्रीय परिषद भरविण्यांत आली. या परिषदेनें एक योजना तयार केली व ती सर्व वसाहतींनां पसंत पडली. स. १९०९ मध्यें ब्रिटिश पार्लमेंटनें 'ॲक्ट ऑफ युनिअन' पास केला. त्याच वर्षाच्या सप्टेंबरच्या २०व्या तारखेस त्याला राजेसाहेबांची संमति मिळाली. ३१ मे १९१० या दिवशीं 'दक्षिणआफ्रिकासंघाची' स्थापना करण्यांत आली व हर्बर्ट ग्लॅडस्टन याला संघाचा पहिला गव्हर्नर जनरल नेमण्यांत आलें.

**अर्वाचीन दक्षिण आफ्रिका ( १९१०-१९२० ).**— इ. स. १९१५ सालीं यूनियन सरकारच्या सैन्यानें जर्मनीपासून नायव्य आफ्रिका हिरावून घेतल्यापासून, पोर्तुगीजांच्या ताब्यांतील आफ्रिकेचा भाग वगळून बाकी सर्व

आफ्रिका ब्रिटिशांच्या ताब्यांत आली म्हटलें तरी चालेल. ब्रिटिशांच्या ताब्यांतील आफ्रिकेचे राजकीय शासन दृष्ट्या खालील प्रमाणें विभाग पाडण्यांत आले होते. ( १ ) १९१० सालीं ब्रिटिश साम्राज्यांत प्रविष्ट झालेला यूनियन ऑफ साउथ आफ्रिकेचा मुलूख. या मुलुखांत केप, नाताळ, ऑरेंजरिव्हर व ट्रान्सव्हाल या वसाहतींचा अंतर्भाव होतो. ( २ ) साउथ वेस्टर्न प्रोटेक्टोरेट. ( ३ ) बेसुटोलंड, बेचुआनालंड, स्वाझलिंड इत्यादि संरक्षित संस्थानें. ( ४ ) र्‍होडेशिया.

क्षेत्रफळ व लोकसंख्याः—र्‍होडेशियाचा भाग धरून सर्व दक्षिण आफ्रिकेचें क्षेत्रफळ १६५०००० चौरस मैल असून त्यांपैकीं पोर्तुगीजांच्या ताब्यांत असलेल्या प्रदेशाचें क्षेत्रफळ १२५००० चौरस मैल आहे. १९२१ सालीं दक्षिण आफ्रिकेची लोकसंख्या ११०००००० होती. पैकीं ७००००० लोक पोर्तुगीजांच्या मुलुखांत होते. यूनियन ऑफ साउथ आफ्रिका उर्फ दक्षिण आफ्रिकासंघ हा १९१० सालीं मे महिन्याच्या ३१ व्या तारखेस अस्तित्वांत आला. या यूनियन मधील शहरांमध्यें फक्त गोर्‍या लोकांनाच निवडून येण्याचा अधिकार आहे. १९२० सालीं केप, ट्रान्सव्हाल, नाताळ व ऑरेंजफ्रीस्टेट या वसाहतींना अनुक्रमें ५१, ४९, १७ व १७ अशा उमेदवारांना निवडून देण्याचा हक्क होता. १९१०–१९२० या सालाच्या दरम्यान मतदारांसंबंधींच्या कायद्यांत कांहींच सुधारणा घडून आली नाहीं.

शेतकीः—१९१०–१९२१ च्या दरम्यान दक्षिण आफ्रिकेमधील शेतकीच्या क्षेत्रांत बर्‍याच सुधारणा घडून आल्या. यूनियन सरकारनें प्रांतिक सरकारच्या ताब्यांतून शेतकीची खातीं काढून घेऊन आपल्या ताब्यांत आणल्यानें, शेतकीमध्यें झपाट्यानें सुधारणा होत गेल्या. या शेतकीसुधारणेचें बहुतेक श्रेय सेनापति बोथा यालाच देणें जरूर आहे. त्याच्या प्रयत्नानें शेतकीचें शिक्षण देणार्‍या शाळा उघडण्यांत येऊन त्यांमधून शास्त्रीय तर्‍हेनें कृषिशिक्षण देण्याची व्यवस्था अंमलांत आली. १९२१ सालीं दक्षिण आफ्रिकेंत ५ शेतकी शाळा होत्या. १९२० सालीं या शाळांमधून ५००० विद्यार्थी बाहेर पडले होते व या शाळांच्या प्रीत्यर्थ १० लाख पौंड खर्चण्यांत आले होते. शेतकीच्या बाबतींत अत्यंत उपयोगी अशीं गुरेंढोरें व त्यांची निपज चांगल्या तर्‍हेची व्हावी एतदर्थ पुष्कळ खटपट करण्यांत आली. निरनिराळ्या प्रकारचीं झाडें व धान्यें आणून त्यांच्यांवर प्रयोग करण्यांत आले. या सर्वांचा परिणाम असा झाला कीं, महायुद्धाच्या ऐन अमदानींतहि, आफ्रिकेला खाद्यवस्तू दुसर्‍या देशांतून आणविण्याचें प्रयोजन पडलें नाहीं. दक्षिण आफ्रिकेंतील महत्त्वाचा उद्योग म्हणजे मेंढ्यांची निपज हा होय. १९१९ सालीं दक्षिण आफ्रिकेंत २३५४८००० मेंढ्या होत्या व तेथून १९१९ सालीं १४६४८००० पौंडांची लोंकर परदेशीं गेली. मोहेरचा पुरवठा दक्षिण आफ्रिकेंतून फार होतो. १९२० सालीं पहल्या कालांतहि ५००००० पौंडांचे मोहेर परदेशी निर्गत झाले. १९१९ सालीं यूनियनमधील गुराढोरांची संख्या ७२५५००० होती. १९१७ सालीं दक्षिण आफ्रिकेंतून १७४३००० पौंडांचें मांस परदेशीं रवाना झालें. १९१९ सालीं ४५२००० पौंड लोणी व १५४६००० पौंड चीज परदेशीं गेलें. १९१९ सालीं यूनियनमध्यें ६९५००० घोडीं आणि गाढवें होतीं. दक्षिण आफ्रिकेमध्यें फार प्रसिद्ध असा धंदा म्हणजे शहामृगांच्या पिसांचा होय. महायुद्धाच्या अमदानींत या धंद्याला उतरती कळा लागली. १९१३ सालीं दक्षिण आफ्रिकेंतून २९५३००० पौंड किंमतीचीं शहामृगांचीं पिसें परदेशीं रवाना झालीं. पण हल्लीं हा धंदा अगदींच बसला आहे.

दक्षिण आफ्रिकेंत होणार्‍या खाद्यधान्यांमध्यें मका हा विपुल प्रमाणांत होतो. १९१८ सालीं १६००००० पौंडांचा मका बाहेर गेला. मक्याच्या खालोखाल काफीर धान्याचा नंबर लागतो. याचा गुरांना चार्‍याच्या कामीं उपयोग होतो. केप प्रॉव्हिन्समध्यें गहूं मोठ्या प्रमाणावर पिकतो. ओटचेंहि उत्पन्न बरेंच आहे. नाताळ व झुलुलँड यांची साखरेबद्दल प्रसिद्धि आहे. १९१९–२० सालीं या प्रदेशांत १८०००० टन साखर तयार झाली व तीपैकीं ३००० टन साखर बाहेर गेली. साखरेचा धंदा किफायतशीर होऊं लागल्यानें चहाच्या धंद्याला उतरतीकळा लागली. तंबाखूचें उत्पन्न बरेंच आहे. दक्षिण आफ्रिकेंत निरनिराळ्या प्रकारचीं फळें होतात. पण त्यांची निर्गत बाहेर फारशी होत नाहीं. १९१९ सालीं १२५००० पौंडांच्या किंमतीचीं फळें मुरब्बा अगर आमच्या रूपानें बाहेर गेलीं.

कालवे व खाणीः—१९२२ पर्यंत या बाबतींत यूनियन सरकारकडून कांहींच करण्यांत आलें नाहीं. १९१२ सालीं इरिगेशन व कॉन्सरवेशन ऑफ वॉटर ॲक्ट पास झाला व इरिगेशन खातें निर्माण करण्यांत आलें. या खात्यावर सरकारचा खर्च सुमारें ५७३००० पौंड इतका १९१८ सालीं झाला होता.

दक्षिण आफ्रिकेंतील महत्त्वाचा खनिजपदार्थ म्हणजे कोळसा हा होय. १९१४ सालापासून फार ईस्टर्न रँड येथें नवीन खाणींचें काम सुरू करण्यांत आलें आहे. रँड येथें खाणींतून सोनें काढण्याचें काम अत्यंत खर्चाचें आहे असें आढळून आलें. हिर्‍याच्या खाणी आफ्रिकेंत विपुल आहेत. त्या ठिकाणीं किंमतीमध्यें अत्यंत फरक वारंवार होत असतात. फार ईस्ट रँडच्या वाढीवरच सोनें काढण्याचा कारखाना व व्यापार १९१२ पासून अवलंबून असलेला आढळतो. १९१० ते १९२१ च्या दरम्यान कोळशाची निपज बरीच वाढ पावली. नाताळ व ट्रान्सव्हाल येथें चांगला कोळसा पैदा होऊं लागल्यामुळें केप प्रांताच्या खाणी मागें पडल्या. तांब्याची निपजहि बरीच होऊं लागल्यामुळें दक्षिण आफ्रिकेचा व्यापार वाढूं लागला आहे.

व्यापार व गलवर्तेः—हिरे व सोनें यांची दक्षिण आफ्रिकेमधून परदेशीं निर्गत होते. दरबान, केपटाउन, पोर्ट एलिझाबेथ व ईस्ट लंडन येथेंच बहुतेक मोठ्या प्रमाणावर व्यापार सुरू असतो. आयात व निर्गत यांच्या प्रमाणांत चढ उतार झालेला आढळून येतो. यूनियनच्या व्यापारांत भाग घेणारें एकच परकीय बंदर म्हणजे डेलागोआबे हें होय. फ्रान्स व अर्जेंटाइन हे देशच मुख्यतः यूनियनशीं व्यापार करणारे असे आहेत. १९१३ मध्यें यूनियन बंदरांत येणारीं जर्मन व्यापारी जहाजें एकंदर २३० होतीं. जपान, अमेरिका, कानडा, न्यूझीलंड, ऑस्ट्रेलेशिया वगैरे देशाशींहि व्यापार चाललेला असतो.

जमाबंदीः—सर्व वसूल यूनियन सरकारकडे जातो व राज्यकारभार चालण्यास यूनियन एकसत्ताकेंकडून देणग्या दिल्या जातात. १९१३ सालीं अमलांत आलेल्या फायनॅन्शल रिलेशन ॲक्टाअन्वयें, वसूल करण्याचा हक्क प्रांतांना मिळाला आहे परंतु एतद्विषयी कायदे करण्याचा हक्क मात्र त्यांनां ठेवलेला नाहीं. शिक्षण, व्यापार व परवाने या बाबतींत वसूल करण्याचा व खर्च करण्याचा प्रांतांना अधिकार ठेवलेला आहे. यूनिअन ट्रेजरीशिवाय इतर ठिकाणीं कर्ज काढण्याचा प्रांतांना अधिकार नाहीं. पोस्ट ऑफिस, सेव्हिंग बँक यांतील पैसा पब्लिकडेट कमिशनरच्या ताब्यांत दिला जातो. साधा अथवा सामान्य फंड व रेल्वे आणि बंदरें या विषयींचा फंड अशा दोन फंडांत यूनियनचा जमाखर्च विभागला गेला आहे.

दळणवळणः—यूनियनमधील बहुतेक सर्व रेल्वे सरकारी असून रेल्वे व बंदरें एका बोर्डाच्या ताब्यांत आहेत. १९१९ सालीं १००४९ मैल रेल्वे तयार होती व तीपैकीं ९५४२ मैल रेल्वे सरकारची होती व बाकीची खाजगी होती. नवीन रेल्वे करण्यांत दहा वर्षांत एकंदर खर्च सुमारें ९११३००० पौंड आला होता. दरबान ते ग्लेंकोपर्यंत व इतर रेल्वेच्या बाबतींत विद्युत्शक्तीचा उपयोग करण्यांत यावा अशी शिफारस सरकारी एंजिनियरनें स. १९२० मध्यें केली होती. दरबान-मारिट्झबर्ग रेल्वेसंबंधीं विद्युत्शक्तीचा उपयोग करण्यांत आला. जागतिक युद्धानंतर साउथ वेस्ट प्रोटेक्टोरेट येथील रेल्वेचा ताबा, रेल्वे-बंदरें यासंबंधीं स्थापन झालेल्या बोर्डानें घेतला.स.१९२० मध्यें यूनियन व प्रोटेक्टोरेट येथील रेल्वे ११३३४ मैल झालेली होती. १९१३ पासून मोटारगाड्यांचा सुळसुळाट सुरू झाला. १९१९ सालीं १६००० मोटारींना परवाना देण्यांत आला. बहुतेक गाड्या अमेरिकेहून मागविलेल्या आहेत. तथापि ओझीं नेणाऱ्या मोटारगाड्या इंग्लंडहून मागविण्यांत येतात. तारखात्याची वाढ झाली असून बिनतारी तारायंत्राचीं स्टेशनें दरबान, केपटाउन व पोर्ट एलिझाबेथ येथें सुरू करण्यांत आलीं. १९२१ सालीं बिनतारी टेलिफोन स्टेशनें उघडण्यांत आलीं. १९१२ सालीं यूनियन कासल कंपनीनें इंग्लंडचा मेल सर्व्हिसचा एक दहा वर्षांचा करार केला. ऑस्ट्रेलिया, हिंदुस्थान वगैरे देशांशीं दळणवळण ठेवण्याचें काम खाजगी कंपनींचीं गलबतें करितात. वैमानिक प्रवासांचीहि हळूहळू प्रगति होत आहे. कायरो ते केपटाउनपर्यंत पहिलें उड्डाण १९२० सालीं दोघां धाडसी साउथ आफ्रिकन लोकांनीं केलें होतें.

शिक्षणः—प्रांतिक कौन्सिलांच्या ताब्यांत युनिव्हर्सिटी शिक्षणाव्यतिरिक्त सर्व शिक्षण असून प्रांताप्रांतांतील शैक्षणिक प्रमाण व पद्धति यांमध्यें फरक आढळून येतो. परंतु गोरे व बिनगोरे यांच्या शिक्षणाची एकंदर चांगली सोय लावण्यांत आली. कोणत्या भाषेंतून शीक्षण घ्यावें हा यूनियन स्थापनेपूर्वी व नंतर एक वादग्रस्त प्रश्न होऊन राहिला. कायद्यानें इंग्रजी व डच भाषांनां समानत्व दिलें होतें. बराच वाद झाल्यानंतर शेवटीं १९११ सालीं असें ठरलें कीं, चवथ्या इयत्तेपर्यंत मुलाच्या मातृभाषेंतून शिक्षण द्यावें व त्यापुढें काय करावें हें त्याच्या आईबापांवर सोपवावें. धार्मिक शिक्षणाबद्दल फारशा अडचणी उद्भवल्या नाहींत. गोऱ्या मुलांकरितां १९१८ सालीं ४८४६ शाळा होत्या व इतरांकरितां २८७७ शाळा त्या वर्षी चालू होत्या. गोऱ्या विद्यार्थ्यांची १९१८ मधील संख्या २८३१०० इतकी असून इतर विद्यार्थ्यांची संख्या त्या सालीं २२०१०० इतकी भरली होती.१८३०१ इतकी शिक्षकांची संख्या असून ३६३१००० पौंड इतका सरकारी खर्च शिक्षणाप्रीत्यर्थ त्या वर्षी झाला होता. खासगी शाळांची संख्या फारशी नाहीं. नेटिव्हांचें शिक्षण बहुतेक मिशनरी लोकांच्या ताब्यांत आहे. लव्हडेल कॉलेज प्रसिद्ध असून नेटिव्हांकरितां स. १९१४ मध्यें नेटिव्ह कॉलेज स्थापण्यांत आलें. साउथ आफ्रिकेंतील युनिव्हर्सिटींचीं मुख्य ठिकाणें प्रिटोरिया, केपऑफगुडहोप हीं असून त्यांस अनेक कॉलेजें जोडलेलीं आहेत. केपटाउन व स्टेलेन बॉस या युनिव्हर्सिटया प्रसिद्ध आहेत. युनिव्हर्सिटीच्या विद्यार्थ्यांची संख्या १९१८ सालीं २०६९ होती. या सालीं उच्च शिक्षणाप्रीत्यर्थ यूनियन सरकारचा २४०००० पौंड खर्च झाला.

इतिहास.—'यूनियन ऑफ साउथ आफ्रिका' सरकार स्थापन झाल्यानंतर पहिली महत्त्वाची जी गोष्ट घडून आली ती म्हणजे, डच लोकांनीं यूनियन सरकारनें ब्रिटिश साम्राज्याशीं असलेला संबंध तोडून टाकावा एतदर्थ चालविलेली चळवळ होय. त्याचप्रमाणें महायुद्धांत कोणत्याच बाजूनें यूनियननें पडूं नये अशीहि चळवळ सुरू झाली. पण या दोन्ही चळवळी जनरल बोथा व स्मट्स या दोन धुरंधरांनीं मागें पाडल्या. याच सुमारास मजूरपक्षानें आपली संघटना करून सोशालिस्ट मतें प्रतिपादन करण्यास सुरुवात केली. हिंदी लोकांनां यूनियनमध्यें येऊं न देण्याची गोऱ्या लोकांची चळवळ याच वेळीं चालू होती. काळ्या-गोऱ्या लोकांमध्यें तेढ माजत चालली होती व बांटु लोकांनीं या प्रश्नाचा निकाल लावण्यासाठीं चंगच बांधला होता. यूनियन सरकार

स्थापन झाल्यानंतर जनरल बोथा यास या नवीन सरकारचा कारभार चालविण्यासाठीं मंत्रिमंडळ बनविण्याची विनंति करण्यांत आली. कौन्सिलची निवडणूक लोकांनींच करावयाची होती. ही निवडणूक होऊन बोथानें सर्वपक्षीय असें संयुक्त मंत्रिमंडळ बनाविलें. यूनियनच्या पार्लमेंटमध्यें १९११-१२ च्या बैठकींत ज्या महत्त्वाच्या प्रश्नावर चर्चा झाली तो प्रश्न म्हणजे शिक्षणासंबंधीं होय. यूनियन स्थापन करणाऱ्या कायद्यानें, पांच वर्षें प्रांतिक सरकारच्या हातांत, उच्च शिक्षणाखेरीज इतर सर्व शिक्षणाची दिशा ठरविण्याचा हक्क ठेवला होता. पण या अवधींत यूनियननें आपलें म्हणणें शिफारसीवजा प्रांतिक सरकारला कळवावयाचें ठरलें होतें. या शिफारसी ठरविण्याकरितां एक संयुक्त शिक्षणकमिटी नेमण्यांत आली होती. तिनें चौथ्या इयत्तेपर्यंत सर्व शिक्षण मातृभाषेंतून देण्यांत यावें व त्यानंतर दुय्यम शिक्षण विद्यार्थ्यांच्या व त्यांच्या पालकांच्या इच्छेवरून इंग्लिश अगर डच भाषेंतून देण्यांत यावें अशी शिफारस केली. यासंबंधी विचार करण्याकरतां पार्लमेंटमध्यें चर्चा सुरू झाली.त्यावेळीं हर्टझोग नांवाच्या एका सभासदानें त्याला विरोध केला. त्याचें म्हणणें प्रथमपासूनच सर्व विद्यार्थ्यांनां इंग्लिश व डच या दोन्ही भाषा शिकविण्यांत याव्यात. पण त्याच्या विरोधाला न जुमानतां यूनियननें कमिटीचा मूळचा ठरावच पसंत केला.

यानंतर यूनियन पार्लमेंटनें उच्च शिक्षणाचा प्रश्न हातीं घेतला. त्यावेळीं अवघ्या दक्षिण आफ्रिकेंत केपटाउन येथें केप ऑफगुडहोप ही एकच युनिव्हर्सिटी होती व ती सुद्धां परीक्षा घेणारी युनिव्हर्सिटी होती. शिक्षण देणारी युनिव्हर्सिटी स्थापन करण्यांत येण्याबद्दल सूचना आलेल्या होत्या व युनिव्हर्सिटी स्थापन करण्याबद्दल दोघा शिक्षणप्रेमी विद्वान् धनिकांनीं ५००००० पौंड देणगी केले होते. अर्थात् पार्लमेंटला यासंबंधीं विचार करणें भाग पडलें. या सूचनेवर कडाक्याचा वादविवाद होऊन ही सूचना नापास झाली. पण या सूचनेचा बारकाईनें तपास करण्याकरतां एक मंडळ नेमण्यांत आलें.या मंडळानें १९१४ सालीं आपला रिपोर्ट सादर केला. त्यांत या मंडळानें केपटाउन व प्रेटोरिया या ठिकाणीं दोन युनिव्हर्सिट्या स्थापन करण्याची शिफारस केली होती. या रिपोर्टावरहि बरीच टीका करण्यांत आली. विशेषतः डच लोकांनीं तर या रिपोर्टावर सडकून टीकेचा भडिमार केला. यामुळें पार्लमेंटनें साउथ आफ्रिकायुनिव्हर्सिटी, केपटाउन युनिव्हर्सिटी व स्टेलेनबोश युनिव्हर्सिटी अशा तीन युनिव्हर्सिट्या स्थापन करावयाचें ठरविलें. यांपैकीं शेवटच्या दोन युनिव्हर्सिट्या या शिकविणाऱ्या युनिव्हर्सिट्या होत्या. याच बैठकींत काळ्या गोऱ्यांच्या हितसंबंधांविषयीं यूनियनमध्यें आशियाटिक लोकांचा कोणता दर्जा असावा याविषयी व राष्ट्रीय व साम्राज्यसंरक्षणाविषयीं विचार करण्यांत आला. त्या विचारान्वयें १९१२ सालीं डिफेन्स ॲक्ट अंमलांत येऊन त्या पायीं ५ लाख पौंड खर्च करण्यांत यावा असें ठरलें. १८ ते २१ वर्षांच्या मधील मुलांनां लष्करी शिक्षण देण्याची तजवीज करण्यांत आली. या वयाच्या विद्यार्थ्यांपैकीं निम्म्या लोकांनीं तरी कोणत्या तरी लष्करी संस्थेंत सामील झालेंच पाहिजे असा ठराव पार्लमेंटनें पास केला. या सक्तीला बोअर लोकांनीं विरोध केला पण त्यांचें कांहीं चाललें नाहीं. आशियाटिक लोकांसंबंधींच्या प्रश्नामध्यें दोन महत्त्वाचे मुद्दे होते. (१) यूनियनमध्यें त्यावेळीं असलेल्या आशियाटिकांचा काय दर्जा असावा (२) व त्यानंतर आशियाटिक लोकांनां यूनियनमध्यें येऊं द्यावें किंवा नाहीं. या दुसऱ्या मुद्द्यावर गोऱ्या लोकांचें नकाराच्या बाबतींत एक मत होतें. फक्त पहिल्या मुद्द्यावर मात्र बरीच चर्चा होण्यासारखी होती. यूनियनमध्यें त्यावेळीं दीड लाख आशियाटिक लोक होते. यापैकीं ⅘ नातालमध्यें होते. नातालमधील या हिंदू लोकांचे फार हाल करण्यांत येत असत व खुद्द हिंदुस्थान सरकारनेंहि याबद्दल आपली नापसंति व्यक्त केली होती. इतर बहुतेक वसाहतींमध्यें आशियाटिक लोकांनां बंदीच करण्यांत येत असल्यामुळें त्या ठिकाणीं हा प्रश्न तीव्र स्वरूपाचा नव्हता. फक्त नातालमध्येंच या प्रश्नाला तीव्र स्वरुप प्राप्त झालें होतें. नाताळमधील आशियाटिक लोकांनां राजकीय हक्क अजीबात नव्हते. ट्रान्सव्हालमध्येंहि हीच स्थिति होती. त्यामुळें आशियाटिक लोकांमध्यें असंतोष उत्पन्न झाला होता. हिंदुस्थान सरकारनें यूनियनमध्यें असलेल्या आशियाटिक लोकांनां चांगलें वागविण्यांत यावें अशी विनंति यूनियनला केली होती पण तिचा तादृश उपयोग झाला नाहीं. स. १९१२ मध्यें नामदार गोखले हे आफ्रिकेंत गेले होते व त्यांनींहि यूनियन सरकारशीं या प्रश्नावर चर्चा केली. दाक्षिणआफ्रिकेंतील हिंदूंनां कांहीं सवलती मिळवून द्याव्या असा गोखल्यांचा मूळ हेतु होता. इ. स. १८९३ मध्यें तेथें गेलेले महात्मा गांधी नाताळ व ट्रान्सव्हालच्या हिंदी जनतेचे नायक बनले.

१९१३च्या जूनमध्यें यूनियन सरकारनें इमिग्रेशन रेग्युलेशन ॲक्ट पास केला. या कायद्याचा मूळ हेतु आशियाटिक लोकांनां यूनियनमध्यें जाण्याला मज्जाव करावा असा होता. गांधींच्या नेतृत्वाखालीं लोकांनीं निःशस्त्रप्रतिकार करण्यास सुरवात केली. एका प्रांतांतून दुसऱ्या प्रांतांत जाण्याबद्दल असलेला मनाई हुकूम मोडण्याकरितां २७०० हिंदी लोक गांधींबरोबर जाऊं लागले. पांचशे लोकांनां नाताळांत अटक करण्यांत आली. गांधींनां नऊ महिन्यांची शिक्षा झाली. त्यानंतर एक कमिशन नेमण्यांत आलें व नाताळांतील पोलटॅक्स व हिंदी लग्नाविषयांचे निर्बंध स.१९१४च्या इंडियन रिलिफ ॲक्टानें काढून टाकण्यांत आले. याच सालीं गांधी-स्मट्स् करार झाला व महात्माजी हिंदुस्थानांत परत आले. दक्षिणआफ्रिकेच्या इतिहासाच्या [illegible] नकाबरोबरच हिंदी प्रश्नाचें पुढें काय

ठिकाणीं पाहिलें पाहिजे. हिंदुस्थानकडे जातांना गांधींनीं पुन्हां चळवळ चालू ठेवण्याचा उपदेश केला. हिंदी लोकासंबंधीं जास्त नियंत्रण असावें अशी यूरोपीयांची धडपड सुरूच होती. शेवटीं स.१९१८च्या इंपीरियल कॉन्फरन्समध्यें हिंदी प्रश्नांची व्यवस्था लागली व यूनियनतर्फे बर्टन यानें हिंदी लोक चांगले व शांतताप्रिय असून त्यांनां आफ्रिकेंत माणसकीनें वागविण्यांत यावें अशी शिफारस केली. गांधी-स्मट्स करारानंतर हिंदी लोकांनां व्यापार करण्याबद्दल परवाने मिळाले व त्यांनीं ट्रन्सव्हाल येथें खाजगी कंपन्या काढून जमीन व मालमत्ता घेण्यास सुरवात केली. या विरुद्ध तेथील गोऱ्या लोकांनीं कांगावा करण्यास सुरवात केली. १९१९ सालीं प्रिटोरियाच्या सुप्रीम कोर्टामार्फत मनाई करण्याचे प्रयत्न सुरू झाले व या लढ्याचा परिणाम पार्लमेंटरी सिलेक्ट कमिटी नेमण्यांत झाला व त्या कमिटीनें ठराव केला कीं, यापुढें हिंदी लोकांनां खाजगी कंपन्यामार्फत जमिनी घेण्याचा हक्क नाहीं. गोऱ्या व्यापाऱ्यांशीं चढाओढ करणारे हिंदी लोक ट्रान्सव्हालमध्यें थोडेसे होते परंतु नाताळांत मात्र हिंदी मजूरांची बरीच संख्या होती. १९२० सालीं आशियाटिक इन्क्वायरी कमिशन बसलें व हिंदुस्थानचे सर बेंजमिन रॉबर्टसन हे प्रतिनिधि म्हणून नेमण्यांत आले. या कमिशनचा रीपोर्ट निराशाजनक होता व हिंदुस्थान सरकारनेंहि त्याचा निषेध केला. वसाहतींत हिंदी लोकांचा समानदर्जा असावा हें तत्त्व त्यावेळीं कानडा, ऑस्ट्रेलिया व न्यूझिलंड यांनीं १९२१ सालच्या इंम्पीरियल कॉन्फरन्समध्यें मान्य केलें. परंतु दक्षिण आफ्रिकेतर्फे असलेल्या जनरल स्मटस् वगैरे प्रतिनिधींनीं हिंदीलोकांनां नागरिकत्वाचे हक्क देण्याच्या बाबतींत कसून विरोध केला.

गोरे लोक व बिनगोरे लोक यांमधील जातिमत्सर जसा वाढूं लागला तेव्हां असें ठरविण्यांत आलें कीं या प्रश्नाचा निकाल प्रांतिक कौन्सिलाकडे न सोंपवितां खुद्द सरकारतर्फे 'नेटिव्ह अफेअर्स डिपार्टमेंट' नें या गोष्टीची व्यवस्था लावावी. गोऱ्या लोकांवर काफीर लोक अत्याचार करीत असत असें प्रसिद्ध झाल्यामुळें सन १९१२ मध्यें एक कमिशन नेमण्यांत आलें होतें. बांटू वगैरे नेटिव्ह लोक युरोपीयांशीं स्पर्धा करीत असत परंतु मजुरीशिवाय केप बॉइज नामक लोक, वकील, वृत्तपत्रकार, वैद्य, वगैरे उच्च दर्जाचे धंदेहि करीत असत. बिनगोरे व स्थानिक लोक यांचें सहकार्य बाबत चाललें होतें. स्वयंनिर्णयाची मागणी जोरानें होण्यास सुरवात झाली होती. १९२० सालच्या कायद्यानें नेटिव्ह व गोरेलोक यांनां परस्परांपासून अलग ठेवण्याचा प्रयत्न करण्यांत आला होता नेटिव्ह लोकांनां निराळ्या जागा व अनेक सवलती देण्यांत याव्या असें स्मट्सचेंहि मत होतें. व्यापार व शेती यांची वृद्धि व्हावी अशी सरकारास आवश्यकता वाटूं लागल्यामुळें १९११ सालीं एक कमिशन नेमण्यांत आलें व त्यांत काळ्याची व्यवस्था करण्यांत आली. स्टेटलँड व ॲग्रिकल्चरल बँक वगैरे संस्था स्थापन करण्यांत आल्या. यूनियनच्या टॅरिफ पॉलिसीबद्दल मतभेद उत्पन्न झाला होता. १९१२ सालच्या कमिशनचें असें मत होतें कीं, गहू, पीठ, साखर, चहा व कापड यांवर जबर कर बसविण्यांत यावा. कर कमी असावा म्हणून न्होडेशियाची मागणी होती. १९२१ सालीं बोर्ड ऑफ ट्रेड ॲंड इन्डस्ट्रीज स्थापण्यांत आलें. रेलवे व हार्बर बोर्ड हें खातें रेल्वे व बंदरें बांधण्याचें काम करीत असे. ज्या तत्त्वावर यूनियनची स्थापना झालेली होती त्यासंबंधीं जनरल हर्टझोग यानें बराच वाद माजविला. जनरल बोथा-स्मट्सप्रभृति ब्रिटिशांशीं आफ्रिकेचा संबंध राहावा या मताचे होते.इंम्पीरियल कॉमनवेल्थचा साऊथआफ्रिका हा भाग स्वयंसत्ताक घटक असावा असेंहि त्यांचें मत होतें. इंग्रज व डच या गोऱ्या वसाहतवाल्यांमध्यें शांतता नांदावी हें आफ्रिकेच्या कल्याणाच्या दृष्टीनें केव्हांहि इष्ट होतें. हर्टझॉग याचें मत डचांचा वरचष्मा असावा असें होतें बोथाला शेवटीं राजीनामा द्यावा लागला व हर्टझॉगच्या नेतृत्वाखालीं एक राष्ट्रीयपक्ष उत्पन्न झाला. १९१३–१४ सालीं मजूरांच्या चळवळींमुळें अत्यंत अस्वस्थता माजली. रँडमधील दंग्याधोप्यापुढें नाताळांतील बिचाऱ्या हिंदू लोकांच्या सत्याग्रही चळवळी कांहींच नव्हत. रँड येथील खाणींतील मजूर हे गोरे होते व त्यांनीं अगदीं बंडच केल्याप्रमाणें दंगे केले. जोहान्सवर्ग येथें ब्रिटिश सैन्य धाडण्यांत आलें होतें. पुष्कळ लोक जखमी झाले व मृत्यू पावले. लष्करी कायदा पुकारण्यांत आला होता. शेवटीं १९१८ सालच्या फॅक्टरी ॲक्टनें मजूरांची स्थिति सुधारण्याचा प्रयत्न करण्यांत आला.

१९१४ सालीं ग्लॅडस्टन साहेब विलायतेस गेले व त्यांच्या जागीं लॉर्ड बक्स्टन नेमण्यांत आला.जागतिक युद्धांत आफ्रिकेची खरी पारख झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. बोअर लोकांच्या मनांतली ब्रिटिशांबद्दलची अढी अद्याप गेलेली नव्हती. त्यांची सहानुभूति जर्मनांकडे बरीच होती. बोथा, स्मट्स् वगैरे लोकांनी त्यावेळीं सावधपणानें वागून बाजू संभाळली. स १९१४ च्या आगस्टांत इंग्लंडच्या कॅबिनेटकडून बोथा, स्मट्स् यांनां असा संदेश आला कीं, जर्मन बिनतारी स्टेशनें घेण्यांत यावीं. या गोष्टीस बोथाप्रभृतींनीं पूर्ण संमति दिली. परंतु साऊथ वेस्ट आफ्रिकेंतील जर्मनांनां कांहीं डच बोअर मदत करीत होतेच. हर्टझॉग् प्रभृतींचें मत असें होतें कीं, युनिअननें या युद्धांत उदासीन राहावें व इंग्लंडच्या साऊथवेस्ट आफ्रिकेच्या स्वारीच्या बेतास कोणीहि बळी पडूं नये. बोथानें जर्मनांशीं लढाई देण्याचा हट्ट धरला. आफ्रिकेंत चोहोंकडे बंडें सुरू झालीं. बोअर पुढाऱ्यांचा हेतू डच प्रजासत्ताक राज्याचें

पुनरुज्जीवन करावें असा होता. बोअर्स व केप यांनां मारिट्झच्या उघड बंडाची वार्ता समजल्यावर डीवेट व बेअर्स यांची बैठक झाली व सर्व बेत ठरले.परंतु मारिट्झचा पूर्वीच पराभव झाला होता. मध्यंतरी बोथा व स्मटस् हे फ्रीस्टेट व ट्रान्सवाल येथील रक्तपात टाळण्याची तयारी करीत होते. यांनीं स्टेनची गांठ घेतली व बंडास आळा घालण्याचा प्रयत्न केला. बोथानें फार विनवणी केल्यावरून स्टेन यानें डीवेट, बेअर्स व केपप्रभृति पुढाऱ्यांनां पाचारण केलें. पुढें दोन वर्षांनीं स्टेन मारला व अशा रीतीनें हच बंडखोरांवरील दाब कमी झाला. त्यानंतर बोथानें डीवेट व बेअर्स यांच्याविरुद्ध शस्त्र उगारलें व अनेक चकमकींनंतर त्यानें बंडखोरांस शरण येण्यास भाग पाडलें व बंडाचा बीमोड केला.

बंडखोरांत एकंदर १०००० लोक सामील असून त्यांचे सहानुभूति बाळगणारे साथीदार बरेच होते. डीवेट, बेअर्स वगैरे पुढाऱ्यांनां जबर शिक्षा ठोठावण्यांत आल्या. सरकारच्या बाजूचे १३२ लोक मारले गेले व २७७ लोकांस जखमा झाल्या. बंडखोरांची किती प्राणहानि झाली हें अनिश्चित आहे. हर्टझॉगनें असें प्रतिपादन केलें कीं, तो स्वतः व त्याचे डीवेट, बेअर्सप्रभृति सहकारी मित्र हे बंडखोर नसून, बंड करण्यांत त्यांचा उद्देश रक्तपात करावा असा नव्हता. जर्मन साऊथ वेस्ट आफ्रिकेच्या स्वारीविरुद्ध 'सशस्त्र निषेध' करावा असा त्यांचा हेतु होता. बोथानें बोअर व ब्रिटन लोकांचें साहाय्य घेऊन जर्मनीचा पराभव केला व त्याचें इंग्लंडांत मोठें स्वागत करण्यांत आलें. जागतिक युद्धांत दक्षिण आफ्रिकेंतून बरीच मोठी लष्कर-भरती करण्यांत आली होती तथापि या कामीं बोअर लोकांची सहानुभूति मुळींच नव्हती ही गोष्ट बोथास्मट्स् ओळखून होते. त्यानंतर निवडणूक झाली व युनियनिस्टांनीं बोथाला फार मदत केली. स्टेनच्या मृत्यूनंतर हर्टझॉगचें ब्रिटिश साम्राज्याविषयींचें मत जास्तच कलुषित होत गेलें. स. १९१७ स त्यानें प्रसिद्ध केलें कीं, दक्षिण आफ्रिकेला जर खरी स्वायत्तता प्राप्त झाली असेल तर तिनें महायुद्धांत उदासीन असेच रहावें. हर्टझॉगच्या धोरणाचें प्रतिबिंब राष्ट्रीय पक्षाच्या प्रजासत्ताक राज्याच्या मागणींत पडलेलें दिसून येतें.

जागतिक युद्धसमाप्तीनंतर, बोथा–स्मटस् यांनीं दक्षिण आफ्रिकेच्या तर्फे व्हर्सेलीसच्या तहावर सह्या केल्या. या तहांत दक्षिण आफ्रिकेला, इतर वसाहतींप्रमाणें लीग ऑफ नेशन्सचे सदस्य होण्याचा मान मिळाला. त्यानंतर प्रेसिडेंट विल्सनचें स्वयंनिर्णयाचें तत्त्व दक्षिण आफ्रिकेस लागू करावें म्हणून फार जोराची मागणी करण्यांत आली. हर्टझॉग हा मुख्य प्रधान लॉइड जॉर्ज यांस भेटण्याकरतां इंग्लंडला जावयास निघाला; परंतु आगबोटीवरील खलाशांनीं हर्टझॉग प्रभृतींनां नेण्याचेंच नाकारलें. यामुळें हर्टझॉग यास डच जहाजांतून न्यूयॉर्कला जावें लागलें व तेथून तो यूरोपांत गेला. हें राष्ट्रीय पक्षाचें शिष्टमंडळ लॉइड जॉर्जला भेटलें, पॅरिसला गेलें व कांहीं न मिळाल्यामुळें हात हालवीत परत आलें. बोथाच्या मृत्यूनंतर स्मटसची प्राइमिनिस्टर म्हणून निवडणूक झाली. महायुद्धामुळें दक्षिण आफ्रिकेचें अतोनात नुकसान झालें होतें. युनिअनिस्टपक्ष राष्ट्रीय व मजूरपक्षाविरुद्ध, बोथाप्रमाणेंच स्मटसला मदत करीत असे. तथापि स्मटसला राज्यकारभार चालविणें जड जाऊं लागलें. पुढें समेट करण्याचा प्रयत्न झाला परंतु यूनिअनचें ऐक्य व साम्राज्यनिष्ठा या तत्त्वासंबंधीं मतभेद झाल्यामुळें दक्षिण आफ्रिकन पक्षाचें अथवा राष्ट्रीय पक्षाचें स्मटसशीं सहकार्य घडून आलें नाहीं. नंतर स्मट्सनें राष्ट्रीय पक्षाविरुद्ध कांगावा करून ऐक्याबद्दल एक जाहीर–पत्रक काढलें. स. १९२१ मध्यें पुन्हां निवडणुकी झाल्या व त्यानंतर बोअर व ब्रिटन यांमधील जुना भेदभाव नष्ट होऊं लागला. युनियनचा एक प्रांत म्हणून ऱ्होडेशियास मानण्यांत यावें, असें धोरण स्मट्सकडे गेलेल्या ऱ्होडेशिअन शिष्टमंडळाच्या बैठकीवरून स्पष्ट दिसूं लागलें होतें. १९२० सालीं गव्हर्नर जनरल लॉर्ड बक्स्टन याची मुदत संपली. त्यानंतर प्रिन्स आर्थर ऑफ कॅनॉट यास गव्हर्नर जनरल व हाय कमिशनर करण्यांत आलें.

संरक्षण व लष्करी संस्थाः—१९१० सालीं युनियन स्थापन झाल्यानंतर निरनिराळ्या लष्करी खात्यांचें एकीकरण करण्यांत आलें. केप कॉलनीमध्यें एक कायमचें सैन्य ठेवण्यांत आलें. दि केप माउंटेड रायफलमेन, व्हालंटिअर कोर व कॅडेट अशी तेथें लष्करी सैन्याची व्यवस्था करण्यांत आली. नाताळमध्यें तीन चार हजारांचें एक सैन्य, व्हालंटिअर कोर व कॅडेट वगैरे केपप्रमाणेंच लष्करी व्यवस्था करण्यांत आली. ट्रान्सव्हाल येथेंहि वरीलप्रमाणेंच सैन्याची योजना झालेली असून वरील तीनहि वसाहतींत कायमचें एक लष्करीमंडळ स्थापण्यांत आलें आहे. ऑरेंज फ्रीस्टेटमध्यें, युद्धाच्या प्रसंगीं सैन्यभरती करण्याची व्यवस्था केलेली असून येथें वरीलप्रमाणें सैन्यहि राखण्यांत आलें आहे. १९१२ सालीं साउथ आफ्रिकन डिफेन्स ॲक्ट करण्यांत आला होता. या कायद्यान्वयें १७ ते ६० च्या दरम्यान ज्यांचें वय असेल त्यांनीं युद्धप्रसंगीं सक्तीची नोकरी केली पाहिजे असा निर्बंध घालण्यांत आला आहे. जर्मन साउथ वेस्ट आफ्रिकेंतील मोहीम संपल्यानंतर युनियन सरकारचें दुसऱ्या एका गोष्टीकडे लक्ष वळलें. दक्षिण आफ्रिकेच्या हद्दीबाहेर ज्यांची स्वखुषीनें लष्करी नोकरी करण्याची इच्छा असेल अशा लोकांची संघटना करण्याबद्दल प्रयत्न करण्यांत आला. डायरेक्टर ऑफ वॉर रिक्रूटिंग नामक एका लष्करी अंमलदाराच्या हाताखालीं 'रंगरूट' भरती करण्याचें काम सन १९१८ च्या युद्धसमाप्तीचा तह होईपर्यंत सुरू होतें. फ्रान्स, ईजिप्त व पॅलेस्टाईन येथें दक्षिण आफ्रिकन सैन्यानें चांगली कामगिरी बजाविली. युनियनच्या नियंत्रणाखालीं दक्षिण आफ्रिकेंत, नेव्हल व्हॉलंटिअर रिझर्व,

हॉस्पिटलस्, कॅम्प्स, गुरांचे दवाखाने, ग्रँड फ्लीट वगैरेंबद्दल योजना करण्यांत आली. युनियनच्या भावी लष्करी योजनेसंबंधीं सन १९१२ च्या कायद्यांतील तत्त्वें योग्य आहेत असें आढळून आलें आहे. सन १९२१ च्या डिफेन्सबिलामुळेंहि कांहीं फेरफार करण्यांत आले आहेत.

आ ज ची प रि स्थि ति ( १९२१-१९२५ ).—साउथ आफ्रिकन युनियनची १९२१ च्या खानेसुमारींत लोकसंख्या ७३००००० असून त्यापैकीं १५ लक्ष गोरे व ५८ लक्ष देश्य व इतरवर्णी लोक आहेत. नाताळांतील गोऱ्या लोकांत सं. १९११ नंतर बरीच वाढ झाली आहे.

देश्य राजकारणः—१९२० सालीं मुख्य प्रधान जनरल स्मटसूनें ब्रिटिश साम्राज्याशीं संबंध कायम राखण्याच्या मताचा युनियनिस्ट पक्ष व साउथ आफ्रिकन पंथ यांच्या मिश्रणानें एक पक्ष बनविला. त्याला विरोधी म्हणजे पूर्ण स्वतंत्र ( ब्रि. साम्राज्याबाहेर ) रिपब्लिक स्थापण्याच्या मताचा जनरल हर्टझोगचा पक्ष होता. स. १९२१ मध्यें जमेंतील तूट भरून काढण्याकरितां अधिक कर बसविण्यांत आले व पोष्टाचा दर १ पेन्साऐवजी २ पेन्स करण्यांत आला. पार्लमेंटांत डच भार्षेत भाषणें होतात; ईग्रज समासदांनां ती भाषा समजते. १९२३ सालीं नॅशनॅलिस्ट व लेबरपक्षांनीं संगनमतानें स्मट्सविरुद्ध अविश्वासदर्शक ठराव आणला पण तो नापास झाला. १९२४ सालच्या निवडणुकींत स्मट्स पराभूत होऊन जनरल हर्टझोग मुख्य प्रधान झाला, व त्याच्या पक्षानें ब्रिटिश साम्राज्याबरोबरचा संबंध तोडण्याची सूचना आपल्या कारकीर्दीत पुढें न आणण्याचें कबूल केलें.स.१९२५ च्या एप्रिलमध्यें पुन्हां पोष्टाचा एक पेन्स दर सुरू झाला.

साम्राज्यविषयक व परकीय राजकारणः—स.१९२१ च्या लंडनमधील साम्राज्यपरिषदेंत युनियनतर्फे जनरल स्मट्स हजर होता. त्याच सालीं साउथ आफ्रिकेचें आरमार तयार करण्याचा उपक्रम झाला. स.१९२१ पूर्वी रॉयल नेव्हीकरितां ग्रेटब्रिटनला दरसाल ८५००० पौंड रोख देण्याचा नियम होता. त्याऐवजीं प्रत्यक्ष आरमार ठेवून मदत करण्याचें नंतर ठरलें. स. १९२३ च्या साम्राज्यपरिषदेंत ज. स्मट्सनें दक्षिणआफ्रिकेच्या निर्गत व्यापारास अधिक सवलती मिळविण्याची खटपट केली. स. १९२५ मध्यें जकातीच्या दरांत कांहीं फेरफार करण्यांत आले. लोखंडी व पोलादी यंत्रें व हत्यारें यांवरील रिबटचा शेकडा ३ दर ठेवण्यांत आला. स. १९२४जानेवारींत प्रिन्स आर्थर ऑफ कॅनॉटच्या मागून अर्ल ॲथलोन हा गव्हर्नर-जनरल झाला. १९२३ च्या आक्टोबरमध्यें यूरोपीयांच्या आगमनावर दक्षिणआफ्रिकेंत निर्बंध घालण्यांत आला, कारण दक्षिण आफ्रिकन लोकांत बेकारी बरीच आढळी होती.स.१९२२मध्यें ज. स्मट्सनें ऱ्होडेशियाला युनियनमध्यें सामील होण्याबद्दल सुचविलें होतें.

व्यापार व मजूरः—रँड येथील सोन्याच्या खाणी संपत आल्यामुळें सोन्याचा धंदा बसण्याची भीति १९२१ सालीं वाटूं लागली. पण हा धंदा शक्य तितका लांबावा म्हणून ज. स्मट्सनें कामाचे तास कमी करून व गोऱ्या नोकरांऐवजीं कमी पगारावर हिंदी मजूर नेमून खर्चांत काटकसर करण्याची सूचना पुढें आणली. तिजमुळें १०००० यूरोपीय इसमांनां नोकरींतून निघावें लागणार होतें; म्हणून यूरोपीय कामकऱ्यांनीं संप केला. त्यांत २० हजार लोक सामिल झाले. त्याच सुमारास किंबर्ले येथील डी बीअर्स कंपनीच्या हिऱ्याच्या खाणी बंद पडल्यामुळें गोऱ्या लोकांतील असंतोष अधिकच वाढला आणि या औद्योगिक प्रश्नाला लवकरच राजकीय स्वरूप प्राप्त झालें. संपवाल्यांवर गोळीबार करावा लागून बरेच बळी पडले आणि ६००० इसमांनां कैद करून दंगा मोडण्यांत आला.

हिंदी लोकांचा प्रश्नः—दक्षिण आफ्रिकेंतील बऱ्याच प्रांतांत हिंदी लोकांची वस्ती वाढल्यामुळें १९२१ सालीं गोऱ्या लोकांस धास्ती वाटूं लागली. हिंदविरोधी मत नाताळांत विशेष आहे, तें केप कॉलनींत कमी आहे; सबब हिंदी लोकांनीं स्वखुषीनें नाताळ सोडून दुसरीकडे जावें असें मत ज. स्मटसनें दिलें. पण सर्वच प्रांतांत बहिष्कृतांप्रमाणें हिंदी लोकांनां वागविण्याचें धोरण अलीकडे युनियन गव्हर्नमेंटनें स्वीकारलें असून त्याकरितां 'कलर बार बिल' कायदेमंडळापुढें आलें आहे व त्याचें दुसरें वाचन१९२५च्या एप्रिलमध्यें पासहि झालें. ज. स्मट्स व केपकॉलनींतील उदारमतवादी लोक या बिलाविरुद्ध आहेत तरी तें पास होईलसें दिसतें. हिंदुस्थान व जपानमध्यें या बिलामुळें खळबळ उडाली आहे.

सन १९२१ सालची खानेसुमारीः—साउथ आफ्रिकेंत युनियनचे हिंदी लोकसंख्येचे स्वतंत्र आंकडे फार थोडे मिळतात. आशियाटिक लोकसंख्येचेच आंकडे दिले आहेत. एकंदर आशियाटिक लोकसंख्या १६५७३१ आहे. त्यांत २ हजार चिनी व २ हजार सीरियन व इतर लोकांची संख्या आहे. आशियाटिक लोकांत ग्रामवासी लोकसंख्या ११४५२२ आहे व नगरवासी ५१२०९ आहे. आशियाटिक लोकसंख्या १९०४ सालीं १२२७३४ होती ती १९२१ सालीं ४१ हजारांनीं वाढलेली दिसते. पण तींतील २००० कमी केली पाहिजे कां कीं पूर्वीच्या शिरोगणतींत सीरियन लोक यूरोपीयांत धरले होते.यूरोपीयांची वाढ आशियाटिकांपेक्षां पुष्कळच अधिक झाली. १११६८०६ ही संख्या १९०४ सालची तर १५१९४८८ ही १९२१ सालची होती.

निरनिराळ्या जातींचें एकंदर लोकसंख्येशीं प्रमाण १९२१ सालीं येणेप्रमाणें होतें. यूरोपीय २१.४, नेटिव्ह ( वांटू ) ६१.८, आशियाटिक २.४ व मिश्र ७.९. इ. स. १९०४ मध्यें यूरोपीय २१.६, नेटिव्ह ६७.४, आशियाटिक २.४ व मिश्र ८.६ असें प्रमाण होतें.

आशियाटिक लोकांची संख्या.

| | नगरवासी | ग्रामवासी | एकूण |
|---|---|---|---|
| पुरुष | ३२९७१ | ६४३६५ | ९७३३६ |
| स्त्रिया | १८२३८ | ५०१५७ | ६८३९५ |
| एकूण | ५१२०९ | ११४५२२ | १६५७३१ |

आशियाटिक व यूरोपीय नगरवासी व ग्रामस्थ (रूरल) यांचें एकंदर लोकसंख्येंत बल येणेंप्रमाणें आहे.

| एकंदर | एकंदर यूरोप | एकंदर आशियाटिक |
|---|---|---|
| १००० | २१४ | २४ |
| २५० | ११० | ७ |
| ७५० | १०४ | १७ |

म्हणजे यूरोपीयांत नगरवासीयांचें आधिक्य आहे. आशियाटिक लोकांत एकंदर लोकसंख्येच्या मानानें नगरवासीयांचें प्रमाण बरासें जास्त आहे.

यूरोपीयांमध्यें नगरवासी होण्याची प्रवृत्ति अधिकाधिक आहे. १८९१ सालीं शेंकडा ३५ नगरवासी होते ते १९२१ सालीं शेंकडा ५६ नगरवासी झाले. एकंदर जनतेंत नगरवासीपणाची वाढ थोडीशी झालेली दिसतेच. १८९१ सालीं दर हजारीं १५० नगरवासी होते ते १९२१ सालीं १६४ झाले. आशियाटिक लोकांतील नगरवासीयांच्या प्रमाणासंबंधानें निरनिराळ्या भागांत भेद करून खालीलप्रमाणें कोष्टक देतां येईल.

| प्रांत | नगरवासी | ग्रामवासी |
|---|---|---|
| केप | ४२.९६ | ३.४८ |
| नाताळ | १८२.१४ | ६७२.५६ |
| ट्रान्सव्हाल | ८१.८९ | १४.६० |
| ऑरेंज | २.०० | .३८ |
| एकंदर हजार | ३०८.९९ | ६९१.०१ |

दर शंभर आशियाटिक स्त्रियांशीं आशिआटिक पुरुषांचें प्रमाणः—

| | केप | नाताळ | ट्रान्सव्हाल | ऑरेंज | एकंदर |
|---|---|---|---|---|---|
| ग्रामस्थ | २४१ | १२८ | २२३ | २१५ | १२८ |
| नगरस्थ | २९५ | १४९ | २२४ | १४७ | १८१ |
| एकंदर | २९० | १३१ | २२४ | १८१ | १४२ |

यूरोपीयन लोकांत स्त्रीपुरुषांचें प्रमाण जवळ जवळ सारखें होत चाललें आहे. १००० पुरुषांत स्त्रियांचें प्रमाण १९०४ सालीं४३१; १९११सालीं ४६३; १९१८सालीं ४८०व १९२१ सालीं ४८५ असें होतें.

शिक्षणः—आशियाटिक, लोकांसाठीं शिक्षणसंस्था यूनियनमध्यें एकंदर ५४ आहेत. त्यांपैकीं नाताळांत ५१ आणि ट्रान्सव्हालमध्यें ३ आहेत. इतरत्र आशियाटिक शिक्षणाच्या शाळा नाहींत. शिक्षणाचा खर्च दर यूरोपीय विद्यार्थ्यामागें १८ पौं., १७ शि., १ पे. आहे तर यूरोपीयनेतर विद्यार्थ्यामागें २ पौं., ५ शि., २ पे. इतका आहे. पगारांमध्येंहि बराच भेद आहे.

| शिक्षकाचा प्रकार (प्रिन्सिपॉल). | पगार रकम, पौंड |
|---|---|
| यूरोपियन पुरुषशिक्षक यूरोपियन शाळेचा. | ५६०ते६६० |
| यूरो. स्त्रीशिक्षक, यूरोपियन शाळेची. | ४८०ते५८० |
| यूरो. पुरुषशिक्षक, इंडि. किंवा मिश्ररक्तीशाळेचा. | २७०ते३५० |
| यूरो. स्त्रीशिक्षक इंडि. किंवा मिश्ररक्ती शाळेची. | २५०ते३०० |
| इंडियन पुरुष, इंडियन किंवा मिश्र. | १५०ते२४० |
| नेटिव्ह पुरुष. | ४२ते९६ |
| नेटिव्ह स्त्री. | ३०ते८४ |

दुय्यम शिक्षक—यूरोपियन पुरुष २४० ते ६५० यू. स्त्री १८० ते ५१०. इंडियन पु. असि. ७२ ते १५०. नेटिव्ह पुरुष अगर स्त्री १८ ते ४८.

आशियाटिक लोकांच्या लग्नांविषयींचे आंकडे सन १९२१ च्या खानेसुमारींत दिले आहेत. २५६१८ दंपतींचें पृथक्करण केलें आहे त्यांत नवऱ्याची आणि बायकोची जन्मभूमि दिली आहे. त्यांत ३४० चिनी व सीरियन लोकांचे आंकडे वजा केले म्हणजे भारतीयांचीं कुटुंबें २५२७८ निघतात. या आंकड्यांचें पृथक्करण करतां असें दिसतें कीं या बसाहतींत आलेले नवीन हिंदी लोक देशी हिंदी लोकांतल्या बायका ज्यामानानें करतात त्या मानानें नवीन आलेल्या हिंदी बायकांनीं देशी हिंदी पुरुषांबरोबर लग्नें कमी लावलीं आहेत.कांहीं इंडियन लोकांचीं लग्नें यूरोप व अमेरिका येथील स्त्रियांबरोबरहि झालीं आहेत.

आतां आशियाटिक लोकांच्या औद्योगिक स्थितीकडे लक्ष देऊं. त्यांचें औद्योगिक वर्गीकरण येणेंप्रमाणें देतां येईल.

| धंदा | पुरुष | स्त्रिया |
|---|---|---|
| मच्छीमार | १४७ | २ |
| शेतकी | १९०२३ | १७८४ |
| खाणकाम | २०४४ | ... |
| कुंभारकाम व कांचकाम | २०२ | ४ |
| रंग, रसायन | ४५८ | १६ |
| धातुकाम | ५२५ | ... |
| सोनारकी | २१० | १४ |
| इलेक्ट्रिकल धंदे | १० | ... |
| ढोरकाम | २६ | १४ |
| सूतकाम किरकोळ | २८ | १५ |
| कोष्टीकाम | ७७१ | ४२ |
| खाणावळी व तंबाखूविक्री | १०१५ | ६३ |
| लांकूडकाम | ९३६ | १७ |
| कागदकाम, छपाई, बांधणी | २८० | ३ |
| घर बांधणें, कंत्राटी वगैरे | ३१६ | ... |
| रंगवाले | २४५ | ... |
| इतर वस्तूंचा उपयोग | ७७ | १० |

| धंदा | पुरुष | स्त्रिया |
|---|---|---|
| ग्यास व पाणीपुरवठा | १२ | २ |
| ने आण | ५१५ | १५ |
| व्यापार (व्यापारी व रकुनी वगळून ) | १२०७३ | ६०१ |
| राज्यव्यवस्था | १७५२ | ४४ |
| प्रतिष्ठित धंदे | ४१२ | ७१ |
| मनोरंजन व खेळ | ६२ | २ |
| घरगुती नोकरी | ६०६६ | ११६१ |
| कारकून, टायपिस्ट, स्टोअरकीपर एंजिन ड्रायव्हर व इतर | १०१९७ | ४८२ |

आशियाटिक व यूरोपियन लोकांमधील उद्योगविषयक भेद स्त्रियांमध्यें विशेष दिसून येतो आणि यासाठीं ज्या धंद्यांत कोणत्या तरी वर्गाच्या स्त्रियांचें विशेष अस्तित्व दिसून येतें अशा कांहीं धंद्यांचे आंकडे येथें देतों. हे आंकडे दरबान येथील आहेत, कारण येथेंच हिंदी स्त्रियांचें काम करणाऱ्या म्हणून अस्तित्व विशेष आहे.

| धंदा | आशिआटिक | यूरोपीय |
|---|---|---|
| शेतकी धंदे | १५३ | २१ |
| कपडे शिवणें वगैरे | ८ | ५१० |
| अन्नपाणी, तंबाखू | ५० | १५ |
| छापखाने व फोटोग्राफी | २ | ५५ |
| ने आण | १३ | ११० |
| व्यापार इन्शुअरन्स इ. | २२३ | ७०० |
| सरकारी नोकरी | ४० | १९४ |
| कारकुनीखेरीज प्रतिष्ठित धंदे | ३३ | ८४० |
| मनोरंजन खेळ | २ | ७५ |
| घरगुती नोकरी | ४२९ | ७९९ |
| कारकुनी टाइपिस्ट ड्राफ्टस मन | ... | १५६५ |

या आंकड्यांवरून असें दिसून येतें कीं, लहान दुकान चालविणें, घरगुती नोकरी करणें इ. कनिष्ठ प्रतीचे धंदे खेरीज करून वरच्या वर्गांत हिंदी स्त्रिया शिरल्या नाहींत. सेन्ससचें पृथक्करण केलें असतां तेथील भारतीय समाजविषयक अनेक प्रकारची माहिती त्यांत भरली आहे असें आढळून येईल. तेथील आंकडे सेन्सस व वार्षिक रिपोर्ट यांवरून गोळा केले आहेत. सेन्ससचा रिपोर्ट अत्यंत वाचनीय आहे.

**दक्षिणध्रुवप्रदेश**, संशोधनार्थ सफरी.—दक्षिणध्रुवाकडील शोधांची वाढ अगदीं अलीकडची म्हणजे मुख्यतः एकोणिसाव्या शतकांतील आहे, याचें कारण दक्षिणध्रुवाकडील शोध हे केवळ भौगोलिक माहितीसंबंधीं जिज्ञासेचें फळ होय. दक्षिण गोलार्धांत प्रवास करण्यास प्रिन्स् हेन्री दि नॅव्हिगेटर् याजकडून १४१८ सालीं आफ्रिकाखंडाच्या खालून हिंदुस्थान देशांत पर्यटण करतांना प्रथमतः उत्तेजन मिळालें. १४८७ सालीं केप ऑफ गुड होपला वळसा घालून केलेल्या प्रवासांत बार्थोलोम्यू डीझ् यानें प्रथम दक्षिणध्रुवप्रदेशांतील थंडीचा अनुभव घेतला व दक्षिणध्रुवप्रदेशांत एखादी जमीन असलीच तर ती आफ्रिकाखंडापासून अलग अशी महासागरांत असावी हें सिद्ध केलें. स. १५२० मध्यें मॅगेलन् सामुद्रधुनींतून झालेल्या प्रवासामुळें हें दक्षिणध्रुवांतील काल्पनिक तिसरें खंड आशिया व अमेरिका या खंडांपासूनहि अलग असल्याचें सिद्ध झालें. ह्या काल्पनिक खंडाचा शोध लावणें हाच सोळाव्या व सतराव्या शतकांच्या आरंभीच्या प्रवाशांचा प्रधान उद्देश होता. 'हॉर्न' भूशिराभोंवतालच्या प्रवाशांना वारंवार विरुद्ध दिशेनें येणारे वारे लागून, त्यांचीं जहाजें घुसल्यानें युक्त अशा आकाश व वर्फाच्छादितं समुद्र असलेल्या प्रदेशांत प्रवेश करीत, परंतु १७७० सालापर्यंत दक्षिण ध्रुव प्रदेशांत कोणीहि प्रवेश केला नव्हता. १७७१ सालीं व्हेस् जोसेफ् केर्ग्युलेन यानें मॉरिशस बेटाच्या दक्षिणेकडे वरील काल्पनिक खंड शोधून काढण्याकरितां प्रवास केला, व दक्षिणेस ५०° अंशावर असलेल्या एका जमिनीवर तो उतरला, परंतु तें बंदर वस्ती करण्यास नुकसानकारक असें आढळून आल्यामुळें त्यानें त्यास "निर्मानुष बेट" (आइल ऑफ डेसोलेशन) असें नांव दिलें.

जेम्स कुक.—कॅप्टन् जेम्स कुक् यानेंच प्रथम इ. स. १७७३ च्या सुमारास प्रवासास निघून १७७४ सालच्या जानेवारी च्या ३० तारखेस दाक्षिणेस ७१°१० अंशापर्यंत प्रवास करून न्यूझीलंड, टेस डेल् फ्यूगो इत्यादि बेटें अगदीं विलग असून हें तिसरें खंड काल्पनिक असावें अशी खात्री करून दिली. कुक्नंतर इंग्लंड व अमेरिका येथील अनेक मच्छीमार लोकांनीं दक्षिण जॉर्जियाकडे पुष्कळ प्रवास केले, परंतु स. १८१९ च्या प्रवासांची रूपरेखा कांहींच कळत नाहीं. स. १८२१-१८२२ च्या पूर्वीच्या सुमारास जॉर्ज पॅावेल ह्या ब्रिटिश खलाशानें दक्षिण "ऑर्क्नी" बेट शोधून त्याची पहाणी केली.

बेलिंग्झन हौसेन:—कुकनंतर दुसरें महत्त्वाचें पर्यटण रशियन् बादशहाच्या आज्ञेनें फॅबियन् व्हान् बेलिंग्झ हौसेन् यानें केलें. ह्या प्रवासाचा हेतु कुकनें मिळविलेल्या माहितीस पूर्णता आणण्याचा होता. 'ट्रॅव्हर्स' बेटें शोधल्यानंतर त्यानें 'सँडविच्' बेटांची पहाणी करून स. १८२३ च्या जानेवारीच्या १ ल्या तारखेस दक्षिणेस ६९°५२' अंशांचा पल्ला गांठला व सांपडलेल्या बेटास त्यानें पहिल्या 'पीटर' चें नांव दिलें. ह्यानंतर एका आठवड्यानें दुसरें एक मोठें बेट सांपडल्यावर त्यास पहिल्या अलेक्झांडर राजाचें नांव देण्यांत आलें. नंतर दक्षिणेकडील 'शेटलंड' बेटाकडे वळून तो रशियास परत आला.

वेडेल:—यानंतर १८२३ सालीं वेडेल जेम्स यानें दक्षिण ध्रुवाकडे ७४°१५' अंशापर्यंत प्रवास केला, व पुढेंहि त्यास

जातां आलें असतें परंतु परतचा प्रवास लांबचा असल्यामुळें त्यानें पुढें मार्ग काढला नाहीं. मात्र वेडेल यानें दक्षिणध्रुव प्रदेशांतील प्राण्यांचे नमुने संग्रहित केले. त्यानें स्वतः केलेल्या पुस्तकावरून त्याची सूक्ष्म कल्पनाशक्ति दिसून येते. १८२९ सालीं हेन्री फॉस्टर यानें शेटलंड बेटावर जाऊन ६२° ५०′ *अंशावर असलेल्या बंदरावरून जी पहाणी केली* तीवरून दक्षिणध्रुवप्रदेशासंबंधीं भूरचनेवर बराच प्रकाश पडतो.

बिस्कोः—एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या चाळीस वर्षांत लंडन येथील एंडर्बी बंधूंनीं दक्षिणध्रुवप्रदेशशोधनांत बराच भाग घेतला होता. त्यांनीं अनेक मच्छीमार प्रवाशांना दिसेल त्या जमिनीचे शोध व पहाणी करण्यास पुष्कळच उत्तेजन दिलें. त्यांत जॉन बिस्को यानें केलेलें पर्यटण कुक् व बेलिंग्ज हौसेन यांच्या प्रवासाइतकें महत्त्वाचें आहे. कारण थोडक्याच साधनसामुग्रीच्या साहाय्यानें बिस्को यानें मागील कुक वगैरेंच्या इतके शोध केले. बिस्को हा अत्यंत मेहनती व हुषार शोधक असून त्याची कल्पनाशक्तीहि तीव्र होती. परंतु सं. १८३१ च्या मार्च १६ ला केप ॲन सूधीर असलेल्या बेटावर त्यानें प्रयत्न केला परंतु वादळानें अत्यंत नासधुस केल्यामुळें व जहाजावरील तीनच माणसें उभी राहाण्यास समर्थ असतांनां पोर्ट फिलांफ आखातांत मोठ्या निकरानें बिस्को याचा जीव वांचला. त्यानंतर बिस्को यानें " ग्रॅहॅम लॅंड " शोधली व एकंदरीनें त्याच्या धाडसामुळें लंडन व पॅरिस येथील भौगोलिक संशोधनसंस्थांनीं त्यास सुवर्णपदकें अर्पण केलीं.

बॅलेनीः—१८३३ सालीं केंप यानें " एंडर्बी " जमिनी-पासून पूर्वेस १०° अंशावर असलेली नवी जमीन शोधून काढली. ' एंडर्बी ' बंधूंच्या मदतीनें सर्वांत शेवटचें झालेलें पर्यटण जॉन बॅलेनी याचें होय. स.१८३९ मध्यें बॅलेनी यानें दक्षिणध्रुववृत्त ओलांडून ६९° अंशापर्यंत दक्षिणेस जहाजें नेलीं व पुढें बर्फाच्या कडेनें गेल्यावर " बॅलेनी " बेटें त्यानें शोधून काढलीं. त्यांपैकीं एकावर १२००० फूट उंचीचा डोंगराळ प्रदेश दिसत असून दुसऱ्यावर एकः जिवंत ज्वालामुखी दिसत होता. त्याच्या पुढेंहि ६३° व ६५° अंशांच्या दरम्यान जमिनीचा सुगावा त्यास लागला, व कांहीं दिवसांनंतर बेलनीबरोबरचें दुसरें सॅब्रिश नांवाचें जहाज वावटळींत चुकलें, परंतु बॅलेनी मात्र सुखरूप परतला.

ड्यूमंट डी उर्व्हाइलः—१८२५ च्या सुमारास दूर दक्षिणेकडील चुंबकीय निरीक्षणांचें महत्व जास्त वाढल्यामुळें व दक्षिणध्रुवप्रदेशाच्या शास्त्रीय अभ्यासाबद्दल जास्त इच्छा *उत्पन्न झाल्यामुळें, अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें, फ्रान्स,* ग्रेटब्रिटन इत्यादि देशांत नवीन पर्यटणें करण्याचे बेत सुरू झाले. प्रथम फ्रेंच लोकांनीं या क्षेत्रांत उडी घेतली व ड्यूमंट डी उर्व्हाइल याच्या नेतृत्वाखालीं एक शोधक मंडळ वेडेलच्याहि पुढें मजल गांठण्याच्या उद्देशानें पाठविण्यांत आलें.डी उर्व्हाइल यानें स. १८३८ च्या सुमारास " जॉइनविले " बेटें व " लुई फिलिप लॅंड " शोधली परंतु दक्षिणध्रुववृत्ताच्या आंत कधींहि प्रवेश केला नाहीं. फ्रान्सची कीर्ति वाढविण्याकरितां डी उर्व्हाइल यानें चुंबकध्रुव गांठण्याचा निश्चय केला व या उद्देशानें ब्रिटिश व अमेरिकन शोधक *मंडळें प्रयत्न करीत असल्याचें त्यास कळलें होतें.* स १८४० च्या सुमारास त्यानें ३०००–४००० फूट उंचीची " अडेली लॅंड " शोधून काढली.

चार्लस विल्किसः—स१८३६ पासूनच संयुक्त संस्थानच्या राष्ट्रीय सभेनें नवीन पदेशशोधनाकरितां अमेरिकन शोधकमंडळ पाठविण्याची तयारी केली होती व त्या कार्यक्रमांतील एक मुख्य भाग दक्षिण ध्रुवप्रदेशशोधाबद्दलचा होता. त्या मंडळाचा अधिकारी चार्लस विल्किस हा नेमला गेला व त्या पर्यटणाचे एकंदर तीन उद्देश ठरले होते तेः— ( १ ) वेडेलच्या मार्गानें शक्य तितकें दूरवर जाणें. ( २ ) दक्षिण ध्रुवप्रदेशांतील कुकनें गांठलेला सर्वांत जास्त लांबचा पल्ला गांठणें. ( ३ ) एंडर्बीलॅंडपर्यंत दक्षिणध्रुवप्रदेशांत घुसणें.

या प्रवाशांचीं जहाजें वाईट व नादुरुस्त होतीं तरी विल्किस यानें आपली कामगिरी उत्तम रीतीनें बजाविली. वरील उद्देशांपैकीं तिसरा उद्देश पूर्ण करतांना विल्किस यास अतिशय त्रास झाला.

जेम्स क्लार्क रॉसः—१८३९ सालीं ब्रिटिश सरकारनें दक्षिणध्रुवप्रदेशशोधनाकरितां ' इरेबस ' व ' टेरर ' हीं दोन जहाजें कॅप्टन जेम्स क्लार्क रॉस याच्या नेतृत्वाखालीं पाठविलीं. रॉसनें थेट चुंबकध्रुवाच्या मध्यरेषेवर जाण्याचें ठरविलें, परंतु विल्किस व डी उर्व्हाइल हे त्याच उद्योगांत असल्याचें त्यास कळल्यावरून त्यानें १८४१ सालीं दक्षिण ध्रुववृत्त ओलांडून पूर्वेस जास्त अक्षांशापर्यंत प्रवास करण्याचा बेत केला, व त्याप्रमाणें चुंबकध्रुवाच्या रोखानें प्रवास करतां करतां रॉस यास ७१ अंशांवर दक्षिणेकडे " केप ॲडेअर " या महत्वाच्या भूशिरापासून दक्षिणेकडे उंचवट्याची अशी डोंगराची रांग दिसली. नंतर व्हिक्टोरिया राणीच्या नांवानें औपचारिकरीत्या तें खंड ताब्यांत घेण्यांत आलें व आंतील प्रदेश दुर्गम असल्यामुळें रॉसनें जहाजें पुढें हाकारलीं.

त्यानंतर व्हिक्टोरिया लॅंडमधील दोन ज्वालामुखी व त्याबरोबर डोंगरांची रांग दिसूं लागली. त्या ठिकाणचे अक्षांश ७८° ४′ असे होते. आतांपर्यंत झालेल्या पर्यटणांत नवीन शोधांच्या दृष्टीनें हें पर्यटण फारच महत्त्वाचें होतें.नंतर पुन्हां स. १८४१ च्या नोव्हेंबरमध्यें रॉसनें पुन्हां दक्षिणध्रुव *प्रदेशांत जहाजें हाकारलीं, परंतु भयंकर वादळामुळें* व बर्फाच्या समुद्रामुळें दोन्ही जहाजांचें सुकाणूं मोडलें. हिवाळ्यांत फाकलंडबेटावर मुक्काम करून जहाजांची डागडुजी करून पुन्हां तिसऱ्या खेपेस रॉसनें आपलीं जहाजें दक्षिणध्रुवप्रदेशांत घातलीं. पुढें बर्फाच्या प्रदेशांतून ७१° ३०′

अंशांवर दक्षिणेस जाऊन देखील जमिनीचा कांहींच पत्ता लागेना. समुद्राचा ठाव पाहतां २६६० पुरुष खोली असल्याचें आढळून आलें. ह्या रॉसच्या प्रवासानंतर लेफ्टेनंट मूर यानें स. १८४५ च्या सुमारास रॉसचें कार्य पुढें कांहीं दिवस चालविलें. परंतु त्यानंतर सुमारें तीस वर्षेपर्यंत दक्षिण ध्रुवप्रदेशशोधन थांबल्यासारखेंच होतें.

मध्यंतरीं स.१८५० च्या सुमारास टॅपसेल नामक गृहस्थानें दक्षिण दिशेस थोडा प्रवास केला. परंतु दक्षिणध्रुववृत्तांत प्रथम " चॅलेंजर " नामक " जहाजानेंच स. १८७४ मध्यें प्रवेश केला. त्या पर्यटणापासून समुद्रशास्त्रासंबंधीं बरीच माहिती उपलब्ध झाली. ठाव घेतां दक्षिणध्रुवाकडील बर्फाकडे समुद्राचा वाढता उथळपणा पाहून त्यावरून ध्रुवबिंदूजवळ कांहीं तरी जमीन असावी असें जॉन मुरे यानें अनुमान काढलें. त्याचप्रमाणें दूरवर दक्षिणेकडच्या समुद्रांतील निरनिराळ्या गाळाच्या नमुन्यांचा संग्रह व पृथक्करण करून त्यानें त्या गाळाच्या नैसर्गिक रचनेंत एक प्रकाराचा सारखेपणा असल्याचें सिद्ध केलें. दक्षिणेकडील महासागराच्या उत्तर भागाच्या तळाशीं एक प्रकारच्या जमिनीचें अस्तित्व दर्शविणारी माती किंवा खोल भागांत एक प्रकारची तांबडी माती सांपडत असून जसजसें दक्षिणेकडे जावें तसतशीं दोन अणूंची बनलेली रेव आढळूं लागते व पुन्हां जसजसें दक्षिणध्रुवाशेजारील बर्फाजवळ जावें तसतसें जमिनीचें अस्तित्व दर्शविणारा एक प्रकारचा निळसर रंगाचा गाळ दृष्टोत्पत्तीस येतो. ह्या निळसर गाळाचे घटकावयव असणारे खडकांचे परमाणू समुद्रांतील बेटावर दृष्टोत्पत्तीस येत नाहींत. परंतु हिमखंडांनीं आपल्याबरोबर आणून टाकलेल्या वाळुकाखंडांनीं दक्षिणध्रुवप्रदेशांत गाळ सांठून बनलेल्या खडकांचें अस्तित्व सिद्ध केलें.ह्याच सुमारास डाल्मन यानें दक्षिणेकडे ६५° अंशापर्यंत प्रवास करून 'पामरलँड' व 'ग्रॅहॅमलँड' यांमध्यें असलेलें " बिस्मार्क " आखात शोधून काढलें.

१८८२ सालीं जेव्हां ध्रुवप्रदेशशोधनाची सार्वराष्ट्रीय योजना पुढें आली त्यावेळीं उत्तरध्रुवप्रदेशांची बारा मुक्कामावर निरनिराळी पाहणी करून त्या निरीक्षणाची दक्षिणध्रुवप्रदेशाच्या निरीक्षणाशीं तुलना करण्याकरतां दक्षिणेकडे दोन शोधस्थानें मुक्रर करण्यांत आलीं. त्यांपैकीं एका स्थानीं फ्रेंचांनीं व दुसऱ्या स्थानीं जर्मन लोकांनीं चुंबकीय व हवामानशास्त्रासंबंधीं पुष्कळ महत्त्वाचे शोध लाविले. १८९२ सालीं डॉ. ब्रुस व डॉ. डोनाल्ड यांनीं प्रवास केला. परंतु त्यापासून कांहींच फायदा झाला नाहीं.

लार्सेनः—१८९३–१८९४ च्या सुमारास कॅप्टन लार्सेन यानें दक्षिणेकडे प्रवास करून 'लिंडेन्बर्ग' व 'ख्रिस्टेन्सेन' अशीं दोन बेटें शोधून काढलीं, पुढें ६९° १०' अंशांपर्यंत दक्षिणध्रुवप्रदेशांत पर्यटन केलें.

बॉर्के ग्रेविंकः—१८९४ सालीं बॉर्के ग्रेविंक नांवाच्या एका तरुण नॉर्वेजिअन गृहस्थास दक्षिणध्रुवाकडे प्रवास करण्याची इच्छा झाल्यामुळें त्यानें अन्टार्टिक जहाजांत सामान्य खलाशाचा धंदा पत्करून १८९५ सालीं त्यानें दक्षिणेकडे ७४° अंश गाठला व " केप अॅडेअर " शेजारींच उतरून दक्षिणध्रुवाकडील जमिनीवर प्रथमच पाय ठेवला. पुन्हां १८९८ सालीं बॉर्के ग्रेविंक यानें स्वतःच्या जबाबदारीवर दुसऱ्या पर्यटणाची तयारी केली, व बरोबर ५० कुत्रे घेऊन, केप अॅडेअरवर उतरून तेथून चुंबकध्रुव व भौगोलिकध्रुव शोधण्याकरतां जमिनीवरील बर्फावरून सरकणाऱ्या गाड्यांतून पुढें जाण्याचा बेत ठरविला. ह्याप्रमाणें जहाज केप अॅडेअरला पोहोंचलें व नंतर १० मनुष्यांच्या टोळीनें तेथेंच मुक्काम केला. परंतु बॉर्के ग्रेविंक यास पुढें बर्फावरून प्रवास करणें अशक्य झाल्यामुळें एक वर्षभर सृष्टिशास्त्रविषयक वस्तूंचा संग्रह करण्यांत व हवामानशास्त्रविषयक व चुंबकीय निरीक्षण करण्यांत खर्च केलें. त्यानें नंतर ७८° ३४' अंशांपर्यंत प्रवास करून तेथून बर्फावरून कुत्र्यांच्या गाड्यांत १६ मैलपर्यंत प्रवास करून ७८° ५०' अंश गांठला व त्या ठिकाणीं ह्यापूर्वी अज्ञात असलेली एक गोष्ट म्हणजे कांहीं खडकाळ बेटावर, लव्हाळयाच्या व लायकेनच्या स्वरूपाच्या वनस्पती उगवत असल्याचें बॉर्के ग्रेविंक यास आढळून आलें.

गर्लेचः—जर्मनीमधील प्रो. जॉक व्हॉन न्युमेअर व ग्रेटब्रिटनमधील सर जॉन मरे इत्यादींनीं व सुप्रसिद्ध भौगोलिक संस्थांनीं दक्षिणध्रुवप्रदेशशोधनाचें कार्य सरकारच्या मदतीनें किंवा राष्ट्राच्या मदतीनें हातीं घेण्याबद्दल वारंवार सूचना केल्या होत्याच. १८९५ सालीं सर क्लेमेंट्स मार्खम यानें त्या कार्यास नेट लाविल्यामुळें प्रत्येक सुधारलेल्या देशांत ह्या शोधाबद्दल जागृति होऊं लागली. १८९८ सालीं कॅप्टन अॅड्रिअन डी गर्लेच यानें एक संयुक्त शोधनमंडळासह 'बेल्जिका' जहाज हाकारलें. यानें दक्षिणध्रुवप्रदेशांत प्रथम ६५° १५' अंश गाठला. पुढें बर्फांतून मार्ग काढीत तें ७१° ३५' अंशांवर आलें. परंतु त्या ठिकाणीं मोठें वादळ झालें, व सूर्य ७० दिवसपर्यंत उगवला नाहीं, व जहाजावरील सर्व लोकांस शरीरांतील रक्ताभिसरणांत बिघाड झाल्याचें व उत्साह नाहींसा झाल्याचें आढळलें. ह्याच काळोखांत डंको नांवाचा गृहस्थ वारला. ह्या पर्यटणांत भौगोलिक शोध फारसे झाले नाहींत. परंतु ह्या पर्यटणांत झालेल्या शास्त्रीय वस्तूंचा संग्रह मात्र फारच महत्त्वाचा आहे.

ह्याच सुमारास लिपझिक् येथील प्रो. कार्ल चन यानें कुकमूर, रॉस इत्यादींना दुरप्रयत्न करून देखील न सांपडलेलें " बौव्हेट " बेट पुन्हां शोधून काढलें.

स्कॉटचे शोधः—१९०१ सालीं यूरोपमधून दक्षिणध्रुवाकडे तीन टोळ्या निघाल्या. त्यांपैकीं ब्रिटिशराष्ट्रीय सफरीची तयारी रॉयल सोसायटी व रॉयल जिऑग्राफिकल सोसायटी

ह्या दोन संस्थांच्या संयुक्त कमिटीनें केली. सफरीच्या खर्चापैकीं बराच भाग स्वतः ब्रिटिश सरकारनें अंगावर घेतला व बाकीचा भाग रॉयल जिऑग्रॅफिकल सोसायटी, लॉंगस्टाफ वगैरेंनीं सोसला. चुंबकीय पाहणी नीट करतां यावी म्हणून डिस्कव्हरी नांवाचें केवळ लांकडाचें एक जहाज बांधण्यांत आलें व ह्या सफरीचा मुख्य अधिकारी आर. एफ्. स्कॉट ह्या नेमण्यांत आला, व त्याच्या हाताखालीं लेफ्टेनंट शॅकल्टन् यासारखे पुष्कळ तज्ज्ञ देण्यांत आले. स. १९०१ च्या डिसेंबरमध्यें या सफरीस सुरवात झाली. माउंट टेरर या पर्वतशिखराच्या पायथ्याशीं ७७° ४९' अंशावर या जहाजानें मुक्काम केला व येथून दक्षिणध्रुवप्रदेशांत बर्फावरून पळणाऱ्या कुत्र्यांच्या गाड्यांतून प्रवासास सुरवात झाली. स. १९०२ च्या नोव्हेंबरमध्यें कॅप्टन स्कॉट, लेफ्टे० शॅकल्टन् आणि डॉ. विल्सन यांनीं बर्फावरून प्रवासास सुरवात केली. येथील एकंदर परिस्थिति उत्तरध्रुवाच्या पेक्षां निराळी होती. हवा अगदीं तुफानी असून उत्तरध्रुवांतील त्या त्या अक्षांशाच्या मानानें वसंत ऋतूंतील हवामानहि पुष्कळ उतरलेलें असतें. उत्तरध्रुवांतल्याप्रमाणें या प्रदेशांत वरील प्रवाशांस अस्वलें, लांडगे, कोल्हे वगैरे प्रवासांतील मुक्कामावर धान्यसामुग्री फस्त करतांना आढळले नाहींत, इतकेंच नव्हे तर मारून खाण्यास उपयोगी अशीं जनावरेंहि येथें नव्हतीं, त्यामुळें सर्वांस पुरेल इतकी धान्यसामुग्री कुत्र्यांच्या गाड्यांतून न्यावी लागली. बर्फाचें मैदान व मधून खोल भेगा त्यामुळें प्रवास करणें फारच संकटावह होतें. पुढें पुढें कुत्रेंहि दमूं लागून एकामागून एक मारावे लागले. यानंतर दक्षिणेकडे ८३ अंशांवरील पर्वतशिखरास माउंट मार्खम व माउंट लॉंगस्टाफ अशीं नांवें देण्यांत आलीं. ह्यानंतरच्या ३८० मैलांच्या प्रवासांत ५९ दिवस खर्च झाले आणि हा प्रवास अगदींच निराळ्या तऱ्हेचा असल्यामुळें प्रसंगाप्रमाणें नवीन नवीन युक्त्या काढाव्या लागल्या. तरी देखील स्कॉट यानें मागील प्रवासापेक्षां पुष्कळच दूरचा पल्ला गांठला. परतचा प्रवास ३४ दिवसांचा झाला व ह्याच वेळीं इतर लोकांनींहि पुष्कळ छोटे प्रवास केले. फेरार यानें तेथील डोंगरांचा भूस्तरशास्त्र दृष्टीनें अभ्यास केला व हॉडसन यानें समुद्रांतर्गत प्राण्यांचा संग्रह केला व बेर्नेची यानें हवामानशास्त्रविषयक निरीक्षण केलें. अशा रीतीनें हें पर्यटण फारच महत्त्वाचें झालें.

ड्रायगाल्स्कीः—ह्याच सुमारास प्रो. एरिच व्हॉन् ड्रायगेल्स्की याच्या नेतृत्वाखालीं जर्मनीनें एका सफरीची तयारी केली. १९०२ सालीं 'गॉस् ' नांवाचें जहाज ६०° अंश दक्षिणेस गेलें. परंतु तेथें समुद्राची खोली १७३० पुरुष असल्यामुळें व आसपास जमिनीच्या अस्तित्वाबद्दल कांहींच खुणा उपलब्ध न झाल्यामुळें बर्फाच्छादित समुद्राच्या बाजूनें पश्चिमेकडे जहाज चाललें तोंच मागाहून दुसऱ्या कैसर विहल्यमचें नांव दिलेली जर्मन आढळून आली. ह्या सफरींत फार लांबचा प्रवास झाला नाहीं. परंतु यावेळीं केलेली शास्त्रीय पाहणी व पदार्थसंग्रह फारच मौल्यवान होता.

नॉर्डेन्स्कजोल्डः—वरील सफरींच्या वेळीं १९०२ सालीं कांहीं शास्त्रज्ञांनीं आपल्या खाजगत जबाबदारीवर दोन सफरींची तयारी केली. ह्या सफरींचा मुख्य अधिकारी नॉर्डेन्स्कजोल्ड हा असून त्यानें प्रथम ६४° २५' अंशांवरील " स्नोहिल् " बेट गांठलें, परंतु पुढें हें जहाज बर्फांत अडकून पडल्यामुळें सर्व मंडळींची मुक्तता कॅप्टन ' इरिझार '. नामक गृहस्थानें आपल्या लष्करी बोटीनें केली.

ब्रूसः—इतक्या अवधींत डॉ. ब्रूस यानें कांहीं मित्रांच्या आर्थिक मदतीनें एक स्कॉटिश शोधक मंडळ तयार केलें. या सफरीचा मुख्य उद्देश वेडेल-समुद्राची पहाणी व शोध करण्याचा होता. ब्रूसनें १९०३ सालीं " साउथ ऑर्की " बेटें पाहून ७०°२५' अंशांपर्यंत ह्या बाजूकडे प्रवेश केला. अनुकूल परिस्थितींत ' वेडेल ' समुद्र तरणीय असतो ही गोष्ट या प्रवासांत प्रथमच निदर्शनास आली. त्याचप्रमाणें ह्या प्रवासांतील समुद्रशास्त्रासंबंधीं निरीक्षण अत्यंत महत्त्वाचें झालें. पुढच्या वर्षीं डॉ. ब्रूसनें ७४°१' अंशापर्यंत जहाज नेलें, व पुढें त्यास बर्फाच्छादित प्रदेश फारच दूरवर दिसला व या प्रदेशास त्यानें " कोटस लँड " असें नांव दिलें.

चार्कोटः—इ. स. १९०४ च्या जानेवारी महिन्यांत डॉ. जीन बी. चार्कोट या गृहस्थानें आपल्या स्वतःच्या जबाबदारीवर दक्षिणध्रुवाकडील सफरीची तयारी केली. पुढें ' गर्लेच ' सामुद्रधुनींतून त्यानें ग्रॅहॅमलॅंडच्या ६७° अंशांपर्यंत प्रवास केला व तेथें त्यास नैर्ऋत्य दिशेस पसरणारी एक डोंगराळ जमीन दिसली, परंतु जहाज खडकावर आपटून फुटल्यामुळें तो कसाबसा सुरक्षित परत आला. पुन्हां स. १९०८ त त्यानें दुसऱ्या सफरीचा बेत केला व त्याप्रमाणें प्रवास करून पूर्वीची " लौबेट लँड " शेजारच्या ग्रॅहॅम लँड व अलेक्झांडर लँडशीं संयुक्त असल्याचें त्यास दिसून आलें. पुढें प्रवास केल्यावर अलेक्झांडर लँडची नवीन ठिकाणाहून पाहणी करतां येऊं लागली व ह्या पलीकडे नैऋत्येस नवीन जमिनीचा शोध लागला. ह्या पर्यटणाचा शेवटचा मुक्काम ७० ३०' अंशावर होता. ह्या प्रवासांत पुष्कळ ठिकाणीं समुद्राची खोली पाहण्यांत आली व त्यावरून जमीन जवळच असावी असें चार्कोटनें सिद्ध केलें.

शॅकल्टनः—मागें स्कॉटबरोबर प्रवास करीत असतां आजारी झालेल्या शॅकल्टननें आपल्या स्वतःच्या जबाबदारीवर कांहीं मित्रांच्या साह्यानें दक्षिणध्रुव शोधण्याकरितां सफर करण्याचें ठरविलें. स. १९०८ च्या जानेवारींत न्यूझीलंडचा किनारा त्यानें सोडला. किनाऱ्यावर जहाजांतून शोधकांच्या टोळीनें उतरावयाचें व वर्षभर शोधाचें कार्य झाल्यानंतर त्या " निम्रोड " जहाजानें मंडळींना परत नेण्यास यावयाचें असा बेत ठरला. परंतु [illegible]

जमिनीवर बर्फामुळें किनारा सुरक्षित नसल्यामुळें शोधक मंडळींनी मार्कट इरेबसच्या पायथ्याशीं किनाऱ्यावर कायमचा मुक्काम करण्याचें ठरविलें. ह्या मंडळींत बरेचसे "डिस्कव्हरी" जहाजाच्या सफरींतील शास्त्रज्ञ सामील झाले होते. ह्या सफरींत रोज तार्जे शिजवलेलें अन्न व सुकें दूध त्याचप्रमाणें ॲसेटिलेन वायूच्या योगानें उत्पन्न केलेला कृत्रिम प्रकाश इत्यादि गोष्टींच्या भरपूर पुरवठ्यामुळें प्राणहानि बिलकुल झाली नाहीं. त्याचप्रमाणें डोंगराळ पृष्ठभागावर उपयोग व्हावा म्हणून बरोबर एक मोटारगाडीहि घेण्यांत आली होती. परंतु बर्फाच्छादित समुद्रपृष्ठावर मुक्काम ठेवण्याच्या वेळाखेरीज इतर कोणत्याहि वावर्तीत तिचा उपयोग झाला नाहीं. ह्या सफरीचा दुसरा एक विशेष म्हणजे मांचुरियांतील तट्टांचा केलेला उपयोग होय. हे कणखर प्राणी निघतांना दहा घेण्यांत आले होते परंतु त्यांपैकीं पहिल्या मुक्कामावरच चार मेले, परंतु बाकी च्यांचा शेवटपर्यंत चांगला उपयोग झाला. ह्या सफरींत ७|८ कुत्रेहि बरोबर घेण्यांत आले होते, परंतु त्यांजवर विशेष अवलंबून राहणें इष्ट नव्हतें.

"निम्रोड" जहाजानें स. १९०८ फेब्रुवारीच्या २२ तारखेस आपला परतचा रस्ता धरला व लागलीच शास्त्रज्ञमंडळींनीं निरनिराळ्या प्रकारची पाहणी व पदार्थसंग्रह करण्यास प्रारंभ केला. ह्या सफरीमुळें तीन महत्त्वाचीं कार्यें झालीं तीः—(१) दक्षिणध्रुवप्रदेशांतील प्राणी व वनस्पतींचे शोध. ( २ ) दक्षिणेकडील चुंबकीय ध्रुवबिंदूचा शोध.( ३ ) शॅकलटनचा दक्षिणध्रुवाजवळील प्रवास

ह्या पर्यटणांतील किरकोळ निरीक्षणें व सहली सोडून दिल्या तरी देखील एकंदर तीन प्रवास फारच महत्त्वाचे झाले. हिंवाळ्यास सुरवात होण्यापूर्वीच प्रो. डेव्हिड हा पांच सोबत्यांसह १३३०० फूट उंचीच्या शिखरापर्यंत गेला व त्या ठिकाणीं ९०० फूट खोलीचें ज्वालामुखीचें ज्वलन्मुख त्यांस आढळलें. ह्यानंतर वरील टोळीनें किनाऱ्याच्या बाजूनें दक्षिणेकडे ७५° अंशावर जाऊन तेथून बर्फावरून सरकणाऱ्या कुत्र्यांच्या गाड्यांतून चुंबकध्रुवाचा शोध लावला. ह्या सफरींतील अत्यंत महत्त्वाचा प्रवास शॅकलटननें केलेला होय. शॅकलटनच्या मुख्य टोळीपुढें आगाऊ जाऊन मुक्काम ठेवण्याची व्यवस्था करण्यांत आली होती,व ह्या मुख्य टोळीवरोबरहि पांच मनुष्यांची सहाय्यक टोळी १० दिवसपर्यंत प्रवास करीतच होती. मधून मधून जसजसे तट्टू गळाटत तसतसे त्यास गोळी घालून त्यांचें मांस परत येतांना खाण्याकरितां उपयोगी पदार्थ म्हणून कोठेंतरी बर्फांत संग्रह करून ठेवण्यांत येई. मधून मधून येणाऱ्या बर्फामधील भेगामुळें प्रवास करणेंहि अत्यंत धोक्याचें होतें. अशा रीतीनें त्या हिमपृष्ठावरून बराच प्रवास केल्यावर सर्व मंडळी ८५°५५' अंशावरील ९५०० फूट उंचीच्या मार्गी येऊन पोहोंचली. आणखी तीन दिवसांच्या प्रवासानंतर सर्व मंडळी १२२०० फूट उंचीवर येऊन पोहोंचली व त्या ठिकाणची पाहणी करतां ८८° २३' अंश असल्याचें आढळून आलें. अन्नाचा पुरवठा असता तर शेवटचे ९७ मैलहि ओलांडतां आले असते. परंतु परत येतांना ७०० मैलांचा प्रवासच अत्यंत कसोटीचा झाला. अशा रीतीनें शॅकलटननें आपल्या पूर्वीच्या लोकांस धाडसात मार्गे टाकल्यामुळें ब्रिटिश सरकारांतून २०००० पौंडांची मदत करण्यांत आली व शॅकलटन यास सरदारकीची पदवी समर्पण करण्यांत आली.

इ. स. १९१०–११ सालच्या सुमाराच्या सफरीः— १९१० सालीं कॅप्टन आर. स्कॉट ह्यानें एका सफरीस स्वतःच्या जबाबदारीवर सुरवात केली. त्यानंतर दक्षिणध्रुवाला जाण्याबद्दल डॉ. डब्ल्यू. एस. ब्रूस यानें १९११–१२ सालीं बेत केला. वेडेल समुद्रांतील कोट्सलँडहून रॉस समुद्रांतील मॅक मर्डो साउंडला जाण्याची त्यानें योजना केली होती परंतु ती यशस्वी झाली नाहीं. त्याच सालीं दोन सफरी अमेरिकेहून निघणार होत्या.

शिरास ( १९१०—१२ ):—लेफ्टेनंट शिरास याच्या नेतृत्वाखालीं १९१० सालीं कॅनानमास नामक जहाजांतून ही सफर जपानहून निघाली होती. रॉस समुद्र गांठण्यास फार काल लागल्यामुळें सिडने येथें हिंवाळा घालवून १९११–१२ सालीं ही सफर बे ऑफ व्हेल येथें परत फिरली. या सफरींत कांहीं शोध लागल्याचें ऐकिवांत नाहीं.

अमंडसेन (१९१०–१२):—कॅप्टन अमंडसेन हा नॉर्वेहून 'फ्रॅम' जहाजांतून १९१० सालीं निघाला. बे ऑफ व्हेलस्मधील बॅरिअरमध्यें तो स.१९११च्या जानेवारींत पोहोंचला. ११६ एस्किमो कुत्रे त्या ठिकाणीं पोहोंचूं शकले. 'फ्रॅम हेइम' नामक एक झोंपडीहि तेथें बांधण्यांत आली. तेथून थेट दक्षिणेकडे तो निघाला परंतु थंडी ( –५८° ते–७५ ) कडक असल्यामुळें त्यास पुढें जातां येईना. नंतर साउथ व्हिक्टोरिया लँड येथील पर्वत दृग्गोचर होऊं लागले. नोव्हेंबरमध्यें पुन्हां दाक्षिणेकडे प्रवास सुरू झाला. बर्फामुळें कांहीं कुत्रे मरण पावले; शेवटीं १४ डिसेंबर इसवी सन १९११ रोजीं दक्षिणध्रुवाचें ठिकाण गाठण्यांत आलें. फ्रॅम जहाज बे ऑफ व्हेलस् येथें १९१२सालच्या जानेवारींत पोहोंचलें.

स्कॉट ( १९१०—१२ ):—दक्षिणध्रुवास पोहोंचणें व रॉस समुद्राच्या क्षेत्राचा शास्त्रीय अभ्यास करणें असे दोन हेतु रॉबर्ट एफ स्कॉट याचे होते. मॅक मर्डो साउंड येथें जाऊन त्यानें रॉस बेट गांठलें. त्यानंतर तो एडवर्ड लँडकडे वळला. शास्त्रीय शोध लावण्याबद्दल त्यानें ही सफर केली होती.

स्कॉटची नॉर्दर्न पार्टी (१९११—१२ ):—ईस्टर्न पार्टीनें केप इव्हॅन्स येथें परत जाण्याचा बेत केला. तेथून पुढें बर्फामुळें प्रवास करणें या नॉर्दर्न पार्टीस अशक्य वाटूं लागलें. टेरानोव्हा वेढून त्यांनां बर्फामुळें परत फिरता येईना व सर्व हिंवाळा त्यांनां सील माशावर राहून काढावा लागला.

शेवटीं ही पार्टी हटपॉइंट येथें सन १९१२च्या नोव्हेंबरमध्यें पोहोंचली.

स्कॉटची वेस्टर्न पार्टी ( १९११-१२ ):—१९११ सालीं ग्रिफिथ टेलर यानें पश्चिमेकडील भागांत असलेल्या डोंगरांसंबंधीं शास्त्रीयदृष्ट्या अभ्यास केला.

विल्सनचा हिमप्रवास ( १९११ ):—हा प्रवास ३६ दिवस सुरू होता व त्यावेळीं थंडीचें प्रमाण सुमारें ६०° व ७०° असें होतें. बर्फ अगदीं दगडासारखें झालें होतें. केप क्रोझिवारची ही सफर अत्यंत त्रासदायक झाली.

स्कॉटचा दक्षिण ध्रुवाकडील प्रवास, (१९११-१२):—या सफरीची मोठ्या प्रमाणांत तयारी करण्यांत आली होती. १७ सैबेरियन घोडे, ३३ सैबेरियन स्लेज कुत्रे, व तीन मोटार स्लेज गाड्या घेऊन स्कॉट हा केप इव्हॅन्स येथें जाऊन पोहोंचला.उत्तर अक्षांश ७८°,७९°व ८०°या ठिकाणीं जाण्याचा स्कॉटनें प्रयत्न केला होता. सप्टेंबर १९११ सालीं थंडीचें मान —४०° च्या वर गेल्यामुळें स्कॉटनें अधिक सामुग्री नेण्याची व्यवस्था केली होती. आक्टोबर १९११ सालीं दोन मोटार स्लेज गाड्या केप इव्हॅन्स येथून निघाल्या व हटपाइंट येथें जाऊन तेथून बर्फांतून बॅरिअरकडे वळल्या. तेथून १६ असामी पुढचा प्रवास करण्यास निघाले. त्यांपैकीं आठ जण पुढच्या प्रवासाला टिकले. शेवटीं तारीख १८ जानेवारी १९१२ रोजीं हे लोक दक्षिण ध्रुवाजवळ गेले. त्यांपैकीं थंडमुळें बरेच लोक गतप्राण झाले व परत फिरण्यास त्यांच्याजवळ कुत्रे व घोडे शिल्लक राहिले नाहींत.

केप इव्हॅन्स येथील १९१२ चा हिंवाळा:—डॉ. ॲटकिन्सन हा कुत्रे बरोबर घेऊन दक्षिणेकडे लेफ्टेनंट इव्हॅन्स यास वांचविण्याकरितां निघाला. शेवटीं इव्हॅन्स याला टेरानोव्हा बोटींत घालून परत जाण्याकरितां हे सफरवाले लोक निघाले. शेवटीं ते हटपॉइंट येथें येऊन पोहोंचले व तेथून डॉ. ॲटकिन्सन हा कार्नर पाईंटपर्यंत गेला व डॉ. स्कॉट हा आपल्या सफरींत नाश पावला आहे अशी खात्री झाल्यामुळें त्यास परत फिरावें लागलें. आक्टोबर ३० सन १९१२ रोजीं डॉ. ॲटकिन्सन हा ७ खेचरें व कुत्रे घेऊन हटपॉइंटहून निघाला व शेवटीं तो नोव्हेंबर १२ तारखेस स्कॉटच्या तंबूजवळ आला. त्या ठिकाणीं स्कॉट व इतर लोक मृत पावलेले त्यास आढळून आले, तथापि त्यांच्या रोजनिशा व कागद त्यास तेथें सांपडले. ही बातमी चोहोंकडे पसरली व या धाडशी लोकांच्या कुटुंबाकरितां फंड उभारण्यांत आला.

आस्ट्रेलियन सफर ( १९११—१४ ):—डॉ. डगलस याच्या नेतृत्वाखालीं आस्ट्रेलियामधून एक सफर निघाली व ६७° अक्षांशाजवळच्या कॉमनवेल्थ—येथें पोहोंचली. नंतर क्वीन मेरी लँड नामक ठिकाणीं बर्फांतून त्यांनां पुढचा प्रवास करावा लागला. अत्यंत तुफान झाल्यामुळें डॉ. डगलस यास फार त्रास झाला होता. स. १९१२ च्या नोव्हेंबरांत प्रत्येकीं ५ स्लेज गाड्या घेऊन या सफरवाल्यांपैकीं कांहीं लोक निरनिराळ्या दिशेकडील वळणानें पुढें जाण्याकरितां निघाले. डॉ. मॉसन हा स्लेज गाड्या घेऊन निघाला व कांहीं दूर गेल्यानंतर त्याची सामुग्री संपत आली. त्याचे साथीदार वाटेंत मरण पावले व डॉ. मॉसन हा एकटा हटपॉईंट येथें कसाबसा पोचंला. कॅप्टन डेव्हिस हा मॉसनची वाट पहात होता. क्वीन मेरी लँड येथील वाइल्ड पार्टीला मदत करण्याचा त्याचा हेतू होता. शेवटीं तो वाइल्ड येथें सुखरूप पोहोंचला व तेथील लोकांनां बरोबर घेऊन तो हॉवर्ट येथें परत आला.

डब्ल्यू. फिलपनर (१९११-१२):—१९११ सालीं वेडेल समुद्राकडे ही जर्मन सफर निघाली. दक्षिण ध्रुवाच्या बाजूस बरेच दूर गेल्यानंतर बर्फावर एक झोंपडी बांधण्यांत आली. कॅप्टन व्होसल यानें साउथ जॉर्जियाकडे हिंवाळ्यांत परत जावें व नंतर एक वर्षानें सफरीवर निघावें असा सल्ला दिला होता. परंतु परत येतांना त्यांनां अतिशय त्रास झाला व या सफरींत कॅप्टन व्हासेल हा मरण पावला.

शॅकल्टनची वेडेलसी पार्टी ( १९१४-१६ ):—शॅकल्टन हा इंग्लंडहून ऑगस्ट १९१४ सालीं 'एनड्युअरन्स' जहाजांतून निघाला. परंतु स. १९१५ च्या जानेवारी१८ तारखेस हें जहाज बर्फामुळें कुंठित झालें व तें फुटूनहि गेलें. साउथ जॉर्जियाकडे जाण्याचा फसून प्रयत्न करण्यांत आला व शॅकल्टन यास शेवटीं यश प्राप्त झालें.

शॅकल्टनची रॉससी पार्टी ( १९१४-१७ ):—रॉस समुद्राच्या बाजूस 'ऑरोरा' जहाज शॅकल्टनचा मार्ग सुलभ करण्याकरितां पुढें जात होतें. 'ऑरोरा' केपइव्हॅन्सला १९१५ च्या जानेवारींत पोहोंचलें. शेवटीं शॅकल्टन हा होप पर्वताजवळ जाऊन पोहोंचला. या सफरींत स्पेन्सरस्मिथ मरण पावला व बाकीचे लोक शेवटीं हटपॉईंटला जाऊन पोहोंचले. केपइव्हॅन्सपार्टीकडे परत जाण्याच्या प्रयत्नांत, मॅकिनटॉश व हेवर्ड यांनीं बर्फामधून प्रवास केला व त्यांत ते नष्ट पावले. 'ऑरोरा' व 'एनड्युअरन्स' जहाजांच्या सफरींत वांचलेल्या ५३ लोकांनां परत आल्यावर आरमार, वैमानिक दळ, वगैरे खात्यांत महायुद्धाच्या काळांत मोठ्या नोकऱ्या देण्यांत आल्या होत्या.

शास्त्रीय फलश्रुतिः—वरील सर्व सफरींची शास्त्रीय दृष्ट्या काय फलश्रुति झाली या गोष्टीचें तात्पर्य स.१९२१पर्यंत नीटपणें सांगतां येणें अशक्य झालें. कारण महायुद्धामुळें संशोधनकार्यांत बराच अडथळा आला. दक्षिणध्रुवासंबंधीं भौगोलिक व प्राणिशास्त्राच्या दृष्टीनें कोणतीं अनुमानें काढतां येतील हें ठरविणें अशक्य आहे; कांकीं आजपर्यंतच्या सर्व सफरींच्या वृत्तांताचें एकीकरण करण्यांत आलें पाहिजे. ऑस्ट्रेलियन व जर्मन सफरी आणि स्कॉट व अमुंडसेन यांच्या सफरी कशा

जमिनीवर बर्फामुळें किनारा सुरक्षित नसल्यामुळें शोधक मंडळींनीं मार्कंट इरेबसच्या पायथ्याशीं किनाऱ्यावर कायमचा मुक्काम करण्याचें ठरविलें ह्या मंडळींत बरेचसे "डिस्कव्हरी" जहाजाच्या सफरींतील शास्त्रज्ञ सामील झाले होते. ह्या सफरींत रोज ताजें शिजवलेलें अन्न व सुकें दूध त्याचप्रमाणें ॲसेटिलेन वायूच्या योगानें उत्पन्न केलेला कृत्रिम प्रकाश इत्यादिकांच्या भरपूर पुरवठ्यामुळें प्राणहानि बिलकुल झाली नाहीं. त्याचप्रमाणें डोंगराळ पृष्ठभागावर उपयोग व्हावा म्हणून बरोबर एक मोटारगाडीहि घेण्यांत आली होती. परंतु बर्फाच्छादित समुद्रपृष्ठावर मुक्काम ठेवण्याच्या वेळाखेरीज इतर कोणत्याहि बाबतींत तिचा उपयोग झाला नाहीं. ह्या सफरींचा दुसरा एक विशेष म्हणजे मांचुरियांतील तट्टांचा केलेला उपयोग होय. हे कणखर प्राणी निघतांना दहा घेण्यांत आले होते परंतु त्यांपैकीं पहिल्या मुक्कामावरच चार मेले, परंतु बाकी त्यांचा शेवटपर्यंत चांगला उपयोग झाला. ह्या सफरींत ३० कुत्रेहि बरोबर घेण्यांत आले होते, परंतु त्यांजवर विशेष अवलंबून राहणें इष्ट नव्हतें.

"निम्रोड" जहाजानें स. १९०८ फेब्रुवारीच्या २२ तारखेस आपला परतचा रस्ता धरला व लागलीच शास्त्रज्ञमंडळींनीं निरनिराळ्या प्रकारची पाहणी व पदार्थसंग्रह करण्यास प्रारंभ केला. ह्या सफरीमुळें तीन महत्त्वाचीं कार्यें झालीं तीं:—(१) दक्षिणध्रुवप्रदेशांतील प्राणी व वनस्पतींचे शोध. ( २ ) दक्षिणेकडील चुंबकीय ध्रुवबिंदूचा शोध.( ३ ) शॅकलटनचा दक्षिणध्रुवाजवळील प्रवास

ह्या पर्यटणांतील किरकोळ निरीक्षणें व सहली सोडून दिल्या तरी देखील एकंदर तीन प्रवास फारच महत्त्वाचे झाले. हिंवाळ्यास सुरवात होण्यापूर्वींच प्रो. डेव्हिड हा पांच सोबत्यांसह १३३०० फूट उंचीच्या शिखरापर्यंत गेला व त्या ठिकाणीं ९०० फूट खोलीचें ज्वालामुखीचें ज्वालामुख त्यांस आढळलें. ह्यानंतर वरील टोळीनें किनाऱ्याच्या बाजूनें दक्षिणेकडे ७५°अंशावर जाऊन तेथून बर्फावरून सरकणाऱ्या कुत्र्यांच्या गाडींतून चुंबकध्रुवाचा शोध लावला. ह्या सफरींतील अत्यंत महत्त्वाचा प्रवास शॅकलटननें केलेला होय. शॅकलटनच्या मुख्य टोळीपुढें आगाऊ जाऊन मुक्काम ठेवण्याची व्यवस्था करण्यांत आली होती,व ह्या मुख्य टोळीबरोबरहि पांच मनुष्यांची सहाय्यक टोळी १० दिवसपर्यंत प्रवास करीतच होती. मधून मधून जसजसे तट्टू गळाटत तसतसे त्यास गोळी घालून त्यांचें मांस परत येतांना खाण्याकरितां उपयोगी पडावें म्हणून कोठेंतरी बर्फांत संग्रह करून ठेवण्यांत येई. मधून मधून येणाऱ्या बर्फामधील भेगामुळें प्रवास करणेंहि अत्यंत धोक्याचें होतें. अशा रीतीनें त्या हिमपृष्ठावरून बराच प्रवास केल्यावर सर्व मंडळी ८५°५५' अंशांवरील ९५०० फूट उंचीच्या जागीं येऊन पोहोंचली. आणखी तीन दिवसांच्या प्रवासानंतर सर्व मंडळी १२२०० फूट उंचीवर येऊन पोहोंचली व त्या ठिकाणची पाहणी करतां ८८° २३' अंश असल्याचें आढळून आलें. अन्नाचा पुरवठा असता तर शेवटचे ९७ मैलहि ओलांडतां आले असते. परंतु परत येतांना ७०० मैलांचा प्रवासच अत्यंत कसोटीचा झाला. अशा रीतीनें शॅकलटननें आपल्या पूर्वींच्या लोकांस धाडसांत मागें टाकल्यामुळें ब्रिटिश सरकारांतून २०००० पौंडांची मदत करण्यांत आली व शॅकलटन यास सरदारकीची पदवी समर्पण करण्यांत आली.

इ. स. १९१०-११ सालच्या सुमाराच्या सफरी:—१९१० सालीं कॅप्टन आर. स्कॉट ह्यानें एका सफरीस स्वतःच्या जबाबदारीवर सुरवात केली. त्यानंतर दक्षिणध्रुवाला जाण्याबद्दल डॉ. डब्ल्यू. एस. ब्रूस यानें १९११-१२ सालीं बेत केला. वेडेल समुद्रांतील कोट्सलँडहून रॉस समुद्रांतील मॅक मर्डो साउंडला जाण्याची त्यानें योजना केली होती परंतु ती यशस्वी झाली नाहीं. त्याच सालीं दोन सफरी अमेरिकेहून निघणार होत्या.

शिरास ( १९१०—१२ ):—लेफ्टेनंट शिरास याच्या नेतृत्वाखालीं १९१० सालीं कॅनानमास नामक जहाजांतून ही सफर जपानहून निघाली होती. रॉस समुद्र गांठण्यास फार काल लागल्यामुळें सिडने येथें हिंवाळा घालवून १९११-१२ सालीं ही सफर बे ऑफ व्हेल येथें परत फिरली. या सफरींत कांहीं शोध लागल्याचें ऐकिवांत नाहीं.

अमंडसेन (१९१०-१२):—कॅप्टन अमंडसेन हा नॉर्वेहून 'फ्रॅम' जहाजांतून १९१० सालीं निघाला. बे ऑफ व्हेलस्मधील बॅरिअरमध्यें तो स.१९११च्या जानेवारींत पोहोंचला. ११६ एस्किमो कुत्रे त्या ठिकाणीं पोहोंचूं शकले. 'फ्रॅम हेइम' नामक एक झोंपडीहि तेथें बांधण्यांत आली. तेथून थेट दक्षिणेकडे तो निघाला परंतु थंडी ( -५८° ते-७५ ) कडक असल्यामुळें त्यास पुढें जातां येईना. नंतर साउथ व्हिक्टोरिया लँड येथील पर्वत दृग्गोचर होऊं लागले. नोव्हेंबरमध्यें पुन्हां दक्षिणेकडे प्रवास सुरू झाला. बर्फामुळें कोहीं कुत्रे मरण पावले; शेवटीं १४ डिसेंबर इसवी सन १९११ रोजीं दक्षिणध्रुवाचें ठिकाण गाठण्यांत आलें. फ्रॅम जहाज बे ऑफ व्हेलस् येथें १९१२सालच्या जानेवारींत पोहोंचलें.

स्कॉट ( १९१०—१२ ):—दक्षिणध्रुवास पोहोंचणें व रॉस समुद्राच्या क्षेत्राचा शास्त्रीय अभ्यास करणें असे दोन हेतू रॉबर्ट एफ स्कॉट याचे होते. मॅक मर्डो साउंड येथें जाऊन त्यानें रॉस बेट गांठलें. त्यानंतर तो एडवर्ड लँडकडे वळला. शास्त्रीय शोध लावण्याबद्दल त्यानें ही सफर केली होती.

स्कॉटची नॉर्दर्न पार्टी (१९११—१२ ):—ईस्टर्न पार्टीनें केप इव्हेन्स येथें परत जाण्याचा बेत केला. तेथून पुढें बर्फामुळें प्रवास करणें या नॉर्दर्न पार्टीस अशक्य वाटूं लागलें. टेरानोव्हा येऊन त्यांना बर्फामुळें परत फिरता येईना व सर्व हिंवाळा त्यांनां सील माशांवर राहून काढावा लागला.

शेवटीं ही पार्टी हटपॉइंट येथें सन १९१२च्या नोव्हेंबरमध्यें पोहोंचली.

स्कॉटची वेस्टर्न पार्टी ( १९११-१२ ):—१९११ सालीं ग्रिफिथ टेलर यानें पश्चिमेकडील भागांत असलेल्या डोंगरांसंबंधीं शास्त्रीयदृष्ट्या अभ्यास केला.

विल्सनचा हिमप्रवास ( १९११ ):—हा प्रवास ३६ दिवस सुरू होता व त्यावेळीं थंडीचें प्रमाण सुमारें ६०° व ७०° असें होतें. बर्फ अगदीं दगडासारखें झालें होतें. केप क्रोझिवारची ही सफर अत्यंत त्रासदायक झाली.

स्कॉटचा दक्षिण ध्रुवाकडील प्रवास (१९११-१२):—या सफरीची मोठ्या प्रमाणांत तयारी करण्यांत आली होती. १७ सैबेरियन घोडे, ३३ सैबेरियन स्लेज कुत्रे, व तीन मोटार स्लेज गाड्या घेऊन स्कॉट हा केप इव्हॅन्स येथें जाऊन पोहोंचला.उत्तर अक्षांश ७८°,७९°व ८०°या ठिकाणीं जाण्याचा स्कॉटनें प्रयत्न केला होता. सप्टेंबर १९११ सालीं थंडीचें मान —४०° च्या वर गेल्यामुळें स्कॉटनें अधिक सामुग्री नेण्याची व्यवस्था केली होती. आक्टोबर १९११ सालीं दोन मोटार स्लेज गाड्या केप इव्हॅन्स येथून निघाल्या व हटपाइंट येथें जाऊन तेथून बर्फांतून बॅरिअरकडे वळल्या. तेथून १६ असामी पुढचा प्रवास करण्यास निघाले. त्यांपैकीं आठ जण पुढच्या प्रवासाला टिकले. शेवटीं तारीख १८ जानेवारी १९१२ रोजीं हे लोक दक्षिण ध्रुवाजवळ गेले. त्यांपैकीं थंडीमुळें बरेच लोक गतप्राण झाले व परत फिरण्यास त्यांच्याजवळ कुत्रे व घोडे शिल्लक राहिले नाहींत.

केप इव्हॅन्स येथील १९१२ चा हिंवाळा:—डॉ. ॲटकिन्सन हा कुत्रे बरोबर घेऊन दक्षिणेकडे लेफ्टेनंट इव्हॅन्स यास वांचविण्याकरितां निघाला. शेवटीं इव्हॅन्स याला टेरानोव्हा बोटींत घालून परत जाण्याकरितां हे सफरवाले लोक निघाले. शेवटीं ते हटपॉइंट येथें येऊन पोहोंचले व तेथून डॉ. ॲटकिन्सन हा कार्नर पॉईंटपर्यंत गेला व डॉ. स्कॉट हा आपल्या सफरींत नाश पावला आहे अशी खात्री झाल्यामुळें त्यास परत फिरावें लागलें. आक्टोबर ३० सन १९१२ रोजीं डॉ. ॲटकिन्सन हा ७ खेचरें व कुत्रे घेऊन हटपॉइंटहून निघाला व शेवटीं तो नोव्हेंबर १२ तारखेस स्कॉटच्या तंबूजवळ आला. त्या ठिकाणीं स्कॉट व इतर लोक मृत पावलेले त्यास आढळून आले, तथापि त्यांच्या रोजनिशा व कागद त्यास तेथें सांपडले. ही बातमी चोहोंकडे पसरली व या धाडशी लोकांच्या कुटुंबाकरितां फंड उभारण्यांत आला.

आस्ट्रेलियन सफर ( १९११—१४ ):—डॉ. डगलस याच्या नेतृत्वाखालीं आस्ट्रेलियामधून एक सफर निघाली व ६७° अक्षांशाजवळच्या कॉमनवेल्थ-बेमध्यें पोहोंचली. नंतर क्वीन मेरी लँड नामक ठिकाणीं बर्फांतून त्यांनां पुढचा प्रवास करावा लागला. अत्यंत तुफान झाल्यामुळें डॉ. डगलस यास फार त्रास झाला होता. स. १९१२ च्या नोव्हेंबरांत प्रत्येकीं ५ स्लेज गाड्या घेऊन या सफरवाल्यांपैकीं कांहीं लोक निरनिराळ्या दिशेकडील वळणानें पुढें जाण्याकरितां निघाले. डॉ. मॉसन हा स्लेज गाड्या घेऊन निघाला व कांहीं दूर गेल्यानंतर त्याची सामुग्री संपत आली. त्याचे साथीदार वाटेंत मरण पावले व डॉ. मॉसन हा एकटा हटपॉइंट येथें कसाबसा पोचेंहाला. कॅप्टन डेव्हिस हा मॉसनची वाट पहात होता. क्वीन मेरी लँड येथील वाइल्ड पार्टीला मदत करण्याचा त्याचा हेतू होता. शेवटीं तो वाइल्ड येथें सुखरूप पोहोंचला व तेथील लोकांनां बरोबर घेऊन तो हॉवर्ट येथें परत आला.

डब्ल्यू. फिलपनर (१९११-१२):—१९११ सालीं वेडेल समुद्राकडे ही जर्मन सफर निघाली. दक्षिण ध्रुवाच्या बाजूस बरेच दूर गेल्यानंतर बर्फावर एक झोंपडी बांधण्यांत आली. कॅप्टन व्होसल यानें साउथ जॉर्जियाकडे हिंवाळ्यांत परत जावें व नंतर एक वर्षानें सफरीवर निघावें असा सल्ला दिला होता. परंतु परत येतांना त्यांनां अतिशय त्रास झाला व या सफरींत कॅप्टन व्हासेल हा मरण पावला.

शॅकल्टनची वेडेलसी पार्टी ( १९१४-१६ ):—शॅकल्टन हा इंग्लंडहून ऑगस्ट १९१४ सालीं 'एनडयुअरन्स' जहाजांतून निघाला. परंतु स. १९१५ च्या जानेवारी १८ तारखेस हें जहाज बर्फामुळें कुंठित झालें व तें फुटूनहि गेलें. साउथ जॉर्जियाकडे जाण्याचा कसून प्रयत्न करण्यांत आला व शॅकल्टन यास शेवटीं यश प्राप्त झालें.

शॅकल्टनची रॉससी पार्टी ( १९१४-१७ ):—रॉस समुद्राच्या बाजूस 'ऑरोरा' जहाज शॅकल्टनचा मार्ग सुलभ करण्याकरितां पुढें जात होतें. 'ऑरोरा' केपइव्हॅन्सला १९१५ च्या जानेवारींत पोहोंचलें. शेवटीं शॅकल्टन हा होप पर्वताजवळ जाऊन पोहोंचला. या सफरींत स्पेन्सरस्मिथ मरण पावला व बाकीचे लोक शेवटीं हटपॉईंटला जाऊन पोहोंचले. केपइव्हॅन्सपार्टीकडे परत जाण्याच्या प्रयत्नांत, मॅकिनटॉश व हेवर्ड यांनीं बर्फामधून प्रवास केला व त्यांत ते नष्ट पावले. 'ऑरोरा' व 'एनडयुअरन्स' जहाजांच्या सफरींत वांचलेल्या ५३ लोकांनां परत आल्यावर आरमार, वैमानिक दळ, वगैरे खात्यांत महायुद्धाच्या काळांत मोठ्या नोकऱ्या देण्यांत आल्या होत्या.

शास्त्रीय फलश्रुतिः—वरील सर्व सफरींची शास्त्रीय दृष्ट्या काय फलश्रुति झाली या गोष्टीचें तात्पर्य स.१९२१पर्यंत नीटपणें सांगतां येणें अशक्य झालें. कारण महायुद्धामुळें संशोधनकार्यास बराच अडथळा आला. दक्षिणध्रुवासंबंधीं भौगोलिक व प्राणिशास्त्राच्या दृष्टीनें कोणतीं अनुमानें काढतां येतील हें ठरविणें अशक्य आहे; कांकीं आजपर्यंतच्या सर्व सफरींच्या वृत्तांताचें एकीकरण करण्यांत आलें पाहिजे. ऑस्ट्रेलियन व जर्मन सफरी आणि स्कॉट व अमुंडसेन यांच्या सफरी कशा

झाल्या व त्यासंबंधीं लिहून ठेविलेल्या हकीगतींत एकवाक्यता कशी आहे हें पाहिल्यानंतरच दक्षिणध्रुवासंबंधीं कांहीं अनुमान करतां येईल. दक्षिणध्रुवासंबंधीं व तेथील हवामान, भौगोलिक स्थिति वगैरे अनेक प्रश्नांसंबंधीं कोणतेंहि निश्चित अनुमान व सिद्धांत अद्यापपर्यंत फारसे प्रसिद्ध झालेले नाहींत.

शॅकल्टनची अलीकडची सफर, 'क्वेस्ट' जहाजः—दक्षिण ध्रुवाकडे गेलेली अगदीं अलीकडील म्हणजे सर अर्नेस्ट शॅकलटॅन याची सफर स. १९२१ त इंग्लंडमधून निघाली. या सफरीनें दक्षिणध्रुवाकडील समुद्राच्या खोलीचीं मापें घेण्याचें, समुद्रांतील जलप्रवाहांचे उगम व मार्ग शोधून काढण्याचें, आणि ज्यांचे नकाशे झालेले नव्हते अशा प्रदेशांची पाहणी करण्याचें कबूल केल्यामुळें ॲडमिरल्टीनें (आरमार खात्यानें) या सफरीला मदत दिली. शॅकल्टननें स्पेरी गीरोस्कोपिक कॅंपस ( सबमरीनला उत्तरध्रुवास जातां यावें म्हणून बनविलेलें जर्मन यंत्र ) बरोबर घेतला होता, पण ध्रुवानजिक त्याची प्रेरक शक्ति नष्ट झाल्यामुळें त्याचा उद्दिष्ट उपयोग झाला नाहीं. तथापि इतर उपयोग पुष्कळ झाला. शॅकलटन ४ जानेवारी १९२२ रोजीं एकाएकीं मरण पावला, व नंतर कमांडर फ्रँक वाइल्ड यानें सफरीचें नेतृत्व पत्करलें. दक्षिण अटलांटिक महासागरांतील सेंट पॉल्'स रॉक्स व झावोडोव्हस्की बेट यांची पाहणी करून फोटो घेण्यांत आले. ट्रिस्टन डा कुन्हा या बेटांतलि रहिवाशी चांगले निरोगी व दीर्घायुषी असल्याचें नमूद करण्यांत आलें. गौफ बेटाचा अगदीं बरोबर नकाशा १९२२ सालीं तयार करण्यांत आला.

प्रा दे शि क स्थि ति, भूवर्णनः—उत्तरध्रुवाकडल्या स्थितीच्या अगदीं उलट स्थिति इकडे आहे, म्हणजे दक्षिण ध्रुवाकडील प्रदेश जलमय नसून भूमय आहे. हा प्रदेश उंच पठार, ग्रीनलंडपेक्षां विस्तृत व उंच आहे. आस्ट्रेलियाइतका विस्तृत हा प्रदेश असावा. एक मोठें भूखंड व एक द्वीपसमूह मिळून दक्षिणध्रुवप्रदेश बनला आहे व मध्यंतरीचा समुद्र सतत बर्फाच्छादित असल्यामुळें निरनिराळे भूभाग एकमेकाला जोडले गेले आहेत. निरनिराळ्या प्रदेशांचीं ग्रॅहॅमलॅंड, लुईफिलिपलॅंड, जॉइनव्हिली आयलंड, पामर आर्चिपेलागो ( द्वीपसमूह ), केसर विल्हेमलँड वगैरे नांवें आहेत.

हवामानः—या प्रदेशाचें पुष्कळ अवलोकन झालें आहे तरी उत्तरध्रुवप्रदेशाइतकी निश्चित हवामानविषयक माहिती ह्या दक्षिणध्रुवप्रदेशाची नाहीं. दक्षिणेकडील अगदीं वरवरच्या ७०°-८०° अक्षांशांकडील प्रदेशांतहि थंडी उत्तरेकडील त्याच अक्षांशांवरील प्रदेशाच्या मानानें वरीच कमी कडक असते; तसेंच उन्हाळ्यांतील उष्णमानहि उत्तरध्रुवप्रदेशाकडच्या मानानें फार कमी असतें. ६०° अक्षांशावरील साउथ ऑर्कनी बेटांतहि उन्हाळ्याच्या तीन महिन्यांत शून्याच्यावर पारा जात नाहीं. याच्या उलट ६०° उत्तर अक्षांशावरील शेटलंड बेटांत त्याच ऋतूंत ५४° उष्णमान असतें. सर्वांत कमी उष्णमान-६६.८° इतकें लेफ्ट वार्ननें आपल्या सफरीच्या वेळीं १९०३ सप्टेंबर १५ रोजीचें नमूद करून ठेविलें आहे. वादळामुळें एकदम उष्णमान वाढतें असा पुष्कळांचा अनुभव आहे. एरेबस नांवाचा पर्वत चढतांना उष्णमान समुद्रसपाटीला ०°, ५००० पासून ८६०० फूट उंचीपर्यंत-२४०°, १०६५० फूट उंचीवर -२८°, ११५०० फूट उंचीवर -२२° व शिखरावर थोडें कमी, याप्रमाणें आढळलें या प्रदेशांत हिंवाळ्यांत २४ तास सतत सूर्य क्षितिजावर आहे असे दिवस २४६ असतात असें ए. गि. मधील लेखक म्हणतो. तरी चांगला सूर्यप्रकाश फक्त १७२५ तासच असतो. या सूर्यप्रकाशाच्या दिवसांत फार उकडतें. मात्र थर्मामिटरमध्यें उष्णमान शून्याच्या खालीं असतें. ७८° अक्षांशावरील प्रदेशांत आकाश अगदीं निरभ्र असतें; पण ६६° अक्षांशावरील प्रदेशांत आकाश बहुतेक धुक्यानें इतकें व्याप्त असतें कीं, प्रवास करणें किंवा भोंवतालच्या परिस्थितीच्या माहितीकरितां अवलोकन करणें अशक्य असतें.

वनस्पती व प्राणीः—उन्हाळ्यांत देखील येथील उष्णमान शून्याच्या वर फार थोडकें असलें तरी कांहीं प्रदेशांत शेवाळ व इतर कांहीं वनस्पती ( फुंजी, आल्जी ) आढळतात. या प्रदेशांत कोणत्याहि प्रकारचें फुलझाड नाहीं. जलचर प्राणी मात्र अनेक प्रकारचे व विपुल पुष्कळ सफरींत उपलब्ध झाले आहेत. पुष्कळ प्रकारचे देवमासे व कांहीं प्रकारचे सील मासे आहेत. पशु मुळींच नाहींत. विनपंखाचे कीटक व गोड्या पाण्याच्या डबक्यांत फार बारीक जीव आढळतात [ 'उत्तरध्रुवप्रदेश' पहा ].

**दक्षिणा**—कर्माचें फळ प्राप्त होण्यासाठीं कर्त्यानें करावयाचें दान. दक्षिणा शब्दाचा उल्लेख ऋग्वेदापासून आढळतो. तैत्तिरीय संहितेंत याचा स्पष्टार्थरूपानें उपयोग केलेला आढळतो. यज्ञाच्या आरंभीं 'या यज्ञांत अमुक गाई दक्षिणेसाठीं दिल्या जातील' असा संकल्प केला जातो. निरनिराळ्या यागपरत्वें गाय, अलंकार, सुवर्ण, वस्त्र वगैरे दक्षिणेचे प्रकार तैत्तिरीय श्रुतींत दिले आहेत. सोमयागांतील दक्षिणा सुत्येच्या दिवशीं माध्यंदिनसवनांत दिली जाते. दर्शपूर्णमास, काम्येष्टि वगैरेंमध्यें मुख्य यागानंतर दक्षिणा दिली जाते. कांहीं यज्ञांत दक्षिणेसाठीं यजमानानें आपल्या अवयवांचें दान केल्याचाहि उल्लेख आहे. सूत्रकालीं यज्ञाचें निमंत्रण आलें असतां 'या यज्ञांत यजमान काय दक्षिणा देणार आहे' असें ऋत्विज विचारीत असत व हा प्रकार अद्याप रूढ आहे. स्मृति व पुराणकालांत होमहवनांच्या कार्यबाहुल्याप्रमाणें दक्षिणेचें प्रमाण ठरूं लागलें. ऋत्विजास कर्मांत विशेष श्रम व काल खर्चावा लागत असल्यास दक्षिणा जास्त द्यावी असें स्मृतिग्रंथांत सांगितलें आहे. दक्षिणा न दिल्यास कर्माची फलप्राप्ति होत नाहीं. सैपम

असतां दक्षिणेच्या बाबतींत कुचराई करतो तो अधम होय असें स्मृतिग्रंथांत वर्णिलें आहे.

द क्षि णा, श्रा व ण मा सा ची.—शिवाजी श्रावणमासीं कोटिलिंगार्चन करी व ब्राह्मणांस धान्य व नक्त दक्षिणा देत असे. समर्थ रामदासांनीं त्यास ही गोष्ट करण्यास सांगितलें होतें. एकमंत्री यास एक मण धान्य, याप्रमाणें दशग्रंथ्यास दहा मण धान्य व नक्त १० ते १०० रु. मिळत. ही परीक्षा पंडितराव करीत असत. यामुळें विद्येस पुष्कळ उत्तेजन मिळे. संभाजी व राजाराम यांच्या कारकीर्दींत ही रीत थोडीबहुत प्रचारांत होती. पुढें शाहूनें हें काम खंडेराव-दाभाडे सेनापति यानकडे सोंपविलें (१७१८). श्रावण-मासाचा धर्मादाय 'आपल्या तालुक्यापैकीं दोनचार लाख रुपये खर्चून, कोटिलिंगें ब्राह्मणांकडून करवीत जावीं' असा खंडेरावास शाहूचा हुकूम झाल्यानें श्रावणमासची दक्षिणा सेनापतींमार्फत होऊं लागली. त्रिंबकराव दाभाडे मेल्यावर (१७३१) ही दक्षिणा देण्याची कामगिरी पेशव्यांकडे आली आणि ती पेशवाई अखेरपर्यंत त्यांच्याचकडे राहिली.

पुण्यास प्रथम शनिवार वाड्यांत ही दक्षिणा मिळे. पुढें पर्वतीच्या पायथ्याशीं या कामासाठीं रमणा नांवाची जागा मुद्दाम तयार करण्यांत येऊन तेथें दक्षिणा देत असत. रमणा नानासाहेबांनीं बांधला. राज्य जसजसें वाढत चाललें तसतशी दक्षिणेची रक्कमहि वाढत चालली. सन १७३६ त १६३५४ रु. पर्यंत ही रक्कम गेली होती. त्यापुढें ती पुढीलप्रमाणें वाढत गेली. ४९०७३ (१७३७), १२३५३० (१७४९), ६२८३५३ (१७५२). पानिपत झाल्यानें त्याचा परिणाम लागलीच या दक्षिणेवरहि घडून आला, कारण १७६२ त ११८९८ रु. च दक्षिणा वांटली पण पुन्हां वाढत चालली ती, १३२०४३ (१७६५), ५०५१२८ (१७७६), २२५३'५४ (१७८९), २६४६४२(१७९७), ४४१०६६(१७९८) इतकी झाली. यावरून देशाची सांपत्तिक व सामाजिक परिस्थितीहि थोडीशी आढळून येईल. दक्षिणा घेण्यास कुंभकोण, तंजावर, रामेश्वर येथपासून काशी, कनोज, मथुरेपर्यंतचे विद्वान ५० ते ६० हजारांपर्यंत येत असत. यांत वैदिक, व्याकरणवेत्ते, ज्योतिषी, कवी, वैद्य, वगैरे लोकांचा भरणा असे. या लोकांची परीक्षा रामशास्त्री प्रभुणे, बाळशास्त्री, अय्याशास्त्री काशी-नाथशास्त्री हे घेत. सर्वांत जास्त दक्षिणेची रक्कम एक हजार रु. असे व कमींत कमी ३ रु. असत. शिवाय दक्षिणा वांट-ण्याचें खलास होईपर्यंत जितके दिवस लागत तितके दिवस जेवणाची सोय सरकार करी.

या रमण्यास चार दारें करून त्यांवर पेशवे, फडणीस, न्यायशास्त्री व पटवर्धन वगैरे सरदार असे बसत. पेशवे थोडा वेळ बसून आपल्या हातांनीं मोठमोठ्या रकमा देत व मग फडणीस (बहुधा नाना) वगैरे अधिकारी वांटीत. ब्राह्म-णास, त्यांच्या कपड्यावर गुलालाच्या पाण्याचा पंजा मारून मग रमण्यांत कोंडून नंतर निरनिराळ्या दारांनीं सोडीत व त्यावेळीं दक्षिणा मिळे. अशा वेळीं भाविक लोक (कधीं कधीं पेशवे देखील घोड्यावरून) रमण्याभोंवतीं प्रदक्षिणा घालीत. बंदोबस्तासाठीं कोतवाली (पोलीस) व लष्करी शिपाई व स्वार असत. रमण्याचें वर्णन खरेशास्त्र्यांच्या ९ व्या खंडांत आलें आहे तें वाचण्यासारखें आहे. सकाळपासून रात्रीं दहाबाजेपर्यंत दक्षिणा वांटण्याचें काम चाले.

रावबाजींच्या शेवटच्या कारकीर्दींत दक्षिणेची रक्कम ८ ते १० लाखांपर्यंत गेली होती; व त्यावेळीं विद्वानांप्रमाणें अवि-द्वानांसहि ती देण्यांत येई. पेशवाई गेल्यानंतर एक दोन वर्षे इंग्रजांनीं दक्षिणा थोडीबहुत चालू ठेविली होती. त्यानंतर तिचें रूपांतर झालें. एल्फिन्स्टननें दक्षिणेवर टीका करून ती अजीबात बंद न करतां, तिच्यामुळें विद्वानांचें पोषण होऊन विद्येला उत्तेजन मिळत असें हें कबूल करून, या पुढें तिला निराळें रूप देण्याचें ठरविलें. १८२१ त त्यानें एक दक्षिणा-संस्कृतपाठशाला नांवाची संस्था स्थापून तींत शिकणा-रांना शिष्यवृत्त्या ठरविल्या. त्या पाठशाळेंत मुख्यतः संस्कृत वाङ्मयास उत्तेजन देण्यांत आलें होतें. याच पाठशाळेचें रूपांतर पुढें हल्लींच्या डेक्कन कॉलेजांत झालें व पाठशाळेच्या उरलेल्या पैशांतूनच दक्षिणाफेलोशिप व दक्षिणाप्राईझफंड ह्या आजच्या दोन बाबी निघाल्या आहेत. [पेशव्यांच्या डायऱ्या; सप्तप्रकरणात्मक बखर;, शाहूमहाराजांचें चरित्र; पेशव्यांची बखर; खरे शास्त्री यांचे खंड; इ.]

दक्षिणायन—कर्क संक्रांतीपासून मकर संक्रांतीपर्यंतचा काळ. कर्कराशीपासून दक्षिणेकडे सूर्याचें जाणें याला दाक्षि-णायनमार्ग अथवा धूमादिमार्ग असेंहि नांव आहे. दक्षि-णायनमार्ग हा पितृलोकास नेणारा आहे, तो अर्चिरादि-मार्गाच्या उलट आहे. दक्षिणायनांत देव निजलेले असतात, मार्गांत सर्वत्र अंधार असतो. त्यामुळेंच भीष्माचार्यांनें दक्षिणायनांत प्राण न सोडतां उत्तरायण लागल्यावर प्राण सोडला अशी कथा आहे. धूर, रात्र, कृष्णपक्ष, दक्षिणाय-नाचे सहा महिने यांत मेलेला योगी चंद्रलोकास जाऊन पुण्यांश सरल्यावर परत येतो असें गीता म्हणते (गीता ८. २५). या दोन गतींस देवयान (शुक्ल) व पितृयाण (कृष्ण) किंवा वर म्हटल्याप्रमाणें अर्चिरादि व धूम्रादिमार्ग अशीं नांवें उपनिषदें व ऋग्वेदांतहि आलीं आहेत. उत्तरायण हा देहपात करण्यास योग्य काल होय असें भारतकालीं मानीत असत. या दोन मार्गांच्या अनुषंगानें लो. टिळकांनीं उत्तरध्रुवप्रदेशीं आर्यांची मूळ वसति होती असें (इतर अनेक प्रमाणांच्या साहाय्यानें) ठरविलें आहे. [गीतारहस्य, आवृत्ति चवथी पृ. २९२–२९५; शिवाय 'अयन' पहा.]

दक्षिणायनाच्या प्रारंभीं कर्कसंक्रांतीस मकरसंक्रांतीप्रमाणेंच पर्व समजून स्नान, दान, अयन श्राद्ध करण्याचें धर्मग्रंथांत सांगितलें आहे व त्याप्रमाणें आचरण्याची रूढी आहे.

दाऊदखानपन्नी—खिझिरखान पन्नी या पठाण शिपा-याचा हा मुलगा. याच्या अंगच्या धैर्यादि गुणामुळें याच्य।

समकालीन योद्ध्यांत हा प्रमुख गणला जात असे. अद्यापिहि दक्षिणेंत याच्या पराक्रमाविषयीं अद्भुत कथा आणि गोष्टी ऐकण्यांत येतात. औरंगझेबाच्या पदरीं यानें बरींच वर्षे नोकरी केली होती. दक्षिणेंतून परत फिरतेवेळीं बहादुरशहानें, दाऊदखान याजकडे दख्खनप्रांताची दिवाणी व वसुली सोंपवून दिली होती ( १७०८—१३ ). फरुखसियर बादशहाच्या कारकीर्दींत, दख्खनचा सुभेदार हुसेनअल्ली यास वाटेंतच आडवून ठार मारावा असा गुप्त संदेश बादशहानें दाऊदखानाबरोबर पाठविला. या संदेशान्वयें हुसेन अली दिल्लीहून बऱ्हाणपुरास आला असतां त्यास दाऊदनें तोंड दिलें. दोन्ही पक्षांमध्यें लालबागेंत तुंबळ युद्ध सुरू असतां दाऊदखानास बंदुकीची गोळी लागून तो आपल्या अंबारींत मरून पडला ( सप्टेंबर १७१५ ).

दाऊद हा बऱ्हाणपुरास सुभा असतांनां मराठे हे शाहूच्या नांवानें मोंगलाई मुलुखांत सर्वत्र धुमाकूळ घालीत असतां त्यांनां दाऊदनें आपण होऊन चौथाई देण्याचें कबूल केलें. कारण तो मराठ्यांस चांगला ओळखत होता व त्यांच्यापुढें आपलें कांहीं चालणार नाहीं हें त्याला ठाऊक होतें. तो मराठ्यांचा बराच पक्षपाती होता. त्याच्याच मध्यस्थीनें दख्खनमधील सहा सुभ्यांवर चौथाई वसूल करण्याची परवानगी शाहूस मिळाली. बऱ्हाणपुरास त्याला गुजराथच्या सुभेदारीवर नेमिलें होतें. [ आर्विन; मनूची; बील; डफ. ]

**दाऊद्नगर**—बिहार-ओरिसामधील गया जिल्ह्याच्या औरंगाबाद पोटविभागांतील एक गांव. शोण नदीच्या उजव्या तीरावर हें आहे. लोकसंख्या (१९११) ९१४०. औरंगझेबाचा रिसालदार दाऊदखान यानें हें वसविलें असें म्हणतात. येथें त्यानें बांधलेली एक सराई आहे. तिच्या भोंवती पाण्याचा खंदक आहे. एकेकाळीं येथें फार मोठा व्यापार चालत असे. तसर कापड येथें खूप तयार करीत असत. येथें साखर करण्याचा कारखाना आहे.

**दाऊल मलक**—वऱ्हाडांत एलिचपूर तालुक्यांत उपराई गांवीं हा मुसुलमान झाला. त्यास आज मितीस बरींच वर्षे होऊन गेलीं. हा नवसास पावतो. नवसाचे प्रकार दोन आहेत. पहिल्या प्रकाराला 'बैठींकंदुरी' व दुसऱ्या प्रकाराला 'फिरतींकंदुरी' असें म्हणतात. 'बैठींकंदुरी' म्हणजे ज्ञातिभोजन आणि 'फिरतींकंदुरी' म्हणजे आपल्याबरोबर स्वजातीय, स्वगोत्री जे येतील त्या मंडळीसह थोडे दिवस गांवांत व नंतर इतर गांवीं जाऊन भिक्षा मागून जें थोडें फार मिळेल त्यापैकीं रोजच्या भोजनास खर्च करून, जें शिल्लक राहील तें शेवटीं भंडारा म्हणून खर्चणें. धनगर, तिळोले, धनोजे कुणबी, तेली, भोई, महार, मांग वगैरे लोक हे नवस करतात.

नवस फेडण्यापूर्वी यजमानाच्या व त्याच्या बरोबरच्या ज्ञातिबांधवांच्या गळ्यांत व उजव्या हातांत प्रथम भुजावर एक एक दोरा बांधितो. त्यास नाडा म्हणतात. यजमानाच्या डोक्यास भगवा कपडा व त्याच्या स्त्रीच्या अंगांत भगवी चोळी घालितात. इतर अनुयायी मंडळींतील प्रत्येक इसमाजवळ भगव्या कपड्याची झोळी, वाळलेल्या दुध्या भोपळ्याचें अर्धें शकल ( यास पतर म्हणतात ), एक लहानशी काठी व लांकडी फावडें हीं असतात. काजीस दक्षणा मिळते. याप्रमाणें दीक्षा घेतल्यावर हा कुळाचार करण्यास मोकळीक होते. कोणत्याहि महिन्यांत फुरसत असेल, त्या दिवशीं (विशेषतः पंचमी, गुरुवार, शुक्रवार, अगर रविवार या दिवशीं) सर्व जमून भिक्षा मागण्यास निघतात. आप्त, सोयरे, इष्ट-मित्र, या सर्व मंडळींसह भिक्षा मागण्यास सुरुवात झाली, म्हणजे हा कुळाचार संपेपर्यंत घरीं न राहतां बाहेरच दिवस काढावे लागतात. भिक्षा मागतांना हे दाऊल "दाऊल" असा उच्चार करतात. मग मुसुलमान काजीच्या हातचें अन्न प्रसाद म्हणून खातात. यावेळीं जातीचा प्रश्न निघत नाहीं. असा क्रम सरासरी एक दिवसापासून एक महिनाभर चालतो.

ही भिक्षा घेतल्यावर दाऊल मलक साधु या मंडळींच्या स्वप्नांत जाऊन सांगतो कीं, अमक्या गृहस्थाच्या घरीं अमुक रंगाचा बकरा किंवा कोंबडा आहे, तो घ्या; त्याप्रमाणें मग तो कोंबडा अगर बकरा विकत घेतात. मग त्याची कंदुरी करून काजीसह भोजन करतात; म्हणजे यात्रा अगर कुळाचार संपला. मग दुसऱ्या दिवशीं गोड ( शुद्धि ) भोजन करतात म्हणजे जातींतील सर्व लोक ( कंदुरीस आलेले व न आलेले ) मिळून एकत्र भोजन करून मग आपल्या घरीं निघून जातात. अशा प्रकारें ही यात्रा अगर कुळाचार दोन, चार, पांच, सात वर्षांनीं करतात.

उपराईसारखें दुसरें असलेंच ठिकाण हिंगणघाट तालुक्यांतील गिरड गांवीं आहे. तें पहाडावर आहे. येथील उरूस शिवरात्रीच्या अगोदर भरतो. एखादा कुणबी काजीच्या घरीं इतरवेळीं जेवला तर तो जातिभ्रष्ट होतो; पण या कुळाचारांत खुशाल भोजन करून मग गोड ( शुद्धि ) भोजन करून तो जातींत राहूं शकतो. हा कुळाचार वऱ्हाड, नागपूर या प्रांतांत व औरंगाबादेपर्यंत चालू आहे. [ विविधज्ञानविस्तार, पुस्तक ४५, अंक १ ला. ]

**दांगट**—महाराष्ट्रांतील एक जात. ही बहुतेक नामशेष होत चालल्यानें हिच्याविषयीं फारशी कोणाला माहिती नाहीं. सिंघण राजाच्या वेळीं ( सुमारें १३ वें शतक ), हल्लीं सिंगणापुर गांव ज्या ठिकाणीं आहे तेथें दाट झाडी असे व त्यावेळीं या जंगलांत दांगट लोकांची वस्ती असे. सिंगणापूरजवळच्या शंभुमहादेवाच्या दर्शनास येणाऱ्या यात्रेकरूंस या जंगलांतून सुरक्षित नेण्याचें काम हे लोक करीत असें म्हणतात. या जातींत जाधव, भोंसले या सारखीं आडनांवें आहेत. कांहीं ठिकाणीं दांगटांनां अस्पृश्य मानलें जातें. सध्यां या लोकांचा मुख्य धंदा लावण्या, पोवाडे

म्हणण्याचा आहे. पुष्कळसे मोलमजुरी करून रहातात. पुण्याजवळच्या हडपसर गांवीं दागटांची कांहीं वस्ती आहे.

**दाजल**—पंजाबमधील डेरा गाझीखान जिल्ह्याच्या जामपूर तहशिलींतील एक गांव. डेरागाझीखानच्या दक्षिणेस ४८ मैल आहे. लोकसंख्या (१९११) ६८९३. नाहरांच्या कारकीर्दीत ह्या गांवाचा पहिल्यानें बोज वाढला.त्यांजपासून जवरीनें तें गाझीखाननें घेतलें व तदनंतर तें कलातच्या खानांच्या हातीं गेलें चाचरच्या रस्त्यानें दाजलहून बराच व्यापार चालत असे पण. तो आतां संपुष्टांत आला आहे. अजूनहि येथून तेल बाहेरगांवीं पाठवितात. जवळचें खेडें व हा गांव मिळून एक म्युनिसिपालिटी आहे.

**दाटी, लोकवस्तीची**—पृथ्वीचे निरनिराळे भूप्रदेश व तेथील लोकवस्ती यांचें मोजमाप करण्याचे पुष्कळ प्रयत्न झालेले आहेत. त्यांपैकीं विशेष महत्त्वाचा प्रयत्न १८८२ सालीं बोहम व एच्. वॅगनर यांनीं केलेला होय. त्यानंतर पी. एफ्.लेन्हॅसूर व एल्. बोडिओ यांनीं मोठ्या परिश्रमानें यूरोप व अमेरिका या दोन खंडांची संपूर्ण माहिती प्रसिद्ध केली; आणि इतर खंडांबद्दलची माहिती स्टेट्स्मन इयरबुकांत सालोसाल अधिक परिपूर्ण देण्याचा प्रयत्न चालू आहे. त्यासंबंधाचें कोष्टकः—

पृथ्वीवरील भूप्रदेश व लोकवस्ती.

| खंड | क्षेत्रफळ चौ. मै. १९०७ आंकडे हजाराचें | लोकसंख्या ( आंकडे हजाराचे ) | | चौ. मैलास लोकसंख्या १९०७ | अनिश्चित स्थितीचें प्रमाण | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | १८८२ | १९०७ | | क्षेत्रफळ | लोकसंख्या |
| यूरोप | ३८२८ | ३२७७४३ | ४०५७५९ | १०६ | २.५ | १.३ |
| आशिया | १५७७३ | ७९५५९१ | ९१८३२४ | ५८ | ४३.२ | ५९.४ |
| आफ्रिका | ११५०७ | २०५८२३ | १२६७३४ | ११ | ९०.१ | ७७.४ |
| अमेरिका | १७२०८ | १००४१५ | १४९९४४ | .९ | ५०.० | ९.१ |
| ओशियानिया | ३४४८ | ४२३२ | ५८८१ | १.७ | ५.४ | १९.६ |
| एकूण | ५१७६४ | १४३३८०४ | १६०६५४२ | ३१.७ | ५०.४ | ४१.४ |

१९०७ सालींहि ही माहिती परिपूर्ण मिळाली नव्हती असे भूप्रदेश तुर्की साम्राज्य, इराण, अफगाणिस्तान, चीन, इंडो-चायना द्वीपकल्प आणि आफ्रिकेचा कांहीं भाग हे होत. मध्य, दक्षिण व ध्रुवप्रदेशीय अमेरिकेबद्दलहि पूर्ण माहिती नाहीं. मुळींच वस्ती नाहीं असा पृथ्वीचा थोडा भाग आहे, आणि वस्तीला कायमचा अयोग्य असा भाग तर अगदींच थोडा आहे. वस्ती होणें अशक्य असे वाटणारे भाग म्हणजे वाळूचीं मैदानें व उत्तर-दक्षिणध्रुवप्रदेश हे होत. पैकीं वालुकामय प्रदेश कालवे काढून वसाहतीला योग्य करतां येण्यासारखे असल्यामुळे फक्त दक्षिणोत्तरध्रुवप्रदेश मात्र कायमचा निर्जन राहणार असें म्हणावें लागतें. भूपृष्ठावरील हवापाण्याच्या विलक्षण भिन्नतेमुळें लोकवस्तीच्या दाटीपातळीचें प्रमाणहि फार निरनिराळें आहे. सर्वसाधारण नियम असा आहे कीं, अन्नपाण्याच्या पुरवठ्याच्या प्रमाणांत लोकवस्ती कमजास्त असते. उलटपक्षीं कोणत्याहि प्रदेशांतील अन्नपाण्याचा पुरवठा तेथील लोकांच्या गुणावगुणावर अवलंबून असतो. अगदीं रानटी जातींपैकींहि अगदीं थोड्या जाती सर्वस्वी निसर्गदत्त अन्नपाण्यावर राहणाऱ्या असतात; स्वकष्टानें शेतीभाती करणाऱ्याच बहुतेक असतात; मानवजात आपल्या बुद्धिमत्तेचा व उद्योगशीलतेचा जसजसा अधिक उपयोग करूं लागली तसतसा अन्नपाण्याचा पुरवठा वाढूं लागला; त्याबरोबर लोकसंख्या वाढूं लागली व वाढत्या लोकसंख्येमुळें उदरनिर्वाहाचीं साधनें वाढूं लागलीं. अशा रीतीनें पूर्वगोलार्धांत जेथें जेथें उच्च संस्कृतीचे लोक आहेत तेथें तेथें लोकवस्ती दाट आहे. असा प्रदेश पूर्वेकडे २५ ते ४० उत्तर अक्षांशांच्या दरम्यान आहे. या ठिकाणीं दाट लोकवस्तीचे म्हणजे दर चौरस मैलीं ५०० हून जास्त वस्तीचे देश एक तर चीन व उत्तर हिंदुस्थान यांच्याप्रमाणें स्वतः पिकविलेल्या धान्यावर उपजीविका करणारे आहेत, नाहींतर पश्चिम यूरोपांतील इंग्लंडादि देशांप्रमाणें मोठाल्या कारखान्यांत तयार केलेल्या व्यापारी जिनसा परदेशीं पाठवून त्यांच्या मोबदला परदेशांतून आलेल्या धान्यावर उदरनिर्वाह करणारे आहेत. शेतकीप्रधान देशांत दाट लोकवस्ती खेड्यापाड्यांतून असते, आणि कारखानेप्रधान देशांत दाट-वस्ती शहरांत असते, हा दोहोंमध्यें मोठा फरक आहे. नवें जग उर्फ अमेरिकाखंड हें बहुतेक नैर्ऋत्य यूरोपांतील लोकांनीं व्यापलें जात आहे. पण नव्या जगांत अद्याप जुन्या जगांतील सर्वांत कमी दाटीच्या देशांतल्या इतकीहि दाटी झाली नाहीं. आस्ट्रेलिया व उत्तर अमेरिका यांच्या पूर्व किनाऱ्यावर मात्र हल्लीं लोकवस्ती बरीच दाट झाली आहे.

ग्रेटब्रिटन व आयर्लंडमध्यें जितकी दाट वस्ती आहे ( दर चौरस मैलास ३५९.६५) तितकी जर पृथ्वीवरील सर्व देशांत ( दक्षिणोत्तरध्रुवप्रदेश व वालुकामैदानें वगळून ) झाली तर सर्व लोकसंख्या २८,२१,६४,३०००० होईल. अन्नोत्पादनाचीं हल्लींचीं साधनेंच हिशोबांत घेतलीं तरी एकंदर पृथ्वीवर

दर चौरस मैलीं २७० इतकी लोकवस्ती पोसण्यास समर्थ आहेत, असें रॅव्हेन्स्टीननें गणित केलें आहे.

लोकवस्तीची दाटी आणि दाटीची राहणी या दोन गोष्टी निरनिराळ्या आहेत. दाटीची राहणी म्हणजे मोठाल्या चाळींतील लहान खोल्यांतून प्रत्येकीं दहादहा वीसवीस मजूरदार माणसें राहणें. अशी स्थिति मुंबई वगैरे मोठाल्या शहरांतील गिरणीमजूरांच्या चाळींत फार आढळते. न्यूयॉर्क शहरांत हा दाटीचा प्रश्न जगांतील सर्व शहरांहून महत्त्वाचा झाला आहे. युनायटेडस्टेट्समधील शिकागो शहरीं दाटीची राहणी नाहीं; तथापि कांहीं ठिकाणीं एकरीं ९०० इतकी दाट लोकवस्ती आहे. न्यूयॉर्क शहराच्या कांहीं भागांत जितकी दाट वस्ती आहे तितकी जर सर्व शहरभर होईल तर त्या एकाच शहरांत सर्व युनायटेडस्टेट्स व बहुतेक कानडा देशांतल्या इतकी लोकसंख्या मावेल.

इंग्लंडमध्यें एका खोलींत दोन माणसें असें वस्तीचें सरकारी प्रमाण आहे.पण या प्रमाणानें पाहतां इंग्लंडांतील लोकसंख्येचा शेकडा ८.२ इतका भाग दाटवस्तीचा ठरतो. जर्मनींत दर खोलीस ३.०३ माणसें अशी सरासरी पडते, म्हणजे सर्व प्रदेश दाटवस्तीचा आहे.

हिं दु स्था न.—लोकवस्तीची दाटी होण्याचीं कारणें हिंदुस्थानांत आणि यूरोपांत भिन्न आहेत. जेथें खायला जास्त मिळतें तेथें दाटी असायची हा नियम दोहोंकडेच आहे. तथापि फरक एवढाच आहे कीं लोकांचें उपजीवन चालण्यास जीं कारणें यूरोपांत आहेत तींच इकडे आहेत काय हें पाहतां असें दिसून येतें कीं यूरोपमध्यें लोकवस्तीच्या दाटीचें कारण व्यापार आणि कारखाने यांची वृद्धि होय. केवळ शेतकीवर दर चौ. मैलास २००हून पेक्षां दाटी क्वचितच आहे. जर्मनीमध्यें लोकवस्तीविषयीं लिहितांना दुरुमिअर म्हणतो कीं निवळ शेतकीवर दर चौ. मैलास २५० पेक्षां जास्त माणसें पोसणें हें शक्य नाहीं. हें त्याचें म्हणणें सर्व यूरोपाविषयीं खरें दिसतें. हिंदुस्थानाविषयीं खरें नाहीं. हिंदुस्थानांत निवळ शेतकीवर पोषण होणाऱ्या प्रदेशांत या अंकाचेंहि दुप्पट, तिप्पट किंवा चौप्पट लोकवस्ती दर चौरस मैलीं आढळते. हिंदुस्थानांत बऱ्याचशा भागांत २०० पेक्षां वस्ती कमी आहे आणि असा प्रदेश म्हटला म्हणजे कोंकणपट्टी, कारोमांडेल किनारा, बंगाल, गंगथडी आणि पंजाबचा ईशान्येकडील भाग हा सोडून दिला असतां हिंदुस्थानची दाटी दर चौरसमैलीं १७५ देखील नाहीं. काश्मीरमध्यें दर चौ. मैलास ४० पेक्षां कमी आहे. तशीच बलुचिस्तानांतहि कमी आहे. पंजाब, सिंध व राजपुताना यांच्या मध्यें दर चौरस मैलास ७२ पासून ८० पर्यंत आहे. बाकी सर्व मोठया प्रदेशांत म्हणजे गुजराथ, निजामचें राज्य म्हैसूर, दक्षिण आणि वऱ्हाड मध्यप्रांत, मध्यहिंदुस्थानचा बराच भाग या सर्व भागांत दर चौ. मैलीं ११५ पासून १६९ पर्यंत दाटी आहे. आपणांकडे दाटीचीं मुख्य कारणें म्हणजे पाण्याचा पुरवठा होय. परंतु पाणी सपाटून असलें म्हणजे लोकवस्ती सपाटून असतेच असें नाहीं. उदाहरणार्थ, ब्रह्मदेशांतील दक्षिण भागांत पाऊस पुष्कळ पडत असून तेथें लोकवस्ती दर चौ. मैलीं फक्त ८० आहे. पाण्याचा पुरवठा जर स्वाभाविक कारणांऐवजीं कृत्रिम कारणांनीं होत असेल तर त्याचा परिणाम लोकांची दाटी वाढविण्याकडे होतो. पंजाब व राजपुताना वगैरे जे भाग सांगितले तेथें पाऊस पडत नाहीं परंतु लोकांचें वास्तव्य तेथें अतिशय खर्चाच्या पाणी पुरविण्याच्या पद्धतीनें केलेलें आहे. मद्रास इलाख्यांत पूर्व आणि दक्षिण भागांत पाऊस फक्त ७२ इंच आहे आणि पूर्वकिनाऱ्यावर ११० इंच आहे. तरी दोन्ही ठिकाणीं लोकवस्तीचें प्रमाण सारखें आहे. कां कीं पाऊस कमी त्या ठिकाणीं कृत्रिम पाण्याचा पुरवठा फार चांगला आहे. गयेच्या परिकरांतील भाग वालुकामय व अनुत्पादक होता तो कालव्यांच्या सहाय्यानें जास्त सुपीक झाला आहे. जमीनीचा स्वाभाविक सुपीकपणा हें लोकवस्तीच्या दाटीचें फारच लहान कारण होय. गंगथडीची व सिंधुथडीची जमीन सुपीकतेच्या दृष्टीनें जवळ जवळ सारखीच आहे. परंतु गंगथडींत वस्ती फार मोठी आहे परंतु सिंधुथडींत फार कमी आहे. सुपीकतेचें महत्त्व नाहींच असें नाहीं. परंतु पाण्याचा पुरवठा व भूपृष्ठस्वरूप यांच्यामुळें त्याची फारशी मातब्बरी नाहीं. दाटीचा कोणत्या तरी पिकाशीं प्रत्यक्ष संबंध जोडतां येत नाहीं. भूपृष्ठस्वरूपाप्रमाणें लोकवस्तीचें प्रमाण बदलतें तें येणेंप्रमाणें. सपाट प्रदेश व उंचसखल प्रदेश यांमुळें लोकवस्तींत कसा बदल पडतो हें पाहूं. सपाट जमिनीवर वस्ती जास्त असते व तेथें प्रत्येक चौ. इंच जमीन देखील वापरतां येण्याजोगी असते असा प्रदेश गंगथडी व बंगाल होय. त्याच्या खालोखाल वस्ती म्हटली म्हणजे पूर्वपश्चिम किनाऱ्यावर होय. संयुक्तप्रांताचा पश्चिम भाग आणि पंजाबचा ईशान्य भाग हा त्याच्या खालोखाल आहे आणि तेथें पाऊसपाणी जरी कमी आणि अनियमित आहे तरी त्याची उणीव कालव्यांनीं भरून काढली आहे. किनाऱ्यावरील ओरिसांतील जिल्हे व मद्रास इलाख्याच्या उत्तरेकडील जिल्हे यांत पाऊस जरी ५० इंच पडतो तरी तेथील लोकवस्तीचें प्रमाण कमी आहे कारण याचा पश्चिम भाग डोंगराळ असून समुद्राकडील भाग दलदलीचा आणि क्षारमिश्रित आहे; व दोहोंच्यामध्यें जो भाग आहे तेथें लोकवस्तीचें प्रमाण फारच मोठें आहे. तें जवळ जवळ गंगथडीच्या प्रमाणाइतकें येईल. आसाममध्यें टेंकडया व जंगलें आहेत आणि ब्रह्मपुत्रा नदीच्या परिकरांत पाळवंटें आहेत आणि त्यांमुळें तेथें लोकवस्तिदाटी फारशी नाहीं. लोकवस्तीच्या वृद्धिक्षयास किंवा अल्पतावहुलतेस दुसरें कारण म्हटलें म्हणजे हवा होय. आसाममध्यें आणखी एक कारण महत्त्वाचें आहे कीं, तेथें मलेरिया फार असतो पंजाबच्या ईशान्येस आणि संयुक्त प्रांताच्या पश्चिमेस जो भाग आहे तेथें लोकवस्तीची वाढ

अंर्लीकडे खुंटल्यासारखी झाली आहे याचें कारण जर्मानीची लोकांस पोसण्याची शक्ति खुंटली नसून, मलेरिया व प्लेग यामुळें होणारी मृत्युसंख्या फार झाली आहे हें होय. कांहीं ठिकाणीं लोकवस्तीचें अल्पत्व होण्याचीं कारणें राजकीय व ऐतिहासिक आहेत. ब्रह्मदेशचा उत्तर भाग चांगला सुपीक आहे परंतु तेथील राज्यव्यवस्था नीट नसल्यामुळें लोकवस्ती वाढली नाहीं. तेंच कारण आसामचें आहे.

शहरांतील दाटी.–शहरांतील लोकवस्तीचीं कोष्टकें पहातां त्यांत सांपत्तिक स्थितीसंबंधानें आणि स्थानिक सरकारांच्या प्रयत्नासंबंधानें कांहीं महत्त्वाच्या गोष्टी दिसून येतात.

## प्रसिद्ध शहरांची लोकसंख्या.

| शहर | लोकसंख्या १९११ | चौ. मैली संख्या | लोकसंख्या १९२१ | चौ. मैली संख्या | बाळांची दरमैली संख्या | फरक शें. १९११-२१ |
|---|---|---|---|---|---|---|
| कलकत्ता | १०४३३०७ | २४८४१ | १३२७५४७ | २१४१२ | ६२९ | +४.३ |
| व हावरा | १७९००६ | २०९८५ | | | | |
| मुंबई | ९७९४४५ | ४२५८५० | ११७५९१४ | ४८९९६ | ८४० | +२०.१ |
| मद्रास | ५१८६६० | १९२१० | ५२६९११ | १८१६९ | ३३५ | +१.६ |
| हैद्राबाद | ५००६२३ | १००१२ | ४०४१८७ | ७९२५ | २७५ | –१९.४ |
| रंगून | २९३३१६ | १०४७६ | ३४१९६२ | ४५०० | ६७७ | +१६ ६ |
| दिल्ली | २३२८३७ | १५२४८ | ३०४४२० | ४६८३ | ४५० | +३०.७ |
| लाहोर | २२८६८७ | ७८१६ | २८१७८१ | ६७१५ | ४४० | +२३.२ |
| अहमदाबाद | २१६७७७ | २१६७८ | २७४००७ | २४९०९ | ३९७ | +१७.७ |
| लखनौ | २५९७९८ | ११४८४ | २४०५६६ | ११५० | २२९ | –४.६ |
| बंगलोर | १००८३४ | ७४४७ | २३७८९६ | २०९३१ | ३४० | +२५.३ |
| कराची | १५११९०३ | २१३९ | २१६८८३ | १९७१६ | ६०५ | +४२.८ |
| कानपूर | १७८५५७ | १८२६० | २१६४३६ | २२६२० | ४२५ | +२१.२ |
| पुणें | १५८८५६ | १२२२० | २१४७९६ | ५३६९ | ३७३ | +१३.८ |
| काशी | २०३८०४ | २०३१४ | १९८४४७ | ११९३० | १४० | –२.६ |
| आग्रा | १८५४४९ | ११००२ | १८५५३२ | ११००० | ११९ | ... |
| अमृतसर | १५२७५६ | १५२७६ | १६०२१८ | १६५२४ | १८१ | +४.९ |
| अलाहाबाद | १७१६९७ | ११२४६ | १५७२२० | १०२५० | २६६ | –८.४ |
| मंडाले | १३८२९९ | ५५३२ | १४८११७ | ५११७ | २०९ | +७.७ |
| नागपूर | १०१४१५ | ५०७१ | १४५१९२ | ७२५९ | २५८ | +४३.२ |
| श्रीनगर | १२६३४४ | १५७३५ | १४१७३५ | १५६५३ | २१ | +८.९ |
| मदुरा | १३४१३० | १९१६१ | १३८८९४ | १७१०५ | १७८ | +२.८ |
| बरेली | १२९४६२ | १६५५२ | १२९४५९ | १६८०० | १२८ | ... |
| मीरत | ११६२२७ | २६३२७ | १२२६०९ | १५५४२ | २१० | +५.१ |
| त्रिचनापल्ली | १२३५१२ | १५४३९ | १२०४२२ | १३६२२ | १७६ | –२.५ |
| जयपूर | १३७०९८ | ४५६९९ | १२०२०७ | ४००६९ | ६३ | –१२.३ |
| पाटना | १३६१५३ | १५१२८ | ११९९७६ | ७९९८ | १६० | –११.९ |
| सोलापूर | ... | ... | ११९५८१ | १७०८३ | ३११ | +१४.९ |
| डाक्का | १०८५५१ | १५११७ | ११९४५० | १७५६६ | १४० | +१०.० |
| सुरत | ११४८६८ | ३८२८९ | ११७४३४ | ३९१४४ | १८३ | +२.२ |
| अजमीर | ... | ... | ११३५१२ | ६६७७ | ५३७ | +३१.७ |
| जबलपूर | १००६५१ | ६७१० | १०८७९३ | ७२५२ | ३६६ | +८.१ |
| पेशावर | ... | ... | १०४४५२ | ३४८१७ | ३४९ | +६.७ |
| रावळपिंडी | ... | ... | १०११४३ | ११८०२ | ५३२ | +१७.० |

पहिली महत्त्वाची गोष्ट ही की, शहरांत दाटी होण्याचें एक महत्त्वाचें कारण जें शहराच्या वस्तीची झपाट्यानें वाढ तिचा परिणाम विशेषेकरून कांहीं शहरांत दिसून येत आहे. सोलापूरची लोकवस्ती सर्वांत झपाट्यानें वाढली, त्याच्या खालोखाल नागपूर व कराची यांची वाढ होय; व त्याच्या नंतर अजमीर व दिल्ली हीं येतात. या शहरांत दाटी लोकांस फारच भासत असावी.

इ. स. १९११ च्या खानेसुमारीच्या वेळीं जयपूर हें सर्वांत दाटीचें शहर होतें, आतां मुंबईनें जयपूरला मागें टाकलें. आतां सर्वांत दाटीचें शहर म्हणजे मुंबई होय.

दर चौरस मैलीं २७० इतकी लोकवस्ती पोसण्यास समर्थ आहेत, असें रॅव्हेन्स्टीननें गणित केलें आहे.

लोकवस्तीची दाटी आणि दाटीची राहणी या दोन गोष्टी निरनिराळ्या आहेत. दाटीची राहणी म्हणजे मोठाल्या चाळींतील लहान खोल्यांतून प्रत्येकीं दहादहा वीसवीस मजूरदार माणसें राहणें. अशी स्थिति मुंबई वगैरे मोठाल्या शहरांतील गिरणीमजूरांच्या चाळींत फार आढळते. न्यूयॉर्क शहरांत ह्या दाटीचा प्रश्न जगांतील सर्व शहरांहून महत्त्वाचा झाला आहे. युनायटेडस्टेट्समधील शिकागो शहरीं दाटीची राहणी नाहीं; तथापि कांहीं ठिकाणीं एकरीं ९०० इतकी दाट लोकवस्ती आहे. न्यूयॉर्क शहराच्या कांहीं भागांत जितकी दाट वस्ती आहे तितकी जर सर्व शहरभर होईल तर त्या एकाच शहरांत सर्व युनायटेडस्टेट्स व बहुतेक कानडा देशांतल्या इतकी लोकसंख्या मावेल.

इंग्लंडमध्यें एका खोलींत दोन माणसें असें वस्तीचें सरकारी प्रमाण आहे.पण या प्रमाणानें पाहतां इंग्लंडांतील लोकसंख्येचा शेकडा ८.२ इतका भाग दाटवस्तीचा ठरतो. जर्मनींत दर खोलीस ३.०३ माणसें अशी सरासरी पडते, म्हणजे सर्व प्रदेश दाटवस्तीचा आहे.

हिंदुस्थान.—लोकवस्तीची दाटी होण्याचीं कारणें हिंदुस्थानांत आणि यूरोपांत भिन्न आहेत. जेथें खायला जास्त मिळतें तेथें दाटी असायची हा नियम चोहोंकडेच आहे. तथापि फरक एवढाच आहे कीं लोकांचें उपजीवन चालण्यास जीं कारणें यूरोपांत आहेत तींच इकडे आहेत काय हें पाहतां असें दिसून येतें कीं यूरोपमध्यें लोकवस्तीच्या दाटीचें कारण व्यापार आणि कारखाने यांची वृद्धि होय. केवळ शेतकीवर दर चौ. मैलास २०० शें पेक्षां दाटी क्वचितच आहे. जर्मनीमध्यें लोकवस्तीविषयीं लिहितांना टुरुमिअर म्हणतो कीं निवळ शेतकीवर दर चौ. मैलास २५० पेक्षां जास्त माणसें पोसणें हें शक्य नाहीं. हें त्याचें म्हणणें सर्व यूरोपाविषयीं खरें दिसतें. हिंदुस्थानाविषयीं खरें नाहीं. हिंदुस्थानांत निवळ शेतकीवर पोषण होणाऱ्या प्रदेशांत या अंकाचेंशेंच्या दुप्पट, तिप्पट किंवा चौप्पट लोकवस्ती दर चौरस मैलीं आढळते. हिंदुस्थानांत बऱ्याचशा भागांत २०० पेक्षां वस्ती कमी आहे आणि असा प्रदेश म्हटला म्हणजे कोंकणपट्टी, कारोमांडेल किनारा, बंगाल, गंगथडी आणि पंजाबचा ईशान्येकडील भाग हा सोडून दिला असतां हिंदुस्थानची दाटी दर चौरस मैलीं १७५ देखील नाहीं. काश्मीरमध्यें दर चौ. मैलास ४० पेक्षां कमी आहे. तशीच बलुचिस्तानांतहि कमी आहे. पंजाब, सिंध व राजपुताना यांच्यामध्यें दर चौरस मैलास ७२ पासून ८० पर्यंत आहे. बाकी सर्व मोठ्या प्रदेशांत म्हणजे गुजराथ, निजामचें राज्य म्हैसूर, दक्षिण आणि वऱ्हाड मध्यप्रांत, मध्यहिंदुस्थानचा बराच भाग या सर्व भागांत दर चौ. मैलीं १५५ पासून १६९पर्यंत दाटी आहे. आपणांकडे दाटीचीं मुख्य कारणें म्हणजे पाण्याचा पुरवठा होय. परंतु पाणी सपाटून असलें म्हणजे लोकवस्ती सपाटून असतेच असें नाहीं. उदाहरणार्थ, ब्रह्मदेशांतील दक्षिण भागांत पाऊस पुष्कळ पडत असून तेथें लोकवस्ती दर चौ. मैलीं फक्त ८० आहे. पाण्याचा पुरवठा जर स्वाभाविक कारणांऐवजीं कृत्रिम कारणांनीं होत असेल तर त्याचा परिणाम लोकांची दाटी वाढविण्याकडे होतो. पंजाब व राजपुताना वगैरे जे भाग सांगितले तेथें पाऊस पडत नाहीं परंतु लोकांचें वास्तव्य तेथें अतिशय खर्चाच्या पाणी पुरविण्याच्या पद्धतीनें केलेलें आहे. मद्रास इलाख्यांत पूर्व आणि दक्षिण भागांत पाऊस फक्त ७२ इंच आहे आणि पूर्वकिनाऱ्यावर ११० इंच आहे. तरी दोन्ही ठिकाणीं लोकवस्तीचें प्रमाण सारखें आहे. कां कीं पाऊस कमी त्या ठिकाणीं कृत्रिम पाण्याचा पुरवठा फार चांगला आहे. गयेच्या परिसरांतील भाग वालुकामय व अनुत्पादक होता तो कालव्यांच्या सहाय्यानें जास्त सुपीक झाला आहे. जमीनीचा स्वाभाविक सुपीकपणा हें लोकवस्तीच्या दाटीचें फारच लहान कारण होय. गंगथडीची व सिंधुथडीची जमीन सुपीकतेच्या दृष्टीनें जवळ जवळ सारखीच आहे. परंतु गंगथडींत वस्ती फार मोठी आहे परंतु सिंधुथडींत फार कमी आहे. सुपीकतेचें महत्त्व नाहींच असें नाहीं, परंतु पाण्याचा पुरवठा व भूपृष्ठस्वरूप यांच्यामुळें त्याची फारशी मातब्बरी नाहीं. दाटीचा कोणत्या तरी पिकाशीं प्रत्यक्ष संबंध जोडतां येत नाहीं. भूपृष्ठस्वरूपाप्रमाणें लोकवस्तीचें प्रमाण बदलतें तें येणेंप्रमाणें. सपाट प्रदेश व उंचसखल प्रदेश यांमुळें लोकवस्तींत कसा बदल पडतो हें पाहूं. सपाट जमिनीवर वस्ती जास्त असते व तेथें प्रत्येक चौ. इंच जमीन देखील वापरतां येण्याजोगी असते असा प्रदेश गंगथडी व बंगाल होय. त्याच्या खालोखाल वस्ती म्हटली म्हणजे पूर्वपश्चिम किनाऱ्यांवर होय. संयुक्तप्रांताचा पश्चिम भाग आणि पंजाबचा ईशान्य भाग हा त्याच्या खालोखाल आहे आणि तेथें पाऊसपाणी जरी कमी आणि अनियमित आहे तरी त्याची उणीव कालव्यांनीं भरून काढली आहे. किनाऱ्यावरील ओरिसांतील जिल्हे व मद्रास इलाख्याच्या उत्तरेकडील जिल्हे यांत पाऊस जरी ५० इंच पडतो तरी तेथील लोकवस्तीचें प्रमाण कमी आहे कारण याचा पश्चिम भाग डोंगराळ असून समुद्राकडील भाग दलदलीचा आणि क्षारमिश्रित आहे; व दोहोंच्यामध्यें जो भाग आहे तेथें लोकवस्तीचें प्रमाण फारच मोठें आहे. तें जवळ जवळ गंगथडीच्या प्रमाणाइतकें येईल. आसाममध्यें टेंकड्या व जंगलें आहेत आणि ब्रह्मपुत्रा नदीच्या परिसरांत पाळवंटें आहेत आणि त्यांमुळें तेथें लोकवस्तीदाटी फारशी नाहीं. लोकवस्तीच्या वृद्धिक्षयास किंवा अल्पताबहुलतेस दुसरें कारण म्हटलें म्हणजे हवा होय. आसाममध्यें आणखी एक कारण महत्त्वाचें आहे कीं, तेथें मलेरिया फार असतो पंजाबच्या ईशान्येस आणि संयुक्त प्रांताच्या पश्चिमेस जो भाग आहे तेथें लोकवस्तीची वाढ

अलीकडे खुंटल्यासारखी झाली आहे याचें कारण जमीनीची लोकांस पोसण्याची शक्ति खुंटली नसून, मलेरिया व प्लेग यामुळें होणारी मृत्युसंख्या फार झाली आहे हें होय. कांहीं ठिकाणीं लोकवस्तीचें अल्पत्व होण्याचीं कारणें राजकीय व ऐतिहासिक आहेत. ब्रह्मदेशचा उत्तर भाग चांगला सुपीक आहे परंतु तेथील राज्यव्यवस्था नीट नसल्यामुळें लोकवस्ती वाढली नाहीं. तेंच कारण आसामचें आहे.

श ह रां ती ल दा टी.—शहरांतील लोकवस्तीचीं कोष्टकें पहातां त्यांत सांपत्तिक स्थितीसंबंधानें आणि स्थानिक सरकारांच्या प्रयत्नासंबंधानें कांहीं महत्त्वाच्या गोष्टी दिसून येतात.

## प्रसिद्ध शहरांची लोकसंख्या.

| शहर | लोकसंख्या १९११ | चौ. मैली संख्या | लोकसंख्या १९२१ | चौ. मैली संख्या | बाग्यांची दरमैली संख्या | फरक शें. १९११-२१ |
|---|---|---|---|---|---|---|
| कलकत्ता | १०४३३०७ | २४८४१ | १३२७५४७ | २१४१२ | ६२९ | +४.३ |
| व हावरा | १७९००६ | २०९८५ | | | | |
| मुंबई | ९७९४४५ | ४२५८५० | ११७५९१४ | ४८९९६ | ८४० | +२०.१ |
| मद्रास | ५१८६६० | १९२१० | ५२६९११ | १८१६९ | ३३५ | +१.६ |
| हैद्राबाद | ५००६२३ | १००१२ | ४०४१८७ | ७९२५ | २७५ | −१९.४ |
| रंगून | २९३३१६ | १०४७६ | ३४१९६२ | ४५०० | ६७७ | +१६ ६ |
| दिल्ली | २३२८३७ | १५२४८ | ३०४४२० | ४६८३ | ४५० | +३०.७ |
| लाहोर | २२८६८७ | ७८१६ | २८१७८१ | ६७१५ | ४४० | +२३.२ |
| अहमदाबाद | २१६७७७ | २१६७८ | २७४००७ | २४९०९ | ३९७ | +१७.७ |
| लखनौ | २५९७९८ | ११४८४ | २४०५६६ | १३५० | २२९ | −४.६ |
| बंगलोर | १००८३४ | ७४४७ | २३७८९६ | २०९३१ | ३४० | +३५.३ |
| कराची | १५११९०३ | २१३९ | २१६८८३ | १९७१६ | ६०५ | +४२.८ |
| कानपूर | १७८५५७ | १८२६० | २१६४३६ | २२६२० | ४२५ | +२१.२ |
| पुणें | १५८८५६ | १२२२० | २१४७९६ | ५३६९ | ३७३ | +१३.८ |
| काशी | २०३८०४ | २०३९४ | १९८४४७ | १९९३० | १४० | −२.६ |
| आग्रा | १८५४४९ | ११००२ | १८५५३२ | ११००० | ११९ | ... |
| अमृतसर | १५२७५६ | १५२७६ | १६०२१८ | १६५३४ | १८१ | +४.९ |
| अलाहाबाद | १७१६९७ | ११२४६ | १५७२२० | १०२५० | २६६ | −८.४ |
| मंडाले | १३८२९९ | ५५३२ | १४८९१७ | ५९१७ | २०९ | +७.७ |
| नागपूर | १०१४१५ | ५०७१ | १४५१९३ | ७२५९ | २५८ | +४३.२ |
| श्रीनगर | १२६३४४ | १५७३५ | १४१७३५ | १५६५३ | २१ | +८.९ |
| मदुरा | १३४१३० | १९१६१ | १३८८९४ | १७१०५ | १७८ | +२.८ |
| बरेली | १२९४६२ | १६५५२ | १२९४५९ | १६८०० | १२८ | ... |
| मीरत | ११६२२७ | २६३२७ | १२२६०९ | १५५४२ | २१० | +५.१ |
| त्रिचनापल्ली | १२३५१२ | १५४३९ | १२०४२२ | १३६२२ | १७६ | −२.५ |
| जयपूर | १३७०९८ | ४५६९९ | १२०२०७ | ४००६९ | ६३ | −१२.३ |
| पाटना | १३६१५३ | १५१२८ | ११९९७६ | ७९९८ | १६० | −११.९ |
| सोलापूर | ... | ... | ११९५८१ | १७०८३ | ३९१ | +९४.९ |
| डाक्का | १०८५५१ | १५९१७ | ११९४५० | १७५६६ | १४० | +१०.० |
| सुरत | ११४८६८ | ३८२८९ | ११७४३४ | ३९१४४ | १८३ | +२.२ |
| अजमीर | ... | ... | ११३५१२ | ६६७७ | ५३७ | +३१.७ |
| जबलपूर | १००६५१ | ६७१० | १०८७९३ | ७२५२ | ३६६ | +८.१ |
| पेशावर | ... | ... | १०४४५२ | ३४८१७ | ३४९ | +६.७ |
| रावळपिंडी | ... | ... | १०११४२ | ११८०२ | ५३२ | +१७.० |

पहिली महत्त्वाची गोष्ट ही कीं, शहरांत दाटी होण्याचें एक महत्त्वाचें कारण जें शहराच्या वस्तीची झपाट्यानें वाढ तिचा परिणाम विशेषेंकरून कांहीं शहरांत दिसून येत आहे. सोलापूरची लोकवस्ती सर्वांत झपाट्यानें वाढली, त्याच्या खालोखाल नागपूर व कराची यांची वाढ होय; व त्याच्या नंतर अजमीर व दिल्ली हीं येतात. या शहरांत दाटी लोकांस फारच भासत असावी.

इ. स. १९११ च्या खानेसुमारीच्या वेळीं जयपूर हें सर्वांत दाटीचें शहर होतें, आतां मुंबईनें जयपूरला मागें टाकलें. आतां सर्वांत दाटीचें शहर म्हणजे मुंबई होय.

शहरांतील लोकसंख्येचें दर मैली प्रमाण वाढूं लागलें म्हणजे लोकांचा आयुष्यक्रम नेहमींच कठिण होत जात नाहीं. जर लोकांची रहाणी आणि जागेचा उपयोग अधिक पद्धतशीर होऊं लागला तर शहरांत संख्यावृद्धि होऊन रहाणीची दाटी होणार नाहीं. घरें जर आकाशाकडे वाढत गेलीं तर तितक्याच क्षेत्रांत पुष्कळ खोल्या बांधतां येतील आणि दर खोलीस माणसांचें प्रमाण कमी पडत जाईल.

रहाणीची दाटी व देशांतील दाटी.—या दोहोंमध्यें अर्थशास्त्रदृष्ट्या फार फरक आहे. विशिष्ट प्रदेशावर अधिक प्रजा पोसली गेली तर तें त्या प्रदेशाच्या आर्थिक उच्चतेचें प्रमाण आहे, उलट रहाणीची दाटी हें आर्थिक उच्चतेचें प्रमाण नसून आर्थिक नीचतेचें प्रमाण आहे. एखाद्या प्रदेशांत दर चौरस मैली लोकसंख्येचें प्रमाण वाढलें तर ती गोष्ट उद्योगधंद्याच्या वाढीमुळें किंवा शेतकीच्या सुधारणेमुळें, अशा हितकर कारणामुळें होईल. कधीं कधीं आसपासच्या प्रदेशांत रोगराई उत्पन्न झाल्यामुळेंहि विशिष्ट भागाची दाटी वाढते पण ती वाढ फारच अस्थिर असते. उलटपक्षीं देशामध्यें दर खोलींत रहाणाऱ्या माणसांचें प्रमाण वाढूं लागलें तर सांपत्तिक निकृष्टताच स्पष्ट दिसूं लागेल. घरांचीं भाडीं फार वाढलीं व भाडें भरण्यास लोक असमर्थ होऊं लागले म्हणजे दर खोलींत अधिक माणसें राहूं लागतील. उद्योग वाढले पण देशांत पुरेशीं घरें बांधावयास लोकांपाशीं भांडवल नाहीं या स्थितीचाहि हा परिणाम आहे. देशामध्यें सुस्थितिदर्शक ज्या गोष्टी दिसावयास पाहिजेत त्यांत मैली लोकसंख्येची वाढ पाहिजे, पण देशांतील माणसांचें एकंदर खोल्यांशीं प्रमाण म्हणजे प्रत्येक खोलींत सरासरी किती माणसें रहातात याचें प्रमाण कमी झालें पाहिजे. गेल्या ४० वर्षांत या दोन्हीं दृष्टींनीं प्रगति दिसत आहे.

घरें व कुटुंबें.

| खानेसुमारी | दरघरीं माणसें | दर चौ. मैली घरें |
|---|---|---|
| १९२१ | ४.९ | ३६.१ |
| १९११ | ४.९ | ३५.८ |
| १९०१ | ५.२ | ३१.६ |
| १८९१ | ५.४ | ३३.९ |
| १८८१ | ५.८ | ३१.७ |

दाढी, पांडुरंग केशव—एक महाराष्ट्र कवि. हा कवि सुमारें १०० वर्षांपूर्वी नागपूर येथें होऊन गेला. या कवीचा जन्म नागपूर येथेंच झाला व त्याचे वंशजहि हल्लीं येथेंच रहातात. विठ्ठल दाढीचे चिरंजीव केशव दाढी व त्यांचे पुत्र हे पांडुरंग दाढी होत. यांचें गोत्र भारद्वाज; कुलदेव जेजुरीचा खंडोबा. पांडुरंग दाढी यानीं लिहिलेला ' ओवीबद्ध अद्भुतरामायण' हा एकच ग्रंथ उपलब्ध झाला आहे. या ग्रंथांत संस्कृतांतील अद्भुतरामायणाची कथा थोडक्यांत सांगितली आहे. मधून मधून दिंड्याहि ह्या ग्रंथांत सांपडतात. ग्रंथांमध्यें वऱ्याचशा चुका असल्यामुळें त्याचा अर्थ समजण्यास फार कठिण जातो.

पांडुरंग दाढीची कविता सामान्य प्रतीची आहे; मुक्तेश्वर, श्रीधर किंवा कृष्णदास मुद्गल यांच्या कवितेहून ही कविता खालच्या दर्जाची आहे. अद्भुतरामायणावर जुन्या मराठी कवींनें लिहिलेला असा हा एवढाच ओवीबद्ध ग्रंथ असावा. असें वाटतें. [ महा. कविचरित्र. ]

दांता—मुंबई इलाख्यांतील महिकांठामधील एक लहानसें संस्थान. यांत ७८ खेडीं आहेत. सर्व प्रदेश ओसाड व डोंगराळ आहे. दांता हें संस्थानांतील मुख्य ठिकाण आहे. संस्थानचा प्राचीन इतिहास रासमालेंत आहे. राण्याला गायकवाड सरकारला घांसदाणा व ईदरच्या महाराजाला खिचडी-रक्कम द्यावी लागते.

दातागंज—संयुक्त प्रांतांतील बदौन जिल्ह्याची एक अगदीं पूर्वेकडची तहशील. हींत सालेमपूर व उसेहट परगण्यांचा समावेश होतो. क्षेत्रफळ ४१७ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) २२३०४८. दातागंज, अलापूर, ककराला हीं गांवें असून खेडीं ४०३ आहेत. ह्या तहशिलीच्या दक्षिणेस गंगा नदी असून पूर्वेस रामगंगा आहे. येथें तांदूळ फार चांगला पिकतो. रामगंगा व गंगेच्या कांठचा प्रदेश वाहून जावयाची भीति असते.

दाथा-मुंबई, काठेवाड. बागड नदीतीरावर समुद्रापासून सुमारें ४ मैलांवरील तालुका. येथें पाणी मुबलक व जमीन सुपीक आहे. तालुक्यांत २६ खेडीं आहेत. तालुकदार सरवैया रजपुतांचे वंशज आहेत. दाथा तालुक्यांतील सर्वांत सुपीक जमीन दाथा, ताली व वालर खेड्यांत आहे. येथें पोष्ट ऑफिस व शाळा आहेत.

दादाजी कृष्णाजी लोहोकरे—हा शिवाजीचा एक सरदार होता. तळेगांव ढमढेऱ्याचा रहिवासी. प्रथम हा शहाजीच्या पदरीं असे. शहाजीनें बंगरूळकडे महाराष्ट्रांतून जी मंडळी नेली त्यांपैकींच हा असून, त्याच्या स्वराज्यस्थापनेच्या मसलतींत याचें मूळपासून अंग होतें. शहाजीला मुस्तफाखानानें जेव्हां पकडलें, त्यावेळीं यालाहि त्याच्याचबरोबर कैद केलें. याचा मुलगा रत्नाकर हा याच सुमारास संभाजी( शहाजीचा वडील पुत्र )सह मुसुलमानांशीं ( अफजल ) लढत असतां, कनकगिरीस मेला ( १६४८ ). पुढें शहाजीस आदिलशहानें मोकळें केलें त्याबरोबरच यालाहि सोडलें. तेव्हांच शहाजीनें दादाजीकडून स्वराज्यस्थापनेच्या कामीं ' चिरंजीव सिऊबास ' जमावा ( फौज ) निशीं मदत करण्याबद्दल बेलरोटीवर हात ठेवून शपथ घेवविली व सरदारांचीं वस्त्रें दिलीं. यापुढें दादाजीनें शिवाजीस मावळचे देशमुख मिळवून घेऊन बरीच मदत केली. कल्याण घेतल्यावर शिवाजीनें तेथील सुभेदारीवर दादाजीचीच नेमणूक केली ( १६५७ ). तत्पूर्वी तो पायदळावरील एक सेनापति होता. दादाजीचा भाऊ सखोपंत हा

कारीचे देशमुख जेधे यांच्याकडे नोकर होता. त्याला भिवंडी येथें नायब सुभेदारी दिली. पुढें अफजलप्रकरणांत दादाजी-प्रमाणेंच त्याचा दुसरा मुलगा रखमाजी यानेंहि कामगिरी बजाविली होती ( १६५९ ) [ जेधे शकावली ]

**दादाभट**—एक भारतीय ज्योतिषी. याच्या बापाचें नांव माधव असून उपनांव गांवकर होतें. किरणावलि नांवाची सूर्यसिद्धांतावरील टीका शके १६४१ मध्यें दादाभटानें केलेली आहे. दादाभटाला दोन मुलें होतीं. त्यांत नारायण नांवाचा लहान होता. नारायणानें केलेले ग्रंथ होरासारसुधानिधि, नरजातकव्याख्या, गणकप्रिया नांवाचा प्रश्नग्रंथ, स्वरसागर नांवाचा शकुनग्रंथ व ताजकसुधानिधि. या ग्रंथांचा काल सुमारें स. १६६० असावा. [ दीक्षित कृत भा. ज्योतिःशास्त्र. ]

**दादाभाई, नवरोजी** ( १८२५–१९१७ )—हा प्रोफेसर, फर्मचा मॅनेजर, बडोद्याचा दिवाण, ब्रिटिश पार्लमेंटचा सभासद, व हिंदुस्थानचा राजकीय पुढारी पारशी धर्माच्या पुरोहित घराण्यांत मुंबईस १८२५ सप्टेंबर ४ रोजीं जन्मला. त्याच्या वयाच्या चवथ्या वर्षाच त्याचा बाप वारला, तथापि त्याच्या आईनें त्याला त्या काळीं मुंबईत शक्य तितकें उच्च शिक्षण एल्फिन्स्टन इंस्टिट्यूटमध्यें मिळण्याची व्यवस्था केली. उत्तम विद्यार्थी म्हणून दादाभाईनीं पुष्कळ बक्षिसें मिळविलीं. त्यांची बुद्धिमत्ता, कर्तृत्व व विद्वत्ता यांचें त्या वेळचे मुंबईचे चीफ जस्टिस सर एरस्किन पेरी यानां इतकें कौतुक वाटलें कीं, दादाभाईनीं बॅरिस्टर व्हावें म्हणून विलायतेचा निम्मा खर्च त्यांनीं केला. पण नुकत्याच घडलेल्या दोनतीन उदाहरणांवरून दादाभाई विलायतेंत गेल्यास ख्रिस्ती होण्याची भीति त्यांच्या जातभाईनां फार वाटत असल्यामुळें बाकी निम्म्या रकमेची मदत करण्यास कोणी तयार होईना. त्यामुळें एलफिन्स्टन इंस्टिट्यूटमध्येंच प्रथम शिक्षकाची व १८५० सालीं प्रोफेसरची नोकरी दादाभाईनीं पत्करली. स. १८५६ मध्यें तेथें राजीनामा देऊन लंडनमध्यें कामा अँड कंपनींत मॅनेजरची नोकरी धरली. तत्पूर्वी मुंबईत असतांनाच दादाभाईनीं स्टुडंट्स लिटररी अँड सायन्टिफिक सोसायटी व तिच्या गुजराथी व मराठी ज्ञानप्रसारक मंडळी अशा शाखा काढल्या. मुंबईस मराठी व पारशी मुलींच्या शाळा प्रथमतः यानींच सुरू केल्या; तसेंच बाँबे असोसिएशन, इराणी फंड, पारशी जिमखाना, युइडो मॅरेज असोसिएशन, फ्रामजी इंस्टिट्यूट, व्हिक्टोरिया अँड आल्बर्ट म्यूझियम या संस्था स्थापण्यांतहि त्यांचें प्रत्यक्ष सहाय्य होतें. शिवाय त्यांनीं १८५१ सालीं 'रास्त गोफ्तार' ( खरें सांगणारा ) नांवाचें गुजराथी पत्र काढलें होतें.

इंग्लंडमध्येंहि दादाभाईनीं गेल्याबरोबर राजकीय कामास सुरवात केली. प्रथम आय. सी. एस. परीक्षा इंग्लंड व हिंदुस्थान दोन्ही देशांत एकदम व्हावी अशाबद्दल खटपट केली तिला अखेर यश येऊन १८९३ सालीं ब्रिटिश पार्लमेंटनें तसा ठराव पास केला ( त्याची अम्मलबजावणी मात्र लांबली). दुसरी गोष्ट म्हणजे इंग्लिश लोकांनां हिंदुस्थानविषयक माहिती देऊन त्यांची सहानुभूती मिळविण्याच्या उद्देशानें लंडन इंडियन सोसायटी स्थापन केली, तीच पुढें विस्तृत करून ईस्ट इंडिया असोसिएशन बनविली, व तिच्याकरितां गायकवाड, होळकर, शिंदे, कच्छचे राव वगैरे संस्थानिकांकडून देणग्या जमविल्या, आणि संस्थेतर्फे हिंदुस्थानच्या प्रश्नासंबंधीं निबंध इंग्रज व हिंदी गृहस्थांकडून वाचविले व स्वतः इंग्लंडभर व्याख्यानें दिलीं. १८६२ सालीं दादाभाईनीं कामा कंपनीची नोकरी सोडून स्वतःची कंपनी काढली, पण ती इ. स. १८६६ मध्यें बुडाली. तेव्हां सावकारांची व्यवस्था त्यांच्या सहानुभूतीनें लावून दादाभाई १८६९ सालीं मुंबईला परत आले. त्यावेळीं सर पी. एम्. मेथा यांच्या पुरस्कर्तृत्वानें त्यानां एक मानपत्र व थैली देऊन मोठा सन्मान करण्यांत आला. त्यानंतर लवकरच दादाभाई फासेट कमिटीपुढें साक्ष देण्याकरितां इंग्लंडांत गेले व त्यांत त्यांनीं हिंदुस्थानचें दारिद्र्य व त्यामानानें करांचा असह्य बोजा असल्याचें सप्रमाण सिद्ध करण्याचा प्रयत्न केला हिंदुस्थानांत दरमाणसी उत्पन्न २० रु. च आहे ह्या दादाभाईच्या विधानामुळें पुष्कळ सरकारी अधिकारी रागावले व त्याबद्दल वाद माजविला. त्यामुळें १८७३ सालीं 'हिंदुस्थानचें दारिद्र्य' नांवाचें स्वतंत्र पुस्तक दादाभाईनीं प्रसिद्ध केलें हिंदुस्थानसरकारनेंहि पुष्कळ माहिती मिळविल्यानंतर २७ रु. उत्पन्न असल्याचें जाहीर केलें.

स. १८७४ मध्यें दादाभाईनां बडोदासंस्थानचे दिवाण नेमण्यांत आलें. तत्कालीन संस्थानिक मल्हारराव गायकवाड यांच्या कारकीर्दीत संस्थानी कारभारांत बराच घोंटाळा माजला होता. पण सुमारें दोन वर्षांच्या अवधींत दादाभाईनीं राज्यकारभाराची नीट व्यवस्था लावून दिली. त्याच बाबतींत रेसिडेंट फायर यांच्याशीं मतभेद होऊन प्रकरण स्टेटसेक्रेटरीपर्यंत गेलें. अखेर दादाभाईची बाजूच योग्य ठरली. दोन वर्षे पुरीं होण्यापूर्वीच दादाभाई राजीनामा देऊन पुन्हां मुंबईत परत आले. तेथें मुंबई म्युनिसिपालटीचे सभासद होऊन त्यांनीं स. १८८५ पर्यंत काम केलें. स. १८८५ मध्यें मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड रे यानीं त्यानां मुंबई कायदेकौन्सिलचे सभासद नेमलें. पण तेथें फार दिवस न राहतां इंग्लंडांत ब्रिटिश पार्लमेंटमध्यें सभासद होण्याच्या इच्छेनें ते इंग्लंडांत गेले. तेथें हॉलबोर्नतर्फे लिबरल पक्षाचा उमेदवार म्हणून दादाभाई उभे राहिले पण १९५० विरुद्ध ३६५१ मतें मिळून ते पडले. स. १८८७च्या इंडियन नॅशनल काँग्रेसचें त्यानां अध्यक्षस्थान देण्यांत आलें. त्यानंतर पुन्हां इंग्लंडमध्यें जाऊन स. १८९२ मध्यें दादाभाई सेंट्रल फिन्सबरीतर्फे लिबरल पक्षातर्फे पार्लमेंटांत निवडून गेले. कॉमन्स सभेंत पहिलें भाषण १८९२ सालच्या आगष्टच्या ९ तारखेस

केलें. पुढील वर्षी आय्. सी. एस्. परीक्षा हिंदुस्थानांतहि घेण्याचा ठराव दादाभाईंच्या खटपटीनें पास झाला. पुन्हां १८९३ सालच्या लाहोरच्या काँग्रेसचें अध्यक्षस्थान दादाभाईंनांच देण्यांत आलें. स. १८९५ च्या निवडणुकींत ते निवडून आले नाहींत. १८९६ सालीं नेमल्या गेलेल्या रॉयल कमिशनचे ते एक सभासद असून लॉर्ड वेल्बी अध्यक्ष होते. या वेल्बी-कमिशनपुढें दादाभाईंनीं आपली साक्षहि दिली. १८९७ पासून स. १९०६ पर्यंत दादाभाई इंग्लंडांतच राहिले. १८९८ सालीं नेमलेल्या इंडियन करन्सी कमिटीपुढें ( फौलर कमिटी ) त्यांनीं साक्ष दिली. १९०२ सालीं त्यांनीं आपलें 'पॉव्हर्टी अँड अन-ब्रिटिश रूल इन इंडिया' हें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यांत मुख्य मुद्दा हिंदुस्थानांतून इंग्लंडांत दरसाल तीन कोट पौंड बिनमोबदला जात असल्यामुळें हिंदुस्थानचें दारिद्र्य सारखें वाढत आहे हा होता. १९०५ सालीं आमस्टरडॅम ( हॉलंड ) येथें भरलेल्या सोशल डेमोक्रॅटांच्या इंटर नॅशनल काँग्रेसला ते हिंदुस्थानचे प्रातिनिधि म्हणून हजर राहिले. तेथेंहि त्यांनीं हिंदुस्थानांतील ब्रिटिश कारभारपद्धतीचा निषेध केला. १९०६ सालीं कलकत्त्यास भरलेल्या हिंदी राष्ट्रीय सभेचे त्यांना तिसऱ्यांदा अध्यक्ष निवडण्यांत आलें.याच महत्त्वाच्या सभेंत दादाभाईंनीं स्वराज्य ( सेल्फ-गव्हर्नमेंट ) हें राष्ट्रीय सभेचें ध्येय म्हणून जाहीर करून स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण अशीं तीन स्वराज्यप्राप्तीचीं निश्चित साधनें सांगितलीं. यानंतर वयोवृद्धत्वामुळें दादाभाई सार्वजनिक व्यवसाय सोडून घरीं स्वस्थ बसले. स. १९१६ मध्यें मुंबई युनिव्हर्सिटीनें त्यांना एलूएल्. डी. ची पदवी अर्पण केली. आयुष्याचीं शेवटचीं वर्षे शांततेनें वेसोंवा येथें घालवून दादाभाई स. १९१७ जून ३० रोजीं परलोकवासी झाले. त्यांचा एकुलता एक मुलगा १८९३ सालींच वारला होता. त्यांच्या पश्चात् त्यांच्या मुली व नातवंडें आहेत.

**दादू**—मुंबई इलाख्यांतील सिंध प्रांतांत असलेल्या लारखाना जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ २९७ चौ. मैल. लोकसंख्या ( १९११ ) ५४६७७. या तालुक्यांत ५५ खेड्यांचा समावेश होत असून दादू हा मुख्य गांव आहे. जमीनसारा व इतर कर मिळून १९०३-०४ सालीं उत्पन्न दीड लाखाचें होतें. पूर्व सीमेवरून सिंधु नदी वहात असून नदीकांठच्या प्रदेशास भरपूर पाणी मिळत असल्यामुळें गहूं व चण्याचें उत्पन्न फार चांगलें होतें. तालुक्यांत नदीच्या पाण्याचे जागोजाग पाट काढून पाणी खेळविलें आहे. तालुक्याच्या पश्चिम भागास 'पश्चिम नाराकालव्यानें' पाणी मिळतें. 'फिटोवाह' हा कालवाहि प्रमुखत्वानें या तालुक्यांत मोडतो.

**दादू-दादूपंथी**—दादू हा अहमदाबाद येथील रहिवाशी. याचा जन्म स. १५४४ त होऊन त्यानें स. १६०३ त समाधि घेतली. विनोदीराम नांवाचा एक नागर ब्राम्हण अहमदाबादेस होता. त्याला साबरमतींतून वहात आलेला एक लहान मुलगा सांपडला, तोच दादू असें म्हणतात. ह्याचें नांव दयाळराम असें ठेविलें. त्याला ११ व्या वर्षी एका साधूनें ( दंतकथा विष्णू म्हणते ) उपदेश केला व त्याचें नांव दादू ठेविलें. दादू याचा अर्थ दाटून उपदेश देणारा असा या पंथांत केला जातो. पुन्हां सात वर्षांनीं तोच साधु दादूस भेटला व त्यानें 'राम' या मंत्राची दीक्षा देऊन पंथाचा प्रचार करण्यास सांगितलें. दादूनें आपल्या ग्रंथांत गुरूचा महिमा पुष्कळ वर्णिला आहे, पण त्याचें नांव दिलें नाहीं; यावरून पंथाची समजूत कीं विष्णूच त्याचा गुरु असावा. दादू अहमदाबादेहून निघून ( १५७४ ) सांभर येथें गेला; तेथें सहा वर्षे राहून हिंदु-मुसुलमान या दोघांनांहि शिष्य केलें. तेथून निघून अंबेर येथें चौदा वर्षे तो राहिला. तेथें राजा भगवानदासाचा व त्याचा स्नेह जमला. अकबरास दादूची माहिती लागतांच त्यानें भगवानदासातर्फे त्याची गांठ घेऊन त्यास आपल्या दीनिइलाहि पंथाचा प्रचार करण्यास सांगितलें; परंतु दादूनें तें नाकारलें. पुढें राजा मानसिंगानेंहि दादूचा मान ठेविला. पुढें मत्सरी लोकांनीं भलतेंच समजाविल्यावरून मानसिंगानें दादूला अंबेरहून जाण्यास सांगितलें. तेव्हां दादू तेथून निघून ( १५९४-१६०३ ) कल्याणपूर, जयपूर, मारवाड, विकानेर वगैरे प्रांतांत उपदेश करीत हिंडून अखेर नारायणा येथें आला; व तेथून जवळच्या भैराणा गांवीं त्यानें समाधि घेतली.

यूरोपमध्यें धर्मसुधारणेची दाट यावेळींच पसरली होती. तशीच कबीर, नानक व दादू यांनीं इकडे ती पसरविण्याची खटपट केली. दादूनें अहमदाबाद-दिल्ली या प्रांतांत हें काम केलें. सांभर येथें दादूच्या मठांत त्याचा अंगरखा व पादुका पूजेंत ठेविल्या आहेत. अंबेर येथेंहि त्याचा एक मठ आहे.

दादूचे १५२ शिष्य होते. त्यानें निरनिराळ्या वेळीं उच्चारलेला उपदेश बाणी नांवाच्या पद्यांत ग्रथित केला असून, पद्यांची संख्या ५ हजार आहे; हीं पद्यें वाद्यांच्या साथीवर गातां येतात. त्याचे ३७ अध्याय आहेत. गुरु, द्वैत, अद्वैत, मन, स्मृति, सत्य, ब्रह्म, विश्वास, प्रार्थना वगैरे विषय यांत आहेत.

वेद व कुराण, वेदांतमत, यज्ञयाग, भिक्षुकवर्ग, चातुर्वर्ण्य व जातिसंस्था, मूर्तिपूजा, माळकरी, तीर्थयात्रा वगैरे गोष्टींच्या तो विरुद्ध होता. पुनर्जन्म म्हणजे याच जन्मांतील निरनिराळ्या वासना होत असें तो म्हणे. वासना व कृति यांच्यामुळें एकच माणूस निरनिराळ्या वेळीं कोल्हा, हंस, डुकर, गाढव, देव यांच्याप्रमाणें वागतो, हाच पुनर्जन्म. ब्रह्मा-विष्णू-महेश हीं सामान्य माणसेंच होतीं. माया ही मूळची वाईट नाहीं; माणूस हा ईश्वरापासून स्वतःस दूर नेऊन मायेस वाईट स्वरूप आणतो. जग वाईट नाहीं, जागतिक वासना-ईषणा वाईट असें त्याचें मत होतें.

तो म्हणे मी हिंदू किंवा मुसुलमान नाहीं, कोणत्याहि ( षट् ) दर्शनांचा मी अनुयायी नाहीं फक्त दयामय ईश्वरावर माझा विश्वास आहे.

त्या च्या पं था चीं मु ख्य त त्वें.—वाईट गोष्टी सोडा, एकमेव ईश्वरास भजा. ईश्वर, अचंचल, अमर्त्य, अभय, आनंदमय, स्वयंप्रकाश, अमूर्त, अदृश्य असा ( ब्रह्मस्वरूपी ) आहे.सर्व जगाचा समन्वय त्याच्यांत होतो. सर्व ब्रह्मांडाचा तो कर्ता, भर्ता आहे. माणसास त्यानें उत्पन्न केल्यानें, मनुष्यानें त्याची पूजा करावी. दादू आपल्यास ( ख्रिस्ताप्रमाणें ) सतत पापीच म्हणवून घेई. जन्मापासुन मरेपर्यंत मी पापीच असल्यानें व आत्मोद्धार करण्याचें सामर्थ्यच माझ्यांत नसल्यानें, तूं माझें रक्षण कर, असें तो देवाला म्हणे. देव-भक्तांत पापामुळेंच द्वैत उत्पन्न झालें ( या द्वैतावरच वाणी ग्रंथांतील सर्वांत मोठा अध्याय रचिला आहे ). त्यानें आपल्या देवावरील प्रेमास विरहिणीची उपमा घेतली आहे.

दादूच्या भक्तांस दादूपंथी म्हणतात. त्यांच्या दोन शाखा आहेत. चेले ही एक शाखा व दुसरी महंत यांची. चेले हे गृहस्थाश्रमी, व्यापारधंदा किंवा नोकरी वगैरे करून पोट भरणारे असतात. तात्विक दृष्ट्या आपण हिंदुधर्मी नाहीं असें ते म्हणतात. त्यांच्यांत आचार व पोषाखावरून अनेक उपशाखा निघाल्या आहेत. भिक्षापात्राच्या एका प्रकारावरूनहि त्यांचा एक स्वतंत्र पंथ आहे. महंत हे अविवाहित असून आपली गादी उच्च दर्जाच्या जातींतून निवडून घेतलेल्या शिष्याकरवीं पुढें चालवितात. शिष्यांनां वाणी शिकविणें व उपदेश करणें हें त्यांचें काम. हे शिपायांचा, वैद्यांचा, सावकारीचा व शेतीचाहि धंदा करतात, किंवा भीक मागतात. दादूच्या ५२ शिष्यांनीं राजपुतान्यांत मठ स्थापिलेले असून त्यांनां दादुद्वार म्हणतात. यांपैकीं कांहीं मठ पैशानें व विद्येनें भरभराटले आहेत; बाकीच्यांत सर्व अनास्था आहे.

यांच्यांतील खालसापंथी महंत हा नारायणा येथें राहतो; हाच दादूच्या खास शिष्यपरंपरेंतील असून सर्व दादूपंथ्यांचा मुख्य आहे. प्रत्येक पंथी दरसाल मेळा भरतो तेव्हां कांहीं दक्षिणा यास देतो. नागा नांवाचा पंथ अंबेर येथें आहे. हे शिपाईगिरीचा पेषा स्वीकारतात व त्यावेळीं त्यांचा पोषाक फारच साधा (हे पूर्वी नग्नस्थितींत राहात असावेत ?) असतो. यांचा मूळ प्रवर्तक बिकानेरचा सुंदरदास होय. हल्लीं जयपूर व इंग्रजी मुलुख यांच्या सीमेवर हे लोक ( २० हजार ) असून त्यांचे ९ मठ आहेत. त्यांच्याजवळ फक्त ढाल, तरवार व तोडयाची बंदूक इतकींच शस्त्रें असतात; अलीकडील सुधारलेलीं शस्त्रें नसतात. सन १८५७ च्या राज्यक्रांतींत हे इंग्रजांच्या बाजूचे होते. उत्तरादिपंथाचा संस्थापक बनारसीदास नांवाचा असून हे बहुतेक पंजाबी असतात. हे वैद्यकी व सावकारी करतात. विरक्तः ( विरागी ) हे फक्त भीक मागतात. यांचा पोषाक नारिंगी रंगाचा असतो; हे नेहमीं टोळयाटोळयांनीं आपल्या महंतांबरोबर हिंडतात. खाकी ( राखी ) पंथी लोकांच्या अंगावर वस्त्र क्वचित् असून ते गोसाव्याप्रमाणें जटाधारी असतात.

दादूनें हिंदूधर्माच्या विरुद्ध हा पंथ प्रथम काढला; परंतु सांप्रत पुन्हां हळू हळू हिंदु धर्म त्यांच्यांत पसरत आहे. पुष्कळ लोक हल्लीं वेदांती मताचे झाले आहेत. ते माळा घालतात, वाणी ग्रंथाची ( मूर्तीप्रमाणें ) आणि दादूच्या पादुका व अंगरख्याची पूजाअर्चा करतात.

एकंदर दादूपंथी (१९११) ७७५० असून ते राजपुताना ( ७६७० ) व इतरत्र आहेत. सन १९११ च्या खानेसुमारीच्या रिपोर्टांत त्यांनां हिंदू म्हणून संबोधिलें आहे. [ हंटर-इंपे ग्याझि; क्रुक्स-ट्राइब्ज अँड कास्ट्स; हॉपकिन्स-रिलिजन्स ऑफ इंडिया; ओमन-सेंट्स ऑफ इंडिया.]

**दादोजी कोंडदेव**—दादोजी कोंडदेव हा शहाजीच्या पदरचा एक विश्वासू ब्राह्मण कारकून होता. पुण्यांत रहात असलेलीं शहाजीच्या कुटुंबाचीं माणसें व त्याची तेथील जहागीर यावर देखरेख ठेवण्याकरितां याची नेमणूक करण्यांत आली होती ( १६३७ ). हा जमाबंदीच्या कामांत फार निपुण होता. याच्या देखरेखीखालीं पुणें प्रांतांतील शेतींत पुष्कळ सुधारणा घडून आली, व एकंदर लोकसंख्या वाढली. पुण्याची वसाहतहि त्यानें केली.

दरवर्षी शेतीचें जें उत्पन्न येईल त्याचा त्या उत्पन्नाच्या मानानें कांहींतरी हिस्सा सारा म्हणून वसूल करण्याची मालिकंबराची पद्धतच दादोजीनें चालू ठेवलेली होती. याच्या वेळीं मावळांतील लोक फारच निकृष्टावस्थेस पोंचलेले होते. म्हणून कांहीं वर्षेपर्यंत यानें सारा माफ केला; व त्यांच्यापैकीं कित्येकांस सारा वसूल करण्याकरितां आपल्या चाकरीस ठेवून त्यांची स्थिति सुधारण्याची यानें आपल्याकडून पुष्कळ खटपट केली. यानें बाल शिवाजी व जिजाबाईस रहाण्याकरितां पुण्यास लालमहाल नांवाचा एक मोठा वाडा बांधला, व शिवाजीस त्याच्या दर्जास अनरूप असें लष्करी व धार्मिक शिक्षण दिलें व त्याच्या मनांत आपल्या धर्माचा अभिमान उत्पन्न केला. त्यामुळें शहाजीनें त्याची तैनात ७०० होनांनीं वाढविली.

इ. स. १६४६ त शिवाजीनें तोरणा किल्ला घेऊन पुढच्याच वर्षी राजगड किल्ला बांधला तेव्हां विजापूरदरबाराकडून शिवाजीच्या वर्तनाविषयीं तक्रारी शहाजीच्या कानांवर घालण्यांत आल्यावरून, शहाजीनें दादोजीस त्याचा बंदोबस्त करण्याविषयीं लिहिलें. दादोजीनें प्रथमतः असल्या कृत्यांपासून शिवाजीस परावृत्त करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला परंतु आपल्या उपदेशाचा शिवाजीच्या मनावर कांहींच परिणाम होत नाहीं असें पाहून त्या स्वामिभक्त माणसास शिवाजीविषयीं फार काळजी वाटूं लागली. मरणसमयीं त्यानें शिवाजीस जवळ बोलावून आपलीं बायकापोरें त्याच्या स्वाधीन केलीं, व या प्रसंगीं त्यानें शिवाजीस पूर्वीप्रमाणें

उपदेश न करतां उलट त्यास गोब्राह्मणांचें प्रतिपालन करून स्वराज्यस्थापनेबद्दल सांगितलें अशी हकीकत बखरकार देतात.

अलीकडे उपलब्ध झालेल्या माहितिवरून स्वराज्यस्थापनेचा उद्योग शहाजीनेंच शिवाजीला पुढें करून गुप्तपणें आरंभला होता व त्या कामीं त्यानें दादोजीस पुणें प्रांतांत मुखत्यार नेमिलें. दादोजीनें रयत सुखी केली, वन्यपशू मारून अरण्यें तोडविलीं. मावळचे देशमुखदेशपांडे वंडाळी माजवीत ती मोडली व जे स्वराज्यस्थापनेस अनुकूल होतील असें वाटलें त्यांनां अनुकूल करून घेतलें. ही मसलत प्रथम भोर प्रांतांत रायरेश्वराच्या देवळांत झाली त्यानें शिवाजीच्या कार्याचा पाया भरला. शिवापूर नांवाच्या गांवीं त्यानें सरकारी बागा (शिवाजीच्या नांवाच्या) केल्या. दादोजीनें तोडलेले अनेक वाद पहातां तो फार न्यायनिष्ठुर दिसतो. वरील बागेतील एक आंबा त्यानें शिवाजीच्या परवानगीशिवाय तोडल्याबद्दल त्यानें आपला हात तोडण्याची शिक्षा स्वतःस फर्माविली, परंतु शिवाजीच्या सांगण्यावरून त्यानें अखेरपर्यंत आपल्या अंगरख्याची एक बाही लांडी ठेविली.

दादोजीचें मूळ गांव भोसल्यांच्या जहागिरींपैकीं मलठण देऊळगांव (पुणें जिल्हा) हें होय. तेथील हा कुळकर्णी. शहाजीनें त्याला निवडून पुणें प्रांताची जहागीर पहाण्यास एक हजार पागेसह नेमलें, त्याच्याच हाताखालीं सिद्दी हिलाल हा फौजदार होता. सिंहगड हा पंताच्या दिमतीस दिला होता. त्यास सुभेदार ( कलेक्टर ) किल्ले कोंढणा व मुज्मुदार सुभे जुन्नर असे अधिकार ( लष्करी व मुलकी ) होते. दादोजी हा लढण्यांतहि कमी नव्हता; बांदल व इतर देशमुख त्यानें प्रसंगीं लढाई करूनच नमविले होते. याप्रमाणें शिवाजीच्या स्वराज्यस्थापनेच्या पायाचें काम दादोजीनेंच प्रथम केलें. तो १६४७ सालीं ( मे अथवा जून ) वारल्यावर त्याचा मुलगा कृष्णाजी यासहि शिवाजीनें योग्यतेस चढविलें. [ तारीख ई शिवाजी; सप्तप्रकर्णात्मक बखर; भा. इ. मं. अहवाल; राजवाडे-शिवकालीन खंड. ]

दाद्री, त ह शी ल.—पंजाब इलाख्यांत असलेल्या जिंद निजामत व संस्थानची दक्षिण बाजूची तहशील. क्षेत्रफळ ५६२ चौरस मैल. हींत १ शहर व १८३ खेडीं आहेत. जिंद तहशिलीच्या दक्षिणेस ही तहशील असून हिच्या दक्षिणेस रोहटक नांवाची ब्रिटिश सरहद्दींतील तहशील आहे. दक्षिणेस व पश्चिमेस दुजानसंस्थान, नाभाची बावल निझामत, पतियाळाची मोहिंदरगड निझामत व लोहारु संस्थान आहे. पश्चिमेस हिसार जिल्हा असून पूर्वेस रोहटक आहे. ही कांहीं अंशीं हरिआन व कांहीं अंशीं बागडसमर्थ असून येथील हवामान उष्ण आहे व जमीन वालुकामिश्रित आहे. लोकसंख्या ( १९२१ ) ११०३१९.

गां व.—दाद्री तालुक्याचें मुख्य गांव. हें दिल्लीहून नैर्ऋत्येस ८७ मैल व जिंदहून दक्षिणेस६० मैल आहे. लोकसंख्या ( १९११ ) ५७१३. पुरातन इतिहासाची माहिती नाहीं. सन १८५७ सालीं हें झजरच्या नबाबाचा जातभाई नबाब बहादुरजंग याच्या ताब्यांत होतें. पण राजद्रोहाच्या आरोपावरून त्याच्या हातून तें काढून घेतलें. बंडांत सरकारास मदत दिल्याबद्दल जिंदच्या राजास नंतर तें इनाम देण्यांत आलें. बादशहा महमदशहाचा खजिनदार सिताराम यानें बांधलेला येथें एक सोमेश्वर नांवाचा तलाव आहे. झज्जर नबाबांच्या जुलमामुळें व्यापार अगदीं बसला. येथें चामड्याचा माल चांगला होतो व कातकामहि उत्तम होतें.

दान—आज आपली दान देण्याची इच्छा सद्बुद्धि, औदार्य, कृतज्ञता, किंवा सहानुभूति या मानसिक वृत्तीमुळें उत्पन्न होते. जंगली व रानटी जातींत याच्या अगदीं उलट स्थिति आहे. निर्हेतुक व विनमोबदला असें दान त्यांनां बिलकुल माहीत नाहीं. पाश्चात्त्य एस्किमो लोकांत हीच स्थिति आढळते. तथापि पाहुण्यांचें आदरआतिथ्य करणें ही कल्पना त्यांनां असते. पण सामान्यतः विनमोबदला दानाची कल्पना त्यांच्यामध्यें नसून कोणतीहि वस्तु दुसऱ्याला देतांना परत मोबदला मिळण्याची अपेक्षा रानटी लोक धरतात, इतकेंच नव्हे तर मोबदला काय मिळावा तेंहि ते सुचवितात. न्यू झीलंडर व अंदमानी लोकांत हा प्रकार आढळतो. देणगीचा दुसरा एक प्रकार म्हणजे दान स्वीकारणाऱ्याकडून एखाद्या कार्याची किंवा त्यापासून अलिप्त राहण्याची अपेक्षा करणें. हा प्रकार राजांनां नजराणा देण्यांत आढळतो. नजराणा देणारा इसम राजानें आपलें इष्ट करावें, कोणतेंहि अनिष्ट करूं नये, अशी अपेक्षा करतो. पौरस्त्य देशांतील, प्राचीन जर्मनींतील, मेक्सिकोमधील व इतर कांहीं देशांतील राजे अशा प्रकारें नजराणे घेतात. निरक्षेप दानबुद्धीचा इतिहास पाहिल्यास त्यांत प्रथम नातलगांनां मदत व अथितीचा सत्कार आणि नंतर पारमार्थिक कल्याणाकरितां केलेलें दान,व शेवटीं निरपेक्ष बुद्धीनें गरीब अंध व पंगू वगैरेस केलेली मदत अशा पायऱ्या आढळतात.

ग्री क व रो म न.—प्राचीन ग्रीक व रोमन लोकांत दानधर्माचे निरनिराळे प्रकार होते ते-( १ ) देवतांनां बळी, ( २ ) शत्रूला व मित्राला वळविण्याकरितां देणगी, ( ३ ) अभ्यागतांचा अतिथिसत्कार, ( ४ ) जननमरणादि संस्कारसमयीं द्यावयाचें दान, ( ५ ) वैवाहिक देणगी ( शुल्क, हुंडा वगैरे ), ( ६ ) कन्यापुत्रादि नातलगांस देणगी, ( ७ ) सरकारला जरूरीच्या वेळीं दिलेलें ऐच्छिक द्रव्यसाहाय्य, ( ८ ) मृत्युपत्रानें दिलेल्या देणग्या, ( ९ ) वार्षिक सणवारांच्या दिवशीं दिलेल्या देणग्या व ( १० ) आश्रितांस दिलेल्या देणग्या.

ख्रि स्ती.—ख्रिस्ती समाजांतील दानपद्धति यहुदी व ग्रीकरोमन पद्धतींच्या मिश्रणानें तयार झाली. '-जो मागतो त्याला द्या ' (गिव्ह टु हिम दॅट आस्केथ,) ' या वाक्यानें

जरी ज्ञानधर्माचा पुरस्कार केला असला तरी 'वो टु हिम दॅट रिसीव्हेथ' (जो घेतो त्याचें अकल्याण होवो) असेंहि वचन आहे, त्याचा उद्देश हाच कीं, ज्याला वास्तविक दान घेण्याची गरज नाहीं त्यानें तें घेतल्यास अकल्याण होईल. या विचारसरणीमुळें फक्त अंध, पंगु या गरजवंतांनाच मदत करावी असें मत रूढ झालें. पण त्याबरोबरच धार्मिक व्रत म्हणून जे लोक दारिद्र्य पत्करतील तेहि दानाला पात्र मानण्यांत येऊं लागले. त्यामुळें मध्ययुगांत या दारिद्र्यव्रताचें (व्हाऊ ऑफ पॉव्हर्टी) फार प्रस्थ वाढलें. ख्रिस्ती मठांतून (मोनॅस्टरी) अनेक स्त्रीपुरुष हें व्रत घेऊन राहूं लागले व लोक भूमिद्रव्यादि दान इतक्या मोठ्या प्रमाणांत देऊं लागले कीं मठवासी लोकांच्या श्रीमंतीच्या व चैनीच्या आयुष्यक्रमाविरुद्ध १६ व्या शतकांत मार्टिन लूथरला बंड करावें लागलें. अनाथपंगूंकरितां मोफत शाळा व हॉस्पिटलें याच काळांत मठांना जोडून काढण्यांत आलीं होतीं व त्यांत अनाथांना मदत करण्याचें काम उत्तम प्रकारें होत असे.

१६ व्या शतकापासून यूरोपीय देशांत उद्योगधंद्यांची वाढ विशेष होऊन पुष्कळ लहान गांवांचें मोठाल्या शहरांत रूपांतर झालें व शहरांच्या व्यवस्थेकरितां म्युनिसिपालिट्या स्थापन झाल्या. लवकरच अनाथसंगोपनाचें काम या नव्या संस्थांकडे गेलें. समाजसत्तावादाचा (सोशॅलिझम) उदय झाल्यावर दानपद्धतीवर त्याचा परिणाम झाला. दानपद्धतीचा उद्देश गरीबांचें वैय्यक्तिक कल्याण साधणें हा असतो, तर समाजसत्तावाद, वैय्यक्तिक विचार बाजूस सारून समाजाचें सामुदायिक हित साधणें हें ध्येय मानतो; अर्थात् दोहोंमध्यें विरोध आहे असें भासतें; पण वास्तविक तसा विरोध नाहीं. सामुदायिक हिताला बाध न येईल अशा रीतीनें वैयक्तिक हित साधलें म्हणजे त्यानेंच सर्व समाजाचें कल्याण होतें. तथापि समाजसत्तावाद्यांनीं सर्व समाजाची नव्या तत्त्वांवर नवी घडी बसविण्याचें ध्येय अंगिकारलें; तर दानपद्धतीनें नव्या तत्त्वानुसार १९ व्या शतकांत ज्या नव्या चळवळी प्रसृत केल्या त्याः-(१) तुरुंगाची सुधारणा, (२) औद्योगिक शाळा, (३) अनाथ बालकसंगोपन, (४) मजूरवर्गाकरितां चांगल्या घरांचा पुरवठा, (५) चांगल्या अन्नाचा पुरवठा, वगैरे होत.

दानपद्धतीचें सांप्रतचें स्वरूप तिला अगदीं अलीकडे प्राप्त झालें आहे. १८१९ सालीं रेव्ह. डॉ. चामर्स यानें ग्लासगो येथें स्वतःचा अनुभव म्हणून असें जाहीर केलें कीं, अनिश्चित व संकीर्ण स्वरूपांत दान देण्यानें फायद्यापेक्षां तोटाच अधिक होतो. नंतर त्यानें सरकारी अधिकाऱ्यांच्या मदतीनें नवीन दानपद्धति प्रचारांत आणली व त्याकरितां आणि अनाथ म्हणून म्हणविणारांच्या प्रत्यक्ष घरीं जाऊन त्यांची स्थिति पाहण्याचें काम स्वयंसेवकांच्या मदतीनें चालू केलें. अशा घरगुती भेटीमध्यें गरीबांना उचलून मदत न देतां त्यांच्या अंगीं स्वावलंबनानें स्वकुटुंबपोषणाचें सामर्थ्य येण्याचा मार्ग दाखविण्याचें काम करण्याचा प्रयत्न केला. त्याचा परिणाम चांगला झाला; तो असा कीं, अनाथांच्या मदतीकडे लागणारा प्रत्यक्ष खर्च बराच कमी झाला, आणि तरीहि गरीबांची दुःस्थिति त्या मानानें पुष्कळ कमी झाली. नंतर अशा प्रकारचे प्रयत्न पुष्कळ शहरांत झाले. लंडन शहरांत अशा कार्याकरितां आणि रस्तोरस्तीं भिक्षा मागत फिरण्याच्या वृत्तीला आळा घालण्याकरितां अनेक संस्था काम करूं लागल्या. १८६८ सालीं एडवर्ड डेनिसन यानें लंडनमधील गरीब लोकांची परिस्थिति निरीक्षण करून डॉ. चामर्ससारखेंच मत दिलें. तो म्हणतो, "गरीबांना मदत करणें अगदीं चूक आहे. त्यांना प्रत्यक्ष भिक्षा कोणीहि घालूं नये. त्यांच्याकरितां शाळा स्थापाव्या, बक्षिसें द्यावीं, मजूरांचे संघ स्थापावे, त्यांना स्वावलंबी होण्याचा मार्ग दाखवावा, पण प्रत्यक्ष पैसे दान म्हणून कधींहि देऊं नये" या तत्त्वानुसार काम करणारी 'चॅरिटी ऑर्गनायझेशन सोसायटी' स्थापन झाली. या तत्त्वांचा इतर देशांतहि प्रसार होऊन अशा प्रकारच्या संस्था पुष्कळ शहरांत स्थापन झाल्या. १८७९ सालीं अशा संस्थांची एक परिषद भरली होती. १९०८ सालीं त्यांची संख्या ३०० होती. अशा संस्थांमार्फत पुढील प्रकारचीं कामें चालतातः—(१) मदतीकरितां अर्ज मागविणें व प्रत्यक्ष स्थिति अवलोकन करून मदत मागणारांची लायकीनालायकी ठरविणें, (२) दानदात्यांना दान मागणारांच्या योग्यायोग्यतेबद्दल माहिती पुरविणें, (३) गरीबांना सल्लामसलत देऊन स्वावलंबनाचा मार्ग दाखविणें, (४) सार्वजनिक मदतीवर चालणाऱ्या संस्थांची व्यवस्था राखणें. असल्या तत्त्वामुळेंच बेकार मजुरांचा प्रश्न जितका राजकारण व अर्थशास्त्र यांचा तितका तो दानपद्धतीचाहि विषय होऊन बसला आहे. अमेरिकेमध्यें दानशास्त्र इतकें महत्त्वाचें होऊन बसलें आहे कीं, यासंबंधीं पद्धतशीर शिक्षण देणाऱ्या तेथें शाळा आहेत व कांहीं विद्यापीठांतून या विषयाचें उच्च शिक्षण देण्यांत येऊन त्याबद्दल पदवीहि दिली जाते.

भा र ती य.—हिंदु समाजांतील दानाचा मुख्य प्रकार ब्राह्मणांना दिलेलीं दानें हा होय. ब्राह्मणाच्या द्रव्यसंपादनमार्गांपैकीं दान घेणें (प्रतिग्रह) हा एक मार्ग आहे. तुळा (तोल) करून स्वतःच्या भारंभार सोनें किंवा रूपें देणें हा फार मोठा दानधर्म समजत असत. याप्रमाणें सुवर्णतुला केलेल्या राजांचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. जमीनी इनाम देण्याचा प्रघातहि फार होता. देवालयांनांहि पुष्कळ जमीनी देणग्या म्हणून दिल्या आहेत. वर दिलेल्या ग्रीक-रोमन लोकांतील प्रकारांपैकीं बरेचसे हिंदुसमाजांतहि रूढ आहेत.

स्वतःच्या मालकीची वस्तु दुसऱ्यास निरपेक्षबुद्धीनें देणें हा दान शब्दाचा सामान्य अर्थ होईल. दान देण्याचा प्रघात ऋग्वेद कालापासून आढळतो. ऋग्वेदांतील दान देणारे राजे व प्रतिग्रह करणारे ऋषी यांचा उल्लेख ज्ञानकोश वि...

४५८ मध्यें केला आहे. त्यावरून तत्कालीन दत्तवस्तूंचाहि बोध होईल. पुराणें व स्मृती यांच्या कालांत दातव्य वस्तूंत बरीच वाढ झाली. भूमि दान दिल्याचा वैदिक कालांत उल्लेख आढळत नाहीं. पण स्मृतिपुराणकालांत आढळतो. भगवद्गीतेंत दानाचे सात्त्विक, राजस व तामस असे तीन प्रकार दिले असून मोबदला न घेण्याच्या इच्छेनें दिलेलें दान सात्त्विक, मोबदल्याच्या इच्छेनें दिलेलें राजस व दान देण्यास अपात्र आणि दिलेल्या दानाची अवहेलना करणारा अशा मनुष्यास दिलेलें दान तामस होय. स्मृतिपुराणादिकांतून उल्लेखिलेलें दान आमुष्मिक फलप्राप्तिरूप होय. एखाद्या व्यक्तीस एखादी वस्तु देणें हेंच केवल दान नसून अग्नींत आहुति देणें याचीहि दानांतच गणना होते. स्वर्गलोकींच्या सुखप्राप्तीसाठीं करावयाच्या दानाप्रमाणेंच मृतात्म्यास प्रिय असलेल्या वस्तू ब्राह्मणास दान देण्याबद्दल शास्त्रवचनें आहेत. " जें तू दुसऱ्यास दिलेंस तेंच आपलेंसें केलेंस; बाकीचें वृथा रक्षिलेंस " अशा अर्थाचें एक वचन रूढ आहे. महाभारतांतील कर्णाचा दान देणारांत फार लौकिक होता. भरतखंडांतील प्राचीन राजांनीं अनेक गावें, जमीनी वगैरे ब्राह्मणांनां दान दिल्याबद्दल शिलालेख, ताम्रपट वगैरेंतून उल्लेख आढळतात. अशा दानास ' अग्रहार ' असें म्हणतात.

पाराशराचीं मतें विशेष विचार करण्यासारखीं आहेत. दानें देणें तें घरीं नेऊन द्यावें, असें तो म्हणतो. त्याचा अर्थ असा दिसतो कीं, खरोखर शरीरव्यंगामुळें ज्यास घराबाहेर पडवत नाहीं त्यांसच दान द्यावें. पाश्चात्य दानपद्धतीच्या आधुनिक तत्त्वांचें बीज पराशराच्या या नियमांत दृष्टीस पडतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. मोफत विद्यादानाची पद्धति हिंदूंमध्यें फार प्राचीन आहे. सार्वजनिक मोफत रुग्णालयें नसलीं तरी गरीबांनां मोफत औषधें देऊन पुण्य जोडण्याचें कार्य वैद्यवर्ग करीत असे. बेकारांनां काम पुरविणाऱ्या किंवा अनाथ अर्भकांचें संगोपन करणाऱ्या स्वतंत्र संस्था मात्र निर्माण झाल्या नाहींत. सांप्रत पाश्चात्यांच्या परिचयामुळें पाश्चात्य दानपद्धतींचीं तत्त्वें व संस्था यांचा अंगीकार आपण करीत आहों. तथापि आपल्याकडे दानशास्त्र प्रगत नाहीं याचा कोणी विचारच करीत नाहीं. त्यामुळें अनेक धर्मादाय फार अव्यवस्थितपणें चालले आहेत. धर्मादायसंस्था कार्यक्षम राहिल्या नाहींत याचें थोडेसें दिग्दर्शन पांचव्या विभागांत ( पृ. ६५८ ) केलेंच आहे. [ एल्. मास्टरमन-चामर्स ऑन चॅरिटी; टी. मॅके-मेथड्स् ऑफ सोशल रिफार्म; सी. एच्. हेंडरसन-मॉडर्न मेथड्स् ऑफ चॅरिटी; ॲमॉस जी वॉर्नर-अमेरिकन चॅरिटीज्; इ. टी. डिव्हाईन-दि प्रॅक्टिस ऑफ चॅरिटी. ]

**दानव**—याचा सामान्य अर्थ देवशत्रु. दैत्य असा आहे, पण दनु, दानु किंवा दानव हा शब्दहि नाग, गोप वगैरे शब्दांप्रमाणें विशिष्ट लोकांचा वाचक असावा. रावणाची बहीण कुंभनसी ही मधु नांवाच्या एका दानवास दिली होती. तेव्हां राक्षसांचा व दानवांचा शरीरसंबंध होत असे असें वाटतें. राक्षस, दानव व असुर हे तिन्ही लोक मूळचे निरनिराळे होत. पुढें संस्कृत भाषेंत हे एकाच अर्थी वापरण्यांत येऊं लागले. दानु शब्द दारु असाहि होऊन पुढें द्रविड शब्दाची प्रकृति झाली असावी असें स्थूल अनुमान आहे. दारु शब्द संस्कृतांत लांकडास लाविला जातो, तेव्हां दानु किंवा दारु हे मूळचे जंगली लोक असण्याचा संभव आहे. नाग हे असे मूळचे डोंगरी ठरतात, गोप हे फिरते ठरतात तसे वानर व दानव हे जंगली ठरतात. "दैत्य" पहा. [ वि. वि. पुस्तक. २३ पान ५३ ].

**दानियल मिर्झा** ( सुलतान )—अकबर बादशहाचा हा तिसरा मुलगा, ता. १० सप्टेंबर १५७२ रोजीं अजमीर येथें जन्मला. शेख जातीच्या दानियल नामक एका प्रसिद्ध दरवेशाच्या घरीं याचा जन्म झाल्यामुळें त्यास दानियल असें नांव प्राप्त झालें. त्याची आई ही राजा बिहारी मल्ल कच्छवाह याची मुलगी होती. हा फार दारूबाज होता. सुलतान मुरादच्या मृत्यूनंतर अकबरानें दानियल यास निजामशाही जिंकण्याकरितां बरोबर मोठी फौज देऊन दक्षिणेंत पाठविलें. इ. स. १६०० मध्यें मोंगलांनीं अहमदनगरचा किल्ला घेतला. ता. ८ एप्रिल १६०५ रोजीं, बऱ्हाणपूर येथें सुलतान दानियल हा मद्यपानाच्या अतिरेकामुळें मरण पावला. याच्या मृत्यूची वार्ता ऐकून, दिवसेंदिवस क्षीण होत चाललेल्या अकबर बादशहास मोठा धक्का बसला. अकबराची त्याच्यावर फार प्रीति होती त्यामुळें त्याची प्रकृति अधिकच बिघडून दीड वर्षाच्या अवधींतच तो मृत्यू पावला. आपल्या पश्चात दानियल यास दिल्लीची गादी मिळावी अशी अकबराची इच्छा होती. खानदेशास त्यानें दानदेश असें नांव दिलें होतें. दानियल हा वऱ्हाड व खानदेश येथील सुभा होता. त्याचें लग्न विजापूरच्या आदिलशहाच्या मुलीशीं पैठण येथें झालें होतें. हिच्याशिवाय जानबेगम नांवाची त्याची एक बेगम होती. तीस तहमूर, बायसंगर व हुशंग असे ३ पुत्र व ४ मुली झाल्या; पैकीं मुलांस पुढें शहाजहाननें ठार मारिलें. [ पातशहानामा, ऐने-इ-अकबरी. ]

**दानिष्मंदखान**—महंमद शफी अगर मुल्ला शफी असें याचें मूळनांव असून हा एक इराणी व्यापारी होता. १६४६ सालीं हा सुरतेस व्यापाराकरितां म्हणून आला. नंतर शहाजहान बादशहानें त्यास आपल्या पदरीं ठेवून घेतलें. पुढें थोड्याच काळांत त्यास तीन हजारांची मनसब व दानिष्मंदखान असा किताब मिळाला. औरंगझेबाच्या कारकीर्दींत तर ह्यास पांच हजारांची मनसब देण्यांत येऊन त्यास शाहाजहानाबादचा सुभेदार नेमण्यांत आलें. १६७० सालच्या जुलै महिन्यांत शाहजहानाबाद येथेंच तो मरण पावला. ख्रिस्ती धर्मांतील तत्त्वांची यास ओळख

होती असें दिसतें. फ्रेंच प्रवासी बर्नियर यानें आपल्या प्रवासवृत्तांत दानिर्म्मंदखानचा उल्लेख केला आहे [ बील ].

**दापोली**, ता लु का.—मुंबई इलाख्यांतील रत्नागिरी जिल्ह्याचा वायव्येकडील एक तालुका. क्षेत्रफळ सुमारें ५०० चौ. मैल. मण्डणगड पेट्याचाहि ह्यांत समावेश होतो. दापोली व हर्णई ही दोन गांवें असून२४३खेडीं आहेत. लोकसंख्या सुमारें १६० हजार. समुद्रकांठच्या खेड्यांत लोकवस्ती वरीच दाट असते.हर्णई हें किनाऱ्यावरच असून त्यासमोरच किल्लेवजा सुवर्णदुर्ग नांवाचें बेट आहे. एकंदर तालुका समुद्रकिनारा सोडतां रुक्ष व खडबडीत आहे. कांहीं कांहीं ठिकाणीं पूर्व भागांत सागवान लांकूड सांपडतें. हवामान समशीतोष्ण असून आरोग्यदायक आहे. पाऊस दापोली येथें १३१ इंच व मण्डणगड येथें १६६ इंच पडतो.

गां व.—दापोली तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें समुद्रतीरापासून ५ मैल दूर आहे. लोकसंख्या सुमारें तीन हजार आहे. १८१८ सालीं दापोली हें दक्षिण कोंकणाचें लष्करी ठाणें करण्यांत आलें होतें. पण १८५७ सालीं सर्व सैन्य तेथून नेण्यांत आलें. येथें मिशन हायस्कुल व सबॉर्डिनेट जज्जाचें कोर्ट आहे.

**दाम**—मुंबई इलाख्यांत महिकांठामधील एक लहानसें संस्थान. यांत दहा गांवें असून क्षेत्रफळ ८४०० एकर आहे. दामाचे मिया मकवान कोळी जातीचे असून त्यांनीं मुसुलमानी धर्म स्वीकारलेला आहे. त्यांना गायकवाडसरकारला घांस–दाणा द्यावा लागतो.

**दाभाडे**—पुणें जिल्ह्यात दाभाड्याचें तळेगांव म्हणून एक गांव आहे; तेथें राजाराम छत्रपतीचा सेनापति खंडेराव दाभाडे याचा वंश आहे. खंडेराव हा या गांवचा मूळचा पाटील होता. त्याचें त्याच्या पूर्वजांसह चरित्र ज्ञानकोशाच्या ११ व्या विभागांत आलें आहे.

त्रि ं व क रा व दा भा डे—खंडेरावाची मुदत संपल्यावर पुढील वर्षाच्या मे महिन्यांत त्याचा मुलगा त्रिंबकराव यास शाहूमहाराजाकडून सेनापतीचीं वस्त्रें मिळालीं. त्यानंतर थोड्याच दिवसांनीं गुजराथच्या मोहिमेवर त्याची रवानगी झाली. इकडे बाजीराव पेशवे यास शाहूनें माळव्यांत मुलुखगिरीकरितां पाठविलें.

इ. स. १७२९ मध्यें सरबुलंदखानापासून मराठ्यांस गुजराथच्या चौथ व सरदेशमुखीच्या सनदा मिळाल्यावर त्या प्रांताचा मोकासा दाभाड्यास देण्यांत आला, व सरदेशमुखीचा कांहीं अंश गोळा करण्याचें कामहि त्याकडेच सोंपविलें. परंतु बाजीरावानें गुजराथच्या कारभारांत ढवळाढवळ करावी, ही गोष्ट दाभाड्यास मुळींच न रुचून या दोन मराठा सरदारांत कायमचें वैमनस्य आलें. पुढें दोघांनींहि ही गोष्ट शाहूच्या कानांवर घालून त्याची आज्ञा विचारली. शाहूनें आज्ञा केली कीं, बाजीरावास माळव्याची मोहीम सांगितल्यामुळें त्यावर त्यानेंच अंमल करावा, मात्र त्रिंबकराव यानें जिंकलेल्या गुजराथेंत ढवळाढवळ करूं नये. यामुळें बाजीराव निरुत्तर झाला. परंतु दाभाड्याच्या मनांत बाजीरावाविषयीं मत्सर उत्पन्न झाला असल्यानें त्यानें सैन्याची जमवाजमव करून राज्याचें रक्षण करण्याकरितां आपण जातों असा उद्देश जाहीर करून तो दक्षिणेंत निघाला. कंठाजी व रघूजी कदम बांडे, उदाजी व आनंदराव पवार, चिमणाजी मोघे, वगैरे सरदार त्यास सामील झाले व दक्षिणेंत आल्यावर निजामहि त्यांस येऊन मिळणार होता. त्रिंबकरावानें निजामाशीं सख्य केल्याचें बाजीरावानें शाहूस सिद्ध करून दाखविलें. तरीहि पेशव्यानें लढाईला प्रत्यक्ष सुरवात होईपर्यंत दाभाड्याशीं तहाचें बोलणें सुरू ठेविलें होतें. बाजीरावाजवळ दाभाड्याच्या अर्धें देखील सैन्य जमलें नसतांहि मोठमोठ्या मजला करून त्यानें दाभाड्याच्या सैन्यास गुजराथेंतच डभई व बडोदें यांच्या दरम्यान गांठलें ( १ एप्रिल १७३१ ). पहिल्याच हल्ल्याबरोबर त्रिंबकरावाच्या सैन्यांतील नवशिक्या सैनिकांनीं पळ काढला तरी, त्रिंबकराव मोठ्या शौर्यानें लढत होता. परंतु त्याला अकस्मात् एक गोळी लागून तो ठार झाला. तेव्हां त्याची सर्व फौज पळून गेली. दाभाड्याकडील मालोजी पवार, पिलाजी गायकवाडाचा एक पुत्र वगैरे मंडळी ठार होऊन उदाजी पवार व चिमणाजी मोघे हे कैद झाले. आनंदराव पवार व पिलाजी गायकवाड हे जखमी झाले, परंतु ते पळून गेले. अशा रीतीनें बाजीरावाचा जय झाला.

त्रिंबकरावास यशवंतराव नांवाचा एक अल्पवयी मुलगा होता. बापाच्या मरणानंतर त्याला सेनापतीचीं वस्त्रें मिळाल्यावर त्याच्या पालकत्वाचें काम त्याची आई उमाबाई हिजकडे आलें; व पिलाजी गायकवाड त्याच्या मुतालकीच्या जागीं कायम झाल्यामुळें सेनापतीचें सर्व कामकाज पाहूं लागला. अतःपर पेशवे व दाभाडे यांच्यामध्यें भांडणास जागा राहूं नये म्हणून, शाहूनें गुजराथचा सर्व कारभार दाभाड्याकडे सोंपवून, त्यानें त्या प्रांताच्या वसुलाचा अर्धा हिस्सा पेशव्यांमार्फत सरकारतिजोरींत भरणा करावा असें ठरविलें. इतर स्वाऱ्यांमध्यें मिळालेला पैसा मात्र खर्च वजा जातां राजाच्या स्वाधीन करण्यांत यावा असा करार होता ( १७३१ ). पण हा करार दाभाड्यांनीं पुरापुरा कधींच पाळला नाहीं,असें असतांहि शाहूच्या पश्चात नानासाहेब पेशव्यानें अर्ध्या गुजराथच्या सनदा यशवंतरावाच्या नांवें करून दिल्या ( १७५० ).

बा बू रा व.—त्रिंबकरावाच्या मृत्यूनंतर सेनापतीचीं वस्त्रें शाहूनें यशवंतराव दाभाड्यास दिलीं. त्याचप्रमाणें यापुढें पेशवे आणि दाभाडे यांच्यामध्यें वितुष्ट राहूं नये म्हणून शाहूनें स्वतः दाभाड्यांच्या गांवीं ( तळेगांव ) येऊन त्रिंबकराव, यशवंतराव व बाबूराव दाभाडे यांची मातोश्री उमाबाई दाभाडे हिची भेट घेतली; व शाहूनें तिची समजूत केली कीं, बाजीराव हा तुझाच पुत्र आहे असें समजून याला

तूं क्षमा कर आणि यापुढें तुझ्या पुत्रांनीं व बाजीरावानें एक चित्तानें रहावें असें कर.

सातान्यास परत आल्यावर शाहूनें यशवंतराव आणि बाबूराव दाभाडे व बाजीराव बल्लाळ यांस बोलवून त्यांचेंहि सख्य करून दिलें. यशवंतरावाच्या ठिकाणीं बाबूरावाची दृढभक्ति असून शाहूनें त्यास देऊं केलेलीं सेनाखासखेलीचीं वस्त्रें त्यानें प्रथम नाकारलीं. परंतु शाहूनें अत्यंत आग्रहपूर्वक हीं वस्त्रें त्यासच देऊन शिवाय हत्ती, घोडा, शिरपेंच, कंठी वगैरे देऊन त्याचा मोठा गौरव केला. हा बाबूराव पुढें फार पराक्रमी निघाला व त्यानें अनेक पराक्रमाचीं कृत्यें करून मोठा लौकिक संपादन केला यशवंतराव हा दुर्व्यसनी व दुर्बळ होता. पुढें शाहूनें बाबूरावास सुरतेच्या मोहिमेवर पाठविलें; याप्रसंगीं बाबुरावानें मोठ्या शिताफीनें अगदीं थोडया सैनिकांनिशीं सुरतेच्या नवाबास गांठून त्यास अटकेंत ठेविलें आणि त्याच्यापासून सुरतेच्या अठ्ठावीस महालांपैकीं चौदा महालांच्या व चौथाईच्या सनदा छत्रपतींच्या नांवें करून घेतल्या. इतक्यांत यशवंतरावहि मोठें सैन्य घेऊन सुरतेस आला. हें पाहून नवाबानें तहनाम्यांतील अटी तावडतोब पुन्या करून दिल्या, व या उभयतां बंधूंस मौल्यवान पोषाख दिला.

यशवंतराव आणि बाबूराव यांनीं परत निघतेवेळीं, खुद्द सुरतेस आपला एक अम्मलदार ठेवून सुरत अठ्ठाविशीपैकीं मिळविलेल्या १४ महालांचा व खानदेशांत जो प्रांत त्यांच्या ताब्यांत आला होता त्याचा नीट रीतीनें बंदोबस्त लावण्याची योजना केली. या सुरतेच्या पराक्रमाबद्दल शाहूनें बाबूराव दाभाड्यास सोन्याचा तोडा आणि पांच लाख रुपयांची जहागीर वंशपरंपरेनें करून दिली. कांहीं महिन्यांनीं गुजराथेंत पुन्हां बंडाळी माजली. दाभाडयांचें कोणी माणूस गुजराथेंत नाहीं व सर्व अंमल मुखत्याराच्या मार्फत चालला आहे ही संधि पाहून जोरावरखां नबाबी नामक अमदाबादच्या मुसुलमान ठाणेदारानें दाभाडयांचीं ठाणीं हळू हळू उठविण्याची खटपट चालविली. हें समजतांच यशवंतराव व बाबूराव यांस अमदाबादेच्या स्वारीवर पाठविलें. या स्वारीबरोबर उमाबाई हीहि होती. दाभाडे आपल्यावर येत आहेत असें पाहून जोरावरनें जय्यत तयारी केली. त्याचें बहुतेक सैन्य कडव्या पठाणांचें असून चांगलें कवायती होतें. लढाईस सुरवात होऊन दोन्हींकडील मिळून सुमारें १५०० लोक पडले. अखेर दाभाडयांचा जय होऊन जोरावरचा पूर्ण पराभव झाला. दाभाडयांच्या फौजेनें अमदाबादेस आपलीं ठाणीं बसवून सर्वत्र शांतता केली आणि गुजराथेचा सर्व बंदोबस्त आपला विश्वासू नोकर पिलाजी गायकवाड यास सांगून व खुद्द अमदाबादेस अप्पाजी गणेश यास ठेवून ते परत आले. या पराक्रमाबद्दल खूष होऊन शाहूनें सोन्याचे दोन तोडे करून उमाबाईच्या पायांत घातले व तेव्हांपासून या घराण्यांतील स्त्रियांस पायांत सोन्याचे तोडे घालण्याचा अधिकार परंपरेनें करून दिला. हा अधिकार फक्त छत्रपतींच्या राणीचा असतो.

अमदाबादेवरील स्वारी हें बाबूरावाच्या आयुष्यांतील शेवटचेंच कृत्य होय. यानंतर खानदेशांतील सत्तेंत कांहीं बखेडा झाला म्हणून बाबूराव हा तिकडील बंदोबस्ताकरितां चालता झाला. एकदां त्याची स्वारी मौजे रामेश्वर देवळे येथें असतां त्या मुक्कामीं त्याच्यावर विषप्रयोग करण्यांत येऊन त्याला ठार मारण्यांत आलें. बाबूरावाच्या मृत्यूनंतर दाभाडे घराण्यांत नांव घेण्यासारखा कोणीहि शूर पुरुष अगर मुत्सद्दी झाला नाहीं. यांचा वंशज सांप्रत तळेगांव येथें नांदत आहे. [ दाभाडे घराण्याची हकीकत; शाहूची बखर; पेशव्यांची बखर; राजवाडे खं. ३. ]

**दाभोळ**—मुंबई इलाखा, रत्नागिरी जिल्हा, दापोली तालुक्यांतील एक बंदर. लोकसंख्या (१९०१) ४४१२. एकेकाळीं दाभोळ ह्या गांवास ऐतिहासिक महत्त्व असून १४, १५ व १६ व्या शतकांत दक्षिण कोंकणांतील दाभोळ हें मुख्य बंदर होतें व येथून तांबडया समुद्रांतील बंदरांशीं व्यापार चालत असे. दक्षिण कोंकणांत एकच प्रसिद्ध असलेली ' सारासिन ' पद्धतीची येथें एक मशीद आहे. इ. स. ५५०–७८ मध्यें बांधलेलें चंडिकाबाईचें येथें एक देवालय आहे. यूसफ आदिलशहाच्या वेळीं विजापूरच्या राज्यांतील एका प्रांताचें दाभोळ हें मुख्य ठिकाण होतें व या प्रांतांत सावित्री नदीपासून तों देवगड किल्ल्यापर्यंतच्या सर्व प्रदेशाचा समावेश होत असे. म्हणजे सध्याचा रत्नागिरी जिल्हाच तो होता म्हटलें तरी चालेल. शिवाजीनें हें १६६० सालीं काबीज केलें व तें आपल्या आरमाराचें एक ठाणें केलें; शिवाय मुलकी खात्यांत दाभोळ हा एक सुभा केला. दाभ्य जंगल किंवा दाभिलेश्वर या नांवावरून हें नांव पडलें असावें असें वाटतें. सध्यां दाभोळ येथून आसपासच्या समुद्रकिनाऱ्याशीं व्यापार चालतो. १९०३–०४ सालीं १५ लाख रुपयांचा माल बाहेर गेला व १७लाखाचा आंत आला. पोलकेश्वर पॉईन्टवरील दीपगृहांतून १५ मैल लांब उजेड पडतो. स. १६८० सालीं( श्रावणांत ) येथें मोत्यांची वृष्टि झाल्याचा एक उल्लेख आढळतो।

**दाम**—हें एक तांब्याचें छोटेंसें नाणें होतें. त्याचें प्रमाण निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळें ($\frac{1}{2}$ आणा, $\frac{1}{4}$ आणा $\frac{1}{8}$ आणा ) आढळतें. प्राचीन द्रम्म नाणें हेंच बहुधा दाम असावें. मध्ययुगांत हिंदुस्थानांत द्रम्म नाणें होतें; त्याचे दोन प्रकार होते. आदिवराह द्रम्म व विग्रहपाल द्रम्म. आदिवराह हा कनोजचा प्रतिहार भोजराज होय. सियाडोणी शिलालेखांत या द्रम्मांचा उल्लेख येतो ( ९०३ ). द्रम्म हा शब्द, अर्थात् तें नाणेंहि परकीय होतें असें चिंतामणराव वैद्य म्हणतात ( म. भा. पु. २ ). वरील काळीं अर्धद्रम्म असेंहि एक नाणें होतें. वैद्यांच्या मतें $\frac{1}{20}$ रुपाया म्हणजे दाम. दिवाळखोराच्या शिल्लकी पैशांत त्याच्या सावकारांना

ज्या विभागणीनें वांटा मिळतो त्या पद्धतीस दामाशाई असें म्हणतात.

**दामाजीपंत**—एक साधु पुरुष. रा. राजवाडे यांनां सातारकर महाराजांच्या दप्तरांत महजर सांपडला, त्यामध्यें शहरांत व खेड्यांत महारांनां कोणकोणते हक्क पूर्वापार आहेत त्याची याद दिलेली आहे. मूळ महजर बेदरची पातशाहत असतांना झाला व तो दामाजीपंत मंगळवेढेकर याच्या हातचा होता. महजरांतील हकीकतीवरून असें दिसतें कीं मंगळवेढ्यास दामाजींपंत कमाविसदार असतांना, विठ्या नांवाचा एक सधन महार मंगळवेढ्यास होता. दामाजीपंताच्या कारकीर्दीत दुर्गादेवीचा ( १४६८–७५ ) दुष्काळ पडला. त्यावेळीं दामाजीनें सरकारी कोठारें लुटविलीं. त्या काळीं वसूल धान्याच्या रूपानें घेत असत व धान्य विकून येईल तो पैका रसद म्हणून राजधानीस पाठवीत.

कोठारें लुटविल्याचें चुगलखोरांनीं बेदरास कळविलें. दामाजीजवळ रसद भरण्यास पैका नव्हता. रसदीकरितां बादशहाचें धरणें पंतावर आलें. पंत विवंचनेंत पडले. त्यावेळीं गांवांतील विठू महारानें आपल्या बापजाद्यांनीं पुरून ठेवलेलें किंवा इतर कोणत्या तरी कारणांनीं जमा केलेलें द्रव्य घेऊन बेदरास जाऊन रसद भरली व पावती पंतास आणून दिली. विठ्यानें परमेश्वरी प्रेरणेनें हें काम केलें. अशी ऐतिहासिक हकीकत प्रस्तुत महजरावरून उपलब्ध होते. हा एकंदर गोष्टींतला प्रकार यद्यपि वास्तविक तथापि आश्चर्योत्पादक असल्यानें अनेक कवींनीं लाघव करून या ऐतिहासिक हकीकतीला आपल्या कल्पनेनें काव्यरूप दिलें. भगवान श्रीविठ्ठल यानें महाराचें रूप घेऊन दामाजीची रसद भरली व मग तो गुप्त झाला, ही काल्पनिक हकीकत वरील ऐतिहासिक हकीकत उपलब्ध झाली नसती तर आहे तशीच रूढ राहिली असती. दामाजीचें थोडें काव्य प्रसिद्ध आहे. [ भा इ. सं. चतुर्थ संमेलनवृत्त. ]

**दामोदर**—एक भारतीय ज्योतिषी. याचा भटतुल्य नांवाचा ग्रंथ आहे. दामोदराच्या पित्याचें नांव पद्मनाभ होतें व गुरुहि तोच होता. दामोदराचा ग्रंथ शके १३३९ मधील आहे. या ग्रंथांत दामोदरानें अयनगति वर्षास ५४ विकला घेतली आहे. [ भारतीय ज्योतिःशास्त्र. ]

**दामोदर नदी**—बंगाल्यांतील एक नदी. हिचा छोटानागपूरमध्यें उगम झाला आहे. लांबी ३६८ मैल. ही बरेच वळसे व वळणें घेऊन हुगळी नदीस जाऊन मिळते. या नदीचे दोन फांटे असून एक पलामाऊ जिल्ह्याच्या तोरी परगण्यांतून वहात असून दुसरा हजारीबागच्या वायव्येकडून वहातो. पुढें जवळच हे दोन्ही प्रवाह एक होत असून नंतर तीस कुसुर, जमुनिआ वगैरे नद्या येऊन मिळतात. मानभूम जिल्हा संपतां संपतां तीस बराकर ही नदी येऊन मिळते. यापुढें या नदीस महत्त्वाचें स्वरूप येतें. बराकर येऊन मिळाल्यानंतर ही नदी आग्नेय दिशेनें वहात जाते व बरद्वानच्या असनसोल पोटविभागाची बान्कुरा जिल्ह्यापासून विभागणी करून पुढें बरद्वान जिल्ह्यांतून वहाते. जुजोटी येथें या नदीचें एडन कालव्याकरितां पाणी घेतात. बरद्वान गांव सोडल्यानंतर ही नदी दक्षिणेकडे वहाते. नदीचा पूर्वार्ध प्रवाह अगदीं जोराचा आहे. यामुळें बराच गाळ प्रवाहाबरोबर आणला जातो. हजारीबागजवळील संगमाजवळ नदीची उंची समुद्रसपाटीपासून १३२६ फूट आहे. दक्षिण बरद्वान व हुगळीमध्यें नदीचा जोर इतका जोराचा नाहीं. हुगळी नदीस ही नदी कलकत्त्याच्या खालीं ३५ मैलांवर फल्टा येथें मिळते. दामोदरनदी हुगळी नदीस पूर्वी कलकत्त्याच्यावर ३९ मैलांवर नया सराई येथें मिळत असे. दामोदर नदीस कधीं कधीं जोराचा पूर एकदम येतो व त्यामुळें बरद्वान जिल्ह्याची फार नुकसानी होते. १८२३ व १८५५ सालीं नदीकांठचीं गांवेंच्या गांवें वाहून गेलीं आहेत. सन्ताल लोक दामोदर नदीस पृथ्वीवरील सर्व नद्यांत फार मान देतात.

**दारव्हा**, ता लु का.—वऱ्हाडांतील यवतमाळ जिल्ह्याचा एक तालुका. क्षेत्रफळ १०६४ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) १८१२८१. खेडीं ३३९ व दारवा व दिग्रस हीं दोन गांवें आहेत. १९०३–०४ सालीं उत्पन्नाचा अंदाज २९१००० रुपये होता. हा तालुका बालाघाट म्हणजे वऱ्हाडच्या दक्षिण डोंगर सपाटींत आहे. जिल्ह्यांतील इतर तालुक्यांपेक्षां हा सुपीक आहे.

गां व.—दारव्हा तालुक्याचा मुख्य गांव. लोकसंख्या ( १९११ ) ३९१० .पूर्वी येथें साबाजी भोंसले रहात असे. सी. पी. रेल्वेचा मूर्तिजापूर–यवतमाळ फांटा यावरून जातो. येथें तहशील कचेरी, दिवाणीकोर्ट व एक शाळा आहे.

**दारा शिकोह**—शहाजहान पातशहाचा वडील व आवडता पुत्र. याचा जन्म मार्च १६१५. नूरजहानचा भाऊ आसफखान वजीर याची मुलगी अर्जुमंदबानू उर्फ मुम्ताज महाल ही दाराची आई. दारास सुलेमान शिकोह व सिपिहर शिकोह अशीं दोन मुलें होतीं. दाराचे तिन्ही ( धाकटे ) भाऊ त्याचा द्वेष करीत. आपल्यामागें आपल्या चौघा मुलांत यादवी माजेल अशी शहाजहानास भीति वाटे; म्हणून त्यानें फक्त दारासच वारस ठरविलें व तो वडील असल्यानें हक्कानें वारस होताच. दारास पातशहा नेहमीं जवळ ठेवी व त्याला पदव्या, बक्षिसें देई. चाळीस हजारी मनसब त्याला त्यानें दिली होती. दरबारीं नेहमीं राहिल्यानें दाराला लढाईतील डावपेंच माहीत नव्हते म्हणून पुढें झालेल्या औरंगझेबाबरोबरच्या लढायांत त्याचा सतत पराभव झाला. दारानें सर्व धर्मांचा अभ्यास करून त्यांनां तो सारखे लेखी; औरंगझेबानें हेंच कारण करून त्यास नास्तिक ठरवून पुढें त्याचा खून

शहाजहान अपस्मारानें आजारी पडला (१६५७) असतां दारानें आपल्या इतर भावांचा बंदोबस्त करण्यास प्रारंभ केला. इतक्यांत औरंगझेब दख्खनमधून निघून मुरादसह उत्तरेकडे निघाला. दाराचा सेनापति यशवंतसिंह व त्याची गांठ उज्जनीजवळ पडली. यशवंतसिंहाच्या हलगर्जी-पणानें त्याचा पराभव झाला. तिकडे सुजानें बंगाल्यांत तयारी केली व दारावर चालून आला, त्याच्यावर दारानें सुलेमान शिकोह यास पाठविलें, त्यानें त्याचा बनारसजवळ पराभव केला; इकडे औरंगझेब मुरादसह आग्र्याकडे येत होता. त्यावर दारा स्वतः गेला; या सामूगडच्या लढाईत प्रथम दाराचा जय झाला, परंतु त्याचा सेनापति खलील यानें विश्वासघात करून औरंगझेबास मदत केल्यानें अखेर दाराचा पराभव होऊन तो आग्र्यास पळाला (मे १६५८). औरंगझेब थेट आग्र्यास येऊन त्यानें शहाजहानास कैदेंत टाकून तख्त बळकाविलें नंतर दारा हा आग्र्याहून पळून दिल्ली, लाहोर (जुलै), मुलतान, सक्कर इकडे पळाला (सप्टेंबर). त्याच्या पाठोपाठ औरंगझेब लागला. हळू हळू दाराचें सैन्य कमी कमी झालें, शिवाय पुष्कळसें औरंगझेबानें फितूर करून फोडलें. शिवाय दाराचा उजवा हात दाऊदखान हा आपल्यास मिळाला असें एक खोटेंच पत्र तयार करून औरंगझेबानें दाराच्या मनांत दाऊदबद्दल संशय काढविला. पुढें सुजा आग्र्यावर येत होता म्हणून औरंगझेब तिकडे गेला व दारावर खलीलखानास (दाराचा पहिला सेनापति) नेमिलें. यानंतर दाराची स्थिति फार निकृष्ट झाली. तो सारखा पळत होता व त्याचें सैन्यहि कमी होत चाललें. त्यानें सक्कर, नंतर भक्कर, लारखाना व तेथून शिविस्थानहून निघून टट्टा गांठलें. यावेळीं त्याच्या तिन्ही बाजूंस व सिंधूच्या दोन्ही कांठांवर शत्रु होता; परंतु त्यांना हुकांडी देऊन सिंधूनदांतून त्यानें पळ काढला व कच्छच्या रणांतून गुजराथेंत शिरला (नोव्हेंबर). अहमदाबादेस तेथील सुभेदार त्याला मिळाला. त्याच्या साहाय्यानें बरीच फौज जमवून दारानें यशवंतसिंहाच्या मदतीकरितां अजमीरकडे प्रयाण केलें. इतक्यांत औरंगझेबानें यशवंतसिंहास फोडलें व दाराच्या तोफखान्यावरील सर्व अधिकारीहि फितूर केले. त्यामुळें देवराईघांटांतील लढाईंत जरी दारा मोठ्या शौर्यानें लढला तरी अखेर औरंगझेबानें त्याचा पराभव केला व तो गुजराथेकडे पुन्हां पळाला (मार्च १६५९). परंतु अहमदाबाद औरंगझेबानें आधींच घेतल्यानें मधूनच वळून दारा कच्छकडे गेला. त्यावर्षी दुष्काळ असल्यानें त्याचे लोक फार मेले. त्याच्यामागें औरंगझेबाचे लोक लागलेच होते. कच्छहून निघून सिंधमधून शिविस्थानांत दारा गेला. तेथून तो कंदाहारमार्गें इराणांत जाणार होता. इतक्यांत त्याची आवडती बेगम नादिराबानू ही एकाएकीं मेली. तिच्या इच्छेप्रमाणें तिचें प्रेत लाहोरास पुरण्यासाठीं पाठविलें व यावेळींच दारानें एक घोडचूक केली. त्या प्रेतावरोबर त्यानें आतां-पर्यंत जवळ असलेले अत्यंत विश्वासु असे सारे शिपाई पाठविले. नंतर बोलनघाटांतून पलीकडे जात असतांना दादरच्या मलीक जीवन या जमीनदाराच्या घरीं तो निःशस्त्र व एकहि शिपाई न घेतां रहावयास गेला. शहाजहानच्या कारकीर्दीत दारानें याच मलीकचा जीव एकदां वाचविला होता. परंतु तें सारें एकीकडे ठेवून मलीकनें विश्वासघात करून दारास पकडून औरंगझेबाचा सेनापति बहादूर याच्या स्वाधीन केलें. यावेळीं फक्त दाराच्या लहान मुलानें (सिपिहर शिकोह) प्रतिकार केला, पण तो फुकट गेला (२३ जून.).

बहादूरनें दारास दिल्लीस औरंगझेबाच्या स्वाधीन केलें (२३ आगष्ट). औरंगझेबानें दारास एका हत्तिणीच्या पाठीवर उघड्या हौद्यांत बसवून साऱ्या शहरभर त्याची धिंड काढिली. हौद्यांतच चौदा वर्षांचा सिपिहर होता व त्या बापलेकांच्या मागें त्यांचा मारेकरी नागवी तरवार घेऊन होता. दाराबद्दल त्यावेळीं शहरच्या लोकांनीं जी अतिशय सहानुभूति दाखविली ती बर्निअरनें उत्तम वर्णिली आहे. रात्रीं खाजगी दरबार भरवून औरंगझेबानें दारा हा नास्तिक, धर्मलंड व राज्यास अपायकारक असल्यानें त्याला मृत्यूची शिक्षा दिली. यावेळीं दारानें त्याला एक दयेच्या याचनेचें पत्र लिहिलें. परंतु त्याचा उपयोग झाला नाहीं. रात्रीं खवासपुरा महालांत औरंगझेबानें नजरबेग-कडून दाराचा खून करविला (२९ आगष्ट). त्यावेळींहि दारानें उशींत लपविलेल्या चाकूनें एका गुलामाला ठार केलें. दुसऱ्या दिवशीं दाराच्या धडाची मिरवणूक काढून धर्मविधि मुळीच न करतां त्याचें दफन हुमायूनच्या कबरींत केलें व मस्तक शहाजहानला नजर केलें. सिपिहरला ग्वालेरीच्या किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. सुलेमाननें औरंगझेबाच्या फौजेशीं तोंड दिलें पण त्याचा पराभव झाल्यावर तो काश्मीरच्या राजाच्या आश्रयास गेला. त्याला त्यानें दगाबाजीनें औरंगझेबाच्या स्वाधीन केलें (स. १६७०); त्यालाहि ग्वालेरीस ठेविलें. कांहीं दिवसांनीं औरंझेबानें त्यांना विषप्रयोग केला.

दारा विद्वान होता; त्यानें महमद पैगंबराचें सफीनत-उल-औलिया नांवाचें एक चरित्र लिहिलें आहे. तसेंच हिंदु व मुसुलमान दोन्ही धर्मांची एकवाक्यता सिद्ध करणारा मज्मा-उल-बहरैन ग्रंथ लिहिला. त्यानें बहुतेक उपनिषदांचीं फारशी भाषांतरें केलीं. त्याच्या दरबारीं सर्व धर्मांचा सारखाच आदर होई. या औपनिषदीय भाषांतरास सर्र-इ-असरार (गुह्यागुह्यतरं) हें नांव आहे. यामुळेंच औरंगझेबानें त्याला काफीर व राफीझी (नास्तिक) ठरवून त्याच्याविरुद्ध त्याचें मुसुलमानी सैन्य उठविलें. दारा कवीहि होता. त्याचें काव्यनाम कादिरी असें होतें. [ टर्कर्स इन् इंडिया: यदुनाथ सरकार; स्टॅन्ले लेनपूल; बील. ]

**दारुहळद**—यास संस्कृतमध्यें दारुहरिद्रा व लॅटिनमध्यें मॉरिंडा अंगुस्तिफोलिया म्हणतात. हें नेहमीं हिरवें

गार दिसणारें झुडूप हिमालयाच्या पूर्वेकडील भागांत वाढलेलें आढळतें. सुमारें ६००० फूट उंचीवर देखील हीं झुडपें वाढतात. आसाम आणि पूर्वबंगालापासून तेनासरीमपर्यंतच्या प्रदेशांत हीं झाडें विशेष आढळतात. याच्या कोंवळया मुळ्यांपासून एक प्रकारचा पिंवळा रंग काढतात. पूर्वबंगाल आणि दार्जिलिंगमधील रहिवाशी सूत रंगविण्याच्या कामीं या रंगाचा मोठ्या प्रमाणावर उपयोग करतात. आसाम आणि ब्रह्मदेशांतलि लोकहि या रंगाचा अलीकडे थोड्याफार प्रमाणावर उपयोग करूं लागले आहेत. गारो टेंकडया आणि दार्जिलिंग या प्रदेशांत, या झुडपाच्या मुळया कुटून आणि आघणाच्या पाण्यांत उकळून त्यापासून रंग तयार करतात. सूत अगर कापसाचें कापड रंगवितांना, रंग पक्का होण्याकरितां या रंगात कांहीं दुसरीं ॲसिडें मिसळतात. आसाममध्यें प्रचलित असलेली रंगावेण्याची पद्धति, डंकनच्या 'डाइज्‌ ॲन्ड डाईंग इन आसाम,' या पुस्तकांत सविस्तर दिली आहे. लोध (सिम्प्लॉकॉस स्पिकॅटा) नांवाच्या झाडाचीं पानें आणि लेटेक (वॅक्सुरिआ सॅपिडा) या झाडाच्या मुळया यांपासून निघणाऱ्या द्रव्याचा रंग भडक दिसण्याकरतां वरील रंगाशीं मिश्रण करून उपयोग करतात असें कित्येक तज्ज्ञांचें मत आहे. [ मेसन, बर्मा ॲन्ड इट्स्‌ पीपल, १८३१; वॅट–कमार्शिअल प्रॉडक्ट्स. ]

दारू—'मद्य' पहा.

दारू (स्फोटक)— या दारूचा शोध पहिल्याप्रथम चीन व हिंदुस्थान देशांत लागला.त्या दोहोंत पहिला कोण व तो शोध कोणत्या वर्षी लागला हे निश्चित सांगता येणार नाहीं. परंतु दारूकाम हें हिंदुस्थानापूर्वी चीन देशाला माहित होतें असें बहुमत आहे. त्या देशानें अद्यापिहि थोड्यावहूत प्रमाणांत आपली छाप ( फटाकड्यांच्या रूपानें ) इतर देशावर ठेविली आहे. दारू म्हणजे सोरा अथवा सोरमीठ, गंधक व कोळसा यांचें कांहीं विवक्षित प्रमाणांत केलेलें मिश्रण होय. यास इंग्रजींत 'ब्लॅक पावडर' (कृष्णमृत्तिका) म्हणतात.

दारूच्या उत्स्फोटकपणाचा शोध सन १३१३ त बर्थोल्ड श्वार्टझ नांवाच्या पाद्र्यानें ( फ्राय बर्ग शहरीं ) लाविला. मात्र त्या पूर्वीच बंदुकीची गोळी सोडतांना तीं वापरण्याचा शोध लागलेला असावा व तसा उल्लेख स. १२५०मधील आढळतोहि. तोफेचा उपयोग पहिल्याप्रथम फ्रानडाच्या व क्रेसीच्या लढाईत करण्यांत आला ( १३४६ ). दारूकामाचा पहिला कारखाना सन १३४० त ऑग्सबर्ग शहरीं उभारण्यांत आला. पुढें १६ व्या शतकांत दारूच्या भुकीऐवजीं तिचे लहान लहान कण करण्यास सुरवात झाल्यावर तिला विशेष महत्त्व येऊन तिचा उपयोग वाढत्या प्रमाणावर होऊं लागला. उत्स्फोटक दारूनें भरलेले ग्रनेट व बॉंब करण्यास जर्मनींत सन १५७० पासून सुरवात झाली व सन १६२७ पासून त्या दारूचा उपयोग खाणीच्या कामांत व रस्ते तयार करण्याच्या कामीं होऊं लागला. दारूचे मुख्य दोन भाग आहेत. तेः—( १ )करमणुकीच्या दारूकामांत उपयोगांत येत असलेली दारू व ( २ ) बंदुकी, तोफा वगैरेंत उपयोगी येणारी अथवा उत्स्फोटक दारू.

दारूकामाची दारू.—कित्येक शतकांपूर्वी जीं सोरा, कोळसा व गंधक हीं तीन द्रव्यें या कामांत उपयोगांत येत होतीं,तींच आज देखील व बहुतेक त्याच प्रमाणांत उपयोगांत येतात. फरक कायतो त्या त्या द्रव्यांच्या दर्जांत व शुद्धपणांत असतो.

( अ ) सोरा अथवा सोरमीठः— येथें फक्त पोटॅशियम नायट्रेटचाच उपयोग करण्यांत येतो. कारण, तो सोडियम नायट्रेटच्या सारखा ( हवेंतील ) आर्द्रताशोषक ( हायग्रोस्कोपिक ) नाहीं. सिंधुनत्रित ( सोडियम नायट्रेट) व पालाश हरित ( पोटॅशीयम क्लोरेट ) हीं दोन द्रव्यें पृथक पृथक पाण्यांत विरघळवून, त्यापासून झालेलें द्रावण ( सोल्युशन ) एकत्र केल्यास तीं आपापसांत होणाऱ्या दुवार प्रतिक्रियेमुळें (डबल रीॲक्शन्‌) पोटॅशियम नायट्रेट व सोडियम्‌ क्लोरेट अशा रूपांत पुन्हां भिन्न होतात. याप्रमाणें तीं एकमेकांपासून भिन्न करून मग अगदीं स्वतंत्र रूपांत उपयोगांत घेण्यांत येतात.

( आ ) गंधकः—गंधकाची लाही( फ्लॉवर ऑफ सल्फर ) घेतल्यास, तींत सल्फ्युरिक व सल्फ्युरस हीं अम्लें असतात. येथें फक्त गंधकाच्या लगडी अथवा नळयांचाच उपयोग करण्यांत येतो. अर्थात तें बारीक करून भुकीच्या रूपांत ध्यावयाचें असतें.

( इ ) या कामीं उपयोगी पडणारा कोळसा वजनांत हलका असून सहज पेट घेणारा असावा लागतो. आपणाकडे थोराच्या (शेर) कोळशांचा फार उपयोग करतात. त्याशिवाय दुसरींहि अनेक प्रकारचीं लांकडें उपयोगांत आणतात कित्येक वेळां लांकडें पूर्णपणें जळूं नयेत म्हणून, तीं जमिनींत अथवा भांड्यांत ( भट्टी लावून ) जाळतात व मग त्यांपासून झालेल्या तांबड्या रंगाच्या कोळशांचा उपयोग करतात. कारण या कामीं पूर्णपणें तयार झालेल्या कोळशापेक्षां अपुरा कोळसा जास्त चांगला असतो.

वरील तीन जिनसांचीं मिश्रणें खालीलप्रमाणें असतात.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| सोरा( सोरमीठ ) | शेकडा | ६४ पासून | शेकडा | ७४ | पर्यंत |
| कोळसा | शेकडा | १६ पासून | शेकडा | २१ | पर्यंत |
| गंधक | | | शेकडा | १० | पर्यंत |

दारू किती वेळांत पेट घेते हें साधारणपणें गंधकाच्या प्रमाणावर अवलंबून असल्यामुळें तें प्रमाण शेकडा ३ पासून ६ पर्यंत कमी ( ज्याप्रमाणें दारू हवी असेल त्याप्रमाणें ) करण्यांत येतें.

रंगाकरितां निरनिराळीं रासायनिक द्रव्यें कमीअधिक प्रमाणांत घालितात व तीं बहुतेक क्लोराइड,सल्फाईड अशा सुलभ ज्वालाग्राही पदार्थांत मिसळण्यांत येतात. अशा स्थितींत तीं

थोड्या उष्णतेनें पेट घेऊन आपापल्या गुणधर्मांप्रमाणें निरनिराळे रंग दृष्टोत्पत्तीस आणतात.

कोणत्या रंगांकरितां कोणतीं द्रव्यें उपयोगांत ध्यावयाचीं त्यांचीं नांवें:—लाल रंगाकरितां लिथीयम्, स्ट्रॉन्शीयम्, कॅलशियम्. हिरव्या रंगाकरितां तांब्याचीं व बेरियम द्रव्यें व बोरिक ॲसिड द्रव्यें. पिवळ्या रंगाकरितां 'सोडियम्' द्रव्यें. किरमिजी रंगाकरितां पोटॅशियम द्रव्यें. सफेत व अस्मानी रंगांकरितां आर्सेनिक द्रव्यें.

फुलें वगैरे पाडण्याकरितां वीड (अशोधित लोखंडांतून यंत्रानें सोलवटून काढलेल्या बारक्या ढलप्या) वापरण्यांत येतें. फुलें रंगीत करावयाचीं असल्यास विडास आधीं तांबडें लाल तापवून ताकाच्या पाण्यांत टाकण्यांत येतें. अशा स्थितींत तें जास्त ठिसूळ होतें. नंतर इतर धातूंच्या रसांत तें टाकिल्यास त्यावर त्या त्या धातूंचीं पुटें चढतात व त्या योगानें त्याच्यापासून पडणारीं 'फुलें' रंगीबेरंगी दिसतात.

फटाक्यांतील आवाज, फुलकरणी अथवा फुलबाजींतील उजेड, बाणाची गति, चंद्रज्योतीचा डोळे दिपवून टाकणारा प्रकाश इत्यादि आतपबाजीच्या भिन्नत्वाचीं कारणें म्हणजे त्या त्या दारूंत असलेलीं निरनिराळ्या द्रव्यांचीं भिन्न भिन्न प्रमाणें होत. चंद्रज्योतींतील लख्ख प्रकाश त्यांतील मॅग्नेशियम या द्रव्याचा होय. ह्याच द्रव्यापासून झालेली 'विजेची' तार देखील तसाच लख्ख प्रकाश देते. [ शिवाय " अग्निक्रीडा " पहा. ]

बंदुकीची व स्फोटक दारू.-दारूच्या उत्स्फोटकपणाच्या गुणाचा शोध बर्थोल्ड स्वार्ट्झ यानें लाविल्याचें मागें आलेंच आहे. तेव्हांपासूनच त्या द्रव्याच्या आंत असलेल्या शक्तीचा मुख्य उपयोग प्राणसंहार करण्याकडे होऊं लागला असावा. मनुष्यबलापेक्षां लढाईच्या कामीं या दारूच्या बळाचा जास्त उपयोग होऊं लागला. लढाई व हिंस्र पशू नाहींसे करण्यांत दारूचा उपयोग होतो त्याप्रमाणें शांततेच्या वेळींहि तिचा उपयोग होतो. म्हणून त्यासाठीं दरवर्षी सुमारें ३,५०,००० टन असलीं उत्स्फोटक द्रव्यें तयार करण्यांत येतात व त्यापासून एकंदर ११५२ निखर्व फुटपाउंड कामगिरी करवून घेण्यात येते. खाणी, बोगदे व डोंगरांतून काढलेल्या रस्त्यांकडे सूक्ष्म नजर फेंकल्यांस ह्या प्रचंड शक्तीच्या उपयोगाची कल्पना होणार आहे. याकामीं दारूशिवाय इतर अनेक रासायनिक द्रव्यें उत्स्फोटणाच्या कामीं उपयोगांत आणतात; म्हणून त्यासंबंधींची साधारण माहिती येथें देणें जरूरीचें आहे.

कमी धूर काढणारी दारू अथवा गनकॉटन १८४६ साली श्यूनबाईन नामक गृहस्थानें ग्लिसिरीनपासून ट्री-नायट्रो-ग्लिसिरीन व नंतर त्याच्याच अनुरोधानें सेल्युलोजपासून नायट्रो-सेल्युलोज अथवा गनकॉटन करण्याचा शोध स्वित्झर्लंडमध्यें बासेल गांवीं लाविला. एक भाग शुद्ध नायट्रिक ॲसिड व दीड भाग शुद्ध सल्फ्यूरिक ॲसिड मिश्र करून त्या मिश्रणांत सेल्युलोज-मग तो कापूस, फडकें अथवा कागदाच्या रूपांत असो-आंत भिजेल असा भिजवून ठेवितात. दोन तासांनंतर तो आंतील मिश्रणांतून पिळून काढून स्वच्छ पाण्यांत पुन्हां पुन्हां धुवून काढितात व सरतेशेवटीं पाण्यांत उकळून वाळवितात. ह्यालाच 'गनकॉटन' असें म्हणतात. ह्या कृतींत 'सेल्युलोज' रचनेंत असलेल्या प्राणोज्ज (ओ-एच्) श्रेणींतील उज्ज (एच) श्रेणीस खो मिळून तिच्या ऐवजीं नत्रद्विप्राण (एन-ओटू)श्रेणी आंत येतात. म्हणजे प्राणोज्ज (ओ-एच्)च्या ऐवजीं (ओ-एन-ओटू) या श्रेणी तयार होतात. ह्या द्रव्यांतील उत्स्फोटक शक्ति दारूच्या शक्तीपेक्षां तिप्पटीनें असून त्याची ज्वलनशक्ति दारूच्या दुप्पट आहे. शिवाय मेथील अल्कोहोल, ॲसिटोन व ॲसेटिक ईथर इत्यादि द्रवांत भिजविल्यास आंतील उत्स्फोटणादि शक्ति कायम राहून, तो जेलाटीनप्रमाणें मऊ व नरम होतो व त्यास वाटेल तसला आकार देण्यांत येऊन तो वाढेल तेथें ठेविण्यास सुलभ होतो; याशिवाय इतर उत्स्फोटक द्रव्यें:—डि-नायट्रो-ग्लिसिरीन्; ट्री-नायट्रो-ग्लिसिरीन्; डायनामिट; गुर्डायनामिट्; कार्बोनिट्, जेलाटीन-डायनामिट्; रेक्झीट; पिक्रिक ॲसिड अथवा ट्री-नायट्रो-फेनोल; मेलिनिट्; लीडिट्; ट्रीनायट्रो-टोल्युओल; हेक्झा-नायट्रो-डी फेनील; डोनारिट्; कांहीं क्लोरेट्स आणि परक्लोरेट्स; अमोनियम्-नायट्रेट्स; कित्येक पाऱ्याचीं द्रव्यें व द्रवरूप (लिक्विड) हवा व द्रवरूप प्राणवायु (ऑक्सिजन) मिश्रित ऑक्झीलिकिड्स इत्यादि.

यांत पुन्हां तीन निरनिराळे वर्ग केलेले आहेत ते पुढीलप्रमाणें:—( १ )उत्स्फोटक द्रव्यें; ( २ ) गतिदायक द्रव्यें व ( ३ ) पेट घेणारीं द्रव्यें. तोफा, हावित्झर्स वगैरेमध्यें या तिन्ही द्रव्यांचा उपयोग करण्यांत येतो. तेथें प्रथम ३ ऱ्या वर्गातील द्रव्यांच्या योगानें २ ऱ्या वर्गातील द्रव्यास पेटविण्यांत येतें व त्यामुळें आंतील गोळ्यास गति मिळते. पुढें खालीं पडल्यावर, व मध्यंतरीं आपटल्यास पहिल्या वर्गांतील द्रव्यांचा स्फोट होऊन उत्स्फोटणाचें कार्य होतें. धूर निघणें, अथवा कांहीं भाग अवशेष राहणें, हें त्या त्या द्रव्यांतील एक व्यंग होय व त्याचें कारण आंतील द्रव्यांचा अपूर्ण उपयोग हें होय.

उत्स्फोटक द्रव्यांच्या आंत असलेली संभाव्य शक्ति (पोटेन्शियल-एनर्जी)ही उष्णता, आवाज, प्रतिकारभंग अथवा काम करण्याच्या शक्तीच्या रूपांत बाहेर पडते. एका अकुंचित जागेंत असलेलीं हीं सर्व द्रव्यें एका क्षणांत गॅस अथवा वायुरूपांत गेल्यास, त्यांस पूर्वीपेक्षां कित्येकपट अधिक जागा लागते. ह्या गुणामुळेंच त्या द्रव्यांस गतिदायक शक्ति मिळते. शिवाय आंत चाललेल्या ऑक्सिडेशनच्या प्रयोगामुळें आंतील उष्णमान २५००° अथवा त्याहूनहि अधिक वर जात असल्यामुळें, आंतील उष्ण झालेला वायू एरव्हींपेक्षां कितीतरी पटीनें जास्त जागा व्यापूं पाहतात. अर्थात अशा स्थितींत त्यांची गतिदायक शक्ति देखील त्याच

प्रमाणांत वाढते. असली गति एका सेकंदांत ७२०० यार्डीपर्यंत म्हणजे एका मिनिटांत २८० मैलांपर्यंत वाढूं शकेल. एकंदर संभाव्य शक्तीपैकीं, फक्त $\frac{1}{3}$ शक्तीच गति देण्याच्या कामीं उपयोगी पडते. बाकीची $\frac{2}{3}$ शक्ति, उष्णता, आवाज, प्रतिरोध, व आजूबाजूंच्या (हवा आदिकरून) जिन्नसांची उष्णमानें वाढविण्यांत खर्च होते. उत्स्फोटक द्रव्यें जळण्याचे एकंदर ४ प्रकार आहेत ते:—

(१) 'फट्' असा आवाज होऊन एकदम जळणें—फटफटणें ('पफिंग'); (२) हळूहळू उष्णता वाढून एकामागून एक भाग जाळ होऊन जळत जाणें (डिफ्लेग्रेशन्); (३) आंतील भारामुळें एकदम जळणें—उत्स्फोट होणें (एक्स्प्लोजन्); (४) हातीं असलेल्या द्रव्यांतील संभाव्यवेग गतिशक्तीच्या प्रहारामुळें असल्यास--धडकणें (डिटोनेशन्) इ०

[संदर्भग्रंथ--बर्थोलेट--सर ला फोर्स दे मातियेर एक्स्फ्लोझीव्ह; ब्रन्सवीक--एक्स्प्लोझीव स्टोफे; होयसरमान--डी नायट्रोसेल्युलोजे; फॉन रोमोकी--गेशिष्टे डर एक्स्प्लोझीव स्टोफे; हॉफ्मन--लेहरबुख डर अन् ऑर्गानिशे शेमी; ओस्ट--लेहरबुख डर शेमिशे टेक्नोलोगी.] (ले. डॉ. वामन द्वारकानाथ कोर्डे)

**दारूगोळा**—दारु व गोळा हे दोन्ही शब्द लष्करावाबतचे असून युद्धामध्यें हल्ला व बचाव या कामांमध्यें बंदुका व तोफा चालविण्याकरितां त्याची आवश्यकता असते. दारूगोळ्यामध्यें तीन प्रकार असतात. (१) स्फोटकद्रव्यें व प्रोपेलंटस्, (२) सर्व प्रकारचीं प्रोजेक्टाइल्स, आणि (३) काडतुसें (कार्ट्रिजेस). यासंबंधाच्या 'स्फोटक द्रव्यांचा कायदा' (एक्स्प्लोझिव्हस् ॲक्ट) यामध्यें दिलेल्या वर्गीकरणाहून निराळें वर्गीकरण लष्करामध्यें असतें. त्यांत दोन स्वतंत्र संग्रह (ग्रुप) असतात. ग्रुपमध्यें निरनिराळीं स्फोटकद्रव्यें, व भरलेलीं गलद स्फोट करणारीं काडतुसें असतात. ग्रुपमध्यें लहान बंदुकांचीं काडतुसें, फ्यूझेस, प्रायमर्स, टयूब्स, भरलेले शेल्स (गोळे) वगैरे. शिवाय या प्रत्येक ग्रुपमध्यें पोटवर्ग असतात, आणि पहिल्या ग्रुपमधील कांहीं पोटवर्गांतील युद्धसाहित्य मॅगेझिन (दारूचें कोठार) मध्यें अगदीं स्वतंत्र ठिकाणीं बंदोबस्तानें ठेवितात आणि दुसऱ्या ग्रुपमधील सर्व पोटवर्गांतील साहित्य आणि पहिल्या ग्रुपमधील उरलेल्या पोटवर्गांतील साहित्य (म्हणजे ओला गन-कॉटन, पिक्रिक ॲसिड, क्यू. एफ्. कार्ट्रिजेस). लढाऊ किल्ल्यामध्यें दारूगोळा सांठविण्याची व्यवस्था वरील प्रकारचीच असते. मात्र त्याच्याकरितां जागा शत्रूच्या माऱ्यापासून अत्यंत सुरक्षित राहील अशा ठिकाणीं करतात. दारूगोळा ठेवण्याची इमारत आच्छादण्याकरितां मोठाले मातीचे तट बांधतात. मॅगेझिननजीक तोफांचीं काडतुसें व गोळे तयार करण्याचा व तपासण्याचा कारखाना (लॅबोरेटरी) असतो. दारुखान्याच्या सर्व भिंती व जमीन आंतील लोखंडी, पोलादी वगैरे सांठयास हवा, उजेड लागणार नाहीं अशा प्रकारें तयार करतात. दारूखान्याच्या दरवाज्याशींच एक खोली असते. तींत जाणारे इसम आपले कपडे बदलून विशिष्ट प्रकारचा पोषाख चढवितात; व खिळे नसतील असे बूट घालतात.

दारूगोळ्याचा पुरवठा करणें तो दोन प्रकारचा असतो; (१) चालत्या सैन्याबरोबरच्या तोफांकरितां व (२) एका ठिकाणीं कायम डांबून ठेवलेल्या तोफांकरितां. चालत्या सैन्याबरोबर तोफा व लहान प्रमाणाच्या हाविट्झर असतात. अशा तोफा जेथें तात्पुरत्या डांवतात तेथें नजीक दारूगोळ्याकरितां कोठार बांधतात व त्यांत दररोज रात्रीं दुसऱ्या दिवसाला पुरेल इतका दारूगोळा सांठवितात. लढाऊ किल्ल्यासारख्या ज्या कायमच्या माऱ्याच्या जागा असतात तेथें दोन दोन किंवा तीन तीन तोफा ठिकठिकाणीं ठेवतात, व अशा काडतुसांचें, गोळ्यांचें व सर्वसामान्य अशीं तीन कोठारें असतात. श्रापनेल वगैरे प्रत्येक प्रकारचे गोळे निरनिराळे ठेवतात. सर्वसामान्य कोठारांत फ्यूजेस, टयूब्स, व तोफा वापरण्याला लागणारीं हत्यारें व इतर सामानसुमान ठेवतात. तोफांच्या माऱ्याचीं सर्व ठिकाणें आगगाडीच्या फाटयांनीं जोडतात. किल्ल्यावरील प्रत्येक तोफेजवळ तटाच्या भिंतीस जागा करून काडतुसें व गोळे भरून ठेवतात.

एखाद्या किल्ल्यावर तोफांचा मारा किती किती करावयाचा तें, लष्करी धोरण व किल्ल्याचें विशिष्ट स्थळ, त्या किल्ल्याची बळकटी व आंतील सैन्याचा जोर वगैरे गोष्टींवर अवलंबून असतें. सामान्यतः मोठया तोफा तीनशें ते चारशें वेळां व हलक्या क्यू. एफ. तोफा एक हजार किंवा त्याहून अधिक वेळा झाडण्याचा प्रघात आहे.

लढाईच्या शस्त्रास्त्रांत जसा जसा फरक होत गेला त्यात्याप्रमाणें युद्धसामुग्री पुरविण्याची पद्धतीहि बदलत गेली जेव्हां सैनिकांनीं एकमेकांशीं भिडून तरवार वगैरे केवळ हस्तशस्त्रांनींच लढण्याची पद्धत होती त्या काळांत ऐन् लढाईच्या वेळीं युद्धसामुग्री पुरविण्याचा प्रश्न फारसा नसे. मध्ययुगांत (इ. स. १०० ते १५००) यूरोपांत धनुष्यबाणांची लढाई होत असे त्यावेळीं बाण पुरविण्याचें काम मुख्य असे. त्या काळांत शत्रुपक्षाकडून उपयोजिलेले बाण शक्य तर पुन्हां उपयोगींत. उदा. इंग्लंडमधील टौटनच्या लढाईत (१४६१) यॉर्किस्ट पक्षाच्या कमांडरनें अशा रीतीनें स्वसैनिकांस बाणांचा दुप्पट पुरवठा केला होता. बंदुकादिअस्त्रें प्रचारांत आल्यानंतरहि शत्रूंचीं हत्यारें व दारूगोळा मिळवून वापरीत असत. उदा. लॅगनिटझच्या लढाईत (१७६०) फ्रेडरिक दि ग्रेटनें आपल्या प्रशियन सैन्याला पराभूत ऑस्ट्रियन सैन्याचा रणांगणावर सांपडलेला दारूगोळा जमा करून देवविला होता. शत्रूची जिंकलेली युद्धसामुग्री उपयोगिण्याचा क्रम अद्यापहि आहे, पण त्यावर मोठी भिस्त अलीकडे कोणतेंहि सैन्य ठेवीत नाहीं. त्याचें मुख्य कारण असें कीं, अलीकडील बंदुका व तोफा फार

प्रमाणशीर असतात आणि ·३०३ इंच व्यासाची ली-मेट-फोर्ड गोळी दुसऱ्या थोड्या कमजास्त आकाराच्या बंदुकीलाहि उपयोगी पडणें शक्य नसतें. शिवाय अलीकडील बंदुकांच्या व तोफांच्या फैरी इतक्या झडत असतात कीं, दारूगोळ्याचा भरपूर पुरवठा आगाऊच व नजीक करून ठेवावा लागतो.

रणांगणावर दारूगोळ्याचा पुरवठा.—लढाई चालू असतां दारूगोळा पुरविण्याचें काम लष्करी गाड्या करतात. तोफांच्या प्रत्येक ब्रिगेडबरोबर असलेल्या गाड्यांचा एकेक तांडा असतो व तो तांडा स्वतःच्या तोफांच्या ब्रिगेडला व पायदळाच्याहि एका ब्रिगेडला दारूगोळा पुरविण्याचें काम करतो. दारूगोळ्याच्या गाड्यांची व्यवस्था रॉयल आर्टिलरीमार्फत चालते. या गाड्यांबरोबर असलेले अधिकारी व सैनिकच तोफा उडविणाऱ्यांपैकीं मृत झालेल्या इसमांची जागा तात्काळ भरून काढतात. या प्रत्यक्ष लढाईच्या जागीं वावरणाऱ्या गाड्यांना दारूगोळा पुरविणाऱ्या दुसऱ्या गाड्यांचे तांडे तेथून मागल्या बाजूस कांहीं मैल अंतरावर असतात. छोट्या बंदुकांचें गोळीबाराचें सामान ( स्मॉल-आर्म-अम्युनिशन ), फिरत्या तोफा, घोड्यावरील तोफा, हावित्झर तोफा व अवजड तोफा यांचे श्राप्नेल, हावित्झर व मोठ्या तोफांचे गोळे, चार निरनिराळ्या प्रकारच्या तोफांचीं काडतुसें, आणि घोडदळाकरितां पम्पाम् काडतुसें-याप्रमाणें बारा प्रकारचा दारूगोळ्याचा सांठा पुरवावा लागतो.

साधे गोळे व कुलपी गोळे ( शॉट व शेल ).—जुन्या काळांत तोफांतून बाण व दगडी गोळे यांचा मारा करीत असत. बाणांना लोखंडी टोकें असत किंवा सर्व बाण लोखंडी करून तोफेच्या तोंडांत नीट बसावे म्हणून तोंडाला चढून फातडें गुंडाळीत असत. दगडी गोळ्यांना खर्च फार कमी लागे त्यामुळें लोखंड, ब्रांझ, किंवा शिसें या धातूंचे खर्च फार येणारे गोळे करविले तरी ते क्वचित् वापरीत. १६ व्या शतकापर्यंत अशी स्थिति होती. त्यानंतर अनेक धातूंच्या अनेक प्रकारच्या गोळ्या व गोळे तयार होऊं लागले. ( १ ) थोडक्या अंतरावरून एकदम मोठा मारा करण्याकरितां केस शॉट या लहान गोळ्यांचा उपयोग करतात. फिरत्या लहान तोफांतून यांचा मारा चारशें यार्डांहून अधिक अंतरावर चांगला होत नाहीं. मोठ्या तोफांमधून एक हजार यार्डांपर्यंत उत्तम मारा होऊं शकतो. शिसें व अँटिमनी या धातूंच्या या गोळ्या करतात. मोठ्या आकाराचे गोळे लोखंडाचे ( कास्ट आयर्न ) करतात व त्यांचें वजन दोन औंसपासून साडेतीन पौंडांपर्यंत असतें. ( २ ) ग्रेप शॉट; हल्लीं हा प्रकार उपयोगांत नाहीं. यांत गोळ्यांच्या तीन रांगा असून त्या खिळ्यांनीं एकत्र बसविलेल्या असतात. ( ३ ) क्विल्टेड शॉट, म्हणजे पुष्कळ लहान गोळ्या क्यान्व्हसमध्यें दोऱ्यांनीं बांधून तयार करीत. हा प्रकारहि हल्लीं रद्द आहे.

( ४ ) चेन शॉटः दोन वाटोळे गोळे सांखळीनें बांधून तयार करीत. शिडाच्या जहाजांच्या काळांत यांचा विशेष उपयोग करीत असत. ( ५ ) तप्त गोळे, यांची युक्ति पोलंडच्या राजा स्टीफन बॅटोरी यानें १५७९ सालीं काढली. मार्टिन्स शेल हा याचाच सुधारलेला प्रकार होय. पोकळ लोखंडी गोळ्यांत लोखंडाचा तप्त रस ओतीत व तावडतोब तो गोळा शत्रूच्या जहाजावर फेंकीत व तो फुटून आंतील तप्त रसामुळें जहाजांना आग लागे. (६) स्टारशेल; हा प्रकार शत्रूच्या हालचालीवर प्रकाश पाडून त्या नजरेस आणण्याकरितां तयार करतात. गोळा उडविल्यावर तो फुटून त्यांतून चकाकणाऱ्या चंद्रज्योती पसरतात व चांगला उजेड पडतो ( ७ ) हातगोळे ( हँड ग्रेनेड्स ), हे तटबंदीवर किंवा बोटीवर हातानें २० ते ३० यार्ड अंतरावर फेकतां येतात. अलीकडे ते सामान्यतः रद्द झाले आहेत. तथापि पोर्ट आर्थरच्या वेढ्यांत ( १९०४ ) जपानी लोकांनीं ते उपयोजिले होते. याशिवाय हाय-एक्स्लोझिव शेल, श्राप्नेल, आर्मरपीअर्सिंग, शेल वगैरे गोळ्या अद्याप चालू असून त्यांत महायुद्धकालांत सुधारणा झाली, आणि कांहीं नव्या प्रकारचे गोळेहि निघाले.

वातेऱ्या ( फ्यूझेस् ).—तोफांचे गोळे सोडण्यास वातेऱ्यांचा उपयोग करण्याची पद्धत तोफांच्या उपयोगापासूनच प्रचारांत आली. मात्र सुरवातीस या वातेऱ्या म्हणजे ज्वालाग्राही दारूच्या मिश्रणानें माखलेले काकडे असत. तोफेच्या तोंडांत गोळा व दारू ठांसून भरून नंतर या वातेऱ्या, त्यांकरितां योजलेल्या जागेंत बसवून ठेवीत व त्यांस दुसऱ्या काकड्यानें पेटवीत. त्यानंतर पुढें या वातेऱ्यांत थोडी सुधारणा केली गेली. या सुधारलेल्या वातेऱ्या म्हणजे लोखंडी अगर तांब्याच्या नळीच्या लहानशा तुकड्यांत सावकाश जळणारी दारू भरून करीत व या वातेऱ्या लोहगोलांत आटे पाडून बसवीत. परंतु योग्य मर्यादेनें व कालांतरानें गोळ्यांचा स्फोट होईल अशी त्यांत योजना नसे. ही योजना १७ व्या शतकाच्या अंतीं प्रथम केली. कागदाच्या अगर लांकडाच्या नळकांड्यास मध्यें भोंक पाडून त्यांत सावकाश जळणारी दारू भरीत व या नळकांड्यास एक भोंक भरलेल्या दारूतून आरपार जाईल असें पाडीत. अशा तऱ्हेनें ठराविक वेळानें ती वातेरी गोळ्यांतील दारूपर्यंत जळत जाऊन त्या दारूस पेटवून स्फोट उडवून देई. परंतु हा शोध प्रयोगावस्थेच्या पलीकडे बराच काल जाऊं शकला नाहीं. कारण अशा ठराविक वेळानें जळणाऱ्या वातेऱ्यांची यशस्विता १७९९ सालीं फलिमिनेट ऑफ मरक्युरी या स्फोटक दारूचा शोध लागेपर्यंत सिद्ध झाली नव्हती आणि त्यानंतरहि प्रयोगांतून अचुक स्फोट करून देणारी वातेरी तयार होऊन तिची उपयुक्तता सिद्ध झाल्यास अवघीं ६०।६५ वर्षेंच झालीं आहेत. पेटमन् फ्यूझ या नांवानें प्रसिद्धीस आलेली जी एक वातेरी तयार करीत तींत एका खरखरीत गोलकावर स्फोटक मिश्रणाचा थर दिलेला असे. तो तोफेच्या

उडण्याबरोबर मोकळा होई व तो गोलक गोळ्याच्या आघातानें वातेरीच्या आंतील बाजूवर घर्षण पावून पेट घेई व अशा तऱ्हेनें गोळ्यांतील दारूचा स्फोट करून देई. आजमितीस अशा वातेऱ्यांचे तीन प्रकार आहेत. ( १ ) धुराच्या दाबानें वातेरीतील दारूची कांडी मोकळी होऊन स्फोट करणारी, (२) तोफेच्या धडाक्यानें अथवा प्रादक्षिणिक गतीमुळें दारूच्या कांडीस मोकळे करून स्फोट करणारी व ( ३ ) इच्छित स्थळीं आदळून स्फोट करणारी.

(१) पहिल्या प्रकारच्या वातेरीस पेसुफ्यूझ म्हणत, तींत टोंकदार स्फोटक कांडी एका दांड्यावर मध्यभागीं बसविलेली असे व त्यावर एक दाबाची तबकडी, ती कांडी दाबून धरण्यास मागें बसविलेली असे व जास्त सुरक्षिततेकरितां एक फिरता खिळा योजिलेला असे व तो गोळ्याच्या फिरत्या गतीनें मोकळा होई. गोळा सुटल्यावर धुराच्या दाबानें दाबाची तबकडी ढकलली जाई व त्यायोगें मध्यभागीं असलेला दांडा पुढें ढकलला जाऊन फिरता खिळा मोकळा सुटे व गोळ्याच्या वर्तुळगतीनें तो पूर्वस्थळीं परत येई व त्यायोगें टोंकदार स्फोटक कांडी पुढें जाण्यास मोकळी होऊन गोळ्याच्या आदळण्याबरोबर ज्वालाग्राहकाचा भडका उडवी व अशा तऱ्हेनें गोळ्याचा स्फोट केला जाई.

( २ ) दुसरा प्रकार लहान जातीच्या वातेऱ्यांत मुख्यतः उपयोगांत आणीत. यांत फिरकी तोफेच्या धडाक्याबरोबर मागें सरकू लागून ठराविक वेळीं व ठराविक ठिकाणीं पेटणाऱ्या कांडीपर्यंत, स्प्रिंग तोडून, जाऊन पोंहोंचे. यायोगें कांडी पुढें सरकण्यास मोकळी होई व गोळ्याच्या आदळण्याबरोबर स्फोटक वाटीवर सुईचा ठोका पडून स्फोट करी. मात्र गोळा वेगांत असतां स्फोटक कांडी स्प्रिंगनें दाबून ठेवलेली असे.

( ३ ) तिसऱ्या प्रकारच्या वातेरींत अशी योजना केलेली असते कीं गोळा आदळल्यानंतर या वातेरीचें झांकण आदळलें गेल्यानें सुईचा आघात स्फोटक वाटीवर होऊन वातेरीस अग्नि मिळे व अशा तऱ्हेनें वातेरी पेटत पेटत गोळ्यांतील दारूचा स्फोट उडवून देई.

कोणत्याहि इच्छित कालांतरानें पेटणाऱ्या वातेरीचें कार्य गोळा तोफेंतून बाहेर पडल्यापासून सुरु होतें. यामुळें ज्वालाग्राही कांडी ज्वालाग्राही वाटीवर आदळून त्यायोगें हळू हळू जळणाऱ्या दारूच्या लांकडी नळीस पेट मिळून गोळ्याचा स्फोट होतो. या लांकडी वातेऱ्या हल्लीं फक्त आर. एम्. एल्. तोफांच्या गोळ्यांतच उपयोगांत आहेत.

हल्लींच्या सुधारलेल्या व जास्त वेळ जळत रहाणाऱ्या वातेऱ्यांत ठराविक वेळ जळत रहाणारीं दारूचीं दोन कडीं एकावर एक बसविलेलीं असतात. यांपैकीं खालचें कडें फिरतें असतें. यामुळें तें फिरतां फिरतां मुद्दाम योजिलेल्या छिद्रावर येतें. या छिद्रांत गोळ्यास पेट देणारी दारू दारूच्या ठिकाणापर्यंत भरलेली असते. तोफेस बत्ती मिळून स्फोट झाल्यावर वातेरींतील ज्वालाग्राहकास धक्का मिळून त्याचा स्फोट होतो. त्यायोगें या दारूच्या कड्यांपैकीं वरील कडें पेट घेतें व तें जळत जळत खालील फिरत्या कड्यास पेटवतें. हें फिरतें कडें पेटत पेटत विवक्षित छिद्र असलेल्या ठिकाणीं आल्यावर तेथील दारू पेटत जाऊन स्फोटक दारू असलेल्या ठिकाणीं जातें व गोळ्याचा स्फोट करतें. दारू पेटत असतां उत्पन्न होणारा धूर, निघून जाण्याकरितां ठेवलेल्या भोकांतून निघून जातो. गोळ्यांच्या फिरत्या गतीमुळें चालन मिळून ठराविक वेळानें पेट घेईल अशा तऱ्हेची यांत्रिक योजना करण्याचे शोध चालू आहेत. परंतु अद्याप तो शोध प्रयोगावस्थेंतून प्रत्यक्षावस्थेंत आला नाहीं.

या वातेऱ्यांस ओलावा लागू नये अशाबद्दल विशेष काळजी घ्यावी लागते. कारण ओलसरपणामुळें पेटण्याची ठराविक वेळ लांबण्याचा संभव असतो.

**ट्यू ब्स व प्रा य म र्स.**—प्राचीनकाळीं गोळ्यांतील दारू पेटविण्याकरितां निरनिराळ्या युक्त्या योजीत असत. लहान तोफांना कान्यांतून एक तापलेली तार भोंसकून बत्ती देत असत, किंवा कान्यामध्यें हळूहळू जळणारी दारू ओतून तिला तापलेल्या तारेनें पेटवीत असत. नंतर कान्यांत एक हळू जळणारी वात कापसाच्या बोळ्यामध्यें बसवूं लागले. इ. स. १७७० च्या सुमारास कान्यामध्यें एक सुमारें १६ इंच लांबीचें सावकाश जळणाऱ्या दारूनें भरलेलें कागदी नळकांडें बसवून त्यानें बत्ती देत. अलीकडे घर्षणनलिकांनीं हें कार्य करतात, व अगदीं अर्वाचीन पद्धतींत दाबाच्या किंवा विजेच्या नळ्या उपयोगांत आणतात. या नळ्या बसवितांना आंतील दारूचा धूर कान्यावाटें बाहेर येऊन कान्याचें तोंड खराब होऊं नये याकरितां अनेक युक्त्या योजित.त. इंग्लिश लोकांमध्यें विशेषतः विजेच्या नळ्यांचा व यूरोपखंडामध्यें दाबाच्या नळ्यांचा विशेष प्रचार आहे. विजेच्या नळ्यांतहि तारयुक्त आणि बिनतारी असे दोन प्रकार आहेत. कांहीं देशांत वीज व दाब या दोहोंचाहि उपयोग करण्यांत येतो.

**तो फां चीं का ड तु सें** ( कार्ट्रिजेस फॉसकॅनन).—पहिलें तोफेचें काडतूस कागदाच्या नळकांड्यांत दारू भरून तयार केलेलें असे. परीच वर्षेपर्यंत तोफांमध्यें दारू घालावयाची ती एका नळकांड्यासारख्या चमच्याला लांब दांडा बसवून त्यानें घालीत असत. या चमच्याचें नळकांडें विशिष्ट मापाचें असून लहान तोफांत बहुतेक एक माप दारू पुरी होत असे. या नळकांड्याचा व्यासहि साधारणतः तोफेच्या तोंडाइतका असे मोठाल्या तोफांत मात्र दोन तीन मापें घालावीं लागत. सामान्यतः गोळ्याच्या वजनाइतकीच दारू घालीत असत.

कागदाचीं किंवा गोणपाटाचीं काडतुसें किल्ल्यांतून रात्रीच्या वेळीं किंवा गलबतावर उपयोगांत आणीत. यामुळें तोफा लवकर भरतां येऊन धोक्याचा संभवहि कमी असे. कागदाचीं किंवा तरटाचीं काडतुसें घालतांना कान्याखालीं येणारा कागदाचा किंवा तरटाचा भाग फाडून काढावा लागे. गोळा

ठांसून बसविल्यानंतर कान्यांत दारू भरून तापलेल्या तारेनें वत्ती देत असत. पाठीमागून भरावयाच्या प्राचीन तोफांमध्यें दारू घालणें फारसें कठिण नसे. कारण दारू भरावयाचा भाग सुटा असून तो काढून आंत दारू भरतां येत असे, व वर चिंध्या ठांसून दारू वर येण्याचें बंद करतां येत असे. कागद, तरट किंवा यांसारख्या पदार्थांचा कांहीं भाग तसाच जळत राहण्याचा संभव असतो आणि त्यामुळें पुन्हां दारू भरावयाच्या वेळीं स्फोट होण्याचा संभव असतो. याकरितां रेशीम, फ्लॅनेल किंवा असाच न धुमसणारा पदार्थ वापरतात.

विनधुराची दारू सामान्यतः पेटविण्यास कठिण असते. याकरितां अशा दारूच्या काडतुसांच्या मागें प्रायमर म्हणजे प्रज्वालक जोडलेला असतो. मोठाल्या तोफांतून अशीं अनेक काडतुसें भरावीं लागतात. हीं काडतुसें कॉर्डाईट, किंवा त्यासारख्याच एखाद्या विन् धुराच्या दारूचीं तयार करून तीं रेशमी कापडाच्या पिशवींत घट्ट बांधतात व त्यांच्या उघड्या तोंडावर प्रायमर बसवितात.

याच्या भोंवतीं रेशमी फीत गुंडाळून तें सर्व काडतूस घट्ट करण्यांत येतें. गरनाळा किंवा हविझ्झर तोफांना निरनिराळ्या आकाराचीं काडतुसें वापरतात. म्हणजे एकंदर बारांतील दारूचें वजन पाहिजे तसें बदलतां येतें.

जलदवारी तोफांकरितां एका पितळी नळकांड्यांत दारू भरतात, व मागील बाजूस ती पेटण्याकरितां प्रायमर बसवितात. हें नळकांडें तोफेंत घातल्यावर जेव्हां वत्ती दिली जाते तेव्हां तें तोफेच्या कोठ्यांत थोडें प्रसरण पावून घट्ट बसतें व मागील बाजूनें धूर जाण्यास प्रतिबंध करतें. हीं काडतुसें लहान तोफांना विशेष उपयोगी पडतात. फारच्या मोठ्या तोफांनांहि पितळी घरांचीं काडतुसें वापरण्यांत येतात. अशा काडतुसांत दारू भरावयाची ती कागदी किंवा नमद्याच्या नळ्यांत घालून भरतात व पुढील तोंड गोळ्याच्या मागील बाजूनें बंद करतात, किंवा एखादें धातूचें टोपण बसवितात आणि गोळा त्यापुढें घालतात.

बंदुकीच्या गोळ्या (कार्ट्रिजेस फॉर स्मॉल आर्म्स).--प्रारंभींच्या गोळ्या गोल आकाराच्या असून तोंडापेक्षां थोड्या लहान असत. व त्या एका कागदांत गुंडाळून त्यांचें काडतूस बनवीत. अर्थात् साध्या नळीच्या बंदुकीमध्यें या गोळ्या घालणें फार सोपें असें. परंतु पूर्वीच्या तोंडाकडून भरावयाच्या बंदुकांत ही घट्ट बसणारी गोळी विशेषतः ती पूर्ण गोल नसेल तर बसविणें फार कठिण जात असे. यामुळें या बंदुका लढाईंत वापरीत नसत. १८२६ सालीं डेल्विर्ग या फ्रेंच ऑफिसरनें बंदूक मोडून तिच्यामध्यें गोळी ठांसून बसवून ती भोंकावरोबर बसेल अशी युक्ति शोधून काढली. परंतु ती ठांसून बसवितांना गोळीचा आकार बदलून तिची दिशा चुकत असे. ४ थ्या विल्यमच्या कारकीर्दींत ब्रिटिश शिपायांजवळ दिलेल्या ब्रन्सविक रायफलमध्यें गोळी नळीच्या खोबणीमध्यें घट्ट बसावी म्हणून तिला एक पाटोळें कडें बसविलेलें असे. ही बंदुकहि धरण्यास कठिण जात असे व लवकर बिघडत असे. १८३५ सालीं डब्ल्यू. ग्रीनर यानें एक नवीन प्रसरण पावणारी गोळी शोधून काढली. ही गोळी दारू पेटल्याबरोबर प्रसरण पावून खोबणींत घट्ट बसे, व धूर बाहेर पडू देत नसे.म्हणून ही गोळी लष्करी खात्यानें नापसंत ठरविली. परंतु याच तत्त्वावर मिनी या फ्रेंच मनुष्यानें १८५२ सालीं केलेल्या गोळ्या पसंत करण्यांत आल्या. व पुढें ग्रीनरलाहि त्याच्या कामगिरीबद्दल बक्षीस देण्यांत आलें. गोळीच्या आकारांतहि हळूहळू फरक होऊन केवळ निमुळत्या गोळीऐवजीं प्रथम सरळ वाटोळ्या व तोंडाशीं निमुळत्या वाटोळ्या गोळ्या बनवितां येऊं लागल्या आणि त्यावर अर्धगोलाकृति लोखंडी टोपी बसविण्यांत येऊं लागली. अशा तऱ्हेच्या गोळ्या १८५५ त ब्रिटिश सैन्यांत एन्फील्ड रायफलमध्यें वापरीत असत. सर जोसेफ विट्वर्थ यानें बरेच प्रयोग करून बारीक तोंडाच्या बंदुका व लांबट गोळ्या यांच्यापासून काय फायदे होतात ते दाखविले. याची बंदूक नेम मारण्याच्या शर्यतीमध्यें व नेम मारण्यास शिकण्याकरितां विशेष वापरण्यांत येत असे.तरी तिला लष्करांत जागा मिळाली नाहीं. व हळूहळू तिचें स्थान मेटफर्ड बंदुकीनें घेतलें. १८६२ सालापासून मेटफर्ड यानें हलक्या रायफलमध्यें व जास्त वेढे असलेल्या खोबणींत आणि घट्ट गोळीमध्यें विशेष काय आहे यासंबंधीं अनेक प्रयोग करून १८८८ मध्यें ली मेटफर्ड या नावाची बंदूक तयार केली व ती ब्रिटिश लष्करांत चालू झाली. तिची अगदीं अलीकडील सुधारलेली आवृत्ति म्हणजे ली एन्फील्ड ही होय.ही३०३ छिद्रांची बंदूक असून तींतून १.२५ इंच लांबीची २१५ ग्रेन वजनाची शिशाची, पातळ निकेलच्या पत्र्यानें आच्छादिलेली गोळी मारली जाते. मार्टिनी हेनरी बंदुकीची गोळी १.२७ इंच लांबीची असून ४५ इंच व्यासाची व ४८० ग्रेन वजनाची असते.

लांबट व हलक्या वजनाच्या गोळीमध्यें कांहीं दोषहि असतात. तिच्यावर वाऱ्याचा परिणाम अधिक होतो. व व्यासाच्या मानानें लांबी जास्त असल्यामुळें खोबणीची वक्रता अधिक ठेवावी लागते. यामुळें ती गोळी नळींतून फिरल्याशिवाय पुढें जाऊं नये म्हणून तिच्यावर निकेलचें घट्ट टोपण बसवावें लागतें. याचा परिणाम असा होतो कीं, या आवरण असलेल्या गोळीमध्यें भेदक शक्ति जास्त असली तरी तिच्यापेक्षां नुसत्या शिशाच्या गोळीनें होणारी जखम अधिक भयंकर असून तिचा बधिरता आणण्याच्या कामींहि जास्त परिणाम होतो. तिच्यामुळें एक लहानसें नीट छिद्र पडतें, परंतु कुरूपता येत नाहीं. तथापि तिचें छिद्र लहान असल्यामुळें व गोळी हलकी लागत असल्यामुळें तीच अधिक पसंत केली जाते. अमेरिकेमध्यें स्पिट्झर गोळी वापरतात. ही ली एन्फील्ड गोळीपेक्षां लहान असून तिची गति तिच्यावर होणाऱ्या वाराचा परिणाम आणि बंदुकीची झीज या

बाबतींत एन्फील्डपेक्षां चांगली आहे असें म्हणतात. जर्मनीमध्यें व फ्रान्समध्यें एस् आणि डी या नांवाच्या गोळ्या १९०६ साली प्रचारांत आल्या.

बंदुकीचीं काडतुसें.—लष्करामध्यें बंदुकीचीं काडतुसें प्रथम १५८६ सालीं उपयोगांत आलीं. तीं प्रथम एका कागदी घरांत दारू व गोळी भरून तयार केलेलीं असत. हीं काडतुसें प्रथम तोंडांतून भरावयाच्याच बंदुकांत वापरीत असत. काडतुसाची मागील बाजू शिपाई दांतांनीं कुरतडून टाकीत व नळींत दारू ओतून वर गोळी ठांसून बसवीत. १६३५ च्या सुमारास चापाच्या अथवा गारेच्या चापाच्या बंदुकी प्रचारांत येईपर्यंत कान्यामध्यें दारू ओतून बंदूक पेटवीत असत. गारेच्या चापाची युक्ति निघाल्यावर पोलादी घोडा गारेवर आपटून ठिणगी उडून दारू पेटविण्याची युक्ति निघाल्यामुळें कान्यांत दारू भरण्याची आवश्यकता उरली नाहीं; कारण नळींत दारू भरतांना त्यांतील कांहीं कान्यांत येऊन घोड्यापर्यंत पोंचत असे.

यानंतर दारू पेटविण्याच्या कामांत तांब्याचीं केपें उपयोगांत आल्यामुळें बरीच प्रगति झाली. केपें वापरण्याची पद्धतहि सर्व लष्करांत सुरू होण्यास आठ वर्षें (१८३४ पासून १८४२ पर्यंत) लागलीं. या केपांत क्लोरेट आफ पोटॅश, गंधक आणि कोळसा यांचें मिश्रण भरलेलें असून तें दाबानें पेट घेत असे. या शोधास अनुसरून गारेचे चाप बदलून लवकरच नवीन तऱ्हेचे चाप बसविण्यांत आले. या केपांमुळेंच अर्वाचीन काडतुसें प्रचारांत आलीं, व पाठीमागून गोळी भरण्याचें तत्त्वहि विस्तृतपणें अमलांत आणतां आलें.

काडतुसांचा मुख्य उपयोग म्हटला म्हणजे बार काढतांना उत्पन्न होणारा धूर पाठीमार्गे येण्यास प्रतिबंध करणें हा होय. व हें कार्य काडतुसाचें घर स्वतःच्याच पेटण्यामुळें प्रसरण पावून नळीमध्यें घट्ट बसून होतें. अगदीं पहिलें काडतूस पितळेच्या पातळ पत्र्याचें व कागदाचें मिळून केलेलें असून तें दारूच्या स्फोटाबरोबर प्रसरण पावून बंदुकीच्या नळींत घट्ट बसत असे व त्यामुळें धूर मार्गे येण्याचें बंद होत असे. या काडतुसाच्या पाठीमार्गे मध्यावर एक लहान केप बसविलेलें असून तें चापाच्या दाबामुळें एका पितळी टांचणीनें दाबलें जाऊन पेट घेत असे. या पितळी टांचणीच्या योगानें काडतुसाचें घरहि काढून घेतां येत असे. इंग्लंडमध्यें हें काडतूस प्रथम १८५५ मध्यें उपयोगांत आलें. अलीकडे जीं काडतुसें प्रचारांत आहेत त्यांमध्यें पाठीमार्गे मध्यावर केप बसविलेलें असून त्याची जागा एका आंतील भागापर्यंत पोंचलेल्या काटयानें दाखविली जाते. या काडतुसाचें घर मागाहून काढून टाकण्यांत येतें किंवा अगदीं अर्वाचीन पद्धतीप्रमाणें मागील फर्टांत बसविलेल्या एका सरकत्या प्रक्षेपकाच्या योगानें बाहेर फेकलें जातें. छऱ्यांच्या बंदुकीमध्यें हीं काडतुसें बहुतेक कागदाचीं किंवा पातळ पत्र्याचीं केलेलीं असतात.

अलीकडे या काडतुसांत थोडीफार सुधारणा झाली आहे. दारू आणि गोळी यांमधील ठांसणी अधिक घट्ट करून तींत सुधारणा केली आहे, व काडतुसाच्या घराची कडा बंदुकीच्या कोठयांत बरोबर बसेल अशीहि त्यांत सुधारणा करण्यांत आली आहे. अशीं काडतुसें लष्करी बंदुकांत प्रथम प्रशियानें १८४१ सालीं, ब्रिटिशांनीं एन्फील्ड बंदुकांत १८६७ सालीं व इतर यूरोपियन राष्ट्रांनींहि त्याच सुमारास उपयोगांत आणलीं. यांची लांबी २.२ पासून २.२५ पर्यंत असते. शिकारी बंदुकांत ही लांबी सव्वादोनपासून साडेतीन इंचांपर्यंत असते. अलीकडे सर्व बंदुकांनां नियमित काडतुसें भरून घेण्याचीहि योजना केलेली असते. त्यामुळें एकदम पाहिजे तेवढीं काडतुसें भरून घेतां येतात.

महायुद्धकालीन सुधारणा.—महायुद्धाच्या अमदानींत दारूगोळ्याच्या बाबतींत पुष्कळच सुधारणा घडून आली. दारूगोळा विपूल निर्माण करण्याच्या कामीं या युद्धामध्यें अतिशय श्रम करण्यांत आले. पण त्याप्रमाणेंच दारूगोळ्याच्या बाबतींत नवीन व परिणामकारक शोध करण्याच्या बाबतींत शास्त्रवेत्त्यांनीं बरीच खटपट केली. महायुद्धामध्यें लढण्याचीं निरनिराळीं साधनें उपयोगांत येऊं लागल्यामुळें त्या साधनांनां उपयोगीं पडणारा दारूगोळाहि बनविण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. उदाहरणार्थ विमानांमधून लढाई करण्याची पद्धति अमलांत आल्यामुळें ' एअर बाँब ' ची जरूरी भासूं लागली व त्या प्रकारचा बाँब तयार करण्यांत आला. चिलखतांमधून घुसतील अशा प्रकारचे गोळे बनविण्यांत आले व तारा तोडण्यासाठीं उपयुक्त अशा प्रकारचे गोळे बनविण्यांत आले. अशा प्रकारें निरनिराळ्या तऱ्हेचे व निरनिराळ्या प्रसंगीं उपयोगी पडणारे दारूगोळे या महायुद्धांत निर्माण करण्यांत आले.

महायुद्धांत जे निरनिराळ्या प्रकारचे गोळे तयार करण्यांत येऊं लागले त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें होतीं:— ( १ ) अतिस्फोटक ( हायएक्स्प्लोझिव ), ( २ ) वर्षावक (श्राप्नेल), ( ३ ) चिलखतभेदी ( आरमरपीयर्सिंग ), (४) धुराचे गोळे, ( ५ ) चकचकीत गोळे, ( ६ )विषारी धूर उर्फ गॅस सोडणारे गोळे व ( ८ ) इनसेंडरी उर्फ आग लावणारे गोळे.

( १ ) अतिस्फोटक गोळाः—या प्रकारच्या गोळ्याचा उपयोग दूर अंतराच्या बाबतींत होतो. या गोळ्यामध्यें दारू दडपून भरावी लागते. हा गोळा पोलादी असून या पोलादी झांकणाच्या खालच्या बाजूला एक भोंक असतें व त्यामध्यें एक पोलादी चपटा तुकडा बसविलेला असतो व पुढील टोंकाला एक पोकळ तुकडा बसविलेला असतो. अशा रीतीची याची रचना असते. या पोलादी झांकणामध्यें जितका दारूगोळा खेंचून भरावा तितका त्याचा जोर अधिक असतो. या गोळ्याचा, इमारती जमीनदोस्त करणें, तारांचीं जाळीं तोडून टाकणें इत्यादि बाबतींत फार उपयोग होतो. जर्मनीमध्यें या पोलादी झांकणामध्यें खालच्या भागामधून दारू कोंबण्यांत

येते. पण इंग्लंडमध्यें पुढच्या भागांतून दारू आंत घालण्याची पद्धत आहे. हा स्फोटक गोळा अमोनियम नायट्रेट, अमॅटोल व पिक्रिक ॲसिड घालून बनविलेला असतो.

( २ ) *वर्षावक उर्फ श्रापेल गोळाः*—हा प्रकार प्रथम लेफ्टनंट हेनरी श्रापूनेल यानें १७८४ सालीं काढला व त्यांत पुढें कर्नल बॉक्सर यानें सुधारणा केली. त्याला डायफ्रॅमशेल असेंहि म्हणतात. याच्याच सेग्मेंट व रिंगशेल अशा आणखी जाती आहेत. हा मुख्यतः माणसांच्या वर सोडावयाचा असतो. पण महायुद्धांत याचा उपयोग तारा तोडण्याच्या व विमानावर टाकण्याच्या बाबतींत करण्यांत आला. या श्रापेलमध्यें लहान लहान दारूच्या गोळ्या घालतात व नंतर त्या हवेंत उडून त्यांचा वर्षाव होतो. गोळ्यांचें वजन व त्यांची संख्या यांच्यावर गोळ्या दूरवर अगर जवळ उडविण्याचें प्रमाण बसलेलें असतें.

( ३ ) चिलखतभेदी गोळेः—जहाजें लोखंडी पत्र्याचीं करूं लागल्यावर लढाऊ जहाजांना चिलखतांप्रमाणें जाड संरक्षक पत्रा बसवूं लागले. अशा जहाजांच्या चिलखतांमध्यें घुसण्याकरितां आवश्यक गोष्टी म्हटल्या म्हणजे ज्या धातूचा गोळा बनविलेला असतो त्या धातूचा चिवटपणा व त्या गोळ्याची स्फोटशक्ति या होत. मऊ चिलखतांच्या बाबतींत गोळ्याच्या स्फोटशक्तीचा व धातूच्या काठिण्याचा फार उपयोग होतो. कठिण व जाड चिलखताच्या आंत घुसण्याच्या कामीं चिवट धातू उपयोगी पडते. चिलखतभेदी गोळ्याचे २ प्रकार आहेत. ( १ ) चिलखतभेदी गोळा, ( २ ) अर्धचिलखतभेदी गोळा. पहिल्या बाबतींत गोळ्याची स्फोटशक्ति थोडी असून गोळ्याचें अगर अस्त्राचें मुख व गोळ्याचा भाग हा अत्यंत कठिण असतो. पण मधला भाग हा मऊ असतएव चिवट असतो. गोळ्याचा मुख्य भाग हा लांबट व अरुंद असा असतो. प्रथमतः हे गोळे लोखंडाचे बनविण्यांत येत असत पण पुढें जसजशीं चिलखतें अधिकाधिक कठिण करण्यांत येऊं लागलीं तसतसें, लोखंडाच्या जागीं पोलाद वापरण्यांत येऊं लागलें. या गोळ्यामध्यें दारू भरण्यापूर्वी तो कांहीं दिवस तसाच ठेवण्यांत येतो. दुसऱ्या प्रकारामध्यें गोळ्याच्या स्फोटशक्तीचा फार उपयोग होतो. या गोळ्याचें टोंक अणकुचीदार व कठिण असतें; व स्फोटद्रव्यें ज्या ठिकाणीं भरतात तो भाग चांगल्या धातूचा केलेला असतो.

गोळा जर कठिण चिलखतावर सोडला तर गोळ्याचें अणकुचीदार टोंक कदाचित मोडण्याचा संभव असतो. यासाठीं त्या टोंकावर एक झांकण घालण्यांत येतें व त्यामुळें गोळ्याचें टोंक न मोडतां, त्या चिलखतांत तिरपें घुसतें.

१९१३ सालीं या गोळ्याच्या कृतींत महत्त्वाची सुधारणा घडून आली. त्या सालीं गोळ्याचा खालचा भाग रुंदट व पुढें निमुळता अशा प्रकारची रचना करण्यांत आली. त्याचप्रमाणें गोळ्याची गति अधिक करण्याच्या बाबतींतहि बरेच प्रयोग करण्यांत आले.

गोळ्यांतील साहित्य उर्फ द्रव्येंः—गोळ्यांतील द्रव्यें तयार करण्यासंबंधींची कृति खालीलप्रमाणें आहे.

शेंकडा–मिश्रण

| | एच् इ. गोळा | श्रापूनेल | चिलखतभेद, |
|---|---|---|---|
| कार्बन | ०.५ | ०.७५ | ०.५ ते ०.७५ |
| सिलिकॉन | ०.३५ | ०.०२ | ०.५ |
| मँगनीज | ०.४ ते १ | १ | ०.२५ |
| सल्फर | ०.०८ | ०.०४ | ०.०८ |
| फॉस्फरस | ०.०८ | ०.०६ | ०.०८ |
| टेन्साइल स्ट्रेंग्थ | ३५.४९ टन दर इंची. | हलका, ५६ टन दर इंची. जड, ३८ टन दर इंची. | ३८ टन दर इंची |
| ईल पाईंट | १९ टन | हलका ४६ जड २४ | २४ टन |

गोळा तयार करण्याच्या कामीं लोखंड किंवा पोलाद वापरण्यांत येतें. ओतीव लोखंड हें कठिण पण ठिसूळ व कमी लवचिक असल्याकारणानें, मोठा मार काढण्याच्या कामीं अगर दुसरें एखादें मोठें काम तडीस नेण्याच्या कामीं लोखंडाचा उपयोग होत नाहीं. मोठ्या गतीच्या तोफेचा धक्का सहन करण्याची शक्ति लोखंडाच्या अंगीं नसते त्यामुळें अशा कामीं लोखंडाचा व्हावा तितका उपयोग होत नाहीं. तथापि लोखंड हें सुलभ द्रवणक्षम असल्यामुळें व तें स्वस्त पडत असल्याकारणानें त्याचाच पुष्कळदां उपयोग करण्यांत येतो. महायुद्धामध्यें एक विशिष्ट प्रकारचा रासायनिक गोळा तयार करण्याच्या कामीं पोलाद भरपूर न मिळाल्यानें जर्मनांनीं लोखंडाचाच उपयोग केला होता. ओतीव लोखंडापेक्षां घडीव लोखंड अधिक चिवट व उपयुक्त असतें. पण ओतीव किंवा घडीव लोखंडापेक्षां सर्व बाबतींत पोलाद हें सरस आहे. पोलादाच्या अंगीं लवचिकपणा, तन्यता व धारणक्षमता हे तिन्ही गुण आहेत व धक्का सहन करण्याची पात्रताहि पोलादाच्या अंगीं आहे. घडीव पोलादाच्या अंगीं तन्यता भरपूर असून व तें तंतुमय असल्याकारणानें छिद्रें पडण्याची भीति नाहीं. ओतीव पोलाद, हें घडीव पोलादापेक्षां अधिक कणखर पण धारणक्षमता व तन्यता या बाबतींत कमी असतें; शिवाय ओतीव पोलादांत रंध्रें राहण्याची भीति असते यासाठीं होतां होईलतों घडीव पोलादाचाच उपयोग करण्यांत येतो. स्फोटक गोळा हा नेहमीं घडीव पोलादाचाच करण्यांत येतो. या गोळ्याची खालची बाजू फार जाड असून या गोळ्याचा बाहेरचा भाग कोनाकृति असतो.

सामान्य गोळा हा ओतीव अगर घडीव लोखंडाचा अगर घडीव पोलादाचाहि क्वचित् प्रसंगीं बनवितात. घडीव पोलादाचा एक तोटा हा आहे कीं, तोफेच्या मारासरशीं त्याचे लहान तुकडे होतात. श्राप्नेल गोळा हा बहुधा घडीव पोलादांत केलेला असतो पण मोठया गोळयाच्या कामीं ओतीव पोलादहि वापरण्यांत येतें. चिलखतभेदी गोळा हा ओतीव अगर घडीव अशा दोन्ही प्रकारच्या पोलादाचा बनविलेला असतो. या गोळयाचीं टोंकें अतिशय कणखर केलेलीं असतात. पण गोळ्याचा मुख्य भाग मात्र मृदु केलेला असतो.

अस्त्रें उर्फ गोळे तयार करण्याच्या कामीं जें पोलाद वापरण्यांत येतें तें निरनिराळया प्रकारानें तयार केलेलें असतें. मुशीमध्यें घालून तयार केलेलें पोलाद हें यूरोपमध्यें व विशेषतः जर्मनीमध्यें मोठया प्रमाणावर वापरण्यांत येतें. पण या पद्धतीनें तयार केलेल्या पोलादांत सारखेपणा रहात नाहीं. पोलाद तयार करण्याची दुसरी पद्धत म्हणजे बिसीमरची पद्धत होय. या पद्धतीनें पोलाद थोडक्या खर्चांत व मोठया प्रमाणावर लवकर तयार करण्यांत येतें. तिसरी पद्धत म्हणजे उघडया भट्टीच्या सहाय्यानें तयार करण्याची होय. या पद्धतींत सारख्या दर्जाचें पोलाद स्वस्तांत तयार होऊं शकतें.

तोफांचीं काडतुसें व काना भरण्याचीं हत्यारें:— तोफांच्या काडतुसांचे दोन प्रकार आहेत. (१) तोंडाकडून भरण्याच्या कामीं वापरलीं जाणारीं काडतुसें व (२) शेपवारी काडतुसें. या प्रत्येक प्रकाराचे पुन्हां दोन पोटप्रकार आहेत. ते म्हणजे, साध्या तोफांचीं काडतुसें व हॉविट्झरचीं काडतुसें हे होत. अलीकडे बहुतेक पाठीमागून भरणाऱ्या तोफांचाच उपयोग सर्वत्र करण्यांत येतो. यांनां लागणाऱ्या काडतुसांचें बाह्य आच्छादन अशा प्रकारचें लागतें कीं जें लवकर गंजतां अगर झिजतां उपयोगी नाहीं. स्फोटाचा परिणाम त्याच्यावर होतां उपयोगी नाहीं, आणि मारासरसें तें आच्छादन जळून खाक झालें पाहिजे. रेशमी किडयांच्या कोशांचें रेशीम या कामीं फार उपयुक्त आहे असें ठरविण्यांत आलें आहे.

मशीनगन, रायफल, आणि पिस्तुलें:—१९१० सालापासून व विशेषतः महायुद्धाच्या अमदानींत, मशीनगन, रायफल, व पिस्तुल यांनां लागणाऱ्या दारूगोळ्यामध्यें पुष्कळच सुधारणा घडून आली आहे. मशीनगन, रायफल वगैरेंनां जीं काडतुसें लागतात, तीं एकाच तऱ्हेचीं पण लहानमोठीं असतात. काडतुसामधील दारूगोळ्याशिवाय काडतुसाचे इतर भाग म्हणजे, काडतुसाचें आच्छादन, प्रायमर व गोळी हे होत. काडतुसाचें आच्छादन काडतुसासाठीं मुद्दाम तयार करण्यांत आलेल्या पितळेचें असतें. हें पितळ शेकडा ६७ भाग तांबें व ३३ भाग जस्त घालून तयार केलेलें असतें. या आच्छादनाच्या आंत प्रायमर म्हणजे पितळेचें दारू भरलेलें एक झांकण असतें व या झांकणामध्यें गोळी घालण्यांत येते, ही गोळी कप्रो-निकलची बनविलेली असते. अशा रीतीनें काडतुसें तयार करून तीं सुरक्षित अशा धातूच्या पेटींत ठेवण्यांत येतात.

मशीनगननां लागणाऱ्या काडतुसांचे दोन प्रकार आहेत. एक जमिनीवर उडविण्यांत येणाऱ्या मशीनगनसाठीं उपयोगांत आणलीं जाणारीं काडतुसें व दुसरीं हवेंत उडवण्याच्या कामीं लागणारीं काडतुसें. पहिल्या प्रकारांत गेल्या महायुद्धामुळें कोणताच म्हणण्यासारखा फरक घडून आला नाहीं फक्त मशीनगनला उपयुक्त अशा प्रकारची उच्च तऱ्हा निर्माण करण्यांत आली. या भुईवरील मशीनगनला लागणारा दारूगोळा साधारणतः बंदुकीला लागणाऱ्या दारूगोळ्याहून निराळा नसतो. महायुद्धामध्यें युध्यमान राष्ट्रांनीं, या मशीनगनसाठीं थोडीं काडतुसें मुद्दाम तयार केलीं होतीं. अंतरिक्षांतील मशीनगनमध्यें घालण्यांत येणाऱ्या दारूगोळ्यामध्यें मात्र निरनिराळया प्रकारची सुधारणा घडून आली.

**दारेसलाम**—दारेसलाम हें पूर्व आफ्रिकेचें बंदर असून दक्षिण अक्षांश ६° ५०' आणि पूर्व रेखांश ३९° २०' यांच्या संयोगावर आहे. १९०९ सालीं येथील लोकसंख्या सुमारें २४००० होती त्यांपैकीं ५०० यूरोपिअन होते. या बंदरांत तरती गोदी आहे. शहर बंदराच्या उत्तरेस असून तें युरोपियन पद्धतीनें वसविलेलें आहे. येथील सडका रुंद आहेत. येथील सार्वजनिक इमारतींत सरकारी आणि जकातीच्या कचेऱ्या, पोष्टऑफिस, रुग्णालय आणि लष्करी चाळी आहेत. येथील गव्हर्नरच्या वाडयाजवळ वनस्पतीचे बगीचे आहेत. येथें पुष्कळ ख्रिस्ती मंदिरें असून सरकारी आणि मिशनरी शाळाहि आहेत.

जर्मनीनें हें घेतलें त्यावेळेस तें फार लहान खेडें होतें. १८६२ सालीं झांजिबारचा सुलतान सय्यद मजीदनें शहर वसविण्याचा इरादा केला. परंतु १८७१ त त्याच्या मरणामुळें तें घडलें नाहीं. दारेसलाम हें मुख्य बंदर करण्याच्या हेतूनें विल्यम मॅकिनॉननें येथून व्हिक्टोरिया नायंझापर्यंत सडक बांधण्यास सुरवात केली पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. १८८७ सालीं डॉक्टर कार्लपीटरनें जर्मन कंपनीच्या वतीनें तें आपल्या ताब्यांत घेतलें आणि १८८९ सालीं जर्मन साम्राज्यसरकारास दिलें. १८९१ सालीं हें वसाहतीच्या राजधानीचें शहर झालें. महायुद्धानंतर हें ब्रिटिशांच्या ताब्यांत मँडेटनें आलें आहे. मोरोगोरोला येथूनच रेल्वे जाते. समुद्रांतून नेलेल्या तारेनें हें झांजिबारला जोडलें आहे. हस्तिदंताचें सामान, रबर, आणि राळ या ठिकाणाहून परदेशास जातें. या शहरांत हिंदी लोकांची वस्ती बरीच आहे.

**दारोड**—मुंबई, काठेवाड. भोयकापासून तीन मैलांवरील निराळी खंडणी देणारी एक जहागीर. येथील तालुकदार झाला रजपूत आहेत.

**दार्जिलिंग,** जि ल्हा.—बंगालमध्यें भागलपूर विभागाचा उत्तर सरहद्दीवरील जिल्हा.क्षेत्रफळ ११६४ चौरस मैल. पश्चिमेस नेपाळ व ईशान्येस भूतान यांच्या दरम्यान हा जिल्हा उत्तरेस सिकीमपर्यंत गेलेला आहे. पूर्वेस व दक्षिणेस हा जिल्हा जलपैगुरी व पूर्णिया या जिल्ह्यापर्यंत जातो. ह्या जिल्ह्याचे दोन स्पष्ट भाग आहेत. हिमालयाच्या खालचा डोंगर व दऱ्या असलेला प्रदेश, व पायथ्याचा सपाट प्रदेश किंवा तराई. सपाट प्रदेश समुद्रसपाटीपासून ३०० फूट उंच आहे व डोंगरांची उंची ६००० ते १०००० फूट असून त्यांच्या माथ्यांवर दाट अरण्यें आहेत. हल्लीं चहाचे मळे व इतर लागवड येथें झालेला आहे. दार्जिलिंग येथील देखावा भव्य व शोभिवंत आहे.

सिकीमच्या उत्तर सरहद्दीवरून पूर्व-पश्चिम जाणाऱ्या हिमालय पर्वतापासून, प्रथम नेपाळ व सिकीम आणि नंतर नेपाळ व दार्जिलिंग यांच्या सरहद्दीवरून, सिंगालिला रांग आलेली आहे. दार्जिलिंगजवळ तीन लहान रांगा येऊन मिळतात यांपैकीं शेवटल्या डोंगरांतून दार्जिलिंग-हिमालय रेल्वे नेलेली आहे. चौरंग्याजवळ दार्जिलिंग स्टेशनची उंची ७००२ फूट आहे. ६००० फुटांपेक्षां उंच डोंगर व ३०७० फुटांपेक्षां खोल दऱ्या यांच्यांमधील अरण्यें राखलेलीं आहेत; यांच्या दरम्यान तिस्ता नदीच्या पूर्वेकडील उतार देशी लागवडीकरिता ठेवलेले आहेत; व त्या नदीच्या प्रदेशांत चहाशिवाय दुसरें कांहीं तयार करण्यांत येत नाहीं.तिस्ता, महानदी (महानंदा) व बालासन ह्या येथील मुख्य नद्या आहेत.

*या जिल्ह्यांत बहुतेक ठिकाणीं कंबूर व कोठें अभ्रक सापडतो.* ३००० ते ११०००फूट उंचीच्या दरम्यान काळीं अस्वलें व तराईत वाघ,गेंडे,हरणें,रानटी डुक्कर व क्वचित हत्ती आढळतात. दार्जिलिंग शहरांतील मध्यम उष्णमान हिवाळ्यांत ४२°, मे महिन्यांत ५९° व जून ते सप्टेंबरपर्यंत सुमारें ६०° असतें. ज्यास्तींत ज्यास्त सरासरी उष्णमान ६६° व कमींत कमी सरासरी ३५° असतें. वार्षिक पाऊस सरासरी १२६ इंच पडतो.

इतिहासः—१८१४-१६ च्या गुरखा युद्धात ईस्टइंडिया कंपनीचा या जिल्ह्याशीं संबंध आला. सिकीमच्या राजापासून गुरख्यांनीं हल्लींच्या जिल्ह्याचा मोरंग किंवा तराई हा भाग घेतला होता, तो १८१६ सालच्या तहानें इंग्रजांनीं आपणांकडे घेऊन लगेच सिकीमला परत दिला. लॉर्ड विल्यम बेंटिंक यांच्या कारकीर्दीत (१८३५) इंग्रजांनीं सिकीमच्या राजापासून दार्जिलिंग व आसपासच्या टेंकड्या, वार्षिक ३००० रु. (पुढें ही रक्कम वाढवून १२००० रु. करण्यांत आली.) देण्याचें कबूल करून मिळविल्या. लवकरच बंगालचे कामगार उन्हाळ्यात सहकुटुंब येथें येऊन राहूं लागले व यूरोपियन आजारी सैनिकांकरितां हें हवा खाण्याचें ठिकाण करण्यांत आलें. १८४९ सालीं हिंदुस्थान सरकारच्या परवानगीनें डॉ. हूकर हा भूतानमध्यें गेला असतां, तेथें त्याला अटक झाल्यामुळें इंग्रजांनीं सिकीमची तराई आपल्या राज्यास जोडून वार्षिक देत असलेली रक्कम बंद केली. शेवटीं १८६६ सालीं तिस्ता नदीच्या पूर्वेकडील ४८६ चौरस मैल प्रदेश (कालिंपांग पोलीस ठाणें) भूतानपासून घेऊन या जिल्ह्यांत समाविष्ट करण्यांत आला.

लोकसंख्याः—या जिल्ह्याची लोकसंख्या १८७२ सालापासून वाढत वाढत १९२१ सालीं २८२७४८ झाली. टेंकड्यावरील हवा निरोगी असून तेथील मृत्यूचें प्रमाण कमी आहे; पण मलेरियस हवा असलेल्या तराईत तें प्रमाण नेहमीं वरेंच असतें. स्त्रियांचें पुरुषांशीं प्रमाण ८७:१०० असल्यामुळें या जिल्ह्यांत जननाचें प्रमाण कमी आहे. लोकसंख्येपैकीं निम्म्याहून अधिक नेपाळी आहेत; व बाकीचे राजवंशी किंवा कोच, लेपचा, व भोतिया आहेत. ३/४ पेक्षां जास्त लोकांचा धर्म हिंदु आहे; पन्नास हजार बौद्ध व शें. ४ पेक्षाहि कमी मुसुलमान आहेत. निम्मे लोक तिबेटी-ब्रह्मी भाषांच्या पोटभाषा बोलतात. याशिवाय, खश नांवाची हिंदीची अपभ्रष्ट भाषा आणि बंगाली व हिंदी भाषाहि चालतात. शें. ७८ लोक शेतकीच्या कामांत गुंतलेले आहेत.

शेतीः—चहा,तांदूळ व मका हे येथें मुख्य जिन्नस आहेत. येथें चहाचें पीक जरी कमी येतें तरी त्याला एक प्रकारचा सुंदर वास असल्यामुळें किंमत चांगली येऊन फायदाहि बरा होतो.कोयनेल काढण्याकरितां सिंकोना झाडांची लागवड१८६४ सालीं सुरू झाली. १९०३-०४ सालीं येथून १२००० पौंड कोयनेल पोष्ट ऑफिसांत विक्रीकरितां पाठविण्यांत आलें होतें.

जंगलेः—राखलेल्या जंगलांचें क्षेत्रफळ ४३३ चौरस मैल आहे. येथें देवदार, वांबू, साग, चेसनट, मॅपल, ओक, मॅगोलिया, लॅारेल वगैरे झाडें होतात. १९०३-०४ सालीं जंगलांचें उत्पन्न २-६२ लक्ष रु. होतें.

खनिजः—दगडी कोळसा, लोखंड, तांबें, दगडी पाट्या वगैरे खनिज पदार्थ या जिल्ह्यांत सांपडतात; पण ह्यांपैकीं फारच थोडे पदार्थ सध्यां काढण्यांत येतात.

व्यापारः—मूळचे सर्व रहिवासी, विशेषतः लेपचा लोक जाडें भरडें कापड तयार करतात. सोनाद व कुरसॅांग येथें दारूचे कारखाने आहेत.ह्या जिल्ह्याचा व्यापार मुख्यतः कलकत्त्याशीं चालतो व चहा, ताग, तरटें, वगैरे जिन्नस बाहेर पाठविण्यांत येतात; विलायती कापड, रॉकेल तेल व मीठ हे आयात जिन्नस आहेत. पश्चिमेकडील व्यापार दार्जिलिंग-हिमालय रेल्वेनें व पूर्वेकडील व्यापार बैलगाड्या व घोडे यांच्या योगानें तिस्ता रस्त्यानें होतो. दार्जिलिंग गांव, कालिंपांग व सिलीगुरी हीं व्यापाराचीं मुख्य ठाणीं आहेत. दार्जिलिंग-हिमालय रेल्वेनें दार्जिलिंग व सिलीगुरी हीं गांवें जोडलेलीं आहेत.

राज्यव्यवस्थाः—राज्यव्यवस्थेकरितां जिल्ह्याचे ( हा नॉन् रेग्युलेशन जिल्ह्यांपैकीं आहे ) दोन पोटविभाग केलेले असून त्यांचीं मुख्य ठिकाणें दार्जिलिंग व कुरसॉंग येथें आहेत. या दोन ठिकाणच्या म्युनिसिपालिटयांखेरीज इतर ठिकाणचा स्थानिक कारभार, दार्जिलिंग-सुधारणा फंडाचा व्यवस्थापक या नात्यानें डेप्युटी कमिशनर पहातो.

गां व.—बंगालमधील दार्जिलिंग जिल्ह्याचें मुख्य ठिकाण, लोअर हिमालयामध्यें असून कलकत्त्याहून ३७९ मैल दूर आहे. दार्जिलिंग म्हणजे " दार्जाची जागा. " १९११ सालीं दोन्ही छावण्या धरून लो. सं. १९००५ होती. दार्जिलिंग हें ब्रिटिशांस १८३५ सालीं मिळालें. आतां हें बंगालच्या लेफ्टनंट गव्हर्नरचें उन्हाळयांत रहाण्याचें थंड ठिकाण आहे. १८९९ सालीं चक्रवातामुळें व वर्षावृष्टीमुळें ह्या गांवाची फार नुकसानी झाली. १८९७ सालीं येथें भूकंपाचा जबर धक्का बसला. चिनीमातीचे पेले, पोंवळयाचे दागिने, पेरोज गोमेद यांचे बनविलेले पेले, माळेचे मणी, घंटा, कुकी, नेपाळी पितळ सामान वगैरे वस्तूंचा व्यापार चालतो. येथें म्युनिसिपालिटीची स्थापना १८५० सालीं झाली. येथें विजेचे दिवे आहेत. दार्जिलिंग छावणींत जालापहाड व कटपहाड यांचा समावेश होतो. लिबांग छावणींत ब्रिटिश पायदळाची तुकडी रहाते.

**दालचिनी**—या झाडास लॅटिनमध्यें सिनॅमोमम्; संस्कृतमध्यें बहुगंध, मनःप्रिय, तनुत्वक; मराठींत दालचिनी; गुजरार्थीत तज, दालचिनी; बंगालींत पाग चिनी; तैलंगी भाषेंत सनलिंगु दालचिनी; तामिळींत करुवा अशीं नांवें आहेत. दालचिनीचें झाड बरेंच मोठें असून तें पश्चिम व दक्षिण हिंदुस्थान, तेनासरीम व सिलोनमध्यें उगवतें. सिलोनमध्यें तर याच्या सुगंधी सालीकरितां याची लागवड मोठ्या प्रमाणांत करितात. याची लागवड हिंदुस्थानांत आर्थिक दृष्टया कोणी करीत नाहीं; परंतु मुंबई, मद्रास व बंगालमध्यें शोभेकरितां हीं झाडें लावितात. पश्चिम व दक्षिण हिंदुस्थान आणि कोंकणपासून दक्षिणेकडे ६००० फूट उंचीपर्यंत हें दालचिनीचें झाड आपोआप उगवतें.

दालचिनीचा वृक्ष मलबारी तज अथवा तमालवृक्षाच्या झाडापेक्षां मोठा असतो. फळहि मोठें असतें. परंतु विशेषेंकरून याची साल तमालाच्या सालीपेक्षां पिंवळी, लवचीक व जास्त सुगंधी असते. याचीं पानें लंबगोल असून मोठीं असतात. आणि त्यांवर तीन रेषा असतात. पानें तमाल पत्रासारखीं परंतु त्याच्या दिढीनें मोठीं असतात. पानें सुकल्यावर त्यांचा लवंगासारखा वास येतो. फळें करवंदासारखीं येतात. त्यांचें तेल काढितात. तसेंच फळांचा अर्क व अत्तर बनतें.

इतिहास.—गार्सिया डी ओर्टा यानें आपल्या लेखांत (१५६३) मलबार व सिलोन येथील या झाडाची माहिती सविस्तर दिली आहे. परंतु पुढील लेखकांनीं या झाडाविषयीं अज्ञान दाखविलें आहे ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे. दालचिनीच्या लांकडाला पुष्कळ वेळां चुकीनें ' कापराचें लांकूड' असें म्हणतात व त्यामुळें कापराच्या झाडापासून याची उत्पत्ति आहे असा कित्येकांचा गैर समज झाला असला पाहिजे. दालचिनीचा व्यापार चिनी लोक करीत, तेव्हां हिचा चिनी लोकांशीं संबंध पडल्यामुळेंच ' दालचिनी ' हा शब्द बनला असावा. चिनी लोक विकावयाच्या सालीची किंमत वाढण्याकरितां तिला पौराणिक नांवें देत व तिच्याबद्दल निरनिराळ्या गोष्टी सांगत असत असें गार्सिया डि ओर्टा म्हणतो. चीन देशांतील लोकांशीं व्यापार सुरू होण्यापूर्वीच दालचिनीचें नांव या देशांत माहीत होतें व फार प्राचीन अरब लोकांशीं दळणवळण असतांना दालचिनीचा संबंध येत असे. पोर्तुगीज व डच लोकांनीं सिलोन जिंकल्यावर दालचिनीची पद्धतशीर लागवड येथें सुरू झाली. दालचिनीच्या व्यापाराचा मक्ता सरकारनें आपणांकडेच ठेवल्यानें तिची किंमत फार वाढली. मक्ता आपणांकडेच कायम ठेवण्याकरितां बरेच कडक कायदे करण्यांत आले. परंतु १७९६ सालीं सिलोन ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत आल्यावर ते कायदे बरेच सौम्य करण्यांत आले व १८३३ पासून तर दालचिनीची लागवड करण्यास प्रतिबंधच ठेविला नाहीं.

लागवड.—हें झाड जंगलांत उगवलें असतां जरी मोठें वाढतें तरी त्याची लागवड केल्यावर तें फारसें वाढत-नाहीं. झाड सुमारें सहा वर्षांचें झाल्यावर तें तोडतात व त्यांतून नवीन अंकुर येतात; तेहि पुन्हां दोन वर्षांनीं तोडून टाकितात. लागवडीला रेताड चिकणमाती व खतावलेली जमीन चांगली असें म्हणतात. उष्ण कटिबंधांत हें झाड कोणत्याहि जमिनीवर वाढतें. हें झाड अयोग्य ठिकाणीं व हवेंत लाविल्यास त्याची साल किंमतीला हलकी ठरते.

दालचिनी तयार करण्याची कृति.—अंकुराच्या आजूबाजूच्या लहान खांद्या व सर्व पानें काढून टाकून त्याच्या वर उभ्या दोन चिरा पाडितात. पावसाळ्यांत छाटणी केलेली असल्यास साल फार त्रास न पडतां निघते. परंतु साल सुटण्यासाठीं गुळगुळीत लांकडी ठोकळ्यानें ती घांसावी लागते. अशा रीतीनें साल काढल्यावर सुमारें एक तासानें त्या साली एकमेकांत घालितात. व दाबून त्यांचे गठ्ठे बांधितात. एक दोन दिवसांनीं त्या फणफणल्यावर त्या वांकड्या चाकूनें खरडून त्यांमधील बिलबिलीत पदार्थ काढून घेतात. यानंतर सालींचे पूर्ववत् गठ्ठे बांधितात परंतु गठ्ठे बांधण्यापूर्वी त्यांचे १२ इंच लांबीचे तुकडे पाडितात व नंतर डाहाळ्यांच्या केलेल्या तक्त्यावर ते तुकडे वाळवितात. साली वाळल्यावर त्या लेखणीप्रमाणें दिसूं लागतात. ३० पौंड वजनाच्या सालींची एक जुडी बांधितात व अशा तीन जुड्या मिळून एक गठ्ठा करितात. मोठाल्या कोंबाची साल लेखणीच्या आकाराची होत नाहीं. तिचे जाड जाड तुकडेच बाजारांत विकतात व स्वाद कमी असल्यामुळें त्यांस फार कमी किंमत

येते. एक एकर जमीनीमध्यें सुमारें १५० पौंड साल उत्पन्न होते. दालचिनी व कासिया लिग्निया (तजपत्र) यांची भेसळ कधीं कधीं करून विकतात.

दालचिनीची साल—पानें व मुळ्या यांपासून तीन प्रकारचें तेल निघतें. सालीपासून निघणाऱ्या तेलाला दालचिनीचा अर्क असें म्हणतात. दालचिनीच्या सालीचा व तेलाचा खाण्यांत व औषधांत उपयोग करितात. हिंदुस्थान व सिलोन येथें दालचिनीच्या ऐवजीं तज व कालका साल वापरतात. हिंदुस्थानांतून सिलोनमध्यें जाणारा माल दिवसेंदिवस वाढत आहे. सिलोनला बहुतेक माल बंगाल व मद्रासमधून जातो व कांहीं थोडा ब्रह्मदेशामधून पाठवितात. दालचिनीच्या बऱ्याच उपजाती आहेत.

**दाल तलाव**—काश्मीर संस्थानांतील श्रीनगरजवळील एक तलाव. लांबी ४ मैल व रुंदी २॥ मैल आहे. सर्व जगांत ही जागा अतिशय रमणीय आहे. कांठावरील डोंगरांच्या सुळक्यांचें व वृक्षांचें प्रतिबिंब पाण्यांत रमणीय दिसतें. आक्टोबर महिन्यांत तर रमणीयता फारच येते. मोठे गगनचुंबित हिंवर वृक्षहि किनाऱ्यावर दृष्टीस पडतात. येथील लव्हाळें लालसर सोनेरी दिसूं लागलें म्हणजे एकंदर देखावा फारच मनोरम दिसतो. डाव्या हातास प्रसिद्ध तख्ति सुलेमान टेंकडी असून उजव्या हातास हरिपर्वत व त्यावरील किल्ला आहे. ह्या दोन टेंकड्यांमध्यें श्रीनगर वसलेलें असून पलीकडे पश्चिमेस वर्फमय पर्वत आहेत. तलावाचें पाणी अत्यंत निर्मळ असून काश्मीरी शाली उत्तम असण्याचें कारण त्या तेथील पाण्यांत धुतल्या जातात हें होय. मोंगल राजांनीं ह्या जागेची रमणियता वाढविण्याकरितां बरीच मेहनत घेतली. येथें सर्वांत मनोहर असा एक अकबर बादशहाच्या वेळीं लावलेला नसिम बाग आहे. झिबवनपर्वताच्या एका कोंपऱ्यावर असलेला पुरी महाल दारा शिकोहनें आपला शिक्षक मुल्लाशाहकरितां बांधला असें म्हणतात. त्याचें थडगें मुलशाहीबागमध्यें सिंघखोऱ्याच्या मुखाशीं आहे. ह्या तलावांत दोन लहान बेटें असून त्यांचीं नांवें 'सोनलंका' व 'रूपलंका' अशीं आहेत. दाल ह्या नांवाची मूळ उत्पत्ति माहीत नाहीं. काश्मिरी भाषेंत ह्या शब्दाचा अर्थ 'तलाव' असाच होतो.

**दास**—आर्यशब्दविरोधीं दस्यु व दास यासंबंधीं विवेचन पूर्वी ( ज्ञानकोश विभाग ३ पृष्ठ २८ व पुढें ) केलेंच आहे. तसेंच दास म्हणजे गुलाम या अर्थी वापरल्या जाणाऱ्या शब्दासंबंधीं माहिती गुलामगिरी या लेखांत दिली आहे.

**दास**— एक जात, यांचें वसतिस्थान. कर्नाटक आणि दक्षिण महाराष्ट्र. विशेषतः कर्नाटकांत आणि कोल्हापूर संस्थानांत दासांची वस्ती बरीच आहे. म्हैसूरमध्येंहि यांची वस्ती बरीच आहे ( १९११मध्यें ४५६७ होती ). हा एक भिकारी वर्ग असून, हिंदु आणि लिंगायत धर्माच्या हलक्या दर्जाच्या जातींत यांची गणना होते. लिंगायत जातीचे दास शैव पंथी व तद्व्यतिरिक्त दास वैष्णवपंथी असतात. तिरुपतीचा व्यंकटराम हें यांचें आराध्य दैवत होय. हे वंशपरंपरा तिरुपतीच्या वार्षिक वाऱ्या करतात. दासांचा जरी एकच धार्मिक पंथ आहे तरी त्यांच्यांत वेगवेगळ्या जातिशाखा पडल्या आहेत. एका जातींतील लोक दुसऱ्या जातींतील लोकांशीं रोटी अगर बेटीव्यवहार करीत नाहींत. उदाहरणार्थ वन्जिग्, वेडर, गोल्ल, होलिआ, कोरवा, क्षत्री, महार, वलु, सकल इत्यादि जातींत रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. दास हे भिक्षा मागून आपली उपजीविका करतात. शनिवारीं, अमावास्येच्या दिवशीं आणि उपोषणाच्या दिवशीं हे मद्यमांसास स्पर्श करीत नाहींत. म्हैसूरमध्यें हे भिक्षुकी करतात व स्वतःजवळ शंख, घंटा वगैरे बाळगतात.

भिक्षावृत्तीशिवाय दास लोक, गाणेंबजावणें आणि नाटकी खेळ वगैरे करून पोट भरतात. दास स्त्रिया बहुधा वेश्यांचा धंदा करतात. कांहीं स्त्रिया वंशपरंपरा देवांच्या देवळांतून रहातात. अशा स्त्रियांना सारा माफ असलेली जमीन इनाम मिळते. देवळें झाडसारवण्याचें काम यांच्याकडे सोंपविलेलें असतें. तथापि देवळाच्या गाभाऱ्यांत जाण्यास यांना मज्जाव असतो. इनाम जमीनीच्या उत्पन्नाशिवाय खेडेगांवांतील मारुतीस अर्पण केलेल्या अन्नवस्त्रांवर यांचा हक्क असतो. होलिया पंथाच्या दास स्त्रिया 'मुर्गाव' देवतेची मिरवणूक काढतात आणि वेश्यांचा धंदा करून चरितार्थ चालवितात.

दासांच्या प्रत्येक जातिशाखेंत ( १ ) त्रिमल व (२) गौड अशा दोन पोटशाखा असतात. यांच्यांत रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं. ही फूट पडण्याचें कारण म्हणजे तिरमलदास, हे आपल्या स्त्रियांना वेश्यांचा धंदा करण्यास परवानगी देतात. नाचतमाशांत सुद्धां तिरमल दास जातीच्या स्त्रिया भाग घेऊं शकतात. उलट गौड दासांमध्यें अविवाहित मुली अगदींच क्वचित असतात. जेव्हां एखाद्या दासास मुलगा होत नसेल, सगळ्या मुलीच असतील तर तो, त्यांपैकीं एक मुलगी अविवाहित ठेवतो व तिला वेश्येचा धंदा करण्याची अनुमति देतो. तिला जीं मुलें होतात तीं त्याच्या आईच्या व बापाच्या इस्टेटीची वारस ठरतात. त्या वेश्येला जर सगळ्या मुलीच झाल्या तर तीहि आपल्याप्रमाणेंच एक मुलगी अविवाहित ठेवते, व तिला आपल्या धंद्याची दिक्षा देते. [ दि एथ्नॉग्राफिकल सर्व्हे ऑफ बॉम्बे. ]

**दास, चित्तरंजन** ( १८७०-१९२५ )—बंगाल्यांतील एक प्रमुख राजकीय पुढारी, प्रख्यात बॅरिस्टर, कवि व कर्ता समाजसुधारक. या बंगाली गृहस्थाचा जन्म श्रीमंत कुलीन, व दानशूर अशा वैद्य जातीच्या घराण्यांत झाला. यांचे वडील भुवनमोहन बाबू हे कलकत्त्याच्या हायकोर्टांत अटर्नीचें काम करीत असत व ते चांगले लेखकहि होते. चित्तरंजन हे विसाव्या वर्षी कलकत्ता युनिव्हर्सिटीचे बी. ए.

होऊन नंतर इंग्लंडांत जाऊन, आय. सी. एस. परीक्षा पास झाले. इंग्लंडांत असतांना १८९२ साली दादाभाई नवरोजींच्या पार्लमेंटरी निवडणुकीनिमित्त दासबाबूंनी अनेक व्याख्यानें दिली. पण त्यामुळें सरकारी नोकरी मिळण्याइतका वर नंबर आला असतांहि सिव्हिल सर्व्हिस परीक्षेच्या अधिकाऱ्यांनीं निवडक उमेदवारांतून त्यांचें नांव गाळून टाकलें. म्हणून बॅरिस्टरीची परीक्षा देऊन स. १८९३ मध्यें हिंदुस्थानांत परत येऊन कलकत्त्यास त्यांनीं वकीली सुरू केली. या धंद्यांत त्यांनीं चांगलें यश व पुष्कळ संपत्ति मिळविली. बंगालच्या विभागणीमुळें तिकडे जी सार्वजनिक चळवळ सुरू झाली तींत सरकारनें अनेक इसमांवर खटले केले, त्यांत अरविंद घोस हे एक होते, त्यांच्या खटल्यांत बॅ. दास यांनीं उत्तम काम करून घोसांना आरोपांतून सोडविलें, व इतर पुष्कळ आरोपींना सल्लामसलत देऊन मदत केली. पुढें पुढें ते आपल्या धंद्यांत इतके निष्णात बनले होते कीं, त्यांची दरमहा प्राप्ति अलीकडे तीस हजारांवर गेली होती. ते राजकारणांत लो. टिळकांच्या पक्षाचे असून स. १९१६ पासून राजकीय चळवळींत प्रामुख्यानें भाग घेऊं लागले. मॉंटेग्यु-चेम्सफर्ड योजना असमाधानकारक आहे हा ठराव अमृतसरच्या कॉंग्रेसपुढें त्यांनींच मांडला. टिळकांच्या पश्चात् महात्मा गांधींच्या असहकारितेच्या कार्यक्रमांत सर्व पक्षांना संमत अशा दुरुस्त्या नागपूर कांग्रेसमध्यें गांधींकडून त्यांनींच करविल्या आणि नंतर त्यांनीं कॉंग्रेसच्या त्या ठरावास अनुसरून अत्यंत किफायतीचा वकीलीचा धंदा सोडला आणि १९२१ सालांतील कायदेभंगाच्या चळवळींत भाग घेऊन त्यांनीं सहा महिने तुरुंगवास पत्करला. तेथून सुटल्यावर गयेच्या कॉंग्रेसचें अध्यक्षस्थान त्यांनां देण्यांत आलें. त्यावेळीं असहकारितेची सांप्रतच्या देशपरिस्थितिमुळें अव्यवहार्यता व विशेषतः असहकारितेला कायमच्या संपाचें किंवा युद्धाचें स्वरूप मिळण्याची अशक्यता आणून सरकारविरुद्ध राजकीय चळवळीला त्यांनीं कौन्सिल-बहिष्काराऐवजीं कौन्सिलांत शिरून विरोध करण्याचें स्वरूप दिलें, व दिवाणगिरी न पत्करतां सरकारला कौन्सिलांत सरसकट विरोध करून कौन्सिलें सुधारण्यास सरकारास भाग पाडणारा कार्यक्रम ठरवून नवा स्वराज्यपक्ष स्थापन केला. कौन्सिलांत शिरून विरोध करण्याची कल्पना बंगाल व मध्यप्रांतांत चांगली यशस्वी झाली. लेजिस्लेटिव्ह असेंब्लींतहि स्वराज्यपक्षाचा विरोध सरकारला जाणवला आणि स. १९२५ मे मध्यें व्हाइसरॉय लॉर्ड रीडिंग रजेवर विलायतेंत जाऊन स्टेट सेक्रेटरी लॉर्ड बर्केनहेड यांच्याबरोबर पुढील सरकारी धोरणाबद्दल घाटाघाट करीत आहेत अशा संधींत अकस्मात् दास हे दार्जिलिंग येथें १९२५ च्या जून १६ रोजीं हृदयाची क्रिया बंद पडून मरण पावले. दास यांच्या पत्नीचें नांव वासंतीदेवी असें असून त्यांनां चिरंजन नांवाचा एक मुलगा व दोन मुली आहेत. मुलगा बॅरिस्टर झालेला आहे. दासबाबू कायद्यांत निष्णात बनले होतेच, पण पूर्व वयांत ते कवि म्हणून चांगले प्रसिद्ध होते. त्यांची कविता कार्लाईल मॅथ्यू अर्नोल्डच्या धाटणीवर असे. १९१५ साली त्यांनीं केवळ वाङ्मयविषयाला वाहिलेलें 'नारायण' नांवाचें मासिक सुरू केलें होतें. इंग्रजी भाषेवरील त्यांचें प्रभुत्व व वक्तृत्व चांगलें होतें. वकीलींतील डावपेंचाप्रमाणें सरकारविरोधी स्वराज्यपक्षाच्या डावपेंचांतहि अध्यक्ष या नात्यानें ते तरबेज बनत चालले होते. वकील असूनहि मुदतीबाहेर गेलेलें वडिलार्जित सर्व कर्ज त्यांनीं ऐपत येतांच फेडून टाकलें. अनाथ लोक व विशेषतः गरीब विद्यार्थी यांनां मदत करण्यांत दासबाबू पुष्कळ पैसा खर्च करीत असत, त्यामुळें विद्यार्थिवर्गाचें प्रेम त्यांच्यावर असे. असहकारितेच्या वेळीं दासांच्या सांगण्यावरून बंगाल्यांत सर्वांत अधिक म्हणजे १० हजार विद्यार्थी सरकारी शिक्षणसंस्था सोडून बाहेर पडले होते. धार्मिक बाबतींत दासबाबू हे ब्राह्मो पंथाचे होते. मात्र त्यांचें अंतरंग खऱ्या चैतन्य संप्रदायी वैष्णवपंथीय साधूसारखें भक्तिपूर्ण होतें. सनातन धर्मातल्या तत्त्वांप्रमाणें गृहस्थाश्रमानंतर वकीलीचा मोठ्या मिळकतीचा धंदा सोडून त्यांनीं वानप्रस्थाश्रम स्वीकारला इतकेंच नव्हे तर मिळविलेली बहुतेक संपत्ति सार्वजनिक कार्याला देऊन टाकली.

दासोपंत (१५५१-१६१६)—एक महाराष्ट्रीय संतकवि. बेदरच्या ब्राह्मणी बादशहांच्या रियासतींत नारायण पेठ म्हणून एक तालुक्याचें ठाणें होतें. तेथील देशपांडये दिगंबरपंत गालवगोत्री यांस पार्वतीबाईच्या पोटीं शके १४७३ भाद्रपद वद्य अष्टमीस दासोपंत हा पुत्र झाला. दासोपंत अंबाजोगाईच्या आंब्यास रहात असे. येथील देशपांडये दासोपंताचे शिष्य झाले. दासोपंताच्या वंशजांचीं दोन घरें सध्यां आंब्यास आहेत. त्यांनां थोरलें देवघर व धाकटें देवघर अशा संज्ञा आहेत. दासोपंताचे एक वंशज सध्यां नागपुराजवळील चांधाकडे व दुसरे बेदराजवळील बावगीस आहे. आंबें येथील देवघरांत दासोपंताचे खालील ग्रंथ आहेतः—

१ गीतार्णव (सव्वा लाख), २ पदार्णव (सव्वा लाख), ३ गीतार्थबोध चंद्रिका, ४ वाक्यवृत्ति, ५ ग्रंथराज, ६ अवधूतराज, ७ दत्तात्रेयमाहात्म्य (संस्कृत), ८ पंचीकरणपासोडी. दासोपंताच्या लेखांपैकीं पदेंच तेवढीं काव्यांत मोडतील. बाकीचे सर्व ग्रंथ वेदान्तशास्त्रपर आहेत.

दासोपंताच्या पंचीकरणासंबंधानें एक बाब नमूद करण्यासारखी आहे. ती ही कीं, हें समग्र पंचीकरण एका पासोडीवर लिहिलेलें आहे. ही पासोडी बरोबर चोवीस हात लांब व अदीच हात रुंद आहे. वरील आठ ग्रंथांखेरीज दासोपंतानें दुसरे अनेक संस्कृत आगमनिगमादि आचारग्रंथ लिहिले आहेत. तेहि लाखापर्यंत आहेत म्हणतात. असला हा प्रचंड ग्रंथ निर्माण करणारा मराठी कवि दुसरा नाहीं. दासोपंताविषयीं अशी आख्यायिका सांगतात कीं, तो दररोज एका दऊतभर शाई ग्रंथलेखनाच्या कामीं जिरवीत असे.

दासोपंतांचीं पदें भक्तिरसपूर्ण व प्रसादपूर्ण आहेत. मोंगलाईंत गोदावरीच्या तीरीं दासोपंताच्या शिष्यमंडळांतील स्त्रीपुरुष हीं पदें मोठ्या प्रेमानें व भक्तीनें गातात. [ महाराष्ट्र-सारस्वत; धर्म. वर्ष १. अंक २३. ]

**दाहिडा**—मुंबई, काठेवाड. लाखापादर ठाण्यांतील एक स्वतंत्र खंडणी देणारा तालुका. हा तालुका वालाकाठी लोकांच्या ताब्यांत आहे.

**दाहीर**—सिंधदेशावर ज्या चचनामक ब्राह्मण घराण्यानें राज्य केलें त्या घराण्यांतील व खुद्द चचराजाचाच दाहीर हा पुत्र होय ( ज्ञा. को. वि. १३ चच-चचनामा पहा ). अरब यात्रेकरू व व्यापारी सिंधप्रांतांत व्यापारासाठीं आले असतां, देवल या बंदराजवळ असलेले दरोडेखोर त्यांना लुटीत. त्याबद्दल इराणच्या शहानें दाहीरकडे दोन वेळा तक्रार केली, परंतु दाहीरनें तिकडे फारसें लक्ष्य दिलें नाहीं. तेव्हां शहानें दाहीरविरुद्ध धार्मिक युद्ध पुकारलें. इराणची त्यावेळची राजधानी कुफा येथें या स्वारीची तयारी होऊन सेनापति महंमद कासम हा नेमिला गेला. या युद्धांत महंमदानें सर्वत्र अश्मिमारयंत्राचा ( क्याटाप्युल्ट ) उपयोग केला; दाहीरजवळ हीं यंत्रें नव्हतीं, त्यामुळें त्याचा पराभव झाला.

या युद्धांत प्रथम हिंदूंचा जय झाला. परंतु शत्रूकडील एका दारूच्या बाणानें दाहीरची अंबारी पेटल्यानें, त्याचा हत्ती भडकला व पळून जाऊन त्यानें एका तलावांत दाहीर यास फेकून दिलें. याप्रमाणें राजा नाहींसा झाल्याबरोबर हिंदूंचें सैन्य नित्याच्या परिपाठाप्रमाणें पाठमोरें झालें व महंमदानें त्यांचा पराभव केला. इतक्यांत दाहीर हा तलावांतून पोहून बाहेर आला, परंतु त्याच्यावर टपलेल्या महंमदानें तो सांपडल्याबरोबर त्याचा वध केला. याप्रमाणें सिंधचें ब्राह्मणी राज्य नामशेष होऊन तो प्रांत मुसुलमानांच्या हातीं गेला ( ७१२ ). [ चचनामा; फेरिस्ता. ]

**दिगंबर जैन**—एक प्रमुख जैन पंथ. जैनांसंबंधीं सामान्य माहिती जैन संप्रदाय या लेखांत विस्तारानें दिली आहे. येथें फक्त दिगंबरपंथ कसा उत्पन्न झाला व त्याचा श्वेतांबर या दुसऱ्या प्रमुख पंथाशीं फरक कोणत्या बाबतींत आहे तेवढें देतों.

दि गं ब र पं था ची उ त्प त्ति.—शिवभूति हा प्रथम प्रधानपुत्र असून पुढें त्यानें दीक्षा घेतली. त्याला एका राजानें एक रत्नकंबल ( मौल्यवान वस्त्र ) दिलें. पुढें शिवभूतीची त्या वस्त्रावर अतिशय आसक्ति बसून तो तें वस्त्र फार जपून ठेवूं लागला. ही गोष्ट त्याच्या गुरूच्या लक्ष्यांत येऊन, शिवभूति कोठें बाहेर गेला असतां, गुरूनें त्या रत्नकंबलाचे तुकडे करून सर्व शिष्यांस वाटून दिले. शिवभूति परत आल्यावर त्याला या गोष्टीचा फार राग येऊन तो वैतागून गेला व त्यानें त्यावेळेपासून वस्त्रत्याग केला व दिगंबरवृत्तीनें राहूं लागला. नग्न स्थितींत पुढें कोणी राहूं नये म्हणून पूर्वीच्या आचार्यांनीं नियम घालून दिला होता त्यामुळें गुरूच्या दृष्टीनें शिवभूतीचें हें कृत्य नियमबाह्य होतें. परंतु पूर्वीचे आचार्य जिनकल्प स्थितींत रहात होते व तसें रहाण्याचें ज्यांच्या अंगांत सामर्थ्य नाहीं त्यांच्याकरितां वरील नियम होता असें शिवभूतीनें आपल्या कृतीचें समर्थन केलें व ज्याच्या अंगांत तसें राहण्याचें सामर्थ्य आहे त्यानें तसें राहण्यास कांहीं हरकत नाहीं; कारण एकदां जी गोष्ट सत्कृत्य म्हणून समजली जात होती ती आचरणांत आणणें केव्हांहि चांगलेंच होय असें त्याचें म्हणणें होतें. ही कथा आवश्यकसूत्रांत आहे.

श्वे तां ब र व दि गं ब र पं थां ती ल भे द.—धर्मग्रंथ (आगमग्रंथ) यामध्यें दोन्ही पंथांत विशेषसा फरक नाहीं. दिगंबरपंथाच्या लोकांचें म्हणणें आहे कीं पूर्वीचे आगमग्रंथ सर्व नष्ट झाले असून सध्याचे ग्रंथ श्वेतांबरपंथांतील लोकांनीं पुन्हां रचले आहेत. या दोन पंथांच्या तत्त्वज्ञानपद्धतीमध्यें मुळींच भेद नाहीं. परंतु दोन्हींहि पंथांनीं आपापले ग्रंथ स्वतंत्र लिहिले आहेत. श्वेतांबरपंथामध्यें हरिवंशचरित्र, पद्मचरित्र इ. ग्रंथ असून ते बहुतेक प्राकृत भाषेंत आहेत. दिगंबरपंथांत हरिवंशपुराण, पद्मपुराण इ. ग्रंथांचीं नांवें असून ते बहुतेक संस्कृत भाषेंत आहेत. सारख्या नांवाच्या दोन्हींहि ग्रंथांत विषय एकच आहेत व फरक फारच थोडे असून ते किरकोळ स्वरूपाचे आहेत. श्वेतांबरपंथांत स्त्री ही दीक्षा घेण्यास अधिकारी असून तिला कैवल्यप्राप्ति झाल्याचे उल्लेख आहेत. दिगंबरपंथांत स्त्रियांस मोक्ष मिळत नाहीं अशी कल्पना आहे. श्वेतांबर साधू वस्त्रें वापरतात व त्यांच्या मूर्तींनाहि वस्त्रें नेसवितात. दिगंबर साधू नग्न रहातात व त्यांच्या मूर्तीहि नग्न असतात. १९ वा तीर्थंकर मल्लीनाथ ही स्त्री होती अशी श्वेतांबरी परंपरा आहे. दिगंबर त्यास पुरुषच समजतात.

श्वेतांबरामध्यें साधू बरेच आढळतात तसें दिगंबरांत आढळत नाहींत. कारण आतां नग्न स्थितींत रहाणें अशक्य होत चाललें आहे. परंतु दिगंबरांमध्यें श्रावकांपैकींच उपदेशक वर्ग निघाला असून त्यास भट्टारक असें म्हणतात.

श्वेतांबरपंथाचे बरेच ग्रंथ स्वतंत्र रीतीनें लिहिलेले आहेत. दिगंबरांचे ग्रंथ भाषांतररूपानेंच अधिक आढळतात. दिगंबरांतील श्रावकवर्ग श्वेतांबरांतील श्रावकवर्गापेक्षां अधिक विद्वान आढळतो. व त्यांच्यापैकीं पुष्कळांना आपल्या धर्माचें थोडें फार ज्ञान असतें. परंतु श्वेतांबरामध्यें साधुवर्गच कायतो विशेष विद्वान आढळतो. श्वेतांबरपंथांतील साधूंचे कोठेंहि मठ अथवा पीठें नाहींत. दिगंबरपंथाच्या कोल्हापूर, लातूर, ईडर, कारंजा इ. ठिकाणीं गाद्या आहेत. गुजराथ, काठेवाड इ. उत्तरेकडील प्रांतांत श्वेतांबर अधिक आहेत. दक्षिणेकडे दिगंबर अधिक आहेत. ओसवाल, पोरवाड, श्रीमाळी या श्वेतांबर जाती आहेत व अग्रवाल, खंडेलवाल, पल्लीवाल, चतुर्थ, पंचम, सैतवाल या दिगंबर जाती आहेत. कुलदैवतें

व कुलंगोत्रें ज्या त्या जातींची चालत आलेली तशींच कायम आहेत. आचारांत वगैरे विशेष फरक म्हटला तर उत्तरदेशस्थ जैन व कर्नाटकस्थ जैन यांच्यामध्यें जास्त व तीव्रतर आढळतो. या जातींची माहिती जातिभास्कर या ग्रंथांत आहे.

दिति—वेदांत अदितिबरोबर ही देवता आढळते. पुराणांतून ही दक्षकन्या कश्यपपत्नी व दैत्यमाता असल्याची कथा आढळते. हिचा महा बलिष्ठ गर्भ इंद्रानें कपटानें विदारण केला व त्यापासून मरुत उत्पन्न झाले असें विष्णुपुराणांत लिहिलें आहे.

दिद्वाण—राजपुतान्यांतील जोधपूर संस्थानमध्यें असलेल्या दिद्वाण जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें जोधपूर शहराच्या ईशान्येस १३० मैल आहे. लोकसंख्या ( १९११ ) १०१२२. ह्या गांवाचें जुनें नांव दुदवानक होतें. पहिल्यानें हें सांभरच्या चव्हाण राजांच्या ताब्यांत होतें. नंतर मोंगलांच्या ताब्यांत जाऊन व नंतर जोधपूर व जयपूर ह्या दोन्ही संस्थानांच्या मिळून ताब्यांत होतें; व १८ व्या शतकाच्या मध्यकालांत तें जोधपूरच्या महाराजा बख्तसिंगाच्या ताब्यांत आलें. गांवाभोंवतीं दगडी भिंत आहे. अकबराच्या अमदानींत बांधलेली एक मशीद आहे व कित्येक जुनीं देवळें आहेत. एकांत पितळेच्या पत्र्यावर लेख आहे. येथून जवळच खाऱ्या पाण्याचा एक तलाव असून तेथें मीठ तयार करतात.

दिनकर ( १ ) ( रामदासी )—हा नगरजवळील भिंगारचा जोशी. यानें वृद्धेश्वर अथवा म्हातारदेव येथें तपश्चर्या केली. यास समर्थांचा अनुग्रह शके १५७६ मध्यें झाला. याचा ग्रंथ स्वानुभवदिनकर ( रचना शक १६१६ ) व अभंग, पदें, सवाया, वगैरे आहेत. [सं. क. का. सू. ].

( २ ) पुण्यांतील एक भारतीय ज्योतिषी. यानें केलेले व पुणें येथील माधवराव पेंडसे यांनीं लिहिलेले बरेच ग्रंथ पुणें आनंदाश्रमांत आहेत. दिनकराचे गणितग्रंथ ग्रहलाघवानुसार ग्रहगणित सुलभरीतीनें करतां यावें म्हणून केलेले आहेत. ते बहुतेक सारणीरूप आहेत. दिनकर हा चांगला कल्पक गणिती होता व त्यास वेधाचें ज्ञान होतें. ग्रहलाघवावरून कोणतेंहि गणित करण्यास आणि मुख्यतः मध्यम आणि स्पष्टग्रह करण्यास दिनकरकृत सारण्या फार उपयोगी पडतात. वामन कृष्ण जोशी गद्रेकर यांनीं अशा प्रकारच्या सारण्यांचा ग्रंथ शके १८०३ मध्यें छापला आहे. त्याचें नांव 'बृहत्पंचांगसाधनोदाहरण' असें आहे.

दिनकराचे ग्रंथ.—ग्रहविज्ञानसारणी, मासप्रवेश, स्मरणी. लग्नसारणी, क्रांतिसारणी, चंद्रोदयांकजाल, दृक्कर्मसारणी, ग्रहणांकुजाल इत्यादि. [ दीक्षितकृत भा. ज्योतिःशास्त्र. ]

( ३ ) एक भारतीय ज्योतिषी. साबरमतीजवळील मारेज गांवीं यानें जन्मस्थान आहे. या ज्योतिष्याचे दोन करणग्रंथ खेटकसिद्धि व चंद्रार्की असे आहेत. लघुखेटकसिद्धि हा ग्रंथ शके १५०० मध्यें पूर्ण झाला असें म्हटलें आहे. [ दीक्षित-भारतीय ज्योतिःशास्त्र. ]



दिनाजपुर, जिल्हा.—बंगाल राजशाही विभागांतील जिल्हा. क्षेत्रफळ ३९४६ चौ. मै. मर्यादाः—उत्तरेस व ईशान्येस जलपैगुरी, वायव्येस व पश्चिमेस पुर्णिया, पूर्वेस रंगपूर, आग्नेयीस बोग्रा, दक्षिणेस राजशाही, व नैर्ऋत्येस माल्दा. हा प्रदेश साधारणपणें सपाट आहे. परंतु दक्षिणेस वारिंद भागांत व वायव्येस कुलीक नदीच्या कांठीं लहान लहान टेंकड्या आहेत. येथें चित्ते आढळतात; रानडुकरांपासून पिकांनां बराच त्रास होतो व पावसाळ्यांत सर्पदंशापासून पुष्कळ लोक मरण पावतात.

इतिहासः—दिनाजपूर प्राचीन अवशेषांविषयीं प्रसिद्ध आहे. कांतनगर व गोपाळगंज येथील १८ व्या शतकांतील सुंदर देवालयांखेरीज, दंतकथेवरून अति प्राचीन समजले जाणारे तलाव व मोडकळीस आलेल्या इमारती येथें पुष्कळ आहेत. नबाबगंज ठाण्यांत, तर्पण घांटावर वाल्मीकि ऋषि स्नान व तर्पण करीत असत, आणि जवळच असलेल्या सीताकोट नांवाच्या किल्ल्यांत रामानें परित्याग केलेली सीता रहात होती अशी दंतकथा आहे. पांडवांनीं विराट राजाच्या ज्या मत्स्य देशांत अज्ञातवासाचे दिवस काढले तो हाच देश होय असांहि लोकांचा समज असून घोराघाटजवळचे अवशेष विराटाचा गोशाळा या नांवानें प्रसिद्ध आहेत. हा जिल्हा वारेंद्र व पुढें पौंड्रवर्धनच्या राज्यांत मोडत असे. ९ व्या शतकांत दिनाजपूर पाल राजांच्या हातांत गेलें; पाषाणस्तंभ व ताम्रपट यांवरून पाल घराण्यासंबंधानें पुष्कळ माहिती मिळते. पाल घराण्यांतील सर्वांत बलिष्ठ राजा महिपाल, याच्या नांवानें एक मोठें तळें असून महिपालच्या नांवाचा लोकांनां अद्याप विसर पडलेला नाहीं. धिवर दिघी येथील अखंड दगडी स्तंभ व इतर बौद्ध अवशेष बहुधा ह्याच कालांतील असावेत. पंधराव्या शतकाच्या आरंभीं राजा गणेश ( यानें पुढें मुसलमानी धर्म स्वीकारला ) यानें दिनाजपूरचें राज्य स्थापन केलें व बंगालच्या मुसुलमान राजाचा पराभव करून स. १४०४ मध्यें सिंहासन बळकाविलें. त्यानें १० वर्षें राज्य केल्यावर त्याचा मुलगा जलालुद्दीन महंमदशहा व नातू अहंमदशहा यांनीं स. १४४२ पर्यंत राज्य केलें. मोंगलांच्या वेळीं देवीकोट व घोराघांट हीं महत्त्वाचीं लष्करी ठाणीं होतीं. ह्या जिल्ह्यांतील रहिवाशांची बेगोखोरपणाबद्दल ख्याति होती व जिल्ह्याची व्यवस्था चांगली राखतां यावी म्हणून माल्दा व बोग्रा हे जिल्हे आणि महादेवपूर ठाणें या जिल्ह्यांपासून निराळा करण्यांत येऊन तो आटपसर करण्यांत आला.

लोकसंख्याः—लोकसंख्या ( १९२१ ) १७०५३५३. राजवंशी लोकांची संख्या एकंदर जिल्ह्यांतील लोकसंख्येच्या तृतीयांश असून ते निःसंशय उत्तर बंगालच्या मूळ रहिवाश्यांचे वंशज आहेत; व मुसुलमानहि बहुधा त्यांच्याचपासून आलेले असावेत. संताळ लोकांची संख्या सुमारें पाऊण लाख आहे.

शेतकीः—जिल्ह्याच्या उत्तर भागांतील जमीन राखी रंगाची, वाळुकामय व ओलावा कायम ठेवणारी अशी असून

तींत बहुधां दोन पिकें होतात. दक्षिणेकडील जमीन तांबड्या रंगाची व कठिण असून तींत फक्त एकच पीक होतें. पूर्व बंगालांत तांदूळ पिकणाऱ्या मुख्य जिल्ह्यांपैकीं दिनाजपूर हा एक आहे. लागवडीच्या जमिनींपैकीं शेकडा ८५ भागांत तांदुळाचें पीक होतें. याशिवाय सरसु, मोहरी आणि ताग हे जिन्नसहि होतात.

व्यापार व दळणवळणः—येथील लोक जाडेभरडे गोणपाट हातांनीं विणतात. पायव्यभागांतीं चटया तयार करतात. बाह्य व्यापार बहुधा कलकत्त्याशीं होतो. तांदूळ, ताग, व गोणपाट हे मुख्य निर्गत जिन्नस व विलायती कापड, मीठ, राकेल, दगडी कोळसा साखर हे मुख्य आयात जिन्नस होत.

रस्तेः—ईस्टर्न बंगाल स्टेटरेल्वेची उत्तर शाखा जिल्ह्याच्या पूर्व कोनांतून दक्षिणोत्तर जाते. मुख्य फांट्यावरील पार्वतीपूर जंक्शनपासून बिहार शाखा दिनाजपूर गांवावरून पश्चिमेकडे जाते. या जिल्ह्यांतील एकंदर रस्त्यांची लांबी १०९७ मैल आहे. १९०३-०४सालीं या जिल्ह्यांतील जमीनमहसुलाचें उत्पन्न १५.११ लक्ष रुपये व एकंदर उत्पन्न २१.७१ लक्ष रुपये होतें. जिल्ह्यांत शिक्षण फार मागासलेलें आहे.

गां व.—दिनाजपूर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें पूर्णभवा नदीच्या पूर्व तीरावर आहे. लोकसंख्या १९११ सालीं १५९४५ होती. येथें सन १८६९ मध्यें म्युनिसिपालिटीची स्थापना करण्यांत आली. जेलमधील कैद्यांस पुढील कामें शिकवितातः तेल काढणें, सतरज्या विणणें, दळणें, दोरा काढणें, वेताचें सामान तयार करणें, विटा करणें, सरकी दळणें, व सरकारी खजिन्याकरितां पिशव्या तयार करणें वगैरे. येथें एक सरकारी हायस्कूल आहे.

**दिनानगर**—पंजाबांतील गुरुदासपूर जिल्ह्याचें व तहसिलीचें मुख्य ठिकाण. हें गुरुदासपूरहून ८ मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९११ ) ४१५४. हें गांव अदिनबेगनें १७५० सालीं वसविलें व रणजितसिंगनें स्वतःकरितां हें उन्हाळ्यांत राहण्याकरितां थंड ठिकाण ठरविलें. येथें म्युनिसिपालिटीची स्थापना १८६७ सालीं झाली. ब्लँकिटें व शाली तयार करणें, काशिदा व वेलबुट्टी काढणें हे येथील उद्योगधंदे आहेत.

**दिनापूर**—बिहार-ओरिसा.पाटणा जिल्ह्यांतील एक गांव. हें स्टेशनापासून ३½ मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९११ ) ३१०२५ सुमारें १० हजार लोक दिनापूर छावणींत रहातात. छावणींत इंग्रजांच्या ४ तुकड्या असून ६ एतद्देशीयांच्या आहेत, व एक तोफखाना आहे. बंकीपूर व पाटणा हीं अगदींच जवळ जवळ आहेत. येथें लांकडावरील बारीक नक्षीकाम फार उत्तम होतें. येथें म्युनिसिपालिटीची स्थापना १८८७ सालीं झाली. १८५७ सालीं पाटणा जिल्ह्यांत बंडास सुरवात पहिल्यानें दिनापूर येथेंच झाली व शिपाई लोक शाहाबाद जिल्ह्यांत शिरले.

**दिन्डोरी**, ता लु का.—मुंबई इलाखा, नाशिक जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ५३२ चौरस मैल. खेडीं १२८ असून मोठें गांव वणी आहे. तहशिलीचें मुख्य ठाणें दिन्डोरीच आहे. लोकसंख्या ( १९११ ) ७५०९८. हा प्रदेश डोंगराळ असून पाऊसपाणी विपुल असतें. एप्रिल-मेमध्यें जरी हवा शुद्ध व प्रकृतीला आरोग्यदायक असते तरी इतर महिन्यांत ती मलेरियाजनक असते. यांत कादवा ही एक नदी आहे.

**दिन्डोरी**, त ह शी ल.—मध्यप्रांत, मन्डला जिल्ह्याची उत्तरे कडील तहशील. क्षे.फ २५२१ चौ. मैल. लो. सं. (१९११) १८३०६५. दिंडोरी हें तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे; ९४२ चौरस मैल सरकारी जंगल आहे. प्रदेश पहाडी व जंगली आहे. कांहीं ठिकाणीं नदीच्या कांठानें थोडीच कां होईना-पण चांगल्यापैकीं सुपीक जमीन असते.

**दिन्दिगल**, ता लु का.—मद्रास इलाख्यांतील मदुरा जिल्ह्याच्या उत्तर भागांत असलेल्या दिन्दिगल पोटविभागांतील एक तालुका. क्षेत्रफळ ८९३ चौरस मैल. लोकसंख्या ( १९२१ ) ४०३७००. दिन्दिगल हें मुख्य गांव आहे. प्रदेश सपाट असून जमीन साधारण पिकाऊ आहे. कोडव नदी ही तालुक्यांतील सर्वांत मोठी नदी होय. येथें तंबाखूची लागवड मोठ्या प्रमाणावर करतात.

गां व.—मद्रास इलाख्यांतील मदुरा जिल्ह्यांत असलेल्या दिन्दिगल तालुक्याचें व पोटविभागाचें मुख्य ठिकाण. हें साउथ इन्डियन रेल्वेचें एक स्टेशन आहे. लोकसंख्या ( १९२१ ) ३०९२२. येथें म्युनिसिपालिटीची स्थापना १८६६ सालीं झाली. हें गांव समुद्रसपाटीपासून ८८० फूट उंच आहे. हवा उष्ण पण प्रकृतीला मानवेल अशी आहे. चामडें, तंबाखु, कॉफी व वेलदोडे या मालांचा व्यापार चालतो. येथें चिरूट मुख्यत्वेंकरून तयार करतात. पटनुलकारन लोक उत्तमपैकीं रेशमी धागा तयार करितात. दिन्दिगल हें पूर्वी एका विवक्षित प्रदेशाच्या राजधानीचें शहर असून हें राज्य मदुरा नांवाच्या राज्याच्या स्वामित्वाखालीं होतें. येथील किल्ला समुद्रसपाटीपासून १२२२ फूट उंच असून असूनहि तो चांगल्या स्थितींत असल्यामुळें या किल्ल्यास फार महत्त्व होतें. सन १६२३ ते १६५९ च्या दरम्यान येथें मराठे व म्हैसूरकर यांच्यामध्यें अनेक चकमकी उडाल्या होत्या. १८ व्या शतकांत हा किल्ला वेगवेगळ्या वेळीं चंदासाहेब, मराठे व म्हैसूरच्या सैन्यानें आपल्या ताब्यांत ठेविला. १७५५ सालीं तो हैदरानें घेतला. म्हैसूरशीं झालेल्या युद्धांत कर्नल वुडनें हा किल्ला १७६७ सालीं घेतला पण १७६९ सालीं तहानंतर तो परत दिला. पुन्हां १७८३ सालीं तो कर्नल लॅन्ग यानें घेतला. पण पुन्हां १७८४ सालीं मंगलोरच्या तहावरहुकूम तो परत केला. सरतेशेवटीं स. १७९० मध्यें तो स्टुअर्ट साहेबानें घेतला, व १७९२सालीं कंपनी सरकारच्या ताब्यांत दिला.

**दिपलो**—मुंबई इलाख्यांतील सिंध प्रांतांत असलेल्या थर व पारकर जिल्ह्याचा एक तालुका. क्षेत्रफळ १५०३ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) २५९६९. या तालुक्यांत ४१

खेडीं असून दिपलो हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. हा प्रदेश ओसाड आहे. येथें वालुकामय टेंकाडें आहेत. येथें बाजरी हें मुख्य धान्य आहे.

**दिपालपूर, तहशील.**—पंजाब इलाख्यांतील मॉन्टगॉमरी जिल्ह्याची एक तहशिल. क्षेत्रफळ ९९५ चौरस मैल. आग्नेय सरहद्दीवरून सतलजनंदी वहाते. लोकसंख्या (१९११) २००९७८. खेडीं ४७३; पैकीं तहशिलीचें मुख्य ठिकाण दिपालपूर येथें आहे. हा सर्व प्रदेश बारीदुआब व सतलज यांच्या मधील सखल प्रदेशांत आहे. पडित जमीन बरीच असून (उत्तर भागांत) कालव्यानें पाणी खेळविलेलें आहे.

**गांव.**—दिपालपूर तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें बारीदुवाबाच्या प्रदेशांत वसलेलें आहे. लोकसंख्या (१९०१) ३८११. याचें देवबळपूर हें प्राचीन नांव असून अर्थात् तें कांहीं धार्मिक दृष्टया ठेविलेलें आहे. येथें इन्डो-सिथियन राजांच्या कारकीर्दीतील नाणीं सांपडलीं आहेत. एके काळीं येथील किल्ला म्हणजे सरहद्दीवरील दिल्लीच्या राज्याचा रक्षण करणारा एक किल्ला अशी याची ख्याति होती (१४ वे व १५ वे शतक). १२८५ सालीं बलवनपुत्र महमद हा मोंगलांशीं लढतांना दिपालपूरनजीक मारला गेला. अल्लाउद्दीनच्या कारकीर्दींत हें घाजी मलिकचें मुख्य ठाणें होतें (हा घाजी मलिक पुढें सुलतान तुघ्लखशहा झाला). फिरोझशहा तुघ्लख या गांवांत १४ व्या शतकांत आला होता, व त्यानें येथें गांवाच्या बाहेर बांधलेली एक मोठी मशीदहि आहे. स. १३५८ मध्यें येथें मोंगलांचा पराजय झाला. स. १३९८ मध्यें तैमूरलंगानें हें गांव घेतलें पण लोकांनीं येथें ठेवलेल्या अधिकाऱ्यास ठार मारिलें. जसरथ व खोखर यांनीं स. १४२३ मध्यें दिपालपूरला वेढा घातला होता, व १४३१ सालीं शेख अली या मोंगलानें तें घेण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याचा पराजय झाला. १५२४ सालीं हा किल्ला बाबरनें घेतला व अकबराच्या कारकीर्दींत तर हें मुलतानच्या सुभ्याचें मुख्य ठाणें होतें. औरंगझेबाच्या वेळीं देखील हें राज्यव्यवस्थेचें केन्द्र होतें. मराठयांनीं हें गांव १७५८ सालीं घेतलें. हें गांव बिआस नदीच्या तीरावर होतें. पण आतां नदीचा प्रवाह बदलला असल्यामुळें, या गांवाचा ऱ्हास झाला आहे. येथें बाबा लालु जसराजाची कबर आहे. यास उच्च कुळांतले खत्री लोक फार मान देतात.

**दिबई**—संयुक्त प्रांतांतील बुलन्दशहरजिल्ह्याच्या अनुपशहर तहशिलींतील एक गांव. लोकसंख्या (१९११) ९५७३. ११व्या शतकांत या गांवास धन्तगड म्हणत असत; व त्यावेळीं तें धाका रजपुतांकडे होतें. नंतर हें सध्याचें गांव नवीन वसविण्यांत आलें. अकबरच्या वेळीं कोईल सरकारांत हें एका परगण्याचें मुख्य ठिकाण होतें. याच्या नजीकच छोइया नदी आहे. जाडें भरडें कापड, कापूस, तूप व धान्य येथून बाहेरगांवीं जातें. याचा कारभार स. १८५६ च्या २० व्या कायद्याप्रमाणें चालतो.

**दिब्रूगड, पोटविभाग.**—आसामधील लखिमपूर जिल्ह्याचा एक पोटविभाग. हा ब्रम्हपुत्रा नदीच्या खोऱ्याच्या पूर्वटोंकावर आहे. क्षेत्रफळ १२५४ चौरस मैल. हा विभाग ब्रम्हपुत्रा नदीच्या दोन्ही तीरावर वसलेला असून तिन्ही बाजूंनीं टेंकड्यांनीं वेष्टिलेला आहे. पण उत्तर, दक्षिण व पूर्वेकडील सीमा अजून पक्क्या ठरलेल्या नाहींत. लोकसंख्या १९११ सालीं १२७४६० होती. १९०४ सालीं यांत एकंदर १३०मळे होते व ६१५१० एकर जमीन लागवडीखालीं होती. एक गांव आहे त्याचें नांव दिब्रुगड. खेडीं ३४८. ३०० चौरस मैल जंगल-राखून ठेवलेलें आहे. पाऊस ९५ ते ११२ इंच पडतो.

**गांव.**—आसाममधील लखिमपूर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण, दिब्रुनदीच्या डाव्या तीरावर आहे. कलकत्याहून ब्रम्हपुत्रेच्या प्रवाहांतून वर जाणाऱ्या बोटी येथेंच थांबतात. लोकसंख्या (१९११) १४५६३. आसामांतील हें एक चांगल्यापैकीं गांव आहे. आकाश निरभ्र असतें. तेव्हां तर भोंवतालच्या टेंकड्यांचा फारच रमणीय देखावा दृष्टीस पडतो. पाऊस ११२ इंचांपावेतों पडत असल्यामुळें हवा नेहमीं थंड व मनाला आल्हाददायक असते. येथें पायदळाची व घोडेस्वाराची एक तुकडी असते. येथें १८७८ पासून म्युनिसिपालिटी स्थापन झाली. धान्य वगैरे कलकत्त्याहून येतें व भोंवतालच्या चहाच्या मळ्यांकडे रवाना होतें. गांवांत चार छापखाने असून एक साप्ताहिक इंग्रजी वर्तमानपत्र निघतें. येथें दोन हायस्कुलें चालतात. आसाम पोलिस ट्रेनिंगस्कूल येथेंच आहे.

**दिमापूर**—आसाममध्यें सिवसागर जिल्ह्यांतील एक खेडें. धनसिरीनदीच्या उजव्या तीरावर हें आहे. लोकसंख्या (१९०१) ५६६. पूर्वी ही काचारी राजाची राजधानी होती. पण १५३६ सालीं अहोम राजांनीं हें गांव लुटलें. अजूनहि मोडके तोडके जुने अवशेष व तलाव दृष्टीस पडतात. ही जागा नाम्बरच्या दाट जंगलांत आहे. निर्मळ पाण्याचे पुष्कळसे तलाव येथें आहेत व पडक्या भिंतींवरून पूर्वी येथें किल्ला असावा असें वाटतें. आंत जाण्यास पक्क्या विटांनीं बांधलेला व कमानी असलेला भव्य दरवाजा आहे. दोन बाजूस खोल खंदक असून एका बाजूस नदी आहे. किल्ल्याच्या आंत तीन तलाव आहेत. वेगळी वेगळी नक्षी काढलेले व वेगवेगळ्या आकाराचे स्तंभ आहेत. या स्तंभावरलेख वगैरे कांहीं नाहींत. हे स्तंभ \/ या आकाराचे असून अशा आकाराचे स्तंभ नाग लोक मोठ्या मेजवानीच्या प्रसंगीं उभारतात.

**दिलपसंत**—(घेंडस). ही एक भोंपळ्याची जात आहे. महाराष्ट्रांत दिलपसंताचे वेल खरबुजवाडींत लावितात. त्यास उन्हाळ्यांत फळें येतात. खरबुजवाडींतील वाळकांप्रमाणेंच याची लावणी व मशागत करतात. फळें गोल, हिरवट, पांढऱ्या रंगाचीं, बसकीं व २।४ इंच व्यासाचीं असतात. गर काशीफळाप्रमाणें अगर दुध्या भोंपळयाप्रमाणें पांढरा स्वच्छ असतो. आंत भोंपळ्यासारख्या पण त्याहून लहान बिया

असतात. दिलपसंताची भाजी होते. याचीं फळें लवकर जून होतात सबब लवकर लवकर तोडा केला पाहिजे.

**दिलावरखान**—माळव्याच्या मुसुलमानी राज्याचा संस्थापक. घयासुद्दीन बल्बन दिल्लीचा शहा (१३१०) याच्या वेळीं माळवा प्रांत मुसुलमानांनीं प्रथम जिंकला. तेव्हांपासून स. १३८७ पर्यंत प्रत्यक्ष दिल्लीकरांचा अंमल तेथें होता. या वेळींच दिलावरखानास माळव्याचा सुभा नेमिलें असतां, त्यानें स्वातंत्र्य जाहीर केलें. याची आई शहाबुद्दीन घोरीच्या घराण्यांतील होती. तैमूरलंगाच्या स्वारीमुळें दिल्लीचा महंमूद-शहा हा तीन वर्षे माळव्यांत येऊन राहिला होता, तो पुन्हां दिल्लीस परतल्यावर दिलावरनें तख्तारोहण केलें (१४०१) व धार ही आपली राजधानी केली; परंतु तो पुष्कळ दिवस मांडवगड येथें राहात असे. तो १४०५ सालीं मेला.

त्याच्या मागून अल्पखान हा सुलतान होशंगशहा नांव घेऊन गादीवर आला. दिलावरपासून अकबरानें माळवाप्रांत खालसा करीपर्यंत एकंदर ११ मुसुलमान राजे माळव्यांत झाले तेः—(१) दिलावरखान घोरी, (२) होशंगशहा, (३) महम्मदशहा, (४) महमूद खिलजी पहिला, (५) घयासुद्दीन, (६) नासीरउद्दीन, (७) महमूद दुसरा, (८) बहादूरशहा (गुजरायचा सुलतान), (९) कादरशहा, (१०) शुजाखान, (११) बाझबहादूर. [ मालकम; बील. ]

**दिलीप**—(सूर्य वं.) इक्ष्वाकु कुलोत्पन्न अंशुमान् राजाचा पुत्र. हा पित्याच्या मागें राज्याधिकारी झाला असतां, सगरांचा उद्धार करण्यासाठीं गंगा आणावी म्हणून यानें तीस सहस्र वर्षे तप केलें. परंतु ती सिद्धि यास न होतां हा मरण पावला. यास सुदक्षणा नांवाची स्त्री व पुत्र भागीरथ होता. यानें स्वर्धेनु सुरभी हिची मुलगी जी नंदिनी तिला वांचविण्याकरितां एकेवेळीं स्वतःचा प्राण देण्याची तयारी केली होती.तेव्हां सुरभीचा शाप नष्ट होऊन दिलीपला रघु नांवाचा पुत्र झाला; ही कथा रघुवंशांत दिली आहे.

**दिलीपसिंग, महाराजा**—अनेकदां यूरोपियन इतिहासकारांनीं यास चुकीनें 'धुलीपसिंग' असें नांव दिलेलें आढळतें. महाराज रणजितसिंह व चांदकुंवार राणीचा हा मुलगा. इ. स. १८४५ त हा आपल्या वयाच्या ५ व्या वर्षी पंजाबचा नामधारी राजा बनला. यावेळीं शिखांनीं इंग्रजां-विरुद्ध लढाई पुकारली होती. प्रथम लुधियाना, फिरोजपूर वगैरे ठिकाणीं शिखांचा जय झाला परंतु पुढें त्यांचा पराजय होऊन थोड्याश्या प्रांताखेरीज बाकीचा सर्व पंजाब व काश्मीर इंग्रजांना मिळाला (१८४६). दिलीप हा नांवाचा राजा झाला व सर हेनरी लॉरेन्स हा रेसिडेंट म्हणून खरा सत्ताधारी (रिअल रूलर) बनला. त्याचा कारभार राणी व प्रजा यांना आवडेना म्हणून त्यांनीं तक्रारी केल्या व फौजाहि जमविली. तेव्हां इंग्रजांनीं राणीला हद्दपार करण्याचें ठरविलें. डोग्रा जातीच्या एका सरदाराला इंग्रजांनीं आपल्या पंखाखालीं घेऊन काश्मीर संस्थान त्याला दिलें. शिखांचें प्राबल्य फार वाढल्यामुळें (रणजितसिंहाचें घोडदळ ८८ हजार, पायदळ ५३ हजार आणि ७००लहान मोठ्या तोफा होत्या). अराजकतेच्या नांवावर इंग्रजांनीं त्यांच्यावर स्वाऱ्या करून सर्व पंजाब खालसा केला. डलहौसीनें दिलीपसिंगास पंजाबच्या राज्यहक्काचा राजीनामा देण्यास भाग पाडून पंजाब खालसा केला (१८४९ मार्च). या कृत्यास त्यानें कलकत्त्याच्या कौन्सिलची व कोर्ट ऑफ डायरेक्टरांची अनुज्ञा मुळींच मिळविली नाहीं. त्यांना कांहीं एक न कळवितां हें सर्व त्यानें आपल्या जबाबदारीवर केलें आणि त्याचें समर्थन पुढीलप्रमाणें केलें. "पंजाबांत मुळीं राज्यच नव्हतें व मीं जर वरीलप्रमाणें धोरण लवकर पत्करिलें नसतें तर सारा पंजाब देश १ महिन्याच्या आंत बंडाळींत व अंदाधुंदींत सांपडला असता आणि मग स्थीरस्थावर करण्यास वर्षेच्या वर्षे पुरलीं नसतीं आणि म्हणूनच आवश्यकता जाणून मी हें कृत्य केलें." रेसिडेंट लॉरेन्सहि या खालसातीच्या विरुद्ध होता. यानंतर दिलीपनें ख्रिस्ती धर्म स्वीकारला व तो कांहीं वर्षे इंग्लंडांत जाऊन राहिला. एका इजिप्शियन बाईशीं त्यानें लग्न लाविलें होतें व तिजपासून त्यास अपत्यहि झालें होतें. पुन्हां हिंदुस्थानांत येण्यास त्यास इंग्रजांनीं परवानगी दिली नाहीं. पुढें दिलीपसिंगानें ख्रिस्ती धर्माचा त्याग करून तो इंग्रजांचा कट्टा शत्रू बनला. अमेरिकेंत तो स. १८९० पर्यंत होता असें म्हणतात. दिलीपसिंगाची एक मुलगी प्रिन्सेस सोफिया ही आतांपर्यंत जिवंत होती.

**दिलेरखान**—याचें नांव अब्दुल रौफ बल्द अब्दुल करीम; हा पूर्वी विजापूरच्या राज्यांत नोकर होता. आदिलशाही बुडाल्यानंतर हा औरंगझेबाच्या पदरीं राहिला, त्या वेळीं त्याला दिलेरखान ही पदवी व सप्तहजारी मनसब मिळाली. हा मराठ्यांच्या विरुद्ध औरंगझेबाच्या मोहिमांत पुष्कळदां लढला होता. बहादुरशहाच्या वेळीं हा दख्खनमध्यें आपल्या जहागिरीच्या गांवीं मेला.

**दिल्ली**,—हल्लीं दिल्ली ही हिंदुस्थानची राजधानी झाली असल्यामुळें हा स्वतंत्र प्रांत समजण्यांत येतो. १९१२ सालीं या भागावर चीफ कमीशनर नेमण्यांत आला. या भागांत जुन्या दिल्ली जिल्ह्यांतील बराच भाग व संयुक्त प्रांतांतील यमुना नदीच्या पूर्वेकडील ४५ चौरसमैलांचा टापू असून या नूतन प्रांताचें हल्लींचें क्षेत्रफळ ५७३ चौरस मैल आहे. १९२१ सालीं याची लो. सं. ४८८१८८ होती.

इतिहास.—अरवली डोंगराचें उत्तर टोंक जेथें यमुनेपर्यंत गेलें आहे त्या ठिकाणीं प्राचीन काळापासून एकामागून एक मोठीं शहरें होऊन गेलीं आहेत; त्यांपैकीं ज्येष्ठ पांडव युधिष्ठिर यानें स्थापन केलेलें इंद्रप्रस्थ (पहा). हें पहिलें होय. फेरिस्ता या प्रवाशानें अशी दंतकथा लिहून ठेविली आहे कीं दिल्ली शहर हें मॅसिडोनियन स्वारीपूर्वी दिल्लू राजानें स्थापन केलें; पण अनंगपाल या तोमर जातीय रजपुतानें अकराव्या शतकांत ज्यामध्यें हल्लीं कुतुबमिनार आहे तो

तांबडा किल्ला बांधून, तेथें गांव वसविलें व तेव्हांपासून या शहराचें अस्तित्व ऐतिहासिकदृष्ट्या सुरू झालें. चंद्रगुप्त, विक्रमादित्याची ज्यावर स्तुति आहे तो लोहस्तंभ त्यानें मथुरेहून आणून येथें उभा केला. याचा व्यास १६ इंच व उंची २३ फूट असून तो जमिनींत तीन फूट पुरलेला आहे. या स्तंभाविषयीं पुढील दंतकथा प्रचलित आहे. स्तंभ जमिनींत इतका खोल पुरलेला होता कीं तो वासुकीच्या डोक्याला जाऊन पोंचला असल्यामुळें बिलकूल हलत नाहीं; व त्याचप्रमाणें त्याच्या संस्थापकाचें राज्यहि कायम टिकेल अशी हकीकत एका ब्राह्मणानें राजास सांगितली. त्यावर त्याचा विश्वास न बसून त्यानें तो स्तंभ खणून काढविला. तेव्हां त्याचें टोंक सर्पाच्या रक्तानें भरलें आहे असें दिसल्यावर त्याची खात्री होऊन त्यानें तो खांब पुन्हां बसविण्याची आज्ञा केली. पण त्याच्या अविश्वासाबद्दल प्रायश्चित्त म्हणूनच कीं काय तो खांब कांहीं केल्या पूर्वीप्रमाणें बसेना. खांब ढिला बसल्यामुळें या शहराला ढिल्ली किंवा दिल्ली असें नांव पडलें. पण तोमर घराण्याच्या पूर्वीच दिल्ली हें नांव निःसंशय होतें यावरून ही दंतकथा फारशी खरी नसावी.

अनंगपाल हा कनोजहून आला असावा; त्यानें उत्तरेस हांसी, पूर्वेस गंगानदी व दक्षिणेस आग्र्यापर्यंत आपला प्रदेश वाढवून त्यावर राज्य केलें. त्याच्या घराण्यानें बरोबर एक शतकपर्यंत राज्य केल्यावर त्याच्या मागीं अजमीरचा चव्हाण वीसलदेव यानें आपलें राज्य स्थापन केलें (११५१). वीसलदेवाचा नातु प्रसिद्ध पृथ्वीराज यानें दिल्ली व अजमीर यांवर राज्य करून दिल्ली येथें पृथ्वीपुर नांवाचें गांव वसविलें. कुतुबमिनारच्या सभोंवतीं या शहराच्या भिंतीचे शेष अद्यापहि दिसतात. स. ११९१ त पृथ्वीराजानें हिंदू राजांची मदत घेऊन तिरावरी येथें महंमद घोरीचा पराभव केला, पण पुढल्या वर्षी त्याच ठिकाणीं त्याचा मोठा पराभव झाला. पृथ्वीराजाच्या मृत्यूबरोबरच दिल्लीच्या हिंदू राजांचा इतिहास संपला. ११९३ सालीं महंमदाचा गुलाम कुतुबुद्दीन यानें दिल्ली शहर सर केलें व त्याच्या धन्याच्या मरणानंतर तें गुलाम घराण्याच्या राजधानीचें ठिकाण झालें. शहर सर केल्यावर लवकरच कुतुबुद्दीनानें मशीद बांधण्यास सुरवात करून तीन वर्षांत पूर्ण केली. या मशीदींत एक बाहेरचें व एक आंतील अशीं दोन पटांगणें असून बाह्य पटांगणांत हिंदु देवालयांतून आणलेले सुंदर खांब सारख्या अंतरावर उभे केलेले आहेत. पूर्वी या खांबांवर चुना लावून खांबावरील मूर्ती अदृश्य केल्या होत्या परंतु आतां वरचा चुना पडून गेल्यामुळें आंतील नक्षीकाम दृष्टीस पडून इतक्या प्राचीन काळींहि हिंदू कारागीर किती कुशल कामें करीत हें कळून येतें. पश्चिम बाजूकडे असलेल्या बारा कमानी मुसलमानी पद्धतीच्या पण हिंदु कारागिरांनीं केलेल्या आहेत. ही मशीद तयार झाल्यानंतर १५० वर्षांनीं इब्न बतूता या मूर प्रवाशानें पाहून, सौंदर्य व विस्तार या दोन्ही दृष्टींनें ती अपूर्व असल्याबद्दलचा आपला अभिप्राय नमूद करून ठेविला आहे. गुलाम घराण्यांतील या मोठ्या राजाचें दुसरें प्रसिद्ध स्मारक म्हणजे मशिदीच्या बाहेरच्या आवारांत आग्नेय कोपऱ्यांतील कुतुबमिनार हें होय. याची उंची २३८ फूट व पायाजवळ व्यास ४७ फूट असून वर निमुळता होत होत वरच्या टोंकाचा व्यास फक्त ९ फूट आहे. हा मनोरा ५ मजली असून त्यामध्यें नागमोडी जिने आहेत. मनोऱ्यावर असलेला घुमट १८०३ सालच्या धरणीकंपानें मोडून नादुरुस्त झाला आहे. सकाळ संध्याकाळ प्रार्थनेच्या वेळीं शहरच्या सर्व लोकांस बोलावण्याकरितां हा मनोरा बांधण्यांत आला असावा. पूर्वी ज्या ठिकाणीं लोहस्तंभ होता ती जागा मशिदीकरितां नियोजित केली गेल्यामुळें, मशिदीच्या आंतील अंगणास या खांबानें फार शोभा आलेली आहे. सभोंवार असलेल्या पुष्कळ प्राचीन अवशेषांपैकीं अल्तमशाचें थडगें व १३११ सालीं अल्लाउद्दीनानें बांधण्यास सुरवात करून अपुरी राहिलेली इमारत, हे महत्त्वाचे आहेत.

गुलाम घराण्यांत सुलतान रेझिया ही बादशाहीण होऊन गेली. १२९० सालपर्यंत गुलाम घराणें चालल्यावर जलालुद्दीन खिलजीनें नवीन घराणें स्थापन केलें. त्याच्यानंतर गादीवर आलेला अल्लाउद्दीन खिलजी याच्या कारकीर्दींत मोंगल टोळ्यांनीं दोन वेळ दिल्लीवर हल्ले केले पण ते व्यर्थ गेले. १३२१ सालीं येथें घियासुद्दीन तघ्लखानें तघ्लख घराणें स्थापन करून पूर्वेस ४ मैलांवर तघलखाबाद येथें नवीन राजधानी स्थापिली. हल्लीं त्या ठिकाणीं मनुष्यवस्ती मुळींच नाहीं, पण किल्ल्याचे व ओसाड रस्त्यांचे अवशेष दृष्टीस पडतात. स. १३२५ त घियासुद्दीनाच्या मरणानंतर त्याचा मुलगा महंमदतघ्लख गादीवर आला. यानें येथील राजधानी उठवून, ८०० मैलांवर दक्षिणेंत दौलताबादेस नेण्याचा तीन वेळ प्रयत्न केला. पुढें फिरोझशहा तघ्लखानें फिरोझाबाद हें नवें शहर वसवून तेथें राजधानी नेली. हल्लींच्या शहरच्या दक्षिणद्वाराबाहेर, या राजाच्या राजवाड्याच्या अवशेषांमध्यें अशोकानें इ. स. पूर्वी तिसऱ्या शतकांत उभारलेला एक प्रसिद्ध स्तंभ आहे. हा स्तंभ फिरोझशहानें, अंबाला जिल्ह्यांत खिज्राबादजवळ तोप्र येथून आणल्यामुळें याला फिरोझशहाची लाट असें म्हणतात. याची लांबी ४२ फू. असून हा गुलाबी दगडाचा केलेला आहे व त्यावर पालीमध्यें अशोकाचीं शासनें (१–७) कोरलीं आहेत.

स. १३९८ च्या डिसेंबर महिन्यांत, तघ्लख घराण्यांत गादीसंबंधीं तंटा चालला असतां तैमूरलंगानें दिल्लीवर स्वारी करून पांच दिवस शहरांत लूट व कत्तल केली व पुष्कळ स्त्रीपुरुषांना गुलाम करून बरोबर घेऊन गेला. त्यानंतर दोन महिनेपर्यंत शहरांत कोणत्याहि प्रकारची राज्यव्यवस्था नव्हती. पुढें महंमदशहानें उरलेला प्रदेश ताब्यांत घेऊन स. १४१२ पर्यंत राज्य केलें. त्याच्या मरणानंतर सय्यद घराण्यानें स. १४५० पर्यंत राज्य केल्यावर येथें लोदी घराणें

असतात. दिलपसंताची भाजी होते. याचीं फळें लवकर जून होतात सबब लवकर लवकर तोडा केला पाहिजे.

**दिलावरखान**—माळव्याच्या मुसुलमानी राज्याचा संस्थापक. घयासुद्दीन बल्बन दिल्लीचा शहा (१३१०) याच्या वेळीं माळवा प्रांत मुसुलमानांनीं प्रथम जिंकला. तेव्हांपासून स. १३८७ पर्यंत प्रत्यक्ष दिल्लीकरांचा अंमल तेथें होता. या वेळींच दिलावरखानास माळव्याचा सुभा नेमिलें असतां, त्यानें स्वातंत्र्य जाहीर केलें. याची आई शहाबुद्दीन घोरीच्या घराण्यांतील होती. तैमूरलंगाच्या स्वारीमुळें दिल्लीचा महंमूदशहा हा तीन वर्षे माळव्यांत येऊन राहिला होता, तो पुन्हां दिल्लीस परतल्यावर दिलावरनें तख्तारोहण केलें (१४०१) व धार ही आपली राजधानी केली; परंतु तो पुष्कळ दिवस मांडवगड येथें राहात असे. तो १४०५ सालीं मेला.

त्याच्या मागून अल्पखान हा सुलतान होशंगशहा नांव घेऊन गादीवर आला. दिलावरपासून अकबरानें माळवाप्रांत खालसा करीपर्यंत एकंदर ११ मुसुलमान राजे माळव्यांत झाले तेः—(१) दिलावरखान घोरी, (२) होशंगशहा, (३) महम्मदशहा, (४) महमूद खिलजी पहिला, (५) घयासुद्दीन, (६) नासीरउद्दीन, (७) महमूद दुसरा, (८) बहादूरशहा (गुजराथचा सुलतान), (९) कादरशहा, (१०) शुजाखान, (११) बाझबहादूर. [ मालकम; बील. ]

**दिलीप**—(सूर्य वं.) इक्ष्वाकु कुलोत्पन्न अंशुमान् राजाचा पुत्र. हा पित्याच्या मागें राज्याधिकारी झाला असतां, सगरांचा उद्धार करण्यासाठीं गंगा आणावी म्हणून यानें तीस सहस्र वर्षे तप केलें. परंतु ती सिद्धि यास न होतां हा मरण पावला. यास सुदक्षणा नांवाची स्त्री व पुत्र भगीरथ होता. यानें स्वर्धेनु सुरभी हिची मुलगी जी नंदिनी तिला वांचविण्याकरितां एकेवेळीं स्वतःचा प्राण देण्याची तयारी केली होती. तेव्हां सुरभीचा शाप नष्ट होऊन दिलीपला रघु नांवाचा पुत्र झाला; ही कथा रघुवंशांत दिली आहे.

**दिलीपसिंग, महाराजा**—अनेकदां यूरोपियन इतिहासकारांनीं यास चुकीनें 'धुलीपसिंग' असें नांव दिलेलें आढळतें. महाराज रणजितसिंह व चांदकुंवार राणीचा हा मुलगा. इ. स. १८४५ त हा आपल्या वयाच्या ५ व्या वर्षी पंजाबचा नामधारी राजा बनला. यावेळीं शिखांनीं इंग्रजांविरुद्ध लढाई पुकारली होती. प्रथम लुधियाना, फिरोजपूर वगैरे ठिकाणीं शिखांचा जय झाला परंतु पुढें त्यांचा पराजय होऊन थोड्याशा प्रांताखेरीज बाकीचा सर्व पंजाब व काश्मीर इंग्रजांना मिळाला (१८४६). दिलीप हा नांवाचा राजा झाला व सर हेनरी लॉरेन्स हा रेसिडेंट म्हणून खरा सत्ताधारी (रिअल रूलर) बनला. त्याचा कारभार राणी व प्रजा यांना आवडेना म्हणून त्यांनीं तक्रारी केल्या व फौजहि जमविली. तेव्हां इंग्रजांनीं राणीला हद्दपार करण्याचें ठरविलें. डोग्रा जातीच्या एका सरदाराला इंग्रजांनीं आपल्या पंजाखालीं घेऊन काश्मीर संस्थान त्याला दिलें. शिखांचें प्राबल्य फार वाढल्यामुळें (रणजितसिंहाचें घोडदळ ८८ हजार, पायदळ ५३ हजार आणि ७००लहान मोठ्या तोफा होत्या). अराजकतेच्या नांवावर इंग्रजांनीं त्यांच्यावर स्वाऱ्या करून सर्व पंजाब खालसा केला. डलहौसीनें दिलीपसिंगास पंजाबच्या राज्यहक्काचा राजीनामा देण्यास भाग पाडून पंजाब खालसा केला (१८४९ मार्च). या कृत्यास त्यानें कलकत्याच्या कौन्सिलची व कोर्ट ऑफ डायरेक्टरांची अनुज्ञा मुळींच मिळविली नाहीं. त्यांना कांहीं एक न कळवितां हें सर्व त्यानें आपल्या जबाबदारीवर केलें आणि त्याचें समर्थन पुढीलप्रमाणें केलें. "पंजाबांत मुळीं राज्यच नव्हतें व मीं जर वरीलप्रमाणें धोरण लवकर पत्करिलें नसतें तर सारा पंजाब देश १ महिन्याच्या आंत बंडाळीत व अंदाधुंदींत सांपडला असता आणि मग स्थीरस्थावर करण्यास वर्षेच्या वर्षे पुरलीं नसतीं आणि म्हणूनच आवश्यकता जाणून मी हें कृत्य केलें." रेसिडेंट लॉरेन्सहि या खालसातीच्या विरुद्ध होता. यानंतर दिलीपनें ख्रिस्ती धर्म स्वीकारला व तो कांहीं वर्षे इंग्लंडांत जाऊन राहिला. एका इजिप्शियन बाईशीं त्यानें लग्न लाविलें होतें व तिजपासून त्यास अपत्यहि झालें होतें. पुन्हां हिंदुस्थानांत येण्यास त्यास इंग्रजांनीं परवानगी दिली नाहीं. पुढें दिलीपसिंगानें ख्रिस्ती धर्माचा त्याग करून तो इंग्रजांचा कट्टा शत्रू बनला. अमेरिकेंत तो स. १८९० पर्यंत होता असें म्हणतात. दिलीपसिंगाची एक मुलगी प्रिन्सेस सोफिया ही आतांपर्यंत जिवंत होती.

**दिलेरखान**—याचें नांव अब्दुल रौफ वल्द अब्दुल करीम; हा पूर्वी विजापूरच्या राज्यांत नोकर होता. आदिलशाही बुडाल्यानंतर हा औरंगझेबाच्या पदरीं राहिला, त्या वेळीं त्याला दिलेरखान ही पदवी व सप्तहजारी मनसब मिळाली. हा मराठ्यांच्या विरुद्ध औरंगझेबाच्या मोहिमांत पुष्कळदां लढला होता. बहादुरशहाच्या वेळीं हा दख्खनमध्यें आपल्या जहागिरीच्या गांवीं मेला.

**दिल्ली**,—हल्लीं दिल्ली ही हिंदुस्थानची राजधानी झाली असल्यामुळें हा स्वतंत्र प्रांत समजण्यांत येतो. १९१२ सालीं या भागावर चीफ कमीशनर नेमण्यांत आला. या भागांत जुन्या दिल्ली जिल्ह्यांतील बराच भाग व संयुक्त प्रांतांतील यमुना नदीच्या पूर्वेकडील ४५ चौरस मैलांचा टापू असून या नूतन प्रांताचें हल्लींचें क्षेत्रफळ ५७३ चौरस मैल आहे. १९२१ सालीं याची लो. सं. ४८८१८८ होती.

**इतिहास**.—अरवली डोंगराचें उत्तर टोंक जेथें यमुनेपर्यंत गेलें आहे त्या ठिकाणीं प्राचीन काळापासून एकामागून एक मोठीं शहरें होऊन गेलीं आहेत; त्यांपैकीं ज्येष्ठ पांडव युधिष्ठिर यानें स्थापन केलेलें इंद्रप्रस्थ (पहा). हें पहिलें होय. फेरिस्ता या प्रवाशानें अशी दंतकथा लिहून ठेविली आहे कीं दिल्ली शहर हें मॅसिडोनियन स्वारीपूर्वी दिल्लू राजानें स्थापन केलें; पण अनंगपाल या तोमर जातीय रजपुतानें अकराव्या शतकांत ज्यामध्यें हल्लीं कुतुबमिनार आहे तो

तांचा किल्ला बांधून, तेथें गांव वसविलें व तेव्हांपासून या शहराचें अस्तित्व ऐतिहासिकदृष्ट्या सुरू झालें. चंद्रगुप्त, विक्रमादित्याची ज्यावर स्तुति आहे तो लोहस्तंभ त्यानें मथुरेहून आणून येथें उभा केला. याचा व्यास १६ इंच व उंची २३ फूट असून तो जमिनींत तीन फूट पुरलेला आहे. या स्तंभाविषयीं पुढील दंतकथा प्रचलित आहे. स्तंभ जमिनींत इतका खोल पुरलेला होता कीं तो वासुकीच्या डोक्याला जाऊन पोंचला असल्यामुळें बिलकूल हलत नाहीं; व त्याचप्रमाणें त्याच्या संस्थापकाचें राज्यहि कायम टिकेल अशी हकीकत एका ब्राह्मणानें राजास सांगितली. त्यावर त्याचा विश्वास न बसून त्यानें तो स्तंभ खणून काढविला. तेव्हां त्याचें टोंक सर्पाच्या रक्तानें भरलें आहे असें दिसल्यावर त्याची खात्री होऊन त्यानें तो खांब पुन्हां बसविण्याची आज्ञा केली. पण त्याच्या अविश्वासाबद्दल प्रायश्चित्त म्हणूनच कीं काय तो खांब कांहीं केल्या पूर्वीप्रमाणें बसेना. खांब ढिला बसल्यामुळें या शहराला ढिल्ली किंवा दिल्ली असें नांव पडलें. पण तोमर घराण्याच्या पूर्वींच दिल्ली हें नांव निःसंशय होतें यावरून ही दंतकथा फारशी खरी नसावी.

अनंगपाल हा कनोजहून आला असावा; त्यानें उत्तरेस हांसी, पूर्वेस गंगानदी व दक्षिणेस आग्र्यापर्यंत आपला प्रदेश वाढवून त्यावर राज्य केलें. त्याच्या घराण्यानें बरोबर एक शतकपर्यंत राज्य केल्यावर त्याच्या जागीं अजमीरचा चव्हाण वीसलदेव यानें आपलें राज्य स्थापन केलें (११५१). वीसलदेवाचा नातु प्रसिद्ध पृथ्वीराज यानें दिल्ली व अजमीर यांवर राज्य करून दिल्ली येथें पृथ्वीपुर नांवाचें गांव वसविलें. कुतुबमिनारच्या सभोंवतीं या शहराच्या भिंतींचे शेष अद्यापहि दिसतात. स. ११९१ त पृथ्वीराजानें हिंदू राजांची मदत घेऊन तिरावरी येथें महंमद घोरीचा पराभव केला, पण पुढल्या वर्षी त्याच ठिकाणीं त्याचा मोठा पराभव झाला. पृथ्वीराजाच्या मृत्यूबरोबरच दिल्लीच्या हिंदू राजांचा इतिहास संपला. ११९३ सालीं महंमदाचा गुलाम कुतुबुद्दीन यानें दिल्ली शहर सर केलें व त्याच्या धन्याच्या मरणानंतर तें गुलाम घराण्याच्या राजधानीचें ठिकाण झालें. शहर सर केल्यावर लवकरच कुतुबुद्दीनानें मशीद बांधण्यास सुरवात करून तीन वर्षांत पूर्ण केली. या मशीदींत एक बाहेरचें व एक आंतील अशीं दोन पटांगणें असून बाह्य पटांगणांत हिंदु देवालयांतून आणलेले सुंदर खांब सारख्या अंतरावर उभे केलेले आहेत. पूर्वी या खांबांवर चुना लावून खांबांवरील मूर्ती अदृश्य केल्या होत्या परंतु आतां वरचा चुना पडून गेल्यामुळें आंतील नक्षीकाम दृष्टीस पडून इतक्या प्राचीन काळींहि हिंदू कारागीर किती कुशल कामें करीत हें कळून येतें. पश्चिम बाजूकडे असलेल्या बारा कमानी मुसुलमानी पद्धतीच्या पण हिंदु कारागिरांनीं केलेल्या आहेत. ही मशीद तयार झाल्यानंतर १५० वर्षांनीं इब्न बतूता या मूर प्रवाशानें पाहून, सौंदर्य व विस्तार या दोन्ही दृष्टीनें ती अपूर्व असल्याबद्दलचा आपला अभिप्राय नमूद करून ठेविला आहे. गुलाम घराण्यांतील या मोठ्या राजाचें दुसरें प्रसिद्ध स्मारक म्हणजे मशिदीच्या बाहेरच्या आवारांत आग्नेय कोपऱ्यांतील कुतुबमिनार हें होय. याची उंची २३८ फूट व पायाजवळ व्यास ४७ फूट असून वर निमुळतां होत होत वरच्या टोंकाचा व्यास फक्त ९ फूट आहे. हा मनोरा ५ मजली असून त्यामध्यें नागमोडी जिने आहेत. मनोऱ्यावर असलेला घुमट १८०३ सालच्या धरणीकंपानें मोडून नादुरुस्त झाला आहे. सकाळ संध्याकाळ प्रार्थनेच्या वेळीं शहरच्या सर्व लोकांस बोलावण्याकरितां हा मनोरा बांधण्यांत आला असावा. पूर्वी ज्या ठिकाणीं लोहस्तंभ होता ती जागा मशिदीकरितां नियोजित केली गेल्यामुळें, मशिदीच्या आंतील अंगणास या खांबानें फार शोभा आलेली आहे. सभोंवार असलेल्या पुष्कळ प्राचीन अवशेषांपैकीं अल्तमशाचें थडगें व १३११ सालीं अल्लाउद्दीनानें बांधण्यास सुरवात करून अपुरी राहिलेली इमारत, हे महत्त्वाचे आहेत.

गुलाम घराण्यांत सुलतान रेझिया ही बादशाहीण होऊन गेली. १२९० सालपर्यंत गुलाम घराणें चालल्यावर जलालुद्दीन खिलजीनें नवीन घराणें स्थापन केलें. त्याच्यानंतर गादीवर आलेला अल्लाउद्दीन खिलजी याच्या कारकीर्दींत मोंगल टोळ्यांनीं दोन वेळ दिल्लीवर हल्ले केले पण ते व्यर्थ गेले. १३२१ सालीं येथें घियासुद्दीन तघ्लखानें तघ्लख घराणें स्थापन करून पूर्वेस ४ मैलांवर तघलखाबाद येथें नवीन राजधानी स्थापिली. हल्लीं त्या ठिकाणीं मनुष्यवस्ती मुळींच नाहीं, पण किल्ल्याचे व ओसाड रस्त्यांचे अवशेष दृष्टीस पडतात. स. १३२५ त घियासुद्दीनाच्या मरणानंतर त्याचा मुलगा महंमदतघ्लख गादीवर आला. यानें येथील राजधानी उठवून, ८०० मैलांवर दक्षिणेंत दौलताबादेस नेण्याचा तीन वेळ प्रयत्न केला. पुढें फिरोझशहा तघ्लखानें फिरोझाबाद हें नवें शहर वसवून तेथें राजधानी नेली. हल्लींच्या शहरच्या दक्षिणद्वाराबाहेर, या राजाच्या राजवाड्याच्या अवशेषांमध्यें अशोकानें इ. स. पूर्वी तिसऱ्या शतकांत उभारलेला एक प्रसिद्ध स्तंभ आहे. हा स्तंभ फिरोझशहानें, अंबाला जिल्ह्यांत खिझराबादजवळ तोप्र येथून आणल्यामुळें याला फिरोझशहाची लाट असें म्हणतात. याची लांबी ४२ फू. असून हा गुलाबी दगडाचा केलेला आहे व त्यावर पालीमध्यें अशोकाचीं शासनें (१–७) कोरलीं आहेत.

स. १३९८ त्या डिसेंबर महिन्यांत, तघ्लख घराण्यांत गादीसंबंधीं तंटा चालला असतां तैमूरलंगानें दिल्लीवर स्वारी करून पांच दिवस शहरांत लूट व कत्तल केली व पुष्कळ स्त्रीपुरुषांना गुलाम करून बरोबर घेऊन गेला. त्यानंतर दोन महिनेपर्यंत शहरांत कोणत्याहि प्रकारची राज्यव्यवस्था नव्हती. पुढें महंमदशहानें उरलेला प्रदेश ताब्यांत घेऊन स. १४१२ पर्यंत राज्य केलें. त्याच्या मरणानंतर सय्यद घराण्यानें स. १४५० पर्यंत राज्य केल्यावर येथें लोदी घराणें

स्थापन झालें. दुसऱ्या शिकंदर लोदीनें आग्रा ही आपली राजधानी केली; पण दिल्लीचें महत्त्वहि कमी झालें नव्हतें. १५२६ सालीं बाबरानें पानिपत येथें लोदी घराण्यांतील शेवटचा इब्राहिम याचा पराभव करून दिल्लींत प्रवेश केला, पण तो मुख्यतः आग्रा येथेंच रहात असे. हुमायुनानें परत दिल्लीस येऊन इंद्रप्रस्थामधील पुराणा किल्ला दुरुस्त केला. शीरशहानें स. १५४० त हुमायुनास पळावयास लावून, शहराभोंवतीं तटबंदी केली. त्यानें बांधलेल्या दरवाजांपैकीं, हल्लींच्या तुरुंगासमोरचा लाल दरवाजा अद्याप चांगला आहे. सालिमगडच्या किल्ल्यानें शीरशहाच्या मुलाची स्मृति अद्याप कायम ठेविली आहे. आसपासच्या इमारतींपैकीं शहाजहानाचें थडगें वास्तुशिल्पकौशल्यदृष्ट्या फार चांगलें आहे. अकबर व जहांगीर हे बहुधां आग्रा, लाहोर, किंवा अजमीर येथें रहात असत. पुढें शहाजहानानें हें शहर हल्लींच्या ठिकाणीं पुन्हां बांधून त्याच्या भोंवतीं तटबंदी केली व त्याला शहाजहानाबाद असें नवीन नांव दिलें; त्यानें जुम्मा मशीद बांधून यमुनेचा पश्चिम कालवा पुन्हां सुरू केला. त्याच्या वेळेपासून ( कांहीं थोडे दिवस खेरीज ) मोंगलांची राजधानी अखेरपर्यंत दिल्ली येथेंच होती. स.१७३७ त महंमदशहा राज्य करीत असतां बाजीराव पेशवा दिल्लीपर्यंत आला होता. त्यानंतर दोन वर्षांनीं नादिरशहानें या शहरांत प्रवेश करून तैमूरच्या कत्तलीची पुनरावृत्ती केली. श्रीमंत व गरीब वगैरे सर्वांनां लुटून व बरोबर अपार संपत्ति घेऊन ५८ दिवसांनंतर त्यानें शहर सोडलें. १७६० सालीं मोंगल बादशहीचे तुकडे होण्यापूर्वी या दुर्दैवी शहरांत दोन वेळ अंतःकलह झाले व अहंमदशहा दुराणीनें व शेवटीं मराठ्यांनीं येथून लूट नेली. शहाअलम नांवाचा मात्र बादशहा होता पण त्याला सत्ता मुळींच राखतां येईना; शेवटीं मराठ्यांनीं स. १७७१ त त्याला पुन्हां दिल्लीच्या गादीवर बसविलें. स. १७७८ त दिल्ली येथें मराठ्यांची शिबंदी कायमची ठेवण्यांत आली व ब्रिटिश येईपर्यंत शहाआलम हा शिंद्यांच्या हातांत केवळ कैदी होता. स. १८०३ मध्यें लॉर्ड लेक यानें मराठ्यांचा पराभव करून दिल्ली शहरांत प्रवेश केला व बादशहाला आपल्या संरक्षणाखालीं घेतलें.

स. १८५७ च्या बंडाचा दिल्ली येथील हकीगतीशीं स्थानिक इतिहासापेक्षां हिंदुस्थानच्या इतिहासाचा जास्त संबंध आहे. स. १८५७ च्या डिसेंबरांत दिल्ली पुन्हां इंग्रजांच्या हातीं आल्यावर कांहीं काळपर्यंत सर्व लोकवस्ती काढून लावण्यांत आली होती; पण स. १८५८ च्या जानेवारीपासून पुन्हां येण्याची मोकळीक दिली. महाराणी व्हिक्टोरिया हिनें स. १८७७ त " हिंदुस्थानची बादशाहीण " हा किताब धारण केला त्यावेळीं येथें दरबार भरला होता.

व र्ण न.—हल्लींचें दिल्ली शहर यमुनेच्या पश्चिम तीरावर २ मैल पसरलेलें असून, त्याच्या इतर तिन्ही बाजूंनां शहाजहानानें बांधिलेली व ब्रिटिश सरकारनें दुरुस्त केलेली ३½ मैल लांबीची, उंच दगडी भिंत आहे. पूर्वी या भिंतीला १० दरवाजे होते, पण त्यांपैकीं बरेच बंद केले आहेत. हल्लीं असलेल्या दरवाजांपैकीं, उत्तरेचा काश्मीर दरवाजा, पश्चिमेकडील फरासखान व अजमीर दरवाजे आणि दक्षिणेचा दिल्ली दरवाजा हे मुख्य आहेत. बादशहाच्या राजवाड्याला हल्लीं किल्ला ( फोर्ट ) असें म्हणतात. हा शहराच्या पूर्वेस नदीकांठीं आहे. त्याच्या तीन बाजूंनां तांबड्या दगडांची भिंत व बुरूज असून दक्षिणेस व पश्चिमेस दरवाजे आहेत.

किल्ल्याच्या ईशान्येस सालेमगडचा बाह्य कोट आहे. येथें यमुनेच्या भव्य पुलावरून ईस्ट इंडिया रेल्वेचा फांटा शहरांत शिरून सालिमगड आणि किल्ला यांवरून शहराच्या स्टेशनकडे जातो. किल्ल्याच्या वायव्येस उघड्या जागेत सार्वजनिक कचेऱ्या व सेंट जेम्सचें ख्रिस्ती देऊळ आहे. याच्या दक्षिणेस रेल्वेच्या पलीकडे असलेल्या उघड्या जागेत सार्वजनिक उद्यानें आहेत; व शहरच्या आग्नेय कोंपऱ्यांत, दर्यागंजमध्यें छावणी आहे. याप्रमाणें व्यापिलेला शहराचा अर्धा भाग, दुकानें व देशी वस्ती यांनीं व्यापिलेल्या नैर्ऋत्य भागापेक्षां उघडा आहे.

दिल्ली शहरांतील सुंदर व भव्य इमारतींचें यथातथ्य वर्णन करणें येथें अशक्य आहे. त्याचें वर्णन दुसऱ्या ग्रंथांत आलेलें आहे. [ फर्ग्यूसन—हिस्ट्री ऑफ इंडियन अँड ईस्टर्न आर्किटेक्चर ( १८७६ ); दिल्ली पास्ट अँड प्रेझेंट ( १९०२ ). ] शहाजहानचा राजवाडा आग्र्याच्या राजवाड्यापेक्षां कमी देखणा पण जास्त प्रशांत आहे. याची दक्षिणोत्तर लांबी ३२०२ फूट व पूर्वपश्चिम लांबी १६०० फूट आहे. दरवाजासमोर नौबदखाना असून पलीकडे दिवाण–ई–आम म्हणजे दरबारची जागा आहे. याच्या पाठीमागें रंगमहाल असून, मध्य इमारतींच्या उत्तरेस, शहाजहानाच्या इमारतींपैकीं जरी सर्वांत सुंदर नव्हे तरी सर्वांत जास्त शृंगारलेला असा दिवाण-इ-खास म्हणजे खासगी भेटींचा दिवाणखाना आहे. या दिवाणखान्याच्या भिंतीवर पुढील प्रसिद्ध वाक्य लिहिलेलें आहे. " पृथ्वीवर जर स्वर्ग असेल तर तो हाच ! हाच ! " मध्य इमारतींच्या दक्षिणेस १००० फूट लांबी रुंदीच्या जागेत राजवाड्यांतील जनाना व खासगी दिवाणखाना असे.

मूळच्या शहरांतील इमारती विटांच्या असून चांगल्या व मजबूत बांधलेल्या आहेत. रस्ते लहान, अरुंद व वळणावळणाचे आहेत; पण दिल्ली शहरांतील मोठ्या दहा रस्त्यांसारखे सुंदर रस्ते सर्व हिंदुस्थानांत कोणत्याहि शहरीं नाहींत. चांदणीचौक हा मुख्य रस्ता किल्ल्यापासून पूर्वेकडे लाहोर दरवाज्यापर्यंत जातो. याची रुंदी ७४ फूट आहे. चांदणी चौकाच्या दक्षिणेस, कांहींशा उंच व खडकाळ जागेवर, शहाजहानानें आपल्या कारकीर्दीच्या चवथ्या वर्षी सुरवात करून १० व्या वर्षी पूर्ण केलेली जुम्मा मशीद नांवाची सुंदर

इमारत आहे. समोरील ४५० फूट लांबीच्या चौरस पटांगणांत काळ्या दगडांची फरसबंदी असून तींत संगमरवरी दगड फार शोभिवंत रीतीनें बसविलेले आहेत. या पटांगणांतून सर्व शहरचा देखावा दृग्गोचर होतो. या शोभिवंत मशिदी-कडे जाण्याकरितां एक भव्य दगडी जिना आहे. मशि-दीच्या शिखरावर तीन संगमरवरी घुमट व पुढील दोन कोपऱ्यांवर दोन उंच मनोरे आहेत. मशिदीच्या आंतील भागांतहि संगमरवरी दगडांची फरसबंदी केलेली असून भिंतीला सुद्धां संगमरवरी दगड बसविलेले आहेत. या-शिवाय अफगाण राजांनीं बांधिलेली काळी मशीद व रोशन-उद्दवल्याची मशीद यांचाहि उल्लेख करणें योग्य आहे. अली-कडील इमारतींमध्यें रेसिडेन्सी म्हणजे हल्लीं हायस्कूल अस-लेली इमारत, नगरभवन (ह्यांत दरबार दिवाणखाना, चित्रांचा संग्रह, अजबखाना व सार्वजनिक वाचनालय हीं आहेत व सेन्ट जेम्सचें ख्रिस्ती देऊळ ह्या मुख्य आहेत. चांदणी चौकाच्या उत्तरेस राणीचा बाग आहे. शहरच्या भिंतीबाहेर उत्तरेस युरोपियन लोकांची वस्ती आहे. पश्चिमेस व नैर्ऋ-त्येस असलेल्या उपांत्य भागांत, पूर्वीच्या बादशाही घरा-ण्यांतील व्यक्तींची थडगीं आहेत; त्यांपैकीं हुमायूनचें थडगें व निजामउद्दीन नांवाच्या साधूच्या स्मरणार्थ बांधिलेली मशीद हीं मुख्य आहेत.

ज्यांच्या योगानें दिल्ली शहराला सौंदर्य व भव्यपणा आला होता ते पूर्वीच्या सरदारांचे राजवाडे नाहींसे होऊन त्या ठिकाणीं नव्या इमारती झालेल्या आहेत. येथें स. १८५० त म्युनिसिपालिटी स्थापन झाली. किल्ल्यावर शिबंदी व ब्रिटिश पायदळ आणि दर्यागंज येथें देशी पायदळ ठेवि-लेलें आहे.

उ द्यो ग धं दे.—जवाहिरी काम, चांदीचें काम, पितळेची व तांब्याची भांडीं, हस्तिदंती कांतकाम, विणकाम, जीगचा कशिदा, चित्रें काढणें वगैरे नाना तऱ्हेचे उद्योगधंदे येथें चालतात. येथील जवाहिरीकामाची प्रसिद्धी आज पुष्कळ वर्षे चालू आहे; पण हल्लींचें काम मोंगलांच्या वेळच्या कामाइतकें सुंदर असत नाहीं. एक: दोन घराण्यांत हस्तिदंती कांत-काम फारच चांगलें होतें. चरखा व गिरण्या यांचीहि वाढ बरीच झाली आहे. याशिवाय छापखान्याचें काम, बिस्किटें करणें वगैरे किरकोळ कामेंहि होतात.

नदीच्या पूर्व तीरावर नॉर्थवेस्टर्न रेल्वेचा फांटा झाल्या-पासून जरी हें शहर व्यापाराच्या मार्गावर नाहीं तरी येथील व्यापार बराच मोठा आहे. येथें येणाऱ्या कापडावर व धान्यावर जकात नसल्यामुळें व्यापारदृष्ट्या याला महत्त्व असून, अद्यापहि एकीकडून कलकत्ता किंवा मुंबई आणि दुसरीकडून रजपुताना यांशीं येथील बराच व्यापार चालतो. रासायनिक पदार्थ, कापूस, रेशीम, सूत, धान्य, तूप, धातूचे जिन्नस, मीठ, शिंगें, कातडीं आणि विलायती कापड वगैरे जिन्नस बाहेरून येतात. हे जिन्नस आणि तंबाखू, साखर, तेल, जवाहिराचें काम, जरीचें काम वगैरे पदार्थ येथून दुसरीकडे रवाना होतात. पंजाब प्रांताबाहेर, सिंद, काबूल, अलवार, बिकानेर, जयपूर व दुआब वगैरे गांवांशीं या शहराचा व्यापार चालतो. येथें बंगाल, नॅशनल, दिल्ली, लंडन, अला-हाबाद आणि अपर इंडिया वगैरे बँका आहेत. चांदणी चौक ही येथील मुख्य बाजारपेठ आहे.

शि क्ष ण.—येथें असलेलें कॉलेज १८७७साली मोडून टाक-ण्यांत आलें होतें. हल्लीं स्वतंत्र युनिव्हर्सिटी स्थापन करण्यांत आली आहे. शिवाय येथें म्युनिसिपल हायस्कूल, आंग्लो-अरेबिक, आंग्लो-संस्कृत, सेन्ट स्टीफन्स व शहाजहान हीं हायस्कुलें; शिक्षक तयार करण्याकरितां शाळा, व उद्योग-धंद्यांची शाळा वगैरे शिक्षणसंस्था आहेत.

न वी दि ल्ली.—१९११साली ज्यावेळीं दिल्लीदरबार भरला त्यावेळीं बादशहा पंचमजॉर्ज यानीं हिंदुस्थानची राजधानी दिल्ली ठरविण्यांत आली आहे असें जाहीर केलें. तेव्हांपासून दिल्ली ही राजधानी झाली व अर्थातच त्यामुळें दिल्लीशह-राची पुनर्रचना होण्यास सुरवात झाली. दिल्लीच्या पूर्ववैभ-वाला साजेल अशी पुनर्रचना करण्यांत यावी असें राजे-साहेबानीं उद्गार काढले होते, व ती गोष्ट मनांत ठेऊनच दिल्लीशहराच्या पुनर्रचनेनिमित्त एक तज्ज्ञांची कमेटी निवड-ण्यांत आली. राजधानीसाठीं दोन जागा सुचविण्यांत आल्या होत्या. एक हल्लींच्या दिल्ली शहरच्या उत्तरेकडील भाग व दक्षिणेकडील भाग. उत्तरेकडील भागांत राजधानी वसविण्यामध्यें थोडे फायदे पण अधिक तोटे होते. त्यामुळें वरील कमिटीनें दिल्लीच्या आग्नेयीकडचा भाग अधिक पसंत केला. हा भाग थोडा उंचावर असल्यानें तेथें नदीला पूर आला तरी पाणी येण्याचा संभव नाहीं. शिवाय त्या भागांत नैसर्गिक ड्रेनेज आहे. याशिवाय या भागांत ऐति-हासिक थडगीं, पुतळे इत्यादि पवित्र अवशेष फार कमी असल्यामुळें व या बाजूला विस्ताराला वाटेल तितकी जागा असल्यामुळें हा भाग कमिटीला अधिक पसंत पडावा यांत आश्चर्य नाहीं. पण कमिटीचें मत हिंदू लोकांना मुळींच पसंत पडलें नाहीं. हिंदी लोकांचें मत नवी राजधानी उत्तर भागांत वसविण्यांत यावी असें होतें. सर ब्रॅडफर्ड लेस्ली यानेंहि तसेंच मत दिलें. त्यामुळें कमिटीनें पुन्हां सर्व भागांची तपासणी करून उत्तर भागांत किती तोटे आहेत हें दाखवून दिलें. शेवटीं बऱ्याच वादविवादानंतर दक्षिणेकडील भागच नूतन राजधानीकरितां पसंत करण्यांत आला.

या नवीन राजधानीचा मध्य रैसीन टेंकडीवर असून या टेंकडीभोंवतालीं राजधानीच्या इमारती झाल्या आहेत. या मध्याच्या उत्तरेस व दक्षिणेस सेक्रेटरीएटच्या इमारती आहेत व त्या इमारतींच्या मधोमध गव्हर्मेंट कोर्ट आहे. या कोर्टाच्या पश्चिमेस गव्हर्मेंट हाऊस बसलेलें आहे. या इमारतींच्या आसपास उद्यानें, बागा वगैरे केल्या आहेत. व येथेंच व्हाईसरायांच्या निरनिराळ्या सेक्रेटरींचे

व अधिकाऱ्यांचे बंगले आहेत. गव्हर्मेंट हॉउसच्या दक्षिण बाजूला हिंदुस्थानच्या सेनापतीचा बंगला आहे. सेक्रेटरीएटच्या पूर्वाभिमुख एक मोठी मोकळी जागा असून तिला ग्रेट प्लेस हें नांव आहे. या जागेंत जलसरोवरें व कारंजीं निर्माण करण्यांत आलीं आहेत. या 'ग्रेट प्लेस' च्या पूर्वेस एक मोठें उद्यान आहे त्याला 'सेंट्रल विस्टा' असें नांव आहे. या उद्यानाच्या दोन्ही बाजूस, कौन्सिलर लोकांचे रहाण्याचे बंगले आहेत. या उद्यानाच्या मधून राजधानीतील प्रमुख रस्ता गेला आहे व या उद्यानाचे चार काटकोण झाले आहेत. या चारी काटकोनांमध्यें इंपीरियल रेकॉर्ड ऑफिस, एथ्नॉलॉजिकल म्यूझियम, दि मेडिकल रीसर्च इन्स्टिट्यूट लायब्ररी व वॉर म्यूझियम इत्यादि भव्य इमारती आहेत. वरील राजरस्त्याच्या उत्तर टोंकाला व्यापारी पेठ वसलेली आहे. या पेठेंत तिमजली इमारती असून, पोष्ट टेलिग्राफ ऑफिसच्या इमारती येथेंच आहे. या रस्त्याच्या दक्षिण टोंकाला अँग्लिकन कॅथेड्रल व अधिकाऱ्यांचे बंगले आहेत. सेक्रेटरीएट ऑफिसची जी उत्तरेकडील इमारत आहे त्याजवळच कौन्सिल ऑफ स्टेट, लेजिस्लेटिव्ह असेंब्ली व चेंबर ऑफ प्रिन्सेस यांच्या बैठकीची इमारत आहे. याच्याहि पुढें पूर्वेस दिल्ली युनिव्हर्सिटीसाठीं जागा राखून ठेवण्यांत आली आहे. १९२१ सालच्या बजेटवरून या नव्या राजधानींतील इमारतींप्रीत्यर्थ १२९१८०००० रुपये खर्च लागेल असा अंदाज आहे.

**दिल्लीचीं हिंदु राजघराणीं**—युधिष्ठिर (पांडव) वंशांतील एक राजा निमिचक्र हस्तिनापूर येथें राज्य करीत असतां, भागीरथीस पूर येऊन तें शहर वाहून गेल्यामुळें त्यानें आपली गादी कौशांबी नगरास नेली. त्यावेळेस युधिष्ठिर शकाचें सुमारें ५८३ वें वर्ष होतें. ही गादी तेथें सुमारें ६०० वर्षें असावी; तेवढ्या काळांत चित्ररथ राजापासून क्षेमक (लक्ष्मीदेव) राजापर्यंत युधिष्ठिरवंशीय ३० पुरुषांनीं तेथें राज्य केलें. या प्रत्येकानें किती किती वर्षें राज्य केलें तें स्पष्ट आढळत नाहीं. एवढेंच नव्हे तर पुरुषांची व वर्षांची आढळणारी संख्या यांचा मेळ मुळींच बसत नाहीं. तो घालण्याचा आजपर्यंत पुष्कळांनीं प्रयत्न केला आहे पण तो साधत नाहीं.

क्षेमक म्हणजे लक्ष्मीदेव यास त्याच्या वीरसेन प्रधानानें मारून, कौशांबी नगरींतून गादी काढून इंद्रप्रस्थ येथें पुन्हां आणिली. वीरसेनापासून पृथ्वीपाळ राजापर्यंत १० पुरुष झाले. वीरसेन वंशांतील शेवटला राजा पृथ्वीपाळ यास त्याच्या नरहरीनाथ नामक प्रधानानें मारिलें, व दिल्ली येथें आपण राज्य करूं लागला. या वंशांत नरहरीनाथासुद्धां १६ राजे झाले. नरहरीनाथ वंशांतील शेवटचा राजा विक्रम यास मित्रपाळ नामक त्याच्या प्रधानानें मारिलें व आपण दिल्ली येथें राज्य करूं लागला. हे राजे एकंदर मित्रपाळासुद्धां १६ झाले.

मित्रपाळ वंशांतील शेवटला राजा विक्रमपाळ यास अहीर जातीच्या कोणा प्रधानानें मारिलें व आपण दिल्ली येथें राज्य करूं लागला. हे अहीर राजे ८ झाले होते. अहीर सूरचंद्र राजाच्या कारकीर्दीच्या अखेरीस विक्रम संवत् चालू झाल्यामुळें युधिष्ठिर शक बुडाला. सूरचंद्र निपुत्रिक असल्यामुळें तो मरण पावतांच दिल्ली येथें एक वंश राज्य करूं लागला. परंतु त्याचें नांव आढळत नाहीं. या वंशांतील ८ पुरुषांनीं राज्य केलें.

या निनावी वंशांतील शेवटला राजा महानंद यास बंगाल्याकडून आलेल्या एका जयसिंग नामक पुरुषानें मारिलें व आपण दिल्ली येथें राज्य करूं लागला. यासुद्धां त्याच्या १२ पुरुषांनीं तेथें राज्य केलें. यापुढें उत्तरेकडून माधवसिंग आला व त्यानें जयसिंग वंशांतील शेवटला राजा दामोदरसेन यास मारून इंद्रप्रस्थ येथें ६ पिढ्यांपर्यंत राज्य केलें. माधवसिंगाच्या वंशांतील शेवटचा राजा नरहरसिंग यास धीरधर राजानें मारून आपण दिल्ली येथें राज्य केलें. या धीरधरासुद्धां ९ पुरुषांनीं राज्य केलें.

धीरधर वंशांतील शेवटला राजा विक्रमचंद यास पूर्वेकडून आलेल्या पृथ्वीपाळ राजानें ठार मारलें व दिल्ली येथें आपण राज्य करूं लागला. पृथ्वीपाळाच्या वंशांत ५ पुरुषांनीं राज्य केलें व त्यांची कारकीर्द सुमारें १०६ वर्षांची झाली. त्यांतील शेवटचा पुरुष पृथुराज (पिठोराराजा) होता.

याप्रमाणें युधिष्ठिरापासून पृथुराजापर्यंतची हकीकत जुन्या राजावलींच्या बाडांतून नेहमीं आढळते. हा काल ४२९४ वर्षांचा होता असेंहि बाडकार म्हणतात. परंतु वर सांगितल्याप्रमाणें त्या कालाची व त्यांत झालेल्या राजांच्या संख्येची संगति अद्यापि कोणत्याहि विद्वानास लाविता आली नाहीं.

**दिल्ली मौन्ट**—मद्रास इलाख्यांतील मलबार जिल्ह्याच्या चिरकल तालुक्यांत एका उंच (८५५ फूट) भागास हें नामाभिधान आहे. खरें नांव 'मौन्ट डी एली' असें आहे. वास्को ड गामास हिंदुस्थानच्या भूमीचा हाच भाग प्रथम दिसला हा समुद्रकिनाऱ्यावर आहे. टेंकडीवर एक मशीद असून सणाच्या दिवशीं मोपले लोकांच्या झुंडीच्या झुंडी वर दर्शनास जातात. ही जागा अनुक्रमें पोर्तुगीज, डच, फ्रेंच व इंग्लिश सैन्यांच्या हातीं होती. येथें एक किल्ला बांधला आहे. चांचे लोकांचें हें पूर्वी गुप्त निवासस्थान होतें.

**दिवाकर**—एक भारतीय ज्योतिषी. हा प्रसिद्ध गोलग्रामस्थ विद्वान कुलांत शके १५२८ मध्यें जन्मला. यानें जातकमार्गपद्म नांवाचा जातकग्रंथ केला. त्याला पद्मजातक असेंहि नांव आहे. केशवी जातकपद्धतीवर प्रौढमनोरमा नांवाची टीका यानें शके १५४८ त केली. तसेंच आपल्या जातकपद्धतीवर गणित तत्त्वचिंतामणी नांवाची सोदाहरण टीका

शके १५४९ त केली. पंचांगसाधक मकरंदावर याची मकरंदविवरण नांवाची सोदाहरण टीका आहे. व्याकरण, न्याय, काव्यसाहित्य यांतहि हा प्रवीण होता. [ दीक्षित-भा. ज्योतिशास्त्र. ]

**दिवाकर पुरुषोत्तम चोरघोडे**—हा साडेतीन शहाण्यांतील एक सवंघ शहाणा होता. देवाजी ( देवा ) असेंहि यास म्हणत. हा नागपुरकर भोसल्यांचा दिवाण. याचें आडनांव चोरघोडे. वऱ्हाडांत पेशव्यांचे कांहीं खाजगत महाल होते त्यांवरील चौथाई पेशवे भोसल्यास देत नसत. या संबंधीं नेहमीं कटकटी निघत. त्यांपैकीं एका वेळीं या दिवाकरानें पुण्यास जाऊन त्याचा समाधानकारक निकाल लाविला ( १७७९ ) होता.

पहिल्या रघूजीच्या मरणानंतर मुधोजी व जानोजी यांनीं भोसल्यांची गादी मिळविण्यासाठीं ज्या खटपटी केल्या त्यांत दिवाकर हा प्रथम उदयास आला. हा नागपूर जिल्ह्यांतील चिमूर येथील रहिवासी. त्रिंबकजी भोसल्याचा वकील कोन्हेरराम याचा दिवाकर हा शागीर्द होता. जानोजीनें आपल्यास सेनासाहेबसुभ्याचीं वस्त्रें पेशव्यांकडून आणविण्याची खटपट चालविली असतां, दिवाकरानें प्रसंग साधून नानासाहेब पेशव्यांकडून अडीच लक्ष रुपयांची नजर घेवघून वस्त्रें आणिलीं. त्यामुळें जानोजीचा दिवाकर हा उजवा हात बनला. दिवाकरावर पेशव्यांचीहि मर्जी असे.

मुधोजी व जानोजी यांच्यांतील नांदगांवच्या लढाईंत दिवाकराच्याच शहाणपणानें जानोजीचा जय झाला. पुढें जानोजी हा राघोबादादास मिळून पुण्यावर चालून येत असतां थोरले माधवराव त्याच्यावर गेले. त्यावेळीं दिवाकर हा पेशव्यांच्या नजरकैदेंत होता; तरीहि पेशव्यांच्या हालचालीच्या बातम्या तो गुप्तपणें जानोजीस कळवी; याच वेळचा बुद्धीबळाचा प्रसंग ( राजा दोन घरें मागें घ्यावा ही सखारामबापूची दिवाकरास गर्भित सूचना ) होय. त्यानें पेशव्यांस सांगितलें कीं १५ लक्ष रुपये घेऊन जानोजीशीं तह करावा; परंतु रावसाहेबांनीं तें ऐकिलें नाहीं. शेवटीं भोसल्यानें कंटाळून दिवाकराच्या मार्फत कनकापूर येथें पेशव्यांशीं तह केला.

यापुढें जानोजीनें दिवाकराची दिवाणगिरी काढून घेतली व कांहीं दिवसांनीं त्याच्यावर इतराजी झाल्यानें त्यास कैदेंत ठेवलें. यानंतर मुधोजी हा अधिकारावर आल्यानंतर त्यानें पंतास सोडिलें. त्यानें त्यावेळीं भवानी शिवरामाचें बंड मोडून मुधोजी व दुसरा रघूजी यांचें सख्य करून दिलें. यानंतर थोड्याच दिवसांत दिवाकरपंत नागपुरास मरण पावला (१७८१). [ नागपूरकर भोसल्यांची बखर, व कागदपत्रें; पेशव्यांची बखर. ]

**दिवाणाची इस्टेट**—मध्यप्रांत. रायगडसंस्थानच्या राजघराण्याच्या एका शाखेची ही इस्टेट आहे. पूर्वी याच शाखेंतून राजाचे दिवाण नेमिले जात असत. यांत एकंदर ३९ गांवें असून क्षेत्रफळ ३०५०० एकर व लोकसंख्या सुमारें आठ हजार आहे. १०० रुपये टाकोळी व ५५५रुपये कौल या इस्टेटीबद्दल दिला जातो. येथें फार मौल्यवान पण लहानसें जंगल आहे.

**दिवाळी** ( दीपावलि )—भारतीयांचा एक सण. हा सण आश्विन व कार्तिक या दोन महिन्यांच्या संधीस ( आश्विन वद्य चतुर्दशीपासून कार्तिक शुद्ध द्वितीयेपर्यंत ) चार दिवस असतो. कोणी धनत्रयोदशीचीहि या सणांत गणना करतात. या सणांत दीपोत्सव हा मुख्य असून अभ्यंगस्नानादि इतर धार्मिक विधीहि आहेत. पहिलीं खरीपाचीं पिकें निघून पुढील रब्बीचा पेरा होऊन नुकताच पाऊस उघडला आहे व थोडीशी थंडी पडूं लागली आहे अशा सुखसेव्या कालांत हा दिवाळीचा सण असतो. या सणांत धार्मिक विधींशिवाय कांहीं व्यावहारिक गोष्टीहि असतात. आश्विन वद्य अमावास्येस व्यापारी लोकांचें वर्ष संपून कार्तिक शुद्ध प्रतिपदेस नव्या वर्षास आरंभ होत असतो.

दिवाळींत पांच दिवसांतील कार्यक्रम पुढीलप्रमाणें असतो. आश्विन वद्य त्रयोदशीस सायंकाळीं घराच्या बाहेर यमदेवतेप्रीत्यर्थ दीपदान केलें जातें. त्यावेळीं आप्तांना धने व गूळ वांटण्याची चाल आहे. आश्विन वद्य चतुर्दशीस नरकचतुर्दशी म्हणतात. या दिवशीं कृष्णानें नरकासुराचा वध केला. या दिवशीं पहाटे सर्वांनीं अभ्यंगस्नान करावयाचें असतें. अमावास्येस लक्ष्मीपूजन व कुबेरपूजन हा विधि होतो. व्यापारीलोक सालअखेरचा हिशेब पुरा करून किफायतीच्या द्रव्याची ( लक्ष्मीची ) पूजा करतात. यावेळींहि आप्त, इष्टमित्रांना गूळ व धने वाटतात. या दिवशीं मुंबई शहरांतील सराफी व व्यापारी मोहोल्यांतील रोषणाई चांगली असते. कार्तिक शुद्ध प्रतिपदेस विक्रम संवताचें नवें वर्ष सुरू होत असल्यामुळें त्याचा हा पाडवाच होय. या दिवशीं बलीच्या राज्यास आरंभ झाल्याचें मानितात. या दिवशीं बलीप्रीत्यर्थ दान, गोक्रीडन ( पोळ्याप्रमाणें गाईंना शृंगारून त्यांची पूजा करणें ) व द्यूत खेळणें हे धार्मिक विधी असतात. व्यापारी लोक या दिवशीं नव्या वहीचें पूजन करतात. कार्तिक शुद्ध द्वितीयेस यमद्वितीया म्हणतात. या दिवशीं बहिणीनें भावास मेजवानी द्यावयाची व भावानें तिला ओवाळणी घालावयाची असते. वरील चारी दिवसांत मिष्टान्न भोजन, शोभेची दारू उडविणें व द्यूतादि खेळ खेळणें हे आचार सर्वत्र रूढ आहेत.

**दिविदिवि**—या झाडाचें लॅटिन नांव सिसाल्पिनिआ केरिआरिआ असून देशी भाषेंत यास दिविदिवे म्हणतात. हें मूळचें दक्षिण अमेरिकेंतलें असून १८३४ सालीं याचा हिंदुस्थानांत प्रवेश झाला.

हें कुंपणास उपयोगी पडणारें झाड असून व्यापारी दृष्ट्या उपयुक्त आहे. या झाडाचीं तयार रोपें ४ आण्यापर्यंत मुंबई, पुण्यासारख्या ठिकाणीं मिळतात. यांचें वीं एक औंस घेतलें

असतां सुमारें १०० झाडें तयार होतात. चामडें रंगविणें व लांकडास लावण्याचें रोगण तयार करणें या कामीं या झाडाचा फार उपयोग होतो. मुंबई इलाख्यांतील धारवाड जिल्ह्यांत या झाडाच्या फळांपासून बरेंच उत्पन्न होतें.

**दिवोदास**—एक वैदिक राजा. याची वेदांत आढळणारी सविस्तर माहिती, ज्ञानकोश विभाग ३ रा (दाशराज्ञयुद्ध अथवा भरतदिग्विजय प्रकरण) यांत दिली आहे. याचा पुत्र किंवा नजीकचा वंशज सुदास होय. पुराणांतून दुसरा एक दिवोदास राजा आढळतो. हा काशीपति सुदेव राजाचा पुत्र. याचें दिवोदास असें नांव असतांहि यास पित्याच्या नांवावरून सौदेव असें म्हणत असत. यानें इंद्राच्या अनुग्रहावरून भागीरथीच्या उत्तरतीरीं व गोमतीच्या दक्षिणतीरीं वाराणसी नांवाची पुरी निर्माण करून तेथें वास्तव्य केलें होतें. यास हैहयकुलोत्पन्न राजांनीं अतिशय त्रास दिला तेव्हां हा भारद्वाज ऋषीस शरण गेला व प्रार्थना करून म्हणाला कीं हैहयांस जिंकील असा मला पुत्र व्हावा. तेव्हां भारद्वाजानें त्याच्याकडून पुत्रकामेष्टि करविल्यावर यास प्रतर्दन नांवाचा पुत्र झाला. पुढें त्यानें हैहय राजांस जिंकून दिवोदासास सुखी केलें.

**दिव्य**—वहिमी किंवा आरोपी इसमाकडून धोक्याची अशी कांहीं भौतिक गोष्ट करवून खऱ्याखोट्याचा निर्णय करण्याच्या पद्धतीला दिव्य म्हणतात. रोमन कायदेपद्धतींत हा प्रकार मुळींच नव्हता; ग्रीकांना माहीत होता पण न्यायदानांत त्याचा तो उपयोग करीत नसत. चिनी व अमेरिकन इंडियन लोकांत या पद्धतीची वाढ झाली नाहीं. कुराणामध्यें दिव्याचा स्पष्ट निषेध केला आहे. दिव्यांचा विशेष प्रचार हिंदु, आफ्रिकन व टयुटॉनिक या लोकांतच आढळतो. आफ्रिकेंत विषदिव्य विशेष रूढ आहे.

सु मे रो-बा बि लो नि य न.—या प्राचीन संस्कृतीच्या लोकांत कायदेशास्त्र बरेंच वाढ पावलें असल्यामुळें दिव्यांना महत्त्व नव्हतें पण मानवी पुरावा दुबळा ठरल्यास एका जलदिव्याचा उपयोग करण्याबद्दल खमुरब्बीच्या कोडांत उल्लेख आहे. एखाद्या नदींत उडी घालण्यास सांगून त्यांतून आरोपी वांचल्यास त्याच्यातर्फे निकाल देत.

रो म न.—रोमनकायद्यांत दिव्याला स्थान नव्हतें. तथापि प्राचीनतम रोमन समाजांत दिव्यें करीत असत. त्यांपैकीं अग्नींतून चालत जाणें हा एक प्रकार असे. आदूनें भारलेली भाकर खावयास दिल्यावर ती ज्याच्या घशांत अडकेल तो खरा गुन्हेगार होय असा एक दिव्याचा प्रकार असे तिसरा प्रकार द्वंद्वयुद्धाच्या दिव्याचा. वादविषयाचा निर्णय द्वंद्वयुद्धानें करण्याची चाल यूरोपांत ख्रिस्तोत्तर १४।१५ व्या शतकापर्यंतहि फार रूढ होती आणि तिचा थोडाफार अवशेष अद्यापहि सांपडतो.

इ रा णी.—अवेस्ता ग्रंथांत सुमारें ३३ प्रकारचीं दिव्यें दिलीं आहेत. त्यांत उष्ण व थंड अशा दोन जाती आहेत. अग्नि, उकळणारें पाणी, वगैरे उष्ण आणि विषप्राशन वगैरे थंड दिव्यांचे प्रकार होत.

मु सु ल मा नी.—कुराणपूर्वकालीन अरबांत अग्निदिव्य प्रचलित होतें. त्याकरितां तरवार, चमचा, किंवा दुसरा एखादा धातूचा जिन्नस खूप तापवीत व तो आरोपीकडून जिभेनें चाटवीत. ज्याची जीभ फार भाजेल तो हरला असें समजत. जादूनें भारलेल्या जागेत उभें करून शपथ घ्यावयास लावणें हा दिव्याचा दुसरा प्रकार असे. कुराणांत ह्या प्रकारांचा निषेध असल्यामुळें तदनंतर दिव्यें बंद झालीं. मात्र आरफमांत आणि खुनांत शपथ करविण्याची पद्धत अद्याप चालू आहे.

हिं दु.—इंग्रजी होण्यापूर्वी मराठी व मुसुलमानी राज्यांत व तत्पूर्वीहि दिव्य करण्याचा प्रघात होता. तंटाभांडणाचा निकाल या दिव्यपद्धतीनें होई. वाक्पारुष्य, दंडपारुष्य, व स्तेय इत्यादि व्यवहारनिर्णयाच्या बाबतींत दिव्य करीत.

दिव्य केव्हां करावयाचें याबद्दल नियम असे. ज्यावेळीं लेखी व तोंडी पुरावा मुळींच मिळत नसेल त्यावेळीं मात्र दिव्य करावें, नाहीं तर करूं नये (याज्ञवल्क्य स्मृति, अ. २ श्लो. २२). तसेंच ज्या ग्रामसभेपुढें निर्णय होई तींतील गोतसभासदांची खात्री जर नुसत्या तोंडी पुराव्यावरून होत नसेल तर दिव्य करीत. स्मृतिकारहि असेंच म्हणजे, मानुषप्रमाणांचा सर्वथा अभाव असल्यास मग दिव्य करावें, म्हणतात. (याज्ञवल्क्य स्मृ. अ. २२).

या दिव्याचे प्रकार अग्नि, जल, तुला, विष इत्यादि असत. ऋग्वेद (१.१५८,४), पंचविंश ब्राह्मण (१४.६;६), छांदोग्य उपनिषद् (६.१६) व कौशिक सूत्र (५२.८) यांत अग्निदिव्याचा आणि शतपथ ब्राह्मण (११.२,७) यांत तुलादिव्याचा उल्लेख आहे. आपस्तंबाखेरीज इतर धर्मसूत्रांत दिव्यासंबंधीं मुळींच उल्लेख नाहीं. मनुस्मृतींत दिव्यांचा उपयोग व्यवहारनिर्णयांत करण्याबद्दल स्पष्ट सांगितलें आहे व तेथपासून दिव्यांचे अनेक प्रकार रूढ असलेले आढळतात. मराठी ऐतिहासिक कागदपत्रांतील कांहीं माहिती येथें देतों.

(१) दिव्य करणाराचे हात प्रथम साबणानें धुवून नखें काढीत, नंतर पिशव्यांत हात घालून त्या बंद करून त्यांवर मोहोर करून तीन रात्रीं दिव्य करणाऱ्यास अटकेंत ठेवीत. पिशव्यांत हात घालण्यापूर्वी हातांवरील सर्व खाणाखुणा टिपून ठेवीत. चौथ्या दिवशीं देवळाच्या अगर दिव्य करावयाच्या ठिकाणीं सात मंडळें करावयाचीं. एक लोखंडाचा लिंबाएवढा गोळा तापवून लाल करावयाचा. दिव्य करणाऱ्याच्या हातांवर पिंपळाचीं पानें द्यावयाचीं. त्यांवर थोडें तूप घालून तो तापविलेला गोळा लोहारानें सांडसांत धरून ठेवावयाचा. मग दिव्य करणारानें तो गोळा हातांत घेऊन तीं सात मंडळें ओलांडून पुढें गवत ठेविलेल्या खड्यांत तो टाकावयाचा. गोळा टाकल्यावर त्या गवतानें पेट घेतला पाहिजे. नंतर फिरून पिशव्यांत हात घालून, त्यांवर मोहोर करून

पुन्हां तीन रात्र दिव्य करणारास अटकेंत ठेवावयाचें. नंतर पिशव्या सोडून हात तपासून पहावयाचे. हातांवर फोड दिसल्यास तो दिव्य करणारा व तो ज्या पक्षाचा असेल तो पक्ष खोटा ठरला असें समजण्यांत येई. फोड वगैरे न आढळल्यास दिव्य करणारा पक्ष खरा समजला जाई.

(२) तप्तमहादिव्य अथवा रवा काढणेंः—तूप अगर तेल एका ताम्हनांत (अथवा कढईत) तापवावयाचें व त्यांत एक ते तीन माशांचा सोन्याचा, रुप्याचा किंवा तांब्याचा तुकडा (रवा) टाकावयाचा दिव्य करणारानें सात मंडळें चालत येऊन त्या तापलेल्या तुपांतील अगर तेलांतील तो रवा काढावयाचा. हातांस इजा झाली नाहीं असें दिसल्यास दिव्य करणारा खरा झाला असें समजत. तुकडा काढावयाच्या पूर्वी हातासंबंधीं तरतुदी वर सांगितल्याप्रमाणें करीत.

(३) देवाचा भंडारा व निर्माल्य डोक्यावर घेऊन शपथक्रिया करणें.

(४) कृष्णा-गोदा वगैरेंसारख्या नदींत उभें राहून शपथ घेणें.

(५) एका पोत्यांत दिव्य करणारास बांधून तें पोतें ठराविक पूज्य मानिलेल्या झाडावर बांधून शपथ घेवविणें व शपथ घेतल्यावर पोतें खालीं ढकलून देणें. मेल्यास तो खोटा व वांचल्यास खरा.

(६) एका ठरलेल्या ठिकाणीं तेथील देवाची पूजाअर्चा करीत राहणें. ठराविक मुदतींत, राहणाऱ्याच्या घरास आग लागली, जनावर चोरीस गेलें, कोणी माणूस मेलें किंवा खुद्द तो राहणारा स्वप्नांत भिऊन ओरडला तर त्यास क्रिया लागली म्हणजे तो खोटा झाला असें ठरवीत.

(७) वादीप्रतिवादींकडून देवापुढें दिवे लावावयाचे. दोन्हीं दिव्यांत तेल सारखें असावयाचें; असें असतां ज्याचा दिवा विनाकारण आधीं विझेल तो खोटा झाला.

(८) वादीप्रतिवादी यांनां तीर्थांत (अगर पवित्र नदींत) उभे करून जो खरा असेल त्याचा हात धरून साक्षीदारानें त्यास बाहेर काढणें. तसें करतांना अडखळून पाण्यांत पडल्यास साक्षीदारानें खोटी साक्ष देऊन खोट्या माणसास पुढें आणिलें असें ठरे.

(९) मस्तकावर गाईचें चामडें घेऊन व उजव्या हातीं तीर्थाच्या पाण्यानें भरलेला चंबू घेऊन शपथ घेणें. चंबू जड होऊन खालीं पडल्यास (एका व्यवहारांत त्या चंबूंत एकाएकीं सर्प निघाला होता. वाड भा. ७ पृ.१८०)तो खोटा ठरे.

दिव्यें करण्याचीं ठिकाणें पुढीलप्रमाणें होतीः पैठण येथील एकनाथांचें देऊळ; राजणगांव (निजामशाही) येथील मशीद; खेडशिवापूर येथील महादेवाच्या देवळासमोरील पिंपळाचें झाड; कऱ्हाड येथील कृष्णाकोयना संगम; माहुली येथील कृष्णावेणासंगम. रहिमतपूरचें कृष्णाकांठचें शिवनाथाचें देऊळ; निंब (सातारा जिल्हा) येथील सदानंद गोसाव्याचा मठ; पंढरपूरच्या सभामंडपांतील रंगशिळा; (खंडोबाच्या) पालीचें (सातारा जिल्हा) खंडेरायाचें मंदीर (येथें अद्यापि वर सांगितलेलीं सात मंडळें व गवताचा खड्डा आहे); जेजुरीच्या देवळांतील कांसव; इ. इ.

[संदर्भग्रंथ—एन्साय० ऑफ रिलिजन अँड एथिक्स; मनुस्मृति, अ. ८; नारदस्मृति, अ. १; आपस्तंबस्मृति २. २९; बृहस्पतिस्मृति ३.३; मिताक्षरीटीका; वाड, भा. २.]

**दीपवंश**—एक बौद्ध महाकाव्य. सिंहली अठ्ठकथांमध्यें दिलेल्या परंपरेवरून महाकाव्य रचण्याचा पहिलाच परंतु अर्धवट प्रयत्न म्हटला म्हणजे, दीपवंशामध्यें दिलेला त्या बेटाचा इतिहास होय. या काव्याच्या कर्त्यानें नांव दिलेलें नाहीं. परंतु बहुतकरून त्यानें हें काव्य ख्रिस्ती शकाच्या चवथ्या शतकाचा आरंभ आणि पांचव्या शतकाचा एक तृतीयांश यांच्या दरम्यान लिहिलें असावें. यांतील भाषा आणि वृत्तें बोजड दिसतात व यांत व्याकरणदृष्ट्या आणि वृत्तविषयक प्रमाद वरेच आढळतात. सिंहली लोक पाली भाषेंत पद्यें रचण्याच्या कामीं त्यावेळीं अनभ्यस्त होते असें दिसतें. या ग्रंथकारानें कांहीं पद्यें पुढें ठेवून अगदीं त्यांच्याप्रमाणें शब्दांची रचना करण्याचा प्रयत्न केल्यासारखें दिसतें. त्यानें आपलीं पद्यें तिपिटक आणि विशेषतः बुद्धवंस, चरियापिटक आणि जातक या ग्रंथांतील कांहीं पद्यें आठवून त्यांच्याप्रमाणें रचलेलीं दिसतात. परंतु त्यानें आपली माहिती अनुराधपूर येथील महाविहारामध्यें जतन करून ठेविलेल्या अठ्ठकथांतील ऐतिहासिक प्रकरणावरून घेतली असावी. कदाचित याखेरीजहि त्याला एक दोन अठ्ठकथा मिळाल्या असाव्या आणि याच गोष्टीमुळें, बहुतकरून एकच विषय कांहीं ठिकाणीं दोन दोन वेळां व क्वचित् तीन वेळांहि वर्णन केलेला आढळतो. उदाहरणार्थ, प्रथम थोडक्यामध्यें व सारांशरूपानें तीन धर्मसंगीतींची हकीकत दिल्यानंतर, लागलीच तीच हकीकत पुन्हां विस्तारानें व अधिक पूर्णतेनें दिलेली आढळते. अशा ठिकाणीं अमुक भाग प्रक्षिप्त आहे, असें म्हणतां येत नाहीं, तर ग्रंथकाराला दोन तऱ्हेच्या हकीकती उपलब्ध झाल्या आणि त्या दोन्हीहि त्याला सारख्याच महत्त्वाच्या वाटल्यामुळें त्यानें त्या दोन्हीहि तशाच लिहून ठेविल्या. एखाद्या कवीनें अर्थातच असें केलें नसतें. इतर गोष्टींमध्येंहि या काव्यामध्यें भाषा व वृत्त यांप्रमाणें अनेक दोष आढळून येतात. हा ग्रंथकार एका विषयावरून भलत्याच विषयावर याप्रमाणें उड्या मारीत जातांना दिसतो. एखाद्या विषयाच्या वर्णनामध्यें कांहीं भाग मध्येंच गळल्याप्रमाणें दिसतो. कांहीं प्रसंगांचें वर्णन सविस्तर, स्वतंत्र आख्यानें देऊन केलेलें आहे, तर कांहींचा केवळ निर्देश केलेला आहे. कांहीं कांहीं ठिकाणीं तर केवळ काव्यप्रशस्तीप्रमाणें कांहीं पद्यें देऊन, त्यांमध्यें एखाद्या कथेंतील अथवा वर्णनांतील मुख्य मुख्य गोष्टी सांगितल्या आहेत. यावरून या अठ्ठकथांमध्यें अशा तऱ्हेचीं पद्यें असून

त्या प्रसंगांचें विस्तृत वर्णन करणें हें, तीं पद्यें पठण करणारांवर सोंपविलें असावें, हें उघड आहे. मधून मधून प्राचीन कालच्या महाकाव्यांप्रमाणें एकामागून एक संवादहि अनेक ठिकाणीं आढळतात. अशा संवादांमध्यें प्राचीन आख्यानांप्रमाणें संदर्भावरून बोलणारा कोण आहे, हें कळतें. परंतु कांहीं ठिकाणीं या संवादांतील परस्परांचा संबंध जोडणारा मजकूर, हीं पद्यें म्हणणाराच मधून मधून गद्य गोष्टीच्या रूपानें सांगत आहे असें दिसतें. अशा ठिकाणीं प्रस्तुत ग्रंथकारानें केवळ त्याच्यापुढें असलेल्या गोष्टी जशाच्या तशा लिहून ठेविल्या आहेत. या गोष्टी अथवा आख्यानें मोठमोठ्या समाजांमध्यें भिक्षूंनीं म्हणून दाखविण्याकरितां तयार केलेलीं असत. [ 'महावंश' पहा. ]

**दीपाबाई**—तंजावरकर थोरल्या व्यंकोजीराजाची राणी. ही फार शहाणी, चतुर व दक्ष होती. व्यंकोजी जेव्हां आपल्या वडिलार्जित जहागिरीचा वांटा शिवाजीस देईना व मुसुलमानी नोकर म्हणविण्यांतच समाधान मानूं लागला, तेव्हां हिनें जुना मुत्सद्दी रघुनाथपंत हणमंते याच्या मध्यस्थीनें या सर्व प्रकरणाचा समाधानकारक निकाल लाविला. खुद्द शिवाजीनें तिची स्तुति केली आहे कीं, 'आमची भावजई शहाणी, पुढील होणमाण जाणून विचारावरी आणिलें.' एवढेंच नव्हे तर, जहागिरीची वांटणी झाल्यावर शिवाजीनें पांच लाख होनांचे प्रांत तिला 'चोळीबांगडीसाठीं दिले' व 'त्यांजवर देखरेख व्यंकोजीनें करावी, पण हक्क सांगूं नये; हे प्रांत मुलीच्या वंशाकडे चालावे व सौभाग्यवती ( गादीवरील राजाची राणी ) देतील त्यांनीं खावेत' असा ठराव केला. दीपाबाई ही इंगळ्याची मुलगी. हिच्या पोटीं शहाजी, सरफोजी व तुकोजी असे तीन पुत्र झाले. व्यंकोजी वारल्यावर हिनें शहाजीस गादीवर बसवून स्वतः राज्यकारभार हांकला ( १६८२ ). [ तंजावरचा शिलालेख; ससप्रकरणात्मक बखर. ]

**दीर**—वायव्येकडील सरहद्दीवरील प्रांतांत असलेल्या दीर, स्वात, चित्रळ एजन्सीतील एक राज्य. दीरनदीवर असलेल्या दीर खेड्यावरून हें नांव पडलें आहे असें म्हणतात. दीरच्या खोऱ्यास कष्कार हें नांव आहे. दीरच्या दक्षिणेस सहा मैलांवर कुंटियाटन येथें पन्जिकोर नदीस दीर व बराळ या नद्या येऊन मिळतात. मैदान खोऱ्याचा व जन्डोल ह्यांचाहि समावेश दीरमध्यें होतो. क्षेत्रफळ (दीर कोहिस्तानधरून) ५००० ते ६००० चौरस मैल; लोकसंख्या अंदाजें १००००० पंजिकोरचें खोरें स्वातच्या खोऱ्याएवढें रुंद नाहीं. कोहिस्तानच्या जंगलांत देवदार लांकूड विपुल आहे.

दीर येथील राजा खान आहे. उत्पन्नाचा दहावा हिस्सा सार्‍यांदाखल आकारिला जातो. शक्य तितक्या ठिकाणीं जमीनींत लागवड केली आहे. दीर हें युसुफझाई पठाणांच्या ताब्यांत आहे. कष्कार व कष्कारमध्यें गुजर लोक पुष्कळ आहेत. पठाणांची भाषा युसुफझाई पुश्तु असून गुजर लोक पंजाबी भाषा बोलतात.

**दीव**—पश्चिम हिंदुस्थान. पोर्तुगीज लोकांच्या ताब्यांतील एक बेट. काठेवाडचा अगदीं दक्षिणेकडील भाग व हें बेट यांच्यांमध्यें दलदलीच्या प्रदेशांतून एक अरुंद प्रवाह गेलेला आहे. याची पूर्वपश्चिम सर्वांत जास्त लांबी ७ मैल व दक्षिणोत्तर रुंदी २ मैल असून याचें क्षेत्रफळ २० चौरस मैल आहे. उत्तरेच्या अरुंद खाडींतून फक्त मच्छीमार मोटी जाऊं शकतात. दक्षिणेस किनाऱ्याजवळ पाणी खोल असून, तेथें एक उत्तम बंदर आहे. या बंदरांत १२ फूट खोल पाण्यांत जहाजें नांगर टाकून सुरक्षित रीतीनें राहूं शकतात. बेटावर नारळांच्या झाडांच्या पुष्कळ बागा आहेत. हवा रुक्ष व कुंद, जमीन नापीक आणि पाणी दुर्मिळ आहे. शेतकीकडे फारच दुर्लक्ष केलें जातें. गहूं, नाचणी, बाजरी, नारळ व कांहीं फळें, हे येथें होणारे जिन्नस होत. दीव बेटाची लोकसंख्या (१९२१) १३८४४ आहे. पैकीं सुमारें दोनशें कायते ख्रिस्ती आहेत.

दीव गांव हें बेटाच्या पूर्व टोंकाला नविबंदरापासून पांच मैलांवर आहे. मराठीच्या वेळीं त्याची लोकसंख्या ५०००० होती असें म्हणतात. पावसाचें पाणी सांठवून ठेवण्याकरितां कांहीं घरांत टांकीं बांधलेलीं आहेत. एके वेळीं सधन व व्यापाराकरितां प्रसिद्ध असलेल्या ह्या शहराला हल्लीं महत्त्व उरलेलें नाहीं. दीवखेरीज ह्या बेटावर दुसरीं तीन मोठीं खेडीं आहेत. तीं येणेंप्रमाणें:—पश्चिमेस खाडीच्या कांठीं मोबकवर; उत्तरेस बचघर; व दक्षिणेस नगब. बचवरशिवाय दोन्ही ठिकाणीं लहान किल्ले आहेत. पूर्वी कापड विणणें व रंगविणें हे येथील लोकांचे धंदे असून येथील मालाला परक्या देशांत चांगली किंमत येत असे. हल्लीं मासे मारणें हा मुख्य धंदा आहे. १९०३-४ मध्यें दीवचें एकंदर उत्पन्न ७३००० रु. होतें.

गोंव्याच्या गव्हर्नर जनरलच्या हाताखालीं असलेल्या गव्हर्नरकडे दीवचे सर्व मुलकी व लष्करी अधिकार आहेत. जुडी म्युनिसिपलकडे न्यायखातें आहे. गव्हर्नरच्या जागेवर नेहमीं यूरोपियन असतो. डॉन जोआव डी कास्ट्रो यानें १५४५ त दिलेल्या वेढ्यानंतर दीवचा हल्लींचा किल्ला सुधारून पुन्हां बांधण्यांत आला. किल्ल्याकडे जाण्याकरितां पूल असून आंत जाण्याच्या दरवाज्यावर पोर्तुगीज भाषेंत एक लेख लिहिलेला आहे. मुख्य किल्ला व तट यांच्यामध्यें खडक खोदून केलेल्या खंदकांत पूर्वी समुद्राचें पाणी नेहमीं येत असे. परंतु हल्लीं तें केवळ मोठ्या भरतीच्या वेळीं मात्र येतें. दीव गांव किल्ल्याच्या पश्चिमेस आहे.

भव्य इमारतींनीं दीवला पूर्वी शोभा आलेली होती; अद्यापि कायम असलेल्या इमारतींत, १६०१ मध्यें बांधलेलें जेसुइट लोकांचें कॉलेज मुख्य आहे. हल्लीं त्या इमारतींत ख्रिस्ती देवालय असून त्याला 'से कॅथीड्रल' असें म्हणतात.

सेंट फ्रान्सिसच्या मठांत हल्लीं लष्करी रुग्णालय आहे. सेंट जॉन ऑफ गॉडच्या मठाचा प्रेतें पुरण्याकरितां उपयोग करितात व सेंट डॉमिनिकचा मठ मोडकळीस आला आहे. पोर्तुगीज लोकांच्या भरभराटीच्या वेळीं येथें सर्व प्रकारचीं नाणीं पाडलीं जात असत. परंतु ती टांकसाळ हळू हळू जीर्णावस्थेप्रत येत चालली आहे. ह्याशिवाय येथें गव्हर्नरचा बंगला, तुरुंग, शाळा वगैरे इमारती आहेत.

अरबस्तान व इराणचें आखात यांशीं व्यापार करण्याला हें बेट फार सोयीचें असल्यामुळे तें आपल्या ताब्यांत असावें अशी उत्कट इच्छा प्रथमपासूनच पोर्तुगीज लोकांच्या मनांत होती;पण नूनो डा कुन्हाच्या वेळेपर्यंत त्यांची ही इच्छा सफल झाली नाहीं. गुजरायचा सुलतान बहादुरशहा यावर हुमायूननें हल्ला केला असतां, त्यानें पोर्तुगीज लोकांबरोबर संरक्षणार्थ तह करून त्यांनां आपल्या बेटावर किल्ला बांधून त्यावर शिबंदी ठेवण्याची परवानगी दिली. हा तह १५३६ पर्यंत टिकला, पण पुढें त्यांच्यामध्यें चकमक झडून १५३७ त गुजरायचा राजा मरण पावला. पुढल्या वर्षी बहादुरशहाचा पुतण्या तिसरा महंमद यानें दीव किल्ल्याला वेढा दिला, पण अँटोनिओ डी सिल्व्हीरा यानें त्याचे प्रयत्न निष्फळ करून त्याला वेढा उठवावयास लाविलें. ह्याच राजानें १५४५ त दीवला पुन्हां वेढा दिला पण त्याच वेळीं डॉ जोआव डी कॅस्ट्रो हा सैन्यासह बेटावर उतरला होता, त्यानें वेढ्यांत सांपडलेल्या सैन्याच्या मदतीस जाऊन गुजरायच्या सुलतानाचा पराभव केला. ह्यानंतर सर्व बेट पोर्तुगीज लोकांच्या ताब्यांत आलें. १६७० त मस्कतच्या एका सशस्त्र अरब टोळीनें किल्ल्यावर अचानक घाला घालून किल्ल्यांतून लूट नेली. त्यानंतर येथें महत्त्वाची गोष्ट घडली नाहीं.

**दीक्षित, चिंतामणी**—हा ज्योतिषी पेशवाईंत झाला. याचा जन्मकाल शके १६५८ आणि मृत्युकाल शके १७३३. याचें वसतिस्थान सातारा. सूर्यसिद्धांताची यानें सारणी केली आणि गोलानंद नांवाचा एक ग्रंथ शके १७१३ मध्यें रचिला. त्यावर टीका यज्ञेश्वर उर्फ बाबा जोशी रोडे यांनीं केली. चिंतामणीचे वंशज सांप्रत सातारा येथें आहेत. [ दीक्षित कृत भारतीय ज्योतिःशास्त्र. ]

**दीक्षित, शंकर बाळकृष्ण** (१८५३–१८९८)—एक महाराष्ट्रीय ज्योतिर्विद्. यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांत दापोली तालुक्यांतील मुरुड गांवीं झाला. मूळचें आडनांव वैशंपायन असून यांच्या निपणज्यानीं यज्ञ केल्यामुळें हें घराणें दीक्षित ही पदवी पावलें. मुरुड येथें मराठी अभ्यास संपवून शंकरराव पुण्यास ट्रेनिंग कॉलेजांत शिकावयास आले (१८७०). ट्रेनिंग कॉलेजांत असतांनाच ते सकाळच्या शाळेंत इंग्रजी शिकत. १८७४ त त्यांनीं मॅट्रिकची परीक्षा दिली. यानंतर ते रेवदंडा, ठाणें, बार्शी, धुळें व पुणें या ठिकाणीं शाळेवर शिक्षक होते. यांना गणित व ज्योतिषावर विशेष व्यासंग असे.यानीं रा. जनार्दन बाळाजी मोडक यांच्याबरोबर सायनवादाचा पुरस्कार केला व सायनमानाचें एक पंचांगहि सुरू केलें. ज्योतिर्विलास, सृष्टचमत्कार, सायन पंचांग, हिंदुपंचाग व भारतीय ज्योतिःशास्त्र हे दीक्षितांचे ज्योतिषग्रंथ होत. भारतीय ज्योतिःशास्त्राच्या तोडीचा या विषयावर संपूर्ण ज्ञान देणारा दुसरा ग्रंथ नाहीं. नुसत्या या ग्रंथावरून दीक्षितांचें नांव अजरामर राहील. याशिवाय भारतभूवर्णन, धर्ममीमांसा, सोपपत्तिक अंकगणित वगैरे यांचे ग्रंथ आहेत. फ्लीट याच्या 'गुप्तांचे शक' या ग्रंथांत दीक्षितांची मदत आहे. शंकरराव मराठी व इंग्रजी नियतकालिकांतून लिहीत. याच्या दीर्घाभ्यासाचा परिणाम प्रकृतीवर होऊन ते विषमज्वरानें २७ एप्रिल १८९८ रोजीं वारले.

**दुजान, संस्थान.**—पंजाबांतील एक एतद्देशीय संस्थान. हें दिल्ली विभागाच्या कमिशनरच्या ताब्यांत आहे. क्षेत्रफळ १०० चौरस मैल व लोकसंख्या ( १९२१ ) २५८३३. यांत दुजान हा एकच गांव असून ३१ खेडीं आहेत.

एका युसुफझई पठाणानें हें संस्थान वसविलें असें म्हणतात. सं. १८०६ मध्यें त्यास नहर व बहु परगणे व हरिआनमधला भाग मिळाला. पण हरिआनमधील भाग त्यानें परत देऊन त्याच्या ऐवजीं दुजानचा प्रदेश घेतला. संस्थानच्या दुजान व नहर अशा दोन तहशिली केल्या आहेत. नबाबाच्या खालोखाल दिवाणास अधिकार आहे. येथून ब्रिटिश सरहद्दीवर अफू आणूं देत नाहींत साराउत्पन्न रु. ७७१७०.

गां व —दुजान संस्थानाच्या राजधानीचें शहर. दिल्लीच्या पश्चिमेस ३७ मैल आहे. लोकसंख्या (१९०१) ५५४५. दुरजनशहा नांवाच्या साधूनें वसविल्यामुळें यास हें नांव पडलें. नंतर येथें झज्जरचे युसफझई पठाण लोक राहूं लागले. येथील पहिला नबाब अबदस समंदखान हा त्यांच्यापैकींच होता.

**दुंदेखान रोहिला**-रोहिलखंडांतील रोहिले हे दिल्लीच्या पातशहास फार त्रास देत. त्यांचें पारिपत्य एकट्या पातशहाच्यानें होईना. अखेर अली मुहम्मदखान या रोहिल्यानें स्वातंत्र्य जाहीर केलें ( १७४४ ). तो मेल्यावर त्याचा पुत्र सादुल्ला हा गादीवर आला आणि दुंदेखान व हाफीझ रहिमत हे सरदार कारभारी झाले. ग्रँट डफ म्हणतो दुंदेखान हा अलीचाच मुलगा व तोच त्याच्या मागून गादीवर आला. महंमदशहानें अखेर रोहिले, अब्दाली व सिंधचे अमीर वगैरेंच्या त्रासापासून मोकळें होण्याकरितां मराठ्यांशीं एक तह करून ( १७५० ) त्यांनां रोहिलखंड वगैरे प्रांतांची चौथाई दिली. त्यामुळें मराठ्यांनीं रोहिल्यावर स्वाऱ्या करून त्यांचा पुष्कळ प्रांत खालसा केला ( १७५१ ) आणि ५० लाख खंडणी वसूल केली. रोहिले पूर्वीपासून दिल्लीच्या पातशाहीविरुद्ध असत; त्यामुळें त्यांनींच अब्दालीस हिंदुस्थानांत बोलाविलें. पानिपतप्रकरणांत व या वरील सर्व गोष्टींत हाफीज रहिमतप्रमाणेंच दुंदेखानाचा हात होता. रोहिलखंडाची वांटणी झाली, तींत याच्या वांट्यास बिसौली,

मुरादाबाद,चांदपूर वगैरेवळ हे जिल्हे आले.हा स.१७७१ च्या सुमारास मेला. त्याच्यानंतर तीन मुलांपैकीं वडील मोहिबुल्लाह हा गादीवर आला. [ राजवाडे खंड. १, ३, ६; मराठी रियासत भा. ४; इलियट, पु. ८. ]

**दुधदुभतें**—**दुधदुभत्यासंबंधीं ऐतिहासिक माहिती.**—सर्व जनावरांत गाय व बैल हे फार प्राचीन कालापासून माणसाळलेले प्राणी आहेत. आपल्या भरतखंडांतील सर्वांत जुन्या अशा वेदवाङ्मयातील निरनिराळ्या ऋचांतून गाय, दूध, दहीं, तूप वगैरेंच्या संबंधीं जे उल्लेख आहेत त्यांवरून वेदवाङ्मय ज्यावेळीं तयार झालें त्या वेळेपूर्वी गाय, बैल वगैरेसंबंधीं चागली माहिती होती व दुभतें प्रचारांत होतें हें उघड आहे. त्यावरून वेदकालीन दुभत्यासंबंधींची माहिती व त्या वेळीं आर्यांच्या मनांत गाईविषयीं किती पूज्यभाव व प्रेम हीं वसत असत याची उत्तम कल्पना येईल. मनुस्मृतींत अनेक स्थलीं दूधदुभत्यासंबंधीं आज्ञा दिलेल्या आहेत त्यांवरून दुधदुभत्यासंबंधीं नियम करण्याइतकी दुभत्याची प्रगति झाली होती हें उघड आहे.

गाय, म्हैस वगैरे नेहमींच्या जनावरांच्या दुधाविषयीं उल्लेख चरक ग्रंथात सापडतो. शेळी, मेंढी, गाढवीण, उंटीण, घोडी, हत्तीण व स्त्री यांच्याहि दुधाच्या गुणधर्मांचे उल्लेख त्यात आहेत. दुधापासून तयार होणारे दहीं, तूप, ताक, चक्का, कढी वगैरे पदार्थांचेहि गुणधर्म त्यात दिले आहेत. यावरून चरकाच्या काळीं ( सुमारें इ. स. पू. ४०० वर्षें ) निरनिराळ्या प्राण्यांच्या दुधाचें परीक्षण फारच बारकाईनें झालेलें होतें हें अगदीं उघड आहे. आपल्या इकडे दुधाच्या गुणधर्मांचें निरीक्षण फक्त आरोग्यशास्त्रदृष्ट्याच विशेष झालें होतें. परंतु दूध कसें तयार होतें, त्याचे घटक काय काय आहेत व ते कोणत्या प्रमाणांत असतात वगैरे गोष्टींविषयीं विचार झालेला दिसत नाहीं. या बाबतींत पाश्चात्त्य शास्त्रज्ञांनीच विशेष संशोधन केलेलें आढळतें. हे शास्त्रज्ञ कोण कोण होते व त्यानीं कोणत्या वर्षी काय काय शोध केले हें रा. घारे यांनीं लिहिलेल्या "दुभतें व दुभतीं जनावरें" या पुस्तकात पाहावयास मिळेल.

इ. स. १८८९ सालापासून दुभत्याच्या पाश्चात्त्य पद्धतीचा प्रसार आपल्या देशांत होऊं लागला, व त्या पद्धतीप्रमाणें दुभतें प्रथम मुंबईत होऊं लागलें. पुढें हलके हलके लष्करी खात्यानें फौजेकरिता दुभत्याची व्यवस्था करण्यास सुरवात केली. प्रस्तुतची गाईबैलांची शोचनीय स्थिति अंशतः तरी दूर व्हावी, दुभत्या जनावरांनां खाटिकांच्या सुरीखालून सोडविणें, गरीब शेतकऱ्यांस शेतकामाकरिता बैल पुरविणें, शेतकऱ्यांच्या शेतांत गुरें बसवून त्यांच्या शेतीची सुधारणा करणें, व पोरक्या अर्भकांनां निर्भेळ दुधाचा पुरवठा करणें यासारखीं कामें कांहीं गोरक्षण संस्था करीत आहेत.

**जनावरांकरितां गोठे.**—दुभत्या जनावरांस शक्य तितका आराम, बलशरीर पौष्टिक चारा, पिण्यास स्वच्छ पाणी, चरण्यास उत्तम मोकळें कुरण व राहण्यास स्वच्छ गोठे मिळाल्यास त्यांची प्रकृति उत्तम राहाते व तीं भरपूर व पौष्टिक दूध देतात. पैकीं स्वच्छता व आराम या दोन बाबी मुख्यत्वेंकरून जनावरांकरितां जे गोठे तयार करावयाचे त्यांच्या बांधणीवर व नंतर ठेवलेल्या व्यवस्थेवर अवलंबून असतात. म्हणून गोठे बांधण्यापूर्वी त्यांत कोणकोणत्या सोयी केल्या म्हणजे जनावरांस सर्वांत अधिक आराम मिळून ते गोठे सर्वस्वीं आरोग्यकारक राहातील याचा नीट विचार करून नंतर गोठ्याचे नकाशे तयार करावे व त्याप्रमाणें गोठ्याच्या बांधकामास सुरवात करावी. बांधकामास सुरवात करण्यापूर्वी इमारतीचे नकाशे तयार केल्यानें फार फायदा आहे. पैकीं पहिली बाब म्हणजे इमारतीस साधारण ठोकळमानानें किती खर्च येईल त्याचा अंदाज होतो व दुसरें नकाशाप्रमाणें बांधकाम नीट व्यवस्थित रीतीनें होत आहे कीं नाहीं हें तपासून पाहतां येतें. तेव्हां नकाशा तयार करतांना लक्षांत घेण्याच्या गोष्टींचा अनुक्रमानें खालीं विचार केला आहे.

( १ ) गोठ्यांत किती जनावरांची सोय पाहिजे किती जनावरांकरितां गोठा बांधावयाचा हें ठरवितांना आपणांस किती दुधाचा पुरवठा पाहिजे आहे हें नक्की ठरविलें पाहिजे. कारण दुधाच्या कमी अधिक पुरवठ्याप्रमाणें जनावरांची संख्याहि कमी अधिक होते; जनावरांच्या जातिपरत्वें एका जनावरापासून कमी अधिक दूध, सालाच्या सरासरीनें आपणांस मिळतें. 'दुभत्या जनावरांच्या जाती' या सदराखालीं प्रत्येक जातीच्या गाई म्हशीपासून साधारण सरासरीनें आपणांस रोज अजमासें किती दूध मिळूं शकेल ही माहिती दिली आहे. त्या मानानें कांहीं विशिष्ट पुरवठा करण्यास किती जनावरें पाळलीं पाहिजेत हें सहज ठरवितां येतें. उदाहरणार्थ, आपणांस रोज दोन्ही वेळ मिळून एक मण दूध पुरवावयाचें आहे व आपण सिंधी जातीच्या गाई ठेवणार आहोंत. आतां सिंधी जातीच्या गाई प्रत्येकी रोज दोन्ही वेळ मिळून चार शेर दूध देतात असें धरलें तर $\frac{४०}{४}$ = १० गाई, दुभत्या व शिवाय भाकड गाई आपण पाळल्याच पाहिजेत. म्हणजे रोज दोन्ही वेळां मिळून एक मण दुधाचा पुरवठा करतां येईल. याप्रमाणें दुधाच्या पुरवठ्याप्रमाणें किती जनावरें ठेवलीं पाहिजेत हें ठरवावें. याशिवाय आटलेलीं भाकड जनावरें गोठ्यांत ठेवावयाचीं असल्यास वर दिलेल्या रीतीनें काढलेल्या जनावरांच्या संख्येपेक्षां शेकडा ४० कमी संख्या येईल. कारण साधारणपणें शंभर गाईंत सुमारें साठ गाई दुभत्या असतात व चाळीस भाकड असतात. याप्रमाणें संख्येसंबंधीं बाबी लक्षांत घेऊन किती जनावरें आपणास ठेवावयाचीं हें ठरवावें.

( २ ) प्रत्येक जनावरास उठण्या बसण्यास किती लांबी रुंदीचें क्षेत्र ठेवावयाचें हें ठरवितांना आपणांस कोणत्या जातीचीं

जनावरें पाळावयाचीं हें ठरवावें. कारण, जनावरांच्या जातीं-प्रमाणें त्यांची लांबी रुंदी निरनिराळी असते. साधारणपणें प्रत्येक जनावरास ८ फूट लांब व ५ फूट रुंदीचें क्षेत्र ठेवल्यानें अडचण न होतां प्रत्येकास पुरी जागा मिळते. ज्या ठिकाणीं जागा महाग अथवा थोडी असते त्या ठिकाणीं ६ फूट लांब व ४ फूट रुंद जागा प्रत्येक जनावरास ठेवतात. मिलिटरी डेअरीं-तून जनावर फक्त उभें राहील इतकीच जागा प्रत्येकास देतात. यांत जागेची व बांधकामाची बचत होते. शेणामुतानें गोठ्यां-तील जमीन घाण होण्याची बाब दोन्हीं बाबतींत जवळ जवळ सारखीच असते.

(३) जनावरांस चारापाणी देण्यास कोणत्या तऱ्हेची गवाणी बांधावी:—जनावरास चारा देण्यास गवाण करणें ती पक्की करावी म्हणजे तिच्या दुरुस्तीकरतां वारंवार खर्च होत नाहीं व ती चांगल्या स्थितींत पुष्कळ वर्षें रहाते. पक्की गवाण केल्यानें ती रोजच्या रोज धुवून स्वच्छ ठेवतां येते. पक्क्या गवाणीस आंतून प्लास्टर (सिमेंटाचें) केलें म्हणजे ती फारच मजबूत होते व अगदीं स्वच्छ ठेवतां येते. गवाण रोजच्या रोज धुतांना वापरलेलें पाणी गवाणीबाहेर काढून लावण्यास मुद्दाम एक भोंक ठेवावें म्हणजे धुण्यास वापरलेलें पाणी तेव्हांच गवाणी बाहेर वाहून जातें. जमिनीपासून गवाणीची उंची दीड फूट असावी. जास्त उंच केल्यास जनावरांस चारा नीट खातां येत नाहीं. गवाणीची रुंदी दीड फूट व खोली एक फूट असावी. प्रत्येक रांगेत वीस अगर जास्त जनावरें बांधण्याइतका मोठा गोठा असल्यास प्रत्येक चार जनावरांस एक सलग गवाण ठेवावी म्हणजे तिची व्यवस्था ठीक ठेवतां येते. पुष्कळदां लांकडी फळ्यांची गवाण तयार करतात पण तींत चाऱ्याची नासाडी होते व असली गवाण स्वच्छ ठेवतां येत नाहीं. पुष्कळदां लांब लांकडी ओंडकीं मांडून गवाण केलेली पहाण्यांत येते. ही पद्धत नुसत्या जमिनीवर चारा देण्यापेक्षां बरी इत-केंच काय तें. यांत चाऱ्याची अतिशय नासाडी होते व स्वच्छतेच्या दृष्टीनेंहि ती रीत फार वाईट असते. जनावरें थोडीं असल्यास लांकडी पेटारीं, पिपाचें अर्धुक, लोखंडी अगर मातीच्या नांदी वगैरे चारा देण्यास वापरतात. परंतु जेथें पुष्कळ जनावरें पाळावयाचीं असतात, तेथें यांचा उपयोग होत नाहीं. अशा ठिकाणीं पक्कीच गवाण पाहिजे. इंग्लंड, अमेरिका वगैरे देशांत लोखंडी पत्र्याच्या साच्या अगर इनॅ-मल्ड केलेल्या पृथक् नांदी प्रत्येक जनावरास ठेवतात. व असल्या नांदींत पिण्याचें पाणी देण्याचीहि व्यवस्था केलेली असते.

(४) भिंतींची जाडी किती ठेवावयाची वगैरे:—प्रथम गोठ्याला भिंती ठेवावयाच्या कीं खांब ठेवावयाचे हें ठरवावें व भिंती किती बाजूंनीं घालावयाच्या हें ठरविलें पाहिजे. आरोग्याच्या दृष्टीनें गोठ्यास मुळींच भिंती न घालणें सर्वांत उत्तम. कारण असें केल्यानें गोठ्यांतील हवा शुद्ध रहाते व गोठ्यांत सर्वांत अधिक सूर्यप्रकाश येतो. तेणेंकरून ते आरोग्यकारक रहातात. परंतु गोठा सर्व बाजूंनीं मोकळा ठेव-ल्यानें थंडीपासून जनावरांचा नीट बचाव होत नाहीं. म्हणून ज्या ठिकाणीं अति कडक थंडी व उन्हाळा असतो त्या ठिकाणीं गोठ्यास भिंती घालाव्या लागतात. गोठ्यास भिंती न घातल्या तर थंडीपासून जनावरांचें संरक्षण करण्यास गोणपा-टाचे पडदे लावण्याची अगर गवताच्या ताट्या भोंवतालीं लावण्याची व्यवस्था करावी लागते. गोठ्यास भिंती घातल्यास त्या पक्क्याच असाव्यात. म्हणजे गोठे टिकाऊ होतात. कच्च्या भिंतींची नेहमीं डागडुजी करण्यांत खर्च फार येतो व त्या नीट स्वच्छ ठेवतां येत नाहींत. शिवाय त्यास लोणा चढ-ण्याचा फारच संभव असतो. पक्क्या भिंतीची जाडी दीड फूट असल्यास पुरी होते. पक्क्या भिंतीच्या दर्जा चुन्यानें भरलेल्या असाव्यात व आंतील बाजस जमिनीपासून चार पांच फूटपर्यंत सिमेंटचें प्लॅस्टर केलेलें असावें; म्हणजे त्यास लोणा चढण्याची मुळींच भीति नसते व त्या स्वच्छ ठेवतां येतात. भिंतींची उंची गोठे किती उंच करावयाचे त्या मानानें ठरवावी. गोठ्याची मध्यम उंची, पंधरा–सोळा फूट ठेवल्यास पुरे होते.

(५) दरवाजे, खिडक्या व जाळ्या ठेवण्यासंबंधीं:—गोठ्यांत भरपूर उजेड येईल व त्यांत शक्य तितकी जास्त हवा खेळती राहील अशी व्यवस्था करण्यास दरवाजे, खिडक्या व जाळ्या ठिकठिकाणीं ठेवाव्या लागतात. गोठ्यांत सूर्यप्रकाश असल्यानें व खेळती हवा राहि-ल्यानें ते जास्त आरोग्यकारक होतात. गोठ्यांतील हवा जनावरांच्या श्वासोच्छ्वासानें व शेणामुताच्या घाणीनें वगैरे सारखी दूषित होत असते. ही दूषित हवा बाहेर घालविण्यास व बाहेरची शुद्ध हवा आंत येण्यास दरवाजे, खिडक्या, जाळ्या व पाखाडींत ठेवलेली खुली जागा यांची अत्यंत आव-श्यकता असते.

श्वासोच्छ्वासाच्या घटकांचें शेंकडा प्रमाण.

| | प्राणवायु | नत्रवायु | कर्बाम्लवायु |
|---|---|---|---|
| श्वास | २०.८१ | ७९.१५ | ०.०४ |
| उच्छ्वास | १६.०३ | ७५.५५ | ४.३८ |
| फरक | –४.७८ | ... | +४.३४ |

प्राण्याच्या शरीरांतील व्यापार व घडामोडी नीट सुरळीत चालण्यास शरीरांत खेळणारें रक्त शुद्ध असावें लागतें व रक्त शुद्ध राहण्यास श्वासावाटे हवेंतील प्राणवायूचा भरपूर पुरवठा व्हावा लागतो. शरीरांत चालणाऱ्या घडामोडींत उत्पन्न होणारा कर्बाम्लवायु रक्तांत मिसळून त्यास अशुद्ध करतो व रक्ताचें फुप्फुसांत शुद्धीकरण होत असतांना तो वायु उच्छ्वासावरोबर बाहेर येतो. रक्ताच्या शुद्धीकरणांत प्राण वायूचें शोषण होतें व कर्बाम्लवायूचें शरीराबाहेर विसर्जन होतें. यामुळेंच उच्छ्वासाच्या हवेंत प्राणवायूचें प्रमाण ४.७८ नें कमी होतें व कर्बाम्ल वायूचें प्रमाण ४.३४ नें अधिक होतें हें वर दिलेल्या कोष्टकावरून स्पष्ट होत आहे.

गोठ्यांतील हवा जर खेळती नसेल तर तींत श्वासोच्छ्वासानें कर्बाम्ल वायूचें प्रमाण अधिकाधिक वाढेल व त्यामुळें ती दूषित होऊन जनावरांच्या आरोग्यावर वाईट परिणाम होईल. हा वाईट परिणाम टाळण्याकरितां खिडक्या, जाळ्या वगैरे ठेवाव्या लागतात. प्रत्येक जनावरास आठ फूट लांब व ५ फूट रुंद क्षेत्र ठेवल्यास व गोठ्याची मध्यम उंची पंधरा फूट ठेवल्यास प्रत्येक जनावरास ८×५×१५ = ६०० घनफूट पोकळी मिळते व साधारणपणें हवेस नेहमींप्रमाणें गति असल्यास २४ तासांत कमींत कमी तीन वेळ गोठ्यांतील हवा बदलली जाते असें धरून चालल्यास प्रत्येक जनावरास २४ तासांत कमींत कमी ६००×३ = १८०० घनफूट हवा मिळते. परंतु हवा नेहमींच मंदगतीनें वाहत नसते म्हणून १८०० घनफुटांपेक्षां कितीतरी जास्त हवा प्रत्येक जनावरास मिळते. म्हणून व्यवहारांत प्रत्येक जनावरास ६०० घनफूट पोकळी ठेवल्यास खिडक्या वगैरे पाहिजे तितक्या ठेवल्यास पाहिजे तितकी शुद्ध हवा मिळते. गोठ्याच्या लांबीच्या मानानें कमी अधिक दरवाजे ठेवावेत. दोन जनावरें एकदम दरवाजांतून बाहेर जातील इतका दरवाजा रुंद असावा हें लक्षांत ठेवावें. प्रत्येक दोन ते चार जनावरांस एक खिडकी असून ती जमीनीपासून पांच फूट उंच व दीड फूट रुंदीची असावी. तिच्या दारांस कांचा बसविल्यानें ती बंद केल्यावरहि उजेडाची कमतरता पडत नाहीं. पुष्कळदां भिंतींत जमिनीपासून दोन तीन इंच उंचीवर चिंचोळ्या जाळ्याहि ठेवितात. यांनींहि गोठ्यांतील हवा शुद्ध व खेळती रहाण्यास मदत होते.

(६) गोठ्यांतील गटार कोठें व कसें ठेवावयाचें व त्याची रुंदी आणि ढाळ किती पाहिजे वगैरेः—गोठ्यांतील गटारें नेहमीं पक्कींच पाहिजेत. कच्च्या गटारांतून वाहाणारें मलमूत्राचें पाणी जमिनींत मुरून चोहोंकडे ओलावा पसरतो. याशिवाय मूत वगैरे कुजून त्याची घाण सुटते व हवा दूषित होते. करितां गटारें खताच्या गारी (खळी) पर्यंत पक्कींच केलीं पाहिजेत. गटारें चुना व सिमेंटानें दर्जा भरून पक्कीं करावी म्हणजे तीं टिकाऊ होऊन मलमूत्राचें पाणी जमिनींत व आजूबाजूस मुरत नाहीं. गटारास आंतील बाजूनें सिमेंटाचें प्लॅस्टर केल्यास फारच उत्तम. गटारें बहुतकरून बंद केलेलीं असतात. परंतु झांकलेल्या गटारांपेक्षां उघडीं गटारें चांगलीं असतात. कारण तीं नीट धुवून स्वच्छ करतां येतात. त्यांत सांचलेला मळ तेव्हांच नजरेस येतो त्यामुळें तीं स्वच्छ ठेवण्याकडे जास्त प्रवृत्ति होते. तसेंच उघड्या गटारावर सूर्यप्रकाश पडल्यानें त्यांत सूक्ष्म, रोगट जंतूंची वाढ कमी होते, हवा खेळती राहिल्यानें घाण सुटत नाहीं. झांकलेल्या गटारांत हे फायदे मुळींच नसतात. गटारांत कोपरे, चिरा व भेगा नसाव्या. गटारें आंतून चौकोनी, तिकोनी अगर वाटोळीं असतात; पैकीं आंतून वाटोळीं गटारें सर्वांत उत्तम. कारण, त्यांत कोपरे राहणें शक्य नसतें, व तीं चांगलीं धुवून स्वच्छ ठेवतां येतात. तीं फार रुंद अगर उंच नसावींत. गटारें दीड फूट रुंद ठेवून त्यांतून पाणी जाण्यासाठीं त्यांनां पुरा ढाळ ठेवावा. दर दहा फुटांस दोन तीन इंचांचा ढाळ पुरा होतो.

( ७ ) नोकर लोकांस वावरण्यास गोठ्यांत रस्ता कोठें ठेवावा व त्याची रुंदी किती असावीः—जनावरें बांधणें, सोडणें, त्यांस चारा घालणें, त्यांची धार काढण्यास जाणें वगैरे कामीं वापरण्यास गोठ्यांत रस्ता ठेवावा लागतो. तो तीन अगर चार फूट रुंद असून पक्का असावा.

( ८ ) गोठ्यांतील जमीन व ढाळः—गोठ्यांतील जमीन ही नेहमीं पक्की असली पाहिजे. जमीन घडीव दगडांनीं अगर पक्क्या विटांनीं फरसबंदी करून व तिच्या दर्जा सिमिटानें भरून पक्की करावी म्हणजे मूत वगैरे मुरून ती ओली होत नाहीं. खांच खळगे होऊन चिखलाची व घाणीची राड न होतां ती रोज धुऊन स्वच्छ ठेवतां येते. जमीनी मुरूम, चुनखडी, दगडाची खडी अगर लहान लहान गोटे ठोकून केलेल्या आढळतात. परंतु अशा जमिनी फरसबंदीच्या जमिनीप्रमाणें टिकाऊ नसतात व त्या तितक्या स्वच्छ ठेवितां येत नाहींत. कच्च्या मातीच्या जमिनी सर्व दृष्टींनीं वाईट असतात. गोठ्यांतील जमिनीस गटाराकडे ढाळ ठेविल्यानें मूत वगैरे वाहून जातें. साधारणपणें सहा ते आठ फूट रुंदीच्या जमिनीस चार ते सहा इंच ढाळ पुष्कळ होतो.

( ९ ) गोठ्याचें छप्पर कोणत्या प्रकारचें करावयाचेंः—गोठ्याला जे, पाखाडें अगर छप्पर करावयाचें तेंहि हवा खेळण्यास जागा ठेवून करावें. दोन्ही बाजूंच्या खालच्या पाखाड्यांमध्यें पांच सहा फूट जागा सोडून त्यावर दुसरें छप्पर मोकळ्या जागेवर करावें व खालच्या व वरच्या पाखाड्यांमध्यें एक–दीड फुटाची मोकळी जागा सोडावी म्हणजे त्या मोकळ्या जागेंतून हवा खेळती रहाते. अशा छप्पराचा आकार लष्करी शिपायांच्या बराकीच्या छप्परासारखा होतो.

( १० ) जनावरांचें शेणमूत वगैरे सांठविण्यास खताची गार कोठें करावीः—जनावरांचें शेणमूत सांठविण्याकरितां खताच्या गारी गोठ्यापासून दूर तयार कराव्यात. जवळ केल्यास शेणामुताची घाण गोठ्यांत येते. गटार खताच्या गारीपर्यंत पक्के केलेलें असावें. खताच्या दृष्टीनेंहि पक्क्या गटाराचा फायदा आहे. जनावरांच्या मुताचा खताच्या दृष्टीनें फारच उपयोग असतो तेव्हां जितकें मूत खताच्या गारींत जाईल तितकें तें खत उत्तम प्रकारचें होऊन पिकाचें उत्पन्न अधिक येतें. खताच्या गारी जनावरांच्या संख्येच्या मानानें दोन अथवा अधिक असाव्यात. म्हणजे मोकळ्या गारी भरेपर्यंत भरलेल्या गारींतील खत कुजून तयार होतें व तें खत शेतांत घातल्यावर मोकळ्या झालेल्या गारींत पुन्हां शेण वगैरे सांठवितां येतें. याप्रमाणें आळीपाळीनें गारी भरतां व मोकळ्या करतां येतात. खताच्या गारी

करणें त्या साधारण उंच जागेवर कराव्या म्हणजे पावसाच्या दिवसांत पाण्यानें खताची नासाडी होणार नाहीं व त्यांतला महत्त्वाचा उपयोगी अंश पाण्यानें धुपून जाणार नाहीं.

(११) जनावरांचा चारा ठेवण्यास व पेंड-दाणा ठेवण्यास कोठार गोठ्याजवळच असावें. म्हणजे रोजचा लागणारा पेंड-दाणा त्यांतून घेऊन थोड्या वेळांत जनावरांस देतां येतो. हें पेंड-दाण्याचें कोठारहि पक्कें असलेलें उत्तम. तें तसें असलें म्हणजे उंदीर, वाळवी वगैरेपासून मालाची नासाडी होत नाहीं. अशा कोठारांचा आकार जनावरांच्या संख्येच्या मानानें लहान मोठा ठेवावा. या कोठरांत पेंड, दाणा, मीठ, कोंडा वगैरे निरनिराळे खाण्याचे पदार्थ तसेंच पोतीं, टोपल्या, दावीं, खुंटे, तराजू वगैरे जनावरांच्या खाण्यापिण्यासंबंधीं लागणारें सर्व सामान व्यवस्थित रीतीनें ठेवण्याची व्यवस्था केलेली असावी. अशा कोठारासहि हवा व उजेडाकरितां खिडक्या ठेवाव्यात. कोठाराची सर्व इमारत पक्की केल्यानें त्यांत ठेवलेला माल चांगला सुरक्षित राहतो.

(१२) वासरें, पोळ व बैल यांचा गोठा व नोकरमाणसांची घरें वगैरे कोठें व कशीं असावीं:—वासरें बांधण्यास निराळा गोठा मुख्य गोठ्याजवळच असावा. म्हणजे धारेच्या वेळीं वासरें सोडणें, बांधणें वगैरे सोईचें होतें. वासरांच्या गोठ्यांतील सर्व व्यवस्था मुख्य गोठ्याप्रमाणेंच असावी. त्यांत फरक एवढाच कीं प्रत्येक वासरास चार फूट लांब व तीन फूट रुंद क्षेत्र ठेवावें व त्याची चाऱ्याची गवाण एक फुटापेक्षां अधिक उंच असूं नये व गवाणीची आंतील खोली व रुंदी अनुक्रमें नऊ इंच व बारा ते चवदा इंच ठेवल्यास पुरी होते.

(१३) आरोग्यदृष्ट्या आजारी जनावरें बांधण्याकरितां कोठडी करणें ती गोठ्याच्या आवारापासून दूर अंतरावर व निरोगी जनावरें तिकडे सहज न जातील अशा ठिकाणीं करावी, म्हणजे चांगल्या जनावरांत तो आजार पसरणार नाहीं. या कोठडींतील सर्व व्यवस्था मुख्य गोठ्याप्रमाणें असावी.

( १४ ) ओला चारा मुरवण्याचें कोठार ( सायलो ) अथवा पेंवः—दुभत्या जनावरांस नेहमींच ओला चारा मिळतो असें नाहीं. म्हणून जेव्हां ओला चारा मुबलक असतो, अशा वेळीं तो मुरवून ठेवावा. म्हणजे ज्या वेळीं ओला ताजा चारा मिळत नाहीं अशा वेळीं तो देतां येतो. अशा रीतीनें ओला चारा मुरवण्याकरितां सायलो अगर चारा मुरवण्याकरितां कोठार अवश्य बांधावें लागतें. हें कोठार चौकोनी अगर वाटोळें असतें. परंतु वाटोळें कोठार चौकोनापेक्षां उत्तम. कारण त्यांत चारा चांगला दाबून भरतां येतो व चाऱ्याची नासाडी होत नाहीं. या कोठाराचा कांहीं भाग जमिनींत व बाकीचा जमिनीवर असतो. असें केल्यानें चारा भरणें व बाहेर काढणें सोपें जातें. हें मुरविण्यानें कोठार चांगलें पक्कें असावें व आंतील बाजूनें त्यास सिमेंटाचें प्लास्टर असावें म्हणजे चारा खराब होत नाहीं. या कोठाराची खोली व व्यास त्यांत जो चारा सांठवावयाचा त्या मानानें कमी अधिक असावी. साधारणपणें दाबलेला मुरवलेचा चारा दर घनफुटास १५।१६ शेर राहतो. त्या मानानें कोठाराचें माप ठेवावें. चारा मुरवण्याचें कोठार, गोठ्याच्या आवारांतच पेंडदाण्याचें कोठार अथवा कडवा वगैरेंच्या गंजी करण्याच्या जागेंत करावें म्हणजे सोयीचें होतें. कोठार बांधतांना त्यांत चारा घालतां यावा व बाहेर काढतां यावा म्हणून जमिनीपासून ८।१० फुटांच्या अंतरावर एकंदर उंचीच्या मानानें खिडक्या ठेवाव्या. किंवा जमिनीपासून वरपर्यंत तीन फूट रुंदीची फट ठेवावी व या फटींत भिंतींत खोबण ठेवावी म्हणजे कोठारांत चारा भरण्याच्या वेळीं लांकडी फळ्या घालून कोठार बंद करतां येतें.

(१५) जनावरें खुल्या जागेंत बांधण्याकरितां गोठ्याजवळच मोकळी जागा अवश्य ठेवावी. गोठा साफ करण्याच्या वेळीं व थंडीच्या दिवसांत सकाळच्या प्रहरीं जनावरांस उन्हांत बांधतां येतें. अशाच प्रकारची जागा वासरांकरितां निराळी ठेवावी व तिच्या भोंवतालीं कोंडाळें करावें म्हणजे त्यांत वासरांना मोकळें सोडतां येतें. व तीं त्यांत मोकळेपणानें हिंडतात. त्यामुळें त्यांजवर एक प्रकारचा तजेला येतो.

(१६) गोठ्याच्या आवारांत किंवा आवाराच्या लगतच जवळ गवत, कडबा, भूस वगैरे चाऱ्याच्या गंजी लावून सांठवण करण्याकरितां मोकळी जागा सोडावी. अशी जागा सखल जागीं नसावी. कारण पावसाळ्याच्या दिवसांत सखल जागेंत भोंवतालचें पाणी येऊन गंजीची व चाऱ्याची खराबी होते. म्हणून गंजी लावण्याकरितां जागा उंच भागीं असावी. या जागेंत जनावरांच्या खालीं बिछायतीकरितां लागणारा पालापाचोळाहि सांठवितां येतो.

( १७ ) जनावरांस पिण्याच्या पाण्याची व्यवस्था जवळ नदी वगैरे असल्यास गोठ्यानजीक करण्याची जरूरी नसते. परंतु जवळ तशी सोय नसल्यास गोठ्याच्या आवारांत जनावरांस पिण्याच्या पाण्याकरितां एक पक्का हौद करावा लागतो. त्यांत विहिरीचें अगर नळाचें पाणी सोडावें. हौदास आंतील बाजूनें सिमेंटाचें प्लास्टर केल्यास तो मजबूत होतो. त्यांतून पाणी झिरपत नाहीं व तो स्वच्छ ठेवतां येतो. अशा हौदाचा कांठ जमिनीपासून दीड फुटापेक्षां कधींहि उंच असूं नये. या हौदाच्या भोंवतालीं आठ फूट पर्यंत पक्की फरसबंदी करावी. कारण असें केलें असतां जनावरांच्या तुडवणीनें तेथें चिखलाची राड होत नाहीं. या फरसबंदीसहि ढाळ ठेवावा म्हणजे पाणी नीट वाहून जाईल.

(१८) जवळपास नदी असल्यास जनावरें धुण्यासाठीं निराळी सोय करण्याची जरूरी नसते. परंतु तसें नसल्यास अशी सोय करावी. पिण्याच्या पाण्याच्या हौदाभोंवतालची पक्की फरसबंदी दहा बारा फूट रुंद करून भोंवतालीं पक्कें गटार

काढल्यास तेथें जनावरांस धुतांहि येतें. मात्र हौदांतून घालदीनें पाणी घेऊन फरसबंदीवर जनावरें धुवून तेथील गटाराहि खताच्या गारीकडे काढून लावावें म्हणजे खळमळ खताच्या गारींत जाऊन खताच्या दृष्टीनें नुकसान होत नाहीं. पाणी पिण्याचा हौद जमिनीवर केल्याचें जनावरांच्या हगण्यामुतण्यानें पिण्याचें पाणी घाण होण्याचा संभव नसतो.

(१९) गोठयाच्या आवारांतील रस्तेः—गोठयाच्या आवारांतील रस्ते गाड्या जाण्यायेण्यासारखे रुंद असावेत. ते खडीचे अथवा मुरुमाचे असावेत म्हणजे पावसाळयाच्या दिवसांत ते खराब होत नाहींत. जनावरें अवाराच्या बाहेर चरण्यास जाण्यास रस्ता स्वतंत्र असलेला बरा. पेंडदाण्याच्या कोठाराकडे जाण्यास एक व कडबा वगैरेंच्या गंजींकडे जाण्यास एक असे रस्ते पाहिजेत.

(२०) सर्व बांधकामास कोणता मालमसाला व किती वापरावाः—वर दिलेल्या बाबी लक्षांत घेऊन गोठयांचा वगैरे नकाशा काढला म्हणजे सर्व इमारतीस किती मालमसाला लागेल याचा नक्की अंदाज करतां येतो. उत्तम प्रकारचा माल वापरला म्हणजे सर्व इमारती टिकाऊ व मजबूत होतात. साधारणमानानें जागेच्या प्रत्येक चौरस फुटामागें मालाप्रमाणें एक रुपयापासून तीन रुपयेपर्यंत खर्च येतो. यांत मालमसाल्याची किंमत व मजुरी येते. यावरून सर्व इमारतीस किती खर्च येईल याचा अंदाज करतां येतो.

(२१) वर दिलेल्या इमारतीशिवाय पोळांकरतां व बैलांकरितां निराळा गोठा करावा. पोळ व बैल गाईंत बांधणें बरें नसतें परंतु ज्या ठिकाणीं पोळ व बैल यांची संख्या थोडी तेथें निराळा गोठा नसला तरी चालतो. अशा वेळीं गाईंच्या गोठयांत एके बाजूस त्यांना बांधलें तरी चालतें. गाय माजास आल्यावर तिला पोळ दाखविण्याकरितां एक निराळीच जागा असावी व त्या जागेभोंवतीं सहा सात फुट उंचीइतकें आडोशाकरितां भिंतींचें कोंडाळें असावें. म्हणजे माजास आलेलें जनावर व पोळ यांना तेथें ठेवतां येतें व त्यांना इतरांपासून उपद्रव पोंचत नाहीं. अशी सोयीची जागा नसल्यास पुष्कळदां पोळ जवळपास वापरणाऱ्या माणसास इजा करतो. याकरितां अशा कामासाठीं स्वतंत्र जागा असलेली बरी. गाभण जनावरास विण्याच्या सुमारास एकांत असें ठिकाण असलेलें बरें म्हणजे त्यांजवर स्वतंत्रपणें देखरेख करणें बरें पडतें व विण्याच्या वेळीं त्यास इतर जनावरांपासून इजा होत नाहीं. गडीमाणसांस राहण्याकरितां गोठयाच्या आवारांतच जागा केल्यानें सोयीचें होतें व सर्व कामें वेळच्या वेळीं होतात. साधारणपणें ८।१० जनावरांमागें एक मनुष्य या प्रमाणांत नोकरांची रहाण्याची व्यवस्था करावी.

(२२) गोठयांचे प्रकारः—गोठे दोन प्रकारचे असतात एकेरी व दुहेरी. ज्या ठिकाणीं जनावरांची संख्या थोडी असते त्या ठिकाणीं एकेरी गोठा बांधणें सोयीचें असतें. अशा गोठयांत जनावरांची एकच रांग असते. परंतु जेथें पुष्कळ जनावरांची सोय करावयाची असते तेथें दुहेरी गोठेच बांधावे लागतात. दुहेरी गोठयांत जनावरें दोन रांगांत बांधलेलीं असतात. दुहेरींतहि दोन भेद आहेत. एकांत दोन्ही रांगांतील जनावरांचीं तोंडें एकमेकांकडे असतात, मध्यभागीं वावरण्याचा रस्ता असतो व रस्त्याच्या दोन्ही बाजूंस चाऱ्याची गवाण असते. गवाणीच्या पलीकडे जनावरें बांधण्याची जागा व त्याच्या पलीकडे गटार व गोठयाची भिंत असते. कधीं कधीं गटार व भिंत यांच्यामध्यें वावरण्यास रस्ता ठेवलेला असतो. दुसऱ्यांत दोन्ही रांगांतील जनावरांच्या शेंपट्या एकमेकांकडे असतात. म्हणजे मध्यभागीं वावरण्याचा रस्ता असतो व त्या रस्त्याच्या दोन्ही बाजूंस गटार असतें. गटारापलीकडे जनावरें बांधण्याची जागा, त्या पलीकडे चाऱ्याची गवाण, नंतर वावरण्याचा रस्ता व गोठयाची भिंत अशी व्यवस्था असते.

(२३) जनावरांच्या गोठयास जागाः— जनावरांचे गोठे बांधण्यास योग्य जागा पसंत करणें हें काम फार महत्त्वाचें आहे. जागा सखल, दलदलीची, व कोंदट अशी नसावी. जवळपास उत्तम पाण्याचा भरपूर पुरवठा होण्यासारखा असावा. जवळपास हमरस्ता नसावा. जवळच जनावरांस चारा तयार करण्यांकरितां पाटाच्या अगर विहिरीच्या पाण्यानें भिजणारी जमीन असावी. आसपास जनावरांस उत्तम चराईचें कुरण असावें व थोडक्या वेळांत गिऱ्हाइकाकडे दूध पोंचवितां येईल अशा ठिकाणीं जनावरांचे गोठे बांधावे. सखल, कोंदट व दलदलीची जागा नसल्यानें जनावरांचे आरोग्य नीट रहातें व रोग बहुधां पसरत नाहीं व नुकसान होत नाहीं. हमरस्ता जवळपास नसल्यानें जाणाऱ्या येणाऱ्या वर्दळीपासून जनावरांस त्रास होत नाहीं व जनावरांत सांथीचे रोग पसरत नाहींत. गोठे बांधण्यास उंचवठयाची खुली जागा पसंत केल्यानें मुबलक स्वच्छ हवा व सूर्यप्रकाश मिळतो; जनावरांचें आरोग्य उत्तम राहातें व त्यामुळें निरोगी व स्वच्छ दूध मिळतें. स्वच्छ व शुद्ध पाण्याचा पुरवठा भरपूर होण्यासारखा असला म्हणजे सर्वत्र स्वच्छता ठेवतां येते व जनावरांस शुद्ध पाणी पिण्यास मिळाल्यानें रोगांचा प्रसार न होतां आरोग्य चांगलें रहातें.

जनावरांचें खाणें.—जनावरांच्या खाद्यपदार्थांचे स्थूल मानानें मुख्य तीन विभाग होतात. (१) पोटभरीचा चारा (रफेज, बल्की फॉडर), (२) पौष्टिक अथवा सकस अन्न (कॉन्सेंन्ट्रेटेड फूड) व (३) मसाला (कॉंडिमेंट्स्) किंवा "अन्नानुबंधपदार्थ" (फूडॲड्जंक्ट्स्). पैकीं पहिल्या विभागांत गवत, कडबा, भुसा, बाटुक वगैरे हिरवा चारा-न "सुकलेला चारा" (सायलेज) हीं येतात, दुसऱ्या विभागांत पेंड, दाणा, कोंडा, चूण, फोल वगैरे येतात; व तिसऱ्यांत मीठ, गूळ, तेल, ओवा, बाडिशेप, हळद, लसूण वगैरे मसाल्याचे पदार्थ येतात. जनावरांकडून त्यांचें काम

योग्य रीतीनें व्हावें, तों निरोगी व सशक्त रहावींत व त्यांच्या शरीराची वाढ जोमानें व्हावी म्हणून, योग्य प्रमाणांत पोटभरीचा चारा, पौष्टिक अन्न व मसाले त्यांनां दिले पाहिजेत. सर्वच जनावरांचें काम सारखें नसतें; उदाहरणार्थ गाभण गाईचें मुख्य काम म्हणजे गर्भाची योग्य वाढ, दुभत्या गाईचें काम दूध, वांसरांचें काम शरीराची वाढ, पोळांचें काम गर्भधारण घडवून आणणें व कामकरी बैलांचें काम शारीरिक श्रम. यांवरून प्रत्येकाच्या कामाप्रमाणें त्याच्या खाण्यांतहि फरक असणें अवश्य आहे. वर दिलेल्या मुख्य कामाशिवाय शरीराची होणारी झीज भरून काढून शरीर सुस्थितींत ठेवणें हेंहि प्रत्येक व्यक्तीचें काम असतेंच. यावरून रोजची झीज भरून काढून शरीर सुस्थितींत ठेवण्यास जितक्या व ज्या प्रकारच्या अन्नाची आवश्यकता प्रत्येक व्यक्तीस असते त्याशिवाय जें विशिष्ट कार्य व्यक्तीस करावयाचें असेल तें कार्य योग्य रीतीनें होण्याकरितां आणखी विशिष्ट प्रकारचें अन्न दिलें पाहिजे हें उघड आहे. पोटभरीच्या चाऱ्यांत उपयुक्त पौष्टिक द्रव्यांचें शेंकडा प्रमाण सर्वांत कमी असतें व पेंड वगैरे पदार्थांत त्यांचें प्रमाण अधिक असतें म्हणून जनावरांचें पोट भरून त्यास अवश्य लागणाऱ्या पौष्टिक द्रव्यांचा योग्य भाग मिळेल अशा रीतीनें चारा व पेंड–दाणा यांचें प्रमाण ठेवलें पाहिजे. ज्यावेळीं जनावरास कांहींच विशिष्ट काम करावयाचें नसतें त्यावेळीं पाहिजे जितका पोटभरीचा चारा दिला म्हणजे काम होतें.परंतु विशेष कामाकरितां पोटभरीच्या चाऱ्याशिवाय पेंड,दाणा वगैरे दिलाच पाहिजे व तसें न करितां जर त्याच्याकडून ते विशिष्ट काम करून घेतलें तर त्याचा शरीरावर वाईट परिणाम होतो.

चा ऱ्या चे घ ट क व का र्यें.—खाद्य पदार्थांचे मुख्य घटक ( १ ) पाणी,( २ ) स्निग्धांश ( ऑइल फॅट ), ( ३ ) शर्करासत्वादि वर्गांतले पदार्थ ( कार्बो हायड्रेटस् ), ( ४ ) मांसजनक पदार्थ ( प्रोटीड्स ), ( ५ ) काष्ठतंतुमयभाग ( वुडीफायबर ),व ( ६ ) निरिंद्रियभाग ( इन–आर्गनिक मॅटर ) हेच असतात. परंतु निरनिराळ्या खाद्य पदार्थांत यांचें शेकडा प्रमाण मात्र निरनिराळें असतें. तें पुढें दिलेल्या कोष्टकांत दिलें आहे. खाद्यपदार्थांच्या या घटकांपैकीं स्निग्धांश, शर्करासत्वादि पदार्थ, व मांसजनक पदार्थ यांचेंच शरीरपोषणाच्याकामीं विशेष महत्त्व आहे. यांपैकीं स्निग्धांश व शर्करासत्वादि पदार्थ यांचें शरीरनिर्वाहसंबंधीं कार्य म्हणजे शरीराची उष्णता कायम राखणें, निरनिराळीं शारीरिक कामें करण्यास लागणाऱ्या शक्तीचा पुरवठा करणें हींच आहेत व यांशिवाय प्रसंगानुसार अन्नांतून यांचा पुरवठा कमी झाल्यास उष्णता कायम राखण्यास व शक्तीचा पुरवठा करण्यास अवश्य लागणाऱ्या चरबीचा सांठा करण्याकरितां हीं द्रव्यें उपयोगीं पडतात. मांसजनक घटकांचें कार्य शरीरांतील स्नायुमय भागांची वाढ करण्याचें आहे. परंतु उष्णता व शक्ति यांनाहि पुरवठा करण्याकडे त्यांचा उपयोग प्रसंगानुसार होतो आणि याकरितांच कोणत्याहि अन्नाचा पौष्टिकपणा त्यांत असलेल्या मांसजनक पदार्थांच्या शेंकडा प्रमाणावर अवलंबून असतो. पेंड ही गवत व कडबा वगैरेपेक्षां जास्त सकस व पौष्टिक असते, याचें कारण पेंडींत मांसजनक पदार्थांचें शेंकडा प्रमाण गवत व कडब्यांतल्यापेक्षां अधिक असतें. खालीं दिलेल्या कोष्टकावरून निरनिराळ्या चाऱ्यांतील घटकांचें शेंकडा प्रमाण कळेल व त्यांचा कमीजास्त पौष्टिकपणा लक्षांत येईल.

जनावरांच्या चारा–दाण्यांतील उपयुक्त घटकांचें शेंकडा प्रमाण.

| नांव | पाणी | स्निग्धांश | मांसजनक पदार्थ | शर्करा इत्यादि |
|---|---|---|---|---|
| हिरवा चारा:— | | | | |
| शाळू | ७०.९६ | ... | ०.८१ | १२.१४ |
| ज्वारी | ६९.७६ | ... | ०.५५ | १४.७४ |
| लूसर्न | ७७.७५ | ०.७६ | ३.०० | ११.८९ |
| गिनीगवत | ७१.५५ | १.०५ | २.६२ | १३.७१ |
| राळ्याचें सायलज | १२.०८ | ... | २.५३ | ४०.५२ |
| जई | ८३.५१ | ०.३७ | ०.९४ | ९.०० |
| शिरस | ८६.१३ | ०.४७ | २.०० | ४.६४ |
| नागली | ८०.८३ | ०.४८ | १.९४ | ७.८५ |
| सातू | ७९.६२ | ०.४५ | २.४६ | ८.२० |
| सिंजी | ८४.४० | ०.३६ | २.६९ | ६.१६ |
| मटकी | ७४.७० | ०.८९ | ३.२० | १२.०० |
| राळा | ७६.७९ | ०.५४ | २.०८ | १०.०८ |
| गहूं | ८२.६५ | ०.४० | १.८७ | ७.५६ |
| चवळी | ८८.९२ | ०.३१ | १.१३ | ४.६५ |
| ज्वारी | ८.९१ | २.४६ | ३.२१ | ४६.२२ |
| सुका चारा:— | | | | |
| जई | ९.८८ | १.९७ | ३.०० | ४१.३१ |
| तूर | ८.८१ | ४.४० | ११.०८ | ४४.६७ |
| हरभरा | ८.४१ | २.२७ | ३.६५ | ४५.८६ |
| गवारी | ५.६० | २.६२ | ५.२५ | ४९.६६ |
| वाल | ९.७२ | ३.७२ | १३.३७ | ४३.०३ |
| गवत | ९.७७ | ... | ४.५४ | ४६.४७ |
| जवं | १२.०७ | १.३८ | ७.८१ | ३९.९९ |
| लाख | ८.५९ | ३.९६ | ९.५० | ४४.२१ |
| लूसर्न | १०.०० | ३.११ | १३.९४ | ४७.३५ |
| मातावापेंढा | १०.२२ | १.२३ | २.५६ | ४०.४६ |
| गिनीगवत | १०.०० | २.६३ | ६.२३ | ४५.७९ |
| उडीद | १५.९६ | १.७० | ११.१९ | ३९.१४ |
| मूग | १३.३० | २.५२ | १०.८८ | ४०.३५ |

(पृष्ठ १०९ वरून पुढें चालू)

| | | | | |
|---|---|---|---|---|
| वाटाणा | ८.५७ | ३.०२ | १०.६४ | ४२.६३ |
| गहूं | १०.०० | २.०७ | ९.७० | ३९.२४ |
| दाणाः— | | | | |
| ज्वारी | १०.७१ | ३.६९ | ९.७१ | ७२.३८ |
| जई | १०.४७ | ५.६९ | ०.६८ | ५९.३८ |
| हरभरा | ९.९८ | ४.३९ | १८.१४ | ५७.९४ |
| गवारी | ९.८३ | २.८१ | २७.२९ | ४८.१८ |
| हुलगा | ८.८२ | ०.८० | १८.१८ | ६२.२९ |
| सरकी | ९.८२ | १८.६५ | १७.३१ | ३९.१५ |
| जव | १२.३९ | १ ८५ | ६.६२ | ७१.५५ |
| बाजरी | ८.७७ | ५.३३ | ९.५२ | ७३.५२ |
| मटकी | ९.९४ | ०.८६ | २०.०० | ६०.५८ |
| उडीद | ९.९७ | ०.९३ | २०.७३ | ५९.९९ |
| मूग | १०.३८ | १.०७ | २१.२२ | ५९.५८ |
| गहूं | १३.२७ | १.६० | १०.९० | ६८.९३ |
| कोंडाः— | | | | |
| गहूं कोंडा | ११.८१ | ३.५० | १३.२० | ५८.४२ |
| तांदूळ ,, | ८.२१ | ८.३१ | ५.७२ | ३४.२५ |
| तूर ,, | ११.४६ | १.२० | ५.१२ | ३९.८१ |
| ,, चूण | १२.८८ | १.९९ | १९.६२ | ४७.२१ |
| हरभरा ,, | १०.२३ | ३.८४ | १४.१५ | ४२.२१ |
| उडीद ,, | ११.२४ | १.३७ | २१.६२ | ४३.२० |
| पेंडः— | | | | |
| नारळ | ७ ७२ | १६.५३ | १३.६२ | ४४.५७ |
| कारळे | ७.४२ | ९.३० | ३८.५६ | २५.४८ |
| तीळ | १०.२३ | १२.५१ | ३०.५६ | २९.७५ |
| करडई | १२.०० | ३.७८ | १६.९१ | ४१.४८ |
| भुईमूग | ७.८३ | १५.४१ | ४८.४८ | २२.०२ |
| सरकी | ८.६० | ४.६० | २०.२० | ४०.७० |
| जवस | ८.८० | ११.८० | २८.८० | ३७.२० |
| शिरस | ९.०० | १०.०० | ३१.२० | ३७.२० |

चा-याच्या घटकांचें पचन.—खाद्य पदार्थांचे मुख्य उपयुक्त घटक स्निग्धांश, शर्करासत्त्वादि पदार्थ व मांसजनक पदार्थ. यांचें पचन निरनिराळ्या पिंडरसांच्या सहाय्यानें होतें. पैकीं लाळ ही लालोत्पादक पिंडांत उत्पन्न होते व तिचा परिणाम अन्न चावलें जात असलेल्या सत्त्वावर (स्टार्च) होतो व त्यास द्राव्य स्थिति येते. जठराच्या आंत सूक्ष्म पिंड असून त्यांत "जाठररस" (गॅस्ट्रिकज्यूस) उत्पन्न होतो, व त्याचा परिणाम अन्नांतल्या मांसजनक पदार्थांवर होतो व त्यांचें रूपांतर होऊन त्यास द्राव्य स्थिति येते. यकृतांत (लिव्हर) पित्त (बाइल) उत्पन्न होतें व त्याचा परिणाम स्निग्धांशावर होऊन ते शोषण होण्यास योग्य होतात. प्रोमरसाच्या (पॅंक्रिॲटिकज्यूस) योगानें सत्त्व, स्निग्धांश व मांसजनक पदार्थ या तिहींवर परिणाम होऊन त्यास द्राव्य स्थिति येते. याशिवाय "आंत्ररसाचाहि (इंटेस्टायनल ज्यूस) अन्नाचें पचन होण्यास उपयोग होतो. याप्रमाणें निरनिराळ्या रसांचा परिणाम अन्नाच्या घटकांवर होऊन त्यास द्राव्य स्थिति येते व त्यानंतर द्रव स्थितींत त्यांचें शोषण होऊन शोषलेला भाग रक्तांत मिसळतो व रक्ताच्या द्वारा सर्व शरीरभर खेळता राहून ज्या ठिकाणीं नवीन भाग तयार होत असेल किंवा झीज झाली असेल त्या ठिकाणीं त्याचा उपयोग होऊन नवीन भाग तयार होतो अगर झालेली झीज भरून निघते. खाल्लेल्या अन्नांतील सर्वच उपयुक्त भाग पचून शोषला जात नाहीं; कारण सर्व 'पाचक रसांचा' (डायजेस्टिव्ह ज्यूस) त्यावर परिणाम होऊन त्यांस पूर्णपणें द्राव्यरूप मिळत नाहीं व सर्व द्राव्यस्थितींत असलेल्या भागांचें पूर्ण शोषण होत नाहीं. यामुळें अन्नांतील उपयुक्त द्रव्यांपैकीं कांहीं भाग पचून त्याचें शोषण होतें व उरलेला भाग मलरूपानें शरीराबाहेर निघून जातो. एकच प्रकारचें अन्न निरनिराळ्या जनावरांस व निरनिराळ्या परिस्थितींत दिल्यास पचन झालेल्या भागांचें प्रमाण निरनिराळें आढळतें. हें 'पाचकत्वाचें शेकडा प्रमाण' (कोइफिशंट ऑफ डायजेस्टिबिलिटि) योनि, वय, शारीरिक स्वास्थ्य, श्रम, मानसिक स्वास्थ्य, ऋतु व हवामान, अन्नाचा प्रकार व अन्न तयार करण्याची रीति यांवर अवलंबून असतें. रंवथ करणाऱ्या प्राण्यांच्या बाबतींत पाचकत्वाचें शेकडा प्रमाण खालीं दिलेल्या कोष्टकांत दिलें आहे. या कोष्टकांतलें प्रमाण पाश्चात्त्य देशांत केलेल्या प्रयोगांवरून काढलेलें आहे व हें प्रमाण आपल्या देशांत सर्वतोपरी उपयोगी पडेल असें मुळींच नाहीं; परंतु त्यावरून निरनिराळ्या खाद्य पदार्थांतील उपयुक्त घटकांचें पाचकत्वाचें शेकडा प्रमाण किती असतें याची बरीचशी कल्पना येईल. अशा प्रकारचे प्रयोग अद्याप आपल्या देशांत झालेले नाहींत.

चाऱ्यांतील उपयुक्त घटकांच्या पाचकत्वाचें शेकडा प्रमाण.

| चाऱ्याचें नांव. | मांसजनक पदार्थ | स्निग्धांश | शर्करासत्त्वादिपदार्थ |
|---|---|---|---|
| गवत (आक्टोबर.) | ५६ | ४६ | ६१ |
| मक्याचें धाटूक | ६५ | ७२ | ७३ |
| मुरवलेलें मक्याचें धाटूक | ५१ | ८० | ६७ |
| ज्वारीचें धाटूक | ६२ | ८५ | ७८ |
| हिरवी जई (फुललेली) | ७५ | ७० | ६३ |
| लूसर्न (फुललेलें) | ८१ | ४५ | ७२ |
| गवत वाळलेलें | ५७ | ५१ | ६४ |
| लूसर्न " | ६८ | ५३ | ६२ |
| गव्हाचा भुसा | ४ | ३१ | ३७ |
| जईचा भुसा | ३३ | ३६ | ४६ |

| चाऱ्याचें नांव | मांसजनक पदार्थ | स्निग्धांश | शर्करा सत्वादि |
|---|---|---|---|
| जवाचा भुसा | २५ | ३९ | ५३ |
| भाताचा पेंढा | ४५ | ४७ | ३२ |
| वाटाण्याचा भुसा | ६० | ४६ | ६४ |
| मईदाणा | ७६ | ८० | ७६ |
| मका दाणा | ७२ | ८९ | ९५ |
| सरकी | ६८ | ८७ | ५० |
| गव्हाचा कोंडा | ७९ | ७१ | ७१ |
| शिरसाची पेंड | ८१ | ७९ | ७६ |
| जवसाची पेंड | ८६ | ९२ | ७८ |
| भुइमुगाची पेंड | ९० | ९० | ८४ |
| तिळाची पेंड | ९० | ९० | ५६ |
| खोबऱ्याची पेंड | ७५ | ९८ | ७७ |
| गाईचें दूध | ९८ | ९४ | १०० |

वर दिलेल्या कोष्टकांवरून हें लक्षांत येईल कीं जनावरानें जो चारा खाल्ला असेल त्यांत असलेल्या उपयुक्त घटकांचा शेंकडा किती भाग पचनशील असतो. उदाहरणार्थः—जर जनावरानें भुइमुगाची पेंड खाल्ली तर त्या पेंडींत असलेल्या मांसजनक पदार्थांपैकीं शेंकडा ९० भाग पचण्यासारखा असतो व उरलेला हिस्सा म्हणजे शेंकडा १० भाग शेणाबरोबर बाहेर येतो; तो पचत नाहीं. या कोष्टकावरून व चाऱ्यांत असलेल्या उपयुक्त घटकांच्या शेंकडा प्रमाणावरून त्यांत शेंकडा किती पचनशील उपयुक्त घटक असतात हें साध्या त्रैराशिकानें काढतां येईल हें उघड आहे.

जनावराच्या कामाप्रमाणें पोषणास लागणारें त्याच्या दर हजारी पौंड वजनास लागणाऱ्या द्रव्यांचें शेंकडा सरासरी प्रमाण (आंकडे पौंडांचे आहेत.)

पोषक द्रव्यांचें कोष्टक.

| जनावराचें वर्णन | चाऱ्यांतील घनभाग | पचनशील भाग मांसजनक | स्निग्धांश | शर्करा सत्वादि |
|---|---|---|---|---|
| पूर्ण वाढीचें व काम न करणारें | १८ | ०.७ | ०.१ | ८.१ |
| थोडें काम करणारें | २२ | १.३ | ०.३ | १०.६ |
| साधारण „ „ | २५ | १.७ | ०.५ | २२.२ |
| फार „ „ | २७ | २.२ | ०.८ | १४.२ |
| रोज १० पौंड दुधाचें | २४ | १.४ | ०.३ | ९.६ |
| „ २० „ „ | २५ | २.६ | ०.५ | ११.७ |
| „ ३० „ „ | २९ | २.९ | ०.६ | १३.८ |
| „ ४० „ „ | ३० | ३.५ | ०.८ | १४.६ |

| जनावराचें वर्णन वांसरें | चाऱ्यांतील घनभाग | पचनशील भाग मांसजनक | स्निग्धांश | शर्करा सत्त्वादि |
|---|---|---|---|---|
| २–३ महिन्याचें (१५० पौं. वजन) | २३ | ३.७ | २.० | १३.० |
| ३–६ महिन्याचें (३०० पौं. वजन) | २४ | ३.१ | १.० | १३.० |
| ६–१२ महिन्याचें (५०० पौं. वजन) | २६ | २.६ | ०.६ | १२.७ |
| १२–१८ महिन्याचें (७०० पौं. वजन) | २६ | २.२ | ०.४ | १२.४ |
| १८–२४ महिन्याचें (९०० पौं. वजन) | २६ | १.६ | ०.३ | १२.० |

कामाप्रमाणें अवश्य लागणाऱ्या उपयुक्त घटकांची इयत्ता किंवा कामानुसार अन्नांशाच्या इयत्तेचें प्रमाण (फीडिंग स्टँडर्ड) पाश्चात्य देशांत निरनिराळ्या जनावरांवर निरनिराळ्या परिस्थितींत प्रयोग करून त्या त्या जनावरांस त्या त्या परिस्थितींत किती पचनशील उपयुक्त द्रव्यांची जरूर असते यावरून ठरविलें आहे. असले प्रयोग आपल्या देशांत अद्याप झालेले नाहींत म्हणून पाश्चात्य देशांतील प्रयोगावरून निघालेल्या अनुमानें वर दिलीं आहेत त्यांवरून जनावरांस परिस्थितीप्रमाणें किती उपयुक्त पचनशील घटकांची अवश्यकता असते याची कल्पना येईल. हे प्रयोग गायबैलांसंबंधीं आहेत.

जनावरांस खुराक तयार करणें.—जनावरांस ज्या प्रकारचें काम करावयाचें असेल त्यामानानें त्याला किती पौष्टिक द्रव्यांची अवश्यकता असते हें ठरवून त्या मानानें त्याच्या रोजच्या खाण्यांत कोणता चारा व पेंड दाणा वगैरे दिला पाहिजे हें ठरवावें लागतें; त्याकरितां जनावरांच्या खाद्य पदार्थांचा कमी अधिक पौष्टिकपणा लक्षांत घेऊन प्रत्येक पदार्थ किती दिला पाहिजे हें ठरवावें लागतें. चाऱ्याचा पौष्टिकपणा त्यांत असलेल्या निरनिराळ्या घटक पदार्थांच्या परस्पर प्रमाणावरून ठरवावा लागतो. याकरितां चाऱ्याचे जे घटक असतात त्यांचीं काय काय कार्यें असतात तीं पहावीं लागतात. याकरितां मांसजनक घटक व उष्णता आणि शक्ति यांचा पुरवठा करणारे घटक कोणत्या प्रमाणांत असतात हें पहावें लागतें. म्हणजे मांसजनक पदार्थांपासून शरीरांतील मांसल भागांची वाढ होते, रोजची झीज भरून येते व उष्णता आणि शक्तींना पुरवठा करणाऱ्या पदार्थांपासून किती पुरवठा होईल हें कळतें. याकरितां शर्करासत्वादि पदार्थ व स्निग्धांश यांनीं गणितानें एकरूप देऊन मग त्यांची मांसजनक पदार्थांशीं तुलना करावी लागते. प्रयोगांतीं असें सिद्ध झालें आहे कीं, शर्करासत्वादि पदार्थ व

(पृष्ठ १०९ वरून पुढें चालू)

| | | | | |
|---|---|---|---|---|
| वाटाणा | ८.५७ | ३.०२ | १०.६४ | ४२.६३ |
| गहूं | १०.०० | २.०७ | ९.७० | ३९.२४ |
| दाणा:— | | | | |
| ज्वारी | १०.७१ | ३.६९ | ९.७१ | ७२.३८ |
| सई | १०.४७ | ५.६९ | ०.६८ | ५९.३८ |
| हरभरा | ९.९८ | ४.३९ | १८.१४ | ५७.९४ |
| गवारी | ९.८३ | २.८१ | २७.२९ | ४८.१८ |
| हुलगा | ८.८२ | ०.८० | १८.१८ | ६२.२९ |
| सरकी | ९.८२ | १८.६५ | १७.३१ | ३१.१५ |
| जव | १२.३९ | १ ८५ | ६.६२ | ७१.५५ |
| बाजरी | ८.७७ | ५.३३ | ९.५२ | ७३.५२ |
| मटकी | ९.९४ | ०.८६ | २०.०० | ६०.५८ |
| उडीद | ९.९७ | ०.९३ | २०.७३ | ५९.९९ |
| मूग | १०.३८ | १.०७ | २१.२२ | ५९.५८ |
| गहूं | १३.२७ | १.६० | १०.९० | ६८.९३ |
| कोंडा:— | | | | |
| गहूं कोंडा | ११.८१ | ३.५० | १३.२० | ५८.४२ |
| तांदूळ ,, | ८.२१ | ८.३१ | ५.७२ | ३४.२५ |
| तूर ,, | ११.४६ | १.२० | ५.१२ | ३९.८१ |
| ,, चूण | १२.८८ | १.९९ | १९.६२ | ४७.२१ |
| हरभरा ,, | १०.२३ | ३.८४ | १४.१५ | ४२.२१ |
| उडीद ,, | ११.२४ | १.३७ | २१.६२ | ४३.२० |
| पेंड:— | | | | |
| नारळ | ७.७२ | १६.५३ | १३.६२ | ४४.५७ |
| फारळे | ७.४२ | ९.३० | ३८.५६ | २५.४८ |
| तीळ | १०.२३ | १२.५१ | ३०.५६ | २९.७५ |
| करडई | १२.०० | ३.७८ | १६.९१ | ४१.४८ |
| भुईमूग | ७.८३ | १५.४१ | ४८.४८ | २२.०२ |
| सरकी | ८.६० | ४.६० | २०.२० | ४०.७० |
| जवस | ८.८० | ११.८० | २८.८० | ३७.२० |
| शिरस | ९.०० | १०.०० | ३१.२० | ३७.२० |

चाऱ्याच्या घटकांचें पचन.—खाद्य पदार्थांचे मुख्य उपयुक्त घटक स्निग्धांश, शर्करासत्त्वादि पदार्थ व मांसजनक पदार्थ. यांचें पचन निरनिराळ्या पिंडरसांच्या सहाय्यानें होतें. पैकीं लाळ ही लालोत्पादक पिंडांत उत्पन्न होते व तिचा परिणाम अन्न चावलें जात असलेल्या सत्त्वावर (स्टार्च) होतो व त्यास द्राव्य स्थिति येते. जठराच्या आंत सूक्ष्म पिंड असून त्यांत "जाठररस" (गॅस्ट्रिकज्यूस) उत्पन्न होतो, व त्याचा परिणाम अन्नांतल्या मांसजनक पदार्थांवर होतो व त्यांचें रूपांतर होऊन त्यास द्राव्य स्थिति येते. यकृतांत (लिव्हर) पित्त (बाइल) उत्पन्न होतें व त्याचा परिणाम स्निग्धांशावर होऊन ते शोषण होण्यास योग्य होतात. क्लोमरसाच्या (पॅंक्रिॲटिकज्यूस) योगानें सत्त्व, स्निग्धांश व मांसजनक पदार्थ या तिहींवर परिणाम होऊन त्यास द्राव्य स्थिति येते. याशिवाय "आंत्ररसाचाहि (इंटेस्टायनलज्यूस) अन्नाचें पचन होण्यास उपयोग होतो. याप्रमाणें निरनिराळ्या रसांचा परिणाम अन्नाच्या घटकांवर होऊन त्यास द्राव्य स्थिति येते व त्यानंतर द्रव स्थितींत त्यांचें शोषण होऊन शोषलेला भाग रक्तांत मिसळतो व रक्ताच्या द्वारा सर्व शरीरभर खेळता राहून ज्या ठिकाणीं नवीन भाग तयार होत असेल किंवा झीज झाली असेल त्या ठिकाणीं त्याचा उपयोग होऊन नवीन भाग तयार होतो अगर झालेली झीज भरून निघते. खाल्लेल्या अन्नांतील सर्वच उपयुक्त भाग पचून शोषला जात नाहीं; कारण सर्व 'पाचक रसांचा' (डायजेस्टिव्ह ज्यूस) त्यावर परिणाम होऊन त्यांस पूर्णपणें द्राव्यरूप मिळत नाहीं व सर्व द्राव्यस्थितींत असलेल्या भागांचें पूर्ण शोषण होत नाहीं. यामुळें अन्नांतील उपयुक्त द्रव्यांपैकीं कांहीं भाग पचून त्याचें शोषण होतें व उरलेला भाग मलरूपानें शरीराबाहेर निघून जातो. एकच प्रकारचें अन्न निरनिराळ्या जनावरांस व निरनिराळ्या परिस्थितींत दिल्यास पचन झालेल्या भागांचें प्रमाण निरनिराळें आढळतें. हें 'पाचकत्वाचें शेकडा प्रमाण' (कोइफिशंट ऑफ डायजेस्टिबिलिटि) योनि, वय, शारीरिक स्वास्थ्य, श्रम, मानसिक स्वास्थ्य, ऋतु व हवामान, अन्नाचा प्रकार व अन्न तयार करण्याची रीति यांवर अवलंबून असतें. रंवथ करणाऱ्या प्राण्यांच्या बाबतींत पाचकत्वाचें शेकडा प्रमाण खालीं दिलेल्या कोष्टकांत दिलें आहे. या कोष्टकांतलें प्रमाण पाश्चात्त्य देशांत केलेल्या प्रयोगांवरून काढलेलें आहे व हें प्रमाण आपल्या देशांत सर्वतोपरी उपयोगी पडेल असें मुळींच नाहीं. परंतु त्यावरून निरनिराळ्या खाद्य पदार्थांतील उपयुक्त घटकांचें पाचकत्वाचें शेकडा प्रमाण किती असतें याची बरीचशी कल्पना येईल. अशा प्रकारचे प्रयोग अद्याप आपल्या देशांत झालेले नाहींत.

चाऱ्यांतील उपयुक्त घटकांच्या पाचकत्वाचें शेकडा प्रमाण.

| चाऱ्याचें नांव. | मांसजनक पदार्थ | स्निग्धांश | शर्करासत्वादिपदार्थ |
|---|---|---|---|
| गवत (ऑक्टोबर.) | ५६ | ४६ | ६१ |
| मक्याचें वाटूक | ६५ | ७२ | ७३ |
| मुरवलेलें मक्याचें वाटूक | ५१ | ८० | ६७ |
| ज्वारीचें वाटूक | ६२ | ६५ | ७८ |
| हिरवी मंई (फुललेली) | ७५ | ७० | ६३ |
| लूसर्न (फुललेलें) | ८१ | ४५ | ७२ |
| गवत वाळलेलें | ५७ | ५१ | ६४ |
| लूसर्न ” | ६८ | ५३ | ६२ |
| गव्हाचा भुसा | ४ | ३१ | ३७ |
| जईचा भुसा | ३३ | ३६ | ४६ |

| धान्याचें नांव | मांसजनक पदार्थ | स्निग्धांश | शर्करा सत्वादि |
|---|---|---|---|
| जवाचा भुसा | २५ | ३९ | ५३ |
| भाताचा पेंढा | ४५ | ४७ | ३२ |
| वाटाण्याचा भुसा | ६० | ४६ | ६४ |
| ओटदाणा | ७६ | ८० | ७६ |
| मका दाणा | ७२ | ८९ | ९५ |
| सरकी | ६८ | ८७ | ५० |
| गव्हाचा कोंडा | ७९ | ७१ | ७१ |
| शिरसाची पेंड | ८१ | ७९ | ७६ |
| जवसाची पेंड | ८६ | ९२ | ७८ |
| भुईमुगाची पेंड | ९० | ९० | ८४ |
| तिळाची पेंड | ९० | ९० | ५६ |
| खोबऱ्याची पेंड | ७५ | ९८ | ७७ |
| गाईचें दूध | ९८ | ९४ | १०० |

वर दिलेल्या कोष्टकांवरून हें लक्षांत येईल कीं जनावरानें जो चारा खाल्ला असेल त्यांत असलेल्या उपयुक्त घटकांचा शेंकडा किती भाग पचनशील असतो. उदाहरणार्थः— जर जनावरानें भुईमुगाची पेंड खाल्ली तर त्या पेंडींत असलेल्या मांसजनक पदार्थांपैकीं शेंकडा ९० भाग पचण्यासारखा असतो व उरलेला हिस्सा म्हणजे शेंकडा १० भाग शेणाबरोबर बाहेर येतो; तो पचत नाहीं. या कोष्टकावरून व चाऱ्यांत असलेल्या उपयुक्त घटकांच्या शेंकडा प्रमाणावरून त्यांत शेंकडा किती पचनशील उपयुक्त घटक असतात हें साध्या त्रैराशिकानें काढतां येईल हें उघड आहे.

जनावराच्या कामाप्रमाणें पोषणास लागणारें त्यांच्या दर हजारी पौंड वजनास लागणाऱ्या द्रव्यांचें शेंकडा सरासरी प्रमाण ( आंकडे पौंडांचे आहेत. )

पोषक द्रव्यांचें कोष्टक.

| जनावराचें वर्णन | चाऱ्यांतील घनभाग | पचनशील भाग: मांसजनक | स्निग्धांश | शर्करा सत्वादि |
|---|---|---|---|---|
| पूर्ण वाढीचें व काम न करणारें | १८ | ०.७ | ०.१ | ८.१ |
| थोडें काम करणारें | २३ | १.३ | ०.३ | १०.६ |
| साधारण ,, ,, | २५ | १.७ | ०.५ | २२.२ |
| फार ,, ,, | २७ | २.२ | ०.८ | १४.२ |
| रोज १० पौंड दुधाचें | २४ | १.४ | ०.३ | ९.६ |
| ,, २० ,, ,, | २७ | २.६ | ०.५ | ११.७ |
| ,, ३० ,, ,, | २९ | २.९ | ०.६ | ११.८ |
| ,, ४० ,, ,, | ३० | ३.५ | ०.८ | १४.६ |

| जनावराचें वर्णन वांसरें | चाऱ्यांतील घनभाग | पचनशील भाग: मांसजनक | स्निग्धांश | शर्करा सत्वादि |
|---|---|---|---|---|
| २–३ महिन्याचें (१५०पौं. वजन) | २३ | ३.७ | २.० | १३.० |
| ३–६ महिन्याचें (३०० पौं.वजन) | २४ | ३.१ | १.० | १३.० |
| ६–१२ महिन्याचें (५०० पौं.वजन) | २६ | २.६ | ०.६ | १२.७ |
| १२–१८महिन्याचें (७०० पौं.वजन) | २६ | २.२ | ०.४ | १२.४ |
| १८–२४ महिन्याचें (९०० पौं.वजन) | २६ | १.६ | ०.३ | १२.० |

कामाप्रमाणें अवश्य लागणाऱ्या उपयुक्त घटकांची इयत्ता किंवा कामानुसार अन्नांशाच्या इयत्तेचें प्रमाण ( फीडिंग स्टॅंडर्ड ) पाश्चात्य देशांत निरनिराळ्या जनावरांवर निरनिराळ्या परिस्थितींत प्रयोग करून त्या त्या जनावरास त्या त्या परिस्थितींत किती पचनशील उपयुक्त द्रव्यांची जरूर असते यावरून ठरविलें आहे. असले प्रयोग आपल्या देशांत अद्याप झालेले नाहींत म्हणून पाश्चात्य देशांतील प्रयोगावरून निघालेलीं अनुमानें वर दिलीं आहेत त्यांवरून जनावरास परिस्थितीप्रमाणें किती उपयुक्त पचनशील घटकांची अवश्यकता असते याची कल्पना येईल. हे प्रयोग गायबैलांसंबंधीं आहेत.

जनावरास खुराक तयार करणें.—जनावरांस ज्या प्रकारचें काम करावयाचें असेल त्यामानानें त्याला किती पौष्टिक द्रव्यांची अवश्यकता असते हें ठरवून त्या मानानें त्यांच्या रोजच्या खाण्यांत कोणता चारा व पेंड दाणा वगैरे दिला पाहिजे हें ठरवावें लागतें; त्याकरितां जनावरांच्या खाद्य पदार्थांचा कमी अधिक पौष्टिकपणा लक्षांत घेऊन प्रत्येक पदार्थ किती दिला पाहिजे हें ठरवावें लागतें. चाऱ्याचा पौष्टिकपणा त्यांत असलेल्या निरनिराळ्या घटक पदार्थांच्या परस्पर प्रमाणावरून ठरवावा लागतो. याकरितां चाऱ्यांतें जे घटक असतात त्यांचीं काय काय कार्यें असतात तीं पहावीं लागतात. याकरितां मांसजनक घटक व उष्णता आणि शक्ति यांचा पुरवठा करणारे घटक कोणत्या प्रमाणांत असतात हें पहावें लागतें म्हणजे मांसजनक पदार्थांपासून शरीरांतील मांसल भागाची वाढ होते, रोजची झीज भरून येते व उष्णता आणि शक्तींना पुरवठा करणाऱ्या पदार्थांपासून किती पुरवठा होईल हें कळतें. याकरितां शर्करासत्वादि पदार्थ व स्निग्धांश यांनां गणितानें एकरूप देऊन मग त्यांची मांसजनक पदार्थांशीं तुलना करावी लागते. प्रयोगांअंतीं असें सिद्ध झालें आहे कीं, शर्करासत्वादि पदार्थ व

स्निग्धांश यांच्यापासून सारखी शक्ति व उष्णता उत्पन्न होत नाहीं, साधारणपणें स्निग्धांशापासून शर्करासत्वादि पदार्थांपेक्षां २.३ पट जास्त उष्णता व शक्ति मिळते. म्हणून या दोहोंस एकरूप देण्याकरितां स्निग्धांशास २.३ नें गुणावें लागतें म्हणजे स्निग्धांशास शर्करासत्वादींचें रूप मिळतें. उदाहरणार्थ.—गव्हाचा कोंडा हा पदार्थ घेतल्यास त्यांत शेंकडा ३.५ स्निग्धांश, १३.२ मांसजनक पदार्थ व ५८.४२ शर्करासत्वादि पदार्थ असतात.तेव्हां त्यांत शक्ति व उष्णता देणारा भाग,३.२दर शेंकडा स्निग्धांश व५८.४२ दर शें.शर्करासत्वादि भाग आहे. तेव्हां त्यांत शेंकडा३.२×२.३ ( स्निग्धांश दर शें. ×२.३ )+५८.४२ = ६५.७८ इतका "सत्त्वतुल्य" अथवा "सत्त्वसम" ( स्टार्च इक्वीव्हॅलंट ) ( उष्णता व शक्तीचा पुरवठा करणारा ) भाग येतो. त्याचप्रमाणें गवतांत तो किती आहे हें पाहिल्यास तो फक्त ४६.४७ इतकाच आहे. पण मांसजनक पदार्थ गवतांत फक्तदर शेंकडा ४.५४ व गव्हाच्या कोंड्यांत दर शेंकडा१३.२ आहेत; तेव्हां मांसजनक पदार्थ व उष्णता व शक्तीचा पुरवठा करणारे पदार्थ यांचें परस्पर प्रमाण म्हणजे "प्रौजस प्रमाण "(अल्ब्युमिनाइड रेशिओ)—गवताचें ४.५४:४६.४७=१:१०.२व गव्हाच्या कोंड्याचें १३.२:६५.७८ = १:४.९ इतकें पडतें. म्हणजे मांसजनक पदार्थांच्या प्रत्येक भागास ४.९ भाग उष्णता देणारे पदार्थ गव्हाच्या कोंड्यांत असतात व गवतांत हें प्रमाण १:१०.२ असल्यानें गव्हाचा कोंडा गवतापेक्षां जास्त सकस व पौष्टिक ठरतो हें उघड आहे. याप्रमाणें प्रत्येक चाऱ्याचें 'प्रौजस प्रमाण' काय आहे हें काढतां येईल व याच रीतीनें जनावरांस जें खाणें द्यावयाचें त्याचें प्रौजस प्रमाण काढतां येऊन त्यावरून जनावरांचा खुराक किती पौष्टिक आहे हें काढतां येतें. मागें"कामाप्रमाणें अवश्य लागणाऱ्या उपयुक्त अन्नघटकांची इयत्ता" या सदराखालीं जें कोष्टक दिलें आहे त्यांत जनावरांच्या कामाप्रमाणें स्निग्धांश वगैरे घटकांचें प्रमाण चाऱ्यांत किती अवश्य पाहिजे हें दिलें आहे. त्यावरून जर प्रौजस प्रमाण काढलें तर तें प्रत्येक बाबतींत वेगळें आहे हें कळेल व जसें काम त्या मानानें प्रौजस प्रमाण वेगळें व त्या खुराकाचा पौष्टिकपणा वेगळा असतो हें लक्षांत येईल. जनावरांच्या खाण्याच्या सर्व पदार्थांत ओला चारा सर्वांत निःसत्व व पेंड सर्वांत सकस असते हें वर दिल्याप्रमाणें गणितानें सिद्ध होतें हे अनुभवहि गणितास धरून आहेत. तेव्हां गुरांच्या रोजच्या खाण्यांत ओला चारा, दाणा, कोंडा, पेंड, यांचें योग्य प्रमाण ठेवल्यास जनावरास त्याच्या कामाप्रमाणें अवश्य पाहिजे तितका भाग देतां येतो. पूर्ण वाढीच्या व कांहीं एक काम न करणाऱ्या बैलास जो पौष्टिक भाग अवश्य आहे त्यापेक्षां जास्त पौष्टिक भाग काम करणाऱ्या बैलास अवश्य लागतो व तीच गोष्ट दूध देणाऱ्या गाईची आहे. खुराक ठरवितांना शरीररक्षणास किती भाग पाहिजे व शरीर रक्षणाशिवाय दुसरें काम करावयाचें असतें त्याकरितां किती पौष्टिक भाग पाहिजे हें लक्षांत घेऊन चाऱ्यांत कोणकोणतें व किती पदार्थ द्यावयाचे हें ठरवावें. साधारणपणें १००० पौंड वजनाच्या पूर्ण वाढीच्या जनावरास फक्त शरीररक्षणास रोज ०.७ पौंड मांसजनक पदार्थ व ६.० पौंड सत्वसम भाग पाहिजे व याशिवाय प्रत्येक १० पौंड दुधास ०.५ पौंड मांसजनक पदार्थ व २.५ पौंड सत्वसम भाग रोज पाहिजे हें प्रयोगावरून सिद्ध झालें आहे; तेव्हां यावरून जनावरांचें वजन व रोजचें दूध किती असेल त्यामानानें त्याच्या खुराकांत किती पौष्टिक पदार्थ पाहिजेत हें ठरवावें. काम करणाऱ्या जनावरांच्या बाबतींत शरीररक्षणास लागणाऱ्या भागाशिवाय कामाच्या मानानें मांसजनक भाग ०.४ ते १.१ पौंड व सत्वसम भाग १.४ ते ६.८ पौंडपर्यंत लागतात. यावरून त्यांचा खुराक कसा असावा हें ठरवावें. साधारणमानानें जनावर सुका व ओला चारा खाईल तेवढ्यांत त्याच्या शरीररक्षणास पाहिजे तितका भाग येतो व विशिष्ट प्रकारच्या कामाकरितां त्यास पेंड दाणा वगैरे द्यावा लागतो. याप्रमाणें शास्त्रीय रीतीनें खुराक ठरविण्याकरितां खाण्याच्या पदार्थांत शेंकडा पचनशील उपयुक्त घटक किती असतात हें माहीत पाहिजे हें उघड आहे. परंतु सर्वांना ही माहिती नसते तेव्हां त्याच्या अभावीं दुभत्या जनावरांच्या बाबतींत तें खाईल तितका सुका व ओला चारा द्यावा व त्याशिवाय प्रत्येक एक शेर दुधास ०.६ ते ०.८ शेर पेंड, कोंडा वगैरेंचें मिश्रण द्यावें म्हणजे प्रमाणशीर व्यावहारिक खुराक तयार होतो ( पाश्चात्य देशांत हें प्रमाण प्रत्येक शेर दुधास ०.३ शेर पेंड वगैरेंचें मिश्रण असें पडतें. ) किंवा वजनानें रोजचें जितकें दूध असेल त्याचा ३/४ ते ४/५ पेंड वगैरेंचा हिस्सा ठेवावा म्हणजे झालें.

निरनिराळ्या खाद्य पदार्थांची तुलना.—जनावरांचे जे निरनिराळे खाद्य पदार्थ असतात त्यांचा बाजारभाव सर्वकाळ व सर्व ठिकाणीं सारखा नसतो व सर्व पदार्थ सारखे पौष्टिक नसतात. म्हणून कोणते पदार्थ उपयोगांत आणले म्हणजे फायदेशीर पडेल हें पहावें लागतें व याकरितां त्यांची परस्पर तुलना करावी लागते. ही तुलना करण्याकरतां प्रत्येक पदार्थांत उपयुक्त द्रव्यांचें शेंकडा प्रमाण किती पडतें तें अगर त्यांपासून शरीरास किती उष्णता मिळण्यासारखी आहे हें काढावें लागतें. शरीरपोषणाच्या दृष्टीनें मांसजनक पदार्थांची व स्निग्धांशाची किंमत शर्करासत्वादि पदार्थांपेक्षां २.५ पट ठोकळ मानानें धरतात व त्याप्रमाणें खाद्य पदार्थांत असलेल्या मांसजनक पदार्थांस व स्निग्धांशास २.५.नें गुणून सत्त्वानें रूप देऊन त्यांत शेंकडा किती सत्त्वमय भाग आहे हें काढतां येतें. त्यावरून व बाजारभावावरून त्या पदार्थांची एकमेकांशीं तुलना करतां येते. चाऱ्यांत उपयुक्त सत्त्वसमभाग शेंकडा किती आहे हें खालीं दिलेल्या सूत्राप्रमाणें काढावें. ( पोषणाच्या दृष्टीनें ) शेंकडा "सत्त्वसमभाग"=

(स्निग्धांश दर शेकडा+मांसजनक पदार्थ दर शेकडा)×२.५ +सत्त्वादिपदार्थ दर शेकडा.

उष्णतेचा पुरवठा यादृष्टीनें तुलना करावयाची असल्यास प्रत्येक १०० पौंड खाद्यपदार्थांतील सर्व उपयुक्त घटकांचा उष्णता उत्पन्न करण्याकडे उपयोग झाल्यास त्यापासून किती उष्णता मिळेल हें काढून तुलना करतात. मांसजनक पदार्थ व सत्त्वादिपदार्थ यांच्या प्रत्येक पौंडापासून १८६० क्यालोरी उष्णता मिळते व स्निग्धांशाच्या एका पौंडापासून ४२२० क्यालोरी उष्णता मिळते तेव्हां खाद्यपदार्थांच्या १०० पौंडापासून किती उष्णता मिळेल हें खालील सूत्राप्रमाणें काढावें व खाद्य पदार्थांची परस्पर तुलना करावी. १०० पौंड खाद्य पदार्थांतील उष्णता (क्यालोरी) = (मांसजनकपदार्थ दर शेकडा + सत्त्वादिपदार्थ दर शेकडा) १८६०+स्निग्धांश दर शेकडा×४२२०. त्या असल्या गणितांतील क्यालोरी म्हणजे एक पौंड पाण्याचें उष्णमान ४° वाढवण्यास जितकी उष्णता लागते तितकी उष्णता हें लक्षांत ठेवावें.

ज ना व रां च्या खा ण्या पि ण्या ची व्य व स्था.— जनावरांस नियमितवेळीं खाण्यास दिलें पाहिजे व रोजचा खुराक अवश्य तितका पौष्टिक असला पाहिजे. रोजच्या खुराकाशिवाय जनावरास रोज नियमितवेळीं रानांत चरावयास नेलें पाहिजे व चाऱ्याप्रमाणें पाणीहि नियमितवेळीं दिलें पाहिजे. दुभत्या जनावरांच्या बाबतींत त्यांनां नेहमीं हिरवा चारा मिळेल अशी व्यवस्था असावी. त्यांनां नुसत्या सुक्या किंवा नुसत्या हिरव्या चाऱ्यावर ठेवूं नये. हिरव्या चाऱ्याची व्यवस्था ठेवण्याकरतां लूसर्न, गिनी गवत, कडवळ, जई, वगैरे हिरवा चाराहि व हंगामाच्या वेळीं कडवळ गवत, हिरवें गवत वगैरे मुरवून ठेवावें म्हणजे वेळेनुसार त्याचा हिरव्या चाऱ्याच्या ऐवजीं उपयोग करतां येतो. हिरवा चारा मुरवण्यांत (१) चारा फुलण्याच्या सुमारास कापून कडबा कापण्याच्या यंत्रानें त्याचे बारीक तुकडे करणें, (२) चारा मुरवण्याच्या कोठारांत तो कापलेल्या चाऱ्या सारखा पसरून सर्वत्र सारखा दाबून त्यांतील शक्य तितकी हवा काढून टाकणें व (३) सर्व कोठार भरलें म्हणजे चारा हवा न जाईल अशा तऱ्हेनें झांकून ठेवणें या मुख्य बाबी आहेत (सविस्तर माहितीकरितां लेखकाचें "दुभतें व दुभतीं जनावरें" हें पुस्तक पान ९७ पहा). या बाबकिडे लक्ष दिलें म्हणजे चारा खराब होत नाहीं व तो चांगल्या स्थितींत पुष्कळ वेळ टिकतो. चाऱ्यांत जर हवा राहिली किंवा गेली तर तो लवकर कुजून नासतो व खाण्यास निरुपयोगी होतो. चारा भरतांना त्यांत थोडें मीठ मिसळलें तर तो लवकर होऊन दुभतीं जनावरें फार आवडीनें खातात. जो चारा जनावरांस द्यावयाचा तो बारीक करून दिला म्हणजे त्याची नासाडी होत नाहीं व तो चांगला चावला जाऊन त्याचें पचन चांगलें होतें. चारा बारीक करण्यास कडबा कापण्याचें यंत्र उपयोगांत आणलें असतां त्याचा चांगला उपयोग होतो. गुरांनां हिरवा व सुका चारा मिसळून द्यावा. पुष्कळदां चारा पाण्यांत भिजवून देतात. चारा कुजका किंवा किडका नसावा. त्यांत पानांचें प्रमाण जास्त असावें व ताट बारीक असावें. चाऱ्यांत, लूसर्न, गवारी, भुईमूग, उडीद, मूग, वगैरेंचे वेल अगर भुसा मिसळल्यानें चारा जास्त रुचकर व पौष्टिक होऊन तो जनावरें आवडीनें खातात. पेंड, दाणा वगैरे पदार्थ भिजवून बारीक करून वेगळे अगर चाऱ्याबरोबर मिसळून द्यावे. प्रथम दाणा भरडून नंतर भिजवून अगर शिजवून दिल्यानें चांगला चावला जातो व त्यामुळें त्याचें उत्तम पचन होऊन नासाडी होत नाहीं. चूण, कोंडा वगैरे पदार्थांबरोबर माती अगर इतर इजा करणारे पदार्थ न जातील अशी व्यवस्था असावी. पेंड, दाणा, कोंडा वगैरे किडके अगर कुजके किंवा बुरसलेले नसावेत. चारा, दाणा वगैरे सर्वच विकत घेणें असल्यास तो हंगामांत घेणें फायदेशीर असतें. कोंडा, चूण वगैरे पदार्थ एकदम फार घेऊं नयेत. कारण ते लवकर खराब होतात. चारा-दाणा नेहमीं चांगल्या कोरड्या जागेंत ठेवले म्हणजे खराब होत नाहींत. जनावरांस रोज थोडथोडें मीठ देत गेलें म्हणजे तीं निरोगी राहतात व चारा रुचकर होतो. लाहोरी मिठाचे मोठे खडे जनावरांशेजारीं ठेवल्यास तीं वाटेल त्यावेळीं तो खडा चाटींत बसतात व त्यांस हवें तेवढें मीठ मिळतें. मधून मधून चाऱ्यांत फरक करावा व कधीं कधीं तेल, हळद, गूळ, ओवा, सुंठ, मिरें वगैरेंचा पाचक खुराक औषधाप्रमाणें द्यावा म्हणजे जनावरांची पचनशक्ति जोरावते. याशिवाय गव्हाचा कोंडा किंवा जवसाचें कूट पाण्यांत शिजवून पाजावें म्हणजे जनावरांचा कोठा साफ रहातो. जनावराचें दूध आटल्यावर पेंड वगैरे कांहीं दिवस देण्याची जरूरी नसते. भरपूर सुका व ओला चारा व रानांत चरणें पुरें होतें. मात्र जनावर विण्याच्या पूर्वी सुमारें दोन महिने थोडथोडा सकस चारा देण्यास सुरुवात करावी व तो हलके हलके वाढवावा म्हणजे जनावर विण्याच्या सुमारास, दूध देत असतांना जितका सकस चारा मिळत असेल तितका मिळावा. विण्याच्या पूर्वी १५।२० दिवस पचण्यास सुलभ असा चारा द्यावा व मधून मधून गव्हाचा कोंडा अगर जवसाचें कूट पाण्यांत शिजवून व थोडें मीठ टाकून पाजावें म्हणजे गाभण जनावराचा कोठा साफ रहातो व विण्याच्या वेळीं त्रास होत नाहीं. वाढत्या वासरांनां चांगला पौष्टिक व सुलभ रीतीनें पचणारा असा चारा द्यावा; त्यांनां पेंड वगैरेहि द्यावी म्हणजे तीं जोमानें वाढतात. इतर जनावरांबरोबर त्यास रानांत सोडल्यानें त्यांचे अवयव मोकळे होऊन तीं निरोगी रहातात व त्यांची वाढ उत्तम होते. वासरांसहि गव्हाचा कोंडा व जवसाचें कूट मधून मधून शिजवून द्यावें. आजारी जनावरांस सहज पचेल असा चारा

द्यावा. रुचकर चारा थोडथोडा दिल्यानें त्यांची प्रकृति लवकर सुधारेल. त्यांनां निबर कडब्याचा चारा देऊं नये. हरळी उत्तम असते. आजारी जनावरास मालकानें अगर त्याच्या सतर्थीच्या माणसानें हातानें त्यांनां आवडणारा चारा द्यावा म्हणजे त्यांनां फार समाधान होतें व त्यामुळें त्यांची प्रकृति लवकर सुधारते. खाण्यापिण्याच्या बाबतींत जनावरांची योग्य रीतीनें बरदास्त ठेवली म्हणजे तीं सहसा आजारी पडत नाहींत व आपलें काम योग्य रीतीनें करीत असतात.

दु भ त्या ज ना व रां ची नि गा.—दुभत्या जनावरांची निगा ठेवणें हें फार महत्त्वाचें आहे. गाई, बैल, वासरें यांकरितां निरनिराळे गोठे असावेत; परंतु तशी व्यवस्था नसल्यास एकाच गोठ्यांत गाई एके ठिकाणीं; बैल, पोळ, एके बाजूस; म्हशी एके ठिकाणीं व वासरें एकीकडे अशीं बांधावींत. सर्वत्रांची खिचडी करून बांधूं नये. म्हणजे सर्व व्यवस्था ठीक राहते. कारण गाई, म्हशी, बैल, वासरें वगैरेंच्या चाऱ्यांत फरक असतो. त्याप्रमाणें चारादाण्याची वांटणी करणें सुलभ पडतें. गाई–म्हशींची धार काढण्यांत अडथळा येत नाहीं व मोठ्या जनावरांत वासरें न मिसळल्यानें त्यांनां कोणत्याहि प्रकारचा उपसर्ग पोंचत नाहीं. जनावरास दोरी अगर सांखळीनेंच बांधणें बरें पडतें. अलीकडे मिलिटरी डेअरीमधून लांकडाच्या अगर लोखंडी उघडत्या मिटत्या चौकटींत जनावरांची मान अडकवून त्यांनां डांबून ठेवण्याची विलायती पद्धत सुरू केलेली आढळते; परंतु आपल्या चालू परिस्थितींत दोरी अगर सांखळीच्या दाण्यानेंच जनावरें बांधणें बरें असतें. जनावरास, तें विशेष तापट असल्याखेरीज शिंगास दोरी लावून बांधूं नये. पायास दोरी बांधण्याची पद्धत वाईट. तीपासून जनावरास अपाय होण्याचा संभव असतो. गळ्याला दावें लावून जनावरें बांधणें सर्वस्वीं उत्तम असतें.

जनावराचा गोठा धारेच्यापूर्वी निदान अर्धा तास तरी झाडून व धुवून साफ करावा, व जनावरांचें अंग रुमालानें अगर ब्रशानें साफ करावें. म्हणजे धार काढतांना दुधांत केरकचरा जाण्याचा संभव कमी असतो. गोठा साफ केल्यानंतर नियमित वेळीं धार काढावी व धार काढतांना "धार काढणें" या सदराखालीं माहिती दिल्याप्रमाणें सर्व व्यवस्था ठेवावी. धार काढतांना जनावरांच्या अनुक्रमाप्रमाणेंच धार काढावी, त्यांत कधीं बदल करूं नये. हा अनुक्रम बदलल्यास ज्यांची धार नेहमीं प्रथम काढण्यांत येते त्यांचा पान्हा थोडा फार फिरून दुध कमी निघण्याचा संभव असतो. जनावरें बाहेर मोकळ्या व स्वच्छ जागेंत बांधण्याची व्यवस्था असून हवेची परिस्थिति अनुकूल असल्यास त्यांस बाहेर बांधून धार काढावी. अशा वेळीं धारेनंतर गोठे धुतले तरी हरकत नाहीं.

धार काढल्यानंतर जनावरांस व आणत्या वासरास कुरणांत चरण्यास न्यावें. यावेळीं पोळांनांहि त्याबरोबर न्यावें. कुरणांत चरण्यास नेल्यानें स्वच्छ खुली हवा व उन्हाचा ताप त्यांनां हवा तितका मिळतो व त्यांनां मोकळेपणानें हिंडतां फिरतां येतें, त्यांचे पाय मोकळे होतात, शेताच्या व्यायामामुळें रुधिराभिसरण चांगलें होतें, चारादाणा चांगला पचतो, व तीं निरोगी राहून त्यांपासून उत्तम दूध मिळतें. वाढत्या जनावरांची वाढ जोमानें होते. याप्रमाणें निदान तीन तास तरी जनावरांस कुरणांत ठेवावें. गाभण जनावरांची विण्याची वेळ जवळ आली असल्यास त्यांनां कुरणांत चरण्याकरितां पाठवूं नये म्हणजे पुष्कळ आघात टळतात. मोठीं जनावरें कुरणांत चरण्यास गेल्यावर लहान वासरांस बागडण्याकरितां मोकळ्या आवारांत सोडावें म्हणजे तीं मनमुराद बागडतात व त्यामुळें तीं खुरटीं न रहातां जोमानें वाढून निरोगी रहातात. फार पावसामुळें जनावरांस बाहेर नेतां येत नसल्यास गोठ्यांतच मालिश करावें म्हणजे यांचें अंग स्वच्छ होऊन रुधिराभिसरण चांगलें होऊन त्यामुळें फायदा होतो.

जनावरांचें अंग चोळून धुवून स्वच्छ ठेवावें म्हणजे पिसा, तांबवा, गोचीड, गोमाशा वगैरेंपासून जनावरांचा बचाव होऊन खरूज, नायटे, केंस गळणें वगैरे रोग होत नाहींत. अंग धुवून स्वच्छ करतांना जनावरास कोठें कांहीं दुखापत वगैरे झाली असल्यास ती नजरेस येऊन तिजवर वेळींच उपचार करणें बरें पडतें. त्यांचें अंग धुतल्यानें केंस स्वच्छ, मऊ व तुळतुळीत होऊन जनावरें दिसण्यांत चांगलीं दिसतात. म्हशींनां रोज धुतलेंच पाहिजे. गाईंनां ८ । १५ दिवशीं धुतलें तरी चालतें. जवळपास नदी असल्यास जनावरांस पोहण्यास न्यावें म्हणजे त्यांनां व्यायाम मिळून त्यांचें अंगहि स्वच्छ होतें.

खाण्याविषयीं 'चारा पाणी' या सदराखालीं माहिती दिल्याप्रमाणें व्यवस्था ठेवावी. लहान वासरें, गाभण जनावरें, आजारी जनावरें, यांचें खाणेंपिणें वगैरेबद्दल विशेष खबरदारी घ्यावी. निगेसंबंधीं सर्व गोष्टी नियमित वेळीं व विशेष काळजीनें कराव्या व इतर जनावरांपासून त्यांस कोणत्याहि प्रकारचा त्रास होऊं देऊं नये. जनावरांच्याखालीं पालापाचोळा वगैरे पसरून बिछाली करावी. विशेषतः थंडीच्या दिवसांत बिछालीची विशेष आवश्यकता असते. बिछालीमुळें अंगास चांगली ऊब येऊन जनावरास आराम मिळतो व खताच्या दृष्टीनेंहि फायदा होतो. मात्र शेणामुतानें ओली झालेली बिछाली रोज काढून खतांत टाकली पाहिजे व निदान ८–१५ दिवसांनीं सर्व बिछाली गोळा करून त्यांतील सुका खतांत टाकून चांगला भाग घेऊन त्यांत नवा पालापाचोळा मिसळावा व गोठ्याची जमीन स्वच्छ धुतल्यावर बिछाली पसरावी. अशा रीतीनें बिछाली बदलली नाहीं तर पिसा वगैरे होऊन जनावरास त्रास होतो. बिछालीच्या पाल्यापाचोळ्यांत कांटे, कांचांचे तुकडे वगैरे इजा करणारे पदार्थ न जातील अशी खबरदारी घ्यावी.

सर्व जनावरांशीं सर्वदां ममतालूपणानें वागावें म्हणजे तीं आनंदी व गरीब स्वभावाचीं होतात व त्यांनां आपला लळा लागतो. वरचेवर त्यांच्या जवळ जाऊन त्यांस थोपटावें, चुचकारावें, अंगावरून हात फिरवावा व प्रेमानें त्यांच्या नांवानें हांका मारून गोड शब्दांनीं त्यांच्याशीं बोलावें. मधून मधून आपल्या हातीं चारा घेऊन त्यांनां तो चारावा म्हणजे त्यांनां फार आनंद वाटतो. दुभत्या जनावरांशीं प्रेमानें व ममतेनें वागल्यास तीं कधींहि पान्हा चोरीत नाहींत. त्यांच्यावर प्रेम करणाऱ्या मनुष्याशिवाय इतर कोणी धार काढण्यास गेल्यास तीं नेहमींपेक्षां दूध कमी देतात. याचें कारण प्रेमाचा किंवा संवयीचा अभाव हेंच असतें. जनावरांशीं कठोरपणानें वागल्यास तींहि कठोर होतात व कोणासहि न जुमानतां खोड्याळ होतात. जनावरांस निष्ठुरपणानें केव्हांहि मारूं नये व त्यांच्यावर मोठ्यानें ओरडूं नये. त्यांचें लक्ष्य दुसरीकडे असतांनां त्यांनां हांक मारल्याशिवाय त्यांच्या जवळ एकदम जाऊं नये अगर कोणत्याहि रीतीनें तीं बुजतील व बिघडतील असें करूं नये. याविषयीं विशेषतः नुकत्याच व्यालेल्या जनावरांच्या बाबतींत विशेष खबरदारी घ्यावी.

दूध, त्याचे गुणधर्म व परीक्षा, दुधाची उत्पत्तिः— सस्तन प्राण्यांच्या मातृपद मिळालेल्या मादीच्या " दुग्धोत्पादक पिंडांत " ( स्तनांत ) उत्पन्न होणारा रस हेंच " दूध " होय. सस्तन प्राण्यांच्या शरीरांत दुग्धोत्पादक पिंड दोन असतात. एक उजव्या बाजूस व एक डाव्या बाजूस असतो. दुग्धोत्पादक पिंडांचे योनिपरत्वें दोन अगर त्यापेक्षां अधिक विभाग झालेले असतात व प्रत्येक विभागाकरितां एक आंचळ असतें. कांहीं योनींतील प्राण्यांच्या दुग्धोत्पादक पिंडांचे मुळींच विभाग झालेले नसतात म्हणून प्रत्येक पिंडास एकच आंचळ असतें. याशिवाय योनिपरत्वें दुग्धोत्पादक पिंडांतील अंतर कमी अथवा अधिक असतें. गाय, म्हैस वगैरेंच्या योनींत दोन्ही दुग्धोत्पादक पिंड अगदीं एकमेकांस चिकटलेले असल्यामुळें त्यांच्यांत मुळींच अंतर अंतर नसतें. दोन्ही दुग्धोत्पादक एकमेकांस चिकटून एकच कांस होते; परंतु प्रत्येक दुग्धोत्पादक पिंडाचे दोन विभाग असल्यानें एक एक विभागास एक एक आंचळ असून कासेस एकूण चार आंचळें असतात. दोन्ही दुग्धोत्पादक पिंड एकमेकांस स्नायूंच्या योगानें चिकटलेले असतात. दुग्धोत्पादक पिंडांत शुद्ध व अशुद्ध रक्तवाहिन्या, मज्जातंतू, मेदोवाहिन्या, दुग्धवाहिन्या यांचें जाळें असून, पिंडाचा मुख्य दुग्धोत्पादक भाग " दुग्धोत्पादक पेशी " ( ॲसिनी ) हा असतो. दुग्धोत्पादक पिंडांत दूध कसें तयार होतें याविषयीं शास्त्रज्ञांनीं अनेक मतें पुढें आणिलीं आहेत. परंतु अद्यापपर्यंत संमत असा सिद्धांत पुढें आलेला नाहीं. एवढी गोष्ट सिद्ध झाली आहे कीं, दुग्धोत्पादक पिंडांत अनेक घडामोडी होऊन दूध तयार होतें व या घडामोडीस मज्जातंतूंचें उत्तेजन व भरपूर रक्तप्रवाह यांची आवश्यकता असून दूध उत्पन्न होतांना त्यांत अन्न, मेद व रक्त यांच्या घटकांपैकीं कांहीं घटक जसेच्या तसेच व कांहीं रूपांतर होऊन येत असावे. पूर्वी एका काळीं दूध हें रक्ताचें रूपांतर आहे असें मत प्रचलित होतें परंतु तें आतां खोटें ठरलें आहे. त्या काळीं रसायनशास्त्रांत फारशी प्रगति झाली नव्हती व निरनिराळ्या दृष्टीनें परीक्षण करण्याचीं साधनेंहि उपलब्ध नव्हतीं. रक्ताचे घटक जे " श्वेत " व " पीत " सूक्ष्म शरीरें ( ब्लड कॉरपस्कल्स) निरोगी ते जनावरांच्या दुधांत केव्हांहि नसतात. रक्तांत दुधाइतका स्निग्धांश केव्हांहि नसतो. दुधांत असलेले मांसजनक पदार्थ रक्तांत त्याच रूपांत कधींहि नसतात. दुधांत असलेली दुग्धशर्करा रक्तांत नसते व रक्तांत दुधाइतके पोटॅशियमचे क्षार केव्हांहि नसतात. यावरून दूध हें रक्ताचें रूपांतर नसून दूध हा रसदुग्धोत्पादक पिंडांत स्वतंत्रपणें उत्पन्न झालेला रस आहे हें उघड आहे. दुग्धोत्पादक पिंडांत निरनिराळ्या घडामोडी होऊन जे निरनिराळे पदार्थ उत्पन्न होतात त्या सर्वांचें जें एक मिश्रण तयार होतें तेंच दूध होय.

दुधाचे घटक.—दूध हें (१) पाणी, (२) स्निग्ध पदार्थ, (३) मांसजनक ( प्रोटीड ) पदार्थ, (४) दुग्धशर्करा व (५) निरिंद्रिय क्षार हे मुख्य पांच पदार्थ मिळून तयार झालें आहे; म्हणून हेच पदार्थ दुधाचे मुख्य घटक होत. थोडयाशा दुधांत दुप्पट तिप्पट पाणी घालून तें " सूक्ष्म वीक्षणींतून " ( मायक्रास्कोप ) पाहिलें असतां स्निग्ध पदार्थांचे हजारों अतिसूक्ष्म बिंदू पाण्यासारख्या पारदर्शक पातळ पदार्थांत तरंगत असलेले दिसतात व हेच स्निग्ध पदार्थांचे सूक्ष्म बिंदू दूध बराच वेळ स्थिर ठेवलें म्हणजे त्याच्या वरच्या भागांत एकत्रित होऊन दुधावर " साय " जमतो. यावरून दूध हें निरनिराळ्या पदार्थांचें मिश्रण आहे हें उघड आहे.

स्निग्धांशाच्या या तरंगत्या सूक्ष्म बिंदूंशिवाय मांसजनक पदार्थांचा कांहीं भागहि तरंगत्या स्थितींत असतो व या तरंगत्या भागामुळेंच दुधास पांढरा रंग येतो. दूध नासलें म्हणजे किंवा त्यांत एखादें अम्ल घालून गरम केलें म्हणजे या तरंगत्या पदार्थांचा चोथा तयार होतो व पाणी व त्यांत विरलेले पदार्थ निराळे होतात. यावरून दुधाचा पांढरा रंग या तरंगत्या पदार्थांमुळेंच असतो हें उघड आहे. दुग्धशर्करेमुळें त्यास गोडसर चव येते. योनि व जातिपरत्वें दुधाचे पाणी, स्निग्ध पदार्थ, मांसजनकपदार्थ, दुग्धशर्करा व निरिंद्रियक्षार या घटकांचें सरासरी शेंकडा प्रमाण कांहीं मर्यादेबाहेर जात नाहीं हें पुढील आंकड्यावरून लक्षांत येण्यासारखें आहे.

गाय व म्हैस यांच्या दुधांतील घटक अनुक्रमें ( सरासरी शेंकडा ):—पाणी ८५.३८ व ८१.७; स्निग्धांश ५.५५

व ८.१५; मांसजनक पदार्थ ३.६७ व ४.३२; दुग्धशर्करा ४.६६ व ५.०१; निरिंद्रियद्रव्यें ०.७६ व ०.८२.

दुधाच्या घटकांपैकीं स्निग्धपदार्थ पाण्यापेक्षां हलके, व मांसजनक पदार्थ, दुग्धशर्करा व निरिंद्रियक्षार हे पदार्थ पाण्यापेक्षां जड असल्यामुळें त्यांच्या परस्परप्रमाणाप्रमाणें दुधाचें विशिष्टगुरुत्व कमीजास्त होतें व तें विशिष्ट मर्यादेबाहेर जात नाहीं. साधारणपणें वर दिलेल्या प्रमाणांत घटक असले म्हणजे गाईच्या दुधाचें विशिष्टगुरुत्व १.०२९ ते १.०३० व म्हशीच्या दुधाचें १.०३१० ते १.०३१६ या मर्यादेत असतें. परंतु एकाच जनावराचें दूध घेतल्यास त्याचें विशिष्ट गुरुत्व १.०२८ ते १.०३४ पर्यंत सुद्धां असतें. साधारणपणें तुलना व परीक्षा करण्यासाठीं विलायतेंत दुधाचें विशिष्टगुरुत्व १.०३२ धरतात. परंतु आपल्या इकडील दुधाचे गुणधर्म लक्षांत घेतां दुधाचें विशिष्टगुरुत्व १.०३० धरलें पाहिजे.

योनिपरत्वें दुधास एक प्रकारचा वास येतो. शिवाय रोगी जनावराच्या दुधास नेहमींपेक्षां निराळा वास येतो. दुधांत निरनिराळे निरिंद्रिय क्षार असल्यानें निळ्या व तांबड्या लिटमस रंगावर परिणाम होऊन “ द्विगुणप्रतिक्रिया ” ( अँफोटेरिक रीॲक्शन ) होते व दोन्ही रंग बदलतात, हा एक दुधाचा विशेष गुण आहे. दूध असजसें शिळें होत जातें तसतसें त्यांत अम्लाचें प्रमाण वाढतें व त्यामुळें निळा लिटमसरंग तांबडा होण्याची प्रतिक्रिया त्या मानानें अधिक होत जाते. दूध तापवलें म्हणजे उष्णतेचा दुधावर परिणाम होऊन त्यांत फरक होतो. त्याचें उष्णमान १४०° झालें म्हणजे मांसजनक पदार्थावर हवेंतील प्राणवायूचा परिणाम होऊन साय येऊं लागते. त्याचें उष्णमान १७६° झालें म्हणजे त्यांतील दुग्धशर्करा करपावयास लागून त्याचा रंग तांबूस व्हावयास लागतो व २१४° उष्णमान झालें म्हणजे तें उकळावयास लागतें व मांसजनक घटकांशीं संयुक्त असलेले चुन्याचे क्षार भांड्याच्या बुडाशीं बसून त्यांची ‘खरवड’ होऊं लागते. १५८° उष्णतेमुळें मांसजनक घटकांपैकीं एक घटकाचें ( अल्ब्यूमिन् ) रूपांतर होऊन तें घट्ट होतें; व दूध ३२° पर्यंत थंड केलें म्हणजे तें गोठतें. याशिवाय उष्णतेमुळें १५८° दुधाच्या वासांत फरक पडतो. घृतांशाबरोबर बराचसा भाग वाईत येतो, आणि त्यांत असलेले वायू निघून जातात. दुधाच्या अंगीं कोणत्याहि प्रकारचा वास शोषून घेण्याचा धर्म असतो म्हणून दुधाशेजारीं कोणताहि वासाचा पदार्थ ठेवल्यास तो वास दुधास लागतो.

पाणी, दुग्धशर्करा, स्निग्ध पदार्थ, मांसजनक पदार्थ व निरिंद्रिय क्षार या मुख्य घटकांशिवाय शेकडा कर्बाम्लवायु ३.२७, प्राणवायु १९.१३ व नायट्रोजन ७७.६० या प्रमाणांत दुधांतल्या शोषलेल्या हवेंत असतात. याशिवाय ताज्या दुधांत रक्तांतल्यासारखे श्वेतपिंड ( ल्यूकोसाइट्स् ) असून मूत्रिका (सायट्रेट्स) सूक्ष्म प्रमाणांत असतात. गाढवीण व मेंढी यांच्या दुधांत “ पाचक पदार्थ ” ( एनझाईम ) असतो व सांसर्गिक रोगानें जनावर आजारी असल्यास त्या रोगाचे जंतू दुधांत येतात. पाणी, स्निग्ध पदार्थ, मांसजनक पदार्थ, दुग्धशर्करा व निरिंद्रियक्षार या घटकांपैकीं पाणी व स्निग्धपदार्थ यांच्या शेकडा प्रमाणांत बराच फरक पडतो तितका फरक मांसजनक पदार्थ, दुग्धशर्करा व निरिंद्रियक्षार यांच्या प्रमाणांत पडत नाहीं. योनि, जात, वैयक्तिकधर्म ( इंडिव्हिज्युआलिटी ) खाणें, वयमान, शरीराचें स्वास्थ्य, दुग्धप्रधानकाल ( लॅक्टेशन पीरिअड ), धार काढण्याच्या वेळेंतील अंतर, ऋतु हवामान आणि मानसिक स्वास्थ्य वगैरे कारणांनीं फरक पडतो हें पुढें दिलेल्या कोष्टकावरून सहज लक्षांत येईल.

गाईच्या दुधाचे निरनिराळे घटक ( विलथ ) व त्याचें शेकडा प्रमाण.



गाय व म्हैस यांच्या दुधांतील निरनिराळ्या घटकांचें शेंकडा सरासरी प्रमाण पुढीलप्रमाणें असतें; गाईचें दूधः—पाणी ८५.३१, स्निग्धांश ४.९, मांसजनक पदार्थ ३.२, दुग्धशर्करा ४.५७, व निरिंद्रिय क्षार ०.७२, म्हशीचें दूधः—पाणी ८२.९, स्निग्धांश ७.६९, मांसजनक पदार्थ ४.११, दुग्धशर्करा ४.४८ व निरिंद्रिय क्षार ०.७८.

धार काढतांना प्रथम व शेवटीं निघणाऱ्या दुधांतील घटकांचे फरक होतात ते शेंकडा प्रमाणांत दिले आहेत.

| आरंभीची धार | स्निग्धांश | पाणी | इतर घटक |
|---|---|---|---|
| पहिला भाग | १.१० | ८९.४२ | १०.५८ |
| शेवटचा भाग | ७.८८ | ८३.३७ | १६.६५ |
| शेवटची धार | १०.०० | ८०.६० | १९.४० |

गाईच्या दुधांत वयोमानाप्रमाणें पडणारा स्निग्धांशाचा फरक शेंकडा प्रमाणांत पुढील प्रमाणें पडतोः—पहिलें वेत ४.८८, दुसरें वेत ५.१, ३ रें वेत ५.०९, चवथें वेत ४.८२, पाचवें वेत ४.६८, सहावें वेत ४.५९,व सातवें वेत ४.५७.

योनिपरत्वें निरनिराळ्या प्राण्यांच्या दुधांतील फरक व घटकांचें शेंकडा प्रमाण.

| नांव | पाणी | स्निग्धांश | मांसजनक घटक. | दुग्ध. शर्करा | निरिंद्रिय क्षार |
|---|---|---|---|---|---|
| मनुष्य | ८६.७३ | ४.१३ | १.९९ | ६.९३ | ०.२० |
| गाय | ८५.३० | ५.५५ | ३ ६७ | ४.६६ | ०.७६ |
| म्हैस | ८१.७० | ८.१५ | ४.३२ | ५.०१ | ०.८२ |
| मेंढी | ८२.२७ | ५.०३ | ७.०१ | ४.०२ | १.०० |
| गाढवीण | ९१.१७ | १.०२ | १.७९ | ५.०५ | ०.४२ |
| घोडी | ८८.०८ | २.०५ | २.१९ | ५ ६१ | ०.५० |
| सांडीण | ८६.९४ | २.०९ | ३.८४ | ५.६६ | ०.६६ |
| डुकरीण | ८४.०४ | ४.५५ | ७.२३ | ३.१३ | १.०५ |
| कुत्री | ७६.६० | ९.५५ | ९.९१ | ३.१९ | ०.७३ |
| माटी | ८१.७३ | ३.३३ | ९.५४ | ४.९१ | ०.५८ |
| हत्तीण | ६७.८५ | १९.५७ | ३.०९ | ८.८४ | ०.६५ |

चीकः—जनावर व्याल्यानंतर पहिल्या दिवशीं जो चीक निघतो तो रंगानें जास्त पिंवळट असून साध्या दुधापेक्षां जास्त दाट असतो. जनावर व्याण्याबरोबर प्रथम जो चीक निघतो त्यांत दुग्धोत्पादक पिंडांतल्या अंतस्त्वचेचा (एपियेलियम) कांहीं भाग जशाचा तसाच येतो; कारण दुग्धोत्पादक पिंडांत ज्या घडामोडी होऊन दूध तयार होतें त्या पूर्णत्वास पोंचलेल्या नसतात. या करितांच चीक निषिद्ध समजला जात असावा. चिकामध्यें थोडासा सारक गुण आहे व त्यामुळें वासरांचा कोठा साफ करण्यास त्याचा उपयोग होतो. चिकांत मांसजनक घटकांचें प्रमाण फार असतें. केसीनपेक्षां अल्ब्यूमिनचें प्रमाण अधिक असतें त्यामुळें कच्चा चीक गरम केला कीं अल्ब्यूमिनचें रूपांतर होऊन तें घट्ट होतें, व "खरवस" तयार होतो. चिकांत मांसजनक घटकांचें प्रमाण फार असल्यानें चीक व त्यापासून केलेला खरवस पचण्यास फार जड असतो. चिकांत निरनिराळ्या घटकांचें शेंकडा प्रमाण साधारणपणें काय असतें तें खालीं दिलें आहे.

गाईच्या चिकांतील घटकांचें शेंकडा प्रमाणः—(जानस्टन यांच्या शोधावरून) पाणी ७८.८, स्निग्धांश ३.५, मांसजनक घटक १२.७, दुग्धशर्करा ४.२ व निरिंद्रिय क्षार ०.८.

सू क्ष्म जं तू व त्यां चा दु धा व र प रि णा म.—दुधावर 'सूक्ष्मजंतू' (बॅक्टिरिआ)चा परिणाम फार लवकर होतो. हे सूक्ष्म जंतू क्षुद्र वनस्पतीच असतात. एका जातीच्या सूक्ष्म जंतूंच्या दुधाच्या घटकांपैकीं दुग्धशर्करेवर प्रथम परिणाम होऊन तिचें विघटीकरण होतें व "दुग्धाम्ल" ( लॅक्टिक ॲसिड ) व "कर्बाम्लवायु" ( कार्बन डाय ऑक्साइड ) तयार होतात. नंतर दुग्धाम्लाचा केसीनवर परिणाम होऊन त्याचें रूपांतर होतें व तें घट्ट होतें हा फरक घडवून आणणाऱ्या सूक्ष्म जंतूंस "दुग्धाम्ल जंतु" (लॅक्टिक बॅक्टिरिआ) म्हणतात व या दुग्धाम्लजंतूंमुळेंच दहीं विरजतें. म्हणून दह्यापासून केलेल्या पदार्थांत ते असंख्य असतात. परंतु हे जंतू अपायकारक नसून त्यांच्या साहाय्यानें अन्नपचनास मदत होते. ताकास पाचकपणा यामुळेंच येतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. हे जंतू सर्वत्र असतात म्हणून दूध उघडें राहून शिळें झालें म्हणजे नासतें. सूक्ष्म जंतूंच्या जाती पुष्कळ आहेत व त्यांच्या जातींप्रमाणें निरनिराळे फरक घडून येतात. कांहीं जातींच्या योगानें दुग्धशर्करेपासून कर्बाम्ल वायु व दारूच्या ( अल्कोहल ) जातीचे पदार्थ उत्पन्न होतात. कांहीं जातींमुळें मांसजनक पदार्थ कडवट होतात. कांहींमुळें त्यास तार व चिकटपणा येतो. कांहींमुळें त्यांचें विघटीकरण होऊन "सल्फ्यूरेटेड हायड्रोजन", "कार्बरेटेड हायड्रोजन" व "फास्फरेटेड हायड्रोजन" वगैरे वायू उत्पन्न होऊन अति वाईट घाण सुटते व कांहींमुळें स्निग्ध पदार्थांचें विघटीकरण होतें. लोणी फार दिवस निष्काळजीपणानें ठेवलें म्हणजे त्यास जी वाईट घाण येऊं लागते ती ब्युटिरिनचें विघटकिरण होऊन जें "ब्युटिरिक ॲसिड" तयार होतें त्यामुळें येते. सूक्ष्म जंतू अति सूक्ष्म असून सर्वत्र असल्याकारणानें जर दूध व त्यापासून केलेले पदार्थ वापरण्यांत थोडासा निष्काळजीपणा झाला तर सूक्ष्म जंतूंची वाढ तेव्हांच होऊन ते पदार्थ बिघडतात व याकरितांच दूधदुभत्याच्या स्वच्छतेसंबंधीं फारच काळजी घ्यावी लागते. दुधाच्या द्वारें निरनिराळ्या सूक्ष्मजंतूंमुळें उत्पन्न होणारे रोग पसरतात व अनेकांस प्राणांस मुकावें लागतें. अगदीं धारोष्ण दूध जरी घेतलें तरी त्यांत हजारों दुग्धाम्ल जंतू असतात. त्यांतल्या त्यांत धार काढतांना प्रथम निघणाऱ्या दुधांत शेवटीं निघणाऱ्या दुधांतल्यापेक्षां जंतूंची संख्या अधिक असते. साधारणपणें व्यवहारांत वापरल्या जाणाऱ्या दुधांत जंतुविरहित दूध नसतेंच असें म्हणण्यास हरकत नाहीं. थंडीच्या दिवसांत त्यांची संख्या कमी असते व पावसाळ्यांत सर्वांत अधिक

असते. डॉ. जोशी यांच्या मतें हिंवाळ्यांत एक घन इंच दुधांत ३२ लक्ष व पावसाळ्यांत ८० लक्ष यांच्या आंत सूक्ष्म जंतूंची संख्या असावी. व्यवहारांत सूक्ष्म जंतूंची संख्यागणना शक्यच नाहीं म्हणून दूध १५।२० मिनिटें उकळावें व नंतरच वापरावें हाच एक सुरक्षित मार्ग आहे. जनावरास जर सांसर्गिक रोग झाला तर त्या रोगाचे जंतू त्याच्या दुधांत येतात. पाश्चात्य देशांत क्षयी जनावरांच्या दुधानें मनुष्यास क्षयरोग होत असतो. आपल्या हिंदुस्थानदेशाचें हवामान व एकंदर परिस्थिति भिन्न असल्यामुळें इकडच्या जनावरांस क्षयरोग होत नाहीं. गाईंनां फारच क्वचित् क्षयरोग होतो. म्हशीस तो झाल्याचीं उदाहरणें नाहींत व शेळीच्या दुधाचा आपल्याकडे क्षयावर औषधाप्रमाणेंच उपयोग करतात. सूक्ष्म जंतूंची वाढ उष्णतामान ३९° ते १२२° या मर्यादेंत शक्य असते. त्याबाहेर उष्णमान असल्यास वाढ होत नाहीं. परंतु त्यांचीं बीजें मात्र मरत नाहींत. अर्थात् दूध उकळल्यास त्यांचीं बीजें सुद्धां मरून जाऊन तें पूर्णपणें जंतुविरहित होतें. दूध थंड होऊन गोठलें तरी सुद्धां त्यांत असलेले सूक्ष्मजंतु-बीज मरत नाहीं व म्हणूनच दूषित दुधापासून केलेला "मलाईका बरफ" (ऐसक्रीम) खाण्यानें अपघात झाल्याचीं उदाहरणें घडून आलीं आहेत व अजून येतातहि. यावरून दूध व त्याचे पदार्थ वापरण्यांत व ते तयार करण्यांत कोणत्याहि प्रकारें ते बिघडणार नाहींत याविषयीं दक्षता व स्वच्छता ठेविली पाहिजे.

**दूध व शरीरपोषणः**—दुधांत पाणी, स्निग्धपदार्थ, दुग्धशर्करा व निरिंद्रिय क्षार असल्यानें शरीरपोषणास आवश्यक असणारीं सर्व द्रव्यें त्यांत असतात. म्हणून पौष्टिक व सात्त्विक अन्न या दृष्टीनें तें महत्त्वाचें आहे. त्यांत असलेल्या स्निग्ध पदार्थांच्या योगानें शरीरांत उष्णता उत्पन्न होते, निरनिराळीं कार्यें घडून येण्यास आवश्यक लागणाऱ्या शक्तीचा पुरवठा होतो व प्रसंगानुसार या कार्यास उपयोगी पडण्याकरितां वसेचा (चरबी) सांठा शरीरांत होतो. मांसजनक घटकांच्या योगानें स्नायूंची वाढ होते व प्रसंगानुसार स्निग्धपदार्थांचीं कार्येंहि त्यांच्यामुळें होतात. दुग्धशर्करेनें स्निग्ध पदार्थांचीं सर्व कार्यें घडून येऊन दुधास गोड चव येते. निरिंद्रिय क्षारांच्या योगानें शरीरांतील अस्थिपंजराची वाढ होते. यांपैकीं दुग्धशर्करा, मांसजनक पदार्थांपैकीं अल्ब्यूमिन व निरिंद्रियक्षारांपैकीं कांहीं भाग विरलेल्या स्थितींत असतात; आणि मांसजनक पदार्थांपैकीं केसीन, निरिंद्रिय क्षारांचा कांहीं भाग व स्निग्धांश हे तर त्या स्थितींत असतात व त्यांचे कण इतके सूक्ष्म असतात कीं, ते त्या स्थितींत आहेत याची खात्री आपल्या नुसत्या चक्षूंनीं पटणार नाहीं. स्निग्ध पदार्थांचे सूक्ष्म बिंदु उत्तम सूक्ष्म वीक्षणीनें दिसतात तरी पण ते मांसजनक पदार्थ व निरिंद्रियक्षार सूक्ष्मवीक्षणीनेंहि दिसत नाहींत. अशी परिस्थिति असल्यानें सभावें पचन करणाऱ्या रसांचा त्यांवर परिणाम होऊन ते अगदीं सुलभपणें पचून जातात. नुकत्याच जन्मलेल्या अपत्याचें जीवित कायम राखण्यास व त्या कोमल अवस्थेंत त्याच्या शरीराचें पोषण करून तें वाढीस लावण्यास जन्मदात्या आईच्या दुधासारखें अन्न या भूतलावर दुसरें कोणतेंहि नाहीं आणि म्हणूनच या ईश्वरदत्त अन्नास "भूलोकींचें अमृत" असें अर्थपूर्ण नांव मिळालें आहे. खरोखर पाहिलें असतां गर्भधारणा, अपत्यजनन, नियमित काळपर्यंत दुग्धोत्पत्ति, प्रसवकालानंतर नियमित कालांतरानें पुनर्रजोदर्शन व त्यानंतर पुन्हां गर्भधारणा या गोष्टींचा विचार केल्यास दुग्धोत्पत्ति फक्त अपत्यसंगोपनार्थच आहे याची सत्यता मनास पटल्यावाचून रहात नाहीं व अपत्याकरितां निर्माण झालेल्या अन्नाचा ज्यांस दुसऱ्या अन्नांवर निर्वाह करण्याची पात्रता आहे अशांनीं अपहार करणें म्हणजे ईश्वरी योजनेचा भंग करणें आहे व मनुष्यप्राण्याशिवाय इतर कोणत्याहि प्राण्यांत न दिसून येणारा आपलपोटेपणा आहे यांत संशय नाहीं. परंतु दुधाकरितां जनावरें पाळून त्यांच्या दुधाचा अन्नासारखा उपयोग करण्याची वहिवाट अनादिकालापासून चालत आली असून ती इतकी हाडींमांसीं भिनली आहे कीं, दुसऱ्या योनींतील प्राण्याच्या दुधाचा उपयोग करणें म्हणजे आपलपोटेपणा होय ही कल्पनासुद्धां मनांत येत नाहीं. सारांश इतकाच कीं ही आपलपोटेपणाची तात्त्विक दृष्टि जरा एका बाजूस ठेवून सुदृढ माणसांनीं वासरें, लहान मोठीं मुलें, म्हातारीं आणि अशक्त माणसें यांची गरज भागवून उरलेलें दूध स्वतःकरितां उपयोगांत आणण्याची प्रवृत्ति ठेवावी कारण त्यांचाच हक्क दुधावर प्रथम पोंचतो.

**दुधाची परीक्षा.**—दुध अस्सल व शुद्ध आहे कीं नाहीं हें पाहण्याकरितां त्याचे गुणधर्म लक्षांत घ्यावे लागतात व परीक्षा करतांना तुलना करण्याकरितां त्याच्या घटकांचें सरासरीचें शेंकडाप्रमाण ठरवावें लागतें. दुधाच्या घटकांपैकीं पाणी व स्निग्धांश यांच्या शेंकडाप्रमाणांत सर्वांत अधिक फरक पडलेला दिसतो व मांसजनक घटक, दुग्धशर्करा, व निरिंद्रियक्षार यांच्या शेंकडाप्रमाणांत विशेष फरक पडत नाहीं. म्हणून परीक्षेकरितां स्निग्धांशविरहित घन पदार्थ (मांसजनक पदार्थ, दुग्धशर्करा व निरिंद्रियक्षार) व पाणी यांचें मध्यम शेंकडाप्रमाण तुलनेकरितां ठरवावें लागतें व नंतर परीक्षेकरितां घेतलेल्या दुधाच्या नमुन्यांत त्यांचें शेंकडा प्रमाण किती आहे हें काढून व शुद्ध दुधांतील मध्यम शेंकडाप्रमाणाशीं तुलना करून तो परीक्षेस घेतलेला दुधाचा नमुना शुद्ध आहे वा भेसळीचा आहे हें ठरवावें लागतें. दुधाची भेसळ खालीं दिलेल्या रीतीनें केलेली बहुधा आढळते. (१) गाईम्हशींचें वगैरे दूध एके ठिकाणीं मिसळणें अगर त्या

मिश्रणांत पाणी घालणें; ( आ ) शुद्ध दुधांत पाणी मिसळणें; ( इ ) शुद्ध दुधांतील थोडा फार स्निग्धांश काढून घेणें व त्यांत पाणी मिसळणें; ( ई ) विलायती पद्धतीनें क्रीम काढून घेतलेलें दुध शुद्ध दुधांत मिसळणें व त्यांत पाणी घालणें; ( उ ) शुद्ध दुधांत पाणी मिसळून त्यांत तांदूळ, बटाटे वगैरेंचें सत्त्व ( स्टार्च ) अगर साखर मिसळणें.

हे व अशा प्रकारचे भेसळीचे प्रकार वर दिल्याप्रमाणें दुधाची परीक्षा केल्यास उघडकीस येतात. दुधाची परीक्षा करतांना खालीं दिलेल्या बाबतींत परीक्षा करावी.

( १ ) दुधाचा रंग, वास व चव यावरून पाण्याची भेसळ, निरनिराळ्या दुधांची भेसळ, साखरेची भेसळ, व दूध तापवलें आहे कीं नाहीं याची थोडी फार कल्पना येते.

( २ ) सूक्ष्म वीक्षणानें परीक्षा करणें, यानें दुधांतील केरकचरा शिजविल्याशिवाय सत्त्व घातलें असल्यास कळतें.

( ३ ) विशिष्टगुरुत्व काढणें, यानें स्निग्धांशविरहित घन पदार्थांचें प्रमाण काढतां येतें.

( ४ ) स्निग्धांशाचें शेंकडा प्रमाण काढणें, यानें स्निग्धांश विरहित घनपदार्थांचें शेंकडाप्रमाण कळतें.

अशा रीतीनें परीक्षा करण्यास 'सूक्ष्मवीक्षणी' व तिचीं उपकरणें, 'उष्णतामापकयंत्रें', 'विशिष्टगुरुत्वमापक यंत्र', 'स्निग्धांशमापकयंत्र' ( ब्युटिरामिटर ) व त्याचीं उपकरणें व गणित करण्यास लागणारीं कोष्टकें व 'चलद्गुणनी' ( स्लाइड रूल, मिल्क स्केल ) वगैरे साधनांची आवश्यकता असते. वर दिलेल्या प्रकारानें दुधाची भेसळ केली असल्यास विशिष्टगुरुत्व व स्निग्धांशविरहित घनपदार्थ यांच्या शेंकडाप्रमाणांत फरक पडतो, व त्यामुळें तुलनेनें भेसळ तेव्हांच उघडकीस येते. दुधांत पाणी घातल्यानें दुधाच्या घटकांचें शेंकडा प्रमाण व विशिष्टगुरुत्व हीं कमी होतात. स्निग्धांश काढून घेतल्यानें स्निग्धांशविरहित घनपदार्थांचें प्रमाण व विशिष्टगुरुत्व हीं वाढतात व पुन्हां त्यांत पाणी घातल्यानें तीं कमी होतात, परंतु स्निग्धांशाचें प्रमाण कमीच असतें. साध्या दुधांत क्रीम काढून घेतलेलें दूध मिसळलें म्हणजे स्निग्धांशाचें प्रमाण कमी होतें व स्निग्धांशविरहित घनपदार्थांचें प्रमाण अधिक झाल्यानें विशिष्टगुरुत्व वाढतें व पाणी घातल्यानें तें कमी होतें; पण स्निग्धांशाचें प्रमाण कमी असतें. वासानें, तापवलेलें दूध किंवा शेळीचें दूध मिसळलें असल्यास कळतें. जनावरानें उग्र वासाचे पदार्थ खाल्ले असल्यास कळतात. रंगावरून गाईम्हशीच्या दुधांची भेसळ अगर पाण्याच्या भेसळीसंबंधीं कयास बांधतां येतो. चवीनें पाण्याची व साखरेची भेसळ यांसंबधीं कल्पना करतां येते. दुधाची परीक्षा करण्यास अवश्य लागणारें दुधाच्या घटकांचें सरासरी शेंकडा प्रमाण पुढें दिल्याप्रमाणें घ्यावें.

गाईच्या व म्हशीच्या दुग्धांतील सरासरी घटक अनुक्रमें:— पाण्याखेरीज घटक १३.७ व १७.२ स्निग्धांश ४.९१ व ७.३७, स्निग्धांश विरहित पदार्थ ८.८२ व ९.८.

दुधांतील स्निग्धांशाचें शेंकडा प्रमाण काढण्याची रीत.— दुधाची परीक्षा करण्याकरितां त्यांतल्या त्यांत स्निग्धांशाचें शेंकडा प्रमाण किती आहे हें माहित पाहिजे. हें प्रमाण काढण्याकरितां डॉ. गरबरचें स्निग्धांशमापक यंत्र फार सोयीचें असतें. या यंत्राबरोबर "स्निग्धांशमापक नलिका" ( ब्युटिरामिटर टेस्ट टयूब ) मिळतात त्यांवर शेंकडा प्रमाण दाखविणाऱ्या खुणा खोदलेल्या असतात.

नमुन्यांतील स्निग्धांशाचें शेंकडा प्रमाण काढण्याकरितां प्रथम स्निग्धांशमापकनलिकेंत १० क्यू. सेंटमीटर सल्फ्यूरिक ॲसिड ( विशिष्टगुरुत्व १.८२५ ) गोजून घालून नंतर ११ क्यू. सेंटिमीटर दूध व नंतर १ क्यू. सें. अमाइल आल्कोहल घालून बूच घट्ट घालावें व नलिका हलवून सर्वांचें एकजात मिश्रण करावें व नंतर स्निग्धांशमापक यंत्रांत नळी ठेवून ( बुचाचा भाग परिघाकडे करून ) झांकण बसवून यंत्र जोरानें तीन मिनिटें फिरवावें व आपोआप थांबल्यावर नळी ( बुचाचा भाग खालींकरून ) काढावी व स्निग्धांश शेंकडा किती आहे तें पहावें. कांहीं नलिकांवर "०", "१", "२", "३" असे आंकडे असतात व कांहींवर "०", "१०", "२०", '३०" असे असतात. पैकीं पहिल्या प्रकारची नळी असल्यास "१" म्हणजे शेंकडा एक व दुसऱ्या प्रकारची असल्यास "१०" म्हणजे शेंकडा $\frac{1}{10}$ स्निग्धांश आहे. असें समजावें. पहिल्या प्रकारांत "०" व "१" मधील अंतराचे दहा भाग केलेले असतात. असला प्रत्येक भाग म्हणजे $\frac{1}{10}$ शेंकडा प्रमाण दाखविणारा असतो. नळी यंत्रांत घालून फिरविली म्हणजे दुधांत जो स्निग्धांश असतो तो नालिकेच्या निमुळत्या भागांत ( तो भाग यंत्राच्या मध्याकडे असल्यानें ) एकत्रित होतो. याचें कारण यंत्र जोरानें फिरविण्यानें उत्पन्न होणारी केंद्रोत्सारिणी शक्ति आहे. सल्फ्यूरिक ॲसिडचा परिणाम दुधावर झाल्यानें मिश्रण काळें होतें व नळी गरम होते. नळी गरम आहे तोंपर्यंतच स्निग्धांश किती आहे तें पहावें. कारण नळी थंड झाल्यावर स्निग्धांश थिजतो व शेंकडा प्रमाण बरोबर मोजतां येत नाहीं. नळी थंड झाल्यास ती थोडा वेळ गरम पाण्यांत ठेवून मग काढून पहावें.

मलईमधील स्निग्धांशाचें शेंकडा प्रमाण काढण्याची रीतः— मलई घेऊन तिच्या दसपट पाणी घालून एकजात मिश्रण करावें व वर दिलेल्या रीतीप्रमाणें त्या मिश्रणांत स्निग्धांश किती आहे तें पहावें व त्याची दसपट करावी म्हणजे मूळच्या मलईंत स्निग्धांशाचें शेंकडा प्रमाण येईल.

दुधाचें विशिष्टगुरुत्व काढण्याची रीतः - हें विशिष्ट गुरुत्व काढण्याच्या तराजूनें काढतां येतें; किंवा विशिष्ट गुरुत्वमापक यंत्रानें काढावें. यांपैकीं दुसऱ्या प्रकारानें विशिष्टगुरुत्व काढणें बरें असतें. विशिष्टगुरुत्व काढतांना दूध कांचेच्या उभ्या भांड्यांत काठोकांठ भरावें आणि विशिष्टगुरुत्वमापक यंत्र ०° पर्यंत बुडवावें व नंतर आपोआप

वर येऊं द्यावें. तें स्थिर झालें म्हणजे दुधाच्या सपाटीबरोबर असणारा आंकडा वाचावा. उदाहरणार्थ उष्णमान ६०° असतांना जें विशिष्टगुरुत्व येतें तें घेण्याची वहिवाट आहे पण दुधाचें उष्णमान ६०° नेहमीं कायम असतेंच असें नाहीं. याकरितां दुधाचें उष्णमान काय आहे हेंहि त्याच वेळीं पहावें व खालीं दिलेल्या रीतीप्रमाणें दुरुस्ती करावी. दुधाचें उष्णमान ६०° या पेक्षां जास्त असेल तर साधारणपणें प्रत्येक अंशास ०.१ वर प्रमाणें आलेल्या आंकड्यांत मिळवावा व कमी असेल तर प्रत्येक अंशास ०.१ याप्रमाणें वजा करावा. उदाहरणार्थ, दुधाचें उष्णमान ६५° आहे व विशिष्टगुरुत्वमापक यंत्रानें पाहिलेला आंकडा २८.३ आहे तर त्या दुधाचें विशिष्टगुरुत्व ०.६० उष्णमान असतांना २८.३ + ५ × ०.१ = २८.८ इतकें येतें.

अशा रीतीनें काढलेला विशिष्टगुरुत्वाचा आंकडा दुधाची परीक्षा करतांना उपयोगी पडणारीं जीं सूत्रें पुढें दिलीं आहेत त्यांतलि "विशिष्टगुरुत्व" सूचक आहे हें ध्यानांत ठेवावें. खरें विशिष्टगुरुत्व म्हणजे हा आंकडा १००० त मिळवून त्या बेरजेस १००० नें भागून जो भागाकार येईल तोच. उदाहरणार्थ, वरील उदाहरणांत घेतलेल्या दुधाचें खरें विशिष्टगुरुत्व म्हणजे $\frac{१०००+२८.८}{१०००} = १.०२८८$ हेंच आहे.

दुधांतील घनपदार्थांचें शेंकडा प्रमाण काढण्याची रीतिः– दुधाचें विशिष्टगुरुत्व व स्निग्धांशांचें शेंकडा प्रमाण वर दिलेल्या रीतीप्रमाणें काढल्यावर त्यांतलि घनपदार्थांचें शेंकडाप्रमाण खालीं दिलेल्या सूत्राप्रमाणें काढावें.

दुधांतील घनपदार्थांचें शेंकडाप्रमाण =

$$\frac{\text{वि. गुरुत्व}}{४} + \frac{६ \times \text{स्निग्धांशाचें शेंकडाप्रमाण}}{५} + ०.१४$$

दुधांतील भेसळीच्या पाण्याचें शेंकडा किमान मान काढण्याची रीतः—गाईच्या दुधांतलि हें शेंकडा किमान खालीं दिलेल्या सूत्राप्रमाणें काढावें. शेंकडा भेसळीचें पाणी=

$$१००-\frac{१०० \times \text{स्निग्धांशविरहित घनपदार्थ शें.प्रमाण}}{८.५}$$

$$\text{किंवा} = १००\frac{१०० \times (\text{वि. गुरुत्व} + \text{स्निग्धांश शें. प्रमाण})}{३४.५}$$

दूध म्हशीचें असल्यास ८.५ च्या ऐवजीं ९.५ व ३४.५ च्या ऐवजीं ३७ हे आंकडे वापरावे.

गायीच्या दुधावरील किती सांका काढून घेतला आहे तें काढण्याची रीतः—

$$\text{सांयाचें शें.प्रमाण} = १००-\frac{(\text{स्निग्धांशांचें शें. प्रमाण})१००}{४.५}$$

दूध म्हशीचें असल्यास ४.५ च्या ऐवजीं ७ आंकडा वापरावा.

तापवलेल्या दुधाची भेसळ ओळखण्याची रीतिः–नमुन्यांत थोडें टिंक्चर ग्वाएकम घालावें. रंग निळा झाल्यास त्यांत तापवलेलें दूध मिसळलें आहे असें समजावें कच्च्या दुधानें रंग बदलत नाहीं. याशिवाय घ्राणेंद्रिय तीक्ष्ण असल्यास वास घेतल्यानेंहि दुधाची भेसळ कळते.

दुधांत साध्या साखरेची भेसळ पाहण्याची रीतः–१० क्यू. सेंटिमीटर दूध घ्यावें व त्यांत अर्धा ग्राम अमोनियम मोलिब्डेट् घालून त्यांत १० क्यू. सेंटिमीटर पातळ केलेलें ( १.१० ) हायड्रोक्लोरिक ॲसिड घालावें व तें मिश्रण पाण्यांत ठेवून सावकाश ८०° ( सेंटिग्रेड ) पर्यंत तापवावें. त्या मिश्रणाचा निळा रंग झाल्यास त्यांत साधी साखर आहे हें समजावें. तुलनेकरितां शुद्ध दुधाचीहि त्यावरोबरच वरीलप्रमाणें परीक्षा करावी. म्हणजे फरक तेव्हांच कळतो.

दु ध घ र.—रोजच्या घरगुती दुभत्यांत दुधाकरितां निराळी खोली नसते. परंतु दूध वगैरे जिन्नस ठेवण्याकरितां शिंकीं, कपाटें, पेट्या व कोनाडे उपयोगांत आणलेले आढळतात. पैकीं शिंक्यावर एकावर एक अशीं भांडीं ठेवावीं लागत असल्यानें वरच्या भांड्याच्या बुडाला असलेला केरकचरा अगर खालच्या भांड्यांतील पदार्थ गरम असल्यास वरच्या भांड्याच्या बुडाशीं तयार झालेले पाण्याचे थेंब बुडावर असलेल्या मळासकट खालच्या भांड्यांत असलेल्या जिनसांत पडण्याचा फार संभव असतो, म्हणून दुभतें ठेवण्यास शिंकीं अयोग्य आहेत. कोनाड्यांचीहि थोडी फार तीच स्थिति आहे. पेट्यांतील हवा खेळती न राहिल्यानें दुधास वाईट वास येऊं लागतो; व आंतील कुंद हवेमुळें पेटींत ठेवलेले पदार्थहि कुजतात. अशा पेटयांत ठेवलेलें दूध लवकर नासतें. फळ्यांऐवजीं वारीक छिद्रांच्या जाळीचा उपयोग केल्यास वरील अवगुण राहणें शक्य नाहीं. जाळीदार कपाटें दुभतें ठेवण्यास फारच चांगलीं असतात. त्यांतील हवा खेळती राहिल्यानें आंतील जिन्नस कुजत नाहींत, व कपाटांस कप्पे असल्यामुळें दूध, दहीं, ताक, लोणी व तूप वगैरे पदार्थ निरनिराळ्या कप्प्यांत ठेवतां येतात. तेणेंकरुन एकाचा संपर्क दुसऱ्यास लागत नाहीं व म्हणून ते जिन्नस बिघडत नाहींत. शिवाय जाळी व दार घट्ट असल्यानें मांजरें उंदीर, झुरळें वगैरे प्राण्यांपासून दुभत्याच्या जिन्नसांचा बचाव होतो. याकरितां दुभतें ठेवण्यासाठीं शक्य तितकें जाळीदार कपाटच वापरावें. घरगुती दुभत्याचे जिन्नस नेहमीं निराळी जागा नसल्यास स्वयंपाकघरांत ठेवणें सोयीचें असतें. परंतु या बाबतींत एक खबरदारी घेणें अवश्य आहे. ती हीच कीं, दुभत्याचें कपाट हें मोरीशेजारीं, अंधाऱ्या जागेंत अगर कोंदट ठिकाणीं नसावें. तसेंच तें चुलीजवळहि नसावें. त्याच्यासाठीं स्वच्छ उजेडाची व हवाशीर जागा असावी म्हणजे दूध वगैरे पदार्थ चांगल्या स्थितींत रहातात.

धंदा या दृष्टीनें मोठ्या प्रमाणावर देशी अगर विलायती पद्धतीप्रमाणें दुभतें करणें झाल्यास त्याकरितां दूधघर स्वतंत्र

असले पाहिजे व त्यांत निरनिराळ्या कामाकरितां स्वतंत्र खोल्या असाव्या. दूधघर बांधतांना खालीं दिलेल्या बाबी अवश्य लक्षांत घ्याव्यात.

( १ ) दूधघराची जागा हमरस्त्यावर, कोंदट व सखल ठिकाणीं नसावी. आजूबाजूस घाण पाणी मुरत असलेलें अगर वहात असलेलें नसावें.जवळपास खताच्या गारी, कचऱ्याच्या पेटग्या व शेतखाने नसावेत. दूधघरास उत्तम जागा वस्ती-पासून दूर, उंचवटयावर व हवाशीर अशी असावी.

( २ ) दूधघराची इमारत पक्की असावी. भिंतीस आंतील बाजूनें निदान ४–५ फुटांपर्यंत सिमेंटाचें प्लास्टर केलेलें असावें. जमीन पक्की चिरेबंदीची व सिमेंटानें दरजा भरलेली असावी. जमीन सिमेंटाची केल्यास फारच उत्तम. जमीनीस ढाळ ठेवावा व तीवर धुण्यास घातलेलें पाणी बाहेर गटारांत जाईल अशी व्यवस्था असावी.

( ३ ) दूधघर कौलारू अगर गच्चीचें असावें. तें कौलारू-असल्यास आंतील बाजूनें लांकडी फळ्यांची पाटणी असावी व ती वरचेवर वरच्या बाजूनें साफ करतां येईल अशी व्यवस्था-करावी. तक्तपोशी केली म्हणजे कौलांतला केरकचरा खालीं पडत नाहीं व तक्तपोशीवरून साफ करतां आली म्हणजे तीवर केरकचरा सांचत नाहीं. फटी न रहातील अशा फळ्या बसवाव्यात व आंतील बाजूनें त्यांस पांढरें रोगण लावावें अगर चुन्याची सफेती द्यावी.

( ४ ) दूधघरांतील हवा खेळती राहण्यास खिडक्या व जाळ्या कराव्या व बाहेरचा केर, माशा वगैरे आंत येऊं नयेत म्हणून जाळ्या, खिडक्या व दारें हीं दुहेरी दारांचीं असावींत. एक दार बारीक मेंकाच्या जाळीचें व दुसरें कांचेच्या तावदानांचें असावें म्हणजे भरपूर उजेड मिळतो.

( ५ ) जरूरीप्रमाणें पाण्याची व मोरीची व्यवस्था करावी व सर्व पाणी पक्क्या गटारांतून दूरवर सोडावें. दूधघराच्या आजूबाजूस निदान ३०।४० फूट मोकळी जागा असावी म्हणजे जास्त खुलेपणा राहातो. शक्य असल्यास दूधघरा-भोंवती पडवी असावी म्हणजे दूधघर जास्त थंड रहातें व वापरण्यास सोय होते.

( ६ ) दूधघरास मुबलक स्वच्छ पाण्याचा पुरवठा कर-ण्याची सोय असावी.

( ७ ) दूधघरांत दूध व क्रीमकरितां, लोण्याकरितां, सांठवणीकरितां, भांडीं वगैरे धुण्याकरितां अशा निरनिराळ्या खोल्या असाव्यात. धंद्याच्या लहानमोठ्या प्रमाणाप्रमाणें कमी अधिक खोल्या कराव्यात. दुभत्याचीं भांडीं व कपडे वगैरे उन्हांत अगर हवाशीर ठिकाणीं वाळवतां येतील अशी व्यवस्था करावी.

( ८ ) खोल्यांतून जरूरीप्रमाणें कोनाडे, फडताळें, कपाटें, खुंटया वगैरेंची व्यवस्था करावी.

( ९ ) घरगुती दुभत्यांत दुभत्याचीं कपाटें अगर पेटया दर १५।२० दिवसांनीं स्वच्छ धुवून उन्हांत वाळवाव्यात, म्हणजे पदार्थ स्वच्छ रहातात. एखादे वेळीं जर कांहीं पदार्थ त्यांत सांडला तर तो लागलीच फडक्यानें पुसावा, कपाट स्वच्छ धुवावें व उन्हांत वाळवावें म्हणजे तो जिन्नस लांकडांत मुरत नाहीं. व कपाटास घाण येत नाहीं. दुभ-त्याचें फडताळ असल्यास तें स्वच्छ मातीनें सारवावें व त्यास दर ४।६ महिन्यांनीं चुना द्यावा. धंद्याकरितां दुभतें केल्यास दूधघराची जमीन रोज सर्व काम झाल्यावर पाण्यानें स्वच्छ धुवून साफ करावी. बाहेरून येणाऱ्या माण-सास केव्हांहि पाय साफ केल्याशिवाय दूधघरांत येऊं देऊं नये. पाय व जोडे साफ करण्याकरितां दूधघराबाहेर एक लोखंडी पट्टीची खरडवणी, जोडयांचा तळ साफ कर-ण्यास जमिनींत बसविलेली असावी व दूधघराच्या दरवा-ज्याबाहेर एक खरखरीत चटई टेवलेली असावी म्हणजे दूधघरांत पायावरोवर फार घाण येत नाहीं. दुधघराचीं दारें खिडक्या वगैरेंचीं जाळीचीं दारें नेहमीं बंद ठेवावींत म्हणजे दुधघरांत माशा वगैरे फारशा येत नाहींत. दुधघरांतील कोणत्याहि जिनसास कोणाहि बाहेरच्या माणसास हात लावूं देऊं नये. व तेथें कोणताहि उग्र वासाचा पदार्थ ठेवूं नये. वापरलीं जाणारीं भांडीं वगैरे स्वच्छ धुतल्या-शिवाय तशींच केव्हांहि ठेवूं नयेत. दुधघरांतील सर्व जिन्नस नीटनेटके व्यवस्थित रीतीनें जेथल्यातेथें ठेवावेत म्हणजे आयत्यावेळीं तेथील भांड्यांचा वगैरे गोंधळ होत नाहीं व जिन्नस वेळेवर तयार मिळतात. दुधघराचें गटार व जमीन दर१५।२०दिवसांनीं चुना अगर पोटॅशपरमँगेनेटच्या पाण्यानें स्वच्छ धुवावी व दूधघराच्या भिंती वगैरेस दर सहा महिन्यांनीं मोरचूत घालून कळीच्या चुन्याची सफेती द्यावी. अशा प्रकारच्या स्वच्छतेसंबंधीं सर्व बाबी अंमलांत आणाव्यात. दूधघरांत स्वच्छतेची किती आवश्यकता आहे हें " दुधाचे गुणधर्म " या सदराखालीं सूक्ष्म जंतूविषयीं जी माहिती दिली आहे तीवरून सहज लक्षांत येईल.

दु भ त्या ची दे शी प द्ध त, धार काढणें:— धार काढ-ण्याच्या वेळीं जनावरांना स्वच्छ ठिकाणीं बांधून व त्यांचें अंग स्वच्छ धुवून मग धार काढणारानें आपले हात स्वच्छ धुवावे व धार काढण्याचें स्वच्छ कोरडें भांडें हातीं घेतल्या-वर दुसऱ्या कोणत्याहि जिनसास हात लावूं नये. वांसरूं सोडण्याबांधण्यास दुसरा मनुष्य असावा. एकाच माणसास दोन्ही कामें करावीं लागल्यास दुधांत घाण जाते. गाईची कांस कोमट पाण्यानें धुवून स्वच्छ करावी व नंतर वांसरास सोडावें. वांसरास सोडल्यावर थोड्याच वेळानें गाय पुरी पान्हवते, त्यावेळीं तिची कांस दुधानें अगदीं तुडुंब भरलेली दिसते. पान्हा सोडण्याच्या वेळीं पुष्कळ जनावरें मलमूत्रोत्सर्जन करतात. त्यावेळीं दुधाच्या भांड्यांत शितोडे न जातील अशी खबरदारी घ्यावी. शिवाय जनावरानें शेंपूट हालवून दुधांत केर पाडूं नये म्हणून त्याचें शेंपूट एका पायास दोरीनें बांधावें व जनावर लाथा मारणारें असल्यास त्यास

भाला घालावा. हीं कामें वासरूं पीत असतांना वासरूं सोड-णारानें करावीत. जनावरानें पान्हा चांगला सोडला असें पाहून धार काढणारानें आंचळापासून वासरास सोडवावें व दुसऱ्यानें वासरास आवरावें व नंतर धार काढणारानें धारेस सुरवात करावी. दोन्ही हातांनीं धार काढणें चांगलें. एकाच बाजूचीं दोन्ही आंचळें न धरतां एका हातानें एका बाजूचें पुढचें आंचळ धरलें तर, दुसऱ्यानें दुसऱ्या बाजूचें मागचें आंचळ धरून धार काढावी, म्हणजे कांसेच्या दोन्ही भागांतलि सारखें दुध निघतें. धार काढणारानें पायाच्या चौक्यावर बसून गुडघ्यांत दुधाचें भांडें धरून धार काढावी. थोड्या जनावरांची धार अशा रीतीनें विशेष त्रासाशिवाय काढतां येते. परंतु जेथें पुष्कळ जनावरांची धार काढावयाची असेल तेथें धार काढणाऱ्यास बसण्यासाठीं एक लहानशी घडवंची केल्यास त्रास कमी होतो. धार काढतांना कोणी वांक-विलेला अंगठा व चार बोटें यांच्यामध्यें आंचळ धरून धार काढतात.कोणी साध्या मुठींत आंचळ धरून काढतात.ही बाब संवयीवर अवलंबून आहे. परंतु म्हशी व जाड कातडीच्या गायी यांच्या धारेस अंगठा व बोटें यांच्यामध्यें आंचळ धरणें सोपें जातें. धार काढणारांचीं नखें वाढलेलीं नसावीत व त्यांस कोणताहि सांसर्गिक रोग नसावा. धार काढण्यास सुर-वात करण्यापूर्वी आंचळांस एखादी सडी वगैरे चिकटली आहे कीं काय हें पाहावें म्हणजे आंचळास दुखापत होण्याचा संभव नसतो. धार झटपट व पुरी काढावी. पुरें दूध न निघा-ल्यास पुष्कळ दूध देणारीं जनावरें बिघडतात व कमी दूध द्यावयास लागतात. पुष्कळ वेळां पुरें दूध न निघाल्यास अगर दुध काढण्याच्या वेळांत अनियमितपणा झाल्यास जनावरांनां आपलें स्वतःचेंच दुध पिण्याची वाईट संवय लागते. याशिवाय शेवटीं निघणाऱ्या दुधांत घृतांशाचें प्रमाण सर्वांत अधिक असतें म्हणून शेवटचें दूध जास्त सकस असतें, सबब पुरी धार काढणें अवश्य आहे. धार काढतांना जवळपास गोंगाट मुळींच नसावा व जनावर बुजेल असें वर्तन कोणींहि करूं नये. धारेच्या वेळीं पेंड, सरकी, फोल, कोंडा वगैरे न देण्याची पहिल्या वेतापासूनच वहिवाट असावी.परंतु देण्याची संवयच झाली असल्यास धारेच्या वेळीं पेंड वगैरे द्यावयासच पाहिजे, नाहीं तर दुध कमी मिळण्याचा अगर जनावर बिथरण्याचाहि संभव असतो. धारेस सुरवात करतांना प्रथम एखाद दुसरी धार जमिनीवर पाडून दुधाचा रंग नेहमीप्रमाणें आहे कीं नाहीं हें पहावें. कारण कांसेस दुखापत झाल्यास अगर आजार झाला असल्यास नेहमी-प्रमाणें दुधाचा रंग नसतो. नेहमीपेक्षां निराळ्या रंगाचें दूध दिसल्यासहि पुरी धार काढावी परंतु तें दूध दूषित असल्या-मुळें वापरूं नये; खताच्या गारींत ओतावें. या व अशा प्रका-रच्या स्वच्छतेसंबंधीं इतर सर्व बाबी लक्षांत घेऊन त्याप्रमाणें व्यवस्था ठेवल्यास शुद्ध दूध मिळतें. दूध स्वच्छ गाळण्यानें गाळून त्याचें वजन करून तें लिहून ठेवावें अगर मापणें असल्यास फेस जिरल्यावर मापावें म्हणजे चूक होत नाहीं. प्रत्येक जनावरापासून किती दूध मिळालें याची नोंद केलेली असावी.

दुधाची विल्हेवाटः—धारेनंतर दूध स्वच्छ गाळण्यानें गाळल्यावर गिऱ्हाइकांनां द्यावें. दूध मोजण्याच्या मापास दांडा असावा म्हणजे काढतांना दुधांत बोटें बुडवावीं लागत नाहींत. माप केव्हांहि जमिनीवर ठेवूं नये म्हणजे दुधांत केर जात नाहीं. दुधाचें भांडें झांकणीनें अगर स्वच्छ कपड्यानें झांकलेलें असावें म्हणजे त्यांत केर पडत नाहीं व दुधावर माशा बसत नाहींत. शिळें व ताजें आणि गाई व म्हशींचें दूध एकत्र करून विकूं नये. लांबवर दूध पाठवावयाचें असल्यास पाटी, शिंकें अगर कावड उपयोगांत आणतात अगर दूध जास्त असल्यास गाडीची जरूरी असते. दूध एका ठिकाणाहून दुसरीकडे नेतांना केव्हांहि उघडें नेऊं नये. तें चांगलें झांक-लेलें असावें म्हणजे त्यांत रस्त्यावरचा घाणेरडा केर, धुराळा पडत नाहीं व त्यावर माशा बसून तें दूषित होत नाहीं. सध्यांच्या गवळ्यांच्या वहिवाटीप्रमाणें दुधाच्या चरवींत गव-ताची चुंबळ अगर लहानशी हिरवी डहाळी घातलेली असते, त्यानें दुध उसळत नाहीं परंतु त्यांत रस्त्याचा धुरळा व केर जाऊन तें दूषित होतेंच. म्हणून दुधाच्या भांड्यांस चांगलेंच झांकण असलें पाहिजे. हल्लीं दूध नेण्याकरितां बरणीच्या आकाराचीं झांकणाचीं भांडीं मिळतात त्यांचा उपयोग करावा किंवा त्यांसारखीं पितळी भांडीं तयार करवून घेऊन त्यांस उत्तम कल्हई करून त्यांचा उपयोग करावा. असल्या भांड्यांस दूध काढण्यास नळी असते त्यामुळें प्रत्येक वेळीं माप दुधांत बुडविण्याचें मुळींच कारण पडत नाहीं. शिवाय झांकणास कडीची सोय असल्यानें कुलूप अगर मोहोर लाव-ण्याची सोय असते. त्यामुळें मध्यंतरीं दुधांत भेसळ कर-ण्याचा संभव कमी असतो. दुध वांटतांना तें नीट हलवून गिऱ्हाइकांस द्यावें म्हणजे सर्वांस एकसारखें दूध मिळतें. दूध वांटतांना कोणास किती दूध दिलें त्याचें टिपण करावें व उरलेलें दूध व वांटलेलें दूध यांची बेरीज मूळ दुधाइतकी आहे कीं नाहीं हें ताडून पहावें व कांहीं मर्यादेबाहेर फरक आढळल्यास कांहीं तरी चूक झाली असें खास समजावें. दुधाचा शुद्धपणा कायम राखण्याकरितां कोणत्याहि रीतीनें तें दूषित होणार नाहीं अशी खबरदारी घ्यावी. वांटून उर-लेलें दूध वेळ न लावतां तापत ठेवावें.

दहीं.—दहीं करण्याकरितां दूध मंदाग्नीवर संथपणें तापवावें व साधारणपणें पांचवा हिस्सा आटल्यावर तें कोमट करून विरजावें. दूध संथपणें तापलें म्हणजे त्यावर चांगली जाड "साय" येते. या सायींत दुधांतील स्निग्धां-शाचा बहुतेक भाग असतो. दूध इतर कामास वापरा-वयाचें असल्यास तें प्रथम उकळेपर्यंत तापवून नंतर वाप-रावें. दूध वाजवीपेक्षां फाजील तापल्यास व आटल्यास तांबूस रंग येतो व एक प्रकारचा चमत्कारिक वास येऊं लागतो.

दूध तापविण्याचें भांडें जाड व उत्तम कल्हईचें असावें. कल्हई न केलेल्या भांड्यांत जास्त वेळ दूध ठेवल्यास तें फळकून त्यांत तांब्याचा विपार आल्यानें तें हिरवट होतें व असलें दूध प्याल्यास मळमळूं लागतें. दूध लोण्याकरितां विरजावयाचें असल्यास साय व वरचा भाग निराळा विरजावा व दह्याकरितां खालचें दूध विरजावें म्हणजे ताक करणें व लोणी काढणें वगैरेस मोठ्या भांड्याची जरूरी नसते व सायीचें दहीं वापरल्यानें कमी होणारें लोणी वांचतें. सायीसकट विरजलेलें दहीं खाण्यास सर्वांत उत्तम असतें दूध विरजण्याकरितां ताजें ताक वापरावें; शिळें वापरल्यास दहीं चांगलें विरजत नाहीं. थंडीच्या दिवसांत विरजणाचीं भांडीं उबदार ठिकाणीं ठेवावीं म्हणजे दहीं होण्यास फार वेळ लागत नाहीं व उन्हाळ्यांत थंड ठिकाणीं ठेवावीं म्हणजे विरजण फसफसून जात नाहीं. थंडीच्या दिवसांत दूध विरजण्यास थंडीच्या मानानें बारा तासांपेक्षां जास्त वेळ लागतो व उन्हाळ्यांत हवेच्या उष्णतेच्या-मानानें बारा तासांपेक्षां कमी वेळ लागतो. दह्याला मधुर आंबटपणा आला म्हणजे तें वापरण्यास व लोणी करण्यास योग्य समजावें. विरजण जास्त शिळें झाल्यास तें फार आंबट होतें, फार फसफसतें व दुधांतील मांसजनक पदार्थ व स्निग्धांश यांचेंहि विघटीकरण होण्यास सुरवात होते; व वाईट घाण येऊं लागून कडवट चव येते. दहीं कडू, मळमळीत, पांचट, बुळबुळीत असल्यास अगर त्यास तार येत असल्यास तें दूषित झालें आहे असें समजावें व तें कोणत्याहि कामास वापरूं नये. दह्यापासून, लोणी, ताक, मठ्ठा, श्रीखंड व श्रीखंडाच्या वड्या इत्यादि पदार्थ करितात. दह्याचे घटक पाणी, स्निग्धांश, मांसजनक पदार्थ, दुग्धशर्करा, दुग्धाम्ल, निरिंद्रियक्षार हेच मुख्य आहेत. याशिवाय दह्यांत दुग्धाम्ल जंतू व कर्बाम्लवायु हे जास्त असतात.

लोणीः—दहीं घुसळून त्यापासून लोणी तयार करण्याकरितां दह्याच्या भांड्यापेक्षां मोठें, स्वच्छ व कल्हईचें भांडें घ्यावें. रवी प्रथम आधणाच्या पाण्यानें धुवावी, नंतर थंड पाण्यांत भिजवून घुसळण्यास घ्यावी. रवीच्या दोऱ्या स्वच्छ असाव्या व घुसळण्यानें दोरीचे धागे भांड्यांत न पडतील, अशी व्यवस्था ठेवावी. घुसळण्याच्या भांड्यांत दहीं घातल्यावर हलके हलके घुसळावें नाहींतर घुसळत असलेलें दहीं उसळून भांड्याबाहेर येतें व भांड्यावर व जमीनीवर सांडतें. त्यामुळें लोण्याचा बराच हिस्सा असलेला; भाग बाहेर पडल्यानें खराब होतो. मध्यंतरीं हवेच्या उष्णमानाप्रमाणें थोडें गरम अगर थंड पाणी घालावें म्हणजे लोणी लवकर येतें. लोण्याचे साधारणपणें हरभऱ्यायेवढे खडे बनल्यावर घुसळणें बंद करावें व तें भांडें स्थिर ठेवावें. म्हणजे सर्व लोण्यांतील खडे वर येतात व लोणी काढणें सोपें जातें. लोणी हातानें काढल्यानें तें मेणचट होतें व तें दूषित होण्याचा संभव असतो. तें हातानेंच काढणें झाल्यास हात चांगले स्वच्छ धुवून नंतर ओल्या हातानें लोणी काढावें. सर्वांत उत्तम मार्ग म्हणजे चमच्यानें लोणी काढणें हा होय. लोणी निराळ्या भांड्यांत काढल्यावर तें थंड पाण्यानें २-३ वेळ स्वच्छ धुवावें म्हणजे त्यांतील ताकाचा अंश निघून जातो. जितका ताकाचा अंश लोण्यांत राहील तितकें तें लवकर विघडतें. लोणी धुतल्यावर तें स्वच्छ व न कळकणाऱ्या भांड्यांत ठेवावें व त्यांत थंड पाणी घालावें. लोणी जास्त दिवस ठेवणें असल्यास त्यांत घातलेलें शिळें पाणी काढून टाकावें व रोज ताजें, थंड पाणी घालावें म्हणजे तें चांगलें टिकतें. याशिवाय एक मोठ्या तोंडाचें मातीचें भांडें घेऊन त्यांत पाणी घालावें व त्यांत लोण्याचें भांडें ठेवावें म्हणजे थंडावा चांगला राहून लोणी लवकर विघडत नाहीं. लोण्यांत घालावयाच्या पाण्यांत जर थोडें मीठ घातलें तर लोणी जास्त दिवस चांगल्या स्थितींत टिकतें. त्यामुळें त्यास थोडीशी खारट चव येते इतकेंच. लोणी जितकें थंड राहील तितकें तें चांगलें रहातें. उन्हाळ्यांत लोण्यास लवकर वास येतो याचें कारण हवेचें जास्त उष्णमान हेंच आहे. तेंच थंडीच्या दिवसांत विशेष काळजी घेतल्याशिवायहि पुष्कळ दिवस चांगलें टिकतें. दह्यापासून केलेलें लोणी चवीला आंबूस लागतें पण विलायती पद्धतीनें केलेलें लोणी आंबूस लागत नाहीं. याचें कारण विलायती पद्धतीच्या लोण्यांतील ताकाचा सर्व अंश धुवून टाकतां येतो परंतु देशी पद्धतीच्या लोण्याचे गोळे मोठे होत असल्यामुळें त्यांत असलेला सर्व अंश धुवून टाकतां येत नाहीं व याच कारणानें देशी लोणी जास्त दिवस ठेवल्यास त्याचें विघटीकरण होण्यास लवकर सुरवात होते व त्यामुळें त्यास घाण येऊं लागते. लोणी करण्यास थंड वेळ उत्तम असते म्हणूनच उन्हाळ्यांत सूर्योदयाच्या सुमारास अगर पहांटे लोणी केलें पाहिजे. लोण्यामध्यें दह्यांत असलेले सर्व घटक पदार्थ असतातच. परंतु त्याचें प्रमाण मात्र निराळें असतें. साधारणपणें शेंकडा ८० ते ८५ टक्के स्निग्धांश असतो व इतर सर्व पदार्थ शेंकडा १५ ते २० टक्के या प्रमाणांत असतात. गाईचें लोणी किंचित् पिंवळट रंगाचें असतें व म्हशीचें शुभ्र पांढरें असतें. गाईपेक्षां म्हशीच्या दुधांत स्निग्धांश जास्त असल्यानें म्हशीच्या दुधापासून गाईच्या तितक्याच दुधापेक्षां जास्त लोणी निघतें. जनावरास सरकी दिल्यानें लोण्यास जास्त घट्टपणा येतो.

ताकः—दहीं घुसळून लोणी काढून घेतल्यावर जें "ताक" मागें रहातें त्यांत दह्यांत असलेले सर्व पदार्थ असतात. स्निग्धांश सर्वांत कमी व पाणी अधिक प्रमाणांत असतें, कारण स्निग्धांशाचा बहुतेक सारा भाग लोण्यांत जातो व घुसळतांना त्यांत थोडें फार पाणी घालावें लागल्यानें पाण्याचें प्रमाण वाढतें. ताक हें कढी वगैरे पदार्थ करण्यास व नुसतें खाण्यास उपयोगी असतें. ताज्या ताकाची चव चांगली असते; पण तें जसजसें शिळें होत जाईल तसतसा त्याचा आंबटपणा वाढतो

व पुढें पुढें त्यास कडवट चव येऊन घाण येऊं लागते. ताक पाचक असून त्याचा उपयोग करण्यास वैद्य व डॉक्टर रोग्यास सांगतात. सायीसकट विरजलेलें मधुर दहीं, लोणी निराळें न होईल इतकें घुसळलें म्हणजे "मठ्ठा" तयार होतो. मठ्ठा ताकापेक्षां जास्त स्वादिष्ट असतो; परंतु पचण्यास ताकाइतका हलका नसतो व ताकाइतका त्यांत पाचक गुण नसतो.

तूप.—लोण्याचें तूप करण्यास तें कढण्याकरितां जाड भांडें घ्यावें. पातळ भांड्यांत लोणी कढवल्यास थोडी जास्त आंच लागली तर तूप करपण्याचा जास्त संभव असतो. लोणी नेहमीं माफक आंचेवर कढवावें म्हणजे तें करपत नाहीं व तुपांतील लवकर उडून जाणारा भाग तितका कमी उडतो व त्यामुळें तुपाचा खमंग स्वाद कमी होत नाहीं. घरगुती कामाकरितां तूप पक्कया कढाचें करण्यासाठीं त्यांतलें सर्व पाणी जाईपर्यंत तें तापवावें. सर्व पाणी आटल्यावर भांडें खालीं उतरावें व थंड होऊं द्यावें व साधारण कढत राहिल्यावर स्वच्छ गाळण्यांतून गाळून उत्तम कल्हईच्या भांड्यांत अगर बरण्या वगैरेंत झांकून ठेवावें. लोणी कढवलें म्हणजे त्यांत असलेलें पाणी वाफ होऊन नाहींसें होतें व पाणी व तुप शिवाय इतर पदार्थांचा कांहीं भाग भांड्याच्या बुडाशीं बसतो व कांहीं फेंसांत येतो. बुडाशीं बसलेला भाग आंचेमुळें करपून जातो व त्याची बेरी होते. तूप बाजाराकरितां तयार करणें झाल्यास तें कच्चया कढाचें ठेवण्याची वहिवाट आहे. याचें कारण त्याचें वजन जास्त होतें व गिऱ्हाइकानें तें घेतल्यावर कढवून वापरावें लागतें. परंतु तूप कच्च्या कढाचें ठेवावयाचें म्हणून त्यांत फार पाणी ठेवूं नये. थोडें पुरें होतें. तुपामध्यें लोण्यांत असलेला घृतांश मात्र असतो. आंचेमुळें त्याच्या रूपांत फरक पडतो इतकेंच. लोण्यापासून शेंकडा ८० ते ८५ टक्के तूप पडतें. दुधापासून केलेल्या इतर कोणत्याहि पदार्थापेक्षां तूप सर्वांत जास्त दिवस चांगल्या स्थितींत टिकतें. तुपांत असलेल्या निरनिराळ्या स्निग्ध पदार्थांच्या परस्पर प्रमाणाप्रमाणें व हवेच्या उष्णमानाप्रमाणें तुपांत कमी किंवा अधिक कणी तयार होते. बाजारी तूप कच्च्या कढाचें असल्यामुळें त्यांत ताकाचा अंश असतो व दुकानांत स्वच्छतेसंबंधीं पाहिजे तितकी काळजी न घेतली तर तुपास खुराळा जातो व या कारणामुळें बाजारी तूप घरच्या तुपापेक्षां लवकर बिघडतें. याशिवाय बाजारी तुपांत तेल, चरबी, बटाटे अगर अळवाच्या कांद्याचा बलक वगैरेंची भेसळ केलेली आढळते. यानेंहि बाजारी तूप लवकर बिघडतें. गाईचें तूप पिंवळट रंगाचें असतें व म्हशीचें पांढरें असतें. ताजें तूप स्वच्छ डब्यांत डाग लावून बंद करून ठेवल्यास तें कित्येक महिने चांगल्या स्थितींत रहातें.

दहीं, ताक, लोणी, तूप या दुभत्यांतील मुख्य पदार्थांशिवाय दुधापासून बासुंदी व खवा करतात. हे जिन्नस करण्यास दूध जाड भांड्यांत घालून आटवावें लागतें. बासुंदी करण्यास कल्हईचें जाड पातेलें व खवा करण्यास लोखंडी जाड कढई उत्तम असते. हे पदार्थ तयार करतांना लक्षांत ठेवण्याची गोष्ट म्हणजे माफक आंचेवर दुधाचा भाग भांड्यास लागून न करपेल असें सारखें ढवळणें ही मुख्य आहे. दूध आटून साधारण पाकाइतकें दाट झाल्यावर साखर वगैरे घालून बासुंदी करण्यास योग्य होतें. दूध $\frac{3}{4}$ ते $\frac{4}{5}$ हिस्से आटवून चवथा अगर पांचवा हिस्सा राहिला म्हणजे त्यास खवा म्हणतात. खवा करण्यास घेतलेल्या दुधांत पाण्याचें शेंकडा प्रमाण ज्या मानानें कमी अधिक असतें त्या मानानें शेंकडा २० ते २५ टक्के खवा पडतो. खव्याचा उपयोग पेढे, बर्फी वगैरे मिठाई व पक्वान्नें करण्याकडे होतो. दुधापासून तयार केलेल्या इतर कोणत्याहि पदार्थापेक्षां खवा जास्त पौष्टिक परंतु पचण्यास सर्वांत अधिक कठिण असतो. खव्यांत दुधांत असलेले सर्व पदार्थ असतात परंतु तो तयार करण्यास लागणाऱ्या आंचेमुळें त्याचें थोडेंफार रूपांतर होतें. त्यांत पाण्याचें प्रमाण फारच कमी असतें. व स्निग्धांश, मांसजनक पदार्थ व दुग्धशर्करा यांचें प्रमाण अधिक असल्यानें त्याचा पौष्टिकपणा वाढतो व तो पचण्यास फार जड असतो.

दुभत्याची विलायती पद्धत, हिंदुस्थानी व विलायती पद्धतींतील मुख्य फरक.—दुभत्याच्या इकडील व विलायतेकडील पद्धतींत फरक आहे. इकडच्या पद्धतींत दूध तापवून नंतर त्यापासून निरनिराळे पदार्थ तयार करतात. परंतु विलायती पद्धतींत ताज्या दुधापासून अगर वाफेच्या योगानें अति थोड्या वेळांत दूध तापवून व नंतर थंड करून त्यापासून निरनिराळे पदार्थ करण्यास सुरवात होते. आपल्या इकडच्या पद्धतींत दूध संथपणानें पुष्कळ वेळ तापल्यानें त्याच्यावर साय येते परंतु विलायती पद्धतींत वाफेच्या योगानें फारच थोड्या वेळांत दूध तापल्यानें व तें तापत असतांना स्थिर नसल्यानें त्यावर साय मुळींच येत नाहीं. हिंदुस्थानी पद्धतींत तापवलेल्या दुधाचें दहीं करून त्यापासून लोणी व ताक करतात, परंतु विलायती पद्धतींत थंड केलेल्या अगर ताज्या दुधापासून "क्रीम" अथवा मलई तयार करतात व ती विरजल्यावर अगर तशीच घुसळून लोणी तयार करतात. हिंदुस्थानी पद्धतींत लोण्यापासून तूप करतात. विलायती पद्धतींत तूप करण्याचा प्रघात फारच क्वचित व कांहीं विशिष्ट भागांत आढळतो. कारण तिकडे बहुधा तुपाचा प्रघात नसतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. तिकडे क्रीम व लोणी यांखेरीज "चीझ" करण्याचा फार प्रघात आहे. आपल्याकडे जसें दहीं व ताक सरसकट उपयोगांत आणतात तसाच तिकडे "चीझ" हा पदार्थ सरसकट उपयोगांत आणतात. तिकडे ताजें दूध थंड करून अथवा तापवलेलें दूध थंड करून गिऱ्हाइकांस देण्याची सरसकट व्यवस्था असते. आपल्याइकडे दूध तापवल्याशिवाय वाटण्यांत येतें. तिकडे क्रीम, लोणी, चीझ वगैरे पदार्थ दुकानांतून विकत आणण्याचा बहुधा सरसकट प्रघात आहे.

परंतु आपल्याइकडे तूप व क्वचित लोण्याशिवाय करून दुधाचे इतर पदार्थ बाजारांतून आणण्याची सरसकट वहिवाट नाहीं. दहीं, ताक, लोणी बहुधां घरगुतींच केलेलें असतें. तिकडील रहिवाशी गोमांसभक्षक असल्यानें स्वाभाविकच दुभत्याकरितां व खाटिकांच्या दुकानाकरितां विशेष फायदेशीर पडणाऱ्या अशा गाईंच्या निरनिराळ्या जाती उत्पन्न करण्याचे प्रयत्न झाले व त्यांत चांगलें यश आलें आहे. आपल्याकडे दुभत्याकरितां व जमिनीची मशागत करण्याकरितां उपयोगी पडणाऱ्या अशा निरनिराळ्या जाती उत्पन्न करण्याचे प्रयत्न देशपरिस्थितीनुरूप झाले व त्यांत यशहि उत्तम आलें. बदललेल्या परिस्थितीनें त्या जातींची सध्यां अवनति झालेली आढळते ही गोष्ट निराळी. याशिवाय दोन्हीं पद्धतींतील ठोकळ फरक म्हणजे आपल्याइकडे जनावरें दूध देण्याचीं बंद होईपर्यंत वासरांस पाजण्याची सरसकट वहिवाट आहे; याच्या उलट परिस्थिति तिकडे आहे. तिकडे सरसकट वांसरें बहुधां न पाजण्याची वहिवाट आहे.वासरांनां वरच्या दुधावर ठेवतात अगर खाटकाच्या हवालीं करतात. फक्त उत्तम दुभत्या जनावरांचीच संतति वाढूं देतात.

विलायती दुभत्यांतील मुख्य बाबी म्हणजे ( १ ) दूध आणि त्याची व्यवस्था, ( २ ) क्रीम अथवा मलई करणें, व ( ३ ) मलईपासून लोणी करणें, याच होत. यांविषयीं माहिती क्रमानें पुढें दिली आहे.

( १ ) दूध व त्याची व्यवस्थाः—प्रथम गाईची धार हातानें अगर धार काढण्याच्या यंत्रानें काढल्यावर तें फडक्यांतून अगर गाळण्यांतून गाळतात. धार काढण्याचें यंत्र प्रथम अमेरिकेंत इ. स. १८७८ मध्यें उपयोगांत आणलें. त्याचे हल्लीं अनेक प्रकार झाले आहेत. हीं यंत्रें हातानें अगर वाफ व वीज यांच्या शक्तीनेंहि चालवितां येणारीं हल्लीं मिळूं लागलीं आहेत. पाश्चात्त्य-विशेष सुधारलेल्या-देशांत यांचा प्रसार बराच झालेला आहे. तथापि पुष्कळ लोक आपल्या इकडच्या सारखीच हातानेंहि धार काढतात. या धार काढण्याच्या यंत्राचा हा फायदा आहे कीं, थोड्या वेळांत पुष्कळ गाईंची धार काढतां येते व दूध दूषित होण्याचा संभव नसतो. दूध काढून तें गाळल्यावर "रेफ्रीजरेटर" (उष्णतानिवारक यंत्र ) नांवाच्या दूध थंड करण्याच्या यंत्रानें ५५° ते ६०° इतकें थंड करून गिऱ्हाइकांनां वांटतात. अगर गाळलेलें दूध " पाश्चुरायझर " नांवाच्या यंत्रानें वाफेच्या साहाय्यानें १४०° ते १७६° पर्यंत तापवून पुन्हां रेफ्रीजरेटरच्या साहाय्यानें ५५°ते ६०° पर्यंत थंड करून वांटतात. धार काढल्याबरोबर ५५°ते ६०° अंशांपर्यंत थंड केल्यानें दुधांतील सूक्ष्म जंतू थंडावतात व त्यामुळें त्यांची वाढ उबट दुधांतल्यासारखी झपाट्यानें होत नाहीं. पुष्कळदां ज्या यंत्रानें दुधापासून क्रीम तयार करतात त्या यंत्रानें क्रीम तयार करून पुन्हां तें क्रीम त्या यंत्रांतून निघालेल्या दुधांत मिसळून तें मिश्रण-म्हणजे दूध-गिऱ्हाइकास देतात. असें केल्यानें दुधांत जो कांहीं केरकचरा असतो तो व त्यांत असलेले पुष्कळसे सूक्ष्म जंतू यंत्रांतील एका भागास चिकटून राहतात व त्यामुळें यंत्रांतून निघालेलें क्रीम व क्रीमविरहित दूध शुद्ध होतें व नंतर क्रीम व क्रीमविरहित दूध एके ठिकाणीं चांगलें मिसळलें म्हणजे पुन्हां शुद्ध दूध तयार होतें. याशिवाय " अल्ट्राव्हायोलेट " नांवाच्या विद्युत्किरणांनींहि दूध शुद्ध करतात. सूर्यप्रकाशांत ज्याप्रमाणें सूक्ष्म जंतुविनाशक धर्म आहे त्याप्रमाणेंच या " अल्ट्राव्हायोलेट " विद्युत्किरणांमध्येंहि आहे. म्हणून दुधाच्या पातळ थरावर हे किरण पाडले म्हणजे दूध सूक्ष्मजंतुविरहित होऊन शुद्ध होतें. अशा तऱ्हेचीं अल्ट्राव्हायोलेट किरणांचीं विद्युद्यंत्रें दूध शुद्ध करण्याकरितां पाश्चात्त्य देशांत बऱ्याच ठिकाणीं उपयोगांत आणतात; परंतु दूध वाफेनें तापवून नंतर थंड करून शुद्ध करण्याची पद्धत बहुतेक सर्व ठिकाणीं आहे. याशिवाय वाफेच्या उष्णतेनें दूध पूर्णपणें जंतुविरहित ( स्टेरिलाइझड् ) करून तें हवा न जाईल अशा स्प्रिंगच्या बुचाच्या बाटल्यांत भरून गिऱ्हाइकांस देण्याचीहि वहिवाट आहे. अशा रीतीनें दूध पूर्णपणें सूक्ष्मजंतुविरहित करण्यास उष्णमान २३०° ते २६०° पर्यंत न्यावें लागतें व तें निदान अर्धा तास तरी कायम ठेवावें लागतें. हें काम ज्या यंत्रानें करतात त्यास " स्टेरिलायझर " म्हणतात. दूध लांबवर रेल्वेमधून पाठवावयाचें असल्यास दुधाच्या चरवींत बर्फ ठेवण्याची व्यवस्था करतात. यानें दूध थंड राहून बिघडत नाहीं. अशा रीतीनें रेल्वेनें दूध लांबवर पाठविण्याकरितां तिकडील रेल्वेकंपन्यांनीं थंड रहाणाऱ्या स्वतंत्र डब्यांचीहि व्यवस्था केलेली असते. गिऱ्हाइकांकडे दूध रवाना करण्याकरितां ज्या चरव्या उपयोगांत आणतात त्यांनां, केरकचरा पडून दूध बिघडूं नये म्हणून उत्तम झांकणांची व्यवस्था असून चरवींतून दूध काढण्याकरितां तोटीचीहि व्यवस्था असते.

( २ ) क्रीम अथवा मलई करणेंः—पाश्चुरायझरमधून दूध तापल्यावर त्याचें उष्णमान हवामानाप्रमाणें ८५°ते९५° पर्यंत कमी करतात अगर थंड केलेल्या दुधाचें तितकें वाढवितात, व नंतर क्रीम तयार करण्याच्या यंत्रानें ( क्रीमसेपरेटर ) त्यापासून क्रीम तयार करतात. या यंत्रांतील ज्या भागांत दूध पडतें व क्रीम वेगळें होतें त्याला चक्राकार तीव्र गति देण्याची व्यवस्था असते व याच तीव्र गतीमुळें केंद्रोत्सारिणी शक्ति उत्पन्न होऊन तिच्या योगानें दुधांतील जड भाग त्या फिरत्या भागाच्या परिघाकडे फेंकला जातो व त्यामुळें त्यांतील हलका भाग म्हणजे घृतांश त्याच्या मध्याकडे एकत्र होत जातो व हाच घृतांश अधिक असलेला दुधाचा भाग म्हणजे क्रीम होय. ही मलई व मलईविरहित दुधाचा भाग यंत्राच्या निरनिराळ्या भागांत पडण्याची व्यवस्था असते. तेथून ते निरनिराळ्या नळ्यांवाटे

यंत्राबाहेर येतात. या यंत्रानें क्रीम तयार करतांना लक्षांत ठेवावयाच्या गोष्टी खालीं दिल्या आहेत.

(१) गाळलेलें दूध घेणें व दुधाचें उष्णमान ८५°ते९५° हवामानाप्रमाणें ठेवणें; उन्हाळ्यांत व हिंवाळ्यांत ९५° उष्णमान असावें. (२) क्रीम करण्याचें यंत्र साफ ठेवणें, तेल देण्याच्या भागास यंत्र सुरू करण्यापूर्वी तेल देणें व यंत्राचे सर्व भाग जेथल्या तेथें नीट बसविणें. (३) यंत्रास गति प्रथम फार थोडी देऊन हलके हलके वाढविणें व दर मिनिटास साधारणपणें ६० वेळ यंत्राचा दांडा फिरेल इतकी पूर्ण गति मिळाल्यावर यंत्रांत दूध सोडणें व दूध संपेपर्यंत हीच पूर्ण गति कायम ठेवणें. (४) काम झाल्यावर यंत्राचे वेगळे होणारे भाग स्वच्छ धुवून व्यवस्थितपणें ठेवणें.

या यंत्रांत क्रीम पातळ किंवा घट्ट तयार करतां येईल अशी व्यवस्था असते. यंत्र सावकाश चालविल्यानें पातळ क्रीम तयार होतें व मर्यादेपेक्षां अधिक वेगानें चालविल्यास क्रीम घट्ट होतें. यंत्राच्या ज्या फिरत्या भागांत क्रीम तयार होतें तो भाग जर थोडासा खालीं वर झाला तर यंत्र काम नीट देत नाहीं कारण असें झालें तर क्रीम निघालेल्या दुधांत क्रीम मिसळतें किंवा क्रीममध्यें क्रीम निघालेलें दूध मिसळतें. याकरितां तो फिरता भाग ज्यावर ठेवावयाचा असतो त्यामध्यें केव्हांहि फेरफार करूं नये.

क्रीम तयार करण्याच्या यंत्राशिवायहि दुधापासून क्रीम तयार करतात.एका उथळ अथवा खोल भांड्यांत दूध पुष्कळ वेळ स्थिर ठेविलें म्हणजे त्या दुधांतील स्निग्धांश वरच्या भागांत येतो व त्याचा एक थर तयार होतो तेंच क्रीम होय. तें चमच्यानें निराळें घेतात. या रीतीनें क्रीम तयार करण्यास वेळ फार लागतो व दूध बिघडून जाण्याचा बराच संभव असतो व त्यास हवामान विशेष थंड असावें लागतें. या सर्व अडचणी क्रीम तयार करण्याच्या यंत्रानें दूर झाल्या आहेत म्हणून यंत्राच्या साहाय्यानें बहुतेक सर्व ठिकाणीं क्रीम तयार करण्यांत येतें. दुधांत जे घटक असतात तेच क्रीममध्येंहि असतात. फरक इतकाच कीं, स्निग्धांश अधिक असतो. क्रीम म्हणजे दुधावरचा सांकाच होय. खालीं दिलेल्या कोष्टकांत क्रीम व दूध यांच्या घटकांचें शेंकडा प्रमाण दिलें आहे त्यावरून हें लक्षांत येईल.

| घटकपदार्थ | उत्तम दूध | उत्तम क्रीम | कनिष्ठ क्रीम |
|---|---|---|---|
| पाणी | ८१.१९ | २९.० | ७६.६ |
| स्निग्धांश | ०८.७० | ६७.५ | १५.१ |
| मांसजनक पदार्थ | ०४.३७ | ०१.२ | ०३.२ |
| दुग्धशर्करा | ०४.९१ | ०२.२ | ०४.५ |
| निरिंद्रियक्षार | ००.८३ | ००.१ | ००.६ |

दाट क्रीममध्यें स्निग्धांश अधिक असतो व पाणी व इतर घटकांचें प्रमाण कमी असतें. याच्या उलट स्थिति पातळ क्रीमची असते हें वरील कोष्टकावरून उघड होतें. क्रीम दुधापेक्षां हलकें असतें.कारण त्याचें विशिष्टगुरुत्व घटकांच्या परस्परप्रमाणाप्रमाणें १.०१७ पासून ०.९४७ पर्यंत बदलतें. थंडीनें क्रीम दाट होतें व उष्णतेनें पातळ होतें. क्रीमपासून लोणी तयार करितात. लोणी तयार करण्यास थंडीच्या दिवसांत क्रीम पातळ असावें व उन्हाळ्याच्या दिवसांत दाट असावें.कारण थंडीच्या दिवसांत पातळ क्रीम लवकर विरजतें व उन्हाळ्याच्या दिवसांत दाट क्रीम असलें म्हणजे दुग्धाम्ल जंतूंची वाढ कमी होऊन दूध फसफसून जात नाहीं. याचें मुख्य कारण दुग्धशर्करेचें कमजास्त प्रमाण हेंच आहे. दुग्धशर्करेमुळेंच सूक्ष्म जंतूंची वाढ होते.

मलईविरहित दूधः—क्रीम काढल्यावर जें मलईविरहित दूध रहातें त्याचाहि उपयोग साध्या दुधाप्रमाणें करतात. साध्या दुधांत फरक इतकाच कीं घटकांचें परस्परप्रमाण वेगळें असतें. मलईविरहित दुधांत स्निग्धांश फारच कमी असतो व पाण्याचा अंश दुधापेक्षां फारच जास्त असतो. मलईविरहित दुधापासून केसीनें तयार करतात. याशिवाय त्यापासून 'दुग्धशर्करा" हि तयार करतात. कारण वैद्यकांत तिचा उपयोग फार असतो.

गाईच्या दुधांत मांसजनक पदार्थ, दुग्धशर्करा, व निरिंद्रियक्षार यांचें शेंकडाप्रमाण साध्या दुधापेक्षां थोडें अधिक असल्यानें मलईविरहित दूध साध्यापेक्षां पौष्टिक असतें.

क्रीम तयार करण्याच्या यंत्राची व्यवस्थाः—या यंत्राचे सुटे होणारे भाग क्रीम तयार करणें झाल्यावरोवर वेगळे करावे व प्रथम थंड पाण्यानें धुवून नंतर ते साबणाच्या अगर धुण्याच्या सोड्याच्या पाण्यानें धुवून स्वच्छ करावे व नंतर हवाशीर ठिकाणीं व्यवस्थित रीतीनें पालथे ठेवून त्यावर स्वच्छ पातळ कापड घालून ठेवावें, म्हणजे त्यांवर केरकचरा पडत नाहीं या यंत्राच्या ज्या फिरत्या भागांत क्रीम तयार होतें त्याच्या आंतील भागास दाट पांढरा पदार्थ चिकटलेला असतो तो क्रीम समजून क्रीममध्यें मिसळूं नये. या दाट पदार्थांत दुधांतील सूक्ष्म जंतु व कचरा असतो. यंत्राचा सुटा न होणारा भाग दमट कपड्यानें पुसून स्वच्छ करावा. पाण्यानें धुवूं नये कारण त्यानें गंज चढतो.

(३)मलईपासून लोणी करणें, मलई विरजणें:—विरजण्याकरितां मलाई घेणें ती चिनी मातीच्या, कथलाच्या अगर एनॅमलच्या रुंद तोंडाच्या भांड्यांत ठेवावी व त्यावर स्वच्छ कापड झांकण घालावें. विरजण्याकरितां हें क्रीमचें भांडें थंडीच्या दिवसांत थंड ठिकाणीं ठेवावें. हवामानाप्रमाणें व कमीअधिक पातळपणाप्रमाणें आठपासून चोवीस तास मलई होण्यास वेळ लागतो. थंडींत अधिक व उन्हाळ्यांत कमी वेळ लागतो. क्रीममध्यें थोडेंसें ताजें ताक मिसळलें म्हणजे तें लवकर विरजतें. क्रीम विरजण्यास ठेविलें म्हणजे मधून मधून २।३ वेळ ढवळावें म्हणजे खालपासून वरपर्यंत तें चांगलें विरजतें; वर दाट व खालीं पाणी असें

होत नाहीं. होतां होईतों ताजें व शिळें क्रीम एकत्र मिसळूं नये. परंतु प्रसंगानुसार क्वचित् तसें करावें लागल्यास ताजें व शिळें क्रीम यांचें ढवळून एकजात मिश्रण करावें म्हणजे तें चांगलें विरजतें. क्रीम चांगलें विरजलें म्हणजे पूर्वीपेक्षां जास्त दाट होतें. नंतर तें थोडें गरम होतें व त्यास किंचित् दह्यासारखा आंबूसहि वास येतो. विरजलेलें क्रीम वाजवीपेक्षां जास्त वेळ ठेवल्यास तें फेसाळतें व फसफसून जातें व त्यास वाईट वास येऊं लागतो. त्यांत असलेल्या नायट्रोजनयुक्त पदार्थांच्या व स्निग्धांशाच्या विघटीकरणामुळें वाईट वास येऊं लागतो. हा वास अशा क्रीमपासून केलेल्या लोण्यासहि लागतो म्हणून योग्य वेळींच लोणी करावें.

क्रीमपासून लोणी करणें:—क्रीम पासून लोणी तयार करण्याचीं निरनिराळ्या प्रकारचीं लहानमोठीं यंत्रें असतात. पैकीं लांकडी यंत्रें प्रथम कढत पाण्यानें स्वच्छ धुवावीं व नंतर त्यांत थंड पाणी घालावें. लांकडांत पाणी मुरून तें चांगलें थंड झाल्यावर त्यांत क्रीम घालण्यास तें योग्य होतें. कधीं कधीं कढत पाण्यानें यंत्र धुतल्यावर त्यास आंतील बाजूनें बारीक मीठहि चोळतात. असें केल्यानें लोणी चिकटून लांकूड मेणचट होत नाहीं. विरजलेलें क्रीम दाट असतें म्हणून त्यांत थोडें थंड पाणी घालून पातळ करावें व त्यांत केशरवोंडीचा, रंग ताज्या दुधांत मिसळून अगर आयता ऑलिव्ह तेलांत तयार केलेला रंग मिसळून मोठ्या भोंकाच्या गाळणींतून गाळावें व नंतर तें गाळलेलें क्रीम लोणी तयार करण्याच्या यंत्रांत ओतावें. झांकण नीट घट्ट बसविल्यावर तें यंत्र चालू करावें. साधारणपणें दर मिनिटास ३० ते ४० वेळा यंत्र फिरेल इतकी त्यास गति द्यावी. थोड्या वेळानें आंतील कर्बाम्ल मिश्रित हवा बाहेर काढून लावण्याकरितां झांकणात असलेलें बटन दाबावें म्हणजे फुस्स असा आवाज होऊन आंतील हवा बाहेर येते. नंतर पुन्हां तें यंत्र चालवावें. मधून मधून झाकणांत बसविलेल्या कांचेकडे पहावें. लोण्याचे बारीक दाणे जसजसे तयार होत जातात तसतशी ही कांच निवळत जाऊन लोणी तयार झालें म्हणजे ती अगदीं स्वच्छ होते व तिला बाजरी अगर जोंधळ्याएवढाले लोण्याचे दाणे थोडे चिकटलेले दिसतात. ही स्थिति आल्यावर यंत्र बंद करावें क्रीम अतिशय थंड असल्यास अगर जास्त गरम असल्यास अनुक्रमें कोमट अथवा थंड पाणी घालावें लागतें. म्हणजे लवकर लोणी येतें. यंत्र अर्धें भरेल इतकें अगर त्यापेक्षां कमी क्रीम यंत्रांत ओतावें. क्रीम जास्त झाल्यास लोणी लवकर येत नाहीं. झांकणांतल्या कांचेस जोंधळ्याएवढे लोण्याचे कण चिकटलेले असून ती स्वच्छ दिसली म्हणजे १०।१५ मिनिटें यंत्र स्थिर ठेवावें म्हणजे लोण्याचे कण ताकाच्या वरच्या भागांत एकत्र होतात.नंतर झांकण काढून ताक बाहेर काढून घेण्याचें भोंक मोकळें करून ताक काढून घ्यावें. असें करतांना बाहेर येणाऱ्या ताकाच्या धारेखालीं पातळ ओलें फडकें किंवा केसांची गाळणी धरावी म्हणजे शेवटीं शेवटीं ताकाबरोबर बाहेर येणारे लोण्याचे कण त्यावर अडकतात व वांया जात नाहींत. ताकाबरोबर लोण्याचे कण येऊं लागले कीं, तें भोंक बंद करावें व लोण्याच्या दाण्यावर सुमारें ताकाइतकेंच थंड पाणी ओतावें व झांकण घट्ट बसवून एक दोन मिनिटें यंत्र सावकाश चालवावें व पूर्वीप्रमाणें थोडा वेळ स्थिर ठेवून त्या भोंकावाटे पाणी काढून घ्यावें. अशानें लोण्याच्या कणांत जो ताकाचा अंश उरलेला असतो तो धुवून जातो. याप्रमाणें ३ वेळ केल्यावर साधारण निवळ पाणी येऊं लागतें. असें झाल्यावर हें धुण्याचें काम बंद करून लोण्यावर बर्फानें थंड केलेलें पाणी घालून यंत्र स्थिर ठेवावें. बर्फाच्या पाण्यानें लोण्याचे दाणे कठिण होतात. नंतर ते दाबून त्यांतलें पाणी काढून टाकणें व त्याच्या वड्या करणें शक्य होतें. लोणी करण्यांत पुढील बाबी अवश्य पाळाव्या,(अ)सर्व लांकडी जिनसा पाण्यात भिजलेल्या व थंड पाहिजेत,(आ) रंग घेतानें किंचित पिंवळसर होईल इतकाच घालावा. (इ) वाजवीपेक्षां फाजील वेळ यंत्र चालवूं नये; कारण फाजील घुसळण्यानें लोण्याचे मोठमोठे गोळे होतात, लोणी मेणचट होतें, त्याचा दाणेदारपणा रहात नाहीं व त्यांतलें सर्व ताक धुवून काढता येत नाहीं व असलें लोणी जास्त वेळ चांगलें टिकत नाहीं. (ई) लोण्याच्या बाबतींत लागणाऱ्या पाण्याचें उष्णमान ६० पेक्षां जास्त असूं नये. (उ) लोण्यांतील ताकाचा सर्व अंश धुवून काढणें.

लोण्याच्या वड्या तयार करणें:—बर्फाच्या पाण्यानें लोण्याचे दाणे चांगले कठिण झाल्यावर लांकडी चमच्यानें ते लोणी दाबण्याच्या यंत्रावर ठेवावे व त्यांतलें पाणी तें यंत्र चालवून काढून टाकावें. या यंत्रानें लोणी वाजवीपेक्षां फाजील दाबल्यास त्याचा दाणेदारपणा मोडतो व तें मेणचट होऊन कमी प्रतीचें होतें. पाणी काढल्यावर याच यंत्रानें लोण्यांत स्वच्छ व बारीक केलेलें मीठ मिसळतात. साधारणपणें शेंकडा २।३ टक्यांपेक्षां अधिक मीठ केव्हांहि घालूं नये. पुष्कळदां लोणी तयार करण्याच्या यंत्रांतच मीठ घातलेलें बर्फाचें पाणी घालून तें यंत्र एक दोन मिनिटें सावकाश चालवितात व दाणा कठिण झाल्यावर लोणी दाबण्याच्या यंत्रावर दाबतात व मग निराळें मीठ घालीत नाहींत. लोण्यांत मीठ मिसळल्यावर लाकडी थापटणी व ठसे यांच्या साहाय्यानें लोण्याच्या चौकोनी अगर वाटोळ्या वड्या तयार करून बर्फांत ठेवतात. लोण्याच्या वड्यांस गुंडाळण्याकरितां एक विशिष्टप्रकारचा कागद केलेला असतो त्यांत त्या गुंडाळून ठेवतात. हा कागद पाण्यानें भिजला तरी साध्या कागदाप्रमाणें फाटत नाहीं, हा त्याचा विशेष धर्म आहे. बर्फांत लोणी ठेवल्यानें तें पुष्कळ दिवस चांगल्या स्थितींत टिकतें.

लोण्याचे घटकः—विरजलेल्या क्रीमचे जे घटक असतात ते सर्व लोण्यांत असतात. परंतु त्यांचें परस्पर प्रमाण मात्र भिन्न असतें. व या घटकांशिवाय त्यांत मीठ

अधिक असतें. साधारणपणें लोण्यांत शेंकडा ८० ते ८५ टक्के स्निग्धांश असतो. व शेंकडा १५ ते २० टक्के पाणी, मीठ, दुग्धशर्करा वगैरे असतात. पुढील आंकड्यांवरून लोण्याचे घटक साधारणपणें शेंकडा कोणत्या प्रमाणांत असतात तें समजेल.

मीठ घातलेलें लोणी.—पाणी १२.५०; स्निग्धांश ८४.६२; मांसजनक पदार्थ ०.४८; दुग्धाम्ल व दुग्धशर्करा ०.४०; मूळचे निरिंद्रियक्षार व मीठ २.००. शिवाय लोणी जर खवट झालें असलें तर मांसजनक पदार्थ व स्निग्धांश यांच्या विघटीकरणानें नवीन पदार्थ उत्पन्न झालेले असतात. व त्यामुळेंच अशा लोण्यास घाण येते. या विघटीकरणानेंच लोणी खवट होतें.

लोण्याची प्रत त्याच्या घटकांचें शेंकडा प्रमाण, त्याचा स्वाद, चव व रंग आणि त्याचें पॅकिंग यांवरून लावण्यांत येते. त्याचा टिकाऊपणाहि लक्षांत घेतला जातो. ताज्या क्रीमपासून केलेलें लोणी विरजलेल्या क्रीमपासून केलेल्या लोण्यापेक्षां जास्त टिकाऊ असतें. त्याचा स्वाद थोडा निराळा असतो परंतु ताज्या क्रीमपासून लोणी करण्यास थोडा अधिक वेळ लागतो. लोणी केल्यावर सर्व लांकडी जिनसा व यंत्रें प्रथम थंड पाण्यानें धुवून नंतर किंचित सोडा घातलेल्या कढत पाण्यानें ब्रशानें चोळून धुवावींत व नंतर कडकडीत पाण्यानें दोन तीन वेळ धुवून उघड्या हवेंत परंतु सावलींत व्यवस्थित रीतीनें ठेवून त्यांवर पातळ स्वच्छ कापड घालावें म्हणजे त्याच्यावर केरकचरा पडत नाहीं. लांकडी जिनसा व यंत्रें उन्हांत ठेवल्यास तीं तडकतात व खराब होतात.

चीझः—वर दिलेल्या पदार्थांशिवाय पाश्चात्त्य देशांत दुधापासून "चीझ" या नांवाचा एक पदार्थ तयार करतात व त्यास तिकडे क्रीम लोण्याइतकेंच महत्त्व आहे. चीझ तयार करण्यास केवळ दुधावर पोसणाऱ्या गाईच्या वासरांच्या पोटापासून तयार केलेल्या "रेनेट" नांवाच्या पदार्थाची आवश्यकता असते व ही गोष्ट हिंदुधर्मबाह्य असल्यामुळें निवृत्तमांस लोकांस चीझ पदार्थाचें मुळींच महत्त्व नाहीं व याकरितांच कांहीं थोड्या मिलिटरी डेअरींखेरीज कोठेंहि चीझ तयार करीत नाहींत.

केसीनः—दुधांत जे मांसजनक पदार्थ असतात त्यांत "केसीन" पदार्थ मुख्य आहे व त्याचें प्रमाणहि जास्त असतें. दुधांतील केसीन (चोथा) निराळें काढण्याकरितां मलईविरहित दूध घ्यावें लागतें. दुधापासून केसीन तयार करण्याकरितां गंधकाम्ल अथवा ॲसिटिक ॲसिडचा उपयोग करतात. मोठ्या प्रमाणांत केसीन करण्यास गंधकाम्लच बरें असतें. साधारणपणें दीड भाग गंधकाम्ल घेऊन तो सात भाग पाण्यांत मिसळावा व हें मिश्रण तयार होईल तें १००० भाग दुधापासून केसीन करण्यास पुरें होतें. मलईविरहित दुधांत वरील मिश्रण मिसळावें व तापवावें. जसजसें तें तापत जातें तसतसें केसीन वेगळें होऊं लागतें व दूध फाटल्यासारखें दिसतें. सर्व केसीन वेगळें झालें म्हणजे केसीन घट्ट होऊन त्याचा गोळा होतो व किंचित पिवळटनिळसर रंगाचें पाणी निराळें होतें. असें झाल्यावर तें पिवळट पाणी गाळून वेगळें करावें व जो पांढरा घट्ट पदार्थ गाळण्यावर रहातो तेंच केसीन होय. असलें केसीन जास्त शुद्ध करण्याकरितां सोडा कार्बोनेटच्या पाण्यांत घालून तापवावें म्हणजे तें त्या पाण्यांत विरून जातें व नंतर ॲसिटिक ॲसिड व पाणी यांचें मिश्रण घालून तापविलें म्हणजे पुन्हां तें घट्ट होऊन त्याचा गोळा होतो, नंतर गाळण्यानें तें केसीन वेगळें करावें व त्याचे बारीक तुकडे करून वाळवावे म्हणजे झालें. अशा रीतीनें केलेलें केसीन जास्त शुद्ध असतें. साधारणपणें केसीनचें प्रमाण शेंकडा साडेतीन टक्के पडतें केसीन वाळल्यानंतर गारगोटीसारखें दिसतें व तें फार कठिण असतें. शुद्ध केलेल्या केसनिमध्येंहि कॅलशियम फॉस्फेट संयुक्त स्थितींत थोडें असतेंच. केसीनचा उपयोग गोंद करणें, बटणें करणें, कागद ग्लेझ करणें, बनावट हस्तिदंत करणें, लहान मुलें व अशक्त माणसांकरितां अन्न तयार करणें वगैरे अनेक कामांकडे होतो म्हणून त्यास बाजारांत फार मागणी असते. ज्या ठिकाणीं मलईविरहित दूध रोज पुष्कळ तयार होतें व त्यास नीट भाव येत नाहीं अगर मागणीहि नाहीं अशा परिस्थितींत त्यापासून केसीन तयार करणें फार फायदेशीर पडतें. केसीन अगदीं कोरड्या स्थितींत सुरक्षितपणें ठेवलें म्हणजे बिघडत नाहीं म्हणून तें जसें तयार होईल तसें सांठवावें व बरेंच सांठलें म्हणजे एकदम विकावें. साध्या दुधापासून केसीन करणें फायदेशीर पडत नाहीं व शिवाय त्यांतला स्निग्धांश काढणें कठिण जातें.

कॅंडेन्स्ड मिल्क अथवा आटीव दूधः—हें कंडेन्स्ड मिल्क अथवा आटीव दूध साध्या अगर मलईविरहित दुधापासून करतात. तें करतांना त्यांत साखर घातलेली असते अगर नसते. दूध आटवण्याकरितां 'व्हॅक्यूमपॅनचा' (निर्वातपात्राचा) उपयोग करतात. म्हणजे उष्णतेचा दुधाच्या घटकांवर परिणाम होत नाहीं व तें पाण्याशीं लवकर मिसळून त्याचें दूध सहज तयार करतां येतें. दूध आटवतांना त्याचें उष्णमान १६०° पेक्षां जास्त ठेवीत नाहींत व साधारणपणें तीन हिस्से आटल्यावर आटवण्याचें बंद करतात व असें करतांना त्यांत सूक्ष्म जंतूंचा शिरकाव कोणत्याहि रीतीनें होणार नाहीं अशी खबरदारी घेण्यांत येते.

आटवलेल्या दुधांत कधीं कधीं तें आटण्यापूर्वी दर शेर दुधास दोन छटाक या प्रमाणांत साधारणपणें साखर घालतात. त्यामुळें तें गोड होऊन जास्त टिकाऊ होतें. आटवलेलें दूध पुष्कळ महिने चांगल्या स्थितींत रहातें व तें दुरदूरच्या ठिकाणीं पाठविणें सोईस्कर होतें. आटवलेल्या दुधाचा उपयोग लढाईच्या काळांत फौजेकरितां, दुष्काळांत गोरगरिबांकरितां, मोठमोठ्या दवाखान्यांत रोग्यांकरितां व प्रवासांत

फारच होतो. सध्या दुभत्यांत हें तयार करीत नाहींत; तें तयार करण्याचे स्वतंत्रच कारखाने असतात.

विशिष्ट श्रेणीचें ( स्टँडर्डाइझ्ड् ) दूध व क्रीम:—अशक्त, आजारी माणसें व लहान मुलांना जें दूध द्यावें लागतें त्यांत स्निग्धांश वगैरे दुधाचे निरनिराळे घटक कांहीं विशिष्ट प्रमाणांत ठेवल्यास त्यांपासून फायदा होतो. नाहीं तर प्रकृतीस अपाय होण्याचा संभव असतो. कारण स्निग्धांश वगैरेचें प्रमाण प्रकृतीस मानवेल त्यापेक्षां जास्त असल्यास अपचन होऊन विकार उद्भवतो, असा डॉक्टरांचा व वैद्यांचा अनुभव आहे; म्हणून अशा माणसांकरितां कांहीं विशिष्ट श्रेणीचें दूध तयार करून विकण्याची वहिवाट पाश्चात्य देशांत आहे. दुधांत स्निग्धांश विशिष्ट प्रमाणांत राखण्यास साधें व मलईविरहित दूध थोडथोडें मिसळतात.

दुभत्यासंबंधीं हिशोब.—हा हिशोब पद्धतशीर ठेवल्यानें अनेक फायदे आहेत. दुभतें हें धंदा या दृष्टीनें पाहिलें तर त्यांत अनेक अडचणी कोठें, कशी व कशा आल्या व त्यांचा परिणाम काय झाला याचा नक्की थांग पद्धतशीर हिशोबानेंच कळतो. मोठ्या जनावरांची व वासरांची नोंद, जनावरांची व्यक्तिशः माहिती, सामानाची यादी, चारादाण्याचा हिशोब, रोजच्या धारेचें टिपण, व्यक्तिशः गिऱ्हाइकांचा हिशोब, दूध वगैरेंची जमा व विक्रेवाट यांचा हिशोब. यांचे तक्ते करून सर्व नोंदी जेव्हांच्या तेव्हां कराव्यात. याशिवाय कीर्द व खतावणी ठेवावी. म्हणजे दुभत्याचा धंदा चांगला चालण्यास हरकत येणार नाहीं.[ले. रा. भास्कर काशिनाथ घारे.]

दुधाचे औद्योगिक उपयोग.— दुधापासून बरेच जिन्नस तयार करितात. त्यांपैकीं प्रमुख या ठिकाणीं उल्लेखिले आहेत. दूध व तूप यांचा उपयोग खाण्याकडे व मेवामिठाई करण्याकडे करतात. दुधापासून शास्त्रीय पद्धतीनें काढल्या जाणाऱ्या साखरेचा उपयोग होमिओपाथीचीं औषधें बनविण्याच्या कामीं फार होतो. जर्मन टिश्यू रेमिडीज अथवा बायोकेमिक औषधांमध्यें या साखरेचा मुख्य उपयोग करतात. मुरंबे, पाक, सरबतें इत्यादि पदार्थ नासूं नयेत म्हणून त्यांमध्येंहि दुधाची साखर घालतात. त्यायोगें हे पदार्थ दीर्घकालपर्यंत नासत अगर आंबत नाहींत. वनस्पतींच्या काढ्यांतहि दुधापासून काढलेली साखर घालतात. शेकडा एकपासून दोनपर्यंत ह्या काढ्यांमध्यें साखर घातल्यास ते नासत नाहींत. अशा प्रकारचे काढे आपल्याकडे अद्याप तयार होऊं लागले नाहींत. दुधापासून निघणाऱ्या चोथ्याचा ( केसीन ) कृत्रिम हस्तिदंत तयार करण्याच्या कामीं चांगला उपयोग होतो. या हस्तिदंताचे कंगवे, बटणें, छत्रीच्या मुठी, चाकू, मुलांचीं खेळणीं इत्यादि वस्तू करतात. आरारूट, सवागी, जस्ताचें फूल व चोथा यांच्या योग्य मिश्रणापासून तोंडाला लावण्याची गुलाबी पावडर तयार होते. त्याचप्रमाणें या चोथ्यापासून इतर कांहीं पदार्थांच्या मिश्रणानें साबण; बिलियर्डचे चेंडू, पेपरवेट्स, सोंगट्या, फांसे वगैरे वस्तू तयार करतात. यापासून अनेक प्रकारचे रंगहि करूं लागले आहेत. कापड वॉटरप्रुफ करण्याच्या कामींहि या चोथ्याचा उपयोग होतो. असे दुधापासून निघणाऱ्या या चोथ्याचे नानाविध उपयोग आहेत. [ रा. स. वा. परांजपे केमिस्ट ( टोकियो ) यांचा ' दूध व त्याचे उपयोग या लेखाचा सारांश. ]

**दुधपुर**—मुंबई इलाख्यांत रेवाकांठामध्यें हें लहानसें संस्थान आहे.

**दुधमळा जमीनदारी**—मध्यप्रांत, चांदा जिल्हा. क्षेत्रफळ ३३ चौरस मैल. जमीनदारींत एकंदर खेडीं १५ असून पैकीं ६ ओसाड आहेत. घराणें राजगोंड आहे. उत्पन्न ७०० रु. टाकोळी ३० रु. जरी गडचिरोळी–धनोरा रस्ता या जमीनदारींतून जातो तरी दुष्काळामुळें जमीनदारी बरीच खालावली आहे.

**दुध्रेज**—मुंबई इलाखा. काठेवाडमधील एक लहान संस्थान तालुकदार झाला रजपुत असून वढवाणचे भायाद आहेत. दुध्रेज हें वढवाण कँपपासून ध्रांगध्राकडे जाणाऱ्या मोठ्या रस्त्यावर आहे.

**दुबळे**—यांची बहुतेक वस्ती मुंबई इलाखा व बडोदें संस्थान यांतून आहे. लो. सं. ( १९११ ) १६८८५६. भडोच, सुरत व ठाणें जिल्ह्यांत हे मुख्यत्वेंकरून आढळतात. आपण रजपूत घराण्यांतले असून राठोड घराण्याशीं आपला निकट संबंध आहे असें हे म्हणतात. कोळ्यांप्रमाणेंच या जातींत इतर लोकांचें बरेंच मिश्रण आहे. हे बहुधा शेतकरी व मजूर असून कांहीं अनवाल ब्राह्मणांचे व इतर उच्च जातींच्या जमीनदारांचे घरगुती नोकरहि आहेत. या जातींत लोकांच्या रहाण्याच्या ठिकाणावरून २० पोटविभाग झाले असून त्यांत तालविया पोटविभागाचे लोक श्रेष्ठ समजले जातात. तालविया लोक सारविया पोटविभागांतील मुलीशीं विवाहसंबंध करतात परंतु आपल्या मुली सारविया लोकांना देत नाहींत.

मुलांचीं लग्नें १० तें २० व मुलींचीं १० ते १८ वर्षांपर्यंत होतात. मुलाचा बाप मुलीबद्दल १५ ते २० रु. देतो या दानास ते देज असें म्हणतात. खंडालिया ( सासऱ्याच्या घरीं कांहीं वर्षे नोकरी करून मग त्याच्या मुलीशीं लग्न लावणें ) ही विवाहपद्धत यांमध्यें प्रचलित आहे. पुनर्विवाह, घटस्फोट व दिराशीं लग्न करणें या सर्व चाली यांमध्यें आहेत. हे लोक मांसाहारी असून यांना घोरपडी फार आवडतात. हे दारू फार पितात. हे चोंधा वगैरे खालच्या जातीच्या हातचें अन्न खात नाहींत.

हे लोक वन्यहिंदु आहेत. भूतपिशाच्चाशिवाय ते हनुमान, शिकोत्री, अगाशी इत्यादि देवतांची पूजा करतात. हे ब्राह्मणांना मान देतात व विवाहसंस्कार व नामसंस्कार त्यांच्याकडून करतात.

महारोग, देवी, इत्यादि संसर्गजन्य रोगांनीं मेलेलीं माणसें हे पुरतात. कोठें कोठें पूर्वजांची लांकडी मूर्ति करून रविवारीं व गुरुवारीं तिची पूजा करण्याची चाल यांच्यामध्यें आहे. खेड्यांच्या सभेंत जातीसंबंधीं प्रश्नांचा निकाल दिला जातो. भ्रष्ट झालेल्या बायकांना जातींत घ्यावयाचें असल्यास त्यांना प्रायश्चित घ्यावें लागतें व प्रायश्चिताचा खर्च नवऱ्याला अगर तिच्या आईबापांना सोसावा लागतो. [ सेन्सस रिपोर्ट (मुंबई ) १९११. ]

**दुमाला**—मूळ फारशी शब्द दुंबाला. मागील बाजू. पिछाडी पाठपुरावा असा धात्वर्थ;रूढार्थ हवाला; ताब्यांत देणें; दोन धनी असणें. खालीं केलें असतां ज्याचा तावा सरकारकडे जातो तें; दुमाले गांव म्हणजे दोन अंमली ( सरकार व जहागीरदार ) गांव. दुमालदार म्हणजे वरील गांवचा जहागिरदार. या गांवचा हिशेब तो दुमालझाडा. येथील अंमल तो दुमाल अंमल. पण हल्लीं सामान्यपणें इनाम या अर्थी दुमाला शब्द वापरतात.

**दुर्गादास राठोड**—महाराज यशवंतसिंग जोधपूरचा राणा याचा दुर्गादास हा अत्यंत विश्वासू सरदार होता. जोधपूरराज्यांत लूनी नदीच्या कांठीं गंगनी टाकुरातीचा मालक दुर्गादास ठाकूर होता. तो कर्णावती शाखेचा रजपूत होता. हल्लीं या गांवीं त्याचा वंश रहात नाहीं. दुर्गाच्या बापाचें नांव आस्तेराज.

यशवंत ( जसवंत ) सिंहास औरंगझेबानें काबूलवर पाठविलें असतां तेथें तो मेल्यावर ( १६७८ ) त्याच्या राणीवर व मुलावर सूड उगविण्याचें त्यानें ठरविलें व त्याप्रमाणें जोधपूरच्या गादीवर आपल्या एका हस्तकास बसवून राणी व मुलें यांना आपल्या ताब्यांत देण्याबद्दल त्यानें तगादा चालविला. अनेक वेळां त्यांना पकडण्याचे प्रयत्नहि त्यानें केले ( १६७९ ), परंतु ते सर्व ज्यानें विफळ केले तो हा दुर्गादास होय. त्यानें अनेक युक्त्या करून एकदां तर खुद्द दिल्लीस लढाई मारून त्या मंडळीस जोधपुरास सुरक्षित पोहोंचविलें. यावेळीं यशवंताचा पुत्र अजित हा गादीवर बसला व दुर्गादास हा त्याचा प्रधान झाला. दुर्गादासानें उदेपूरच्या राजसिंहाचें सहाय्य घेतलें, व बहुतेक राजपुताना एक करून त्यानें औरंगझेबास त्रास देण्यास सुरवात केली. त्यामुळें औरंगझेब स्वतः आपल्या सर्व मुलांसह राजपुतान्यांत आला ( १६८० ) परंतु त्याच्यानें सर्व रजपूत राजे उठले होते त्यांचा पराभव झाला नाहीं. इतक्यांत दुर्गादास व त्याची मालकीण यांनीं औरंगझेबाचा पुत्र अकबर यालाच त्याच्याविरुद्ध उठविलें. परंतु औरंगझेबानें नेहमीची कपटयुक्ती रचिली. त्यानें अकबरास एक बनावट पत्र लिहून तें दुर्गादासाच्या हातीं पडेल अशी तजवीज केली. त्यांत तूं रजपुतांस फसवून येथपर्यंत आणलेंस हें चांगलें केलें. आतां पुढून मी व मागून तूं त्यांना ठार मारून टाकूं असा मजकूर होता. तें पाहून दुर्गादास आपल्या सर्व रजपुतांना घेऊन निघून गेला; व अकबरहि नाइलाजानें पळून गेला. मागून औरंगझेबाची ही लुच्चेगिरी उघडकीस आली. जर वरील प्रसंगीं रजपूत व अकबर यांनीं एकदम औरंगझेबावर हल्ला केला असता, तर तो खास पकडला गेला असता.पुढें दुर्गादासानें अकबरास औरंगझेबाच्या सर्वत्र पसरलेल्या सैन्यांतून सुरक्षित दक्षिणेंत संभाजी छत्रपतींच्या दरबारीं आणून सोडिलें ( १६८१ ) चार वर्षें रजपुतांचा व औरंगझेबाचा झगडा चालला होता; परंतु औरंगझेबाला जय अखेरपर्यंत मिळाला नाहीं. उलट अपमानकारक अटी कबूल करून त्यानें त्यांच्याशीं तह केला ( १६८१ ). या सर्व कामांत दुर्गादास होता. त्याचा भाऊ सोनिंग हाहि त्याच्यासारखाच शूर होता.

दुर्गादास हा मुत्सद्दी, स्वामिनिष्ट, स्वदेशाभिमानी होता. त्याच्याबद्दल अनेक दंतकथा प्रचलित आहेत. औरंगझेब दख्खनमध्यें शिवाजी छत्रपतीस व उत्तरेकडे दुर्गादासास भीत असे असें म्हणतात.अकबराकडून फोडण्यासाठीं व चंद्रावती व अजितसिंह यांना आपल्या स्वाधीन करण्यासाठीं औरंगझेबानें त्याला पुष्कळदां लांच(एकदां ८हजार सोन्याच्या मोहरा ) देऊं केला, पंचहजारी मनसबदारी देऊं केली पण तो फितला नाहीं. अद्यापि सुद्धां त्याला राजपुतान्यांत फार मान देतात. त्याच्याबद्दल पुढील दोहा प्रसिद्ध आहे. " ए, माता! पूत ऐसा जीन । जैसा दुर्गादास ॥ बंद मुद्रा रोखियो। बिन खंबा आकाश ॥ " ( हे आई,तूं दुर्गादासासारखा पराक्रमी पुत्र प्रसव ).

दुर्गादासाचा पुत्र तेजसिंह हाहि शूर होता. अकबराला दख्खनमध्यें नेतांना तोहि दुर्गादासाबरोबर होता. दुर्गादास उदार होता. त्याच्या शत्रूंनीं त्याचा भाऊ सोनिंग याचा खून केला असतां व ते त्याच्या हातीं लढाईत अनेकदां सांपडले असतांहि त्यानें त्यांचा सूड घेण्यासाठीं वध केला नाहीं. नाहीं तर रजपूत हे सूड घेण्याच्या कामीं फार प्रख्यात आहेत. त्यानें अकबराच्या बायकापोरांचा चांगला संभाळ केला. एवढेंच नव्हे तर औरंगझेबानें आपल्या नातींच्या सुटकेची खटपट चालविली असतां,आग्र्याच्या राजवाड्यांतील जनानखान्यापेक्षां येथें दुर्गादासाच्या ताब्यांत आम्ही सुखांत आहों, असें त्या नातींनें व अकबराच्या बेगमांनीं त्याला कळविल्याचें ऐकण्यांत आहे. दुर्गादास जसा पवित्र होता तसाच आपल्या लोकांचा आवडता होता व त्याचें वजनहि त्यांच्यावर फार होतें. नाहीं तर सतत सहा वर्षें अजितसिंहाला त्यानें जें गुप्तपणें निरनिराळ्या ठिकाणीं ठेविलें होतें ,तें शक्य झालें नसतें. राजपुतान्यांत त्याच्या तसबिरी अद्यापि भक्तिभावानें पूजितात. पांढऱ्या घोड्यावर पांढऱ्या पोषाकाचा व म्हातारपणामुळें दाढी आणि केस पांढरे झालेला दुर्गादास या चित्रांतून चितारलेला असतो. [ टॉड—राजस्तान, भा. २; इलियट डॉसन; जदुनाथ—औरंगझेब. भा. ३, ४, ५; संभाजी महाराजांची बखर. ]

**दुर्गादेवी**—इ. स. १४६८ मध्यें. महाराष्ट्रांत जो सात वर्षांचा मोठा दुष्काळ पडला होता त्यास 'दुर्गादेवी' या नांवानें संबोधण्यांत येत असे. सात वर्षानंतर (१४७५) पुन्हां पाऊस वेळच्यावेळीं पडूं लागला. परंतु या दुष्काळांत सर्व देश उजाड झाला असल्यामुळें, गोदावरी व कृष्णा या दोन नद्यांच्या दरम्यानच्या प्रदेशांतून तिसाहूनहि अधिक वर्षेपर्यंत फारच थोडा वसूल गोळा केला जाई. याचा नक्की काळ राजवाडेयांनीं एका पत्राधारें 'सरस्वतीमंदिरां'त प्रसिद्ध केला आहे. या दुष्काळांत मोंगलाईंतील गोदावरीकडील पुष्कळ घराणीं वरघाटीं आलीं. त्या वेळच्या कागदांतून त्यास दुर्गाडी म्हणत. त्यांत सर्व देश उजाड झाला, सरकारी वसूल थकला; पैठण, पुणतांबें येथें असलेलीं प्राचीन संस्कृत विद्यापीठें बंद पडलीं. त्यामुळें महाराष्ट्रांतील अनेक पंडित घराणीं काशीस गेलीं. हल्लीं काशी येथील महाराष्ट्रीय पंडित घराण्यांचा पूर्वेतिहास असा आहे. वतनें बंद पडल्यामुळें जुनीं देवस्थानें लयास गेलीं. सारांश महाराष्ट्राची फार हलाखी झाली. ती सांवरण्यास २५।३० वर्षे लागलीं. हल्लींच्या महाराष्ट्रांतील पाटिलक्या, देशमुख्या वगैरे अधिकार दुर्गाडीनंतरच्या आहेत असें राजवाडे म्हणतात. [ सरस्वतीमंदिर. त्रैमासिक. ]

**दुर्गाबाई**—राघोबादादा पेशव्याची जानकीबाई नांवाच्या पहिल्या बायकोपासून झालेली कन्या. ही बाबूजी नाईक बारामतीकरांच्या पांडुरंगराव नांवाच्या मुलास दिली होती. आपल्या आईबापांनीं नारायणरावास मारिलें हें कृत्य हिला आवडलें नाहीं म्हणून हिनें त्यांची निर्भत्सना केली. ही धारमाईच्या पक्षाची असल्यामुळें सवाई माधवरावाच्या जन्माच्या वेळीं हिला नानाफडणिसानें मुद्दाम पुरंदर किल्ल्यावर गंगाबाईच्या जवळ ठेविलें होतें. आनंदीबाई हिची सावत्र आई असल्यानें व हिनें नानाचा पक्ष स्वीकारल्यानें आनंदीबाईनें रावबाजीस बारामतीकरांना त्रास देण्यास सांगितलें होतें व त्याप्रमाणें रावबाजीनें पुढें त्यांचा सरंजाम जप्त केला. दुर्गाबाईचें लग्न ७ फेब्रु. १७७३ रोजीं झालें. ज्ञा. को. वि. ७ यांत दुर्गाबाई ही आनंदीबाईची कन्या म्हटलें आहे (८. १५७ आ.) तें त्या ठिकाणीं दिलेल्या पुराव्यावरून म्हटलें आहे. [ पेशव्यांची बखर, पेशवाईची अखेर. ]

**दुर्गावती राणी**—चन्देल रजपूतवंशीय महोबाचा राजा सालवाहन याची ही कन्या. गढामंडळ (गढ मंडला) येथील रजपूत कच्छवाहशाखीय दलपत या राजास ही दिली होती. दलपतचा बाप गोविंद उर्फ अमानदास नांवाचा होता. याचवेळीं सालवाहन हा गरीब झाल्यानें त्यानें गढमंडल्याच्या (आपल्याहून छोट्या) राजास मुलगी दिली. ही फार सुंदर होती. कांहीं ठिकाणीं दलपतनें दुर्गावतीच्या संमतीनें तिला तिच्या बापाच्या घरून जबरीनें नेलें व तो सिंगलगर्दा येथील राजा होता असें म्हटलें आहे. लग्नानंतर चार पांच वर्षांनीं दलपत मेला व दुर्गावतीनें आपल्या लहान वीर नारायण नांवाच्या मुलाच्या नांवानें राज्यकारभार चालविला. अकबरास राज्यलोभ सुटून व राज्य चालविणारी बाई आहे असें पाहून त्यानें आपला सेनापति असफखान यास ६ हजार घोडदळ, १२ हजार पायदळ व तोफखाना यांसह राणीवर पाठविलें. राणीनें आपल्या थोडक्याशा सैन्यानिशीं त्याला तोंड दिलें. पुष्कळ वेळपर्यंत तिनें त्याला दाद दिली नाहीं. मोठ्या शौर्यानें हत्तीवर बसून ती लढत होती; इतक्यांत एक तीर लागून तिच्या डोळ्यास जखम झाली व वीरनारायणासहि भयंकर जखम झाली. तरीहि ती लढतच होती. एवढ्यांत पुन्हां दुसरा तीर राणीच्या मानेंत घुसला. यावेळीं तिचे लोक बहुतेक ठार झाले होते. शत्रु जवळ येत आहेत असें पाहून तिनें महाताजवळील खंजीर हिसकावून घेऊन आपल्या छातींत खुपसला. याप्रमाणें जिवंत शत्रूच्या हातीं सांपडून अप्रतिष्ठा होण्यापेक्षां तिनें मरण पत्करिलें. वीरनारायणास त्याच्या सरदारांनीं चूडागड येथें गुपचिपपणें नेलें; परंतु असफखानानें तेथें जाऊन गडास वेढा दिला. अठरा वर्षांच्या वीरनारायणानें आईप्रमाणें शेवटपर्यंत लढून आपला प्राण रणांगणांत सोडला. नंतर मुसुलमानांच्या हातीं लागूं नये म्हणून तेथील सर्व राजस्त्रियांनीं जोहार केला याप्रमाणें गढमंडलाचें राज्य मुसुलमानांच्या हातीं गेलें (१५६४).

दुर्गावतीचा हा राजमहाल मदनमहाल नांवानें प्रख्यात असून हल्लींच्या जबलपूर (मध्यप्रांत) जिल्ह्यांत आहे. या वंशांतील एक पुरुष बहारप्रांतांत गेला; हल्लींचा गिधूर (मोंगीर जिल्हा. बहारप्रांत) येथील राजा या पुरुषाचाच वंशज होय असें म्हणतात. [ विन्द्रीज-अकबरनामा; स्मिथ-ऑक्सफर्ड हि. इं. मध्ययुगीन. भारत. भा. २; वील. ]

**दुर्बिण**—हें दूर अंतरावरील पदार्थ पहाण्याचें दृग्यंत्र आहे. या यंत्राचा शोध कोणी लावला यावद्दल अनेक वेळां वादविवाद झालेला आहे. डेमॉक्रिटस यानें आकाशगंगा ही अनेक तारकासमूह मिळून झालेली आहे असें प्रसिद्ध केलें त्यावरून त्याला दुर्बिण माहीत असावी असा कित्येकांचा तर्क आहे. त्यानंतर बेकन, पोर्टा, डिजेस वगैरे शास्त्रज्ञांच्या ग्रंथांतून सांपडणाऱ्या कांहीं उल्लेखांवरून त्यांस दुर्बिणीसारखें एखादें यंत्र माहीत असावें असा कित्येकांचा तर्क आहे. तथापि इ. स. १६०० च्या पूर्वी दुर्बिण अज्ञात होती; निदान तिचें व्यावहारिक महत्त्व पटलें नव्हतें ही गोष्ट मात्र खरी. दुर्बिणीच्या शोधाचें श्रेय लिपर्से, जॅनसेन आणि मेरिअस या तिघांपैकीं कोणाकडे द्यावयाचें हें अनिश्चित आहे. यांपैकीं कोणी तरी इ. स. १६०८ च्या सुमारास हॉलंडमध्यें दुर्बिणीचा शोध लावला ही गोष्ट मात्र खरी.

दुर्बिणीचा शोध लागल्यावर लवकरच तिचा प्रसार सर्व यूरोपभर झाला, व १६०९ सालीं गॅलिलिओ यास पदुआ येथें जी अध्यापकाची जागा मिळाली ती त्यानें केलेल्या एका दुर्बिणीमुळेंच होय असा समज आहे. गॅलिलिओ, प्रथम एक बाह्यगोल व एक अंतर्गोल अशीं दोन भिंगें (लेन्स) एका

शिशाच्या नळीच्या दोन तोंडांत बसवून आपली दुर्बिण तयार करी. यानें आपलें सर्व आयुष्य दुर्बिणीची सुधारणा करण्यांत घालविलें व दृश्य पदार्थ तीन पटींपासून तेहेतीस पटींइतका मोठा दिसेल इतकी प्रगति त्यानें दुर्बिणींत केली. या सर्वांत मोठ्या दुर्बिणीनें गुरूचे उपग्रह, सूर्यावरील डाग, शुक्राच्या कला आणि चंद्रावरील पर्वत आणि दऱ्या यांचा शोध लावला. तसेंच गुरूचे उपग्रह गुरूभोंवतीं फिरतात हें सिद्ध केलें आणि सूर्याची स्वतःच्या अक्षाभोंवतीं गति सिद्ध करून कोपर्निकसच्या मतास पुष्टि दिली. गॅलिलिओच्या या शोधांमुळें या विशिष्ट तऱ्हेच्या दुर्बिणीस त्याचेंच नांव पडलें.

केप्लरनें दुर्बिणीमध्यें दोन्हीहि बाह्यगोल भिंगें वापरण्यापासून कांहीं विशिष्ट फायदे आहेत असें दाखविलें व अशा तऱ्हेची दुर्बिण सीनर यानें प्रथम तयार केली. अशाच तऱ्हेची विशेष महत्‌दर्शक शक्तीची दुर्बिण ह्यायगेन्झ यानें आपल्या भावाच्या मदतीनें तयार केली. अशा तऱ्हेच्या बारा फूट केंद्रांतराच्या दुर्बिणीनें त्यानें शनीचा सर्वांत तेजस्वी उपग्रह ( टायटन ) १६५५ सालीं शोधून काढला, व शनीच्या कड्याचें स्पष्टीकरण प्रसिद्ध केलें. परंतु या दुर्बिणीनें दिसणारी प्रतिमा गॅलिलिओच्या दुर्बिणीइतकी स्पष्ट दिसत नाहीं व महत्‌दर्शकता वाढविण्यास केंद्रांतर वाढवावें लागतें. अशा तऱ्हेच्या ३०० फुटांपासून ६०० फुटांपर्यंत केंद्रांतर असणाऱ्या दुर्बिणी ऑझौत वगैरेंनीं तयार केल्या. व जेम्स ब्रॅड्ले यानें एका दोनशेसवाबारा फूट केंद्रांतराच्या दुर्बिणीनें शुक्राचा व्यास मोजला. या दुर्बिणीला नळी वापरीत नसत. त्यामुळें 'तीस हवादुर्बिण' असें म्हणत. परंतु या दुर्बिणींचा उपयोग करणें फार त्रासदायक असे.

परावर्तक दुर्बिण.—न्यूटननें निरनिराळ्या रंगांच्या प्रकाशांच्या वक्रीभवनामध्यें फरक असतो हें सिद्ध करून दाखवीपर्यंत दुर्बिणींतून दिसणाऱ्या दृश्यामध्यें भिंगाच्या वक्रतेपासून उद्भवणाऱ्या चुकीपेक्षां इतर चूक असण्याचा संभव असेल अशी शास्त्रज्ञांस कल्पना नव्हती, ग्रेगरी यानें असें दाखविलें कीं, भिंगाचे वक्र जर गोलीयच्छेदांत असतील तर त्यांतून पडणारी प्रतिमा मूळ पदार्थाच्या बाजूला थोडीशी अंतर्वक्र असते. परंतु ही चूक शंकुच्छेदीय वक्रतेचीं भिंगें वापरल्यास दुरुस्त होते. परंतु त्याला इष्ट त्या वक्रतेचीं भिंगें तयार करून दुर्बिण करतां आली नाहीं व परावर्तक दुर्बिण प्रथम बनविण्याचें श्रेय न्यूटनला मिळालें. त्याच्या मतें वक्रीभवनात्मक दुर्बिणींतील चूक भिंगाच्या गोलच्छेदीय वक्रतेमुळें होत नसून भिन्न रंगांच्या प्रकाशांच्या भिन्न वक्रीभवनामुळें होत असली पाहिजे. त्यानें अनेक प्रयोग करून प्रथम हें ठरविलें कीं, कोणत्याहि रंगाच्या प्रकाशाच्या किरणाचा आपातकोन परावृत्त कोनाबरोबर असतो. यावरून त्यानें कथील व तांबें यांच्या मिश्र धातूची दुर्बिणींतील परावर्तकाच्या ठिकाणीं योजना करण्याचें अनेक प्रयोगानंतर ठरविलें. न्यूटनच्या पहिल्याच दुर्बिणींतून त्याला गुरूचे उपग्रह व शुक्राच्या कला पाहतां आल्या. यानंतर या दुर्बिणींत जॉन हॅड्ले यानें प्रगति करून स. १७२३ मध्यें, सहा इंच मुख व ६२⅚ केंद्रांतर असून धातूचा परावर्तक घातलेली अशी २३० पट महत्‌दर्शक दुर्बिण तयार केली हॅड्ले यानें ही युक्ति ब्रॅड्ले व मोलिनो यांस सांगितली. त्यांनीं अनेक दुर्बिणी तयार केल्या व त्यांपैकीं कांहीं फारच महत्‌दर्शक होत्या. व एकीचें केंद्रांतर अवघें ८ फूट होतें. मोलिनो याजपासून ही युक्ति स्कार्लेट आणि ह्यर्न या दोन लंडनमधील चष्मे करणाऱ्यांस मिळाली व त्यांनीं व्यापारी धोरणानें दुर्बिणी करण्यास सुरवात केली. तथापि ग्रेगरीच्या शोधास व्यावहारिक स्वरूप देण्याचें कार्य एडिंबरो येथील शॉर्ट यानें केलें. हा आपल्या दुर्बिणींत प्रथम कांचेचे परावर्तक वापरीत असे पण पुढें तो धातूचे वापरूं लागला. यानें ग्रेगरी पद्धतीच्या अनेक दुर्बिणी तयार केल्या व पुष्कळ संपत्ति मिळविली. याच्या कांहीं दुर्बिणी अद्यापिहि चांगल्या स्थितींत आहेत.

निर्वर्ण दुर्बिणी.—चेस्टर मूर हॉल यानें असें पाहिलें कीं, मनुष्याच्या डोळ्याला असलेल्या भिंगांतून त्याच्या विशिष्ट आकारामुळें अशा तऱ्हेनें किरणांचें वक्रीभवन होतें कीं, नेत्रांतःपटलावर पूर्णपणें निर्वर्ण प्रतिमा पडते. त्याअर्थी अनेक भिन्न भिन्न वक्रीभवनशक्तींच्या भिंगांची एकत्र योजना करून हाच परिणाम कृत्रिम रीतीनें घडवून आणतां येणें शक्य आहे. अनेक प्रयोगांतीं व अनेक प्रकारचीं भिंगें योजून वक्रीभवनामुळें उद्भवणारी चूक घालवितां येते असें त्यास आढळून आलें व १७३३ सालीं पूर्णपणें निर्वर्ण प्रतिमा पाडणारी दुर्बिण त्यानें बनविली. परंतु हॉलनें या शोधाचा कांहींच उपयोग करून घेतला नाहीं. व हा शोध डोलंड यानें स्वतंत्र रीतीनें पुन्हां लावला. यानंतर विल्यम हर्शेल यानें निरनिराळे परावर्तक तयार करण्यांत बरेच परिश्रम करून तीन अतिशय उत्तम अशा दुर्बिणी तयार करून आपले ज्योतिषशास्त्रांतील अत्यंत महत्त्वाचे शोध लावले. या परावर्तक दुर्बिणमुळें शुद्ध व पूर्णपणें समघटक अशीं कांचेचीं अखंड भिंगें तयार करण्यास जी मोठी अडचण पडत असे ती दूर झाली. आतां थोडक्यांत यांपैकीं कांहीं दुर्बिणींची माहिती देऊं.

वक्रीभवनात्मक दुर्बिणः—या दुर्बिणींत पदार्थाच्या बाजूला एक बाह्यगोल भिंग बसविलेलें असून त्यांतून त्या पदार्थाची लहानशी प्रतिमा पडते. तीं डोळ्याजवळ असलेल्या अंतर्गोल अगर बाह्यगोल भिंगांमुळें आपणांस मोठी होऊन दिसते. जेव्हां डोळ्याजवळच्या भिंगाचा व पदार्थाकडील भिंगाचा अक्ष एकाच रेषेंत असतो आणि दोहींकडील भिंगांचें केंद्र एकाच ठिकाणीं येतें त्यावेळीं पदार्थाकडील कांचेंतून येणारे समांतर किरण डोळ्याकडील भिंगांतूनहि समांतरच बाहेर पडतात, व त्यांचें डोळ्यांतील भिंगामधून जातांना केंद्रीकरण होऊन पदार्थाची प्रतिमा

नेत्रांतःपटलावर पडते. जरी दृक्‌शास्त्रीय कांचा तयार करण्यामध्यें यान्याच सुधारणा झाल्या आहेत तरी १७५८ सालीं डोलंड ज्या तऱ्हेच्या क्राउन व गारेच्या कांचा वापरीत असे त्याच तऱ्हेच्या जवळ जवळ आजहि मोठाल्या वक्रीभवनात्मक कांचा दुर्बिणींतून वापरण्यांत येतात. क्राउन कांच व गारेची कांच यांतून येणाऱ्या सूर्यकिरणांचा विच्छिन्न किरणपट निरनिराळा असतो ही गोष्ट अनेक दिवसांपासून परिचित आहे. गारेच्या त्रिपार्श्वातून येणारा विच्छिन्नकिरणपट निळ्या बाजूला ओढल्यासारखा दिसून तांबड्याबाजूकडे आवळल्यासारखा दिसतो, व क्राउन कांचेचा याच्या उलट असतो. या दोषास उत्सर्जनदोष असें म्हणतात. अलीकडे हा उत्सर्जन दोष अतिशय अल्प असणाऱ्या कांचा तयार होऊं लागल्या आहेत. परंतु अद्यापहि पूर्वीच्याच कांचा प्रचारांत आहेत. डोळ्याजवळील कांच अशा तऱ्हेची असली पाहिजे कीं, तिच्यांतून येणारी प्रतिमा पूर्णपणें सपाट पडली पाहिजे.

न्यूटननें आपल्या परावर्तक दुर्बिणींत योजलेल्या परावर्तकांमध्यें अलीकडे पुष्कळच फरक झाला आहे. चांदी, निकल, जस्त इत्यादि अनेक धातूंचें मिश्रण परावर्तकाकरितां वापरण्यांत येतें. तथापि चार भाग तांबें व एक भाग कथील किंवा २५२ भाग तांब्यास ११७.८ कथील हें मिश्रण सर्वांत उत्तम ठरलें आहे. या धातूचा परावर्तक कठिण व ठिसूळ असून त्यावर अतिशय उत्तम जिल्हई देतां येते. अलीकडे कांचेवर चांदीचा पत्रा बसवून तयार केलेले परावर्तक विशेष प्रचारांत येऊं लागलें आहे.

दुर्बिण तयार झाल्यावर ती बसविणें ही गोष्टहि महत्त्वाची आहे. ती मुळींच हलतां कामा नये, व तिला पाहिजे तशी वळवितां येऊन पाहिजे त्या दृश्यपदार्थाकडे सहज लावतां आली पाहिजे. जेव्हां दुर्बिणीनें दीर्घकालीन फोटो घ्यावयाचे असतात तेव्हां तिची गति पृथ्वीच्या दैनंदिन गतीबरोबर अगर दृश्य पदार्थाबरोबर ठेवतां आली पाहिजे. सध्यांच्या प्रचलित पद्धतींमध्यें इक्विटेरियल किंवा विषुववृत्तीय पद्धत सर्वांत उत्तम समजली जाते. हींत पृथ्वीच्या अक्षाशीं समांतर असा एक अक्ष बसविलेला असून त्याला ध्रुवाक्ष ( पोलर ॲक्सिस )असें म्हणतात व दुसरा त्याच्याशीं काटकोन करणारा अक्ष बसविलेला असून त्यास क्रांत्यक्ष ( डेक्लिनेशन ॲक्सिस )असें म्हणतात. या अक्षाशीं दुर्बिणीची नळी काटकोन करून बसविलेली असते. या पद्धतीचेहि सहा निरनिराळे प्रकार आहेत ते असेः—

( अ ) यामध्यें ध्रुवाक्षाचीं आवणें ( बेअरिंग्ज ) टोंकांशीं असतात व क्रांत्यक्ष ध्रुवाक्षाच्या दोन्ही टोंकास जोडलेल्या आवरणावर बसविलेला असतो. दुर्बिण क्रांत्यक्षाच्या एका टोंकास जोडलेली असून दुसऱ्या टोंकास तोल सांभाळण्याकरितां वजन लावलेलें असतें.

( आ ) हींत ध्रुवाक्ष वरीलप्रमाणेंच बसविलेला असतो व दुर्बिण क्रांत्यक्षाच्या आवणांत बसविलेली असून ध्रुवाक्षाशीं समांतर असते.

( इ ) ध्रुवाक्षाचें वरील आवण वाढवून त्यांत क्रांत्यक्ष बसविलेला असतो. दुर्बिण क्रांत्यक्षाच्या एका टोंकाशीं बसविलेली असून दुसऱ्या टोंकास वजन लाविलेलें असतें.

( ई ) ध्रुवाक्षाच्या वरील टोंकाजवळचें आवण वाढवून त्याला एक चिमटा जोडून त्यांत क्रांत्यक्ष बसविलेला असतो आणि दुर्बिण क्रांत्यक्षाच्या आवणांच्या दरम्यान बसविलेली असते.

( उ ) ध्रुवाक्षाच्या आवणामध्यें दुर्बिणीचें डोळ्याकडील भिंग बसविलेलें असतें आणि दुर्बिणीच्या अक्षाचा वराचसा भाग ध्रुवाक्षाशीं समांतर असतो.

( ऊ ) दुर्बिण ही स्थिर असून तिच्या अक्षाच्या दिशेनें एका बाह्य आरशावरून दृश्यपदार्थापासून येणारे किरण परावर्तित करून पाठविले जातात.

**दुर्योधन**—सुयोधन. धृतराष्ट्र व गांधारी यांचा ज्येष्ठ पुत्र, व कट्टा पांडवशत्रु. हा गदायुद्धांत मोठा निपुण होता. यानें पांडवांच्या नाशासाठीं त्यांनां अनेक संकटांत घातलें. पण शेवटीं पांडव सुखरूप पार पडून कौरवांशीं लढले. या भारतीय युद्धांत शेवटीं दुर्योधन पडला. ही कथा महाभारतांत सविस्तर वर्णिलेली आहे. या महाकाव्यांतील मुख्य नायक दुर्योधन यासच म्हणतां येईल.

**दुर्लभराज**—दुर्लभराज हा अनहिलपट्टण येथील चामुंड ( सिंह ) राजाचा धाकटा पुत्र व मूळराज वाक्पतीचा नातु होय. याचा वडील भाऊ वल्लभ ( विग्रह ) राय मेल्यानंतर हा गादीवर आला. यानें मारवाडदेशचा राजा महेन्द्र याची कन्या दुर्लभादेवी स्वयंवरांत मिळविली. दुर्लभानें परत येतांना पुष्कळ राजांचा पराजय केला. याचा धाकटा भाऊ नागराजा याचा भीम नांवाचा पुत्र होता. तो वयांत आल्यावर त्यास गादीवर बसवून दुर्लभ व नागराज हे दोघेहि तपश्चर्येस गेले व अनहिलपट्टण येथेंच स्वर्गस्थ झाले.

प्रबन्धचिंतामणीकार हेमाचार्यांनें चामुंड राजाबद्दल सांगितलेली गोष्ट दुर्लभराजाबद्दलहि सांगतात. तो काशीस जात असतां वाटेंत माळव्याचा राजा मुंज यानें त्याचीं राजचिन्हें हरण केलीं. पुढें तो काशीसच निवर्तला परंतु त्यानें पूर्वीच ही हकीकत भीमास कळवून ठेविली होती व त्यावेळेपासून गुजराथ व माळवा येथील राजांमध्यें शत्रुत्व उत्पन्न झालें. दुर्लभसेन हा इ. स. १०१० मध्यें गादीवर बसला. यास जिनेश्वरसूरीनें जैनधर्माचीं मूलतत्त्वें समजावून दिलीं होतीं. याची बहीण मारवाडचा राजा महेन्द्र यास दिली होती. [ रासमाला, पु. १; टॉड—वेस्टर्न इंडिया, पृ. १७०: इंडि. ॲंटि. १८७५; द्याश्रयकाव्य. ]

**दुर्वास**—एक ऋषि. अत्रि व अनुसूया यांचा पुत्र. हा अत्यंत कोपिष्ठ असल्यानें याच्यासारख्या

दुर्वास म्हणतात. यानें अंबरीष राजाला छळिलें ( अंबरीष पहा ). एकदां दुर्योधनाच्या सांगण्यावरून हा पांडवांचें सत्त्व घेण्याकरितां मध्यरात्रीं हजारों शिष्यांसह पांडव वनवासांत असतां, त्यांच्याकडे भोजनास गेला पण श्रीकृष्णकृपेनें पांडव सत्त्वापासून ढळले नाहींत.

**दुल्हादेव**—नवऱ्यामुलाची देवता. उत्तर व मध्यहिंदुस्थानांतील रानटी जातींतील ही एक प्रमुख देवता आहे. दुल्हादेव हा एक दुर्दैवी नवरामुलगा असून तो लग्नांतच वीज पडून मरण पावला होता. तो आणि त्याचा घोडा दगडाचें रूप पावले असा समज आहे. त्यावेळेपासून त्याची पूजा करण्यांत येत असते. नवरीमुलगी आणण्याकरितां जात असलेल्या नवऱ्यामुलाचा विशेष मानमरातब राखण्यांत येतो याचें कारण दुल्हादेव नवरामुलगा होता हें होय.

रानटी, डोंगरी लोकांची ही गृहदेवता असून माघ महिन्याच्या शेवटच्या दिवशीं दुल्हाची फुलांनीं पूजा करण्यात येते, व लग्नाच्या वेळीं त्याला बकरें अर्पण करण्यांत येतें. कांहीं ठिकाणीं तर ब्राह्मण सुद्धा त्याची पूजा करितात. त्याची आवडती वस्तु म्हणजे परशु होय. मिरझापूर येथें स्वयंपाकगृहांत त्याला बसवून तेलहळद लावितात. लग्नांत त्याला बकरें बळी देण्यांत येतें. याला ईश्वररूप देण्याचें कारण लग्नसमारंभांतील त्याच्या आकस्मिक मृत्यूमुळें त्याच्या आप्तेष्टांना झालेलें दुःख असावें.

**दुष्काळ**—याचा शब्दार्थ 'वाईट काळ' असा असला तरी अतिवृष्टि किंवा अनावृष्टि होऊन शेतींचीं पिकें बुडणें व अन्नाची वाण पडणें याला दुष्काळ म्हणतात. दुष्काळ पडून लोकांची हालअपेष्टा झाल्याचीं उदाहरणें सर्व देशांत व सर्वकाळीं आढळतात. दुष्काळाला पर्जन्यविषयक कारणाशिवाय पिकावर रोगराई होणें, टोळधाड येणें, वगैरे कारणेंहि होतात. या नैसर्गिक कारणांशिवाय युद्धें, धान्यांची उत्पत्ति व विनियम या बाबतींत अर्थशास्त्र दृष्ट्या होणाऱ्या चुका, वगैरे कृत्रिम कारणेंहि असतात. अगदीं अलीकडील शास्त्रीय शोध लक्षांत घेतले तरी दुष्काळाचीं नैसर्गिक कारणें अतिवृष्टि, अनावृष्टि, रोगराई, टोळधाड हीं मनुष्याच्या निवारणशक्तीच्या बाहेरचीं आहेत. पर्जन्यविषयक आपत्तीवर कालव्याच्या पाण्याचा पुरवठा ही एक युक्ति आहे; तथापि सर्व देशांत सर्व सुपीक जमीन भिजण्याइतकी कालव्यांची वाढ अद्याप झालेली नाहीं. रेल्वे, मोटारी वगैरे दळणवळणाचीं आधुनिक साधनें हा दुष्काळनिवारक उपाय आहे, कारण त्यायोगानें धान्यसमृद्ध देशांतून दुष्काळपीडित देशांत हल्लीं प्राचीन काळापेक्षां फार त्वरित गतीनें धान्य नेतां येतें. साधारणपणें उष्णकटिबंधांतील देशांत अनावृष्टि हेंच दुष्काळाचें नेहमींचें कारण आहे. हिंदुस्थान व ऑस्ट्रेलिया हे दुष्काळाच्या बाबतींल प्रसिद्ध देश होत. तथापि येथें कालव्यांनीं दुष्काळनिवारण्याची बरीचशी सोय केली आहे. उलटपक्षीं अतिवृष्टीमुळें व बर्फादिकांच्या माद्रलामुळें होणाऱ्या पिकांच्या नुकसानीबाबत मानवी उपाय योजणें तितकें सोपें नाहीं. पिकांवर येणारें टोळधाडीचें संकट निवारणें शक्य आहे असें फ्रेंच लोकांच्या अल्जिअर्समधील एका अनुभवावरून सिद्ध झालें आहे. तथापि दुष्काळनिवारणार्थ आधुनिक काळांतील रामबाण इलाज म्हणजे रेल्वेमोटारीदि दळणवळणाचीं उत्कृष्ट साधनें होय. दुष्काळाच्या कृत्रिम कारणांपैकीं बरींचशीं हल्लीं नाहींशीं होत चाललीं आहेत. युद्धें शक्य तों टाळण्याची धडपड राष्ट्रसंघ करीत आहे आणि प्रत्येक देशांतील अर्थशास्त्रीय तज्ज्ञ शेतकीनें उत्पन्न वाढण्याबद्दल व चलनादि व्यवहार नीट चालण्याबद्दल दक्षता बाळगीत आहेत. त्यामुळें प्राचीन काळाच्या मानानें अलीकडे दुष्काळाची आपत्ति पुष्कळच कमी झाली आहे.

२० व्या शतकांत कृत्रिम कारणांमुळें दुष्काळ बहुधा क्वचित्च पडतो. मुख्य कारण नैसर्गिक म्हणजे पर्जन्य हेंच असून कालव्यांचा प्रसार हाच त्यावरील उत्तम उपाय होय. दळणवळणाचीं साधनेंहि हल्लीं सर्वत्र झपाट्यानें वाढत असल्यामुळें पूर्वीच्या सारखे दहा दहा बारा बारा वर्षांचे भयंकर दुष्काळ पुढील काळांत बहुधां कोठेंहि पडणार नाहींत. असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**जगांतील मोठे दुष्काळ.**—इतिहासांत नमूद असलेल्या दुष्काळांची यादी अशीः-ख्रि.पू. ४३६ चा रोममधील दुष्काळ, यावेळीं हजारों लोकांनीं टायबर नदींत जीव दिले. स. ४२ ईजिप्तमधील मोठा दुष्काळ; स. ६५० सर्व हिंदुस्थानभरचा दुष्काळ; स. ८७९ जागतिक दुष्काळ; स. ९४१, १०२२ व १०३३ हिंदुस्थानांतलि सर्वप्रांतीय दुष्काळ. ह्यांत असंख्य लोक मृत्युमुखीं पडून मानवभक्षणापर्यंत ( कॅनिबॉलिझम ) पाळी आली होती; १००५ इंग्लंडांतील दुष्काळ. १०६६ सर्व यूरोपभरचा दुष्काळ. १०६४ ते १०७२ ईजिप्तमधील सप्तवार्षिक दुष्काळ; स. ११४८ते११५९ अकरा वर्षांचा हिंदुस्थानांतील दुष्काळ. यावेळीं मुसुलमान राजांनाहि कुटुंबीयांकरितां अन्नसामुग्री मिळणें कठिण पडलें. वर्षानुवर्षे हा दुष्काळ चालल्यामुळें हजारों इसम मृत्यु पावले; १३९६–१४०७ हा बारा वर्षांचा दुर्गादेवी दुष्काळ म्हणून हिंदुस्थानांत प्रसिद्धि पावलेला आहे. १५८६ सालीं इंग्लंडमध्यें मोठा दुष्काळ पडला व त्याच वेळीं अनाथगृहांबद्दलचा कायदा प्रचारांत आला. १६६१ सालीं हिंदुस्थानांतील दुष्काळाच्या वेळीं सतत दोन वर्षांत एक पावसाचा थेंबहि पडला नाहीं असें म्हणतात; १७६९–१७७० यावर्षी बंगालप्रांतांत दुष्काळ पडून सुमारें एकतृतीयांश लोकसंख्या मृत्युमुखीं पडली. स.१७८३ चा दुष्काळ हिंदुस्थानांत बनारस ते लाहोरपर्यंतच्या प्रांतांत पडला; स. १७९०–९२ हा दुष्काळ मुंबई व मद्रास इलाख्यांत पडला. याच वेळीं दुष्काळी कामें काढण्याची पद्धत प्रथम सुरू झाली; स. १८४६-१८४७ आयर्लंडमधील दुष्काळ. १८८७–१८८९ चीनमधील दुष्काळ; १८९१–१८९२

मधील रशियांतील दुष्काळ; स. १८९७चा हिंदुस्थानांतील मोठा दुष्काळ. व १९०५चा रशियांतील दुष्काळ.

हिंदुस्थान.—पुराणकालापासून दुष्काळ चालूच आहेत. इंग्रजी राज्य सुरू झाल्यापासून बरेच दुष्काळ पडूं लागले आहेत ह्याच दोन काळांतील फरक आहे. पूर्वीचे दुष्काळ सतत लढाई, कुराज्य व अनावृष्टयादि नैसर्गिक कारणांमुळे पडत असत. पण हल्लीं दुष्काळ पडण्याचें हिंदुस्थानांतील कारण अनावृष्टि हें आहे. पण पाटबंधारे व दळणवळणाचे मार्ग सुरू झाल्यापासून दुष्काळाची भीति बरीचशी कमी झाली आहे. तथापि येथील धान्य परदेशांत जाऊं लागल्यामुळें येथें कायमची महर्गता झाली, व त्या महर्गतेच्या दराप्रमाणें पैसा देऊन धान्य विकत घेण्याची शक्ति राहिली नाहीं, त्यामुळें गरीबगुरीबांनां प्रत्येक वर्ष दुष्काळाप्रमाणें भासूं लागलें आहे.

दळणावळणाच्या चांगल्या सोयी झाल्यामुळें पूर्वीपेक्षां हल्लीं दुष्काळनिवारण पुष्कळ तऱ्हेनें करतां येतें. सरकार दुष्काळाच्या वेळीं तन्निवारणार्थ कामें काढीत असतें. दुष्काळाचीं चिन्हें म्हणजे पावसाचा अभाव, स्थलांतर, दानधर्म कमी, गुन्ह्यांची संख्या जास्त, आणि सावकार लोकांची धान्याची अतिशय खरेदी. हीं चिन्हें दिसूं लागलीं म्हणजे अधिकारी लोक दुष्काळी कामाच्या कार्यक्रमासंबंधीं दवंडी पिटतात व नंतर गरीब कोण श्रीमंत कोण, दुष्काळी कामावर येणारे आहेत त्यांची यादी वगैरे होऊन, त्यांच्याकडे दुष्काळी कामें सोंपविलीं जातात. हीं दुष्काळी कामें साधारण पावसाच्या सुरवातीला बंदच होतात. कारण लोक आपआपलीं शेतें नांगरण्याकरितां परत जातात व ज्यांचीं शेतें नसतील ते देखील दुष्काळी कामापेक्षां शेतांतील श्रम पसंत करून, आपआपल्या गांवीं परत जातात. कदाचित् कांहीं मजूर पावसाळा सुरू होण्याच्या नंतर राहिले असतील त्यांनां पहिलें पीक आल्यावर परत जाण्यास सांगण्यांत येतें. पावसाळा बंद झाला म्हणजे दुष्काळी कामें पूर्ण बंद होतात. सरकारची दुष्काळच्या कामीं मदत असते हें तर खरेंच, परंतु ती सर्व लोकांपासूनहि असते. कारण निरनिराळया जातींचे लोक दुष्काळनिवारणार्थ रकमा गोळा करतात व त्या सरकारच्या स्वाधीन करतात. त्यांचे उद्देश चार असतात. (१) लंगडे, लुळे, वायकामुळें ह्यांच्याकरितां; (२) पोरक्या मुलांकरितां; (३) प्रतिष्ठित गरिबांनां त्यांच्या दर्जाप्रमाणें राहतां यावें या हेतूनें; (४) आणि सर्वस्वी जे बुडाले आहेत त्यांच्या उद्धारार्थ. ह्या फंडामुळें गरिबांचा त्याचप्रमाणें सरकारचाहि पुष्कळ बोजा कमी होतो. ह्या कामाकरितां कांहीं दयाळू व श्रीमंत लोकांनीं कर्जरोख्यांच्या रूपानें ठेवी ठेवल्या आहेत आणि त्या ठेवींपासून जें उत्पन्न येईल तें दुष्काळनिवारणार्थ उपयोगांत आणावयाचें अशा अटी घातल्या आहेत.

१८६०–६१ चा दुष्काळः—मुख्यतें आग्रा, पंजाब, राजपुताना व कच्छ ह्या प्रांतांत हा होता. सरकारनें कराची माफी दिलेली नव्हती; परंतु मोठमोठीं दुष्काळी कामें काढलीं होतीं आणि वेतन थोडेसे जास्त वाढविलें होतें. कंगालखाने उघडले होते आणि प्रतिष्ठित स्त्रियांनां त्यांच्या घरींच कामें दिलीं होतीं. साधारण ३ कोटि तीस लक्ष जीवांनां एक दिवसाचें अन्न मिळून २७ लक्ष रुपये खर्च केले होते.

१८६५–६७चा ओरिसांतील दुष्काळः—हा दुष्काळ सर्व पूर्व किनाऱ्यावर आणि मुख्यत्वेंकरून ओरिसाप्रांतांत भयंकर होता. हा दुष्काळ सतत दोन वर्षे चालू होता. पहिल्या वर्षी अवर्षण दुसऱ्या वर्षी अतिवर्षण मिळून पिकाची खराबी झाली. जवळजवळ ९५ लक्ष रुपये खर्च होऊन ३ कोटि ५० लक्ष जीवांनां एक दिवस पुरेल इतकें अन्न वांटलें. त्याचप्रमाणें मद्रासमध्यें १२ लक्ष रुपये खर्च करून २ कोटि १० लक्ष जीवांनां एक दिवस पुरेल इतकें अन्न वांटलें.

१८६८–७० चा राजपुतान्यांतील दुष्काळः—पूर्वेकडील दुष्काळ बंद होतो न होतो इतक्यांत पश्चिमेकडे सुरू झाला. यानें ४ कोटि ४५ लक्ष लोकसंख्या व्यापिली होती. ह्या दुष्काळानें ठाणें राजपुतान्यांतील देशी संस्थानें व इंग्रजांचा अजमीर प्रांत येथें होतें. सुमारें ४९ लक्ष रुपये खर्च झाले. यावेळीं सरकारनें शेतकऱ्यांनां अगाऊ कर्ज देऊन शेतकऱ्यांचे हाल कमी केले. आग्रा प्रांतांतच ३० लक्ष रुपये खर्च होऊन २ कोटि ९० लक्ष जीवांनां एक दिवस पुरेल इतकें अन्न वांटण्यांत आलें.

१८७३–७४ चा बहारप्रांतांतील दुष्काळः—ह्या दुष्काळांत सरासरी २ कोटि १५ लक्ष लोक सांपडले होते. हा दुष्काळ बहार, बंगाल व संयुक्तप्रांत यांतच होता. ६½ कोटि रुपये खर्च करून ३ कोटि जीवांनां एक दिवस पुरेल इतकें अन्न वांटण्यांत आलें. ह्या दुष्काळांत जवळजवळ ४ कोटि रुपयांच्या धान्याची आयात करण्यांत आली.

१८७६–७८ चा दक्षिण हिंदुस्थानचा दुष्काळः—पहिल्या वर्षी ह्या दुष्काळानें फक्त दक्षिण हिंदुस्थानच ग्रासून टाकला होता. परंतु दुसऱ्या वर्षी तो जवळजवळ सर्व हिंदुस्थान देशभर पसरला. यावेळीं इंग्रजी राज्यांतच इतर दुष्काळापेक्षां ५२५०००० जास्त लोक मृत्युमुखीं पडले. सरकारची करडी अंमलबजावणी, दळणवळणाच्या साधनांचा अभाव, व अन्नाचा तुटवडा हीं सर्व जीवहानि होण्याचीं कारणें होत. हिंदुस्थानच्या लोकसंख्येच्या मानानें, ८½ कोटि रुपये खर्च होऊन सत्तर कोटि जीवांनां एक दिवस पुरेल इतकें अन्न वांटण्यांत आलें, म्हणजे कांहींच नाहीं.

१८७८-८० चें दुष्काळी कमीशनः—स. १८७८ च्या दुष्काळाची चवकशी करण्याकरितां सर रिचर्ड स्ट्रॅची ह्यांच्या नेतृत्वाखालीं एक कमिटी नेमण्यांत आली. तिच्या सूचना येणेंप्रमाणें होत्या.—(१) सरकारनें दुष्काळनिवारणार्थ जे कांहीं उपाय योजावयाचे ते लोकांनीं स्वकष्टार्जित श्रमावर अवलंबून न राहतां सरकारवरच अवलंबून राहणें योग्य होईल असें त्यांनां वाटूं नये. होतां होईल तों त्यांनीं

आपल्या श्रमावरच अवलंबून राहिलें पाहिजे. (२) अशा तऱ्हेची मजुरी लोकांना दिली पाहिजे कीं, उपाय नाहीं म्हणूनच त्यांनां दुष्काळी कामावर जाण्याची इच्छा झाली पाहिजे. (३) कामावर धडधाकटच मजुर लावावेत आणि त्यांच्या पुरेशीच मजुरी त्यांनां द्यावी. (४) कंगालखान्यांत किंवा गांवांत जी भीक घालावयाची ती ज्या कोणाच्यानें कोणत्याहि परिस्थितींत काम होत नाहीं त्याला घातली जावी. याकरितां म्हणून प्रत्येक खेडोखेडीं लोक नेमले जात असत. अन्नाचा पुरवठा करावयाचा तो व्यापारांत अडथळा न होईल अशा तऱ्हेनें झाला पाहिजे. (५) जमीनदारांनां कर्जाच्या रूपानें किंवा कांहीं दिवस कराची तहकुबी या रूपानें मदत द्यावी; व त्याच प्रमाणांत जमीनदारांनीं आपल्या कुळांनां देखील सवलती दिल्या पाहिजेत. या सूचनांनुसार सरकारनें फॅमिन कोड तयार करून तें अमलांत आणलें आहे.

१८९६–९७ चा दुष्काळः—हा दुष्काळ अतिशय भयंकर होता. तो बहुतेक सर्व हिंदुस्थान व मुख्यत्वेंकरून संयुक्तप्रांत, बहार, हिसार जिल्हा (पंजाब) या भागांत पसरला होता. याचें कारण १८९५ सालीं पावसाचा अभाव. त्यावेळीं ७½ कोट रुपये खर्च होऊन ८२१०००००० लोकांनां एक दिवस पुरेल इतकें अन्न वांटण्यांत आलें. या दुष्काळानें सरासरी ६९५०००००० इतकी लोकसंख्या ग्रस्त झाली होती.

१८९९–१९०० चा दुष्काळः—१८९७ सालचा दुष्काळ बंद होतो न होतो इतक्यांत १८९९ सालीं लगेच सुरू होऊन त्यानें पुन्हां सर्व देशाला व्यापून टाकिलें. या दुष्काळाला मदत करण्याकरितां म्हणून पटकी व सांथीचा ताप सुरू झाला, त्यामुळें अतिशय प्राणहानि झाली व गुरेंढोरेंहि पुष्कळ मेलीं. सरासरी १० कोट रुपये खर्च करून ११४०००००७० इतक्या लोकांना १ दिवस पुरण्याइतकें अन्न वांटण्यांत आलें.

दुष्काळामुळें प्राणहानि अतिशय होत असते. दुष्काळाची जुळी बहीण सांथ ही होय. बहुतकरून प्रत्येक दुष्काळाच्या समयीं पटकी किंवा महामारी ही असावयाचीच. दुष्काळी कामें सुरू केल्यापासून मृत्युसंख्या बरीच कमी झाली आहे.

१९१८ सालीं मोठेंच अवर्षण पडलें होतें तथापि, लोकांच्या अंगीं दुष्काळाला विरोध करण्याची शक्ति इतकी वाढली होती कीं सरकारला मदतीची विनंति न करतां, आतांपर्यंत कधींहि मिळाली नाहीं इतकी मदत लोकांकडून आपोआप आली व त्यामुळें लोकांच्या सामाजिक व्यवहाराला फारसा अडथळा आला नाहीं. पुढल्या वर्षीच चांगला पाऊस पडून या अवर्षणाचे परिणाम लवकरच नाहींसे झाले. तेव्हां यापुढें १८९९ सालांतल्यासारखे वाईट परिणाम लोकांनां भोगावे लागतील अशी स्थिति राहिली नाहीं.

१९२०–२१ सालीं मद्रास, मुंबई, मध्यप्रांत आणि बलुचिस्तान या भागांत दुष्काळ जाहीर केला गेला. बंगाल, पंजाब आणि मध्यहिंदुस्थान हे प्रांत स्थानिक संकटांनीं गांजले होते. यावेळींहि दुष्काळनिवारणाची लोकांची मोठी तयारी दिसून आली. ज्या ठिकाणीं अवर्षण पडलें त्या क्षेत्रांतील एकंदर संख्येपैकीं शेंकडा ३ लोक कायते दुष्काळी कामावर होते.

दुष्काळप्रतिबंधक उपाय म्हणजे शेतीचें आधुनिक ज्ञान वाढविणें हा होय. हा एवढाच उपाय म्हणजे अर्धवटच आहे. भूस्तरशास्त्र, खनिजशास्त्र, मानवजातिशास्त्र आणि भाषाशास्त्र, या सर्व शास्त्रांचें ज्ञान व्हावें या दृष्टीनें चवकशी सुरू आहे. व्यापारी आंकडेहि छापण्यांत येऊं लागले आहेत; परंतु हे आंकडे अद्याप पुरेसे बाहेर पडत नाहींत. सरकारचीं निरनिराळीं कामें निरनिराळ्या खात्यांकडे वांटून दिलीं आहेत व त्याप्रमाणें तीं कामें एकदम होत असतात.

दुष्काळापासून रक्षण करण्याकरितां संरक्षक व उत्पन्नाचे लोहमार्ग व कालवे तयार करण्यांत आले आहेत. सरकारनें दुष्काळाप्रीत्यर्थ म्हणून गंगाजळी ठेव ठेविली आहे. या ठेवीचा मुख्य उपयोग दुष्काळापासून रक्षण करणें, किंवा 'संरक्षक' कामें करणें, किंवा कर्ज फेडण्याकडे उपयोगांत आणणें हा आहे. इतक्या दुष्काळापासून जो अनुभव आला व त्यावेळीं लोहमार्ग व पाटबंधाऱ्यामुळें जो फायदा झाला त्यामुळें आणखी लोहमार्ग व पाटबंधारे बांधणें जरूर वाटून त्या दिशेनें प्रयत्न सुरू झाले आहेत.

शेतकरी मजुरांची संख्या वाढत आहे आणि त्यांनां पोटभर देखील खावयास मिळत नाहीं. वास्तव त्यांची मजुरी कांहीं वाढत नाहीं आणि धान्यरूपानें जी मजुरी मिळत असे ती आतां नगदीच्या रुपानें मिळूं लागली आहे. या वाढीला (मजुरांच्या) शेतकीसुधारणेनें फायदा होईल असें वाटत नाहीं. यास उपाय म्हणजे स्थानत्याग किंवा लोकसंख्येच्या वाढीवर आळा घातला पाहिजे अथवा स. १८८० च्या कमीशनप्रमाणें उद्योगधंदे वाढले पाहिजेत. या दिशेनें आरंभ झाला आहे तरी औद्योगिक धंदे व लोकसंख्येची वाढ यांचा मेळ मुळींच बसत नाहीं. लोकसंख्या सपाट्यानें वाढत आहे. उद्योगधंदे सुरू करण्यास मुद्दल नाहीं आणि पैशाच्या अभावामुळें जोंपर्यंत उद्योगधंदे सुरू होऊन पुष्कळ मजूर कामास लागत नाहींत तोंपर्यंत दुष्काळाचा प्रश्न सुटणें कठिण आहे. उद्योगधंदे उभारण्याकरितां येथें भांडवल नाहीं म्हणून परदेशी भांडवल येथें आणून धंदे सुरू करावे, असें कांहींचें मत आहे.

[ वालफोर्ड—ऑन दि फॅमिन्स ऑफ दि वर्ल्ड (जर्नल ऑफ दि स्टॅटिस्टिकल सोसायटी, १८७८–७९); रमेशचंद्र दत्त–फॅमिन्स इन इंडिया (१९००); रॉबर्ट वालेस–फॅमिन इन इंडिया (१९००); जॉर्ज कॅम्पबेल–फॅमिन्स इन इंडिया (१७६९–१७८८); इं. गॅ.; १८८०, १८९८ व १९०० सालचे इंडियन फॅमिन कमिशनचे रिपोर्टः थॉमस मॉरिसन–इंडियन इंडस्ट्रिअल ऑर्गनायझेशन (१९०६). ]

**दुष्यंत**—पौरव कुलोत्पन्न राजा. यास लक्ष्मणा व शकुंतला अशा दोन भार्या होत्या. एकदां हा राजा मृगयेकरितां भटकत असतांना कण्वऋषींच्या आश्रमाजवळ आला व त्या ठिकाणीं शकुंतलेस यानें गांधर्वविधिवाहपद्धतीनें वरिलें. पुढें शकुंतलेस भरत नांवाचा मुलगा झाला. नंतर दुष्यंतानें शकुंतलेशीं विवाह झाल्याचें नाकारिलें पण जेव्हां आकाशवाणीनें भरत हा तुझाच मुलगा आहे असें सांगितलें तेव्हां त्यानें राजपुत्राचा स्वीकार केला (भा. आदिपर्व). कालिदासानें या कथानकाचा उपयोग करून आपलें जगप्रसिद्ध शाकुंतल नाटक रचिलें आहे.

**दूर्वा**—या तृणाचा उल्लेख ऋग्वेदापासून आढळतो. तैत्तिरीय श्रुतींत "आपल्या मुळांच्या वाढीप्रमाणें आमच्या वंशाची वाढ कर" अशी दूर्वेची स्तुति केली आहे. हें गवत सर्व हिंदुस्थानभर सर्व ऋतूंत आढळतें. फक्त पंजाबच्या पश्चिम भागांतील वाळवंटाच्या प्रदेशांत तें फार क्वचितच आढळतें. याच्या हिरवी, पांढरी व निळ्या रंगाची अशा तीन जाती आहेत. तिन्हीं जातींचे गुणधर्म बहुतेक सारखेच आहेत. देवपूजेच्या वेळीं फुलांप्रमाणें दूर्वांकुर वाहण्याची चाल आहे. दूर्वा गणपतीला फार प्रिय आहेत. भाद्रपद शु. ८ रोजीं बहुत स्त्रिया दूर्वांची पूजा करतात; व दिवसभर उपवास करतात. मृतांचा आत्मा शांत करण्यासाठीं दूर्वांची पूजा करण्याची चाल गुजराथेंत आहे. दूर्वा किंवा हरळीचीं बेटें हिरवीगार व शोभिवंत दिसतात. शहरांतील बगीच्यांतून मोठमोठाल्या पटांगणांत लावलेल्या दूर्वा यंत्रानें कापून साफ ठेवतात. त्यामुळें तीं पटांगणें शोभिवंत दिसतात.

ऑस्ट्रेलियामध्यें वसाहतींच्या प्रदेशांत हें गवत आहे, तरी तें त्या प्रदेशांत मूळचें नसून लागवडीमुळें त्या भागांत आलेलें आहे. हें हिंदुस्थानांत हलक्या व वाळुमिश्रित जमीनींत उगवत असून रस्त्याच्या बाजूंनांहि भरपूर आढळतें. जमीनीच्या व हवेच्या मानानें ह्याच्या पौष्टिक गुणामध्यें फरक होतो. ह्या गवताचे कोंब किंवा मुळें कापून तीं जमीनीवर पसरून दिल्यास त्यांना मुळें फुटतात; व अशा रीतीनें या गवताचें प्रजनन लवकर होतें.

हें गवत कापून वाळवून ठेविलें असतां पुष्कळ वर्षें टिकतें. या गवताची लागवड केल्यास ह्यापासून पुष्कळ पीक निघतें. उन्हाळ्यांतहि हें गवत हिरवें असतें. दूर्वांनां फुलें येण्याच्या वेळेस कापल्या असतां त्यांत पौष्टिकपणा जास्त असून नवें गवतहि फार लौकर फुटतें. कापणी केल्यावर शक्य तितक्या लौकर हें वाळवून ठेविल्यानें ह्याचा रंग वदलत नाहीं.

या गवताचीं मुळें जमीनींत फार खोल गेलेलीं असून, हें गवत काढून टाकावयाला फार त्रास होतो. दाहशामक पेय व औषध या दृष्टीनेंहि याच्या मुळ्यांचा उपयोग होतो. नाकांतून उष्णतेनें रक्त पडत असल्यास दूर्वांचा रस नाकांत पिळावा. उचकीवर दुर्वांच्या मुळ्यांचा रस १ मासा व मध १ तोळा एकत्र करून प्यावीं. (वाट–कमार्शि. प्रॉ.; वनौ. गुणादर्श).

**दूषित रक्तावस्था**—वैद्यकशास्त्रामध्यें अमुक जखम किंवा व्रण "दूषित" होऊन त्यामुळें रोग उत्पन्न झाला असें ऐकण्यांत येतें त्याचा अर्थ हा कीं रोगजंतू अगर त्यांपासून झालेलीं विषें त्या जखमेंत शिरून सर्व शरीरभर दुष्परिणाम घडवून आणतात. कारणानुसार व रोगजंतूंच्या भिन्नत्वानुसार या प्रकारच्या रोगांचे तीन प्रकारचे ढोबळ व महत्त्वाचे भेद आहेत, ते असेः—(१) जंतु विषशोषण ज्वर. शरीरांतील कोणत्या तरी भागामध्यें जंतूपासून उत्पन्न होणारीं विषें प्रवेश करून ज्वररोग उत्पन्न करतात, परंतु रक्तांत जंतूंचा प्रवेश या रोगांत झालेला नसतो. पुष्कळ जण या ज्वराचा पुढें वर्णन दिलेल्या जंतुदूषित रक्तज्वराशीं घोंटाळा करून ते दोन्ही एकच समजतात; पण ती चूक होय. कारण या रोगांत रक्त जंतुप्रवेशामुळें दूषित नसतें व तें दुसऱ्या प्राण्याच्या शरीरांत टोंचून घातलें तरी त्यास तसा रोग होत नाहीं. परंतु जंतुदूषित रक्तज्वराच्या रोग्याचें रक्त दुसऱ्यास टोंचल्यानें दुसऱ्यासहि तसाच रोग होतो. एखादी बरी न झालेली जखम शरीरांत असून त्यांतून निघणारे पू, लस इत्यादि त्वरित कुजणारे पदार्थ बाहेर टाकून जखम साफ न केल्यामुळें तें कुजलेलें विष रक्तात भिनतें. रोगजंतु रक्तांत भिनत नाहींत. या प्रकारचे ज्वर शस्त्रवैद्यकांत फार करून पहाण्यांत येतात. एखादी मोठी, खोल व जिच्यांतून पुवाचा निकाल बरोबर न झाल्यामुळें आंत दुर्गंधिमय कुजणारा पू सांचून रहाणारी जखम असली कीं त्याबरोबर ज्वर उत्पन्न व्हावयाचाच. तसेंच, आकस्मित जखम एखाद्या माणसास होते व त्यावेळीं त्या जखमेंत बाहेरील केर, घाण अगर तेथील त्वचेवरील घाण शिरल्यामुळें हा ज्वर येतो. बायका प्रसूत झाल्यामुळें गर्भाशयांत वारीचे तुकडे रहातात व ते अतित्वरित कुजणारे असल्यामुळें तें विष रक्तांत शोषलें जाऊन हा ज्वर येतो व जितकें अधिक विषशोषण होईल त्यामानानें कमी अधिक ज्वरहि असतो.

याचे अदीर्घकालीन उपभेदः—हाडें मोडून जखम झाल्यास किंवा अंग पोळून भाजून जखमा साफ न करतां आल्यामुळें जखमेंतील विषबाधेमुळें थोडे दिवस ज्वर येतो व नंतर जखम बरी झाली म्हणजे बरा होतो.

(२) तीव्र विषशोषण भेदः—या भेदामध्यें पुष्कळ वेळ कुजणारें विष रक्तांत शिरल्यामुळें मोठा ज्वर येतो. खूपच थंडी वाजून येऊन त्याबरोबर शीघ्र नाडी, जिभेस कोरड, डोकें दुखणें, मळमळ, ओकारी व नंतर अतिसार हीं लक्षणें होतात. याहूनहि तीव्र रोग असल्यास रोगी अगदींच थोड्या काळामध्यें फार गळून जातो व त्यास वात होऊन तो आपणाशींच पुटपुटत असतो. नंतर एकदम ताप कमी होऊन त्यास झांपड येते व नंतर मरणहि येतें. कांहीं रोगी तापास एक आठवडा झाल्यानंतर सान्निपात झालेल्या रोग्याप्रमाणें

स्थिति होऊन नंतर बरे होतात. दीर्घकालीन उपभेद येणें प्रमाणें:—१ संतत अथवा अंतर्दाहसूचक ज्वर हा एक प्रकार आहे. रोग्यास हाडीव्रण, संधिव्रण, कफक्षयादि पुष्कळ दिवस टिकणारा रोग असून जखमेंत किंवा फुप्फुसांतील पोखरलेल्या कफाच्या विवरांत जंतूंची विषें सांचून तें विषशोषण फार दिवस रक्तांत होत असल्यामुळें संध्याकाळचा नियमितपणें एकदम ज्वर येऊन तोंड लाल होणें; नंतर तो घाम येऊन निघणें व त्यांतच अतिसार व शरीर क्षिजण्याची प्रवृत्ति असणें हीं या भेदाचीं ठरीव लक्षणें होत. इंद्रिय गंड किंवा मेदरोग हा यकृतप्लीहामूत्रपिंडादि इंद्रियांनां प्रायः होतो. कारण त्या इंद्रियांच्या रचनेमध्यें गळवाप्रमाणें पू होऊन त्यांतील विषशोषण फार दिवस एकसारखें होऊन हा दीर्घकालीन ज्वर येतो. त्या विषापासून एक प्रकारचा पदार्थ उत्पन्न होऊन तो रक्ताच्या मार्गें धमन्यांच्या भोंवतालीं घट्ट बसून त्याचे मेणासारखे थर वाढत जाऊन तीं विकृत इंद्रियें आकारानें मोठीं होतात. या मेणासारख्या पदार्थावरून हें नांव रोगास पडलें आहे या रोगामध्यें निदान तीन्ह प्रकारच्या भेदांत उपचार केल्यानें त्वरित व खास आराम पडतो. जंतुघ्न धावनांच्या योगानें रोगाचें कारण जें जखमेंत सांचलेली पू वगैरे घाण ती धुवून साफ केल्यानें तेथील भाग कुजण्याची क्रिया थांबते. जखम खोल असल्यास तिचा ती वरी होईपर्यंत निचरा होत राहील अशी तजवीज केल्यावरोवर तावडतोब ज्वर उतरत रोगी सुधारत जातो. शरीरांतील विषोत्सर्जन होण्यासाठीं पारदयुक्त जुलाबाचें औषधहि एकदां द्यावें. त्यासाठीं कोणी शिरांमध्यें अमृतजलहि टोंचून घालतात. हृदयाची क्रिया न थकण्यासाठीं उत्तेजक औषधें देण्यांत यावींत व त्यासाठीं कुचल्याचें सत्त्व टोंचून शरीरांत घालावें. येणेंप्रमाणें शास्त्रोक्तरीतीनें व्रणशुद्धि झाल्यानंतर ज्वर जातो.

जं तु दू षि त र क्त ज्व र.—जंतुविषशोषणज्वर व हा ज्वर यांमध्यें हा मुख्य फरक आहे कीं, या ज्वरामध्यें रक्तांत प्रत्यक्ष जंतूंचा प्रवेश होतो व रक्त तपासून पाहिलें असतां कमी अधिक प्रमाणांत त्यांचें हें रक्तांतील अस्तित्व दृष्टीस पडतें. या एका किंवा अनेक जंतूंचीं पोषण, वर्धन, जननादि क्रिया रक्तामध्यें सुरू असल्यामुळें रक्तांत जंतूंनी संख्या वाढते, व त्याचप्रमाणें ती शरीरांतील भागांत व इंद्रियांतहि वाढते. या ज्वरामध्यें अनेक प्रकारचे जंतू असतात त्यांपैकीं शेकडा ५० पूयवृद्धिकारक जंतू असून ते सूतिकाज्वर, व्राणितहृदयांतर्गतदाह या रोगांत सांपडतात. याचे श्वेत व पीवर असे दोन भेद असतात व याशिवाय फुप्फुसजंतु, आंत्रजंतु, पूयप्रमेहजंतु, असे अनेक प्रकारचे जंतू हा जंतुदूषितरक्तज्वर उत्पन्न होण्यास कारणीभूत होतात. रक्तप्रवाहांत एकदां हे जंतू शिरले म्हणजे मूळच्या जखमेंतच काय परंतु अन्य इंद्रियांत व अन्य ठिकाणीं त्यांची संख्या वाढत जाऊन त्यांपासून विषोत्पत्ति होते. शस्त्रवैद्यकांत ज्या पद्धतीनें जखमा बांधाव्या लागतात त्या पद्धतीनें त्या बांधण्यांत हयगय झाल्यामुळें, किंवा मार, प्रसूति यानंतर उपचार योग्य तऱ्हेनें न झाल्यामुळें, हा ज्वर येतो. कारण बहुधा जखम वेडी वांकडी फाटल्यामुळें जंतुप्रवेश सहज होतो; तसेंच प्लेग, घटसर्परोग, रक्तत्वचाज्वर व अस्थ्यावरणदाह या रोगांतहि हा ज्वर उत्पन्न होतो; यांची गर्भावस्था कमींत कमी थोडे तास असते; परंतु कित्येक दिवसहि ती असूं शकते. बारीकशी जखम कां असेना, त्या ठिकाणीं धूप सूज व ठणका उत्पन्न होऊन शेजारील रसग्रंथि मोठी होते, तिलाच बाघाणा आला आहे असें म्हणतात व तेथपर्यंत कळ व सूज असते. नंतर हा भाग लवकर कुजून सडण्याची प्रवृत्ति फार जलद उत्पन्न होते. रोग यापेक्षां सौम्य असल्यास फक्त जखम अति लाल दिसते व तिच्या कडा अति फुगीर दिसतात व जखम बिघडलेली नसते. याहून सौम्य रोग असल्यास जखमेंत होणारा बदल व मोठा ज्वर हींच मुख्य लक्षणें असतात. हा रोग न होऊं देण्यासाठीं खालीलप्रमाणें प्रतिबंधक उपाय योजावेत. शस्त्रक्रिया करतांना व प्रसूतिनंतर रोग्यास शास्त्रोक्त पद्धतीनें उपचार करावेत म्हणजे हा ज्वर फारच अल्प प्रमाणांत येतो, असें आंकड्यानिशीं सिद्ध झालेलें आहे. इ. स. १८६८ मध्यें इंग्लंडमधल्या दोन प्रांतांसंबंधीं आरोग्यरिपोर्ट प्रसिद्ध झाला त्यांत बावीस वर्षांत २३६८९ बायका प्रसूतिज्वरानें वारल्या असें प्रसिद्ध झालें आहे. त्याच्या उलट प्रकार म्हणजे डब्लिन येथील संयुक्त ब्रिटिश राज्यांतील अत्यंत मोठ्या सूतिकातुरालयामध्यें इ. स. १८८४ पासून १९०३ या वीस वर्षांत ३००२३ स्त्रियांपैकीं फक्त २१ बाळंतिणींनां सूतिकाज्वर झाल्याचें नमूद आहे. म्हणजे तेथें मृत्यूचें प्रमाण ०·०६६ शेकडा पडतें. याच काळामध्यें इंग्लंड व आयर्लंड येथील याच कारणामुळें मृत्यूचें प्रमाण शेकडा ०.२१६ आहे; येणेंप्रमाणें या रोगप्रतिबंधाच्या कामीं कालांतरानें फार यश संपादन होत गेलें आहे. जी जखम दूषित झाली ती शस्त्रानें रुंद करून तींत कॅर्बोलिक ॲसिडाचा बोळा फिरविल्यानें ती जखम शुद्ध होते व लागलीच शरीरांत ज्या ज्या प्रकारच्या जंतूंनीं दूषित रक्त होऊन ज्वर आला असेल त्या त्या प्रकारची लस शरीरांत टोंचून घालतात; त्यापैकीं ॲंटिस्ट्रेप्टो कॉकिक लस आणि पॉलिव्हॅलेंट ( बहुगुणी ) लस या गुणावहपणांत सुप्रसिद्ध आहेत. सूतिकाज्वरांत उद्भवणाऱ्या जंतुदूषित रक्तज्वरांत मेंझरकृत लस उपयुक्त असते.

याशिवाय रोग्याच्या रक्ताच्या लशीपासून मुद्दाम केलेल्या लशीचा तोडगा जखमेमुळें झालेल्या ज्वरांत उपयोगांत आणितात. परंतु रोगी अत्यवस्थ असतां रक्तापासून लस तयार करण्यांत कालक्षेप होतो हा त्यांत एक दोष आहे; व अशा वेळीं पुष्कळ कोयनेल, ब्रँडी वगैरे उत्तेजक पदार्थ व पातळ अन्न आणि सर्वांग कोमट पाण्यानें पुसून

ज्वरातिशयांचे नियमन करणें या उपायाचा अवलंब करावा लागतो.

पू य वृ द्धि ज्व र.—यास हें नांव दिलें गेलें तेव्हां रक्तवाहिन्यांत पूय होतो अशी भ्रमक कल्पना होती; परंतु निरनिराळ्या ठिकाणीं गळवें होतात हें ज्याचें प्रधान लक्षण आहे अशा प्रकारचा हा एक तीव्र ज्वर होय असें आतां कळून चुकलें आहे. इ. स. १८४६ त व्हिरचो या जंतुशास्त्रज्ञानेंच प्रथम शोध लाविला कीं, या ज्वरांत रक्तवाहिन्यांत पू नसतो, फक्त गोठलेलें रक्त असतें. व्रीन डी आर्केट यानें विषशोषणावर व जंतुदूषित रक्तज्वर यांतील भिन्नत्व स्थापित केलें व या दुसऱ्या प्रकारच्या ज्वरांत शिरांमध्यें रक्ताच्या गुठळ्या अडकून बसतात हा शोध लाविला. कोणत्याहि प्रकारच्या पूयोत्पादक जंतूपासून किंवा एखाद्या गळवापासून हा पूयवृद्धिज्वर उत्पन्न होतो. जंतुदूषित हृदयांतरत्त्वचादाहामुळें किंवा जननमार्गे जंतू दूषित झाल्यामुळें हा रोग उत्पन्न होतो. तसेंच जेणेंकरून रक्तांत गुठळ्या उत्पन्न होतील अशी परिस्थिति झाली असतांहि हा ज्वर येतो. फुप्फुसांत रक्तांमधील गुठळी शिरामध्यें अडकली म्हणजे त्या पुढील फुप्फुसाचा भाग कुजून तेथें लालसर जागा दिसते. या ज्वराची पुढील प्रमाणें लक्षणें होतात. प्रथम खूप थंडी वाजून ती पुनः पुनः येऊन अंग कढत होऊन ताप भरतो. रोग्याची कांति बदलून वर्ण मातट रंगाचा होतो. नाडी अशक्त होऊन अति जलद चालते व जिभेस कोरड पडते. एक आठवड्यानंतर इतर ठिकाणीं गळवें उत्पन्न होतात व तीं बहुधा सांध्यांच्या ठिकाणीं असतात. तथापि त्या ठिकाणीं पू होत आहे हें दर्शविणारें लक्षण जो ठणका तो कांहीं रोग्यांत नसतोहि पण बऱ्याच रोग्यांत असतो. त्यास उपाय लवकर न झाल्यास सांध्यांत पू फार होऊन सांध्याचा नाश होतो. रोग अति तीव्र असल्यास मूत्रपिंडांत गळवें होऊन आल्ब्युमिन मिश्रित लघवी, व कमरेंत व पाठींत शूळ उत्पन्न होतो; तसेंच फुप्फुसांत गळवें होऊन श्वास होतो किंवा प्लीहेंतील गळूं फुटून पोटांत अंत्रावरणदाह रोग होतो. कधीं डोळ्यांतील दृग्जलास्थानाच्या पडद्यांतील मध्यधमनी चोंदल्यामुळें एकाएकीं अंधत्व येतें. ज्यामानानें रोगजंतूचा जोर असेल त्यामानानें ज्वर कमी अधिक दिवस टिकतो. मेंदू किंवा हृदयादि महत्त्वाच्या इंद्रियांत गळवें झालीं तर, किंवा फार दिवस व फार पू होऊन शक्तिपात झाल्यामुळें मृत्यु घडतो. तथापि दीर्घकालीन प्रकारचा ज्वर कित्येक महिनेपर्यंत टिकून शेवटीं रोगी साफ बरा झाल्याचीं उदाहरणें घडतात. जेव्हां गळवें नजरेस येतील तेव्हांच या रोगाचें खात्रीनें निदान होतें ही मात्र फार दुर्दैवाची गोष्ट आहे; कारण तितका अवधि फुकट जातो. जेथें जखम किंवा जंतुप्रवेशामुळें विषशोषण होण्यासारखी परिस्थिति असेल तेथून रक्ताच्या दूषित गुठळ्या रक्तांत शिरून रक्त दूषित न करतील असा प्रयत्न आपणास करावयाचा असतो. उदाहरणार्थ, हात अगर पाय दूषित झाला असल्यास जखमेच्या वरील भागाच्या सुमारास तो कापून काढावा, हा एक मार्ग किंवा शस्त्रानें त्यांतील शिरा व्यवच्छिन्न करून काढून टाकाव्या, हेंहि कांहीं ठिकाणीं साध्य होण्यासारखें आहे. गळवें बनलीच तर तीं लवकर कापून आंतील पोकळ भाग स्वच्छ धुवून काढीत जावा. लस टोंचून तिनें फायदा होण्यासारखा असतो म्हणून तिचा अनुभव जरूर पहावा. कारण जंतुदूषित रक्तज्वरांत तिचा उपयोग फार होतो. ज्वर अंमळ दीर्घकालीन असल्यास रोग्याचें रक्त काढून त्यापासून स्वयंसिद्ध लस तयार करण्यास अवसर सांपडतो व त्या लसीनें अधिक गुण पडतो यांत संशय नाहीं; किंवा अनेक जंतूंवर चालणारी बहुगुणी लस टोंचावी; तीहि चांगली असते. रोग्यास पातळ व पौष्टिक अन्न, ब्रांडी वगैरे उत्तेजक पेयें व औषधें जरूरीप्रमाणें पोटांत देऊन येणेंप्रमाणें उपचार सुरू ठेवावेत, व जेणेंकरून रोग्याची शक्ति कायम राहील ते ते उपाय अंमलांत आणावेत.

**दृष्ट**—दृष्ट होणें किंवा लागणें या गोष्टीवर बहुतेक लोकांची श्रद्धा असून अगदीं प्राचीन काळापासून आजतागाईत सर्व देशांत दृष्टीसंबंधीं लोकांच्या अनेक समजुती आहेत असें दिसून येतें. भौतिकशास्त्रांची हल्लीं प्रगति झालेली असून शैक्षणिक प्रसाराहि बराच झाला आहे. तथापि दृष्ट लागण्याच्या कल्पनेवर लोकांचा अजूनहि विश्वास आहे. कांहीं व्यक्तींना त्यांच्या, दृक्प्रांतांत येणाऱ्या सजीव अथवा निर्जीव वस्तू भारून टाकतां येतात व त्यांच्यावर बरावाईट अम्मल गाजवितां येतो असें म्हणतात. प्रेमकटाक्ष अनामयत्व उत्पन्न करतो, परंतु दृष्ट झालेली व्यक्ति किंवा दृष्ट झालेला पदार्थ दृष्ट झाल्यामुळें पीडित होतो याबद्दल अनेक दाखले देण्यांत येतात. मनुष्याचें कांहींहि वाईट झालें, तो आजारी पडला किंवा त्याला अपयश आलें कीं, या सर्व गोष्टी दृष्ट झाल्यामुळेंच झाल्या असल्या पाहिजेत अशी जुन्या लोकांची समजूत होते. बाबिलोनिया व ईजिप्त या देशांत पूर्वी अशी समजूत होती कीं, दृष्टीचा परिणाम जिवंत माणसावर होतोच पण मृतावरहि तो झाल्यावांचून रहात नाहीं. ज्यू, मुसुलमान, हिंदू वगैरे लोकांत दृष्ट लागू नये म्हणून अनेक संरक्षक उपाय योजण्यांत येतात. जुन्या ग्रीक व रोमन लोकांच्या पौराणिक कथांमधून दृष्ट लागण्यासंबंधीं अनेक उल्लेख आहेत. मेडयूसा नामक स्त्रीची दृष्ट लागतांच सर्व पदार्थ दगड होऊन जात असत असें वर्णन आढळतें. फ्रुटार्च म्हणतो कीं, कांहीं लोकांची दृष्ट लागतांच मुलें व पशू यांचा संहार होतो. विशेषतः गाय व घोडा यांना फार दृष्ट लागते व कधीं कधीं दृष्टीमुळें गाय कायमची आटते. आपल्या घोड्यांनां व उंटांनां दृष्ट लागू नये म्हणून तुर्क व अरब लोक त्यांच्या गळ्यांत कांहीं तरी मंत्रून घालतात. लंडनमध्यें, घोड्याच्या पितळी सामानांत चंद्र, सूर्य वगैरे आकृती असत व दृष्ट लागू नये म्हणून त्या घोड्यांनां

घालीत असत फिन्स, स्कॅन्डिनेव्हिअन वगैरे लोकांतहि दृष्टी-बद्दल अनेक कल्पना आहेत.

दृष्ट कोणाची लागते.—ज्यांची दृष्ट लागते अशांत स्त्रियांचीच जास्त संख्या असते असें आढळून आलें आहे. जादुगारी व चेटूक करणाऱ्या वर्गांतहि पुरुषांपेक्षां स्त्रियाच जास्त असतात. बाबिलोनियन, ज्यू, ग्रीक, रोमन व अरबी वाङ्मयांत जादुगारी, चेटूक वगैरे करणाऱ्या स्त्रियाच असत असे उल्लेख आहेत. फ्रुटार्च म्हणतो कीं, दृष्टिक्षेपांत प्रेम उत्पन्न करण्याचा धर्म आहे तसाच मत्सरग्रस्त दृष्टिक्षेपांत अशुभ करण्याचा गुण असून असला दृष्टिक्षेप हा एक विषारी बाणच होय. मूर लोकांचीहि अशीच समजूत आहे. दृष्ट लागू नये म्हणून अन्नापैकीं थोडा भाग भुताला टाकण्याची हिंदु लोकांत चाल आहे. कुराणांतील कांहीं वाक्यांत, मंत्रताइतांत संरक्षणसामर्थ्य आहे अशी मुसुलमानांची समजूत आहे. तीट किंवा काजळ लावण्याची हिंदु लोकांत पद्धत आहे व तिचा हेतू दृष्ट लागू नये असाच असावा. अप्रतिम सौन्दर्य किंवा कुरूपता ज्यांची असते अशा लोकांमध्यें दृष्टीची शक्ति असते. देवादिकांची सुद्धां दृष्ट लागू शकते व या बाबतींत जूनो नामक देवाची प्रसिद्धि आहे. अत्यंत सामर्थ्यवान, खुजा व तिरव्या डोळ्याच्या मनुष्याची दृष्ट लागते असें म्हणतात. निळ्या किंवा हिरवट डोळ्याच्या माणसाचीहि दृष्टि वाईट असते अशी आर्मेनियामध्यें समजूत आहे. सर्प, कोल्हा, मोर या प्राण्यांची दृष्टि अशुभ मानण्यांत येते. टोळांची दृष्ट फार वाईट असते. ससा आडवा गेला तर टायकोब्राहीसारखा विद्वान गृहस्थ पुढें पाऊल टाकीत नसे. इंग्लंड व आयर्लंड येथें सशाची दृष्ट फार अशुभ मानतात. एका विशिष्ट पक्ष्याची दृष्ट लागतांच मनुष्य मरतो अशी ब्राझिलमध्यें समजूत आहे. सापाची दृष्ट होतांच बेडूक व पक्षी इत्यादि प्राणी विमोहित होतात असें म्हणतात. इंग्लंडमध्यें प्लेगचा पूर्वी धुमाकूळ सुरू होता त्यावेळीं तेथें अशी एक समजूत होती कीं, मरणोन्मुख मनुष्याची दृष्ट ज्याला लागेल तो लवकरच रोगग्रस्त होतो. एखाद्या मनुष्याची, प्राण्याची व पदार्थाची अवास्तव स्तुति अथवा तारीफ केली कीं, तो स्तुतीचा विषय हटकून नष्ट पावतो अशी हिंदूंप्रमाणें इंग्रज व ईजिप्शियनांमध्येंहि समजूत आहे. जास्त स्तुति न करणें हा इंग्लंडमधील एक शिष्टाचार आहे.

उपचार.—दृष्टीचें सर्व लोकांनां भय वाटतें व तिच्या-बद्दल अनेक समजुती सर्वत्र रूढ आहेत. परंतु दृष्टीवर अनेक तोडगेहि पूर्वापार सर्व लोकांमध्यें आहेत असें दिसून येतें. पूर्वकालीन योद्धयाच्या शिरस्त्राणावर व ढालीवर कांहीं तरी भारून ठेविलेलें असे. त्यामुळें दृष्टीचा पहिला परिणाम त्यावर होऊन योद्धयाचें रक्षण होत असे. कांहीं तरी जादुगारी करूनहि दृष्टीला हतप्रभ करून टाकीत असत. दृष्ट लागू नये म्हणून चकाकणारे अलंकार, किंवा तशाच प्रकारचीं तेजस्वी शिरस्त्राणें घालीत असत. एखादें हास्यास्पद किंवा बीभत्स चिन्ह असलें कीं तें दृष्टीच्या आकर्षणास विघातक असतें म्हणून कांहीं गलिच्छ व चमत्कारिक मंत्रताईत अस्तित्वांत आले. स्वतःसच दृष्ट लावून घेणारे, अंगरख्याच्या आंत गुप्तपणें ठेवण्यासारखे, धर्मग्रंथांतील विशिष्ट उतारे असलेले असे तीन प्रकारचे मंत्रताईत असतात. वरील बीभत्स व इतर अनेक चिन्हांशिवाय प्रत्यक्ष दृष्टीचाच आकार दर्शविणारे ताईत असतात. डोळ्याची आकृति असलेल्या ताइतावरच घुबड, सर्प, वृश्चिक, व्याघ्र, हरिण, इत्यादि प्राण्यांच्या आकृती काढलेल्या असतात. असले ताईत ग्रीक, रोमन, फोनिशियन, तुर्क, अरब, इटालियन, रशियन वगैरे लोक वापरीत असत. इटलीमध्यें डोळ्याचा आकार असलेली कांच किंवा मणी ताईत म्हणून बाळगतात. चक्र, शिडी, गदा, सुरी, सर्प, मासा, कोंबडा, सिंह, डुक्कर, कुत्रा, हत्ती, बेडूक, पाल वगैरे प्राणी असलेले ताईत दृष्टीवर उत्तम तोडगे म्हणून गणले जातात. चंद्र, सूर्य, व्हर्जिन मेरी, डायाना वगैरेंचेहि ताईत असतात. तांबडी चिंधी, किल्ली, मीठ, आंगठी, अंडें, इत्यादि पदार्थचिहि ताईत करण्यांत येतात. ताइताशिवाय जादू, मंत्र, तंत्र, इत्यादि अनेक प्रकार सर्व देशांत दृष्टसंरक्षक म्हणून प्रचारांत आहेत.

आपल्याकडेहि दृष्ट लागू नये म्हणून ताईत, गंडे, मणी, तीट वगैरे साधनें उपयोगांत आणतात. ताईत चौकोनी किंवा लांबोडा असून आंत यंत्रें काढलेले कागद असतात. घोड्याचे केंसहि क्वचित त्यांत घालतात. अशुभनिवारक स्तोत्रें किंवा मंत्र लिहिलेलीं चिटोरीं सुद्धां त्यांत ठेवतात. मंत्र म्हणून व गांठी देऊन मग गंडा हातांत किंवा गळ्यांत बांधतात. दृष्टमणी नांवाचे काळ्या रंगाचे व वर पांढरे ठिपके असलेले स्वतंत्र मणी मिळतात, ते ताइताच्या किंवा ओंवंतीच्या दोहों बाजूस घालतात. काजळाची तीट बहुधां प्रत्येक स्त्रीस घरच्याघरीं करतां येते. याशिवाय मीठमिरच्या ओंवाळून टाकतात. ज्याला दृष्ट लागली असेल त्याच्या तोंडावरून व पाठीवरून ७-७ वेळ "दृष्टमिष्ट पापी... चुलींत पडो," असा उच्चार करून मीठमिरची उतरवून चुलींत फेंकतात. एक काळ्या चिंधीचा काकडा करून तो पेटवून शेणांत उलटा भिंतीस चिकटवितात. तो तिडतिड फार करू लागल्यास व वरील मीठमिरच्या चुलींत फेंकल्यानंतर घाण सुटल्यास दृष्ट लागली होती असें समजतात. स्वतःची स्वतःसच दृष्ट लागते असाहि समज आहे. लहान मुलांनां व सुरूप स्त्रीपुरुषांनां दृष्ट लागते; निर्जीव सुंदर वस्तूंनांहि दृष्ट लागते असा समज आहे. डांग प्रदेशांत डाकिणी म्हणून ज्या भिल्ल स्त्रियांनां म्हणतात, त्यांची दृष्ट अन्नाला लागते अशी समजूत आहे. त्यांनीं मागितल्यावर त्यांनां अन्न न देतां भक्षण केल्यास त्यापासून अपाय होतो व त्या अन्नाचें केस, मांस, रक्त यांत रूपांतर होतें असा समज आहे. पशूंच्या गळ्यांत धांवळ्याच्या दशा व मोठमोठे कांचेचे मणी दृष्टींचे प्रतिबंधक म्हणून आपल्याकडेहि

वापरतात. गांवांत ज्यांची दृष्ट लागते म्हणून प्रसिद्धी आहे, त्यांच्यादेखत गाईम्हशींचें दूधहि काढीत नाहींत. निर्जीव पदार्थ म्हणजे दगडी, लांकडी किंवा धातूंच्या वस्तू दृष्टीमुळें भंग पावतात अशीहि पण दृढ समजूत आहे.

**दृष्टि**—पाहण्याची क्रिया नेत्रांकडून होते. चक्षुरिंद्रियाच्या अन्तर्गत पडद्यावर ( रेटिना ) प्रकाशाच्या योगानें बाह्यवस्तूंची प्रतिमा पडते. या पडद्याला दृङ्मज्जारज्जू जोडलेले असतात. या मज्जारज्जूंच्या योगानें पडद्यावरील प्रतिमेचें ज्ञान मेंदूस होतें. जर प्रकाशकिरण पडद्यावर एकवटून न पडतां विस्तृतपणें पडतील तर त्या योगानें पदार्थ ओळखतां येणार नाहींत; म्हणून पदार्थांची प्रतिमा बरोबर रीतीनें नेत्राच्या पडद्यावर पडावी म्हणून एक विशिष्ट प्रकारची रचना असते. हें काम कनीनिका आणि डोळ्यांत असणारें बाह्यगोलभिंग ( लेन्स ) हीं करितात. फोटोच्या क्यामेऱ्यांत ज्याप्रमाणें प्रतिमा कांचफलकावर ( ग्रौंड ग्लासवर ) पडते त्याप्रमाणेंच या नेत्रान्तर्गत लेन्सच्या योगानें चक्षुरिंद्रियान्तर्गत पडद्यावर प्रतिमा पडते व त्या योगानें आपणांस ज्ञान होतें.

त्रिपार्श्व (प्रिझम) भिंगांतून सूर्यप्रकाशाचे किरण पाठविले तर सात रंगांचा एक पट्ट पडतो. या पट्टयास " कृत्रिम इंद्रधनुष्य " असें नांव आहे. पदार्थविज्ञानशास्त्रवेत्त्यांनीं असें सिद्ध केलें आहे कीं, तांबड्या किरणांच्या योगानें सुमारें दर सेकंदास ३९२ महापद्म वेळ ईथरचीं आंदोलनें होतात, व अगदीं कडेच्या जांभळ्या रंगाच्या योगानें सुमारें ७५७ महापद्म आंदोलनें होतात. ३९२ महापद्म आंदोलनें आणि तांबडा रंग; किंवा ७५७ महापद्म आंदोलनें आणि जांभळा रंग यांमध्यें कसा काय कार्यकारण संबंध आहे हें अद्याप शास्त्रज्ञलोकांस समजलें नाहीं. जर दर सेकंदास इथरची ३९२ महापद्म आंदोलनांपेक्षां कमी आंदोलनें किंवा ७५७ आंदोलनांपेक्षां जास्त आंदोलनें झालीं तर मानवी नेत्रास त्यांचें ज्ञान होत नाहीं. तांबड्या रंगाच्या आंदोलनांपेक्षां कमी आंदोलनें झाल्यास त्यांचें उष्णतेच्या किरणांच्या रूपानें ज्ञान होऊं शकतें व जांभळ्या रंगाच्या आंदोलनांपेक्षां जास्त आंदोलनें झाल्यास त्यांच्या योगानें कांहीं रासायनिक क्रिया घडतात. जर याप्रमाणें जास्त आंदोलनाच्या लहरी क्विनाइन सल्फेट या नांवाच्या पदार्थांच्या द्रावणांतून जाऊं दिल्या तर मानवी नेत्रांस त्या दृग्गोचर होऊं शकतात. याचें कारण असें आहे कीं, वरील द्रव्याच्या योगानें त्यांचीं आंदोलनें कमी प्रमाणावर होऊं लागतात त्यामुळें मनुष्यास हीं आंदोलनें दिसूं लागतात. रांटजन किरण नांवाच्या किरणांचीं दर सेकंदास ७५७ पेक्षां जास्त आंदोलनें होतात, त्यामुळें हे किरण दिसत नाहींत. परंतु हेच किरण बेरिअम प्लाटिनो सायनाइड नांवाच्या द्रव्यांतून गेल्याच्या योगानें ते मानवी दृष्टीस दृग्गोचर होऊं शकतात. कारण कीं ह्या किरणांचीं आंदोलनें वरील द्रवाच्या योगानें बऱ्याच कमी प्रमाणावर होऊं लागतात व त्यामुळें आपल्या नेत्रास हे किरण पाहतां येतात.

आपल्या डोळ्यांत एक लेन्स असतें म्हणून वर सांगितलेंच आहे. जवळचा पदार्थ पाहतांना तें लेन्स नेत्रांतील स्नायूंच्या योगानें जास्त फुगीर होतें व दूरचे पदार्थ पाहतांना लेन्स पातळ होतें. त्यामुळें आपणास दूरचे किंवा जवळचे पदार्थ स्पष्टपणें पाहतां येतात. मनुष्याच्या नेत्रांतील लेन्सांत कित्येक दोष उत्पन्न होतात. त्या दोषांचें निराकरण करावयाचें असल्यास कित्येकदां नेत्रांपुढें कृत्रिम कांचेचीं लेन्सें बसवून दृष्टिदोषाचें निराकरण करतां येतें.

**क नी नि का**.—आपल्या डोळ्यांत जो काळा भाग दिसतो त्याच्या मध्यभागीं एक बारीकसा मसुरीएवढें वर्तुळ दिसतें. अर्धवट अंधेरांत हें वर्तुळ पाहिल्यास मोठें झालेलें दिसतें व तीव्र उजेडांत बारीक झालेलें दिसतें. ही क्रिया एका पडद्याच्या योगानें होते. या पडद्यास कनीनिका असें नांव आहे. या पडद्यास कांहीं स्नायु जोडलेले आहेत, त्यांच्या योगानें वरील छिद्र लहानमोठें होतें. अंधेरांतून उजेडांत आल्यास मोठ्या छिद्रांतून जास्त प्रकाश येऊं लागतो, व त्यामुळें दृङ्मज्जारज्जूस त्रास होऊं लागतो, हा त्रास न व्हावा म्हणून कनीनिकेचें छिद्र लहान होतें; व त्यामुळें प्रकाश माफक प्रमाणावर नेत्रांत गेल्यामुळें नीट दिसूं लागतें.

**अं ध विं दु आ णि पी त विं दु**.—एका कागदावर सुमारें पावणेदोन इंचांच्या अंतरावर एक फुली व एक लहान काळा ठिपका अशीं दोन चिन्हें काढावींत. नंतर डावा डोळा मिटून फुलीकडे पहात कागद पुढेंमागें सरकवावा; म्हणजे कागदाची अशी एक स्थिति होते कीं, फुली दिसते, परंतु ठिपका दिसत नाहीं. या चमत्काराचें कारण असें आहे कीं, ठिपक्याची प्रतिमा नेत्राच्या पडद्यावरील 'अंधबिंदु' नांवाच्या स्थळीं पडते. त्यामुळें त्याची प्रतिमा आपणांस दिसत नाहीं. नेत्राच्या पडद्यावर दोन महत्त्वाचीं स्थळें आहेत. त्यांपैकीं एकास पीतबिंदु व दुसऱ्यास अंधबिंदु अशीं नांवें आहेत. पीतबिंदूवर बाह्य वस्तूची प्रतिमा पडल्यास ती अगदीं स्पष्टपणें दिसते; अंधबिंदूवर पडल्यास प्रतिमेचें ज्ञान मनास होत नाहीं; व या दोहोंव्यतिरिक्त अन्यस्थळीं ( पडद्यावरच ) प्रतिमा पडल्यास ती साधारणपणें दिसते.

**दृ ष्टि सा त त्य**.—नेत्राच्या पडद्यावर प्रतिमा पडली व नंतर ती प्रतिमा नाहींशी झाली तरी तिचें आपणांस कांहीं काळपर्यंत ज्ञान होतें. हा काळ सुमारें $\frac{1}{5}$ सेकंडपासून $\frac{1}{10}$ सेकंदापर्यंत आहे. नेत्रेंद्रियाच्या या गुणधर्माचा उपयोग सिनेमाटोग्राफ नांवाच्या यंत्रांत केलेला आहे. व्यवहारांत सुद्धां असेंच दिसून येईल. उ॰ पेटलेली उदबत्ती घेऊन ती झपाट्यानें वर्तुलाकार फिरविल्यास आपणास अग्निवर्तुल दिसतें; याचें कारण सुद्धां दृष्टिसातत्य हेंच आहे.

अं त र्वि स र्ज न.—क्षेत्रफळानें सारखे असे दोन चौकोन घेतले व प्रत्येकांत एकेक लहान चौकोन काढला, व एक काळा आणि दुसरा पांढरा असा रंगविला तर आंतला काळा चौकन पांढऱ्या चौकोनापेक्षां किंचितसा लहान दिसतो. असें दिसण्याचें कारण असें आहे कीं, नेत्रपटलावर जो ठसा उमटतो तो चित्राच्या आकाराच्या बाहेर थोडासा जातो. यामुळें शुभ्र वस्तूंचा ठसा काळ्या प्रदेशावर पडून त्यामुळें कृष्ण भूमिकेवरील शुभ्र वस्तू किंचितशा मोठ्या दिसूं लागतात. हा जो परिणाम दिसतो त्यास अंतर्विसर्जन अशी संज्ञा आहे. हा परिणाम भिन्न भिन्न लोकांवर भिन्न भिन्न प्रमाणांत घडतो आणि एकाच मनुष्यावर भिन्न भिन्न दिवशीं भिन्न भिन्न प्रमाणांत घडतो.

रं गां चें ज्ञा न.—रंगाचें जें ज्ञान होतें तें ईथरमध्यें ठराविक आंदोलनें अथवा कंप होऊन त्यांची प्रतिमा नेत्रपटलावर पडल्याच्या योगानें होतें. ठराविक प्रमाणांत ठराविक कंप झाल्याशिवाय रंगाचें ज्ञान होणें शक्य नाहीं. शुभ्र प्रकाश सात रंगांच्या मिश्रणानें उत्पन्न होतो. एखाद्या पदार्थावर सूर्यप्रकाश पडला असतांना तो प्रकाश त्या पदार्थापासून परावर्तन होतांना त्या पदार्थानें कोणत्याहि प्रकारच्या प्रकाशलहरींचें ग्रहण न करितां प्रकाशाचें उत्सर्जन केल्यास तो पदार्थ पांढरा दिसतो. सर्वच प्रकारच्या लहरींचें ग्रहण करून कांहींच उत्सर्जन न केल्यास तो पदार्थ काळा दिसतो. जर पदार्थानें हिरव्याशिवायकरून दुसऱ्या सर्व प्रकारच्या लहरींचें ग्रहण केलें तर पदार्थ हिरवा दिसतो; याप्रमाणेंच दुसऱ्या रंगांविषयीं समजावें

नि र नि रा ळ्या रं गां चें मि श्र ण.—निरनिराळ्या रंगांचें मिश्रण करण्याच्या अनेक पद्धती आहेत; त्यांपैकीं एक दोन पद्धती पुढें दिल्या आहेत.

पहिली पद्धतः—दोन कोन जवळ जवळ आणून एक फट तयार करतात. या फटीशेजारीं एक त्रिकोणी भिंग बसविलेलें असतें. या भिंगांत वरील फटींतून सूर्यप्रकाश घेऊन त्याच्यापासून योग्य प्रकारचा रंग येऊं देतात; नंतर दुसऱ्या एका फटींतून दुसऱ्या भिंगाच्या योगानें दुसऱ्या एखाद्या रंगाचा प्रकाश येऊं देतात; हे दोन्ही रंग एका स्वच्छ पडद्यावर एकाच ठिकाणीं पडूं येतात. या पडद्याकडे पाहून या रंगांचें मिश्रण झालेलें समजून येतें.

दुसरी पद्धतः—समजा कीं, आपणांस हिरवा आणि नारिंगी यांचें मिश्रण करावयाचें आहे. तर अ व ब दोन ठिकाणीं त्या रंगाचे कागद टेवून खावे व त्यांच्या वरल्या बाजूंस क येथें एक कांच धरावी. म्हणजे तेथील नारिंगी किरण कांचपासून परावर्तन पाऊन निघतील व अ येथील हिरवे किरण क कांचेस छेदून जातील,असें झाल्यामुळें डोळ्यास हिरवा आणि नारिंगी या दोन रंगांचें मिश्रण दिसतें; म्हणजे हिरवा आणि नारिंगी यांचें मिश्रण पिवळें होतें असें आपल्या डोळ्यास समजून येतें.

तिसरी पद्धतः—एका चक्रावर जे रंग ज्या प्रमाणांत पाहिजे त्या प्रमाणांत त्या चक्रावरील वृत्तखंडें रंगवावींत; नंतर तें चक्र यंत्राच्या साहाय्यानें अत्यंत वेगानें फिरवावें. अशा रीतीनें चक्र फिरत असतां त्याकडे पाहिलें तर आपणास दोन रंगांचें मिश्रण झालेलें दिसून येईल. याप्रमाणें चक्र फिरविलें तर दृष्टिसातत्यामुळें रंगांचें मिश्रण झालेलें दिसून येतें.

प्रसिद्ध शास्त्रज्ञ न्यूटन यानें इंद्रधनुष्यांत दिसणारे सात रंग याप्रमाणेंच एका चक्रावर काढून तें चक्र फार वेगानें फिरविलें. तेव्हां ते सात रंग निरनिराळे न दिसतां त्या सर्वांचा मिळून एकच पांढरा रंग दिसूं लागला; याप्रमाणें न्यूटननें सात रंगांच्या मिश्रणापासून पांढरा रंग उत्पन्न होतो असें सिद्ध केलें.

पांढऱ्या रंगांत किती प्रमाणांत सात रंग आहेत हें पुढें दिलेल्या वृत्तखंडांच्या अंशांवरून ध्यानांत येईल.

| रंगाचें नांव | अंश | कला |
|---|---|---|
| तांबडा | ६०° | ४५.५' |
| नारिंगी | ३४° | १०.५' |
| पिवळा | ५४° | ४१.' |
| हिरवा | ६० | ४५.'५ |
| अस्मानी | ५४° | ४१'. |
| निळा | ३४° | १०.'५ |
| काशपुष्परंग | ६०° | ४५.'५ |

(वरील सर्व अंशांची बेरीज ३६०° अंशांइतकी पाहिजे. परंतु .५' कला म्हणजे ३० विकला—इतकी तफावत पडते). वरील कोष्टकावरून प्रत्येक रंगाचें पांढऱ्या रंगांत काय प्रमाण आहे, याचा हिशोब करतां येतो.

रं गां वि ष यीं चे सि द्धा न्त.—रंगाचें ज्ञान आपणास कोणत्या प्रकारें होतें याविषयीं सध्यां प्रचलित असे दोन सिद्धान्त आहेत. या सिद्धान्तांचें विवेचन पुढें केलें आहे. प्रत्येक रंगाच्या ठराविक लांबीच्या लहरी असतात. पुढें कित्येक रंगांच्या लहरींची लांबी दिली आहे. लांबीचें परिमाण मिलिमिटरचा एक दशलक्षांश हें आहे. तांबडा ६५६; नारिंगी ६०८; पिंवळा ५६७; हिरवट पिंवळा ५६४; इत्यादि याप्रमाणें निरनिराळ्या लांबीच्या लहरींच्या योगानें निरनिराळे रंग दिसतात. परंतु अमुक प्रकारच्या लहरींच्या योगानें अमुक प्रकारचाच रंग कां दिसावा याविषयीं यंग आणि हेल्महोल्ट्स यांची पुढें दिल्याप्रमाणें कल्पना आहे. यंग यानें प्रथमतः ही कल्पना बसविली व नंतर हेल्महोल्ट्स यानें ती कल्पना जास्त परिणत केली.

नेत्रपटलावर तीन प्रकारचे मज्जातंतू आहेत असें यांत गृहीत धरलें आहे. त्यांतील एका प्रकारच्या तंतूनें तांबड्या लहरींचें ज्ञान होतें, दुसऱ्या प्रकारच्यानें हिरवीचें ज्ञान होतें व तिसऱ्या प्रकारच्यानें काशपुष्परंगाचें ज्ञान होतें. परंतु सृष्टीमध्यें तीन रंग नाहींत. तीन रंगांव्यतिरिक्त जे दुसरे

रंग आहेत; तेव्हां त्यांनीं असें गृहीत धरलें कीं, दोन किंवा तीन प्रकारच्या मज्जारज्जूंस निरनिराळ्या प्रमाणांत चेतना मिळते; त्यामुळें निरनिराळे रंग दिसतात. तिन्हींहि प्रकारच्या मज्जारज्जूंस समप्रमाणांत जर चेतना मिळाली तर पांढरा रंग दिसतो.

हेरिंगचा सिद्धान्तः—वरील सिद्धान्ताविरुद्ध हेरिंग नांवाच्या शास्त्रज्ञानें असा सिद्धान्त मांडला आहे कीं, नेत्रपटलावर तीन प्रकारचे मज्जारज्जू आहेत; त्यांतील प्रत्येकानें पुढील जोडयांचें ज्ञान होतें. त्या जोडया येणेंप्रमाणें:— तांबडा आणि हिरवा; पिंवळा आणि निळा; पांढरा आणि काळा. या मज्जारज्जूंवर एका प्रकारच्या लहरीनें घटनात्मक कार्य होतें. आणि दुसऱ्या प्रकारच्या लहरीनें विघटनात्मक कार्य होतें. उदाहरणार्थ समजा कीं, रक्तहारित मज्जेवर घटनात्मक कार्य झाल्यास तांबडा रंग दिसूं लागेल. व विघटनात्मक कार्य झाल्यास हिरवा रंग दिसूं लागेल रंगांत दोन किंवा तीन प्रकारच्या मज्जारज्जूंचें कार्य होऊन तसले मिश्र रंग दिसतात. या वरील दोन प्रकारच्या सिद्धान्तांपासून शास्त्रीयदृष्टया रंगांच्या दोन निरनिराळ्या उपपत्ती संभवतात; त्यांपैकीं जास्त प्रमाणयुक्त कोणती हें अद्याप नीटसें सिद्ध झालें नाहीं.

व र्णा न्ध ता.—शोधकांनां असें आढळून आलें आहे कीं, दर शेंभर लोकांत ४ लोकांच्या ठिकाणीं वर्णान्धता असते; म्हणजे कांहीं लोकांनां रंग ओळखूं येत नाहींत. कित्येकांनां तांबडा रंग दिसत नाहीं, तर त्याऐवजीं त्यांनां काळसर हिरवा रंग दिसतो. परंतु कित्येकांनां हिरवा रंग दिसत नाहीं तर, त्या हिरव्या रंगाऐवजीं काळसर पिंवळा रंग दिसतो. असेंहि आढळून आलें आहे कीं, स्त्रियांमध्यें वर्णान्धतेचें प्रमाण अत्यंत अल्प असतें आणि पुरुषांमध्येंच बहुधां हा रोग जास्त आढळून येतो. रेल्वेवरील बहुतेक सर्व नोकरांनां हिरवा, पांढरा, तांबडा वगैरे रंग फार दुरूनच ओळखावे लागतात. म्हणून रेल्वे अधिकारी वर्णान्धता असलेलीं मनुष्यें सहसा नोकरीवर लावीत नाहींत.

दृ ष्टि दो ष.—दृष्टिदोष अनेक प्रकारचे आहेत; त्यांपैकीं कांहींचें वर्णन पुढें केलें आहे.

दूरदृष्टिदोषः—या प्रकारचा दृष्टिदोष बहुतकरून म्हातारपणीं उत्पन्न होतो. क्वचित प्रसंगीं हा दोष तारुण्यांत सुद्धां उत्पन्न होतो. या रोगाचें महत्त्वाचें कारण हें आहे कीं, नेत्रांतील लेन्सची जाडी कमी होऊन लेन्सचें केंद्रान्तर वाढतें; व त्यामुळें जवळचें दिसत नाहीं. हा दोष नाहींसा करण्याकरितां योग्य केंद्रान्तराच्या बाह्यगोलभिंगांचा चष्मा वापरावा लागतो (जास्त माहिती उपनेत्र या लेखांत पहा. ).

समीपदृष्टिदोषः—हा रोग आधुनिक ग्रंथप्रसारामुळें उत्पन्न झाला आहे. जंगली लोकांत हा रोग आढळत नाहीं. अतिवाचनामुळें डोळ्यांतील लेन्समध्यें फुगीरपणा उत्पन्न होतो. त्यामुळें लांबचें दिसेनासें होतें. हा दोष नाहींसा करण्याकरितां अंतर्गोलभिंगें वापरतात ( उपनेत्र पहा. ).

तिरळेपणाः—नेत्रांचा तिरळेपणा नाहींसा करण्याकरितां त्रिकोणी भिंगांचा चष्मा वापरतात ( उपनेत्र पहा ).

मोतीबिंदुः—या रोगांत नेत्रांतील लेन्सचें पारदर्शकत्व नाहींसें होतें; त्यामुळें मनुष्य अगदीं अंध होतो; परंतु शस्त्रप्रयोगानें हें निरुपयोगी झालेलें लेन्स काढून टाकतात; व नंतर योग्य प्रकारचें लेन्स असलेला चष्मा नाकावर बसविल्यास या अंध मनुष्यास उत्तम प्रकारें दिसूं लागतें। मोतीबिंदु दुरुस्त केलेल्या मनुष्यास जवळचें पाहण्यास वेगळा चष्मा आणि दूरचें पाहण्यास वेगळा चष्मा या प्रमाणें निदान दोन चष्मे तरी वापरावे लागतात.

दृ ष्टी चें सं र क्ष ण.—आतां दृष्टीच्या आरोग्याचे ठळक ठळक नियम देऊं. लहान मुलांच्या दृष्टीविषयीं फार जपलें पाहिजे; विशेषतः ज्या मुलांच्या आईबापांच्या दृष्टींत दोष असतील त्या मुलांच्या दृष्टीविषयीं फारच जपलें पाहिजे. कारण दृष्टीसंबंधीं असणारे कित्येक दोष संततींत उत्पन्न होतात. कांहीं दोष प्रत्यक्ष रीतीनें संततींत उतरत नाहींत, तरी त्या दोषांची पूर्व तयारी संततीच्या ठिकाणीं भरपूर असते; समीपदृष्टिदोष हा रोग फक्त आधुनिक सुधारणेपासूनच उत्पन्न झाला आहे. रानटी मनुष्यांत समीपदृष्टिदोष असलेला एकहि इसम सांपडत नाहीं. पुस्तकांचा प्रसार झाल्यापासून, विशेषतः बारीक टाइपांच्या पुस्तकांच्या प्रसारापासून या रोगास चांगलीच मदत होते. मुलें शाळेंत जात असतांना त्यांच्या सर्वसाधारण आरोग्याची काळजी न घेणें, वाचण्यास अंधेराची जागा असणें, अत्यंत जवळ पुस्तक धरणें, बारीक टाईप, खराब टाईप, व्हाईट कागद इत्यादि कारणें हा रोग उत्पन्न करण्यास कारणीभूत होतात. तेव्हां हीं कारणें वेळींच दूर केलीं पाहिजेत. जर समीपदृष्टिदोष उत्पन्न झाला असेल तर योग्य चष्मा वापरावा; हा चष्मा डोळ्यावर सतत असूं द्यावा. नवीन चष्मा लावणाऱ्यास विशेषतः मुलास आपल्या डोळ्यावर सतत चष्मा असूं देण्याचें पसंत पडत नाहीं; परंतु त्यांस याविषयीं नीट समजाऊन सांगावें. सामान्य मनुष्य जवळचें पाहूं लागला तर डोळ्यांतील लेन्स फुगीर होतें व दूरचें पाहूं लागला कीं चापट होतें; परंतु समीप-दृष्टि हा दोष उत्पन्न झालेल्या मनुष्याच्या डोळ्यांत असें घडत नाहीं; त्यामुळें त्याचा दृष्टिदोष वाढतच जातो. परंतु योग्य प्रकारचा चष्मा लावल्यानें डोळ्यांतील इंद्रिय लेन्सची क्रिया पूर्ववत् घडूं लागते व त्यायोगानें डोळ्यांतील स्नायूस योग्य व्यायाम घडतो. याकरितांच समीपदृष्टीच्या मनुष्यानें आपल्या डोळ्यावर सतत चष्मा असूं द्यावा असें वैद्य व डॉक्टर लोक सांगतात.

मु लां च्या शा ळा.—मुलांच्या शाळा दृष्टीचे दोष उत्पन्न करण्यापासून अलिप्त अशा असाव्यात. कारण मुलांस दिवसांतील कित्येक तास शाळेंत घालवावे लागतात. शाळेंत उजेड आणि हवा मुबलक यावी. मुलास एकसारखें पुस्तकाकडे

अं त र्वि स र्ज न.—क्षेत्रफळानें सारखे असे दोन चौकोन घेतले व प्रत्येकांत एकेक लहान चौकोन काढला, व एक काळा आणि दुसरा पांढरा असा रंगविला तर आंतला काळा चौकन पांढऱ्या चौकोनापेक्षां किंचितसा लहान दिसतो. असें दिसण्याचें कारण असें आहे कीं, नेत्रपटलावर जो ठसा उमटतो तो चित्राच्या आकाराच्या बाहेर थोडासा जातो. यामुळें शुभ्र वस्तूंचा ठसा काळ्या प्रदेशावर पडून त्यामुळें कृष्ण भूमिकेवरील शुभ्र वस्तू किंचितशा मोठ्या दिसूं लागतात. हा जो परिणाम दिसतो त्यास अंतर्विसर्जन अशी संज्ञा आहे. हा परिणाम भिन्न भिन्न लोकांवर भिन्न भिन्न प्रमाणांत घडतो आणि एकाच मनुष्यावर भिन्न भिन्न दिवशीं भिन्न भिन्न प्रमाणांत घडतो.

रं गां चें ज्ञा न.—रंगाचें जें ज्ञान होतें तें ईथरमध्यें ठराविक आंदोलनें अथवा कंप होऊन त्यांची प्रतिमा नेत्रपटलावर पडल्याच्या योगानें होतें. ठराविक प्रमाणांत ठराविक कंप झाल्याशिवाय रंगाचें ज्ञान होणें शक्य नाहीं. शुभ्र प्रकाश सात रंगांच्या मिश्रणानें उत्पन्न होतो. एखाद्या पदार्थावर सूर्यप्रकाश पडला असतांना तो प्रकाश त्या पदार्थापासून परावर्तन होतांना त्या पदार्थानें कोणत्याहि प्रकारच्या प्रकाशलहरींचें ग्रहण न करितां प्रकाशाचें उत्सर्जन केल्यास तो पदार्थ पांढरा दिसतो. सर्वच प्रकारच्या लहरींचें ग्रहण करून कांहींच उत्सर्जन न केल्यास तो पदार्थ काळा दिसतो. जर पदार्थानें हिरव्याशिवायकरून दुसऱ्या सर्व प्रकारच्या लहरींचें ग्रहण केलें तर पदार्थ हिरवा दिसतो; याप्रमाणेंच दुसऱ्या रंगांविषयीं समजावें

नि र नि रा ळ्या रं गां चें मि श्र ण.—निरनिराळ्या रंगांचें मिश्रण करण्याच्या अनेक पद्धती आहेत; त्यांपैकीं एक दोन पद्धती पुढें दिल्या आहेत.

पहिली पद्धतः—दोन कोन जवळ जवळ आणून एक फट तयार करतात. या फटीशेजारीं एक त्रिकोणी भिंग बसविलेलें असतें. या भिंगांत वरील फटींतून सूर्यप्रकाश घेऊन त्याच्यापासून योग्य प्रकारचा रंग येऊं येतात; नंतर दुसऱ्या एका फटींतून दुसऱ्या भिंगाच्या योगानें दुसऱ्या एखाद्या रंगाचा प्रकाश येऊं देतात; हे दोन्ही रंग एका स्वच्छ पडद्यावर एकाच ठिकाणीं पडूं येतात. या पडद्याकडे पाहून या रंगांचें मिश्रण झालेलें समजून येतें.

दुसरी पद्धतः—समजा कीं, आपणांस हिरवा आणि नारिंगी यांचें मिश्रण करावयाचें आहे. तर अ व ब दोन ठिकाणीं त्या रंगाचे कागद टेवून यावे व त्यांच्या वरल्या बाजूस क येथें एक कांच धरावी. म्हणजे तेथील नारिंगी किरण कांचेपासून परावर्तन पाऊन निघतील व ब येथील हिरवे किरण क कांचेस छेदून जातील,असें झाल्यामुळें डोळ्यास हिरवा आणि नारिंगी या दोन रंगांचें मिश्रण दिसतें; म्हणजे हिरवा आणि नारिंगी यांचें मिश्रण पिवळें होतें असें आपल्या डोळ्यास समजून येतें.

तिसरी पद्धतः—एका चक्रावर जे रंग ज्या प्रमाणांत पाहिजे त्या प्रमाणांत त्या चक्रावरील वृत्तखंडें रंगवावींत; नंतर तें चक्र यंत्राच्या साह्याय्यानें अत्यंत वेगानें फिरवावें. अशा रीतीनें चक्र फिरत असतां त्याकडे पाहिलें तर आपणास दोन रंगांचें मिश्रण झालेलें दिसून येईल. याप्रमाणें चक्र फिरविलें तर दृष्टिसातत्यामुळें रंगांचें मिश्रण झालेलें दिसून येतें.

प्रसिद्ध शास्त्रज्ञ न्यूटन यानें इंद्रधनुष्यांत दिसणारे सात रंग याप्रमाणेंच एका चक्रावर काढून तें चक्र फार वेगानें फिरविलें. तेव्हां ते सात रंग निरनिराळे न दिसतां त्या सर्वांचा मिळून एकच पांढरा रंग दिसूं लागला; याप्रमाणें न्यूटननें सात रंगांच्या मिश्रणापासून पांढरा रंग उत्पन्न होतो असें सिद्ध केलें.

पांढऱ्या रंगांत किती प्रमाणांत सात रंग आहेत हें पुढें दिलेल्या वृत्तखंडांच्या अंशांवरून ध्यानांत येईल.

| रंगाचें नांव | अंश | कला |
|---|---|---|
| तांबडा | ६०° | ४५.५′ |
| नारिंगी | ३४° | १०.५′ |
| पिवळा | ५४° | ४१.′ |
| हिरवा | ६० | ४५.′५ |
| अस्मानी | ५४° | ४१′. |
| निळा | ३४° | १०.′५ |
| काशपुष्परंग | ६०° | ४५.′५ |

(वरील सर्व अंशांची बेरीज ३६०° अंशांइतकी पाहिजे. परंतु .५′ कला म्हणजे ३० विकला—इतकी तफावत पडते). वरील कोष्टकावरून प्रत्येक रंगाचें पांढऱ्या रंगांत काय प्रमाण आहे, याचा हिशोब करतां येतो.

रं गां वि ष यीं चे सि द्धा न्त.—रंगांचें ज्ञान आपणास कोणत्या प्रकारें होतें याविषयीं सध्यां प्रचलित असे दोन सिद्धान्त आहेत. या सिद्धान्तांचें विवेचन पुढें केलें आहे. प्रत्येक रंगाच्या ठराविक लांबीच्या लहरी असतात. पुढें कित्येक रंगांच्या लहरींची लांबी दिली आहे. लांबीचें परिमाण मिलिमिटरचा एक दशलक्षांश हें आहे. तांबडा ६५६; नारिंगी ६०८; पिंवळा ५६७; हिरवट पिंवळा ५६४; इत्यादि याप्रमाणें निरनिराळ्या लांबीच्या लहरींच्या योगानें निरनिराळे रंग दिसतात. परंतु अमुक प्रकारच्या लहरींच्या योगानें अमुक प्रकारचाच रंग कां दिसावा याविषयीं यंग आणि हेल्महोट्झ यांची पुढें दिल्याप्रमाणें कल्पना आहे. यंग यानें प्रथमतः ही कल्पना बसविली व नंतर हेल्महोट्झ यानें ती कल्पना जास्त परिणत केली.

नेत्रपटलावर तीन प्रकारचे मज्जातंतू आहेत असें यांत गृहीत धरलें आहे. त्यांतील एका प्रकारच्या तंतूनें तांबड्या लहरींचें ज्ञान होतें, दुसऱ्या प्रकारच्यानें हिरवीचें ज्ञान होतें व तिसऱ्या प्रकारच्यानें काशपुष्परंगाचें ज्ञान होतें. परंतु सृष्टीमध्यें तीन रंग नाहींत. तीन रंगांव्यतिरिक्त जे दुसरे

रंग आहेत; तेव्हां त्यांनीं असें गृहीत धरलें कीं, दोन किंवा तीन प्रकारच्या मज्जारज्जूंस निरनिराळ्या प्रमाणांत चेतना मिळते; त्यामुळें निरनिराळे रंग दिसतात. तिन्हींहि प्रकारच्या मज्जारज्जूंस समप्रमाणांत जर चेतना मिळाली तर पांढरा रंग दिसतो.

हेअरिंगचा सिद्धान्तः—वरील सिद्धान्ताविरुद्ध हेअरिंग नांवाच्या शास्त्रज्ञानें असा सिद्धान्त मांडला आहे कीं, नेत्रपटलावर तीन प्रकारचे मज्जारज्जू आहेत; त्यांतील प्रत्येकानें पुढील जोडयांचें ज्ञान होतें. त्या जोडया येणेंप्रमाणेः—तांबडा आणि हिरवा; पिंवळा आणि निळा; पांढरा आणि काळा. या मज्जारज्जूंवर एका प्रकारच्या लहरींनें घटनात्मक कार्य होतें. आणि दुसऱ्या प्रकारच्या लहरींनें विघटनात्मक कार्य होतें. उदाहरणार्थ समजा कीं, रक्ताहारित मज्जेवर घटनात्मक कार्य झाल्यास तांबडा रंग दिसूं लागेल. व विघटनात्मक कार्य झाल्यास हिरवा रंग दिसूं लागेल रंगांत दोन किंवा तीन प्रकारच्या मज्जारज्जूंचें कार्य होऊन तसले मिश्र रंग दिसतात. या वरील दोन प्रकारच्या सिद्धान्तांपासून शास्त्रीयदृष्टया रंगांच्या दोन निरनिराळ्या उपपत्ती संभवतात; त्यांपैकीं जास्त प्रमाणयुक्त कोणती हें अद्याप नीटसें सिद्ध झालें नाहीं.

वर्णान्धता.—शोधकांनां असें आढळून आलें आहे कीं, दर शंभर लोकांत ४ लोकांच्या ठिकाणीं वर्णान्धता असते; म्हणजे कांहीं लोकांनां रंग ओळखूं येत नाहींत. कित्येकांनां तांबडा रंग दिसत नाहीं, तर त्याऐवजीं त्यांनां काळसर हिरवा रंग दिसतो. परंतु कित्येकांनां हिरवा रंग दिसत नाहीं तर, त्या हिरव्या रंगाऐवजीं काळसर पिंवळा रंग दिसतो. असेंहि आढळून आलें आहे कीं, स्त्रियांमध्यें वर्णान्धतेचें प्रमाण अत्यंत अल्प असतें आणि पुरुषांमध्येंच बहुधा हा रोग जास्त आढळून येतो. रेल्वेवरील बहुतेक सर्व नोकरांनां हिरवा, पांढरा, तांबडा वगैरे रंग फार दुरूनच ओळखावे लागतात. म्हणून रेल्वे अधिकारी वर्णान्धता असलेलीं मनुष्यें सहसा नोकरीवर लावीत नाहींत.

दृष्टिदोष.—दृष्टिदोष अनेक प्रकारचे आहेत; त्यांपैकीं कांहींचें वर्णन पुढें केलें आहे.

दूरदृष्टिदोषः—या प्रकारचा दृष्टिदोष बहुतकरून म्हातारपणीं उत्पन्न होतो. क्वचित प्रसंगीं हा दोष तारुण्यांत सुद्धां उत्पन्न होतो. या रोगाचें महत्त्वाचें कारण हें आहे कीं, नेत्रांतील लेन्सची जाडी कमी होऊन लेन्सचें केंद्रान्तर वाढतें; व त्यामुळें जवळचें दिसत नाहीं. हा दोष नाहींसा करण्याकरितां योग्य केंद्रान्तराच्या बाह्यगोलभिंगांचा चष्मा वापरावा लागतो (जास्त माहिती उपनेत्र या लेखांत पहा. ).

समीपदृष्टिदोषः—हा रोग आधुनिक ग्रंथप्रसारामुळें उत्पन्न झाला आहे. जंगली लोकांत हा रोग आढळत नाहीं. अतिवाचनामुळें डोळ्यांतील लेन्समध्यें फुगीरपणा उत्पन्न होतो. त्यामुळें लांबचें दिसेनासें होतें. हा दोष नाहींसा करण्याकरितां अंतर्गोलभिंगें वापरतात (उपनेत्र पहा. ).

तिरळेपणाः—नेत्रांचा तिरळेपणा नाहींसा करण्याकरितां त्रिकोणी भिंगांचा चष्मा वापरतात ( उपनेत्र पहा ).

मोतीबिंदुः—या रोगांत नेत्रांतील लेन्सचें पारदर्शकत्व नाहींसें होतें; त्यामुळें मनुष्य अगदीं अंध होतो; परंतु शस्त्रप्रयोगानें हें निरुपयोगी झालेलें लेन्स काढून टाकतात; व नंतर योग्य प्रकारचें लेन्स असलेला चष्मा नाकावर बसविल्यास या अंध मनुष्यास उत्तम प्रकारें दिसूं लागतें। मोतीबिंदु दुरुस्त केलेल्या मनुष्यास जवळचें पाहण्यास वेगळा चष्मा आणि दूरचें पाहण्यास वेगळा चष्मा या प्रमाणें निदान दोन चष्मे तरी वापरावे लागतात.

दृष्टीचें संरक्षण.—आतां दृष्टीच्या आरोग्याचे ठळक ठळक नियम देऊं. लहान मुलांच्या दृष्टीविषयीं फार जपलें पाहिजे; विशेषतः ज्या मुलांच्या आईबापांच्या दृष्टींत दोष असतील त्या मुलांच्या दृष्टीविषयीं फारच जपलें पाहिजे. कारण दृष्टीसंबंधीं असणारे कित्येक दोष संततींत उत्पन्न होतात. कांहीं दोष प्रत्यक्ष रीतीनें संततींत उतरत नाहींत, तरी त्या दोषांची पूर्व तयारी संततीच्या ठिकाणीं भरपूर असते; समीपदृष्टिदोष हा रोग फक्त आधुनिक सुधारणेपासूनच उत्पन्न झाला आहे. रानटी मनुष्यांत समीपदृष्टिदोष असलेला एकहि इसम सांपडत नाहीं. पुस्तकांचा प्रसार झाल्यापासून, विशेषतः बारीक टाइपांच्या पुस्तकांच्या प्रसारापासून या रोगास चांगलीच मदत होते. मुलें शाळेंत जात असतांना त्यांच्या सर्वसाधारण आरोग्याची काळजी न घेणें, वाचण्यास अंधेराची जागा असणें, अत्यंत जवळ पुस्तक धरणें, बारीक टाईप, खराब टाईप, वाईट कागद इत्यादि कारणें हा रोग उत्पन्न करण्यास कारणीभूत होतात. तेव्हां हीं कारणें वेळींच दूर केलीं पाहिजेत. जर समीपदृष्टिदोष उत्पन्न झाला असेल तर योग्य चष्मा वापरावा; हा चष्मा डोळ्यावर सतत असूं द्यावा. नवीन चष्मा लावणाऱ्यास विशेषतः मुलास आपल्या डोळ्यावर सतत चष्मा असूं देण्याचें पसंत पडत नाहीं; परंतु त्यांस याविषयीं नीट समजाऊन सांगावें. सामान्य मनुष्य जवळचें पाहूं लागला तर डोळ्यांतील लेन्स फुगीर होतें व दूरचें पाहूं लागला कीं चापट होतें; परंतु समीप-दृष्टि हा दोष उत्पन्न झालेल्या मनुष्याच्या डोळ्यांत असें घडत नाहीं; त्यामुळें त्याचा दृष्टिदोष वाढतच जातो. परंतु योग्य प्रकारचा चष्मा लावल्यानें डोळ्यांतील सेंद्रिय लेन्सची क्रिया पूर्ववत् घडूं लागते व त्यायोगानें डोळ्यांतील स्नायूस योग्य व्यायाम घडतो. याकरितां समीपदृष्टीच्या मनुष्यानें आपल्या डोळ्यावर सतत चष्मा असूं द्यावा असें वैद्य व डॉक्टर लोक सांगतात.

मुलांच्या शाळा.—मुलांच्या शाळा दृष्टीचे दोष उत्पन्न करण्यापासून अलिप्त अशा असाव्यात. कारण सांतील कित्येक तास शाळेंत घालवावे नजीक आणि हवा मुबलक यावी. मुलास

किंवा पार्टीकडे पाहत बसवूं नये; मधून मधून दुसऱ्या प्रकारानें शिकवावें.

**देऊळगांव राजा**—वऱ्हाडांतील बुलढाणा जिल्ह्याच्या चिखली तालुक्यांतील एक गांव. लोकसंख्या ( १९११ ) ६०२६. सिंघखेडच्या जाधवरावांवरून हें नांव पडलें ( ' जाधव ' पहा ). जाधवरावांचा किल्ला व रावजगदेव याची बायको दुर्गाबाई हिची 'मोतीसमाध' येथें अजून दृष्टीस पडते. येथें एक बालाजीचें मंदिर असून वऱ्हाडांतील सर्वांत मोठी जत्रा येथें भरते.

**देऊळघाट**—वऱ्हाड. येथें हल्लीं एक नबाबघराणें नांदत आहे. हे मूळचे दिल्लीचे पठाण होत. नादीरशहाच्या स्वारीनंतर दिल्लीहून निघून हैदराबादेस हे निजामाकडे नोकर राहिले. आसईच्या लढाईच्या वेळीं महंमद रहीम हा हैदराबादेहून देऊळघाट येथील किल्ल्यांत किल्लेदारीच्या जागेवर आला. यानें आसईच्या लढाईत मराठ्यांविरुद्ध वेलस्ली याला मदत केली त्यामुळें वेलस्लीनें त्याला निजामाकडून चार गांवें जहागीर देवविली. हल्लींचा नबाब महंमद सलामुल्ला हा वरील महंमदचा नातु होय ( १९२५ ). घाट बुलढाण्याजवळ आहे; त्यास देऊळघाटची वेस असेंहि म्हणतात. खंडेराव काशी न्यायाधीश यास या परगण्याचा मोकासा स. १७५२ त मिळाला होता. [वऱ्हाडचा इतिहास; फेरिस्ता.]

**देगांवे**—मुंबई इलाखा, बेळगांव जिल्हा. कित्तूरच्या नैर्ऋत्येस तीन मैलांवर हें एक खेडें आहे. गोवे येथील सहावा कदंब राजा परमादि ( स. ११४७–११७५ ) याची पत्नी कमलादेवी हिनें कमलनारायण आणि महालक्ष्मी अशीं देवळें बांधलीं आहेत. देवळांत चार शिलालेख असून पैकीं दोन ११७५ सालांतील आहेत.

**देदयी**, टाउनशिप.—खालच्या ब्रह्मदेशांतील पियपन जिल्ह्याची एक पूर्वेकडील टाउनशिप. क्षेत्रफळ ३६५ चौरस मैल हिचा आकार त्रिकोनी असून पूर्व व पश्चिम सीमांवरून टो व पयपान ह्या नद्या वहातात. दक्षिणेस समुद्र आहे लोकसंख्या ( १९११ ) ७१४४९२. या टाउनशिपमध्यें देदयी हा एक मोठा गांव असून १२३ खेडीं आहेत.

गांव:—चिनद क्रीर नदीच्या उजव्या तीरावर हें गांव आहे. लोकसंख्या ( १९११ ) ६१८९. हा गांव सखल जमीनीवर वसलेला आहे. येथें तावकिरात नांवाचा बौद्धांचा मोठा पागोडा ( देवालय ) आहे. व्यापारामुळें ह्या गांवास कांहींसें महत्त्व प्राप्त झालें आहे.

**देदर्द**—मुंबई इलाखा. काठेवाडांतील एक लहानसें संस्थान. हें चोक ठाण्यांत असून त्यापासून वायव्येस सुमारें ६ मैलांवर वसलें आहे. तालुकदार सर्वैया रजपूत आहेत.

**देदान**—मुंबई इलाखा. काठेवाडांतील एक छोटेखानी संस्थान. तालुकदार कातीनें कोटिला असून हे काठी लोकाशीं लग्नव्यवहार करितात.

**देधोट**—मुंबई इलाखा. महिकांठामधील लहान संस्थान. यांत तीन गांवें आहेत. संस्थानिक मकवान कोळी आहेत. त्यांनां गायकवाडास घांसदाणा व ईदरच्या महाराजाला खिचडी द्यावी लागते.

**देपाळपुर**—पंजाब. दिल्लीच्या पठाण राजांच्या वेळीं उत्तरपंजाबचें मुख्य ठाणें होतें. फेरोजशहाचें हें आवडतें असल्यानें त्यानें तेथें इमारती बांधून, सतलजचा एक कालवाहि आणिला होता. तैमूरच्या वेळीं हें मुलतानच्या खालोखाल होतें. याच्या अमलाखालीं ८४ किल्ले होते. हल्ली ते उध्वस्त झाले आहेत. हें ठाणें देवपाल राजानें वसविलें. त्याचा काल आढळत नाहीं. तरी हें फार जुनें आहे. इंडोसिथियन यांचीं नाणीं येथें सांपडतात, त्यावरून त्यावेळीं हें होतेंच. टॉलेमीचें डैडल बहुधा हेंच असावें. [ कनिंगहॅम; भारतवर्षीय भूवर्णन. ]

**देबल**—सिंधप्रांतांतील एक प्राचीन बंदर ( दाहीर व चचनामा पहा. ) हें सिंधूनदाच्या कांठीं होतें. याचें नक्की स्थान आढळत नाहीं. टंगमार नांवाचे लुटारू येथें होते त्यांनी अरब ( सेरनदीपकडील ) व्यापाऱ्यांचीं गलबतें लुटलीं. हे लूटारू कराची व लारबंदर यांच्या दरम्यान रहात असत. त्यावरून या दोहोंच्या दरम्यान वघार व धारा यांच्या संगमावर, लारच्या उत्तरेस २॥ कोस व भांबुराच्या नैर्ऋत्येस ८॥ कोसांवर हें येतें. इब्नबतुता यानें लारीच्या ( तो येथें गेला होता )जवळ हें असल्याचें लिहिलें आहे. येथें प्राचीन अवशेष बरेच आहेत. पण त्यांचें संशोधन झालेलें नाहीं. [ कनिंगहॅम; भारतवर्षीय भूवर्णन. ]

**देरडीजान वाइनि**—मुंबई, काठेवाड. वाला ठाण्यांतील निराळी खंडणी देणारी एक जहागीर. ही जहागीर एकाच खेड्याची असून चारण लोक हिचे मालक आहेत. गायकवाडनें जनाबाईच्या स्मरणार्थ येथें एक देऊळ बांधलें आहे.

**देरोमोहबत**—मुंबई इलाखा, सिंधप्रांत. हैद्राबाद जिल्ह्यांत एक तालुका. क्षेत्रफळ ४९८ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ४५०८७. यांत १०० खेडीं असून, पैकीं मातली हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. ह्या तालुक्याचा प्रदेश उच्चनीच असून बाजरी व तांदूळ हीं येथील मुख्य पिकें आहेत. थोडक्या प्रमाणावर कापूस व गहूंहि होतो.

**देलथ**—पंजाबांतील बशहर संस्थानाचें एक लहानसें मांडलिक संस्थान. क्षेत्रफळ ४२ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) १३५१ येथील ठाकूर हिंदु रजपूत आहे. त्याच्या हातांत सर्व अधिकार आहे, पण मरणाची शिक्षा देण्याकरितां सिमल्याहून ' हिलस्टेट्स सुपरिंटेन्डंट ' ची मंजुरी मिळवावी लागते.

**देलवाड**—राजपुतान्यांतील उदेपूर संस्थानामधील एक इस्टेट. ह्या इस्टेटींत ८६ खेड्यांचा समावेश होतो. ही इस्टेट मेवाडच्या एका सरदाराकडे असून त्यास राजराणा म्हणतात. गांवाच्या दक्षिण भागीं महाराजांचा भव्य व रमणीय वाडा असून त्याच्या दक्षिणेस राष्ट्रसेनदेवीचें भव्य देवालय आहे.

देलवाडाचे राजराणे झाला रजपूत आहेत. १६ व्या शतकांत काठेवाडाहून आलेला व १५३४ सालीं जो चितोडच्या वेढ्यांत मारला गेला त्या अज्जबंधु सज्ज याच्या वंशांत हे लोक जन्म पावलेले आहेत. मुख्य गांव देलवाड. हें उदेपूर शहराच्या उत्तरेस १४ मैल अरवली टेंकड्यांच्या पूर्व भागांत आहे. लोकसंख्या सुमारें दोन हजार.

**देव**—बहारमधील गया जिल्ह्याच्या औरंगाबाद पोट-विभागांतील एक खेडें. उदेपूरच्या राण्यांच्या वंशातल्या प्राचीन काळच्या देवराजांच्या राजधानीचें हें गांव आहे. वॉरनहेस्टिंग व बनारसचा राजा यांमध्यें जें भांडण झालें त्यावेळीं वृद्ध देवराजानें इंग्रजांच्या मदतीस सैन्य पाठविलें होतें. १८५७ सालीं राजानें ब्रिटिशास संकटकाळीं बरीच मदत केली. मदनपूर जवळ उमगा येथें १४९३ सालीं बांधलेलें जुनाट देवालय आहे. देव येथेंहि एक देवालय आहे.

**देव**—सध्यां देव हा शब्द ईश्वरवाचक आहे. पण हा शब्द मूळचा विशिष्ट लोकांचा वाचक असावा, कां कीं, " देव आणि मनुष्य हे शेजारी असून तपोबलानें देवांचा उत्कर्ष झाला आणि मनुष्यांचा अपकर्ष होता तसाच राहिला " असें आपस्तंब म्हणतो. ऋग्वेदांत व विशेषतः ब्राह्मणांत देव आणि असुर हीं राष्ट्रें असून त्यांचीं युद्धें झाल्याबद्दलचे उल्लेख अनेक आढळतात. देव शब्द अवेस्तामध्यें शत्रुवाचक आहे.

देवांस बायका होत्या, मुलेंहि होतीं, देवांच्या बागा होत्या व राजधान्या होत्या; देवांचा राजा होता त्यास इंद्र म्हणत. देवांचा जसा मंत्रि होता तसा सेनापतिहि होता. इतकेंच नव्हे तर देवांच्या कुळी देखील होत्या. कोटि व कुळी हे शब्द मूळचे एकच दिसतात. देवांच्या कुळी तेहेतीस होत्या. तेहेतीस कुळी मिळून पांच वंश झालेले दिसतात. आदित्यांच्या १२ कुळी ( द्वादशादित्य), वसूंच्या आठ कुळी ( अष्टवसू ), रुद्रांच्या अकरा कुळी मिळून एकतीस कुळी होतात. पुढें इंद्र व प्रजापति हे दोन वंश दोन कुळी मानीत. याप्रमाणें देवांच्या तेहेतीस कुळी होत्या यावरून देव शब्द मूळचा विशिष्ट लोकांचा वाचक असावा असें अनुमान निघतें.

शालिवाहनाच्या चवथ्या शतकांत देवराष्ट्र हा प्रांत सुप्रसिद्ध होता. आज आपल्या लिपीस देवनागरी हें नांव आलें आहे. सुर्या हें सुरांचें म्हणजे देवांचें राष्ट्र असावें असेंहि एक लेखक सुचवितो. सुर्या हें नांव सुरे लोकांच्या वसाहतीस मिळालें असलें पाहिजे आणि बारा आदित्यांमध्यें सुर ही कुळी असली पाहिजे. निरनिराळ्या राष्ट्रांतील देवासंबंधी कल्पना त्या त्या राष्ट्रनामाखालीं आढळतील. [वि. ज्ञा. २३]

**देवक**—वनस्पती किंवा जीव या सृष्ट वस्तूंपैकीं केव्हां एखाद्या वस्तूवरून—पुष्कळ वेळां पाऊस, ढग, तारा, वारा, यांपैकीं एक—, अमेरिका, आफ्रिका, ऑस्ट्रेलिया, आशिया आणि इतर वेस्ट, ईस्ट इंडीज बेटें यांमधील पुष्कळ रानटी जातींतून, एखाद्या खऱ्या किंवा मानलेल्या सजातियाचें नांव ठेवलें जातें, तेव्हां त्या वस्तूस "देवक" (इंग्रजींत "टोटेम") असें म्हणतात. प्रत्येक मुलाला ( तें पुरुष असो किंवा स्त्री असो ) हें नांव आईकडून किंवा बापाकडून मिळालेलें असतें. हें वंशपरंपरा चालत आलेलें असतें; आईच्या कुळाकडून मिळाल्यास " स्त्रीवंशा "चें व बापाकडून मिळाल्यास पुरुष वंशा"चें असे त्यांत दोन प्रकार आहेत. त्याला किंवा तिला ज्या वस्तूचें नांव दिलें असेल तींत व त्या व्यक्तींत कांहीं एक गूढ संबंध असतो असें मानण्यांत येतें. जेथें कुळाचा पत्ता नसतो अशा प्रसंगीं आईचें व बापाचें, अशीं दोन देवकें मुलांनां पाळावीं लागतात.

धा र्मि क बा जू.—आपल्या देवकनाम वस्तूस मारावयाचें किंवा खावयाचें नाहीं असा, एक अक्षय पाळावयाचा नियम असतो. ती वस्तू आपलें संरक्षण करते व उपदेशाचीं किंवा इशारतीचीं स्वप्नें आपणांस पाडतें अशीहि कांहीं अंशीं समजूत आहे. कुळानें पूज्य मानलेले प्राणी मेले असतां, त्यांनां पुरण्याची व त्यांच्या निधनाबद्दल शोक करण्याची चाल कांहीं जातींत आहे. सॅमोआ जातीच्या लोकांत, हे प्राणी कुळदेवतांचीं वाहनें आहेत असें समजून त्यांना मोठा मान देण्यांत येतो. देवकपूजेची मूळ कल्पना कशी आली त्याविषयीं अनेक मतें आहेत; त्यांपैकीं एक म्हणजे हीं मनुष्यप्राण्यांनां दिलेलीं देवकें, त्यांच्या जातींतून भाडाराच्या द्वारें अन्नाचा पुरवठा अधिक प्रमाणावर करतात म्हणून त्यांची उपासना करण्याचा मूळ उद्देश असावा मनुष्य मेल्यावर त्याला त्याच्या देवकाशीं एकरूप करण्यासंबंधीं उत्तरक्रियेच्या वेळीं पुष्कळ संस्कार करावे लागतात; त्याचप्रमाणें लहान असतांना त्याला त्याच्या जातीचे विधी व गुप्तविद्या हीं सांगण्याच्या वेळीं कांहीं संस्कार करावे लागतात. मनुष्यांनीं आपल्या देवकाशीं एकरूप होऊन वागावें किंवा आपल्या देवकाचें कातडें, किंवा पिसारा धारण करावा, किंवा त्याच्यासारखा मुखवटा घालावा असा परिपाठ आहे. ज्या मानानें देवकवस्तूच्या ठायीं पूर्वजांचा अंश किंवा ईश्वरी प्रतिमा कमीजास्त वास्तव्य करते अशी कल्पना असते त्या मानानें त्या पूज्य वस्तूबद्दल धार्मिक आदर वाटूं लागतो.

रानटी लोकांच्या धर्मांतील किंवा पुराणांतील सर्वांत श्रेष्ठ जो पुरुष तो त्यांचा देवक नव्हे. ऑस्ट्रेलियन लोकांच्या कथापुराणांत अशा एका श्रेष्ठ पुरुषानें लोकांस देवकपूजा करण्याविषयीं सांगितलें आहे. त्यानें देवकें लोकांत वांटून दिलीं व लग्नविधीबद्दल नियम घालून दिले, असें न्यू साउथ वेल्समधील यूहलाई जातींत मानतात. उत्तर व मध्य ऑस्ट्रेलियांत रूढ असणाऱ्या पुराणकथांतून अशाहि आख्यायिका आहेत कीं, मूळ देवकें वन्य पशू असून समुद्रकांठीं किंवा तळ्याच्या कांठीं वाढलीं व त्यांच्यापासून प्रत्येक देवकगोत्रांतील माणसें उत्पन्न झालीं. एकच देवक असणाऱ्या जातींतून आपापसांत लग्नव्यवहार होऊं नयेत असा निर्बंध ईश्वरानें घालून दिला असें कांहीं मानतात; कांहीं जण तें

पुरातनकाळच्या फिरतीवर असणाऱ्या देवक प्राण्यांनीं घालून दिला असें म्हणतात. एकाच रक्तसंबंधांतील माणसांचा आपापसांतील व्यवहार फार अनिष्टकारक होतो असें दिसून आल्यावर माणसांनींच आपापल्यांत ही चाल पाडली असेंहि कोणी समजतात. शेवटली बाब खरी मानली असतां, ही पद्धत मोडल्यानें, म्हणजे एकाच देवकगणांतील आपापसांत बेटीव्यवहार केल्यानें, धर्माच्या दृष्टीनें पाप होत नाहीं म्हणून धर्मदंड मिळण्याची भीति बाळगण्यास नको.

सा मा जि क सं ज्ञा.—ह्या देवकसंप्रदायाचा लग्नसंबंधी चालीरीतींवर बराच परिणाम घडलेला दिसतो; किंवा त्या संबंधांतच देवकाचें नांव विशेष ऐकूं येतें. मध्य आस्ट्रेलियांतील व पश्चिमेकडील कांहीं अज्ञात भागांतील खेरीजकरून इतर एकच देवक असणारीं स्त्रीपुरुषें आपापल्या शिकारीच्या मैदानापासून कितीं लांब लांब रहात असलीं तरी आणि नातें (रक्तसंबंध) आड येत नसलें तरी सुद्धां आपापसांत लग्नव्यवहार करीत नाहींत.

*आस्ट्रेलियामध्यें सर्वत्र अशी चाल आहे कीं,* प्रत्येक व्यक्ति आपल्या जातींतील दोन निरनिराळ्या वर्गांपैकीं कोणच्याना कोणच्या तरी एकांत, जन्म पावतांच—म्हणजे विशिष्ट कुळांत उत्पन्न झाल्याच्या योगानें—आपोआप पडते. ह्या दोन वर्गांतील माणसांचा एकमेकांशीं विवाह होऊं शकतो, पण एकाच वर्गांतील स्त्रीपुरुषांचा विवाह निषिद्ध मानला आहे. अशा वर्गांना प्राण्यांचीं नांवें दिलेलीं असतात, असें:—श्येन व कावळा, कावळा व पांढरा कोक्याटू (पोपट जातीचा पक्षी). प्रत्येक वर्गांत घरींच देवककुळें असतात, जसें:—कुत्रा, रानचेरी, वांवट, बेडूक, घुबड, क्यांगारू यांच्या सारखीं; आणि अरुंता राष्ट्राखेरीजकरून, कोठेंहि एकच देवक घराणें दोन वर्गांमध्यें यावयाचें नाहीं. तेव्हां, अरुंता राष्ट्रांतील लोकांखेरीज इतर सर्व लोक वर किंवा वधू पाहावयाची झाली तर, आपल्या वर्गाच्या बाहेर पाहातात. कोणीहि आपल्याच देवककुळांत शरीरसंबंध करीत नाहींत.

उत्तर अमेरिकेंतील कांहीं भागांत हीच चाल प्रचारांत आहे; पण तेथें "बाह्य किंवा असगोत्र विवाह" वर्ग नेहेमींच दोन असतात असें नाहीं. उदाहरणार्थ, मोहेगन लोकांमध्यें अशा तऱ्हेचे तीन वर्ग आहेत—कोल्हा, टर्टल (कबूतराची एक जात) व टर्की (कोंबडा). कोल्हा-वर्गामध्यें सर्व देवकें चतुष्पाद आहेत; टर्टलमध्यें निरनिराळ्या जातींचे टर्टल पक्षी व पिवळा ईल मासा; आणि टर्की—वर्गामध्यें सर्व देवकें पक्ष्यांचीं आहेत. हें देवकांचें वर्गीकरण मुद्दाम योजून केलेलें दिसतें; आपोआप झालेलें नव्हे. ऑस्ट्रेलियन जातींमध्यें अशा वर्गांची योजना परस्परविरुद्ध रंगांच्या प्राण्यांचीं नांवें त्यांना दिलेलीं पाहून, जाणूनबुजून केलेली दिसते, असें:—पांढरा कोक्याटो व कावळा, कावळा व पांढरा श्येन. आस्ट्रेलिया व अमेरिका या दोन्ही देशांत, वर्गांना दिलेलीं प्राण्यांचीं नांवें, त्या वर्गांतील कुळांनाहि दिलेलीं आढळतात. दोन किंवा अधिक प्रमुख "बाह्य विवाह" वर्ग पुष्कळ लोकांत आढळून येतात. त्या लोकांत अशीं देवककुळें नसतील किंवा पूर्वी असलीं तरी सध्यां अस्तित्वांत नसतील देखील, असे लोक म्हणजे, हिंदुस्थानांतील तोडा व मेट्ची जातीचे लोक, आफ्रिकेंतील वनिक लोक व मॉलिनेसियांतील कांहीं लोक.

बाह्यविवाहः—ह्या संबंधांत अरुंता लोकांचा विधिविरुद्धताः—एकच देवक पाळणाऱ्या कुळांतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होतां कामा नये हा जो सर्वसाधारण नियम आहे त्याला अपवाद मध्य ऑस्ट्रेलियांतील अरुंता "राष्ट्रांत" सांपडतो. ह्या ठिकाणीं देवक हें आईबापांपासून मुलाला मिळत नसतें, तर आईला जेथें त्याचा गर्भ राहिला असेल त्या ठिकाणचें जें "स्थानिक देवक" तें त्या मुलाचें देवक, असें धरतात. याविषयीं कल्पना अशी आहे कीं, फार पुरातनकाळीं होऊन गेलेल्यांचीं पिशाच्चें (एका देवकाची एक टोळी अशा रीतीनें) निरनिराळ्या ठिकाणीं टोळ्या करून तो *भाग घेरतात; किंवा पुरातन जीवांचे आत्मे वरील*-प्रमाणें रहातात; ते त्या ठिकाणावरून जात असलेल्या विवाहित स्त्रियांमध्यें शिरतात, व शरीर धारण करून बाहेर पडतात. जसें एकादी बाई—मग तिचें देवक किंवा तिच्या नवऱ्याचें देवक कोणचेंहि असो—जर, जेथें रानमांजरांचे आत्मे आहेत असें माहीत आहे अशा जागीं गर्भवती झाली तर तिच्या त्या मुलाचें देवक रानमांजर असतें. ह्यायोगानें एका वर्गांतील देवक, दुसऱ्या वर्गांत जाऊन पडतें व तें देवक जर वंशपरंपरेचें नसेल तर एकच देवकनांव असलेल्या दोन व्यक्तींत शरीरसंबंध होऊं शकतो. ह्या सर्व कारणांवरून अरुंता जातींत एकाच देवककुळांत लग्न करण्याची वहिवाट कशी पडली असावी हें उघड होतें.

अरुंता लोकांमध्यें प्रत्येक देवक आत्म्याचा एक एक लाकडी किंवा दगडी "चुरिंगा" म्हणून असतो; यांना निरनिराळे आकार असतात व त्यांवर वर्तुळें, शंकू, कळस वगैरे जुन्या आकृती काढलेल्या असतात. ह्यांचें फार महत्त्व मानतात.

नि र नि रा ळीं म तें.—हीं अरुंता राष्ट्रांतील सगोत्र विवाह करण्याची व वंशपरंपरा देवक न चालविण्याची पद्धत नवी कीं जुनी; इतर मनुष्यजातीची व अरुंता राष्ट्राविरहित ऑस्ट्रेलियाची देवकपद्धत जी असगोत्र विवाह करण्याची व देवक वंशपरंपरा चालविण्याची ती या अरुंता देवक पद्धतीच्या पूर्वीची कीं मागाहूनची; याविषयीं बराच वाद माजून राहिला आहे. त्याचप्रमाणें ही असगोत्र विवाहाची चाल कसकशी समाजांत येत गेली यासंबंधीं निरनिराळीं मतें आहेत. एका कुटुंबांत, आई, बाप, भाऊ, बहीण, मुलगा, मुलगी, नवरा, बायको, हें जें नातें असतें, व त्यांच्यांत जो सपिंड—विवाह वर्ज्य असतो, तोच प्रकार व तेंच नातें हळू हळू एकाच वर्गाच्या समाजांत येत जाऊन, तितक्याच

वयांच्या व दर्जाच्या माणसांनां आपली बहीण किंवा माऊ, बायको किंवा आई वगैरे नातें लावून, त्यांच्यात्यांच्यांत एकाच कुटुंबांत निषिद्ध मानलेला सपिंडविवाह, पुढें पुढें होईनासा झाला; अशा रीतीनें असगोत्रविवाहाची चाल पडली असावी असें कित्येकांचें म्हणणें आहे. दुसरें एक मत असें आहे कीं, डार्विनच्या सिद्धांताप्रमाणें, मनुष्य पहिल्यानें मत्सरग्रस्त पशुवृत्तीचा असे. तो आपल्या मुलांनां बायकाजवळ येऊं देत नसे व अशा रीतीनें तो घरांत सर्वत्र शांतता राखी व प्रेमामुळें घरांतल्याघरांत लागणारीं भांडणें टाळण्याचा यत्न करी. तेव्हां अर्थातच मुलांनां बायका मिळविण्याकरितां दुसरीकडे जावें लागे व स्वायोगानें असगोत्रविवाहाची पद्धत आपोआप समाजांत आली. पुढें मनुष्याला मनुष्यपणा प्राप्त होऊन तो मुलाला घरांत राहूं देऊं लागला; पण मुलानें बायको करावयाची ती मात्र दुसऱ्या जातींतील असावी.

धार्मिक व सामाजिक प्रकारांतील संबंध.— या देवकपद्धतीच्या धार्मिक व सामाजिक प्रकारांत विलक्षण संबंध आहे. वंशपरंपरा चालत आलेल्या आपल्या देवकाचें नांव जर दुसऱ्या मनुष्याच्या देवकास असेल, तर त्याच्याशीं लग्न करावयाचें नाहीं, ही सामाजिक चाल जेथें फार शिस्तीनें पाळली जाते, तेथेंच आपलें देवक मारावयाचें किंवा खावयाचें नाहीं, ही धार्मिक बाजू फार लंगडी पडलेली आहे असें दिसून येतें; उलट जेथें देवकाला मोठा मान असतो किंवा देवकप्राण्यांत असणाऱ्या देवाबद्दल फार भक्ति आहे असें दिसून येतें, त्याच ठिकाणीं त्याच लोकांत एकच देवक असणाऱ्या कुळांतून शरीरसंबंध होऊं शकतो. कांहीं कांहीं अमेरिकन जातींतून सगोत्रविवाहास समाज शिक्षा देतो; ही शिक्षा कधीं कधीं अपराध्यास ठार मारण्यापर्यंत सुद्धां जाते.

मातृपितृक देवकें.— आतां मुलाला देवक जें मिळें जातें तें आईच्या कुळांतील कीं बापाच्या, याविषयीं वाद आहे. कारण कांहीं जातींतील लोक आईचें देवक चालवितात तर कांहीं बापाचें; पण आतांपर्यंतच्या शोधावरून बहुतेक असें ठरलें गेलें आहे कीं, पहिल्यानें मातृदेवकच मुलाला चालवावें लागे. पण पुढें कांहीं ठिकाणीं याची परिणति पितृदेवकांत व कांहीं ठिकाणीं पितृमातृदेवकांत झाली. तेव्हां कांहीं मुलें मातृदेवक चालवितात व कांहीं पितृदेवक चालवितात; व कांहीं मातृपितृक अशीं दोन्ही देवकें चालवितात याचें फारसें गूढ वाटणार नाहीं.

इतर देशांतील देवकपद्धति.— फिजी, समोआ, ब्रिटिश न्यू गिनिया वगैरे देशांतून देवक-चालीच्या निरनिराळ्या तऱ्हा पाहण्यास सांपडतात. टॉरेस बेटांत देवकपूजेचें विभूतिपूजेंत रूपांतर झालेलें आढळतें. ब्यांक्स आयलंडमधील लोकांत कांहीं चाली अशा आहेत कीं त्या पाहून देवक—पद्धतीची आठवण होते. मोटा बेटांत पुष्कळ माणसांनां एखादें विशिष्ट फळ किंवा प्राणी खावयाचा नसतो. त्यांचा जन्म होण्यापूर्वी त्यांच्या आयांच्या ध्यानांत एखादा प्राणी किंवा फळ सांपडतें, अशांच व्यक्तींनां ही वरील आडकाठी असते. तें फळ किंवा तो प्राणी खाण्यास निषिद्ध मानतात.

देवकपद्धतीच्या उगमाविषयीं पुराणकथा.— ही देवकें पाळण्याची चाल कशी अस्तित्वांत आली याविषयीं ज्या दंतकथा आहेत त्या ऐतिहासिक दृष्टीनें मुळींच महत्त्वाच्या नाहींत. याविषयीं रानटी लोकांत निरनिराळ्या कथा आहेत. कांहीं आपली उत्पत्ति देवकवस्तूपासून झाली आहे असें मानतात. पूर्वी पृथ्वीवर प्राण्यांचीच सर्व जात होती; त्यांचीं जरी निरनिराळीं रूपें असत तरी ते स्वभावानें मनुष्यच असत; ही पुढें माणसें झालीं. तरी पण त्यांनीं आपल्या पूर्व योनींशीं संबंध कायमच ठेविला. त्यांचीं मुलें किंवा आत्मे बायकांत शिरून पुन्हां जन्म घेतात, अशा प्रकारच्या कथाहि पुष्कळ आहेत. सर्व चराचर वस्तूंचा पिता जो बैआमे त्यानें ही देवकें व त्यांसंबंधीं नियम मनुष्यांनां घालून दिले असें कांहीं ऑस्ट्रेलियन लोक मानतात.

स्त्री-पुरुष देवकें.— ज्याप्रमाणें वैयक्तिक देवकें असतात म्हणून सांगितलें आहे, त्याचप्रमाणें ऑस्ट्रेलियांत लिंगदेवकेंहि आहेत म्हणून सांगतात. कांहीं जातींतील लोक असें समजतात कीं स्त्री-पुरुष या प्रत्येक जातीला संरक्षक असा एक प्राणी—तो बहुशः एखादा पक्षी असतो; आणि त्या प्राण्याला इजा करणें म्हणजे त्या जातीला (स्त्री किंवा पुरुष) इजा करणें होय. या कल्पनेचा फायदा बायका अशा रीतीनें घेतात कीं जेव्हां त्यांचा जिवलग प्रेमसंबंधांत अनभिज्ञ असतो तेव्हां त्याचें संरक्षक-देवक ठार मारतात व याचा परिणाम प्रेमकलह, थट्टामस्करी वगैरेंत करून घेतात. ऑस्ट्रेलियांतील पुष्कळ भागांतून, एका घराण्याची पुष्कळ देवकें असतात, म्हणजे तें एक घराणें पुष्कळ वस्तूंस आपलीं देवकें म्हणून समजतें. ही देवकाची चाल पूर्वी पुष्कळ देशांतून रूढ होती व अद्यापिहि कांहीं कांहीं सुधारलेल्या देशांतून आढळते.

भारतीय, देवकाचा देव या अर्थी उपयोग करतात, व लग्न, मुंज वगैरे शुभप्रसंगीं याचें (देवदेवक) पूजन करितात. ब्राह्मणांत गणपति, सरस्वती, सप्तमातृका (या क्षुद्र देवता असतात) वगैरे असतात. खालच्या वर्गांत गोत्र या अर्थानें देवक शब्द वापरतात. ब्राह्मणांत जसा सगोत्रविवाह होत नाहीं तसा या खालच्या वर्गांत सदेवक (म्हणजे एकच देवक ज्यांचें आहे) विवाह होत नाहीं. त्यांच्या या देवकांत बहुधा वृक्ष-वेलीच असतात. उदा० आंबा, चिंच, जांभळी, अमरवेल, पिंपळ वगैरे. याशिवाय कुऱ्हाड, तीर, कट्यार, तरवार, पाणी वगैरेहि देवकें वरच्या देवकांच्या जोडीस असतात. या देवकांची स्थापना (देवकप्रतिष्ठा) शुभप्रसंगाच्या अगदीं प्रारंभीं करतात व प्रसंग संपल्यावर त्यांचें उत्थापन होतें. देवकांत फळांचाहि समावेश होतो. ज्ञानकोशांत निरनिराळ्या जातींची जी माहिती आलेली आहे तींत

त्यांच्या देवकांचीहि माहिती आली आहे. [ लांग–दि सीक्रेट ऑफ दि टोटेम; फ्रेझर–टोटेमिझम्; डाल्टन–डिस्क्रिप्टिव्ह एथ्नालॉजी ऑफ बंगाल. ]

**देवकी**—कृष्णाची माता, वसुदेवाची पत्नी व कंसाची बहीण म्हणून हिचा महाभारतांत निर्देश आहे. छांदोग्य उपनिषदांत ( ३. १७, ६ ) ‘ देवकीपुत्र ’ असें कृष्णाचें मातृकनाम आलें आहे. हिचा पिता देवक असून तो गंधर्वांचा राजा होता असें भारतांत वर्णन आढळतें. देवकीला कधीं कधीं अदितीचा अवतार मानलें आहे. हिनेंच पुन्हां जन्म घेऊन राजा सुतपा याची पृष्णी नांवानें पत्नी होऊन राहिल्याची कथा आहे.

**देवगड**, (१)ता लु का.—मुंबई इलाख्यांतील रत्नागिरी जिल्ह्याचा दक्षिणेकडील तालुका. क्षेत्रफळ ५२५ चौरस मैल. खेडीं १२९. लोकसंख्या सुमारें १४८०००. वायव्येकडील भागांत विजयदुर्ग आहे व देवगड किल्ला देवगड येथें समुद्रकिनाऱ्यावर आहे. पाऊसमान ८० इंच असून हवा साधारण मानानें निरोगी आहे. जमीन बहुतेक नापीक आहे. सरकारसारा सुमारें १८ हजार आहे.

गां व.—देवगड तालुक्यांतील एक गांव व बंदर. मुंबईहून १८० मैल. लोकसंख्या सुमारें १५००. हें फार सुरक्षित बंदर आहे. आंग्र्यांनीं येथें तट बांधिला होता (१८ वें शतक) पण १८१८ सालीं कर्नल इमलाकनें हें बंदर हस्तगत केलें. १८७५ सालीं खारेपाटणऐवजीं हें तालुक्याचें ठिकाण केलें. या बंदरांतून २१३ लाखांचा व्यापार चालतो. येथील खाडींत बारीक मोतीं सांपडतात.

(२)याचें दुसरें नांव हरेश्वर. मुंबई इलाखा जंजिरा संस्थानांतील एक खेडें. श्रीवर्धनच्या दक्षिणेस ३ मैल. येथें पेशव्यांचे पूर्वज रहात असत. येथें काळभैरवाचें देवालय आहे. महाशिवरात्रीस व कार्तिक शुद्धांत अशा दोन जत्रा येथें भरतात.

(३)पो ट वि भा ग.–बिहार-ओरिसामधील सन्ताल परगणा जिल्ह्याचा पश्चिमेकडील पोटविभाग. क्षेत्रफळ ९५२ चौरस मैल. कांहीं ठिकाणीं जंगल भरपूर असलेल्या टेंकड्या आहेत. लोकसंख्या ( १९११ ) ३०६४७७. देवगड व मधुपूर हीं दोन गांवें असून शिवाय २२६८ खेडीं आहेत. यांत देवगड तालुका असून त्याचें क्षेत्रफळ ३०४ चौरस मैल व लोकसंख्या १०३९८१ आहे.

गां व.—सन्ताल परगणाच्या जिल्ह्याच्या पोटविभागाचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या (१९११) ११२९४. येथें शिवाचीं बावीस देवालयें असून हें यात्रेचें ठिकाण आहे. वैजनाथा–( वैद्यनाथ )चें सर्वांत जुनें देवालय असून येथें शिवाच्या बारा लिंगांपैकीं एक लिंग आहे. देवालयांपैकीं तीन देवालयें पार्वतीचीं आहेत.

(४) बंगाल. बामरा मांडलिक संस्थानचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या ५७०२. बंगाल–नागपूर रेल्वेवर बामरा रोड स्टेशन आहे, तेथून हा गांव ५८ मैल दूर आहे. डोंगराच्या खबदाडींत हा गांव वसलेला असून जवळच एक मनोरम धबधबा आहे. येथें संस्थानानें स्वखर्चानें चालविलेलें एक हायस्कूल आहे.

(५) राजपुतान्यांतील उदेपूर संस्थानांतील एक इस्टेट. ह्या इस्टेटींत देवगड खेरीजकरून १८१ खेडीं आहेत. ही एका राऊत अधिपतीच्या ताब्यांत आहे. हा सिसोदिया रजपुतांच्या चोण्डावत वंशांत जन्मलेला आहे. खंडणी रु. ५७१०. हिचें मुख्य गांव देवगड. गांवाभोंवती तट असून त्याच्या आंत एक भव्य राजवाडा आहे. येथून पूर्वेस तीन मैलांवर अन्जनखेड्यांत नाथपंथी मठ आहे. लोकसंख्या सुमारें ५ हजार असून शेंकडा ९८ लोक हिंदू आहेत.

(६)नागपूर प्रांत. वर्धेच्या पूर्वेस गोंडवनांत देवगड असून, येथें पूर्वी गोंड राजाचें एक राज्य होतें. हा गोंडराजा साधारण स्वतंत्रच असे. गोंड वनांतील गोंड राजे नांवाला मुसुलमानांचे अंकित असत. वऱ्हाडच्या सुभ्याखालीं देवगड सरकार ( प्रांत ) इ. स. १६३७ त आलें होतें. शाहूनें परसोजी भोसल्यास सेनासाहेब सुभ्याच्या पदासाठीं जो सरंजाम दिला त्यांत देवगड प्रांत दिला होता ( १७०७ ). यावेळीं बख्त बुलंद हा देवगडचा राजा होता. कान्होजी भोंसल्यानें वऱ्हाडांत अंमल बसवून देवगडावर स्वारी करून खंडणी घेतली होती. थोरला रघुजी एकदां कान्होजीवर रुसून देवगडकर बख्तबुलंदयाचा पुत्र चांदसुलतान ( देवगडच्या गोंड राजास औरंगझेबानें बाटविलें होतें असें म्हणतात ) याच्याकडे गेला होता; मग तेथून साताऱ्यास शाहूकडे गेला होता; चांदनें देवगड सोडून आपली राजधानी नागपुरास केली होती. तो उदार होता. त्याच्या कारकीर्दींत उद्योगधंदे वाढून राज्यांत संपत्ति वाढली. या सुमारास चांद सुलतान मेला व त्याचे पुत्र मीर, अकबर, बुऱ्हाण व ( लेंकावळा ) वलीशहा यांच्यांत गादीबद्दल तंटे लागले. वलीनें अकबर व मीर यांनां ठार मारिलें, तेव्हां त्यांची आई रतनकुंवर हिनें रघूजीस मदतीस बोलाविलें ( १७३६ ). रघूजी स्वतः पवनीस जाऊन वलीचा पराभव करून परतला. नंतर वलीनें आपला दिवाण रघुनाथसिंग यास पाठविलें. त्याचा सोनवरडी येथें रघूजीनें पराभव केला व त्यास फितूर करून त्याच्या मदतीनें देवगडराज्यांतील मानार, रामक्षेत्र वगैरे ठाणीं कायम केलीं; व देवगडास जाऊन वली यास फूस लावून किल्ल्याबाहेर आणून कैद केलें आणि राणीस भेटून करारमदार ठरवून त्या सर्वांस नागपुरास आणून ठेविलें. राणीनें रघूजीस आपला पुत्र मानून देवगडच्या राज्याचे हिस्से करून बुऱ्हाण व रघूजी यांस ते वांटून दिले ( १७३७ ) व स्वारीखर्च १० लाख रुपये दिला. खुद्द देवगड किल्ला रघूजीनें आपल्याकडे ठेवून पवनी, मूळ तापी, मारूड वगैरे प्रांत बुऱ्हाणास दिला. नंतर पांच वर्षांनीं बुऱ्हाणनें आपल्या एका भाऊबंदाविरुद्ध रघूजीकडून

मदत घेऊन त्याबद्दल त्यास आपल्या राज्यापैकीं वऱ्हाचा प्रांत दिला (१७४२). याचवेळीच रघूजीनें नागपूर आपल्या ताब्यांत घेऊन बुऱ्हाणास आपल्या हातचें बाहुलें बनविलें, मात्र त्याची राजा ही पदवी व मानमरातब कायम ठेवला. थोड्याच दिवसांत त्याचें सारें राज्य खालसा करून त्याच्या वंशजास कायमची नेमणूक व इनाम तोडून दिलें. या बुऱ्हाणचा वंशज अद्यापिहि नागपुरास असून त्यास पोलिटिकल पेनशन आणि इनाम वगैरे आहे. [ नागपूरकर भोंसल्यांची बखर; नागपूर डिस्ट्रिक्ट ग्याझे. ]

**देवगड किल्ला**—संयुक्त प्रान्तांतील झांशी जिल्ह्याच्या ललितपूर तहशिलीमध्यें मोडकळीस आलेला हा किल्ला बेटवा नदीच्या उजव्या तीरावर आहे. किल्ल्यांत ईशान्य कोंपऱ्यांत १६ जैन मंदिरें आहेत. किल्ल्याच्या खालीं देवगड गांव असून गुप्त वंशाच्या वेळचें एक सुंदर देवालय आहे. किल्ल्याच्या दक्षिणेकडील तटाच्या भिंतींत सिद्धगुंफा नांवाचें लेणें आहे. १८११ सालपर्यंत हा किल्ला बुंदेल्यांच्या ताब्यांत होता.

**देवगांव**—(१) वऱ्हाड-मध्यप्रांत, जिल्हा उमरावती; तालुका इलिचपूर. हें एक लहान खेडेगांव आहे. यावरूनच इलिचपूर चिकल्दाला जवळचा रस्ता आहे. किल्ला आणि देवगांव यांच्या दरम्यान एक प्रवाशांच्या घोड्यांकरितां तबेला बांधलेला आहे. वेलस्लीनें गाविलगडचा किल्ला घेतल्यावर चार दिवसांनीं म्हणजे ता. १९ डिसेंबर १८०३ रोजीं ईस्ट इंडिया कंपनी व भोंसले यांमध्यें जो तहनामा झाला त्यावरील सह्या या गांवीं झाल्या म्हणून हें देवगांव प्रसिद्ध आहे.

(२) संयुक्त प्रांतांतील अझमगड जिल्ह्याची दक्षिणेकडील तहशील. हींत देवगांव, बेल-दौलताबाद, व बेल्हाबान परगण्याचा समावेश होतो. क्षेत्रफळ ३८५ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) २२३८११. खेडीं ७०२ मंगई, बेसू व गांगी ह्या तीन नद्या ह्या तहशिलींतून वहातात. सांदळाचें पीक सर्वांत जास्त होतें.

**देवगिरी**—मुंबई इलाखा, धारवाड जिल्हा. बंकापूर-राणेबिन्नूर रस्त्यावर करजगीच्या पश्चिमेस सहा मैलांवर दोन हजार लोकवस्तीचा एक गांव. येथें हनुमान, बसवम्मा व येल्लम्मा यांचीं देवळें आहेत. पैकीं येल्लम्माचें देऊळ जखणाचार्यानें बांधलें असें म्हणतात. यांत १५३८ सालचा एक शिलालेख आहे. देवगिरी येथील एका तलावांत खणीत असतांना १८७५-७६ सालीं तीन ताम्रपट सांपडले आहेत. त्यांची जुनी कानडी लिपी असून भाषा संस्कृत आहे.

**देवगिरीकर यादव**—'यादव' पहा.

**देवगुप्त**—हा माळव्याचा राजा. माळव्याचे गुप्त राजे हे कनोजच्या मौखरी राजांचे पिढीजाद शत्रू होत. हूणांनीं ठाणेश्वराच्या राज्यावर स्वारी केली, त्यावेळीं तेथील राजा प्रभाकरवर्धन मेला व राज्यवर्धन दुसरीकडे अडकला असें पाहून देवगुप्तानें कनोजवर हल्ला चढविला. त्यांत तेथील राजा गृहवर्मा ठार झाला व त्याची राणी ( राज्यवर्धनाची बहीण ) राज्यश्री ही देवगुप्ताच्या हातीं लागली. तिला त्यानें कैदेंत ठेविलें. नंतर त्यानें ठाणेश्वराकडे मोर्चा फिरविला. त्यावेळीं त्याला बंगाल( कर्णसुवर्ण )चा राजा शशांकगुप्त ( हा त्याचा मित्र होता ) यानें मदत केली. कनोजच्या मौखरींचे मालवीय गुप्तांसारखेच हे बंगीयगुप्तहि शत्रू होते. कारण मौखरींनीं त्यांचें राज्य हिसकावून घेतलें होतें. राज्यवर्धन हूणांवर गेला असतां, त्यास ही बातमी समजतांच तो तावडतोब देवगुप्तावर चालून आला व लढाई देऊन, त्यानें देवगुप्तास ठार केलें आणि त्याच्या कुटुंबास कैद करून राज्यश्रीला सोडविलें. देवगुप्ताचे सावत्र भाऊ कुमार व माधव हे राज्यवर्धनाला भाऊन मिळाले होते.

माळव्याच्या गुप्तघराण्याचा संस्थापक कृष्णगुप्त हा उज्जनीस रहात असे व तो मौखरीघराण्याचा शत्रु होता. त्याचा ठाणेश्वराच्या वर्धनघराण्याशीं संबंध होता. त्याचा पुत्र हर्षगुप्त, त्याचा जीवितगुप्त ( ? ), त्याचा कुमारगुप्त, त्याचा दामोदरगुप्त व त्याचा महासेनगुप्त. याची बहीण प्रभाकरवर्धनाची आई होती. महासेनानें पुष्कळ वर्षे राज्य केलें. त्याला दोन राण्या असून वडील राणीचा पुत्र देवगुप्त आणि धाकटीचे कुमारगुप्त व माधवगुप्त होत. धाकट्या दोन मुलांस बापानें आपला भाचा प्रभाकरवर्धन याच्या दरबारीं नशीब काढण्यास पाठविलें. पुढें देवगुप्त राजा झाला. प्रभाकरवर्धन एकाएकीं मेल्यावर देवगुप्तानें वर सांगितल्याप्रमाणें ग्रहवर्म्यावर स्वारी केली. तेव्हां सूड घेण्यासाठीं राज्यवर्धनानें त्याचा पराभव करून व त्यास मारून त्याच्या बायकामुलांना कैद केलें. पुढें माधव हा माळव्याचा राजा व्हावयाचा, परंतु कांहीं काळ हर्षवर्धनानें त्याला राज्य दिलें नाहीं. आपल्याला साम्राज्याभिषेक झाल्यावर त्यानें माधवाला गंगेच्या पूर्वेकडील एक प्रांत दिला व यापुढें या माधवाचा वंश गंगा लच्या या( अफसड ) भागांत राहिला. ह्युएनत्संग उज्जनीस गेला तेव्हां तेथें एक ब्राम्हण राजा होता, यावरून देवगुप्ताच्या नंतर हर्षानें तें राज्य खालसा केलें असावें व पुढें तेथें आपला एखादा मांडलिक ठेवला असावा. सारांश मालवीय गुप्तघराणें देवगुप्ताबरोबरच नष्ट होऊन पुढें मागधीय गुप्तघराणें सुरू झालें. हर्षाच्या मरणानंतर हा माधवगुप्त या गुप्तशाखेंत बराच प्रख्यातीस आला ( ६७२ ). त्याचा मुलगा देवगुप्त, त्याचा विष्णुगुप्त व त्याचा अफसड शिलालेख कोरविणारा जीवितगुप्त होय ( ७६२ ). [ हर्षचरित्र; अफसड शिलालेख; मध्य. भारत भा. १ ].

**देवटेक**—मध्यप्रांत, जिल्हा चांदा, ब्रह्मपुरी तहशील. येथें एक लहानसें देऊळ असून दुसऱ्यानें कांहीं अवशेष दिसतात. येथें एक शिळा असून तीवर दोन लेख आहेत. त्यांपैकीं एकाची लिपि अशोककालीन असून दुसरी गुप्तांच्या

काळांतील आहे. दोन्ही लेख अपुरे आहेत. परंतु त्यांत चिकंबरी नांवाचा लेख असून मि. हिरालाल हे देवटेकजवळ असलेल्या चिकमारा या खेड्याशीं त्याचा संबंध लावतात. यावरून चिकमारा गांव २००० वर्षांपूर्वीचें असावेंसें दिसतें. देवटेकपासून दोन मैलांवर असलेल्या चिकमारा आणि पानोरी येथें पुष्कळ प्राचीन दगड वगैरे दृष्टीस पडतात. पूर्वी हीं तीन खेडीं मिळून एक मोठें नगर असावें.

**देवदत्त**—हा कोलीय वंशांतील असून याची बहीण यशोधरा ही सिद्धार्थ गौतम याची पत्नी होती. लहानपणा-पासून सिद्धार्थ व देवदत्त हे एकत्र वाढले होते. सिद्धार्थानें बुद्धत्वप्राप्तीनंतर नवा पंथ काढला व त्याचा प्रथम स्वीकार देवदत्त यानें केला होता. पुढें बुद्धाचा उत्कर्ष सहन न झाल्यानें देवदत्त स्वतंत्र पंथ काढण्याच्या विचारास लागला. आपणांस पट्टशिष्यत्व मिळावें अशीहि त्यानें बुद्धा-जवळ खटपट केली. पण सारिपुत्र व मोग्गलान हे विद्यमान आहेत तोंपर्यंत मुख्य कार्यभार कोणावरहि टाकणार नाहीं असें बुद्धानें देवदत्तास उत्तर दिलें. पुढें देवदत्तानें, मगध देशचा युवराज अजातशत्रु, याला आपलेसें करून घेऊन बुद्धाचा खून करण्याचा प्रयत्न केला पण तो फसला. अजात-शत्रूनें राजा बिंबिसार यास मारलें, ती मसलतहि देवदत्ता-चीच होती. पुढें अजातशत्रूनें बौद्धधर्माची दीक्षा घेतल्या-मुळें देवदत्ताचा आधार नाहींसा झाला ( 'अजातशत्रु' पहा ). संघांत भेद उत्पन्न करून कोकालिक, कतमोरतिस्स, खण्ड-देवसुत व समुद्रदत्त असे चार शिष्य संघांतून फोडून तो बुद्धाकडे गेला. भिक्षूंनीं अरण्यांत रहावें, त्यांनीं भिक्षावृत्तीचा अवलंब करावा, हलकें वस्त्र वापरावें, वृक्षाखालीं शयन करावें व मांस व मत्स्य खाऊं नयेत असे पांच नियम संघांत असावे अशी त्यानें बुद्धाजवळ मागणी केली. बुद्ध या गोष्टीस कबूल न झाल्यामुळें त्यानें स्वतंत्र धर्मपंथ काढला; पण त्याचे सर्व शिष्य त्यास सोडून गेले व त्याचा चोहोंकडे दुर्लौकिक झाला. त्रिरत्नांवर म्हणजे बुद्ध, धर्म आणि संघ यांच्यांवर त्याची श्रद्धा होती, म्हणून पुढील जन्मीं तो " प्रत्येक बुद्ध " ( स्वतःच्या उद्धारापुरता ज्ञानी ) झाला असें बौद्ध ग्रंथकार मानतात. जातकांतून देवदत्ताची निंदा केलेली आढळते याचें कारण गौतमाचें व त्याचें हाडवैर होय [ बुद्धोत्तर जग, पृ. १४६–१४७ पहा. ]

**देवदार**—देवदाराला हिमालयन सिडार, देदवार, दिआर, केलु, किओरि, केलोन, किलर, जिआम, पालुदार, नखतार व देवदारु हीं दुसरीं नांवें आहेत. याचें लॅटिन नांव सेड्रस लिबानी असें आहे.

व स्तु क्षे त्र.—हीं झाडें पश्चिम हिमालय व पश्चिमेकडील अफगाणिस्तानच्या पर्वतापासून पूर्वेस कुमानमधील कॉली नदीपर्यंत आढळतात. समुद्रसपाटीपासून ६००० फूट उंचीवर व कधीं कधीं १०००० फूट उंचीवर सुद्धां हीं झाडें वाढतात.

ग्रेटब्रिटनमध्यें १८३१ सालीं हीं झाडें पहिल्यानें नेलीं व अलीकडे त्यांची लागवड यूरोप व अमेरिका खंडांतून बऱ्याच मोठ्या प्रमाणावर करितात. देवदाराचें महत्त्व पौर्वात्य लोकांनां फार पुरातन काळापासून माहित होतें तरी इटलीमध्यें १७८७ सालपर्यंत देवदाराचीं झाडें नव्हतीं असें वेनूयॅम म्हणतो.

ला ग व ड.—लेबानॉन् व अटलास येथील देवदाराच्या उपजातीपासून हिंदुस्थानांतील देवदार त्याच्या विशिष्ट कमानदार फांद्यामुळें व लांबट कोंट्यामुळें लवकर ओळखतां येतो. देवदाराचीं झाडें जमावानें उगवतात, तरी केवळ देवदारानेंच जंगल आपणांला कोठें दिसून येत नाहीं, कारण इतर जातींचींहि झाडें त्याच्याबरोबर उगवतात.

या झाडाचा जास्तींत जास्त परिघ ४५ फूट असून उंची २४० फूट असते. या झाडाच्या वाढीला ग्रानाइट व चुन-खडीचे थर असलेली भुसभुशीत जमीन लागते. हिमाल-याच्या उत्तरेकडील उतारांवर पावसापासून त्याचा बचाव होत असल्यामुळें हीं झाडें तेथें चांगलीं वाढतात. दार्जिलिंग व निलगिरी येथें फार पाऊस व चिखल असल्यामुळें या झाडाची लागवड तेथें फायदेशीर होत नाहीं.

उ प यो ग.—देवदाराचें लांकूड व त्यापासून निघणारें तेल फार उपयोगी असतें. त्याचा औषधाकडेहि उपयोग करीत असतात. देवदार हें उत्तर हिंदुस्थानांतील मुख्य इमा-रतीचें लांकूड आहे. रेल्वेचे सिलिपाट ( स्लीपर ) करण्यांत त्याचा फार उपयोग होतो. काश्मीर व कनधार येथील कांहीं इमारतींचें देवदार ६०० पासून ८०० वर्षांचें जुनें आहे असें म्हणतात. या त्याच्या गुणामुळें पूल व घरें बांधण्यास हें लांकूड फार उत्तम आहे. काश्मीर व पंजाबांत या लांकडावर कोरींव काम करितात. यापासून निघणारें तेल ( केलनका तेल ) अशुद्ध टरपेन्टाइनसारखें असून गुरांच्या दवाखान्यांतून त्याचा उपयोग करितात. देवदा-राच्या लांकडाचा अर्धांग वायु व संधिवात या रोगांवर उपयोग होतो असें अरबी वैद्य अविहसेन्ना ( सुमारें इ. स. १००० त ) म्हणतो.

व्या पा र.—देवदार लांकडाचा पुरवठा दरवर्षी किती होतो हें निश्चयात्मक सांगतां येत नाहीं.या लांकडाच्या ओंडयांतून तेल असल्यामुळें नदींतून नेतांना ते खराब होण्याची फारशी भीति नसते. जंगलांतून हीं लांकडें बाजारांत आणण्यास फार खर्च येत असल्यामुळें त्यांचा उपयोग जितका व्हावा तितका होत नाहीं. सरकारी अहवालांवरून ३० पासून ४० लक्ष घन फूट लांकडाचा पुरवठा दरवर्षी हिंदुस्थानांत होतो असें दिसतें. हें लांकूड पंजाब, काश्मीर, अफगाणिस्तान, हजारा, कागन वगैरे ठिकाणांहून पुरविलें जातें.

ला ल दे व दा र.—याला चितागॉंगवुड, पांढरा सिडार, सायफा, दालमारा वगैरे नांवें आहेत. लाल देवदाराचें

झाड दिसण्यांत फार सुंदर असून त्याची उत्पत्ति उष्णकटिबंधांतील जंगलांत सिक्किमपासून चितागाँग आणि ब्रम्हदेश, कोंकण, दख्खन, म्हैसूर, मलबार व सिलोन ( लंका ) वगैरे भागांतून होते. याचें लांकूड पिंवळट, तपकिरी रंगाचें असून त्याच्या खुर्च्या, मेजें व इतर लांकडी सामान तयार करितात. या झाडांपासून पारदर्शक पिंवळट रंगाचा डिंक निघतो. याची साल स्तंभक आहे. फुलांपासून पिंवळा व लाल रंग करितात.

**देवदासी**—दक्षिणेंतील देवस्थानांतून देवांस देवदासी अर्पण करून तिजकडून मंदिरांत देवाची सेवा करविण्याची चाल आज बरींच शतकें रूढ आहे. गरीब किंवा देवभोळे आईबाप आपल्या लहान मुली देवदासींच्या अड्डयावरील मुख्य बाई जी ग्यासमाता तिला विकतात. अविवाहित राहून देवाची सेवा करण्यांत या मुलींनां पुढें सर्व जन्म काढावा लागतो. यांनीं देवास चौरी वारावी, त्याच्या समोर नृत्य करावें, देवाचा रथ किंवा दिंडी निघाली तर त्या समारंभास यांनीं देवासमोर नाचत जावें व देवास कुंभारती ओवाळावी अशीं त्यांचीं कामें आहेत.

महाराष्ट्रीय मुरळ्यांप्रमाणें या देवदासी उघडपणें व्यभिचार करतात. इ. १००४ मध्यें कोरलेल्या शिलालेखांत तंजावर येथील राजराज देवालयांत ४०० देवदासी असल्याचें लिहिलें आहे, व त्यांच्या निर्वाहास जमिनी तोडून दिलेल्या आहेत असेंहि म्हटलें आहे व अजूनहि मदुरा, कांजीवरम् व तंजावर येथील मंदिरांत अनेक देवदासी आहेत. १५ व्या शतकांत अबदुल रझाक नांवाचा विजयनगरच्या दरबारांतील तुर्की वकील लिहितो कीं, देवदासी सरकारी संस्थेंत रहातात. त्यांची सर्व व्यवस्था सरकार करतें व त्यांच्यापासून होणाऱ्या उत्पन्नाचा विनियोग पोलीसखात्याकडे करण्यांत येतो.

देवदासींची चाल जुन्या ग्रीक लोकांतहि होती व ईस्टर ( पहा ) देवतेच्या मंदिरांत बाबिलोनियामध्येंहि होतीच. हिरोडोटस म्हणतो कीं, बाबिलोनियांत जन्मलेल्या प्रत्येक स्त्रीनें आयुष्यांत एक वेळ तरी अफ्रोडीटीच्या मंदिरांत जाऊन बसलें पाहिजे व परपुरुषांशी संग केला पाहिजे असा निर्बंध होता. मंदिरांत जाऊन ती बसली म्हणजे जो पुरुष प्रथम चांदीचें नाणें तिच्यापुढें ठेवील त्याच्याबरोबर मंदिराबाहेर जाऊन त्यास तृप्त केलें म्हणजे देवी प्रसन्न होते अशी त्यांची समजूत असे. मग कोणताहि पुरुष प्रथम येऊन नाणें टाकीना कां, तिला तो नाकारतां येत नसे. कनानाइट लोकांत याला केदेशोय म्हणत. तसेंच आफ्रिका, ईजिप्त व इतर कांहीं देशांतहि यासारखीच चाल असे. शेतांतील धान्याची उत्पत्ति व स्त्रियांच्या ठिकाणीं प्रजोत्पत्ति हा एक मोठाच चमत्कार आहे असे पुरातन कालीं लोकांस वाटे व त्यामुळें स्त्रीपुरुषसंग हा या दोन्ही चमत्कारांचें मुख्य कारण समजला जाऊन त्याला एकप्रकारचें पावित्र्य प्राप्त झालें. मनुष्यास स्त्रीसंगापासून जो आनंद होतो तोच देवांस अर्पण करावा अशा कल्पनेनें सुद्धां देवदासींची चाल पडली असेल. स्कंदपुराणांत कार्तिकेयाला दक्षाचा विध्वंस करण्यास बापानें पाठविलें असतां वाटेंत सुंदर स्त्रियांनीं जाऊन व नृत्य करून त्याचें मनरंजन केलें अशी कथा आहे व यावरूनच देवदासींचीं लग्नें प्रथम देवाबरोबर लावून मग वेश्यावृत्ति करण्यास त्यांस मोकळीक मिळत असावी. मुरळ्यांचें लग्न प्रथम खंडोबाबरोबर लावतात व कोठें कोठें तर देवाबरोबर लग्न लावून गर्भाधान पुजाऱ्यासच करावें लागतें. ही चाल जगन्नाथाच्या मंदिरांत अद्याप चालू आहे असें म्हणतात. अशा अनीतिकारक धंद्यांत पडलेल्या स्त्रियांची सुधारणा करून त्यांनां सन्मार्गाला लावण्यासाठीं मद्रास येथें दोन वर्षांपूर्वी 'हिंदु युवती-शरणालयम्' नांवाची संस्था निघाली आहे.

**देवदुर्ग, तालुका.**—हैद्राबाद संस्थान. रायचूर जिल्ह्यामधील एक तालुका. जहागिरी धरून लोकसंख्या (१९११) ८८९७० क्षेत्रफळ ५४७ चौरस मैल. यांत देवदुर्ग हा एक मोठा गांव असून शिवाय १७० खेडीं आणि ४ जहागिरी आहेत. १९०५ सालीं येरगर तालुक्याचा कांहीं भाग ह्या तालुक्यास जोडण्यांत आला. उत्तर व पश्चिम किनाऱ्यांवरून कृष्णा नदी वहाते.

गांव.—देवदुर्ग तालुक्याचें मुख्य ठिकाण. रायचूरच्या पश्चिमेस ३४ मैलांवर हें आहे. लोकसंख्या (१९११) ६८३७. येथें एक जुनाट किल्ला आहे. तो वेदरच्या पाळेगारांच्या ताब्यांत होता. उत्तरेस एका टेंकडीवर अभ्रक सांपडतो.

**देवदूत ( एन्जल )**—ईश्वराहून कमी पण मानवाहून उच्च दर्जाची अशी एक अतिमानुष कोटि. इस्लामी, यहुदी, ख्रिस्ती या एकेश्वरवादी धर्मांत आणि झोरोआस्टरपंथ वगैरे आणखी कित्येक धर्मपंथांत ही कोटि मानतात. अनेकेश्वरी धर्मांत मानवाहून उच्च अशा अनेक कोटया मानतात; व त्यांमधून जात जात मनुष्य अखेर प्रत्यक्ष परमेश्वरस्वरूप पावूं शकतो असें मत हिंदुधर्मांतहि आहे. पण एकेश्वरी धर्मांत ईश्वर व एन्जल यांत स्पष्ट व कायमचा भेद असून एन्जल हा ईश्वरस्वरूप कधींहि पावणार नाहीं असें मानतात. एन्जल हा शब्द मूळ मेसेंजर (दूत) या अर्थाच्या ग्रीक शब्दापासून झाला आहे. ते स्वर्गांत राहतात व त्यावरून त्यांनां 'होस्ट ऑफ हेवन' (स्वर्गांतले रहिवासी ) असेंहि म्हणतात. 'चेरुबिम' या नांवाची दुसरी एक कोटि असून ते 'एडन' बागेचे संरक्षक आहेत. एन्जलपैकीं गॅब्रिएल, मायकेल वगैरे प्रमुख आहेत. 'न्यू टेस्टॅमेंट'( बायबलचा उत्तरार्ध ) यामध्यें एन्जलबद्दल पुष्कळ माहिती आहे. त्यांच्यामध्यें चांगले एन्जल व वाईट एन्जल असे दोन प्रकार असून वाईट एन्जलांमध्यें बाल्झेबब व सेटन हे प्रमुख आहेत एन्जल हेच देवाचे दरबारी व सैनिक होत. त्यांच्यामार्फत ई० सर्व सृष्टीवर व मानवजातीवर सत्ता चालवितो,

प्राण्यांचेहि संरक्षक- एन्जल ( गार्डियन एन्जल ) असतात अशी समजूत आहे.

**देवधर** ( ढमढेरे )—रामचंद्र आवा देवधर ढमढेरे यास नानासाहेब पेशवे यांच्या कारकीर्दीत दफ्तरांत असामी मिळाली. तेथें त्यानें पंधरा वर्षे काम केलें. पुढें थोरल्या माधवरावानीं त्यास पेशवाईची दफ्तरदारी दिली (१७६२). आवा वारल्यावर ( १७८५ ) त्याचा मुलगा मोरोपंत तात्या हा त्या जागेवर आला. तो १७८९ साली मेला. त्याच्या मागें पांडुरंग अण्णा हा दफ्तरदार झाला. पुढें रावबाजीनें त्याला विजयदुर्गच्या आरमाराचा सुभा व तेथील फडणिशी देऊन, नवीन आरमार तयार करण्यास सांगितलें. पुण्यास त्याचा भाऊ हरिपंत राहिला. याची मुलगी कुसाबाई ही रावबाजीस स. १८१७ त दिली; ही श्रीमंतांची पांचवी बायको. लग्नानंतर पेशव्यानें पांडुरंगास कर्नाळा, राजमाची, वेलापूर वगैरेच्या मामलती सांगितल्या व दफ्तरदारीचें उत्पन्न कमी आल्यानें निराळा सरंजामहि दिला. त्यांत जातीस २० हजार आणि फौज व नगारखान्याकडे ८० हजार मिळून १ लाखाचा सरंजाम दिला.तसेंच राघोवा (हरिपंताचा पुत्र) ढमढेऱ्यास जातीस १५ व फौजेस ४० एकूण ५५ हजारांचा सरंजाम दिला आणि तितकाच रामचंद्र पांडुरंग यासहि दिला; त्याबद्दल इतलाखी ( स्वतंत्र सरंजामीच्या विरुद्ध ) फौजेच्या हुजेरीची कामगिरी सांगितली. पांडुरंग हा काशीयात्रेस गेला ( १८११ ) असतां दफ्तरदारीचें काम रामचंद्र व राघोवा करीत असत. रावबाजी पुण्याहून निघून शेवटीं वऱ्हाणपुराकडे जात असतां पांडुरंग व त्याचा मुलगा रामचंद्र हे खानदेशापर्यंत त्याच्यावरोवर होते. परंतु पुढें इंग्रजांचा जाहिरनामा प्रसिद्ध झाल्यावर पांडुरंग श्रीमंतांस सोडून परत पुण्यास आला, व रामचंद्र हा मात्र त्यांच्याबरोबर ब्रम्हावर्तास गेला. पांडुरंगानें पेशव्यांचा पक्ष सोडला व त्याबद्दल एल्फिन्स्टननें त्याचा २० हजारांचा व रामचंद्राचा १५ हजारांचा जातीचा सरंजाम कायम केला. त्यावर रामचंद्रपंत हा १८२९ साली पुण्यास परत आला. पांडुरंगपंत हा वारल्यावर त्याचा १६ हजारांचा सरंजाम जप्त करून फक्त ४ हजारांचा रामचंद्राकडे कायम केला.[वाड—कैफियती.]

**देवनहळ्ळी**, तालुका.—म्हैसूरमधील बंगलोर जिल्ह्याचा उत्तरेकडील तालुका. क्षेत्रफळ २२९ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ६२६३२. गांवें दोन ( देवनहळ्ळी व वादिगेनहळ्ळी ) व खेडीं २३८. उत्तर व पूर्व भागीं लहान टेंकड्या आहेत. पण एकंदरींत ह्या तालुक्याची जमीन सपाट व सुपीक आहे. पोनेयार नदीचा वरचा प्रवाह पूर्वेकडून वहातो. उत्तरभागीं तलपरगी किंवा पाण्याचे झरे आहेत. येथें अफूची लागवड करीत असत पण ती बंद करण्यांत आली. येथें बटाटे चांगले होतात.

गांव.—म्हैसूर संस्थान बंगलोर जिल्ह्यामधील देवनहळ्ळी तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें बंगलोर शहराच्या उत्तरेस २३ मैलांवर आहे. लोकसंख्या (१९११) ६३१३. अवतो वंशांतील एका पुरुषानें येथें किल्ला बांधिला पण तो म्हैसूरच्या राजानीं १७४९ साली हस्तगत केला. येथें हैदर वेढा देण्याकरितां आला असतां त्याचा मुलगा टिप्पू येथें १७५३ साली जन्मला. कार्नवालीसनें हा गांव १७९१ साली घेतला. १८७० साली येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली.

**देवनाथ** ( १७५४-१८२१ )—एक महाराष्ट्रीय संतकवि. वऱ्हाडांत सुर्जी अंजनगांव हें इतिहासप्रसिद्ध स्थळ आहे, त्यांतील सुर्जी गांवीं देवनाथ जन्मला. आरंभीं तो तालीमबाज होता. पुढें कांहीं कारणावरून वैराग्य उत्पन्न होऊन तो जामोद–जळगांवजवळील वारीगांवच्या मारुतीची भक्ति करूं लागला. पुढें त्यास कवित्वाची स्फूर्ति झाली; आणि कविता करीत सर्व हिंदुस्थानभर त्यानें प्रवास केला. ग्वाल्हेर येथें कीर्तन करीत असतां मंडपास आग लागून देवनाथ जळून मेला. देवनाथाच्या कवितेंत बहुतेक पदें व कटिबंध आहेत. उत्तर वऱ्हाड व बऱ्हाणपूर–ग्वाल्हेर या प्रांतांत त्याचें शिष्यमंडळ पसरलेलें आहे. याचें मूळ नांव देवराव असून त्याच्या बापाचें नांव राजोपंत व बायकोचें नांव रमा होतें. एकनाथाच्या संप्रदायांतील तेरावा पुरुष गोविंदनाथ हा याचा गुरु. याला श्रीमंत शिष्यांची ( पैशाची ) फार आवड असे. देवनाथाची कविता रा. अच्युत सीताराम साठे यानीं "वैदर्भ काव्यसंग्रहांत" प्रसिद्ध केली आहे. [ वऱ्हाडचा इतिहास; महाराष्ट्र सारस्वत. ]

**देवपाटण**—अशोकाची मुलगी चारुमति हिनें हें शहर वसविलें ( ख्रि पू. २५० ). हें नेपाळांत पशुपतिनाथाच्या उत्तरेस आहे. चारुमतीनें बौद्धधर्म स्वीकारून आपलें कायमचें वास्तव्य या शहरींच केलें. शहरस्थापनेच्या वेळीं अशोक तेथें होता; परंतु नंतर तो परत आपल्या राजधानीस गेला. चारुमतीचा पति देवपाल नांवाचा होता. त्याच्या स्मरणार्थ हें शहर तिनें वसविलें आणि तेथें एक मठ स्थापून व आपण जोगीण होऊन मरेपर्यंत ती तेथेंच राहिली. [ ओल्डफील्ड—स्केचेस फ्रॉम नेपाल; इंडि. अँटि.पु. १३; लेव्ही—ली नेपाळ. ]

**देवप्रयाग**—संयुक्त प्रांतांतील टेहरी संस्थानांतील एक खेडें. हें अलकनन्दा व भागीरथीच्या संगमावर वसलेलें आहे. येथें दरवर्षी यात्रेकरू लोक येतात. येथें रामचंद्राचें मोठें देवालय आहे. जो कोणी दक्षिणेंतील द्रविड किंवा तेलंग ब्राह्मण पहाडी ब्राह्मणकन्येशीं लग्न लावून या क्षेत्रीं राहील त्यानेंच देवाची पूजा करावी.अशा पुजाऱ्याला जी कन्यासंतति होईल तिचा क्रम सदरहूप्रमाणेंच चालतो. पुरुषसंतति उपाध्येगिरी करून उदरनिर्वाह करितात. ही प्राचीन रीत आहे. याचें महात्म्य केदारखंडांत वर्णन केलें आहे. धार्मिक विधि वसिष्ठ कुंड व ब्रह्मकुंड या दोन ठिकाणीं होतो.

**देवबंद**, तहशील.—संयुक्त प्रांतांतील सहाराणपूर जिल्ह्याची दक्षिणेकडील तहशील. ह्या तहशिलींत तीन परगणे आहेत, त्यांचीं नांवें–रामपूर, नागल, व देवबंद. क्षेत्रफळ

३६५ चौरस मैल, पैकीं १९०३–०४ साली ३२० चौरस मैल जमीनींत लागवड केलेली होती. लोकसंख्या ( १९११ ) २०४३०१. गांवें दोन ( देववंद व रामपूर ) व खेडीं ३१०. तहशिलीच्या पश्चिम भागास पूर्व यमुना कालव्यापासून पाणी मिळतें व पूर्व भागास अमरगंगा कालव्याच्या देववंद शाखेकडून मिळतें.

गांव.—देववंद तहशिलीचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या ( १९११ ) १८६१४; पैकीं अर्ध्याहून अधिक वस्ती मुसुलमानांची आहे. जवळील जंगलांत देवीचें देवालय आहे. तेव्हां देववंदशद्ब 'देवीवन' याचा हा अपभ्रंश असावा असें वाटतें. पांडवांनीं वनवासांतील सुरवातीचे दिवस येथेंच काढले अशी आख्यायिका आहे. सालार मसूदगाझीनें येथील किल्ला काबीज केला होता. पूर्वकाळीं नदीच्या पश्चिमेस अर्धीच मैलांवर हें गांव आहे. येथें अरबी विद्यापीठ आहे. मुन्सफी व तहशिली व इतर कचेऱ्या आहेत. येथून बाहेरगांवीं धान्य पाठविलें जातें. येथें कापड व ब्लँकिटें तयार करितात.

**देवभात**—हें तांदुळाच्या जातीचें एक धान्य असून त्याचा समावेश उपधान्यांत होतो. तलावाच्या कांठीं अथवा पाणथळ जागेंत हें फार पिकतें. उपवासाच्या दिवशीं हें खाण्याचा प्रघात कांहीं ठिकाणीं आहे. ऋषिपंचमीच्या दिवशीं ( बैलाच्या श्रमानें किंवा लोखंडी हत्यारानें ज्याची उत्पत्ति झाली तें या दिवशीं खात नाहींत ) देवभात खातात.

**देवमासा**—हा सिटासि म्हणजे मत्स्यवत् प्राणी होय. या वर्गांतील प्राणी पाण्यांत राहणारे असतात. यांना पुढचे दोन वल्ह्यासारखे पाय असतात. मागच्या पायाच्या खुणा त्वचेखालीं असतात. या प्राण्यास मान नसते व नाकपुड्या डोक्यावर असतात. हे प्राणी मांसाहारी आहेत. देवमासा, गोदामासा व डॉलफिन अशा याच्या तीन जाती आहेत. देवमासा हा प्राणी सहसा नजरेस न पडणारा असा आहे. उत्तर व दक्षिण ध्रुवाच्या महासागरात फिन नांवाच्या देवमाशाचें वास्तव्य असतें. तथापि हिंदुस्थानाला वळसा घालणाऱ्या समुद्रांतहि प्रचंड डॉलफिन मासे व देवमासे असलेले आढळून येतात. देवमासा हा सस्तन प्राणी असल्यामुळें त्यास मत्स्यांच्या कोटींत घालणें चूक होय. गाय किंवा घोडा याप्रमाणें देवमासा हाहि सस्तन असा प्राणी असून तो केवळ पाण्यांत राहतो एवढ्यावरूनच त्याची जात मत्स्याची ठरूं शकणार नाहीं. देवमाशाचें चालणें मत्स्याप्रमाणें असतें, कारण त्यास पाण्यांतून सदैव पोहावें लागतें. मत्स्यांप्रमाणें त्याची शेंपटी ऊर्ध्व रेषेंत नसून आडवी असते. कारण श्वासोच्छ्वासाकरितां त्यास वारंवार जलपृष्ठभागावर यावें लागतें. सर्व सस्तन प्राण्यांना जसे केंस असतात तसे देवमाशास नाहींत; कारण केंसामुळें त्याची जलांतील गति मंद होईल. तरी पण त्याच्या हनुवटीजवळ थोडेसे केंस असतातच. त्याच्या शरीरांतील उष्णता कायम राहण्यास त्याच्या त्वचेखालीं २।३ फूट जाडीचा चरबीचा जाड थर असतो. त्याच्या डोक्याजवळ हातासारखे अवयव असले तरी त्यांत लहान हाडें, स्नायू व रक्तवाहिन्या वगैरे सर्व असते व त्यांचा त्यास वल्ह्याप्रमाणें उपयोग करतां येतो.

कांहीं विशिष्ट माशांपैकीं, ग्रीनलंड अथवा आर्टिक राइटव्हेल नांवाच्या माशाची लांबी ४५ते५० फूट असते व कांहीं माशांची लांबी तर ७०।८० फूटहि असते. याचें डोकें शरीराच्या ⅓ भागाइतकें मोठें असतें. त्याच्या जबड्याची लांबी फारच मोठी व विस्तीर्ण म्हणजे एक मनुष्य उभा राहील इतकी असते. त्याच्या तोंडाचा आकार एखाद्या लांबलचक व प्रचंड चमच्यासारखा असतो. आपल्या भयंकर जबड्यानें देवमासा अनेक लहान मासे व बरेच पाणी एकदम तोंडात घेतो; परंतु सगळें पाणी पोटांत न जाण्याची नैसर्गिक योजना असते. कारण खालचा जबडा वर उचलणें व तोंडभर जीभ घोळविणें यामुळें नाकपुड्यांच्या आंत असलेलें पाणी दाब पडून त्याच्या डोक्यांतून वर कारंज्याप्रमाणें उडूं लागतें.

काळा देवमासा ( ब्लॅक व्हेल ).— अथवा सदर्न राइट व्हेल. हा वरील माशाप्रमाणेंच असतो; परंतु काळ्या देवमाशाचें डोकें शरीराच्या मानानें लहान असून मुख्य हाडहि लहान असतें आणि मणके मात्र जास्त असतात. अटलांटिक व पॅसिफिक महासागरांत याचें वास्तव्य असून या माशाच्या कांहीं पोटजातीहि आहेत. बिस्के राइटव्हेल हा मासा पूर्वी अटलांटिक महासागराच्या उत्तरेस आढळत असे परंतु आतां ही जात लुप्त झाल्यासारखी आहे.

देवमाशाच्या जबड्यांतील मोठें हाड व देवमाशाचें तेल हे पदार्थ अत्यंत उपयुक्त व भारी किंमतीचे असतात. देवमाशाची चरबीहि फार उपयुक्त असते असें म्हणतात. हे मासे पकडण्याचा एक स्वतंत्रच धंदा असून जगांतील सर्व देशांत तो चालू आहे व तो बराच किफायतशीर असल्याचें आढळतें. देवमाशाची शिकार करणें बरेंच धोक्याचें असतें व या शिकारींत आश्चर्य व मनोरंजन उत्पन्न करण्यासारखे बरेच प्रसंग असतात.

**देवयान**—याचा प्राचीन वैदिक अर्थ देवाकडे नेणारा मार्ग असा आहे; कांहीं ग्रंथांतून देव ज्या मार्गानें पृथ्वी आणि स्वर्ग यांमध्यें प्रवास करीत तो मार्ग असा अर्थ निघतो. पुढें या शब्दाला पारिभाषिक अर्थ येऊन, धार्मिक विचारांत याला स्थान मिळालें. याच्या उलट पितृयान शब्द आहे. वाढत्या ज्ञानाचे व प्रकाशाचे प्रदेश देवयानाच्या मार्गांत येतात तर पितृयानमार्गांत अंधःकार व नाश यांचे एकामागून एक प्रदेश भेटतात असा उपनिषदांवरून निष्कर्ष निघतो. उत्तरायण व दक्षिणायन या अर्थाच्याच देवयान व पितृयान या संज्ञा आहेत. कै. लो. टिळकांच्या ओरायन ग्रंथांत ( प्र. २ रें ) याचें स्पष्टीकरण केलेलें आढळेल.

**देवयानी**—वारुणी भृगुचा पुत्र शुक्र, याची कन्या. ही बाल्यापासून तपस्विनी, विद्यासंपन्न व पित्यास परमप्रिय

अशी असे. शुक्राचार्यांकडे बृहस्पतीचा पुत्र कच संजीवनी विद्येच्या गुप्त हेतूनें अध्ययन करीत राहिला असतां, त्यावर हिचें प्रेम बसून तो कित्येक वेळां दैत्यदानवांच्या हातून मरण पावला असतां पित्याला भीड घालून हिनें त्याला वांचविलें होतें. पण गुरुभगिनी म्हणून कचानें हिला वरिलें नाहीं ( 'कच' पहा ).

एकदां देवयानी व वृषपर्व्याची कन्या शर्मिष्ठा आपल्या सहचरींसहित जलक्रीडेला गेल्या असतां शर्मिष्ठा चुकून देवयानीचें वस्त्र नेसली. देवयानीस राग येऊन त्या दोघींची दुरुत्तरें झाल्यावर शर्मिष्ठेनें देवयानीस नग्न स्थितींत एका कूपांत लोटून दिलें तेव्हां ययाति राजानें तिला वर काढिलें. नंतर त्याच्याशीं देवयानीचा विवाह झाला. [ महाभारत, आदिपर्व.]

**देवरकोंडा**–हैद्राबाद संस्थानांतील नलगोंडा जिल्ह्याचा नैर्ऋत्येकडील एक तालुका. हा कृष्णानदीमुळें मद्रास इलाख्यांतील गन्तूर जिल्ह्यापासून विभागला गेला आहे. क्षेत्रफळ ९८९चौरस मैल व जहागिरी धरून लोकसंख्या(१९११) ११९१०७. यांत खेडीं १८५ व जहागिरी २३आहेत. देवरकोन्डा हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. पश्चिम भागीं पुष्कळ टेंकड्या आहेत. तांदुळाचें उत्पन्न जबर आहे.

**देवराष्ट्र**—दक्षिणापथांतील शक २७२ च्या सुमारचा एक देश. शकपूर्व ३ ऱ्या शतकापासून शकोत्तर १३ व्या शतकापर्यंतच्या सोळाशें वर्षांतले जे शिलालेख, ताम्रपट व नाणीं आतांपर्यंत प्रसिद्ध झालीं आहेत त्यांत देवराष्ट्र या देशाचा उल्लेख फक्त एकदां व एका स्थळीं आलेला आहे. [ 'देवरुखे ' पहा. ]

**देवराष्ट्र**—मुंबई इलाखा, सातारा जिल्हा. खानापूर तालुक्यांत वीटच्या नैर्ऋत्येस १२ मैलांवर हा गांव आहे. गांवाच्या वायव्येस दोन मैल अंतरावर महादेवांचीं पुष्कळ देवळें असून त्या सर्वांत जुनें देऊळ समुद्रेश्वर महादेवाचें आहे. टेंकड्यांत ऋषींच्या गुहा आहेत. देवळाच्या जवळ एक समुद्रेश्वर नांवाचें कुंड आहे. त्यांतलें पाणी गुणकारी आहे असें मानतात.

या समुद्रेश्वर देवळाचा आणि मुहमद गिझनीनें जें सोरटी सोमनाथाचें प्रसिद्ध देऊळ फोडिलें त्याचा कांहीं संबंध दिसतो. यांतील गुहा हिंगणदेव (ज्यानें म्हसूनें किंवा हिंगण खाडींत विहीर बांधिली) राजानें बांधिल्या असें म्हणतात, व त्याच्याच नांवावरून, याच्या जवळील एका खेड्याचें नांव हिंगणगड असें पडलें असावें. त्याची राजधानी कौंडिण्यपूर होती. हेंच पंत प्रतिनिधींचें खेडें कुंडल आहे असें म्हणतात. [ सातारा ग्याझे. ]

**देवरिया**, त ह शी ल.—संयुक्त प्रांतांतील गोरखपूर जिल्ह्याची आग्नेयेकडील तहशील. सालेम परगण्याच्या शिवेवर ही तहशील आहे. क्षेत्रफळ ५८२ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ५१३००७. यांत ४ गांवें व १३०० खेडीं आहेत. जमीन अत्यंत सुपीक असून लागवडहि भरपूर केली जाते. दक्षिणेस राप्ती व घोग्रा या नद्या आहेत. मध्यभागीं लहान गंडक आहे.

**देवरी–किशोरी जमीनदारी**—मध्यप्रांत, जिल्हा भंडारा. साकोली तहशिलीच्या ईशान्येस ही जमीनदारी असून तिचें क्षेत्रफळ २८ चौरस मैल आहे. इ. स. १८१८ मध्यें ही कामठा जमीनदारीबरोबर चिमणा पाटील याच्यापासून हिसकावून घेऊन नर्मद लोधी याच्या ताब्यांत दिली. हींत एकंदर ११ खेडीं आहेत. लोकसंख्या (१९०१) २३६०. उत्पन्न २९०० रु. असून टाकोळी १००० रु. आहे.

**देवरुख**—मुंबई इलाख्यांतील रत्नागिरी जिल्ह्याच्या संगमेश्वर तालुक्याचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या सुमारें चार हजार. येथील हवापाणी उत्तम आहे व गांवाची रचनाहि चांगली आहे.

**देवरुखे**—हे ब्राह्मण मुख्यत्वें कुलाबा व रत्नागिरी जिल्ह्यांत (फुणगुसच्या खाडीच्या दोन्ही कांठांवर९० गांवांत) आढळतात. रत्नागिरी जिल्ह्यांत संगमेश्वर तालुक्यांतील देवरुख गांवावरून ते आपल्यास देवरुखे म्हणवितात. त्यांचें म्हणणें कीं, आपण मूळचे देशस्थ; परंतु देवरुखभागांत राहावयास गेल्यामुळें देवरुखे हें नांव प्राप्त झालें. विल्सन म्हणतो कीं, अथर्ववेदाच्या देवर्षिशाखेचा हा वर्ग असावा. महाराष्ट्र ब्राह्मणांत त्यांचा दर्जा कमी लेखला जातो; त्यांच्या पंक्तीस बसल्यास संकटें कोसळतात असा समज आहे. त्यामुळें पुष्कळ कऱ्हाडे–देशस्थ–चित्पावनब्राह्मण त्यांच्या पंक्तीस बसत नाहींत " ( से. रि. १९११; मुंबै, भा. २ पृ. २४५ ). यांच्या धार्मिक व सामाजिक चालीरीती देशस्थब्राह्मणांहून फारशा निराळ्या नाहींत. यांच्यापैकीं पुष्कळजण शेतकरी असून, अगदीं थोडे लोक व्यापार व सरकारी नोकरींत शिरले आहेत.

शके १६४६ ( स. १७२४ ) मध्यें सोपारें ( जि. ठाणें ) येथील ब्राह्मणांनीं देवरुखे हे पंक्तिपावन ब्राह्मण नाहींत असा निकाल दिला होता ( भा. इ. मं. चा. इति. १८३६ ). सध्यां मुंबईंतील बहुतेक खाणावळी देवरुख्यांनीं चालविल्या आहेत व त्यांत सर्व तऱ्हेचे ब्राह्मण जेवतात; कोंकणांतहि बहुतेक लोक त्यांच्याशीं रोटीव्यवहार करतात.

वरील निर्णयपत्रांत देवरुख्यांना देवराष्ट्रीय म्हटलें आहे. स्कंदपुराणांतहि त्यांनां देवराष्ट्रीय म्हणून ते देवराष्ट्रांतून आलेले व अपांक्त म्हटलें आहे. " अन्येपि देवराष्ट्रीया देवराष्ट्राद्युपागताः । अपांक्तेया अयाज्याश्च गिरिकांतारवासिनः ॥ " पद्मपुराणांत सुद्धां यांनां पंक्तिदूषक देवराष्ट्रब्राह्मण म्हणून संबोधिलें आहे.

शके २७२ ( स. ३५० ) च्या अलाहाबादच्या समुद्रगुप्ताच्या शिलालेखांत देवराष्ट्र देशाचा उल्लेख आढळतो. दक्षिणापथांतील जे जे राजे त्यानें जिंकले त्या देशांच्या नामावलींत देवराष्ट्राचें नांव आहे. तसेंच तेथील कुबेर

नांवाच्या राजाचाहि उल्लेख आहे. नागपुर ते म्हैसूरपर्यंतच्या प्रदेशांत मध्येंच हें देवराष्ट्र होतें. सह्याद्रीच्या किनाऱ्याचा टापू त्या राष्ट्रांत मोडत असे.

कृष्णानदीच्या कांठीं कऱ्हाडा( सातारा जिल्हा )जवळ कुंडलच्या पूर्वेस ३१३ कोसांवर हल्लीं देवराष्ट्र नांवाचें एक खेडें आहे ( पहा ). त्याच्या आसपास प्राचीन अवशेष, लेणीं, देवळें फार आहेत. येथें कुबेरेश्वर व समुद्रेश्वर यांचीं देवळेंहि आहेत.हेंच पूर्वीच्या देवराष्ट्राच्या राजधानीचें शहर; हें राज्य सातारा ते कोल्हापूर व अरबीसमुद्र ते पंढरपुर या भागावर पसरलें असावें व शके २७२ त तेथें कुबेर राजा होता. त्याच्या आश्रयानें देवराष्ट्र या प्रांतांत जे ब्राह्मण रहात असत ते देवराष्ट्र–देवराष्ट्रीय–देवरुखे ब्राह्मण होत असें रा. राजवाडे म्हणतात.

शातवाहनांचें राज्य ( २२८ ) नष्ट झाल्यावर त्यांचे मांडलिक तगरेश्वर यांचाहि ऱ्हास होऊन देवराष्ट्र येथील राजांनीं महाराष्ट्रांत डोकें वर उचललें असावें. त्यांनां पुढें ( ३५० ) समुद्रगुप्तानें मांडलिक केलें. नंतर ते ४७८ पर्यंत कांहीं काळ मांडलिक व कांहीं काळ स्वतंत्र राहून, शेवटीं चालुक्यांचे मांडलिक बनले असावेत. या २५० वर्षांच्या ( २३०–४८० ) कालांत महाराष्ट्रांत अनेक लहानमोठे राजे व राज्यें उदयास आलीं. त्यांपैकींच देवराष्ट्राचें एक राज्य होय. हें राज्य ४७८ त चालुक्यांच्या अंकित झालें असावें व पुढें थोड्याच कालानें नष्ट झालें असावें. त्यावेळीं कुबेर राजाचे आश्रित हे देवराष्ट्रीय ब्राह्मण राजाश्रयाभावीं त्या ( देवराष्ट्र ) प्रांतांतून निघून संगमेश्वर व फुणगूसच्या आसपास येऊन कायमचे राहिले असावे. हा टापू त्यावेळीं चालुक्यांच्या अंमलापासून दूर होता. यावेळीं तेथें दुसरे ( चित्पावन ) ब्राह्मण होतेच. त्यांच्यामध्यें परचक्राच्या भयानें हे देवराष्ट्रीय येऊन गिरिगव्हरांत लपून राहिले. या घाटावरील भिन्नाचाराच्या व भिन्न व्यवहाराच्या ब्राह्मणांपासून यज्ञयाग करणारे चित्पावन ब्राह्मण अर्थातच अलिप्त राहिले.

देवराष्ट्र याचा अपभ्रंश देवरठ्ठ होतो; देवऋषि याचा अपभ्रंश देवरुखे किंवा देवरखे. संगमेश्वराजवळ देवरुख हें एक गांवहि आहे. सारांश ही बात प्रादेशिक आहे; याशिवाय इतर महाराष्ट्रीय ब्राह्मण व यांच्यांत विशेष फरक नाहीं.

हे स्वतःस देवर्षिब्राह्मण म्हणवून पंचद्राविडांतर्गत महाराष्ट्र ब्राह्मण असल्याचें सांगतात. मुंबई इलाख्यांत यांची लो. सं. सुमारें ५ हजार असून याशिवाय माळवा, ग्वाल्हेर, कर्नाटक इकडे २ हजारांपर्यंत लोक आहेत. ठाणें जिल्ह्यांत उंबरगांव पेटयांतहि यांची वस्ती बरीच आहे.

कुलाबा जिल्ह्यांत दहिवली येथील विठ्ठलदेवाचें एक संस्थान या जातीच्या पंचायतीच्या मालकीचें आहे. गरीब विद्यार्थ्यांकरितां अलीकडे यांनीं कांहीं फंड काढले आहेत. पूर्वी यांच्यांत पंचायती होत्या, सांप्रत नाहींत. यांच्यांत पोटजाती नाहींत; हे आपणांस ऋग्वेदीय देशस्थांची पोटजात म्हणवितात आणि देशस्थांशीं आपला लग्नव्यवहार २५० वर्षांपासून असल्याचें सांगतात. यांचा धर्मविधी देवरुखे भिक्षुकांकरवींच बहुशः होतो. हे अपांक्त नाहींत याबद्दल निरनिराळ्या ठिकाणच्या धर्मसभेचीं व अधिकाऱ्यांचीं आज्ञापत्रें ( नकला ) पाहण्यांत येतात.

शतप्रश्नकल्पलता या पुस्तकांत (अ. १, प्र. ९) यांच्या उत्पत्तीबद्दल एक दंतकथा आहे. तीच सर्वत्र आढळते. यांचें म्हणणें कीं कोल्हापूरप्रांतांतून शृगाल राजाच्या (?) छळामुळें आम्हीं कोंकणांत गेलों. पुढें परशुराम कोंकणांत आल्यावर त्याच्या वडिलाच्या श्राद्धास या ब्राह्मणांनां क्षण दिला असतां हे गेले नाहींत म्हणून मग त्यानें चित्पावनांनां निर्माण केलें व देवर्षि ब्राह्मणांनां शाप दिला.

यांचीं व देशस्थांचीं गोत्रें ( वरीचशीं ) एकच आहेत. तसेंच दोघांच्या कुलस्वामींमध्येंहि बरेंच साम्य आहे. ऋग्वेदी आश्वलायन व यजुर्वेदी तैत्तिरीय शाखांतर्गत हिरण्यकेशी अशा दोन शाखा यांच्यामध्यें आहेत. तुळजापूर व कोल्हापूर येथील देवी, जेजुरीचा खंडोबा हे यांचे मुख्य देव आहेत.

यां चीं कां हीं आ ड नां वें.—करोडे, कानडे, कारुळकर, कोवजे (कोगजे), कारकर, कवठेकर, कुलकर्णी, खटावकर, खरवतकर, आरेकर, आंबेडकर, चाफेकर ( दोन गोत्रांचे ), चांदे, जुवेकर, जकाते, जोशी, ढापरे, डांगे, ताले, टांकसाळे, तेरे, तेरेदेसाई, डंबळकर, गोंधळेकर, चौगुले, निमकर, नवरंगे, निंबंधे, धनुर्धर, पेडवळे, पिंपुटकर, बोमे ( भोमे ), मोळे, मडसावले, बाठे, पाठे, पांगारकर, मोगरे, देवळे, महाजन, मराठे, मांडुसकर, मुद्गल, मुळे, मुसळे, रोहे, शिधुत, साले, सावले. यांशिवाय कर्नाटक प्रांतांत गेलेल्या लोकांचीं आडनांवें:—धवळट्टी, बनट्टी, कलघटगीकर वगैरे.

कै. विष्णु परशुराम पंडित यांनीं ' पंचद्राविडान्तर्गत महाराष्ट्र ब्राह्मणांतील देवरुख्यांविषयीं शास्त्रसंमतविचार ' नामक एक पुस्तक लिहिलें आहे (१८७४) त्यांत देवरुख्यांनां देशस्थ म्हटलें आहे.

मुसुलमानी अंमलांत कुळकर्ण, देसाईपण, करोडगिरी वगैरे अधिकार यांनां मिळाल्यानें पुन्हां हे देशावर अहमदनगर, बेळगांव, धारवाडाकडे गेले. मराठी राज्यांत हे जकाते, कारकून झाल्यानें गुजराथ, माळवा, सातारा, पुणें या भागांत पसरले. महादजी शिंद्याच्या लष्करांत अमलदारवाले जहागीरदार होते. नागो देवचके हाहि एक पथक्या त्यांत होता. [ सेन्सस रिपोर्ट १९११. मुंबई; मा. इ. सं. अहवाल, शक १८३८; रत्नागिरी ग्याझे; सोलापूर ग्याझे; भांडारकर–हिस्टरी ऑफ दि डेक्कन; विल्सन–इंडियन कास्ट्स; हरिवंश; सह्याद्रिखंड; रा. मि. मो. मांडुसकर यांची माहिती. ]

देवल—संयुक्त प्रांतांतील पिलीभित जिल्ह्याच्या बिसलपूर तहशिलींतील एक खेडें. हें खवा काल्याच्या पश्चिम भागावर वसलेलें आहे. पलीकडच्या तीरावर देवरिया व

गड गाजन आहेत. येथें एक इ. स. ९९२ तील लेख सांपडला आहे. त्यांत छिंद वंशाच्या लल्ल नामक राजानें बांधलेल्या देवालयांचा उल्लेख आहे. प्राचीन मयूत शहराच्या अवशेषाची--धोंडे मातीची आठवण म्हणून मोठे धोंडे व मातीचे डोंगर जवळच आहेत. [ ए. इं. १, पृ. ७५. ]

**देवल, गोविंद बल्लाळ** ( मृत्यु १९१६ )—एक महाराष्ट्रीय नाटककार. यांचा जन्म सांगलीजवळील हरिपूर गांवीं झाला. लहानपणापासून यानां नाटकाचा नाद होता तरी १८७९ सालीं हे मॅट्रिक पास झाले. गोविंदरावानां कविता करण्याचा नाद असल्यामुळें साहजिकच त्यावेळीं बेळगांवीं शिक्षक असणाऱ्या अण्णासाहेब किर्लोस्करांशीं त्यांचा चांगला परिचय झाला. १८८४ सालीं देवल अग्रिकल्चर (शेतकी)ची परीक्षा उत्तीर्ण झाले. अग्रिकल्चर कॉलेजांत असतांना 'आर्योद्धारक मंडळीं'त गोविंदराव काम करीत. तेव्हांच त्यांचा उत्तम नट म्हणून लौकिक झाला. कांहीं दिवस सरकारी नोकरी केल्यानंतर ती कायमची सोडून ते नाट्यवाङ्मयांत भर घालूं लागले. किर्लोस्करांच्या खालोखाल नाट्यकवि म्हणून यांचें नांव पुढें येऊन बऱ्याच नाटक मंडळ्यांनां यांच्या नाटकांवर गवर होतां आलें. देवलांनीं एकंदर संगीत व गद्य मिळून सात नाटकें लिहिलीं आहेत तीः—सं. विक्रमोर्वशीय; सं. मृच्छकटिक; सं. शापसंभ्रम; सं. शारदा; दुर्गा; फाल्गुनराव व झुंझारराव. यांपैकीं पहिलीं तीन संस्कृत नाटकांचीं व शेवटलीं इंग्रजी नाटकांचीं रूपांतरें होत. शारदा नाटक कायतें एकच त्यांचें स्वतःचें व तत्कालीन समाजांत क्रांति करून सोडणारें नाटक होतें जरठतरुणीविवाह हा या नाटकाचा सामाजिक विषय असून नाटककारानें आपल्या कवित्वानें तो उत्कृष्ट रंगविला आहे. त्यामुळें बराच काळ महाराष्ट्रीयांच्या मनावर याचा पगडा बसला होता. मरणसमयीं यांचें वय सुमारें ६० वर्षांचें होतें.

**देवलदेवी**—गुजराथचा राजा कर्णराय याला कमलादेवी नांवाच्या राणीपासून झालेली मुलगी. 'करणवाघेला' पहा.

**देवलस्मृति**—देवल या ऋषीचा असितावरोबर वैदिक वाङ्मयांत उल्लेख येतो. सर्वानुक्रमणीप्रमाणें हे कश्यप कुलांतील असून ऋग्वेदाच्या नवव्या मंडलांतील ५ ते २४ या सूक्तांचे द्रष्टे आहेत. वैदिक देवल व स्मृतिकार देवल यांचा संबंध जोडणारा स्पष्ट आधार नाहीं. देवलस्मृतींत, ती सिंधु नदीच्या कांठीं रचली गेल्याबद्दल उल्लेख आहे. या स्मृतीचा काल सुमारें ७३२ असावा. कारण सिंधु देश मुसुलमानांनीं जिंकून ( दाहीर पहा ) तेथील हिंदूंनां भ्रष्ट केल्यावर कांहीं कालानें म्हणजे सुमारें २० वर्षांनीं रजपुतांनीं मुसुलमानांनां तेथून घालवून दिल्यावर ही स्मृति रचली असावी. कारण या स्मृतींत ( श्लोक ५३ ) धर्मांतर केलेल्यास२०वर्षांनींहि पुन्हां धर्मांत घेतां येतें असें वचन आहे. इतर स्मृतींहून हींत विशेष हा आहे कीं,या स्मृतीच्या आरंभीं प्रस्तावनेंतच देवलास ऋषींनीं, म्लेच्छांनीं धर्मभ्रष्ट केलेल्या अशा ब्राह्मणक्षत्रियादि चतुवर्णीयांनां शुद्ध कसें करून घ्यावें याबद्दल प्रश्न विचारला असून त्यासंबंधींच विवेचन मुख्यतः या स्मृतींत आहे. प्रायश्चित करणारा वयानें ८० वर्षांच्या पुढील असेल किंवा सोळा वर्षांच्या आंतील वयाचा असेल अथवा रोगी असेल तर त्यानें, जें प्रायश्चित सांगितलें असेल त्याच्या अर्धें आचरावें. प्रायश्चित्त करणारा अकरा वर्षांच्या आंतील असेल तर त्याच्याबद्दल प्रायश्चित त्याच्या भावानें, पित्यानें अथवा पालकानें करावें असें सांगितलें आहे. ब्रह्मचारी, गृहस्थाश्रमी, अग्निहोत्री, स्त्री, रजस्वला स्त्री वगैरेंनां भ्रष्ट केलें असल्यास कोणतें प्रायश्चित आचरावें, जबरीनें म्लेच्छान्न भक्षण करविल्यास अथवा निरुपायानें भक्षणाचा प्रसंग आल्यास कोणतें प्रायश्चित आचरावें वगैरे विषय या स्मृतींत आले आहेत. भ्रष्टता पावल्यावर जितका काल म्लेच्छ सहवासांत जाईल त्या मानानें कमी अधिक प्रायश्चित्त आचरणाचें प्रमाण सांगितलें आहे. या देवलस्मृतींतील व कांहीं अन्यस्मृतींतील वचनाधारें धर्मांतर केलेल्या त्रैवर्णिकांनां शुद्धिसंस्कार करून धर्मांत घेण्याचा प्रघात श्री शंकराचार्यांच्या संमतीनें अलीकडे चालू झाला आहे. सदर शुद्धिसंस्काराचा प्रयोग पुस्तकरूपानें पंडित विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव ( पुणें ) यांनीं छापिला असून त्या पुस्तकास भाषांतरासह देवलस्मृति जोडली आहे.

**देवलिआ**—काठेवाड. वढवाण ( स्टेशन ) ठाण्यांतील निराळी खंडणी देणारी जहागीर. लखतार हिच्या जवळचें हें रेल्वे स्टेशन आहे. या तालुक्यांत देवलिआ व अन्याळी अशीं दोन खेडीं आहेत.

**देवळिया**—राजपुतान्यांतील प्रतापगड संस्थानाची जुनी राजधानी. प्रतापगड गांवाच्या पश्चिमेस ही ७ $\frac{1}{2}$ मैल आहे. सन १५६१ च्या सुमारास हें गांव संस्थान अस्तित्वांत आणणारा बिका यानें वसविलें. पूर्वी या गांवास तट होता. १६४८ च्या सुमारास महारावत हरिसिंग यानें बांधलेला एक जुना राजवाडा आहे. तेजातलाव सर्वांत मोठा आहे. तो तेजसिंगनें बांधिला. गांवांत हिंदूंचीं व जैनांचीं देवालयें आहेत.

**देवळी**— (१) मध्यप्रांत. वर्धा जिल्ह्याच्या वर्धा तहशिलींतील एक गांव. वर्ध्याहून ११ मैल व देहगांव स्टेशनहून ५ मैलांवर आहे. लोकसंख्या सुमारें ५ हजार. येथें पूर्वी कापसाचा मोठा बाजार भरत असे. येथें एक राष्ट्रकूटांचा ताम्रपट ( इ. स. ९४० ) सांपडला आहे. राजे लक्ष्मणराव भोंसले यांच्याकडे हा गांव आहे.

( २ ) राजपुताना. अजमेर-मेरवाडांतील एक छावणी. समुद्रसपाटीपासून उंची ११२२ फूट. लोकसंख्या सुमारें ५ हजार. देवळी सपाट प्रदेशावर असून नसिराबादच्या आग्नेयीस ५७ मै. आहे. येथें नेटिव्ह पायदळाच्या तुकडीची व घोडेस्वारांची व्यवस्था आहे. हें गांव हारावती व टोंक पोलिटिकल एजन्सीचें मुख्य ठिकाण आहे.

**देवळें**—देऊळ हा शब्द देवालय (देव + आलय = देवाचें घर) या संस्कृत शब्दापासून झाला आहे. इंग्रजी शब्द 'टेंपल' मूळ लॅटिन भार्षेतील भविष्यकथनाची जागा या अर्थाच्या शब्दापासून झाला असून नंतर त्याला देवालय असा अर्थ प्राप्त झाला. देवालयांचा प्रसार मूर्तिपूजक लोकांच्या देशांतच फार आढळतो, तथापि मूर्तिपूजाविहीन अशा खिस्ती व मुसुलमानी धर्मांतहि देवालयासारखीं पवित्र गृहें असतात व त्यांत प्रत्यक्ष देवाची मूर्ति नसली तरी तेथें ईश्वर अदृश्य रूपानें वास करतो किंवा तेथें मधून मधून भेट देतो असें मानतात, व अशा गृहांचा सार्वजनिक प्रार्थना करण्याच्या कामीं उपयोग करतात. खिस्ती धर्मांतलीं चर्चें व इस्लामी धर्मांतील मशिदी अशा प्रकारच्या होत.

**प्राथमिक अवस्थेंतील समाज.**—ऐतिहासिक दृष्ट्या पाहतां वारंवार स्थानांतर करण्याऱ्या (नोमॅड) भटक्या जातींच्या लोकांत देवतांची पूजा असली तरी देवालयें असणें शक्य नाहीं. बहुधां यांचे धार्मिक विधी उघड्या जागेंत होतात, कारण वृक्षपाषाणादिकांच्या आश्रयानें देवता रहातात अशा समजुतीनें वृक्षपाषाणादिकांचीच ते पूजा करतात. मूर्तिपूजेचा अवलंब केल्यावरहि देवांच्या मूर्ती ते स्थानांतर करतांना बरोबर घेतात व त्यांना झोपडींत किंवा तंबूंत तात्पुरत्या स्थापन करतात. याच्या पुढील पायरी स्थायिक एके ठिकाणीं राहणाऱ्या रानटी जातींची. ज्या ठिकाणीं मृत पूर्वजांचे आत्मे किंवा देव प्रादुर्भूत होतात अशी समजूत असते अशा पवित्र स्थानांना भोंवतालीं दगडांचें कोंडाळें करून मध्यें मूर्ति किंवा इतर देवतादर्शक दगड वगैरे ठेवतात. नंतर अशा पवित्र स्थानीं लहानसें झोपडें बांधण्याची चाल पडली व सांप्रत अप्रगत व गरीब स्थितींतल्या लोकसमाजांत हाच प्रकार दृष्टीस पडतो. अशा प्राथमिक अवस्थेंतील देवालयाबरोबरच मृतांच्या देहांचें दफन करण्याची (पुरण्याची) चाल ज्या ज्या धर्मांत आहे त्या त्या धर्मांच्या समाजांत दफनभूमीलाहि पावित्र्य प्राप्त होऊन तेथें देवालयासारखींच पवित्र गृहें (इमारती) बांधण्याची चाल रूढ झाली. देवळांचा एक नैसर्गिक प्रकार म्हणजे गुहा. अशा गुहांमध्यें दैवतें मांडून त्यांना पवित्र पूजाप्रार्थनास्थानांचें स्वरूप देणाऱ्या रानटी जाती पुष्कळ आहेत. हा प्रकार ईजिप्त, अरबस्तान, अमेरिकेंतील पेरु व इतर देशांत आढळतो.

**उच्च संस्कृतींतील समाज.**—उच्च संस्कृतीच्या लोकांत धार्मिक बाबतींत देवळांना मोठें महत्त्व असतें आणि तीं शिल्पकलेच्या मानवी प्रगतीच्या दृष्टीनें फार महत्त्वाचीं असतात. कारण त्यांवरून त्या त्या समाजाच्या धार्मिक विधींची व त्याचप्रमाणें त्यांच्या औद्योगिक प्रगतीची व सौंदर्यविषयक कल्पनांची माहिती मिळते. ईजिप्तमध्यें प्राचीन काळचीं मोठालीं देवालयें आहेत. तीं दगडी असून देवाची मूर्ति स्थापलेल्या मध्यवर्ती जागेभोंवतीं बऱ्याच खोल्या व दिवाणखाने बांधल्यामुळें एकंदर देवालयाची इमारत पुष्कळ मोठी असते. मूर्तीची जागा अंधःकारयुक्त असून तेथें फक्त उच्च पुरोहित वर्गाला (प्रीस्ट) जाण्याची परवानगी असते. अशा देवालयांच्या पुढील भागाची उंची सर्वांत अधिक व मागील भागांची कमी कमी होत गेलेली असते. बाबिलोनियांत जुन्या काळचीं कांहीं देवालयें जमिनीखालून उकरून काढलीं आहेत तींहि फार मोठालीं आहेत. त्यांत बाहेरच्या बाजूला एक मोठा दिवाणखाना असून त्याला लागून मागें एक लहान खोली असते व तींत देवतेची मूर्ति असते. कांहीं देवालयें फार उंच व सहासात मजल्यांचीं असून शेवटच्या मजल्यापर्यंत जिने असत आणि अगदीं शिखरावर एक खोली असून तींत सिंहासनावर देवाची मूर्ति स्थापलेली असे एकंदर विश्वाची रचना एकावर एक असे सात लोक (झोन) मिळून आहे अशा समजुतीमुळें देवळांना सात मजली आकार देऊन वर देवाची स्थापना केली आहे. ईजिप्तमधील देवळांचें क्षेत्रफळ किंवा भोंवतालचें आवार फार विस्तृत असतें तर बाबिलोनियांतील प्राचीन देवालयांची उंची फार असते. ईजिप्त व बाबिलोनिया या दोन्ही देशांतील देवळांस पुष्कळ जमिनी इनाम दिलेल्या असत आणि बाबिलोनियांत तर देवळांतील पुरोहितांकडेच न्यायमनसुब्याचें काम असे व तें देवालयाभोंवतालच्या इमारतींत चाले. त्यामुळें त्या राष्ट्रांत देवालयें ही मोठी महत्त्वाची संस्था होती. ग्रीक लोकांतील प्राचीन देवळाचा मुख्य भाग म्हणजे एक चौकोनी लांबट खोली असून तिच्या भोंवतीं अनेक खोल्या असत. देवळाचें तोंड पूर्वेकडे असून मुख्य दरवाज्यासमोर देवाची मूर्ति बसवीत असत. हीं देवळें साधारणपणें लहानच असत पण तीं चांगली रंगीत शोभिवंत केलेलीं असत.

**हिंदु.**—वैदिक काळांत मूर्तिपूजा व देवळें नव्हतीं, बुद्धपूर्व काळांतील देवालयांचे अवशेष मुळींच उपलब्ध नाहींत. वैदिक काळांत देवळें असलींच तर तीं हल्लीं ब्रह्मदेशांतल्याप्रमाणें लांकडी असलीं पाहिजेत, कारण अशोकाच्या काळापर्यंत इमारतीकडे दगडांचा उपयोग करण्याचें माहीतच नव्हतें, असें वास्तुकलाभिज्ञ जेम्स फर्ग्युसन म्हणतो. देवळें म्हणून मोठाल्या दगडी इमारती बांधण्याची पद्धत बौद्ध काळांत सुरू झाली. पण बौद्धांच्या देवळांत देवाच्या मूर्ती नसून बुद्धाच्या शरीराचे अवशेष ठेवण्याची पद्धत होती. अशा स्थानाला प्रथम स्तूपाचा म्हणजे वाटोळ्या झांकणाचा आकार देत. चैत्य या नांवाच्या पवित्र स्थानांचा दुसरा एक प्रकार आहे याला देवालयाप्रमाणें मोठ्या इमारतींचा आकार देऊन त्यांत स्तूप बांधलेला असतो. पवित्र बौद्ध स्थानांचा दुसरा प्रकार म्हणजे डोंगरी खडकांत खोदून तयार केलेले स्तूप व चैत्य(गुहा) हा होय. तिसरा प्रकार विहार उर्फ बौद्ध भिक्षूंना राहण्याकरितां बांधलेल्या खडकांत खोदून तयार

केलेल्या लहानमोठ्या खोल्या. स्तूप, चैत्य व विहार हिंदुस्थानांत अनेक ठिकाणीं आहेत.

हिंदूंचीं जीं देवळें सर्व हिंदुस्थानभर आहेत त्यांची मूळ कल्पना, आकार व शोभा या बाबतींत बौद्धांच्या उपर्युक्त पवित्र स्थानांचें अनुकरण बरेंच झालें आहे. तथापि हिंदु देवालयपद्धतीचे मुख्य दोन प्रकार आहेत. एक दक्षिणहिंदुस्थानांतील द्राविडी व दुसरा बाकीच्या भागांतील सर्वसामान्य. दक्षिणेकडील देवळें चौरस असून त्यांचा वरचा भाग मनोऱ्याप्रमाणें उंच व कित्येक मजले देऊन केलेला असतो. मुख्य देवळाच्या आंत एक गाभारा उर्फ मुख्य मूर्तीची लहान खोली असून तिच्या भोंवतालीं प्रदक्षिणेकरितां मोकळा मार्ग असतो. पुढल्या बाजूला अनेक खांब असलेला मोठा सभामंडप असतो. शिवाय मुख्य देवळाभोंवतीं पुजाऱ्यांना राहण्याकरितां खोल्या, मोठें अंगण, पाण्याचीं टांकीं किंवा विहिरी वगैरे असतात. शैव व वैष्णव दोन्हीं पंथांचीं देवळें सारखींच असून फक्त मूर्ती व खोदकाम निराळ्या प्रकारचें असतें. उत्तरेकडील देवळांचा खालचा आकार बहुकोनी असून वरील शिखर वाटोळें व निमुळतें होत गेलेलें असतें व त्याला मजले नसतात. देवळाच्या समोर एक चौरस चवुतरा असून त्यावर मनोऱ्यासारखें छप्पर असतें. देवालयशिल्पाविषयीं माहिती शिल्पशास्त्रांतील असल्यानें ती येथें फारशी दिलेली नाहीं.

नेपाळ, ब्रह्मदेश, तिबेट, चीन व जपान या देशांत बौद्ध धर्माचा प्रसार झाल्यावर तेथें स्तूप बांधण्यांत आले. पण त्यांच्या आकारांत निरनिराळ्या देशांत थोडा फार फरक आहे. बहुतेक सर्व धर्मांत सर्वश्रेष्ठ असें एक देवालय असतें. ख्रिस्ती धर्मांतील रोम येथील पँथिऑन, मुसुलमानांचे मक्का येथील काबा, हिंदूंचे काशी येथील विश्वेश्वराचें देवालय, बौद्धांचें गया येथील बोधिवृक्षाचें स्थान हीं स्थानें अशा प्रकारचीं होत. प्राचीन काळापासून मुख्य यात्रेचीं हीं ठिकाणें असून गुन्हेगारांना संरक्षक स्थळें म्हणूनहि हीं उपयुक्त असत.

**देवांग**—यांची एकूण लो. सं. ( १९११ ) ४५१३५५. यांना देवांपति, देवांगुळ, देवलवार अशींहि नांवें आहेत. मऱ्हाड, ब्रम्हदेश, कूर्ग, मद्रास इलाखा, निजामाचें राज्य, कोचीन व कोंकण या प्रांतांतून हे लोक आहेत. विशेषतः मद्रास इलाख्यांत हे फार ( २८६५०४ ) आहेत. हे कोष्टी असून सुती व रेशमी हीं दोन्ही कापडें विणतात. पुढें विणणाऱ्या लोकांचा एक वेगळाच वर्ग झाला. ह्या वर्गाचे पुष्कळ लोक लिंगायत पंथाचे झाले. देवांगअय्या व मसांगअय्या हे त्यांचे पुढारी आहेत. परदेशी व मुंबईतील गिरण्यांचा माल निघूं लागल्यापासून यांचा धंदा बराच खालावला जाऊन पुष्कळ लोक कर्जबाजारी झाले आहेत. या लोकांचे कुलाचारदावारु, सुतसाळी इत्यादि २९ पोटभेद असून त्यांचा परस्परांशीं विवाहसंबंध होत नाहीं. कुलाचारदावारु लोकांमध्यें कोठें कोठें जानवें व लिंग हीं दोन्ही घालण्याची चाल आहे. सुतसाळी लोक मुसुलमान धर्मांतून आलेले असून, त्यांमध्यें सुंता करण्याची चाल आहे असें म्हणतात. यांच्या आडनांवांवरून ह्यांचीं कुळें ठरलीं जातात. नाशिक येथील मराठेसाळी या पोटभागांतील लोकांत आडनांवांखेरीज गोत्रेंहि आहेत. हिरे व चिकक्कुरविन या पोटभेदांतील लोकांचीं २६ गोत्रें असून त्यांतील अर्धीं शिवनामवाचक व अर्धीं पार्वतीनामवाचक आहेत. एक आडनांव ( बेडागू ) असलेल्या व कोठें कोठें एक देवक असलेल्या लोकांमध्यें विवाहसंबंध होत नाहींत. आतेबहीण व मामेबहीण यांच्याशीं लग्न बहुधां करितां येतें. कर्नाटकांत मुलीबद्दल, मुलाचा बाप मुलीच्या बापाला ३० रुपये देतो. पुनर्विवाहाची चाल यांमध्यें आहे. पंचाची संमति असल्यास घटस्फोटहि करितां येतो. खंडोबा, बहिरोबा, जोतीबा, नरसोबा इत्यादि देवतांची हे लोक पूजा करितात. यांचे उपाध्ये देशस्थ ब्राम्हण आहेत. सोलापूर जिल्ह्यांतील खेड्यांतील कोष्टी लोकांचे सामाजिक प्रश्न जातिसभेपुढें मांडले जाऊन निकाल दिला जातो व या निकालावर आसपासच्या खेड्यांच्या संयुक्त सभेकडे अपील करितां येतें. सातारा व पूर्व खानदेश येथेंहि अशाच पंचायती आहेत.

धारवाडच्या बाजूस यांनां हटगर म्हणतात. त्यांच्यांत कांहीं जंगमपंथी ( शिवाचारी ) आहेत व कांहीं रामानुजी उर्फ कुलाचारी आहेत. प्रसंगविशेषीं या दोघांत शरीरसंबंध होतो. लिंगायत देवांग व कुलाचारी देवांग यांचा बेटीव्यवहार झाला तरी लिंगायत देवांग व इतर लिंगायतसमाज ( रेड्डी, तेली वगैरे ) यांचा परस्पर शरीरसंबंध होत नाहीं. यांच्या पंचायती बहुधां, यांच्या मोठ्या वस्तीच्या गांवीं भरत असतात. सर्वांत मोठी सरपंचायत स. १९०४ त स्थापली. व्यापार किंवा लग्न वगैरे समारंभांत कांहीं ठराविक रक्कम पंचायतीच्या खर्चासाठीं घेतात. देवांगांहून भिन्न परंतु त्यांना सदृश अशी जात विश्वकर्म किंवा पंचायन होय. देवांगांचा इतर कोणत्याहि जातीशीं अन्नोदकव्यवहार चालत नाहीं. यांचे विवाहादि संस्कार यांच्या जातीचे उपाध्याय करितात. जातीसंबंधीं प्रश्नांचा निर्णय ब्राम्हणांकडून करवितात. हे पुनर्विवाह शास्त्रसंमत मानीत नाहींत. देवांग पुरुषाकडून अन्यजातीच्या स्त्रियांच्या पोटीं अधमर्ण्यव्यवहारानें झालेल्या संततीस कुरसाली म्हणतात. अशांबरोबर देवांग अन्नोदकव्यवहार करीत नाहींत असें म्हणतात. [ बा. म. लाड. सेक्रेटरी, दे. ध. प्रसारक समाज व रामचंद्र बाळाचार्य आरवटी, धारवाड, यांनीं पुरविलेली माहिती; सेन्सस रिपोर्ट, पु. ७, १८, सन १९११.]

**देवानंपिय**— देवानंपिय व पियदसि हे दोन प्राकृत शब्द अशोकाच्या शिलाशासनांत नेहमीं येतात. देवानंपिय या प्राकृत सामासिक शब्दाचें संस्कृत रूप देवानां प्रिय. याचे अर्थ मूर्ख व देवप्रिय असे दोन होतात. दिव् धातूचें खेळणें

व प्रकाशणें असे दोन अर्थ. खेलनार्थक दिव्‌पासून निघालेल्या देव शब्दाचा अर्थ जुगारी व प्रकाशनार्थक दिव्‌पासून झालेल्या देव शब्दाचा अर्थ निर्जर. पहिल्या पक्षीं देवानांप्रिय म्हणजे जुगाऱ्यांचा लाडका अतएव मूर्ख, निंद्य. दुसऱ्या पक्षीं अमरांचा लाडका अतएव पूज्य.

पतंजलि, शंकराचार्य व बाण यांनीं स्तुत्यर्थक अर्थी देवानांप्रिय योजिलें आहे. परंतु या सामासिक भावनेनें मूर्ख असाहि अर्थ निघतो. त्यामुळें व्यस्त अर्थानें या पदाचा अर्थ लाविल्यास तो पुढीलप्रमाणें लागतोः– देवानां प्रियः असा अर्थ न घेतां देवेभ्यः प्रियः असा अर्थ घ्यावा. प्राकृतांत चतुर्थीचें काम षष्ठी करते. देवानांप्रिय म्हणजे लाडका व देवेभ्यः प्रियः म्हणजे देवानां लाडका. मतलब एकच. मात्र स्मिथनें दिलेला 'सेक्रेड' (पवित्र) हा अर्थ या सामासिक पदाचा मुळींच होऊं शकत नाहीं. यूरोपांतील राजे आपणांस धर्माचे व संस्थानाचे मुख्य समजून 'सेक्रेड', 'प्रेशिअस' वगैरे उपपदें ज्या अर्थानें लावीत, त्या अर्थास अनुलक्षून स्मिथनें वरील सेक्रेड असा अर्थ या सामासिक पदाचा केला असावा. पण भारतवर्षांत राजा हा धर्माचा अंकित आहे, धर्म राजाचा नाहीं. आपलें मूळ नांव न योजतां परोक्ष नांवानें आपली माहिती देण्याची चाल इकडे सूत्रकालापासून आहे. दे परोक्षप्रिय आहेत. आपलें खरें नांव उच्चारून आढयता पदरीं न घेतां, व या पुरातन चालीस अनुसरून अशोकानें (फक्त एकाअिवाय) सर्वत्र शिलाशासनांत आपलें वरील (देवानंपिय पियदसि) टोपण नांव कोरविलें. प्रियदर्शन (पियदसि) हें त्याचें परोक्ष नांव दीपवंशांत सर्वत्र उल्लेखिलें आहे. अशोक असें नांव तेथें आढळत नाहीं. तेव्हां स्मिथचा 'प्रेशिअस' हा प्रियदर्शनाचा अर्थ चुकीचा दिसतो. सारांश, देवानंपिय पियदसि राजा, याचें भाषांतर देवांना लाडका जो प्रियदर्शी नांवाचा राजा (अशोक) तो असें करण्यांत येतें. [भा. इ. मं. अहवाल, १८३५.]

**देवार**—गाणारे व भिक्षा मागणारे द्रविड जातीचे हे लोक आहेत. यांची वस्ती बहुधां वऱ्हाड मध्यप्रांतांतच असून लो. सं. २५०० आहे. यांच्या कुलांचीं नांवें कांहीं गांवांवरून पडलीं आहेत. जसें रायपुरिया, रतनपुरिया. रायपुरिया नारळाला तुंबा लावलेली सारंगी वाजवितात. रतनपुरिया लोक वांशाला भोपळ्याचा तुंबा लावून तांतीच्या दोऱ्यांनीं वाजवितात. देवरांच्या वर्गांचीं नांवें बहुतेक द्रविड शब्दांचींच आहेत. कांहीं गोंड नांवें आहेत व कांहीं कचार शब्द आहेत. विवाह प्रौढदशेंतच होतात. उपवर मुलीला योग्य वर नच मिळाला तर ती तिच्या बहिणीच्या नवऱ्यास देतात.

वधू प्रौढ असल्यास गर्भाधान निराळें करावें लागत नाहीं. त्यानंतर कधीं ती माहेरीं आली तर तिऱ्हाइतासारखी येते. कारण ती व तिचे आईबाप यांस परस्परांचा स्वयंपाक चालत नाहीं. तिचे सासूसासरे सुद्धां तिच्या हातचें जेवीत नाहींत. प्रत्येक जोडपें व त्यांचीं अविवाहित मुलें यांचें एक स्वतंत्र कुटुंब होतें. लग्नापूर्वीच जर मुलीनें व्यभिचार केला असला तर वरेच विधी गाळतात आणि वधूचे केंस धरून वरानें तिला एक गुद्दा मारून लग्नस्तंभाभोंवतीं ७ प्रदक्षिणा घातल्या कीं लग्न झालें. जर नवऱ्यापासून पळून दुसऱ्या माणसाबरोबर बायको राहूं लागली तर त्याला विधवाविवाहाच्या दुप्पट दंड भरावा लागतो. जर त्याला हें देणें परवडत नसेल तर त्यानें १० रुपयांसकट ती बायको परत नवऱ्याकडे पाठवावी. कर्जाबद्दल बायको गहाण टाकण्याबद्दल देवारांची ख्याति आहे. सकारण किंवा परस्पर संमतीनें घटस्फोट करण्याची मनाई नाहीं. घटस्फोट करणाऱ्याला मरेपर्यंत लग्न करतां येत नाहीं. पण बायकोनें वाटेल त्याच्याबरोबर लग्न करावें. यांचे देव महामाई देवी व दुल्हादेव हे आहेत.

हे लोक प्रेतें पुरतात. यांच्यापैकीं श्रीमंत लोक दोन वर्षांनीं तीं उकरून जाळतात आणि रक्षा नदींत टाकतात. हे ब्राह्मणांच्या हातचें जेवत नाहींत किंवा स्वतः आपल्या जातीच्या हातचें खात नाहींत. पण गोंडांच्या हातचें खातात. एवढेंच नव्हे तर ते त्यांचें उष्टें देखील खातात. हे लोक डुकरें पुष्कळ पाळतात. हे गाऊन भिक्षा मागतात. रतनपुरी देवार गोपालरायाची प्रशस्ति गातात.

रायपुरी देवार गुर्जर गीत गातात. यांत गौळणी व श्रीकृष्णाची गाणीं असतात. हे लोक सुत काढणें, वानरें शिकविणें, अस्वलें व वाघ पाळून त्यांच्यांवर पैसा मिळविणें आणि शिसें व कथलाचे दागिने विकणें हे धंदे करतात. रायपुरींत त्यांच्या बायका जुनीं वस्त्रें घेऊन गोंदण्याचा धंदा करतात. [रसेल व हिरालाल.]

**देवास, संस्थानें.**—सेंट्रल इंडिया एजन्सीच्या माळवा पोलिटिकल चार्जमधील जोड संस्थान. धाकटी पाती व मोठी पाती अशा याच्या दोन शाखा आहेत. जरी या दोन्ही पात्यांवर निरनिराळे संस्थानिक आहेत व त्यांचा कारभारहि निरनिराळा व बहुतेक बाबतींत एकमेकांपासून स्वतंत्र आहे, तरी त्यांची राजधानी एकच असून एकाच प्रदेशांतील भाग त्यांनां वांटून देण्यांत आलेले आहेत. संस्थानांभोंवतीं ग्वाल्हेर, इंदूर, भोपाळ, जावरा व नरसिंगगड यांतील प्रांत आहेत. बागदच्या परगण्याखेरीज इतर सर्व भाग माळव्याच्या पठारावर असून त्यांतून चंबळा, सिप्रा व कालीसिंध या नद्या वाहतात. येथें पावसाचें मान ३५ ते ४५इंच आहे. पाण्याचा पुरवठा बराच असल्यामुळें दुष्काळ फारसे पडत नाहींत.

येथील संस्थानिक मराठे जातीचे असून त्यांचें उपनांव पवार आहे. घराचा मूळपुरुष उदाजीराव व देवासचे मूळपुरुष तुकोजीराव आणि जिवाजीराव हे सख्खेचुलतबंधू होत. तुकोजीराव व जिवाजीराव हे पहिल्या बाजीरावाबरोबर सन १७२५ मध्यें मध्य हिंदुस्थानांत आले. त्यावेळीं त्यांनीं बजाविलेल्या कामगिरीबद्दल पेशव्यांकडून त्यांनां देवास, सारंगपूर, अलोट वगैरे २४२९०० रुपये वसुलाचे परगणे इनाम मिळाले; त्यांपैकीं कांहीं अद्यापहि त्यांच्या वंशांत

चालू आहेत. वरील रकमेंतून २६००० रु. मिराशी सरदारांनीं घावे लागत. स्थानिक जहागिरदारांकडून ७८९२२ रु. खंडणी येई ती पेशव्यांनीं यांनां खर्चाकरतां लावून दिली होती. तुकोजी व जिवाजी यांचें जमेना, म्हणून पुढें ते विभक्त झाले व संस्थानहि वांटलें गेलें. पुढें त्यांच्या वंशजांनीं एकत्र वागण्याचें ठरवून तसा कारभार चालविला. उभयतां राजांचे हक्क, मानपान सारे सारखे असून जें उत्पन्न येतें तें दोघे सारखें वांटून घेतात. तुकोजी-जिवाजीच्या नंतरचे राजे दुर्बळ असल्यानें त्यांचा मुलूख शेजारचे प्रबळ राजे लुटीत असत. शिंद्यानें तर एकदां सारंगपूर प्रांत बळकावला होता, तो पुढें (१८१९) परत मिळाला. सन १८१८ त मोठ्या पातीचा संस्थानिक दुसरा तुकोजीराव व धाकट्या पातीचा दुसरा आनंदराव आणि ब्रिटिश सरकार यांच्यामध्यें तह होऊन दोन्ही संस्थानांनीं आपला कारभार एकत्र व एकाच दिवाणाकडून चालवावा असें ठरलें; पण ह्या व्यवस्थेमुळें पुढें फार तंटे होऊं लागल्यामुळें ती पद्धत सोडून प्रत्येक संस्थानचा कारभार स्वतंत्र झाला. इ. स. १८३६-३७ पासून प्रत्येक संस्थान ब्रिटिश सरकारला वार्षिक १४२३७ रु. खंडणी देतें. येथील संस्थानिकांनां दत्तक घेण्याबद्दल सनद मिळालेली आहे. १८६४ व १८९० सालीं दोन्ही संस्थानिकांनीं आगगाड्यांकरितां लागणारी जमीन दिली. १८८१ सालीं दोन्ही शाखांनीं मिठाच्या नेआणीवरील जकात बंद केली. त्याबद्दल त्यांनां प्रत्येकीं वार्षिक रु. ४१२-८-० मिळतात. अफूखेरीज इतर सर्व करहि १८८५ सालीं बंद झाले. सारंगपूर ही बाझबहादूरच्या वेळीं माळव्याची राजधानी होती. देवासच्या दक्षिणेस तीन मैलांवर नागदा ही ह्यापूर्वीची राजधानी होती असें म्हणतात.

प्रत्येक संस्थानावर स्वतंत्र संस्थानिक आहे; व शिक्षण, आरोग्य, जुंगी (म्युनिसिपल हद्दींत येणाऱ्या मालावरील जकात) व अबकारी या बाबतींशिवाय त्यांचा इतर कारभार स्वतंत्र असतो. येथें ब्रिटिश नाणें चालतें. फक्त तांब्याच्या नाण्यावर "देवास संस्थान" हीं मराठी अक्षरें असून 'जुनिअर" किंवा "सिनिअर" अशीं इंग्रजी नांवें असतात. न्याय व सर्वसाधारण बाबतींत संस्थानिकांच्या हातात पूर्ण सत्ता आहे. मध्यंतरी संस्थानांत लहान जहागीरदार बंडाळ्या करीत. राघोगडच्या ठाकुरानें स. १८३४ त बंडाळी केली होती. दोन्ही पातींच्या राजांनीं सन १८५७ मध्यें इंग्रजांनां चांगली मदत केली होती. धान्य, कापूस व अफू हे निर्गतीचे मुख्य जिन्नस आहेत. गहूं, ज्वारी, मका, तूर, ऊंस, तंबाखू, अफू वगैरेंची येथें पैदास होते. आग्रा-मुंबई, देवास-उज्जनी, आणि देवास-भोपाळ हे दळणवळणाचे मुख्य मार्ग आहेत. मुंबई, बडोदें आणि मध्य हिंदुस्थानांतील रेल्वेची नागडा-मथुरा ही शाखा अलोट आणि गदगूचा या परगण्यांतून गेलेली आहे. संस्थानांत एक हायस्कूल आहे.

मो ठी पा ती.—हें संस्थान उत्तर अक्षांश २२° ११′ ते २३° ५३′ व पूर्व रेखांश ७५° २५′ ते ७७° ४६′ यांवर आहे. हिचा मूळ पुरुष पहिला तुकोजी हा होय. तो १७५३ सालीं मरण पावल्यावर त्याचा (वडील भावाचा नातू) दत्तक मुलगा कृष्णाजीराव गादीवर बसला. हा पानिपतच्या लढाईत होता. १७८९ सालीं त्याच्या मागून त्याचाहि (पुतण्या) दत्तक मुलगा दुसरा तुकोजी गादीवर आला. पेंढारी, शिंदे व होळकर यांच्या स्वाऱ्यांमुळें दोन्ही शाखांची स्थिति त्यावेळीं खालावलेली होती. हा तुकोजी सन १८२४ त निपुत्रिकच वारला. तेव्हां त्याचा दत्तक पुत्र रुक्मांगद हा गादीवर आला. तोहि निपुत्रिकच होता. त्याच्या मागून गादीवर आलेला दत्तकपुत्र दुसरा कृष्णाजी राव हा १८६० सालीं गादीवर आला. याला कर्ज फार झालें होतें. सांप्रतचे महाराज तुकोजीराव हे १८९९ सालीं गादीवर बसले. यांचें शिक्षण इंदूर व अजमीर येथील विद्यापीठांत झालेलें आहे. यांचा जन्म १ जानेवारी १८८८ रोजीं झाला. व यानां संपूर्ण हक्क १९०८ सालीं मिळाले. यानां राजा अशी पदवी असून १५ तोफांची सलामी मिळते. येथील लो. संख्या (१९२१) ७७००५. लोकसंख्येपैकीं शेंकडा ८५ हिंदु व शेंकडा १२ मुसुलमान आहेत. येथें राजस्थानी भाषेची माळवी नांवाची पोटभाषा चालते. शेंकडा ३६ शेतकीवर व शेंकडा २९ मोलमजुरीवर निर्वाह करितात.

या शाखेचें क्षेत्रफळ ४४५०३ चौर मैल आहे. त्यांत देवास, अलोट, सारंगपूर, राघोगड, व बागौद हे परगणे आहेत. संदरसी प्रांताच्या उत्पन्नाचा एकतृतीयांश व डुंगेला प्रांताचा एकद्वितीयांश हिस्सा इंग्रजांकडून पात्यांनां मिळतो. एकंदर उत्पन्न ७ लक्ष रुपये आहे, तें जमिनीवरील करांचें उत्पन्न, जकातीपासून होणारें उत्पन्न व अफूवरील करांचें उत्पन्न यांपासून वसूल होतें. १९१३ सालापासून राज्यकारभारासाठीं कौन्सिल आहे. पण १९२२ च्या जानेवारींत एक कौन्सिल व एक प्रतिनिधिमंडळ स्थापण्यांत आलें. प्रजेला प्रतिनिधी निवडण्याचा हक्क अद्यापि नाहीं. सक्तीचें शिक्षण राज्यांत सुरू आहे. गुन्हेगारांची वसाहत करून त्यांनां शिक्षण देण्याची व्यवस्था चालू आहे. संस्थानचें लष्कर अगदींच किरकोळ आहे. पहिली शेतमोजणी १८३० सालीं झाली. त्यावेळीं फक्त लागवड झालेल्या शेताची मोजणी करण्यांत आली होती. १८९४ सालीं बिनलागवडीच्या जमिनीचीहि मोजणी होऊन प्रत्येक गांवाचे नकाशे तयार करण्यांत आले आहेत. भोजाखेडी, जवाशा व पठाडी असे तीन गांवचे टाकेदार ठाकूर आहेत. त्यांचें उत्पन्न २४ हजार आहे.

धा क टी पा ती.—याचा मूळपुरुष जिवाजीराव १७७५ त मरण पावला. त्याच्या मागें त्याचा दुसरा पुत्र आनंदराव, त्याचा मुलगा हैबतराव हे गादीवर आले. हैबतराव निपुत्रिक म्हणून त्यानें आनंदराव यास दत्तक घेतलें. हाहि स. १८३७ त

निपुत्रिक वारला. त्याचा दत्तक हैबतराव, त्याचा नारायणराव. हा १८६४ त गादीवर आला. सांप्रतचे महाराज मल्हारराव बाबासाहेब हे आहेत. ॲडव्हायसर व कारभारी यांच्या मदतीनें राज्यकारभार चालतो. महाराजांचा जन्म १८ आगष्ट १८७७ त झाला व ८ जानेवारी १८९२ सालीं हे दत्तक आले. डेली कॉलेजांत यांचें शिक्षण झालें. १८९७ सालीं यानां पूर्ण अधिकार मिळाले. पुढील इतिहास फारसा महत्त्वाचा नाहीं. या संस्थानिकालाहि राजा अशी पदवी व १५ तोफांची सलामी आहे. महाराजांनां १९२२सालीं केसरी हिंदचें पदक, १९१७ सालीं के. सी. एस्. आयची पदवी व १९१८ सालीं वंशपरंपरा महाराज हा किताब मिळाला. या संस्थानची लो. सं. ( १९२१ ) ६६९९८. लोकसंख्येपैकीं शें. ८५ हिंदू व शें. १० मुसुलमान आहेत. शें. ४० शेतकीवर व शें. २८ मोलमजुरीवर निर्वाह करितात. येथेंहि माळवी नांवाची भाषा चालते. संस्थानचें क्षेत्रफळ ४१९.४१ चौरस मैल व वार्षिक उत्पन्न ६।। लक्ष रुपये आहे. या संस्थानांत पुढील सहा परगणे आहेतः—देवास, वघावद बदगुचा, रिंगनोद, सारंगपूर आणि अकबरपूर. पहिली मोजणी व जमाबंदी अनुक्रमें १८८१ व १८९४ सालीं झाली.

गां व.—मध्य हिंदुस्थानांतील दोन लहान लहान संस्थानांची राजधानी. इन्दूरहून २४ मैल. लोकसंख्या ( १९११ ) ६४९२. चामुन्डा पहाडाच्या पायथ्याशीं हा गांव वसलेला आहे व त्यावरून या गांवाचें नांव देवीवासिनी पडलें. या जागेला इ. स. १७३९ पर्यंत कांहींच महत्त्व नव्हतें पण या सालीं हें मराठ्यांच्या ताब्यांत आलें. [ गोडबोले—देशी संस्थानें; इंपे. ग्याझि ; संस्थानी रिपोर्ट. ]

**देवी**—ज्यांत अंगावर विवक्षित तऱ्हेच्या पुटकुळ्या उगवतात अशा प्रकारचा हा एक सांथीचा ज्वर आहे.

का र णें.—हा अत्यंत स्पर्शसंचारी ज्वर असून रोग्याच्या खोलींतील दूषित हवेच्या संसर्गानें तर हा होतोच; परंतु रोग्याचे कपडे अंथरूण पांघरूण व इतर वस्तूंच्या योगानेंहि रोगप्रसार होतो. पुटकुळींतील लस स्पर्शसंचारी असते. परंतु त्या उगवण्यापूर्वी देखील रोग्याचा संसर्ग इतरांस बाधतो. तसेंच देवी येऊन मृत झालेल्यांचाहि संसर्ग होऊन इतरांनां देवी येतात. स्त्रीपुरुषें—मग तीं कोणत्याहि वयाचीं, गर्भावस्थेंतील सुद्धां असलीं तरी सर्वांनां रोग होणें संभवनीय असतें. तरी त्यांतल्यात्यांत गर्भाला व एक वर्षाच्या आंतील मुलांनां कांहींसा संसर्ग कमी प्रमाणांत होतो. शिद्दी लोकांनां श्वेतवर्णीयांपेक्षां हा रोग जास्त प्रमाणांत होतो. अपवाद वगळले असतां, एकाद्या माणसास एकदां देवी आल्या तर त्यास त्या पुन्हां सहसा येत नाहींत. देवींची लस टोंचण्याचा प्रतिबंधक तोडगा निघाल्यापासून देवींच्या सांथीपासून उत्पन्न होणारे अनर्थ व दुष्परिणामांची तीव्रता फारच कमी झालेली आहे. अठराव्या शतकाच्या शेवटीं ही युक्ति निघाली.

ज्व रा चा क्र म व मु द त.—गर्भावस्था बारा दिवस असते व तीमध्यें रोग्याची प्रकृति बिघडणार असल्याचें कांहीं एक लक्षण आढळून येत नाहीं. नंतर एके दिवशीं खूप थंडी वाजून व कंबर, पाठ मनस्वी दुखून व वांति, डोकेंदुखी पराकाष्ठेची होऊन ज्वर भराभर १०२° ते १०३° अगर १०४° पर्यंत भरतो; व दुसऱ्या दिवशीं तर कदाचित् यापेक्षांहि अधिक चढतो. रोग्याच्यानें कांहींच करवत नाहीं व त्यास अंथरूणांत पडून रहाण्यावांचून इलाज नसतो. क्षुधानाश, तृषा, जिभेवर बुरशी व बद्धकोष्ठ हीं लक्षणें असतात. तिसऱ्या दिवशीं देवीचे फोड दिसूं लागतात; पण त्याच्या अगोदर कांहीं रोग्यांमध्यें अंगावर विवक्षित ठिकाणीं लाली उठते; ते प्रकारः—(१) नुसती लाली गोंवराप्रमाणें दिसणारी तोंडावर व सर्वांगावर कांहीं रोग्यांत आढळते तर कांहीं जणांच्या ती फक्त हातापायांच्या बाहेरील बाजूवर असते. ( २ ) ही लाली त्वचेंत फुटली आहे असेंहि प्रकार आढळतात; म्हणजे बेंबीपासून खालीं ओटीपोटावर व अर्धे मांड्यांवर त्रिकोणी आकाराच्या प्रदेशभर असें फुटलेलें अंग दिसतें. कोणाच्या कांखेंत व कांखेपासून जवळील व खालील त्वचा अशा प्रकारची होते. त्याचे लाल चट्टे असून ते मावळल्यावर तेथें पिवळा अगर पिंगट डाग कांहीं दिवस असतो. ही लाली दुसऱ्या दिवशीं दिसूं लागून तिची समाप्ति दोन दिवसांत होते; फार तर एखादा दिवस तिचें व देवीच्या फोडांचें साहचर्य असतें. याचा अतिरक्त वर्णाचा तिसरा एक भयंकर भेद आहे. प्रथम दुसऱ्या दिवशीं खूपच लाली येऊन ती फुटते व तिचे लहान मोठे चट्टे किंवा डाग अंगावर दिसतात. तोंड, चेहरा, डोळे, लाल व फुगीर दिसतात. वांतींत पित्त अगर रक्त व शौचावाटें रक्त, लघवींतून आल्ब्यूमिन व रक्त जाणें हीं लक्षणें होतात. कधीं वात अथवा बेशुद्धि असली तरी एकंदरींत रोग्यास शुद्धि शेवटपर्यंत असते. तीन दिवसांच्या आंत व कधीं तर अगोदरहि मृत्यु येतो.

दे वी चे फो ड.—चेहरा, कपाळ, डोकें या ठिकाणीं बारीक व लाल अशा पुटकुळ्या तिसऱ्या दिवसापासून येण्यास आरंभ होऊन नंतर पाठ, बाहु, हात व मग मांड्या, पाय, पावलें वगैरे खालील भागावरहि पुटकुळ्या येतात. नंतर त्या ठळक दिसूं लागतात; बोटांनीं पुटकुळी दाबली तर त्वचेंत गोळी रोंवल्याप्रमाणें बोटाला लागते. नंतर तिसऱ्या दिवशीं पुटकुळीच्या मध्यभागीं पापुद्र्याचा बारीक फोड येतो व तो फोड प्रथम स्वच्छ व पारदर्शक दिसतो पण पुढील दोन दिवसांत मोठा होऊन एक ठराविक बदल त्यांमध्यें होतो तो असाः—वरील पापुदरा फुटून तेथें लहान खळगी बनते व भोंवतालीं वाटोळी उंच कड असते. पुटकुळीच्या आंत पापुद्र्याचे अनेक कप्पे असल्यामुळें पुटकुळी फोडली तरी थोडीच लस बाहेर निघते. याच सुमारास फोडाचा पारदर्शकपणा नाहींसा होऊन त्यांतील लस जरीच गढूळ होते; व उगवण्याच्या सहाव्या परंतु ज्वराच्या

दिवशीं पुटकुळ्या पूर्णपणें पुवाळतात. असें झालें म्हणजे दर-एक फोडाभोंवतालची जागा गळवाप्रमाणें सुजून फुगून गुलाबी होते व याप्रमाणें चेहऱ्यावर फार फोड असले तर सुजेमुळें रोगी ओळखूं सुद्धां येत नाहीं. डोक्यावरची त्वचा सुजेमुळें फार ठणकते व तीच गत हातापायांची व बोटांची होते. ह्या पुवाळलेल्या फोडावर खपली धरण्यास दोन तीन दिवस लागतात. त्या अवधींत फोड सुकण्यास मधून आरंभ होऊन त्याची काळसर पिंगट रंगाची खपली बनते; व ती कांहीं दिवस टिकून रहाते. खपली धरण्यापूर्वी कांहीं रोग्यांच्या फोडांतून पू थोडथोडा वहातोहि. फोड कोरडे पडले म्हणजे सूज कमी होऊन मग चेहरा ओळखतां येतो व नंतर खपली पडून जाऊन त्या ठिकाणीं काळसर लाल डाग रहातो. तो जरी प्रथम फुगीर दिसला तरी नंतर आंत बसून तेथें खोलगट सर्वांच्या परिचयाचा देवीचा वण रहातो. हात व चेहरा या ठिकाणीं फोड फार येतात. अंगावर व वस्त्राच्छादित भागावर कमी येतात. आरंभीं ज्या भागांवर लाली येते म्हणून वर सांगितलें आहे तेथेंहि फोड कमी येतात असें म्हणतात. देवीच्या फोडांच्या उगवण्यापासून खपली धरीपर्यंत जीं जीं स्थित्यंतरें वर वर्णिलीं आहेत, तीं प्रथम चेहऱ्यावरील फोडांत नंतर एकदोन दिवसांनीं हात-पाय व सर्वांगावरील फोडांमध्यें होतात. जेथें अगोदरच दुसरे कसले फोड येऊन अगर पलिस्तरें अथवा पट्टया मारून त्वचेंत दाह झालेला असतो अशा ठिकाणीं देवीच्या फोडांचें पीक अगदीं दाट येतें. साध्या त्वचेवर फोड येतात व श्लेष्मल त्वचेवर ते येत नाहींत असें मात्र होत नाहीं. तोंडांत, टाळूवर, घशांतहि येतात व तेथें सदा असणाऱ्या ओलाव्यामुळें त्या फोडांचें स्वरूप भिन्न प्रकारचें असतें; म्हणजे ते पुवाळलेले फोड असे न दिसतां किंचित करड्या किंवा कधीं मोत्याप्रमाणें रंग असलेले, साधारण सपाटच उंचवट्याप्रमाणें असतात व ते चरून रक्ताळण्याचा किंवा व्रण बनण्याचा संभव व प्रवृत्ति असते. जिभेवर फोड व बुरशी असतेच पण क्वचित् जीभ सर्वच सुजते. कंठामध्यें व्रण व क्षतें फोडामुळें पडतात. नाकांत फोड, खपल्या, दाह, सूज, इत्यादि प्रकार झाल्यामुळें श्वासोच्छ्वासास अवरोध होतो.

रो ग्या चें प्र कृ ति मा न.—ज्वर जोराचा नसेल, तर फोड दिसूं लागतांच आरंभीचा ताप थांबतो, व रोगी दोन तीन दिवस सुरवातीस जरी अगदीं निमून असला तरी फोड उगवल्यावर तो स्वतः वैद्याकडे अगर रुग्णालयांत जाण्यासारख्या स्थितींत असतो. त्याचें शरीर फोडांनीं अगदीं भरून गेलेलें असतें; तथापि आरंभी त्यास होत असलेली वांति, कमर दुखणें, मस्तक व अंग दुखणें व ज्वर यांपासून त्यास यावेळीं फारशी पीडा होत नाहीं. पण मात्र जेव्हां फोड पुवाळतात, तेव्हां चांगली थंडी वाजून तीन ते सहा अगर आठहि दिवस टिकणारा ताप पुन्हां येतो; व तो १०३°-१०४° पर्यंत चढून सकाळीं कमी असला तरी निघत नाहीं. निद्रा-नाश, मस्तकशूळ, वायूमुळें बरळणें व दर मिनिटास नाडीचे १०० ते १२० ठोके इतकें प्रमाण असतें. खपल्या सुकून सूज कमी होऊं लागतांच हा ताप व त्याचीं लक्षणें हीं पुन्हां कमी होतात; परंतु कांहीं रोग्यांचे केंस व नखें या ज्वराच्या कडकी-मुळें गळतात.

भे द.—हे पुष्कळ असतात. पण त्यांचे मुख्य प्रकार पुढें दिले आहेतः— ( १ ) विकीर्ण किंवा प्रसृत भेद, याचेंच वर्णन वर दिलें आहे. ( २ ) संमेलकभेद; यांत फोड बेसुमार व जलद म्हणजे दुसऱ्या दिवशीं येऊं लागून आरंभीचा तापहि कडक असतो. फोड दिसल्यावर ताप उतरावा तो कांहीं उतरत नाहीं. फोड विपुल असल्यामुळें ते एकमेकांशीं संयुक्त, दाह, वेदना, सूज, ठणका, ताप व रोग्याचे हाल त्या मानानें फार होतात. चेहऱ्यावर परिणाम विशेष होतो. नाक, घसा, कंठ या ठिकाणीं फोड हटकून येऊन त्यामुळें होणारा त्रास भोगावा लागतो. फोड फुगूं लागल्यावर येणारा ज्वर तीव्रतर असून त्यांतील नाडीच्या ठोक्यांचें प्रमाण, वायूमुळें बडबड, बेशुद्धि, गुंगी हीं सर्व लक्षणें विशेष जोराचीं असतात. दोष व दुष्परिणाम बहुधा उद्भवतात व रोगीहि दगावण्याचें प्रमाण मागील भेदापेक्षां त्यांत अधिक असतें. मृत्यु येण्याचीं कारणें ज्वराधिक्य, पूयवृद्धिज्वर, यामुळें येणारी ग्लानि, इत्यादि हीं होत. ( ३ ) उग्रभेदांत पहिल्या दोन दिवसांच्या आंतच फोड दिसतात असें एकदां वर सांगितलेंच आहे. याचाच पुढें ( ४ ) रक्तमय भेद बनतो. तसें झालें म्हणजे फोडांतून रक्त वाहू लागतें; अगर ते त्वचेंत उतरून मोठाले लाल डाग पायावर दिसतात. हा प्रकार श्लेष्मल त्वचेवरील फोडांतहि होऊन त्यामुळें कंठांत, घशांत घट सर्पाप्रमाणें गोठलेल्या रक्ताचें सायटें अगर पापुद्रा बनतो, नाक, फुप्फुस, गुद, मूत्रपिंड, गर्भाशय यांपैकीं इंद्रियांतून रक्तस्राव होतो. हा भेद असाध्य आहे. ( ५ ) अतिसौम्य भेदः—पूर्वी देवी टोंचलेल्या असून त्यांतील प्रतिबंधक शक्ति अपुरी असल्यामुळें अगर ती संपत असल्यामुळें, अगर टोंच-णारांच्या दोषामुळें हा भेद पहाण्यांत येतो. त्याचें पहिल्या विकीर्ण भेदाशीं बरेंच साम्य आहे. त्यांतहि पुष्कळ तऱ्हा दिसून येतात; ( अ ) ताप नसून किंवा थोडा असून फोडहि अगदीं थोडे असणें ही सौम्य तऱ्हा झाली. हींत फोड फुटून खपली धरते. ( आ ) कधीं आरंभीचा ताप अति जोराचा पण थोडा वेळ टिकणारा असून, पुन्हां फोड फुगण्याच्या वेळचा ताप थोडा असतो व फोडांचीं सर्व स्थित्यंतरें न होतांच ते जिरतात. आरंभीं लाली येते म्हणून लिहिलें आहे तें या भेदास फार करून लागू असते. यांतील रोगी मुळींच दगा-वत नाहींत व बहुधा फारसे किंवा मुळींच रहात नाहींत. ( ६ ) निवेशित भेदः—यामध्यें देवीच्या फोडांची लस दुस-ऱ्याच्या अंगांत बारीक जखम, खरचटणें, या मार्गानें शिरली असतां, त्या जागीं एक पुटकुळी उठते. नंतर थंडी वाजून

ज्वर भरतो व नजीकच्या रसग्रंथी सुजून दुखतात; उदाह.: कांखेतील ग्रंथी. यानंतर अकराव्या दिवशीं वर वर्णिल्याप्रमाणें सर्वांगावर देवी येऊन खपल्या पडतात. एकंदरींत हा भेद सौम्य पण स्पर्शसंचारी व क्वचित्प्रसंगीं प्राणघातकहि असतो. या ज्वरामध्यें होणारे दोष व दुष्परिणाम होतात ते येणेंप्रमाणें:—(१) गळवें व धांवरें. (२) डोळे येणें व त्यांत पूयोत्पत्ति विशेष असल्यास डोळा जाणें. (३) कर्णमूळ, कर्णदाहामुळें दुर्गंधियुक्त कर्णस्राव. (४) श्वासनलिकादाह, मिश्रफुप्फुसदाह, फुप्फुसावरणदाह, व वर सांगितलेला कंठदाह हे श्वसनेंद्रियापैकीं रोग संभवतात. (५) धमन्यांतील रक्त थिजल्यामुळें अर्धांगवायु, मस्तिष्कदाह, पृष्ठवंशरज्जुदाह, हस्तपाद मज्जातंतुदाह हे मज्जातंतूचे रोग कोणा रोग्यास प्रसंगवशात् होतात. यामुळें मृत झालेल्यांची शरीरतपासणी व चीरफाड करून पहातां इतर सांथीच्या ज्वरांत जसे नाना इंद्रियांवर परिणाम होतात तसेच या ज्वरांतहि होतात तथापि या रोगाचा म्हणून अमका विशिष्ट जंतु असें अद्याप निश्चित झालें नाहीं.

रो ग नि दा न.—सांथ सुरू असतां थंडी वाजून ताप भरणें, वांति होऊन कंबर विशेष दुखणें हीं लक्षणें व एरवीं एखादें जबर दुखणें येणार एवढ्यानेंच जीं सूचक असतात तीं अशा वेळीं देवी येणार असें दर्शवितात. सुरवातीस लाली येते त्यामुळें गोंवराचा ताप आहे कीं काय अशी शंका येते. परंतु गोंवरांत पडसें, खोकला हीं स्पष्ट असतात. कधीं गोंवर आला असतां देवी आल्या आहेत अशी समजूत चुकून होते. उपदंशांतहि देवीसारखे फोड एखादे वेळीं येतात; पण ते मोठा ज्वर येऊन न येतां सावकाश येतात. उग्रभेदांतील पुटकुळ्या रक्फाळून लवकर फुटतात व त्या फुटण्यापूर्वी रोगी कदाचित दगावेलहि हें ध्यानांत असावें. कांजिण्यांचे फोड देवीप्रमाणें असतात. पण ते दिसण्याच्या अगोदर ताप नसतो, तर ते उगवल्यावर ताप येतो व ते फोड मांसांत शिशाच्या गोळीप्रमाणें रुतल्यासारखे बोटास लागत नाहींत व बहुधा मध्यें फुटून खळगी पडत नाहीं.

सा ध्या सा ध्य वि चा र.—वरील भेदवर्णनांत सांगितल्यामुळें पुनरुक्ति केली नाहीं. विकीर्ण व अतिसौम्य भेद हे साध्य असतात. दर सात वर्षांनीं पुन्हा देवी टोंचून घेत जाव्या व अशा घेतल्या आहेत असें समजल्यास रोगी साध्य समजावा.

उ प चा र.—एकंदर सांथीच्या ज्वरांत रोग्यास ज्या धोरणानें ठेवावें असें सांगितलें आहे तशी व्यवस्था ठेवावी म्हणजे दुसऱ्यांस संसर्ग न पोंचेल अशा दूरच्या ठिकाणीं त्यास वेगळा ठेवावा. तेथें हवा पुष्कळ पाहिजे. दूध एकंदरींत पुष्कळ परंतु थोडथोडें व वरचेवर द्यावें. शोष पडतो त्यासाठीं थंड पेयें द्यावीत. अंगाचा दाहशमन होण्यासाठीं कोमट पाण्यांत रुमाल भिजवून अंगास चोळावा. फोड फार खाजत असल्यास त्यावर व्हॅसेलीन लावावें. गरिवास खांवरेल व त्यावर कोरडी व स्वच्छ राख हा उपाय बरा आहे. चेहरा सुजून ठणकतो म्हणून थंड पाण्याच्या घड्या त्यावर ठेवाव्या व पापण्या वेरचेवर पुसून त्यांत स्तंभक नेत्रबिंदूचे थेंब घालीत जावे. झोपेसाठीं जरूरीप्रमाणें औषधें दिलीं पाहिजेत व शक्तिपात तीव्र भेदांत होऊं नये म्हणून ब्रांडी योग्य प्रमाणांत द्यावी. तोंड विद्रूप होऊं नये म्हणून तोंडास टिंक्चर आयोडीन लावणें, पुटकुळ्या मुद्दाम अगोदर फोडणें व त्यावर सज्जीखाराच्या कांडीनें स्पर्श करणें, तेल लावणें वगैरे नाना युक्त्या व इलाज करितात. परंतु खरोखर उपयोग होतो किंवा नाहीं याची वानवाच आहे. परिचारकांपैकीं अगर इतर कोणी देवी न काढविलेलीं माणसें असतील त्यांस देवी काढवाव्या, म्हणजे देवी आल्याच तर भीतीचें कारण उरणार नाहीं.

दे वीं चा प्र ति बं ध.—प्रथम खुद्द देवींच्या फोडाची लस टोंचीत असत त्यामुळें सौम्य देवी येऊन जाऊन पुढें जन्मभर तें माणूस देवी येण्याच्या भीतीपासून मुक्त असे. पण लस टोंचल्यावर जो ज्वर व देवी येत त्या स्पर्शसंचारी असल्यामुळें टोंचलेला माणूस जरी रोगप्रतिबंध झालेला असला तरी सांथ पसरण्यास यामुळें उलट मदतच होऊं लागली. कारण टोंचून न घेणाऱ्यांचीच संख्या नेहमीं अधिक असते. यामुळें रोगप्रतिबंधाची ही तऱ्हा मागें पडून स. १७९६ पासून जेन्नर या वैद्यानें गोस्तन देवींची लस प्रचारांत आणिली. त्याच्या लक्षांत असें आलें कीं, गाईच्या स्तनावर व कांसेवर फोड येतात व दूध काढणारांनां संसर्गामुळें तसेच फोड येतात. परंतु अशा माणसांनां पुढें देवींचें अगदीं भय नसतें असा अनुभव गवळी लोकांत होता असें त्यास कळल्यावरून ती लस घेऊन इतर माणसांस टोंचून मोठ्या प्रमाणावर देशांत रोगप्रतिबंध करण्याचें त्यानें आरंभिलें व त्यांत त्यानें उत्तम यश संपादिलें. उलटपक्षीं ज्या न टोंचलेल्या लोकांनां देवी येऊन गेल्या आहेत. त्यांनां देवी काढल्या असतां देवींचे फोडच मुळीं येत नाहींत असाहि अनुभव त्यास आला. यानंतर अनेक प्रयोग करून या प्रतिबंधक तोडग्याच्या सत्यतेविषयीं त्यानें व इतरांनीं खात्री करून घेतली. या गोस्तन देवींच्या फोडांची लस एका माणसाची दुसऱ्यास टोंचली तरी तसेच फोड येऊन रोगप्रतिबंधकपणांत ती लस हीनवीर्य नसते; व अशा तऱ्हेनेंहि पुढें माणसांनां एकाची लस दुसऱ्यास टोंचून देवीरोगप्रतिबंधक करण्याची वहिवाट पडली. पण कांहीं कालानंतर अगोदर वासरांस मुद्दाम ही लस टोंचून नंतर ती माणसास टोंचावी ही चाल सर्वांनां सुरक्षित वाटून माणसांच्या फोडाची लस टोंचण्याची चाल मोडली.

गो स्त न दे वी टों च ल्या व र हो णा रीं स्थि त्यं त रें.—टोंचल्यावर दोन किंवा तीन दिवसांनीं लाल पुळी टोंचल्याजागीं येते. ती मोठी होऊन चवथ्या पांचव्या दिवशीं तिचा फोड बनतो; तो पुढें करड्या रंगाचा होऊन फुगत जाऊन मोठा होतो; पण मध्यभागीं त्याचा पापुद्रा जरा व

खळगीप्रमाणें होतो. आठव्या–नवव्या दिवशीं हे फोड पिंवळे होऊन दाह व सुजेमुळें भोंवतालची त्वचा लाल व गुलाबी होते. फोडांचा गहूळपणा व त्यांच्या भोंवतालची लाली वाढत जाऊन ते खूप ठणकतात व त्यामुळें ताप येतो; काखेंतील गांठी देखील सुजून दुखतात. दहाव्या अकराव्या दिवशीं फोडांतील ओलावा व विघळणें कमी होऊन ते सुकण्याच्या पंथास लागतात व त्यांवर पिंगट रंगाची खपली धरते. थोड्या दिवसांत भोंवतालची सूज व लाली कमी होऊन सुमारें विसाव्या दिवशीं किंवा जरा अगोदर ही खपली पडून जाते; व तेथें कायमचा खोल व्रण रहातो.

देवी टोंचण्याची कायद्यानें सक्ति आपल्या देशांत अद्याप केली नाहीं; पण पाश्चात्य देशांत कांहीं व्यक्ती वगळून ती केलेली आहे. त्या व्यक्ती म्हणजे मूल अत्यंत अशक्त आहे असा डाक्टरचा दाखला आणणारे व ज्यांची हा इलाज वाईट आहे अशी शपथपूर्वक प्रामाणिक समजूत असलेले लोक. माणसांच्या लशीचा दुसऱ्या माणसास टोंचण्यास उपयोग केल्यानें रोगप्रतिबंध झाला तरी पहिल्या माणसांत स्वाभाविक कांहीं रोगबीजें असल्यास तीं दुसऱ्यांनां बाधतील ही शंका, ती चाल मोडून टाकून गोस्तन लस प्रचारांत आणल्यानें नाहींशी झाली आहे. यानंतर कोंपमन या शोधकानें पुढील उपयुक्त शोध लाविल्यानें देवी टोंचण्याचें काम अधिक सुकर झालें आहे.एक भाग वासरांच्या फोडाची लस व सहा भाग समसमान पाणी व शुद्ध ग्लिसरीन यांचें मिश्रण हें एकत्र व एकजीव होईतों मिश्र करून टोंचण्याच्या अगोदर कांहीं आठवडे सूक्ष्म नळ्यांत सीलबंद करून अंधेरांत ठेवल्यानें एरवी वासरांच्या लशींत आढळणारें पूयजंतु पूर्णपणें मृत होऊन ही लस अधिक उपयुक्त व सशक्त ठरली गेली आहे; व हल्लीं तीच प्रचारांत चालू आहे.

दे वी टों च णें.—दंडाच्या बाहेरील भागावर देवी काढतात. तेथें मध्यभागावरील चामडी डाव्या हातानें जरा ताणून धरून ती अगोदर जंतुघ्न धावनानें शुद्ध व स्वच्छ केल्यावर तशाच रीतीनें स्वच्छ केलेला चाकू तिरका धरून त्यावर लस घेऊन तीन ते पांच ठिकाणीं मध्यें वेताचें अंतर ठेवून तेथें रक्त न निघेल व लस तर आंत जावी अशा बेतानें टोंचावा. कोणी चाकूनें त्वचेवरील जागा प्रथम तीन चारदां खरवडून रक्त टिपल्यावर मग त्या जागीं लस चोळून घालतात किंवा ठरलेल्या जागेवर लशीचा थेंब टेकून त्यांतून चाकूनें खरडून लस भिनेलसें करितात.नंतर लस सुकल्यावर त्यावर बोरिकलिंटची पट्टी बसवावी व दंड अंमळ बांधून ठेवावा. यापासून दुष्परिणाम सहसा घडत नाहींत. पण चुकून कांहीं अपघाताप्रमाणें धावरें कधीं कधीं झाल्याचीं उदाहरणें आहेत. हात सडल्याचें क्वचित घडलें आहे. पण तो दोष लशीपेक्षां टोंचणारा अगर बालकाचें संगोपन करणारा याची जपणूक व स्वच्छतेचा अभाव यांवरच अधिक येऊं शकतो. वर सांगितलेल्या माणसांची लस टोंचल्यानें उपदंशादि रोगसंसर्ग दुसऱ्यास होणें शक्य आहे; पण ही लस मात्र अगदीं बिनधोक आहे. कधीं असें होतें कीं देवी काढणें तर अत्यंत जरूर आहे व लस तर नाहीं अशा वेळीं एका बालकाची लस दुसऱ्यास टोंचल्याशिवाय गत्यंतर नसतें तरी अशा वेळीं ज्याची लस दुसऱ्यास टोंचायची तें बालक व त्याचीं आईबापें निरोगी व उपदंशादि रोगरहित आहेत अशी पूर्ण खात्री झाल्यावर मग टोंचण्यास हरकत नाहीं. जीं मुलें फारच अशक्त आहेत अगर ज्यांच्या अंगावर इसब आगपेण इत्यादि त्वग्रोग आहेत अशीं मुलें एरवीं टोंचू नयेत. गांवांत सांथच जर सुरू असली तर त्या धोक्यांत त्या बालकांचे जीव सांपडण्यापेक्षां तेव्हां मात्र या असल्या मुलांनांदेखील अवश्य टोंचावें. टोंचून त्या लशींतून क्षयजंतुप्रवेश होतो असें कोणी म्हणत असत; पण तें सर्वस्वीं खोटें आहे.

पुन्हां देवी काढणें:—सांथीमध्यें जीं टोंचलेलीं माणसें मरण पावलीं त्यांच्या हकीकतीवरून असें उघड झालें आहे कीं, ज्यांनां चार पांच जागापेक्षां कमी व्रण आहे अशीं माणसेंच देवीनें मरण पावतात; अगर ज्यांचे टोंचल्याचे व्रण चांगले मोठे, खोल व स्पष्ट नाहींत अशींहि माणसें बळी पडतात. असें जरी असलें तरी एकदां देवी टोंचल्यानें जन्मभर रोगप्रतिबंध होतो असें मात्र नाहीं. त्याचा अंमल बारा पंधरा वर्षें टिकतो. म्हणून शैशवानंतर पुन्हां चवदा पंधराव्या वर्षी देवी काढवाव्या व त्यानंतर पुन्हां पंधरा वर्षांनीं देवीची सांथ सुरू झाल्यास काढवाव्या. त्यापासून इजा नसल्यामुळें पहिली प्रतिबंधक शक्ति कायम असल्यास फार तर नवीन काढविलेल्या देवी मुळींच फुगणार नाहींत किंवा अर्धवट फुगतील इतकेंच. पण तो अंमल संपला असल्यास एक जिवावरील संकट टळेल.

आ यु र्वे दी य नि दा न.—मसुरांप्रमाणें सर्व अंगावर पुळ्या उठतात त्यांस मसुरिका म्हणजे देवी म्हणतात. तिखट, आंबट, खारट, क्षार, विरुद्धाशन, व जेवणानंतर लगेच जेवल्यानें, वाईट भाज्या खाल्ल्यानें, वायु, व उदकें दुष्ट झाल्यानें व एखाद्या देशावर क्रूर ग्रहाची दृष्टी पडल्यानें त्या देशांतील मनुष्यांच्या शरीरांत दोष उत्पन्न होतात व ते दोष शरीरांतील रक्त दुष्ट करून मसुरांप्रमाणें पुळ्या उत्पन्न करितात. त्यांस देवी असें म्हणतात. यांचीं पूर्वचिन्हें खालीं लिहिल्याप्रमाणें:—ताप, कंड सुटणें, अंग गळणें, अस्वस्थपणा, भोंवळ, त्वचेचा रंग बदलणें, किंचित् सूज व डोळे लाल असणें.

वात, पित्त, रक्त, कफ, संनिपात अशा भेदानें या देवी पांच प्रकारच्या आहेत शिवाय त्वचा व सप्तधातु यांत दोषांचा प्रवेश झाल्यानेंहि पुन्हां आठ प्रकार देवींचे वर्णिले आहेत. फोड काळसर, तांबडे, रूक्ष असून त्यांत तीव्र वेदना असतात. ते स्पर्शाला कठिण लागतात. उशीरानें पिकतात हीं सर्व लक्षणें वातजन्य देवीचीं आहेत. सांधे, हाडें आणि पेरीं यांच्या ठिकाणीं फूट लागणें, खोकला, कंप, अस्वस्थपणा, थकवा, तहान, आटाळा, ओंठ, व जीभ सुकणें, अरुची,

फोड लाल, पिवळे, किंवा पांढरे असून आग फार होणें, ठणका फार असणें व लौकर पिकणें हीं पित्तजन्य देवींचीं लक्षणें होत. झुलाव होणें, अंग दुखणें, दाह, तहान, अरुचि, तोंड येणें, डोळे लाल होणें, ताप फार जोराचा असणें व तो दुःसह असणें, हीं लक्षणें रक्तजन्य देवींत असून शिवाय वर सांगितलेलीं पित्तविशिष्ट देवींचींहि लक्षणें होतात. तोंडांतून कफ पडणें, जडपणा, डोकें दुखणें, मळमळणें, अरुचि, झोंप येणें, आळस, झांपड, फोड पांढरे, स्निग्ध, मोठे, कंडुयुक्त, व दुखावा फार नसलेले आणि लौकर न पिकणारे असे असणें हीं लक्षणें कफजन्य देवींचीं आहेत. पुळ्या निळ्या असून चपटया असणें व मध्यें खोलगट असून कडा वर उचललेल्या असणें. पुळ्या लवकर न पिकणें, पुळ्यांतील स्रावास फार दुर्गंधी असणें व पुळ्या फार दाट येणें हीं सर्व लक्षणें त्रिदोषजन्य देवींत असतात व यांनीच घशांत अवरोध म्हणजे बांध बसणें, अरुचि, अंग ताठणें, बडबड, अस्वस्थता हीं लक्षणें झालीं असतां त्यास ' चर्मदल " असें नांव आहे. या तऱ्हेच्या देवी बऱ्या होत नाहींत. दोषांनीं त्वचेचाच आश्रय करून देवी आल्या असतां पाण्यावरील बुडबुड्या-प्रमाणें देवी दिसतात व यांत विशेष लक्षणें नसून त्या फुटल्या असतां आंतून पाणी येतें व त्या हलक्या होत जातात.

दोषांनीं रक्तधातूचा आश्रय करून आलेल्या देवी लाल असतात, लवकर पिकतात व वर पातळ कंवदें असतें. या फार दुष्ट नाहींत, बऱ्या होतात व फुटल्यावर आंतून रक्त गळतें. मांसधातूचा आश्रय असलेल्या देवी कठिण, तेलकट रंगाच्या, उशिरां पिकणाऱ्या, कंवदें जाड असलेल्या, अंग दुखणें, तहान, कंड सुटणें, ताप, अस्वस्थपणा, ह्या लक्षणांनीं युक्त असतात. मेदधातूचा आश्रय असलेल्या देवींत मृदुपणा, वाटोळा आकार, थोड्या उचलेल्या असणें, ताप फार असणें, फोड मोठे मोठे असणें, ते तेलकट असणें, व ठणका फार असणें आणि विचारशक्ति, अस्वस्थपणा, संताप, हीं लक्षणें असून यांतून एखादाच रोगी बचतो. मज्जाधातूचा आश्रय असलेल्या देवी फार बारीक, त्वचेबरोबर, रुक्ष, चपट्या, कांहींशा वर उचललेल्या, ठणका फार असलेल्या, व अस्वस्थपणा, आणि विचारशक्ति हीं लक्षणें असलेल्या असतात. यांचा जोर आंत फार असतो. सर्व मर्में आंतून फोडतात व भुंग्यानें लांकूड खावें तशीं हाडेंहि या देवींनीं दुष्ट होतात. या देवी फार भयंकर आहेत, यांतून मनुष्य बरा होत नाहीं. अस्थिगत देवींचींहि हींच लक्षणें आहेत.

शुक्र धातूचा आश्रय करणाऱ्या देवी प्रथमपासूनच पिकल्यासारख्या दिसतात. त्या फार बारीक, ज्यांत दुखावा फार आहे अशा आणि तेल्या रंगाच्या असतात. त्यांत अस्वस्थता, दाह, बडबडणें (कोणतीहि एकच गोष्ट घेऊन), व हालचाल कमी असणें, हीं लक्षणें होतात, यांतून मनुष्य बांचत नाहीं. त्वचेंत असलेल्या, रक्ताचा आश्रय केलेल्या, पित्तजन्य व कफापासून झालेल्या, तसेंच कफ व पित्त यांच्या आधिक्यानें झालेल्या देवी सुखानें बऱ्या होतात. वायूपासून झालेल्या वातपित्तजन्य व कफवातजन्य या देवी कष्टसाध्य आहेत. याकरितां यांत औषधादिकांनीं चांगला यत्न करावा. सन्निपातानें येणाऱ्या देवी असाध्य आहेत. त्या असाध्य देवींचीं लक्षणें येणेंप्रमाणें:—ज्या देवी पोंवळ्या-प्रमाणें रंग असलेल्या किंवा जांभळाप्रमाणें मोठ्या व काळसर रंगाच्या, किंवा लोखंडाच्या रंगाच्या अथवा जवसाच्या फळाच्या रंगाच्या (अळशी सारख्या) त्या असाध्य होत. खोकला, उचकी, मोह, अतिशय ताप, धुंदी, तोंडांतून रक्त येणें, किंवा नाकांतून, डोळ्यांतून रक्त येणें, घशाशीं घरघर असून दमा असणें हीं लक्षणें असतां औषधें देण्याचें कारण नाहीं, कारण रोगी असाध्य असतो.

देवींनीं पीडिलेल्या मनुष्याच्या नाकांतून जर दीर्घ श्वासोच्छ्वास चालत असले व तो शुद्धींत नसून तहानेनें पीडित असला तर तो वांचत नाहीं. लवकरच मृत्युमुखीं पडतो. देवी बऱ्या होऊं लागल्यावर किंवा शेवटीं शेवटीं जर रोग्याच्या कोंपरास, मनगटाच्या जागीं आणि खांद्याच्या मागच्या बाजूस सूज आली तर तोहि कष्टसाध्य होतो. प्रथम ताप येऊन कफ व पित्त या दोषांनीं अगदीं बारीक लालसर पुरळ उठतो व त्याबरोबरच खोकला व अरोचक हीं असतात त्यास रोमांतक किंवा " गोंवर " असें म्हणतात. या रोगांत लहान मुलांस कफाचा फार उपद्रव होऊन ताप व दमा हीं जास्त प्रमाणांत झालीं तरच प्राणहानि होते. मोठीं माणसें यानें दगावत नाहींत व मुलेंहि दगावण्याचें प्रमाण फार कमी असतें.

याशिवाय कांजिण्या या नांवाचा विकार विशेषेंकरून मुलांस होतो. यांत लाल व काळसर रंगाच्या पुळ्या विरळ विरळ येतात व तीन चार दिवसांत मावळतात. कांजिण्यांच्या पूर्वी तापहि येतो. याहि सुखसाध्य आहेत.

देवीविकारांत औषध देऊं नये असा फार लोकांचा समज आहे. कारण देवी आलेल्या लोकांपैकीं पुष्कळ मोठें प्रमाण औषधोपचार केल्यावांचून बरें होणारें आहे. हलक्या प्रकारच्या (त्वग्गत, रक्तगत, व दोषदुर्बलतेनें आलेल्या) देवींवर औषधोपचार करण्याचें कारण नाहीं असें वैद्यशास्त्राचेंहि म्हणणें आहे. परंतु तीव्र प्रकारच्या देवींवर व त्यांत होणाऱ्या मूर्छा, ज्वर, वातविकार, नेत्रविकार, इत्यादि लक्षणांवर चिकित्सा केलीच पाहिजे. शिवाय देवी न येण्याकरितां प्रतिबंधक उपायांचाहि अवलंब केला पाहिजे. चिंचोके व हळद थंड पाण्यांत उगाळून देवींची सांथ येतांच घ्यावें म्हणजे देवी येत नाहींत. केळीच्या सोपाच्या पाण्यांत पांढरें चंदन उगाळून प्यावें अथवा अडुळशाच्या रसांत जेष्ठमध घ्यावा; या उपायांनीं देवींचा विकार होत नाहीं. देवी येण्यापूर्वी त्यांच्या पूर्वरूपांत म्हणजे ताप येतो तेव्हां कडुपडवळ, कडुलिंबाची साल, व अडुळसा यांच्या काढ्यानें ओकारी करवावी. ओकारी झाल्यानंतर दुसऱ्या दिवशीं सौम्य

अथवा तीव्र दोषबलाप्रमाणें रेचकहि द्यावें. अशा रीतीनें वमन व विरेचन केल्यानें देवी हलक्या जातात.

देवींच्या सुरवातीला म्हणजे दिसूं लागतांच कडुलिंबाच्या पानांचा रस अथवा काढा घ्यावा व पुढें देवी चांगल्या उमगल्यावर गुळवेल, जेष्ठमध, मनुका, मोरवेल व डाळिंबाची साल यांचा काढा गूळ घालून घ्यावा म्हणजे देवी चांगल्या भरतात व पुढें वातविकार होत नाहींत. दोषांचा विचार करून त्या दोषांवरील चिकित्साहि उपयोगी पडते. वड, मंजिष्ठ, शिरीष, उंबर, आणि पिंपरी यांची साल तुपांत उगाळून वातिक देवींवर लेप करावा. कडु पडवळ, गुळवेल, नागरमोथे, अडुळसा, धमासा, काडेचिराईत, कडुलिंब, कुटकी व पित्तपापडा, यांचा काढा सर्व प्रकारच्या देवींत द्यावा. देवींनीं तोंड किंवा घसा आला असतां आंवळकटी व जेष्ठमध यांचा काढा मध घालून त्याच्या गुळण्या वारंवार कराव्या. डोळ्यांत देवी येऊन डोळे उघडतां येत नाहींत व डोळे न उघडण्यानेंच डोळे जातात अथवा फूल पडणें, सारा येणें इत्यादि विकार होतात म्हणून डोळे दिवसांतून २।४ वेळ मुद्दाम उघडून आंत प्रकाश जाऊं द्यावा व त्यांवरील सूज जाण्याकरितां जेष्ठमध व कवाड यांच्या पाण्यानें शेकावें व दारुहळद, मंजिष्ठ, वाळा, लोध्र, कमळ यांची वडी डोळ्यांवर बसवावी. देवींचे व्रण धुण्याकरितां ( फार मोठे होऊन घाण येऊं लागली तर धुवावें ) कडुलिंब, तोंडली ( कडू ) व वेत यांचा काढा उपयोगांत आणावा व व्रण चिघळतील तर त्यांवर वस्त्रगाळ रानशेणीची राख, अथवा वडपिंपळ, उंबर, व पिंपरी यांच्या सालीची वस्त्रगाळ पूड टाकावी. देवी आल्या दिवसापासून रोग्याच्या खोलींत धुरी करावी. वेळूची साल, तुळशी, राळ, लाख, सरकी, मसुरा, सातु, तूप, ब्राम्ही, हीं औषधें धुरी देण्याचीं आहेत. धुरी दिल्यानें इतर जीवजंतूंपासून विष बाधत नाहीं. देवींत घाणीमुळें अथवा इतर प्राण्यांच्या ( माशा वगैरे ) मळामुळें कृमी पडल्यास राळ, हिंग, व लसूण यांची धुरी कमी पडलेल्या भागास द्यावी. देवींच्या विकारांत स्वच्छता फार ठेविली पाहिजे. वाटेल त्यानें देवींच्या रोग्यास स्पर्श न करणें व उष्टे विटाळ न होऊं देणें वगैरे ज्या चाली रूढ आहेत त्या अगदीं आवश्यक आहेत, कारण देवींच्या विकारांत बाह्य विषांचा संबंध देवींच्या व्रणांतून फार जलद होऊन त्यामुळें भयंकर परिणाम होतात. रोग्याचें मन प्रसन्न राहील असें करावें व त्याला धीर देत जावा. लहान मुलें अथवा भित्रे लोक यांनीं देवी आलेल्या माणसाजवळ जाऊं नये.

संनिपातज्वराबरोबर असलेल्या शीतलिका नांवाच्या देवींत फोड मोठे येतात व ते सात दिवसांनीं उगवून सात दिवस असतात आणि तिसऱ्या सप्तकांत खपल्या पडूं लागतात. यांच्या बरोबर असलेल्या ज्वराची चिकित्सा केली पाहिजे. शीतलिका देवी फारच कष्टसाध्य असतात. देवींच्या विकारांत खपल्या पडूं लागतात तेव्हांच विशेष दक्षता बाळगली पाहिजे. यावेळीं धनुर्वातासारखे विकार बाह्य अथवा आंतील कारणांनीं होतात व रोग्याचा जीव धोक्यांत येतो. देवी हलक्या असतां भात, भाकरी, दूध, भाजी, पोळी, इत्यादि खाण्यास द्यावें. परंतु त्यांच्याबरोबर ताप असेल तर हलकें अन्न अथवा दूधच प्रकृतिमान पाहून देत जावें. तीव्र विकारांत खपल्या पडेपर्यंत स्नान करूं नये. खपल्या पडल्यावर पौष्टिक अन्न द्यावें व प्रवाळ, माक्षिक, लोह, इत्यादि शक्तिवर्धक व शीतवीर्य औषधें बराच काळपर्यंत चालू ठेवावीं.

**देवी**—सामान्यतः याचा अर्थ स्त्री–देवता किंवा देवपत्नी असा होतो. पण विशेषतः शिवपत्नी हैमवतीला हें नामाभिधान लावितात. महाभारतांत हिचीं नुसतीं निरनिराळीं नांवें व स्वरूपें वर्णिलीं आहेत; पण पुढील काळांतील पुराणांतून हिची फार प्रतिष्ठा वाढविलेली दिसते. शक्ति या शिवस्त्री–स्वरूपांत हिचे एक उग्र व दुसरा सौम्य असे दोन प्रकार पहावयास सांपडतात. उमा, गौरी, पार्वती, हैमवती, जगन्माता व भवानी हीं सौम्य अवतारांचीं नांवें असून, दुर्गा, काली, चंडी, भैरवी यांसारखीं नांवें हिचें रौद्र स्वरूप प्रकट करितात. याच रौद्र स्वरूपाला भिऊन भक्त तिला प्राण्यांचे बळी अर्पण करतात व तांत्रिक पद्धतीनें आराधना करतात. चंडीमाहात्म्यांत हिनें असुरांवर मिळविलेले विजय वर्णिले असून त्या त्या प्रसंगानें हिला प्राप्त झालेलीं नांवें दिलेलीं आहेत; उदा० दुर्गा ( तिला असुरांचे दूत भेटले तेव्हां ); दशभुजा ( जेव्हां तिनें असुरांचें कांहीं लष्कर नष्ट केलें तेव्हां); सिंहवाहिनी(असुर सेनापति रक्तबीज याच्याशीं युद्ध केलें तेव्हां ); इ. उग्र स्वरूपांत असतांना हिला प्राप्त झालेलीं दुसरीं नांवें म्हणजे भद्रकाली, चामुंडा, महामारी, रक्तदंतिका, इत्यादि होत.

**देवीकोट**—बंगालमधील दिनाजपुर जिल्ह्याच्या बालुरघाट पोटविभागांतील एक प्राचीन अवशेष भाग. आख्यायिका अशी आहे कीं पूर्वी हा बाणनगरचा किल्ला होता. यामध्यें पडके भाग, मनोरे व खांब पुष्कळ आहेत. राजाच्या वाड्याच्या विटा वगैरे अवशेष आहेत. येथें जवळच धल, व कालादिघी असे दोन तलाव आहेत व जवळच पुरातन कालचीं कांहीं देवालयें आहेत.

बंगालच्या मुसुलमान अधिकाऱ्यांची देवीकोट ही उत्तर भागांतील राजधानी होती येथेंच महंमद –इ– बखत्यार खिलजी स. १२०६मध्यें मेला. येथें एक पिराचा दरगा आहे. त्याचें नांव अत्ताउद्दीन किंवा अताउल्लाह असें होतें. मशीदींत शिलालेख आहे. १५ व्या शतकाच्या अखेरीस येथें मुसुलमानी सैन्याची, अल्लाउद्दीन हुसेनच्या सेनापतिस्वाखालीं मोठी छावणी होती.

**देवीकोट्टई**—मद्रास इलाखा. तंजावर जिल्ह्याच्या शियाली तालुक्यांतील कोलेरून नदीच्या मुखाशीं असलेला एक मोडकळीस आलेला किल्ला. तंजावरचा राजा प्रतापसिंग याच्याजवळून कंपनीसरकारनें तो १७४९ सालीं घेतला. स.

१७५८ त फ्रेंच आले तेव्हां इंग्रजांनीं किल्ला सोडून दिला.पण वान्दिवाश येथें आयरकूटनें जय मिळविल्यावर फ्रेंचांस तो परत सोडून द्यावा लागला. तेथें १७६० सालीं इंग्रज लोकांची छावणी ठेवण्यांत आली. कोलेरूनच्या पुरामुळें त्याची बहुतेक नासाडी झाली आहे.

**देवीदास**-(देवदास) हा व्यंकटेश स्तोत्राचा कर्ता.याची संतमालिकाहि प्रसिद्ध आहे. हा चैतन्यसंप्रदायी ( १५८०-१६८० ) असून यानें गरुडाख्यान, करुणामृतसार ( रचना श. १६०८ ) प्रार्थनासात्विक, व्यंकटेशस्तुति (?) भामावर्णन वगैरे ग्रंथ केले आहेत.

**देवीभागवत**—अठरा पुराणांची जी नाममालिका आहे तीत या पुराणाचा उल्लेख नाहीं. परंतु शैव व पद्मपुराणांत याची अष्टादश महापुराणांत गणना केली आहे. व खुद्द या पुराणांतच पहिल्या स्कंधांत या पुराणास महापुराण म्हटलें आहे. कोईच्या मतें वैष्णव भागवत हें महापुराण नसून एक वैष्णव तंत्र आहे व देवीभागवत हेंच महापुराण आहे. आणि या मतास पोषक आधार म्हणजे शैवपुराणानें अठरा पुराणांत वैष्णव भागवत वगळिलें आहे व देवीभागवताचा संग्रह केला आहे. शिवाय स्कंध व अध्याय यांच्या दोन्ही पुराणांच्या संख्येंत व विषयमांडणींत बरेंच साम्य आहे. परंतु वैष्णव भागवतावरील टीकाकार श्रीधर यानें "भागवतपुराणें अनेक असलीं तरी विष्णुभागवत हेंच महापुराण होय" असें म्हटलें आहे. देवीभागवतावर नीलकंठाची टीका आहे. तो शैवमताचा असल्यामुळें देवीभागवत महापुराण ठरविण्याचा त्यानें बराच प्रयत्न केला आहे. त्याची टीका वाचण्यासारखी आहे. देवीभागवतावर आपल्या टीकेपूर्वी दुसऱ्या कोणाची टीका नव्हती असें नीलकंठ टीकाकारच म्हणतो. पद्मपुराणांत देवीभागवताबरोबर दुर्गाभागवताचाहि उल्लेख येतो. देवीभागवताचे बारा स्कंध असून सर्वांचे मिळून अध्याय ३१८ आहेत. या ग्रंथांतील विषय स्कंधवार पुढें दिले आहेत.

पहिल्या स्कंधांत ग्रंथविस्तार, जगाची उत्पत्ति, पुराणलक्षण, पुराणांचीं व उपपुराणांचीं नांवें, निपुत्रिकत्वाबद्दल व्यासचिंता, हयग्रीवाख्यान, मधुकैटभचरित्र, शुकोत्पत्ति, बुधोत्पत्ति, शुकजनकसंवाद, शुकाचा विवाह, शुकनिर्वाण, पांडवांची उत्पत्ति इत्यादि कथा असून दुसऱ्या स्कंधांत मत्स्यगंधेची उत्पत्ति, भीष्मजन्मकथेपासून कौरव-यादव-नाशापर्यंत कथा, परिक्षिति, जन्मेजय यांच्या कथा व सर्पसत्र वर्णिलें आहे. स्कंध तीनमध्यें अंबा (देवी) विधान, सृष्ट्युत्पत्ति, मधुकैटभनाश, जगदुत्पत्तीबद्दल देवीची ब्रह्मा-विष्णु-महेशास आज्ञा, देवकृत देवीची स्तुति, देवीमंत्रबीजकथन व उतथ्य कथा, देवीयज्ञ, सात्विक-राजस-तामसयज्ञ, सुदर्शन चरित्र व देवीप्रभावकथन, नवरात्रमाहात्म्य व रामकथा हे विषय आहेत. तसेंच चवथ्या स्कंधांत कृष्णचरित्र, नरनारायणाख्यान, संजीवनीप्राप्त्यर्थ शुक्राचार्यांची तपश्चर्या ( येथें बृहस्पतीनें शुक्राचार्यांचा वेष घेऊन दैत्यांनां खोटया जैनधर्माचा उपदेश केल्याचा उल्लेख आहे. ही कथा थोड्या फरकानें पद्मपुराणांत आहे. ) पांचव्या स्कंधांत महिषासुरवध व येथून पुढील सर्व कथाभाग मार्कंडेय पुराणांतील सप्तशती-देवीमाहात्म्य प्रमाणेंच आहे. सहाव्यांत वृत्रासुरवध, सौगत मताचा उल्लेख, त्रिविधकर्मकथन, युगोद्भवधर्म, आडि ( पक्षि ) बकयुद्ध, शुनःशेपकथा, वसिष्ठोत्पत्ति, सहस्रार्जुनकथा, भृगुवंशोच्छेद, हैहयकथा, स्त्रीरूपी नारद व त्याची संतति, हे विषय आहेत. सातव्यांत हरिश्चंद्रकथा, विश्वामित्रकालीन दुष्काळाचें विशेष हृदयद्रावक वर्णन, भारतवर्षांतील देवीच्या स्थानांचा उल्लेख, देवी व हिमालय यांच्या संवादप्रसंगीं देवीगीता ( हींत भगवद्गीतेंतील श्लोक फार आहेत ). आठव्या स्कंधांत भू, स्वर्ग, पाताळ, नरक, ग्रहनक्षत्रादि वर्णन व देवीच्या पूजेचे कालपरत्वें विधी दिले आहेत. स्कंध नऊ यांत देवीच्या अनेक शक्तींचें वर्णन, गंगादि नद्यांचे शाप, भक्ष-अभक्ष वर्णन, पृथ्वीची उत्पत्ति, तिची स्तुति, गंगास्नानमाहात्म्य, प्रक्ष्ण्वशाखोक्त गंगास्तोत्र, अनेक लोकवर्णन, तुलसीची उत्पत्ति, शालिग्रामलक्षणें, सावित्रीकथा, मध्येंच धर्मशास्त्रकथन, तप्तमुद्रा व माध्वमतनिंदा, महालक्ष्मी उपाख्यान वगैरे व अनेक देवांचीं उपाख्यानें.दहाव्यांत स्वायंभुवादि मनूंच्या कथा. दशावतारांपैकीं नवव्यांत युद्धगणना, स्कंध अकरा व बारा यांत आन्हिक प्रकरण वर्णिलें आहे.

**देवीहोसूर**—मुंबई इलाखा, धारवाड जिल्हा. करजगीच्या नैर्ऋत्येस सुमारें १० मैलांवर असलेलें एक खेडें. येथील बनशंकरीच्या देवळांत चार, बसवन्नाच्या देवळांत एक आणि भोगेश्वराच्या देवळांत दोन शिलालेख आहेत.याशिवाय कोणी कजन्नीवलि याच्या अंगणांत दोन, शेतांत एक व गांवाच्या पूर्वेकडील तळ्याच्या बांधावर एक असे चार शिलालेख आहेत.

**देश**—हर्षकाळीं एका राज्यांत मोडणाऱ्या सर्व प्रदेशाला देश म्हणत. वराहमिहिर व इतर ग्रंथकार यांनींहि याच अर्थानें त्याचा उपयोग केला आहे. पूर्वी या अर्थी जनपद हा शब्द वापरीत. देश या अर्थी मंडल ( कोंगमंडल, चौलमंडल वगैरे ) शब्द दख्खनमध्यें प्रचलित असे. देशाचे भाग उत्तरेकडे भुक्ति व दख्खनकडे वाड ( हल्लींचे जिल्हे ) असत व त्यांचे पुन्हां विषय ( तालुका ), नाड, अहार असत व त्यांचे शेवटचे घटक ग्राम असत. सोळाव्या व सतराव्या शतकांत महाराष्ट्रांत देशशब्द तालुका किंवा जिल्हा या अर्थीहि वापरीत. उ. वायदेश ( वांई तालुका ), माणदेश, मिरजदेश वगैरे. सह्याद्रि, बालाघाट, कर्नाटक व गोदावरी यांमधील जो प्रदेश तो देश. देश, प्रांत, सुभा, परगणा, तालुका, जिल्हा, महाल, कसबा, पेटा, संमत, तर्फ, मौजा वगैरे नांवें देश व त्याचे भाग यांचीं वाचक आहेत.

**देशपांडे-देशमुख-देसाई**—दक्षिणेंत मुसुलमानी अंमलांत साधारणतः रयतवारी पद्धतीच अमलांत होती. सरकार

व रयत यांच्या दरम्यान मालगुजार, जमीनदार, तालुकदार, अशांसारखे मध्यस्थ फारसे नसत. पाटील-कुलकर्णी गांवचा वसूल करीत व आपलें वेतन काढून घेऊन तो सरकारी कमावीसदार किंवा सुभेदार यांच्या स्वाधीन करीत. प्रत्येक परगण्यास (हल्लींचा पेटा किंवा लहान तालुका) देशमुख-देशपांडे हे अधिकारी असत. हेहि वतनदारच असून वंशपरंपरा आपलें काम करीत. हे परगण्यांतील सर्व जमाबंदीचा हिशेब ठेवीत व वसुलीवर देखरेख करीत. त्यासाठीं यांच्याजवळ थोडीफार शिबंदी असे; आणि तिच्या जोरावर (गढ्या, कोट बांधून) गढींबंद राहून आसपासच्या मुलुखांत दंगा करीत किंवा मध्यवर्ती सरकार दुर्बळ असल्यास आपली सत्ता फैलावीत. यासाठींच शिवाजीनें यांचीं ठाणीं स्वतःच्या ताब्यांत घेतलीं होतीं व कांहीं पाडूनहि टाकलीं होतीं.वंशपरंपरा अधिकार चालविल्यानें यांचें त्या त्या भागीं बरेंच वर्चस्व असे.यामुळेंच शिवाजीनें राज्यस्थापनेच्या प्रारंभीं यांना नाना तऱ्हांनीं आपल्या काबूंत आणिलें होतें.

सरकारी शेतसाऱ्यावर शेंकडा दोन ते पांचपर्यंत यांचा हक्क असे, त्यास रुसूम म्हणत. कोठें कोठें धान्यावर शेंकडा तीन व रोख पैशांवर शेंकडा सात घेत. त्याशिवाय त्यांनां इनाम जमिनी असत. ग्रामपंचायतींतील पाटील-कुळकर्ण्यांप्रमाणेंच परगण्याच्या पंचायतींत त्यांनां हक्कवाबी असत. भेट, तोरण, घट, जोडा, पासोडी, तूप, तेल, वगैरे वस्तू बलुत्याप्रमाणेंच त्यांनांहि (जास्त प्रमाणांत) मिळत. सांप्रत यांचे पूर्वीचे अधिकार काढून घेतले असून त्यांचा रुसूम मात्र चालू आहे. त्यामुळें हे हल्लीं गरीब स्थितींत आले आहेत, व कांहीं कर्जबाजारीहि झाले आहेत. पूर्वी जमाबंदीचे, त्या त्या परगण्यांतील सर्व कागदपत्र (दप्तरच) देशपांड्याच्या ताब्यांत असे; त्याच्या हाताखालीं मोहरीर नांवाचा कारकून (सांप्रतचा रेकॉर्ड कीपर) असे. निरनिराळ्या वहीतदारांचे व वतनदारीचे हक्क व जमिनींचें बारीक सारीक वर्णन या हिशोबांत दिलें जाई. देशपांडे हा निरनिराळ्या गांवांच्या कुलकर्ण्यांनें पाठविलेले हिशेब एकत्र करून सर्व परगण्यांचा हिशोब तयार करी.

देशपांड्याप्रमाणेंच कोंकणांत व कर्नाटकांत देसाई हाहि एक अधिकारी असे. त्याचें काम देशपांड्याचेंच असे. कोंकणांतील प्रभुपणाचा हुद्दाहि देसायाच्याच जोडीचा असे. प्रभुदेसाई असा त्या हुद्याचा जोड उच्चार करितात. अधिकारावरून सांप्रत तें एक आडनांवहि झालें आहे. त्याप्रमाणेंच देशमुख, देशपांडे व देसाई हींहि आडनांवें झालीं. देशपांडे हा देशमुखाच्या हाताखालचा असे. गांवचा जसा कुळकर्णी तसा परगण्याचा देशपांडे. देशपांड्यासच देशकुलकर्णी असें म्हणत.

रा. राजवाडे असे म्हणतात कीं, मुसुलमानी अंमलापूर्वी (कोंकणांत ?) ब्राह्मणांकडे देशमुख्या नव्हत्या. देशमुखी म्हणजे लष्करी व फौजदारी अधिकार. गांवचें संरक्षण जसा पाटील करी, तसें परगण्याचें संरक्षण देशमुख करी. लढाईच्या प्रसंगीं पाटील व देशमुखदेशपांडे यांनीं अमुक सैनिक सरकारास पुरवावे असे करार असत. मुसुलमानी अंमलांत वतनाच्या घालमेली झाल्या, त्यांत मराठे पाटील व मराठे देशमुख हे बरेचसे स्थानभ्रष्ट होऊन त्यांच्या जागीं ब्राह्मण देशमुख आले. [ चतुर्थ संमेलनवृत्त, भा. इ. मं.; वाडडायऱ्या; डफ; राजवाडे खंड. ]

**देशपांडे, रामचंद्र भोजराव**—हे महाराष्ट्र कवि सुमारें ७० वर्षांपूर्वी दक्षिण महाराष्ट्रांत पाच्छापुर येथें होऊन गेले. बापू गोखले यांच्या लष्करांत राहून स्वराज्यरक्षणासाठीं यानीं मोठमोठया लढाया मारल्या होत्या. रामचंद्र भोजराव यांचे मूळ पुरुष धवरस हे पूर्वी मोगलाईंत वेदर येथें रहात असत. रामचंद्रपंतांचा संस्कृत भाषेचा अभ्यास चांगला असून, संस्कृतांत व मराठींत कविता करण्याचा नाद त्यांनां याळपणापासून होता. पेशव्यांच्या पदरीं लष्करांत बरेच दिवस नोकरी करून ते यडूर येथें विरूपाक्षेश्वराच्या दर्शनास गेले. यडूर येथें असतां, रामचंद्रपंतांनीं 'श्रीवीरभद्रक्षेत्रवर्णन' नामक ८६ ओंव्यांचें एक प्रकरण लिहिलें. यडुराहून स्वग्रामीं आल्यावर, कोठें तरी निवांतस्थळीं राहून परमार्थसाधन करावें, अशी इच्छा त्यांस उत्पन्न झाली. नंतर शींगेहोळी येथें एक मोठा वाडा बांधून, त्यांत आपल्या परिवारासह रामचंद्रपंत जाऊन राहिले. तेथें *त्यानीं स्मार्ताग्नि* ठेवला होता. रोज त्रिकाल संध्यास्नान, होमहवन व ईश्वरभजन इत्यादि सत्कर्मांत ते आपला कालक्षेप करीत असत. फुरसतीच्या वेळीं कविता लिहिण्याचा क्रमहि त्यांनीं चालू ठेवला होता. रामचंद्रपंतांनीं संस्कृत आणि मराठी मिळून एकंदर ७ ग्रंथ लिहिले आहेत ते येणेंप्रमाणें:-संस्कृत-सिद्धेश्वराष्टक; रामदीक्षितस्तोत्र, आरत्या व पदें, चिदंबरगीति. मराठी-गंगास्तव आर्या (अपूर्ण); वीरभद्रक्षेत्रवर्णन आणि श्रीगणेशचरित्र.

त्यांच्या ग्रंथांतल्या मराठी कवितेवर त्यांची जन्मभाषा जी कानडी, तिची झांक वरीव कमी मारते. काव्य या दृष्टीनें रामचंद्रपंतांची कविता, म्हणण्यासारखी रसवती नाहीं, तथापि एका शिपाईबाण्याच्या भाविक गृहस्थानें लिहिलेली कविता या नात्यानें तिचें महत्त्व बरेंच आहे. वयाच्या ७९ व्या वर्षी (शके १७७८) त्यांस देवाज्ञा झाली.

**देशमुख, गोपाळ हरि** (१८२३-१८९२)— लोकहितवादी. यांचे वडील हरिपंत हे शेवटले पेशवे यांच्या कारकीर्दींत फार प्रसिद्धीस आले. यानां पेशवेसरकार यांच्याकडून जहागीर होती पुढें ती खालसा झाली व त्यानां १२०० रु. दरसाल पेन्शन मिळालें. गोपाळराव यांचा जन्म १८ फेब्रुवारी १८२३ रोजीं झाला. हे कांहीं दिवस पुण्याचे एजंट यांच्या कचेरींत कारकून होते व पुढें ते वाढत वाढत शिरस्तेदार झाले व पुढें इनाम कमिशनमध्यें सब असिस्टंट झाले व त्यानां धर्मशास्त्रावर पुस्तक लिहिण्याकरितां सरकारनें

मुंबईस पाठविलें व पुढें ते अहमदाबादेस स्मालकाज कोर्टाचे जज्ज झाले. १८७७ सालीं त्यांस रावबहादूर केलें. कांहीं दिवस ते कायदेकौन्सिलचे सभासद व रतलाम संस्थानचे दिवाण होते. पुण्यांत लायब्ररी, छापखाना, रयतेची सभा, दवाखाना, मुलींची शाळा या संस्था यांच्या आश्रयानें सुरू झाल्या. यांचीं मतें विधवापुनर्विवाहास अनकूल होतीं व यानीं आपला मुलगा विलायतेस पाठविल्याबद्दल त्यांचा त्यांच्या जातीनें अनेक प्रकारें छळ केला तो त्यांनीं निमूटपणें सोसला त्यामुळें द्वेषभाव विरघळून गेला. यांनीं अनेक ग्रंथ लिहून प्रसिद्ध केले त्यांचीं नांवें:-लंचेचा निबंध, लक्ष्मीज्ञान, यंत्रज्ञान, भरतखंडपर्व, होळीचा सण, अलंकार, खोटी शपथ, गुलिस्तान, सौभाग्यरत्न, निबंधसंग्रह, निगमप्रकाश, आगमप्रकाश, हिंदुस्थानचें दारिद्र्य, सुभाषित, भिक्षुक, पानिपत, कलियुग, जातिभेद, स्वाध्याय, ऐतिहासिक गोष्टी भाग ३, गीतातत्त्व, हिंदुस्थानचा इतिहास, पृथ्वीराज चव्हाण, गुजराथचा इतिहास, स्वराज्य, ग्रामरचना, बोधपत्रें, उदेपूरचा इतिहास, आश्वलायन गृह्यसूत्राचें भाषांतर इत्यादि लहान मोठे ३२ ग्रंथ आहेत. यांस मराठी, इंग्रजी, फारशी, गुजराथी, हिंदुस्थानी भाषा समजत असत. 'लोकहितवादी' या टोपण नांवानें यांचे लेख प्रसिद्ध होत. निबंधमालाकारानीं यांच्या लेखावर सडकून टीका केल्यामुळें कांहीं काळ यांचे ग्रंथ लोकांच्या दृष्टीआड होते; पण आतां पुन्हां ते वाचनांत येऊं लागले आहेत. हे मुंबई आर्य समाजाचे प्रमुख अध्यक्ष, व थिऑसाफिकल सोसायटीचे मुंबई शाखेचे अध्यक्ष होते. यांच्या घरीं मोफत दवाखाना होता. यानां इंग्रजी शिक्षणाची फार हौस असे.

यांचीं मतें 'सुधारकी' असत पाश्चात्य संस्कृतींतील चांगल्या गोष्टी आपल्या लोकांनीं शिकाव्या व जुन्या वाईट संवयी टाकून याव्या हा लोकहितवादींचा स्वजातीयांवर टीका करण्यांत हेतु असे. त्यांची भाषा अतिशय कडक असल्यानें तत्कालीन लोकांनां ती रुचत नसे. तथापि आगरकराप्रमाणें लोकहितवादींची किंमत आतां कळूं लागली आहे व त्यांच्या ग्रंथांनां आधुनिक अभ्यासक्रमांत स्थान मिळूं लागलें आहे. [प्रो. केळकर-लोकहितवादी; केसरी ता. ११ व १८ आक्टोबर १८९२.]

**देशाधिकारी**—प्राचीन काळीं पाटील किंवा ग्रामाधिकारी ज्याप्रमाणें गांवचा मुख्य अधिकारी समजला जात असे, त्याचप्रमाणें देशाधिकाऱ्याकडे जिल्ह्याचा अधिकार (हल्लींच्या कलेक्टरप्रमाणें) असावा असें दिसतें. विज्ञानेश्वर टीकेंत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, ग्रामाधिकाऱ्याच्या हुकुमानें बसलेल्या पंचायतीचा निकाल प्रतिवादीस पसंत पडला नाहीं तर त्यानें देशाधिकाऱ्याकडे फिर्याद न्यावी. यावरून देशाधिकारी हा प्राचीन हिंदु संस्थेंतील एक कामगार असून त्याचा दर्जा ग्रामाधिकारी किंवा पाटील यांच्यावर होता हें उघड दिसतें. देशाधिकाऱ्याची जागा वंशपरंपरा नसे व देशमुखाप्रमाणें त्यांनां कांहीं इनाम जमिनी किंवा हक्कहि नव्हते ते सरकारनें नेमलेले असत व त्यांच्या बदल्याहि होत. [वाड; डफ.]

**देहांतशासन**—सर्व काळीं व सर्व देशांत गुन्हेगारांनां देहांतशासनपद्धति अमलांत आहे. अलीकडे ही शिक्षा रद्द करण्याबद्दल चळवळ होऊं लागली आहे. प्राचीन काळीं व मध्ययुगांतहि अत्यंत क्रूरपणें छळ करून ही शिक्षा अपराध्यांनां देण्यांत येत असे. चामडी सोलून काढून ठार करणें, भिंतींत गाडणें, सुळावर चढविणें, उकळत असलेल्या तेलांत बुडविणें व आंतडीं बाहेर काढणें इत्यादि देहांतशासनाच्या पद्धती प्राचीन काळीं प्रचारांत असत. त्या काळीं गुन्ह्याचें मुख्य स्वरूप व महत्त्व लक्षांत न घेतां ही शिक्षा सरसकट दिली जात असे. तिसऱ्या जॉर्जच्या कारकीर्दीपर्यंत इंग्लंडांत असल्या अमानुष व अन्यायी शिक्षा प्रॉटेस्टंट धर्मांतहि चालू होत्या ही गोष्ट कमी लांछनास्पद नाहीं. महान तत्त्ववेत्त्यांनीं आजवर देहांतशासनाचें समर्थनच केलेलें आढळतें. मोझेइक व जर्मानिक कायद्यानें जिवास जीव घेण्याची मोकळीक ठेविली होती. अगदीं निगरगट्ट गुन्हेगारास ही शिक्षा दिल्यानें लोकहित साधेल असें प्लेटोचें मत होतें. मोझेसचे कायदे प्रमाण मानून ग्रोटिअसनें या प्रश्नाचा धार्मिक दृष्टीनें विचार केला होता. प्रत्यपकार करणें जरूर आहे असें मॉंटेस्क्यूचें मत होतें. गुन्हेगार हा सामाजिक कराराविरुद्ध बंड करणारा असल्यानें त्याला ही शिक्षा असावी असें हॉब्जप्रमाणें रूसोलाहि वाटत असे. सामाजिक करारांत मनुष्याची फौजदारी-कायद्यास संमति असतेच, अतएव गुन्हेगार हा देहांतशासनार्ह असतो, अशी कँटची समजूत होती. बेकॅरियानें देहांतशिक्षेविरुद्ध मत दिलें आहे, परंतु बेंथॅम व रोमिली यांनीं गुन्ह्यास प्रतिरोधक या दृष्टीनें देहांतशिक्षेचें समर्थन केलें आहे.

उपर्युक्त मतांवरून या शासनाचें समर्थन कोणत्या मुद्यावर करण्यांत येतें हें कळून येईल. जेथें ही शिक्षा रद्द करण्यांत आली आहे त्या ठिकाणीं खुनांचें प्रमाण कमी झालें आहे असें दाखविण्यांत येतें. उलट याच्याविरुद्ध पुरावाहि पुढें करण्यांत येतो. मनुष्याचा प्राण घेण्यास ख्रिस्ती धर्म अनुकूल नसून सरकारलाहि तो हक्क नाहीं. शिवाय या शिक्षेमुळें पाप वाढत जाईल, समाजांतील माणुसकीचा लोप होईल, जीवितांची किंमत फारच स्वस्त होईल व खून करण्याचा भयंकर मोह उत्पन्न होईल इत्यादि कारणें देहांतशासनाचा त्याग करावा याबद्दल जोरानें प्रतिपादन केलीं जातात. राजद्रोह, खून, आग लावणें, बलात्कार, चांचेगिरी, जीवितास अपाय होईल अशा रीतीनें चोरी करणें, लढाऊ जहाज जाळणें इत्यादि कारणांबद्दल अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत ही शिक्षा फर्माविली जाते. मिचिगन, विसकॉनसिन, ऱ्होड आयलंड व मेन या ठिकाणीं ही शिक्षा रद्द करण्यांत आली आहे. १८८८ सालीं न्यूयॉर्के येथें फांशी

देण्याऐवजीं विजेच्या धक्क्यानें जीव घेण्याची नवीन सुधारणा अमलांत आली. यूरोपांत देहान्तशासन कमी होऊं लागलें आहे. हॉलंडांत १८७० मध्यें ही शिक्षा रद्द झाली.रूमानिया, पोर्तुगाल व स्वित्झर्लंडमध्यें हें शासन रद्द करण्यांत आलें. १८७०-७९ च्या दरम्यान ऑस्ट्रियांत १६, स्वीडनमध्यें ३, नार्वेंत ३, डेन्मार्कमध्यें १, व वव्हेरियांत ७ इतक्या थोड्या लोकांनां देहान्त शिक्षा देण्यांत आली. १८६९-७८ च्या दरम्यान उत्तर जर्मनीमध्यें ४८४ लोकांनां ही शिक्षा झाली होती. परंतु त्यांपैकीं एकाच मनुष्यास फांशीं देण्यांत आले. राजकीय गुन्ह्याबद्दल मरणाची शिक्षा देण्याचें काम बहुतेक सर्व देशांत रद्द करण्यांत आलें आहे. फ्रेंच राज्यक्रान्तीच्या वेळेपासून तेथें हा प्रकार अस्तित्वांत नाहीं. इंग्लंड, ऑस्ट्रिया रशिया व संयुक्त संस्थानें येथें फांशीची शिक्षा देण्यांत येते. न्यूयॉर्क व मॅसाच्युसेट्स् येथें विजेच्या धक्क्यानें जीव घेण्यांत येतो व जर्मनींत शिरच्छेद करण्याची चाल आहे.

हिं दु स्था न.—प्रस्तुत खुनाचा गुन्हा करणारास फांशीं अगर जन्मठेप ( काळ्या पाण्याची शिक्षा ) इंडियन पीनल कोडनें सांगितली आहे. मराठी रिसायतींत खून करणारास ठार मारण्याची शिक्षा क्वचितच देण्यांत येत असे, असें उपलब्ध झालेल्या माहितीवरून अनुमान निघतें. त्यावेळीं खून करणारास कैदेची शिक्षा करण्यांत येई. परंतु खून करणारानें ज्याचा खून केला असेल त्याच्या आप्तांस खुनाबद्दल द्रव्य व सरकार दंड दिल्यास खून करणाऱ्या इसमाची सुटका करण्यांत येई. खुनाबद्दल मयताच्या नातेवाईकांस द्यावयाच्या रकमेचें प्रमाण ज्या इसमाचा खून झाला असेल त्या इसमाची जात, दर्जा इत्यादि गोष्टींवर अवलंबून असे. गुन्हा करणारा इसम वतनदार असल्यास त्याचें वतन जप्त करण्यांत येऊन वतनाचें उत्पन्न सरकारजमा करण्यांत येई. आतां हीं जी विधानें केलीं तीं, ज्या उदाहरणांवरून स्पष्ट होतील अशीं कांहीं उदाहरणें येथें नमूद करितों.

लमाण जातीच्या दोन इसमांमध्यें जातीविषयीं दावा होता. उभयतां दावेकरी लोकांत युद्ध सुरू झालें. लमाणांच्या तांड्यांत सरकारचा सरकारकून मारला गेला. ज्या इसमाच्या हातून कारकून मारला गेला त्यास साताऱ्याच्या किल्ल्यावर अटकेंत ठेवण्यांत आलें. पुढें लमाणानें गुन्हेगारीबद्दल रुपये १५००० देण्याचें कबूल केल्यावरून त्यास मुक्त करण्यांत आलें ( इ. स. १७४०-४१ वाड भाग १, पान १८४ ). गुन्हेगारीची एवढी मोठी रक्कम गुन्हा करणाऱ्या इसमाकडून घेतल्याचें क्वचितच आढळतें. ठार मारला गेलेला इसम सरकारी कारकून असल्यानें गुन्हेगारीबद्दल एवढी मोठी रक्कम वसूल करण्यांत आली असावी असें दिसतें.

खुनाचा गुन्हा करणारा इसम वतनदार असल्यास व त्यानें गुन्हा केल्याचें शाबीत झाल्यास ज्या इसमाचा खून झाला असेल त्याच्या आप्तांस वतनापैकीं कांहीं भाग खुनाचा मोबदला म्हणून देऊन खून करणारानें आपली सुटका करून घेतल्याचीं अनेक उदाहरणें आढळतात.

ब्राह्मणाचा खून झाल्यास खून करणाऱ्या इसमास जबर शिक्षा करण्यांत येऊन ज्याचा खून झाला असेल त्याच्या आप्तांस इनाम वगैरे देण्यांत येत असे. ओंकारभट व रणछोडभट व्यास औदिच्य ब्राह्मण मौजे पचेड प्रां रतलाम यांचा भाऊ नारायणभट व्यास याची बेअब्रू करून लालसिंग रजपुतानें त्यास जिवें मारिलें. ओंकारभट व रणछोडभट यानें रजपुताचें पारिपत्य व्हावें म्हणून हुजूर कळविलें. रजपुतास देशाबाहेर काढून टाकण्याचा आणि त्याच्या मालकीचे वारा जहागीर गांव जप्त करण्यांत येऊन ब्राह्मणास जमीन चावर एक आणि घरास जागा इनाम देण्याचा हुकूम करण्यांत आला. (इ. स. १७५३-५४, वाड, भाग ५, पान ४८ ).

*खुनाच्या कामीं कोण कोण लोक सामील होते हें माहीत* असून त्याबद्दलची माहिती सरकारी अधिकाऱ्यास न दिल्यास त्या इसमाकडून गुन्हेगारी घेत असत. त्याचप्रमाणें खुनांत सामील असणाऱ्या इसमांकडून गुन्हेगारी घेण्यांत येई. ( वाड भाग ७, पोटभाग २, पान १९७ ).

खुनाचा गुन्हा करणारास ठार मारण्याची शिक्षा क्वचित् प्रसंगीं देण्यांत येत असे, असें दोन ठिकाणीं आढळलेल्या उदाहरणांवरून दिसून येतें. वाड, भाग ८, पान ८३ व ८७ त भाग ८, पान ८३ वरील उल्लेखः—दोन असामी यांनीं ज्या गांवीं खून केला त्या गांवीं हारदूजणास नेऊन छाटून टाकिलें. इ. स. १७७५-७६ भाग ८, पान ८७ वरील उल्लेखः—कृष्णाजी उतरेकर यानें एका शिंप्याच्या दोन कुणबिणींचा खून केला. या इसमास तोफेच्या तोंडीं देण्याचा हुकूम देण्यांत आला.

ब्राह्मण गुन्हेगार असल्यास गुन्हेगारी घेऊन त्यास सोडतेवेळीं त्याच्याकडून जामीन घेणें, त्यास वाळींत ठेवणें अगर त्याच्याकडून प्रायश्चित करविणें वगैरे गोष्टी सरकारच्या हुकुमावरून करण्यांत येत असत.

खुनाच्या गुन्ह्यासंबंधीं ज्या विशिष्ट बाबी दृष्टोत्पत्तीस आल्या त्या दर्शविणारीं निरनिराळीं उदाहरणें वर सांगितलीं. ब्रह्महत्या हें पंचमहापातकांपैकीं एक महापातक असून त्यास सर्वस्व हरण करणें, देशांतून घालवून देणें, अगर ठार मारणें हा दंड मनुस्मृतींत सांगितला आहे. मनुस्मृतीच्या वचनाच्या दृष्टीनें विचार करतां वरील उदाहरणांत या गुन्ह्यास ज्या प्रकारचा दंड केलेला आढळतो त्यापेक्षां अधिक दंड असावयास पाहिजे होता. परंतु तसा प्रकार आपणास वरील उदाहरणांवरून आढळून येत नाहीं. स्मृतींतील तत्त्वास सोडून मराठी रिसायतींत या गुन्ह्याच्या बाबतींत जी व्यवस्था-पद्धति अस्तित्वांत आली ती कोणत्या कारणामुळें आली हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. या गुन्ह्यांच्या बाबतींत महंमदी शास्त्राचें धोरण कोणत्या स्वरूपाचें होतें हें लक्षांत घेतलें असतां या प्रश्नाचा उलगडा सहज

होतो. खुनाचा गुन्हा झाला असल्यास ज्याचा खून झाला असेल त्याच्या आप्तेष्टांस नुकसानीबद्दल द्रव्य देऊन खून करणाराची मुक्तता करून घेण्याचा मार्ग कुराणास संमत आहे. मुसुलमानी रियासतींत या तत्त्वास अनुसरून खुनाबद्दल द्रव्य घेण्याचा जो प्रघात सुरू झाला तो प्रघात पुढें मराठी रियासतींतहि कायम राहिला असावा असें दिसतें. [ भा. इ. सं. मं , चतुर्थ संमेलनवृत्त, शके १८३८ ].

**देहू**—मुंबई, पुणे जिल्हा. हवेली तालुक्यांत, भीमेस मिळणाऱ्या इन्द्रायणी नदीच्या दक्षिण तीरावर हें खेडें आहे. हें पुण्याहून तीस मैल किंवा शेलारवाडी स्टेशनहून फक्त तीनच मैल लांब आहे. येथें तुकारामाचा (पहा) जन्म झाला. येथें प्रतिवर्षी फाल्गुनमासीं कृष्ण पक्षांत द्वितीयेस मोठी जात्रा भरते. खुद्द देहू येथेंहि एक विठोबाचें देवालय असून तेथें दरएक महिन्याच्या शुक्ल व कृष्ण पक्षांतील एकादशीस देवदर्शनार्थ हजार दोन हजार भक्त लोटतात.

**दैत्य**—दैत्य, असुर, दानव, वगैरे शब्द वैदिक व पौराणिक ( संस्कृत ) वाङ्मयांत फार येतात व देवांचे प्रतिस्पर्धी व शत्रू या नात्यानें देव व दैत्य यांचे पुष्कळ सामने झालेले त्यांत वर्णिले आहेत. असुरिया (असीरिया), बाबिलोनिया, इराण, या देशांच्या प्राचीन वाङ्मयांत, तसेंच ज्यू व ख्रिस्ती लोकांच्या धर्मग्रंथांत देव (गॉड) व दैत्य (डीमन) यांचीं भांडणें वर्णिलीं आहेत.

प्रथम देव ( गॉड ), देवदूत ( एन्जल ), वनदेवता ( फेअरी ), दैत्य ( डीमन ), महदात्मा ( स्पिरिट ), भूतपिशाच ( घोस्ट ) यांच्यामधील फरक स्पष्ट केला पाहिजे. देव याचेहि दोन अर्थ आहेत. सर्व धर्मांतील अर्थ देव म्हणजे ईश्वर ( गॉड ) हा सर्व विश्वाचा उत्पादक व चालक असा मानला जातो. पण देव याचा प्राचीन संस्कृत वाङ्मयांतील अर्थ ' एक प्राचीन समाज ' असा असला पाहिजे असें अनेक संस्कृत पंडितांचें मत आहे (' देव' पहा ). तसेंच दैत्य,राक्षस, असुर, दानव वगैरे शब्दहि प्राचीन लोकसमाजवाचक नामें असून ते सर्व देवांचे शत्रू होते अशी उपपत्ति अलीकडील विद्वानांनीं लाविली आहे. तथापि इतर संस्कृतींतील धर्मग्रंथांत दैत्य ( डीमन ) हे परमेश्वराचे शत्रू असून परमेश्वराला स्वर्गांत त्रास दिल्यामुळें त्यानें त्यांनां पाताळांत फेंकून दिलें, वगैरे वर्णनें आहेत. ' डीमन ' या शब्दाला प्राचीन ग्रीक भाषेंत चांगला अर्थ होता. पण पुढें एकेश्वरी व मूर्तिपूजाविरोधी ख्रिस्ती धर्म स्थापन झाल्यावर ख्रिस्तेतर प्राचीन मूर्तिपूजक धर्मांतील देवदेवतांनां ख्रिस्तानुयायांकडून परमेश्वराचे शत्रू अशा वाईट अर्थानें ' डीमन ' शब्द वापरण्यांत येऊं लागला. महदात्मा ( स्पिरिट ) म्हणजे मृतआत्म्यांचा उच्च कोटीप्रत गेलेला आत्मा. असे आत्मे पुनर्जन्मांतून मुक्त झालेले असतात, त्यांनां शरीरें असतात पण तीं अदृश्य असतात, त्यांनां खायलाप्यायला लागत नाहीं, मनुष्यांपेक्षां त्यांची बुद्धि अधिक तीव्र असते, व अगदीं गुप्त गोष्टी त्यांनां समजतात. देव, दैत्य व महदात्मे यांच्यामध्यें फरक असला तरी दैत्य व महदात्मे देवांच्या दर्जाला पोहोंचूं शकतात. महदात्मे हे झाडें, नद्या, खडक अशांच्या आश्रयानें राहतात. पण बहुधा त्यांनां विशिष्ट निवासस्थान नसतें.

हिंदु धर्मग्रंथांतील कल्पना.—दैत्य, असुर वगैरेंचीं देवांशीं अनेक भांडणें व युद्धें झालीं, अशाबद्दल अनेक पुराणांत वर्णनें आहेत. दैत्य हे कश्यप ऋषीला दिति नांवाच्या स्त्रीपासून झालेले पुत्र, अशी त्यांची उत्पत्ति दिली आहे. ऋषींच्या यज्ञांनां ते फार उपद्रव देत. देवदैत्यांसंबंधीं बऱ्याचशा कथा ज्ञानकोश दुसऱ्या विभागांत ( पृष्ठ २२५–२४२ ) दिल्या आहेत. दैत्य व दानव दोघे एकच असावेसें दिसतें. कित्येक हिंदु देवतांनां, ज्या दैत्यांनां त्यांनीं जिंकलें व ठार मारलें त्यांच्या नांवावरून नांवें पडलीं आहेत, उदा. इंद्राला वृत्रहन्, विष्णूला कैटभजित् व मधुसूदन, देवीला महिषासुरमर्दिनी, कृष्णाला केशिनिषूदन वगैरे नांवें रूढ आहेत. हिंदूंच्या दशावतारांपैकीं बहुतेक त्या त्या वेळीं फार बलाढ्य झालेल्या दैत्यांनां मारण्याकरितां झाले असें वर्णन आहे. उदा. मत्स्यावतार शंखासुराला,वराह हिरण्याक्ष दैत्याला,नारसिंह हिरण्यकश्यपूला, वामन बलिदैत्याला, राम रावणादिकांनां, कृष्ण अरिष्टादिकांनां मारण्याकरितां अवतरले.

ख्रिस्ती धर्मग्रंथांतील कल्पना.—या धर्मांत हिंदूंतील दैत्य, दानव, असुर यांच्यासारखेच देवाचे शत्रू म्हणून अनेक व्यक्ती आहेत पण त्या मानवकोटींत नाहींत. 'एन्जल्स' ( देवदूत ) म्हणून एक मानवाहून उच्च कोटी असून या एन्जलकोटीमध्यें कांहीं चांगले व कांहीं वाईट निघाले व त्यामुळें वाईट एन्जलांचा उर्फ दैत्यांचा स्वर्गांतून पाताळांत अवःपात झाला (देवदूत पहा ). सैतान हा त्यांच्यातील मुख्य दैत्य होय. सैतान व त्याचे अनुयायी यांचा मुख्य अपराध म्हटला म्हणजे परमेश्वराचा मत्सर. याबद्दलची कथा मिल्टन नामक इंग्रज कवीनें आपल्या ' पॅरॅडाइज लॉस्ट ' ( स्वर्गपदच्युति ) नांवाच्या महाकाव्यांत वर्णिली आहे.

**दैनहाट**—बंगाल इलाख्यांतील वर्द्वान जिल्ह्याच्या काटवा पोटविभागांतील एक गांव. भागीरथीनदीच्या उजव्या तीरावर आहे. लोकसंख्या सुमारें ५ हजार. पितळेचीं व कांशाचीं भांडीं येथें तयार करितात व लहान प्रमाणावर कापड विणण्याचें कामहि चालतें. मीठ,ताग,धान्य, विलायती कापड, कापूर व तंबाखूचा व्यापारहि येथें चालतो.

**दैववाद**—या तत्त्वाचा अर्थ असा कीं, त्रैलोक्यांतील सर्व गोष्टी एका बलिष्ठ अतिमानुष शक्तीच्या अनुल्लंघनीय व हुकूमानुसार घडत असतात. दैववाद व हेतुमूलकतावाद ( डिटरमिनिझम ) यांचा पुष्कळदां परस्पर घोटाळा करण्यांत येतो; पण वास्तविक हेतुमूलकतावादाचा अर्थ अगदीं भिन्न आहे. दैववादाचें मुख्य मर्म असें आहे कीं, त्यांत मानवी प्रयत्नाला (प्रयत्नवादाला) यत्किंचितहि

किंवा कार्यकारणवादाला स्थान नसतें. उदाहरणार्थ, एखादा दैववादी मनुष्य आपण अमक्या अमक्या दिवशीं मरणार असें मानूं लागला कीं, त्याचा असाहि विश्वास असतो कीं, त्याचा तो मृत्यु कांहीं केलें तरी किंवा कितीहि सावधगिरी ठेवली तरी टळणार नाहीं किंवा मागेंपुढें होणार नाहीं. दैववाद कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत सर्व धर्मांत आढळतोच. होमरच्या काव्यामध्यें ही कल्पना दृष्टीस पडते. दैव ईश्वरास बांधूं शकत नाहीं असें कांहीं धर्मांत मानतात, तर उलट देवावरसुद्धां दैवाचा ताबा असतो असें मत कांहीं धर्मांत विशेषतः हिंदुधर्मांत आहे (लिखितमपि ललाटे प्रोज्झितुं कः समर्थ । हें सुभाषित प्रसिद्धच आहे). ख्रिस्ती व इस्लामी धर्मांतहि दैववाद आहे. पण ख्रिस्ती धर्मांत एक सर्वसत्ताधारी ईश्वराव्यतिरिक्त दुसरी कोणतीहि शक्ति नसल्यामुळें दैववादाचें अधिष्ठानहि ईश्वरच आहे. पण सदसद्विवेकबुद्धियुक्त असा मनुष्य सर्वस्वीं दैवाधीन पंगु आहे,त्याला स्वप्रयत्नानें गोष्टी घडवून आणण्यास यत्किंचितहि वाव नाहीं, असें मानणें योग्य नसून प्रयत्नवादाला थोडा तरी अवकाश असला पाहिजे, असें मत ख्रिस्ती समाजांत मान्यता पावलें आहे; आणि चांगल्या चांगल्या ख्रिस्ती पंडितांनीं ईश्वराचें सर्वसत्ताधीशत्व मान्य करतांना पौरस्त्य देशांतला निर्भेळ दैववाद मान्य न करतां प्रयत्नवादाचाहि पुरस्कार केला आहे. इस्लामी धर्मांत मात्र किस्मेत किंवा नशीब हीच सर्व कर्तुमकर्तुम् शक्ति आहे असें तत्त्व आहे. पौर्वात्य देशांत भौतिक गोष्टींनां मुळींच महत्त्व न देतां सर्व सुखदुःखांनां दैवयोग म्हणून तोंड देणारे पुष्कळ इसम आढळतात.

भा र ती य.—संस्कृत भाषेंत दैव या अर्थाचे काल, विधि, अदृष्ट कर्म वगैरे आहेत. पण दैव व कर्म यांच्या अर्थांत थोडा फरक आहे. दैववाद किंवा कर्मवाद याचा हिंदुधर्मांत अर्थ अगदीं निराळा आहे. भारतीय दैववाद हा हिंदुधर्मांतील पुनर्जन्माच्या तत्त्वावर उभारलेला आहे. दैव किंवा अदृष्ट म्हणजे पूर्वीच्या सर्व जन्मांत प्राण्यानें जीं पापपुण्याचीं कृत्यें केलेलीं असतात त्यांचें फल म्हणून चालू जन्मांत त्या प्राण्याच्या आयुष्यांतलि प्रत्येक गोष्ट घडत असते. दैव व पुनर्जन्मविषयक सिद्धान्तांचें मूळ एका ब्राह्मण ग्रंथांत असून ते उपनिषद्कालापासून भारतीयांत रूढ आहेत. पुढें हे सिद्धान्त बौद्ध धर्मानेंहि मान्य केले. जैन धर्मांतहि ते आहेत. हिंदुस्थानांत अनेक तत्त्वज्ञानपंथ असून त्यांचे मुख्य दोन वर्ग आहेत; एक इच्छास्वातंत्र्य, नैतिक जबाबदारी, व पुनर्जन्म या गोष्टी मान्य करतो, व दुसरा ह्या तिन्ही साफ नाकारतो. जैन व बौद्ध हे दोन्ही धर्म पहिल्या वर्गापैकीं आहेत. पुनर्जन्मावर त्यांचा विश्वास असून पुनर्जन्म टाळणें हेंच मानवाचें मुख्य ध्येय मानतात. आत्म्याच्या हातून देहामार्फत जीं कार्यें होतात तेंच कर्म (पाप किंवा पुण्य होय.) होय. या कर्मामुळेंच आत्मा एका देहांतून दुसऱ्या देहांत जन्म घेतो. नवा देह कोणता मिळावयाचा ही गोष्ट कर्मांच्या बऱ्यावाईटपणावर ऊर्फ पापपुण्यावर अवलंबून असते. सत्कर्म किंवा पुण्य केलें असेल तर स्वर्गप्राप्ति होते किंवा भूलोकीं उच्च कुलांत जन्म होतो. पाप केलें असेल तर आत्मा अधोगतीला जातो आणि हलक्या प्राण्यांचा किंवा वनस्पतींचा किंवा निर्जीव द्रव्याचा जन्म पावतो. इंद्रियदमन व तपाचरण करून मनुष्य मुक्त होऊं शकतो.

आधुनिक हिंदु धर्मपंथांपैकीं शीखपंथ हा सर्वांत कट्टा दैववादी आहे. मानवांनां श्रीमंती, दारिद्र्य वगैरे निरनिराळी परिस्थिति कां प्राप्त होते याची शीखपंथीय लोक इतरांप्रमाणेंच मीमांसा करतात. पण प्रयत्नवाद किंवा इच्छास्वातंत्र्यवाद त्यांनां मुळींच मान्य नाहीं. प्रत्येक गोष्ट पूर्णपणें दैवाधीन असते असें ते मानतात. स्वर्ग मिळविणें हें शीखांचें धार्मिक ध्येय नसून मोक्ष किंवा पुनर्जन्म टाळणें हें ध्येय आहे. सनातन हिंदु किंवा भागवत धर्मांत दैववादाला कर्मवादाचें व इतर धर्मपंथांतल्यापेक्षां जरा निराळें स्वरूप प्राप्त झालें आहे. ('कर्मवाद' पहा).

**दैवज्ञ**—सुवर्णकारांची एक जात. दैवज्ञ (कोंकणस्थ) ज्ञातीची लोकसंख्या सुमारें ५० हजार असून त्यांच्या वस्तीचें मुख्य ठिकाण महाराष्ट्रांत दमणपासून कारवारपर्यंत असलेले जिल्हे होत; त्यांपैकीं कारवार जिल्हा (सु. १५०००), गोमांतक (सु. ३०००), रत्नागिरि जिल्हा (सु. १००००), कुलाबा जिल्हा (सु. ६०००), ठाणें जिल्हा (सु. ४५००) व मुंबई बेट (सु. ७०००). याशिवाय कोल्हापुर संस्थान, बेळगांव जिल्हा, सातारा व पुणें ह्या प्रांतीं सुमारें तीन हजारांवर यांची वस्ती आहे. हल्लीं यांची पंचायत अस्तित्वांत नाहीं. ज्ञातीच्या मालकीची प्रत्येक तालुक्यांतून एक दोन देवळें याप्रमाणें अनेक देवळें असून प्रत्येक देवळास दरसाल शेतजमीनीचें वगैरे रु. १००-१५० चें उत्पन्न असतें व त्यावर त्या त्या गांवांतील दैवज्ञब्राह्मण ज्ञातीची सत्ता असते. गोमांतक प्रांतांत ज्ञातीच्या मालकीचें कासारपाली येथें देवीचें संस्थान आहे. तसेंच पुणें येथील दुर्गादेवीचें देवालय ज्ञातीच्या मालकीचें असून त्यास पेशवाईपासून वतन चालू आहे. त्याचप्रमाणें इतर ठिकाणींहि गणपतीउत्सवाप्रीत्यर्थ व इतर धार्मिक कारणांकरितां पेशवाईपासून वर्षासनें चालू आहेत. ज्ञातीमध्यें कोणावर कोणत्याहि प्रकारें कर लादलेला नाहीं. पंचायतीचे निवाडे उपलब्ध नाहींत. पंचायत अस्तित्वांत नसल्यामुळें निकाल देण्याची वगैरे गरजच पडत नाहीं. ह्या ज्ञातीच्या सदृश (संस्कारांनीं व धंद्यानें) तथापि तीहून भिन्न अशी एकच जात असून ती देशस्थ पंचाल (किंवा देशस्थ दैवज्ञ) ही होय. त्याशिवाय केवळ धंद्यानेंच सदृश परंतु संस्कारांनीं भिन्न अशा १५-२० जाती आहेत. त्या देवांगन, खानदेशी, अहीर, लाड, वैश्य, अंगसाळी, कडू, वगैरे. ज्ञातीमध्यें पोटजाती नाहींत. जातीमध्यें विवाहादि संस्कार बहुतेक

स्वज्ञातीय उपाध्यायांकडून करविण्यांत येतात. स्वज्ञातीचा उपाध्याय न मिळाल्यास इतर ब्राह्मणज्ञातीच्या उपाध्यायाकडून करून घेण्यांत येतात. ही जात आपणाला ब्राह्मण म्हणविते व पंचाल समाजांत आपलें श्रेष्ठ स्थान असल्याबद्दलचे बरेंच पुरावे पुढें आणिते.

ज्ञातीसंबंधीं उपलब्ध असलेली बहुतेक माहिती, आज्ञापत्रें निवाडे, वगैरे कै. वे. शा. सं. नारायण रावजीशास्त्री क्षीरसागर यांनीं 'विश्वब्रह्म कुलोत्साह' ह्या ग्रंथांत संकलीत केलेली आहे. देवशिल्प ही शूद्रवृत्ति नव्हे; शिल्पाला वेद अशी संज्ञा आहे; यज्ञयागादि क्रिया विश्वकर्म्यानें उत्पन्न केल्या; शिल्पकर्म आणि ब्रह्मकर्म एकरूप आहेत; वैदिकमंत्रानें सुवर्णालंकार धारण; विश्वब्राह्मणशिल्पी व शूद्रशिल्पी यांचा भेद; आर्षेयब्राह्मणांस विश्वब्राह्मण पूज्य आहेत; विश्वब्राह्मण यज्ञांत पुरोहित होते; त्वष्टा प्रजापति उच्च प्रतीचा ब्राह्मण होता; पंचालशिल्पी हा ब्राह्मण जातीपैकीं एक भेद; पंचाल ब्राह्मण वैदिक धर्माधिकारी आहेत; पंचाल हा शब्द ब्राह्मणवाची आहे; पंचाल ब्राह्मणास दैवज्ञब्राह्मण नांव आहे; देवशिल्पकर्म हें ब्राह्मणांचें स्वाभाविक कर्म; शिल्पकर्म व यज्ञकर्म ब्राह्मणांनीं करावें, इत्यादि मतें या ग्रंथांत प्रतिपादिलीं आहेत.

गोमांतकांतून १६ व्या शतकांत पोर्तुगीजांच्या धर्मच्छलास कंटाळून रत्नागिरी व साष्टी प्रांतीं बरींच दैवज्ञब्राह्मणज्ञातीय कुटुंबें आलीं असें सांगतात. पुढें प्रथम साष्टी प्रांतांतून व अष्टागरांतून व नंतर रत्नागिरी जिल्ह्यांतून ह्या ज्ञातीचे लोक मुंबई शहरांत व्यापारधंद्यानिमित्त येऊन राहिले. गेल्या पन्नास वर्षांत रत्नागिरी जिल्ह्यांतून कोल्हापूर संस्थानांत धंद्यानिमित्त बरींच कुटुंबें जाऊन राहिलीं असून मुंबई शहरांतून बडोदा, इंदूर, गुजराथ प्रांत, वऱ्हाड वगैरे ठिकाणीं नोकरीधंद्यानिमित्त कित्येक मंडळी गेली आहेत. ह्यांपैकीं कांहीं लोक मोठ मोठ्या हुद्द्यांवर आहेत.

या समाजांत पुरुषांचा पोषाख म्हटला म्हणजे एक धाराबंदी, बंदांचा लांब बाह्यांचा अंगरखा, धोतर, जोडा व दक्षिणी पागोटें. मुंबईतील कांहीं मंडळी पारशी घाटाचें पागोटें वापरतात. कुलाबा व रत्नागिरी जिल्ह्यांतील कित्येक तालुक्यांतील स्त्रिया केसांची वेणी व त्यांत मूद, अग्रफूल, गुलाबाचें फूल, वगैरे दागिने घालतात. इतरत्र बहुतेक ठिकाणीं अंबाडा घालण्याचा प्रघात आहे. अंबाडा घालणाऱ्या स्त्रिया अग्रफुलाखेरीज पूर्वोक्त सर्व दागिने घालतात. गळ्यांतील दागिने म्हटले म्हणजे सरी, ठुशी, वज्रटीक चिंचपेटी, हे असून त्यांत हल्लीं मोहनमाळ (नेकलेस) वगैरे दागिन्यांची भर पडत आहे. मनगटांत घालावयाचे दागिने, भरीव गोट, जोडका, पाटल्या, वाळे, इत्यादि दागिने असून त्यांत हल्लीं निरनिराळ्या प्रकारच्या सोन्यामोत्यांच्या बांगड्यांची भर पडली आहे. दंडांत वांकी, वेळा, बाजूबंद वगैरे दागिने उपयोगांत आणितात. नववधूच्या बाबतींत सोन्याचा कमरपट्टा, वेणीचे नग, पांचूचा हार अद्यापि कित्येक ठिकाणीं घालण्यांत येतात. पायांत चांदीचीं जोडवीं, व कांहीं कालपर्यंत तोडेहि असतात. नाकांत घालण्यास हिरकणीची टीक असलेल्या मोत्यांच्या नथीचा उपयोग सर्वत्र सारखा होतो. स्त्रीपुरुषांच्या-विशेषतः पुरुषांच्या पोषाखांत आधुनिक कालानुसार पुष्कळ फरक पडत चालला असून नवीन शिकलेल्या पिढींतील पुष्कळ तरुणांमध्यें 'अप-टू-डेटेडनेस' उतरत चालला आहे, अशी माहिती दैवज्ञ समाजोन्नति परिषदेचे चिटणीस देतात.

या ज्ञातींत विधवापुनर्विवाहाची चाल केव्हांहि प्रचलित नसून कित्येक निराश्रित विधवांस व मुलांस ज्ञातीफंडांतून सवडीप्रमाणें मदत घेली जाते. रखेल्या स्त्रियांपासून अगर अधर्म व्यवहारापासून झालेल्या संततीची गणना ज्ञातींत होत नसून तिची स्वतंत्रहि जात बनलेली पहाण्यांत नाहीं. इतर सुवर्णकार वर्गापेक्षां दैवज्ञ समाज अधिक सुशिक्षित दिसतो; व आपली सार्वांगिक सुधारणा करण्याचे त्याचे प्रयत्न चालू आहेत. त्याकरितां " दैवज्ञ समाजोन्नति परिषद " स्थापिली असून, " दैवज्ञ प्रबोधिनी " नांवाचें एक पाक्षिक आज अकरा वर्षे चालत आहे. [ संदर्भवाङ्मय—क्षीरसागर-विश्वब्रह्मकुलोत्साह, विश्वब्रह्मपंचालांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास, विश्वकर्मान्वयभूषण, पंचालब्राह्मणनिर्णय; प्रबोधिनी पाक्षिक पत्र; रा. ब. मा. वेदक, चिटणीस दैवज्ञ समाजोन्नति परिषद ( सेंट्रल कमिटी ) यांजकडून आलेली माहिती. ]

**दोआव**—दोआव म्हणजे दोन नद्यांचा संगम अथवा एकमेकांस मिळणाऱ्या दोन नद्यांच्या मधील प्रदेश. पंजाबांतील दुआब प्रख्यात आहेत. त्यास अरब ग्रंथकार दोश—ई—आब असें म्हणत. चीनाब, झेलम, रावी, बिआस व सतलज यांचा सिंधूशीं संगम होण्याच्या पूर्वी, त्या दोहोंच्या मधील प्रदेशास दोआव म्हणतात. प्राचीन काळीं या पांचहि नद्या एकाच ठिकाणीं मिळत असें अरब ग्रंथकार सांगतात. हल्लींच्या भावलपुर संस्थानांतील बाघउा गांवाजवळ हें ठिकाण होतें असें म्हणतात. आरीअननें चार दुआबांचीं नांवें बरोबर दिलीं आहेत. ग्रीक भाषेंत दोआब या अर्थी मेसापोटेमिया हा शब्द आहे. हल्लीं टायग्रीस व युफ्रेटीस या दोन नद्यांमधील प्रदेशास मेसापोटेमिया हेंच नांव आहे. पंजाबांत बारीदोआब (सतलज-रावीमधील), रेचना दोआब ( रावी-चिनाबमधील ), जेच दोआब ( चिनाब-झेलममधील ) व सिंधसागर दोआब ( झेलम-सिंधुमधील ) हे दोआब आहेत. दक्षिण हिंदुस्थानांत कृष्णा व तुंगभद्रा यांमधील दुआब प्रसिद्ध आहे. गंगाजमना यांच्यामधील अंतर्वेद प्रांतासहि दोआब म्हणतात. यमुनेचे कांहीं मोठमोठे कालवे काढलेले आहेत. त्यांच्यामधील प्रांतासहि कधीं दोआब म्हणतात. शिवालिक पहाडापासून

तों खाली अलाहाबादपर्यंतच्या सर्व प्रदेशास हें नांव आहे. इटावा ते अलाहाबादपर्यंत अन्तर्वेदी म्हणण्याची चाल आहे.

दोआबमध्यें सहाराणपूर,मुझफ्फरनगर,मीरत,बुलन्दशहर, अलिगड, मथुरा व आग्रयाचा कांहीं भाग,मैनपुरी, इटावा व फरुक्काबाद जिल्ह्यांचा भाग,कानपूर, फत्तेपूर व अलाहाबादचा कांहीं भाग, ह्यांचा समावेश होतो. येथील जमीन स्वाभाविकतःच फार सुपीक आहे व वरचा गंगेचा कालवा, खालचा गंगेचा कालवा व पूर्व यमुना कालवा ह्यांनीं आणखी त्यांत भर घातली आहे. येथें गहूं पुष्कळ पेरतात. मध्यें थोडीशी जागा उसर नांवाच्या सपाटीनें व ढाक नांवाच्या जंगलानें व्यापलेली आहे. त्याशिवाय जिकडे तिकडे लागवडींत आणलेली पिकाऊ जमीन दृष्टीस पडते. १८ व्या शतकाच्या अखेरीच्या व सध्यांच्या या दुआबाच्या स्थितींत महदंतर आहे. यांत कानपूर, हाथरस, मीरत, सहारणपूर, अलाहाबाद हीं व्यापारी मुख्य शहरें होत. मोठमोठ्या एकमेकींनां मिळणाऱ्या दोन नद्यांच्या मधील प्रदेश या अर्थानें जगांत असे दोआब पुष्कळ आढळतात. [ रावर्टी--अफगाणिस्तान; इंडि. अँटि. पु. ३४ पृ. २५४; इंपे. ग्याझे. ]

**दोडका**--ही एक भाजीची वेली आहे. हीस लॅटिनमध्यें लफ्फा अॅक्यु टॅंगुला, संस्कृतमध्यें कोशातकी, मराठींत दोडका, किंवा शिराळें, हिंदींत तुराई, गुजरार्थीत तुरिया इत्यादि नांवें आहेत. या वेलाचीं पानें काळसर हिरवीं, लांबट व चिरकीं असतात. पानांच्या शिरा पांढऱ्या असतात व त्या स्वच्छ दिसतात. घोसाळ्याच्या पानांच्या शिरा तशा दिसत नाहींत. फुलें पिवळीं असतात. फळें ६ ते १८ इंच लांबीचीं व ३।४ इंच जाड असतात. फळास ९ ते ९ धारा असतात. दोडके उंसांत लावतात तेव्हां त्यांची लागण उन्हाळ्यांत होते. कोणी फळबागेंत लावतात, तेव्हां फळझाडांस पाणी देतांना दोडक्याचीं आळीं मोकळ्या जागेंत लावितात. परंतु स्वतंत्र लागण उन्हाळा व पावसाळा या दोन्ही काळांत करितात. थंडींत दोडक्याचे वेल चांगले वाढत नाहींत. वेल जमिनीवर, कुंपणावर, मांडवावर, झाडावर अगर छपरावर चढवितात. दोडक्याचें बीं लावितांना तें गोडच्या जातीचें आहे अशाबद्दल खात्री करून घ्यावी. कडू दोडका औषधाशिवाय कोणत्याहि उपयोगाचा नाहीं. कधीं कधीं गोड दोडक्याच्या वेलासहि कडू फळें येतात. परंतु तीं देठाजवळ कडू असतात. भाजीकरितां चिरतांना प्रत्येक फळ चाखून मग चिरावें. ज्या वेलास गोडीं फळें येत आहेत तो वेल म्हैस किंवा इतर ढोरानें चावल्यास त्याला चावल्यानंतर येणारीं फळें सर्व कडू होतात हा अनुभव आहे म्हणून दोडक्याचा वेल म्हैस अगर ढोर न चावील असा बंदोबस्त ठेवावा. दोडक्याची मोकळी व पातळ भाजी अगर चटणी करितात. दोडक्याची भाजी जास्त खाल्ल्यानें कित्येकांस आमांश होतो असें म्हणतात.

**दोड-बळ्ळापूर**, तालुका.--म्हैसूर. बंगलोर जिल्ह्याचा एक वायव्येकडील तालुका. क्षेत्रफळ ३१० चौरस मैल. लोकसंख्या १९११ सालीं ७३८३३ होती. ह्या तालुक्यांत एकच मोठें गांव दोड-बळ्ळापूर आहे. खेडीं २७८. उत्तर भागांत पहाडी जंगलमय प्रदेश आहे. येथें गोरिबिदनूर ही खिंड आहे. ह्या तालुक्यांतून अर्कावती नदी वहाते. मोठे मोठे तलावहि ह्या तालुक्यामध्यें आहेत. पश्चिम व दक्षिण भागांत कांहीं ठिकाणीं जंगल, कांहीं ठिकाणीं कुरणें असलेला असा प्रदेश आहे. एकंदरींत जमीन सुपीक आहे. येथें तंबाखूचें व बटाट्यांचें मुख्य पीक होतें.

गां व.--दोड बळ्ळापूर तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें अर्कावती नदीतीरीं बंगलोर शहरापासून २३ मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९११ ) ७२७२. १२ व्या शतकांत हें चांगल्यापैकीं व्यापाराचें गांव होतें. निरनिराळ्या काळीं तें विजापूर, मराठे, मोंगल ह्यांच्या ताब्यांत गेलें. शहाजीला हें गांव जहागिरींत मिळालें होतें. सरतेशेवटीं हें अलिकुलीखानच्या ताब्यांत आलें होतें. हैदरअलीनें हें गांव १७६१ सालीं घेतलें. येथें म्युनिसिपालिटीची स्थापना स. १८७० मध्यें झाली.

**दोमरिया गंज**--संयुक्तप्रांतांतील बस्ति जिल्ह्याची एक वायव्येकडील तहशील. ह्यांत रसुलपूर व बन्सी (पश्चिम) ह्या दोन्ही परगण्यांचा समावेश होतो. क्षेत्रफळ ५८६ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ३०६१६१. एकंदर खेडीं ११११ असून एक बिसकोहर नांवाचा मोठा गांव आहे. राप्ती नदी ह्या तहशिलींतून पश्चिम-पूर्व वहाते. ह्या नदीच्या आसमंतांतील प्रदेश फार सुपीक आहे. तीस 'भाट' ही संज्ञा आहे. तहशिलीच्या उत्तरेकडील भागांस नेपाळी तराईचें दलदलीचें स्वरूप प्राप्त झालें आहे.

**दोर व दोरखंडें**--हिंदुस्थानांतील शेतकरी व डोंगरांतील लोक दोर करण्याच्या कामीं पुष्कळ तऱ्हेच्या तंतूंचा उपयोग करितात. गठ्ठे बांधण्यास अथवा जूं बांधण्यास ते कोणत्या तरी झाडाची साल अथवा फांदी यांची दोरी करतात. कांहीं रोपांचे केलेले दोर खेड्यांतील दुकानांत अथवा बाजारांत विकत मिळतात. केव्हां केव्हां हीं रोपें शेताच्या लहान तुकड्यांत लावतात. कधीं कधीं यांचीं शेताच्या सभोंवतीं कुंपणें घालतात. हिंदुस्थानांतील तंतूंच्या साधनबलासंबंधीं पुष्कळ शोध लावण्यांत आले यांचें मुख्य कारण म्हणजे रशियन लागाच्या ऐवजीं व ब्रिटिश आरमारांत दुसऱ्या जास्त उपयोगी हिंदी दोरांची मागणी हें होय. रॉक्सबरो नांवाच्या प्रसिद्ध वनस्पतिशास्त्रज्ञानें या बाबतींतील आपल्या शोधांची बरीच माहिती लिहून ठेविली आहे. रायले व बेडेन पॅवेल यांनींहि पुष्कळ माहिती दिली आहे. खालील झाडांपासून तंतू निघतातः--ओलकत बोळ, मेंढ, कुंवार, हिंदी अगर, मांदार, भांग, नारळी, चिंच, अंबाडी, कापूस, गौळी, अंवाडा, केळ, शिंदी, कुंस, शेवरी, सहदेवी इत्यादि. यूरोपिअन

यंत्रांच्या सहाय्यानें दोर करणारे कारखानदार वरील पैकीं फार थोडे तंतू वापरतात. ते काथ्या, ताग, सनताग, कापूस, दखणी ताग वगैरे माल वापरून शिवाय कुंवार व सिसल, रशियन ताग आणि मॅनिला वगैरे परदेशांतून आणवितात. अलीकडे हिंदुस्थानांत कुंवारची मोठ्या प्रमाणांत लागवड करतात. मॅनिला तागाची लागवड विशेष फलप्रद झाली नाहीं. बांधण्यासाठीं लागणारे दोर कमी किंमतींत तयार करण्याकरितां अलीकडे अळशीचीं झाडें व अंबाडीचा उपयोग करण्याकडे लक्ष लागलें आहे. कलकत्त्यांतील एका गिरणीनें स्वस्त परंतु यूरोपियन पद्धतीवर दोऱ्या तयार केल्या होत्या. त्यांचे गुंडाळे असून त्या वेगवेगळ्या रंगाच्या होत्या. ज्यूटचे देखील दोर तयार करतात. तंबूसाठीं बऱ्याच वर्षांपासून सुताच्या दोऱ्या उपयोगांत आणतात. उत्तर हिंदुस्थानांत 'मुंज' व दक्षिणेकडे 'काथ्या' यांचा उपयोग करतात. मासे मारण्यासाठीं व इतर तऱ्हेचे सुरेख दोर तयार करण्यासाठीं या तंतूंचा उपयोग करतात.

दोर व दोरखंडाचा व्यापार.—१९०४ सालीं हिंदुस्थानांत असलेल्या १९ कारखान्यांपैकीं १२ बंगालमध्यें, ६ मद्रासेंत व, १ ब्रह्मदेशांत होता. १९०६-०७ सालची आयात सुमारें ७ लक्षांची असून निर्गत यापेक्षां १५ हजारांनीं जास्त होती. आयात मालाचा बहुतेक पुरवठा संयुक्त राज्यांतून होत असून त्याच्या खालोखाल चीन (हाँगकाँग) व संयुक्त संस्थानें यांचा नंबर लागतो. बहुतेक माल मुंबई व ब्रह्मदेशांत जातो. याच्या खालोखाल बंगालमध्यें जातो. निर्गत मालाचे मुख्य गिऱ्हाईक स्ट्रेटसेटलमेंट असून त्याच्या खालोखाल संयुक्त राज्य, केपकालनी, अरबस्तान, इराण, सयाम व आशियांतील तुर्कस्तान हे होत. यांतील निर्गत माल बंगाल प्रांत (१९०६-०७)पुरवीत असून मद्रासचा दुसरा नंबर आहे [ वाट ].

दोर (यांत्रिक).—गिरण्यामधून हल्लीं दोरांचा उपयोग शक्ति वाहण्याकडे फार करतात. हे दोर कापसाच्या सुताचे करतात. यांची जाडी सरासरी ¾ इंचांपासून ते २½ इंचापर्यंत असते. परंतु १¾ इंच जाडीच्या पुढचे दोर बहुधां वापरीत नाहींत. कारण ते बारीक दोराइतके चांगले चालत नाहींत.

मोठ्या शक्तिसंग्राहक चक्रावरून शक्ति पलीकडे नेत असतांना दोरांची गति दर मिनीटास ४००० ते ५००० फूट ठेवतात. इतर ठिकाणीं वापरलेल्या दोरांची गति दर मिनीटास २५०० ते ६००० फूट असते. दोर-चाकें बिडाचीं असतात. दोर बसण्यासाठीं त्यांवर खांचा (खोबण) ठेवलेल्या असतात. या खोबणींच्या बाजू एकमेकींशीं ४५° चा कोन करतात. दोर खोबणीच्या बाजूवर बसतो. बुडाला चिकटत नाहीं. दोर चाकें समोरासमोर असतील तर या ४५° कोनाच्या खोबणी चालतात पण जर समोरासमोर नसतील तर चाकावरील खोबणी जास्त रुंद केल्या पाहिजेत.

दोरांचे जोड करतांना जोडावयाच्या टोकांचे पेड सोडवून घेतात व एकाचे पेड दुसऱ्याच्या पेडांत भरून जोड करतात. जोडाच्या लांबीचें प्रमाण असें आहे कीं दोराच्या परीघाच्या ३० पट लांब तरी जोडाची लांबी लागते.

दोराच्या व्यासाच्या ३० पट तरी चाकाचा व्यास लागतो कारण चाक जितकें मोठें असेल तितका दोर कमी वाकतो व कमी वाकण्यानें कमी तुटतो. चाकामधील अंतर २० ते १०० फूट असावें. दोर नेहमीं आडवे राहतील असें शाफ्टींग बसवावें. दोराची खालची बाजू हीच नेहमीं ओढणारी बाजू असावी. दोरांची योजना करतांना त्यांच्याखालीं व आजूबाजूस पुष्कळ जागा मोकळी ठेवावी. दोर झिजण्याच्या कारणांपैकीं एक मुख्य कारण असें आहे कीं दोर-गाळ्यामध्यें लांकडाचा किंवा लोखंडाचा एक भाग असा असतो कीं तो दोरापासून दूर आहेसा वाटतो. परंतु यंत्र सुरू करतांना किंवा बंद होतांना दोर फार सैल सुटतात त्यावेळीं हा भाग दोरांना घासून दोर खराब होतात. ४००० घोडयाच्या किंवा अश्वशक्तीच्या (हॉर्सपॉवर) इंजनाला जास्तींत जास्त म्हणजे ६४ दोर १¾ इंची लावलेले आहेत. १¾ इंची ४० दोर बसतील अशीं चाकें पुष्कळ ठिकाणीं चालू आहेत, या चाकांच्या परिघामध्यें बहुतेक करून ८,१०,१२,१६,२४ पुडे असतात. ८ फुटांपेक्षां कमी व्यास असलेलीं चाकें अखंड असतात.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ८ ते १२ | फूट | व्यासाचीं | चाकें | २ | पुडयांचीं | करतात. | |
| १३ „ २० | „ | „ | „ | ६किंवा८ | „ | „ | „ |
| २० „ २४ | „ | „ | „ | १० | „ | „ | „ |
| २४ „ ३० | „ | „ | „ | १२ | „ | „ | „ |
| ३२ „ पुढें | „ | „ | „ | १६ ते २४ | „ | „ | „ |

चाकांचे आरे ८,१०,१२,१४ असतात. मोठालीं व रुंद चाकें असल्यास आरे दुहेरी असतात. घुघले अथवा तुंबे ५ ते ८ फूट व्यासाचे फारच मोठ्या चाकांना वापरतात. बनावट, ताण, चाकांचा परीघ व खोबणीचा आंतील भाग यावर दोराचा टिकाऊपणा असतो. [ ले. के. व्ही. मनोहर. ]

**दोस्तअल्ली**—कर्नाटकचा एक नबाब. वाघिणगिऱ्याच्या नायकास हुकमतींत आणण्याकरितां, इसवी सन १७०६ त औरंगझेबानें दाऊदखानास कर्नाटकांतून वर बोलाविलें तेव्हां, दाऊदखानानें आपल्या मागें कर्नाटक पैनघाटाचा कारभार पाहण्यासाठीं, सादतउल्लाखान नांवाच्या सरदाराची नेमणूक केली होती. दोस्तअल्ली हा या सादतखानाचा पुतण्या होता. १७३२ सालीं दोस्तअल्ली हा आपल्या काकाच्या मागून कर्नाटक प्रांताचा नबाब झाला. परंतु यानें अधिकारसूत्रें हातीं घेण्याकरितां निजामउल्मुल्क किंवा मोंगल बादशहा यांपैकीं कोणाचीच परवानगी घेतली नाहीं. पुढें १७४० सालीं मराठ्यांनीं कर्नाटकांत स्वारी करून दामुलचेरी घाटाजवळ दोस्तअल्लीवर हल्ला केला, व त्याला ठार करून त्याच्या सैन्याचा पराभव केला. दोस्तअल्लीचा दिवाण मीरअसीद यास या हल्ल्यांत मराठ्यांनीं कैद

दोस्तअलीस सफदरअली नांवाचा एक मुलगा असून त्याची मुलगी( ? ) चंदासाहेब यास दिली होती. बापाच्या मृत्यूनंतर सफदरअलीनें मराठ्यांस पैसा देऊन त्यांच्याशीं स्नेह करून घेतला.

**दोस्त मुहम्मदखान**—काबूल कंदाहारचा बुद्धिमान, शूर, बरकझै वंशाचा राजा. अबदालीचा नातु जमानशहा हा गादीवर असतां, त्याचा वजीर फत्तेखान बरकझै यानें आंधळा केल्यानें, तो पळून इंग्रजांच्या आश्रयास लुधिआन्यास आला. त्याचा भाऊ शहा सुजा यासहि फत्तेखानानें होकलून दिलें व तोहि इंग्रजांकडे आला. फत्तेखानाचा भाऊ दोस्तमुहम्मद होय. भावाभावांत तंटे होऊन फतेखान मारला जाऊन दोस्तमुहंमद हा गादीवर आला.

इराण व रशिया यांची दृष्टि अफगाणिस्तानावर होती. शहासुजास पुढें करून रणजितसिंग व इंग्रजहि तिकडे शिरूं पाहत होते; शिवाय इंग्रजांस रशिया हिंदुस्थानावर येईल ही एक भीति होती. इराणनें स. १८३७ त हिरातला वेढा दिला, परंतु मुहम्मदनें तो उठविला.

पेशावरप्रांत रणजितसिंहाकडे होता, तो परत घेण्याची खटपट मुहम्मदनें इंग्रज व रशियाकडे चालविली. इंग्रज रणजितसिंगास भ्याला होता. रशियानें पेशावर परत घेऊन देण्याचें कबूल केलें, तेव्हां मुहम्मद त्यास मिळला. त्याप्रमाणें इराणहि त्यांनां मिळाला. रशिया आंत खास येणार म्हणून गव्हर्नर जनरल आक्लंड यानें अफगाणिस्तानावर स्वारी करण्याचें ठरविलें. रणजितसिंग, इंग्रज व शहासुजा एक झाले व अफगाणिस्तानावर इंग्रजी फौज निघाली ( १८३९ ). कंदाहारास जाऊन इंग्रजांनीं शहासुजास गादीवर बसविलें (मे) व गिझनीचा किल्ला घेतला ( जुलई ). तेव्हां मुहम्मदानें कळविलें कीं, सुजाची दिवाणगिरी आपल्याला दिल्यास आपण राज्य सोडतों. पण इंग्रजानें तें ऐकलें नाहीं, तेव्हां मुहम्मद बुखाऱ्यास पळाला व सुजा काबूल येथें दाखल झाला ( आगष्ट ).

पुढें मुहम्मद इंग्रजांच्या स्वाधीन झाला, त्याला त्यांनीं कलकत्त्यास आणून ठेविलें ( मे. १८४१ ). तिकडे अफगाणांनीं बंड करून ( नोव्हेंबर ) मुहम्मदचा पुत्र अकबरखान यास पुढारी करून सर्व इंग्रजांची ( बायकामुलें सोडून ) कत्तल केली. पंधरा हजार फौजेपैकीं फक्त एकच मनुष्य वांचला ( जानेवारी १८४२ ) पुढल्या वर्षी इंग्रजांनीं अकबराचा पराभव केला व काबूल घेतलें ( सप्टेंबर ); परंतु यावेळीं सुजाचा खून झाला होता. शेवटीं दोस्तमुहम्मदास सोडलें व तो काबुलास परत गेला ( नोव्हेंबर ). पुढें मुहम्मद गादीवर बसला, तो शेवटपर्यंत राज्य करून ९ जून १८६३ रोजीं मेला. त्याच्या मागें त्याचा धाकटा पुत्र शेरअली हा अमीर झाला. [ *बील;* हंटर. ]

**दोहद**, ता लु का.—मुंबई इलाख्यांतील पंचमहाल जिल्ह्याचा पूर्वेकडील एक तालुका. ह्यांत झालोद पेट्याचा समावेश होतो क्षेत्रफळ ६०७ चौरस मैल. यांत दोहद गांव व ११८ खेडीं आहेत लोकसंख्या ( १९११ ). ७३५२४. तालुक्यांत दाट जंगलें असून प्रदेश पहाडी आहे. हिंवाळ्यांत कधीं कधीं बर्फ पडतें. अनास नदी पूर्व सरहद्दीवरून वहाते.

शहर(दोहद किंवा द्वाहाद)–मुंबई, पंचमहाल जिल्हा. दोहद तालुक्याचें मुख्य शहर. पू. रे. ७०°१८′व उ. अ. २०°–५०′. हें गुजराथ व माळवा यांमधील मुख्य घाटाजवळ असून चारी बाजूंस लहान टेंकड्यांची रांग आहे. लोकसंख्या ( १९११ )९३०३. हें हमरस्त्यावर असल्यामुळें या शहरीं बराच व्यापार चालतो.

येथें पूर्वी दधीचि ऋषी राहत असे अशी आख्यायिका आहे. १४ व्या शतकाच्या अखेरपर्यंत हें रजपुतांच्या ताब्यांत होतें. स. १४११ त तें पहिल्या सुलतान अहंमदानें जिंकलें. १६ व्या शतकाच्या अखेरीस तें अकबर बादशहाच्या ताब्यांत जाऊन स. १७५० त शिंद्याच्या ताब्यांत गेलें स. १८५३ त येथें इंग्लिशांची सत्ता सुरू झाली.

या शहराचे पूर्व दोहद व पश्चिम दोहद असे दोन भाग करितात. त्यांपैकीं पूर्व दोहद नवीन वसलेलें असून पश्चिमेकडील वस्ती जुनाट आहे. जुन्या दोहदमध्यें एक सुंदर तलाव असून त्यामधील दोन बेटांवर दौलतराव शिंद्याचे व्याही बापूसाहेब पाटणकर यानीं दोन क्रीडाभुवनें बांधलीं होतीं. तलावाच्या पूर्वेस डोंगरवाडा नांवाचा बाग आहे; तेथें पूर्वी एका रजपूत सरदाराचा वाडा होता. याशिवाय चंदन तलाव, पांचवाडा मशीद वगैरे ठिकाणें पहाण्यासारखीं आहेत. नवीन दोहदमध्यें स. १६१९ त शहाजहान बादशहानें औरंगझेबाच्या जन्मानिमित्त बांधलेली धर्मशाळा व पाटणकरानीं बांधलेली तीनमजली बारद्वारी इमारत हीं प्रेक्षणीय आहेत. अलीकडे या धर्मशाळेंत सरकारी कचेऱ्या भरतात.

**दौंड**—मुंबई, पुणें जिल्हा. भिमथडी तालुक्यांतील दौंड पेट्याचें मुख्य गांव. हें पुण्याच्या पूर्वेस ४८ मैल आहे. येथें भैरवदेव व विठोबाचीं अशीं दोन देवालयें आहेत. दोन्ही देवळें महादजी शिन्दे यानें बांधलीं. एप्रिलमध्यें दरवर्षी यात्रा भरते. दौंड–मनमाड रेलवे, दौंड–बारामती रेलवे व ग्रेट इंडियन पेनिन्शुला या शाखांचें हें जंक्शन आहे.

**दौर**—वायव्य सरहद्दीवरील प्रांत. उत्तर वझिरिस्तान एजन्सींतील एक खोरें. टोची नदीच्या प्रदेशांत हें खोरें आहे. भोंवतालीं वझीर टेंकड्या आहेत. वेझदा ( ७००० फूट ) हें त्यांचें अत्युच्च शिखर आहे. हिंवाळ्यांत हवा आरोग्यदायक असते पण तीच उन्हाळ्यांत रोगट व मलेरिया उत्पन्न करणारी असते. पाऊसपाणी १५ इंच. सन १७०० मध्यें काबूल सेनापति बहादुरशहा हा बन्नूला जातांना ह्या खोऱ्यांतून गेला होता. पण पुढील वर्षी सुखरूप परत जाऊं देण्यास त्यास बरीच रक्कम भरावी लागली. कालपरत्वें दौरचें खोरें दुराण्यांच्या हातीं गेलें. परंतु खरें

पाहतां तें १८९३ पावेतों स्वतंत्रच होतें. पण ब्रिटिश सरकारनें अफगाणिस्तानच्या अमीराशीं केलेल्या तहानें हें ब्रिटिशांच्या अमलाखालीं आलें. यांतील लोक दौरी जातीचे आहेत. हे लोक जरी कांहींसे मायेफिरू असले तरी कडवे नाहींत. सुमारें २१००० लोक आपली उपजीविका शेतकीवर चालवितात. जमीन अत्यंत सुपीक असून मका, तांदूळ, बाजरी, ऊंस, गहूं, जव हीं धान्यें पिकतात. दुसऱ्या ठिकाणांहून कापूस आणून येथें कापड विणतात. कास्तकार लोकांना उत्पन्नाच्या दोनतृतीयांश धान्य सार म्हणून द्यावें लागतें. दौर हें उत्तर वझिरिस्तानच्या पोलिटिकल एजंटाच्या अंमलाखालीं आहे व त्याला मदतनीस म्हणून तहशिलदार व नायब तहशिलदार आहेत. मिरमशहा, इदक, इस्सूखेल व तप्पी येथें सरकारी शाळा आहेत.

**दौलतराव शिंदे**—शिंदे घराण्यांतील एक संस्थानिक. महादजी शिंद्याचा सावत्र भाऊ तुकोजी म्हणून होता, तो पानिपतांत ठार झाला; त्याचा पुत्र आनंदराव, त्याचा दौलतराव. याच्या आईचें नांव मैनाबाई. महादजीस मुलगा न झाल्यानें त्यानें याला दत्तक घेण्याचें ठरविलें; परंतु तो एकाएकीं वारल्यामुळें (१७९४) दत्तविधान झालें नाहीं व त्यामुळें दौलतरावास सरदारीचीं वस्त्रें पेशव्यांकडून मिळालीं तेव्हां महादजीची नायको लक्ष्मीबाई हिनें हरकत घेतली होती; यावेळीं दौलतराव १४ वर्षांचा होता.

या सुमारास अनेक भानगडींचीं राजकारणें पेशवाईत उत्पन्न झालीं. दौलतरावास अनुभव व पोक्तविचार नसल्यानें मराठी राज्यांत याच्या वागण्यानें अनेक घोटाळे उत्पन्न झाले. खर्ड्याच्या लढाईत दौलतराव हजर होता (१७९५). तिकडून परत आल्यावर तो पुण्याहून उत्तरेकडे निघाला. इतक्यांत सवाईरावसाहेबांनीं प्राणत्याग केला. तेव्हां अडचणीचा प्रसंग जाणून नानानें त्याला तावडतोब परत बोलाविलें; उद्देश हा कीं त्याच्यासारख्या फौजबंद सरदारास आपल्या बाजूस ओढून यशोदाबाईच्या मांडीवर दत्तक देऊन राज्य चालवावें. पण या मसलतीस दौलतरावाचा दिवाण बाळोबातात्या प्रतिकूल होता. रावबाजीनें बाळोबास प्रथम फोडून त्याच्या करवीं दौलतरावासहि फोडलें आणि आपल्यास गादीवर बसविल्यास त्याला ४ लाखांचा मुलुख व पुण्यास असेपर्यंतचा सैन्यखर्च देण्याचें कबूल केलें. दौलतराव यावेळीं लहान, बिनअनुभवी व पैशाचा लोभी होता. या लोभीपणानें त्यानें रावबाजीच्या कारकीर्दीत पुष्कळ वेळां वचनें मोडून उलटसुलट बाजू घेतल्या होत्या. तसेंच नानाला कैदेंत टाकण्यासहि त्यानें कमी केलें नाहीं आणि होळकराशीं भांडून इंग्रजांस बळावूं दिलें. पुढें त्याला इंग्रजांचा कावा कळला व त्यानें त्यांच्याविरुद्ध चळवळहि केली; परंतु ती फार उशीरा केली गेली.

दौलतराव रावबाजीस गादीवर बसविणार हें कळतांच नानानेंच बाजीरावास पुण्यास आणलें. इतक्यांत दौलतराव पुण्यास आला व बाजीरावानें त्याला नानाला कैद करण्यास सांगितलें. हें समजतांच नाना महाडाकडे निघून गेला. वास्तविक बाळोबाच या कारस्थानाचा कर्ता होता. त्याच्या मनांत नानाचा कारभार आपल्या हातीं घ्यावयाचा होता; बाळोबा शेणवी असल्यानें ब्राह्मणांचा द्वेष करी.

बाजीराव गादीवर आल्यावर तो पुन्हां नानाकडे संधान बांधूं लागला व कबूल केलेला पैसा देईना म्हणून बाळोबानें परशुरामभाऊस नानांच्या विरुद्ध फोडून रावबाजीस कैद करून चिमाजीआप्पास यशोदाबाईस दत्तक देऊन राज्याचा कारभार आपल्या हातीं घेतला (मे १७९६).

नानानें कारस्थान करून रावबाजी व दौलतराव यांना बाळोबाविरुद्ध आपल्याकडे वळवून घेतलें; दौलतरावास बरीचशी रक्कम कबूल केली व रावबाजीस गादीवर बसविण्याचें ठरविलें. तेव्हां दौलतरावानें बाळोबास कैद केलें. मात्र चिमाजी आप्पा व परशुरामभाऊ हे पळून गेले. पुन्हां रावबाजी गादीवर आला. याच वेळीं नानाला न समजतां रावबाजीनें दौलतरावाशीं एक गुप्त तह केला होता कीं, नानांपासून आमचें रक्षण सतत करावें, त्याबद्दल आम्ही दोन कोट रु. देऊं आणि सर्जेराव घाटग्याची मुलगी (ही दौलतरावाच्या मनांत फार भरली होती) तुम्हांस करून देऊं. त्याप्रमाणें हें लग्न होऊन सर्जेरावास दौलतरावाची दिवाणगिरीहि मिळाली.

या सुमारास तुकोजी होळकर मेला व त्याच्या मुलांमध्यें सरदारीबद्दल तंटा लागला. तेव्हां शिंद्यानें काशीरावाचा पक्ष घेऊन त्याचा शूर भाऊ मल्हारराव याच्यावर एकाएकीं छापा घालून त्यास ठार मारून त्याच्या अल्पवयस्क मुलास (खंडेराव) आपल्यापाशीं ठेवून त्याच्या नांवें होळकरी संस्थान चालविलें. त्यामुळें त्यांच्यांत व यशवंतरावांत वैर माजलें. आतां शिंदे हा नानांजवळ कबूल केलेली रक्कम व नगरचा किल्ला आणि १० लाखांचा मुलूख मागूं लागला. नानानें बरीच रक्कम भरून उत्तरेकडे कूच केल्यास किल्ला देण्याचें कबूल केलें. कसेंहि करून शिंदा पुण्याहून हलल्यास नानांस पाहिजे होतें. कारण क्षणैकबुद्धि रावबाजी त्याच्या साहाय्यानें नानास अपाय करण्यास टपला होता. परंतु शिंदा जाईना. यावेळीं अनेक मसलती झाल्या. अखेर वचन देऊन शिंद्यानें नानांस आपल्या गोटांत आणवून विश्वासघातानें (रावबाजीच्या सांगण्यावरून) त्यांना कैद करून नगरास पाठविलें (३१ डिसेंबर १७९७).

लग्नांत खर्च झाल्यानें व फौजेचा पगार तुंबल्यामुळें आणि कबूल केलेलें काम (नानास कैद) पार पाडल्यामुळें शिंद्यानें पेशव्याजवळ दोन कोट रकमेची मागणी केली. खजिन्यांत इतका पैका नव्हता; व तो कसा वसूल करावा ही नानाची कर्तबगारीहि पेशव्यांत नव्हती. तेव्हां त्यानें सर्जेरावाकडून पुण्याच्या लोकांपासून परभारें पैका वसूल करण्यास शिंद्यास परवानगी दिली. या सर्जेरावानें अत्यंत छळ करून

धुवून काढलें. त्यानें खुद्द शनवारवाड्यांतहि धुमाकूळ घातला. हा अति दुष्ट मनुष्य होता. (ज्ञा. को. वि. १३ घाटगे–सर्जेराव घाटगे–पहा.).

या जुलुमामुळें दौलतरावास कैद करण्याचें पेशव्यानें ठरविलें. परंतु आयत्यावेळीं त्याचा धीर झाला नाहीं. मात्र या दोघांत वांकडें येऊन परक्या राजांकडे दोघांनींहि मदत मागितली होती. शेवटीं पेशव्यास शह देण्यास शिंद्यानें नानास सोडलें.

मध्यंतरीं महादजीच्या स्त्रियांचा व दौलतरावाचा वेबनाव होऊन त्या बायांनीं ५।६ वर्षे फौजेच्या बळावर स्वराज्यांत धुमाकूळ घालून व कोल्हापुरकरांची मदत घेऊन लुटालूट केली. शेवटीं बाळोबानें बायांचा व दौलतरावाचा समेट करून दिला. इंग्रजांनींहि कारस्थानें करून बायांनां चिथावलें. कारण शिंदा हा मराठी राज्यांत फौजबंद सरदार होता व तोच त्यांच्या इच्छेच्या आड येण्यासारखा होता. म्हणून नेहमीं त्याची शक्ति कशी कमी होईल इकडेच त्यांचें लक्ष्य असे व त्यासाठीं ते मुद्दाम भानगडीहि उत्पन्न करीत.

नाना वारल्यावर (१८००) त्यांच्या संपत्तीवर शिंदे व पेशवे दोघांनींहि हात मारला. पुढें पेशव्यांकडून ४७ लाखांच्या वराता उत्तरेकडील सरदारांवर घेऊन एकदांचा शिंदा तिकडे वळला. वाटेंत त्याचा यशवंतराव होळकरानें पराभव केला (१८०१). यावेळेपासून दौलतरावाचें लक्ष्य युद्धशास्त्राकडे जास्त लागलें. तरी पण तो उतावळा असल्यानें उत्तम सेनापति बनला नाहीं, म्हणून अखेर त्याचा इंग्रजांनीं पराभव केला. यावेळीं शिंदे–होळकरांनीं परस्परांच्या राजधान्या जाळल्या; होळकरानें तर पुणेंहि जाळलें. त्यावेळीं रावबाजी पळून इंग्रजाकडे गेला आणि वसईस त्यानें मराठी राज्याच्या वेढाव्याचा तह लिहून दिला (१८०३).

या तहामुळें सर्व मराठ्यांचे डोळे उघडले. दौलतरावानें होळकरास व भोंसल्यास मिळवून इंग्रजांस हांकलून लावण्याचा प्रयत्न चालविला. परंतु एकमेकांचीं मनें शुद्ध नसल्यानें व इंग्रजांची युद्धसामुग्री उत्तम दर्जाची असल्यानें मराठ्यांचा सर्वत्र पराभव होत गेला. अलीगड, दिल्ली, आसई, आग्रा, लासवाडी व अडगांव येथील लढायांत शिंदा नामोहरम झाला (१८०३). त्याच्या सैन्यावरील अधिकारी इंग्रज व फ्रेंच होते; त्यांनीं आयत्या वेळीं फितुरी केल्यानें अर्थातच दौलतरावाचा नाश झाला. सुर्जी–अंजनगांवचा नामुष्कीचा तह होऊन त्यांत त्याचा अर्ध्यापेक्षां जास्त मुलुख इंग्रजांनां मिळाला.

इतक्यांत होळकरानें इंग्रजांचा पराभव केल्यानें दौलतराव त्यास जाऊन मिळाला (१८०४); परंतु पुन्हां आपसांतलें जुनें वैर निघून त्यानें होळकरास सोडलें. त्यावेळीं कार्नवालीसनें नवीन तह करून ग्वालेर किल्ला दौलतरावास देऊन त्याला व त्याच्या कुटुंबाला जहागिरी वगैरे दिल्या (१८०५). पुढें बारा वर्षे दौलतरावानें गडबड केली नाहीं. नंतर पेंढाऱ्यांनां मिळून पुन्हां इंग्रजांविरुद्ध काहूर उठविण्याची खटपट त्यानें केली, परंतु ती इंग्रजांच्या चातुर्यामुळें साधली नाहीं (१८१७). मात्र यावेळीं झालेल्या तहानें दौलतराव नाखुषीनें इंग्रजांचा मांडलिक बनला. रावबाजीच्या शेवटच्या कारस्थानांतहि दौलतरावानें भाग घेतला होता, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं (१८१८); उलट त्याचा मुलुख व सत्ता जास्त संपुष्टांत आली.

पेशवाई गेल्यावर नऊ वर्षे दौलतराव निर्वंत होता. त्या काळांत त्यानें गडबड केली नाहीं. हा त्याच्या सारखा मुत्सद्दी व सेनापति नसल्यानें महादजीचें बेत याच्या हातून सिद्धीस गेले नाहींत. दौलतराव २१ मार्च १८२७ रोजीं मरण पावला. त्यावेळीं त्याचें राज्य दीड कोटीचें होतें. त्याची बायको बायजाबाई; त्याला पुत्र नसल्यानें दत्तक घेऊन बाईनें बरेंच दिवस राज्य चालविलें. [ मॅलेसन—नेटिव्ह स्टेट्स; गोडबोले–एतद्देशीय संस्थानें; खरे–भाग ९।१०।११।१२; पेशव्यांची बखर; पेशवाईची अखेर. ]

**दौलताबाद**—उर्फ देवगिरी. हैद्राबाद संस्थानांतील औरंगाबाद जिल्ह्यांतील व तालुक्यांतील एक किल्ला. हा किल्ला पूर्वीं यादवांच्या कारकीर्दींत राजधानीचें गांवच होता. यादववंशीय राजे चालुक्यांचे जरी मांडलिक होते तरी पण लौकरच त्यांनीं त्यांची सत्ता झुगारून देऊन ते स्वतंत्र बनले. पहिला भिल्लम यानें देवगिरीची स्थापना केली असें हेमाद्रीचें म्हणणें आहे. त्याचा नातू सिंघण यानें पश्चिम चालुक्यांचा सर्व प्रदेश पादाक्रांत केला. अल्लाउद्दीन खिलजीनें हा किल्ला १२९४ सालीं घेतला व हीच मुसुलमानांची दख्खनमधील पहिली स्वारी होय. पण राजानें खंडणी देण्याचें कबूल केल्यावर त्यास किल्ला परत करण्यांत आला, पण खंडणी देण्यांत चूक पडूं लागल्यामुळें पुन्हां पुन्हां स्वाऱ्या होऊं लागल्या. मलिक काफरनें देवगिरी १३०७, १३१० व १३१८ सालीं घेतलें. शेवटच्या वेळीं राजा हरपालच्या अंगाची जिवंतपणें चामडी सोलून काढली. महमद बिन तघ्लखचा विचार तर दौलताबाद ही आपल्या राज्याची राजधानी करण्याचा होता. १३३९ सालीं दिल्लीची सर्व लोकवस्ती येथें आणण्याचा त्याचा विचार कायम ठरला व त्यानेंच देवगिरीचें नांव दौलताबाद ठेवलें व येथून त्यानें वरंगळच्या राज्याविरुद्ध सैन्य पाठविलें.

पण उत्तर हिंदुस्थानांत एकदम कांहीं गडबड उपस्थित झाल्यामुळें राजास उत्तरेकडे जावें लागलें व त्याच्या मागें नवीन जिंकलेल्या प्रांतांच्या अधिकाऱ्यांनीं बंड उभारलें. व एकंदर धामधुमींत झाफरखाननें (गुलबर्ग्याचा अधिकारी) दौलताबाद आपल्या ताब्यांत घेतलें व तो किल्ला बहामनी (ब्राह्मणी) राजांच्या हातीं १५२६ पर्यंत राहिला. तदनंतर तो किल्ला निझामशाहीच्या ताब्यांत गेला व तेथून तो अकबराच्या ताब्यांत आला. अहमदनगर हातचें गेल्यावर निझामशाहीची राजधानी औरंगाबाद झाली व दौलताबाद

१६३३ पर्यंत त्यांच्याच हातांत राहिला.त्या सालीं तो शहाजहानच्या सरदारानें परत घेतला. औरंगझेबाच्या निधनकालापर्यंत तो मोगलांच्याच ताब्यांत होता पण नंतर तो हैदराबादचा निझाम असफजाह ह्याच्या ताब्यांत गेला.

हा किल्ला एका खडकावर बांधला असून तुसत्या खडकाचीच उंची १५० फूट आहे. टेंकडीची उंची६००फूट आहे. तटाच्या आंत देवगिरी शहर होतें, पण सध्यां तेथें एक लहानसें खेडें आहे. किल्ल्याच्या तटबंदीशिवाय आणखी कांहीं चांगल्या चांगल्या इमारतीहि तेथें आहेत. उदाहरणार्थः—चंदमिनार, चिनीमहाल. चंदमिनार हा अल्लाउद्दीन बहामनीनें उभारला. चिनीमहालमध्यें औरंगझेबानें कुतुबशाहीचा शेवटचा राजा अबुलहसन ह्यास कैद करून ठेवलें होतें. किल्ल्यास आठ दरवाजे आहेत. याच ठिकाणीं एका बुरुजावर ‘ मेंढा ’ नांवाची पंचरसीधातूची तोफ आहे. किल्ल्यामध्यें जनार्दनस्वामींची समाधि आहे. येथें द्राक्षें चांगलीं होतात.

**दौलेश्वरम्**—मद्रास इलाख्यांतील गोदावरी जिल्ह्याच्या राजमहेंद्री तालुक्यांतील एक गांव. राजमहेन्द्री गांवाच्या दक्षिणेस ५ मैल. लोकसंख्या ( १९११ ). १०३४७ हें एक्झिक्युटिव्ह इन्जिनिअरचें मुख्य ठिकाण आहे. जवळपास इमारतीदगडांच्या खाणी आहेत. येथें ‘ यूनिअन ’ संघाची स्थापना झाली आहे.

**द्रवगुरुत्वमापक** ( हायड्रोमिटर )—या प्रकारच्या यंत्रानें फारसा त्रास न पडतां कोणत्याहि प्रवाही द्रव्याचें गुरुत्वमापन करतां येतें. जेव्हां एखादा पदार्थ पाण्यांत तरंगतो तेव्हां जेवढा पदार्थ पाण्यांत बुडालेला असतो तेवढ्या आकाराच्या पाण्याचें वजन त्या पदार्थाच्या माराइतकें असतें. सिनेसिअस सायरेनिअस यानें आपल्या पांचव्या पत्रकांत असें लिहून ठेविलें आहे कीं, अलेक्झांड्रियाच्या हिपाशिया ( हिपाशिया [ ३७०-४१५ ] ही एक प्रसिद्ध तत्त्वज्ञानी स्त्री होती; हिनें शिकवून पुष्कळ शिष्य तयार केले, हिचा पुढें खून झाला ) हिनें द्रवगुरुत्वमापक यंत्राचा शोध लावला. परंतु त्याकडे कोणी फारसें लक्ष पुरविलें नाहीं. पुढें १६७५ सालीं राबर्ट बॉइल यानें “ न्यू एसे इन्स्ट्रुमेन्ट ” या नांवाखालीं फिरून या यंत्राचा शोध लावला. बॉइलच्या या यंत्रानें गिनी या नाण्यांत लबाडी केली असल्यास ती तात्काळ ओळखतां येत असे. बॉइलच्या यंत्राची रचना पुढें दिल्याप्रमाणें असते.

एका पोकळ गोळ्यास एक वर दांडी बसविलेली असते. व खालीं एक स्क्रू बसविलेला असतो; त्यायोगानें त्या स्क्रूमध्यें गिनीचें नाणें पकडून धरतां येतें; नंतर हें पाण्यांत सोडलें असतां ठराविक खुणेपर्यंत बुडतें. जर गिनीचें नाणें खोटें असेल तर भलत्याच खुणेवर हें यंत्र स्थिर होतें. यावरून नाण्याची पारख करतां येते. कारण गिनीचा आकार आणि वजन ठराविक असतात. खोट्या गिनीचें वजन खऱ्या गिनीइतकें असलें तर त्याचा आकार कमीजास्त असतो; व आकार गिनीइतका असल्यास वजनांत फरक असतो. यामुळें गुरुत्वमापक यंत्रांत हा फरक तेव्हांच दृष्टोत्पत्तीस येतो. गुरुत्वमापकाचा सर्वांत महत्त्वाचा उपयोग दारूंतील मद्यार्कांश मापण्याकडे करतात. याकरितां तसल्या प्रकारच्या यंत्राचें वर्णन करून नंतर दुसऱ्या कांहीं यंत्रांची माहिती देऊं.

सध्या ग्रेटब्रिटनमध्यें सायकेस याचें गुरुत्वमापक यंत्र उपयोगांत आहे. इंग्लंडच्या जकात आणि अबकारी खात्यानें या यंत्राचा एका शतकापेक्षां जास्त काळपर्यंत उपयोग केला आहे व हेंच यंत्र मद्यार्कांश मापण्याच्या कामीं उपयोगांत आणावें असा पार्लमेंटचा कायदा झाला आहे. या साऱ्या गोष्टी लक्षांत घेऊन या यंत्राचें सविस्तर वर्णन केलें आहे.

एका पोकळ गोळ्यास एक लांब दांडी जोडलेली असून त्यावर खुणा केलेल्या असतात. खालच्या बाजूस एक जड गोळा बसविलेला असतो. या सर्वांवर रुप्याचा जाड मुलामा चढविलेला असतो. जर रुप्याचा पातळ मुलामा असला तर त्या पातळ थरांतून कित्येक मद्यार्कांत असणाऱ्या ‘ सॅकारिक ॲसिड ’ चा परिणाम घडून यंत्र गंजूं लागतें. एवढ्याकरितां जाड मुलामा चढवावा लागतो. दारूच्या अंगीं कमी जास्त प्रमाणांत घनत्व किंवा द्रवत्व असल्यास यंत्राच्या बुडांत एक चकती बसवून यंत्रास योग्य स्थितींत आणतात. या यंत्रास अनुलक्षून एक कोष्टक तयार केलें आहे. यावरून कोणत्या उष्णमानावर, कोणत्या खुणेवर यंत्र स्थिर झालें असतां त्यांत शेंकडा काय प्रमाणांत दारू ( मद्यार्क ) आहे हें झटकन कळतें.

दु ग्ध मा प क यं त्र.—असल्या प्रकारचें यंत्र बहुधा कांचेंच केलेलें असतें. खालच्या गोळ्यांत शिशाचे छरे किंवा पारा भरलेला असतो. यायोगानें यंत्राचा गुरुत्वमध्य खालीं येतो व त्यायोगानें यंत्र द्रवांत स्थिर रहातें. यांत एक पोकळ पंचपात्राकृति भाग असतो व त्याला एक लांब दांडी बसविलेली असते व या दांडीवर खुणा केलेल्या असतात. निर्मळ दुधांत यंत्र बुडविलें असतां तें ज्या ठिकाणीं स्थिर होतें त्या ठिकाणीं एक खूण केलेली असते व नुसतें पाणी असल्यास ज्या ठिकाणीं यंत्र स्थिर होतें त्या ठिकाणीं एक खूण केलेली असते. पाणी आणि दूध यांचें मिश्रण असल्यास दरम्यानच्या खुणेवर यंत्र स्थिर होतें. यावरून दुधांत शेंकडा किती पाणी आहे हें काढतां येतें.

क्षा र मा प क यं त्र.—या यंत्राची रचना वरील दुग्धमापक यंत्रासारखीच असते. या यंत्राच्या योगानें पाण्यांत किती प्रमाणांत मीठ आहे हें सुलभ रीतीनें पाहतां येतें. ज्या जहाजावर एंजिनांत खारें पाणी वापरतात त्या ठिकाणीं याचा फार उपयोग होतो.

नि क ल स न या चें ज ल गु रु त्व मा प क.—या यंत्राच्या साहाय्यानें घन आणि प्रवाही द्रव्यांचे विशिष्टगुरुत्व

येतें. या यंत्राचा प्रयोगशाळेंत पुष्कळदां उपयोग होतो. तसेंच हें यंत्र बरेंच सुप्रसिद्ध आहे.

या यंत्रांतहि एका पोकळ पंचपात्राला दांडा बसविलेला असून त्यावर एक तबकडी बसविलेली असते व खालच्या बाजूस एक शंक्वाकृति लहानसें पात्र जोडलेलें असतें. हें यंत्र पितळेचें किंवा तांब्याचें करतात. तबकडीवर ठराविक वजन ठेविलें असतां विशिष्ट खुणेपर्यंत यंत्र बुडतें. ज्या पदार्थाचें विशिष्टगुरुत्व काढावयाचें असेल तो पदार्थ तबकडीवर ठेवतात. नंतर त्या तबकडीवर वजनें ठेऊन त्या खुणेपर्यंत यंत्र बुडूं देतात. यावरून पदार्थाचें वजन निघतें. जसें:—रिकाम्या तबकडीवर १० ग्राम ठेवले असतां खुणेवर यंत्र स्थिर होतें आणि इष्टपदार्थासह ७ ग्राम ठेविले तर खुणेवर यंत्र स्थिर होतें. तेव्हां दहा उणे सात बरोबर तीन भाग इतकें त्या पदार्थाचें वजन झालें. नंतर इष्ट पदार्थ खालील पात्रांत ठेऊन यंत्र पाण्यांत बुडवितात. पात्रांत पाण्याचे बुडबुडे राहूं देऊं नयेत; किंवा इष्टपदार्थास पाण्याचे चिकटलेले बुडबुडे राहूं देऊं नयेत. नंतर त्या पदार्थाचें वजन पाण्यांत किती भरतें हें तबकडीवर वजन ठेऊन काढतात.

$$\frac{\text{पदार्थाचें हवेंतील वजन}}{\text{पदार्थाचें वजन—पदार्थाचें पाण्यांतील वजन}} = \text{वि. गुरुत्व}$$

वरील समीकरणावरून विशिष्ट गुरुत्व काढतां येतें.

**द्रवीभवन** (१) घनपदार्थ वितळून त्यांचे प्रवाही पदार्थ होतात.—प्रवाही पदार्थाचें उष्णमान कमी केलें असतां त्याचे घनपदार्थ होतात. याप्रमाणें द्रव्यांचें अवस्थान्तर होत असतांना द्रव्यांतून उष्णता बाहेर पडते किंवा पदार्थांत उष्णता गुप्त होते. एखाद्या घन द्रव्याला दुसऱ्या एखाद्या द्रवरूपी पदार्थांत विरघळविणें आणि द्रवरूपी पदार्थांतील परकीय द्रव्याचे स्फटिक तयार करणें या दोन क्रियांतील महत्त्वाच्या बऱ्याच गोष्टी द्रवीभवनाच्या मूल-तत्त्वाशीं अत्यंत जुळत्या आहेत म्हणून त्या दोन प्रकारांचा द्रवीभवनाबरोबरच विचार केला आहे.

(२) द्रवीभवनाचा सामान्य प्रकार.—मुख्यत्वें-करून द्रवीभवन दोन प्रकारांनीं होतें. एकांत स्फटिक तयार होण्याचा प्रकार दिसून येतो आणि दुसऱ्यांत स्फटिकेतर प्रकारानें द्रवीभवन होतांना दिसून येतें. बर्फ वितळण्याचा प्रकार पहिल्यांत गणतात; यांत घनावस्थेंतून प्रवाही रूपावस्थेंत पदार्थ जात असतांना त्याचें एका नियमित उष्णमानावर रूपांतर होतें; अशा प्रकारचें रूपांतर होत असतांना घनरूपावस्था आणि द्रवरूपावस्था यांच्या दरम्यान घट्ट मधासारखी एखादी अर्धवट अवस्था असत नाहीं; घनरूपावस्थेंतून द्रवरूपावस्थेंत पदार्थाला नेत असतांना त्या पदार्थाला ठराविक परिमाणाची उष्णता द्यावी लागते; त्याशिवाय त्या पदार्थाचें रूपांतर होत नाहीं; या उष्णतेला गुप्त उष्णता किंवा अंतर्हित उष्णता (लेटंट हीट) अशी शास्त्रीय संज्ञा आहे. याप्रमाणें रूपांतर झाल्यामुळें पदार्थाला जास्त किंवा कमी अवकाश (घनफळ) लागतो. स्फटिकेतर द्रवीभवनाचीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत. कांच, वाळू, डांबर, सेंद्रिय तेलें इत्यादि या प्रकारच्या पदार्थांत द्रवरूपांतून घनावस्थेंत पदार्थ जात असतांना तो पदार्थ हळू हळू घट्ट होत जातो; एकदम द्रवरूपावस्थेंतून घनरूपावस्थेंत या पदार्थाचें रूपांतर होऊं शकत नाहीं; म्हणून असल्या पदार्थाला घनीभवनाचा बिंदु असत नाहीं; याकारणानें अमक्याच उष्णमानावर घनावस्था संपून द्रवावस्था सुरू झाली असें म्हणतां येत नाहीं.

पाण्यांत किंवा एखाद्या द्रवांत एखादा क्षार विरघळवून त्याचे स्फटिक बनवितां येतात; एकाच क्षारापासून अनेक वेळां निरनिराळ्या प्रकारचे (आकाराचे) स्फटिक तयार होऊं शकतात; या क्षारस्फटिकांचें एका आकारांतून दुसऱ्या आकारांत रूपांतर होत असतांना त्या स्फटिकांतून उष्णता बाहेर पडते किंवा उष्णतेचें त्या स्फटिकाकडून अपशोषण होतें. कांहीं धातूंचे वितळण्याचे बिंदु खालीं दिले आहेत.

वितळण्याचे बिंदू

| | | |
|---|---|---|
| पारा | −३८.८° | शतांश |
| पालाश ( पोट्याशियम् ) | ६२.५° | ,, |
| सिंधु ( सोडिअम् ) | ९५.६° | ,, |
| कथिल | २३१.९° | ,, |
| बिस्मथ | २६९.२° | ,, |
| काश्म ( क्याडमिअम् ) | ३२०.७° | ,, |
| शिसें | ३२७.७° | ,, |
| जस्त | ४१९.०° | ,, |
| अंज ( अन्टिमनी ) | ६३०°. | ,, |
| स्फट ( अल्युमिनम् ) | ६५५° | ,, |
| रुपें | ९६२°. | ,, |
| सोनें | १०६४° | ,, |
| तांबें | १०८२° | ,, |
| निकेल | १४२७° | ,, |
| पलाद ( प्यालॅडियम् ) | १५३५° | ,, |
| प्लातिन ( प्लाटिनम् ) | १७१०° | ,, |

पाण्यांत क्षार विरघळवून द्रावणास संपृक्तावस्था आणावी. क्षाराच्या द्रावणाचा असा एक नियम आहे कीं, संपृक्तावस्थेंत असलेल्या द्रावणाचें उष्णमान कांहीं नियमित अंशाखालीं उतरलें असतां त्या द्रावणापासून स्फटिक बनूं लागतात. ज्या ठराविक उष्णमानाखालीं विशिष्ट घनतेच्या द्रावणापासून स्फटिक बनूं लागतात त्या उष्णमानास घनीभवनाचा बिंदु असें नांव आहे. कित्येकदां घनीभवनाच्या बिंदुच्या खालीं उष्णमान नेलें असतांना देखील स्फटिक तयार होत नाहींत; अशा वेळेस त्या द्रावणांत योग्य प्रकारच्या स्फटिकाचा अत्यंत सूक्ष्म कण टाकला असतां तावडतोब त्या द्रवापासून स्फटिक तयार होऊं लागतात. पाणी हें या प्रकारचें उदाहरण आहे.

स्वच्छ कांचेच्या पात्रांत पाणी घालून तें शून्य अंशाखालीं कांहीं अंशापर्यंत थंड केलें तरी देखील त्या पाण्याचें बर्फ होत नाहीं; परंतु शून्य अंशाखालीं पाण्याचें उष्णमान असतांनाच त्यांत बर्फाच्या स्फटिकाचा एक सूक्ष्म कण टाकला तर तात्काळ त्या पाण्यापासून बर्फ होऊं लागतें आणि त्या पाण्याचें उष्णमान वाढूं लागतें व तें शून्य अंशापर्यंत येऊन नंतर तें वाढण्याचें थांबतें. जर पाण्यांत प्रथमपासून बर्फाचे स्फटिक असतील तर पाण्याचें उष्णमान शून्य अंशाखालीं केव्हांहि जात नाहीं.

( ३ ) मिश्र धातूंचे वितळण्याचे बिंदु व उपयोग.—शास्त्रज्ञांनीं मिश्रधातूंच्या वितळण्याच्या उष्णमानाविषयीं फार परिश्रम केले आहेत. अनेक प्रकारच्या कारखान्यांत मिश्र धातु वापरावी लागते; अर्थातच या मिश्र धातूंचे गुणधर्म शोधून काढावे लागतात. हिंदुस्थानांतील रहिवाश्यांच्या रोजच्या व्यवहारांत पितळ ही मिश्रधातु फारच मोठ्या प्रमाणांत वापरण्यांत येते. लवकर वितळणाऱ्या मिश्रधातूंपैकीं कांहीं धातू पुढें दिल्या आहेत. न्यूटननें ५० भाग बिस्मथ घेऊन त्यांत ३१.२५ भाग शिसें आणि १८.७५ कथिल मिसळून एक धातु बनविली; या मिश्र धातूस न्यूटनची धातु असें नांव आहे. डीन डारसेट (१७२५–१८०१) या शास्त्रवेत्त्यानें ५० भाग बिस्मथ, २५ भाग शिसें व २५ भाग कथील याप्रमाणें मिश्रण करून एक धातु बनविली. थोरल्या व्हालेन्टाइन रोज यानें ५० भाग बिस्मथ, २८.१ भाग शिसें आणि २४.१ भाग कथील घेऊन एक मिश्र धातु बनविली. या तिन्ही मिश्रधातु ९१° ते ९५° इतक्या उष्णमानावर, वितळतात; या मिश्रधातूंत क्याडमिअम् नांवाची धातु मिश्रित केली तर त्यांचा वितळण्याचा बिंदु बराच खालीं उतरतो. वुड या शास्त्रज्ञानें डारसेट याच्या मिश्रधातूंत पुढील सुधरणा केली; ५० भाग बिस्मथ, २५ भाग शिसें, १२.५ भाग कथील आणि १२.५ भाग क्याडमिअम् याप्रमाणें धातू घेऊन त्यांचें मिश्रण केलें तर तयार झालेल्या मिश्रधातूचा वितळण्याचा बिंदु ६६° ते ७१° याच्या दरम्यान असतो. लिपोविट्झ यानें एक मिश्रधातु तयार केली; तिची घटना याप्रमाणें आहे:—१५ भाग बिस्मथ, ८ भाग शिसें, ४ भाग कथिल आणि ३ भाग क्याडमिअम् याप्रमाणें घेऊन मिश्रधातु बनवावी; ही मिश्रधातु सुमारें ५५° उष्णमानावर वितळते. या शेवटच्या दोन धातूंचा नित्येकदां थट्टा करण्यासाठीं उपयोग करतात; या धातूचे चमचे करून ते पाहुण्याच्या पुढें ठेवून त्यांच्या शेजारीं कढत चहाचे पेले ठेऊन देतात. पाहुण्यांनीं चहा पिण्यासाठीं कपांत चमचे बुडविले असतां ते वितळून जातात व ही एक गंमत होते. या प्रकारच्या मिश्रधातूंचा कांहीं प्रकारच्या यांत्रिक योजनेंत उपयोग करतात. आगगाडीचें एंजिन, गिरण्यांतील एंजिन वगैरे यंत्रांतील तापकांत लवकर वितळणाऱ्या धातूचा उपयोग होतो. तापकांतील पाणी कांहीं एका विशिष्ट पातळीच्या खालीं गेलें तर त्यायोगानें तापकास इजा होते व त्यायोगानें तापकास लवकरच भोकें पडून तो निरुपयोगी होतो. अशी आपत्ति येऊं नये म्हणून तापकाच्या अंगास लवकर वितळणाऱ्या धातूची गुठदी बसवितात. पाण्याची पातळी कांहीं एका विशिष्ट मर्यादेखालीं गेली असतां गुठदीचें उष्णमान वाढतें आणि त्यायोगानें ती गुठदी वितळते व त्यामुळें तापकांतील पाणी भट्टींत जातें

( ४ ) स्फटिकांतील पाणी.—तुरटी, खडीसाखर व निरनिराळीं लवणें यांचें द्रावण करून तें सुकवावें; द्रावणांतील पाणी जसजसें आटूं लागतें तसतसें त्यांचे (म्हणजे विद्रुत घन पदार्थांचे ) स्फटिक बनूं लागतात. या स्फटिकाचा एक मौजेचा गुणधर्म आहे. पाण्यांत मीठ आणि साखर विरघळवावी, तें पाणी गरम करावें, म्हणजे आणखी मीठ आणि साखर विरघळेल. हें द्रावण कढत असतांनाच फडक्यांतून गाळून घ्यावें; व त्या गाळलेल्या द्रावणांत मीठ आणि साखर यांचे दोन लहान खडे टांगावेत; व तें मिश्रण हळूहळू थंड होऊं द्यावें. जसजसें मिश्रण थंड होऊं लागतें तसतसे टांगलेले खडे मोठे होऊं लागतात. पाणी थंड होऊं लागलें म्हणजे मीठ आणि साखर यांचे सूक्ष्म कण विद्राव्य स्थितींतून निघून घनावस्थेंत येतात व घनावस्थेंत आलेले हे कण आपआपल्या जातीच्या खड्यावर बसतात. मिठाचे कण साखरेच्या स्फटिकावर बसूं शकत नाहींत किंवा साखरेचे कण मिठाच्या स्फटिकावर बसूं शकत नाहींत. या पद्धतीनें पाण्यांत एकत्र विरघळलेले पदार्थ निरनिराळे करतां येतात.

( ५ ) दाबाचा परिणाम.—पाण्याचें बर्फ झालें असतां त्याचा आकार वाढतो; म्हणजे एक घनफूट आकाराचें पाणी गोठविलें असतां जें बर्फ तयार होतें त्यास एक घनफुटापेक्षां जास्त जागा लागते. आतां पाण्यावर दाब ठेवला तर पाणी गोठण्यास शून्य अंशाखालीं कित्येक अंशांपर्यंत पाण्याचें उष्णमान उतरावें लागतें; व नंतर पाण्याचें बर्फ होतें. मेणाचें याच्या अगदीं उलट आहे. एक घनफूट पातळ मेणाचें थंडीनें घट्ट मेण केलें असतां त्या घट्ट मेणाचा आकार एक घनफुटापेक्षां लहान होतो. घट्ट मेणावर दाब ठेवला असतां मेणाचा वितळण्याचा बिंदु नेहमींपेक्षां वर चढतो. या प्रकारच्या दाबासंबंधानें पुढील नियम शास्त्रज्ञांनीं बसविला आहे.

पदार्थ वितळत असतांना ( किंवा जास्त शुद्ध रीतीनें बोलावयाचें म्हणजे पदार्थ वितळल्यानंतर ) त्याच्या आकारमानांत जसा फरक होईल त्याप्रमाणें वितळण्याचा बिंदु खालीं किंवा वर सरकतो. जे पदार्थ थिजले असतां बर्फाप्रमाणें जास्त जागा व्यापतात त्या पदार्थांवर दाब वाढविला असतां त्यांचा वितळण्याचा बिंदु खालीं उतरतो अ... जे पदार्थ थिजले असतां मेणाप्रमाणें कमी जागा ...

त्या पदार्थांवर दाब वाढविला असतां त्यांचा वितळण्याचा बिंदु वर चढतो.

**द्रव्य ( मॅटर )**—विद्युच्छास्त्राचा अभ्यास जारीनें करून पाश्चात्त्य शास्त्रज्ञांनीं कुतूहलपूर्ण व मानवी बुद्धीस थक्क करून सोडणारे असे अनेक शोध लाविले आहेत. या शोधांनीं मनुष्याचा दृष्टिकोण बदलण्याचा बराच संभव आहे. विद्युच्छास्त्राच्या अभावीं विचार करण्याची पद्धति व विद्युत्शास्त्राची मदत घेऊन बनलेली विचाराची दिशा यांमध्यें महदंतर पडत चाललें आहे. यांपैकीं दोन शोध तर द्रव्याचें वास्तविक स्वरूप व घटना यांचा अभ्यास करतांना फारच उपयुक्त होणार आहेत. पहिला शोध असा कीं, निरनिराळ्या विरल ( रेरिफाइड) वायूंतून विद्युत्प्रवाह सोडला असतां दृष्टोत्पत्तीस येणारे चमत्कार, व दुसरा शोध कांहीं विवक्षित किरणविसर्जनाचा. जगतांत कांहीं पदार्थ असे आहेत कीं, त्यांच्यापासून विशिष्ट अदृश्य किरण एकसारखे विसर्जन पावत असतात, व हे किरण अपारदर्शक वस्तूंतून सुद्धां प्रवेश करूं शकतात.

आतां पूर्वकालीं द्रव्याच्या घटनेसंबंधीं कोणतें मत प्रचलित होतें व या आश्चर्यकारक शोधांच्या साहाय्यानें त्यासंबंधीं शास्त्रज्ञांचें मत कसें बदलत चाललें आहे याचा संक्षेपतः विचार करूं.

प्रथमतः जगांतील प्रत्येक पदार्थ अति सूक्ष्म कण एके ठिकाणीं जमून त्यांच्या समवायानें बनलेला आहे असा समज होता. पुढें याच कणांनां अणु असें शास्त्रांत म्हणूं लागले. प्रत्येक पदार्थ अण्वात्मक आहे व या मूलभूत अणूंचा धर्म व त्या विवक्षित पदार्थाचा धर्म एकच असतो. निरनिराळ्या प्रकारच्या अणूंच्या समवायानें निरनिराळ्या गुणधर्मांचे पदार्थ तयार होतात अशी अण्वात्मक उपपत्ति होती. परंतु या उपपत्तीमुळें प्रत्येक पदार्थागणिक भिन्न अणू समजावे लागतात व यामुळें अनवस्था उत्पन्न होते. ही आपत्ति —अंशतः कां होईना—डाल्टनच्या परमाणुवादानें टळली.त्याचें म्हणणें असें कीं वर सांगितलेले अणू सुद्धां स्वतः अविभाज्य नाहींत तर ते त्यांहून सूक्ष्म असणाऱ्या दुसऱ्या कणांचे-ज्यांनां आपण परमाणू म्हणूं-बनलेले आहेत. हे परमाणू ६०–७० पृथक मूलद्रव्यांचे असतात. या मूलद्रव्यांस स्वतंत्र गुणधर्म आहेत. परंतु जेव्हां निरनिराळे दोन किंवा अधिक प्रकारचे परमाणू एके ठिकाणीं येऊन संयोग पावतात तेव्हां तिसऱ्याच पदार्थाचे अणू निर्माण होतात. या अणूंचा गुणधर्म घटक परमाणूंच्या गुणधर्मांहून निराळा कां असतो हें समजण्यास मात्र अद्यापि साधनें नाहींत. याहि पलीकडे जाऊन प्रख्यात शास्त्रवेत्ता प्रौट हा असें प्रतिपादन करितो कीं, उज्ज हेंच सर्व पदार्थांचें मूळ घटकद्रव्य आहे व याचेच परमाणू भिन्न प्रमाणांत संयुक्त होऊन भिन्न भिन्न गुणधर्मांचे भिन्न पदार्थ निर्माण होतात. मूलद्रव्यांच्या परमाणुभारांकांच्या कोष्टकाकडे नजर टाकिली तर असें दिसून येईल कीं उज्ज हें द्रव्य सर्वांत हलकें आहे व बहुतेक मूलद्रव्यांचे परमाणुभारांक उज्जाच्या कोणत्या तरी पूर्ण पट असतात. यावरून प्रौटनें असा कयास केला कीं, उज्ज हाच सर्व पदार्थांचा मूळघटक आहे. परंतु कांहीं परमाणुभारांकांची उज्जाशीं तुलना केली असतां अशा पूर्ण पटी बसत नाहींत व उज्जाच्या परमाणूचे सुद्धां स्वतःचे स्वतंत्र गुणधर्म काय आहेत हें अद्याप दृष्टोत्पत्तीस आलेलें नाहीं. या गोष्टीनें डाल्टनच्या म्हणण्याला थोडासा अपवाद येतो, तथापि एवढें निश्चित आहे कीं, सर्व मूलद्रव्यांनां आधारभूत असें कांहीं विशिष्ट द्रव्य आहे व मूलद्रव्यांच्या परमाणुभारांकांचा त्या त्या द्रव्यांच्या रासायनिक व पदार्थवैज्ञानिक धर्मांवर बराच परिणाम होतो. न्यूलंड्स व मेंडेलीफ यांचा नियतांतरत्वाचा नियम (लॉ ऑफ पीरिऑडिक क्लासिफिकेशन )हेंच प्रतिपादन करतो. मूलद्रव्याचा परमाणुभारांक जसा चढतो किंवा उतरतो तसा त्या मूलद्रव्याच्या गुणधर्मांमध्यें पदार्थवैज्ञानिक अगर रासायनिक चढ किंवा उतार दृष्टोत्पत्तीस येतो. रॉटगेन किरण, ऋणध्रुवकिरण व किरणविसर्जक पदार्थांपासून निघणारे किरण यांचें पदार्थभेदकत्व पुष्कळ अंशीं त्या पदार्थांतील मूल द्रव्यांच्या परमाणुभारांकांवरच अवलंबून असतें. यावरून असें स्पष्ट दिसून येईल कीं, द्रव्याचा अभ्यास करतांना त्याच्या मूलद्रव्याच्या परमाणुभारांकास विशेष महत्त्व आहे.

आतांपर्यंत द्रव्याच्या घटनेसंबंधीं जो विचार झाला तो विद्युच्छास्त्राची फारशी मदत न घेतां झाला. परंतु आधुनिक काळांत विद्युत्शास्त्रांत जे नवीन प्रयोग झाले त्यांच्या साहाय्यानें शास्त्रज्ञांनीं द्रव्याची घटना काय ठरविली आहे तें पाहूं.

किरणविसर्जक द्रव्यांच्या परमाणूंमध्यें ऋणविद्युत्कण असतात असें आढळून आलें आहे. परंतु इतर पदार्थांसहि प्रकाशोद्दाही तीव्रज्वलनोष्णता दिली असतां किंवा अतिनील प्रकाशांत त्यांचें निरीक्षण केलें असतां सदरहू ऋणविद्युत्कण दृष्टीस पडतात. यावरून असें दिसतें कीं प्रत्येक कणांत ऋणविद्युत्कणांचें वास्तव्य आहे; व प्रयोगांतीं असें सिद्ध झालें आहे कीं प्रत्येक ऋणविद्युत्कणापाशीं सारखाच ऋणविद्युत्चा संचय आहे. प्रत्येक ऋणविद्युत्कणाचा ऐन जिन्नस अथवा द्रव्यराशि ( मास ) उज्जाच्या १⁄७०० व्या हिश्शाएवढा आहे. निरनिराळ्या मूलद्रव्यांत त्यांच्या परमाणुभारांकांच्या प्रमाणांत या ऋणविद्युत्कणांचें वास्तव्य असतें. प्रत्येक परमाणूच्या ठिकाणीं ऋणविद्युत्कणांचें अशा तऱ्हेनें अस्तित्व सिद्ध झाल्यानंतर ज्याअर्थीं दरेक परमाणु सुप्तविद्युत (इलेक्ट्रिकली न्यूट्रल)आहे त्याअर्थीं या ऋणविद्युत्चें कार्य मारणारी ( नाहींसें करणारी ) अशी समबल व प्रतिरोधी घनविद्युत् आणि पर्यायानें घनविद्युत्कण त्याठिकाणीं असले पाहिजेत असें सहजच अनुमान निघतें. आणि हें अनुमान खालील प्रयोगावरून खरें ठरलें. हवेचा दाब हलका असतां कोणत्याहि वायूंतून विद्युत्प्रवाह सोडला असतां त्या वायूंत

धनविद्युत्कण आहेत असें दिसून येईल या धनविद्युत्कणांचा धनविद्युत्संचय ऋणविद्युत्कणांएवढाच असतो परंतु त्यांचा द्रव्यराशि उज्जाच्या परमाणूएवढा असतो.

द्रव्याची घटना विद्युत्कणात्मक आहे असें ठरल्यानंतर त्याच्या द्रव्यराशीची उपपत्ति काय आहे याचा विचार करणें अप्रस्तुत होणार नाहीं.

आपल्या भोंवतालचें वातावरण एका निर्भार अदृश्य व स्थितिस्थापक प्रवाही इथ्र नांवाच्या पदार्थानें भरलेलें आहे. अशा प्रकारच्या वातावरणांत प्रत्येक परमाणूमध्यें वास्तव्य करणारे ऋणविद्युत्कण अति सूक्ष्म पण अप्रतिहत गतीनें एकसारखे भ्रमण करीत असतात. विद्युच्छास्त्रांतील एक नियम या ठिकाणीं लक्षांत ठेविला पाहिजे कीं, समविद्युत्कण एकमेकांस अपसारक असतात व विषम विद्युत्कण हे एकमेकांस आकर्षक असतात. या तत्त्वास अनुसरून यांच्या परस्परक्रियांपासून एक प्रकारची प्रेरणा उत्पन्न होते. आतां ज्या ठिकाणीं प्रेरणा उत्पन्न झाली त्या ठिकाणीं द्रव्यराशि असलाच पाहिजे. कारण द्रव्यराशीशिवाय प्रेरणाच उद्भवूं शकत नाहीं या द्रव्यराशींत केव्हां केव्हां थोडा बदल होऊं शकतो. तो दोन प्रकारांनीं; एक असा कीं, वातावरणांत असलेलें इथ्र या विद्युत्कणांच्या गतीला प्रतिरोध करितें. या प्रतिरोधानें द्रव्यराशि विद्युत्क्रियेनें होणाऱ्या द्रव्यापेक्षां जास्त भासतो. दुसरा बदल असा कीं, गति प्राप्त झाली असतां बीजभूत शक्तीहि वाढते व त्याबरोबरच द्रव्यराशीहि वाढतो. गति जर प्रकाशवेगाइतकी मोठी असेल तरच ही वाढ मोठी भासते. परंतु सर्वसाधारण द्रव्याचे घटक जे विद्युत्कण त्यासंबंधीं विचार कर्तव्य असतां त्यांची गति अति सूक्ष्म असल्यामुळें ही वाढ जमेत धरली नाहीं तरी चालेल.

**वजन.**—आतांपर्यंत द्रव्याच्या घटनेचा विचार विद्युद्दृष्ट्या केला. आतां त्याच धोरणानें त्याच्या वजनाचा विचार करूं. वजन व द्रव्यराशि यांचा संबंध हा द्रव्याचा एक गूढ व महत्त्वाचा गुणधर्म आहे. कोणत्याहि पदार्थाचें वजन त्याच्या द्रव्यराशीशीं प्रमाणांत असतें, हा सिद्धांत न्यूटननें व नंतर इ. स. १८३० मध्यें बेसेलनें प्रयोगांनीं सिद्ध करून दाखविला. द्रव्याच्या घटनेचा संबंध विद्युत्शीं असतो असा विचार करीत असतां ह्या गुणोत्तराच्या सातत्यास नवीनच महत्त्व प्राप्त होतें. आतांपर्यंत आपण असें पाहिलें कीं प्रत्येक पदार्थांतील परमाणूमध्यें बारीक कण असतात, त्यांचा द्रव्यराशि उज्जाच्या परमाणूच्या $\frac{1}{1000}$ इतका असतो, तो बारीक कण ऋणविद्युत्नें संचारित असतो आणि ह्या संचाराच्या योगानेंच त्याचा द्रव्यराशि बनलेला असतो. नंतर असा प्रश्न उद्भवतो कीं हा द्रव्यराशि मोजतां येण्यासारखा आहे कीं काय? प्रथम आपण असें समजूं कीं हा द्रव्यराशि मोजतां येण्यासारखा नाहीं. असें असेल तर या सूक्ष्म कणांच्या भरतीनें परमाणूंच्या द्रव्यराशींत वाढ होईल पण वजनांत होणार नाहीं. जर परमाणूमधील सूक्ष्मकण परमाणुभारांकांशीं प्रमाणात्मक असतील तर वजनाशीं द्रव्यराशीचें असलेलें गुणोत्तर, सूक्ष्म कण मोजतां येण्याजोगे असले किंवा नसले तरी सुद्धां, स्थिर असतें आणि जर हे सूक्ष्म कण प्रमाणात्मक नसतील व जर त्यांना वजन नसेल तर द्रव्यराशीशीं वजनाच्या असलेल्या गुणोत्तरांत व बेसेलनें सिद्ध केलेल्या गुणोत्तरांत बराच फरक पडेल. पण आपणांस सूक्ष्म कण परमाणुभारांकांशीं प्रमाणात्मक असतात हें निराळ्या रीतीनें दाखवितां येतें.म्हणून द्रव्यराशीशीं असलेल्या वजनाच्या गुणोत्तराचें सातत्य विद्युत्संचाराच्या योगानें उत्पन्न होणारा द्रव्यराशि मोजतां येण्याजोगा आहे किंवा नाहीं हें ठरविण्यास उपयोगी पडत नाहीं.

आपणांस जर क्ष-किरणविसर्जक पदार्थांच्या बाबतींत हें गुणोत्तर काढतां येईल तर ह्या मुद्द्यावर बराच प्रकाश पडेल आणि ज्या अर्थी हे पदार्थ बरीच उष्णता बाहेर टाकतात त्याअर्थी इतर पदार्थांतल्यापेक्षां त्यांच्यामध्यें बीजरूप शक्ति पुष्कळच असली पाहिजे हें सिद्ध होतें. आतां आपण जर अशी कल्पना केली कीं,१ ग्रॅम क्ष-किरण विसर्जक पदार्थानें त्यांतील क्ष-किरणविसर्जक धर्माचा लय होईपर्यंत टाकलेली उष्णता हें त्या पदार्थांतील बीजरूप शक्ति मोजण्याचें प्रमाण(मूलमान)आहे,तर क्ष-किरणविसर्जक पदार्थांत क्ष-किरण विसर्जक नसणाऱ्या पदार्थांपेक्षां असलेला जास्त द्रव्यराशि हा क्ष-किरणविसर्जक पदार्थामध्यें असलेल्या विद्युत्-संचाराच्या योगानेंच आहे असें सिद्ध होतें.हा फरक वरुणामध्यें(युरेनियम) वीस हजार मूलद्रव्याच्या द्रव्यराशीच्या भागांत एक भाग ह्या प्रमाणांत आढळतो. म्हणजे क्ष-किरणविसर्जक पदार्थांत हें गुणोत्तर काढतां येणें शक्य आहे आणि प्रो. जे. जे. थॉमसन् व सदर्न्स (१९१०) ह्यांनीं केलेल्या प्रयोगावरून क्ष-किरणविसर्जक असणाऱ्या किंवा नसणाऱ्या दोन्ही प्रकारच्या पदार्थांमध्यें विद्युत्च्या योगानें उत्पन्न होणारा जास्त द्रव्यराशि भारांकांशीं प्रमाणात्मक असतो असें सिद्ध होतें.

अलीकडे गुणोत्तर शोधण्याकरितां फारसे प्रयोग झाले नाहींत. तरी पण पदार्थांच्या वजनावर रासायनिक किंवा पदार्थवैज्ञानिक स्थितींतील बदलानें होणाऱ्या परिणामावर बरेच शोध लागले आहेत. रासायनिक संयोगांत, वजनांत मोजतां येण्याजोगा फरक होत नाहीं असें लँडोल्टनें सिद्ध केलें आहे. पॉयिंटिंग व फिलिप्स यांनीं असें दाखविलें आहे कीं उष्णमानांत जरी फरक केला तरी वजनांत फरक होत नाहीं, तसेच पॉयिंटिंग यानें असें दाखविलें कीं, स्फटिकाचें वजन किंवा दोन स्फटिकांमधील आकर्षक शक्ति ही त्यांतील अक्षांच्या विशिष्ट दिशेवर अवलंबून नसते. हे सर्व सिद्धांत असें दर्शवितात कीं, द्रव्याच्या कोणत्याहि भागाचें वजन हें पदार्थवैज्ञानिक स्थितीवर किंवा रासायनिक संयोगाच्या वेळीं असणाऱ्या परिस्थिती— अवलंबून नसतें. क्ष-किरण-विसर्जक पदार्थामध्यें

होणाऱ्या बदलाच्या वेळीं वजनांत बदल होतो कीं नाहीं ह्याबद्दल अद्याप निश्चित शोध लागले नाहींत.

आतां आपण वजनाचा विचार गुरुत्वाकर्षणाच्या सहाय्यानें करूं. गुरुत्वाकर्षणाबद्दल बरींच मतें प्रस्थापित झालेलीं आहेत. त्यांतील आपण दोन मतांचा विचार करूं. हीं दोनहि मतें बरींच जुनीं असून विद्युच्छास्त्रदृष्ट्या केलेल्या द्रव्याच्या विचाराशीं जुळतीं आहेत. यांपैकीं पहिलें मत विद्युत्च्या द्वि-द्रवमताशीं संमत आहे. आतां एकाच प्रकारच्या दोन विद्युत्मधील अपसारक शक्तीपेक्षां निरनिराळ्या प्रकारच्या दोन विद्युत्मधील आकर्षक शक्ति जास्त असते.ही अवशिष्ट असणारी शक्ति म्हणजेच गुरुत्वाकर्षण. आणि गुरुत्वाकर्षण जर ह्या अवशिष्ट असणाऱ्या शक्तीवर अवलंबून असेल तर वजन हें पदार्थामध्यें असलेल्या विद्युत्च्या मूलमानावर अवलंबून असलें पाहिजे. दुसरें मत जिनीव्हा येथील ली सेज यानें इ. स. १८१८ मध्यें प्रस्थापित केलें. ह्याच्या म्हणण्याप्रमाणें सर्व जग हें अतिसूक्ष्म अशा कणांनीं भरलेलें असून ते कण अतिशय वेगानें इतस्ततः भ्रमण करीत असतात. हे कण सूर्यमालेच्याहि पलीकडून आलेले असल्यामुळें त्यांस 'मृत्युलोकातीत कण' (अल्ट्रामुंडेन) असें म्हणतात. हे कण कोणत्याहि पदार्थांतून आरपार जाऊं शकतात. व मोठमोठ्या पदार्थांतून हे बहुतेक अपशोषण्याशिवाय जातात. अपशोषण होतें तें फार थोडें असतें व पदार्थ एकाच प्रकारच्या परमाणूचा बनलेला असून त्या घटकपरमाणूमधील अंतर त्यांच्या आकारापेक्षां अधिक असेल तर हें अपशोषणाहि त्या पदार्थांमधील द्रव्यराशीशीं प्रमाणात्मक असतें. ली सेज ह्यानें असेंहि सिद्ध केलें कीं कोणत्याहि दोन पदार्थांत ह्या कणांच्या शिरकावाच्या योगानें मिळणाऱ्या भ्रामक शक्तीचा दर, त्या पदार्थांच्या द्रव्यराशीच्या गुणाकाराशीं प्रमाणात्मक असतो व त्यांच्यामधील अंतर त्यांच्या द्रव्यराशीपेक्षां बरेंच मोठें असल्यास त्या अंतराच्या वर्गाच्या व्यस्त प्रमाणांत असतो. ह्यावरून असें दिसून येतें कीं, त्यांच्यावर असलेल्या प्रेरणा गुरुत्वाकर्षणाचे नियम बरोबर पाळतात. क्लार्क मॅक्सवेल असें समजतो कीं, मृत्युलोकातीत सूक्ष्म कणांकडून दिल्या जाणाऱ्या भ्रामक शक्तीमुळें गतिविशिष्ट शक्ति कमी होते व तिचें रूपांतर रॉंटजेन किरण, उष्णता, अरिभवन, या किंवा अशाच कोणत्याहि एका प्रकारच्या शक्तींत होतें. अर्वाचीन मताप्रमाणें ह्या सूक्ष्म कणांचें अस्तित्व सिद्ध होऊन त्यांनां पदार्थांमधून आरपार जाण्याची शक्ति असते असें सिद्ध झालें आहे, आणि आपणांस हेंहि माहीत आहे कीं त्यांच्या प्रेरणेचें रूपांतर प्रकाशलहरींमध्यें किंवा रॉंटजेन किरणांमध्यें होतें. ली सेज याच्या मताप्रमाणें हे सूक्ष्म कण फक्त भ्रामकशक्तिवाहक आहेत. भ्रामक शक्ति असणारे कोणतेहि पदार्थ अति वेगानें फिरत असतात आणि त्यांनां कोणत्याहि पदार्थांतून आरपार जाण्याची शक्ति असते. रॉंटजेन किरणांत हे सर्व गुणधर्म असतात. म्हणून ली सेज याच्या सूक्ष्म कणाबद्दल रॉंटजेन किरण घालण्यास कांहीं एक प्रत्यवाय नाहीं.

ह्या लेखामध्यें द्रव्याच्या घटनेचा विचार, त्याचा विद्युत्शास्त्राशीं संबंध आहे अशा धोरणानें केला आहे. कारण या धोरणास पोषक असे बरेच सिद्धांत प्रयोगांनीं सिद्ध करून दाखविले आहेत व अजून नवीन नवीन सिद्धांत प्रयोगांनीं द्रव्याच्या घटनेबद्दल वगैरे सिद्ध होत आहेत. म्हणूनच ह्या दृष्टीनें द्रव्याच्या घटनेचा विचार करणें श्रेयस्कर आहे.

**द्राविड वेद**—द्राविडभाषेंत नम्माळवार यानें जे ग्रंथ केले आहेत त्या सर्वांनां द्राविड वेद असें म्हणतात. तिरुवोयमोळी यांत सामवेदाचा सारांश १ हजार पद्यांत आहे; तिरुविरुत्तम यांत १०० पद्यें (सारांश) ऋग्वेदाचीं, तिरुवाशिरीयम यांत ७ पद्यें यजुर्वेदाचीं, व पेरियतिरुवंदादि यांत १०७ पद्यें अथर्ववेदाचीं आलीं आहेत. हीं पद्यें त्या त्या वेदांतील मजकुराचें तामीळ भाषेंत (सारांश रूपाचें) भाषांतर आहे. मधुरकवि यानें तिरुवोयमोळी हें प्रसिद्धीस आणलें; संगम या कविसमाजांत त्यास अपमान मिळाला; ही ३०० लोकांची सभा होती. पाण्ड्यराजांच्या कारकीर्दींत ही गोष्ट घडली. [ अय्यंगार-एन्शन्ट इंडिया. ]

**द्राविड संस्कृति, भाषावर्ग.**—या भाषावर्गांत दक्षिण हिंदुस्थानांतील प्रमुख भाषांचा समावेश होतो. या भाषा बोलणारांची एकंदर संख्या ठोकळमानानें पांच कोटी सत्तर लक्ष इतकी आहे. येथें फक्त तामीळ, मल्याळी, कानडी व तेलगू इतक्यांची माहिती देऊन किरकोळ कोडगु, तुळू, तोड, कोट या भाषा वगळल्या आहेत. या भाषावर्गाला द्राविडी हें नांव केवळ सांकेतिक अर्थानें दिलेलें आहे. हा शब्द संस्कृत द्रविड शब्दापासून बनलेला असून तोहि जुन्या द्रमिळ, द्रमिळ, तामिळ, अशा मूळ शब्दापासून होत गेलेला आहे. तेव्हां द्राविडी व तामिळी हे दोन्ही शब्द एकच होत. आंध्र (म्हणजे तेलगु) व द्रविड (म्हणजे तामिळ) या लोकांची जी भाषा तिला आंध्र-द्रविड भाषा असें कुमारिलभट्टानें म्हटलें आहे. हिंदुस्थानांत द्रविड या शब्दाचे अनेक अर्थ आहेत, उदा. पंचद्रविड असें जे म्हणतात त्यांत तेलगु, कानडी, मराठी, गुजराथी, व तामिळ इतक्यांचा समावेश होतो. यूरोपियनांनीं द्रविडी हें एका सबंध भाषावर्गाला नांव दिलेलें असून तें नांव टाकून देण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं.

या द्राविडी भाषांनीं सर्व दक्षिण हिंदुस्थान व सिलोनचा उत्तरार्ध व्यापिला आहे. उत्तरेस यांची मर्यादा गोमांतक ते कोल्हापूर येथपासून सुरू होते. पुढें हैद्राबादेमधून वऱ्हाडच्या दक्षिणहद्दीवरून पूर्वेस बंगालच्या उपसागरापर्यंत ती मर्यादा पोहोंचते. चांदा व भंडारा यांच्या पूर्वेकडील टेंकड्यांतूनहि द्राविडी लोक असून सपाट प्रदेशांतील आर्य भाषांमध्यें या द्राविडी भाषा बेटाप्रमाणें वसलेल्या आहेत. उत्तरेकडे

छोटा नागपूर, मध्यप्रांत व गंगेच्या कांठचा राजमहाल येथें द्राविडी भाषा आढळतात. आणि अगदीं वायव्येस बलुचिस्तानांतहि एक द्राविडी भाषा चालू आहे. उत्तरेकडील हे द्राविडी जातींचे लोक झपाट्यानें आर्य बनत चालले असून त्यांच्या भाषेवर आर्य भाषेचा परिणाम होतांहोतां शेवटीं तिच्या जागीं आर्यभाषा आली आहे. १८९१ सालीं गोंड लोकांची संख्या ३०,६१,६८० होती, पण गोंडी भाषा बोलणारे मात्र १३,७९,५८० इतकेच लोक होते. अनेक जातींचे लोक पूर्वी द्राविडी भाषा बोलत असलेले हल्लीं आर्यभाषा बोलूं लागले आहेत. कित्येक द्राविडी भाषांत आर्य भाषांची मिसळ होऊन त्या मिश्रभाषा बनल्या आहेत. या आर्यभाषांच्या प्रसाराचा असाहि परिणाम झाला कीं, मूळ आर्यभाषा बोलणाऱ्या लोकांतहि द्राविडींचें मिश्रण आढळतें. दुसरें असें कीं, द्रविड लोक हिंदुस्थानांत आर्यलोक येण्यापूर्वी बराच काळ राहिलेले होते यांत शंका नाहीं. आर्यांनीं उत्तर हिंदुस्थान व्यापल्यावर द्रविड लोकांचा संहार न करतां उलट त्यांनां आपल्या समाजांत घेतलें. आतां द्राविडी भाषेच्या खुणा अद्यापहि आर्यभाषांत सांपडतात किंवा काय एवढाच आपल्यापुढें प्रश्न आहे व याचें उत्तर होकारार्थी आहे असें बिशप काल्डवेल याच्या पुढील उताऱ्यावरून दिसून येईल:—

"आर्यपूर्व द्रविड लोक संख्येनें अधिक होते. त्यांचा नाश न करतां आर्यांनीं त्यांनां आपल्या समाजांत घेऊन परतंत्र बनविलें. द्रविड लोकांनीं जेत्या आर्यांची भाषा उचलली, पण तिच्यावर त्यांच्या द्राविडी भाषेचा परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. तो परिणाम असा कीं आर्यभाषेंत कित्येक द्राविडी शब्द नवीन आले, व एकंदर आर्यभाषेचा जोर व वळण दोन्हीं बदलून गेलीं."

प्रथम शब्दसंग्रहाबद्दल विचार करतां असें दिसून येतें कीं, इंडो-आर्यन भाषेंतील बरेचसे शब्द कोणत्याहि इंडो-यूरोपियन भाषेंत आढळत नाहींत. विशेषतः अर्वाचीन देशी भाषांत असे शब्द पुष्कळ आहेत. अशा शब्दांपैकीं पुष्कळांची उत्पत्ति संस्कृतपासूनच आहे असें अलीकडील भाषाशास्त्रज्ञांनीं सिद्ध करण्याचा क्रम चालविला आहे. तथापि तसले शब्द संस्कृत भाषेंत किंवा मूळ वैदिक भाषेंत सांपडतात इतकेंच सिद्ध झाल्यानें भागत नाहीं. तर ते संस्कृतप्रमाणें इंडो-यूरोपियन वर्गांतील भाषामध्येंहि सांपडले पाहिजेत; तरच ते मूळ द्राविडी नाहींत असें ठरेल. परंतु ही गोष्ट तर भाषाशास्त्रानें सिद्ध होऊं शकत नाहीं. उदा. क्रियापदांतील कित्येक मूळ संस्कृत धातू इंडो-यूरोपियन भाषांत आढळत नाहींत. तसेंच बरेच शब्दहि आढळत नाहींत. तेव्हां असले कित्येक शब्द व धातू मूळ द्राविडी भाषांमधील असले पाहिजेत. बिशप काल्डवेलनें आपल्या व्याकरणांत असल्या शब्दांच्या याद्या दिल्या आहेत. त्यांपैकीं एक 'शिव' शब्द उदाहरणार्थ घेऊं. रुद्रदेवता या अर्थी 'शिव' हा शब्द वेदांत आलेला आहे. द्राविडी भाषेंत शिव म्हणजे तांबडा असा अर्थ असून तिकडूनच तो संस्कृतमध्यें आला असावा असें दिसतें. ऋग्वेदांत रुद्र म्हणजे तांबडा असा अर्थ आहे. रुद्र-शिव या देवाच्या नांवामध्यें द्राविडी भाषेंतील कल्पना शिरलेली दिसते. या एकाच शब्दावरून शब्द व कल्पना या दोन्हींवर द्राविडी भाषेचा किती परिणाम झालेला आहे तें स्पष्ट दिसतें. साधारणतः असा एक नियम दिसतो कीं, जे लोक दुसरा देश जिंकून तेथें नवीन वसाहत करतात, त्यांनां त्या नव्या देशांतील हवामानानुसार व तद्देशीय लोकांबरोबरच्या संघट्टनेमुळें उच्चारपद्धति थोड्याफार अंशानें स्वीकारावी लागते. आर्य लोकांमधील मूर्धन्यवर्ण द्राविडी भाषेंतून आलेले आहेत किंवा संस्कृतमध्यें मूळ ते होतेच याबद्दल बराच वाद माजलेला आहे. हे मूर्धन्यवर्ण इंडो-यूरोपियन भाषांत असल्याचें दिसत नाहीं. द्राविडी भाषांत मात्र ते प्रमुखत्वानें आहेत. हिंदुस्थानांत या वर्णांचा उच्चार कांहीं मूर्धन्य व कांहीं दंत्यवर्णांसारखा करतात. तेव्हां मूळ द्राविडी भाषेंतील मूर्धन्यवर्णांचा आर्यभाषेंतील वर्णांवर परिणाम झाला असावा हें संभवनीय दिसतें. द्राविडी भाषेचा आर्यभाषेवर दुसरा परिणाम झालेला दिसतो तो 'ल' या वर्णाच्या बाबतींतील होय. बहुतेक इंडो-यूरोपियन भाषांत 'र' व 'ल' असे दोन्हीं स्वतंत्र वर्ग आहेत. परंतु इतर भाषांत जेथें 'र' असतो तेथें संस्कृतमध्यें 'ल' असतो; आणि उलट 'ल' च्या जागीं 'र' असतो. जुन्या इराणी भाषांत 'ल' हा वर्णच नाहीं. तेव्हां या बाबतींतहि द्राविडीचा परिणाम झाला असावा हें स्पष्ट दिसतें. 'र' चा 'ल' असा फरक द्राविडी भाषेंत पुष्कळ आढळतो आणि वेदकालापासून पुढें 'ल' चा उपयोग इंडो-आर्यन्‌भाषेंत वाढत्या प्रमाणांत होत गेला आहे ,या गोष्टीवरूनहि वरील अनुमानाला दुजोरा मिळतो. प्राकृत भाषेंत एकेरी शब्दांत व सामासिक शब्दांत स्वरापुढें आलेल्या कठोर व्यंजनाला मृदुत्व येणें, मराठीमध्यें तालव्य वर्णांचा दोन प्रकारानें उच्चार होणें, छ बद्दल स आणि स बद्दल ह येणें वगैरे गोष्टी द्राविडी भाषेच्या झालेल्या परिणामाच्याच द्योतक आहेत.

प्रत्ययांच्या बाबतींत द्राविडी भाषांचा आर्यभाषांवर परिणाम झालेला आहे, तो वरच्यापेक्षां अधिक महत्त्वाचा आहे. विभक्तिप्रत्ययांच्या ऐवजीं शब्दयोगीअव्ययें जोडून अर्थ आणण्याची पद्धत असून हीं अव्ययें एकवचनाला व अनेकवचनाला सारखींच असतात. ही इंडो-आर्यन भाषेंतील पद्धत द्राविडी भाषेंत आढळते व इतर अनार्यभाषांतहि आढळते. शिवाय हीं अव्ययें शब्दाच्या मूळ रूपाला न लागतां सामान्यरूपाला लागतात व द्राविडी भाषेंतहि तीच पद्धत असून या सामान्यरूपालाच षष्ठी विभक्तीचा अर्थ असतो. मराठी व बिहारी भाषेंत हें सामान्य रूप फार उपयोगांत आणतात, आणि या दोन भाषांवरच द्राविडीचा परिणाम सर्वांत अधिक

आलेला आहे. शिवाय या दोन्ही भाषावर्गांमध्ये षष्ठीविभक्तिरूपांचा विशेषणाप्रमाणें उपयोग करतात.

द्रविड लोकांची हिंदुस्थानांत वस्ती किती काळ आहे तें नक्की माहीत नाहींत. तथापि आर्यलोक हिंदुस्थानांत येण्यापूर्वीच ते हिंदुस्थानांत होते यांत शंका नाहीं. परंतु द्राविडी लोक हिंदुस्थानांतील मूळचे रहिवाशी आहेत किंवा दुसऱ्या ठिकाणाहून ते हिंदुस्थानांत आलेले आहेत हेंहि सांगतां येत नाहीं. हिंदुस्थानच्या वायव्येकडील प्रांतांत द्राविडी भाषा आढळते. यावरून आर्यलोकांप्रमाणेंच द्रविड लोकहि त्याच बाजूनें बाहेरून हिंदुस्थानांत आले असले पाहिजेत, असें बिशप काल्डवेलचें म्हणणें आहे; आणि डॅनिश भाषाशास्त्रज्ञ रास्क याच्या मताप्रमाणेंच त्याचेंहि मत त्यानें आधारानिशीं असें दिलें आहे कीं, द्राविडी ही सिथियन भाषावर्गांपैकीं एक भाषा आहे.

एका भाषावर्गाला दिलेलें सिथियन नांव हेंच बरोबर नाहीं. ग्रीक ग्रंथकारांमार्फत सिथियन म्हणून जे शब्द चालत आलेले आहेत ते मूळ वास्तविक इराणियन आहेत; म्हणजे इंडो-यूरोपियन भाषावर्गांतील आहेत. आशिया व यूरोप येथील ज्या भाषा इंडो-यूरोपीय किंवा सेमिटिक या भाषावर्गांत पडत नाहींत अशा भाषांच्या वर्गाला सिथियन असें नांव देण्याचा प्रघात पडला आहे. तथापि या भाषा सर्व एका वर्गांत पडण्यासारख्या नाहींत. चीन व शेजारचा प्रदेश यांतील एकाक्षरी भाषा ही काकेशस पर्वतांतील भाषेहून किंवा फिन लोक व माग्यार लोक यांच्या भाषांहून इंडो-यूरोपीय भाषाइतकीच भिन्न आहे. द्राविडी भाषांचा हिंदुस्थानाबाहेरील इतर भाषावर्गांशीं संबंध दाखविण्याचे सर्व प्रयत्न सामान्यतः निष्फळच झालेले आहेत; सबब द्राविडी हा एक स्वतंत्र भाषावर्ग कल्पिणें आपणांस प्राप्त आहे. द्राविडी वर्गाचा मुंडावर्गाशीं संबंध आहे हें त्या भाषावर्गावरील लेखांत दाखविलेंच आहे. द्राविडी भाषांचा इंडो-यूरोपीय भाषांशीं संबंध आहे असें दाखविण्याचे प्रयत्न सर्व निष्फळ झालेले आहेत. द्राविडी भाषावर्गांतील तामीळ, मल्याळी, कानडी व तेलगू या प्रमुख भाषा आहेत. फार कालापासून त्यांत वाङ्मय होत आलेलें आहे. तथापि ही वाङ्मयीन भाषा त्या त्या लोकांच्या बोलण्यांतील भाषेहून भिन्न आहे आणि बोलण्याच्या व लिहिण्याच्या भाषेंत फरक इतका असतो कीं, एखाद्या निरक्षर इसमाला त्याच्याच भाषेंतील ग्रंथ वाचून दाखविल्यास तो समजणें अशक्य असतें. या बोलण्याच्या व लिहिण्याच्या भाषेंत फरक कोठें व कसा पडतो याचें विवेचन करण्याचें हें स्थळ नव्हे. इतकेंमात्र खरें कीं, बोलण्याच्या भाषेपेक्षां लिहिण्यांतील भाषा जुन्या स्वरूपांतली असते. याबद्दलची अधिक माहिती बिशप काल्डवेलच्या व्याकरणग्रंथांत सांपडेल.

द्राविडी भाषा मूळ ज्या भाषेपासून निघाल्या त्या भाषेंतील पुष्कळशा गोष्टी जिच्यांत अद्यापिहि कायम आहेत अशी एकच भाषा आहे, ती तामीळ होय. तेव्हां या भाषेच्या आधारानें इतर भाषांचें वर्गीकरण करणें युक्त आहे. मल्याळी भाषेंतील वाङ्मयावर तामिळीचा फार परिणाम झालेला आहे आणि या दोन्ही भाषांमध्यें साम्य फारच आहे. पण दोन्ही भाषांत स्वतंत्र निरनिराळें वाङ्मय झालेलें असल्यामुळें त्यांनां दोन निराळ्या भाषा मानणें भाग आहे. कानडी भाषाहि तामिळीशीं फार समान आहे. या दोन भाषांतच स्त्रीलिंगाबद्दल व्यवस्थित नियम आहेत; सबुद्ध व निर्बुद्ध नामांचे अनेक वचनी प्रत्ययहि दोहींत सारखेसारखेच आहेत; व दोहींतहि सामान्यरूपें सारख्याच प्रकारचीं होतात. कुमारिलभट्टानें आंध्र-द्राविडभाषा म्हणून जें म्हटलें आहे त्यांतील द्राविड शब्दांत कानडी व तामिळ या भाषांचा समावेश होत असून आंध्र म्हणजेच तेलगू भाषा होय.

निरनिराळ्या द्राविडी भाषा बोलणारांची १९११ सालची संख्या पुढील कोष्टकावरून दिसून येईलः—

| भाषा | संख्या |
|---|---|
| तामीळ | १,८१,२८,३६५ |
| मल्याळी | ६७,९२,२७७ |
| कानडी | १,०५,२५,७३९ |
| तेलगू | २,३५,४२,८६१ |
| तुळू | ५,६३,४५३ |
| कोडगु | ४२,८८१ |
| तोडा | ७३० |
| कोटा | १,२८० |
| कुरुख | ८,००,३२८ |
| माल्टो | ६४,८७५ |
| गोंडी | १५,२७,१५७ |
| कुइ | ५,३०,४७६ |
| कोलामी व नाइकी | २४,०७४ |
| ब्राहुई | १,७४,२२९ |
| एकूण | ६,२७,१८,७२५ |

सं स्कृ ति.—या संस्कृतीविषयीं पद्धतशीर विवेचन झालें नाहीं. या संस्कृतीचा इतिहास द्यावयाचा म्हणजे आर्यन् संस्कृतीचा परिणाम होण्यापूर्वीचें रूप पहावयाचें आणि एकंदर मनुष्यभ्रमणाच्या इतिहासामध्यें या महावंशाचीं भ्रमणें देऊन तिच्या पोटसंस्कृती कशा निर्माण झाल्या हें पहावयाचें.

आज ही संस्कृति हिंदुस्थानांत प्रामुख्यानें आहे व इतर तत्सदृश जे लोक असतील त्यांचा भारतीय द्राविडांशीं कितपत ऐतिहासिक संबंध जोडतां येईल हा मुख्य ऐतिहासिक प्रश्न होय. ज्या वंशांशीं द्राविड वंशाचा संबंध जोडण्यांत येत आहे असे वंश म्हटले म्हणजे सरहद्दीवरील ब्राहुई, इराणांतील लुरी, प्राचीन तुर्कस्तानांतील सुमेरियन, हे होत. यापेक्षां दूरचा संबंध लावणाऱ्या मंडळींनीं त्यांचा सेमिटिक लोकांशीं वांशिक संबंध लावला आहे आणि कित्येकांनीं

आस्ट्रेलियांतील अन्य लोकांशीं संबंध लावला आहे. याची पुढची पायरी म्हणजे फिन, लॅप वगैरे लोकांशीं संबंध जुळविणें. तर तसली कल्पनाहि अर्धी मुर्धी गंभीरपणानें व अर्धी मुर्धी थट्टेनें रिसलेनें सुचविली आहे. द्राविड लोकांचे थोडे बहुत कुरळे केंस, यहुद्यांचे तसल्याच प्रकारचे केंस व मिलेनेशियन भाषा बोलणाऱ्यांचे केंस यांचें सादृश्य कित्येक लोक विचारास घेतात तर कित्येक लोक बूमेरँगनें आस्ट्रोलॉइड व द्राविड लोकांचा संबंध जोडूं पहातात कोलेरियन, निग्रिटो इत्यादि रक्तें हिंदुस्थानांत होतीं आणि त्यांचा वंश नष्ट झाला असेल असें कीन म्हणतो ( कोचीन ट्राइब्स अँड कास्ट्स भाग पहिला, कीनची प्रस्तावना ). हें मत हिंदुस्थानांतील सरकारी मानवशास्त्रवेत्त्यांच्या मताविरुद्ध आहे आणि ते कोलेरियन व निग्रिटो या केवळ कल्पना असून ते द्राविडांचेच पोटभेद आहेत असें म्हणूं लागतात.

प्राचीन द्राविडांचें वाङ्मय शिल्लक नाहीं. हिंदुस्थानांतील सर्वांत जुनें वाङ्मय जें तामिळ त्यांतील जुन्यांतले जुने ग्रंथ जरी घेतले तरी ते ग्रंथ संस्कृत भाषेनें तामिळवर परिणाम केल्यानंतरच्या काळांतले आहेत आणि त्यामुळें हिंदुस्थानामध्यें द्राविडी संस्कृतीला जें स्वरूप प्राप्त झालें तें केवळ आर्येन संस्कृतीची रूपांतर पावलेली शाखा या नात्यानेंच झालें. द्राविडी छंदःशास्त्रांतील वैशिष्ट्यें विज्ञानेतिहासांत सविस्तर दिलेलींच आहेत. द्राविडांचें जें स्वतंत्र संगीत आहे तें द्राविडांच्या लौकिक गानास संस्कृत-शास्त्रज्ञांनीं पद्धति लावून निर्माण केलेलें संगीत होय.

द्राविडांचा विशिष्ट कायदा देखील हिंदु कायद्याची उपशाखा या नात्यानें अस्तित्वांत आहे. द्राविडांचा विशिष्ट असा जो मातृपरंपरेचा कायदा तो देखील औदीच्यांच्या धर्मकल्पनांपासून अस्पृष्ट राहिला नाहीं. उदाहरणार्थ, प्रत्येक मल्याळी नायरांचे विवाह हे ब्राह्मणी कायद्याप्रमाणें पाट होत, त्यांत मुलींचें लग्न अगोदर ब्राह्मणाबरोबर अगर झाडाबरोबर लागतें, तेंच थाटानें होतें व त्या लग्नानंतर मुलीस १४ दिवसांनीं वैधव्याची दीक्षा देण्यांत येते आणि मग मात्र ती आपला संबंध वाटेल त्याबरोबर करते व जेव्हां पहिल्या नामधारी लग्नाचा नवरा मरेल तेव्हां त्या नवऱ्यास ( संबंधच्या नवऱ्यास नव्हे ) नायर स्त्री पिंड देते. कायद्यावर जसा परिणाम घडला तसा दुसऱ्या अनेक आचारांवरहि परिणाम घडला आहे. द्राविड संस्कृतीवर वैदिक संस्कृतीचा जरी परिणाम झाला तरी त्यायोगानें तिचें वैशिष्ट्य नष्ट न होतां तें जास्त प्रगट करावयास एक दिशा मिळाली आणि तिनें हिंदु संस्कृतीस वैचित्र्य आणलें. तें वैचित्र्य आपणांस द्राविडी कलाकौशल्यांत व वास्तुशास्त्रांत पूर्णपणें आढळून येतें.

द्राविडी संस्कृतीचा हिंदु संस्कृतीशीं मिलाफ जितका उत्तम तऱ्हेनें झाला तितका दुसऱ्या कोणत्याहि संस्कृतीशीं झाला नाहीं. पापुअन, फिजी, ऑस्ट्रोलाइड हे सर्व वंश वन्य स्थितींत राहिले. चिनी संस्कृति त्यांच्यावर फारशी परिणाम करूं शकली नाहीं. अरबांनीं तिच्यावर फारच थोडा परिणाम केला आणि आतां जर परिणाम बराच होत असेल तर तो ख्रिस्ती संस्कृतीचा होय.

हिंदुस्थानांतील द्राविडांमध्यें जरी हिंदुत्व पूर्णपणें शिरलें तरी कित्येक आचार जुनेच राहिले हें वीरकल, माद्रीगल यांच्या अस्तित्वावरून दिसून येईल ( वीरकल पहा ). कांहीं गोष्टींमध्यें द्राविड संस्कृतीनें आपला जोर दाखविला तो आपल्या आवडीनिवडींनें होय. कर्नाटकामध्यें बसवाच्या संप्रदायास जो जोर मिळाला त्यांत दिसून येणारें मन आपलें थोडेसें स्वातंत्र्य दाखवीत होतें यांत शंका नाहीं.

सुमेरियन लोकांशीं द्राविडांचा संबंध कितपत आहे हें अन्यत्र ( सुमेरियन पहा ) दिलेंच आहे. तसाच सेमिटिक लोकांशीं संबंध ( जो अजून पूर्णपणें सिद्ध झालासें वाटत नाहीं ) तो सेमिटिक या सदराखालीं दिला आहे.

**द्राक्षें**—या वेलीस लॅटिनमध्यें विटिस वाइनफेरा, इंग्रजींत ग्रेप, संस्कृतमध्यें द्राक्षा, अमृतफला,स्वादुफला, मराठींत द्राक्ष, खिसमिस, हिंदींत अंगूर, दाख, किसमिस तेलगूंत द्राक्ष-पोंडु इत्यादि नांवें आहेत. द्राक्षाचा वेल मूळचा पश्चिम आशिया, दक्षिण यूरोप, अल्जीरिया व मोरोक्को या देशांच्या समशीतोष्ण भागांतील आहे. वायव्य हिमालयावर द्राक्षांच्या जंगली वेली आहेत.वायव्य हिंदुस्थानांत त्यांची पुष्कळ लागवड केली जाते; परंतु दक्षिणेच्या बाजूला द्राक्षांचे वेल फार आढळत नाहींत.

द्राक्षांची माहिती हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून आहे.संस्कृतमध्यें द्राक्षाला मृद्विका असेंहि म्हणतात. द्राक्षांच्या मद्याकाला मद्धिका असें नांव आहे. चरक व सुश्रुत या ग्रंथांत द्राक्षांचा उल्लेख आहे परंतु हिंदुस्थानांत मुसुलमानी अमलापूर्वी द्राक्षांची लागवड होत असे कीं नाहीं यासंबंधीं बिनचुक माहिती मिळत नाहीं.

फारडोंग येथील ८ व्या शतकांतील जुनीं स्थळें शोधीत असतां वाळून कठिण झालेलीं कांहीं काळीं द्राक्षें सांपडलीं असें स्टाइन यानें 'एन्शन्ट खोतान' नामक पुस्तकांत लिहिलें आहे. याच पुस्तकांत दुसरीकडे त्यानें असें लिहिलें आहे कीं दंदान ऊलीक यानें आपल्या एका चित्रांत नेहमीच्या अंजिराच्या पानाऐवजीं द्राक्षाचें पान काढलें आहे. बावर मॅन्साक्रिप्टमध्यें, मनुका, बेदाणा वगैरेंच्या औषधी उपयोगासंबंधीं पुष्कळ उल्लेख आहेत. वैदिक ग्रंथांत द्राक्षाचा उल्लेख आढळतो.

परंतु, वैद्यकांत मुख्यतः वाळलेलीं द्राक्षें म्हणजे मनुका, बेदाणा वगैरे, व द्राक्षाचें मद्य म्हणजे मद्धिका यांचे उपयोग सांगितलेले आहेत यावरून हल्लींप्रमाणें, मुसुलमानी अमदानीच्या पूर्वीहि द्राक्षें उत्तर सरहद्दीपलीकडून येत असावींत. मुसुलमानी धर्मांत दारू निषिद्ध असल्यामुळें, त्यांच्या अंमदानींत द्राक्षांच्या लागवडीवर कसकसे परिणाम झाले याबद्दल पुष्कळांनीं विवेचन केलें आहे. दौलताबाद येथील द्राक्षाचे मळे तुघ्लखांच्या ( इ. स. १३३५ ) वेळेपा

अस्तित्वांत असून त्या ठिकाणीं राजधानी अथवा लष्करी ठाणें असे त्यावेळीं ते चांगल्या स्थितींत असत असें एक ग्रंथकार लिहितो. मूर प्रवासी इब्नबतूता ( १४३० ) व फ्रेंच प्रवासी थिव्हेनॉट ( १६६७ ) हे दौलताबादेस गेले त्यावेळीं तेथील द्राक्षांचे मळे पाहून त्यांनां आश्चर्य वाटलें.

अकबराच्या कारकीर्दींत द्राक्षांच्या लागवडीला चांगलें उत्तेजन मिळून पंजाबमध्यें व उत्तर व पश्चिम हिंदुस्थानांत उत्तमोत्तम जातींच्या द्राक्षांची लागवड करण्यांत आली होती. परंतु त्याच्या नातवाच्या कारकीर्दींत काश्मीर येथील द्राक्षांचे मळे तोडून टाकण्याविषयीं हुकूम झाला व यामुळें त्यापुढें एकंदर हिंदुस्थानांतील द्राक्षांच्या लागवडीकडे दुर्लक्ष होऊं लागलें. हल्लीं हिंदुस्थानांत द्राक्षांची लागवड महत्त्वाची नाहीं याचें कारण हेंच असण्याचा संभव आहे.

परंतु उत्तर व पश्चिम हिंदुस्थान हे प्रदेश द्राक्षांच्या लागवडीला योग्य आहेत यांत मात्र कांहीं संशय नाहीं. हल्लीं सुद्धां अफगाणिस्तान, बलुचिस्तान व काश्मीर येथील द्राक्षांचा व्यापार मोठा असून तो पुष्कळ वाढवितां येण्यासारखा आहे. यूरोपियन लोकांच्या आवडीच्या द्राक्षांच्या निरनिराळ्या जाती हिंदुस्थानांत आणल्या होत्या; परंतु त्यांपैकीं बहुतेक येथें होत नाहींत असें आढळून आलें. बहुतेकांनां येथील हवापाणी व जमीन मानवत नाहीं असें दिसतें. सफेद अंगूर, काश्मिरी द्राक्षें, बेदाणा व हबशी अंगूर येवढ्याच जाती येथें स्थायिक झाल्या आहेत. पावसाळा सुरू होऊन हवेंत ओलावा आल्यावर द्राक्षें चांगलीं पिकत नाहींत. दख्खनकडे मार्च महिन्यांत, कलकत्त्याच्या आजूबाजूला मेमध्यें, व उत्तरेच्या प्रांतांत जून महिन्यांत, म्हणजे उन्हाळा सर्वांत जास्त असून हवेंत आर्द्रता मुळींच नसते अशा वेळीं द्राक्षें फार उत्तम पिकतात.

पं जा ब.—पंजाबांत यूरोपप्रमाणेंच द्राक्षांचे वेल चांगले फोंफावतात; व तेथें एकंदर दहा बारा प्रकारचीं द्राक्षें होतात. परंतु अलीकडील द्राक्षांच्या लागवडीसंबंधीं विशेष माहिती उपलब्ध नाहीं. अकबराच्या काळीं काश्मिरांत द्राक्षांची लागवड बरीच होत असून द्राक्षांची दारू करण्याचा धंदाहि बराच चालत असे. मध्यंतरीं द्राक्षांची लागवड कमी झाल्याचा उल्लेख मागें आलाच आहे. त्यानंतर १८७६ पासून त्या धंद्याला उर्जितावस्था प्राप्त झाली असून तेथील तांबड्या व पांढऱ्या दारूला स. १८८४च्या कलकत्ता येथील सर्वराष्ट्रीय प्रदर्शनांत सुवर्णपदक मिळालें होतें. संयुक्त प्रांतांत सपाटीच्या सर्व जिल्ह्यांत द्राक्षें पुष्कळ होतात; परंतु तीं दारूच्या उपयोगी नसतात असें म्हणतात. कनावर येथें फार प्राचीन काळापासून द्राक्षांची लागवड होत आहे.

ब लु चि स्ता न व सिं ध.—केट्याला जाणाऱ्या नवीन प्रवाशाला तिकडे बाजारांत दिसून येणारीं उत्तमोत्तम व मुबलक द्राक्षें पाहून आश्चर्य वाटतें. केट्टापिशीन जिल्ह्यांत सुमारें अठरा प्रकारचीं द्राक्षें होतात; पैकीं हैता, स्पीन खिसमिस, कलमक, हुसेनी, तोर, खिसमिस, व तंडान ह्या प्रकारचीं सर्वांत जास्त असतात. हैता द्राक्ष लांबट, मोठें, कठिण सालीचें व हिरव्या रंगाचें असून त्यावर पिंवळी छटा असते. हें फार टिकाऊ असल्यामुळें कापसांत घालून हिंदुस्थानांत निरनिराळ्या ठिकाणीं विक्रीस पाठवितात. हीं द्राक्षें आगस्ट ते नोव्हेंबर अखेरपर्यंत मिळतात. चुना व सोडा मिश्रित उकळत्या पाण्यांत घालून वाळविल्यावर मनुका तयार होतात. स्पीन खिसमिस लहान, हिरव्या रंगाचें व लांबट असून त्याचा हंगाम आगस्ट ते आक्टोबरपर्यंत असतो. कलमक हें मध्यम आकाराचें हिरवें व लांबट असतें. हुसेनी द्राक्ष मऊ असून मध्यें बारीक असतें. तोर द्राक्ष काळसर व गोडीला मध्यम असून अंमळ लवकर म्हणजे जुलईच्या मध्यांत पिकतें. खिसमिस लहान, पिंगट व गाभळ्या रंगाचें, असून त्याची साल मऊ असते व तंडान हें द्राक्ष मोठें, वाटोळें, हिरव्या रंगाचें व हलक्या प्रतीचें असतें. मुद्दाम केलेल्या लांकडी लहान करंड्यांत, कापसांत उत्तम व टिकाऊ द्राक्षांचे धर ठेवून बहुतेक सर्व हिंदुस्थानभर विक्रीकरितां पाठविण्यांत येतात.

बंगाल व आसाम या प्रांतांत पाऊस फार होतो असल्यामुळें येथें द्राक्षें होत नाहींत, त्याचप्रमाणें मद्रासची परिस्थितीहि द्राक्षांच्या लागवडीला अनुकूल नाहीं. म्हैसूरमध्यें एम्. पाल नांवाच्या एका आस्ट्रेलियन गृहस्थानें द्राक्षांच्या लावडीचे प्रयोग करून पाहिले होते ( १९०६-७ ). तेथील हवा द्राक्षांनां जशी पाहिजे तशी असून तेथें लवकरच संयोगणती द्राक्षें तयार होऊं लागतील असें त्याचें म्हणणें होतें.

महाराष्ट्रांत नाशिक येथें द्राक्षांची लागवड फारच मोठ्या प्रमाणावर होते. पुणें, नगर जिल्हा, सातारा जिल्हा, औरंगाबाद, सिंध व बेंगलूर या ठिकाणींहि द्राक्षांची लागवड थोडी थोडी आहे. द्राक्षांच्या जाती अनेक आहेत. नाशिक येथें एकंदर चार जातींची लागवड होते. हबशी अथवा काळी व करवंदी या जातींचें फळ काळें असतें. हबशीचे वेल फार माजतात पण फळ थोडें येतें. त्याचप्रमाणें करवंदीला फळ कमीच येतें. हिला ब्लॅक प्रिन्स असेंहि नांव आहे. करवंदीच्या घडांतील दाणे एकदम पिकत नाहींत. साहेबी व फकडी, या जातींचा दाणा पांढरा असतो; आणि गोसावी व भोकरी यांच्या दाण्याला तो परिपक्व झाल्यावर तांबूस छटा येते. साहेबी व फकडी या जाती फार उंची आहेत; पण यांनां फळ जरा कमी येतें. भोकरीची लागवड फार मोठ्या प्रमाणावर होते, हिला फळ विपुल येतें व दाणा गोल असतो. या जातीचीं कोंवळीं पानें व दाणे हे तांबडे असतात. यावरून ही जात इतर जातींपासून ओळखतां येते.

द्राक्षाला हवामान मध्यमप्रतीचें पाहिजे. कोंकणसारख्या फार पाऊस पडतो अशा प्रदेशांत द्राक्षें बहुधा चांगलीं येणार नाहींत असें वाटतें. परंतु फार कडक उन्हाळा व फार कडक थंडी जेथें पडते अशा ठिकाणीं द्राक्षें चांगलीं होतात.

एकंदरीत द्राक्षे तयार होण्याच्या सुमारास हवा कोरडी असावयास पाहिजे. द्राक्षांची लागवड फांटे ( कलमें ) लावून करितात. ही पद्धत फार सोपी आहे. आक्टोबर (दसऱ्याच्या सुमारास )महिन्यांत द्राक्षांची छाटणी केल्यावर फांटे (कलमें) चांगल्या जून तपकिरी रंग आलेल्या भागाच्या घेतात व त्याच्या वरच्या कोंवळ्या फांद्या टाकून देतात. फांटा नऊ ते दहा इंच असून त्यावर चार पांच फुगलेले डोळे असावे. वाफे चांगले खणून खत घालून त्यांत सहा सहा इंचांच्या अंतरावर दोन दोन कलमें दोन तीन डोळे ठेवून लावतात. फांट्यांच्या ओळींमध्यें नऊ नऊ इंच अंतर ठेवतात, व तीं लावल्याबरोबर भरपूर पाणी देतात. महिना सव्वा महिन्यानें डोळे चांगले फुगेपर्यंत पाणी चार पांच दिवसांनीं द्यावें; नंतर पाणी आठ दिवसांनीं एकदां दिलें तरी चालतें. अडीच महिन्यांनीं फांट्यांनां चांगली फूट येते. फांटे-कलमाशिवाय जडवे दाबून किंवा आंब्यासारखीं कलमें बांधून द्राक्षांची वाढ करतात. कलम बांधल्यापासून फळ जास्त येतें, व घड मोठे येऊन दाणाहि मोठा होतो.

जमिनीसंबंधानें इतर झाडांप्रमाणें द्राक्षांचे वेल खोडकर नाहींत.यांस जमीन भारी, मध्यम किंवा साधारणपैकी चालते. द्राक्षांच्या मुळ्या फारशा खोल जात नसल्यामुळें द्राक्षांची लागवड करण्यास जमिनीसंबंधानें फारशी अडचण पडत नाहीं. नाशिककडील जमिनी बऱ्याच खोल व चिकण असून त्यांतून निचरा साधारणच होत असतो; पण मुळ्या दोन तीन फुटांपेक्षां खालीं सहसा जात नसल्यानें खालच्या जमिनीचा उपयोग किंवा तिचा परिणाम वरच्या मुळ्यांवर फारसा होत नाहीं. परंतु जमीन चांगली निचऱ्याची असली म्हणजे त्या ठिकाणीं भुरी रोग होण्याची भीति त्यामानानें फार कमी असते. नाशिककडील द्राक्षांच्या जमिनींत हरळी व लव्हाळा हीं अतिशय असल्यामुळें जमीन फार कठीण होऊन जाते. द्राक्षांची जमीन उन्हाळ्यांत पहिल्यानें बऱ्याच वेळां चांगली नांगरून व वखरून तींतील शक्य तितकी हरळी व लव्हाळा काढून टाकावा; वरचेवर जमीन कुळवून सपाट करावी. नंतर पावसाळ्यांत जमिनींत ताग पेरून दीड महिन्यानें तो जमिनींत गाडून टाकावा. याच्या योगानें द्राक्षाच्या हुंड्या लावल्याबरोबर त्यांच्या मुळ्या वाढण्याला जमीन खोल व कसदार झाल्यामुळें हुंड्या लवकर जोमांत येतात.

हुंड्या लावण्यास सात आठ फुटांच्या अंतरावर नऊ ते बारा इंचांचे लहान लहान खड्डे घेतात. सातारा व नगर जिल्ह्यांत नऊ फुटांवर खड्डे घेऊन त्यांच्या चारी बाजूंस चार पांगारे लावून त्यांवर वेलाची एक एक फांदीच चढवितात. या पद्धतींत एक असा दोष आहे कीं, वेलांच्या साहाय्यानें जमीनीची नांगरणी मुळींच करतां येत नाहीं, म्हणून हातानें खणणी करावी लागत असल्यामुळें खर्च फार येतो व कामहि व्हावयास पाहिजे तसें होत नाहीं. म्हणून एकेका वेलापासून चार चार फांद्या न घेतां एकच घेऊन ती एकेका पांगाऱ्यावर चढवावी. आक्टोबरमध्यें लावलेले फांटे जानेवारी महिन्यांत लावण्यास तयार होतात. जानेवारी (पौष) महिना हुंड्या काढून लावण्यास फार चांगला होय. प्रत्येक खड्ड्यांत एक एक टोपली कुजलेलें शेणखत घालावें आणि वाफ्यांतून हुंड्या काढून घेऊन एकएक खड्ड्यांत दोनदोन फांट्यांची हुंडी लावावी व त्यांच्या मुळ्यांवर माती चांगली दडपून बसवावी. तसेंच वाफे व दांड बांधून घेऊन पाणी द्यावें. हुंड्या लावणें व पाणी देणें या गोष्टी बहुतेक बरोबरच व्हाव्या. दुसरें पाणी तिसऱ्या-चवथ्या दिवशीं द्यावें व नंतर तिसरें पांच सहा दिवसांनीं द्यावें. पंधरा वीस दिवसांनीं कोणते वेल मेले हें समजेल. जे मेले असतील ते काढून टाकून त्या ठिकाणीं दुसऱ्या हुंड्या आणून लावाव्या. हुंड्या लावल्यापासून एक महिन्यानें त्यांची वाढ सुरू होते. यावेळीं एकेक टोपली सोनखत अगर शेणखत द्यावें व याच वेळेपासून वेलांनां वळण देण्यास सुरवात करावी.

प्रत्येक पानाच्या बगलेंतून एक एक डीर फुटत असतो. सर्व पानांतळे डीर तसेच वाढूं दिले तर वेलाच्या बाजूला बऱ्याच फांद्या तयार होऊन वरचा शेंडा कमजोर होईल. यामुळें चार पांच फूट उंचीपर्यंत बाजूचे डीर पहिल्यानेंच खुडून टाकिले पाहिजेत. याला डीर मारणें असें म्हणतात. डीर मारल्यानें मुख्य वेलाला जोर येतो. वेल लवचीक असल्यामुळें झाडांच्या खोडाप्रमाणें तो ताठ उभा रहात नाहीं म्हणून त्याला कशाचा तरी आधार द्यावा लागतो; हा आधार बहुधा कारवीच्या काठ्यांचा अगर पांगाऱ्याच्या डांभांचा देतात व त्यालाच केळीच्या सोपटानें बांधून टाकतात. वेल वाढत असतांना शेंड्याकडील नऊ दहा इंचांवरील डीर मात्र खुडून टाकीत नाहींत वेल जसजसा वाढत जाईल तसतसे त्याला नवीन बांध घेत गेले पाहिजे. वेल जोरानें वाढत असल्यास जमिनीखालून जे कोंब येतील ते काढून टाकले पाहिजेत. परंतु मुख्य वेल चांगला वाढत नसेल किंवा तो मरून जाईल तर खालून फुटलेले दोन कोंब ठेवून तेच कारवीवर चढवावे व बाकीचे खुडून टाकावे. सर्व व्यवस्था नीट सुरळीत चालल्यास एप्रिल महिन्याच्या सुमारास वेल साडेचार-पांच फुटांपर्यंत वाढतात. ते इतके वाढले म्हणजे वरचा शेंडा खुडून टाकावा व त्याच्या खालचे तीन चार कोंब बाजूला फुटूं द्यावे, म्हणजे त्यांच्यात पुढें फांद्या बनतात. या फांद्या वाढूं लागल्या म्हणजे त्यांचें वजन कारवीला झेंपत नाहीं. यामुळें कारवीऐवजीं पांगाऱ्याचे खांब द्यावे लागतात. हे खांब २॥ ते ३॥ इंच जाडीचे व सात फूट उंचीचे असून ओले असतांनाच एप्रिल महिन्यांत लावावे म्हणजे त्यांनां मुळ्या फुटतील. त्यांवरच कारवीसकट वेल सोपटानें बांधून टाकावे, व बाजूच्या फांद्या जशा वाढतील तशा वाढूं द्याव्या.

सप्टेंबर महिन्याच्या सुमारास शेंड्याच्या खालच्या बाजूला वाढूं दिलेले तीन चार कोंब हे सहा सात फुटांचे

वाढतात आणि त्यांचीं पहिलीं कांहीं कांहीं कांडीं चांगलीं जून होऊन त्यांनां तपकिरी रंग येतो. ह्या सर्व फांद्या तशाच वाढूं दिल्या तर झाडाची सर्व शक्ति नवीन कोंब वाढविण्यांत खर्च होऊन फळ मुळींच येणार नाहीं. तेव्हां असें होऊं नये म्हणून वरील फांद्यांच्या जून कांड्यांवरील तीन चार डोळे ठेवून बाकीचा भाग छाटून टाकतात. ही पहिली छाटणी सप्टेंबरच्या शेवटच्या आठवड्यांत करितात. वरील तीन चार डोळ्यांपैकीं पहिले दोन डोळे बहुधां मुग्धावस्थेंत राहून वरचे दोन डोळे फुगून त्यांच्या फांद्या बनतात. छाटणी केल्याबरोबर सर्व बाग चारी दिशांनीं चार वेळां देशी नांगरानें नांगरतात. वेल आठ आठ फुटांवर लाविले असल्यामुळें बैल जोडण्यासाठीं साडेतीन फूट लांबीचें जूं वापरतात. नांगर खोल लावण्याचें कारण नाहीं. दोन दोन ओळींमध्यें नांगराचीं चार पांच तासें पडतात. नांगरणी झाल्यावर अळीं व दांड बांधून घेतात.

छाटणी झाल्यावर १५।२० दिवसांनीं डोळे फुगूं लागतात व त्याच वेळीं उडद्या नांवाचा एक किडा कोंब खाऊन टाकतो. हे कोंब खाल्ले गेले किंवा त्यांनां कोणत्याहि रीतीनें इजा झाली तर ते पुढें चांगले वाढत नाहींत; यासाठीं हे किडे धरून मारले पाहिजेत. यांनां उजेड सोसत नसल्यामुळें ते दिवसा दडून बसतात. वेल छाटल्यावर किड्यांनां लपण्यास कांहीं आसरा नसल्यामुळें वेलांच्या शेंड्यांवर केळीच्या वाळलेल्या पानांचे कुंचले करून ठेविले म्हणजे त्यांत किडे लपून बसतात. रोज सकाळीं व दुपारीं कुंचले पाण्यांत झाडले म्हणजे ते किडे पाण्यांत पडून मरतात. वेलाला पांच सहा पानें आल्यावर या किड्यांपासून त्रास होत नाहीं. किडे धरण्याचें काम प्रत्येक छाटणीच्या वेळीं व्हावयास पाहिजे. छाटणीनंतर कोंब सहा इंच वाढल्यावर पाणी द्यावें व पुढील पाणी बारा किंवा पंधरा दिवसांनीं द्यावें. पाण्याच्या दोन पाळ्या झाल्यानंतर पुन्हां पाणी देण्यापूर्वी सर्व अळीं खुरपून घ्यावीं. वेलांवर तुरळक फळ आल्यास तें घ्यावें किंवा मुळींच खुडून टाकावें. मार्च महिन्यांत तयार झालेलें फळ काढल्यानंतर एप्रिल महिन्यांत वेल पुन्हां छाटावे लागतात. सप्टेंबर महिन्यांत चार डोळे ठेऊन वेल छाटले असतां वरच्या दोन डोळ्यांच्या फांद्या तयार होतात. एप्रिल महिन्यांत वरील चार डोळ्यांपैकीं मागचा एक डोळा ठेऊन बाकीची सर्व फांदी छाटून टाकावी. पुढें हा एक डोळा फुटून त्याच्यापासून नवीन फांदी तयार होते. छाटणी झाल्यावरोबर सर्व बाग पूर्वीप्रमाणें नांगरून घेऊन अळीं करून दर झाडास एक एक टोपली शेणखत अगर सोनखत देऊन पाणी देतात. पुढील पाणी पावसाळ्यापर्यंत दहा बारा दिवसांच्या अंतरानें देतात. यावेळीं कुंचल्यांनीं किडे धरून मारून टाकावेत. एप्रिलच्या छाटणीनंतर पावसाळ्यांत वेलींनां थोडा बहार येतो; हा फार आंबट असतो म्हणून त्यास खट्टा बहार म्हणतात. याचा कांहीं उपयोग नसतो. आक्टोबरच्या छाटणीनंतर जो बहार येतो तो गोड असतो म्हणून त्यास मिठ्ठा बहार म्हणतात. दर छाटणीच्या वेळीं पांगारे वगैरे मोडले असल्यास नवीन लावून त्यांवर वेल नीट बांधून द्यावे. वेल जमिनीवर केव्हांहि पडूं देऊं नयेत. नंतर आक्टोबरच्या पहिल्या आठवड्यांत पूर्वीप्रमाणेंच तीन चार डोळे ठेवून छाटणी करावी. यांपैकीं पुढचे दोन डोळे फुटून त्यांवर मिठ्ठा बहार येतो. हा बहार काढून घेतल्यानंतर पुन्हां एप्रिलमध्यें पूर्वीप्रमाणेंच प्रत्येक फांदीवर मागचा एक एक डोळा ठेवून छाटणी करावी. याप्रमाणें छाटणी एकदां मागें व एकदां पुढें अशी करून सर्व वेल आटोक्यांत ठेवतात. छाटणी करतेवेळीं डोळ्याच्या पुढच्या बाजूला अर्ध्या इंचावर छाट घ्यावा म्हणजे वेलावर मर फार कमी होते. दर छाटणीच्या वेळीं इतर ठिकाणीं वेलावर कोठेंहि मर असल्यास ती छाटून टाकावी. छाटणी झाल्यावर वेलावरची जुनी साल सुटूं लागते ती सर्व काढून वेल साफ करावा म्हणजे त्यावर उडद्या किड्यांनां लपून बसण्यास जागा मिळत नाहीं.

वेल छाटून नवीन फूट होऊं लागली म्हणजे प्रत्येक फांदीवर पांचव्या, सहाव्या किंवा सातव्या पानासमोर मोहोर दृष्टीस पडतो. आठव्या पानानंतर कधींहि मोहोर येत नाहीं. मोहोर दिसूं लागल्याबरोबर आठव्या अगर नवव्या पानापुढील शेंडा खुडून टाकावा, म्हणजे वेलाचा सर्व जोर फळांच्या घडांवर जाऊन घड मोठे होतील. वेळेनुसार सातव्या, आठव्या अगर नवव्या पानाच्या बगलांतून नवीन डिऱ्या निघतात. या डिऱ्यानां प्रत्येकीं चार पांच पानें ठेवून त्यांचेहि शेंडे खुडून टाकावे. याप्रमाणें दोन वेळां शेंडे खुडले असतां पुरे होतात. तिसऱ्यांनदां शेंडे खुडावे लागत नाहींत. मात्र शेंडे आंबट बहाराच्या वेळीं केव्हांहि खुडूं नयेत.

पावसाळा सुरू झाला म्हणजे बुरशीसारखा एक रोग पानांवर येतो. याला बुरी रोग किंवा पंख्या रोग असें म्हणतात. हा रोग वनस्पतिजन्य आहे व तो झाला असतां वेल फार कमजोर होऊन उत्पन्न फार कमी येतें. याकरितां हा रोग होऊं नये म्हणून पावसाळा सुरू होण्यापूर्वी बोर्डोमिश्रण शिंपडावें म्हणजे पानें निरोगी रहातात. हें मिश्रण शिंपडल्यावर वेलांनां जी नवीन फूट येईल तीवर रोग होण्याचा संभव असतो. परंतु पहिलीं पानें निरोगी राहिल्यामुळें पुढें होण्याऱ्या रोगापासून फारसें नुकसान होत नाहीं. पुढें आक्टोबरची छाटणी झाल्यानंतर फूल उमलण्याच्या अगोदर नोव्हेंबरमध्यें पुन्हां एकदां मिश्रण मारावें व सर्व फळ चांगलें धरल्यावर डिसेंबरच्या १५ तारखेच्या सुमारास पुन्हां मिश्रण मारावें. यावेळीं मिश्रणांत नेहमींच्या दुप्पट पाणी घालून तें निमकस करावें. यानंतर बहुधां रोग येणार नाहीं; परंतु येत आहे असें वाटल्यास तिसऱ्यानदां फक्त घडांवरच मिश्रण मारावें.

मिश्रण करण्याची रीत.—दीड शेर मोरचूत एका खादीच्या पिशवींत घालून तिचें तोंड बांधावें व ती एका लांकडाच्या टिपांत ठेवून तिच्यावर सुमारें साडेसात शेर आधणाचें पाणी ओतावें आणि ती पिशवी सर्व मोरचूत चांगला विरघळेपर्यंत वरचेवर सर्व वेलांवर हलवावी. दुसऱ्या एका टिपांत एक शेर कळीचा चुना घेऊन तो दहा शेर पाण्यांत विरघळवावा. चुना ताजा व लवकर विरघळणारा असावा. तिसऱ्या एका टिपांत दहा शेर गरम पाणी घेऊन त्यांत सव्वा शेर साबण घालून तो विरघळवावा. यावेळीं चांगला धारेचा चाकू या मिश्रणांत थोडा वेळ धरल्यास त्यावर तांब्यासारखा तांबडा रंग चढला तर मिश्रणांत चुना कमी आहे असें समजावें व त्यांत चाकूचें पातें पांढरें शुभ्र राहीपर्यंत आणखी चुन्याचें मिश्रण घालावें.

हीं मिश्रणें तयार झालीं म्हणजे १२५ शेर पाणी राहील एवढें एक लांकडाचें टीप घेऊन तें अर्धें थंड पाण्यानें भरावें. त्यांत मोरचुताचें व चुन्याचें पाणी एकाच वेळीं बरोबर ओतून काठीनें खूप हालवावें. नंतर त्यांत साबणाचें पाणी घालून एकंदर मिश्रण १२५ शेर होईपर्यंत पाणी घालून तें सर्व चांगलें ढवळावें. एका राकेलच्या डब्यांत वीस शेर पाणी मावतें. हें मिश्रण करण्यासाठीं कोणत्याहि धातूचें भांडें वापरूं नये; निदान मोरचूताच्या मिश्रणास तरी लांकडी टीप वापरावें. याशिवाय 'ॲन्थ्राक्नोज्' या नांवाचा रोग द्राक्षाच्या वेलांवर होत असतो. या रोगाचें खरें कारण आद्याप नीटसें समजलें नाहीं. या रोगाचें लक्षण असें आहे कीं, पानांवर, पानांच्या देठांवर, कोंवळया वेलांवर व केव्हां केव्हां फळांवर पहिल्यानें कांळसर डाग दिसूं लागतात. हेच डाग पुढें मोठे होऊन तेथील जागा दबल्यासारखी दिसते. ज्या ठिकाणीं डाग दिसतात तेथील सर्व भाग अगदीं निर्जीव होऊन जातो. हा रोग वाटेल त्यावेळीं होतो. या रोगापासून अद्यापपावेतों फारसें नुकसान झालेलें नाहीं; परंतु त्याकडे वेळेवर लक्ष न दिल्यास हा रोग भयंकर होण्याचा संभव आहे. यास उपाय म्हणजे ज्या भागावर 'ॲन्थ्राक्नोज' रोग झाला असेल तो कापून काढून जाळून टाकावा आणि बागेंत याचा प्रादुर्भाव फार असेल तर सर्व झाडांवर आयर्नसल्फेट व सल्फ्यूरिक ॲसिड (लोहगंधकित व गंधकाम्ल) यांचें मिश्रण मारावें. हें मिश्रण पानें, फुलें जाळील यासाठीं छाटणी झाल्याबरोबर व डोळे फुटूं लागण्यापूर्वीच तें सर्व झाडांवर भिंतीला चुन्याचा रंग देतात त्याप्रमाणें कुंचल्यानें लावावें.

मिश्रणाची दुसरी रीत.—कढत पाणी १०० भाग, त्यांत जितकें आयर्न सल्फेट विरघळेल तितकें म्हणजे सुमारें ५० भाग, सल्फ्यूरिक ॲसिड(तेजाब), १ भाग घेऊन आयर्न सल्फेट पाण्यांत जितकें विरेल तितकें विरवावें. नंतर सल्फ्यूरिक ॲसिड घालावें; तें घालतांना मिश्रण सारखें ढवळीत रहावें. ॲसिडमध्यें एकदम पाणी ओतल्यास तें एकाएकीं पेट घेऊन मोठा आवाज होण्याचा संभव असतो म्हणून ॲसिड सावकाश ओतावें.

झाडें चार वर्षांचीं झालीं म्हणजे दर झाडास पांच पौंड फळ येण्यास हरकत पडत नाहीं. बाग एकदां चांगला जोमांत आला म्हणजे दर वेलास सरासरी दहा पौंड फळ येतें. पंधरा पौंड फळ येणें हें चांगलें उत्पन्न होय. लोक बोर्डोमिश्रणाचा उपयोग करूं लागण्यापूर्वी फळ तयार होण्याच्या अगोदर बागवान लोक पीक एकदम घेत नसत. परंतु आतां बोर्डोमिश्रणाचा उपयोग सर्वत्र सुरू झाल्यामुळें बाग पांच वर्षांच्या करारानें देखील विकले जातात.

बाग जुना झाला म्हणजे उत्पन्न कमी पडूं लागतें झाडें वेडे वांकडे होऊन मरूं लागतात. यासाठीं वीस अगर पंचवीस वर्षांनंतर नवीन फुटीचे वेल तयार करावे. ते असेः—उत्पन्न कमी पडूं लागलें किंवा पंजांचा कांहीं भाग वाळूं लागला म्हणजे आक्टोबरच्या छाटणीनंतर जमिनीखालून जे कोंब येतात, त्यांतील एक किंवा दोन वाढूं द्यावे. एप्रिलच्या छाटणीनंतरचे कोंब घेऊं नयेत. कारण यांच्यापासून पुढें वेल व पंजे चांगले होत नाहींत. आक्टोबरच्या छाटणीनंतर निघालेल्या कोंबांपासून तीन किंवा चार फांद्या तयार होतील पण त्यापुढील एप्रिलांत त्या न छाटतां आणखी एकवर्षानें म्हणजे पुढील आक्टोबरमध्यें पहिल्या छाटणीप्रमाणें छाटाव्या; व एप्रिलमध्यें जुने वेल जमिनबरोबर कापून टाकावेत. जरूर पडल्यास आणखी खत द्यावें. नवीन फुटीपासून झालेल्या वेलांनां दोन वर्षें चांगलें उत्पन्न येत नाहीं; यासाठीं बागेंतील सर्व वेल एकदम कापून न टाकतां थोडे थोडे कापावे म्हणजे उत्पन्नांत एकदम तूट येणार नाहीं.

हिंदुस्थानांतून द्राक्षाची दारू फारशी बाहेर जात नाहीं. बाहेरून मात्र बरीच येते. द्राक्षाच्या दारूचा पुरवठा ज्या देशांतून होतो ते देश त्यांच्या महत्त्वाच्या अनुक्रमानें येणेंप्रमाणेः—संयुक्त राज्य, फ्रान्स, इटली, बेल्जम, व जर्मनी. द्राक्षें चवीला गोड व किंचित् तुरट आहेत; तीं थंड असून पचनास जड आहेत. त्यांनीं शौचाला व लघ्वीला साफ होतें. रक्तपित्त, मदात्यय, तहान, धकवा, खोकला, दमा, उरःक्षत व क्षय, या रोगांत द्राक्षें हितावह आहेत. डोळ्यांचे रोग द्राक्षें घालवितात व तीं वृष्य आहेत. सर्व फळांत द्राक्षें निर्दोष व गुणकारक आहेत. [वॅट; परांजपे—फळझाडांचा बाग].

**दुग, जिल्हा.**—मध्यप्रान्ताच्या छत्तिसगड विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ३८०७ चौरस मैल. १९०६ सालीं रायपूर व बिलासपूर जिल्ह्यांचे कांहीं भाग तोडून घेऊन हा नवीन जिल्हा निर्माण करण्यांत आला. ह्यामध्यें बिलासपूरच्या मुंगेरी तहशिलीचा कांहीं भाग, पूर्ण दुग तहशील व शिमोगा व धमतरी तहशिलीचा कांहीं भाग इतक्यांचा समावेश होतो. उत्तरेस—खैरागड व कवर्धा मांडलिक संस्थानें व बिलासपूर जिल्हा, पूर्वेस—रायपूर जिल्हा, दक्षिणेस—कां[illegible] संस्थान, पश्चिमेस—खैरागड, नान्द[illegible]

व बालाघाट जिल्हे. या जिल्ह्याच्या दक्षिण भागीं १६४ चौरस मैल सरकारी जंगल आहे. आग्नेय व वायव्य भागांत असलेल्या जमिनदाऱ्यांत जंगली प्रदेश आहे. तन्डुला नदी दक्षिण-उत्तर वहात जाऊन दुगच्या दक्षिणेत शिवनाथ नदीस जाऊन मिळते. ह्या नदीस पूर्वेकडून पथा व वऱ्हा ह्या दोन नद्या येऊन मिळत असून पश्चिमेकडून सोम्भारसा व अमनेर या नद्या येऊन मिळतात. येथील हवा फार उष्ण आहे. वार्षिक पाऊसपाणी ४७½ इंच. लोकसंख्या (१९२१) ७४४२४६ या जिल्ह्यांत द्रुग हा एकच मोठा गांव असून २०४७ खेडीं आहेत. मालगुझारी व खालसा भागांत लोकवस्ती दाट आहे. वऱ्याच भागांत काळी व उत्तम पिकाऊ जमीन आहे. तांदूळ, गहूं, कोद्रु व अळशीचें उत्पन्न होतें. द्रुग व भिलई हीं दोन स्टेशनें बंगाल-नागपूर रेल्वेवर आहेत. ह्या जिल्ह्यांत ९ जमिनदारी इस्टेटी आहेत; त्यांचें क्षेत्रफळ १०४० चौरस मैल असून लोकसंख्या: सुमारें एक लाख आहे.

**त ह शी ल.**—मध्यप्रान्तांतील द्रुग जिल्ह्याची एक मध्यवर्ती तहशील. १९०६ सालीं रायपूर व बिलासपूर जिल्ह्यांचा कांहीं भाग घेऊन ही तयार केली. पूर्वीच्या रायपूरच्या द्रुग तहशिलीचें क्षेत्रफळ १९११चौ.मै.होतें.सध्याच्या द्रुग तहशिलीचें क्षेत्रफळ ९२४ चौरस मैल असून लोकसंख्या (१९११) २२०७२३ आहे. ह्या तहशिलींत द्रुग हा गांव असून ५०७ खेडीं आहेत. द्रुग हेंच जिल्ह्याचें व तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. ह्या तहशिलींत सरकारी जंगल नाहीं. जमीन सुपीक असून कापसाचें पीक मुख्य आहे.

**गां व.**—मध्यप्रान्तांतील द्रुग जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. बंगाल नागपूर रेल्वेवर आहे. मुंबईहून ६८५ मैल. लोकसंख्या (१९११)७०४८. येथें एक मोडकळीस आलेला किल्ला (गढी) आहे. त्याचा उपयोग मराठ्यांनीं १७४१ सालीं जेव्हां छत्तिसगडवर स्वारी केली होती तेव्हां केला होता. येथें कांशाचीं भांडीं तयार करितात. तसेंच सुती कापडहि येथें विणलें जातें. जवळ विड्याच्या पानांचे मळे आहेत.

**द्रुपद**—एक पुरुकुलोत्पन्न राजा. यास पार्षत व पांचाल असेंहि ह्मणत. यास चार पुत्र व शिखंडिनी नामक कन्या प्रथम झाली होती. नंतर अग्निकुंडांतून द्रोणाचार्याच्या वधार्थ धृष्टद्युम्न झाला. द्रौपदी नामक कन्याहि त्यांतून उत्पन्न झाली. भारतीय युद्धामध्यें हा सर्व सैन्यासह पांडवाकडे होता. द्रोणाचार्याच्या हातून यास मृत्यु आला. यानें माकंदी, छत्रवती, कांपिल्य, आहिछत्रा इत्यादि नगरें वसविलीं होतीं.

**द्रोण**—भरद्वाजपुत्र. भरद्वाजाचें घृताची नामक अप्सरेच्या दर्शनानें द्रोणांत वीर्य पडून त्यापासून हा उत्पन्न झाला. हा वेदवेदांग, धनुर्विद्या, कवचविद्या, व अस्त्रविद्या यांत प्रवीण होता. याचा पुत्र सप्तचिरंजीवांपैकीं अश्वत्थामा होय. द्रोणानें कौरवपांडवांना धनुर्विद्या शिकविली. भारतीय युद्धांत कौरवांतर्फे हा पांच दिवस मोठ्या शौर्यानें लढला, पण नंतर आपला पुत्र मेला अशी खोटीच उठविलेली वार्ता ऐकून यानें शस्त्रत्याग केला. तेव्हां धृष्टद्युम्नानें याचा शिरच्छेद केला.

**द्रौपदी**—महाभारतांतील मुख्य नायिका; द्रुपद राजाची कन्या कृष्णा. हिला पांचाली, याज्ञसेनी व पार्षती, अशींहि नांवें आहेत. ही द्रुपद राजाच्या यज्ञांत शचीच्या अंशानें अग्नींतून निर्माण झाली. उपवर झाली असतां स्वयंवरांत हिला पांडवांनीं वरिलें. कृष्ण हिला तिच्या सुस्वभावामुळें भगिनी मानीत होता. हिला पांच पुत्र पांच पांडवांकडून झाले होते. ते महारथी होते. वनवासांत व अज्ञातवासांत ही पांडवांच्या बरोबर होती. द्रौपदी ही परम पतिव्रता, सद्गुणी व क्षमाशीलपण मोठी मानी असे. पांडव ज्या वेळेस निजधामास गेले त्यावेळीं ही त्यांच्याबरोबर गेली व मार्गानें जात असतां हिचा देह पतन पावला.

**द्वंद्वयुद्ध**—म्हणजे दोनच इसमांचें युद्ध. मोठें युद्ध चालू असतां त्यांतील दोनच व्यक्तींनीं एकमेकांशीं लढाई करण्याचा प्रघात प्राचीन भारतीयांत असे. महाभारतामध्यें रथ्यांच्या युद्धाचें वारंवार फारच वर्णन आलेलें आहे. हीं युद्धें बहुधा द्वंद्वयुद्धें होत असत. या द्वंद्वयुद्धांचीं वर्णनें केवळ काल्पनिक आहेत असें नाहीं. प्राचीन काळीं दोन्ही फौजांतील मुख्य मुख्य सेनापतींनीं पुढें होऊन एकमेकांस गांठावें असाच क्रम होता. हल्लींप्रमाणें मागें राहण्याचा नियम नव्हता. सेनापति किंवा विशिष्ट वीर हे प्रत्यक्ष युद्धांत रणशूर असून एकमेकांशीं लढत असत; आणि हे सेनापती बहुधा रथी असल्यानें रथांचें द्वंद्वयुद्ध वारंवार होत असे. अशा वेळीं इतर सैनिक आपलें युद्ध बंद करून त्यांच्याकडे पहात बसत, असेंहि वर्णन आहे. अशा प्रकारचीं द्वंद्वयुद्धें होमरनें वर्णन केलेलीं आहेत. हातघाईची लढाई चालली असतांना दोन्ही पक्षांचे योद्धे किंचित थांबून प्रसिद्ध वीरांमध्यें लागलेलें द्वंद्वयुद्ध पाहण्यास तयार असत. अशा वेळीं धर्मयुद्धाच्या नियमाप्रमाणें द्वंद्वयुद्ध करणाऱ्या वीरास इतर लोक मदत करीत नसत. धर्मयुद्धाच्या नियमाप्रमाणें प्रत्येक मनुष्यानें दुसऱ्या एकावरच हल्ला करावा असें होतें. द्वंद्वयुद्धें इतर युद्धें चाललीं असतांनाहि होत असत. या द्वंद्वयुद्धांचें महाभारतांतील मोठें वर्णन म्हणजे कर्णार्जुनयुद्ध होय. रथ्यांच्या युद्धांत सारथ्यांचेंहि महत्त्व फार असे. रथ समविषम भूमि संभाळून हांकणें व निरनिराळ्या जागीं नेऊन मारा करतां येईल, तेथें रथास झपाट्यानें नेणें. रथीस वारंवार प्रोत्साहन देणें वगैरे गोष्टी सारथ्यास कराव्या लागत. दोन रथ्यांत युद्ध सुरू झालें म्हणजे रथ एकाच जागीं उभे रहात नसत. रथांची हालचाल बाण चुकविण्यासाठींहि होत असे; याची कल्पना नीट करतां येत नाहीं. कर्णाच्या रथाचें चाक खड्यांत गेलें त्यावेळेस तो तें चाक वर काढूं लागला. या वर्णनावरून द्वंद्वयुद्धांत रथ मंडलें घेत असत असें दिसतें. रथ्याप्रमाणेंच गजारूढ, अश्वारूढ व पदाति यांच्यामध्येंहि

द्वंद्वयुद्धें होत. त्यावेळींहि तिसऱ्यानें मध्यें प्रवेश करावयाचा नाहीं असा नियम असे. हा नियम अभिमन्युचक्रव्यूहभेदन या प्रसंगीं कौरवांनीं मोडला.

मध्यकालीं रजपूत राजांत द्वंद्वयुद्धें होत असत. या द्वंद्वयुद्धांवर सबंध सैन्याचा जय किंवा पराजय मानून त्याप्रमाणें युद्धाचा शेवट लावण्याची चाल मात्र नव्हती. एक द्वंद्वयुद्ध संपल्यास दुसरें सुरू होई. अलीकडील कालांत असल्या प्रकारचीं निर्णयात्मक द्वंद्वयुद्धें झाल्याचीं आढळत नाहींत. कुस्ती ही द्वंद्वयुद्धाचें एक स्वरूप धरल्यास तींत वरील प्रकार थोडा फार फरकानें येतो कोठेंकोठें प्राण घेण्यापर्यंत कुस्तीचें पर्यवसान होतें.

पा श्चा त्य लो क.—यूरोपीयांत द्वंद्वयुद्धांना दिव्याचें म्हणजे परमेश्वरी संकेतानुवर्ती न्यायनिर्णय करण्याचें स्वरूप आहे. ज्याअर्थी याच कारणास्तव डेव्हिड गेलिआयवरोबर लढला त्याअर्थी न्यायनिर्णयविषयक द्वंद्वयुद्ध (ज्युडिशियल ड्युएल) हा ईश्वरप्रणीत मार्ग आहे, असें स्कूलमेन (मध्ययुगीन यूरोपीय विद्वान) यांनीं जाहीर केलें. होमरकालापासून ग्रीक लोकांत, प्राचीन रोमन लोकांत, व रोमन साम्राज्य जिंकणाऱ्या गॉथ वगैरे रानटी लोकांतहि ही चाल पसरून ख्रिस्तोत्तर नवव्या दहाव्या शतकापर्यंत ती यूरोपांत रूढ होती. तथापि एकंदर ख्रिस्ती समाजाच्या सदसद्विवेकबुद्धीला ही गोष्ट पटत नव्हती. त्यामुळें स. १००६ मध्यें आयर्लंडांत आणि स. १०१२ मध्यें नॉर्वे देशांत ती बंद करण्याचा प्रयत्न झाला. पण इंग्लंडमध्यें नॉर्मन लोकांची सत्ता स्थापन झाल्यावर विल्यम दि कॉंकररनें लढाईनें वादनिर्णयाची पद्धत (ट्रायल बाय बॅटल) कायदेशीर ठरविली. त्यामुळें दिवाणी व फौजदारी दोन्ही स्वरूपांच्या खटल्यांत द्वंद्वयुद्धानें पुष्कळ निर्णय होऊं लागले. या द्वंद्वयुद्धाविषयींचे नियमहि १०९९ सालीं गॉडफ्रेनें प्रसिद्ध केले, त्यांत नाईट लोकांनीं घोडेस्वार होऊन चिलखत व शिरस्त्राण घालून भाल्यांनीं (लान्स) व सामान्य लोकांनीं पायीं, जाकीट घालून आणि काठीनें लढावें असें ठरविलें होतें. ख्रिस्तीधर्मसंस्था द्वंद्वयुद्धांचा कांहींसा पुरस्कार व कांहीं विरोध करतांना आढळतात. क्रूसेडच्या (ख्रिस्ती-मुसुलमानांचें धर्मयुद्ध) वेळीं पीटर दि हरमिटनें तीन, सहा, दहा, अशा ख्रिस्ती व मुसुलमानी योद्धयांचीं द्वंद्वें व्हावीं असें आव्हान केलें होतें. १४ व्या शतकांत या द्वंद्वयुद्धाच्या वादनिर्णयविषयक स्वरूपाला अनाथ दुर्बलसंरक्षणाच्या स्वरूपाची (शिव्हलरी) जोड मिळाली. फिलिप दि फेअर राजानें १३०६ सालीं या द्वंद्वयुद्धाबद्दलची एक नियमावली (कोड) तयार केली व तिच्या निरनिराळ्या देशांत आवृत्त्या निघाल्या.

यूरोपांत मध्ययुगांत शस्त्रधारी वीरांचे केवळ खेळवजा सामने होत, त्यांत आणि द्वंद्वयुद्धांत फरक आहे. ७ फ्रेंच व ७ इंग्लिश वीर, किंवा १३ फ्रेंच व १३ इटालियन वीर किंवा १०० एका बाजूला व १०० दुसऱ्या बाजूला वीर असे सामने होत असत. पण खरें द्वंद्वयुद्ध फक्त दोन वीरांत आणि केवळ वादनिर्णयाच्या कारणानिमित्तच होत असे. पण वीरांच्या सामन्यांनांच पुढें विशेष महत्त्व येऊन वादनिर्णायक द्वंद्वयुद्धें मागें पडत चाललीं. सुबुद्ध मत द्वंद्वयुद्धांच्या विरुद्ध बनत चाललें होतें. १५४५ सालीं ट्रेंटच्या कौन्सिलनें वादनिर्णायक द्वंद्वयुद्धपद्धतीचा निषेध केला, आणि त्यांत भाग घेणारांना व मदत करणारांना ख्रिस्तसमाजबहिष्कृत करण्याचा ठराव केला. तथापि सर्वमान्य जनतेंत असल्या द्वंद्वयुद्धांची गोडी कायम होती, त्यामुळें उपर्युक्त कौन्सिलचे ठराव दप्तरांतच राहिले. शिवाय वादनिर्णायक व अनाथसंरक्षक द्वंद्वयुद्धांच्या जोडीला आणखी एक तिसऱ्या प्रकारचें द्वंद्वयुद्ध रूढ झालें. कायद्याच्या व कोर्टाच्या मध्यस्थीवांचूनच खासगी भांडणांत खासगी द्वंद्वयुद्धें होऊं लागलीं. क्षुल्लक खासगी भांडणावरून लोक एकमेकांना युद्धास आव्हान करूं लागले व तें न स्वीकारणें सभ्य गृहस्थास मानहानिकारक आहे असा प्रचार रूढ झाला. प्रथम इटालियन लोकांनीं ही रूढि पाडली आणि लवकरच ती यूरोपभर पसरून पुढें सुमारें ३०० वर्षे या घातक रूढीमुळें सरसकट सर्व कुटुंबांचें स्वास्थ्य बिघडवून टाकलें. कारण कोण कोणाला केव्हां द्वंद्वयुद्धास आव्हान करील याचा नियमच उरला नव्हता. संभावितपणाच्या नांवाखालीं हे केवळ खुनाचे गुन्हे राजरोसपणें होऊं लागले! हा अनर्थ लक्षांत येतांच फ्रान्स व स्कॉटलंडमध्यें कोणत्याहि द्वंद्वयुद्धाला सरकारी परवानगी घेतली पाहिजे असा कायदा करण्यांत आला. इंग्लंडांत बेकनच्या सल्ल्यावरून पहिल्या जेम्स राजानें द्वंद्वयुद्धांत ठार मारणें हा खुनाचा गुन्हा होय, असा कायदा केला. हल्लीं ग्रेटब्रिटन व युनायटेड स्टेट्सच्या कायद्यांत कोणत्याहि प्रकारच्या द्वंद्वयुद्धाला मोकळीक नाहीं. जर्मनींत व इतर यूरोपीय देशांत खासगी द्वंद्वयुद्धें अद्यापहि होतात. तीं सर्वस्वीं बंद पडणें हा केवळ कायद्याचा प्रश्न नसून समाजाच्या समजुतीचा आहे. खाजगी किंवा घरगुती भांडणांत सूड उगविण्याकरितां असा द्वंद्वयुद्धाचा मार्ग मोकळा पाहिजेच, असें लोकमत बऱ्याच यूरोपीय देशांत प्रबल आहे. या बाबतींत इंग्लंड व इतर यूरोपीय देश यांच्यांत मोठी तफावत आहे. इंग्लंडमध्यें द्वंद्वयुद्धांतील प्राणहानि निव्वळ खून समजून तिला फांशीची शिक्षा ठेवलेली आहे; तर इतर यूरोपीय देशांत या गोष्टीला सौम्य शिक्षा आहेत. लोक फौजदारी कोर्टाऐवजीं द्वंद्वयुद्धाचा मार्ग कां अधिक पसंत करतात, हा कायदेशास्त्रज्ञांपुढें मोठा महत्त्वाचा प्रश्न असून त्याबद्दल इतिहासकार राबर्टसन व राजनीतिशास्त्रज्ञ बेंथाम यांनीं मननीय विचार प्रदर्शित केले आहेत. जेथें वैयक्तिक मानापमानाच्या बाबींना समाधानकारक कायदेशीर इलाज देश्य कायदेकोडांत नसतो तेथें खाजगी रीतीनें सूड उगविण्याची प्रवृत्ति लोकांत अधिक होते, आणि विषप्रयोगादि मार्गापेक्षां द्वंद्वयुद्धाचा मार्ग पुष्कळ बरा; असा निष्कर्ष

काढून सदरहू विद्वानांनी या पद्धतीचें समर्थनच केलें आहे. पण इंग्रजी कायदेपद्धतींत खाजगी अब्रूविषयक गुन्ह्यांचीहि योग्य दाद लागण्याची सोय असल्यामुळें इंग्रज लोकांचा द्वंद्वयुद्धाकडे ओढा होत नाहीं, असें इंग्रजेतर यूरोपीय कायदेपंडितांनींहि कबूल केलें आहे. तथापि द्वंद्वयुद्धपक्षीयांचें असें म्हणणें कीं खासगी अपमानाचे असे कित्येक नाजूक प्रसंग असतात कीं त्यांबद्दल प्रतिपक्षाला कायदेकोर्टांत केवळ दंड किंवा कैदेची शिक्षा झाल्यानें मानी मनुष्याच्या मनाचें खरें समाधान होणें शक्य नसून त्याकरितां द्वंद्वयुद्धाचा मार्गच मोकळा पाहिजे. सदरहू प्रतिपादनांत कांहींच अर्थ नाहीं असें म्हणतां येत नाहीं. तसेंच द्वंद्वयुद्धपद्धतीचें बीज मानवजातीच्या नैसर्गिक युद्धप्रियतेंत असल्यामुळें या पद्धतीचा उगम प्रथम एखाद्या विशिष्ट देशांत झाला असें म्हणणें चूक आहे, व कधीं काळीं द्वंद्वयुद्धें पृथ्वीतलावर अजीबात बंद पडतील असें मानणेंहि चूक आहे.

**द्वार, पूर्व.**—आसाम प्रान्तांतलि गोलपारा जिल्ह्यामधील एका भागास ही संज्ञा आहे. क्षेत्रफळ १५७० चौरस मैल. लोकसंख्या १९११ सालीं ९१५९२. भूतानच्या पर्वतांच्या पायथ्यावरील सपाट जमीन ह्या प्रदेशांत आहे. भुमेश्वर नांवाची एकच टेंकडी आहे. कांहीं भागांत सालवृक्षांचें जंगलच्या जंगल आहे. पूर्व द्वार हा भाग १८६५ सालीं ब्रिटिशांनीं घेतला. १८६६ सालीं पूर्वद्वार गोलपारा जिल्ह्यांत घेण्यांत आला. येथें तांदुळाचें उत्पन्न मुख्य आहे.

एकंदर पूर्वद्वारांत पांच द्वार येतात. ( १ ) बिजनीद्वार, ( २ ) सिद्लीद्वार, ( ३ ) चिरंगद्वार, ( ४ ) रिपूद्वार, व ( ५ ) गुम. सारावसूलीच्या सोयीकरितां चिरंग, रिपू व गुम ह्या तीन द्वारांचे दोन मौजे केले आहेत. बिजनी एका वेगळ्या जमीनदाराच्या हाताखालीं आहे. जेव्हां हे द्वार ब्रिटिश अंमलाखालीं आलें तेव्हां बिजनी द्वाराचा बिजनी राजा आपली वंशपरंपरा चालत आलेली इस्टेट सोडण्यास तयार नव्हता. सिदलीद्वारचा राजा देखील अशाच रीतीनें हक्क दाखवूं लागला. १८७० सालीं सिदलीच्या राजाशीं ७ वर्षांचा करार करण्यांत आला व बिजनीच्या अज्ञान (लहान वयाच्या) राजाकरितां कोर्ट आफ वार्ड नेमण्यांत आलें. १८८२ सालीं १३०००० एकर जमीन बिजनी राजाच्या ताब्यांत देण्यांत आली. १७०८०० एकर सिदली राजाकडे लावून देण्यांत आले पण ह्या करारास दोन्ही राजांची नाखुषी असल्याकारणानें ते सरकारताब्यांतच राहिले; पैकीं मालिकाना म्हणून सरकार सिदली राजास उत्पन्नापैकीं शेंकडा २० व बिजनी राजास उत्पन्नापैकीं शेंकडा ७॥ उत्पन्न देत असतें.

**प श्चि म.**—बंगालमधील जलपैगुरी जिल्ह्याचा ईशान्येकडील प्रदेश. हा हिमालयाच्या पायथ्याशीं आहे. क्षेत्रफळ १८६२ चौरस मैल. पूर्व द्वार व दार्जिलिंग जिल्ह्याच्या कालिमपान्ग पोटविभागाबरोबर पश्चिमद्वारहि १८६५ सालीं ब्रिटिश राज्यास जोडण्यांत आला. ह्या प्रदेशाच्या उत्तर भागांत जंगली प्रदेश खूप आहे. जमीन लालसर काळया रंगाची आहे. पाऊसपाणी १८० इंच असतें. तिस्ता व रैना नद्यांच्या मधील प्रदेशांत चहाच्या झाडांची लागवड केली आहे.

पश्चिमेस तिस्ता व जलधाक ह्यांच्यामधील प्रदेशांत तांदूळ व तंबाखूचें वगैरे पीक मुबलक होतें. हा प्रदेश ब्रिटिश अंमलाखालीं आल्यानंतर ह्याची पहिल्यानें कशी तरी जमाबंदी करण्यांत आली. पुन्हां ह्याची १८७४-८० व १८८९-९५ अशी दोनदां जमाबंदी करण्यांत आली होती व त्यावेळीं ४ ठाण्यांतून १५ वर्षेपर्यंत एक नेमलेली रक्कम घ्यावयाची असें ठरलें व अम्बारी फालाकाताची जमाबंदीची मुदत दहा वर्षेपर्यंत ठरविण्यांत आली. व्यापाराचीं मुख्य गांवें:—अलिपूर, बक्सा, फालाकाता व भैनागुरी हीं आहेत.

**द्वारका**—बडोदे संस्थानांतील अमरेली प्रांतांत, उखामंडल ताळुक्यांतील एक गांव व बंदर. अमदाबादेच्या नैर्ऋत्येस २३५ मैल व बडोदा शहराच्या पश्चिमेस २७० मैल. लोकसंख्या ( १९११ ) ६५४८. ही आनर्त देशाची राजधानी असून येथें संपूर्ण यादवांसहित, कृष्ण व बलराम राहत असत. ही नगरी प्रथमतः भूमीवरच होती. परंतु जरासंध व कालयवन, हे वारंवार येऊन त्रास देत त्यामुळें विश्वकर्म्याकडून हिची स्थापना कृष्णानें समुद्रांत करविली होती. हिंदुस्थानांत हें अत्यंत पवित्र स्थान समजलें जात असून येथें नेहमीं हिंदु यात्रेकरू जातात. गोमतीच्या तीरावर द्वारकानाथजींचें देवालय आहे. दरसाल दर्शनार्थ दहा हजार भक्त तरी लोटत असतील अशी कल्पना आहे. येथें शंकराचार्यांचा मठ आहे. दुसरा मठ शृंगेरीस आहे; तिसरा जगन्नाथ येथें असून चवथा हिमालयांत बद्रिनाथ येथें आहे. येथून बंदर ( रुपन नांवाचें ) गावाच्या उत्तरेस एक मैलावर आहे. बाहेर जाणारा माल बाजरी, तेल, तूप व आंत येणारा माल तांदूळ, गहूं, ज्वारी, साखर, कापडचोपड वगैरे. मुंबई, सुरत, कराची व झांझिबार ह्या बंदरांशीं येथून दळणवळण चालतें.

**द्वारनान्ग तिरमेन**—आसामांतील खाशी टेंकड्यामधील एक लहान संस्थान. लोकसंख्या ( १९०१ ) ३६२. एकंदर उत्पन्न १९०३-०४ सालीं १०० रुपये होतें. मुख्य उत्पन्न तांदूळ, बाजरी व संत्रीं हें आहे. येथें चुनखडी विपुल सांपडते.

**द्वारसमुद्र**—कर्नाटकांत असणारें नंदीदुर्गाच्या पश्चिमेकडील २० कोसांवरील शहर; हें होयसळ बल्लाळ ( पहा ) राजांची राजधानी होतें. यास दोरसमुद्र व द्वारावती अशींहि नांवें आहेत. सांप्रत याचें नांव हळेबिड असून येथें अति सुंदर अशीं कांहीं देवळें व अनेक शिलालेख आहेत. त्यांचें वर्णन फर्ग्युसन यानें केलें आहे. मलिक काफरनें यावर स्वारी केली होती. [ स्मिथ; अय्यंगार—एन्शन्ट इंडिया. ]

**द्वाराहाट**—संयुक्त प्रांत अलमोरा जिल्ह्यांतील व तहशिलींतील एक खेडें. हें राणीखेतच्या उत्तरेस १२ मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९०० ) ४६४. येथें कट्युरी वंशाच्या राजांपैकीं कोणी रहात होते. उत्तमपैकीं कोरलेले मोडक्या

पडक्या देवळांचे दगड येथें दृष्टीस पडतात. येथील मोठ्या मुख्य देवालयांत पुष्कळ मूर्ती असून दोन अकराव्या शतकांतले लेखहि आहेत. येथें कांहीं विचित्र थडगीं असून त्यांचा संबंध तैमूर हिंदुस्थानांत आला होता त्या कालाकडे लाविला जातो. ह्या गांवास अलीकडे वरचेवर्से महत्त्व येऊं लागलें आहे.

**द्वीपें**—येटासारख्या खंडाला द्वीप हें नांव असून पृथ्वीवर अशा तऱ्हेचीं अनेक द्वीपें असल्याचें पुराणें सांगतात. सर्व द्वीपांचा केंद्र मेरु पर्वत असून कमलपत्रांप्रमाणें तीं त्यापासून निघून समुद्रांच्या योगें वेगवेगळीं राहिलीं आहेत. हीं द्वीपें बहुधा सात आहेतः—जंबु; प्लक्ष किंवा गोमेदक; शाल्मक; कुश;क्रौंच; शाक व पुष्कर.यांनां वेढणारे समुद्र म्हणजे लवण, इक्षु, सुरा, घृत, दधि, दुग्ध व जल हे होत. महाभारतांत भद्राश्व; केतुमाल; जंबुद्वीप व उत्तरकुरु हीं चार द्वीपें सांगितलेलीं आहेत; विष्णुपुराणांत भारतवर्ष ( हिंदुस्थान ) नऊ द्वीपांचें मिळून बनलें असल्याचा उल्लेख आहे.

**द्वैत उर्फ द्वितत्त्ववाद**—दोन सहस्वसमान तत्त्वांनीं सर्व गोष्टींचा खुलासा करणारें मत. ( १ ) अध्यात्मिक द्वितत्त्ववाद हा मन व जड प्रकृति यांचें निरंतर सहवर्तित्व प्रतिपादन करतो. यांतील एका मताप्रमाणें मन व जडप्रकृति अगदीं भिन्न असून त्यांत कार्यकारणसंबंध असणें अशक्य होय. ( २ ) दुसऱ्या मताचा द्वितत्त्ववाद आनुमानिक-सापेक्ष आहे. मन व जडप्रकृति यांत बरेंच अंतर असल्यामुळें मन प्रकृतितत्त्व जाणण्यास समर्थ नसलें तरी स्वतःच्या कार्यकारणनियमावरून, प्रकृति इंद्रियसंवेदनांचें मूळ आहे, असें अनुमान काढता येतें. म्हणून विचारवंत मनास प्रकृति ही आवश्यक गृहीत गोष्ट आहे. याप्रमाणें हें मत एकतत्त्व-मन-वादाकडे झुकतें. पण मनास कळो वा न कळो प्रकृति अस्तित्वांत आहे असें समजलेंच पाहिजे. ज्ञानवत्ता संवेदनात्मक व बुद्धिविषयक असते. संवेदनांनीं बौद्धिक चमत्कारांचा खुलासा होत नाहीं. संवेदना क्षणिक व वैयक्तिक असल्यामुळें स्मृति, आवश्यकता तत्त्व व साम्यता यांचा खुलासा कसा करावयाचा ? मनांत सतत राहणारी मूळशक्ति ही कार्यें करते असें यावर म्हणतात. ही शक्ति अनुभवपूर्व व अनुभवातीत आहे. या ठिकाणीं दोन तत्त्वें दृग्गोचर होतात. मन संवेदना—आघात नोंदणारा प्रतिमाग्राहक चित्रपट नव्हे. त्यांत चिकित्सक बदल करणारी शक्ति आहे. ती इंद्रियदत्त संवेदनांवर प्रतिक्रिया करून त्यांनां व्यवस्थित करिते. नीतिशास्त्र व धर्मशास्त्र यांत हीं दोन तत्त्वें आढळतात. वाईट व चांगलें हीं विरोधी तत्त्वें नीतिशास्त्रांत प्रामुख्यानें प्रतिपादण्यांत आलीं आहेत. पारशी परमार्थसाधनमार्गांत व कांहीं ख्रिस्ती पंथांत वाईट व चांगलें हे मनुष्यावर ताबा मिळविण्यास धडपडत असतात असें म्हटलें आहे. ख्रिस्ती संप्रदायांत सैतान व देव हीं परस्परविरोधी तत्त्वें आहेत. पण या दोन्ही मतांत शेवटीं चांगल्याचाच जय होणार असें म्हणून अंतिम एकतत्त्वाचाच पुरस्कार केला आहे. सैतान-अस्तित्व व ईश्वराचे गुण यांचा मेळ न घालतां आल्यामुळें हें द्वैत सुरू झालें. मिल ईश्वराचा चांगुलपणा प्रतिपादण्यासाठीं त्याचा सर्वशक्तिमानपणा सोडण्यास तयार झाला. या सर्व विचारावरून सैतान तत्त्व व ईश्वर तत्त्व एकाच वेळीं उत्पन्न झालें असून सैतानावर ईश्वराचा पूर्ण ताबा नाहीं असें म्हणावें लागतें. या मतांचा थोडक्यांत इतिहास खालीलप्रमाणें आहे. अतिप्राचीन यूरोपीय तत्त्ववेत्ते—उदा० अयोनियन पंथी लोक—विश्वांतील सर्व गोष्टींचा खुलासा एका जडप्रकृति—तत्त्वानें करीत. नंतर, जड तत्त्वावर आत्मिक तत्त्व परिणाम करतें असें म्हणण्यांत येऊं लागलें. बुद्धि ही फरक व प्रगति यांचें कारण आहे असें प्रथम आनाक्सागोरसनें प्रतिपादिलें. पण बुद्धि ही सुद्धां अतिशुद्ध व विरळ जड प्रकृति आहे असें तो म्हणे. प्लेटोनें द्वितत्त्ववाद उघडपणें प्रथम पुढें मांडला. वस्तूचें सूक्ष्मदृष्टींतील आदिरूप ( आयुडिया ) व इंद्रियसंवेदनांच्या मागील तत्त्व हीं दोन भिन्न तत्त्वें आहेत असें तो म्हणे. त्याचप्रमाणें पूर्णता व अपूर्णता ही द्वैतजोडी यानें पुढें आणली. याप्रमाणें नीति व अध्यात्म यांचा मिलाफ केला. आरिस्टॉटलनें या द्वैताविरुद्ध बरीच गडबड केली पण स्वरूप ( फॉर्म ) व प्रकृतिद्रव्य(मॅटर)या द्वैतांतून तोहि सुटला नाहीं. स्कोल्यास्टिक लोक बाह्य स्वरूपावर विशेष जोर देणारे असल्यामुळें द्वितत्त्ववादाचे पुरस्कर्ते होते. ब्रुनो व पारासिलीस या यूरोपीय संस्कृतीच्या पुनर्जन्माच्या काळांतील ( रेनायसन्स ) तत्त्ववेत्यांनीं या अंधद्वैताविरुद्ध बंड करणें साहजिक होतें. यांनीं सर्व वर्तमान गोष्टींत मन व जडप्रकृति यांचें एकत्व प्रतिपादन केलें. लेब्निझच्या उदात्त व बुद्धिप्रमाण एकतत्त्ववादाचे ते पुरोगामी दूतच होते. डेकार्ट व बेकन यांच्या वेळेपासून भौतिकशास्त्राचें महत्व वाढलें व अध्यात्मशास्त्रांतील प्रश्न मागें पडले. भौतिकशास्त्रीय पुराव्यांनीं अस्तित्वाची मूलतत्त्वें समजावून घेण्याची प्रवृत्ति सुरू झाली. डेकार्टनें ज्ञानतत्त्व व जडविस्तार तत्त्व हें द्वैत प्रामुख्यानें पुढें आणलें. स्पिनोझानें यांतील चूक जाणून मन व जडप्रकृति यांच्या मागें एक पदार्थ आहे असें प्रतिपादन केलें. लेब्निझनें विश्व हें आत्मिक तत्त्वाच्या सुसंगततेचा परिणाम आहे असें म्हटलें. कांटनें शुद्धबुद्धि व वस्तुतत्त्व यांतील संबंध दाखविला नाहीं. त्यानें ज्ञानवर्तेत अनुभविक व अनुभवपूर्व असा भेद केला. कांटच्या नंतर या भेदापासून दोन निराळे प्रवाह झाले. एकांत मन व जडप्रकृति यांचा काय संबंध आहे याचा खल असून दुसऱ्यांत शुद्धबुद्धितत्त्वें व अनुभवतत्त्वें यांचा खल आहे.

**हिंदु द्वैतमत**.—भारतीय तत्त्वज्ञानांतील द्वैतमत श्रीमध्वाचार्य उर्फ श्रीमदानंदतीर्थ ( ११९७–१२७६ ) यांनीं प्रवृत्त केलें. परब्रह्म व जीव हे दोन्ही सदैव भिन्नच मानले पाहिजेत, पूर्णपणें किंवा अंशतःहि त्यांचें ऐक्य होणें शक्य नाहीं असें माध्वसंप्रदायाचें मत असल्यामुळें यास 'द्वैत मत' असें म्हणतात. मध्वाचार्यांनीं प्रस्थानत्रयीवर ( ८ नि

वेदांतसूत्रें व भगवद्गीता हे तीन ग्रंथ ) भाष्यें लिहून हे तिन्ही ग्रंथ द्वैतमतप्रतिपादक आहेत असें दाखविलें आहे. हें द्वैतमत शंकराचार्यांच्या अद्वैतमताच्या अगदीं विरुद्ध असें आहे ( 'अद्वैत' पहा ). रामानुजाचार्यांचें 'विशिष्टाद्वैत' हें मतहि मध्वाचार्यांनां मान्य नाहीं. जगांत द्वैताचे पांच भेद ( पंचभेद ) कायमचे रहाणारे आहेत. ते असेः—

( १ ) परमात्मा व जीवात्मा; ( २ ) ईश्वर व जडसृष्टि; ( ३ ) आत्मा व जडसृष्टि; ( ४ ) एक जीवात्मा व दुसरा जीवात्मा; आणि ( ५ ) जडाचा एक परमाणु व दुसरा परमाणु. मोक्ष म्हणजे पुनर्जन्मापासून सुटका होऊन नारायणाच्या ( परमेश्वराच्या ) सांनिध्यांत निरंतर राहणें. जीवात्मे असंख्य असून त्यांपैकीं प्रत्येक शाश्वत टिकणारा व दुसऱ्या जीवात्म्यापासून निरंतर स्वतंत्र रहाणारा आणि पुनर्जन्म पावणारा आहे. जीवांचे तीन वर्ग आहेतः—( १ ) परमेश्वराहून कमी दर्जाचे असे देव, ऋषी, राजे, पितृदेव आणि इतर कांहीं सद्गुणसंपन्न जीव; यांनां मोक्षप्राप्ति निश्चित होते. ( २ ) पहिल्या वर्गांत जाण्याइतके चांगले नाहींत किंवा तिसऱ्या वर्गांत जाण्याइतके वाईटहि नाहींत असे मध्यम प्रतीचे जीव; यांनां नेहमीं पुनर्जन्म घ्यावा लागतो; आणि ( ३ ) तिसरा वर्ग दैत्य व इतर पापकर्मी जीवांचा; ते कायमचे नरकांत जातात. अशा प्रकारचें हें मत आहे. या संप्रदायाची अधिक माहिती 'मध्वाचार्य' या लेखांत पहा.

अमेरिकन इंडियन.—अमेरिकेंतील मूळच्या इंडियन लोकांत ख्रिस्ती लोकांप्रमाणें देव व सैतान किंवा मानवाला मदत करणाऱ्या देवता व मानवाचें शत्रुत्व करणाऱ्या देवता आहेत असा जो समज आहे तो चुकीचा आहे. प्रथमारंभीं गेलेल्या ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या गैरसमजुतीमुळें हा समज प्रसृत झाला. कांहीं इंडियन जातींमध्यें, एकच देव मानवाच्या पापपुण्याप्रमाणें सुखदुःखाची वांटणी करतो, असें मत आहे.

ईजिप्शियन ( मिसरी ).—मिसरी लोकांच्या धर्मांत निरनिराळ्या प्रगतीच्या अवस्थांमध्यें द्वैतविषयक सर्व कल्पना दृष्टीस पडतात. मनुष्याच्या आयुष्यांतील प्रत्येक चांगली किंवा वाईट गोष्ट भुतांच्या ( स्पिरिट्स ) कडून करविली जाते, ही आद्य समजूत प्रागैतिहासिक काळांतील मिसरी समाजांत होती असें 'मृतांचे ग्रंथ' या मिसरी ग्रंथावरून दिसून येतें. पण कोणतेंहि भूत चांगलें किंवा वाईट नसून प्रत्येक भूत मनुष्याप्रमाणेंच कधीं चांगली व कधीं वाईट गोष्ट घडवून आणतें अशी समजूत होती. त्यानंतरच्या काळांत कांहीं भुतें कायमचीं चांगलीं व कांहीं कायमचीं वाईट अशी द्वैतदर्शक कल्पना रूढ झालेली दिसते. त्याच वेळीं प्रकाश व अंधकार, आरोग्य व आजारीपणा, शांतता व वादळ, सुकाळ व दुष्काळ, वगैरे प्रकारच्या जोड्या पडून चांगल्यांचा समूह एका बाजूला व वाईटांचा समूह दुसऱ्या बाजूला याप्रमाणें दोन विरोधी पक्ष निर्माण झाले व देवतांचेहि असे दोन वर्ग पडले. तथापि वरील जोड्यांत भौतिक द्वैताची कल्पनाच अनुस्यूत आहे. त्यानंतरची पायरी नैतिक द्वैतमताची. मिसरी लोकांत लढाईच्या वेळीं स्वतःच्या बाजूला चांगल्या देवतांचें साहाय्य आहे व शत्रूंनां वाईट देवनांचें साहाय्य आहे अशी कल्पना वाढत गेली. स्वपक्षाला मदत करणारे देव धूर्त, न्यायप्रेमी, सत्यप्रेमी, अनाथकैवारी, परोपकारी, या व इतर अनेक सद्गुणांनीं युक्त आहेत अशी कल्पना अस्तित्वांत आली. अर्थात हेच गुण मिसरी लोकांतहि असले पाहिजेत; आणि प्रत्येक सद्गुणी मनुष्यानें दुर्गुणयुक्त लोकांचा किंवा गोष्टींचा पाडाव करण्यास झटलें पाहिजे हें तत्त्व मान्य झालें.

**द्वैतवन**—हें वन सरस्वती नदीतीरीं असून या समीप मरुधन्व देश आहे. पांडव हस्तिनापुरांतून वनवासास निघाले त्याकाळीं ते प्रथमतः या वनांत आले होते.

**द्व्याश्रय काव्य**—एक इतिहासग्रंथ. सिद्धराज व कुमारपाल यांच्या कारकीर्दींतील प्रसिद्ध हेमराजानें य ग्रंथास सुरवात केली याचें हें नांव असण्याचें कारण असें कीं या ग्रंथाच्या रचनेचे हेतु दोन होते; संस्कृत व्याकरण शिकविणें व अनन्हिलवाडपट्टणच्या राजांचा इतिहास सांगणें. त्या काव्याचा गोषवारा येणेंप्रमाणेः—

सर्ग १ ला.—अनहिलपूर नांवाचें शहर होतें. तेथें राज्य करणाऱ्या सोळंकी राजांमध्यें पहिला राजा मूळराजा हा होता. हें शहर फार चांगलें होतें आणि मूळराजाहि मोठा पराक्रमी होता. यानें उत्तर कोसल देश जिंकला.

सर्ग २ रा.—मूळराजाचे मंत्री खेरालूचे चेराणक, जंबक आणि जेहुल या नांवाचे होते. त्यांच्या सल्लयानें त्यानें वामनस्थली येथें राहणारा सौराष्ट्र देशाचा राजा ग्राहरिपु हा प्रभासक्षेत्रावरच्या यात्रेकरूंस त्रास देई म्हणून त्यावर स्वारी करण्याचा निश्चय केला. ग्राहरिपूनें सिंधु देशच्या राजास जिंकलें होतें व कच्छ देशचा फुलामहाराजाचा मुलगा लाखा राजा हा त्याचा मित्र होता. वामनस्थली हें उज्जयंताद्री पासून ७ कोस व समुद्रापासून २० कोस होतें. ग्राहरिपु हा जातीचा अभीर ( गवळी ) होता.

सर्ग ३ रा.—मूळराज यास बीज आणि दंडक असे दोन चुलते होते. त्यांचे मुलगे मूळराजाच्या पदरीं नव्हते. या सर्गांत मूळराज विजय यात्रेस निघतो.

सर्ग ४ था.—ग्राहरिपु, लाखा व सिंधु देशचा राजा यांसह मूळराजास जंबुमाळी नदीवर भेटतो.

सर्ग ५ वा.—मूळराजानें ग्राहरिपु व लाखा यांस लढाईंत मारलें. मूळराजाचा धाकटा भाऊ गंगाधरचा राजा गंगामह, व त्याचा मित्र रेवतीमित्र, शिलाराष्ट्र येथील राजा व एक मारवाड राजा हे व काशी देशचा राजा हे सर्व मूळराजाच्या बाजूनें लढले. परमार वंशांतील श्रीगाल येथील राजाहि मूळराजाकडे होता ( हा मारवाडचा राजा शेट राठोड याचा मुलगा व उदेपूर व ईदर या घराण्यांचा मूळपुरुष सियोजी असावा ).

सर्ग ६ वा.—मूळराजास चामुंडराजा नांवाचा पुत्र झाला. त्याचें शिक्षण रुद्रप्रसाद ( सिद्धपूर येथील रुद्रमाला देवालय ) येथें बरेंच झालें असावें. मूळराजास अंगदेश, वनवासदेश, देवगिरी, कोल्हापूर ( येथून पद्मराग ), काश्मीर ( कस्तूरी ), कुरुदेश, पांचाल देशांतील कांपिल्य नगरीचा राजा इत्यादि राजे खंडणी देत असत. लाट देशाचा राजा द्वारप यानें कुलक्षणी हत्ती खण्डणीदाखल दिल्यावरून मूळराजा त्याजवर मुलासह चालून जातो. च्छभ्रवति ( नर्मदा ? ) नदीवर भृगुकच्छ (भडोच) नगराजवळ चामुंड राजानें द्वारप राजाचा पराभव करून त्यास मारिलें. नंतर परत आल्यावर चामुंड राजास राज्याभिषेक करून सरस्वती तीरावर श्रीस्थळ ( सिद्धपूर ) येथें मूळराज निजधामास गेला ( इ. स. ९९७). वाटेंत च्छभ्रवती ( नर्मदा ) तीरावर सूर्यपूर नगर लागलें; तेथील स्त्रिया कुरूप होत्या.

सर्ग ७ वा.—चामुंड राजा यास वल्लभ राजा, दुर्लभराजा, व नागराजा असे तीन पुत्र झाले. चामुंडराजानें आपल्या बहिणीस–चिनी देवीस–भ्रष्ट केल्यामुळें तो काशीयात्रेस जात असतां त्याचें चामर माळव्याच्या राजानें हिसकून घेतलें. म्हणून परत आल्यावर त्यानें वल्लभराय यास त्याजवर स्वारी करण्यास पाठविलें. तो पारापारा व सिंधुसिंधु या नद्या ओलांडल्या शिवाय न येत म्हणून कुंतल ( बेल्लारी किंवा अडवाणीचा भाग ) देशामधून गेला. परंतु वाटेंत त्यास देवी आल्यामुळें त्यानें आपलें सैन्य परत पाठविलें (इ.स.१०१०); पुढें तो तेथेंच मेला. नंतर चामुंडराजानें दुर्लभराय यास गादीवर बसवून शुक्ल तीर्थास ( भडोचजवळ ) गमन केलें व तेथें तो मेला.(?)

दुर्लभराजास श्रीजिनेश्वरसूरी यानें जैन धर्माचीं मूलतत्त्वें समजावून दिलीं होतीं. दुर्लभ राजाची बहीण (?) मारवाडचा राजा महेन्द्र यास दिली होती. दुर्लभराजा व नागराजा हे महेन्द्र राजाकडे गेले. त्याची मुलगी दुर्लभादेवी ही दुर्लभराजानें स्वयंवरांत मिळविली व महेन्द्रानें आपली धाकटी मुलगी नागराजास दिली. परत येत असतां त्यांनीं अंगदेश, माळवा, हूणदेश, मथुरा(या राजानें तुर्क लोकांकडे साहाय्यार्थ गमन केलें ), आंध्र देश, चैदिय, कुरु व काशी इत्यादि राजांचा पराभव केला.

सर्ग ८ वा.—दुर्लभराजाचा धाकटा भाऊ नागराज यास भीम या नांवाचा पुत्र झाला. त्याला गादीवर बसवून दुर्लभराज व नागराज दोघेहि तपश्चर्येस गेले व पट्टण येथें स्वर्गस्थ झाले. भीमदेवास पुण्ड्रदेश, आंध्रदेश, व मगधदेश येथील राजे करभार देत असत. भीमदेवानें सिंध देशचा राजा हम्मुक यावर स्वारी केली. हम्मुकानें शिवसाण येथील राजास जिंकिलें होतें. भीमदेव हा पंजाबांत गेला व तेथील नद्यांवर त्यानें झाडें, दगड व माती यांचा पूल बांधून हम्मुकाबरोबर लढाई करून त्यास जिंकिलें [ चेदिदेश ( गोण्डवण ) हा त्यावेळीं हम्मुक राजाच्याच ताब्यांत होता ?]

सर्ग ९ वा.—नंतर भीमदेव चेदिदेशाकडे वळला. वाटेंत त्यानें पुष्कळ राजांस जिंकलें. चेदिदेशच्या राजाजवळ भिल्ल व म्लेंछ सैन्य होतें पण तो भीमदेवास शरण आला, त्याचें नांव कर्ण होतें. भीमदेवानें काशी, गजबन्धदेश, यंतु, कलिंग देशचा राजा संतिक, व नन्ति, गन्ति, हन्ति, षन्ति, मन्ति आणि गौड देशचा राजा यांनां जिंकलें होतें. भीमदेवास क्षेमराज व कर्ण असे दोन पुत्र होते. क्षेमराजास देवप्रसाद या नांवाचा एक मुलगा होता. भीमदेव हा कर्णास गादीवर बसवून निजधामास गेला ( इ. स. १०७२ ). क्षेमराज हा राज्याचा स्वीकार न करितां दहिस्थळ या गांवाजवळ मुण्डिकेश्वर या तीर्थावर राहिला. कर्णराजानें हें दहिस्थळ देवप्रसाद यास दिलें. कर्णराजानें दक्षिणेंतील चंद्रपूर नगरच्या जयकेशी नांवाच्या राजाच्या मयनल्लदेवी नांवाच्या मुलीबरोबर लग्न केलें.

सर्ग १० वा.—कर्णानें पुत्रप्राप्तीकरितां लक्ष्मीस प्रसन्न करून घेतलें.

सर्ग ११.—कर्णास जयसिंह नांवाचा पुत्र झाला. त्याला त्यानें गादीवर बसविलें ( इ. स. १०९३ ) व आपण स्वर्गास गमन केलें. देवप्रसाद यानें आपला पुत्र त्रिभुवनपाल यास जयसिंहाच्या हवालीं करून स्वतःस दहन करून घेतलें.

सर्ग १२ वा.—जयसिंहानें श्रीस्थळ (सिद्धपूर) तीर्थाच्या संरक्षणार्थ मांसभक्षक राक्षसांवर स्वारी करून त्यांचा राजा बर्बर ( बर्बरक ) यास कैद केलें. पण त्याची बायको पिंगलिका हिच्या विनवणीवरून त्यानें त्यास सोडून दिलें. हा बर्बर कोणी स्वारी करून आलेला मुसुलमान असावा. त्याच्या बाजूनें अंतधार्नदेशच्या राजाचा धाकटा भाऊ लढत होता.

सर्ग १३ वा.—जयसिंहास रानांत पाटल देशांतील भोगावतीपुरीचा नागराज रत्नचूड याचा पुत्र कनकचूड भेटला. याचें दुसरा नागपुत्र दमन याचा सहाध्यायी, याजबरोबर भांडण झालें होतें. जयसिंहानें त्यास मदत केली व त्यानें यास वर दिला. बर्बरक यास वर्वरक असें उज्जन येथील ताम्रपटांत म्हटलें आहे. तो ताम्रपट रॉयल एशियाटिक सोसायटीच्या ताब्यांत आहे.

सर्ग १४ वा.—जयसिंहानें उज्जनीचा राजा यशोवर्मा याजवर स्वारी करून त्यास कैद केलें व अवंती आणि धारप्रांत मिळविलें, तसेंच उज्जनीजवळचा सिमहा प्रांत जिंकला. या स्वारींत त्याला भिल्ल राजाकडून पुष्कळ मदत झाली. उज्जनीच्या राजांच्या कारकीर्दी येणेंप्रमाणें आहेत:—(१) भोजदेव, ( २ ) उदयादित्य, ( ३ ) नरवर्मा ( मृ. सं. ११९० ), (४)यशोवर्मा (मृ.सं.११९४), अजयवर्मा (सं. १२००–१२३५) इत्यादि.

सर्ग १५ वा.—नंतर जयसिंह माळव्याहून परत फिरला. वाटेंत पुष्कळ राजांनीं त्यास मुली दिल्या. नंतर तो कांहीं दिवस सिद्धपुरास राहिला. तेथें पूर्ववाहिनी सरस्वती तीरावर त्यानें रुद्रमाळ बांधिला व एक महावीरस्वामींचें देऊळ बांधिलें

नंतर तो पांचाळ देशच्या राजांकडे, त्यांनी सोमनाथाची यात्रा करण्यास सांगण्यास पायांनीं चालत गेला. त्यानें देवलपट्टणास येऊन सोमनाथाचें दर्शन घेतलें. देवलपट्टणच्या राजानें त्याचा सत्कार केला. नंतर तो गिरनारपर्वतावर गेला आणि तेथें त्यानें नेमिनाथांची पूजा केली. पुढें सिंहपुरास ( सिहोर ) गेला आणि तेथून पट्टणास परत आला. त्यानें सहस्रलिंगनामक तलाव बांधला व पुष्कळ तळीं, विहिरी, मंदिरें, बागा वगैरे बांधिल्या व सदावर्तें घातलीं. त्यानें ज्योतिष, न्याय पुराण इत्यादिकांच्या अभ्यासासाठीं शाळा स्थापन केल्या आणि चंडिकादेवी वगैरेंचीं एकशें आठ देवळें बांधलीं. नंतर सिद्धराजानें त्रिभुवनपालाचा पुत्र कुमारपाल यास गादीवर बसवून स्वर्गारोहण केलें ( इ. स. ११४३ ).

सर्ग १६ वा.—सपादलक्ष ( नागोर ) देशाचा राजा आन ( याला मेरुतुंग विशालदेव चव्हाण याचा नातु आनक असें म्हणतो ) हा अवंतीचा राजा बल्लाळ याशीं मैत्री करून व पारा नदीतीरावरच्या राजांच्या साहाय्यानें चालून आला. त्याच्या सैन्यांत परकीय भाषा जाणणारे पुष्कळ लोक होते. त्याला उत्तराधिप असें म्हणत व कुमारपाल याला पश्चिमाधिप असें म्हणत. आन राजानें पश्चिम गुजराथवर प्रथम स्वारी केली व त्यास कथागामचा राजा व कुमारपालाचा एक सेनापति चाहाद [ याचा नदोल येथील जैन शायत्रींतील ताम्रपटांत उल्लेख आहे ( १२१४ ) व मेरुतुंग म्हणतो कीं आन राजास वाहाद जाऊन मिळाला ]. या आन राजानें गुजराथमध्यें येणाऱ्या व्यापाऱ्यांकडून तेथील बरीच माहिती मिळविली होती. आन राजास पाटलिपुत्र येथील राजा ( हा कोल्ह्यासारखा होता ) येऊन मिळाला. आनराजानें सैन्य राक नांवाच्या ब्राह्मणाच्या हाताखालीं होतें.

कुमारपालास उत्तम घोडेस्वार असे कोळी व कच्छ प्रांतांतील त्याचे मांडलिक येऊन मिळाले. तसेच सिंधी लोक येऊन मिळाले. कुमारपाल अबूकडे सैन्य घेऊन निघाला व तेथें त्यास हरणाचें कातडें पांघरणारे पुष्कळ रानटी लोक येऊन मिळाले गावेळीं अबूचा राजा विक्रमसिंह होता. विश्वामित्रापासून निघालेल्या परमार वंशांतील जालंधर ( जालोर ) देशाचा राजा पण त्यास येऊन मिळाला. अबूवर वर्णासा नदीतीरावर कुमारपालानें तळ दिला.

सर्ग १७ वा.—यांत रात्रीचें वर्णन असून १८ व्यांत आन राजास त्याच्या मंत्र्यानें म्हटलें कीं आपण मारवाड सोडून इकडे स्वारी करण्यास यावयाचें नव्हतें व आतां लढाई न करतां तह करावा. लढाईमध्यें गुजराथी सैन्य आहाद या मंत्र्याच्या हाताखालीं होतें व आन राजाचें सैन्य गोविंदराज या मंत्र्याच्या हाताखालीं होतें. आन राजा बाण लागून जमिनीवर पडला. व त्याचें सैन्य शरण आलें.

सर्ग १९ वा.—कुमारपालानें आनराजाची मुलगी जल्हाणा हिंजबरोबर विवाह केला व परत फिरला. बल्लाळ राजावर त्यानें पाठविलेले विजय आणि कृष्ण हे सेनापती फितुर होऊन त्यास मिळाले. तेव्हां कुमारपालानें त्याजवर चालून जाऊन त्याचा पराभव केला.

सर्ग २० वा—यांत कुमारपालानें प्राणियज्ञ बंद केला. त्याला महिपालदेव नांवाचा भाऊ होता व त्या महिपालास जयदेव नांवाचा पुत्र होता. ब्राह्मण देखील यज्ञामध्यें पशुवध बंद करून धान्याचा यज्ञ करूं लागले. पालिदेश आणि पांचाल देश या देशांतहि पशुयज्ञ बंद केला व मांसविक्रय बंद करून त्या लोकांस ३ वर्षांचें त्यांचें उत्पन्न नुकसानीदाखल दिलें. काशीच्या आसपासचे लोक मात्र प्राणिहत्या करीत. वेवारशी मालहि तो जप्त करीत नसे. त्यानें केदारेश्वर व सोमनाथ या देवळांचा जिर्णोद्धार केला. त्यानें अनहिलपुरास पार्श्वनाथाचें देवालय बांधून स्फटिकाच्या मूर्ती बसविल्या. त्यानें देवपट्टणासहि पार्श्वनाथाचें देवालय बांधलें. अनहिलपूरच्या देवालयास त्यानें कुमारविहार असें नांव ठेविलें. नंतर त्यानें अनहिलपुरासच कुमारपालेश्वराचें देवालय बांधलें.

याप्रमाणें जिनेश्वरसूरि याचा शिष्य लेशजयतिलकगणी यानें लिहिलेल्या द्व्याश्रय नांवाच्या ग्रंथांतील कथेचा सारांश आहे. लक्ष्मीतिलककवि यानें या ग्रंथावर टीका लिहिली. हा ग्रंथ वि. सं. १३१२ ( इ. स. १२५६ ) मध्यें श्रीप्रल्हादपट्टण येथें दिवाळीच्या दिवशीं समाप्त झाला. [ रासमाला; एशि. रिस. पु. ९; टॉड—वेस्टर्न इंडिया; इं. अँ. पु. १ व ३; रॉ. ए. सो. ( बॉं. ब्रँच ), पु. १, ( बेंगाल ) पु. ५ व ७. ]

घ—या वर्णाला चार अवस्थांतून जावें लागलें. पहिली नेहमींची अशोकाच्या गिरनार शिलालेखांत, दुसरी मेवाडचा गुहिलवंशी राजा अपराजित याच्या काळच्या कुंडेश्वर लेखांत (इसवी सन ६६१), तिसरी उदयादित्याच्या वेळच्या (११ वें शतक) उज्जनी येथील लेखांत, व शेवटली अवस्था अबूचा परमार राजा धारावर्ष याच्या वेळच्या ओरिआ लेखांत (स. १२०८) दृष्टोत्पत्तीस येते.

ध = (ध च्या अवस्था)

**धकचा किल्ला**—हा कुलाबा जिल्ह्यांत कर्जतच्या पूर्वेस सुमारें तीन कोसांवर सह्याद्रीच्या पश्चिमेकडील एका २८९८ फूट उंचीच्या शिखरावर आहे. ज्या टेंकडीच्या शिखरावर हा बांधलेला आहे, तिच्या वायव्येकडील उतरणीवर कांहीं कोरीव लेणीं आहेत; परंतु तेथें जातां येत नाहीं. किल्ल्याचा तट थोडाफार शाबूत आहे. [कुलाबा ग्याझे.]

**धक्का (पाण्यांतला)**—होड्या, बोटी वगैरे पाण्यांतून येणाऱ्या जाणाऱ्या वाहनांसाठीं जो धक्का बांधतात त्याला पाण्यांतला धक्का (पीयर) असें म्हणतात. हा सर्व ठिकाणीं सारखाच नसतो. पाण्याची खोली, चालणारी रहदारी, तेथें येणारीं जाणारीं वाहनें म्हणजे होड्या, पढाव, मचवे, बोटी हीं ज्या तऱ्हेचीं असतील त्याप्रमाणें निरनिराळ्या तऱ्हेचा असतो. लहान लहान बंदरांत हा बहुतकरून उतरता दगडी असतो. उतरता असण्याचें कारण होड्या किंवा मचवे लागण्यास भरती ओहोटी असली तरी सारखेंच सोपें जावें. जेव्हां भरती असेल तेव्हां उताराच्या वरच्या बाजूला मचवे लागतात व ओहोट असेल तेव्हां उताराच्या खालच्या बाजूला लागतात. समुद्रकांठच्या किंवा मोठ्या नदीकांठच्या लोकांच्या हे चांगले परिचयाचे असतात. बोटींचे धक्के हे निराळे असतात. साध्या बोटी ज्या लहान लहान समुद्रकांठानें जात असतात त्यांचे धक्के एकमजलीच असतात. पण विलायतेहून येणाऱ्या जाणाऱ्या बोटींचे धक्के प्रचंड, मोठाले, केव्हां केव्हां दुमजली असावे लागतात. तसेंच या धक्क्यांवर याऱ्या वगैरेंची अव्वल तयारी करावी लागते. विलायती बोटी उंच असल्यामुळें त्या चटकन दुसऱ्या मजल्याशींच लागतात. केव्हां केव्हां समुद्राची किंवा नदीची खोली तीराजवळ खोल नसते. त्यावेळेस समुद्रांत उंच खांब वसवून त्यांवर धक्का बांधावा लागतो. नाहींतर धक्क्याला बोट लागणें शक्यच नसतें. मागें सांगितल्याप्रमाणें धक्का लांकडी, दगडी किंवा लोखंडी बांधणें हें ती जागा, मिळणारा माल व रहदारी यांवर अवलंबून असतें. कांहीं ठिकाणीं तरते धक्के असतात. त्यांचें एक टोंक एका ठिकाणीं बसविलेलें असतें व दुसरें टोंक पाण्यांत असतें. हे पाण्यावर तरंगत असल्यामुळें भरती किंवा ओहोटी किंवा इतर कांहीं कारणामुळें पाण्याची खोली बदलत असली तरीहि येणारी बोट व धक्का यांच्या मधील अंतर सारखेंच रहातें. ज्या ठिकाणीं बोटीवर सबंध आगगाडी घेऊन एका बाजूवरून दुसऱ्या बाजूवर न्यावयाची असते त्या ठिकाणीं असले धक्के जरूर लागतात. [ले. व्ही. एच. मनोहर.]

**धडगांव किल्ला**—मुंबई, पश्चिम खानदेश. तळोदे तालुक्यांत तळोद्याच्या उत्तरेस, सातपुड्यांत २० मैलांवर हा किल्ला असून, १८६२ सालीं याची डागडुजी करण्यांत आली होती. येथें पाणी विपुल असून अन्नसामुग्रीहि मिळण्यासारखी होती. येथें भिल्लपलटणीची एक तुकडी ठेवली होती. हल्लीं हें पोलीस फौजदारीचें एक ठाणें आहे. [बॉबे. ग्याझे. भा. १२]

**धडफळे**—पुण्यांतील जुन्या घराण्यांपैकीं हें एक आहे. यांचा मूळ पुरुष रंगो बापूजी, हा मालिकंबराच्या वेळीं पुण्याचा ठाणेदार होता. इ. स. १६२९ च्या मोठ्या दुष्काळानंतर पुण्याची वस्ती वाढवून व पेठा स्थापून जमाबंदी वगैरे काम यानेंच केलें. पुढेंहि पेशव्यांच्या वेळीं पुणें शहराची पुनर्रचना करण्यांत रंगोपंताच्या वंशजांनीं खटपट केली. थोरल्या बाजीरावाच्या वेळीं विनायक नारायण व गणेश नारायण आणि मल्हार गोविंद धडफळे ह्यात होते. बाळाजी विश्वनाथ पेशवे यास थोरातानें हिंगणगांवच्या गढींत कैदेंत ठेविलें असतां, मोरो विश्वनाथ व गणेश नारायण धडफळे यांनीं त्याची जामीनगिरी पत्करून त्याला सोडविलें. पुढें बाजीराव पुण्यास आल्यावर प्रथम धडफळ्याच्याच वाड्यांत राहत होता. नंतर शनिवारवाडा बांधण्यांत आला व त्याचें कामहि धडफळ्याकडेच दिलेलें होतें. पेशव्यांनीं धडफळ्यांना पुष्कळ वंशपरंपरा इनामें करून दिलीं आहेत. त्यांच्या ऋणानुबंधी देशस्थ घराण्यांपैकीं हें एक होय [राजवाडे खंड–३; भा. इ. मं. अहवाल. १८३५.]

**धनककट**— आंध्रदेशाहून जंगलांतून व ओसाड मैदानांतून १६७ मैलांवर हा देश होता. तेथें ह्युएनत्संग गेला होता. त्यानें धनकचक असें याचें नांव दिलें आहे. तेंच धनकटक असें कनिंगहॅमचें मत आहे. कान्हेरी आणि कार्ले येथील लेण्यांतील कोरीव लेखांत चार ठिकाणीं धनककट असा उल्लेख आहे, तें व हें एकच होय. लेखांतील तें नांव झेनोडघाटिस या ग्रीक मनुष्याचें आहे असें ... न्सन म्हणतो; परंतु तें देशाचें किंवा शहराचें नांव

कनिंगहॅमनें सविस्तर प्रतिपादनानें सिद्ध केलें आहे. डॉ. भाऊ दाजी यांनीहि ह्युएनत्संगानें लिहिलेलें नांव व पूर्वोक्त कोरीव नांव यांचें ऐक्य दाखविलें आहे.

धनककट आणि कृष्णानदीवरील धरणीकोट किंवा अमरावती एकच होय असें कनिंगहॅम म्हणतो. सिलोन आणि सयाम येथील बौद्ध दंतकथांत अशी एक कथा आहे कीं गंगेचें मुख आणि सिंहलद्वीप यांमध्यें माजेरिका देशांत नाग रहात होते. त्यांस मिळालेले बुद्धाचे एक किंवा दोन द्रोण अवशेष त्यांनीं एका अति भव्य व सुंदर अशा स्तूपांत ठेविले. हें स्थान हिरे सांपडतात त्या प्रदेशाच्या जवळ होतें. माजेरिका देश गोदावरीवरील दंतपुराच्या दक्षिणेस हिऱ्यांच्या प्रदेशाजवळच होता असें एका बौद्ध ग्रंथावरून दिसतें. या दोन प्रमाणांवरून तें स्थान कृष्णानदीवरील धरणीकोटाच्या जवळ होतें. हिऱ्यांच्या खाणींचा प्रदेश धरणीकोटाच्या अगदीं जवळ उत्तरेस आहे. बौद्ध ग्रंथांत माजेरिका येथील स्तूपाचें अतिशय वर्णन केलें आहे. हें धरणीकोट येथील स्तूपांस मात्र लागतें. ह्युएनत्संगहि तो स्तूप पाहून चकित झाला होता. हल्लींहि याचे जे अवशेष आहेत, त्यांचें काम फार सुंदर आहे. शिवाय धरणीकोट ही त्या प्रांताची एकदां राजधानी होती अशी तेथील लोकांत दंतकथा आहे. या प्रमाणांवरून ह्युएनत्संगानें लिहिलेलें स्थान हेंच असें कनिंगहॅम म्हणतो. सदरील स्तूप सुमारें इ. स. च्या दुसऱ्या शतकांतला आहे. ह्या देशाचा घेर १००० मैल सांगितला आहे. मर्यादा सांगितली नाहीं, परंतु पश्चिमेस कलबुर्गा आणि पेन्नाकोंडा, दक्षिणेस तिरुपति आणि पालिकत सरोवर, उत्तरेस आंध्र आणि कलिंग व पूर्वेस समुद्र; याप्रमाणें ती असावी. सांप्रत हें गांव गुंटुर तालुक्यांत आहे. [ जर्नल बॉंबे ब्रँच रॉयल एशियाटिक सोसायटी पु. ७; अय्यंगार-एन्शन्ट इंडिया; दीक्षित-प्राचीन भूवर्णन. ]

**धंधुका**—मुंबई इलाखा. अहमदाबाद जिल्ह्यांतील एक तालुका. ह्यांत गोघा पेटयाचा समावेश होतो. क्षेत्रफळ १३०७ चौरस मैल धंधुका, घोलेरा गोघा व रानपूर हीं मोठीं गांवें असून खेडीं २०४. आहेत. लोकसंख्या. (१९११) १२५५०२. पश्चिमेकडील भागांत टेंकड्या व दऱ्या आहेत. मध्यभागांत कापूस होत असून पूर्व भागांत गहूं होतो. विहिरी व तलाव आहेत परंतु पाण्याचें दुर्भिक्ष असतें. हवा वाईट आहे. पाऊस १८ ते ५८ इंच पडतो. धंधुका हेंच या तहशिलीचें मुख्य ठाणें असून तें सुरतेच्या वायव्येस ५० कोसांवर आहे. याची लो. सं. (१९०१) १०२१४. गांवास पाणीपुरवठा चांगला नाहीं. बोहरी व मोढवाणी यांची वस्ती पुष्कळ आहे. कापड, मातीचीं भांडीं व सुतारकाम चांगलें होतें. प्रख्यात जैन पंडित हेमचंद्र येथेंच जन्मला ( १२वें शतक ). त्याच्या स्मरणार्थ कुमारपालानें येथें एक देऊळ बांधलें आहे. येथें देशी शाळा, व म्युनिसिपालिटी (स्थापना १८६०) आहे; तिचें उत्पन्न १६ हजार (१९०३-०४ सालीं) होतें. गांवाच्या डाव्या बाजूस भादर नदी आहे. [ बॉंबे ग्याझे. पु. ४. ]

**धनगर**—यांची एकंदर लो.सं.(१९११) ६७३४३९. कोंकण व दक्षिण महाराष्ट्र (निजामाचें राज्य), मध्यप्रांत, वऱ्हाड व मध्यहिंदुस्थान यांमध्यें हे लोक आढळतात. गुरें विकणें व घोंगड्या विणणें हे त्यांचे धंदे असून ते खिल्लारें पाळून त्यांवर उदरनिर्वाह करतात. उत्तर हिंदुस्थानांतलि धनगर हे मजुरी व हलालखोरांचीं कामेंहि करतात. या लोकांच्या उत्पत्तीसंबंधीं निरनिराळीं मतें आहेत, तरी या जातींतील देवकांवरून हे लोक मूळचे अनार्य असावे असें दिसतें. असाव अथवा मराठा धनगर, हे लोक धनगरांचा एक मोठा भाग असून हे मराठी जिल्ह्यांत वसलेले आहेत. हेटकर ही कुळी वऱ्हाड व वाशिमनजीकचा डोंगराळ प्रदेश यांमध्यें आहे; यांपैकीं कांहीं जरी स्थायिक असले तरी, कांहीं अजून भटकेच आहेत.

यांच्यामध्यें २२ कुळ्या असून एका कुळींतील लोक दुसऱ्या कुळींतील लोकांशीं विवाहसंबंध करीत नाहींत. यांच्या आडनांवांप्रमाणें यांचीं कुळें ठरलीं जातात. मुलींचीं लग्नें ४ महिन्यापासून १२ वर्षांपर्यंत व मुलांचीं १४-२५ वर्षांपर्यंत होतात. विवाहाचा मुहूर्त ब्राह्मण ठरवितो, परंतु ब्राह्मण नसल्यास नवरा बायकोला एका ठिकाणीं बसवून मग एक गाय बाहेर सोडतात; तिचें वासरूं, तिच्या मागोमाग सोडलें जातें वासरूं गाईकडे जातांना जोडप्याच्या उजव्या हाताकडून गेलें तर तो मुहूर्त शुभ समजतात, डाव्या बाजूनें गेल्यास, २ तासानंतर फिरून गाय व वासरूं सोडून शुभ मुहूर्त पहातात. पुनर्विवाह व घटस्फोट दोन्ही चाली यांच्यांत आहेत. हे मांसाहारी असून बुरुड, परीट इत्यादि जातींच्या हातचें जेवत नाहींत. हे हिंदुधर्मीय असून ह्यांचे उपाध्याय ब्राह्मण आहेत. कोठें कोठें या लोकांचे क्रियाकर्मविधी कुंभार किंवा जंगम करतात. सातारा जिल्ह्यांतील धनगर लोकांची एक मध्यवर्ती संस्था असून तिचा मुख्य अधिकारी गावडा कुळांतला असतो व तो कन्हाडास राहतो. या संस्थेची सभा ज्या खेड्यांत भानगड उपस्थित झाली असेल तेथें भरते व डेंगडा, मरगळा, देहाघा, येडगा व गावडा ह्या प्रत्येक कुळांतील कांहीं प्रतिनिधी सभेंत हजर असल्याखेरीज सभेला निकाल देतां येत नाहीं. अपराधाबद्दल दंड व ज्ञातिभोजन हीं द्यावीं लागतात. सोलापूर व अहमदनगर जिल्ह्यांमध्येंहि अशाच पंचायती आहेत. पुण्यांत या लोकांचे सामाजिक प्रश्न यांच्या सभेंत ठरले जातात व सभा बोलावण्याचा खर्च फिर्याद आणणाराला द्यावा लागतो.

नागपूर, वर्धा, चांदा, वऱ्हाड व नेमाडकडील यांची संख्या ९६००० आहे. पूर्वी एकदां मेंढरें व शेळ्यांचे कळप वारुळांतून निघाले व शेताची नासाडी करूं लागले, तेव्हां लोकांनीं महादेवाची प्रार्थना केल्यावरून त्यानें धनगर

निर्माण केले अशी यांच्या उत्पत्तीची कथा आहे. म्हणून धनगर शाळूाची पूजा करतात. यांच्या कुळीः—घराडे, कानडे, झाडे, लाडशे, गड्डी, तेलंगे, मराठे, माहुन्ये. आडनांवें:—चव्हाण, पोवार, डोका, मार्ते, सारोदी, म्हाली, कावळे, चांभाडे, गुजडे, जुवाडे, लांबचोटे, मोडके, खाटीक, चांदेकर, दंभाडे, इले, मोय, धनसोडे, होळकर, वुळये, भागवत, लांबदाते, बोराडे, मतकर इत्यादि. या नांवांवरून या जातींत इतर लोकांचें मिश्रण बरेंच झालेलें दिसतें. इंदुराकडे मुसुलमान स्त्रीपासून झालेल्या मुलांस जन्मतः हिंदू धनगरांनीं वाढविलें, तर ते हिंदूंत गणले जाऊन, इतर जातभाईप्रमाणें समान हक्कानें वागतात. दोघां बहिणींबरोबर एकदम लग्न करतां येतें व परतवेलहि चालतो. कधीं कधीं बायकोकरितां नवऱ्यास सासऱ्याच्या घरीं नोकरी करावी लागते. वऱ्हाडाकडे नवरी ही नवऱ्यापेक्षां ठेंगणी असली म्हणजे चांगलें समजतात मग बयानें ती त्याच्यापेक्षां मोठी असल्यास चालते.

लग्नें चातुर्मासांत सुद्धां होतात. पण ब्राह्मणानें राणादेवीच्या नांवानें तांदूळ पेरावे लागतात. वधूकडे येतांना वर काळें कांबळें पांघरावयास घेतो. वधूच्या गळ्यांत प्रथम पिवळ्या रंगाच्या ७ सरांचें मंगळसूत्र बांधतात दुसऱ्या दिवशीं काळ्या पोतेचें मंगळसूत्र घालून पिवळ्या दोऱ्याचें काढून टाकतात. वरपक्षास लग्नाचा खर्च ५०रु. येतो. वधूपक्षास ३० रुपये येतो. इतर विधी मराठी चालीरितीप्रमाणें होतात. लग्नांत ब्राह्मण मालगुजार हजर असला पाहिजे. विधवाविवाहापूर्वी एका चांदीच्या आंगठीबरोबर विवाह केला पाहिजे व ती आंगठी मोडली किंवा हारवली तर तिचा प्रेतसंस्कार करावा लागतो. घटस्फोट जातिपंचायतीसमोर करावा लागतो. घटस्फोट बायकोसहि करतां येतो. धनगरांचे मुख्य देव महादेव व खंडोबा आहेत. नाचणगांवचा बहराम हा वऱ्हाडच्या धनगरांचा मुख्य देव आहे माघांतील अमावास्येस देवपूजा नांवाच्या पूजेचा समारंभ करतात. त्यावेळीं बीमरास पुरोहित करतात. तो तांदुळाच्या पिठाचे पुतळे करून त्यांवर धनगरांकडून शेंदूर व फुलें वाहवून नंतर त्यांस धान्य वाटतो व आशीर्वाद देतो. याबद्दल त्याला भोजन व दक्षिणा मिळून इतर प्रकारेंहि त्याची संभावना होते. खंडोबा हा कुलदेव पुष्कळ घराण्यांत असतो. मोठें घराणें असलें तर वडील भावाच्या घरींच खंडोबाची मूर्ति असते. कुलदेवीची पूजा लग्नकार्यांत करतात व चैत्रांत तिला एक बकरा बळी देतात. तिच्या आसनाखालीं बकऱ्याचें डोकें पुरतात. रविवारीं खंडोबाची पूजा करतात. विठोबाचीहि भक्ती करतात. बालाजीची पूजा शुक्रवारीं करतात. व विवाहित स्त्रीच्या "भैरणी" किंवा "सासीन"(सुवासीन) मूर्तीचीहि पूजा करतात. हे प्रेतें दहन करतात. अगदींच दरिद्री लोक, अविवाहित मुलें, देवीच्या आजारांत मेलेलीं मुलें मात्र पुरतात. स्मशानांतून परत आल्यावर सर्वांनीं दारू प्याली पाहिजे. हे लोक सर्व कृत्यांत ब्राह्मणांस बोलावितात. कुणबी, कुळमाळी व सोनार यांच्या हातचें हे लोक जेवतात. कुणबी लोक यांच्या हातचें पाणी पितात. साधारण अपराधाकरितां बहिष्कार घालतात. मेंढे विकणें, कुत्रा किंवा मांजर यांच्या शवास स्पर्श करणें, गाय व म्हैस यांस मारणें किंवा त्याच्या गळ्यास दोरी आवळून प्राण जाणें वगैरेंस प्रायश्चित्त घेऊन जातींत जातां येतें. घरांत मांजर मेलें तर ५ आठवडे घरांत चूल पेटवीत नाहींत. हे बकरीचें दूध विकतात. हे मेंढरांच्या लोकरींचीं कांबळीं करतात.

यांच्यांतील गवळी धनगर हे गाई व म्हशींचीं खिल्लारें बाळगतात. मेंढे धनगर असतात ते मेंढरें किंवा बकरीं बाळगतात व चारतात. ठाणें जिल्ह्यांतील खटेकरी धनगर हे घोंगड्या विणतात. पावसाचें भविष्य वर्तविण्याबद्दल यांची प्रसिद्धि आहे. जेथें जेथें खंडोबाचें महास्थान असतें तेथें तेथें पूजा धनगराची असते. तेव्हां खंडोबा हा मूळचा धनगरांचाच देव असावा.

खांडा हें मूळचें एका जातीच्या हत्याराचें नांव होय. हा शब्द संस्कृत भाषेंत खड्गपरशु असा असून तो शिवास लावतात. खंडोबा हें शिवाचेंच स्वरूप समजण्याचा संप्रदाय आहे. मार्तंड व मल्हारि अशीं आणखीं दोन खंडोबाचीं नांवें आहेत. मार्तंड हा एक वीर धनगरांमध्यें होऊन गेला असावा. खंडोबा ही जरी एक व्यक्ति नसली तरी मार्तंड नांवाचा जो वीर धनगरांत झाला तो खंडोबाचा अवतार मानिला गेला असवा व त्यामुळें खंडोबा व मार्तंड हे शब्द एकमेकांचे वाचक झाले असावेत. खंडोबा व मार्तंड ( खंडोबा याअर्थी ) हीं नांवें संस्कृतांत आढळत नाहींत.

मल्हारि म्हणजे मल्ल नांवाच्या असुराचा अरि अशी एक व्युत्पत्ति आहे. मलहारी पापाचें हरण करणारा असेंहि कोणी म्हणतात. मलापहार किंवा मलहारी अशी एक नदी असून त्या नदीच्या नांवावरून मल्हारि हें तिच्या कांठच्या प्रांतास नांव पडलें व त्या प्रांतांतील मार्तंड किंवा खंडोबा या देवासहि तें नांव मिळालें असावें. [ संदर्भग्रंथः—विविधज्ञान वि. पु. ३३. पृ. १११; ठाणें ग्याझे; रसेल व हिरालाल; सेन्सस ऑफ इंडिया (१९११), वॉले पु. ७. ]

**धनपाल**— एक जैन पंडित. यानें ऋषभपंचाशिका नामक पुस्तक लिहिलें. तें जर्मन ओरि. सोसायटीच्या मासिकांत क्लैटनें प्रसिद्ध केलें आहे. धनपालाचें दुसरें पुस्तक तिलकमंजरी नांवाचें आहे. पण तें अद्याप उपलब्ध नाहीं. काव्यालंकार नामक ग्रंथावर टीका करीत असतां, नामि नामक कवीनें त्या ग्रंथांतून उतारा घेतला आहे. 'पयलच्छी नाममाला' ग्रंथ धनपाल यानें संवत् १२२९ मध्यें लिहिला. तो बुल्हरनें छापून प्रसिद्ध केला आहे. धनपालानें वरील ग्रंथ सुंदरी नांवाच्या त्याच्या बहिणीकरितां लिहिला हा कवि मुंज व भोजराजाचा आश्रित होता. याच्या ग्रंथांवरून असें दिसतें कीं, यानें आपल्या-

सर्व माणसांसुद्धा जैन धर्माची दीक्षा घेतली होती. हेमचंद्रानें याला देशी कोशाचा कर्ता म्हटलें आहे. हा स्वतःस धनवाल (श्लो. २७९) म्हणवितो. [ जर्नल बाँ. रॉ. ए. सो. १८९४; इंडि. अँटि. १८७५; ऑफ्रेटची यादी. ]

**धनवार**—ही जात मुख्यत्वें मध्यप्रांतांत आढळते; हिची एकंदर लो. सं.(१९११) १९२४२ असून तींत १४८६१ हिंदु व बाकीचे वन्य आहेत. धनवार म्हणजे धनुर्धारी; अजूनहि धनुष्यानें केलेल्या शिकारीवर त्यांचा बहुतेक निर्वाह होतो. यांची उत्पत्तिकथा गोंडांप्रमाणें व कुलनामें कवारांप्रमाणें असून,हे आपली भाषा विसरले आहेत; हे छत्तीसगडी हिंदी बोलतात.लग्नांत बाणांचा आहेर करितात, व प्रत्येक घरीं रोज धनुष्याची पुजा करतात. एका वाघिणीनें दोन अनाथ मुलांना आपल्या दुधावर पोसून वाढविलें. पुढें त्या बहिणभावंडांनीं लग्न लाविलें. त्यांनां १२ मुलें झालीं. या मातापित्यांचीं नांवें नागा लोधा व नागी लोधी अशीं होतीं अशी कथा आहे. यांनीं आपल्या प्रत्येक मुलासाठीं १५ दिवसांची वृद्धि पाळल्यानें, सांप्रत या जातींत ५॥ महिने वृद्धीची चाल पडली आहे. वरील १२ मुलांतील करणकोट हा यांचा मुख्य वीरपुरुष होय. या १२ जणांनीं गवळ्यांच्या १२ मुलींशीं लग्नें लाविलीं. त्यांच्यापासून विंझवार, भूमिया, कोरवा, माझी वगैरे पोटजाती झाल्या.

कवार व गोंड यांच्या मिश्रणापासून बहुधा प्रथम हे झाले असावेत, मागाहून इतरांच्या रक्तांचेहि मिश्रण यांच्यांत झालें. हे गाईस देव समजून ती मेल्यास आपल्या घरांतील मडकीं फोडून टाकतात; हे गोमांस भक्षण करीत नाहींत. मात्र दसवार नांवाची यांची एक पोटजात रानगोमांस खाते.

यांचीं लग्नें स्थानिक हिंदु पद्धतीनें होतात. वरात घरीं आल्यावर वधूनें स्वयंपाक करून वरानें तो स्वहस्तें ज्ञातीस वाढावयाचा. पाट लावणें हलकें मानतात. या दिवशीं ज्ञातीस वकऱ्याची सागोती व दारू पाजतात. बायकोनें व्यभिचार केल्यास ज्ञातिभोजनानें ती शुद्ध होते व तिचा जारहि (मात्र तो गोंड, रावत किंवा कवार पाहिजे) या प्रायश्चित्तानें धनवार बनतो. काडी मोडण्यास नवऱ्याची परवानगी अवश्य पाहिजे. मूल झालें म्हणजे ६ व्या दिवशीं सर्व पुरुष क्षौर करतात. हे लोक प्रेतें पुरतात. सुतकी मंडळी तीन दिवस स्वयंपाक न करतां शेजारीपाजारी बिनमिठाचें अन्न त्यांनां घालतात. यांचे मुख्य देव ठाकुरदेव व दुल्हादेव; पहिला शेतीचा व दुसरा कुळाचा. मय्या (माता) आंधियारी देवीची पूजा माघ वद्यांत करतात. अवेत शेळीचा बळी दिला देतात. या देवीची मुलगी मसवासी ही बाऱ्या धनवारांची माता असून ही डायनाप्रमाणें शिकारदेवता आहे. जादुटोण्यावर यांचा फार विश्वास आहे. जादूगार पुरुषास वैगा व स्त्रीस टोनी म्हणतात. यांत टोनी हिची जादू बैगावरहि चालते. हे जादूत्यांच्या चेहऱ्यापोशाखावरून ओळखूं येतात. कवारांनां धनवार करून घेतात; तसेंच गोंड, विंझवार स्त्रीचा व धनवारचा संबंध झाल्यास तिलाहि जातींत सामील करतात. जातींतील सरपंच या जोडप्यांनां बकऱ्याचें रक्त पिण्यास देतात व हा विधि पार पाडतो.

गाय किंवा मांजर यांची न जाणून हत्या झाली, घरच्या बैलाचें नाक किंवा कान न कळत तुटला, त्याच्या जखमेंत किडे पडले, सरकारी अधिकाऱ्यांखेरीज इतरांच्या हातचा मार मिळाला, बायकोनें नवऱ्याचें नांव घेतलें वगैरे गोष्टींमुळें बहिष्कार पडतो; मात्र जातजेवणानें तो संपतो. शिवाय नरसिंगनाथाची यात्रा करावी लागते आणि सोनें बुडविलेलें पाणी बांबूच्या नळकांड्यांतून प्यावें लागतें. गोंदणें हें पवित्र मानलें आहे; गोंदलेल्या माणसाची व त्याच्या आत्म्याची ताटातूट होत नाहीं असा समज आहे. हे बिन गोंदलेल्या व्यक्तीच्या हातचें पाणीहि पीत नाहींत.

मृत मनुष्य आपल्याच वंशांत पुन्हां पुन्हां जन्मतो अशी यांच्यांत समजूत असल्यानें, मूल झाल्यावर तें कोणाचा अवतार हें प्रथम ठरवून त्याप्रमाणें त्यास आजाचें, काकाचें वगैरे नांव देतात; त्यांत लिंगभेद मानीत नाहींत; म्हणजे मुलास तो आत्याचा अवतार समजून त्यास तिचें नांव(कौशी, घाशी वगैरे) देतात तर मुलीस चुलत्याचा अवतार समजून पुरुषाचें नांव (भाल्या, वाल्या वगैरे) देतात. शिकार हा यांचा मुख्य धंदा असून, हल्लीं हे शेतकी व मजुरी करतात. हे चटया विणणें हलकें मानतात. [ रसेल व हिरालाल. ]

**धनसिरी**—नागा टेंकड्यांत उगम पावलेली आसामांतील एक नदी, ब्रह्मपुत्रा नदीस जाऊन मिळते. नदीच्या उगमाकडील वरच्या प्रदेशांत दाट जंगल आहे. वोकाजान येथें धनसिरी नदीवर आसाम–बंगाल रेल्वेचा पूल आहे. निरनिराळ्या ५ ठिकाणीं तरी आहेत.

**धनाजी जाधव आणि त्याचा वंश**—लुखजी जाधव याचा पुत्र जो अचलोजी त्यास निजामशहा यानें ठार मारल्यावर त्याचा मुलगा संताजी याचें संगोपन जिजाबाईनें केलें. कनकगिरीच्या लढाईंत हा मेला. त्याला शंभुसिंग म्हणून पुत्र होता. त्याचा मुलगा धनाजी.याचा जन्म स.१६५० च्या सुमारास झाला. हा प्रथम प्रतापराव गुजराच्या हाताखालीं होता. उंबराणीच्या लढाईंत तो प्रथम पुढें आला. पुढें (१६७४) धनाजी हा हंबीरराव मोहिते याच्या हाताखालीं गेला. विजापूरचा सेनापति अबदुलकरीम याशीं झालेल्या नेसरीच्या लढाईंत यानें विशेष शौर्य दाखविल्यामुळें यास बढती देण्यांत आली (फेब्रु.) साबनूरच्या लढाईंत यानें हुसेनखान मायणा याचा पुरा मोड केल्या तेव्हां शिवाजीनें याची तारीफ केली (१६७९).

संभाजीचा वध झाल्यावर आतां पुढें काय करावें हें ठरविण्याकरितां जी मुख्य मुख्य मराठे मंडळी रायगडावर जमली त्यांत धनाजी जाधव होता. त्यानें साताऱ्यास सर्जाखानाचा पराभव केला.

पुढें ( १६९० ) धनाजी राजारामाबरोबर जिंजीस गेला. तेथें त्यानें इस्मायलमकाचा पराभव केला, यावेळीं म्हाद जी नाईक पानसंबळ याच्या मृत्यूचें वर्तमान समजल्यामुळें संताजी घोरपडे यास सेनापति नेमण्यांत येऊन त्याच्याबरोबर धनाजीस जयसिंगराव ही पदवी देऊन महाराष्ट्रांत पाठविण्यांत आलें ( १६९० ).

महाराष्ट्रांत १६९२ सालीं संताजीच्या वांईकडील व गोदेच्या उत्तरतीरींच्या मोहिमांत बरोबर धनाजी होतो. धनाजीच्या सैन्यांत संताजीच्या इतकी चांगली शिस्त नव्हती पण तो आपल्या लोकांनां अधिक प्रिय होता. इकडे धनाजीनें अमात्य व सचिव यांच्याबरोबर पन्हाळा घेतला.

धनाजी हा संताजी घोरपड्याबरोबर महाराष्ट्रांतून पुन्हां कर्नाटकांत आल्यावर ( १६९३ ) पुढील वर्षे तो संताजीबरोबरच होता. परंतु शेवटीं शेवटीं या दोन्ही सरदारांमध्यें वैमनस्य उत्पन्न होऊन धनाजीनें संताजीच्या सैन्यांतील कांहीं लोकांस फितविलें, व एके दिवशीं विजापुराजवळ संताजीवर एकदम हल्ला केला. संताजी आपला जीव वांचवून कसा तरी तेथून निसटला, तेव्हां कांहीं लोकांनां त्याच्या पाठलागार्थ पाठवून, व कांहींनां सातान्यास राजारामाकडे रवाना करून धनाजी अर्ध्या लोकांसह (सुमारें १०००० फौज) झुल्फिकारखानाचा समाचार घेण्याकरितां पुन्हां कर्नाटकांत आला.यापुढें दोन वर्षे धनाजीची व झुल्फिकारखानाची कर्नाटकांत झटापट चालू होती. त्यावेळीं व त्यानंतर धनाजीनें कर्नाटकांत व महाराष्ट्रांत सर्व बाजूस आपली फौज पसरून मोंगलांशीं चाललेल्या युद्धांत बरेच नांवाजण्यासारखे पराक्रम केले ( १७०३-०५ ) त्यामुळें औरंगझेब फार चिडला परंतु, त्याच्यानें मराठ्यांचा पुरा पराभव होईना.

औरंगझेब महाराष्ट्रांतील किल्ले घेण्यांत गुंतला होता. तेव्हां धनाजीनें आपली बायकामुलें वाघिणगिरें येथें आणून ठेविलीं होतीं. इ. स. १७०५-०७ च्या सुमारास औरंगझेबानें तेथील गडीस वेढा दिला, तेव्हां धनाजी मोंगलांच्या सैन्याभोंवतीं घिरट्या घालून त्यांनां त्रास देत होता. धनाजीचा मोंगलांच्या शिपायांस इतका धाक बसला होता कीं, तो असलेला दृष्टीस पडतांच ते पळावयास लागत. अशी एक आख्यायिका आहे कीं, आपल्या घोड्यास पाणी पाजून दचकून जेव्हां घोडा पाणी पीत नसे तेव्हां मोंगल स्वार 'तुला पाण्यांत धनाजी दिसतो कीं काय?' असें घोड्यास विचारीत. मध्यंतरीं ( १७०७ ) घोरपड्यांनीं ताराबाईच्या मुलखांत लुटालूट केल्यामुळें धनाजी त्यांच्या पारिपत्यास गेला असतां झुल्फिकारखान घोरपड्यांच्या मदतीस आला, व त्यानें धनाजीस कृष्णेपार काढून दिलें. यानंतर मोंगलांचें सैन्य महाराष्ट्रांतून निघून गेल्यावरोबर धनाजीनें पुण्याचा फौजदार लोदीखान याचा पराभव करून चाकणचा किल्ला परत घेतला.

यानंतर मोंगलांच्या छावणींतून शाहूची सुटका होऊन तो महाराष्ट्रांत आला, तेव्हां ताराबाईकडून धनाजी जाधवाची त्याच्यावर रवानगी झाली होती.परंतु धनाजीनें शाहू हा तोतया नसून खरा आहे असें ओळखून तो त्याला मिळाला.पुढें शाहू गादीवर बसला तेव्हां त्यानें धनाजीस सेनापतीच्या जागीं कायम केलें, व त्याच्याकडे कांहीं जिल्ह्यांचा वसूल गोळा करण्याचें काम दिलें ( १७०८ ). धनाजी हा अखेरपर्यंत कोल्हापूरच्या विरुद्ध शाहूकडेच राहिला. कोल्हापूरकर मात्र त्याला फोडण्याचा प्रयत्न करीत होते.

पुढल्या वर्षी धनाजी हा कोल्हापूरकरावरील रांगण्याच्या मोहिमेवरून परत येत असतां वारणा नदीच्या कांठीं वडगांव येथें मरण पावला ( मे १७१० ). त्याला कित्येक दिवसांपूर्वी झालेली एक जखम पुन्हां वाहूं लागल्यामुळें तो बरेच दिवसपर्यंत आजारी होता. या आजारांत त्यानें वसुलाच्या कामाकरितां बाळाजी विश्वनाथ याची नेमणूक केली होती.

धनाजीची स्त्री गोपिकाबाई ही सती गेली. धनाजीस दोन बायका होत्या. पहिलीस संताजी व दुसरीस चंद्रसेन आणि शंभुसिंग असे पुत्र होते. पैकीं चंद्रसेन हा पुढें सेनापति झाला. शिवाजीच्या तालमींत तयार झालेला धनाजी हा शाहूच्या कारकीर्दीत शेवटचाच पुरुष होय. धनाजी हा सत्तेच्या जोरावर लोकांचे वतनी हक्क दडपण्यास कमी करीत नसे हें मसूर व कन्हाडच्या देशमुखांच्या तत्कालीन तंट्यावरून दिसून येतें.

**चंद्रसेन जाधव.**—हा धनाजीचा मुलगा.धनाजी आजारी असतांना बाळाजी विश्वनाथ हा त्याचा कुल कारभार पाहूं लागला, तेव्हां त्याच्या मनांत बाळाजीविषयीं मत्सर उत्पन्न झाला. वास्तविक चंद्रसेनाचा ओढा ताराबाईकडे होता व तो आंतून तिला ( शाहूच्या विरुद्ध ) फितूरहि झाला होता.

धनाजीच्या मरणानंतर चंद्रसेनाकडे सेनापतित्व आलें. इ. स. १७१२ मध्यें मोगलाईतून चौथ, सरदेशमुखी व घासदाणा हे हक्क वसूल करण्याकरितां चंद्रसेनाची योजना झाली होती. या प्रसंगीं वरील हक्कांपैकीं सरदेशमुखी गोळा करण्याकरितां चंद्रसेनाबरोबर बाळाजी विश्वनाथाची नेमणूक झाली असल्यामुळें बाळाजीविषयीं चंद्रसेनाचा द्वेषाग्नि अधिकच भडकला. त्यानें क्षुल्लक कारणावरून ( हरणाचा तंटा ) कुरापत काढून बाळाजीचा पाठलाग केला व ( शाहूच्या आज्ञेवरून ) त्यास पांडवगडामध्यें आश्रय मिळाला असतां चंद्रसेनानें त्या किल्ल्यास वेढा दिला, व बाळाजीस आपल्या हवालीं करण्याविषयीं शाहूजवळ उर्मटपणानें मागणी केली. शाहूनें हैबतराव निंबाळकरास जाधवाचें पारिपत्य करण्यास पाठविलें. निंबाळकरानें जेऊरजवळ चंद्रसेनाचा पराभव केला; तेव्हां तो उघडपणें कोल्हापूरकर संभाजीकडे गेला; परंतु पुढें लवकरच दक्षिणेंत निजामउल्मुल्क आल्यावर त्यानें निजामाच्या पदरीं चाकरी धरली व शाहूचा पाडाव करण्याची खटपट चालविली. बेदरच्या पूर्वेस २५ मैलांवर भालकी येथें बरीच मोठी जहागीर निजामानें जाधवास देऊन त्यास आपल्या पदरीं ठेविलें. मराठेशाहीस निजाम

यापुढें त्रास देईल तो याच्याच वळावर. चंद्रसेनास शाहूनें वळवून घेतलें असतें तर निजामाचा कायमचा त्रास मिटला असता. इ. स. १७१६ मध्यें सय्यदबंधु हुसेन अल्लीखान याचा दिवाण महकमसिंग व खंडेराव दाभाडे यांच्या दरम्यान अहमदनगराजवळ जी लढाई झाली तींत चंद्रसेन मोंगलांकडून लढत होता.

इ. स. १७२० मध्यें निजामउल्मुल्क हा मोंगल बादशहापासून स्वतंत्र होण्याच्या उद्देशानें दक्षिणेंत आला तेव्हां चंद्रसेन जाधव त्याच्या सैन्यास जाऊन मिळाला. बाळापुरच्या लढाईंतहि चंद्रसेन निजामाकडून लढला. स. १७२५ त तर चंद्रसेनानेंच निजामास शाहूविरुद्ध उठविलें होतें.

इ. स.१७२७–२८ मध्यें निजाम व बाजीराव यांच्यामध्यें जें युद्ध झालें, त्यांत चंद्रसेन लढत होता. त्यानेंच संभाजीस शाहूकडे राज्याचा हिस्सा मागण्यास चिथविलें होतें. त्यानें १७३९ सालीं संभाजीचा पक्ष घेऊन बीडकडे धुमाकूळ घातला. हा १७५१ सालीं मरण पावला.

रा म चं द्र जा ध व.—हा चंद्रसेनाचा मुलगा. इ. स. १५५६ त हैद्राबादचा नवाब सलाबतजंग यानें रामचंद्र जाधव व रावरंभा निंबाळकर यांनां बुशीच्या पाठलागार्थ त्याच्या मागोमाग पाठविलें होतें परंतु बुशी आपलें फारसें नुकसान न होऊं देतां हैद्राबादेस जाऊन पोंचला. यानंतर बुशीनें याला आपल्याकडे वळवून घेतल्यामुळें यानें मच्छलीपट्टणाहून बुशीच्या मदतीस हैद्राबादेस जी कुमक येत होती तिला मुळींच अडथळा केला नाहीं.

स. १७५६ च्या अखेरीस बुशी आपल्या पूर्वकिनाऱ्यावरील जहागिरीकडे निघून गेल्यावर, बुशीकडे जी कुमक आली होती, तिला अडविण्याच्या कामीं रामचंद्र जाधवानें जी हयगय केली, तिजबद्दल त्याचें पारिपत्य करण्यासाठीं,सलाबत जंगानें त्याजवर स्वारी करून, त्याची बहुतेक जहागीर त्याजकडून काढून घेतली. बाह्यतः मात्र, रामचंद्र जाधवानें कराराप्रमाणें चाकरीस ठेवावयास पाहिजे तेवढी फौज ठेविली नाहीं, असें या स्वारीचें कारण दाखविण्यांत आलें होतें. उदगीरच्या लढाईंत हा निजामाकडेच होता. स. १७६१ मध्यें निजामअल्लीनें गोदावरीतीरीं असलेल्या कायगांव टोकें नांवाच्या गांवातील हिंदु देवळें उध्वस्त केल्यावरून, रामचंद्र जाधव मोंगलांनां सोडून मराठ्यांच्या पक्षास मिळाला.

इ. स. १७६२ त राघोबादादानें याला सेनापतीचीं वस्त्रें दिलीं. परंतु सेनापति या नात्यानें गुजराथप्रांतहि आपल्या ताब्यांत देण्यांत येईल अशी जी यास आशा होती, ती सफळ न झाल्यानें हा लवकरच पुढें पुन्हां निजामअल्लीकडे गेला. रामचंद्र हा स. १७६९ त निजामकडून मारला गेला. त्याचा पुत्र खाशेराव यास भालकीची जहागीर मिळाली होती. टिप्पूबरोबरच्या एका लढाईंत ठार झाल्यावर (१७९१) ही जहागीर खालसा झाली. सांप्रत याचा वंश निजामहींत नांदत आहे. [ जाधवांची कैफियत; डफ, राजाराम व शाहु यांच्या बखरी; खाफीखान; पेशव्यांची बखर. ]

**धनुर्मास**—धनराशींत सूर्य असतो तो काल. या मुदतींत सकाळीं सूर्योदयाबरोबर त्याला तूपखिचडी, गुळाची पोळी यांचा नैवेद्य अर्पण करण्याची चाल आहे. यावेळीं धनसंक्रांत असते.

**धनुर्वात**—या रोगाचें कारण विशिष्ट प्रकारचे जंतू हे होय व ते बहुधा मातींत असतात. शेतांतील अगर बागेंतील थोडी माती जनावरांच्या शरीरांत त्वचेखालीं टोंचली तर बहुधा धनुर्वात होतो असे प्रयोग केले आहेत. कोणी मनुष्य पायगाडीवरून अगर दुसऱ्या कोठें पडून त्याचें अंग खरचटलें, किंवा बोटास लागलें, अगर अनवाणी चालतांना ठेंच लागली तर जखमेंत जंतुप्रवेश होऊन दांतखिळी बसून पाठ ताठणें हें मुख्य लक्षण दिसून येण्यास सुरवात होते. सुईनें, टांचणीनें झालेली किती बारीक जखम असली किंवा हाड मोडून जखमेंतून दिसत आहे इतकी मोठी असली तरी जर तिला शेण, माती, धुरळा याचा संसर्ग होऊन, अगर उपजलेल्या मुलाच्या नाळीवाटेहि जंतुप्रवेश होऊन धनुर्वात होतो. बाळंतपणानंतर लागलीच, किंवा शस्त्रक्रियेनंतर अगर सुईनें क्विनाईन टोंचल्यावर स्वच्छतेच्या अभावीं हा रोग होतो. पूर्वी हा रोग आपोआपहि होतो अशी समजूत होती. पण जखम कळेल न कळेल इतकी असल्यामुळें ही समजूत बळावली असावा. परंतु आतां या समजुतीस कोणी थारा देत नाहीं. चांगली बळकट सशक्त माणसें विशेषतः या रोगास बळी पडतात.

ल क्ष णें.—दांतखिळी बसून मान व पाठ ताठ होते व त्यामुळें असह्य वेदना होतात. त्याचें कारण त्या भागांतील स्नायू बरच्यावर वाताचा वेग येऊन आकुंचन पावतात. कुचल्याच्या सत्त्वाचा विषार झाला असतांहि हुबेहूब अशीच लक्षणें होतात. पण मुख्य फरक हा कीं, धनुर्वातामध्यें स्नायू सदा ताठलेले असून वाताचा वेग येईल तेव्हां त्यांत ताठरपणाची व वेदनाची आणखी भर पडते. पण विषारामध्यें वेदनांचा वेग अगर झटका येऊन तो निघून गेल्यावर मध्यंतरीं शरीरस्नायू नेहमींप्रमाणें मऊ व शिथिल असतात. दुःखाची गोष्ट ही कीं, इतक्या परम वेदना होत असूनहि मेंदु व संज्ञाशक्ति शाबूत असल्यामुळें आपले स्नायू यंत्राच्या मगरमिठींत सांपडल्यामुळें आपला शक्तिपात होत जाऊन आपला मृत्यु समीप येत आहे याची पूर्ण जाणीव बिचाऱ्या रोग्यास असते. उष्ण कटिबंधांत हा रोग विशेष झपाट्यानें होतो, तो इतका कीं सकाळीं हातांत कांच शिरून जखम व्हावी व धनुर्वात होऊन रात्रीं रोगी मरावा; इतक्या तीव्रतेचे हे भेद क्वचित येथें पहाण्यांत येतात. याचें कारण येथील माती गरम असल्यामुळें तींत जंतुवृद्धि जशी झपाट्यानें होते तशी ती थंड प्रदेशांतील मातीमध्यें होत नाहीं.

ह्या रोगाचे जंतू जखमेंत शिरल्यावर फक्त तेथेंच वस्ती करितात. इतर कांहीं जंतूंप्रमाणें रक्तांत प्रवेश करीत नाहींत. मात्र त्यांपासून तेथें असें जलाल विष उत्पन्न तयार होतें कीं तें मज्जातंतूंच्या मार्गानें पृष्ठवंशरज्जूमध्यें प्रवेश करून शरीरांतील सर्व सिद्ध स्नायूंना त्यांतील मज्जातंतूमुळेंच वायूचे झटके येतील अशी बाधा करतें. ही विषबाधा इतकी त्वरित होते कीं, जखम झाल्यावर तो अवयव तोडण्याच्या पूर्वीच पृष्ठवंशापर्यंत विषसंसर्ग पोंचलेला असतो व त्यापासून विषबाधा न होण्याची आशा बिलकूल नसते.

सकाळीं रोगी जागा होतांना त्यास पाठींत चमत्कारिकच वाटूं लागतें. आपली मान रात्रीं निजल्यावर वारा बसून ताठली आहे अशी समजूत प्रथम होते, त्याबरोबरच थोड्या वेदना तेथें सुरू होतात. नंतर तोंड उघडतांना कांहीं अडचण पडत आहे असेंहि त्याच्या ध्यानांत येऊन आपणास जबडा उघडून " आ " करण्यास पंचाईत पडत आहे याची जाणीव त्यास होते. ओष्ठयुगुलाचे दोन्ही कोंपरे मागें व खालीं सरकून ताठल्यामुळें चेहऱ्यास विकृत हास्य केल्याचें स्वरूप येतें. पुढें दातखिळी इतकी गच्च आवळून बसते कीं, ती उघडून पोटांत कांहीं पाण्याचा अगर दुधाचा घोंट घालणें मुष्कीलीचें होतें. म्हणून खाण्याचे पातळ पदार्थ चमच्यानें गालाच्या आंतील मार्गेत भरवले म्हणजे शेवटच्या दाढामार्गें फट असते तीकडून अन्ननलिकेंत तें अन्न जातें. यानंतर अन्ननलिकेचे स्नायु विषग्रस्त झाल्यामुळें पातळ पदार्थ गिळण्यास फार अडचण पडूं लागते. पोट, उदर यांचे स्नायू ताठल्यामुळें त्यावर हात ठेवून पाहिलें असतां आपण एखाद्या फळीवर हात ठेविला आहे किंवा काय असा भास होतो. इतकें काठिण्य स्नायूंना येतें. हातापायांच्या स्नायूंनांहि असेंच होतें व धाताचा झटका आला म्हणजे त्यांत वांब अगर गोळा उत्पन्न होतो, व त्या गोळ्याची वेदना पराकाष्ठेची असते. यानंतर छातीच्या स्नायूंनांहि ताठरपणा येतो. म्हणजे मग शरीरांतील सर्व स्नायू अहोरात्र ताठलेले राहून जेव्हां जेव्हां धनुर्वाताचे वेदनायुक्त झटके येतात तेव्हां त्या ताठरपणांत अधिक भर पडून रोग्याचे फार हाल होतात. कधीं तर वेदना इतक्या जोराच्या येतात कीं रोगी धनुष्याप्रमाणें पुढें किंवा मागें किंवा उजव्या, डाव्या बाजूला त्यामुळें वांकडा होतो व म्हणूनच या रोगाचें धनुर्वात हें नांव पडलें आहे. झटक्याचा जोर इतका असतो कीं एखादेवेळीं एखादा स्नायू त्यामुळें तुटतोहि. झटका आला असतांना रोग्यास वेदना असह्य होऊन अंगाला घाम सुटतो व तो निघून गेला कीं रोगी अगदीं थकून मृतप्राय पडतो. छातीचे स्नायू ताठल्यामुळें श्वसनक्रियाहि नीट चालत नाहीं व म्हणून त्याचा जीव फार गुदमरतो.

**सा ध्या सा ध्य वि चा र.**—इजा अथवा जखम झाल्यानंतर एक आठवड्याच्या आंत जर वातलक्षणें दिसून येण्यास आरंभ झाला तर रोग प्रायः असाध्यच आहे असें मानावें. दहा दिवसांनंतर लक्षणें सुरू झालीं तरीहि वरीलप्रमाणेंच रोग असाध्य समजण्यास हरकत नाहीं. परंतु जखम होऊन पंधरा दिवस, तीन आठवडे किंवा अधिक काळ लोटला असेल तर रोग साध्य आहे अशी आशा करण्यास हरकत नाहीं. सूतिकावस्था, गर्भपात, मोठाल्या जखमा, छाती, पोट यांवरील जखमा यानंतर झालेला धनुर्वात असाध्य असतो. हातापायांवरील जखमामुळें झाल्यास तो साध्य असतो.

**उ प चा र व शु श्रू षा.**—पहिलें काम जखम कोठें असेल तिचा तपास करून जंतुघ्न औषधानें तिचें शुद्धीकरण करणें हें होय. कारण या भयंकर जंतूवरोवर जखमेंत पूयवर्धक जंतूंचें मिश्रण असल्यावर जें विषसंवर्धन होईल तें अधिक बेसुमार होईल यांत शंका नाहीं. हें शुद्धीकरण यथाशास्त्र करण्यास अडचणीची जागा असेल तर तेथें चाकूनें जागा वरचेवर कापून अगर, डागून किंवा शुद्ध कारबॉलिक ॲसिडनें भाजून काढावी. नंतर रोग्यास अंधार असलेल्या जागीं स्वस्थपणें निजवून ठेवावें. त्याच्या भोंवतीं दारें, खिडक्या खडखडा वाजवून, आरडाओरड करून, एकदम लख्ख उजेड करून त्यास फटफट केल्यानें झटके अधिक वेळां येतात, व त्यांचा जोरहि प्रखर असतो. जोर फार असल्यास रोग्याच्या मानानें त्यास मार्फिया टोंचून घालावा. अगर झटक्याच्या वेळीं क्लोरोफार्म हुंगवावा. जोर फारच असेल तर तो रोज दोनदां तीनदांहि हुंगविण्याखेरीज गत्यंतर नसतें. गळ्यावाटें पातळ अन्न अगदींच जात नसल्यास गुदद्वारावाटें पातळ पदार्थ पिचकारीनें घालून रोग्याचें पोषण करावें. या रोगांत लस टोंचून घालण्याचा उपयोग होतो असें अलीकडे अनुभवास येऊं लागलें आहे. लस त्वचेखालीं अगर स्नायूंत टोंचतात. दोन्ही प्रकारानें एकदम टोंचणेंहि उपयुक्त असतें व तें लक्षणांत सौम्यता येईपर्यंत रोज सुरू ठेवावें. जखमेजवळील स्नायूंत टोंचावें. याशिवाय झटके शमन करणारीं पुढील औषधें सौम्य रोग असल्यास व मोठ्या प्रमाणांत दिलीं तर उपयुक्त होतात. तीं औषधें (१) क्लोरल हैड्रेट (२०–४० ग्रेन), (२) पोटॅशियम ब्रोमाइड (६० ग्रेन). हीं दोन्ही औषधें मिश्र करून दर ४–६ तासांनीं द्यावींत. (३) पोटांत अगर गुदद्वारावाटें क्लोरेटोन (१०–१५ ग्रेन) ३०–४० ग्रेन तिळाचे तेलांत विरघळवून पिचकारीनें घालावें. (४) त्याचप्रमाणें पॅराल्डीहाइड औषधाचा द्रव करून (३–५ ड्राम) त्याचा बस्ति द्यावा. जरूर तर झोंपेसाठीं मार्फियाची पिचकारी वरचेवर द्यावी. पण त्यापेक्षां वरील झटके शमन करणारीं औषधेंहि झोंप आणतातच. तीं औषधें दिलीं तरी लस टोंचून रोगचिकित्सा करण्याचें रहित करूं नये.

**धनुर्वेद**—भारतीय युद्धकलेचें स्वरूप किती प्राचीन आहे ही गोष्ट ' धनुर्वेद ' या संज्ञेवरूनच सहज कळणार आहे. "गायनं पंचमो वेदः" ह्या सुप्रसिद्ध वचनांत वर्णिलेल्या गायनकलेप्रमाणें युद्धकला ही देखील अत्यंत प्राचीन काळीं वेदवाङ्मयांत समाविष्ट झाली. हा यजुर्वेदाचा ७५

आहे व त्या वेदाप्रमाणें ह्याहि ब्रह्मदेवाच्या दक्षिणमुखांतून निघाल्याची कथा आहे.

रथ, गज, अश्व या वहानांवर आरूढ होऊन त्याचप्रमाणें पायींच, लढणाऱ्या योद्धांच्या चार प्रकारांवरून धनुर्वेद "चतुष्पाद" असल्याचें वर्णन पुराणांतरीं सांपडतें. ह्या धनुर्वेदांत शस्त्रें, अस्त्रें युद्ध करण्याचे प्रकार, वाहनें इत्यादि अनेक गोष्टींचें विवेचन आहे.

धनुर्वेद हा पांच अंगांनीं युक्त आहे व हीं युद्धाचीं पांच अंगें पुढीलप्रमाणें होतः—(१) यंत्रमुक्त, (२) पाणिमुक्त, (३) मुक्त संधारित, (४) अमुक्त, व (५) बाहुयुद्ध.

ह्याचप्रमाणें (१) शस्त्रसंपत्ति व (२) अस्त्रसंपत्ति यांच्या भेदामुळें युद्धाचे दोन प्रकार होतात, व पुन्हां (१) ऋजुत्व (सरळपणा) व (२) मायावित्व (गनिमी कावा) यांच्या भेदामुळें युद्धाचे आणखी दोन प्रकार होतात. या वरील पांच प्रकारांपैकीं यंत्रमुक्त युद्धांत धनुष्य, गोफण वगैरे साधनांचा उपयोग केला जातो. मोठमोठ्या शिळा, तोमर (लोखंडी गदा) इत्यादि हत्यारें ज्यांत उपयोगिलीं जातात तें पाणिमुक्त युद्ध होय. 'मुक्त संधारित' नामक युद्धांत शस्त्रें जरी शत्रूंनीं अंगावर फेकलीं तरी त्यापासून आपला बचाव करतां येतो. खड्ग, तलवार वगैरेंनीं खेळावयाचें युद्ध अमुक्त होय, व ज्यामध्यें कोणत्याच आयुधाचा उपयोग न करितां केवळ कुस्ति करावयाची असते, तें बाहुयुद्ध होय. ह्यांपैकीं धनुष्यांनीं केलेलीं युद्धें उत्तम, प्रास वगैरेंच्या साहाय्यानें केलेलीं मध्यम होत व खड्गादिकांनीं केलेलीं हलक्या दर्जाचीं व बाहुयुद्धें तर अत्यंत कनिष्ठ दर्जाचीं होत. धनुर्वेद शिकण्यासाठीं तच्छास्त्रपारंगत अशा विद्वान ब्राह्मण गुरुपाशीं जाऊन अध्ययन केलें पाहिजे. परंतु राष्ट्राच्या संकटकालीं शूद्रांनीं स्वतःच युद्धकलेचें शिक्षण घेऊन राजास मदत करण्यास प्रत्यवाय नाहीं. ह्यानंतर धनुष्य कसें धरावें, बाण कसा लावावा, प्रत्यंचा कशी ओढावी; बाण सोडतांना एकंदर शरीर कसें असावें यासंबंधीं सूक्ष्म नियम सांगितले आहेत. त्याचप्रमाणें खड्ग, पाश, शूल, तोमर, गदा, मुद्गर, भिंदिपाल, लगुड, वज्र, पट्टिश, कृपाण, क्षेपणी (गोफण) वगैरे आयुधांचीं निरनिराळीं कार्यें सांगितलीं आहेत. रणामध्यें प्रत्येक रथाला तीन तीन घोडे जुंपलेले असावेत व त्यांच्या रक्षणाकरितां तीन धनुर्धारी असावेत असा नियम होता. अशा रीतीनें ह्या शास्त्रांत पारंगत झालेल्या योद्धयास जयश्री हटकून मिळालीच पाहिजे असा त्यावेळीं समज होता. [ अग्निपुराण ]

**धने**—संस्कृत–धान्याक; हिंदी–धना–धनिया. गुजराथी–धना. कानडी, हविजा. धने व कोथिंबीर सर्वत्र प्रसिद्ध आहे. यांचा स्वयंपाकांत, भाजींत, कढींत वगैरे नित्य उपयोग होतो. कोथिंबिरीच्या झाडास जें बीं येतें त्यास धने म्हणतात. धने मसाल्यांत घालतात. हा पदार्थ स्वादिष्ट, थंड व पित्तशामक आहे. धने कोथिंबिरीकरितां सर्वत्र सर्वकाळ पेरितात. मुंबई इलख्यांत या पिकाखालीं दर वर्षी आठ नऊ हजार एकर क्षेत्र असतें. या पिकाची जास्त लागवड खानदेश सातारा जिल्हा व मद्रास इलाख्यांत तिनवल्ली जिल्ह्यांत आढळते. खानदेशांत यांचें स्वतंत्र पीक घेतात आणि पुणें व सातारा जिल्ह्यांत धने भुईमुगांत, मिरच्यांत, श्रावण घेवड्यांत; वटाटे, उडीद, वाटाणा वगैरे पिकांत टाकतात. मध्यप्रांतांत नेमाड, वर्धा व नागपुर जिल्ह्यांत धन्याची लागवड करितात. खानदेशांत खरीप पीक काढल्यावर सर्व गवाळ काढून शेत ४–५ वेळ कुळवून तयार करितात. खत वगैरे फारसें देत नाहींत. बीं दर एकरीं सुमारें ३०–४० पौंड पाभारीनें पेरितात. पुणें व सातारा जिल्ह्यांत उनवड्याला सुमारें एक पौंड बीं लागतें. खरीप पीक आक्टोबरांत व रब्बी जानेवारींत तयार होतें. झाडें काठ्यांनीं ठोकून धने तयार करतात. दर एकरीं सरासरी उत्पन्न ६००–७०० पौंड येतें. स्वतंत्र व मिसळीचें दर एकरी सरासरी उत्पन्न ४०६० पौंड येतें. पिकाला दर एकरी सुमारें ९–१० रुपये खर्च येतो.

**धनोरा**—वऱ्हाड, तालुका जळगांव, जिल्हा बुलढाणें. हें जळगांवच्या नैर्ऋत्येस ६ मैलांवर सुमारें हजार लोकवस्तीचें गांव आहे. येथें एक महासिद्धाचें देवालय असून त्याप्रीत्यर्थ माघ शु. पौर्णिमेस एक जत्रा भरते. सर्प व पिसाळलेला कुत्रा चावलेला मनुष्य येथें बरा होतो अशी आख्यायिका आहे. [ बुलढाणा ग्याझे. ]

**धनोरा जमीनदारी**— मध्यप्रांत, जिल्हा चांदा. हिचें क्षेत्रफळ ९१ चौरस मैल आहे. उत्तरेस रांगी जमीनदारी, पश्चिमेस रांगी आणि दूधमळा जमीनदारी, दक्षिणेस झारपाशा जमीनदारी, पूर्वेस मुरमेगांव आणि औंधी (जिल्हा द्रुग) जमीनदारी. एकंदर खेडीं ३२ पैकीं १७ खेड्यांत वस्ती आहे. ५२ चौरस मैल जंगल असून त्याची पहाणी झाली नाहीं. अलीकडचे दुष्काळ हिला फार भोंवले आहेत. त्यामुळें लोकसंख्या जी सन १८९१ त ४४३२ होती ती सन १९०१ मध्यें २२०४ वर उतरली. उत्पन्न १६०० रु. टाकोळी (खंडणी) १२०६ व इतर कर रु. ६०–८–० आहे. घराणें राजगोंड; जमीनदारी यांना कशी मिळाली याबद्दल त्यांच्याजवळ कागदपत्र नाहींत व ऐतिहासिक महत्त्वाच्या गोष्टीहि कांहीं नाहींत. धनोरा खेड्यांत एक चांगला तलाव असून आणखी दोन तळीं जमीनदारींत आहेत. [ चांदा ग्याझे. भाग ए. १९०९.]

**धन्वंतरि**—(१) विक्रमादित्य राजाच्या सभेंत जीं ९ पंडित रत्नें होतीं त्यांतील हा एक कविरत्न होता. हा महाविद्वान व पप्रहस्ती, असा नामांकित वैद्य होता.

(२) समुद्रमंथनानंतर त्यांतून अमृताचा कलश घेऊन निघालेला आयुर्वेदाचा प्रवर्तकाचार्य.

**धमणार**—इंदूर संस्थानांतील एक खेडें. येथें बौद्ध पद्धतीचीं व हिंदु पद्धतीचीं लेणीं कोरलेलीं आहेत. त्यांत कांहीं राहाण्याच्या जागा, कांहीं 'विहार' व कांहीं चैत्य (दिवाणखाने) आहेत. चौदा गुहा महत्त्वाच्या व पहाण्यालायक

आहेत. पैकीं 'बडी कचेरी' व 'भीमाचा बाझार' हीं अत्युत्तम आहेत. बडी कचेरींत एक चैत्य असून त्यांत स्तूप आहे. भीमबाझारांत विहार व चैत्य दोन्हींहि आहेत. एकांत मरणोन्मुख बुद्धाची मूर्ति काढली आहे. ५ व्या ते ७ व्या शतकाच्या दरम्यानचें हें काम असावें असा अंदाज आहे.

ह्याच्या उत्तरेस हिंदु पद्धतीचीं लेणीं आहेत. मध्यभागीं एक मोठें लेणें व भोंवतीं सात लहान लेणीं आहेत. तीं दिसण्यांत साध्या देवळांप्रमाणेंच दिसतात. मुख्य देवालय मूळ विष्णूचें असून हल्लीं विष्णूच्या मूर्तीच्या पुढें एक शिवलिंग स्थापलें आहे. बरोली येथील देवालयाशीं असलेल्या साम्यावरून हें ८ किंवा ९ व्या शतकांत बांधलें असावें, असा फर्ग्यूसन साहेबाचा अंदाज आहे व तेथील कांहीं शिलालेखावरूनहि हा अंदाज बरोबर असावा असें वाटतें. अशाच तऱ्हेचीं लेणीं पोलादनगर, खोलवी, अवर, बेनैगा, हातिगांव व रामगांव येथें आहेत [कनिंगहॅम—आर्कि. सर्व्हे. ऑफ इंडिया.]

**धमतरी, तहशील.**—मध्यप्रांत, छत्तिसगड डिव्हिजन. रायपूर जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्रफळ १५९८ चौरस मैल. ह्यांत ६१७ गांवें असून लो. सं. (१९११) २२१३७२. ह्या तहशिलींतील कांहीं भाग व थोडी लोहारा जमीनदारी द्रुग जिल्ह्याच्या सन्जारी तहशिलींत घेण्यांत आली. महानदीच्या पश्चिम कांठचा प्रदेश सुपीक असून दक्षिण भागांत टेंकड्या व जंगल आहे. ८२८ चौरस मैल जंगल राखीव आहे. [इंपे. ग्याझे. पु. ११.]

**गांव.**—वरील धमतरी तहशिलीचें मुख्य ठिकाण. रायपूरच्या दक्षिणेस ४६ मैल. लोकसंख्या सुमारें दहा हजार. दक्षिण रायपूर जिल्ह्यांतून व बस्तर व कांकेर संस्थानांतून येथें माल येतो. येथें अमेरिकन मिशनचा एक दवाखाना, एक महारोग्यांकरितां रुग्णालय व एक शाळा आहे. म्युनिसिपालिटीची स्थापना १८८१ सालीं झाली असून वार्षिक उत्पन्न (१८९१-१९०१) सरासरी ३५०० रु. आहे. येथें मुलांची व एक मुलींची शाळा आहे. [इंपे. ग्याझे. पु. ११.]

**धमन्या**—प्राण्यांच्या छातीच्या पोकळींत हृदय असतें व त्यांतच शरीरांतील सर्व रक्ताचा सांठा असतो. धमन्या म्हणजे या हृदयापासून शुद्ध रक्त सर्व शरीरभर ज्या नळ्यांतून नेलें जातें त्या लवचिक नळ्या. हृदयापासून एओर्टा व पल्मनरी आर्टरी नांवाच्या दोन मुख्य व मोठ्या धमन्या निघतात व त्यांस शाखा व उपशाखा अशा उत्तरोत्तर बारीक नळ्या दोहोंबाजूंनीं फुटतात; व अति बारीक व त्यापासून अत्यंत सूक्ष्म अशा धमन्यांच्या शाखा पुढें पुढें शाखास अशा उपशाखा त्याप्रमाणें फुटतात. मोठाल्या धमन्यांच्या जागा बहुतेक ठराविक असतात व त्यांस नांवेंहि दिलेलीं असतात परंतु त्यांपासून पुढें ज्या बारीक व सूक्ष्म धमन्या निघालेल्या असतात त्या मात्र हरएक माणसांत त्या अमुकच ठिकाणीं सांपडतात असा नियम नसतो व हरएक प्राण्यामध्यें त्या भिन्न तऱ्हेनें फुटतात. यामुळें शरीरशास्त्रवेत्त्यांमध्यें सुद्धां या बारीक धमन्यांच्या निरनिराळ्या निश्चित स्थानांसंबंधीं वाद सुरू असतात. त्यासंबंधीं मुद्दा येवढाच लक्षांत ठेवावयाचा कीं या बारीक धमन्यांत कांहीं विशेष रचनाचातुर्य असतें अथवा शस्त्रक्रिया केली असतां त्या कापल्या जाऊन त्यापासून मोठा अनर्थ गुदरण्याचा संभव असतो असें कांहीं एक नसतें, व भिन्न भिन्न माणसांत त्या अंमळ भिन्नभिन्न तऱ्हेनें व भिन्न ठिकाणीं उगवतात व त्यांचीं नांवें लक्षांत ठेवण्याइतकें त्यांचें महत्त्व नसतें. नेहमींच्या रीतीनें वाढ होण्यास कांहीं अडथळा आला असतांना नव्या तऱ्हेनें धमन्यांची वाढ होण्यास कांहीं अडचण पडत नाहीं; व असें मज्जातंतु, अस्थि वगैरे शरीरांतील इतर घटकावयवांचें होत नाहीं व म्हणून धमन्यांमध्यें त्या उगवण्यासंबंधीं वैचित्र्य फारच दिसून येतें. इतर प्राणी चार पायावर चालतात व मानवप्राणी उभा चालतो या वेगळ्या परिस्थितीमुळें अर्थात् या दोन्ही प्राण्यांच्या धमन्यांच्या रचनेंत पुष्कळच फरक पडला जातो. चेहरा, डोकें वगैरे विशेष चलनवलन असणाऱ्या भागांत जाणाऱ्या धमन्यांमध्यें नागमोडीची रचना विशेष असते. जेव्हां एखादी महत्त्वाची आणि सर्व प्राण्यांत अचूक त्याच ठिकाणीं सांपडणारी अशी शाखा धमनीपासून निघणें जरूर असतें तेव्हां मोठी धमनी एक अगर दोन बाटोळीं वळणें एकदम घेऊन त्या भागांत घुसते व तेथें तिच्यापासून ती शाखा निघते. अत्यंत सूक्ष्म धमन्यांचीं टोंकें त्यांच्याजवळ येणाऱ्या दुसऱ्या धमन्यांच्या टोंकांशीं जुळतीं होऊन त्यांचें जाळेंच बनतें व पहिल्या सूक्ष्म धमन्यांतील रक्त दुसऱ्या सूक्ष्म धमन्यांत प्रवेश करूं शकतें व यामुळें एखादी मोठी धमनी शस्त्रक्रियेंत अगर अपघातामुळें तुटली असतां अथवा अन्यकारणानें तींतील रक्तप्रवाह बंद झाला असतां त्या बंद होणाऱ्या ठिकाणीं वरील व खालील ज्या धमन्यांच्या शाखा असतात त्या एकदम फुगून मोठ्या होतात व त्यांच्या मार्गें अडलेला रक्तप्रवाह पुढें निर्विघ्नपणें पुन्हां सुरू होतो. यास अपवादात्मक अशा धमन्या म्हणजे प्लीहा व मेंदूच्या खालील भागावर असलेल्या मज्जाग्रंथी यांस रक्ताचा पुरवठा करणाऱ्या होत. या लवक असणाऱ्या धमन्यांशीं आपल्या टोंकांच्या योगानें संयुक्त होत नाहींत. यामुळें त्या धमन्यांत कांहीं विकृतीमुळें अडथळा उत्पन्न झाल्यास मेंदूचा अगर प्लीहेचा तो भाग शुद्ध रक्तहीन होतो. तसेंच माथा, ओष्ट व गळ्यांत घाटीवर थॉयरॉइड पिंड असतो त्यांत शिरणाऱ्या धमन्यांखेरीज शरीराच्या मध्यमार्गी त्वचेखालून जाणाऱ्या धमन्या उजवीकडील डावीकडल्या धमन्यांशीं संलग्न होऊन अथवा याच्या उलट प्रकारें रक्तप्रवाह सुरू रहाण्याचा क्रम शरीरांतील इतर धमन्याप्रमाणें नसतो, ही एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

पल्मनरी धमनी हृदयापासून निघते म्हणून वर सांगितलेंच आहे व तिचें वर्णन श्वासोच्छ्वासेंद्रियें या

फुप्फुसाच्या वर्णनांत सांपडेल; येथें आतां या महाधमनीचें वर्णन संक्षेपानें करूं. ही हृदयाच्या डाव्या कप्याच्या खालील भागापासून निघून वर चढत जाते तेव्हां पुढल्या व उजव्या बाजूस वळते. मग खालीं उतरत वक्षःस्थलांतून मध्यपटलांत शिरून उदराच्या पोकळींतून खालीं उतरते व चवथ्या कटिमण्याच्या मध्यरेषेच्या किंचित् डाव्या बाजूस येऊन तेथें तिच्या उजवी व डावी अशा दोन मोठ्या शाखा होतात (श्रोणि धमन्या). महाधमनी हृदयापासून निघाली म्हणजे प्रथम कमानदार होते. कमानीचा आरंभ तिसऱ्या बरगडीच्या व उरोवंशाच्या डाव्या बाजूकडील संधिस्थानासमोर असतो. पुढें ती उरोवंशाच्या उजव्या बाजूस दुसऱ्या बरगडीच्या संधिस्थानापर्यंत चढते. मग तेथून मार्गे वळून डाव्या बाजूकडे उतरत उतरत पांचव्या पृष्ठमण्याच्या डाव्या बाजूस येते. येवढ्या भागास महाधमनीची कमान असें म्हणतात. या कमानीखालून डाव्या फुप्फुसांत शिरणाऱ्या शिरा, धमन्या व नळ्या असतात व यांपैकीं पल्मनरी धमनीची एक शाखा व ही कमान या दोहोंस चिटकून असणारा असा एक तंतुमय भाग गर्भावस्थेतील एका अवयवाचा शेष म्हणून असतो त्यास नळी म्हणतात. महाधमनीच्या दोन श्रोणिधमन्या जेथें निघतात तेथून खालीं माकडहाडाच्या पुढें एक लांब व बारीक शाखा निघते व ती पुच्छास्थीपर्यंत जाते.

धमन्यांचें वर्गीकरण.—(१) मनुष्य प्राण्यांच्या शरीरांतील धमन्यांचें खालील वर्गीकरण लक्षांत ठेवण्यास सोपें आहे. म्हणजे (१) डोकें, मान, खांदा आणि हात यांतील धमन्या; (२) उदर व छातीच्या पोकळींतील जीं महत्वाचीं व नाना प्रकारचीं इंद्रियें आहेत त्यांकडे जाणाऱ्या धमन्या; (३) छाती व उदर यांच्याभोंवतीं असणाऱ्या मांसत्वचादि वेष्टणास रक्तपुरवठा करणाऱ्या धमन्या, आणि (४) कटिर, मांड्या व पाय यांस जाणाऱ्या धमन्या.

डोकें, मान, हात यांकडे जाणाऱ्या शाखा यांचा आरंभ मागें महाधमनीची कमान सांगितली तिच्या आडव्या भागापासून होतो व त्या तीन आहेत. (अ) अनामिका, (आ) वामग्रैवेयक, (इ) वामाधोजत्रु; त्यांपैकीं अनामिका ही धमनी सर्वांत मोठी व पहिलीच शाखा आहे व ती वर चढत जाऊन गळ्यांत प्रवेश करिते व तेथें तिच्या दक्षिण ग्रैवेयक व दक्षिणाधोजत्रु अशा दोन शाखा होतात. या ग्रैवेयक धमन्या मान व मस्तक यांमध्यें व अधोजत्रु धमन्या दोन्ही हात व खांदे यांत शाखांद्वारें रक्ताचा पुरवठा करतात. ग्रैवेयक धमन्या या दोन प्रकारच्या आहेत. एक उजव्या व एक डाव्या बाजूची. प्रत्येक धमनी कंठाच्या बाजूनें वर चढत जाते आणि कंठमण्याच्या वरच्या कांठाच्या सुमारास तिच्या दोन शाखा होतात. एक बहिर्ग्रैवेयक हीं अनेक शाखांच्या योगानें डोकें व मुखाच्या बाहेरील भागास रक्त पुरविते. कंठ, टाळु, लालापिंड, मानेचे स्नायु, कानामागचा व डोक्याचा मागील भाग, कानापुढचा भाग, वर्णनाक्रियेचे स्नायू, घसा व मेंदूवरील आवरण यांस रक्ताचा पुरवठा ही धमनी शाखांच्या द्वारें करिते दुसरी अंतर्ग्रैवेयक ही कर्णास्थीच्या एका छिद्रांतून मस्तकांत शिरून तिच्या शाखा अनेक व अति बारीक होतात व कांहीं शाखा डोळ्यांत व कानांत पसरतात. हिच्यापुढें अग्र व मध्य अशा दोन शाखा होतात व या दोन्ही शाखा मेंदूच्या आंतलि, बाहेरील, व तळाच्या सर्व महत्त्वाच्या नाजूक भागांस भरपूर रक्ताचा पुरवठा विपुल व असंख्य शाखांच्या द्वारें करतात. उजव्या बाजूच्या अंतर्ग्रैवेयक धमनीच्या सर्व शाखा व सूक्ष्म धमन्या, डाव्या बाजूकडील त्याच धमनीच्या शाखा उपशाखांशीं धमन्यांच्या (म्ह. पुढें संलग्न होणाऱ्या) योगानें मेंदूच्या अग्रभागीं तळाच्या बाजूला संलग्न होतात, येवढेंच नव्हे तर मेंदूच्या तळाच्या पार्श्वभागीं बसिलर नांवाच्या धमनींशीं पोस्टेरिअर कम्युनिकेटिंग नांवाची शाखा आहे तिच्याशीं या दोन्ही अंतर्ग्रैवेयक धमन्या संलग्न होतात व यांच्यायोगानें विलिसचा चक्रव्यूह नांवाचा शिरा व धमन्यांच्या योगानें बनलेला चक्राकार मार्ग मेंदूतलि रक्ताभिसरणास सोईस्कर असा तयार होतो. या मार्गाच्या योगानें उजवीकडील धमन्यांतील डाव्या धमन्यांमध्यें अगर याच्या उलटसुलट कशाहि प्रकारानें मेंदूस रक्ताचा पुरवठा नेहमीं भरपूर होतो. मेंदूस रक्ताचा पुरवठा करणाऱ्या धमन्या दोन; त्यांपैकीं अंतर्ग्रैवेयक हिचें वर्णन आतां केलेंच आहे व दुसरी धमनी वेर्टेब्रल. या दोन्ही धमन्यांचा विशेष हा आहे कीं (१) या धमन्या मेंदूंत शिरण्याच्या अगोदर त्वचेच्या पृष्ठभागापासून त्या बऱ्याच खोल असतात; (२) त्यांना वळणें व नागमोडी फार असतात; व (३) दुसऱ्या धमन्यांशीं संलग्न होणाऱ्या मोठ्या शाखा नसतात. अधोजत्रु धमनी हें नांव अन्वर्थकच आहे. कारण, ती जत्रुखालून आडवी जाते व पुढें कांखेंत शिरते. तेव्हां तिला कक्षाधमनी म्हणतात. अधोजत्रुधमनीच्या शाखाः (१) वेर्टेब्रल ग्रैवेयकमण्याच्या छिद्रांतून वर कवटीच्या मागील महाछिद्रांत प्रवेश करून दुसऱ्या बाजूच्या ह्याच धमनीशीं संलग्न होऊन तिची बासिलर धमनी होते व मानेंतील अंतःस्नायु, पृष्ठवंशरज्जु, मेंदूचें आवरण या सर्वांस रक्ताचा पुरवठा करते व धमनीच्या शाखा व तसेंच कानांचा खोल भाग यांत प्रवेश करिते. (२) थायरॉइड ॲक्सिस ही शाखाच्या योगानें थायरॉइडपिंड मानेंतील स्नायु, खवाट्यावरील व पाठीचे स्नायू यांस रक्ताचा पुरवठा करिते. (३) इंटर्नल मेमरी ही छाती व उदराचे स्नायू यांस रक्ताचा पुरवठा करते. (४) इंटर कॉस्टल धमन्या फांसाळ्यामधील स्नायूंस रक्त पुरवितात. कक्षाधमनी ही पुढें बाहूच्या आंतल्या अंगानें उतरूं लागते, तेव्हां तिला भुजधमनी म्हणतात. ही धमनी शाखामुळें आजूबाजूस छातीच्या स्नायूंस रक्तपुरवठा करिते. भुजधमनी बाहूंतून खालीं उतरत उतरत कोपराच्या पुढील खळगीपर्यंत जाते व तेथें तिच्या

दोन शाखा होतात. एक बहिःप्रकोष्ठधमनी व दुसरी अंतःप्रकोष्ठ धमनी. ही दंडांतील स्नायूंस रक्त पुरविते.

बहिःप्रकोष्ठधमनीचें वर्णनः—ह्या धमनींची शाखा दुसऱ्या शाखेपेक्षां मोठी असते. ही प्रकोष्ठाच्या अंग ठ्याकडील कांठाकडून मनगटापर्यंत येते व तेथें अगदीं त्वचेच्या नजीक आलेली असते म्हणून रक्तासुधावनाचा वेग (नाडी) कसा आहे तो या ठिकाणीं स्पर्शानें नाडी पहाण्याचा विशेष प्रघात आहे. ही जागा इतर जागांपेक्षां पहाण्यास सोयीची म्हणून हीच पसंत करतात. या धमनीपासून पुढें मनगटाच्या पुढच्या अंगानें एक बारीक शाखा तळहाताकडे जाते व बाकीची धमनी अंगठ्यामार्गे येऊन पुनः विभागते. तिच्या शाखा बोटाच्या मागील भागांस रक्त पुरवितात.

अंतःप्रकोष्ठ धमनीचें वर्णनः—ही प्रकोष्ठाच्या करंगळीकडील कांठाकडून मणगटापर्यंत जाते व तेथें कमानदार वळण घेऊन अंगठ्याकडे येऊन मागील धमनीच्या एका शाखेस मिळते. या कमानीपासून बोटामधील प्रत्येक बेचकाच्या सुमारानें एकेक शाखा निघते व तेथें विभागून बोटाच्या दोन्ही बाजूंनीं नखांपर्यंत जाते.

औरस महाधमनीचें वर्णनः—ही छातींतील पोकळींतून उदराच्या पोकळींत प्रवेश करते व तीस अनेक शाखा फुटतात; पैकीं हृदयस्नायुपोषक दोन शाखा प्रथम फुटतात, तीन शाखा फुप्फुसांत जातात व पांच सहा शाखा अन्ननलिकेंत रक्तपुरवठा करतात व बरगड्यांच्या मध्यावकाशांतून जाणाऱ्या उजवीकडील दहा व तितक्याच डावीकडील मिळून त्या वीस शाखा आहेत.

औदरमहाधमनीचें वर्णनः—वरील धमनी मध्यपटलांतून उदरांत आली म्हणजे तिला हें नांव मिळतें. ही पृष्ठवंशाच्या डाव्या बाजूनें खालीं उतरत जाऊन चौथ्या कटिमण्याच्या सुमारास जाते व तेथें तिच्या दोन शाखा होतात. पोटांत असणाऱ्या सर्व इंद्रियांस या धमनीनें रक्त पुरविलें जातें. बेंबीजवळ हात ठेविला असतां ही धमनी उडतांना हातास लागते. या धक्क्याच्या स्पर्शांत कांहीं फरक वाटल्यास "वाट सरली" म्हणून आपल्या लोकांमध्यें विकार मानण्यांत येतो तो हाेय. हिच्या शाखा पुढील ठिकाणीं रक्त पुरवितात.—अन्ननलिका, श्वासनलिका, हृदयावरण, मूत्रपिंड व त्यांवरच्या गांठी, वृषण, जठर, यकृत, प्लीहा, पित्ताशय, जठराचें पार्श्वमुख, पिंड ( उदर व लहान आंतडें ), आंतडीं उदराच्या पोकळींत ज्या पडद्यानें सांवरून धरलेलीं असतात तो मेस्कूटरी नांवाचा लांब पडदा व त्यायोगानें धाकटें, मोठें व गुदाजवळचें अशीं सर्व आंतडीं. त्याचप्रमाणें नऊ नऊ शाखा बरगड्यामधील जागेस, चार चार कंबरेस, दोन धमन्या मध्यपटलाच्या खालच्या भागास आणि मिडल सक्रेल ही कटिराचे आंतील मागल्या भागास रक्त पुरवितात. सर डब्ल्यू टर्नर यानें रंगीत प्रवाही पदार्थ या धमनींत पिचकारीनें घालून असें सिद्ध केलें आहे कीं छाती व उदर यांच्या आंत असलेल्या इंद्रियांस रक्त पोंचविणाऱ्या धमन्या व या पोकळीवर आच्छादनार्थ जी त्वचा असते तींतील धमन्या या दोहोंचें अतिसूक्ष्म संलग्न होणाऱ्या शाखांच्या मार्गे दळणवळण असतें. कटिर, जंघा व पाय यांस रक्ताचा पुरवठा करणाऱ्या धमन्या जेथें औदर महाधमनीचे दोन फांटे होतात त्यांस श्रोणि धमन्या म्हणतात. हिच्या शाखा अंतःश्रोणिधमन्या बस्तिप्रदेशांतील अवयवांस रक्तपुरवठा करितात व जी दुसरी शाखा बहिःश्रोणिधमनी ती मांडींत शिरते व तेथें तिला सक्थिय धमनी हें नांव प्राप्त होतें; व त्या मांड्यांच्या पुढील व मागलि स्नायूंस रक्ताचा पुरवठा करतात. नंतर ही धमनी मांडीमार्गे पोटरीमागील खळगींत येते व तेथें तिला पॉप्लिटल हें नांव प्राप्त होतें. तेथें तिचे दोन विभाग होऊन त्यांपैकीं एक शाखा पुढें येते. तिला प्राक्जंघधमनी म्हणतात. ही गुडघ्याखालच्या पायाच्या पुढील भागास रक्त पुरवून घोट्यावरून पावलांत शिरते ( चरणधमनी ). दुसरी शाखा पोटरींतून खालीं उतरून आंतील घोट्याच्या बाजूनें जाऊन पावलाच्या तळव्यांत शिरते ( पदतल धमनी ) व पुढें हिच्याहि अंतःपदतल व बहिःपदतल या दोन शाखा पायाच्या तळव्यांत रक्त पोंचवितात व त्यांपासून पायाच्या अंगठ्यास व बोटांसहि बारीक शाखांच्या द्वारें रक्त पोंचतें.

ध म न्या च्या र च ने चें सं क्षि प्त व र्ण न.—ज्या अनेक आवरणांच्या योगानें धमनी बनलेली असते तीं खालीप्रमाणें एकाखालीं एक अशीं पांच आवरणें आहेत.(१)सर्वांच्या बाहेर मिथ्यावरण नांवाचें एक झिरझिरीत आवरण असतें.(२)याच्या आंत पिवळ्या लवचीक तंतूंचें बनलेलें एक आवरण असतें.(३) त्याच्या आंत आडव्या आकाराच्या पेशींचें सरळ बनलेलें एक आवरण असतें. मोठाल्या धमन्यांमध्यें नं. २ चें लवचीक तंतूंचें आवरण जाड असतें. कारण त्यांत रक्त अधिक येतें व जातें. मध्यम व लहान धमन्यांत स्नायुमय आवरण जाड असतें, अशाकरितां कीं तें संकोच पावून त्यायोगें रक्त पुढें ढकललें जावें. ( ४ ) याच्या आंत जाळीदार तंतुमय आवरण असतें. ( ५ ) व याच्याहि आंत मऊ कस्तराप्रमाणें एक खवल्यासारखें पेशींचें आवरण असतें व यावरूनच रक्त वहात असतें. मात्र या वहाणाऱ्या रक्तानें खुद्द धमन्यांचें पोषण होत नसतें तर त्यांनां पोषण करणाऱ्या केशवाहिन्या म्हणून सूक्ष्मदर्शक यंत्रानेंच दिसणाऱ्या अतिसूक्ष्म धमन्या त्यांच्या आवरणांतच असतात, व तशाच बारीक मज्जातंतुशाखाहि असतात. त्यांच्या योगानें धमन्यांचें संकोचन व विस्तरण शरीराच्या जरुरीप्रमाणें होतें.

गर्भावस्थेंतील मूल धमन्यांचें वर वर्णिलेल्या धमन्यांमध्यें होणारें रूपांतर यांचें अतिसंक्षेपानें वर्णनः— प्रथम रुधिराभिसरणाचें इंद्रिय म्हणून रक्त वहाण्यासाठीं धमनीची एकच कमान बनते, व तिच्यापासून गर्भावस्थेंतच कांहीं कालानें आणखी चार कमानी होऊन मग पहिल्या ५

जवळ जवळ नाहींशी होते, व बाकी राहिलेल्या चार कमानींपासून क्रमाक्रमानें वर सांगितलेल्या सर्व मोठ्या व लहान धमन्या मूल जन्मण्याच्या सुमारास तयार होतात. मानवप्राण्याच्या धमन्यांशीं इतर जलचर, व चतुष्पाद विहगादि प्राण्यांच्या धमन्यांचें तुलनात्मक पद्धतीनें व शारीरशास्त्राच्या रीतीनें परीक्षण करणें हा एक मनोवेधक विषय आहे व त्यासाठीं त्यावरचीं स्वतंत्र पुस्तकेंच अधिक माहिती मिळवण्यासाठीं जिज्ञासूंनीं पहावीं.

धमनीविस्तरण.—ही एक शरीरांत उत्पन्न होणारी व्याधि आहे. एखाद्या धमनीजवळचें मांसशिरादि फुगून त्याची एक पोकळ गांठ बनते, व या पोकळ गांठीचा संबंध त्या धमनीशीं रक्तप्रवाहाच्या योगें असतो, व म्हणून या गांठींत रक्त असतें. अगर असेंहि घडतें कीं, मूळ धमनीच एके ठिकाणीं सर्व बाजूंनीं अगर एकाच अंगानें फुगून तिच्यावर एक पोकळ गांठ उत्पन्न होते. असें होण्याचें कारण सर्वांगाचा अगर धमनींचा रोगामुळें कमकुवतपणा अगर दुखापत झाल्यामुळें धमनींत आलेला अशक्तपणा हें होय. धमनीच्या आंतील मऊ अंगास जे धमनीचे पापुद्रे असतात, त्यांच्यांत हळू हळू दाहक्रिया होणें हें नेहमींचें कारण आहे. दुखापतीनें हा रोग झालेला आढळून येतो. त्यावेळीं रक्त बाजूच्या मांसशिरादिकांत मिळून, गोठून त्याची पोकळ गांठ होते. या रोगापासून अशी रीति असते कीं ही गांठ वाढत जाऊन भोंवतालच्या महत्त्वाच्या इंद्रियांवर तिचा दाब असह्य होऊं लागल्यास त्या त्या इंद्रियांच्या सुरळीत व्यापारास धक्का पोंचतो व त्यामुळें रोगांत भर पडते.अथवा या गांठींतच रक्तसंचय वाजवीपेक्षां फाजील झाल्यास ती गांठ शरीरांतच फुटते आणि आंतील धमनीचा रक्तस्राव न थांबवितां आल्यामुळें मृत्यु येतो. या रोगाचे मुख्य भेद व वर्णन पुढें दिल्याप्रमाणें आहेः—

(१) आपोआप होणारी गांठः—ही गांठ संधिवात झालेला अगर जबर अंगमेहनतीचीं कामें करणारा अगर मूत्रपिंड बिघडलेला असा मनुष्य असेल तर त्याची एखादी धमनी कांहींहि अपघात, दुखापत न होतां आपोआप सर्व बाजूंनीं केवळ हृदयाच्या आकुंचनप्रसरणामुळें जें रक्त जोरानें धमन्यांत खेचलें जातें त्याचा जोर सहन न झाल्यामुळें एखाद्या जागीं फुगतें व गांठ बनण्यास आरंभ होतो.

(२) अपघातानें बनलेली गांठः—कांच वगैरे पदार्थ शिरून हा रोग होत असल्याचें वर सांगितलें आहेच. तसेंच लढाईत बंदुकीची गोळी अगर वागनेट मांडींत अगर दंडांत घुसल्यामुळें, अगर एखादा अनवाणी चालला असतां त्याच्या पायाच्या तळव्यांत खिळा शिरल्यामुळें त्या त्या विवक्षित धमन्या अधु होऊन या विस्तरणग्रंथी बनण्यास प्रारंभ होतो.

(३) धमनीच्या पोकळीची एकच बाजु अधु होऊन तिच्या एकाच बाजूस फुगारा येणारी गांठः—हींत असें होतें कीं धमनींतून हळू हळू या फुग्यांत थोडथोडें रक्त येतें व त्यामुळें तें सांखळून गोठण्यास अवसर सांपडतो व अशा गोठलेल्या रक्तावर पुन्हां दुसऱ्या वेळेस आणखी बाहेर आलेलें रक्त गोठून त्याचा एक थर बसतो. अशा अनेक थरांमुळें ती पोकळी भरून जाते व त्या गांठींत धमनीप्रमाणें नाडीचा धक्का हातास स्पर्शानें जो कळतो तो कळणें बंद होतें. मागून ही पोकळी व गांठ लहान होते व रोग आपोआप बरा होतो. अगर अशा तऱ्हेची गांठ असल्यावर पोटांत औषध देऊनहि रक्त गोठवणें साधतें.

(४) ज्या गांठीमध्यें धमनी सर्व बाजूंनीं एकेठिकाणीं वाटोळी फुगते तिचें वर्णनः—अशा गांठीमध्यें वर लिहिल्याप्रमाणें रोग आपोआप बरा होण्याचा संभव नसतो. कारण प्रतिक्षणीं हृदयाकडून आलेला रक्ताचा लोंढा थेट धमनीच्या व त्या गांठीच्या पोकळींतच येऊन आदळणार. मग रक्त गोठून त्याचे थरावरथर बसणार कसे ? अशा गांठीचा आकार गिरण्यांतून सूत गुंडाळलेल्या चात्या असतात त्याप्रमाणें म्हणजे वर व खालीं निमुळता व मध्येंच लठ्ठ फुगलेला असा असतो.

रोगाची चिकित्सा.—हलकें व कमी अन्न देणें. रोग्यास बिछान्यांत पडून राहून पूर्ण विश्रांति घेऊं देणें; यामुळें रक्ताभिसरणाचा जोर अंमळ कमी होतो. पण रक्त गोठून त्याचे थर बनून रोगग्रंथि आपोआप बरी होणें या उपायानें अंमळ कठिणच असतें. रक्ताभिसरणाचा जोर कमी होण्याची आशा करण्यापेक्षां अलीकडे शस्त्रवैद्य शरीरांतील ती ती धमनी शस्त्रानें अक्षम करून दिसेलशी करतो व गांठीच्यावरील धमनीचा भाग शुद्ध केलेल्या दोऱ्यानें बांधून टाकितो. यापासून जे धोके उत्पन्न होण्यासारखे पूर्वी वाटत असत तसे कांहीं प्रकार वास्तविक घडत नाहींत; व या शस्त्रक्रियेपासून फार फायदा होतो असा अनुभव आलेला आहे. पूर्वी या शस्त्रक्रिया करण्यास वैद्य धजत नसत पण आतां तर ते असें म्हणतात कीं पोट अगर छाती खेरीजकरून इतर सर्व धमन्यासंबंधीं होणाऱ्या असल्या गांठी शस्त्रक्रियेनें बऱ्या केलेल्याच बऱ्या व या शस्त्रक्रियेंत धमनीच्या गांठीच्या वरचा आणि गांठीचा खालचा भाग हे शुद्ध दोऱ्यानें बांधितात व मधील गाठ कापून बाहेर काढितात. कापलेल्या भागावरील व खालील ज्या धमनींच्या शाखा असतात त्यांस एकमेकांशीं संलग्न होतां येतें हें "धमन्यां"च्या वर्णनांत सांगितलेंच आहे. तेणेंकरून रुधिराभिसरणाच्या पूर्ववत् क्रमास अडचण पडत नाहीं. छातींतील व पोटांतलि धमनीच्या गांठी बऱ्या होण्यासाठीं शुद्ध जेलाटीनचा द्रव तयार करून कांखेमध्यें जो पोकळ भाग असतो त्यांत पिचकारीनें टोंचून घालितात. म्हणजे तें औषध रक्तांत मिसळून रक्त अंमळ सावकाश गोठून रोगाच्या गांठींतीलहि रक्त गोठण्याचा संभव असतो व रोग बरा होण्याचा हा एक उपाय आहे. याशिवाय उपचार म्हणजे यांत्रिक साधनानें धमनी गांठीच्यावर दाबून धरणें अगर रबराचे पट्टे बांधून धमनीवर दाब बसविणें हे होत. पण शस्त्रक्रिया करविणें अधिक चांगलें व फायदेशीर असतें.